# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

( शरीरखंड. )

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर; एम्. ए पीएच्. डी.

यांनीं

इतरांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला.

## विभाग सतरावा

—:*:—

## नेपाळ—बडोदें

—*—

ज्ञानं राष्ट्रधनं महत्तममिदं ब्राह्मण्यसंरक्षकम् ।
लोके क्षत्रियवैश्यकार्यघटनासौकर्यसंस्थापकम् ॥
कर्तृत्वागमबोधको ननु भवेज्ज्ञानार्थयत्नोऽधुना ।
ज्ञात्वा नागपुरे सुपण्डितजनैः संघः शुभो निर्मितः ॥

१९२५

मुद्रक—डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीं ज्ञानकोश छापखाना ८४१ सदाशिव पेठ पुणें येथें छापला.

प्रकाशकः—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड नागपूर, तर्फे श्रीधर व्यंकटेश केतकर,
८४१ सदाशिव पेठ, पुणें.

या विभागांतील विशिष्ट लेख व लेखकः—पडदा, पंप, पाणबुडे, पाणी दृर्ण, पोखरलेली विहीर—रा. वा. ह. मनोहर. पशुवैद्यक-रा. य. ना. मराठे. पारशी कायदा-श्री.बमनजी पेस्तनजी. पिकांचे रोग—प्रो. आजरेकर. पेन्सिली—प्रो. एन् एन्. गोडबोले. पेजेट—प्रो. व्ही. एन् गोडबोले.

[ ‘ परमार्थसाधन ’ हा लेख ‘ पारमार्थिक कर्म ’ या नांवानें दिला आहे. ]

[ पॉस्टडॅम लेखनागाऐवजीं पाट्सडॅम असें वाचावें ]

ज्या विषयावर शाखासंपादक नाहींत त्या विषयाची जबाबदारी संपादकमंडळावर आहे असें समजावें.

——:*S*:——




## अंतरंग परिचय.

प्रस्तुत विभागांत 'न', 'प', व 'फ' हीं अक्षरें पुरीं झालीं असून 'ब' चीं २१ पृष्ठें झालीं आहेत. त्यांचें वर्गीकरणः—

### नेपाळ—न्हावी.

**हिंदुस्थान, इतिहास,** पौराणिक.—नैमिषारण्य. प्राचीन हिंदुस्थान.—नोर्थवेस्टफ्रंटियरप्रांत. मराठे.—नेमाजी शिंदे. ब्रिटिश.—नेपियर, नोबिलो. जाती.—नेयगी, न्हावी.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल,** महाराष्ट्र.—नेरु, नेवासे, नेसरगी. मध्य प्रांत.—नेमाड. संयुक्तप्रांत.—नैनीताल. मद्रास.—नेल्लोर, नौरंगपूर. म्हैसूर.—नेलमंगल इंदूर.—नेमाड, नेमावर. नेपाळ.—नेपाळ. राजपुताना.—नैनवा, नोहर. बंगाल.—नैहाती, नौखोली. आसाम.—नोंगखलाव, नोंगस्टोइन, नोंग स्पंग, नोबोसोफो, नौगांव. मध्य हिंदुस्थान.—नौगांव. पंजाब.—नौशहर. वायव्य सरहद्द प्रांत.—नौशेरा. ब्रह्मदेश.—न्यौंगलेबिन.

**यूरोप,** ऐतिहासिक.—नेपोलियन पहिला, दुसरा व तिसरा, नेल्सन. प्रादेशिक.—न्यू कॅसल, न्यू मार्केट, न्यूरेंबर्ग.

**आफ्रिका,** प्रादेशिक.—नैरोबी, न्यासा, न्युमिडिया, न्यूबिआ.

**अमेरिका.** प्रादेशिक.—नेब्रास्का, नेवाडा, नेव्हिस, न्यूअर्क, न्यू आर्लियन्स, न्यू ग्रॅनडा, न्यू जर्सी, न्यू फाउंडलंड, न्यू मेक्सिको, न्यूयार्क, न्यू हॅम्पशायर, न्यू हेवन.

**आस्ट्रेलेशिया,** प्रादेशिक.—न्यूगिनी, न्यूझीलंड.

**शास्त्रें,** वनस्पति.—नोलकोल. रसायन—न्युन, नोबेल. पदार्थविज्ञान.—नोबिली, न्यूटन. गणित.—नेपियर. व्यापारशास्त्र.—नौकानयन. तर्क किंवा न्यायशास्त्र.—न्याय (दर्शन). कायदेशास्त्र.—न्यायपद्धति. धर्म व संप्रदाय.—नेस्टोरियन पंथ, नोहा, न्यूमन.

### प—प्लेटो.

**हिंदुस्थान, ऐतिहासिक.** वैदिक.—पंचजन, पाणि, पराशर, पर्शु, पार्थिया. पौराणिक.—पंचाल, पंडु, पंपासरोवर, परशुराम, पराशर, परीक्षित, पांचाल, पांडव, पांड्य, पुलस्त्य, पुलिंद, पुष्कलावती, पूतना, पृथु, प्रद्युम्न, प्रमीला, प्रल्हाद, प्रसेन, प्रसेनजित, प्राचेतस. प्राचीन हिंदुस्थान.—पंचमहाशब्द, पद्मिनी, परमार घराणें, परिहारवंश, पल्लव घराणें, पांडुवंश, पाण्ड्य, पारी घराणें, पालराजे, पृथ्वीराज, पोंग राज्य, पुंड्रदेश, पौंड्रवर्धन, प्रतिहार. मराठे.—पटवर्धन गंगाधरशास्त्री, पटवर्धन घराणें, पटेल-पाटील, पंडित राव, परशुरामभाऊ पटवर्धन, पवार घराणें, पानपतचें युद्ध, पारसनीस, पिंगळे, पुरंदरे घराणें, पेठे, पेंढारी, पेशवे, प्रतापसिंह छत्रपति, प्रतापसिंह महाराणा, प्रतिनिधि. ब्रिटिश.—पटवर्धन पांडुरंग नरसिंह, पाल, पूर्णय्या, पेरॉन. जाती.—पंका, पंचधा, पटवेकरी, पटेलिया, पठाण, परजा, परधान, पराया, पलैंग, पाईक, पांचकळशी, पांचाल, पाथरवट, पारधी, पारशी, पासी, पिंजारी, पुलयन, पोत्ती मलयाळ, प्रभु.

**प्रादेशिक,** महाराष्ट्र.—पट्टदकल, पट्टा, पंढरपूर, पनवेल, पन्हाळगड, परसगड, परळी, पवनगड, पळासविहीर, पांचगणी, पांचवड, पाचोरा, पाटण, पांडवगड, पारघाट, पारनेर, पारोळें, पिंपळनेर, पुणतांबें, पुणें, पुरंदर, पेठ, पेण, पौड, प्रतापगड. गुजराथ.—पंचमहाल, पंचासर, परांतिज, पलाली, पळासनी, पाटडी, पाटलावडी, पांडु, पार्डी, पाल, पालनपूर, पालिठाणा, पालियाद, पालेज, पावागड, पेठापूर, पेरिम, पोरबंदर, पीचा, प्रभास. प्रेमपूर. सिंध.—पट्टल किंवा त्रिरनकोट-पिठोरा. संयुक्त प्रांत.—पट्टी, पडरोणा, पंचायान, पिलीभित, पिलोपण, पूर्वा, पैलाणी, प्रतापगड, प्रयाग. बडोदें.—पट्टण, पाद्रा, पेटलाद. हैद्राबाद.—पटंचरु, परकाल, परभणी, परळी वैद्यनाथ, परिंडा, पर्गी, पाखाल, पाटोद, पाथरी, पातगल, पालम, पालोंचा, पैगाह, पैठण. वऱ्हाड—मध्य प्रांत.—पंचमढी, पयोष्णी नदी, परडा, परतवाडा, परलकोट, पवनी, पळसगड, पळसगांव, पाइनगंगा, पाइनघाट, पांढरकवडा, पांडुर्णा, पातुर, पारियाम, पालखेडा, पिंपळगांव. राजपुताना.—पंचभद्रा, पार्सोली, पाली, पिराव, पुष्कर, पोकरन. मध्य हिंदुस्थान.—पठारी, पन्ना, पहरा, पारोन, पालदेव, पिपलियानगर, पिपलोदा, बंगाल.—पटुआखली, पंडुआ, पबना, पलामऊ, पाकौर, पाणिहाटी, पाथरघाट, पारसनाथ, पुसा, प्लासी. बिहार—ओरिसा.—पाटणा, पाटलीपुत्र, पाललहरा, पुरी, पोराहाट, पौला. पंजाब—पंजाब, पटौडी, पठाणकोट, पतियाळा, परसुर, पलवल, पाकपट्टन, पानिपत, पालमपूर, पिंजौर, पिंडदादनखान, पिंडघेब, पैल, पैलगांव. ब्रह्मदेश.—पआन, पकोक्कू, पंगतारा, पगन, पंगमी, पंटनव, पडौंग, पर्थेरयी, पयागले. पलव, पालें, पेगु, पेगुसित्तंग कालावा, पोन्नगयून, पौक, पौकटाऊ, पौग, पौंगडे, पौंगबिन.

मद्रास.—पट्टिकोंडा, पडवा, पतुकोट्टई, पद्मनाभपुरम्, परमगुडी, परवूर, पर्लाकिमेडी, पलनाद, पलमनेर, पल्लमड, पक्षितीर्थ, पांडिचेरी, पाडिनालकनाड, पानरोटी, पापनाशम्, पार्वतीपुरम्, पालकोंडा, पालकोल्ल, पालघाट, पालनी, पालमकोट्टो, पाल्कची सामुद्रधुनी, पिठापुरम्, पुंगनूर, पुत्तुर, पुदुकोट्टई, पुरुषोत्तपूर, पुलिकत, पुलिवेंडला, पूनामल्ली, पूर्वघाट, पेद्दापुरम्, पेनुकोंडा, पेन्नर, पेरंबलूर, पेरियाकुलम्, पोंटर्गा, पोदनूर, पोदिली, पोनेरी, पोन्नानी, पोर्टोनोव्हो, पोलवरम्, पोलाची, पोलुर, प्यापल्लि, प्रोद्दतूर. म्हैसूर.—पावूगड, पुन्नाट. आसाम.—प्राग्ज्योतिषपूर. काश्मीर.—पुनर्चेराज्य. वायव्य-सरहद्द.—पेशावर. सिलोन.—पोलोनारुवा.

वाङ्मय, मराठी.—परशुराम, परसाभागवत, पोवाडे, प्रल्हाद वडेर. संस्कृत.—पंडित शं. पां., पद्मपुराण, पुराणें. पतंजली, पद्मगुप्त, परमानंद. पाली.—प्रज्ञापारमिता, पाणिनी, पोट्ठया. हिंदी.—पृथ्वीराज रासा.

आशिया, जाती.—पॅफ्लॅगोनियन लोक. प्रादेशिक.—पॅफिला, परोपनिषदी, पर्गामम, पर्सिस, पर्सेपोलिस, पॅलेस्टाईन, पॅल्माइरा, पसारगडी, पाँटस, पिसिडिया, पुकेट, पेकिंग, पेनांग, पेरिमबेट.

यूरोप, ऐतिहासिक.—पार्नेल, पार्लमेंट, पिट, पीटर दि ग्रेट, पेरिक्लीस. पोपसत्ता, प्रादेशिक.—पदुआ, पॅरिस, पर्थ, पलेर्मो, पॅव्हिआ, पॉट्सडॅम, पांपी, पार्मा, पिन्स्क, पिरनीज, पिसा, पेरिंथस, पो नदी, पोर्टमेहॉन, पोर्ट्समाऊथ, पोर्तुगाल, पोलंड, पोसेन, प्राग, प्रेसबर्ग, प्रेस्टन, प्लीमौथ, वाङ्मय—पोर्तुगीज वाङ्मय, पोललोकांचें वाङ्मय, चरित्रें:—पोप, प्लिनी.

आफ्रिका. प्रादेशिक.—पिटर मारिट्झबर्ग, पिरामिड, पूर्व आफ्रिका, पेंबा बेट, पोर्टसय्यद, प्रिटोरिया.

अमेरिका. प्रादेशिक.—पनामा, पॅराग्वे. पिट्सबर्ग, पेरामारिबो, पेरू, पोटोसी, पोर्ट ऑ प्रिन्स, पोर्टोरिको, प्रॉव्हिडन्स.

शास्त्रें, वैद्यक.—पथ्यापथ्यविचार, परिक्रमणकंपवायु, पशुवैद्यक, पांडुरोग, पादांगुलक्षत, पादांगुष्ठ वातरोग, पानविभ्रम, पीतज्वर, पेटके, पेप्सीन, पेरें, पोटशूळ, प्रदररोग, प्रसूतिविज्ञान, प्रास्टेटपिंडाचे व्याधी, प्लेग. पदार्थविज्ञान.—पदार्थविज्ञानशास्त्र—पाकस, पागेनडार्फ, पाणबुडे, पेपिन, प्रकाश, प्रकाशलेखन प्रकाशव्यतिकरण, प्रकाशशोषण, प्रवर्तकवेष्टन. रसायन.—पॅरॅफिन, परपाम्ल, पलाद, पाणी, पातन किंवा ऊर्ध्वपातन, पारद, पालाश, पीताम्ल, पुतलिकाम्ल, पैत्तोलन, प्रतिज्वरिन, प्रयामिन, प्रमास्तजनक, प्राण, प्राणिदीकरण, प्राणिद, प्राणोज्जज्वोत, प्रायोज्जिदें, प्लव, प्लवप्रतिन, प्लवरंजनी, प्लातिन. चरित्रें—पॅर्किन, पाश्चूर, प्राउट, प्राऊस्ट, प्रीस्टले. वनस्पति.—पडवळ, पतंग, पपनस, पपया, परवर, पळस, पाच, पायरी, पारिजात, पालक, पावटा, पासली, पिकांचे रोग, पिर्क, पिंपळी, पिशुलोस, पिस्ता, पुदीना, पेरू. प्राणिशास्त्र.—पक्षी, पाणघोडा, पिपीलिकाभक्षक, पापट, प्राणिशास्त्र. खनिजशास्त्र.—पाच, पायरोल्यूसाइड, पाषाणचुंबक, पिचब्लेंड. यंत्रशास्त्र.—पडदा, पंप, पाणी देणें, पुली. युद्धशास्त्र.—पाणतीर, पिस्तुल. समाजशास्त्र.—पिरलो, प्रूडाँ. प्रेम. ज्योतिष.—पंचांग, पृथ्वी, पौर्णिमा. शिक्षणशास्त्र.—पेस्टालोझी. कायदेशास्त्र.—पंच, पुराव्याचा कायदा, पेटंट. तत्त्वज्ञान.—पेरिपॅटेटिक्स, प्रत्यक्षप्रमाणवाद, पायथॅगोरस, पिऱ्हो. प्रोटॅगोरस, प्लेटो. शासनशास्त्र.—पेन्शन, पोस्ट, प्राप्तीवरील कर, प्रिव्हिकौन्सिल व कॅबिनेट. अर्थशास्त्र.—पेढ्या व पत. औद्योगिक.—पेंड, पेन्सिल, पेपरमिंट, पोखरलेली विहीर. भाषाशास्त्र.—पहलवी, धर्म व संप्रदाय.—परमेश्वर, पांचरात्र, पाताल, पारमार्थिक कर्म, पावित्र्य, पाशुपतदर्शन, पितृपूजा, पिशाच व पिशाचपूजा, पुनर्जन्म, पुराणें, पुंसवन, पोपसत्ता, पौरोहित्य, प्रवर, प्रस्थानत्रयी, प्रॉटेस्टंट पंथ, प्राणिपूजा, प्रायश्चित, प्रेत व प्रेतसंस्कार, प्लूटो. अक्षरविकास.—प.

## फ—फ्लेमिश वाङ्मय.

हिंदुस्थान, ऐतिहासिक, मुसुलमान.-फारुकी राजे. मराठे.-फडके हरिपंत, फडणवीस, फत्तेसिंह भोसले. जाति.-फकीर.

प्रादेशिक, महाराष्ट्र.—फर्कांडे, फलटण, फैजपूर. वऱ्हाड मध्यप्रांत—फत्तेखर्डा. राजपुताना.—फलोदी. पंजाब.—फगवार, फत्तेगड, फत्तेजंग, फरीदकोट, फरुकनगर, फालिया, फाझिल्का, फिरोझपूर, फिलोर, फुलकियन संस्थानें, फुल निझामत. संयुक्तप्रांत.—फत्तेपूर, फत्तेपूरशिक्री, फत्तेहाबाद, फरुखाबाद, फिरोझाबाद. फुलपूर, फैजाबाद. बंगाल.—फरीदपूर, फेनी. मद्रास.—फोर्टसेंट डेव्हिड, फ्रेंचइंडिया.

वाङ्मय, मराठी.—फडके गंगाधरशास्त्री.

आशिया, प्रादेशिक.-फिजी बेटें, फिनिशिया, फिलिपाईन बेटें, फुकोक, फुची, फैजाबाद, फोर्ट संडेमन, फ्रिजिया, फ्रेंच-इंडोचीन, फ्लारेस. वाङ्मय.—फारशी, फाहिआन, फिरदौसी, फेरिश्ता.

यूरोप. ऐतिहासिक.—फर्डिनंड राजे, फिलिप राजे, फ्रेडरिक दि ग्रेट, प्रादेशिक.—फालकर्क, फालमथ, फिन्लंड, फिन्सबरी, फिलिप्पी, फ्रँकफोर्ट-ऑन-ओडर, फ्रँकफोर्ट-ऑन-मेन, फ्रान्स, फ्रेडरिकस्टॅड, फ्लॉरेन्स, वाङ्मय.—फ्रेंच, फ्लेमिश.

आफ्रिका, जाती.—फुला. प्रादेशिक.—फॅशोडा, फेझ, फ्रीटाऊन, फ्रेंच कांगो, फ्रेंच वेस्ट आफ्रिका.

अमेरिका, ऐतिहासिक.—फ्रँकलिन. प्रादेशिक.—फिलाडेल्फिया, फ्लॉरिडा.

शास्त्रें, वैद्यक.—फुप्फुसदाह, फुप्फुसविस्तृति, फुप्फुसावरणदाह. रसायन.—फुंकनळी, फ्यूमेल तेल, फेलिंग, फ्रेसनेल. पदार्थविज्ञान.—फारेनहैट, फ्रँकलिन. फ्रौन्होफर. वनस्पति.—फणस, फलुम. शिक्षणशास्त्र.—फ्रोबेल. कायदा—फौजदारी कायदा. अर्थशास्त्र, फॉसेट. शासनशास्त्र.—फडणवीस. समाजशास्त्र.—फोरियर. तत्त्वज्ञान.—फायर्ले. शिल्पशास्त्र—फर्ग्युसन. संशोधन.—फर्लांग. अक्षरविकास.—फ.

## ब—बडोदें.

हिंदुस्थान, ऐतिहासिक-पौराणिक.-बकासुर. मुसुलमानी.-बख्तबुलंद. जाती.-बंजारिया, बटवाल. प्रादेशिक, महाराष्ट्र—बंकापूर. गुजराथ.—बजाणा, बडोदें. मध्यहिंदुस्थान.—बडवानी. वऱ्हाड-मध्यप्रांत—बटकागड, बडनूर, बडनेरा. पंजाब.—बघात. बंगाल.—बकरगंज, बंगाल. बिहार ओरिसा.—बक्सार. मद्रास.—बंगनपल्ले. म्हैसूर.—बंगलूर. संयुक्तप्रांत.—बटवा. वाङ्मय, बंगालीवाङ्मय, बंकिमचंद्र. आशिया, प्रादेशिक.—बॅक्ट्रिया, बगदाद, बटेव्हिया. यूरोप, प्रादेशिक.-बकिंगहॅम. शास्त्रें—वनस्पति.—बचनाग, बजरबट्टू, बटाटे, बडिशोप. शासनशास्त्र.—बजेट. अक्षरविकास.—ब.

लो क.—नेवार लोकांइतकी गुरखा लोकांत विवाहबंधनें नाहींत. मुलीला काडी मोडून देण्याचा अधिकार असतो व कांहीं अटींनंतर ती पहिल्या नवऱ्याकडे परतहि येऊं शकते. विधवाविवाहाची चाल इकडे नाहीं. मूळचे रहिवाशी मंगोलियन आहेत. खप, मगार, गुरंग व ठाकूर इत्यादि जातींचे लोक लष्करांत आहेत. येथें येऊन राहिलेल्या बाहेरील हिंदू लोकांचा येथील मूळच्या रहिवाश्यांशीं बेटीव्यवहार होऊन ही प्रजा झालेली आहे. नेपाळखोऱ्याच्या पश्चिमेस जरी त्यांचा मूळप्रदेश आहे तरी गुरखा लोकांनीं हा देश पादाक्रांत केल्यापासून हे संकरज लोक सर्व देशभर पसरले. नेपाळखोऱ्यांत नेवारी लोक रहातात. ह्या लोकांनां शेतकीचें, व्यापाराचें व लांकूड व धातूंवरील खोदींव कामाचेंहि चांगलें ज्ञान आहे. येथें तिबेटियन ज्ञातींतील कांहीं लोक असून, त्यांनां 'भोतिया' ( भूत ) लोक म्हणतात. त्याचप्रमाणें किरान्ती, मुर्मी, लिम्बू, लेपचा, थारू, बोकसा वगैरे जातींचे लोक आहेत. गुरखा लोक शरीरबांध्यानें ठेंगणे पण आडदांड, धिप्पाड व काळे आहेत. नेवार लोक जरा उंच व सडपातळ असतात.

भा षा.—पश्चिम नेपाळांत कामी व भ्रामु ह्या दोन भाषा प्रचारांत आहेत. मध्यनेपाळांत पधि, पहाडी आणि धृइ; व कोसी भागात हायू अथवा वायू ह्या भाषा बोलतात. साऱ्या नेपाळची एक सर्वसाधारण पर्वतिया नांवाची भाषा आहे. पाल्पा येथील लोक पाल्पा नांवाची एक वेगळीच भाषा बोलतात.

ध र्म.—येथील बहुतेक लोक हिंदू धर्माचे व कांहीं बौद्ध आहेत. चीनहून आलेल्या मन्जुसरीनें नेवारी लोकांत बौद्ध धर्माचा प्रसार केला असें म्हणतात. पण सध्यां प्रचारांत असलेला बौद्ध धर्म खरा नसून त्यांत हिंदू धर्माच्या तत्त्वांचा भेसळ आहे. भोतिया, लिम्बू, लेपचा ज्ञातींतहि कांहीं लोक बौद्धधर्मीय आहेत. पण ह्या सर्वांच्या चालीरीतींत पुष्कळ साम्यता आहे. येथील लोक फारच धर्मभोळे आहेत. व्यवहारांतील प्रत्येक गोष्टीला ते कांहीं तरी मोठें धार्मिक स्वरूप देतात. ह्यामुळें भोंदू लोकांचें व फलज्योतिषांचें चांगलें फावतें. बौद्ध व हिंदू दोघेहि प्रेतें जाळतात. येथील हिंदू मांसाहारी आहेत. ते रक्षी नांवाची दारूहि पितात. मच्छेन्द्रजत्रा, इन्द्रजत्रा, दसरा, दिवाळी, होळी, हे जरी हिंदूंचे सण आहेत तरी बौद्ध लोकहि ते पाळतात.

शे त की.—नेपाळच्या खोऱ्यांत दोन तऱ्हेची जमीन आहे. कांहीं प्रदेश वालुकामय आहे व कांहीं ठिकाणीं पिकाऊ जमीन आहे. नेवार लोक बहुतेक शेतकीचा धंदा करतात. पेरणी व कापणी वगैरे सर्व हातानेंच करतात. जमीन उंचीपैकीं नसल्यामुळें खत घालण्याची जरूरी पडते. येथील खत म्हणजे एक तऱ्हेची जमिनींत सांपडणारी मातीच असते. हिंवाळ्यांत ती खणून आणून शेताच्या बाजूनें तिचे ढीग घालून ठेवतात, व पेरणीच्या अगोदर ती वाळली म्हणजे सर्व शेतभर पसरतात. शेतें फार मोठीं नसतात. ह्या भागांत भाताची पेरणी होते. स्वाभाविकच हिमालयाच्या पायथ्याच्या उतारांत हा प्रदेश असल्यामुळें पाटाच्या द्वारें शेतांनां पाणी पुरविण्याची चांगली सोय झाली आहे.

कांहीं ठिकाणीं नद्यांच्या तीरांनीं पाणथळ जागीं नुसतें भाताचेंच उत्पन्न होतें. कोठें कोठें हिंवाळ्यांत गहूं व पावसाळ्यांत उडीद पेरतात. भाताचें उत्पन्न मुख्य असून गव्हाचें उत्पन्नहि बरेंच आहे पण गहूं हें लोकांचें खाण्याचें मुख्य धान्य नसल्यामुळें या पिकाकडे फारसें लक्ष देत नाहींत. गव्हापासून बहुतकरून आंब व दारू काढतात. खोऱ्यामध्यें जव व ओट नांवाचें धान्यहि थोड्या प्रमाणावर काढतात. ओट धान्याचा उपयोग घोड्याला दाणा देण्याकडे करतात. मकाई खोऱ्यांतील उंचवट्याच्या भागांत पेरतात. त्याप्रमाणें आरुआ नांवाचें धान्यहि मकाईप्रमाणेंच माथ्यावर पेरतात. बटाट्याचें पीक बरेंच असून व ज्वारीहि बरीच पिकते. इकडे दुष्काळ बहुधां पडत नाहीं. खोऱ्यांत सर्व तऱ्हेचा भाजीपाला होतो. उत्तमपैकीं चवदार संत्रीं व इडलिंबें होतात. तराईतील पीक बहुतेक अंगीं जमिनीवर अवलंबून आहे. तांदूळ, गहूं व ऊंस हीं येथील मुख्य पिकें होत. नेपाळसरकारला तराईपासून फार मोठें उत्पन्न आहे. शेतसारा रयतवारी तत्त्वावर आहे. सरकारास किंवा माळगुजरास कूळ जो सारा देतें तो किती द्यावयाचा हें जमिनीवर व उगवण्याऱ्या पिकावर अवलंबून असतें. सारा पैशाच्या किंवा धान्याच्या रूपानें सरकार घेतें.

जं ग ली प्र दे श.—जंगलाचे तीन विभाग केले आहेत:(१) तराई, (२) डोंगरखोरें व (३) पर्वतमाथा. तराईमध्यें मोठमोठें गवत व दलदलीची जमीन असते. यांत शिसवी वृक्षांचें मोठें जंगल असून खैराचीं झाडेंहि मुबलक आहेत. डोंगरखोरें जंगलांत साल, असेना वगैरे वृक्षांचें जंगल आहे. येथून इमारती लांकूड फार चांगलें निघूं शकतें. येथें देखील बाबर जातीचें गवत फार आहे. तिसऱ्या भागांत देवद्वार लांकूड मुबलक असून शिसपेन्सिलीस लागणारें लांकूडहि पुष्कळ आहे. कांहीं भागांत चांफ्याचीं झाडें आहेत. सरहद्दींतील सर्व जंगल खुद्द नेपाळसरकारच्या ताब्यांत आहे. जंगलाची जशी घ्यावी तशी काळजी घेतली जात नाहीं. सरहद्दीपर्यंत रेल्वे गेली आहे तरीपण इमारती लांकडाचा व्यापार वाढला आहे. मेण, मध वगैरे इतर उत्पन्न मात्र मोठ्या प्रमाणावर आहे.

धं दे.—तराईच्या जंगलांत थारु लोक रहातात. ब्रह्मदेशांतील काचीन लोकांप्रमाणेंच यांची राहणी आहे. हे लोक शिकारी असून शेतकीहि करतात व गुरें पोसून दुधदुभत्याचाहि व्यापार करतात. खनिज पदार्थांकडे सरकारनें अजून लक्ष पुरविलें नाहीं. इकडे तांबें, लोखंड, व गंधक विपुल सांपडतें. वापरण्याचें जाडेभरडें सुती कापड बहुतेक बायकाच

घरीं विणतात. भुतिया हे लोक लोंकरीचीं कांवळीं तयार करतात. येथें एक तऱ्हेचा जाड कागद तयार होतो. नेवार लोक सोनारी व सुतारी कामामध्यें कुशल असून व्यापारीहि आहेत.

*व्यापार व दळणवळण.*—नेपाळांत व्यापार दोन तऱ्हेचा आहे.एक हिमालयांतील मार्गातून तिबेटाशीं व दुसरा दक्षिणेकडे इंग्रज सरहद्दीवरील प्रांताशीं. पैकीं तिबेटच्या व्यापारापासून सरकारास तीन लाख रुपयांचें उत्पन्न येतें. नेपाळांतून तिबेटांत तांब्याचीं घडविलेलीं भांडीं, कापें, व लोखंड वगैरे माल जातो, व तिबेटांतून पशमिना ( शालजोडयाकरितां लोंकर ), जाडेभरडें लोंकरी कापड, मीठ, टांकणखार, पारा, सुवर्णरज व सुकीं फळें इत्यादि माल येतो. नेपाळच्या ब्रिटिश हिंदुस्थानाबरोबरच्या आयातनिर्गतीचे १९१७-१८सालचे आंकडे पुढील प्रमाणें आहेत. हिंदुस्थानांत आयात १५६३०४०पौंड व निर्गत १४०५००० पौंड होती. सरहद्दीवरील व्यापाराचीं मुख्य ठिकाणें बीरगंज, नेपाळगंज, बटवाल, हनुमाननगर, आणि धुलवारी हीं होत. सरहद्दीवरून थेट खाटमांडूपर्यंत पक्का रस्ता आहे. भीमजेडीच्या पुढें पायीं हमालाच्या पाठीवर ओझें देऊन जावें लागतें. नेपाळांत दळणवळणाची चांगली व्यवस्था नाहीं. रस्ते वगैरे केल्यानें पहाडांतील ठिकाणाचें अजिंक्यत्व जातें व परवशतेस बळी पडावें लागतें अशी स्थानिक लोकांची समजूत आहे. रक्षाल व खाटमांडूमध्यें जो रस्ता आहे त्याच रस्त्यानें फक्त यूरोपीयन लोक नेपाळांत जाऊं येऊं शकतात.

*राज्यव्यवस्था.*—मुख्य राज्यव्यवस्था प्रधानाच्या हातीं असते. त्याच्या परवानगीशिवाय सार्वजनिक पैशाचा व्यय केला जात नाहीं सर्व तऱ्हेच्या नेमणुका करण्याचा व अधिकाऱ्यांना शिक्षा करण्याचा अधिकार प्रधानाकडेच असतो. राज्यांत इलम, धनकूट, गुरखा, पल्पा, दोती, नकमुलुख, बटवाल, चितवण, मुरंग, इत्यादि जिल्हे मुख्य व मोठे होत. दिवाणी व फौजदारी न्यायासनें येथें आहेत. सर्व प्रदेशाची 'सर्कला' त विभागणी केली आहे.

खून किंवा गोवध करणारांस देहान्तशासन असून ब्राह्मणांनां किंवा बायकांना फांशीं देण्यांत येत नाहीं. नेपाळी लोक मोठे कायदेनिर्बंध मानणारे अशी त्यांची ख्याति असल्यामुळें बहुतेक अन्याय किंवा अपराध फार थोडे घडतात.उत्पन्न व खर्चाच्या बाबीचें खातें प्रधानाच्या हातीं असल्यामुळें त्याविषयीं निश्चित असें कांहींच सांगतां येत नाहीं. नेपाळी सरकारचें वार्षिक उत्पन्न सुमारें २ कोटी रुपयांचें आहे. शेतसारा, कर व महसूल, खाणी, जंगल व हक्कमावी इत्यादि उत्पन्नाचीं मुख्य द्वारें होत.

मोहोर नावाचें चांदीचें नाणें प्रचारांत आहे. त्याची किंमत साधारणपणें आपल्याकडील ६ आणे ८ पैंबरोबर असते. खाटमांडू येथें टांकसाळ आहे. तांब्याचे ५० पैसे म्हणजे वरील एक मोहोर. हिंदुस्थानांतील नाणीं तिकडे चालतात.

जे लोक आपखुशीनें फौजेंत शिरतात त्यांस फर्मांत कमी ३ वर्षे नोकरी करावी लागते. नेवार लोकांनां हत्यारें वापरण्याची परवानगी नाहीं. निकडीच्या समयीं प्रत्येक सुदृढ मनुष्यास लढण्यास तयार असावें लागतें सेनापति हा नेहमीं प्रधानाचा कनिष्ठ बंधू असतो. सैन्यांतील इतर जागा देखील प्रधानाच्या आप्तबंधूंस मिळतात. गुणाप्रमाणें निवड करण्याची चाल तिकडे नाहीं.

नेपाळच्या वैद्यकखात्यानें फार सुधारणा केल्या आहेत. खाटमांडु येथील बीर हॉस्पिटलमध्यें डॉ. के. एल्. गुप्त हे चीफ मेडिकल ऑफिसर आहेत. तुरुंगाकरितां निराळा डॉक्टर आहे. स्त्रियांच्या हॉस्पिटलवर मिस् एच्. सेन, एम्. बी. या मुख्य आहेत. बॅक्टिरिऑलॉजिकल लॅबोरेटरी ( जंतुविषयक प्रयोगशाळा ) उत्तम साधनयुक्त आहे. एक्सरेज् बिल्डिंग नुकतीच पुरी झाली असून तींत सामान भरपूर आहे. ऑपरेशन थिएटर ( शस्त्रक्रियेची जागा ) बीर हॉस्पिटलमध्यें नवें बांधलें असून त्यांत शस्त्रसामुग्री उत्तम व भरपूर आहे. याशिवाय नेपाळांत एकंदर १४ मोफत दवाखाने आहेत.

इंजिनियरिंगखात्यांत हल्लीं नेपाळी इसम पाटणा, पुणें, रुरकी वगैरे ठिकाणीं शिकलेले आहेत व ते इंग्लंड व अमेरिकेंतील इंजिनियरिंग असोशियनांचे ऑनररी सभासद आहेत. सडकांची व ड्रेनेजची सुधारणा सर्वत्र सुरू आहे. तसेंच लांकडी व लोखंडी पूल, विश्रांतिगृहें ठिकठिकाणीं बांधण्यांत येत आहेत. अलीकडे भिमफेदी, भिछकर, भाटगांव व पाटण या चार ठिकाणीं नवे जलसंचय ( वॉटर-वर्क्स ) बांधले आहेत, व हीं कामें नेपाळी इंजिनियरांनीं केलीं आहेत. फारपिंगपासून सुमारें ७ मैलांवर हायड्रो-इलेक्ट्रिक पॉवर-हाऊस बांधलें असून शहरांत सर्वत्र विजेचे दिवे झाले आहेत. रेल्वेचे दोन फांटे बांधण्याचें काम चालू आहे. टेलिफोनची योजना पुरी झाली असून सरहद्दीवरील बिरगुंज व रक्सौल या ठिकाणापासून राजधानीपर्यंत त्वरित-संदेश जाऊं लागले आहेत. विजेच्या शक्तीवर दळण्याच्या गिरण्या व छापखाने चालू आहेत. शेती व खाणी यांची सुधारणा चालू असून तोफा व दारुगोळा तयार करण्याचे कारखाने सुरू झाले आहेत. ही सर्वांगीण सुधारणा सांप्रतच्या प्रधानाच्या कारकीर्दीतील आहे.

नेपाळांतून लोक बाहेरदेशीं सारखे जात असतात व यांची वस्ती पूर्वेकडील प्रदेशांत पसरत आहे. हल्लींच्या मुख्य प्रधानानें नेपाळांत चालू असणारा गुलामांचा व्यापार बंद करण्याकरितां फार खटपट केली आहे. नेपाळांत १५७१९ गुलामांचे मालक असून गुलामांची संख्या ५१४१९ आहे. गुलामांच्या मालकांचे तीन प्रकार आहेतः—( १ ) ज्यांनां वडिलोपार्जित मालमत्ता म्हणून गुलामांवर मालकी मिळते असे इसम; हे गुलामांनां घरांतील नोकरांप्रमाणें किंबहुना

घरांतील कुटुंबीयांप्रमाणें ममतेनें वागवितात. ( २ ) शेतांच्या कामाला गुलामांस लावणारे मालक; आणि ( ३ ) जे लोक केवळ व्यापार करण्याकरितां गुलाम वाळगतात ते. नेपाळच्या राजानें खुशी असेल त्या मालकाकडून गुलाम विकत घेऊन नंतर त्यांनां स्वातंत्र्य देण्याच्या कार्याकरितां ३४ लक्ष रुपये या कार्याकरितां उभारलेल्या फंडास दिले आहेत. नेपाळांतील सर्वच गुलामांस त्यांच्या मालकांनां कायद्यानें ठरविलेली नुकसानभरपाई देऊन व त्याच गुलामांनां त्याच मालकांकडे आणखी ७ वर्षे कामाकरितां ठेवून नंतर पूर्णपणें स्वातंत्र्य देण्याचा विचार येथील राजाच्या मनांत आहे

इ ति हा स.—डॉ. भगवानलाल इंद्राजी याचा " नेपाळमधील शिलालेख " हा ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वीचा 'नेपाळचा इतिहास' म्हणजे आधुनिक वंशावळीवरून लिहिलेला होय. कर्कपट्रिक व प्रिंसेप यांनीं दिलेल्या वंशावळया बहुधा पार्वतीय भाषेतील एका लहान ग्रंथाधारें दिलेल्या असाव्या. डॉ. राईट याचा इतिहास ललितपूरच्या महाबुद्धविहारांत सुमारें शंभर वर्षांपूर्वी रहाणाऱ्या बुद्ध भिक्षूच्या वंशावळीच्या आधारें बहुतेक रचिला आहे.

राईटच्या पुस्तकांशीं डॉ. भगवानलाल यानें आपल्या हस्तलिखित पार्वतीय वंशावळया ताडून पाहून राईटचा ग्रंथ विश्वसनीय आहे असें त्यानें जाहीर केलें. परंतु त्यानें कांहीं महत्त्वाच्या चुकांच्या दुरुस्तीबद्दल सूचना केल्या आहेत. या बौद्ध पार्वतीय वंशावळीप्रमाणें नेपाळच्या निरनिराळया राजवंशावळी व त्यांच्या कारकीर्दीचीं वर्षे पुढें दिल्याप्रमाणें आहेतः—

(१) मातातीर्थ याचें गोपाळघराणें:—हें ५२१ वर्षे टिकलें. याला गोपाळ म्हणण्याचें कारण याचा मूळ पुरुष गोपाळ ( गवळी ) होता हें होय. ( १ ) भुक्तमानगत ८८ वर्षे. (२) जयगुप्त ( भुक्तमानगतचा पुत्र ) ७२ व. याचा पुत्र ( ३ ) परमगुप्त ८० व. याचा पुत्र ( ४ ) हर्षगुप्त ९३ व. याचा पुत्र ( ५ ) भीमगुप्त ३८ व. याचा पुत्र ( ६ ) मणिगुप्त ३७ व. याचा पुत्र ( ७ ) विष्णुगुप्त ४२ व. याचा पुत्र ( ८ ) यक्षगुप्त ७२ वर्षे हा निपुत्रिक मारल्यामुळें यानंतर अहीर घराणें सुरू झालें.

(२) अहीर घराणें:—हें घराणें हिंदुस्थानांतून आलें. (१) वरसिंह, ( २ ) जयमतिसिंह, (३) भुवनसिंह ( याला पूर्वेकडील किरात घराण्यानें जिंकिलें ).

(३) किरात घराणें:—हें गोकर्ण येथें रहात होतें. हें एकंदर १११८ वर्षे टिकलें. (१) कलंबर हा १२ द्वापारशेषमध्यें आला. त्याचा पुत्र (२) पवी, नंतर (३) स्कंधर, (४) वलंभ, ( ५ ) हरीं, ( ६ ) हुमाति, हा पांडवांबरोबर अरण्यांत गेला. याचा पुत्र ( ७ ) जितेदास्ते, यानें भारतीय युद्धांत पांडवांनां मदत केली, व त्यांतच तो मारला गेला. याच्याच हयातींत शाक्यसिंहबुद्ध हा नेपाळांत आला. त्याचा पुत्र ( ८ ) गलि. नंतर ( ९ ) पुष्क, (१०) सुयर्म, ( ११ ) पर्ब, ( १२ ) हुंक, ( १३ ) स्वानंद, ( १४ ) स्थुंको, याच्यास वेळीं पाटलीपुत्राचा राजा अशोक हा नेपाळांत आला होता. अशोकाच्या चारुमतिनामक मुलीचें लग्न देवपालनामक क्षत्रियाशीं झालें, व त्यानें देवपाटणाची स्थापना केली. नंतर ( १५ ) गिघ्रु, ( १६ ) नने, ( १७ ) लुक, ( १८ ) थोर, ( १९ ) टोको, ( २० ) वर्म, ( २१ ) गुज, ( २२ ) पुष्कर, ( २३ ) केस, ( २४ ) सुंस, ( २५ ) सम्मु, ( २६ गुणन, ( २७ ) खिबु, ( २८ ) पटुक, याच्यावर सोमवंशी रजपुतांनीं हल्ला केला होता. यानें शंखमुलतीर्थ हा नवा किल्ला बांधला (२९) गास्ति, यास सोमवंशीयांनीं हांकून लावलें यानें गोदावरी जवळील फुलोच्छ या ठिकाणीं नवीन किल्ला बांधला, व अखेरीस यानें आपलें राज्य गमावलें

(४) सोमवंशी घराणें:—( १ ) निमिष, ( २ ) मनाक्ष, ( ३ ) काकवर्मन, ( ४ ) पशुप्रेक्षदेव, यानें पशुपतीचें देवालय पुन्हां दुरुस्त केलें व हिंदुस्थानांतून वऱ्याच लोकांनां वसाहती करण्यास नेपाळांत आणलें. (ख्रि. पू. १८६७; कलियुग १२३४ ). ( ५ ) भास्करवर्मन, यानें सर्व हिंदुस्थान देश जिंकला, देवपाटणचा विस्तार वाढविला व पशुपतीची आराधना त्यानें ताम्रपटावर खोदवून घेऊन चारुमतीविहारांत ती ठेवली. याला मुलगा नसल्यामुळें यानें सूर्यवंशीय मुलगा दत्तक घेतला.

(५) सूर्यवंशी घराणें: —हे लिच्छिवि असून पूर्वभागांत राज्य करीत होते. (१) भूमिवर्मन कलियुग याचा १३८९ मध्यें राज्याभिषेक झाला ( म्हणजे ख्रि. पू. १७१२ ). यानें आपली राजधानी बाणेश्वर येथें नेली. ( २ ) चंद्रवर्मन, ६१ वर्षे. ( ३ ) जयवर्मन, ८२ व. ( ४ ) वर्षवर्धन, ६१ व. ( ५ ) सर्ववर्मन, ७८ व. ( ६ ) पृथ्वीवर्मन, ७६ व. ( ७ ) ज्येष्टवर्मन, ७५ व. ( ८ ) हरिवर्मन, ७६ व. ( ९ ) कुबेरवर्मन, ८८ व. (१०) सिद्धिवर्मन, ६१ व. ( ११ ) हरदत्तवर्मन, यानें (८१ वर्षे) चार नारायणानां चांगु, चेंगुनु, इचांगु, व शिखर हीं देवळें बांधलीं व बुद्धनीलकंठ येथें जलशयनाचें देऊळ बांधिलें. ( १२ ) वसुदत्तवर्मन, ६३ वर्षे; (१३) पतिवर्मन ५३ वर्षे; (१४) शिववृद्धिवर्मन, ५४ व. ( १५ ) वसंतवर्मन, ६१ व. (१६) शिववर्मन, ६२ व. (१७) रुद्रदेववर्मन ६६ व. (१८) वृषदेववर्मन, यानें विहार बांधलें व अन्य बुद्धदेवतांच्या मूर्ती स्थापिल्या. याच्या भावाचें नांव बालार्चन असून हाहि बुद्धच होता. ६१ व. (१९) शंकरदेव यानें पशुपतीच्या त्रिशूळाची स्थापना केली. ६५ वर्षे. (२०) धर्मदेव, ५९ व. (२१) मानदेव यानें मतिराज्यानजीक विहार बांधिला. त्याचें नांव नकविहार असून कांहींच्या मतें खासा-चैत्य असें होतें. ४९ वर्षे (२२) महीदेव, ५१ व. (२३) वसंतदेव; याचा राज्यारोहणकाल २८०० किंवा ख्रि. पू. ३०१ हा होता. ३६ व. (२४) उदयदेववर्मन ३५ व. ( २५ ) मानदेववर्मन, ३५ व. ( २६ ) गुणकामदेववर्मन ३० व. ( २७ ) शिवदेववर्मन, यानें देवपाटण शहर बरेंच वाढविलें, व त्या ठिकाणीं आपली राजधानी नेली.

त्यानें पुन्हां शाक्तविधी सुरू केले व आपण स्वतः भिक्षु झाला. त्याचा मुलगा पुण्यदेववर्मन यानेंहि त्याचेंच अनुकरण केलें. एक शिवदेव श्रीहर्षाचा समकालीन होता. ५१व. ( २८ ) नरेंद्रदेववर्मन, ४२ व. ( २९ ) भीमदेववर्मन्, ३६ व. ( ३० ) विश्वदेववर्मन, ४७ व. याच विश्वदेववर्मनने आपली कन्या अंशुवर्धन नांवाच्या ठाकुरी वंशजास दिली. याच्याच राज्यांत विक्रमादित्य नेपाळांत आला व त्यानें आपला संवत्सर तेथें सुरू केला ( ५१ वर्षे ).

(६) ठाकुरी वंशः—(१) अंशुवर्धन हा शेवटल्या सूर्यवंशी राजाचा जांवई असून फार शूर व विद्वानहि होता. यानें शब्दविद्याशास्त्र हा ग्रंथ लिहिला आहे. ह्यूएनत्संग म्हणतो कीं अंशुवर्मन व अंशुफमो हे एकच आहेत. हा प्रथम श्रीहर्षाचा मांडलिक होता;त्याच्या पश्चात हा स्वतंत्र झाला (६४८) हा पश्चिम नेपाळचा राजा होता. त्याच्या वंशाचा मगध राजाशीं संबंध होता. यानें आपली राजधानी मध्यलखु येथें नेली. यानें एक ७ तोटयांची पाणपोई बांधली व तीवर एक शिलालेख लिहिला.(२) कृतवर्मन, ८७ व. (३) भीमार्जुन, ९३ व. ( ४ ) नंददेव याच्या राज्यांत शालिवाहन शक नेपाळांत प्रथम सुरू झाला. २५ वर्षे. ( ५ ) वीरदेव, यानें ललितपट्टणनामक शहर वसविलें. हें नांव ठेवावयाचें कारण या नांवाचा एक गवत विकणारा होता; यानें तलाव, देवळें, लिंगें यांची स्थापना केली. त्या तलावाचें नांव मणितलाव असें होतें, व हें नांव देण्याचें कारण या राजाची इष्टदेवता मणियोगिनी होती. ९५ वर्षे. ( ६ ) चंद्रकेतुदेव-याला याच्या शत्रूंनीं भयंकर त्रास दिला, व लुटलें. ( ७ ) नरेंद्रदेव–यानें लोमरी देवीजवळ तीर्थविहार बांधला, व तो आपल्या बापाचा जो धर्मगुरू बंधुदत्त आचार्य त्यास दिला. त्याला तीन मुलें होतीं. त्यांपैकीं पहिले दोन पद्मदेव व रत्नदेव हे संन्याशी बनले, व तिसरा वरदेव हा गादीवर बसला. हाहि आपल्या मृत्यूपूर्वी अलग किंवा अकूबहाल ( विहाराचें नांव ) मध्यें रहावयास गेला ( ७०० ). ( ८ ) वरदेव, यानें आपली राजधानी ललितपट्टणला नेली. याच्या वेळेस शंकराचार्य आणि अवलोकितेश्वर हे नेपाळांत आले होते. (९) शंकरदेव १२ वर्षे, ( १० ) वर्धमानदेव यानें शंखु शहर वसविलें व तें उग्रतादेवीला अर्पण केलें. १३ व. ( ११ ) बलिदेव-१३ व. ( १२ ) जयदेव( ७५१ ). ( १३) बालार्जुनदेव-१५ व.( १४ ) विक्रमदेव-१७ व.( १५ ) गुणकामदेव यानें कान्तिपूर वसविलें. हेंच सांप्रतचें खाटमांडु होय. हें शहर इ स. ७२३ या वर्षी वाग्मती व विष्णुमती या नद्यांच्या संगमावर वसविलें. त्याचप्रमाणें थावेल हें खेडेगांवहि ( या ठिकाणीं विक्रमाचा विहार व इतर पुष्कळ देवळें आहेत ) या शहरानजीकच वसलें आहे.( ५१ व.). ( १६ ) भोजदेव–८ व. ( १७ ) लक्ष्मीकामदेव–२२ . ( १८ ) जयकामदेव (२० व.) याला मुलगा नसल्यामुळे नवाकोट ठाकुरी घराण्यांतील पुरुप याच्या पश्चात गादीवर आला.

( ७ ) नवाकोट ( नयाकोट ) ठाकुरी घराणेः—( १ ) भास्करदेव, ( २ ) बलदेव, ( ३ ) पद्मदेव, ( ४ ) नागार्जुनदेव ( १०७२ ), (५) शंकरदेव याच्या राज्यांत प्रज्ञापारमिता नांवाचा एक हस्तलिखित ग्रंथ एका विधवा ब्राह्मणीनें सोनेरी अक्षरांनी लिहून ठेविला आहे. वि. संवत् २४५ मध्यें ही ब्राह्मणी मूळची गौडदेशीय असो येथील असून ती नेपाळांत झाल या खेड्यांत येऊन राहिली होती. याच्या मरणानंतर अंशुवर्धनच्या घराण्यांतील वामदेव नांवाच्या एका गोत्रजानें कांतिपूर व ललितपूर येथील राजांच्या मदतीनें नवकोट ठाकुरी घराण्यास जिंकून त्यांस पुन्हां आपल्या पूर्वीच्या ठिकाणीं हुसकून लाविलें ( १०९२ ).

(८) अंशुवर्धनाचें दुसरें ठाकुरी घराणेः—( १ ) वामदेव, ( २ ) हर्षदेव, ( ३ ) सदाशिवदेव, यानें कीर्तिपूर हें शहर खाटमांडूच्या नैर्ऋत्येस वसविलें, व इ. स. ७५० त एक नवीन सोन्याचा कळस पशुपतीच्या मंदिरावर चढविला. यानें तांबें व लोखंड यांच्या मिश्रणाचीं नवीन सिंहछाप असलेलीं नाणीं चालू केलीं. ( ४ ) मानदेव हा चक्रविहारांत संन्याशी होऊन राहिला. १० व. ( ५ ) नरसिंहदेव, २२ व. ( ६ ) नंददेव, २१ व. ( ७ ) रुद्रदेव हा बुद्धभिक्षु झाला. १९ व. ( ८ ) मित्रदेव, २१ व. ( ९ ) अरिदेव, २२ व. ( १० ). अभयमल, ९ व ( ११ ) जयदेवमल्ल यानें शाखवालच्या मदतीनें नेवारी शक इ. स. ८७९ त सुरू केला (१० व.).हा कान्तिपूर व ललितपट्टणावर राज्य करी व याचा भाऊ ( १२ ) आनंदमल यानें भक्तपूर किंवा भाटगांव वसविलें, व वेणीपूर, पणौती, नाला, धोमखेल, खड्पु अथवा शड्पु, चौकटशंगा हीं ७ गावें वसविलीं. हा ( २५ व. ) भाटगांव येथें रहात असे या दोन भावांच्या राज्यांत दक्षिणेंतून कर्नाटक घराण्यांतील नान्यदेव या मूळ पुरुषानें प्रवेश केला.

( ९ ) कर्नाटक घराणेः—( १ ) नान्यदेव यानें नेपाळ संवत् ९ श्रावण शुद्ध ७ ला, दोन्ही मल्लांना तिरहूतकडे हांकून लाविलें. यानें भाटगांव येथें ५० वर्षे राज्य केलें. याच्या बरोबरच नेपाळांत नेवार लोक आले व त्यांच्या नांवावरूनच नेपाळ हे नांव देशास मिळालें. नेवारशकहि यापुढें म्हणजे ता. २० आक्टोबर इ. स. ८७९ मध्यें सुरू झाला(वि. सं. ९३६ कार्तिक शुद्ध प्रतिपदा). ( २ ) गंगदेव, ४१ व. ( ३ ) नरसिंहदेव, ३१ व. [ नेपाळसंवत् १११ फाल्गुन शुद्ध ६ ला राजा मल्लदेव व कभ्यमल्ल(ललितपट्टणचा) यांनीं चापागांव व चंपापुरी हीं शहरें वसविलीं. ] ( ४ ) शक्तिदेव, ३९ व. (५ ) रामसिंहदेव, ५८ व. ( ६ ) हरिदेव यानें आपली राजधानी खाटमांडु येथें नेली. पाटणच्या त्याच्या सैन्यानें बंड करून हरिदेवास थावेलास हांकून लावलें. (७) राजा हरिदेवाच्या तैनातींतून एका मगर नोकरास काढून टाकण्यांत आलें, व मुकुंदसेनाकडून देश जिंकून

त्याला गादीत घालून मिरवीत आणलें. मुकुंदसेनाच्या मगर व खप सैन्यानें पवित्र देवालयांचा विध्वंस केला व मत्स्येंद्रनाथाच्या देवालयांतून भैरवाची मूर्ति पालपाला नेण्यांत आली. यामुळें पशुपतींचा क्रोध होऊन मुकुंदसेनाची सर्व सेना पटकीच्या आजारास बळी पडली. मुकुंदसेन एकटाच काय तो साधुवेशांत प्राण घेऊन पळून जाऊं शकला. हा देवीघाटावर मरण पावला.

नेपाळ देश अगदीं धुळीस मिळाल्यामुळें, गादी रिकामी पडून जिकडे तिकडे सात आठ वर्षे बेबंदशाही माजली. तेव्हां नवाकोटचें वैस ठाकुराणी घराणें पुन्हां मुलुख मिळविण्यास आलें. ललितपट्टणांत प्रत्येक टोलाला ( पेठ ) एक एक राजा होता, व कान्तिपूरला तर एकसमयावच्छेदेंकरून १२ राजे होते. भाटगांव हा ठाकुरीच्या ताब्यांत होता ह्या ठाकुरी घराण्यांतील पुरुषांनीं २२५ वर्षे राज्य केलें व पुष्कळ बुद्ध मंदिरें आणि विहार बांधिले. या सुमारास सूर्यवंशी अयोध्याभूप हरिसिंहदेव याला मुसुलमानांनीं हाकून दिल्यामुळें त्यानें सिमरोणगढ येथें गादी स्थापिली. हें सिमरोणगढ तराईमध्यें आहे. तो आपल्या देवीच्या (तुळजा भवानीच्या) आज्ञेवरून नेपाळांत आला व त्यानें सूर्यवंशी घराणें स्थापिलें.

( १० ) भाटगांवचें सूर्यवंशी घराणें:—( १ ) हरिश्चंद्रदेव ( २८ वर्षे ) यानें इ. स. १३२४ त सर्व नेपाळचें खोरें पादाक्रांत केलें. ( २ ) मतिसिंहदेव, १५ व. ( ३ ) शक्तिसिंहदेव (३३ व.) याला चीनच्या बादशहाकडून चीनी शकाच्या ५३५ व्या वर्षी एक पत्र आलें, त्या पत्रावर शक्तिसिंहराम हें नांव होतें. मग त्यानें राज्यत्याग केला. ( ४ ) श्यामसिंहदेव(१५ व.) याच्या वेळीं इ.स. १४०८ मध्यें म्हणजे नेपाळशकाच्या भाद्रपद शुद्ध १२ ला एक मोठा थोरला भूकंपाचा धक्का बसला. याची मुलगी मल्लांच्या एका वंशजास दिली होती.ह्याच्या ताब्यांत तिरहूत हा प्रांत होता. या राजाच्या मृत्यूनंतर तिसरें ठाकुरी घराणें गादीवर आलें.

( ११ ) तिसरें ठाकुरी घराणें:—(१) जयभद्रमल्ल, १५ व. ( २ ) नागमल्ल १५ व. ( ३ ) जयजगतमल्ल ११ व. ( ४ ) नागेंद्रमल्ल, १० व. ( ५ ) उग्रमल्ल, १५ व. (६) अशोकमल्ल (१९ व.)यानें वैस ठाकुरींनां पाटणाहून हांकून लाविलें.याच्या वेळीं पश्चिमेकडून खप लोकांचे हल्ले नेपाळवर होऊं लागले. यानें स्वयंभूनाथच्या नजीक काशीपूर नांवाचें शहर वसविलें. हें मन्मती, वागमती व रुद्रमती या नद्यांच्या मध्यें आहे. (७) जयस्थितिमल्ल यानें जातीविषयीं व वंशविषयक कायदे केले. बऱ्याच मूर्ती व देवळें बांधलीं. नेपाळसंवत् ५१२ चा, या राजाचा शिलालेख ललितपट्टणनजीक सांपडला आहे. याच्या वेळीं बौद्ध झालेले लोकें पुन्हां हिंदु झाले (८) यक्षमल्ल यानें भाटगांवचा तट बांधला. या शहराच्या मुख्य दरवाज्याच्या उजव्या हातास श्रावण शुद्ध नेपाळसंवत् ५७३ ( इ. स. १४५३ ) चा एक शिलालेख आहे. यानें व याच्या नंतरच्या राजानें एक दत्तात्रेयाचें देवालय बांधलें आहे. हा नेपाळसंवत् ५९२ मध्यें वारला; त्याला तीन मुलगे होते. त्यांपैकीं पहिला व तिसरा यांनीं दोन गाद्या भाटगांव आणि खाटमांडु येथें स्थापना केल्या, व मधला रणमल्ल यानें बाणेपा शहर घेतलें. बाणेपा येथील वंश साधारण एक शतक चालून मग भाटगांव शाखेंत सामील झालें.

(अ) भाटगांव शाखा:-(९) जयरायमल्ल, १५ वर्षे; त्याचा पुत्र (११) सुवर्णमल्ल, १५ वर्षे; त्याचा पुत्र (११) प्राणमल्ल, १५ वर्षे; त्याचा पुत्र ( १२ ) विश्वमल्ल, १५ वर्षे; त्याचा पुत्र (१३) त्रैलोक्यमल्ल, १५ वर्षे; त्याचा पुत्र (१४) जगज्योतिर्मल्ल किंवा जयज्योतिर्मल्ल १५ वर्षे; त्याचा पुत्र (१५) नरेन्द्रमल्ल, २१ वर्षे; त्याचा पुत्र ( १६ ) जगत्प्रकाशमल्ल, २१ वर्षे; याच्याच कारकीर्दींत हरसिंह भारो व वासिंह भारो यांनीं भीमसेनाचें देवालय बांधलें, व तेथें उभारलेल्या एका दगडी सिंहावर नेपाळ संवत् ७७५ ( इ. स. १६५५ ) हा खोदला आहे. या राजानें ५ श्लोक, भवानी देवीच्या प्रीत्यर्थ, विमलसुचमंडपांतील एका शिलेवर कोरून ठेविले आहेत. जेष्ठ वद्य ३ नेपाळसंवत् ७८५ या वर्षी त्यानें एक श्लोक गरुडाप्रीत्यर्थ एका गरुडस्तंभावर नारायणचौकांत खोदून ठेवला आहे.(१७) जितामित्रमल्ल (२१ वर्षे )यानें दरबाराजवळील हरिशंकराची मूर्ति अर्पण केली. यानें दुसरीं अनेक देवालयें बांधलीं, व ज्येष्ठ शु॥ १५ ला ( इ. स. १६८३ ) एक लेख एका धर्मशाळेवर खोदला आहे.(१८) भूपतीन्द्रमल्ल (३४वर्षे) याच्या वेळचे शिलालेख पुढीलप्रमाणें आहेत:–(अ) नेपाळसंवत्, ८१७, कलि ४७९९, शकसंवत् १६२०, फाल्गुन शु॥ ९ हा लेख मालतीचौकांत आहे. ( आ ) इ. स. १७०३ चा लेख तांत्रिक गुप्तदेवतांच्या देवालयांत आहे. ( इ ) इ. स. १७०७. ( ई ) इ. स. १७०७ हा लेख दरबारांत आहे. ( उ ) इ. स. १७१८ हा लेख भैरवाच्या देवळांत आहे. ( ऊ ) इ. स. १७२१ वगैरे.(१९)रणजितमल्ल यानें अन्नपूर्णादेवीला एक बैल बळी दिला ( स. १७३७ ). याच्या वेळीं गुरखा लोकांचा राजा नरभूपालशाह यानें नेपाळवर स्वारी केली. या राजाबरोबर नेपाळचें भाटगांव घराणें लोपलें. तसेंच यानें पृथ्वीमल्ल या गुरखा राजास मदतीस बोलाविलें. गुरखे हे मूळचे राजपुतान्यांतील असून अल्लाउद्दीन खिलजीच्या त्रासामुळें इकडे आले. पृथ्वीमल्लानें रणजित यास साहाय्य केलें पण पुढें त्यानेंहि राज्य खालसा केलें. त्या वेळीं त्यानें इंग्रजांची मदत मागितली. कॅ. किनलॉक हा मदतीस गेला असतां त्याचा पराभव झाला.तेव्हां गुरख्यांनीं खाटमांडु, भाटगांव व पाटण हीं सर्वच शहरें काबीज केलीं. अशा तऱ्हेनें नेपाळ गुरख्यांच्या ताब्यांत गेलें ( १७६९ ).

( ब ) खाटमांडु शाखा:-(१) रत्नमल्ल ( ७१ वर्षे ) यानें कान्तिपूरच्या १२ ठाकुरी राजांचा वध केला. इ. स. १४९१ नंतर त्यानें नवाकोटच्या ठाकुरांचा पराजय करून मग भोतियांचा पाडाव केला ( भोतिया हे तिबेटी लोक होत ), याप्रीत्यर्थ त्यानें सीनाचा राजा पाल्पा याची मदत घेतली

होती. याच राजाच्या राज्यांत मुसुलमानांनीं प्रथम स्वारी केली. पण तींत त्यांनां यश आलें नाहीं. सोमशेखरनंद नांवाचा एक दक्षिणी ब्राह्मण पशुपतीच्या देवालयांतील मुख्य पुजारी झाला. तुळजादेवीचें मंदीर यानें बांधलें, व सिंह छापाचें एक नवीन नाणें चालू केलें. ( २ ) अमरमल्ल यानें २८ गांवें व खेडीपाडीं यांवर राज्य केलें. याच्या कारकीर्दीत गयेच्या देवळांच्या नमुन्यावर एक देऊळ ललितपट्टण येथें बांधलें गेलें ( ३ ) सूर्यमल्ल यानें भाटगांव शाखेपासून शंखपूर आणि चांगूनारायण घेतलें. (४) नरेंद्रमल्ल, (५)महीन्द्रमल्ल यानें दील्लीश्वराची चांदीचें नाणें काढण्याकरितां परवानगी मिळविली. हा त्रैलोक्यमल्ल नांवाच्या भाटगांवच्या राजाचा स्नेही झाला व यानें माघ शु॥ ५ ला तुळजादेवीला एक देऊळ अर्पण केलें, ( नेपाळसंवत् ६६९ ). याच्याच राज्यांत पुरंदर राजवंशी यानें एक नारायणाचें देवालय बांधिलें. तें ललितपट्टणच्या राजवाड्यानजीक आहे ( इ. स. १५६६ ). ( ६ ) सदाशिवमल्ल याला लोकांनीं भाटगांव येथें हांकून लाविलें व तेथें त्याला कैदेंत टाकण्यांत आलें. ( ७ ) शिवसिंहमल्ल, यानें एका लेखाप्रमाणें, इ स. १५९४ मध्यें स्वयंभूचें देवालय दुरुस्त केलें,व याच्या गंगा नांवाच्या राणीनें चांगूनारायणाचें देऊळ इ. स. १५८५ मध्यें दुरुस्त केलें. याला दोन मुलगे होते. थोरला हा कान्तिपूरच्या गादीवर बसला, व धाकट्यानें तर बाप जिवंत असतांच ललितपट्टण हस्तगत करून घेतलें. (८) लक्ष्मीनरसिंहमल्ल याच्या कारकीर्दीत खाटमांडु नांवानें प्रसिद्ध असलेलें गोरखनाथाचें देवालय ( इ. स. १५९५ ) बांधलें गेलें. याला पुढें वेड लागलें व याला गादीवरून काढून टाकण्यांत आलें, व मग याच्या मुलानें यास १६ वर्षे बंदिवासांत ठेविलें. (९) प्रतापमल्ल हा इ. स. १६३९ त गादीवर बसला हा कवि होता. याच्या राज्यांतील लेख पुढीलप्रमाणें आहेतः—( अ ) स्वयंभू मंदीर जेव्हां पुन्हा बांधलें त्या वेळच्या लेखांचा संग्रह. हें एका लामानें इसवी सन १६४० त बांधिलें. ( आ ) स्वयंभूस्तोत्र, इसवी सन १६५०. ( इ ) गुह्येश्वरस्तोत्र, इसवी सन १६५४ ( ई ) १५ अक्षरांत कालिकास्तोत्र ( राईट याचा ताम्रपट पहा). इसवी सन १६५४. ( उ ) लायकुलवहाल येथें विश्वरूपाची मूर्ति (स. १६५७) स्थापिली, त्यावेळच्या कागदपत्रांत उल्लेख केल्याप्रमाणें याला ४मुलें होतीं. तीं म्हणजे पार्थिवेंद्र, नृपेंद्र, महीपतींद्र, चक्रपतींद्र हीं होत. या सर्वांस या राजानें एकामागून एक या क्रमानें आपल्या ह्यातींत राज्य करण्यास लाविलें होतें. नृपेंद्रानें पशुपतीच्या नंदीला एक कोट बांधिला. त्याचा एक लेख आहे. चक्रपतींद्र याने एक दिवस राज्य केलें व लगेच तो मरण पावला. याच्या नाण्यांवर धनुष्य आणि बाण असून शिवाय पाश, अंकुश, यक्षाची शेंपूट आणि ने. सं. ७८९ ( इ. स. १६६९) आहे. (१०) महिंद्रमल्ल हा स. १६९४ मध्यें वारला. (११) भास्करमल्ल यानें ने. सं. ८२२ पर्यंत राज्य केलें. हा प्लेगनें वयाच्या २२ व्या वर्षी वारला. याला संतान नव्हतें. (१२) जगज्जयमल्ल;एक लांबचा नातेवाईक असून याला भास्कराच्या बायकांनीं गादीवर बसविलें याला राजेंद्रप्रकाश, जयप्रकाश, राज्यप्रकाश, नरेंद्रप्रकाश, चंद्रप्रकाश हे ५ मुलगे होते. (१३) जयप्रकाश यानें आपला भाऊ राज्यप्रकाश याला हांकून दिलें. तो आपल्या ललितपट्टण येथील विष्णूमल्लनामक भावाकडे पळून गेला. याला इ.स.१७६८ मध्यें पृथ्वीनारायण या गुरखा राजानें पदच्युत केलें.

( क ) ललितपट्टण येथील शाखा.—( १ ) हरिहरसिंह हा कांतिपूरच्या शिवसिंहाचा धाकटा मुलगा होता. ( २ ) सिद्धिनृसिंह यानें इसवी सन १६२० मध्यें ललितपुरास एक राजवाडा बांधला. याच वर्षी यानें तुळजादेवीची मूर्ति स्थापिली व स. १६३७ या वर्षी राधाकृष्णाचें देवालय बांधिलें; तसेंच त्यानें एक जलमार्ग तयार केला (इ. स. १६३६ ) व नंतर तो संन्याशी बनला. (३) श्री निवासमल्ल यानें इ. स. १६५७ पासून राज्याचीं सूत्रें हातीं घेतलीं.खाटमांडूच्या प्रतापमल्लाबरोबर याची लढाई झाली (इ. स. १६५८ –१६६२). याच्या कारकीर्दींतील शेवटचा लेख स. १७०१ चा आहे. (४) योगनरेंद्रमल्ल याचा मुलगा वारल्यामुळें यानें संन्यासदीक्षा घेतली. ( ५ ) महीपतींद्र ( किंवा महींद्रमल्ल ) हा खाटमांडूचा राजा झाला. हा इ स. १७२२ मध्यें दिवंगत झाला. (६) जययोगप्रकाश याच्या राज्यांतील स.१७२३ चा एक लेख आढळतो. (७) विष्णुमल्ल हा योगनरेंद्र याच्या मुलीचा मुलगा; यानें मूलचौकांतील एक घंटा स. १७३७ त अर्पण केली. नंतर लवकरच हा निपुत्रिक मरण पावला. (८) राज्यप्रकाश (७ वा)याला विष्णुमल्ल यानें राजा केलें.त्याच्या प्रधानांनीं डोळे काढून त्याला हांकून लावलें. (९)याचें नांव आढळत नाहीं. (१०)जयप्रकाश कान्तिपूरचा राजा यानें ललितपट्टणवर २ वर्षें राज्य केलें. यालाहि प्रधानांनीं घालवून लाविलें. (११) विश्वजितमल्ल ( विष्णुमल्लाच्या मुलीचा मुलगा ) याला प्रधानांनीं ठार केलें. ( १२ ) दलमर्दनशहा ( नवकोटचा ) याला प्रधानांनीं राजा केलें, व नंतर ४ वर्षांनीं यास हांकून लाविलें. (१३)तेजनरसिंह हा राज्यावर आल्यावर ३ वर्षांनीं याचा सर्व प्रदेश पृथ्वीनारायणानें जिंकून घेतला.

यावरून ही वंशावळी जरी बरीच सत्य आहे तरी वास्तविक तिला महत्व नाहीं. सामान्यतः हिंदुस्थानचे वंशावळीलेखक आपल्या वंशावळींत भारतीय कथा व कौरवपांडव यांचा कसाना कसा तरी संबंध जुळवून थेट सत्ययुगापर्यंत चारहि युगांची वंशावळी देण्याचा प्रयत्न करतात असाच समज प्राचीन ग्रीक लोकांचा होता. त्यांच्या मतें प्रत्येक प्रजासत्ताक संस्थानातील किंवा शहरांतील कोणीना कोणी तरी प्राचीन योद्ध्यानें ट्रॉयच्या घनघोर युद्धांत भाग घेतल्याशिवाय त्या शहरास किंवा प्रजासत्ताक संस्थानास महत्त्वच नाहीं म्हणूनच हिरोडोटससारख्या इतिहासकाराचा

कल तत्कालीन परिस्थितीच्या मूलकारणांचा शोध करतांना होमरनें सांगितलेल्या दंतकथांकडे फार असे.

ज्योतिर्विदांनीं चारहि युगांचा काल ठरवून कलियुगाच्या सुरवातीस भारतीय युद्धाचा काल ठरविल्यावरच बहुतेक साऱ्या वंशावळीकारांनीं आपले ग्रंथ लिहिले आहेत. यामुळें त्यांनीं प्रत्येक राजाच्या आयुर्मर्यादेंत भर घातली, शिवाय या वंशावळीकारांनीं निरनिराळे शक उपयोगांत आणल्यामुळें आणखीहि घोटाळा झाला. आधुनिक लेखकांनां शालिवाहन आणि विक्रमसंवत् हे दोन कायते शक माहीत आहेत. परंतु, हिंदुस्थानांत कितीतरी शक अस्तित्वांत आले होते. इतकेंच काय, पण एकाच नांवाचे दोन तीन राजे होऊन गेले आहेत, व दोन तीन विक्रमादित्य शककार असावेत असें "संवताचे उत्पादक"या मूलग्रंथांतील शब्दांवरून उघड दिसतें.

या वंशावळ्यांतील पाल्हाळ वर्णनेंच काय तीं अविश्वसनीय आहेत असें नव्हे तर कांहीं वंशचे वंशच बनावट असले पाहिजेत. महाभारत, आणि महात्म्यग्रंथांतून नांवें घेऊन नेपाळच्या खऱ्या राजाच्या याद्यांच्या सुरवातीस तीं दडपून दिलीं असलीं पाहिजेत. अहीर वंशालाहि वरील विधानें लागू आहेत. किरातांनां मात्र ही गोष्ट लागू पडत नाहीं. एकंदरीनें पाहतां पहिले पहिले वंश हे बराच काल अडवून बसले आहेत मात्र पुढील वंशवृक्ष बरोबर असावेत असें दिसतें. हा काल म्हणजे ठाकुरी घराण्यांतील, खाटमांडु शाखेचा संस्थापक जो गुणकर्मदेव त्याच्यापासूनचा होय. या सुमाराची ( इ. स. ७२३ ) माहिती खरी असावी परंतु गुणकर्मदेवाच्या नंतर लागलीच आलेले राजे भोजदेव, लक्ष्मीकामदेव यांचा काळ एका लेखांत इ. स. १०१५--१०३९ यांच्यामध्यें दिला आहे.एवढेंच नव्हे तर हस्तलेखांतील तारखांवरुन ७ व ८ हीं वैश्य ठाकुरी घराणीं ११ व्या शतकापासून १४ व्या शतकापर्यंत गादीवर होतीं. अर्थात ८, ९, १० या शतकांतील वंशवृक्ष पूर्ण नाहीं असें वाटतें, व ही अपूर्णता झांकण्यासाठीं कांहीं कांहीं राजांचे राज्यकाल बरेच वाढविण्यांत आले आहेत. जर्मन प्राच्य भाषासंशोधक मंडळानें नारायणदेवाचा राज्यारोहणकाल इ. स. १०९७ हा ठरविला आहे.

याप्रमाणें वंशावळ्या अविश्वसनीय असून त्यांत आगोजाग मोठमोठ्या ढोबळ चुका आहेत. अंशुवर्धन याचें नांव मात्र, वंशावळ, हस्तलिखितें, ताम्रपट, व ह्युएनत्संग याच्या पुस्तकांत आलेलें आहे. याचा काल वंशावळीप्रमाणें ख्रि. पू. १०१ हा आहे. त्याच्या ताम्रपटांवर ३४, ३९, ४५ हे संवत आहेत. ह्युएनत्संगच्या मतें अंशुवर्मन हा इ. सनाच्या ७ व्या शतकाच्या पूर्वार्धांत राज्य करीत असावा.

अंशुवर्धन हा सामंत होता.-तेव्हां अर्थात त्यानें स्वतःचा शक निर्माण केला नसावा. त्याच्या शिलालेखांतील शक श्रीहर्ष याचा असावा. हा इ. स. ६०६--७ मध्यें सुरू झाला. हर्षाच्या राज्याची सीमा नेपाळपर्यंत पोंचल्यामुळें साहजीकच त्याचा नेपाळ सामंतांनीं हा हर्षशक सुरू केला असावा. कनिंगहॅम असेंच म्हणतो. वंशावळींतील विक्रमादित्य म्हणजे हर्षवर्धन होय. शिवाय कनिंगहॅमच्या मतें हर्ष हा वैश्य जातीचा होता व त्याच जातीचें नवाकोटचें वैश नांवाचें आठवें घराणें होतें. ह्यूएनत्संग यानें लिहिलेल्या ग्रंथांत आणि शिलालेखामधील तारखेंत तफावत आहे. त्यावरून तो प्रत्यक्ष असा नेपाळांत गेला नव्हता असें वाटतें. अंशुवर्धन व जिष्णुगुप्त यांच्या कारकीर्दींत नेपाळांत दोनहातीं राज्यपद्धति होती, व ह्युएनत्संग नेपाळांत लिच्छवीवंशी राजा होता व तो अंशुवर्धन होता असें जें म्हणतो त्याचा अर्थ एवढाच कीं लिच्छवीवंशी राजा व अंशुवर्धन अशा दोघांची सत्ता एकसमयावच्छेदेंकरून नेपाळांत तेव्हां चालू असावी. अंशुवर्धन फार पराक्रमी असल्यामुळें त्याची कीर्ति हर्षाच्यासारखी पसरली. हर्षाच्यानंतर त्यानें महाराजाधिराज ही पदवी धारण केली असावी.

या अंशुवर्धनाच्या पाठोपाठ याच वंशांत जिष्णुगुप्त झाला असावा. या वेळच्या शिलालेखांवरून नेपाळमध्यें दुहेरी राजसत्ता होती हें स्पष्ट होतें. अंशुवर्धन हा पहिला शिवदेव याचा नोकर होता. पण पुढें त्यानें हळू हळू सर्व राजसत्ता बळकावली. शिवाय त्याला त्या राजानें महाराज ही पदवीहि अर्पण केली परंतु, अलीकडील इतिहासांतील जंगबहादूरप्रमाणें त्यानें आपल्या मालकाचें व त्याच्या पुढील वंशजांचें स्वातंत्र्य वरपंकी तरी ठेवलें होतें. अशा प्रकारचा अर्थ जिष्णुगुप्ताच्या दोन्ही लेखांवरून निष्पन्न होतो. पुढें पूर्वीच्या राजघराण्याच्या हातांत पुन्हां सर्व सत्ता आली; ही सत्ता त्यांनीं कशी मिळविली हें नीटसें कळत नाहीं. अंशुवर्धनाचें घराणें अगदीं लहान होतें, म्हणून त्यांत फारच थोडे राजे झाले.

शिलालेखातून उल्लेखिलेले लिच्छवी घराणें हें वंशावळींत दिलेलें सूर्यघराणेंच होय हें दोघांच्या एकवाक्यतेवरून सिद्ध होतें. वंशावळींत जयवर्मन व वृषदेववर्मन या दोन राजांच्यामध्यें १४ नांवें जास्त सांपडतात. परंतु शिलालेखांमध्यें मात्र त्यांचा कोठें मागमूसहि नाहीं. यानंतरचे ६ राजे--शंकरदेव, धर्मदेव, मानदेव, महीदेव, वसंतदेव आणि उदयदेव हे वंशावळी व शिलालेख यांत ओळीनें आले आहेत.

लिच्छवीवंशाचा शक नीट ठरविण्यासाठीं, शिवदेव,ध्रुवदेव यांचे काल ठरविले पाहिजेत. वंशावळी व शिलालेख यांवरून सामान्यपणें ध्रुवदेव हा ११ वा येतो. वसंतदेव व जयदेवाचा बाप यांच्यामध्यें १५ राजे झाले, व वसंतसेनाच्या राज्याच्या सुरवातीसच, संवत् ४३५ येतो. याप्रमाणें सुमारें २०७--२१३ वर्षेपावेतों १६ राजांनीं राज्य केलें.

तौलनिक भाषापद्धतीप्रमाणें पाहतां गुप्तशिलालेखांची लिपि, व मानदेवाच्या शिलालेखाची लिपि ही बहुतेक जुळते; व विशेषतः स्कंधगुप्ताच्या वेळच्या स्तंभावरील लिपीशीं तर ती फारच जुळते. गुप्तकाल हा इ. स. च्या दुसऱ्या ऱ्या शतकात सुरू झाला. वेबरच्या म्हणण्याप्रमाणें तो इ. स.

१९० पासून सुरू होतो. समुद्रगुप्त हा इ. सनाच्या ४ थ्या शतकात झाला. याच वेळीं इकडे मानवेदेव हाहि राज्य करीत होता.

वर दिलेल्या एकंदर माहितीवरून वंशावळीकारांजवळ ऐतिहासिक पुरावा चांगलाच होता हें सिद्ध होतें. म्हणूनच वंशावळींतील पुष्कळ नांवें खरीं आहेत.

गुरखा घराणेंः—पृथ्वीमल्ल उर्फ पृथ्वीनारायण यानें स. १७६९ त सर्व नेपाळ जिंकला हें मागें आलेंच आहे. त्यानंतर तो दोन वर्षांनीं मेला ( १७७१ ) त्यास सिंहप्रताप व बहादूरशहा असे दोन पुत्र होते. सिंहप्रताप स. १७७५ त मेला. त्याला राणाबहादुर हा पुत्र होता. तो लहान असल्यानें त्याचा चुलता बहादूरशहा हा कारभार करी परंतु त्याच्या भावजयीस तें पसंत पडेना; म्हणून बहादुरशहा हिंदुस्थानांत आला. पुढें जेव्हां राजमाता वारली ( १८७८६ ), तेव्हां तो परत आला व त्यानें पुन्हां स १७९५ पावेतों कारभार केला. ह्याच्या कारकीर्दीत राज्याची चतुःसीमा एकीकडे भूतानपावेतों व दुसरीकडे काश्मीरपावेतों वाढली. लॉर्ड कार्नवालीसच्या कारकीर्दीपर्यंत ह्या देशाचा ब्रिटिश हिंदुस्थानाशीं कांहीं संबंध नव्हता. पण पुढें बनारसच्या रेसिडेन्टामार्फत इंग्रजांनीं गुरखा लोकांशीं बोलणें सुरू केलें व त्याप्रमाणें १७९२ सालीं एक तहहि झाला. गुरखे लोक पूर्वी तिबेटच्या बाजूस स्वाऱ्या करीत असत. त्यामुळें एकदां चीनच्या बादशहानें लामाचा शिष्य म्हणून नेपाळी लोकांवर एक मोठें सैन्य पाठविलें. तें सैन्य नयाकोटच्या अलीकडे येऊन पोहोंचलें. तेव्हां गुरखा लोकांनीं इंग्लिशांजवळ मदत मागितली, व कॉर्नवालीसनें कर्नल कर्कप्याट्रिक ह्यास पाठवून चीन व नेपाळ ह्या दोन देशांत तह घडवून आणण्याचा घाट घातला ( १७९२ ). पण गुरखा लोकांनीं चीनचें स्वामित्व अगोदरच कबूल केल्यामुळें, कर्नलास मध्यें तोंड घालण्याची जरूरी पडली नाहीं, म्हणून १७९३ सालीं तो परत आला. पुढें ( १७९५ त ) राणाबहादूरशहा ह्यानें राज्याचीं सूत्रें चुलत्याकडून आपल्या हातीं घेतलीं तेव्हांपासून १८०० पर्यंत राज्यांत जिकडे तिकडे बेबंदशाही माजली. शेवटीं ही स्थिति असह्य होऊन दामोदर पांडे व इतर सरदारांनीं राजास पदच्युत करून त्याच्या अज्ञान पुत्रास गादीवर बसविलें. पण राणीच सर्व कारभार पहात असे. राणाबहादुरशहा बनारसला गेला. तेथें कॅप्टन नॉक्स यास त्याचा पोलिटिकल एजन्ट नेमण्यांत आलें. राणाबहादुर ह्याप्रमाणें ब्रिटिश हद्दींत असल्यामुळें नेपाळशीं दोस्ती जोडण्यास ही चांगलीच संधि मिळाली, व त्याप्रमाणें राण्यास कांहीं तरी नेमणूक मिळवून देण्याच्या उद्देशानें इंग्रजांनीं नेपाळच्या राण्याशीं बोलणें लाविलें. पुढें स. १८०१ च्या तहाप्रमाणें खाटमांडु येथें रेसिडेन्ट ठेवण्याची अट नेपाळाधिपतीनें कबूल केली, व त्याप्रमाणें १८०२ सालीं नॉक्स हा खाटमांडु येथें जाऊन पोहोंचला. पण त्यास दरबारीं मानानें वागविण्यांत न आल्यामुळें १८०३ सालीं तो परत आला. पुढें राणाबहादूर नेपाळास परत गेला व आपल्या विरुद्ध पक्षांतील एका पुढाऱ्याचा खून करून राज्यपदारूढ झाला. पण पुढें लवकरच भावाच्या झगड्यांत तो स्वतःच मारला गेला व भीमसेन या नांवाच्या एका तरुण व महत्वाकांक्षी पुरुषानें बालराजाच्या वतीनें व राणीच्या संमतीनें राज्यकारभारसूत्रें पल्याआ हातीं घेतलीं.

ब्रिटिश व नेपाळ यांच्यामधील सरहद्दीवरील डाकू व इतर वाटमाऱ्या लोकांचा नाश करण्याकरिता इंग्रजांनीं ६-७ वर्षें प्रयत्न केला. शेवटीं दोघांनीं मिळून कमीशन नेमलें, व इंग्रजांनीं त्या जागेचा ताबा घेऊन बंदोबस्त करावा असें ठरलें. पण हे पावसाळ्याचे दिवस असल्यामुळें इंग्रजी पोलीसठाण्यावर नेपाळी लोकांनीं हल्ले केले. ह्यामुळें १८१४ सालीं नेपाळशीं लढाई करण्याचें जाहीर करण्यांत आलें. त्याप्रमाणें पश्चिमेकडून यमुना व सतलज ह्या नद्यांच्या पलीकडून स्वाऱ्या करण्यांत आल्या. पण किल्ले वगैरे घेण्याच्या प्रयत्नांत इंग्रजांना फार नुकसानी व हार खावी लागली. कलंगा येथील हल्ल्यांत तर बेदम मार मिळून जनरल गिल्पी ठार झाला (१८१५). त्याच्या जागीं डेव्हिड ऑक्टरलोनी ह्याची नेमणूक झाली. ह्यानें फार कुशलतेनें लढून गुरखा लोकांकडून युक्तीनें काली नदीच्या पलीकडील सर्व प्रांत ब्रिटिशांचा असें कबूल करवून घेतलें. कुमाऊन प्रांतांतूनहि ब्रिटिशांनीं गुरख्यांस हांकलून लाविलें. तेव्हां नोव्हेंबर १८१५ त एक तह झाला. पण राजानें सही करण्याचें नाकारल्यानें पुन्हा युद्धास सुरुवात होऊन स. १८१६ च्या सुरवातीस खाटमांडु राजधानीवर मोठें सैन्य पाठविण्यांत आलें. अडचणीस न जुमानतां व हरएक ठिकाणीं गुरख्यांचा पराभव करीत करीत इंग्रज हे खाटमांडूच्या जवळ तीन दिवसांच्या वाटेवर आले, तेव्हां मात्र राजानें तह करण्याकरितां आपला वकील पाठविला (१८१६). या तहात मागील तहाचीच पुनरावृत्ति करण्यांत आली. गुरखे लोकांनीं ह्या तहावरहुकूम काली नदीच्या पश्चिमेकडील सर्व प्रदेश, कुमाऊन, डेहराडून, अलमोरा आणि सिमला हीं सर्व ठिकाणें इंग्रजांस दिलीं. ह्याच वर्षाच्या शेवटीं येथील राजा देवीनें मरण पावला, व त्याचा पुत्र राजेन्द्र विक्रमशाह त्याच्या पश्चात गादीवर आला. पण राजाचें पोरवय असल्यामुळें भीमसेन थापा हाच सर्व कारभार पहात असे. १८३७ सालीं राजाचा कनिष्ठ पुत्र एकाएकीं वारला व भीमसेनानें त्यास विष घालून मारलें अशी अफवा पसरली. यामुळे भीमसेनास नोकरी सोडावी लागली व त्यानें आत्महत्या करून घेतली. त्याचा पुतण्या मातबरसिंग यानें लाहोर दरबारात नोकरी मिळविली. पुढें १८४३ सालीं मातबरसिंगास प्रधानकीचीं वस्त्रें घेण्यासाठीं परत बोलाविलें. पण त्याचा पुतण्या जंगबहादूर यानें दोन वर्षांनंतर त्याचा खून केला. जंगबहादूर हा फार हुषार, शूर व विलक्षण महत्वाकांक्षी होता. विक्रमशहाच्या राणीच्या शिकवणीवरून त्यानें चुलत्याचा खून

केला. नंतर तो सैन्याचा मुख्य अधिपति झाला. सन १८४६ त गगनसिंग नांवाच्या नवीन प्रधानाचा खून झाला, तेव्हां राणीच्या सांगण्यावरून जंगबहादुरानें खुनाबद्दल सूड उगविला. सरदार व मानकरी लोकांची एक सभा भरून खून करणाऱ्यांस शोधून काढून त्यांचा इन्साफ करण्याचें ठरलें. पण राणीचा हुकूम सरदारांनीं अमान्य केल्यावरून त्याचा परिणाम 'खोत' येथील कत्तलींत झाला; तींत १५० सरदार लोक ठार झाले. नंतर जंगबहादुर यास प्रधानकीचीं वस्त्रें देण्यांत आलीं. पुढें थोड्याच दिवसांनीं याच्या खुनाचा कट केल्याच्या संशयावरून बऱ्याच कटवाल्यांस फांशीं देण्यांत आलें व खुद्द राणीस तिच्या दोन तरुण पुत्रांसह हद्दपार करण्यांत आलें. वालराजाहि त्याच्याबरोबर गेल्यामुळें सुरेंद्र विक्रमशहा ह्यास त्याच्याऐवजीं गादीवर बसविण्यांत आलें. जंगबहादुर हा दूरदर्शी, न्यायी व सत्तेचा योग्य उपयोग करणारा मनुष्य होता असें म्हणतात. त्यानें राज्यांतील आपल्या सर्व शत्रूंचा नाश केला,व तरुण राजास आपल्या पूर्ण कह्यांत ठेविलें. इंग्रजांची व ह्याची मैत्री होती. पुढें १८५० सालीं तो यूरोपांतून जाऊन आल्यानंतर ती अधिकच दृढ झाली. हिंदुस्थानच्या एका कोंपऱ्यांतील देशांतून जंगबहादुरसारख्या सत्ताधीशानें पाश्चात्त्य देशांतून हिंडणें व तेथील राजनीति आणि बलाबल ह्यांचा अभ्यास व अनुभव घेणें हें वाखाणणीय होय. १८५७ सालच्या धामधुमींत देखील जंगबहादुर हा पलटणवाल्यांस न मिळतां, इंग्रजांस मदत करण्यास तयार झाला. पण दिल्ली घेईपर्यंत त्याच्या मदतीची जरूरीच पडली नाहीं. गोरखपूर व लखनौ घेण्यांत जंगबहादूरनें इंग्रजांस मदत केली. श्री. धोंडोपंत नाना पेशवे हे नेपाळांत वारल्यावर त्यांच्या राजकुटुंबास यानें नेपाळांत आश्रय दिला होता. नेपाळच्या राजानें जंगबहादूरास महाराजा हा किताब दिला व इंग्रजांनीं जी. सी. बी. ही पदवी दिली, आणि १९ तोफांच्या सलामीचा मान दिला पुढें१८६०सालीं जो तह झाला, त्यांत अयोध्या प्रांताच्या सीमेवरील कांहीं प्रदेश नेपाळच्या महाराजास परत देण्यांत आला. जंगबहादूर हा १८७७ सालीं वारला.

सन१८८१ त सुरेन्द्र विक्रमशहाचा नातु महाराजाधिराज पृथ्वीवीर विक्रमशहा आपल्या आजोबानंतर गादीवर आला. राणा दीपसिंग प्रधान व त्याचा बंधु धीरसमशेर सेनापति ह्यांच्याविरुद्ध झालेला एक गुप्त कट १८८२ सालीं उघडकीस आला. त्यांत जंगबहादुराचा पुत्र जगतसिंग ह्याचें अंग असल्याचें दिसून आलें, म्हणून त्यास हद्दपार करण्यांत आलें, पण १८८५ सालीं त्यास परत देशांत येण्याची परवानगी मिळाली. धीरसमशेर हा १८८४ च्या सुमारास मरण पावला. पुढें त्याच्या पुत्रांनीं राणादीपसिंगाच्या विरुद्ध कट करून त्यास ठार मारलें व सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली. जगत्सिंगाचा, व त्याच्या पुत्राचाहि ह्याच गडबडींत खून करण्यांत आला. धीरसमशेरचा ज्येष्ठ पुत्र वीरसमशेर हा प्रधान झाला. ह्याच्या कारकीर्दींत राज्यांत शांतता व भरभराट होती. कलकत्ता येथें ह्यानें स्वतःकरितां एक भव्य प्रासाद बांधिला. ह्याचें व इंग्रज सरकारचें सूत चांगलें होतें. गुरखा लोकांच्या लष्करभरतीकरितां ह्यानें इंग्रजांस बरीच मदत केली. हा १९०१ सालीं मरण पावला. वीरसमशेरानंतर देवसमशेर हा ( त्याचा बंधु ) प्रधान झाला, पुढें तीनच महिन्यांनीं चंद्रसमशेर ह्याची प्रधानाच्या जागेवर नेमणूक झाली. १९०३ सालीं दिल्लीस भरलेल्या बादशाही दरबारास चंद्रसमशेर, त्याचे बंधू व इतर प्रमुख लोक सरकारी पाहुणे म्हणून आले होते.

अलीकडील माहिती.—महाराजाधिराज सुरेंद्र विक्रमशहा हा११डिसेंबर १९११रोजीं वारल्यावर त्याचा पुत्र त्रिभुवनवीर विक्रम गादीवर आला. त्याचा जन्म स. १९०६मध्यें झाला. येथील सर्व सत्ता मुख्य प्रधानाच्या हातीं असते. हल्लीं महाराजा सर चंद्रशेखर समशेरजंग बहादुर राणा हा मुख्य प्रधान असून त्याची नेमणूक स. १९०१ मध्यें झालेली आहे. ब्रिटिश सैन्यांतील ऑनररी जनरलचा हुद्दा त्याला आहे. त्याला अनेक (इंग्रजी व चिनी लष्करी )पदव्या आहेत. या प्रधानाच्या कारकीर्दींत राज्यकारभाराच्या प्रत्येक खात्यांत सुधारणा करण्यांत आली आहे. जुन्या कायद्यांत नव्या परिस्थितीला अनुरूप अशी दुरुस्ती करण्यांत आली. अव्वल व अपील कोर्टें आणि हायकोर्टें स्थापण्यांत आलीं व त्यांवर शेवटचें अपील ऐकणारें प्रीव्हीकौन्सिलसारखें 'निक्षरी आड्डा' हें आहे.स. १९१८ मध्यें त्रिभुवनचंद्र कॉलेज स्थापन झालें असून त्यांत बी. ए. परीक्षेपर्यंतचें शिक्षण हिंदुस्थानांतील मेंत्र एम्.ए.प्रिन्सिपाल व इतर प्रोफेसर यांच्याकडून दिलें जातें. हल्लीं बरेच नेपाळी ग्रॅज्युएट तयार झाले असून पांच नेपाळी इसम कलकत्ता युनिव्हर्सिटीची एम्. ए. ची पदवी घेतलेले आहेत. शिवाय हिंदुस्थानांतील शेतकी, वैद्यक, कायदा, व्यापार वगैरे शिक्षणाच्या कॉलेजांत अनेक नेपाळी विद्यार्थी आहेत. प्राथमिक शिक्षणाच्या मोफत शाळा नेपाळांत सर्वत्र स्थापल्या आहेत.

राज्यकारभारविषयक नेपाळसरकारचा दर्जा निश्चित सांगतां येत नाहीं. फार तर तो अफगाणिस्तानसारखा आहे असें म्हणतां येईल. संस्थानासंबंधींच्या अंतस्थ सर्व कारभारांत पूर्ण मोकळीक अफगाणिस्तानाप्रमाणें नेपाळला आहेच. नुकतेच ( ता. २१ डिसेंबर १९२३ ) नेपाळ हें पूर्ण स्वतंत्र राष्ट्र आहे, अशी इंग्रजांनीं त्यास मान्यता दिली आहे. त्याला वाटेल तितका शस्त्रगोळा व हत्यारें हिंदुस्थानांतून घेऊन जाण्याची परवानगी इंग्रजांनीं दिली आहे. मात्र त्याचा उपयोग इंग्रजांविरुद्ध करूं नये असा निर्बंध आहे. त्यास सांप्रत दोस्तराष्ट्र असें संबोधण्यांत येतें. हल्लीं खाटमांडु येथें इंग्रजांचा एक वकील असतो व नेपाळचाहि वकील दिल्लीस असतो. तिबेटांत ल्हासा येथेंहि एक नेपाळचा वकील आहे.

नेपाळसरकारचा व चीनच्या अध्यक्षाचा संबंध हल्लीं मित्रत्वाचा आहे. पूर्वीं दर पाच वर्षांनीं नेपाळच्या राज्यास चीनला कांहीं तरी मौल्यवान नजराणा पाठवावा लागे.

नेपाळांत ४५ हजार खडें सैन्य आहे. त्यांत मार्टिनी–हेनरी बंदुका वापरतात. शिवाय २५० तोफा असलेला तोफखानाहि आहे. गुरखे लोकांनां ब्रिटिश सरकार आपल्या सैन्यांत घेतें गेल्या महायुद्धाच्या वेळीं गुरखे लोकांची सैन्यांत भरती फारच मोठ्या प्रमाणांत झाली व त्याला नेपाळसरकारनें सवलत दिली. इतकेंच नव्हे तर नेपाळसरकारनें स्वतःच्या सैन्यापैकीं उत्तम सैन्य हिंदुस्थानसरकारच्या मदतीला दिलें. या सैन्यानें १९१७ सालीं हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील युद्धकार्यांत चांगली कामगिरी बजावली. ब्रिटिश सार्वभौम बादशाकडून युद्धसमाप्तीनंतर नेपाळच्या मुख्य प्रधानांनां गेलला संदेश व तत्कालीन व्हाइसरायांनीं स्वदेशीं परत जाणाऱ्या नेपाळी सैन्याला उद्देशून केलेलें स्तुतिपूर्ण भाषण यातहि नेपाळसरकारच्या महायुद्धातील मदतीबद्दल कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला होता. नेपाळनें १९२५ सालीं गुलामगिरी बंद करण्यासाठीं जोरानें खटपट केली.

[संदर्भग्रंथः—जिऑलॉ.सर्व्हे ऑफ इंडिया. नेपाळ भा.८; बृहत्संहिता; गुप्त–इन्सक्रिप्शन्स; वान्सिटार्ट–हिस्टरी ऑफ नेपाळ. ए नोट; लेव्ही—नोट ऑन नेपाळ; इंडियन अँटिक्वरी, १८८०–८४, भा.९;१३व १४, पूर्णचंद्र मुकर्जी--नेपाळ अँड तिबेट; हूकर–तराई, नेपाळ एक्स्प्लोरेशन रिपोर्ट; वॅडेल--सिक्कीम अँड नेपाळ; प्रिन्सेप–अमंग दि हिमालयाज; इंटर–पोलिटिकल, मिलिटरी ट्रॅन्झ्याक्शन्स; इंपे. ग्याझे. भा.१९; ओल्डफील्ड– हिस्टरी ऑफ नेपाळ; वेन्डाल स्केचेस फ्रॉम नेपाळ; मार्बेल.डफ– क्रॉनॉलजी; राईट--नेपाळ स्टेट नोट्स.]

**नेपियर, जॉन** ( १५५०–१६१७ )—एक स्कॉटिश गणितशास्त्रज्ञ व लॉगरिथमपद्धतीचा शोधक. हा एडिंबरोनजीक मर्चिस्टन गावीं जन्मला. १५६६ सालीं म्हणजे वयाच्या तेराव्या वर्षी जॉन मॅट्रिक परीक्षा पास झाला. पुढें सेंट ॲन्ड्र्यूज युनिव्हर्सिटींत थोडीं वर्षे उच्च शिक्षण घेतल्यावर पॅरिसच्या युनिव्हर्सिटींत त्यानें कांहीं वर्षे अभ्यास केला. स. १५९४ मध्यें त्यानें 'प्लेन डिस्कव्हरी' ( साधा शोध ) नांवाचें ख्रिस्ती धर्मविषयक पुस्तक लिहिलें. सन १५९६ मध्यें त्याने देशाच्या संरक्षणाच्या कांहीं गुप्त युक्त्या काढल्या. हाच त्याचा 'लागरिथम' वरील सुप्रसिद्ध ग्रंथ होय. जगाला लागरिथमची माहिती देणारा हाच पहिला ग्रंथ होय. शिवाय त्यानें बेरीज, वजाबाकी, गुणाकार व भागाकार आणि वर्गमूळ करण्याच्या सोप्या रीती चेस-बोर्डाच्या साहाय्यानें तयार केल्या, व 'रॅबडोलोजिया' नांवाचा ग्रंथ १६१७ सालीं प्रसिद्ध केला.

**नेपियर, सर चार्लस जेम्स** ( १७८२–१८५३ )—हा ब्रिटिश लढवय्या व मुत्सद्दी, लंडन शहरांतील व्हाइटहॉलमध्यें १७८२ सालीं जन्मला. १७९७ सालीं त्याला लष्करांत नोकरी मिळाली. पुढें तो १८०४ सालीं कॅप्टनच्या व स. १८०६ मध्यें मेजरच्या हुद्यावर चढला. पोर्तुगालमध्यें कोरुनाच्या लढाईत तो मरणोन्मुख होऊन फ्रेंच्यांच्या हातीं लागला असतां फ्रेंच सेनापतीनें त्याला कैदेंत न ठेवितां अंध मातेला भेटण्याकरितां इंग्लंडांत जाण्याची मोकळीक दिली. १८१० १८११ सालीं तो पुन्हां स्पेन-पोर्तुगालमधील युद्धात सामील झाला.स.१८२२ मध्यें त्यानें सेफालोनिया येथें राहून आठ वर्षें लष्करी रेसिडेंट व गव्हर्नर या जागेवर नोकरी केली.तेथें त्यानें एकतंत्रीपणानें राज्य केलें. पुढें १८०३ सालीं वरिष्ठ अधिकाऱ्यांशीं भांडून नोकरी सोडून तो इंग्लंडांत परत आला. १८३९ सालीं त्याला इंग्लंडांत पुन्हां नोकरीवर नेमलें,व यॉर्कशायर, लँकेशायर वगैरे ठिकाणीं चार्टिस्ट लोकांचे दंगे मोडण्याचें काम त्यानें केलें. १८४० मध्यें तो हिंदुस्थानांत नोकरीकरितां प्रथम पुण्यास आला. इ. स. १८४२ त गव्हर्नर जनरल एलेन्बरोनें औटराम व इतर पोलिटिकल अधिकारी यास सिंधमधून काढून ( कारण तो त्यांचा द्वेष करी ) त्या जागीं नेपियर यास मुलकी व लष्करी सर्व अधिकार देऊन आपला खास प्रतिनिधि म्हणून नेमिलें.नेपियरनें पूर्वीचे तह व करारमदार सर्व एकीकडे गुंडाळून ठेवून व हिंदुस्थानसरकारची आपल्यास संमति आहे या मानीव आधारावर दरोडेगिरी सुरू करून सिंध प्रांत खालसा करण्यास सुरवात केली (स्मिथ–ऑक्स–हिस्टरी, इंडिया पृ. ६८५ ) त्याच्या या दडपशाहीनेंच अखेरीस बलुची लोकांनीं त्रासून जाऊन नाइलाजानें कमिशनरच्या बंगल्यावर हल्ला केला ( फेब्रु. १८४३ ).नेपियर तर या संधीचीच वाट पहात होता. त्यानें याचा फायदा घेऊन तावडतोब लढाई पुकारली. मार्शमन म्हणतो कीं, अमीराबद्दल कलुषित मन करून घेऊनच नेपियर हा सिंधमध्यें प्रथम आला होता. गव्हर्नर जनरलनें त्याच्याकडे अमीरानें केलेल्या ( इंग्रजांच्या म्हणण्याप्रमाणें ) राजद्रोही गोष्टींचा छडा लावण्याचें काम सोपविलें.मात्र त्याबरोबरच अगदीं खात्रीलायक पुरावा असल्याशिवाय निकाल देऊं नये असेंहि फर्माविलें होतें. नेपियरनें प्रथम अमीरावरील तीन आरोपांशिवाय बाकीचे सर्व आरोप काढून टाकले. या तीन आरोपांना आधार काय तो फक्त एक सिंधी भाषेंत लिहिलेलें पत्र होतें. त्या पत्राच्या खरेपणाबद्दल तत्कालीन हिंदुस्थानांतील बहुतेक तज्ज्ञांनां संशय होता, असें असतां व स्वतःस सिंधी भाषा बिलकूल येत नसतां आणि अमीरास आपल्यावरील आरोपांचें निराकरण करण्याची संधीहि न देता नेपियरनें "ईजिप्तसारखा सुपीक" सिंध प्रांत अमीरास दोषी ठरवून खालसा केला व १८३९च्या तहास हरताळ फांसला. या कामीं अमीराचा एक नातेवाईक अली मुराद याचेंहि साहाय्य त्यास होतें. नेपियरनें तर सिंधमध्यें दरोडेगिरी सुरू केली होती ( मार्शमन–हिस्टरी ऑफ इंडिया, तिसरी आवृत्ती. पृ. ४३१–३६ ). तेथील

सरदारांचा कांहीं अपराध नसतांना त्यांचे किल्ले काबीज केले. ज्या अमीराला त्यानें पदच्युत केलें, त्यानेंच हैद्राबाद येथें ( १८४३ फेब्रु. ) तेथील प्रजेनें आपलें राज्य हरण केल्या-मुळें चिडून नेपियरवर उघडपणें चाल केली असतां नेपियरचें रक्षण करून त्याचे प्राण वांचविले. नंतर प्रजेच्या या बंडाचा मोड करून नेपियरनें अमीराची सर्व संपत्ति लुटली. त्यांत एकट्या नेपियरच्या वांट्यास ७ लाख रु. आले. या एकंदर कृत्यास हॉबहाऊस ( ई इं. कंपनीच्या बोर्ड ऑफ कंट्रोलचा प्रेसिडेंट ) यानें पाजीपणा व लुच्चेगिरी असें नांव दिलें आहे. या लुटीबद्दल नेपियर व औटराम यांच्यांत भांडणें जुंपलीं होतीं. नेपियरच्या एकंदर कृत्यावर कंपनीच्या अधिकाऱ्यांचा टपका आल्यानें तो इंग्लंडास परत गेला. पुढें शीख युद्धाच्या वेळीं तो पुन्हां हिंदुस्थानांत आला होता. त्यावेळीं शिपायांना भत्ता देण्याच्या बाबतींत त्याचा व गव्हर्नर जनरल डलहौसी याचा तंटा होऊन नेपियर राजिनामा देऊन परत गेला, व थोड्याच दिवसांनीं मरण पावला. [ स्मिथ-हिस्टरी ऑफ इंडिया; मार्शमन-हि. इंडिया; एन्सा. ब्रिटा. ]

**नेपोलियन,** प हि ला ( १७६९-१८२१ ).—( नेपोलियन = रानचा सिंह ) फ्रेंचांचा बादशहा. कॉर्सिका बेटांतील अजेशिओ गांवीं १५ ऑगस्ट १७६९ सालीं जन्मला. त्याचा बाप कारलो उर्फ चार्लस बोनापार्ट व आई मेरिया लेटिशिया रामोलिनो यांनां एकंदर तेरा मुलें झालीं, त्यांपैकीं जोसेफ, नेपोलियन, लुसीन, लुई, जेरोम हे पांच मुलगे आणि एलीझा, कारोलाईन व पालीन या तीन मुली होत्या; इतर मुलें अल्पायुषी झालीं. पूर्वी इटलीतील जिनोव्हा संस्थानच्या ताब्यांत असलेलें कॉर्सिका बेट फ्रान्सनें विकत घेऊन नेपोलियनच्या जन्मापूर्वी फक्त सहा महिनेच ताब्यांत घेतलें होतें; त्यामुळें नेपोलियन जन्मतःच फ्रेंच प्रजाजन बनला. नेपोलियनचीं आईबाप दोघेहि सरदार घराण्यांतलीं होतीं. वाङ्मयाचा आवड, चौकसबुद्धि, कारस्थानकुशलता त्याच्या बापाच्या अंगचे गुण, आणि निश्चयी स्वभाव त्वरित निर्णयबुद्धि व कोणत्याहि विरोधाला व अडचणींना न जुमानतां स्वतःचे निर्णय तडीस नेण्याचा हिंमती स्वभाव हे आईचे गुण नेपोलियनमध्यें उतरले होते ते इतके कीं पुढें युद्धांत व राजकारणांत नेपोलियन सर्वांना अत्यंत जबरदस्त प्रतिस्पर्धी होऊन बसला. नेपोलियनचें शरीर मूळ सडपातळ पण बांधेसूद, चेहरा जरा लांबट, डोकें मोठें, कान लहान, कपाळ भव्य, डोळे पाणीदार, दंड पिळदार व छाती रुंद होती. अंगावर केंस कमी व छातीवर मुळींच नव्हते. हृदयाची गति मंद असून नाडीचे ठोके मिनिटास अवघे चाळीस पडत. उंची पांच फूट पांच इंच होती. ओंठ घट्ट आवळून धरण्याची त्याची लकब असल्यामुळें मुद्रा उग्र दिसे, त्याला नेहमीं उजवा खांदा उडविण्याची संवय असे त्याला आजन्म तपकीर ओढण्याचा फार नाद होता. जगांत अद्वितीय योद्धा म्हणून नांवाजलेल्या नेपोलियनला घोड्यावर बसण्याची मांड कधींहि नीट साधली नव्हती व बंदुकीचा नेमहि अचुक मारतां येत नसे.

शिक्षणः—नेपोलियनला लहान वयांतच ड्रम वाजविणें, तरवार फिरविणें वगैरे खेळांची आवड असे व त्याचा वडील भाऊ जोसेफ हा सौम्य स्वभावाचा होता. या फरकामुळें थोरल्याला भिक्षुकी धंद्यांत ( चर्च ) व दुसऱ्याला म्हणजे नेपोलियनला शिपाईगिरींत घालण्याचें बापानें ठरविलें. नेपोलियनचा बाप चैनी व खर्चिक होता व त्याला दारूचें व्यसनहि जास्त जडत गेलें. त्यामुळें कर्ज झालें, व कुटुंबाला कठिण काळ आला. तथापि नेपोलियनची आई मॅडम मेरिया मोठी धीराची बाई होती. तिनें मुलांची चांगली काळजी घेऊन त्यांनां कडक शिस्त लावली. नेपोलियन फार व्रात्य असल्यामुळें त्याच्यावर तिला फार लक्ष द्यावें लागे. नऊ वर्षांचा होईपर्यंत कॉर्सिका येथें शिक्षण झाल्यावर नेपोलियनला त्याच्या बापानें फ्रान्समध्यें आणून तेथीलें शाळेंत चार महिने ठेवून नंतर ब्रीन येथील लष्करी शाळेंत घातलें. या शाळेंत फ्रेंच, लॅटिन वगैरे भाषा आणि इतिहास, भूगोल, गणित व शिवाय नर्तन, गायन, वादन, चित्रकला वगैरे विषय शिकवीत. शाळेवर देखरेख व शिस्त धर्मगुरूंची असे, व शाळेची कीर्ति चांगली नव्हती. शाळेंत नेपोलियन इतरांशीं मिसळत नसे. त्याचा अभ्यास बरा असे. त्या वेळच्या त्याच्या चोपड्या अद्याप आहेत. त्यावरून तो फार पुस्तकें वाची व त्यांचा गोषवारा काढी असें दिसतें. गणितांत त्याची मति विशेष चाले,इतिहास व विशेषतः प्लुटार्ककृत चरित्रें त्याला फार आवडत असत. ब्रीन येथील अभ्यासक्रम संपल्यावर १७८४ सालीं पॅरिस येथील 'ईकोल मिलिटेयर' नांवाच्या लष्करी शाळेंत तो गेला. तोफखान्यात जागा मिळावी म्हणून त्यानें चांगला अभ्यास केला. तथापि त्याला फ्रेंच भाषा शुद्ध लिहितां येत नव्हती व अक्षरहि फार वाईट होतें, त्यामुळें त्याचा नंबर परीक्षेत वर आला नाहीं. कविता करण्याचा नादहि त्याला एव्हांपासून होता.

नोकरीः—१७८५ च्या आक्टोबरात नेपोलियननें येथील परीक्षा देऊन तोफखान्याच्या पलटणींत नौकरी धरली तेथें त्यानें प्रायव्हेट, कार्पोरल व सार्जंट यांचीं कामें केल्यावर १७८६ सालीं त्याला ज्युनियर लेफ्टनंटची जागा मिळाली. १७८५ सालीं त्याचा बाप वारला, त्यावेळीं त्याच्या आईचें वय तीस वर्षांचें होतें; यावेळीं कुटुंबाचा भार नेपोलियनवर पडला. दुसरें उत्पन्न विशेष नव्हतें, शिवाय एक जुना वतनाचा दावा नेपोलियनच्या बापानें लावला होता त्यांतहि नेपोलियन हरला तेव्हां सांपत्तिक स्थिति फारच वाईट झाली. तथापि मॅडम मेरियानें दक्षतेनें व काटकसरीनें दिवस काढले. आईचें हें काटकसरीचें वळण नेपोलियनला पुढें फार उपयोगी पडलें. त्यानें अनेक लढाया केल्या पण कधीं त्याला कर्ज काढावें लागलें नाहीं किंवा कागदाचें नाणें पाडावें लागले नाहीं. नौकरींत असतां तो रजा घेऊन

वारंवार कॉर्सिकांत येई. कॉर्सिकावेट फ्रेंचांच्या ताब्यांतून सोडवून स्वतंत्र करावे हा विचार त्याच्या डोक्यांत होता. नोकरीवर व रजेवर असतांनाहि त्याचें वाचन व अभ्यास चालूच असे.या वेळच्याहि चोपड्या व टिपणें अद्याप आहेत. विशेषतः पारतंत्र्यांतून स्वातंत्र्य मिळवलेल्या लोकांचा इतिहास तो बारकाईनें अभ्यासी. ग्रीस, रोमन, कार्थेज, इंग्लंड, फ्रान्स, पर्शिया, चीन, अरबस्तान, वगैरे देशांचा इतिहास त्यानें लक्षपूर्वक वाचला. फ्लुटार्क,सीझर, कार्नेली, व्होल्टेअर, रूसो यांचे ग्रंथ त्याला फार आवडत. इंग्लंडच्या इतिहासाचा अभ्यास, विशेषेंकरून १६८८सालच्या राज्यक्रांतीपर्यंत त्यानें स्वतःचीं टिपणें लिहिलीं आहेत. त्यांत क्रॉमवेलबद्दल तो लिहितोः "धीर, हुषार, कपटी, व ढोंगी असून त्याची पूर्व वर्यांतील लोकशाहीचीं उच्च तत्त्वे पुढें त्याच्या महत्त्वाकांक्षेच्या सर्वभक्षक ज्वाळांनां बळी पडलीं; आणि सत्तेचीं मधुर फळें चाखल्यावर एकट्यानें अनियंत्रित राज्यकारभार करण्याच्या सुखाची त्याची लालसा प्रबळ झाली." नेपोलियननें राजकारण, समाजव्यवस्था, न्याय, वगैरे वरील अनेक ग्रंथ व शिवाय काव्य व नाटकेंहि वाचलीं. शिवाय द्रव्यार्जनाच्या इच्छेनें निबंध, इतिहास व कादंबऱ्या लिहिल्या.

रजेवरून परत आल्यावर १७८८-८९ सालीं आक्झोन येथील दंडाळी मोडण्याच्या कामावर त्याच्या सैन्याची तुकडी नेमली गेली. त्याच सुमारास फ्रेंच राज्यक्रांतीचा स्फोट झाला ( सप्टेंबर १७८९ ). त्याचा फायदा घेऊन स्वतंत्र व्हावें म्हणून कार्सिकांतल्या लोकांनीं दांडगाईचे प्रकार सुरू केले. तथापि लढाई न करतां कार्सिकाचा पूर्वी हद्दपार केलेला पुढारी पेआली यालाच परत बोलावून त्याच्याकडे कार्सिकाच्या बंदोबस्ताचें काम फ्रेंच सरकारनें दिलें. पण फ्रान्सशीं राजनिष्ठ न राहतां इंग्लंडच्या मदतीनें कार्सिका स्वतंत्र करण्याचीं कारस्थानें पेआलीनें सुरू केलीं. उलटपक्षीं लहान कार्सिका बेट पूर्ण स्वतंत्र न राहूं शकतां बलाढ्य राष्ट्राच्या भक्ष्यस्थानीं पडेल हें जाणून तें फ्रान्सच्या अमलाखालीं राहणेंच इष्ट आहे असें नेपोलियननें विचारपूर्वक ठरवून पेआलीला उघड विरोध केला.स.१७९१मध्यें सैन्याची पुनर्रचना झाली, तींत नेपोलियनची व्हॅलेन्स येथें लेफ्टनंटच्या जागीं नेमणूक झाली. येथेंहि एक राजकीय क्लब होता. तेथील लायब्रेरियन नेपोलियन झाला. तेथेंच "सुखप्राप्तीसाठीं मनुष्यामध्यें कोणतीं अत्यंत महत्त्वाचीं सत्यें व मनोविकार बिंबविले पाहिजेत" ह्या, बक्षिसाकरितां नेमलेल्या विषयावर त्यानें निबंध लिहिला. त्यांत त्यानें स्पार्टन लोकांच्या समाजरचनेची स्तुति केली होती. स.१७९१ मध्यें तो रजा घेऊन कार्सिकांत गेला. त्या वेळीं पेआलीबरोबरचें त्याचें भांडण वाढतच गेलें. पुढें फ्रेंच सरकारनें पेआली व त्याचा दोस्त पोझोडीबर्गो या दोघांनां हद्दपार केल्यामुळें ते अनुक्रमें इंग्लंड व रशियांत जाऊन राहिले; व अखेरपर्यंत पोझोडीबर्गोनें झारचें मन नेपोलियनविरुद्ध कलुषित करून वैर वाढविलें. कार्सिकन लोकहि नेपोलियनविरुद्ध चिडून त्यांनीं त्याच्या घरावर हल्ला करण्याचें ठरविलें. त्यामुळें १७९३ फेब्रुवारी ता. १ रोजीं नेपोलियन आपल्या सर्व कुटुंबीयांसह पळून फ्रान्समध्यें येऊन राहिला व त्यानें सर्वस्वी फ्रेंच रिपब्लिक सरकारच्या नोकरीला वाहून घेतलें.

टूलोनचा विजय.—फ्रेंच राज्यक्रांतिकारकांनीं राजाराणीला पदच्युत केल्यामुळें व पुढें ठार मारल्यामुळें आस्ट्रिया,प्रशिया, इंग्लंड, हॉलंड, स्पेन, वगैरे देश फ्रान्सवर चालून आले. खुद्द फ्रान्समध्येंहि राजशाहीचा पुरस्कर्ता असा एक पक्ष होता. या परिस्थितीचें बारकाईनें निरीक्षण करून आपलीं मतें प्रश्नोत्तर रूपानें सोप्या भाषेंत लिहिलेलें एक लहानसें पुस्तक नेपोलियननें प्रसिद्ध केलें; त्यांत नव्या सरकारास मान्यता देऊन सर्व फ्रेंचांनीं चालून आलेल्या आस्ट्रियादि शत्रूंनां तोंड देण्याकरितां एकी केली पाहिजे असें प्रतिपादिलें. याच सुमारास टूलोनच्या राजपक्षीयांनीं तें बंदर इंग्रजांच्या ताब्यांत दिल्यामुळें त्यांनां तेथून हांकून लावण्याकरितां कार्टो, डॉपेट, व डुगोमीर या तीन नालायक सरदारांची अनुक्रमें नेमणूक झाली व त्यांच्या हाताखालीं नेपोलियनला नेमलें. नेपोलियननें टूलोनची नीट पाहणी करून तोफांच्या माऱ्याकरितां जागा नक्की केली. प्रथम लएग्युलेट या महत्त्वाच्या ठिकाणचा किल्ला मोठ्या निकराचा हल्ला करून सर केला. त्यावर लवकरच ( ता. १९ डिसेंबर, १७९३ ) टूलोन हस्तगत झालें. या सर्वांचें श्रेय इतर वरिष्ठ व कनिष्ठ फ्रेंच अधिकाऱ्यांनीं मनःपूर्वक नेपोलियनला दिलें; पॅरिसमध्यें त्याचा लौकिक वाढला.

कैदः—वरील विजयानंतर दक्षिण फ्रान्सच्या किनाऱ्याची लष्करी दृष्ट्या मजबुती करण्याच्या कामावर नेपोलियनची नेमणूक होऊन तो तिकडे गेला. इकडे पॅरीसमध्यें कन्व्हेन्शन म्हणून तात्पुरती राज्यकारभार पहाणारी सभा होती तिचा मुख्य राबिसपिअर व बारस यांच्याशींहि नेपोलियनचें विशेष सख्य झालें. पण राबिसपिअर मोठा क्रूर असून त्यानें केवळ संशयावरून अनेक फ्रेंच स्त्रीपुरुषांनां वधाची शिक्षा 'कमिटी ऑफ पब्लिक सेफ्टी' नांवाच्या लष्करी न्यायसभेमार्फत देवविली. या जुलमामुळें चिडून कांहीं कटवाल्यांनीं राबिसपिअर व तत्पक्षीय आणखी एकवीस जणांस ठार मारलें. त्यावेळीं नेपोलियनविरुद्ध देशद्रोहाचा आरोप करून त्याला कैदेंत टाकलें; पण पुढें न्यायाधीशांनीं त्याचा जबाब ऐकून त्याला पूर्ण निर्दोषी ठरवून सोडून दिलें. तथापि नेपोलियनची नोकरी गेली व त्याच्या सर्व कुटुंबाला कांहीं दिवस मोठ्या दारिद्र्यांत व संकटांत काढावे लागले. त्यावेळीं द्रव्याकरितां त्यानें पुस्तकें लिहिलीं, नोकरीकरितां अर्ज केले व मॅडम परमान नांवाच्या संपत्तिमान पण वयानें बऱ्याच अधिक असलेल्या विधवेशीं विवाह करण्याचाहि प्रयत्न केला. पण कांहींच जमलें नाहीं.

पॅरिसमधील बंडाचा मोड व विवाह.—अशा वेळीं कन्व्हेन्शन सरकारला नेपोलियनची गरज लागली. पॅरिसमध्यें कन्व्हेन्शनविरुद्ध दुसऱ्या पक्षानें लढाईची बरीच तयारी केली. तें बंड मोडण्याकरितां बारसच्या सूचनेवरून नेपोलियनची नेमणूक झाली. त्यानें पॅरिस शहरांत नाक्यानाक्यांवर तोफा गाडून ५ आक्टोबर १६९५च्या बंडाळींतील ३०००० लोकांनां २०० हून अधिक प्राणहानि होऊं न देतां थोडक्या वेळांत उधळून लावलें, व सर्व शहरांत चांगला वचक बसविला. या विजयामुळें नेपोलियनला चांगला अधिकार प्राप्त झाला, पैसा मिळूं लागला, व त्याच्या भावांनांहि सरकारी नोकऱ्या मिळाल्या व कुटुंबाचें दैन्य कायमचें नाहींसें झालें. कन्व्हेन्शननें ठरविलेल्या नव्या राज्यघटनेप्रमाणें नेमलेल्या बारस, रुबेल, कार्नो वगैरे डायरेक्टरांत नेपोलियनचें वजन फार वाढलें. मुलकी सत्तेवर लष्करी सत्तेचा पगडा बसण्यास सुरवात झाली. याच संधीस बारसच्या मध्यस्थीनें नेपोलियनचा विवाह जोसेफाईन नांवाच्या विधवेशीं १७९६ मार्च ता. ९ रोजीं झाला.तिला पहिल्या संबंधाचा मुलगा व मुलगी अशीं दोन मुलें होतीं. पॅरिसमध्यें चैनी लोकांचे क्लब होते त्यांपैकीं बारसच्या क्लबांत विधवा जोसेफाईनचें जाणेयेणें असे. नेपोलियन त्या क्लबांत जाऊं लागून विवाहाच्या गोष्टी निघाल्या तेव्हां प्रथम गरीब नेपोलियनला वरण्यास ती तयार नव्हती, पण पुढें इटलीच्या मोहिमेवर नेपोलियनची नेमणूक झाल्यावर तिनें विवाहास रुकार दिला.

इटलींतील मोहीमः—वर सांगितलेल्या फ्रान्सच्या नव्या डायरेक्टरांनां नेपोलियननें इटलीवर स्वारी करून आस्ट्रियाचा मोड करण्याची व देशांत पैसा आणण्याची कल्पना व योजना सुचविली होती. ती डायरेक्टरांनीं पसंत करून नेपोलियनला हुकूम दिला. तिच्या खर्चाकरितां सरकारी खजिन्यांतून पैसा मात्र देण्यास शिल्लक नव्हता.तेव्हां नेपोलियननें स्वतः कर्ज काढून सैन्याची जमवाजमव केली, व इटलीवर चाल केली. या मोहिमेंत नेपोलियन सर्वस्वी विजयी झाला. शूर, धाडसी शिपाई,युद्धकलाप्रवीण सेनापति व चतुर राजकारणी व मुत्सद्दी, असे त्याच्या अंगचे तिन्ही प्रकारचे गुण प्रत्ययास येऊन त्यानें नांव यूरोपभर पसरलें. फ्रेंच लोकांच्या प्रेमास तर तो फारच पात्र झाला, पण डायरेक्टरांनां मात्र त्याचा मत्सर व भीति वाटूं लागल्यामुळें त्यांनीं त्याच्या मार्गांत अनेक अडचणी आणल्या, पण प्रत्येक बाबतींत अखेर नेपोलियनच यशस्वी झाला. लोदींच्या पुलावर मिळालेल्या विजयानें ( १० मे १७९६ ) सेनापतीपेक्षां अधिक महत्त्वाच्या पदीं चढण्याचीं स्वप्नें त्याला दिसूं लागलीं आणि आरकोलच्या पुलावरील अकल्पित बचावामुळें आपला भविष्यकाळ विशेष उज्ज्वल होणार असा दैववाद त्याच्या डोक्यांत घोळूं लागला. जनरल बोलू, वूर्मझर, आलविंझी वगैरे कसलेल्या आस्ट्रियन सेनापतींचें युद्धनैपुण्य नेपोलियननें रद्द पाडून आस्ट्रियन बादशाहाला शरण येऊन कँपोफोर्मियाचा तह करण्यास भाग पाडलें, व आस्ट्रियाची इटलींतील सत्ता नष्ट केली सार्डिनिया, नेपल्स वगैरे इटालियन संस्थानिकांनां पराभूत करून त्यांच्या सैन्याची मदत मिळविली. इटालींतील अनेक लहान लहान संस्थानें मोडून तेथें लोकसत्ताक राज्यें स्थापून त्या सर्वांचें एक संयुक्त 'सिस आलाईन रिपब्लिक' स्थापलें ( १६ आक्टोबर १७९६ ). उलटपक्षीं रोम येथील पोपचें राज्य डायरेक्टरांचा आग्रह असतांहि सामान्य लोकांची धर्मबुद्धि न दुखवावी म्हणून मोठ्या अदबीनें तह करून कायम राखलें, आणि पॅरिस येथील डायरेक्टरांना खुष राखण्याकरितां मीलन येथून सुमारें दहा कोटी रुपये व पोपजवळून वीस लक्ष डॉलर खंडणी, व शिवाय खास्गीरीत्या डायरेक्टरांनां गाडीकरितां दोनशें उत्तम घोडे, पॅरिस येथील विद्वानांनां ग्रंथ, पुराणवस्तुसंशोधकांनां इटलींतील प्राचीन कालच्या अनेक वस्तू, शोकी मित्रांनां सुंदर चित्रें, वगैरे अनेकांनां अनेक प्रकारच्या देणग्या धाडल्या. इतर ठिकाणच्या फ्रेंच फौजेलाहि त्यानें लक्षावधि रुपये धाडले. यामुळें सर्व दर्जाच्या व प्रकारच्या लोकांनीं नेपोलियनचीं स्तुतिस्तोत्रें गाण्यास सुरवात केली.

ईजिप्तवरील मोहीमः—स. १७९५ पासून फ्रान्समध्यें पांच डायरेक्टर सर्व सत्ताधारी बनले होते. त्यांच्या अरेरावीमुळें लोकमत विरुद्ध बनून एक मॉडरेटपक्ष निर्माण झाला, व त्यानें आपल्या मताचा बार्थिलेमी नांवाचा इसम पांचवा डायरेक्टर निवडला. त्याच्या बाजूला कार्नो मिळून डायरेक्टरांत दुफळी झाली. तेव्हां बारसपक्षानें नेपोलियनला वश करून त्यानें पाठविलेल्या जनरल आगेरोच्या मदतीनें मॉडरेटपक्षाचा पराभव केला.स.१७९७च्या डिसेंबरांत तो पॅरिसला परतल्यावर डिरेक्टर होण्यास लायक आहे असें कित्येकांनीं सुचविलें; पण त्यानें तें नाकारलें.डायरेक्टरांनीं डोईजड होऊं लागलेल्या नेपोलियनला इंग्लंडवर स्वारी करण्याची कामगिरी सांगितली व त्याकरितां फ्रान्सच्या उत्तर किनाऱ्यावर चाललेल्या आरमारी तयारीची, नेपोलियन पहाणी करून आला व ती फार अपुरी असल्याचें मत देऊन जर्मनीचा उत्तर किनारा किंवा ईजिप्त वगैरे पौरस्त्य देश जिंकून ब्रिटिश व्यापार बंद पाडण्याची योजना त्यानें सुचविली. नेपोलियन दूर देशी गेलेला बरा, असें डायरेक्टरांस वाटत असल्यामुळें त्यांनीं ईजिप्तच्या मोहिमेस रुकार दिला. ईजिप्तच्या मोहिमेचा बेत नेपोलियनच्या मनांत फार दिवस घोळत होता. ईजिप्त जिंकला कीं आशिया सहज जिंकतां येईल व हिंदुस्थानावर चाल करून टिप्पू व मराठे यांच्या मदतीनें इंग्रजांनां घालवून लावतां येईल आणि अलेक्झांडर दि ग्रेटलाहि साधलें नाहीं तें सर्व हिंदुस्थान जिंकून हस्तगत करण्याचें श्रेय मिळेल असलें मनोराज्य नेपोलियननें उभारिलें होतें. डायरेक्टरांचा हुकुम मिळतांच त्यानें जय्यत तयारी केली. तेरा मोठीं, चवदा मध्यम व बरींचशीं लहान लढाऊ जहाजें

आणि सामान भरलेलीं ३०० जहाजें, शिवाय ईजिप्तमधील पुराणवस्तुसंशोधनाकरितां चांगले शास्त्रज्ञ, कलाभिज्ञ, इंजिनियर वगैरे विद्वान इसम, यंत्रसामुग्री व छापण्याचें सामान बरोबर घेऊन तो १९ मे १७९८ रोजीं टूलोन बंदरांतून निघाला. भूमध्यसमुद्रांत ब्रिटिश आरमाराचा अडथळा होऊं नये म्हणून त्यानें इंग्लंडवरच्या मोहिमेची हूल उठविली होती. नेपोलियननें वाटेंत माल्टा हस्तगत करून २ जुलै रोजीं आलेक्झांड्रिया शहर घेतलें,पुढें मनोऱ्यानजीकच्या (पिरॅमिड) लढाईत अरबांचा पूर्ण पराभव करून लवकर कायरो शहर हस्तगत केलें व तेथें नवी राज्यव्यवस्था सुरू केली. अरब व इंग्रज ह्यांनीं पुन्हां लढाईची तयारी केली. तेव्हां एकर येथें पराभव झाल्यामुळें व विशेषतः फ्रान्समध्यें अव्यवस्था माजल्यामुळें नेपोलियन ९ आक्टोबर १७९९ रोजीं फ्रान्सला परत आला. सुवेझ कालवा व इतर शेतकीचे कालवे तयार करण्याचे बेत तसेच राहिले. मात्र या मोहिमेमुळें आरमारी सामर्थ्य असलेल्या पाश्चात्य राष्ट्राला ईजिप्तवर सहज सत्ता बसवितां येईलसें ठरलें. माल्टा बेट इंग्रजांनीं घेतलें व हिंदुस्थानांत ब्रिटिश सरकारनें नेपोलियनच्या भीतीनें टिप्पूचा पूर्ण नाश केला. ईजिप्तमध्यें रोझेटास्टोन हस्तगत होऊन ईजिप्शियन लिपीचें वाचन सुबोध झालें व पुराणवस्तुशोधांत इतर भर पडली.

नवीन राज्यघटनेचा फर्स्ट कॉन्सलः—नेपोलियन दूर ईजिप्तमध्यें असतां इंग्लंडच्या उत्तेजनानें व मदतीनें आस्ट्रियानें बराच इटली फ्रान्सच्या हातून परत जिंकून घेतला. डायरेक्टरांमध्यें बारसखेरीज साईस, रॉजर डयूकास, गोहीयखुम्यूलिन हे चार नवे डायरेक्टर आले होते. त्यांपैकीं साईस हा विशेष नांवाजलेला होता. या डायरेक्टरांत, राज्यकारभारांत कर्तबगार कोणीच नव्हता, उलट संशयावरून त्यांनीं अनेकांना हद्दपार केलें, त्यामुळें देशांत अस्वस्थता माजली होती. याप्रमाणें अन्तर्बाह्य हलाखीच्या स्थितींत लोकांना नेपोलियन हा एकच त्राता आहे असें वाटत होतें. नेपोलिननेंहि तें जाणून सर्व राजकीय सत्ता आपल्या हातीं घेण्याचा अचाट कट केला. बारस, साईस व डयूकास या तिघांना त्यानें कटांत घेतलें. शिवाय कावेबाज टालेरांड, पॅरिसचा कोतवाल फूशे, आणि एन्शंटसचें कौन्सिल (शिष्टांची सभा) व ज्यूनियरांचें कौन्सिल ( पांचशें तरुणांची सभा ) या दोन कायदेमंडळांपैकीं बऱ्याच लोकांस अनुकूल करून घेऊन त्यांनीं, देशांत अराजकांचा मोठा कट आहे, त्याकरितां नेपोलियनला सैन्याचा मुख्य नेमावा, व पूर्वीची राज्यघटना बदलून टाकावी व डायरेक्टरांनीं राजीनामे देऊन त्यांच्या ऐवजीं तिघांचें कौन्सिलेट नेमावें त्यांनीं नवीन राज्यघटना बनवावी असे ठराव करावे असा व्यूह रचला. त्याप्रमाणें १८नोव्हेंबर१७९९रोजीं शिष्टांची सभा भरून त्यांनीं ठराव पास केल्यावर तरुणांच्या सभेपुढें ते ठराव आले, त्यावेळीं "अराजकांच्या कटाला पुरावा कोठें आहे; नेपोलियननेंच कायद्यांचीं बंधनें तोडलीं आहेत; त्याला ' आउट लॉ ' ठरवावा" अशा सूचना येऊं लागल्या. तेथें हजर असलेला नेपोलियन त्या सूचना ऐकून इतका घाबरला कीं जरा मूर्च्छितहि झाला पण तभेचा अध्यक्ष नेपोलियनचाच भाऊ लुसीन बोनापार्ट हा होता; मोठ्या धैर्यानें व युक्तीनें आऊटला करण्याच्या सूचना, नेपोलियनचें म्हणणें ऐकल्याशिवाय मतास घालण्याचें नाकारून तो अध्यक्षस्थान सोडून बाहेर आला आणि ' सभेंत इंग्लंडच्या लांचानें फितूर बनलेले कांहीं लोक आहेत ' असें बाहेरच्या सैन्यास सांगतांच सैन्यानें सभा उधळून लावली. नंतर रात्रीं पुन्हां सभा भरली, तींत नेपोलियनविरोधी इसम हजर न राहिल्यामुळें डायरेक्टरांऐवजीं डयूकास, साईस व नेपोलियन हे तीन कॉन्सल नेमण्याचे ठराव पास झाले. त्यांत नेपोलियन फर्स्ट कॉन्सल नेमला गेला व त्यानें सर्व राज्यसूत्रें हातीं घेऊन देशाचा कारभार सुरू केला. साईसनें नवी राज्यघटना तयार केली तींत नेपोलियननें अनेक दुरुस्त्या केल्या. या नव्या राज्यघटनेंत चार मुख्य संस्था होत्या त्यांपैकीं ' कौन्सिल ऑफ स्टेट 'नें फक्त नव्या कायद्यांची सूचना करावी, ' ट्रायब्यूनेट ' नें त्यांवर फक्त वादविवादात्मक भाषणें करावीं, ' लेजिस्लेटर ' नें नुसतीं मतें द्यावीं व ' सीनेट ' नें अखेरची मंजूरी किंवा नामंजूरी द्यावी, अशी योजना होती. याप्रमाणें घोटाळ्याची राज्यघटना करून नेपोलियननें सर्व अधिकार फर्स्ट कॉन्सिलच्या हातीं राहतीलसें केलें. तरी वरून लोकसत्ताक दिसणारी ही राज्यपद्धति फ्रान्सच्या मतदारांनीं १५६२ प्रतिकूल विरुद्ध ३०११००७ अनुकूल मतें देऊन प्रचंड बहुमतानें पास केली. याप्रमाणें अधिकार हातीं आल्यावर नेपोलियननें चांगले लायख इसम निवडून मंत्रिमंडळ बसविलें; आणि इंग्लंड, प्रशिया, स्पेन, रशिया वगैरे देशांशीं फ्रेंच सरकारचा मुख्य सत्ताधीश म्हणून बोलणें सुरू केलें. पण फक्त रशियाचा झार पॉल नेपोलियननें पूर्वींचे रशियन कैदी सोडल्यामुळें व आशिया जिंकून आपसांत वांटून घेण्याच्या आमिषानें दोस्त बनला. उलट इंग्लंडनें नेपोलियनचा अधिकार अमान्य करून पुन्हां आस्ट्रियाला मदत देऊन युद्ध करण्याचें ठरविलें.

आस्ट्रियाशीं दुसरें युद्धः—ही परिस्थिति पाहून नेपोलियननेंच आस्ट्रियावर चालून जाण्याचें ठरविलें, व मोरेयूच्या सेनापतीस तिकडे रवाना केलें व स्वतः अत्यंत गुप्तपणानें दुसरें सैन्य तयार करून व अत्यंत बिकट असा आल्प्स पर्वत ओलांडून त्यानें आस्ट्रियन सैन्याला अचानक गांठलें व मारेंगो येथें आस्ट्रियन सरदार डिमेलो याच्या सैन्याचा पूर्ण मोड केला. डिमेलोनें तात्पुरता तह केला. तो नाकारून आस्ट्रियन सरकारनें युद्ध चालविलें, तेव्हा होहेनलिंडन येथें पुन्हां पराभव झाल्यामुळें अखेर आस्ट्रियानें तह केला आणि इटलीचा पूर्वी फ्रान्सनें जिंकलेला प्रदेश मध्यंतरीं आस्ट्रियानें घेतला होता तो फ्रान्सला पुन्हां परत मिळाला.

तहाहयात कॉन्सिल, अन्तःसुधारणा, कट व सम्राटपदः— मारेंगोच्या विजयानंतर लगेच नेपोलियन पॅरिसला परत आला. एके दिवशीं नेपोलियन नाटकाला गेला असतां त्याच्या गाडीला राजपक्षाच्या कटवाल्यांनीं स्फोटक द्रव्यांनीं अपघात करण्याचें ठरविलें. पण नेपोलियनच्या गाडीला इजा न होतां इतर इसम मरण पावले. या कटाचा शोध लावून त्यानें अनेकांना फांशीच्या व हद्दपारीच्या शिक्षा दिल्या. या राजपक्षाच्या कटामुळें व आस्ट्रियावरील विजयामुळें लोकमत नेपोलियनला फार अनुकूल बनलें आणि कॉन्सलच्या जागेची तीन वर्षांची मुदत संपल्यानंतर त्याला कायदेमंडळांनीं व सर्व फ्रेंच नागरिकांपैकीं ३५६८८८५ अनुकूल व ८३७४ प्रतिकूल मतांनीं तहाहयातचा फर्स्ट कॉन्सल नेमलें. आस्ट्रियाचा पराभव झाल्यामुळें व हार नेपोलियनला मिळाल्यामुळें इंग्लंडनेंहि नमतें घेऊन नेपोलियनशीं अमीन्सचा तह २७ मार्च १८०२ केला. नेपोलियननें फर्स्ट कॉन्सल झाल्यापासून फ्रान्सच्या अन्तर्गत सुधारणेकडे फार बारकाईनें लक्ष दिलें. फ्रेंच राज्यक्रांतिकारकांनीं जुनें कॅलेंडर बदलून, धर्म नाहींसा करून, पिढीजाद अमीरउमरावांचीं घराणीं उध्वस्त केलीं होतीं. नेपोलियननें पुन्हां जुनें कॅलेंडर, धर्मखातें, पोपची सत्ता वगैरे प्रस्थापित करून परदेशीं पळालेल्या राजपक्षाच्या अनेक श्रीमंत सरदारांना देशांत परत येऊं दिलें. पूर्वी डायरेक्टरांनीं कैदेंत टाकलेल्या अनेक राजकीय पुढाऱ्यांना सोडून देऊन त्यांना मोठाल्या नोकऱ्याहि दिल्या. कायद्याचीं कोडें नवीन तयार केलीं तीं इतकीं चांगलीं आहेत कीं, हल्लीं बऱ्याच यूरोपीय देशांतील कायदे त्या नमुन्याचे आहेत. त्यानें शिक्षण, शेती, कालवे, व्यापार, वगैरे सर्व खातीं सुधारलीं. पदव्या देण्याची पद्धत पुन्हां सुरू करून 'लीजन ऑफ ऑनर' नांवाचें पदक देण्याची नवीन योजना केली. कोणत्याहि धंद्यांत किंवा पेशांत उत्कृष्ट ठरेल त्याला हें पदक व त्याबरोबर जमीन किंवा देणगीहि मिळे. याप्रमाणें समानतेचीं तत्त्वें राखून सर्व लोक व सर्व राजकीय पक्षांना त्यानें खुष केलें; तें इतकें कीं, बोरबोन राजघराण्याचा वारस अठरावा लुई यानेंहि नेपोलियनला 'मला तुम्ही फ्रान्सच्या गादीवर बसवावें' वगैरे मजकुराचें पत्र लिहिलें! त्याला मात्र 'तुम्हीं या भानगडींत पडूं नये' असें उत्तर नेपोलियननें निक्षून लिहिलें. या निराशेमुळें बोरबोन घराण्याच्या वतीनें एक मोठा कट, नेपोलियनला ठार मारण्याकरितां १८०४ सालीं झाला. त्याचा पुढारी जॉर्ज काडोडल असून त्याला इंग्लंडांतून पैशाची मदत होती. या मोठ्या कटाचा सुगावा दुसऱ्या एका बारक्या कटांतील आरोपीकडून नेपोलियनला कळला. मोरेयू, पिशेग्रू, बोरबोन घराण्यांतला ड्यूक-डी-एनगाईन, कौंट आर्टाय वगैरे बडे इसम कटांत सामील असल्याचें शाबीत झालें. पुष्कळांना देहांतशासन झालें. या कटामुळें फ्रान्सच्या जनतेला बोरबोन घराण्याची पुन्हां भीति वाटूं लागून, नेपोलियनलाच राजपद देण्याकडे लोकमत वळलें. १८ मे १८०४ रोजीं फ्रेंच साम्राज्याचा नेपोलियनला बादशहा करण्याची सूचना सीनेटनें मान्य केली. पुढें सर्व फ्रेंच नागरिकांचींहि मतें घेतलीं तेव्हां ३५७२३२९ अनुकूल मतें पडलीं. तदनुसार नेपोलियनला जोसेफाईन राणीसह राज्याभिषेक नॉटरडॅम येथें खुद्द पोपच्या हस्तें होऊन त्यांना राजमुकुट अर्पण करण्यांत आले. नंतर २० मे १८०५ रोजीं 'इटलीचा राजा' हें पद व राजमुकुट धारण केला. शिवाय तहाहयात कॉन्सल झाल्यापासून नेपोलियननें सर्व सत्ता आपल्या एकट्याच्या हातीं ठेवण्यासाठीं राज्यघटनेंत हळू हळू अनेक फरक केले होते.

इंग्लंडवरच्या स्वारीची तयारीः—इटली, ईजिप्त, आस्ट्रियादि देशांतील उघड युद्ध व फ्रान्समधील गुप्त कटांत जेथें तेथें इंग्रजांचा हात असल्यामुळें आणि आमीन्सच्या तहाप्रमाणें माल्टा बेट इंग्रजांनीं फ्रेंचांना न दिल्यामुळें खुद्द इंग्लंडवर स्वारी करण्याच्या इराद्यानें फ्रान्सच्या उत्तर किनाऱ्यावर बोलोन येथें २४०० जहाजांच्या जंगी आरमाराची तयारी करविली. इंग्लंडनेंहि, सतरा वर्षांवरील व बावन वर्षांच्या आंतील प्रत्येक इसमानें लढाईत सामील झालेंच पाहिजे असा कायदा करून दहा कोट रुपयांचे नवे कर्जरोखे काढून नवे कर बसवून संरक्षणाची तयारी केली. १८मे१८०३ रोजीं आरमारी युद्ध सुरू होऊन तें १८०५ अगस्टपर्यंत चाललें. इंग्लिश खाडींत एक संबंध जहाजांचा पूल बनवून सहा तासांत एकदम दीड लक्ष सैन्य इंग्लिश किनाऱ्यावर उतरवून इंग्रजांशीं जमिनीवरच लढाई द्यावी असा त्याचा बेत होता. असा पूल न होऊं देण्याकरितां इंग्लंडनें सर्व आरमार इंग्लिश खाडींत जमविलें. केडिझ, ब्रेस्ट व टूलोन येथील फ्रेंच जहाजें इंग्लिश खाडींत आणण्याचा नेपोलियननें प्रयत्न केला पण ब्रिटिश जहाजांनीं त्यांना अडविलें. उभय आरमारांच्या चार दोन लहान चकमकींहि झाल्या, इंग्रज आरमारास तोंड देण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें त्याला फसवून इंग्लिश खाडींतून दूर नेण्याकरितां नेपोलियननें वेस्ट इंडीज बेटांवर स्वारी करण्याची हूल दाखविली; त्याप्रमाणें इंग्रज अधिकारी नेल्सन यानें कांहीं जहाजांसह पाठलागासहि गेला.व त्या संधींत आरमारी स्वारीचा प्रयत्न फ्रेंच सरदारानें केला पण त्याच्या भित्रेपणामुळें तोहि फसला. शिवाय मध्यंतरीं इंग्लंडनें आस्ट्रिया, प्रशिया, रशिया व स्वीडन, यांच्याशीं एकमत करून फ्रान्सवर आस्ट्रिया, प्रशिया व रशिया याजकडून स्वारी करविली. यामुळें नेपोलियननें इंग्लंडवरील स्वारीचा बेत रहित करून आस्ट्रियावर एकदम चाल केली. अखेर समुद्रावर फ्रेंच व इंग्रज आरमारांनीं ट्राफलगार येथें लढाई (१८ आक्टोबर १९०५) होऊन तींत फ्रेंच आरमाराचा बहुतेक नाश झाला.

नेपोलियनविरुद्ध उत्तर यूरोपः—गेल्या महायुद्धांतील जर्मन कैसरप्रमाणें नेपोलियनचेंहि पहिले बेत फ्रान्सला ईजिप्त, हिंदुस्थान वगैरे दूर देशीं वसाहतींचें साम्राज्य

पथकें उभारलीं. थोडक्या दिवसांत सर्व तयारी करून संयुक्तांच्या फौजा एकत्र होण्यापूर्वी त्यांचा पृथक्पृथक् पराभव करण्याच्या योजनेनें तो निघाला. आस्ट्रिया स्वतःला मिळावा निदान तटस्थ रहावा म्हणून त्यानें खटपट केली, पण आस्ट्रियन प्रधान मेटरनिक यानें नेपोलियनची अखेर लावण्याच्या दूरवर धोरणानें वरून तहाचीं बोलणीं लावून आंतून संयुक्तांना पूर्ण मदत केली, व अखेर उघडपणें संयुक्तांस मिळाला. शिवाय या वेळीं नेपोलियनविरुद्ध संयुक्तांनीं "सर्व राजांनीं व संस्थानिकांनीं आपापलीं सैन्यें घेऊन नेपोलियनच्या जाचांतून यूरोप मोकळें करण्यास मदत करावी" असा जाहीरनामा ता. १९ मार्च १८१३ रोजीं काढला आणि झारनें प्रत्यक्ष पत्रें पाठवून व लालूच दाखवून नेपोलियनच्या अनेक मांडलिकांना नेपोलियनविरुद्ध उठाविलें; इतकेंच नव्हे तर खुद्द नेपोलियनचे जुने सरदार व सैन्य यांना फितुर करण्याचे यत्न केले. उभय सैन्यांची पहिली लढाई लटझेन येथें, दुसरी ड्रेसडेन व तिसरी वटझेन येथें होऊन तिन्हींत नेपोलियनला जय मिळाला. तेव्हां मेटरनिकनें तहाचीं बोलणीं सुरू केलीं. अद्याप आस्ट्रिया तटस्थ होता. तह करण्याचा संयुक्तांचा विचार नसून केवळ तयारीस फुरसत मिळण्याकरितां तहाचीं बोलणीं चालू ठेविलीं होतीं. नेपोलियनलाहि तयारीला अवसर मिळाला; तथापि त्याला तह मनापासून पाहिजे होता. पण मेटरनिकनें अशक्य अटी हळूहळू पुढे करून संयुक्तांची पुन्हां तयारी होतांच तह होत नाहीं असें जाहीर केले, व आस्ट्रिया उघडपणें संयुक्तांस मिळाला. या वेळेच्या संयुक्तांच्या तयारींत अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे बरनेडो, मोरेऊ व जोमिनी या नेपोलियनकडील कसलेल्या सरदारांची प्राप्ति. या फितूर सरदारांनीं संयुक्तांना असा सल्ला दिला कीं, "संयुक्तांचें सैन्य केवढेंहि असले तरी प्रत्यक्ष नेपोलियन जेथें जातीनें हजर असेल तेथें त्याच्या सामन्यास उभे राहूं नये व लढाई देण्याचें धाडस करूं नये. तेथून पळ काढावा आणि तो नसेल तेथें त्याच्या सरदारांशीं लढाई देऊन फ्रेंच सैन्याचा नाश करावा." ही युक्ति लिजनिटस, ड्रेसडेन, गोरलिझ वगैरे ठिकाणीं अवलंबिल्यामुळें नेपोलियनला विनाकारण धांवपळ करावी लागून सैन्यांत अव्यवस्था फार झाली. शिवाय सैन्याच्या तुकड्याच्या तुकड्या फितूर होऊन संयुक्तांना मिळूं लागल्या. अशा स्थितींत संयुक्तांनीं मोठ्या सैन्यानिशीं खुद्द नेपोलियनशीं लिप्झिक येथे मोठी लढाई दिली तींत नेपोलियनचा पराभव झाला. तेव्हां माघार घेत नेपोलियन ९ नोव्हेंबर १८१३ रोजीं पॅरिसला परत आला. कारण पॅरिसमध्येंहि फितुरी माजून सर्व अव्यवस्था झाली होती. येथें फितुरांचा अग्रणी खुद्द टालेरांड होता. नेपोलियन 'लेजिस्लेटिव्ह बॉडी', या सभेपुढें नवें सैन्य मागूं लागला पण तें नाकारण्यांत आलें. तथापि संयुक्तांची फौज फ्रेंच सरहद्दीवर जमल्यामुळें खुद्द फ्रान्सच्या संरक्षणाचा प्रश्न आहे, हे निरनिराळ्या लष्करी व मुलकी शिष्टांच्या सभेंत समजून सांगितल्यावर नेपोलियन म्हणाला "जगाची सत्ता फ्रान्सला मिळवून द्यावी अशी मी हिंमत बाधली होती. पण फ्रान्सच्या लोकवस्तीच्या मानानें पाहतां माझे बेत अफाट होते. या बाबींतल्या चुकीमुळें माझे अंदाज फसले. त्याकरितां कांहीं भोगावें लागल्यास मी स्वतः भोगीन. प्रसंग पाहून वेळ पडेल त्याप्रमाणें मी तहहि करीन." या भाषणानें देशसंरक्षणाकरितां सैन्यांत दाखल झालेले लोक घेऊन नेपोलियननें संयुक्तांविरुद्ध मार्मेंड, मांटेरू, मेरी, सोइसन्स, क्रेओन, ऱ्हीम्स वगैरे ठिकाणीं जय मिळविले. पण त्यांत त्याचें बरेच सैन्य नाश पावलें, आणि सर्व तऱ्हेची सामुग्री पॅरिसमधून घेऊन येणारे खटारे शत्रूंनीं हस्तगत केले. तेव्हां संयुक्तांना अडविण्याचें काम अशक्य होऊन त्यांच्या दोन लाख सैन्यानें चाल करून पॅरिस शहर हस्तगत केलें.

राज्यत्याग, एल्बानिवास, पुनः राज्यप्राप्ति व वाटर्लूस पराजयः—सैन्याच्या अभावामुळें लढाई न करतां नेपोलियन फान्टेनब्लू येथें राहिला. पॅरिसमध्यें टालेरांडनें सीनेट सभा भरवून 'नेपोलियनला सिंहासनावरून दूर केलें आहे' असा ठराव केला. नेपोलियनचे बहुतेक सरदार आतां संयुक्तांना मिळाले होते. त्यांपैकीं ने, बरथियर, लेफेरे, उदीनो व कालिनकूर यांनीं नेपोलियनची गांठ घेऊन राज्याचा राजीनामा देण्यास त्याचें मन वळविलें. राजीनामा दिल्यावर संयुक्तांशीं फान्टेनब्लूचा तह कालिनकूरने जुळवून आणून (१) नेपोलियनला एल्बाबेट द्यावें, ( २ ) त्याला तेथील बादशहा व पूर्ण स्वतंत्र मालक समजावा, (३ ) त्यानें तेथें सैन्य ठेवावें, ( ४ ) फ्रेंच खजिन्यातून वीस लक्ष फ्रँक त्याला मिळावे, (५) व त्याची आई, मुलगा वगैरेंना अशाच रकमा मिळत जाव्या वगैरे अटी ठरल्या. तदनुसार ३ मे १८१४ रोजीं तो एल्बांत दाखल झाला, व राजा या नात्यानें सर्व कारभार त्यानें सुरू केला मुलकी व लष्करी अधिकारी नेमले; सडका, कालवे, शेतकीसुधारणा, खाणी, तसेंच सैन्य, आरमार, तटबंदी वगैरे गोष्टी त्यानें सुरू करून त्या बेटाला लवकरच नवें रूप दिलें. पण या सुधारणांकरितां त्याला लवकरच पैशाची अडचण भासूं लागली. त्याच्या स्त्रीपुत्राला मेटरनिकनें एल्बास धाडण्याचे नाकारलें. तिकडे फ्रान्समध्यें लुई राजानें अनियंत्रित राज्यकारभार सुरू केल्यामुळें लवकरच तो अप्रिय बनला. हें सर्व जाणून नेपोलियननें पुन्हां फ्रान्समध्यें परत येण्याचें अगदीं गुप्तपणें ठरवून दहा महिन्यांनीं ता. १ मार्च १८१५ रोजीं १२१९ लोकांसह तो फ्रान्सच्या किनाऱ्यावर उतरला व अत्यंत युक्तीनें त्यानें फ्रेंच लोकांस व लुई बादशहाच्या लष्करास आपल्या बाजूस वळवून घेऊन एकहि बंदूक न झाडतां पॅरिस शहर हस्तगत केलें. लुई राजा सैन्य फितल्यामुळें पळून पुन्हां संयुक्तांच्या आश्रयास गेला. पॅरिसला येतांच नेपोलियननें राज्यकारभार सुरू केला. मुलकी व लष्करी अधिकारी नेमले व बेंजामिन कान्स्टंट यानें तयार केलेली इंग्लंडच्या सारखी नियंत्रित राज्यपद्धति ( लिमिटेड

मॉनर्की ) मान्य केली, आणि कालिनकूर, फूशे, सावारी, दान्हू, सौल्ट, वगैरे जुन्या इसमांस अधिकारी नेमलें. नेपोलियन परत आल्याचें कळतांच संयुक्तांनीं पुन्हां प्रत्येकी दीड लाख सैन्य घेऊन फ्रान्सवर स्वारी केली. नेपोलियननें 'मी यापुढें फ्रान्सच्या बाहेर ढुंकूनहि पाहणार नाहीं' असें अनेकवार जाहीर केलें. पण संयुक्तांनीं तिकडे लक्ष न देतां चाल केली. तेव्हां नेपोलियन नवें सैन्य घेऊन ता. ११ जून, १८१५ रोजीं लढाईवर निघाला. संयुक्तांचे सेनापती ब्लूचर व वेलिंग्टन यांनां प्रथम लढाई देण्याचें ठरवून ने, सौल्ट, ग्रुच्या, एरलो वगैरे सरदारांस हुकूम दिले. लिग्नी येथें ब्लूचरच्या सैन्याचा फ्रेंचांनीं पराभवहि केला. क्वाटरब्रासच्या लढाईत इंग्रज व फ्रेंच यांची बरोबरी झाली. पण पुढें वाटर्लू येथें एकट्या वेलिंग्टनला गांठण्याचा डाव, नेपोलियनच्या ग्रुच्ची सरदारास ब्लूचरचें प्रशियन सैन्य अडवून धरण्याचें न साधल्यामुळें, अखेर फसला; आणि वाटर्लूच्या लढाईत ( ता. १८ जून, १८१५ ) फ्रेंचांनां वेलिंग्टनच्या सैन्यावर जय मिळणार अशा संधीस ब्लूचरची कुमक येऊन पोहोंचल्यामुळें फ्रेंचांचा पूर्ण मोड झाला.

कैद व सेंट हेलिना बेटांत अखेरः—सैन्य न उरल्यामुळें लढाई थांबवून नेपोलियननें लेयॉन येथून सर्व वृत्त पॅरिसला कळविलें व नंतर २१ जून रोजीं पॅरिसमध्यें गेला, व कारनो, फूशे, रेनो, लुसीन वगैरेंचा सल्ला त्यानें विचारला. प्रतिनिधिसभेची ( चेंबर ऑफ डेप्युटीज ) बैठक भरविण्यांत आली. 'राष्ट्र संकटांत आहे. या वेळीं जो आमची सभा बरखास्त करण्याचा प्रयत्न करील तो राष्ट्रद्रोही समजला जाईल; व त्यास त्या गुन्ह्याचें शासन मिळेल. लष्करी अम्मलदार, परराष्ट्रीय वकील व राष्ट्रांतले अधिकारी यांनीं एकदम येथें जमावें अशी आम्ही आज्ञा करतो" असा ठराव सभेनें करून तो नेपोलियनकडेहि पाठविला. पुन्हां भरलेल्या बैठकींत स्वतः हजर न राहतां नेपोलियननें लुसीन बोनापार्टला लढाईची हकीकत सांगण्यास पाठविलें. सभेनें पुढील सूचना करण्याकरितां पांच जणांची कमिटि नेमली. त्यांच्या सूचना आल्यावर दुसऱ्या दिवशींच्या बैठकींत "नेपोलियन बादशहास आपल्या राज्याचा राजीनामा देण्यास सुचवावें" असा ठराव केला. त्याप्रमाणें नेपोलियननें राजीनामा लिहून दिला तोः—"माझें राजकीय जीवित संपलें, आणि आतां मी आपल्या मुलास 'दुसरा नेपोलियन' या नांवानें फ्रान्सचा बादशहा जाहीर करतों. 'स्वतंत्र राष्ट्र' असें राहतां यावें म्हणून सर्वांच्या संरक्षणाकरितां एकदिल व्हा." इत्यादि राजीनामा झाल्यावर चेंबर्स सभांनीं तात्पुरत्या मंत्रिमंडळाकडे राज्यकारभार सोंपविला. मंत्रिमंडळानें दोस्तांच्या पॅरिसवर चाल करून येणाऱ्या सरदारांस तह करण्याची विनंति केली; तिला ब्लूचरनें उत्तर दिलें कीं, "नेपोलियनला धरून माझ्या सैन्यामध्यें सर्व शिपायांदेखत फांशीं दिल्याशिवाय मी कांहींएक ऐकणार नाहीं." ही परिस्थिति पाहून नेपोलियननें अमेरिकेंत जाण्याचें ठरविलें. समुद्रावर ब्रिटिश आरमार पहारा करीत होतें. त्याच्या मेटलंड नांवाच्या अधिकाऱ्यास ब्रिटिश सरकारकडून अमेरिकेस जाण्याचा परवाना देण्याबद्दल विचारलें. परवान्याचें नक्की न सांगतां मेटलंडनें नेपोलियनला इंग्लंडांत नेण्याचें कबूल करून आपल्या जहाजावर नेपोलियन व त्याच्या मंडळीस घेतलें. ब्रिटिश किनाऱ्याजवळ आल्यावर ब्रिटिश सरकारनें इंग्लंडांत उतरण्याची परवानगी न देतां नेपोलियनला कैदी म्हणून सेंट हेलिना बेटांत ता. १६ नोव्हेंबर, १८१५ रोजीं नेऊन ठेविलें. सर हडसन लो नांवाचा लष्करी अम्मलदार बेटाचा गव्हर्नर नेमला. फ्रान्स, आस्ट्रिया व रशिया यांनींहि एकेक कमिशनर नेमला होता. ते सर्व नालायक असल्यामुळें नेपोलियननें कोणाचीहि भेट घेतली नाहीं.

नेपोलियनला खर्चाकरितां सालीना ८००० पौंडांची नेमणूक होती. तेथें बरट्रांड, गोरगोड, लास कासेस, मॉथोलोन वगैरे ५१ माणसें होतीं. नेपोलियननें तेथें आपलें आत्मचरित्र व इतर कांहीं विषयांवर लेख लिहिले व शेवटीं एक मृत्युपत्रहि लिहिलें. तेथून पळून जाण्याचें त्यानें कधीं मनांतहि आणलें नाहीं. सेंट हेलिनाला गेल्यापासूनच त्याची प्रकृति खालावत जाऊन अखेर तो ता. ५ मे, स. १८२१ रोजीं मरण पावला. त्याचें मृत शरीर फाडून कोथळा व काळीज शस्त्रवैद्याकडून हडसन लो यानें बाहेर काढवलें व नंतर त्याच्या शवाचें दफन त्या बेटांतच केलें. पुढें एकोणीस वर्षांनीं नेपोलियनचें तें शव मोठ्या समारंभानें पॅरिस येथें नेऊन पुरण्यांत आलें.

नेपोलियनचें युद्धकौशल्यः—अलीकडे फ्रेंच जनरल स्टाफनें नेपोलियनने प्रत्यक्ष रणांगणावरचे बरेचसे हुकूम प्रसिद्ध केल्यामुळें या बाबतींत निश्चित मत बनवितां आलें आहे. तत्पूर्वी "नेपोलियन म्हणजे ४० हजार सैन्य" इतकें त्याच्या रणांगणावर प्रत्यक्ष हजर असण्यास महत्त्व त्याच्या शत्रूंनीं दिलेलें पाहून मोठें गूढ वाटत असे, तें आतां उकललें आहे. त्याला उत्कृष्ट शिक्षकांकडून लष्करी शिक्षण मिळालें होतें; त्याला तोफखाना, तटबंदी व डोंगराळ मुलखांतल्या लढाया यांविषयींचें ज्ञान पक्कें होतें. लष्करी ज्ञानाला तो शास्त्रीय व गणिती पद्धति लागू करून प्रत्यक्ष लढाईत त्याची यशस्विता सिद्ध करण्याचे प्रसंग त्यानें लवकरच मिळविले. लढाईच्या तत्कालीन सर्व डावपेंचांचें पूर्ण ज्ञान, अविरत उद्योग, हिंमत व विलक्षण धाडस या अनेक गुणांवर त्यानें १८०५ सालपर्यंतच्या सर्व लढाया जिंकल्या. त्यांत नेपोलियनची स्वतःची नवी युक्ति किंवा शोध कोणताहि नव्हता. पण या सर्व काळांत कांहीं तरी नवी युक्ति शोधून काढण्याकडे त्याचें गणिती मन सारखें गुंतलें होतें. घोडेस्वारांच्या पथकाचा आडोमा ( कॅव्हलरी स्क्रीन ) पुढें करून त्याच्या मागून सर्व पायदळ सैन्य न्यावें अशी योजना त्यानें १८०५ सालीं सुरू केली. पण एका विशिष्ट घटकेला शत्रुसैन्याची असलेली रचना ४८ तासांनंतर तशीच कायम राहणें शक्य नसल्यामुळें

घोडदळामागें सर्व सैन्य एकत्र ठेवणें इष्ट नसे. म्हणून १८०६ सालीं नेपोलियननें अशी युक्ति काढली कीं घोडेदळामागें फक्त सर्व हत्यारबंद असलेली आघाडी पलटण ( अडव्हान्स्ड गार्ड ) ठेवून बाकीचें सैन्य एक दिवसाच्या अंतरावर ठेवावयाचें आणि शत्रुसैन्याच्या हालचाली-नुरूप या मागल्या सैन्याच्या हालचाली करावयाच्या. आस्टरलिझ, येना, फ्रीडलँड वगैरे लढायांत व नंतरच्या कांहीं लढायांत त्यानें हीच युक्ति योजली. पण पुलटुस्क, हील्सबर्ग वगैरे लढायांत ती योजली नाहीं. कारण या युक्तीवर त्याचा पूर्ण विश्वास नव्हता, व ती त्यानें स्वतःच्या कोणाहि सेनापतीला सांगितली नव्हती. नेपोलियन व त्याचे तत्कालीन प्रतिस्पर्धी त्यांच्यामध्यें एक विशेष महत्त्वाचा फरक हा असे कीं, लढाईच्या अगदीं आणीबाणीच्या व अवघड प्रसंगींहि नेपोलियन अगदीं शांतचित्त असे; कारण शत्रु कोणत्या स्थितींत असेल, काय हालचाली करील यासंबंधीं सर्व गोष्टी आगाऊ नीट लक्षांत आणून तो आपली लढाईची योजना आगाऊ ठरवीत असे. उलटपक्षीं फ्रेंच सैन्याच्या लढाई जुंपल्यावरच्या विविध हालचाली पाहून शत्रूकडील सेनापती गोंधळून जात व लढाईच्या ऐन धामधुमींत क्षणोक्षणीं बदलणाऱ्या परिस्थित्यनुरूप निर्णय ठरवून निरनिराळे हुकूम सोडण्याचें त्यांनां साधत नसे, या एका गोष्टींतच नेपोलियनच्या सर्व विजयांचें रहस्य आहे.

नेपोलियनची योग्यताः—नेपोलियनची बुद्धि सर्वगामी होती. त्याला अगम्य व असाध्य असा कोणताच विषय नव्हता. या अचाट बुद्धिमत्तेबरोबरच सर्व विषयांचें, अगदीं चालू काळापर्यंतचें ज्ञान मिळविलें पाहिजे ही जाणीव नेपोलियनला पूर्ण होती. बुद्धिमान इसम बहुधां ज्ञानार्जनांत आळशी असतात व थोडक्या वाचनानें सर्वज्ञ बनण्याचा त्यांनां मोह पडतो. नेपोलियनचें ग्रंथवाचन किती विस्तृत व विविध होतें हें त्याच्या उपलब्ध नोटबुकांवरून कळतें. फ्रेंच राज्यक्रांतींतील राजनीतिशास्त्र, समाजशास्त्र वगैरे विषयांत कसलेल्या पंडितावरहि त्यानें प्रथम प्रथम भाषणानें व निबंधलेखनानें छाप पाडली; गोएटे वगैरे यूरोपीय कविवर्योंकडून त्यानें प्रशंसा मिळविली. राज्यकारभार, समाजनियमन, धर्मकारण, कायदा, युद्धकला व सेनापतित्व वगैरे विषयांत केवळ तात्त्विक सिद्धांतांनीं नव्हे तर प्रत्यक्ष कार्य करून दाखवून त्यानें राजांनां व राजमंत्र्यांना तसेंच योद्ध्यांनां व सेनापतींनां आदर्शभूत व्हावें असें आचरण करून ठेविलें आहे.

नेपोलियनचे दोषः—नेपोलियनचे मुख्य दोष त्याचें स्त्रीविषयक अनिर्बंध वर्तन व राक्षसी महत्त्वाकांक्षा हे दोन प्रामुख्यानें दाखविण्यांत येतात. भारतीय नीतिमत्तेच्या अभिमानी लेखकांनां तर नेपोलियनचा कमीपणा फक्त उपर्युक्त नैतिक दुराचरणांत दिसतो. कोणत्याहि इसमाचें सार्वजनिक महत्पद खाजगी निर्दोष आचरणाच्या कोंदणांत विशेष खुलतें यांत शंका नाहीं. पण नेपोलियनला या बाबतींत विशेष दोष देतांना पौरस्त्यांच्या विशिष्ट नीतिकल्पना यूरोपीयन समाजांत कधींच रूढ नव्हत्या व नाहींत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तत्कालीन फ्रान्सचा लुई व इंग्लंडचा जार्ज बादशहा यांच्याहून अधिक दुराचरणी नेपोलियन खास नव्हता व यामुळें पाश्चात्त्य लेखक नेपोलियनच्या या वैगुण्याकडे फारसें लक्ष देत नाहींत. उलटपक्षीं पौरस्त्य लेखकांनां अनियंत्रित राज्यपद्धति युगानुयुगें हाडींमासीं खिळलेली असल्यामुळें "रिपब्लिक" ( लोकशाही ) किंवा नियंत्रित राज्यपद्धति ( लिमिटेड मॉनर्की ) या यूरोपांतील परिणत शासनपद्धतीविरुद्ध नेपोलियननें केलेल्या घोर चुकांचें फारसें महत्व वाटत नाहीं. नेपोलियनची साम्राज्य स्थापण्याची महत्त्वाकांक्षा कांहीं मराठी लेखकांनां राक्षसी वाटते, पण इंग्लंडनें अखिल जगावर स्थापलेलें साम्राज्य त्यांनां असुरी वृत्तीचें द्योतक वाटत नाहीं हें आश्चर्य आहे. नेपोलियनची अलीकडील जर्मन कायरसशीं किंवा प्राचीन अलेक्झांडर, सीझर, वगैरे जगज्जेत्यांशीं तुलना करतात. राज्यक्रांतींतील पुढारी म्हणून त्याची तुलना इंग्लंडच्या क्रामवेलशींहि करावयास पाहिजे सेनापति या नात्यानें तो वरील चौघांहून श्रेष्ठ होता, कारण कायसर प्रत्यक्ष सेनापति नसे; अलेक्झांडर व सीझर यांचे विजय युद्धकलेंत मागासलेल्या लोकांवर मिळविलेले होते आणि क्रामवेलनें तर लष्करी पेशांत न मुरलेल्या आपल्याच देशबांधवांवर काय ते जय मिळविले; यूरोपीय रणसंग्रामावर त्याचें युद्धकौशल्य कसास लागलेंच नाहीं.

नेपोलियनच्या धोरणांतल्या मुख्य चुका दोन दिसतातः— (१) लोकशाहीच्या राज्यपद्धतीकडील तत्कालीन विद्वानांच्या ओढ्याकडे त्यानें केलेलें दुर्लक्ष्य; आणि (२) यूरोपांत साम्राज्य स्थापण्याची अशक्यता या ऐतिहासिक सिद्धांताचें अज्ञान. पहिल्या चुकीमुळें टालेरांड, फूशे, प्रत्यक्ष त्याचा भाऊ लुसीन बोनापार्ट वगैरे प्रमुख फ्रेंच विद्वान नेपोलियनचे विरोधी बनले; आणि टालेरांड व फूशे यांनीं तर रशिया व इंग्लंडशीं फितुरीनें संगनमत करून नेपोलियनला रसातळास पोंचविलें. रशियन झारला टालेरांड हा गुप्तपणें नेपोलियनचे सर्व बेत कळवी आणि फूशेनें शेवटच्या मोहिमेचे ( वाटर्लू वगैरे लढायांच्या वेळचे ) नेपोलियनचे नकाशे व कागदपत्र वेलिंग्टनकडे अगाऊ धाडले. अनेक फ्रेंच मुत्सद्दी व सेनापती फितूर झाले. या सर्वांचें कारण नेपोलियनची अनियंत्रित बादशाही सत्ता फ्रेंच पुढाऱ्यांनां नको होती. नेपोलियननें वॉशिंग्टनप्रमाणें लोकशाहीचा अध्यक्ष होण्याचें ध्येय ठेवलें असतें तर त्याला वॉशिंग्टनप्रमाणें फ्रेंच राष्ट्रानें एकदां सोडून दोन चारदां अध्यक्षपद दिलें असतें; कारण फ्रेंच राष्ट्राच्या सुधारणेच्या गोष्टी त्यानें अल्पावधींत कोणाहि यूरोपीय प्रधानापेक्षां किंवा लोकशाहीच्या अध्यक्षापेक्षां अधिक केल्या होत्या. फ्रेंच राज्यक्रांतीच्या धामधुमीनंतर सुलतानी सत्ता गाजविणाऱ्याचीच जरुरी होती, असें कांहींचें

मत आहे; पण अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धकाळीं तिकडेहि अशी धामधूम माजली होती. पण जॉर्ज वॉशिंग्टननें पूर्ण निर्लोभी वृत्ति ठेवून लोकशाही राज्यपद्धति पूर्ण यशस्वी करुन दाखविली. फ्रान्सचे पुढारी अमेरिकन पुढाऱ्यांपेक्षां कांहीं विलक्षण मूर्ख नव्हते. नेपोलियननें क्रॉमवेलचें अनुकरण न करतां वॉशिंग्टनचें केलें असतें म्हणजे हेकेखोर व नाठाळ फ्रेंच वावदूकांनांहि जरूर तर लष्करी सत्तेच्या जोरावर गप्प बसवून शिवाय लोकशाही राज्यपद्धति यशस्वी करतां आली असती. परंतु त्याला विद्वत्तेच्या जोरावर राजकारणी फ्रेंच विद्वानांचा पुढारी बनतांच आलें नाहीं; इतकेंच नव्हे तर खऱ्या लोकप्रतिनिधिसभेंत भाषण करण्यास तो भीत असे, ही गोष्ट, कान्सोलेट स्थापण्याच्या वेळीं व वाटर्लूच्या लढाईनंतर प्रतिनिधिसभेंत त्याची बाजू सावरण्याचें काम लुसीन बोनापार्टला करावें लागलें यावरुन स्पष्ट दिसते. याचें कारण तो केवळ लष्करी शाळेंत व बहुतेक खाजगी वाचनानें शिकलेला एकांगी विद्वान बनलेला होता; युनिव्हर्सिटींत पंडितांच्या आखाड्यांत कसून बनलेला विद्वान नव्हता.

त्याची दुसरी चूक, साम्राज्य कोठें वाढवावें या बाबतची. सर्व यूरोपीय देश बहुतेक समबलाचे व समसंस्कृतीचे असल्यामुळें यूरोपीय देशांनां एकमेकांवर साम्राज्य स्थापणें शक्य नाहीं ही गोष्ट फ्रान्स–इंग्लंडमधील शतसांवत्सरिक युद्धानें ( हंड्रेड ईयर्स वॉर ) चांगली ठरली. अगदीं नुकतेंच पराभूत झालेल्या जर्मन रूहर प्रांतावर फ्रेंचांनां राजसत्ता स्थापतां आली नाहीं आणि जमीनदोस्त केलेल्या जर्मनीवर परकी राज्य चालविण्याचें इंग्लंड,फ्रान्ससारख्या बलाढ्य राष्ट्रांच्या स्वप्नांतहि आलें नाहीं, ह्यावरुन स्पष्ट दिसते. याच्या अगदीं उलट म्हणजे यूरोपवर फ्रेंच साम्राज्य स्थापण्याची नेपोलियनची महत्त्वाकांक्षा, शस्त्रबलांत व संस्कृतींत मागसलेल्या देशांवर प्रगत देशांनां साम्राज्य स्थापणें शक्य आहे, इतकेंच नव्हे तर पुढारी राष्ट्रांनां संमत आहे ही गोष्ट, हल्लीं रीफ लोकांनां पारतंत्र्यांत ठेवण्याकरितां चालविलेल्या स्पेन-फ्रान्सच्या प्रयत्नांचा निषेध, राष्ट्रसंघ ही जगमान्य संस्था करीत नाहीं यावरून स्पष्ट दिसतें. नेपोलियनचे ईजिप्त वगैरे मागासलेले आफ्रिकन व आशियाटिक देश जिंकण्याचे प्रयत्न यशस्वी झाले असते, तर त्याला इंग्लंडेतर यूरोपीय देशांचा फारसा विरोधहि झाला नसता. पण ती दिशा सोडून नेपोलियन यूरोपीय राजांनांच पदच्युत करूं लागला व मांडलिक बनवूं लागला तेव्हां सर्व यूरोपनें खुद्द त्याच्याच देशबांधवांच्या मदतीनें त्याला गारद केलें यांत आश्चर्य कांहींच नाहीं;यांत नेपोलियनच्या शोचनीय चुकांची मात्र कींव येते.

[ संदर्भग्रंथ —जे. हॉलंड रोज–दि लाईफ ऑफ नेपोलियन; डब्ल्यू. एम्. स्लोन–नेपोलियनः ए.हिस्टरी; ओकोनेर मॉरिस-नेपोलियन; दि केंब्रिज मॉडर्न हिस्टरी,व्हा. ९वा, नेपोलियन; कॉरस्पॉन्डन्स डी नेपोलियन दि फर्स्ट(३२व्हा.ल्यूम्स,पॅरिस); ॲबट–दि लाईफ ऑफ नेपोलियन; ओ. ब्रौनिंग–नेपोलियन दि फर्स्ट फेज, इंग्लंड अँड नेपोलियन इन १८०३; एच. ए. एल.फिशर–नेपोलियानिक स्टेट्समनशिप; लेडी मालकम— ए डायरी ऑफ सेंट हेलेनाः डब्ल्यू फॉरसिथ–हिस्टरी ऑफ दि कॅप्टिव्हिटी ऑफ नेपोलियन ॲट सेंट हेलेना; अर्ल ऑफ रोजबरी—नेपोलियनः दि लास्ट फेज; वि. ल. भावे-चक्रवर्ती नेपोलियन. ]

दु स रा.—पहिला नेपोलियन याच्या मुलाला बोनापार्टिस्ट पक्षानें दुसरा नेपोलियन हें पद दिलें होतें. १८१४ सालीं पहिल्या नेपोलियननें राज्यत्याग केला त्यावेळीं कांहीं दिवस दुसरा नेपोलियन राजा मानला गेला होता व म्हणूनच पुढें प्रिन्स लुई या नेपोलियननें तिसरा नेपोलियन हें नांव धारण केलें.

ति स रा.—( सन १८०८ ते १८७३ ) चार्लस लुई नेपोलियन बोनापार्ट हा फ्रान्सचा बादशाहा १८०८च्या एप्रिलांत पॅरिस येथें जन्मला हा पहिल्या नेपोलियनचा भाऊ लुई, याचा तिसरा मुलगा. त्याची आई,महाराणी जोसेफाईन हिच्या पहिल्या नवऱ्याची मुलगी हॉर्टेन्स ही होय. यामुळें त्याचें, पहिल्या नेपोलियनशीं पुतण्या व सावत्र नातू असें नातें होतें. लुई नेपोलियनच्या औरसपणाबद्दल त्यावेळीं शंका प्रदर्शित करण्यांत आल्या होत्या. कारण त्याचा बाप लुई बोनापार्ट हा नेहमीं आजारी, अस्वस्थ व स्वपत्नीविषयीं साशंक असे व आई देखणी व लहरी असून इतकी बेमुर्वत असे कीं, नवराबायकोंचें मुळींच जमत नसे. परंतु बापलेकांतील स्वभावसाम्यामुळें वरील शंका अयोग्य ठरतात. हा प्रथमपासूनच गंभीर व कल्पनासृष्टींत भराऱ्या मारणारा होता. लुई राजाला हद्दपार केल्यावर हॉर्टेन्स आपल्या दोन मुलांसह फ्रान्समध्येंच राहिली होती.

बोर्बोन राजे राज्य करूं लागतांच (सन१८१५) हॉर्टेन्सला फ्रान्स सोडून जावें लागलें.त्या वेळीं माजी लुई राजा फ्लॉरेन्समध्यें रहात होता, त्यानें कोर्टामार्फत वडील मुलाचा कबजा मिळविला. तेव्हां हॉर्टेन्स ही स्वतंत्र व एकटी कॉन्स्टन्सरोवरानजीक राहिली. तेथें नेपोलियनचें शिक्षण तिच्या देखरेखीखालीं झालें. त्याला वाङ्मयाचीच अधिक गोडी असून शारीरिक खेळांतहि तो तरबेज होता. त्याच्या शिक्षकांनीं त्याला फ्रेंच राज्यक्रांति, लोकशाही, फ्रेंच साम्राज्य वगैरे राजकीय प्रश्नांची सविस्तर माहिती देऊन बादशाहा होण्याबद्दलच्या कल्पना लहानपणापासून त्याच्या मनांत भरवून दिल्या होत्या. सन १८२३ मध्यें तो आपल्या आईबरोबर बापाला भेटून परत आल्यावर त्यानें लष्करी शिक्षण मिळविलें.२३ व्या वर्षीच तो लिबरल म्हणून राजकारणांत पडला. १८३०सालच्या राज्यक्रांतीनें त्याच्या आकांक्षा प्रबळ झाल्या. परंतु बोनापार्ट घराण्याला फ्रान्समध्यें राहण्याची कायद्यानें मनाई असल्यामुळें तो इटलींतच राही. तेथें तो कार्बोनरी संस्थांत शिरला. रोमोग्ना येथील बंडांत व रोममधून पोपला

हांकून लावण्यांत नेपोलियन व त्याचा भाऊ दोघेहि सामील होते. इतक्यांत ऑस्ट्रियन सैन्य चालून आलें, त्या गडबडींत त्याचा थोरला मुलगा वारला व लुई नेपोलियन पॅरिसला पळून आला व लुई फिलिफच्या खास परवानगीनें तेथें राहिला. परंतु पुढें लोकशाही पक्षाशीं संगनमत करण्याच्या आरोपावरून त्याला पुन्हां फ्रान्स सोडून जावें लागलें. इतक्यांत रीचर्डटचा ड्यूक मरण पावला, आणि त्याचा चुलता व बाप यांनीं आपला राज्यावरील वारसा-हक्क सोडलेला असल्यामुळें लुई नेपोलियनच बोनापार्ट घराण्यांतील वारस उरला. त्यानें 'रेव्हेरी पॉलिटिक्स', 'कन्सिडरेशन्स पॉलिटिक्स,'व 'मॅन्युअल डी आर्टीलरी' हीं तीन पुस्तकें लिहिलीं.

१८३६ सालीं त्यानें व्हाड्रे, लेडी वगैरे मित्रांच्या मदतीनें स्ट्रासबर्ग येथील लष्करांत बंड उभारण्याचा प्रयत्न केला, पण तो फसला आणि लुई फिलिफच्या हुकुमानें त्याला अमेरिकेंत हद्दपार केलें. पण तेथून खोटा पासपोर्ट घेऊन तो १८३७ मध्यें परत आला व लंडनला जाऊन राहिला. तेथें ऑर्से, डिझरायली, लेडी ब्लेसिंग्टन यांच्याबरोबर त्याची मैत्री जमली. स.१८३९ त बोनापार्टशाही,समाजसत्ताशाही व शांततावाद यावद्दल एक पुस्तक त्यानें लिहिलें. शिवाय फ्रान्समध्यें त्याच्या पक्षाच्या लेखकांनीं वर्तमानपत्रद्वारें त्याला अनुकूल मत बनविण्याचा उद्योग चालविलाच होता. नेपोलियननें (१८४० त ) बोलोन येथें बंड उभारून पॅरिसवर चालून जाण्याचा प्रयत्न केला; पण तो फसला व त्याच्यासह बऱ्याच जणांनां कैदेची शिक्षा झाली; त्यानें कैदेंत अनेक लेख लिहिले; सहा वर्षें कैदेंत काढल्यावर १८४६ त बापाच्या मरणाच्या निमित्तानें तो लंडनला येऊन राहिला. तेथें त्यानें अतोनात चैन केली. परंतु फ्रान्सच्या परिस्थितीवर त्याची पूर्ण नजर होती.स .१८४८ च्या राज्यक्रांतीच्या सुरवातीस तो पुन्हां पॅरिसला आला. त्याच्या मित्रांनीं वर्तमानपत्रांतून लेख लिहून लोकमत त्याच्या बाजूचें बनविलें होतें. त्यामुळें लोकशाही स्थापन झाल्यावर सीस, यॉन, चॅरेंट-इंफीरियर व कॉर्सिका या चार भागांनीं अध्यक्षाच्या जागेकरितां त्याचें नांव सुचविलें; आणि कार्यकारी कमिटीचा विरोध असतांहि असेंब्लीनें त्याचीच निवड कायम केली. तेव्हां त्यानें लंडनला परत जाऊन तेथून राजीनामा पाठविला, व त्यांत 'सर्व लोकांनीं ऐक्यमत्यानें मला निवडल्यास मी जबाबदारी घेण्यास तयार आहे' असा खुलासा केला. याप्रमाणें या कामीं त्यानें विलक्षण बुद्धिमत्ता व व्यवहारचतुरता दाखविली. त्याच्या राजीनाम्याचा इष्ट परिणाम होऊन मध्यम व सामान्य वर्गांतील लोक सर्वस्वी त्याला अनुकूल झाले. बोनापार्ट घराण्यावरील प्रतिबंध काढून टाकला; अखेर स. १८४८ च्या डिसेंबरमध्यें तो अध्यक्षाच्या जागीं निवडून आला व त्यानेंहि लोकशाहीशीं सत्यनिष्ठ राहण्याची शपथ घेतली. पुढें १८४८ पासून १८५२ पर्यंत त्यानें संपूर्ण सत्ता आपल्या हातांत घेण्याचा प्रयत्न चालवून, रोमन लोकशाही मोडून तेथें पोपची सत्ता पुन्हां स्थापण्याकरतां त्यानें सैन्य पाठविलें; छापखाने, क्लब, भाषणस्वातंत्र्य,शिक्षणसंस्था यांवर कडक निर्बंध घातले, व प्रधानमंडळांत आपल्या पक्षाचे लोक भरले.

याप्रमाणें बादशाही धोरण जाहीर करून त्यानें लोकशाही सभासद दूर केले; त्यानें १८५९ त मतदारांची संख्या ९० लक्षांची ६० लक्षांवर उतरविली; व सार्वत्रिक मतदारीच्या तत्त्वावर हरताळ फांसला. याप्रमाणें रिपब्लिकन पक्ष मारून टाकण्याचा प्रयत्न करीत असतां, उपाध्यायांची स्तुति करून शिपायांस बक्षिसें वाटून, व्यापाऱ्यांनां उत्तेजन देऊन, कामगारांनां ममता दाखवून व शेतकऱ्यांनां वश करून सर्व देशभर लोकप्रियता जोडण्याची त्याने जंगी मोहीम सुरू केली. एकदम बादशाहीपदास हात न घालतां तें हळू हळू गांठण्याचा त्याचा हा डाव होता. स.१८५२ त पुन्हां निवडणूक सुरू झाली. पुनर्निवडणुकीवर असलेला निर्बंध दूर करण्याचें असेंब्लीनें नाकारलें, तेव्हां मात्र त्यानें एकदम लोकसभा नष्ट करून स्वतःच्या नांवानें बादशाही जाहीर केली. पण देशभर पसरलेल्या लोकशाही मतवाल्यांनीं त्याला विरोध केला, तेव्हां त्यानें दडपशाही सुरू केली व कॅथोलिक पक्षाला देणग्यांनीं वश करून राज्यकारभार चालविला. तीन चार वर्षांत त्याला कोणी प्रतिस्पर्धी अथवा अडथळा करणारा उरला नाहीं. पुढें त्यानें उद्योगधंद्यांनां उत्तेजन दिलें, दळणवळणाचीं साधनें वाढविलीं, सार्वजनिक कामें काढून गरीबांच्या पोटापाण्याची सोय करून दिली; व दरबारचा थाट डोळे दिपवील असा ठेवला. त्यानंतर वयाच्या ४४ व्या वर्षी त्यानें लग्न केलें. त्याच्या बायकोचें वय तेव्हां २६ होतें. यावेळीं फ्रान्समध्यें सर्वत्र शांतता,सुव्यवस्था व भरभराट असल्याने जनता नेपोलियनवर संतुष्ट होती. पुढें क्रिमियन युद्धांत फ्रान्सने इंग्लंडला मदत केली. याप्रमाणें स.१८१५ व १८४० या सालांतील अपमानाबद्दल रशियावर सूड उगविल्यामुळें नेपोलियनची सत्ता शिखरास पोहोंचली. १८५६ सालीं त्याला मुलगाहि झाला, व नेपोलियनचे सर्व मनोरथ फलद्रुप झाले. मग त्यानें इतर देशांतील पारतंत्र्यांत रुतलेल्या प्रजाजनांनां राजकीय हक्क संपादण्यांत मदत करण्याचें ठरविलें, प्रथम त्यानें इटलीला साहाय्य केलें. इटली स्वतंत्र झाल्यास पोपची सत्ता खालावेल या भीतीनें फ्रेंच कॅथोलिक पक्षानें व खुद्द महाराणीनें इटलीस मदत न करण्याबद्दल गळ घातली व त्यामुळें तो टाळाटाळ करणार, इतक्यांत एका इटालियनानें त्याला ठार मारण्याचा प्रयत्न केला, पण तो फसला, तेव्हां त्यानें इटालीला मदत केली. नंतर त्यानें इंग्लंडबरोबर खुल्या व्यापाराचा तह केला, पण या दोन गोष्टींमुळें फ्रान्समध्यें बरेच लोक नाखूष झाले. लोकशाही व कॅथोलिक हे दोन्ही पक्ष त्याच्या विरुद्ध उठले.तेव्हां सर्व फ्रान्सला व यूरोपियन राष्ट्रांनां दिपविण्याकरतां व आपलें घराणें चिरस्थायी करण्याकरतां त्यानें मेक्सिको प्रकरण सुरू केलें. याच

वेळीं जर्मन प्रधान बिस्मार्क जर्मनराष्ट्र बनवीत होता. १८५५ सालीं दोघांनीं फ्रॅंको-जर्मन मित्रसंघ स्थापण्याचें ठरविलें. पण उलट उत्तर जर्मनी प्रशियानें घेतला, त्यावेळीं नेपोलियन आजारी होता; पण त्यामुळें सोशॅलिष्ट,लिबरल व रिपब्लिक पक्षांनीं मोठा विरोध केला, तेव्हां त्यांनां नेपोलियननें कांहीं हक्क दिले, परंतु लवकरच बिस्मार्कच्या कारस्थानास बळी पडून त्यानें स. १८७० मध्यें फ्रॅंको-जर्मन युद्ध सुरु केलें,पण त्यांत फ्रान्सचा भयंकर पराभव झाला. नेपोलियनची प्रकृतीहि आजारानें फार क्षीण झाली होती. राणीच्या तंत्रानें तो फार चालू लागला. तिनें त्याला पुत्रासह रणभूमीवर पाठविलें, पण तेथें पराभव पावून तो शत्रूच्या हातीं सांपडला. इकडे क्रांतिकारकांनीं त्याला पदच्युत करून लोकशाही स्थापिली. तो स. १८७३ त मरण पावला.

**नेब्रास्का**—उत्तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक संस्थान. क्षेत्रफळ ७७५१० चौरस मैल. पैकीं ७०२ चौरस मैलांचा प्रदेश पाण्यानें व्यापिला आहे. लोकसंख्या (१९१८) १२९६८७७. लिंकन हें राजधानीचें शहर असून तेथील लोकसंख्या ( १९१८ ) १७०७७७ आहे.

रोमनकॅथोलिक, मेथॉडिस्ट, ल्यूथेरन, प्रेसबिटेरियन, व बॅप्टिस्ट या उतरत्या अनुक्रमाप्रमाणें संख्येनें या संस्थानांत त्या त्या धर्मसंप्रदायाचे लोक आहेत. ७ ते १५ वर्षे वयाच्या मुलांनां शिक्षण सक्तीनें केलें असून शाळेच्या टर्ममधील निदान बारा आठवडे तरी त्यांनीं शाळेंत हजर राहिलें पाहिजे असा नियम आहे. 'युनिव्हर्सिटी ऑफ नेब्रास्का, ( लिंकन )', 'क्रेघटन युनि. ( ओमाहा )' इत्यादि, उच्च शिक्षणाकरिता संस्था आहेत.येथें अनाथपंगुगृहें असून त्यांतून गरीब लोकांच्या निर्वाहाची सोय करण्यांत येते. हें संस्थान कृषिप्रधान आहे. वाळलेलें गवत, बटाटे, गहूं, मका, ओट आणि वाटाणा हीं या संस्थानांतील मुख्य पिकें होत. बीटच्या मूळापासून साखर काढतात. कुरुंदाचा दगड आणि चुनखडी यांच्या अनेक खाणी आहेत. १९१५ सालीं १५१४१७१ डॉ. किंमतीचा खनिज माल या संस्थानांतून बाहेरदेशीं गेला. छापणें, साबण आणि मेणबत्त्या तयार करणें, कौलें व विटा तयार करणें, आणि साखर तयार करणें हे येथील मुख्य उद्योगधंदे आहेत. १९१६ सालीं संस्थानांत ८३३२ मैल लांबीचा वाफेच्या गाडीचा आणि २२२ मैल लांबीचा विजेच्या गाडीचा रस्ता तयार केला होता. सन १९१८ मध्यें नेब्रास्का संस्थानांत ९३४ सेव्हिंग्ज बँका असून त्याशिवाय २५० नॅशनल बँका होत्या. ३३ सभासदांचें वरिष्ठ मंडळ ( सेनेट ) आणि १०० सभासदांचें प्रतिनिधिमंडळ ( हाउस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हज ) असतें. दर दोन वर्षांनीं दोनहि मंडळांतील सभासदांची नवी निवडणूक होते. काँग्रेसमध्यें वरिष्ठ मंडळांतील आणि प्रतिनिधिमंडळांतील अनुक्रमें २ व ६ सभासद संस्थानांतून जातात. या संस्थानचे ९३ परगणे पाडण्यांत आले आहेत.

**नेमाजी शिंदे**—एक मराठा सरदार. हा शिवाजीच्या पदरीं प्रथम होता. पुढें संभाजीला कंटाळून हा औरंगझेबास मिळाला होता. राजारामाच्यावेळीं हा विशेष प्रख्यातीस आला. राजाराम जिंजीस असतां औरंगझेबाकडून फुटून हा परत राजारामास मिळाला ( १६९० ) नंतर यांस तेथून महाराष्ट्रांत पाठविण्यांत आलें महाराष्ट्रांत औरंगझेबाच्या फौजांचा पराभव करण्याकडे जी सरदार मंडळी गुंतली होती तींत हा एक प्रमुख होता.यानें एकदां (१६९८) आठ हजार फौजेसह खानदेशांत घुसून नंदुरबार,शिरपूर,थाळनेर वगैरे गांवें लुटलीं. थाळनेरजवळ मोंगलाचा सरदार हुसेन-अली याचा मोड करून त्यास पकडून कैदेंत ठेविलें व जबर खंडणी घेऊन मग त्याची सुटका केली. पुढील सालीं राजारामानें गंगथडी, खानदेश, वऱ्हाडपर्यंत जी मोठी मोहीम केली तींत नेमाजी होता. मोहिमेवरून परत येतांना प्रत्येक प्रांतांत आपल्या एकेक सरदाराची नेमणूक ( खंडणीवसुली व बंदोबस्तासाठीं) राजारामानें केली, त्यांत नेमाजीकडे खानदेश आला होता. पुढें शाहूची सुटका होईपर्यंत नेमाजी बहुधां खानदेशांतच सुभेदार असावा. शाहू दक्षिणेंत आला त्यावेळीं त्याला पहिल्यानें मिळालेल्या मंडळींत नेमाजीहि होता ( १७०७ ). पुढील सालीं बहादुरशहानें कामबक्षावरील स्वारींत शाहूची मदत मागितली असता त्यानें नेमाजीसच पाठविलें. नेमाजीनें हैद्राबादनजीक चढाई करून कामबक्षाचा शेवट केला ( १७०८ ). हुसेनअली दख्खनचा सुभेदार होण्यास आला असतां बऱ्हाणपुरास दाऊदखान पन्नी याची व हुसेनची लढाई झाली, त्यावेळीं नेमाजी हा जवळच राहून लढाईचा परिणाम पहात होता. कारण बादशहानें व हुसेननें दोघांनींहि मराठ्याकडे मदतीचा संदर्भ लावून ठेविला होता व शाहूनें त्यासाठींच नेमाजीची नेमणूक खानदेशांत केली होती ( १७१८ ) [ सप्तप्रकरण बखर; जेधे; शिवदिग्विजय; राजारामाची बखर; शाहूचें चरित्र ]

**नेमाड जिल्हा**—( १ ) इन्दूर संस्थानांतील अगदीं दक्षिणेकडील एक जिल्हा.नर्मदेच्या दोन्ही तीरावर हा जिल्हा वसलेला असून याचें क्षेत्रफळ ३८७१ चौ. मै. व लोकसंख्या ( १९११ ) ३४८४५०. ह्या जिल्ह्यांत एकंदर ४ शहरें व १२७० खेडीं आहेत. नर्मदेच्या प्रदेशांतील जमीन फार सुपीक आहे. इतर भागांत सातपुड्याचा डोंगराळ प्रदेश आहे. १६ व्या शतकांत येथील जंगलांत रानटी हत्ती बरेच सांपडत असत.

उत्तरेकडून दक्षिण हिंदुस्थानांत प्रवास करणारास याच जिल्ह्यांतून जाणाऱ्या मार्गाचा अवलंब करावा लागत असे. तिसऱ्या शतकांत येथें हैहय राजे रहात असून माहिष्मती ( महेश्वर ) ही त्यांची राजधानी होती. ९ व्या शतकांत माळव्याचे परमार येथें रहात असत, असें ऊन, हरसूद, सिधान, आणि देवला येथें असलेल्या जैनधर्मीय व इतर देवळयांवरून दिसून येतें. १२ व्या शतकांत मुसुलमान

आले तेव्हांपासून हा जिल्हा कमीअधिक प्रमाणानें दिल्लीच्या छत्राखालीं राहिला. स. १४०१ पासून हा जिल्हा माहूच्या मुसुलमान राजांच्या ताब्यांत गेला व १५३१ सालीं गुजराथच्या बहादुरशहाच्या ताब्यांत गेला व नंतर १५३४ सालीं हुमायूनाच्या ताब्यांत गेला. अकबरानें जेव्हां माळवा घेतला तेव्हां १५६२ सालीं हा जिल्हा त्याच्याकडे गेला व ह्याचा माळव्याच्या सुभ्यांत समावेश करण्यांत आला ह्या जिल्ह्याच्या बऱ्याचशा भागाचा विजागड सरकारांत समावेश होत असून मुख्य ठाणें जलालाबाद येथें आहे. विजागडचा किल्ला विजा नांवाच्या गाली नायकानें १३ व्या शतकांत बांधला अशी आख्यायिका आहे. औरंगझेबाचे कारकीर्दींत नेमाड जिल्ह्याचा औरंगाबादच्या सुभ्यांत प्रवेश होत असे. १७ व्या शतकाच्या अखेरीस मराठ्यांनीं ह्या जिल्ह्यांत प्रवेश केला. १६९० सालीं त्यांनीं धरमपुरी घेतलें, पण पेशव्यांच्या सत्तेचा ह्या प्रदेशावर सन १७४० व १७५५ च्या मध्यें जम बसला. मराठ्यांच्या अमदानींत ह्या प्रदेशाचें सर्व वैभव नष्ट झालें. उन १७६४ आणि १७८८ च्या दरम्यान हा जिल्हा होळकर, शिंदे व धारचे पवार ह्यांच्या ताब्यांत जाऊन वांटणी करण्यांत आली व सन १८०० व १८१८ च्या दरम्यान तर मराठे व पेंढारी लोकांच्या लुटालुटीस व अंदाधुंदीस हा जिल्हा बळी पडला. १८२३ सालीं ग्वाल्हेर येथें जो तह झाला त्यांत नेमाड जिल्ह्याचा शिंद्यांकडे असलेला बहुतेक भाग ब्रिटिश अमलाखालीं आला. १८५५ सालीं ह्या जिल्ह्याची अर्धी लोकसंख्या कमी झाली होती. मुख्य व्यवस्था इंदूरच्या रेसिडेन्टच्या देखरेखीखालीं आहे. १८६१ सालीं हा जिल्हा पूर्णपणें ब्रिटिशांच्या ताब्यांत आला व १८६४ सालीं ह्या जिल्ह्याचा मध्य प्रदेशात समावेश करण्यांत आला होता पण १८६७ सालीं होळकरांस दक्षिणेंतील कांहीं जमिनीच्या बदली मोबदला म्हणून हा परत देण्यात आला. हा जिल्हा एका सुभ्याच्या हाताखालीं आहे. ह्या जिल्ह्याचे एकंदर ११ परगणे केले आहेत.

(२) मध्यप्रांत. नर्मदा विभागाचा एक जिल्हा. हा खानदेश व मध्यहिंदुस्थानातील संस्थानांच्या लगतचा, नर्मदेच्या खोऱ्याच्या व सातपुड्याच्या डोंगरसपाटीच्या अगदीं पश्चिमेकडील कांहींसा डोंगराळ व कांहींसा सपाट असा प्रदेश आहे. हा जिल्हा म्हणजे पूर्वींच्या 'प्रान्त नेमाड'चा एक लहानसा भाग आहे. नर्मदा नदी दूरपर्यंत याच्या उत्तर सीमेवरून वहाते. नर्मदा नदीला पुनासा येथें एक ४० फूट उंचीचा धबधबा असून येथून १२ मैलांवर मांधाता बेट आहे. अबना व सुकता नद्यांचा प्रदेश फार सुपीक आहे. दक्षिणेकडे सातपुड्याच्या पहाडाची मुख्य ओळ असून येथें 'असिरगड' आहे. ह्या भागातून तापी नदी वहात असून जवळच बऱ्हाणपूर आहे. नर्मदेच्या काठचा थोडासा प्रदेश सोडून सर्व जमीन खडकाळ आहे. लागवड केलेली पिकाऊ जमीन सोडून सर्वत्र जंगल आहे. ह्या भागांत तिरवाडीचे गवत उगवत असून त्यापासून तेल काढतात. यांत वाघ चित्ते, सांबर, काळवीट व जंगली कुत्रेहि आढळतात. हवा निरोगी आहे. उन्हाळ्यांत उष्णता फार भासते. पाऊस सरासरी ३२ इंच असतो. जरी इतर जिल्ह्यांच्या मानानें पाऊस फार कमी पडतो तरी पण कापूस व ज्वारीच्या पिकास तो फार फायदेशीर असतो.

इ ति हा स.—याचा व इंदुरी नेमाडचा इतिहास सामान्यतः एकच आहे, व त्यामुळें तो येथें स्वतंत्रपणें देण्याचें कारण नाहीं.

खांडवा येथें पूर्वी जैन लोक पुष्कळ रहात असत. बऱ्हाणपूर येथें १६ व्या शतकांत बांधलेल्या दोन मशिदी आहेत. पैकीं एकींत कोरलेले दगड बसविले असून मशीद फारच सुंदर आहे मांधाता येथें एक शिवलिंग आहे. आणि तेथेंहि वेगळया वेगळया वेळीं बांधलेलीं पुष्कळ देवळें आहेत. क्षेत्रफळ ४२२७ चौ. मै. व लोकसंख्या ( १९२१ ) ३९६५५४. यांत दोन गांवें ( खांडवा व बऱ्हाणपूर ) व १०१९ खेडीं आहेत. जिल्ह्याचा बराचसा भाग लागवडीच्या अभावीं पडीत आहे. शेंकडा ८६ लोक हिंदू आहेत. बऱ्हाणपूर येथें मुसुलमानांची संख्या वरीच आहे.

भा षा.—बहुतेक लोक नेमाडी भाषा बोलतात. भिल्ल लोकांची भाषा हिंदी व गुजराथी ह्या दोन भाषांची भेसळ आहे. बऱ्हाणपूर तहशिलींत कांहीं लोक खानदेशी-मराठी भाषा बोलतात. मुसुलमान उर्दू भाषा बोलत असून कोरकू लोक कोरकू भाषाच बोलतात. कोरकू लोक व मध्यहिंदुस्थानांतील भिल्ल लोक पहाडी प्रदेशात रहातात. उत्तर हिंदुस्थानचे रजपूत, मुसुलमान व गुजर लोक खांडव्याच्या सपाटीच्या प्रदेशांत रहातात.

लो क.—रजपूत, ब्राह्मण, बनिया, कुणबी व गुजर ह्या मुख्य ज्ञाती होत. ब्राह्मण ज्ञातीचे नागर व नार्मदेव असे दोन पोटविभाग आहेत. नागरी ब्राह्मण हे ग्रामपुरोहित, कुळकर्णी, पाटील किंवा पाठशाळाशिक्षक असतात. व नार्मदेव हे नर्मदातटाकीं रहाणारे ब्राह्मण होत. गुजर आणि कुणबी हे लोक विशेषतः शेतकीकडे लक्ष घालतात. भिलाल लोक अतिशय बेइमान व दारुडे लोक आहेत. भिल्ल लोक इस्लामी धर्माचे आहोंत असे दाखवितात. कोरकू लोक मात्र कांहींसे सुधारलेले आहेत. शेंकडा ६७ लोक शेतकीवर उपजीविका करतात.

नद्यांच्या कांठच्या प्रदेशांत चांगल्यापैकीं काळी जमीन आहे. डोंगरसपाटीवर व उच्च प्रदेशांतील तपकिरी रंगाची जमीन आहे. त्या जमीनींत पावसाळ्यांमध्येंच पीक निघूं शकतें. ज्वारी व कापूस हीं येथील प्रमुख पिकें होत. तंट्याभिल्ल नावाच्या प्रसिद्ध डाकूला पकडण्याच्या कामांत मदत केल्यावरून कांहीं लोकांस नियमितकालपर्यंत कांहीं खेडीं दिलीं आहेत. साडेपांचशें चौ. मैलांहून अधिक जमीन रयतवारी पद्धतीवर कांहीं जमीन 'मालिक मकबुजा' आहे

व कांहीं 'सीरहक्काची' आहे. १९५१ चौ. मै. जमीन जंगलमय आहे.

शेती.—नर्मदाकांठच्या काळ्या जमीनींत गहूं वगैरे पेरतात. चणा, तांदूळ, तीळ, व कांहीं जमिनींत सरकारच्या परवानगीनें गांजा पिकवितात. सध्यां कापसाचें पीक जास्त प्रमाणावर होऊं लागलें आहे. बऱ्हाणपूर तहसिलींत तर कापूस इतका पेरतात कीं ज्वारीचें पीक देखील पुरेसें काढीत नाहींत. वसंतऋतूंतील पिकाला पाटाचें पाणी देण्याची चाल आहे. ही पद्धत मध्यप्रान्तांत इतरत्र कोठेंहि नाहीं. मध्यप्रांतांत पिकाला विहीरीचें पाणी देतात. अंदाजें १७०६ चौरस मैल जंगल राखून ठेवलेलें आहे. तापीच्या खोऱ्यांतील जंगल लागवडीकरितां तोडावयाचें आहे. नर्मदेच्या पहाडांतील जंगलांत त्याचप्रमाणें तापीच्या वरील खोऱ्यांतील जंगलांत किंमतवान सागवानी इमारती लांकूड होतें. उत्तर व दक्षिण पहाडांतील लोक गुरें पोसण्याचा धंदा करितात. वऱ्हाड व खानदेशांतील कापसाच्या कारखान्याकरितां जळाऊ लांकूड जातें. चांदवड, बरवई, व छोटातवा नदीच्या भागांत लोखंड धातू सांपडते. व बऱ्हाणपूरजवळ चुनखडी सांपडते.

व्यापार.—शेतकीकडील लोक सोडून इतर लोक व्यापारी मालाची नेआण करण्यांत गुंतलेले आढळतात. खांडवा व इतर मुख्य खेड्यांत जाडें-भरडें कापड तयार होतें. बऱ्हाणपूरला रेशमी कापड विणतात व सोनेरी व रुपेरी लेसहि तयार करतात. बऱ्हाणपूरला कांचेच्या हंड्या होतात. ह्या जिल्ह्यांत बरेच कापूस दाबण्याचे कारखाने आहेत. खांडवा येथें एक तेलाची गिरणी असून एक इमारती लांकडाची जंगी वखार आहे. कच्चा कापूस, सरकी, तीळ, ज्वारी हा माल मुख्यत्वें करून बाहेर पाठविला जातो. कापसाचा व्यापार मुसुलमान भाटिया लोकांच्या हातांत आहे. ग्रेट इंडियन पेनिन्शुला रेल्वेची लाईन या जिल्ह्यांतून जाते. बऱ्हाणपूर व खांडवा हीं दोन मोठीं स्टेशनें याच लाईनवर आहेत. येथून इन्दूरकडेहि एक छोटी लाईन जाते.

दुष्काळ.—सन १८०३ सालीं ह्या जिल्ह्यांत मोठा दुष्काळ पडला होता. त्याला 'महाकाल' असें म्हणतात. दुसरा दुष्काळ १८४५ सालीं पाऊसपाण्याच्या अभावीं पडला. या वर्षी तीन लाख रुपये साऱ्याची माफी देण्यांत आली होती. १८९७ सालचा दुष्काळ कांहीं मोठासा जाचला नाहीं. कारण १८९५ सालीं पाऊसपाणी चांगलें पडून कापसाचें पीक उत्तमपैकीं आलें होतें. या जिल्ह्याचा कारभार मध्यप्रांतांतील इतर जिल्ह्याप्रमाणेंच आहे.

**नेमावर,** जिल्हा.—मध्यहिंदुस्थान. इंदूर संस्थानांतील एक जिल्हा. हा नर्मदेच्या उत्तर किनाऱ्यावर आहे. क्षेत्रफळ १०५९ चौरस मैल. जिल्ह्याचा बहुतेक भाग नर्मदेच्या सुपीक प्रदेशांतच आहे. उत्तरेस विंध्याद्रीची पर्वतावली असून नर्मदा, चन्केश्वर, दतुनी, बागडी इत्यादि उपनद्यांनीं जिल्हा भरदार्‍ धनधान्यसमृद्ध करून सोडला आहे. पाऊसमान सरासरी २९ इंच असतें. नर्मदेच्या दक्षिणेस असलेल्या नेमाड जिल्ह्याशीं ह्या जिल्ह्याचा ऐतिहासिक दृष्ट्या अति निकट संबंध आहे. अलबेरुणी ह्यानें आपल्या धारपासून नेमावरपर्यंतच्या प्रवासाचें मजेदार वर्णन दिलेलें आहे. हा जिल्हा १० व्या शतकापासून १३व्या शतकापर्यंत माळव्याच्या परमार राजांच्या ताब्यांत होता. त्याची खूण म्हणून नेमावर खेड्यांत एक फारच उत्तम जैन देवालय आहे. अकबराच्या कारकीर्दींत हा जिल्हा माळव्याच्या सुभ्याच्या हिंदिया सरकारांत समाविष्ट केला गेला. स. १७४० व १७४५ च्या दरम्यान हा जिल्हा पेशव्यांच्या ताब्यांत आला व त्यांतील कांहीं परगणे शिंद्याकडे ( १७८२ सालीं ) रुजू झाले.

१९ व्या शतकाच्या प्रारंभीं छट्टू नांवाच्या प्रसिद्ध पेंढाऱ्यांच्या पुढाऱ्याचीं मुख्य नाकीं सतवास व नेमावर येथें होतीं, व १८१५ सालीं ह्या जिल्ह्यांतून त्यानें पेंढारी लोकांचा मोठा जमाव तयार केला. ग्वाल्हेरच्या छावणीच्या खर्चाकरितां १८४४ सालीं ह्या जिल्ह्यांत कांहीं अधिक परगण्यांची भर टाकण्यांत आली. १८५७ सालच्या धामधुमीनंतर नेमावर जिल्ह्याचा कांहीं भाग १८६१ पर्यंत ब्रिटिश व्यवस्थेखालीं होता पण त्यासालीं दक्षिणेंतील कांहीं जमिनीच्या बदली तो होळकर सरकारास परत देण्यांत आला.

लोकसंख्या ( १९११ ) ९४६००. ह्या जिल्ह्यांत एकंदर ३४३ खेडीं आहेत. ह्या जिल्ह्यावर एका सुभ्याची नेमणूक असून तो सतवास येथें रहातो. न्यायव्यवस्थेच्या सोईसाठीं ह्या जिल्ह्याचे खातेगांव, कांतापूर व कन्नोद असे तीन परगणे केले असून प्रत्येक परगणा एक एका अमीनाच्या ताब्यांत आहे. एकंदर उत्पन्न साडेतीन लाखांहून अधिक आहे.

**नेयगी**—हे लोक म्हैसूर संस्थानभर पसरले आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ९४४६६. यांचा मुख्य धंदा कापड विणण्याचा व कपडे रंगविण्याचा आहे. यांपैकीं कांहीं दक्षिण महाराष्ट्रांत आहेत. सोलापुरांतील पद्मसाळी ही जात आज महाराष्ट्रीय धरण्यास कांहीं हरकत नाहीं. कित्येक लोक व्यापार व शेतकी करतात. यांच्यांत विलिमाग्गा, देवांग वगैरे आठ भेद आहेत.

विलिमाग्गा.—यांना कुरुविन वनिजिगा असें दुसरें नांव आहे. हे लोक कानडी भाषा बोलतात. लिंगायत व लिंगायतेतर असे यांच्यांत दोन भेद आहेत. याशिवाय दुसरे ६६ पोटभेद आहेत. यांच्यांत विवाहास वयोमर्यादा नाहीं. विधवाविवाहास परवानगी आहे. घटस्फोट फक्त व्यभिचाराच्या दोषावरून करतां येतो. लिंगायत वर्ग मांसभक्षण अगर सुरापान करीत नाहींत. इतर लोक धार्मिक प्रसंगीं ब्राह्मणांस बोलावितात. पांढरें कापड विणतात म्हणून 'विलिमाग्गा' हें नांव त्यांनां पडलें आहे.

दे वां ग.—भाषेवरून कानडी व तेलुगु असे यांच्यांत दोन वर्ग पडले आहेत. कानडी लोकांनीं ब्राह्मणी आचार उचलले आहेत. देवांग लोक शिवभक्त असून ते लिंग धारण करतात. 'गणेश' ही त्यांच्या मागांवरील अधिष्ठात्री देवता आहे. तेलगू लोकांत कांहीं शिवाची व कांहीं विष्णूची भक्ति करतात. धार्मिक मतभेदावरून विवाहास आडकाठी होत नाहीं. 'चौदेश्वरी' ही यांची कुलदेवता आहे.

ख त्री.—खत्री हे रेशमी कापड विणणाऱ्यांचें नांव असून आचारविचारांत ते पटवेगारांप्रमाणेंच आहेत. पण त्यांच्याशीं यांचा शरीरसंबंध होत नाहीं; रोटीव्यवहार मात्र होतो. ते शैव असून मराठी भाषा बोलतात व त्यांच्या नांवापुढें 'सा' हें अक्षर लावतात.

प ट वे गा र.—हे रेशमी कापड विणतात.व हिंदु देवतांची भक्ति करतात. हे विशेषतः शाक्तिपूजक आहेत. ते गुजराथी व हिंदी मिळून झालेली भाषा बोलतात.

सा ल.—पद्मसाल व पाथसाल हे विष्णुपूजक आहेत.शकुन्साल हे शिवपूजक असून लिंग धारण करतात. यांच्यामध्यें एकमेकांत शरीरसंबंध होत नाहीं. ते मूळचे तेलगू आहेत. पद्मसाल तेलगु भाषा बोलतात व पाथसाल कानडी भाषा बोलतात.

सौ रा ष्ट्र.—पटनुली अथवा जामखनवाला या नांवांनेंहि हे लोक ओळखिले जातात. हे लोक उत्तरेकडून इकडे रहावयास आले आहेत. हे कुटनी नांवाचा कपडा तयार करतात; तो दुसऱ्यास करतां येत नाहीं असें म्हणतात. याशिवाय हे उत्तम कापसाचे व लोंकरीचे गालीचे विणतात. 'खेस' नांवाच्या, कापूस व रेशीम मिळून हिरव्या रंगाच्या नकली शाली करतात. हे लोक वैष्णव असून त्यांचा वंशपरंपरागत गुरु ब्राह्मण असतो. यांच्यांत विधवाविवाहास परवानगी नाहीं.

से नि गा.—कोष्ट्यांची ही एक श्रीमंत जात आहे. हे दक्षिण कर्नाटकांतून आलेले असून स्त्रियांना उपयोगी असें उत्तम व मौल्यवान कापड ते विणतात. हे लिंगायत आहेत.

टो गा टा.—हे लोक मूळचे तेलगू असून शिवभक्त आहेत. ते गरीब लोकांस उपयोगी असें हलक्या प्रतीचें कापड विणतात. हे वैष्णव आहेत. [ म्हैसूर, सेन्सस रिपोर्ट, १९११ ]

**नेर**—( १ ) मुंबई, पश्चिम खानदेश. धुळ्यापासून १४ मैलांवर पांझरा नदीच्या कांठीं हें एक लहानसें गांव आहे. अकबराच्या कारकीर्दीत हा एक नंदुरबाद सरकारांतील महाल असून त्याचें उत्पन्न ७२२७६० दाम (१८०७० रु.) होतें. येथें असलेल्या कांहीं मुसुलमानी कबरींवरून येथील पूर्व वैभवाची साक्ष पटते. स.१८७२ च्या पुरामुळें या गांवाचें बरेंच नुकसान झालें.

( २ ) नेरपिंगळाई, वऱ्हाड. उमरावती जिल्ह्यांत मोर्शी तालुक्यांतील एक गांव. जवळील टेंकडीवर पिंगळाई देवीचें देवालय असून त्यावरून नेरपिंगळाई असें या गांवास नांव मिळालें आहे. यवतमाळ जिल्ह्यांत, दार्वा तालुक्यांत नेर परसोपन्त नांवाचें एक महत्त्वाचें गांव आहे. ऐने–इ–अकबरींत यास परगण्याचें गांव म्हणत असत.

**नेलमंगल**—म्हैसूर संस्थान. बंगलोर जिल्ह्याच्या उत्तरेकडील एक तालुका. क्षेत्रफळ ५५ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ६८७२७. ह्या तालुक्यांत दोन शहरें ( त्यामगोंदल व नेलमंगल) व २८८ खेडीं आहेत. पूर्वेकडून अर्कावती नदी वहाते व पश्चिमेकडे डोंगराची ओळ आहे. शिवगंगा हें ह्या डोंगराचें अत्युच्च (४५५९ फूट) शिखर आहे. इतर जागीं मोठे तलाव आहेत. येथील माती लालसर रंगाची आहे. कोठें कोठें लोखंड सांपडतें.

**नेलोर,जिल्हा.**—मद्रास इलाख्यांतील पूर्व किनाऱ्यावरील एक जिल्हा. हा जिल्हा मोठा असून इलाख्यांत याचा दुसरा नंबर लागतो. क्षेत्रफळ७९७३चौरस मैल. कर्नाटकच्या सपाट प्रदेशाचा हा भाग असून याच्या पूर्वेस बंगालचा उपसागर आहे. दक्षिणेस चिंगलपट व उत्तर अर्काट हे दोन जिल्हे; पश्चिमेस पूर्वघाट व उत्तरेस गुंतूर जिल्हा. येथील जमीन फार सुपीक नाहीं. कांहीं ठिकाणीं तर खडकाळ प्रदेश आहे. ह्या जिल्ह्यांत पुलिकतचा मोठा तलाव आहे. येथील सृष्टिसौंदर्य फारसें चांगलें नाहीं. ह्या जिल्ह्यांत सात नद्या वहातात. पण त्यांचा फारसा उपयोग नाहीं. फक्त कंदलेरु नदींत होड्या चालतात. पेन्नर नदीचें पाणी पाटाकरितां घेतलें आहे.

या जिल्ह्यांत अभ्रक बराच सांपडतो. निळा,पिंवळा,हिरवा रंग देऊन अभ्रकाचा वेगळ्या वेगळ्या ठिकाणीं कांचेच्या ऐवजीं उपयोग करण्याची चाल आहे. तरी पूर्वीप्रमाणें सध्यां हा धंदा भरभराटींत नाहीं. यांत खारकांचीं व नारळीचीं झाडें पुष्कळ आहेत. हवा कोरडी पण शुद्ध आहे. उन्हाळ्यांत दोन तीन महिने पश्चिमेकडील वाऱ्यामुळें उष्णता अतिशयित भासते.

इतिहासः—चोल रजांच्या पूर्वीच्या नेलोर जिल्ह्याचा इतिहास उपलब्ध नाहीं पण हा जिल्हा त्यांच्या ताब्यांत तेराव्या शतकापर्यंत होता असें दिसून येतें. तेराव्या शतकाच्या मध्यकालीं हा जिल्हा मदुरेच्या पांड्य वंशाच्या हातीं गेला व नंतर चोल राजांच्या हातीं गेला. १४ व्या शतकांत विजयानगरच्या हिंदु राज्यांत याचा समावेश झाला. कृष्णरायनें १५५२ त उदयगिरीचा किल्ला घेतला व तेथें एक प्रतिनिधि नेमला, व तालीकोट येथें १५६५ सालीं विजयानगरच्या हिंदु राज्याचा नाश मुसुलमानांनीं केला तरी हा जिल्हा त्या प्रतिनिधीच्या अमलाखालींच होता.

नेलोरशीं इंग्लिशांचा संबंध सन १६२५ पासून येतो. अंबोयनाच्या कत्तलीनंतर कंपनीच्या नोकरांनीं दुगराजपट्टम् येथें वसाहत केली व त्यास आरमेगांव हें नांव दिलें. पण मद्रासेस फोर्ट सेन्ट जॉर्ज ही वसाहत उभारण्यांत आल्यावर इंग्लिशांनीं १६३९ सालीं आरमेगांव सोडून दिलें. १७५३ सालीं नेलोर हा जिल्हा अर्काटच्या नबाबाच्या भावाच्या ताब्यांत

होता. १७५७ सालीं त्यांनीं नवाबाच्या विरुद्ध बंडाळी उभारली व मच्छलीपट्टम्‌च्या फ्रेंचांच्या मदतीनें त्यानें नवाबाच्या सैन्याचा पराजय केला. लवकरच नबाबास मदत करणाऱ्या कर्नल फोर्ड यास मद्रासेहून येलावणें आलें. अर्थातच नवाबाच्या भावास (याचें नांव नजीब-उल्ला होतें) फावलें. तो नवाबाच्या राज्यावर लहानमोठे हल्ले करूं लागला. पण मद्रासेहून एक तुकडी येऊन तिनें त्याचा पराभव केला. नंतर १७५८ सालीं त्यानें फ्रेंचांच्या मदतीनें पुन्हां जोर धरला. पण १७५९ सालीं फ्रेंचांचा, लालीच्या सेनापतित्वाखालीं वेढा घालून फोर्ट सेन्टजॉर्ज घेण्याचा प्रयत्न निष्फळ झालेला पाहून त्यानें फ्रेंचांची बाजू सोडली व तो इंग्रजांच्या बाजूस आला, व आपल्या हद्दींतील सर्व फ्रेंच लोकांस मारून टाकलें. ह्यावरून त्यास पुन्हां जिल्ह्याचा अधिपति नेमण्यांत आलें पुढील वर्षी बसालतजंग ह्याचा हा जिल्हा घेण्याचा विचार दिसला, पण इंग्लिश सैन्य मदतीस आल्यामुळें त्याला आपला विचार बदलावा लागला. १७६१ सालीं पान्डेचरी घेतल्यावर नवाबाचा इंग्लिशांच्या मदतीनें नेल्लोर घेण्याचा बेत होता. १७६२ सालीं कर्नल केलाडच्या नायकत्वाखालीं एक सैन्याची तुकडी नजीब-उल्लावर पाठविण्यांत आली. तिनें फेब्रुवारी महिन्यांत नेल्लोर किल्ला घेतला व लवकरच तो नवाबास बहाल केला गेला.

हैदरअल्लीशीं झालेल्या लढायांत नेल्लोर जिल्ह्यास कोणत्याहि तऱ्हेचा फारसा त्रास झाला नाहीं.जेव्हां १७८१ सालीं नवाबानें कर्नाटक प्रांत इंग्रजांस तोडून दिला तेव्हां अर्थातच हा जिल्हा इंग्रजांच्या ताब्यांत पहिल्या प्रथमच आला. १८०१ सालीं नवाब अझीम उद्दौलानें कर्नाटक इंग्रजांच्या ताब्यांत पूर्णपणें दिला.

पौराणिक किंवा ऐतिहासिक अवशेष येथें कांहीं नाहींत म्हटलें तरी चालेल. एक उदयगिरीचा किल्ला आहे. पण सध्यां तो मोडकळीस आला आहे. या जिल्ह्याच्या प्राचीन इतिहासाचा शोध लावण्याचे प्रयत्न सुरू आहेत. चालुक्यांच्या वेळचे कांहीं लेख सांपडले आहेत. तंगतूर येथें कांहीं जुनाट नाणीं सांपडलीं आहेत.

१९२१ सालीं जिल्ह्याची लोकसंख्या १३८५५५३ होती. ह्या जिल्ह्यांत एकंदर १३ तालुके, ८ शहरें व १५९४ खेडीं आहेत. येथें शेंकडा ९० लोक हिंदु आहेत. नेल्लोर तालुक्यांत बहुतेक सर्व मुसुलमानच रहातात. व ओन्गोले तालुक्यांत बहुतेक लोकवस्ती ख्रिस्ती लोकांचीच आहे. येथें स्त्रियांची संख्या फार थोडी आहे. बहुतेक लोक तेलगू भाषा बोलतात. 'यानादि ' नांवाचे जंगली लोक ह्या जिल्ह्यांत आहेत. श्रीहरिकोटच्या जंगलांत जिल्ह्याच्या दक्षिण भागांत ते रहातात. इतर जिल्ह्यांपेक्षां ह्या जिल्ह्यांत नुसत्या शेतकीवर निर्वाह करणारे लोक फार थोडे आहेत.

समुद्रकांठीं वसलेले जे तालुके आहेत त्यांच्यांत व इतर तालुक्यांत सर्व दृष्टीनें बराच फरक आहे. जमीन व एकंदर शोभा ( सृष्टिसौंदर्य ) ह्यांतहि बराच फरक आहे. पहाडाच्या (घाटाच्या ) पायथ्याकडील म्हणजे पश्चिम भागाची जमीन, उत्तरोत्तर जसजसें अधिकाधिक पश्चिमेकडे जावें तसतशी कणखर गोटाळ होत जाते. पण समुद्रकांठचा प्रदेश सर्व साधारणपणें सुपीक आहे. पुलिकतच्या तलावापासून तों थेट वेलिकोंडाच्या टेंकड्यांपर्यंत सरसकट चांगली जमीन आहे. जिल्ह्यांत सर्वांत सुपीक जमीन आत्मकूर व नेल्लोर तालुक्याची पेन्नारच्या आसमंतांतील होय. ओन्गोले व कन्दकूर तालुक्यांतील जमीन अस्सल काळी, कापसाची आहे. अगदीं समुद्रानजीकची जमीन फार सुपीक नाहीं. उदयगिरी व कनगिरी तालुक्यांची जमीन अगदीं खराब आहे असें म्हणावें लागतें. येथें दोन मुख्य हंगाम आहेतः— एक ' पुनास ' धान्याचा हंगाम, व दुसरा ' पैर ' धान्याचा हंगाम. जमीनदारी व इनामी जमीनी जमेस धरतां जिल्ह्याचें क्षेत्रफळ ७९७३ चौरस मैल आहे. त्यापैकीं २५७३६७१ एकर जमीनदारी व इनामी आहे. येथें मुख्य तांदुळाचें पीक होतें. गंतूर व नेल्लोर तहासिलींत तर सर्वत्र तांदूळच पिकवितात व आत्मपूर, रापूर व कंदकूर तालुक्यांत व इतर ठिकाणींहि ' चोलम् ' धान्य पिकवितात. ओन्गोले व कंदकूर तालुक्यांत ' वरींग ' पिकवितात. उदयगिरी व कनगिरी तालुक्यांत ' चणे ' पिकवितात. तंबाखू, कापूस ( उत्तरेकडील तालुक्यांत ) नीळ, ऊंस व एरंडी इत्यादि पिकें पिकवितात. या जिल्ह्यांत बऱ्याच ठिकाणीं पडीत जमीनहि दृष्टीस पडते.

ह्या जिल्ह्यांत अभ्रक विपुल सांपडतें. लोखंड धातुहि कोठें कोठें सांपडतो. पेडाकिरटल व चेंढीजवळ चुनखडी विपुल सांपडते. किनाऱ्यावर मिठागारें आहेत. चेजेर्लो येथें हिरे सांपडत असें म्हणतात. नेल्लोर येथें पूर्वी सुती कापड फार होत असे. हलक्या तऱ्हेचीं कांबळीं, तांब्याचीं व पितळेचीं भांडीं येथें तयार करतात. उदगिरी येथें तर उत्तमपैकीं लांकडावरचें नक्षीकाम करणारे लोक असून ते रंगहि तयार करतात. तांदूळ, नीळ, कापूस, तूप, मीठ, अळशी, जळाऊ लांकूड, चामडें, शिंगें, तंबाखू, चुना, कापड, तांब्याचीं व पितळेचीं भांडीं हा माल निर्गत असून आयात माल साखर, मसाले, रॉकेल वगैरे आहे.

नेल्लोर, ओन्गोले, गंतू, कावली, कंदकूर, अद्दनकी, अलूर, वेन्कटगिरी, आणि सुलूरपेट हीं व्यापाराचीं मुख्य गांवें असून कोटापट्टम हें व्यापारी बंदर म्हणून प्रसिद्ध आहे. नेल्लोर तालुक्यांत पाऊस फार कमी पडत असल्यामुळें तेथें दुष्काळ वारंवार पडतो.त्याचप्रमाणें पेन्नार नदीच्या दक्षिणेस असलेल्या तालुक्यांत पाऊसपाणी ठीक असल्यामुळें दुष्काळापासून फारसा त्रास होत नाहीं. ह्या जिल्ह्यांत तेरा तालुके व चार जमीनदारी तहशिली आहेत.

ता लु का.— नेल्लोर जिल्ह्याच्या मध्यभागीं हा तालुका आहे. ह्या तालुक्याच्या पूर्वेस बंगालचा उपसागर आहे. क्षेत्रफळ ५०३ चौरस मैल आणि लोकसंख्या ( १९२१ )

१७२७७९. ह्या तालुक्यामध्यें १ शहर व ८४ खेडीं आहेत. येथें तांदुळाचें पीक बऱ्याच मोठ्या प्रमाणावर होतें.

शहर.—नेल्लोर जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश १४° २७' आणि पूर्वरेखांश ७९° ५९'. हें पेन्नार नदीच्या उजव्या किनाऱ्यावर वसलेलें आहे. तसेंच हें ईस्ट–कोस्ट -रेल्वेवरील एक स्टेशन असून मद्रासपासून १०९ मैल दूर आहे. लोकसंख्या (१९११) ३३२४६ असून येथें २५ हजारांवर हिंदु धर्माचे लोक आहेत.

**नेल्लीकुप्पम**—मद्रास इलाखा. दक्षिणअर्काट जिल्ह्याच्या कुडलोर तालुक्यांतील एक गांव व साऊथ इंडियन रेल्वेवरील एक स्टेशन. लोकसंख्या ( १९११ ) १३५०४. पोर्टोनोव्होप्रमाणेंच येथें मुसुलमान लोकांची वस्ती जास्त आहे. येथें जवळच साखर काढण्याचा एक कारखाना आहे. येथें सर्व ठिकाणीं ऊंस होतो. सुपारीचीं झाडेंहि येथें बरींच आहेत.

**नेल्सन, व्हायकौंट होरेशिओ** (१७५८–१८०५)— हा ब्रिटिश आरमारी योद्धा नॉरफोकशायरमध्यें जन्मला. त्याचें शिक्षण फारसें न होतां तो १८७० सालीं जहाजावर नोकरीस राहिला. तो आर्टिक समुद्र व ईस्ट इंडीज बेटें या ठिकाणच्या सफरींत होता. १७७७ सालीं तो लेफ्टनंटच्या जागेची परीक्षा देऊन त्या जागीं कायम झाला, व १७७९ सालीं कॅप्टन झाला. अमेरिकन–स्वातंत्र्ययुद्धाच्या वेळीं त्यानें आरमारी लढाईंत भाग घेतला. हें युद्ध संपल्यावर त्याला वेस्ट इंडीज बेटांतील एका फ्रिगेटवर अधिकारी नेमण्यांत आलें. तेथें त्यानें स्वतंत्र झालेल्या अमेरिकन लोकांविरुद्ध इंग्लंडचे नॅव्हिगेशन लॉज ( नौकानयनाचे कायदे ) लागू केल्यामुळें बऱ्याच तक्रारी उद्भवल्या. पुढें १७८९ सालच्या राज्यक्रांतीनंतर फ्रान्सबरोबर सुरू झालेल्या युद्धांत त्याला अगॅमेम्नान जहाजावर कॅप्टनच्या हुद्द्यावर १७९३ सालीं नेमण्यांत आलें व तेव्हांपासून १८०० पर्यंत तो सतत लढाईंत गुंतलेला होता व याच काळांत तो मोठ्या नांवालौकिकास चढला. टूलानच्या वेळ्यांत ब्रिटिशांनां माघार घ्यावी लागली. पुढें कॉर्सिका बेटांतील काल्व्ही हें ठिकाण घेत असतां नेलसनचा उजवा डोळा अपघातानें फुटला. तथापि तो नोकरींत कायम होता इतकेंच नव्हे तर १७९७ सालीं सेंटव्हिन्सेंटच्या लढाईंत ब्रिटिशांनां मिळालेल्या जयाचें बरेंच श्रेय नेल्सनला आहे व त्याबद्दल त्याला 'नाईट' ही पदवी देण्यांत आली, व लवकरच रिअर–अॅडमिरल नेमण्यांत आलें. नंतर सांताक्रूस डी टेनेरिफ येथें खजिना असलेलें एक स्पॅनिश जहाज हस्तगत करण्याच्या प्रयत्नांत त्याच्या उजव्या हाताच्या कोपरांतून गोळी गेली. त्यांतून बरा झाल्यावर त्याची नेमणूक टूलान येथें एक मोठें फ्रेंच आरमार तयार होत होतें, त्याचा नाश करण्याकडे झाली. पण नेल्सनची टेहळणी चुकवून तें आरमार दूर गेलें, तेव्हां सार्डिनिया, नेपल्स, मेसिना, अलेक्झांड्रिया, वगैरे ठिकाणें धुंडाळीत तो भूमध्यसमुद्रभर फिरला. अखेर नाईल नदीच्या मुखाशीं असलेल्या फ्रेंच आरमाराशीं त्यानें ता. १ आगस्ट, १७९८ रोजी लढाई देऊन मोठा विजय मिळविला. या वेळींहि त्याला कपाळावर एक जखम झाली. यानंतर नेल्सन, हा नेपल्सची राणी मेरिया कॅरोलिना व तिची हस्तक एमा हॅमिल्टन यांच्या प्रेमपाशांत सांपडून फ्रेंचांविरुद्ध नेपल्सच्या संरक्षणार्थ तिकडेच राहिला व ब्रिटिश सरकारच्या नोकरीकडेहि कांहीं अंशीं त्यानें दुर्लक्ष केलें.एमा हॅमिल्टनचा नवरा जिवंत असतांहि तिच्याशीं नेल्सनचा प्रेमसंबंध वाढत जाऊन त्यांनां अपत्यहि झालें व नेल्सननें लग्नाच्या बायकोशीं काडीमोड केली. या दुर्वर्तनामुळें इंग्लंडचा राजा, प्रधानमंडळ व आरमारखात्याचे अधिकारी यांची नेल्सनवर इतराजी झाली होती. पण इंग्रज लोकांस तो प्रिय होता व आरमारी युद्धांत वाकबगार होता, त्यामुळें बाल्टिक समुद्रावरील स्वारींत सर हाईड या मुख्य अधिकाऱ्याच्या हाताखालीं नेल्सनची नेमणूक आरमारखात्यानें केली.नंतर लवकरच झालेल्या कोपनहेगच्या लढाईंतील जयाचें सर्व श्रेय नेल्सनलाच आहे. याच लढाईंत नेल्सननें मुद्दाम आपल्या फुटक्या डोळ्यांनां दुर्बीण लावून सर हाईड याचा ऐन वेळीं परत फिरण्याचा हुकूम न दिसल्याचा बहाणा केला व अखेर लढाई जिंकली त्याबद्दल त्याला व्हायकौंट ही पदवी मिळाली. १८०३ सालीं नेपोलियनबरोबर पुन्हां युद्ध सुरू होतांच त्याला भूमध्यसमुद्रांतील ब्रिटिश आरमाराचा कमांडर नेमण्यांत आलें. या वेळच्या फ्रेंचांबरोबरच्या युद्धांतील १८०५ सालच्या आक्टोबरच्या२१व्या तारखेस झालेली ट्राफल्गारची लढाई हा नेल्सनचा शेवटचा आणि ब्रिटिश आरमारी इतिहासांतील एक अत्यंत महत्त्वाचा विजय होय. या विजयानें नेपोलियनच्या इंग्लंडवरील आरमारी स्वारीबद्दल इंग्रजांनां वाटणारी भीति कायमची नष्ट झाली. या लढाईच्या वेळीं नेल्सननें आपल्या लढाऊ लोकांनां सांगितलेला संदेश " इंग्लंड एक्सपेक्टस् एव्हरी मॅन वुइल डू हिज ड्यूटी "(प्रत्येक मनुष्य आपलें कर्तव्य करील अशी इंग्लंडला आशा आहे)चिरस्मरणीय झाला आहे या लढाईंत ऐन आणीबाणीच्या वेळीं नेल्सनला छातीवर गोळी लागून त्यांतच त्याचा अंत झाला. पण मरणापूर्वी त्याला विजयाची बातमी कळली व 'मी आपलें कर्तव्य केलें आहे व त्याबद्दल मी ईश्वराचे आभार मानतों' असें म्हणून त्यानें प्राण सोडला. नेल्सन गर्विष्ठ,स्तुतिप्रिय व चटकन विकारवश होणारा होता. सामान्यतः हे दोष इंग्रज माणसांत नसतात आणि थोर इंग्रज इसमांत दिसणारे गुण नेल्सनमध्यें अगदींच कमी होते. नेल्सनचें स्मारक लंडन शहरांत ट्राफल्गार स्क्वेअरमध्यें मोठा पुतळा उभारून केलें आहे. नेल्सन तरुण वयांत मुंबईस नोकरीसाठीं आला होता पण त्यास मुंबईसरकारनें नोकरीस ठेवलें नाहीं म्हणून तो परत गेला असें या वर्षीं ( १९२५ ) टाईम्स ऑफ इंडियानें प्रसिद्ध केलें आहे.

**नेवाडा**—उत्तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक. क्षेत्रफळ ११०६९० चौरस मैल; पैकीं ८६१ चौरस मैलांचा प्रदेश पाण्यानें व्यापिला आहे. लोकसंख्या ( १९१८ ) ११४७४२. यांतील कॅर्सन सिटी हें राजधानीचें शहर आहे. रोमनकॅथोलिक पंथाच्या लोकांचा भरणा या संस्थानांत विशेष असून त्यांच्या खालोखाल एपिस्कोपल, मेथॉडिस्ट, मॉर्मान आणि प्रेसबिटेरीयन या शाखेचे लोक आहेत. आठ ते सोळा वर्षे वयांच्या मुलांनां शिक्षण सक्तीचें केलें आहे, 'युनिव्हर्सिटी ऑफ रेनो' ही उच्च शिक्षणसंस्था आहे. गहूं, जव, बटाटे आणि धान्यें हीं मुख्य पिकें आहेत. घोडे, खेचरें, दुभत्या गाई, मेंढ्या आणि डुकरें इत्यादि जनावरें संस्थानांत प्रामुख्यानें आढळतात. १९१७ सालीं मेंढ्यांपासून १०२००००० पौंडांची लॉकर काढण्यांत आली.

सोनें आणि रुपें या धातूंच्या खाणी नेवाडा संस्थानांत मुख्यत्वेंकरून आहेत. तथापि तांबें, शिसें, जस्त, लोखंड, पारा, गंधक, ग्राफाइट, शिरगोळा ( जिप्सम ) आणि इमारतीचे दगड इत्यादिकांच्या खाणीहि येथें आहेत. १९२५ सालीं, नेवाडा संस्थानांतून ३५४७९६५५ डॉलर किंमतीचा खनिज माल परदेशीं रवाना झाला. संस्थानांतील उद्योगधंदे विशेष महत्त्वाचे नाहींत. १९१६ सालीं, संस्थानांत २३१८ मैल लांबीचा रेल्वेचा रस्ता तयार होता. १६ सभासदांचें वरिष्ठमंडळ ( सेनेट ) आणि ३७ सभासदांचें प्रतिनिधिमंडळ ( हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्ह ) असतें. कॉंग्रेसमध्यें या संस्थानांतून वरिष्ठ मंडळांतील व प्रतिनिधिमंडळांतील अनुक्रमें २ व १ सभासद पाठवितात. १८६४ सालीं या संस्थानचा यूनियनमध्यें प्रवेश झाला.

**नेवासें**, ता लु का.—मुंबई इलाखा.अहमदनगर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ६२१ चौरस मैल. या तालुक्यामध्यें १४५ गांवें असून त्यांपैकीं बरींच जहागिरी गांवेंहि आहेत. तालुक्याचें मुख्य ठिकाण नेवासें आहे. लोकसंख्या ( १९११ ) ९०५६५. जमीन सपाटीची असून गोदावरी नदीच्या बाजूला उतार आहे.तालुक्याची उत्तर सीमा गोदावरी नदी आहे. खरीपापेक्षां रब्बीचेंच पीक जास्त होतें. फार थोड्या भागांत पाटाचें पाणी पुरविलेलें जातें.

गां व.—नेवासें तालुक्याचें मुख्य ठिकाण. हा गांव प्रवरा नदीच्या कांठीं आहे. येथें मोहनी राजाचें स्थान असून माघ शु॥ पंचमीस मोठी यात्रा भरते ज्ञानेश्वरानें लिहिलेला ज्ञानेश्वर ग्रंथ येथें तयार झाला असावा असें दिसतें. नेवाशावरील संस्कृतग्रंथ महालयमाहात्म्य ( स्कंदपुराणांतर्गत ) हा होय. यांत नेवाशासाठीं वापरलेले संस्कृत शब्द निधिवास व महालय हे होत. या माहात्म्यांत वैष्णवी शक्तीचा (स्थानदेवतेचा ) गौरव केला आहे. ज्ञानेश्वरी लिहीत असतांना ज्या खांबाला ज्ञानेश्वर टेकून बसत त्या स्तंभावरीललेख तैलदानविषयक आहे. हा स्तंभ एका नष्ट झालेल्या देवळाचा भाग आहे. ज्ञानेश्वरीच्या शेवटच्या ओंव्यांत महालय स्थानाचा उल्लेख आहे. ज्ञानेश्वरींतील ओंवीचा अर्थ नेवासें ही जाधवांची राजधानी होती असा तळेकरशास्त्री काढतात आणि त्या जाधव राजांस गवळी समजतात [ इं. अॅ. १८७५ ].

**नेव्हिस**—ब्रिटिश वेस्ट इंडीज बेटांपैकीं एक बेट. हें व सेंट किट्स मिळून लीवर्ड बेटांच्या पांच इलाख्यांपैकीं एक इलाखा होतो. याची लोकसंख्या १९०१ सालीं १२७७४ होती हें बेट उत्तरअक्षांश १७°१४'व पश्चिमरेखांश ६२°३३' यांत आहे.नेव्हिस बेट व किटस् यांच्यामध्यें दोन मैल रुंदीची एक खाडी असून हें बेट वर्तुळाकार आहे.या बेटाचें क्षेत्रफळ ५० चौरस मैल आहे. ह्या बेटावर भयंकर वादळें होत असून देखील येथील हवा निरोगी आहे. येथून साखर, रम दारू व काकवी यांची निर्गत होते. धांन्य, कॉफी व फळें या वस्तू येथें उत्पन्न होत असून औषधी पाण्याचे झरे व गंधकाचे थर सांपडतात. चार्लस टाऊन हें मुख्य शहर नैर्ऋत्य किनाऱ्यावर आहे. किट्स नेव्हिसचें कायदेकौन्सिल व सेंट किटसची राजधानी बासेतेरी येथें असते. कोलंबसाला हें बेट १४९८ सालीं सांपडलें. स. १६२८ त येथें ब्रिटिश वसाहत स्थापन झाली. गुलामांच्या व्यापाराच्या वेळीं याची फार प्रसिद्धि होती.

**नेसर्गी**—मुंबई इलाखा, बेळगांव जिल्हा. सांपगांवच्या उत्तरेस सुमारें सात मैलांवर हा गांव आहे. येथें एक जुनाट व पडकें बसवाचें देऊळ आहे. विणकाम व बांगड्या करण्याचे धंदे येथें चालतात. बसवेश्वराची दर बारा वर्षांनीं एकदां येथें मोठी जत्रा भरते. देवळांत इ. स. १२१९ सालचा एक शिलालेख आहे. धोंड्या वाघाचा पाठलाग करीत असतां जनरल वेल्स्लीस १८०० सालीं येथें निपाणीचा देसाई येऊन मिळाला.

**नेस्टोरियन पंथ**—हिंदुस्थानांत प्रसार झालेला फार जुना ख्रिस्ती पंथ या नात्यानें या पंथाचें महत्त्व आहे. नेस्टोरियन पंथाचा मूळ पुरुष नेस्टोरियस होय. हा अँटिओसकजवळील युप्रेपियसच्या मठाचा शिष्य होता. अरियन, नोव्हेशियन इत्यादि पंथांवर त्यानें कडक टीका केल्यामुळें, या सर्व पंथांनीं त्याच्या विरुद्ध चळवळ केली. या वादाचा निकाल लावण्यासाठीं ४३१ मध्यें एफोसियस येथें एक धर्मपरिषद भरली व तींत नेस्टोरियसच्या विरुद्ध निकाल झाला. पुढें तो ४३५ मध्यें अरबस्तानांतील पेट्रा गांवीं अज्ञातवासांत राहिला. ४३९ मध्यें तो ओएसीस येथें जाऊन राहिला. व्हेमीज नांवाच्या जातीनें त्याला तुरुंगांत ठेविलें व नंतर शेन्यूट नांवाच्या ईजिप्शियन साधूनें त्याचा फार छळ केला व शेवटीं हालांतच त्याला मरण आलें.

ने स्टो रि य न पं था चीं म तें.—नेस्टोरियन पंथाचा मूळ पुरुष नेस्टोरियस असला तरी त्याच्या हयातींत त्याच्या पंथाची फारशी भरभराट झाली नाहीं. त्याचा अनुयायी इबस यानें या पंथाला ४३५ च्या सुमारास बरीच चालना दिली. बर्सुमास यानें इराणांतील निसिबिक या गांवीं नेस्टोरियन धर्म शिकविण्याची शाळा ४३५ मध्यें

१७२७७९. ह्या तालुक्यामध्यें १ शहर व ८४ खेडीं आहेत. येथें तांदुळाचें पीक बऱ्याच मोठ्या प्रमाणावर होतें.

शहर.—नेल्लोर जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश १४° २७' आणि पूर्वरेखांश ७९° ५९'. हें पेन्नार नदीच्या उजव्या किनाऱ्यावर वसलेलें आहे. तसेंच हें ईस्ट-कोस्ट-रेल्वेवरील एक स्टेशन असून मद्रासपासून १०९ मैल दूर आहे. लोकसंख्या (१९११) ३३२४६ असून येथें २५ हजारांवर हिंदु धर्माचे लोक आहेत.

**नेल्लीकुप्पम**—मद्रास इलाखा. दक्षिणअर्काट जिल्ह्याच्या कुडलोर तालुक्यांतील एक गांव व साऊथ इंडियन रेल्वेवरील एक स्टेशन. लोकसंख्या ( १९११ ) १३५०४. पोर्टोनोव्हो-प्रमाणेंच येथें मुसुलमान लोकांची वस्ती जास्त आहे. येथें जवळच साखर काढण्याचा एक कारखाना आहे. येथें सर्व ठिकाणीं ऊंस होतो. सुपारीचीं झाडेंहि येथें बरींच आहेत.

**नेल्सन, व्हायकौंट होरेशिओ** (१७५८-१८०५)—हा ब्रिटिश आरमारी योद्धा नॉरफोकशायरमध्यें जन्मला. त्याचें शिक्षण फारसें न होतां तो १८७० सालीं जहाजावर नोकरीस राहिला. तो आर्टिक समुद्र व ईस्ट इंडीज बेटें या ठिकाणच्या सफरींत होता. १७७७ सालीं तो लेफ्टनंटच्या जागेची परीक्षा देऊन त्या जागीं कायम झाला, व १७७९ सालीं कॅप्टन झाला. अमेरिकन-स्वातंत्र्ययुद्धाच्या वेळीं त्यानें आरमारी लढाईंत भाग घेतला. हें युद्ध संपल्यावर त्याला वेस्ट इंडीज बेटांतील एका फ्रिगेटवर अधिकारी नेमण्यांत आलें. तेथें त्यानें स्वतंत्र झालेल्या अमेरिकन लोकांविरुद्ध इंग्लंडचे नॅव्हिगेशन लॉज ( नौकानयनाचे कायदे ) लागू केल्यामुळें बऱ्याच तक्रारी उद्भवल्या. पुढें १७८९ सालच्या राज्यक्रांतीनंतर फ्रान्सबरोबर सुरू झालेल्या युद्धांत त्याला अगॅमेम्नान जहाजावर कॅप्टनच्या हुद्द्यावर १७९३ सालीं नेमण्यांत आलें व तेव्हांपासून १८०० पर्यंत तो सतत लढाईंत गुंतलेला होता व याच काळांत तो मोठ्या नांवालौकिकास चढला. टूलानच्या वेढ्यांत ब्रिटिशांनां माघार घ्यावी लागली. पुढें कॉर्सिका बेटांतील काल्व्ही हें ठिकाण घेत असतां नेल्सनचा उजवा डोळा अपघातानें फुटला. तथापि तो नोकरींत कायम होता इतकेंच नव्हे तर १७९७ सालीं सेंटव्हिन्सेंटच्या लढाईंत ब्रिटिशांनां मिळालेल्या जयाचें बरेंच श्रेय नेल्सनला आहे व त्याबद्दल त्याला 'नाईट' ही पदवी देण्यांत आली, व लवकरच रिअर-अॅडमिरल नेमण्यांत आलें. नंतर सांताक्रूस डी टेनेरिफ येथें खजिना असलेलें एक स्पॅनिश जहाज हस्तगत करण्याच्या प्रयत्नांत त्याच्या उजव्या हाताच्या कोपरांतून गोळी गेली. त्यांतून बरा झाल्यावर त्याची नेमणूक टूलान येथें एक मोठें फ्रेंच आरमार तयार होत होतें, त्याचा नाश करण्याकडे झाली. पण नेल्सनची टेहळणी चुकवून तें आरमार दूर गेलें, तेव्हां सार्डिनिया, नेपल्स, मेसिना, अलेक्झांड्रिया, वगैरे ठिकाणें धुंडाळीत तो भूमध्यसमुद्रभर फिरला. अखेर नाईल नदीच्या मुखाशीं असलेल्या फ्रेंच आरमाराशीं त्यानें ता. १ आगस्ट, १७९८ रोजी लढाई देऊन मोठा विजय मिळविला. या वेळींहि त्याला कपाळावर एक जखम झाली. यानंतर नेल्सन, हा नेपल्सची राणी मेरिया कॅरोलिना व तिची हस्तक एमा हॅमिल्टन यांच्या प्रेमपाशांत सांपडून फ्रेंचांविरुद्ध नेपल्सच्या संरक्षणार्थ तिकडेच राहिला व ब्रिटिश सरकारच्या नोकरीकडेहि कांहीं अंशीं त्यानें दुर्लक्ष केलें.एमा हॅमिल्टनचा नवरा जिवंत असतांहि तिच्याशीं नेल्सनचा प्रेमसंबंध वाढत जाऊन त्यांनां अपत्यहि झालें व नेल्सननें लग्नाच्या बायकोशीं काडीमोड केली. या दुर्वतनामुळें इंग्लंडचा राजा, प्रधानमंडळ व आरमारखात्याचे अधिकारी यांची नेल्सनवर इतराजी झाली होती. पण इंग्रज लोकांस तो प्रिय होता व आरमारी युद्धांत वाकबगार होता, त्यामुळें बाल्टिक समुद्रावरील स्वारींत सर हाईड या मुख्य अधिकाऱ्याच्या हाताखालीं नेल्सनची नेमणूक आरमारखात्यानें केली. नंतर लवकरच झालेल्या कोपनहेगच्या लढाईंतील जयाचें सर्व श्रेय नेल्सनलाच आहे. याच लढाईंत नेल्सननें मुद्दाम आपल्या फुटक्या डोळ्यांनां दुर्बीण लावून सर हाईड याचा ऐन वेळीं परत फिरण्याचा हुकूम न दिसल्याचा बहाणा केला व अखेर लढाई जिंकली त्याबद्दल त्याला व्हायकौंट ही पदवी मिळाली. १८०३ सालीं नेपोलियनबरोबर पुन्हां युद्ध सुरू होतांच त्याला भूमध्यसमुद्रांतील ब्रिटिश आरमाराचा कमांडर नेमण्यांत आलें. या वेळच्या फ्रेंचांबरोबरच्या युद्धांतील १८०५ सालच्या आक्टोबरच्या २१व्या तारखेस झालेली ट्राफल्गारची लढाई हा नेल्सनचा शेवटचा आणि ब्रिटिश आरमारी इतिहासांतील एक अत्यंत महत्त्वाचा विजय होय. या विजयानें नेपोलियनच्या इंग्लंडवरील आरमारी स्वारीबद्दल इंग्रजांनां वाटणारी भीति कायमची नष्ट झाली. या लढाईच्या वेळीं नेल्सननें आपल्या लढाऊ लोकांना सांगितलेला संदेश "इंग्लंड एक्स्पेक्टस् एव्हरी मॅन वुइल डू हिज ड्यूटी"(प्रत्येक मनुष्य आपलें कर्तव्य करील अशी इंग्लंडला आशा आहे)चिरस्मरणीय झाला आहे या लढाईंत ऐन आणीबाणीच्या वेळीं नेल्सनला छातीवर गोळी लागून त्यांतच त्याचा अंत झाला. पण मरणापूर्वीं त्याला विजयाची बातमी कळली व 'मी आपलें कर्तव्य केलें आहे व त्याबद्दल मी ईश्वराचे आभार मानतों' असें म्हणून त्यानें प्राण सोडला. नेल्सन गर्विष्ठ, स्तुतिप्रिय व चटकन विकारवश होणारा होता. सामान्यतः हे दोष इंग्रज माणसांत नसतात आणि थोर इंग्रज इसमांत दिसणारे गुण नेल्सनमध्यें अगदींच कमी होते. नेल्सनचें स्मारक लंडन शहरांत ट्राफल्गार स्क्वेअरमध्यें मोठा पुतळा उभारून केलें आहे. नेल्सन तरुण वयांत मुंबईस नोकरीसाठीं आला होता पण त्यास मुंबईसरकारनें नोकरीस ठेवलें नाहीं म्हणून तो परत गेला असें या वर्षीं ( १९२५ ) टाईम्स ऑफ इंडियानें प्रसिद्ध केलें आहे.

**नेवाडा**—उत्तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक. क्षेत्रफल ११०६९० चौरस मैल; पैकीं ८६१ चौरस मैलांचा प्रदेश पाण्यानें व्यापिला आहे. लोकसंख्या (१९१८) ११४७४२. यांतील कॅर्सन सिटी हें राजधानीचें शहर आहे. रोमनकॅथोलिक पंथाच्या लोकांचा भरणा या संस्थानांत विशेष असून त्यांच्या खालोखाल एपिस्कोपल, मेथॉडिस्ट, मॉर्मान आणि प्रेसबिटेरीयन या शाखेचे लोक आहेत. आठ ते सोळा वर्षे वयांच्या मुलांनां शिक्षण सक्तीचें केलें आहे, 'युनिव्हर्सिटी ऑफ रेनो' ही उच्च शिक्षणसंस्था आहे. गहूं, जव, बटाटे आणि धान्यें हीं मुख्य पिकें आहेत. घोडे, खेचरें, दुभत्या गाई, मेंढ्या आणि डुकरें इत्यादि जनावरें संस्थानांत प्रामुख्यानें आढळतात. १९१७ सालीं मेंढ्यांपासून १०२००००० पौंडांची लॉकर काढण्यांत आली.

सोनें आणि रुपें या धातूंच्या खाणी नेवाडा संस्थानांत मुख्यत्वेंकरून आहेत. तथापि तांबें, शिसें, जस्त, लोखंड, पारा, गंधक, ग्राफाइट, शिरगोळा (जिप्सम) आणि इमारतीचे दगड इत्यादिकांच्या खाणींहि येथें आहेत. १९२५ सालीं, नेवाडा संस्थानांतून ३५४७९६५५ डॉलर किंमतीचा खनिज माल परदेशीं रवाना झाला. संस्थानांतील उद्योगधंदे विशेष महत्त्वाचे नाहींत. १९१६ सालीं, संस्थानांत २३१८ मैल लांबीचा रेल्वेचा रस्ता तयार होता. १६ सभासदांचें वरिष्ठमंडळ (सेनेट) आणि ३७ सभासदांचें प्रतिनिधिमंडळ (हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्ह) असतें. कॉंग्रेसमध्यें या संस्थानांतून वरिष्ठ मंडळांतील व प्रतिनिधिमंडळांतील अनुक्रमें २ व १ सभासद पाठवितात. १८६४ सालीं या संस्थानचा यूनियनमध्यें प्रवेश झाला.

**नेवासें**, ता लु का.—मुंबई इलाखा.अहमदनगर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ६२१ चौरस मैल. या तालुक्यामध्यें १४५ गांवें असून त्यांपैकीं बरींच जहागिरी गांवेंहि आहेत. तालुक्याचें मुख्य ठिकाण नेवासें आहे. लोकसंख्या (१९११) ९०५६५. जमीन सपाटीची असून गोदावरी नदीच्या बाजूला उतार आहे.तालुक्याची उत्तर सीमा गोदावरी नदी आहे. खरीपापेक्षां रब्बीचेंच पीक जास्त होतें. फार थोड्या भागांत पाटाचें पाणी पुरविलेलें जातें.

गां व.—नेवासें तालुक्याचें मुख्य ठिकाण. हा गांव प्रवरा नदीच्या कांठीं आहे. येथें मोहनी राजाचें स्थान असून माघ शु॥ पंचमीस मोठी यात्रा भरते ज्ञानेश्वरानें लिहिलेला ज्ञानेश्वर ग्रंथ येथें तयार झाला असावा असें दिसतें. नेवाशावरील संस्कृतग्रंथ महालयमाहात्म्य (स्कंदपुराणांतर्गत) हा होय. यांत नेवाशासाठीं वापरलेले संस्कृत शब्द निधिवास व महालय हे होत. या माहात्म्यांत वैष्णवी शक्तीचा (स्थानदेवतेचा) गौरव केला आहे. ज्ञानेश्वरी लिहीत असतांना ज्या खांबाला ज्ञानेश्वर टेकून बसत त्या स्तंभावरीललेख तैलदानविषयक आहे. हा स्तंभ एका नष्ट झालेल्या देवळाचा भाग आहे. ज्ञानेश्वरीच्या शेवटच्या ओंव्यांत महालय स्थानाचा उल्लेख आहे. ज्ञानेश्वरींतील ओंवींचा अर्थ नेवासें ही जाधवांची राजधानी होती असा तळेकरशास्त्री काढतात आणि त्या जाधव राजांस गवळी समजतात [ इं. ॲं. १८७५ ].

**नेव्हिस**—ब्रिटिश वेस्ट इंडीज बेटांपैकीं एक बेट. हें व सेंट किट्स मिळून लीवर्ड बेटांच्या पांच इलाख्यांपैकीं एक इलाखा होतो. याची लोकसंख्या १९०१ सालीं १२७७४ होती हें बेट उत्तरअक्षांश १७°१४'व पश्चिमरेखांश ६२°३३' यांत आहे.नेव्हिस बेट व किटस् यांच्यामध्यें दोन मैल रुंदीची एक खाडी असून हें बेट वर्तुळाकार आहे.या बेटाचें क्षेत्रफळ ५० चौरस मैल आहे. ह्या बेटावर भयंकर वादळें होत असून देखील येथील हवा निरोगी आहे. येथून साखर, रम दारू व काकवी यांची निर्गत होते. धान्य, कॉफी व फळें या वस्तू येथें उत्पन्न होत असून औषधी पाण्याचे झरे व गंधकाचे थर सांपडतात. चार्लस टाऊन हें मुख्य शहर नैर्ऋत्य किनाऱ्यावर आहे. किट्स नेव्हिसचें कायदेकौन्सिल व सेंट किटसची राजधानी बासेतेरी येथें असते. कोलंबसाला हें बेट १४९८ सालीं सांपडलें. स. १६२८ त येथें ब्रिटिश वसाहत स्थापन झाली. गुलामांच्या व्यापाराच्या वेळीं याची फार प्रसिद्धि होती.

**नेसर्गी**—मुंबई इलाखा, बेळगांव जिल्हा. सांपगांवच्या उत्तरेस सुमारें सात मैलांवर हा गांव आहे. येथें एक जुनाट व पडकें बसवाचें देऊळ आहे. विणकाम व बांगड्या करण्याचे धंदे येथें चालतात. बसवेश्वराची दर बारा वर्षांनीं एकदां येथें मोठी जत्रा भरते. देवळांत इ. स. १२१९ सालचा एक शिलालेख आहे. धोंड्या वाघाचा पाठलाग करीत असतां जनरल वेल्स्लीस १८०० सालीं येथें निपाणीचा देसाई येऊन मिळाला.

**नेस्टोरियन पंथ**—हिंदुस्थानांत प्रसार झालेला फार जुना खिस्ती पंथ या नात्यानें या पंथाचें महत्त्व आहे. नेस्टोरियन पंथाचा मूळ पुरुष नेस्टोरियस होय. हा अँटिओकजवळील युप्रेपियसच्या मठाचा बिशप होता. अरियन, नोव्हेशियन इत्यादि पंथांवर त्यानें कडक टीका केल्यामुळें, या सर्व पंथांनीं त्याच्या विरुद्ध चळवळ केली. या वादाचा निकाल लावण्यासाठीं ४३१ मध्यें एफेसियस येथें एक धर्मपरिषद भरली व तींत नेस्टोरियसच्या विरुद्ध निकाल झाला. पुढें तो ४३५ मध्यें अरबस्तानांतील पेट्रा गांवीं अज्ञातवासांत राहिला. ४३९ मध्यें तो ओएसीस येथें जाऊन राहिला. व्हेमीज नांवाच्या जातीनें त्याला तुरुंगांत ठेविलें व नंतर शेन्यूट नांवाच्या ईजिप्शियन साधूनें त्याचा फार छळ केला व शेवटीं हालांतच त्याला मरण आलें.

ने स्टो रि य न पं था चीं म तें.—नेस्टोरियन पंथाचा मूळ पुरुष नेस्टोरियस असला तरी त्याच्या हयातींत त्याच्या पंथाची फारशी भरभराट झाली नाहीं. त्याचा अनुयायी इबस यानें या पंथाला ४३५ च्या सुमारास बरीच चालना दिली. बर्सुमास यानें इराणांतील निसिबिक या गांवीं नेस्टोरियन धर्म शिकविण्याची शाळा ४३५ मध्यें

काढली . पुढें या पंथाला व त्याच्या अनुयायांनां कॅथोलिकांकडून व राजसत्तेकडून अतिशय विरोध होऊं लागल्यामुळे, या पंथाचे लोक इराणमध्यें येऊन राहिले व तेथें त्यांनीं आपल्या धर्माचा प्रसार करण्यास सुरवात केली. इराणांतील परिस्थितीप्रमाणें त्यांनां आपल्या धर्मतत्त्वांत थोडा फार फरक करणें भाग पडलें. उदाहरणार्थ. पूर्वी नेस्टोरियन पंथाच्या धर्मगुरूंनां ब्रह्मचर्याचें व्रत पाळावें लागत असे, पण इराणांत आल्यानंतर त्यांनीं तो नियम रद्द केला व लग्नें करण्यास मोकळीक देऊन टाकली. इराणांत असतांनां या पंथाच्या लोकांनां बराच छळ सोसावा लागला. इस्लामी सत्तेनें त्यांनां प्रथमतः चांगल्या तऱ्हेनें वागविलें; पण पुढें इस्लामांनींहि यांनां छळण्यास कमी केलें नाहीं. नेस्टोरियन पंथाचीं तत्त्वें मुख्यतः पुढीलप्रमाणें होतीं:—नेस्टोरियसच्या मतें, ख्रिस्तामध्यें देवत्व व मनुष्यत्व या दोहोंचा अंश होता. तो ख्रिस्ताला देव मानीत नसे असें कांहीं विद्वान मानतात तें खरें नाहीं. नेस्टोरियसचा व त्याच्या विरुद्ध असलेल्या इतर पंथांचा ज्या एका बाबतींत बेबनाव असे ती बाब म्हणजे 'थिओटोकस' हें विशेषण मेरीला लावण्यांत यावें किंवा नाहीं, ही होय. थिओटोकस म्हणजे दैवी अंश गर्भांत धारण करणारी. मेरीला थिओटोकस म्हणणें चुकीचें आहे असें नेस्टोरियसचें मत होतें; कारण ख्रिस्तदेव हा मेरीसारख्या मनुष्यदेहधारी स्त्रीच्या पोटीं जन्मला असें म्हणणें म्हणजे मनुष्याच्या पोटीं देव जन्मतो असें म्हटल्यासारखें होतें व तें बरोबर नाहीं असें त्याचें म्हणणें होतें.

ने स्टो रि य न पं था चा ध र्म प्र सा र.—नेस्टोरियन लोकांचा कॅथोलिकांनीं व बायझंटाईन राजसत्तेनें छळ आरंभल्यामुळें त्यांनां देशत्याग करावा लागला; व ते आशियाखंडांत येऊन राहिले. अशियामध्यें त्यांनीं धर्मप्रसाराचें काम जारीनें सुरू केलें. सीरिया, आर्मेनिया, अरेबिया, हलवन, मर्व्ह, हिरात, ताश्कंद, समरकंद, बल्ख, काशगर, या ठिकाणीं त्यांनीं आपलीं धर्मपीठें स्थापन केलीं. इतकेंच नव्हे तर चीनमध्यें, पेकिंग, सिंगनफू सीनफू, येथेंहि आपला धर्मप्रसार केला. हिंदुस्थानांत कल्लन व क्रांगनोर येथेंहि त्यांनीं मठ स्थापन केले. १२६५ मध्यें त्यांनीं एकंदर २५ प्रांतांमध्यें ७० धर्मपीठें स्थापन केलीं होतीं. मलबारमध्यें हल्लीं जे सीरियन ख्रिस्ती लोक आढळतात ते याच पंथाचे लोक आहेत. मलबारमध्यें या पंथाची फारशी डाळ शिजली नाहीं. मुसुलमानी अमदानींत या पंथाच्या अनुयायांचा छळ होऊं लागल्यामुळें पोर्तुगीज लोकांची या सीरियन ख्रिस्त्यांनीं मदत मागितली. पण पुढें या पोर्तुगीज लोकांनींच त्यांचा छळ केला व शेवटीं या लोकांनां रोमच्या धर्माध्यक्षासमोर मान वांकवावी लागली. १८ व्या शतकामध्यें, हिंदुस्थानांतील नेस्टोरियन चर्च हें जेकोबाइट पंथाच्या ताब्यांत गेलें. मारगॅब्रियल यानें नेस्टोरियन पीठाचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न केला पण त्याला फारसें यश आलें नाहीं. चीनमध्यें या पंथाची चळवळ इ.स. ६३६ पर्यंत भरभराटींत होती पुढें ८ व्या शतकांत ती मंदावली. तथापि थोडक्याच कालानंतर या पंथानें पुन्हां आपला जम बसविला. १० व्या शतकांत तार्तरींमध्यें या पंथानें धर्मप्रसार केला व त्यास बरेंच यशहि प्राप्त झालें. करीथ नांवाच्या एका मोंगल जातीनें या धर्माचा स्वीकार केला होता. तसेंच सोग्डीज नांवाच्या पर्शुभारतीय भाषेंत नव्या कराराचें भाषांतर उपलब्ध झालें आहे. त्यावरून नेस्टोरियन लोकांनीं ती भाषा बोलणाऱ्या लोकांतहि धर्मप्रसार केला होता असें दिसतें. मार्कोपोलो या प्रसिद्ध प्रवाशाला बगदादपासून पेकीनपर्यंत या नेस्टोरियन लोकांचीं पुष्कळच पीठें आढळलीं होतीं असें त्याच्या प्रवासाच्या हकीकतीवरून समजतें. हल्लीं नेस्टोरियनांची वस्ती मुख्यतः तुर्कस्तान व इराणमध्यें आढळते. हे लोक पुराणमताभिमानी आहेत. त्यांचीं देवालयें, प्रार्थना वगैरे सर्व जुन्या आहेत. नेस्टोरिसला ते आपल्या पंथाचा मोठा साधु मानतात व त्याची नित्य प्रार्थना करतात. [ बॅडजर—दि नेस्टोरियन्स अँड देअर रिच्युअल; मिलनेर—दि सीरियन चर्च इन इंडिया ( १८९२ )].

**नैनवा**—राजपुताना, बुंदी संस्थानांतील उत्तर भागांतील शहर. लोकसंख्या सुमारें चार हजार. या शहराच्या भोंवती एक भिंत व खंदक असून दोन्हींहि चांगल्या स्थितींत आहेत. याच्या ईशान्येस व नैर्ऋत्येस ३ तलाव आहेत. या तलावांतलें पाणी खंदकांत वाटेल तेव्हां सोडतां येतें. यांतील सर्वांत मोठा तलाव नवलसागर हा नवलसिंग नांवाच्या सोळंकी रजपुतानें इ. स. १४५० त बांधला असें म्हणतात. यांत एक लहानसा पण सुंदर असा राजवाडा आहे.

**नैनीताल**, जि ल्हा.—संयुक्त प्रांत.कुमाउन विभागांतील दक्षिणेकडील जिल्हा. उ. अ. २८° ५१' ते २९° ३७' व पू. रे. ७८° ४३' ते ८०° ५'.क्षेत्रफळ २६७७ चौरस मैल. उत्तरेस अलमोरा व गढवाल जिल्हे; पूर्वेस नेपाळ व अलमोरा; पश्चिमेस गढवाल व बिजनोर, व दक्षिणेस पिलिभित, बरेली, मुरादाबाद व रामपूर संस्थान हा हिमालयाच्या सर्वांत बाहेरच्या ओळीवर असून मगर या नांवाच्या पर्वताचा भाग मुख्य आहे. येथील टेंकड्यांवर जंगल असून यांच्या शिखरांवरून अत्युत्कृष्ट देखावे दिसतात. टेंकड्यांच्या पायथ्याशीं भाबर नांवाचा अरुंद जमिनीचा भाग असून येथें शेती फार कमी करतात. बाकीच्या भागांत तराई नांवाचा दलदलीचा प्रदेश व काशीपूर तहशील आहे. तराईच्या उत्तरेकडून बरेच नाले व नद्या उगम पावतात यामुळें सर्व प्रदेश हिरवागार असतो. शारदा नदी बर्फाच्छादित शिखरापासून उगम पावते. यांत तलावहि पुष्कळ आहेत; पैकीं मुख्य नैनीताल, भीमताल, मालवाताल, नौकुचियाताल, व खुर्याताल हे होत.

जिल्ह्याच्या खालच्या भागांत साल झाडें वरीच आढळतात. पण वर गेल्यावर यूरोपीय झाडेंहि आढळतात. येथें हत्ती, वाघ, चित्ते, लांडगे, कोल्हे, अस्वलें, सांदर, सर्व प्रकारचीं हरणें, नीलगायी वगैरे जनावरें आहेत. तसेंच सर्प, अजगर, चित्रविचित्र पक्षी, मासे वगैरेहि दृष्टीस पडतात. येथील हवा थंड असून थंडीपासून उन्हाळ्यापर्यंत उष्णतेचें मान २६° पासून ७५° पर्यंत बदलतें. पाऊसाचें मान निरनिराळ्या भागांत कमी जास्त असतें. काशीपूर येथें ४३ इंच, हल्द्वानी येथें ७७ इंच व नैनीताल येथें ९५ इंच पाऊस पडतो.

इतिहासः—यांतील बऱ्याच टेंकडया महाभारतांत उल्लेखिलेल्या आहेत. ह्युएनत्संग आला त्यावेळेस मोविसान राजा तराई भागांत राज्य करीत होता व ब्रह्मपुरा हें दुसरें राज्य होतें. तराई येथें नंतर जंगल झालें व कल्चुरी राजांकडे टेंकडया गेल्या; यांच्याविषयीं फार माहिती नाहीं. पुढें हा प्रदेश चंद राजांकडे गेला. हे आपल्याला झुशी येथील सोमवंशी रजपूत म्हणवीत. मुसुलमान इतिहासकार कुमाऊनचा उल्लेख गयाचंदानें दिल्ली सरकारजवळून १४व्या शतकांत भावर व तराईवरचा हक्क मिळविला त्या वेळेस करतात. किरातीचंदानें प्रथमच (१४८८–१५०३) सर्व प्रांतावर राज्य केलें. मुसलमान सरदारांनीं पर्वतावर पुष्कळ द्रव्य असेल या आशेनें टेंकडयांवर बरेच हल्ले केले. चंद राजांची सत्ता बहुतेक टेंकडयांवरच असे. परंतु बाझबहादुर (१६३८–७८) यानें मोंगल सैन्याच्या मदतीनें गढवाल राजाजवळून तराई भाग परत मिळविला. १६७२त त्यानें जिझिया कर बसविला. त्याचें उत्पन्न तो दिल्लीपतीला खंडणी म्हणून देत असे. येथल्या देवीचंद नांवाच्या एका राजानें (१७२०–२६) अफगाण कटांत सामील होऊन दिल्लीच्या सैन्याविरुद्ध लढाई केली पण तींत त्याचा पराभव झाला. इ. स. १७४४ त अली महंमद या रोहिल्याच्या पुढाऱ्यानें आपलें सैन्य चंदाच्या मुलुखांत धाडलें पण अखेरीस रोहिल्यांनां पळावें लागलें. यानंतर परस्परांत समेट झाला. पुढें एकमेकांत भांडणें होऊन कांहीं भाग ब्राह्मणांकडे व कांहीं अयोध्येच्या नबाबाकडे होता; पुढें गुरख्यांनीं स्वारी करुन चंद लोकांनां हांकून लाविलें इ. स. १८०१ त अयोध्येच्या नबाबानें ब्रिटिशांनां रोहिलखंडाबरोबरच तराई व काशीपूर दिलें. इ. स. १८१४ त नेपाळयुद्ध सुरू झालें व ब्रिटिशांना अलमोरा मिळालें. बंडांत (१८५७) टेंकडीवरील भाग तटस्थ होता. मैदानांत मात्र बरीच गडबड होऊन लुटारूंच्या टोळ्याच्या टोळ्या फिरत होत्या. परंतु सरतेशेवटीं बंड कसें तरी मोडलें. अद्याप अज्ञात व पुराणवस्तू असलेला बराच भाग शिल्लक आहे. काशीपूरजवळ तिसऱ्या व चवथ्या शतकांतील लेख असलेल्या विटा सांपडल्या. भीमताल येथील बाझबहादुरनें बांधलेलें हें चंदाचें मुख्य स्मारक आहे.

जिल्ह्यांत ७ शहरें व १५१३ खेडीं आहेत. लोकसंख्या (१९२१) २७६८७५. यांत नैनीताल, भावर, तराई व काशीपूर, असे ४ भाग आहेत. हिंदी (शें. ६७), मध्यपहाडी (शें. ३१), नेपाळी किंवा गुरखी (शें. १) या भाषा चालतात. येथें ब्राह्मण, रजपूत व डोम या जाती मुख्य आहेत. इतर जाती म्हणजे थारू, बोकसा, भोतिया, रेण, तुर्क, ख्रिस्ती वगैरे आहेत.

शेतकीः—खोल दऱ्यांत गहूं व तांदूळ पिकतो. कमी सुपीक जमीनींत जव पेरतात. टेंकडयांवरच्या उताराबर बटाटे पेरतात. येथें मुख्यत्त्वेंकरून तांदूळ जास्त होतो. येथील बहुतेक जमीन सरकारी इस्टेटींत मोडते व थोड्या प्रमाणांत जमीनदारी धारापद्धतीहि आहे. येथील गहूं, तांदूळ, मका, गळिताचीं धान्यें, कापूस, थोडा चहा, बागाइतींचीं पिकें मुख्य आहेत. येथील गुरें धष्टपुष्ट नसतात. येथें तट्टू ओझें वाहण्याच्या कामीं उपयोगितात. बकऱ्यांचा खाण्याकडे जास्त उपयोग केला जातो. एकंदर सरासरी ११७ चौरस मैल जमिनीला कालव्याचें पाणी मिळतें. येथें खाणी बऱ्याचशा आहेत, परंतु त्या फायदेशीर नाहींत. कांहीं दिवसांपूर्वी थोडेंसें लोखंड निघत असे. घेला व फिभा या नद्यांतून थोडेंसें सोनें सांपडतें. गंधक, जिप्सम व तुरटी हीं थोड्या प्रमाणांत मिळतात.

व्यापारः—येथें कापड तयार होऊन व रंग वगैरे देऊन डोंगराळ प्रदेशाला पाठविलें जातें. बकऱ्यांच्या केसांपासून दोऱ्या वगैरेहि तयार करतात. नैनीताल येथें एक दारूचा कारखाना आहे. निर्गत माल बटाटे, मिरच्या, आलें, जंगली जिनसा वगैरे असून आयात माल मीठ, धातु, धान्य वगैरे आहे. नैनीताल हें डोंगरी व्यापाराचें मुख्य ठिकाण असून हल्द्वानी, रामनगर, चोरगलिया, कालाधुंगी, भावर, जसपूर व काशीपूर हीं मैदानांतील व्यापारी ठिकाणें आहेत.

रस्तेः—यांत रोहिलखंड-कुमाऊन हीच एक रेल्वे असून शिवाय बैलगाडीचे रस्ते बरेलीहून अलमोरा व मुरादाबादहून राणीखेत हे दोन मुख्य रस्ते आहेत. राज्यव्यवस्था इतर जिल्ह्यांप्रमाणेंच आहे.

त ह शी ल.—नैनीताल जिल्ह्याची तहशील. क्षेत्रफळ ४३३ चौरस मैल; लोकसंख्या (१९११) ५८६३१. यांत ५५७ खेडीं व २ शहरें आहेत. हें एक थंड हवेचें ठिकाण आहे. येथें पेशकार अर्थात नायबतहशिलदार राहतो.

गां व.—नैनीताल जिल्ह्याचें मुख्य शहर. येथें लष्करी छावणी आहे. उ. अ. २९° २४′ व पू. रे. ७९° २८′. लोकसंख्या (१९११) १०२७०. रोहिलखंड-कुमाऊन रेल्वेच्या कथगोदम स्टेशनवर उतरून टांगा-मोटारीनें नैनीतालला जातात. प्रवाश्यांकरितां चांगलीं ३।४ हॉटेलें आहेत. सन १८४२ नंतर हें शहर भरभराटीस येऊं लागलें. बंडांतून पळालेले लोक येथें लपून रहात. हल्लीं हें थंड हवेचें ठिकाण असून प्रांतिक सरकार उन्हाळ्यांत येथेंच असतें. यांत एक

तळें आहे. चीना ( ८५८८ फूट ), देवपथ ( ७९८७ फूट ), व आर्यपथ ( ७४६१ ) हीं उंच शिखरें आहेत. येथें गव्हर्नरचा राहण्याचा बंगला फार चांगला आहे. याशिवाय जिल्ह्याच्या मुख्य कचेऱ्या व २ रुग्णालयें, क्लब व मिशनरी संस्था आहेत. आधीं टेकड्यांच्या शिखरावर पंपानें पाणी चढवून नंतर सर्वत्र पुरवितात. येथील व्यापार म्हणजे उन्हाळ्यांतील प्रवाशांच्या गरजा भागविणाऱ्या जिनसांचा आहे. या ठिकाणीं मुलींकरितां पीटर्सफील्ड कॉलेज, स्मिथ कॉलेज, जोसेफ कॉलेज व पांच हायस्कुलें आहेत.

**नैमिषारण्य**—नर्मदेच्या उत्तरेस व कुरुदेशाच्या पश्चिमेस गोमती नदीजवळ असणारें वन. याच वनांत सौतीनें ऋषींस महाभारत कथन केलें. या अरण्यांत भगवंतानें एका निमिषांत दैत्यांचा संहार केला म्हणून यास हें नांव पडलें. याला नैमिशारण्य असेंहि दुसरें नांव आहे. त्याबद्दल कथा अशी—तपश्चर्येस उत्तम स्थल कोणतें असा एकदां ऋषींनीं ब्रह्मदेवास प्रश्न केला असतां, "आतां मी एक मनोमय चक्र निर्माण करतों, त्याची गति जेथें कुंठित होईल तें स्थल" असें ब्रह्मदेवानें उत्तर केलें. नंतर त्याच्या चक्राची नेमि जेथें शीर्ण झाली तें स्थल नैमिशारण्य नांवानें प्रसिद्धीस आलें.

**नैरोबी**—ब्रिटिश पूर्व आफ्रिका. ईस्ट आफ्रिकन प्रोटेक्टोरेटचें व उकंबा प्रांताचें नैरोबी हें राजधानीचें शहर असून मोंबासाच्या वायव्येस रेल्वेनें ३२७ मैल व व्हिक्टोरिआ निआंझावरील फ्लॉरेन्स बंदराच्या आग्नेयीस २५७ मैल आहे. येथील लोकसंख्या सुमारें १४०००आहे;पैकीं८००यूरोपीयन व ३००० हिंदी आहेत. किकुयु टेंकडीच्या पायथ्याशीं असलेल्या ॲथी मैदानांत हें शहर असून समुद्रसपाटीपासून ५४५० फूट उंच आहे. किलिमांजारो आणि केनिया पर्वतांचे देखावे येथून फार चांगले दिसतात. उगांडा रेल्वेचें, लष्करी सैन्याचें व वसाहतसंघाचें हें मुख्य ठिकाण आहे. हिंदी, यूरोपीय, आणि एतद्देशीय असे तीन भाग या शहराचे केले आहेत. हिंदी आणि यूरोपीय या दोन भागांच्या दरम्यान एक मोठें नगरभवन आहे. हिंदु, मुसुलमान व ख्रिस्ती लोकांच्या देवळांशिवाय येथें शाळा आणि रुग्णालयें आहेत. शहरापासून १३ मैल दूर असलेल्या झऱ्याचें पाणी येथें आणलें आहे. पूर्वी येथें रेल्वे–अधिकारी व हिंदुस्थानांतील मजूर रहात असत. १९०२ सालापासून यूरोपीयन लोक येथें राहूं लागले. १९०७ सालीं नैरोबी हें राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण करण्यांत आलें ( केनिया पहा ).

**नैहाती**—बंगाल, चोवीस परगणे जिल्हा. जवलपूर पोटविभागांतील शहर. हें हुगळीच्या पूर्व किनाऱ्यावर वसलें आहे. लोकसंख्या (१९११) १८२१९. हें ईस्टर्न–बंगाल–रेल्वेवरील स्टेशन असून येथून एक फांटा ईस्ट–इंडियन रेल्वेला मिळतो. शहरांत एक एमिग्रेशन डेपो आणि ताग व तेल काढण्याच्या गिरण्या आहेत.

**नोंगख्लाव**—आसाम. खासी टेंकड्यांमधील एक लहान संस्थान. लोकसंख्या (१९११) १०७१६. १९०३–०४ सालीं संस्थानचें उत्पन्न २३५० रुपये होतें. येथून जवळच स.१८२९मध्यें लेफ्टनंट बेडिंगफील्ड व बर्लटनचा खून झाला. मुख्य पीक बटाटे, तांदूळ व मका आहे. येथें कुऱ्हाडी तयार करतात.

**नोंगस्टोइन**—आसाम. खासी टेंकड्यांमधील एक लहान संस्थान लोकसंख्या (१९११)९६६२. मुख्य पिकें लाख, मध, कापूस, तांदूळ, बाजरी हीं आहेत. मातीचीं भांडीं, सुती कापड, वगैरे तयार करतात. येथें चुनखडी व दगडी कोळसा सांपडतो, पण दगडी कोळसा अजून खाणींतून बाहेर काढण्यास सुरवात केली नाहीं.

**नोंगस्पंग**—आसाम. खासी टेंकड्यांमधील एक लहान संस्थान. लोकसंख्या २३६८. मुख्य पीक तांदूळ, बटाटे व मध असून लोखंडहि सांपडतें पण खाणी नाहींत.

**नोंग्लेवाई**—आसाम. खासी टेंकड्यांमधील एक लहान संस्थान. लोकसंख्या ( १९११ ) ४१६. मुख्य पीक तांदूळ व बटाटे हें आहे.

**नोबिली, रॉबर्ट डी**—हा एक जेसुईट मिशनरी दक्षिण हिंदुस्थानांत ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार करण्याकरितां १६०६ मध्यें आला. लोकांवर आपली छाप पाडण्याकरितां हा ब्राह्मणासारखा रहात असे व कावेनें रंगविलेलीं भगवीं वस्त्रें नेसत असे; वारंवार स्नान करी, शाकाहार करी व कपाळावर गंध लावी. ख्रिस्ती मिशनऱ्यांस प्रथम फक्त अगदीं खालच्या वर्गांतीलच लोक बाटविण्यास मिळत. परंतु वरीलप्रमाणें नोबिलीनें ढोंग सुरू केल्यावर कांहीं उच्च वर्णाचे लोक ख्रिस्ती होऊं लागले व त्यांची मर्जी सांभाळण्याकरितां पराया लोकांत ख्रिस्ती संप्रदाय पसरविण्याचें काम बंद करावें लागलें, व ख्रिस्ती लोकांतहि जातिभेद मान्य करण्यांत आला व याविरुद्ध पोपांनीं केलेली ऑरड व्यर्थ ठरली. परंतु यामुळें मिशनऱ्यांच्या एकंदर कार्यास मोठा धक्का बसला असें इतर जेसुइटांचें म्हणणें आहे.

**नोबिली, लिओपोल्डो** (१७८४–१८३५)—एक इटालियन शास्त्रज्ञ. यानें तरुणपणांत तोफखान्यांत काम केलें; परंतु पुढें हा फ्लॉरेन्स येथें प्रोफेसर झाला. लोहचुंबकसूचींत (चलचुंबकसूची) सुधारणा करून आसक्त–चुंबक–सूचि वापरून जास्त सूक्ष्मत्व आणण्याची युक्ति यानें शोधून काढली. विद्युच्छास्त्रांतहि यानें कांहीं शोध लावले आहेत. यानें बरेचसे लेख लिहिले आहेत.

**नोबेल, ऑल्फ्रेड वर्नहार्ड** (सन १८३३–९६)—हा स्वीडनमधील रसायनज्ञ व यंत्रकलाभिज्ञ स्टॉकहोम येथें जन्मला. याच्या बापाचा सेंटपीटर्सबर्ग ( पेट्रोग्राड— लेनिनग्राड ) येथें पाणतीर ( टॉर्पेडो ) तयार करण्याचा कारखाना होता. तेथें कांहीं दिवस राहून स्टॉकहोमला परत आल्यावर त्यानें स्फोटकद्रव्यें तयार करण्याचा अभ्यास चालविला.

लवकरच नायट्रोग्लिसरीनमध्यें, त्या पदार्थाशीं उदासीन रहाणारा द्रव मिसळून त्यानें डायनामाइट नांवाचें स्फोटक द्रव्य तयार केलें. गनकॉटन व नायट्रोग्लिसरीन यांचें मिश्रण करून त्याचे ब्लास्टिंग, जिलेटिन व बॅलिस्टाइट नांवाचे अतिस्फोटक पदार्थ त्यानें तयार केले. याच पदार्थांत कॉर्डाइट नांवाचा स्फोटक पदार्थ अंतर्भूत होतो. परंतु याच वेळीं ब्रिटिश सरकारनें दोघां इंग्रज गृहस्थांस कॉर्डाइटचें पेटंट दिल्यामुळें ब्रिटिश सरकाराविरुद्ध नोवेलनें कैक दिवस फिर्याद मांडली होती. परंतु कॉर्डाइट व ब्लास्टिंग, जिलेटिन आणि बॅलिस्टाईट यांत, गनकॉटन व नायट्रोग्लिसरीन यांचें प्रमाण निराळें असल्यामुळें शेवटीं फिर्यादीचा निकाल नोवेलविरुद्ध झाला. त्यानें शोधून काढलेलीं स्फोटक द्रव्यें तयार करून विकण्याचा त्यालाच हक्क असल्यामुळें थोड्याच दिवसांत त्यानें पुष्कळ पैसा मिळविला. आपल्या अपार संपत्तींतून त्यानें एक मोठा भाग दरवर्षी ५ बक्षिसें देण्याकरितां राखून ठेविला आहे. रसायनशास्त्रांत प्रावीण्य मिळविणारास एक, पदार्थ विज्ञानशास्त्रांत एक, वैद्यकशास्त्रांत एक, उत्तम व उपयुक्त लेख किंवा पुस्तक लिहिणारास एक व राष्ट्राराष्ट्रांतील तंटे मिटवून, त्यांत सलोखा राखून जगाची शांतता राखण्याचा जो कोणी उपक्रम करील त्यास एक अशीं हीं पांच पारितोषिकें आहेत. नोवेल हा सानरीमो येथें १८९६ सालीं मरण पावला. मरतांना त्याची संपत्ति सुमारें १७५०००० पौंड होती. पहिलें नोवेल पारितोपिक १९०१ सालीं नोवेलच्या पांचव्या वर्षाच्या पुण्यतिथीच्या दिवशीं ( ता. १० डिसेंबर ) देण्यांत आलें.

नोवेल फंड हा एका बोर्ड ऑफ डिरेक्टर्सच्या ताब्यांत आहे. स्वीडिश ॲकेडमी ऑफ सायन्स—( अ ) पदार्थविज्ञान, ( आ ) रसायन; स्टॉकहोम फॅकल्टी ऑफ मेडिसिन—( इ ) वैद्यक किंवा शारीरशास्त्र; स्वीडिश ॲकेडमी ऑफ लिटरेचर—( ई ) वाङ्मय; आणि नॉर्वेजियन स्टोर्दिंगनें निवडलेल्या पांच माणसांची कमिटी—( उ )शांतता; या संस्थांकडे पारितोपिकांकरितां माणसें निवडण्याचें काम असतें. या संस्थांनीं नेमिलेले पंधरा प्रतिनिधी वरील बोर्ड ऑफ डायरेक्टर्सची निवड करतात. या बोर्डाचा अध्यक्ष स्वीडिश सरकारनें नेमिलेला असतो. प्रत्येक पारितोपिक सुमारें ६५हजार पौंडांचें असतें. पदार्थविज्ञान–मार्कोनी ( १९०९ ), रसायन–मेरी क्युरी ( १९११), वाङ्मय--किप्लिंग(१९०७), रवींद्रनाथ टागोर ( १९१३ ), रोमेन रोलंड ( १९१५ ) व अनाटोल फ्रान्स ( १९२१ ), यीट्स ( १९२४ ) आणि शांतता--रूझवेल्ट ( १९०६ ), वूड्रो विल्सन (१९१९) यांचीं आजपर्यंत पारितोपिकें मिळविलेल्यांत नांवें आढळतात.

**नोवोसोफो**—खासी टेंकड्यांतील एक लहान संस्थान. लोकसंख्या १६५०. १९०३–०४ सालीं संस्थानचें एकंदर उत्पन्न ५०० रुपये होतें. मुख्य पिकें तांदूळ, मका व बटाटे आहेत.

**नोलकोल**--नवलकोल, आलकोल हीं सर्व 'नांवें' नोहलकोहल" या जर्मन नांवाचे अपभ्रंश आहेत. कोलरावि" हें याचें खरें इंग्रजी नांव आहे. नोलकोल ही कोबी, फुलवर वगैरे भाज्यांच्या वर्गांतील आहे व त्याच भाज्यांबरोबर तो इकडे आला आहे. याचें वी कोबीसारखेंच असतें. कोबी, फुलवरपेक्षां ही भाजी कमी नाजूक आहे. रंगावरून पांढरा व जांभळा अशा याच्या दोन जाती आहेत व दोहोंच्या हळवा व गरवा अशा दोन जाती आहेत. नोलकोलचें रोप कोबीप्रमाणेंच वाफ्यांत तयार करतात. कोबीच्या रोपाचीं पानें गोल असून किनार कात्रीदार नसते. नोलकोलच्या रोपाचीं पानें लांबट असून त्याची किनार कात्रीदार असते.

रोपास पांच पानें येण्यास ४आठवडे लागतात. कोबीपेक्षां हें रोप थोडें लवकर तयार होतें म्हणून कोबींत दंडानें हें रोप लावणें असल्यास १०–१२ दिवसांनीं कोबीच्या बियामागून पेरावें म्हणजे तें कोबीबरोबर लावण्याजोगें वाढतें. नोलकोलचें स्वतंत्र पीकहि लावितात. याची लागण कोबीप्रमाणेंच करावयाची. हलक्या नोलकोलची लागण जवळ जवळ करावी, कारण तीं झाडें फार माजत नाहींत. गरवा नोलकोल कोबीइतका १–१॥ हात लांबीच्या अंतरानें लावावा कारण तीं झाडें हात दीड हात पसरतात.

नोलकोल कोवळेपणींच रुचिदिष्ट लागतो. जून झाल्यावर त्यास उग्र वास येतो. थंडी असेपर्यंत याचा स्वाद रहातो. उन्हाळ्यांत यास अतिउग्र वास येतो व चिरतांना कधीं कधीं फार वाईट घाण येते. नोलकोलची किसून अगर तुकडे करून मोकळी भाजी करतात. याचे बटाट्याप्रमाणें तुकडे शिजवून पातळ भाजीहि करतात.

**नोविचझार** ( प्राचीन--रॅसिया )—सर्व्हिया. ही प्रथम यूरोपमधील तुर्कस्तानांतील एक संजाक कोसोव्हो विलायतमध्यें होती. पण स.१९१३च्या बुखारेस्टच्या तहानें कोसोव्होचा बराच भाग सर्व्हियाकडे आला त्यांत हा जिल्हा आला. याची लोकसंख्या सुमारें १५०००० आहे. हा प्रदेश डोंगराळ असून यांतून उत्तरेस बोस्नियांत लिमनदी वहात जाते. यांत तीनचतुर्थांश ख्रिस्ती–सर्व लोकांची वस्ती असून बाकीचे महंमदी, अल्बेनियन, जिप्सि, व तुर्क आहेत. हा संजाक लष्करी दृष्टया महत्त्वाचा आहे. हा बोस्निया व सालोनिका यांमधील मार्गावर आहे.

याची राजधानी नोविचझार हें सुमारें १२ हजार लोकवस्तीचें गांव असून प्राचीन सर्व्हियन शहर रॅसियाच्या ठिकाणीं वसलें आहे. याच्याजवळच रोमन स्नानगृहें असून सेंटपिटर व पॉल हीं आर्थेनामंदिरें आहेत.

**नोहर**—राजपुतान्यांतील बिकानेर संस्थानाच्या रेणीनिझामतमधील नोहर तहशिलीचें मुख्य ठिकाण. हिसारच्या पश्चिमेस ५८ मैल. लोकसंख्या सुमारें पांच हजार. येथें एक किल्ला आहे. पूर्वेस १६ मैलांवर गोगामो नांवाचें गांव आहे, तेथें गुरांचा मोठा बाजार भरतो. गोगा नांवाच्या चव्हाण

रजपुताच्या नांवावरून ह्यास गोगामेरी हें नांव पडलें आहे नोहर तहशिलींत १७० खेडीं असून बहुतेक सर्व जहागिरी आहेत. शेंकडा ३४ जाट लोकांची वस्ती आहे.

**नोहा**—बायबलमधील सृष्टयुत्पत्तिविषयक वर्णनांत नोहा हा आदामपासून दहावा पुरुष व लॅमेच याचा मुलगा असें सांगितलें आहे ( जेनेसीस, ५-११ ). नोहाला शेम, हेम व जाफेथ असे तीन मुलगे होते. नोहानें एक जहाज बांधून सार्वत्रिक जलप्रलयाच्या वेळीं स्वतःचा व कुटुंबाचा बचाव केला ( डेल्यूज, ' बायबल पहा ). नोहासंबंधींच्या ह्या कथेचें भारतीय वाङ्मयांतील मनु व जलप्रलय याविषयींच्या कथेशीं साम्य आहे(वेदविद्या पृ २४१). महापूर ओसरल्यावर देवानें नोहाजवळ करार करून त्याला प्राण्यांचें मांस खाण्याची परवानगी दिली; पण मांसाबरोबर रक्तप्राशन न करण्याची व मांसाकरितां मनुष्यवध न करण्याची अट घातली. द्राक्षांची लागवड व त्यापासून दारू करणारा आदाम हाच पहिला मानव होय. द्राक्षामदिरेच्या अतिरिक्त प्राशनाचे दुष्परिणाम अनुभविणारा पहिला मानव हाच. मदिरेच्या अतिसेवन-प्रसंगींहि नोहाच्या दोघां मुलांनीं पितृभक्ति कायम ठेवली पण तिसऱ्या मुलानें मात्र बापाच्या वर्तनाचा निषेध केला. पृथ्वीवरील मानवजातीचा पुढील विस्तार नोहाच्या पुत्रांच्या द्वारें झाला.

**नोळंबवाडी**—हा प्रांत प्राचीन असून समुद्रगुप्ताच्या वेळेपासून (सन ३४०) त्यास हें नांव आहे. त्या वेळीं याच्या मर्यादा, उत्तरेस कृष्णानदी, दक्षिणेस पेन्नार नदी, पूर्वेस बंगालचा उपसागर व पश्चिमेस बनवासी व गंगपाडी हे प्रांत, अशा होत्या. त्या काळीं हा प्रांत महावलीचे बाण, वैडुंब, चोल व पल्लव यांच्या ताब्यांत थोडथोडा होता. नंतर तो सर्व पल्लवांनीं जिंकून घेतला. पुढें (९९०) पहिल्या राजराज चोलानें तो काबीज केला. यानंतर चालुक्य व चोल यांच्या झगड्यांत कांहीं दिवस चोलांच्या तर कांहीं दिवस चालुक्यांच्या अंमलांत हा भाग असे. राजेंद्र चोलाच्या कारकीर्दींत पुन्हां चालुक्यांनीं हा प्रांत घेतला. त्यांच्या जवळून गंगराजा दुसरा मारसिंह यानें तो जिंकून घेतला (१०००) असतां पुढें सोमेश्वर चालुक्यानें परत मिळविला (१०६२). विक्रमादित्य चालुक्याच्या वेळीं या प्रांतावर विक्रमनोळंब नांवाचा सुभेदार होता (१०८०). त्याच्या मागून उच्छंगीदुर्गचा पांड्य सरदार हा सुभेदार झाला ( १०८८ ). यापुढें द्वारसमुद्राच्या होयसळ बल्लाळांनीं या प्रांतावर स्वाऱ्या करण्यास प्रारंभ केला. पहिला बल्लाळ यानें पांड्यापासून हा भाग जिंकून घेतला (११०४). मध्यंतरीं चोलांनीं तो काबीज केल्यामुळे प्रख्यात विष्णुवर्धन होयसळानें त्यांच्यापासून हिसकून घेऊन त्या विजयाप्रीत्यर्थ त्यानें आपल्यास नोळंबवाडी गोंड ही पदवी धारण केली व आपल्या नाण्यांवरहि ती कोरविली (१११६). पुन्हां (११६१) होयसळांनीं हा प्रांत पांड्यांपासून जिंकून घेतल्याचा उल्लेख आढळतो. त्यावरून मध्यंतरीं होयसळाकडून तो गेला असावा असें दिसतें.

मूळ ह्या प्रांतास एका नोळंब नांवाच्या राजानें आपलें नांव दिलें. पल्लवराजांची नोळंब ही एक शाखा होती. म्हैसूरकडील सांप्रतचे नोनाव हे प्राचीन नोळंबच असावेत. समुद्रगुप्ताच्या काळीं नोळंबवाडीचें नांव "३२ हजार नोळंबवाडी" असें होतें. याचा अर्थ ३२ हजार होनांच्या ( मोहरांचा ? ) उत्पन्नाचा नोळंबवाडी प्रांत असा आहे. कांहींच्या मतें म्हैसूर संस्थानांतलि सांप्रतचे नंदीदुर्ग, चितळदुर्ग व तुमकूर हे प्रांत म्हणजे प्राचीन नोळंबवाडी होय. [ एपिग्राफिआ कर्नाटिका. भा. ७; अय्यंगार-एन्शन्ट इंडिया. ]

**नौकानयन**—नौकानयनाचा महत्त्वाचा भाग जो आरमार त्याचें स्वतंत्र विवेचन त्या नांवाखालीं सांपडेल. या ठिकाणीं नौकानयनाचा इतिहास देण्याचें योजिलें आहे.

पौरस्त्य नौकानयन

भा र ती य.—भारतीय नौकानयनाचा थोडक्यांत इतिहास " आरमार " या लेखांत (वि. ८. पृ. २५३-५४) दिला आहे.

पाश्चात्त्य नौकानयन

प्रा रं भी चा इ ति हा स —व्यापारी जहाजांच्या दळणवळणाचा धंदा आज जो जगभर अवाढव्य वाढला आहे त्याला मूळ आरंभ अगदीं रानटी स्थितींतल्या मासेमाऱ्यांच्या लांकडाचा ओंडा व वल्हें अशा साधनांपासून झाला असला पाहिजे. पुढें असलाच ओंडा पोखरून त्याचें लहानसें होडगें व त्यालाच एक कातड्याचें लहानसें शीड करण्याची युक्ति निघाली. अशा होडग्यांतून भूमध्यसमुद्राकांठच्या गांवीं समुद्रावरून जा ये करणाऱ्यास व पुढें दूरवर पूर्वेकडील देशांतल्या बंदरांत जाण्यास सुरवात झाली. समुद्राकांठच्या रहिवाशांनीं स्वतःजवळचे मासे किंवा मीठ देऊन त्याऐवजीं स्वतःला लागणाऱ्या दगडी सुऱ्या, थंडींत पांघरण्याकरितां कातड्याचीं वस्त्रें वगैरे जिनसांची नेआण चालविली होती. समुद्रकांठीं वसाहत करून राहिलेल्या निरनिराळ्या ठिकाणच्या रहिवाश्यांमध्यें समुद्रकांठच्या वेड्यावांकड्या जमिनीवरून दळणवळण करण्यापेक्षा समुद्रांतून सरळ जहाजांतून जाणें सोईचें वाटूं लागलें; यामुळें असा जहाजांतून जा ये करणाऱ्या नाविक लोकांचा एक वर्ग तयार झाला. ते स्वतः जहाजें तयार करीत असत किंवा लोकांपासून विकत घेत; लोकसंख्या वाढून त्यांच्या गरजा जसजशा वाढत गेल्या त्याबरोबर या समुद्रावरील जहाजांतून व्यापार करणाऱ्या नावाड्यांची संख्याहि वाढली. अनुभवानुभवानें ते मोठमोठ्या बोटी बांधूं लागले आणि समुद्रावर दूरदूरच्या सफरी करणाऱ्या मंडळ्या बनवूं लागले, व पौरस्त्य देशांपैकीं हिंदुस्थानांत अशा प्रकारच्या नौकानयनाची किती प्रगति झाली होती,

याची माहिती पूर्वी दिली आहे. चिनी लोकहि प्राचीन कालापासून दर्यावरील व्यापारांत पडलेले आढळतात परंतु ते मलबार किनाऱ्यापर्यंतच येत. त्यापुढील दूरच्या पश्चिमेकडील देशाशीं त्यांचें दळणवळण नव्हतें. मलाया द्वीपकल्पांतील लोक अगदीं प्राचीन कालापासून हिंदुस्थानाशीं व्यापार करीत असत. इतकेंच नव्हे तर आफ्रिकेच्या किनाऱ्यापर्यंतहि ते जात असत. हिंदी महासागरांतून सफरी करणाऱ्या लोकांमध्यें अरब हे एकेकाळीं प्रमुख होते. यूरोपांतील देशांना नजीक असे प्राचीन काळचे अत्यंत सुप्रसिद्ध दर्यावर्दी लोक म्हटले म्हणजे फिनिशियन होत. हे बहुधा टायर व सीडॉन या दोन सुप्रसिद्ध शहरीं राहणारे धाडसी रहिवाशी होते. २७ वा टायर एझेकील याचें समुद्रावरचें असलेलें वर्चस्व फिनिशियन लोकांच्या दर्यावर्दीपणांतील प्राविण्याची उत्तम साक्ष देते. सालोमन राजानें जें मोठें देवालय बांधण्याचें काम हातीं घेतलें, तें फिनिशियन हिराम ह्याच्या साहाय्यामुळेंच होय. त्यानंतर बऱ्याच वर्षांनीं म्हणजे सुमारें २ हजार वर्षांपूर्वी व्यापारी दळणवळणाकरितां जहाजें सर्रास उपयोगांत येऊं लागलीं होतीं; व त्यांचा आकारहि अगदीं लहान नसे, हें पुढील गोष्टीवरून सिद्ध होतें—सेंटपॉलला रोमकडे नेणारे शंभर सैनिक मॉयरा येथें आले तेव्हां तेथें एक अलेक्झांड्रियन जहाज गहूं भरून इटलीला जावयास निघालें होतें. त्या जहाजांत गव्हासुद्धां हे सैनिक व इतर प्रवासी मिळून २७६ मनुष्यें बसून गेलीं. समुद्रमार्गानें व्यापारी दळणवळण इतकें वाढलें होतें तरी जमिनीवरून चालणाऱ्या व्यापाररूपी सांखळीचे हे केवळ कांहीं थोडेसे दुवे होते. पौरस्त्य आणि पाश्चात्य देश यांच्यामध्यें निरनिराळ्या प्राचीन काळांत निरनिराळ्या खुष्कीच्या मार्गानें हिंदुस्थानांत आणि यूरोपांत उत्पन्न होणाऱ्या मालाची जी एकंदर देवघेव चालू असे, त्यासंबंधींची माहिती पूर्णपणें भारतीय आणि यूरोपीय या दोघांनांहि नव्हती. शिवाय प्राचीन काळीं बहुधा दर्यावरील जाऱ्ये उन्हाळा संपतांच बंद पडत असे.

प्राचीन काळीं फिनिशियन लोकांनीं दर्यावरील व्यापार अधिकाधिक वाढवून अनेक बंदरांशीं संबंध जोडला, व तेथें वखारी घातल्या. केडिझ उर्फ प्राचीन गेडिर हे अशापैकींच एक बंदर असून तेथून फिनिशियन लोक पुढें ब्रिटनपर्यंत जात असत. फिनिशियन लोकांचें अनुकरण करून यूरोपखंडाच्या दक्षिणेकडील बरेच देश व्यापारांत पुढें सरसावले त्यांत ऱ्होडेशियन्स हे प्रमुख होते. त्यांनीं दर्यावरील व्यापारासंबंधाचें एक कायद्यांचें कोडहि तयार केलें होतें. हेच कायदे पुढें रोमन लोकांनीं आपल्या कायद्यांत अंतर्भूत केले व रोमन कायद्यांतून ते अलीकडील यूरोपीय कायद्यांत थोड्याफार प्रमाणांत समाविष्ट झाले आहेत. भूमध्यसमुद्र आणि ॲड्रियाटिक समुद्र यांमधून व्यापार करणाऱ्यांत व्हेनेशियन, जिनोई आणि पिसन हे लोक पुढें भरभराटीस आले. त्यांनीं जहाजें बांधण्याच्या धंद्यांत बराच नांवलौकिक मिळविला आणि त्यांचीं जहाजें उत्तरसमुद्राकडील ब्रिटन वगैरे देशांत खपत असत. इटलीच्या मार्गानें समुद्रांतून यरुशलेमला जाणाऱ्या अनेक ख्रिस्ती यात्रेकरूंमुळेंहि या नौकानयनाच्या धंद्याला पुष्कळ उत्तेजन मिळत असे.

प्राचीन काळीं उत्तर यूरोपकडील देशांचा परस्पर व्यापार बहुतेक खुष्कीच्याच मार्गानें चालत असे. परंतु ते लोक रानटी स्थितींतून निघून जसजसे सुधारत गेले तसतसे नद्या आणि समुद्र यांच्या मार्गानें व्यापार करण्याचे फायदे त्यांनां अधिकाधिक पटूं लागले आणि त्यांनीं निरनिराळे जलमार्ग सुधारून काढले. समुद्रावरून जाणाऱ्या परस्परांच्या व्यापारी जहाजांवर शत्रुराष्ट्रांतील लोक हल्ले करीत असल्यामुळें अशा व्यापारी जहाजांवरील लोकांनां संरक्षणाकरितां युद्धसामुग्री बाळगावी लागत असे. अशा प्रकारच्या दर्यावरील व्यापारांत स्पेन, पोर्तुगाल, इंग्लंड व नेदरलँड हे देश प्रमुख होते. या देशांनीं हिंदुस्थान आणि नवीन शोधून काढलेलें अमेरिकाखंड येथील अनेक बंदरांशीं व्यापार सुरू केला, व हे लोक वाटेंत जातां येतांना परस्परांचीं व्यापारी जहाजें हल्ला करून लुटीत असत, व एकमेकांचे लोक कैद करीत असत. अशा कैद्यांकडून पैसे घेऊन त्यांनां सोडून देणें हा त्यावेळीं एक धंदाच होऊन बसला होता.

इंग्रजांच्या व्यापाराची वाढ:—इंग्रजी जहाजें तांडे बनवून सफरी करीत असत. प्रत्येक तांड्यावर ॲडमिरल नांवाचा मुख्य अधिकारी असे. जहाजांत व्यापारी मालाबरोबर युद्धसामुग्रीहि असे. त्या वेळीं इंग्लंडांत लोंकर पुष्कळ तयार होत असे व तिला दूरदूरची मागणी येत असे. या लोंकरीच्या व्यापारानिमित्तानें इंग्रज व्यापाऱ्यांचा दूरदूरच्या बंदरांशीं संबंध जडला. उलट दूरदूरचे व्यापारीहि व्यापाराकरितां इंग्लंडच्या बंदरांत येऊं लागले. लिव्हरपूल, ब्रिस्टल साउथ-हॅम्प्टन व लंडन हीं त्यावेळीं प्रसिद्ध बंदरें होतीं. स्पॅनिश पोर्तुगीज लोकांनीं नवे देश व नवे जलमार्ग शोधून काढल्यावर इंग्रजांचेंहि तिकडे लक्ष गेलें, आणि इंग्लंडांतील ट्यूडर घराण्याच्या वेळीं धाडसी इंग्रज समुद्रावर दूरदूरच्या सफरी करूं लागले. इंग्लंडच्या आठव्या हेन्रीनें स्पेनच्या फर्डीनंड बादशहाबरोबर फ्रान्सविरुद्ध तह करून जिब्राल्टरपर्यंत जहाजांचें संरक्षण करण्याचें काम आपल्याकडे घेतलें, आणि भूमध्यसमुद्रांतील संरक्षणाचें काम स्पेनकडे दिलें. याप्रमाणें इंग्रजांचा दर्यावरील व्याप वाढत चालला, तथापि प्रत्यक्ष जहाजें बांधण्याचें काम इंग्लंडमध्यें होत नसल्यामुळें बाल्टिक समुद्रांतील प्रसिद्ध बंदरांतून इंग्रज व्यापारी जहाजें विकत आणीत असत. यामुळें इंग्रजांचा बहुतेक व्यापार हॅन्स शहरच्या ताब्यांत होता. परंतु एलिझाबेथच्या कारकीर्दीपासून ही स्थिति बदलून जहाजें बांधण्याच्या धंद्यास इंग्लंडनें स्वतः आरंभ केला. एलिझाबेथ राणीनें या धंद्यास उत्तेजन देण्याकरितां पुष्कळ द्रव्यसाहाय्य केलें,व हॅन्सियाटिक संघाला विरोध केला. दूरदूरच्या परकी देशांत व्यापार

करण्यास सुलभ जावें म्हणून धाडसी व्यापारी मोठमोठ्या कंपन्या बनवीत आणि स्वतः राजाजवळून व्यापारासंबंधीच्या हक्कसनदा मिळवीत. इंग्लंडमध्यें अशा कंपन्यांपैकीं रशियन व्यापारी कंपनी, टर्की व्यापारी कंपनी आणि ईस्ट इंडिया कंपनी ह्या होत्या.

१६ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास अँटवर्प शहर भरभराटीच्या शिखरास पोहोंचलें होतें. तेथील बंदरांत एकेका वेळीं २५०० पर्यंत जहाजें नांगरलेलीं असत.पण याच शतकाच्या अखेरीस स्पेननें हल्ला करून हें शहर उध्वस्त करून टाकलें तेव्हां तेथील बरेचसे रहिवाशी ॲमस्टरडॅम येथें रहावयास गेले. जहाजें बांधणें व दर्यावरील व्यापार, या कामांत हॉलंड देश पुढें सरसावला, पण दक्षिणेकडील दोन्ही भूशिर–मार्ग ( केप रूटस् ) शत्रुराष्ट्रांच्या कबजांत असल्यामुळें इंग्रज व हॉलंड या दोन्ही लोकांनीं हिंदुस्थानादि पौरस्त्य देशांस जाण्याचा जलमार्ग शोधून काढण्याचे फार धाडसाचे प्रयत्न केले. ध्रुवप्रदेशानजीकच्या नैसर्गिक अशक्यतेमुळें असले जलमार्ग सांपडले नाहींत, पण या प्रयत्नामुळें अनेक नवे प्रदेश व समुद्र यांची माहिती या लोकांनां झाली व तिकडे वसाहती करण्यास त्यांनीं सुरवात केली. या वसाहतींकडे लवकरच फ्रेंचांचें लक्ष गेलें. पोर्तुगीज लोक डच लोकांनां वारंवार अडथळे करीत, व स्पॅनिश लोकांचीं जहाजें इंग्रज खलाशी लुटून फार नुकसान करीत. तथापि या सर्व दर्यावर्दी राष्ट्रांमध्यें हॉलंड सर्वांत अधिक भरभराटींत होतें. ॲमस्टरडॅम येथें फार मोठा व्यापार चालत असे; १५७१ ते १६५० एवढ्या अवधींत या शहराचा विस्तार पूर्वीपेक्षां तिप्पट वाढला. पुष्कळ माल राहणारीं मोठालीं डच जहाजें थोड्या खलाशांनां नेतां येत असत, त्यामुळें त्यांचे भाड्याचे दर हलके असत, त्यामुळें इंग्रज व्यापारी सुद्धां डच जहाजांतून आपल्या मालाची ने–आण करीत. त्यामुळें इंग्लंडचीं स्वतःचीं जहाजें फारच कमी झालीं व इंग्रज खलाशी डच जहाजांवर नोकऱ्या करूं लागले. याप्रमाणें स.१६५०च्या सुमारास इंग्लंड नौकायनाच्या धंद्यांत फार खालावलें होतें.

नॅव्हिगेशन ॲक्ट (१६५१):—ही स्थिति सुधारण्याकरितां नॅव्हिगेशन ॲक्ट नांवाचा कायदा पास केला. या कायद्यानें असा निर्बंध घातला कीं, इंग्लंडचा किनारा व इंग्लंडच्या दूरदूरच्या वसाहती यामध्यें चालणारा सर्व व्यापार इंग्रजांच्या मालकीच्या इंग्लिश जहाजांतून व इंग्रज खलाशांनीं चालविला पाहिजे. याशिवाय दुसरेहि कांहीं निर्बंध या कायद्यानें घातले व ते हॉलंडचा व्यापार बसविण्याच्या हेतूनें घातले होते यांत शंका नाहीं. डच लोकांनीहि या गोष्टीस जोराचा विरोध केल्यामुळें उभयतांत प्रत्यक्ष युद्धें झालीं, पण त्यांत इंग्लंडच अखेर विजयी झालें. तथापि इंग्लंडला दुसरा प्रतिस्पर्धी फ्रान्स पुढें आला.रिचेल्यू व नंतर कोलबर या दोन फ्रेंच प्रधानांच्या उत्तेजनामुळें फ्रेंच लोक अटलांटिक समुद्र ओलांडून अमेरिकेंत व दूरच्या हिंदुस्थानांत व्यापाराकरितां जाऊन वसाहतीहि करूं लागले होते. स्पॅनिश राष्ट्राच्या वर्चस्वाला मात्र या सुमारास उतरती कळा लागली होती. नॅव्हिगेशन ॲक्टामुळें इंग्लंडच्या जहाजांचें टनेज १६६६ पेक्षां १६८८ सालीं दुप्पट, वाढलें. तथापि ही वाढ फ्रान्सला फायद्याची झाली; ती अशी कीं फ्रान्स व इंग्लंड यांच्यामधील पुढील युद्धांत फ्रान्सनें डच जहाजांच्या मदतीनें इंग्लंडचीं ३००० जहाजें कैद केलीं व उलट इंग्लंडनें फक्त ६७ फ्रेंच जहाजें पकडलीं. यावेळीं इनव्हर्नेस हें शहर जहाजें बांधण्याच्या धंद्यांत फार प्रसिद्धीस आलें होतें.

१७०१ सालीं इंग्लंडचीं ३२८१ जहाजें, २६१२२२ टन भरताडाचीं असून त्यांवर ५६६० तोफा होत्या. एकट्या लंडन शहराचीं ५६०, ब्रिस्टलचीं १६५ आणि लिव्हरपूलचीं फक्त १०२ जहाजें होतीं. यानंतर केवळ तीस वर्षांनीं लंडनच्या जहाजांची संख्या १४१७ वर गेली, त्यांचें भरताड १५ ते ७५० टनपर्यंत होतें, तथापि त्यांपैकीं निम्म्याहून अधिक २०० टनांहून कमी वहनशक्तीचीं होतीं. १७६५ च्या एका लेखांत असा उल्लेख आहे कीं डच, डॅनिश व स्वीडिश हीं जहाजें इंग्लिश जहाजांपेक्षां मोठीं असून त्यांनीं लिस्बनचा भूमध्यसमुद्रांतील सर्व व्यापार इंग्रजांच्या हातून आपल्या हातीं घेतला. स. १७१४ पासून समुद्रावरून पर्यटन करीत असतां रेखांश बरोबर समजण्याची युक्ति काढणारास बक्षिसें देण्याचें जाहीर करण्यांत येत होतें, त्यापैकीं २० हजार पौंडांचें एक बक्षीस जॉन हॅरिसन यानें क्रॉनॉमीटर यंत्र तयार करून मिळविलें. १८ व्या शतकाच्या उत्तरार्धांत इंग्लंडांत उत्तरेकडील मोठाल्या सरोवरांच्या कांठच्या प्रदेशांत जहाजें बांधण्याच्या धंद्याचा मूळ पाया घातला गेला. परंतु जहाजांनां लागणाऱ्या ओक नांवाच्या लांकडांचा पुरवठा भरपूर होईना. शिवाय ब्रिटिश जहाजांची संख्या वाढल्यामुळें इंग्रज खलाशीहि पुरेसे मिळेनात म्हणून नॅव्हिगेशन ॲक्ट दुरुस्त करून इंग्रज खलाशांच्या संख्येच्या तीनचतुर्थांशपर्यंत परकी खलाशी ब्रिटिश जहाजांवर नोकर ठेवण्यास परवानगी देण्यांत आली. निग्रोंनां गुलाम बनवून अमेरिकेंत नेण्याचा व्यापार सुरू झाल्यामुळें त्यांपैकीं बरेंच काम ब्रिटिश जहाजांनां मिळूं लागलें. पुढें युनायटेड स्टेट्सच्या बरोबरच्या युद्धांत ब्रिटिश व्यापारी जहाजांस अमेरिकन जहाजांनीं बराच त्रास दिला आणि युद्धसामुग्रीच्या वाहतुकींत पुष्कळ जहाजें गुंतल्यामुळें लंडन बंदरांत मालाची ने–आण करणारीं बरींच परकी जहाजें दिसूं लागलीं. याच सुमारास दूरदूरच्या वसाहतींबरोबरचा व्यापार हातीं रहावा म्हणून निरनिराळ्या राष्ट्रांच्या जहाजांची परस्परांत मोठी झटापट होत असे. अशा उद्देशानें युद्धसामुग्री जवळ बाळगून संचार करणारीं त्यावेळीं खाजगी व्यापाऱ्यांचीं पुष्काळ जहाजें असत. त्यांत फ्रेंचांचें ' बोर्डेले ' नांवाचें एक जहाज प्रसिद्ध असून त्यानें चार वर्षांत १६४ परकी जहाजें

हस्तगत केलें होतें. नेपोलियनबरोबरच्या युद्धाच्या वेळीं हें प्रमाण फारच वाढलें व सन १८१५ सालच्या सुमारास लिव्हरपूल, ग्लासगो इ. ठिकाणच्या व्यापाऱ्यांनीं ब्रिटिश आरमारखातें व सरकार यांच्याकडे व्यापारी जहाजांच्या संरक्षणाविषयीं अधिक तजवीज करण्यासंबंधानें जोराची मागणी सुरू केली. उलटपक्षीं चोरटा व्यापार फार चालू असल्यामुळें सरकारचें आर्थिक नुकसान होतें अशी सरकारतर्फे १७६० सालपासून पुष्कळ वर्षें मोठी तक्रार होती.

लांकडी जहाजांऐवजीं लोखंडी जहाजें होऊं लागल्यापासून जहाजांत माल पूर्वीपेक्षां दुप्पट जाऊं लागला. जहाजांची वहनशक्ति मोजण्याचा ट्रेडबोर्डानें नवा नियम ठरविला. एक टन म्हणजे १०० घनफूट इतकी कायमचें आच्छादन केलेली जहाजांतील जागा अशी व्याख्या केली. जहाजांत किती टन माल राहतो त्यावरून जहाजाचें टनेज ठरवीत नाहींत तथापि अजमासें हिशोब असा आहे कीं, १०० घनफूट म्हणजे एक टन या हिशोबानें जहाज जितक्या टनांचें असतें त्याच्या दुप्पट टन माल जहाजांत राहतो. असें टनेज ठरविण्याचें एक कारण जहाजावरील जकातीची आकारणी करण्याची सोय व दुसरें कारण विमा उतरलेल्या जहाजांची नुकसानभरपाई ठरविण्याचें साधन हीं आहेत. तथापि रजिस्टर्ड टनेजपेक्षां पुष्कळ अधिक माल नेतां यावा म्हणून विशेष प्रकारच्या आकाराचीं जहाजें बांधण्याच्या युक्त्या निघाल्या आहेत.

१९ वें शतकः—१८व्या शतकाच्या अखेरीस वाफेच्या यंत्राच्या साहाय्यानें बोटी व जहाजें चालविण्याची युक्ति निघाल्यापासून नौकानयनाच्या बाबतींत पूर्ण मन्वंतर घडून आलें. लहान नद्यासरोवरांपासून तों मोठाल्या महासागरांतून वाफेच्या बोटी वावरूं लागल्या. १८३३ सालीं ' रॉयल विल्यम ' नांवाचें एक कॅनेडियन जहाज क्विबेकहून लंडनाला १७ दिवसांत आलें. १८३८ सालीं 'दि ग्रेट वेस्टर्न', 'सिरियस' वगैरे आगबोटी पंधरा ते अठरा दिवसांत अटलांटिक महासागराची सफर करूं लागल्या. १८४० सालीं 'कुनार्ड स्टीमशिप कंपनी' स्थापन झाली. या कंपनीच्या आगबोटी २०६ फूट लांबीच्या व ११४५ टन भरताडाच्या होत्या. याप्रमाणें लवकरच अटलांटिक महासागरावरील बराचसा व्यापार अमेरिकेनें आपल्या हातांत घेऊन नंतर चीनबरोबरचा व्यापारहि आपल्या ताब्यांत घेण्याचा यत्न सुरु केला. त्याकरितां अभूतपूर्व वेगानें चालणाऱ्या आगबोटी अमेरिकेनें बांधल्या. तथापि आगबोटींत जळणाचा खर्च फार लागत असल्यामुळें शिडांच्या साहाय्यानें वाऱ्याबरोबर झपाट्यानें चालणारीं साधीं जहाजें या वेळीं पॅसिफिक महासागरांत पुष्कळ होतीं. आणि लांकडाऐवजीं लोखंडाचीं जहाजें बांधण्यांत अमेरिका मागें पडून इंग्लंड पुढें गेल्यामुळें पृथ्वीच्या पाठीवरील बराचसा व्यापार ब्रिटिश जहाजांच्याच हातीं राहिला.

वाफेच्या जहाजांची रहदारी फार वाढल्यावर दूरदूरच्या सफरी करणाऱ्या बोटींच्या सोयीकरितां कोळसा पुरविणारीं बंदरें जागजागीं बांधण्यांत आलीं. १८५० सालच्या सुमारास नॅव्हिगेशन ॲक्ट ब्रिटिश जहाजवाल्या मालकांच्या विरोधाकडे लक्ष न देतां रद्द करण्यांत येऊन १८५४ सालीं ब्रिटिश बंदरांत सर्व परकी जहाजांनां येण्याची परवानगी मिळाली. १८५६ सालीं पॅरिसचा तह होऊन खाजगी जहाजांवर लढाऊ सामुग्री ठेवून युद्धकालांत लुटालूट करण्याची त्यांनां असलेली परवानगी काढून घेण्यांत आली, व लवकरच फ्रान्स–इंग्लंडमधील या तहावर इतर राष्ट्रांनीं सह्या केल्या.

१८५८ सालीं ब्रुनेलच्या फारच मोठी ' दि ग्रेट ईस्टर्न ' नांवाची आगबोट तयार झाली. हिची लांबी ६७९ फूट व वहनशक्ति १३,३४४ टन होती. या नमुन्याचीं मोठमोठीं व्यापारी जहाजें पुष्कळ तयार होऊं लागलीं. १८७३ सालीं डर्बीतर्फेचा पार्लमेंटचा सभासद सॅम्युअल प्लिमसोल याच्या मागणीवरून, जहाजांच्या नालायक स्थितीमुळें अनेक माणसें मृत्युमुखीं पडतात या तक्रारीसंबंधाची चौकशी करण्याकरितां एक सरकारी कमिशन नेमण्यांत आलें. १८७६ सालीं प्लिमसोलनें सुचविलेली दुरुस्ती मर्चंट शिपिंग ॲक्टमध्यें करण्यांत आली, यांत नालायक जहाजें सफरीवर पाठविणें फौजदारी गुन्हा ठरवून शिवाय जहाजांत ओझें किती भरावें याबद्दल प्रत्येक जहाजावर प्लिमसोल मार्क या नांवाची रेषा सरकारतर्फे मारण्यांत येऊं लागली.

१८६९ सालीं सुवेझ कालव्याचा मार्ग सुरू होऊन पौरस्त्य देशांबरोबर व्यापारी दळणवळणांत क्रांति घडून आली. या सुमारास मोठमोठ्या किंमतीचा माल बोटींतून जाऊं लागून बोटीला आग लागल्यास विमा कंपन्यांनां फार नुकसान येऊं लागलें. त्यामुळें तावडतोब आग विझविण्याकरितां बोटींवर अग्निनाशक वायु भरून ठेवण्याच्या युक्त्या निघाल्या. गोठविलेलें मांस व नासणारा कुजणारा माल चांगल्या स्थितींत नेण्याकरितां बर्फाच्या खोल्या व उष्णतारोधक जागा वगैरे सोयी बोटींवर करण्यांत येऊं लागल्या.

जर्मनी व जपानी व्यापारी जहाजांची वाढः—फ्रॅंकोप्रशियन युद्धांत विजयी झाल्यापासून जर्मनींत उद्योगधंदे फार वाढून जगबरोबरचा व्यापार आपल्या हातीं घेण्याची महत्त्वाकांक्षा जर्मन लोकांनीं धरली. निरनिराळ्या देशांतला माल स्वतः परस्पर आणवून त्याचा पक्का बनवून ते जिन्नस इतर देशांत पाठविण्याचा मोठा उद्योग जर्मनीनें सुरू केला. या व्यापारी नेआणीकरितां स्वतःच्या मोठमोठ्या बोटी बांधण्याचे कारखाने काढले. पक्क्या मालाच्या किंमती परदेशांत कमी ठेवून व मालाच्या वाहतुकीचे दर हलके ठेवून ब्रिटिश जहाजांबरोबर व ब्रिटिश मालाबरोबर मोठी स्पर्धा सुरू केली. या कामीं सरकारी आगगाड्यांचें मालावरील भाडें कमी करून तसेंच जहाजें बांधणाऱ्या व माल तयार करणाऱ्या कारखान्यांनां द्रव्यसाहाय्य देऊन जर्मन

सरकारनें लोकांस या चढाओढींत फार मदत केली. तसेंच या सुमारास पूर्वेकडील जपान हें राष्ट्रहि व्यापारांत पुढें आलें. जपानी लोकांनीं बोटी बांधण्याचे मोठमोठे कारखाने काढले व जपानसरकारनें स्वतःचें आरमार पुष्कळ वाढविलें.

यापुढें फ्रान्सनें दर्यावरील व्यापार वाढविण्याच्या बुद्धीनें व्यापारी जहाजांनां दूरदूरच्या प्रवासाच्या मानानें आर्थिक देणग्या देण्याचें ठरविलें. यामुळें फ्रेंच जहाजें वहातुकीचे दर कमी करून दूरदूरच्या सफरी करूं लागलीं. पण यामुळें परदेशी व्यापाऱ्यांचें नुकसान होऊं लागल्यामुळें १९०३ सालीं पॅरिस येथें आंतरराष्ट्रीय जहाजवाल्या मालकांची सभा स्थापन होऊन तिनें पूर्वीचे वाहतुकीचे दर कायम ठेवण्याचा ठराव केला व फ्रेंच जहाजवाल्या मालकांनीं त्याला मान्यता दिली, पण देशान्तर्गत जलमार्गावर वहातुकीच्या दरांत सवलती ठेवण्याचें त्यांनीं ठरविलें

आगबोटीमधील चढाओढः—शिडांचीं जहाजें पूर्णपणें मागें पडून वाफेच्या जहाजांची रहदारी सर्वत्र सुरू झाल्यावर आगबोटींचे दोन प्रकार झाले. पहिला प्रकार ' लायनर्सचा ' म्हणजे टपाल व पाहिल्या वर्गाचे उतारू, व सामान्य तिसऱ्या वर्गाचे उतारू, तसेंच व्यापारी माल यांची ने-आण ठराविक ठिकाणांमध्यें नियमितपणानें करणाऱ्या बोटींचा; आणि दुसरा प्रकार म्हणजे पुष्कळ भाडें मिळेल तिकडे कोळसा, लांकूड, गहूं, नायट्रेट, ज्यूट वगैरे वाटेल त्या जिन्नसांची नेआण करणाऱ्या ' सीकर्स ' किंवा 'ट्रँप' बोटींचा. या दुसऱ्या प्रकारच्या बोटी फार मोठाल्या असून त्यांची पहिल्या प्रकारच्या बोटींशीं नेहमीं चढाओढ चालू असे. वेळेस या ' सीकर ' बोटी भाड्याचे दर कमीहि करीत असत, व ' लायनर्स ' बोटीवाल्या कंपन्यांनां नुकसान सोसावें लागे. याकरितां सदरहू 'लायनर्स' कंपन्यांनीं व्यापाऱ्यांचा मालहि सवलतीनें व नियमितपणें नेण्याचें कबूल केलें व उलट व्यापाऱ्यांनीं या कंपन्यांच्या बोटींतूनच फक्त माल पाठविण्याबद्दल बांधून घेतलें. असे करार व कट होऊं लागल्यामुळें कित्येक 'सीकर' बोटींनां काम मिळेनासें होऊन तक्रारी उत्पन्न झाल्या; व त्यासंबधानें चौकशी करण्याकरितां १९०६ सालीं कमिशनहि बसलें होतें.

मोठाल्या बोटी व बंदरेः—दुसरी गोष्ट अशी कीं, अलीकडे सर्व खंडांत लोकसंख्या जिकडे तिकडे पुष्कळ वाढून जलस्थलवाहनांचाहि प्रसार पुष्कळ झाल्यापासून मालाची उत्पत्ति व खप पुष्कळ वाढून जगावरील मोठमोठ्या बाजारपेठांत विलक्षण चढाओढ सुरू झाली आहे. जपान, जर्मनी व अमेरिका या देशांच्या मालाची हरएक देशांतील बाजारपेठा काबीज करण्याकरितां परस्परांत झटापट चालू आहे. अशा स्थितींत वहातुकीच्या कमजास्त खर्चामुळें मालाच्या किंमतींत आणा-पावआणा फेर पडला तरी तेवढ्यानें स्वस्त मालाकडे गिऱ्हाईक वळून महाग माल पडून फुकट जाण्याची वेळ येते. यामुळें दोन महत्त्वाचे परिणाम घडून आले. पहिला परिणाम अर्थशास्त्रांतील उत्पत्तितत्त्वासंबंधानें असा झाला कीं, लहान प्रमाणावर उद्योगधंदे चालवून थोडक्या भांडवलावर पुष्कळ नफा मारण्याची जुनी पद्धति मागें पडून मोठ्या प्रमाणावर थोडे टक्के नफा घेऊन चालणारे मोठमोठे कारखाने सुरू झाले. शिवाय माल स्वस्त विकतां यावा म्हणून वाहतुकीचा खर्च कमींत कमी पाडण्याकरितां नव्या नव्या कल्पना काढण्यांत आल्या. त्यांपैकीं एक कल्पना, थेटच्या भरवणचिठ्यांची ( 'थ्रू' बिल्स ऑफ लोडिंग ) होय; म्हणजे एकच बोट-कंपनी किंवा रेल्वेकंपनी उत्पत्तिस्थानापासून थेट दूर देशच्या बाजारपेठेंत माल नेऊन पोंचविण्याचें पत्करूं लागली. मध्यंतरीच्या अनेक कंपन्यांच्या बोटींतून किंवा आगगाड्यांतून माल नेण्याची व्यवस्था मूळ करारबद्ध कंपनीच करते; यामुळें एकंदरीनें कमी भाडेखर्चांत माल जाऊं शकतो. दुसरी गोष्ट म्हणजे एका खेपेंत पुष्कळ माल नेतां यावा म्हणून बोटी मोठमोठ्या बांधणें ही होय. दोन लहान बोटींतल्या इतका माल एका मोठ्या बोटींत जाऊं लागल्यास खलाशी व इतर अधिकारी थोडे पुरून कोळसा व इतर सामुग्रीहि कमी पुरते व त्यामुळें भाडें कमी होऊन मालाची किंमत कमी करतां येते. शिवाय दोन लहान बोटींपेक्षां दुप्पट माल नेणारी एक मोठी बोट बांधण्यास खर्च कमी लागतो. उदाहरणार्थ, दोहोंमिळून २००० टन माल नेण्याऱ्या दोन बोटी बांधण्यास जर ४०,००० पौंड लागतात तर तितकाच माल नेणारी एक बोट बांधण्यास ३५००० पौंड खर्च पुरतो. यामुळें उत्तरोत्तर मोठमोठ्या बोटी बांधण्याचा तडाका चालू आहे, व मोठाल्या बोटी जाव्या म्हणून सुवेझसारखे लहान उथळ कालवे रुंद व अधिकाधिक खोल करण्याकरिता अवाढव्य खननयंत्रें ( मॅमॉथ ड्रेजर्स ) तयार होत आहेत. मोठाल्या बोटी निघाल्यापासून तिसरा महत्त्वाचा प्रश्न म्हटला म्हणजे माल लवकर उतरविण्याचढविण्याच्या सोयीसंबंधीचा होय. कारण मोठाल्या बोटी बंदरांत फार वेळ कुचंबून राहिल्यास त्याचा रोजखर्च अंगावर पडतो. हल्लीं एकेक बोट १०००० टन माल नेऊं शकते, तेवढा माल बंदरांत नेण्याआणण्याकरितां जुन्या पद्धतीचे मालगाडीचे, प्रत्येकी ८ टन माल नेणारे डबे वापरल्यास ३० डब्यांची एक मालगाडी या हिशोबानें ४०।४५ मालगाड्या किंवा १०००।१२०० डबे लागतील. याकरितां आगगाड्यांचे मालडबेहि मोठमोठे करण्याचें काम चालू आहे. शिवाय बंदरें व गोद्या मोठमोठ्या बांधून रेल्वेचा फांटा थेट धक्यापर्यंत नेणें जरूर असतें, आणि या दृष्टीनें विचार करतां ज्या बंदरांत अशा सोयी नाहींत तीं बंदरें जरा जवळ असलीं तरी तीं मागें पडून जेथें मालाची चढउतार झटपट करण्याच्या सर्व सोयी आहेत अशा बंदरांची उत्तरोत्तर भरभराट होत आहे यांत आश्चर्य नाहीं.

मजबूत व सुखसोयींच्या बोटीः—दूरदूर देशांत वसाहती झाल्यापासून प्रवाशांची रहदारी फार वाढली असून सणासुटीच्या निमित्तानें केवळ मौजेकरतां प्रवास करणारे लोकहि पुष्कळ असतात. त्यामुळें अशा हौशी प्रवाशांची नेआण करणाऱ्या अशाच कामाकरितां स्वतंत्र बोटी असतात. अशा बोटींतून जेवण्याखाण्यापासून हिंडण्याखेळण्यापर्यंत सर्व प्रकारच्या सुखसोयी अगदीं श्रीमंताच्या घरच्याप्रमाणें केलेल्य असतात. बोटींमध्यें सुधारणा होण्याचें दुसरें कारण विमाकंपन्या होय. बोटी भक्कम नसल्यास विम्याचे दर जबर पडतात. त्यामुळें व्यापारी आपला माल चांगल्या भक्कम बोटींतूनच पाठवितात जहाजांची तपासणी करून त्यांची वर्गवारीनें नोंदणी करणारी एक 'लॉईडस रजिस्टर' नांवाची सोसायटी आहे. या सोसायटीनें जहाजांच्या बांधणीसंबंधानें नियम केलेले आहेत, व त्यांत नेहमीं शिल्पशास्त्रप्रगत्यनुरूप सुधारणा होत असते. त्यामुळें बोटींहि सुधारलेल्या नमुन्याप्रमाणें बांधणें मालकास भाग पडतें याप्रमाणें नौकाशिल्पांत सुधारणा करण्याच्या कामीं लॉईडस रजिस्टरनें फार महत्त्वाची कामगिरी चालविलेली आहे.

येणेंप्रमाणें विम्याचे दर व भाड्याच्या दरांतील चढाओढ या दोन कारणांनीं बोटी बांधण्याच्या कामांत फार सुधारणा घडवून आणली आहे. शिवाय श्रीमंत प्रवाशांच्या हौशी हेंहि आणखी एक महत्त्वाचें कारण होय. निरनिराळ्या राष्ट्रांच्या बोटी वहनशक्तीसह दर्शविणारें कोष्टक येथें देतों.

| देशाचें नांव | १९०८ साल | | १९२२ साल | |
|---|---|---|---|---|
| | जहाजें | टनेज | जहाजें | टनेज |
| युनायटेड किंगडम | ९५४२ | १७३१८३५१ | ८८४९ | १९२९५६३७ |
| युनायटेड किंगडम, वसाहती | ११५६३ | १८७०९५३७ | ११३२१ | २२०४२५२० |
| युनायटेड स्टेटस् | ३४८० | ४८१०२६८ | ५४८१ | १४०६२४६० |
| जर्मनी | २१७८ | ४२३२१४५ | १७२३ | १८८७४०८ |
| नार्वे | २१४८ | १९८२६७८ | १८५२ | २६००८६१ |
| फ्रान्स | १५१७ | १८८३८९५ | २०९४ | ३८४५७९२ |
| इटली | १०९८ | १२८५२२५ | १४१२ | २८६६३३५ |
| जपान | ८६५ | ११४०१७७ | २०२६ | ३५८६९१८ |
| रशिया | १३८१ | ९७४५१७ | ... | ... |
| स्वीडन | १५४२ | ९०४१५५ | १३४५ | १११५३७५ |
| स्पेन | ५५१ | ७०१२७८ | ९७३ | १२८२७५७ |
| हॉलंड | ५६५ | ८७६६२० | ११६४ | २६३२७१२ |
| डेन्मार्क | ८७० | ७३३७९० | ८२२ | १०३८१३८ |

'आगबोट व आरमार पहा'.

**नौखाली,** जिल्हा.—बंगाल. चित्तगांव विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १६४४ चौरस मैल. उत्तरेस टिप्पेरा जिल्हा व हिलटिप्पेरा संस्थान; पूर्वेस चित्तगांव जिल्हा व सन्द्वीप खाडी; दक्षिणेस बंगालचा उपसागर; पश्चिमेस मेघना नदीचा मुखप्रदेश. ह्या जिल्ह्यांत मेघना नदीच्या मुखांतील बेटांचाहि समावेश होतो. पैकीं सन्द्वीप व हातिआ हीं दोन मोठीं होत. जिल्ह्याच्या वायव्येकडील भागांत सुपारीच्या झाडांचीं वनेंच्या वनें आहेत. समुद्रकिनाऱ्यावर नारळीचीं झाडें आहेत. तीन बेटांत राखलेलें लष्करनें जंगल आहे. यांत वाघ, चित्ते व भुंकणारीं हरणें सांपडतात. त्याचप्रमाणें मगर व अजगर हे प्राणी पुष्कळ आहेत. पाऊसमान ११५ इंच. मेघनेचे पूर नुकसानकारक असतात.

१८७६ सालीं मोठ्या चक्रवातामुळें हातिआ व सन्द्वीप बेटांतील अर्धी अधिक लोकसंख्या मृत्युमुखीं पडली. तदनंतर लवकरच महामारीच्या सांथीनें येथें मोठा कहर उडविला.

इतिहासः—१२७९त जेव्हां महमद तघ्रीलनें बंगाल देशाच्या आग्नेय भागावर स्वारी केली त्यावेळीं मुसुलमानांनीं हा देश व्यापला अशी कल्पना आहे. १३५३ सालीं बंगालचा सुभेदार शमसुद्दीन यानें हा प्रदेश काबीज केला. १७ व्या शतकांत पोर्तुगीज लोकांनीं सन्द्वीप बेटांत ठाणें दिलें. सन १६०९ सालीं कांहीं चांचे लोकांनीं सन्द्वीप बेट आपल्या ताब्यांत घेतलें व गोन्झालीसच्या नायकत्वाखालीं सर्व किनारा हादरून सोडिला. १६१० सालीं आराकानच्या राजानें पोर्तुगीजांच्या मदतीनें बंगाल घेण्याचा प्रयत्न केला पण मोंगल सैन्यानें तो सफल होऊं दिला नाहीं. पुढें गोन्झालीसनें गोव्याच्या गव्हर्नराच्या मदतीनें अकियावर हल्ला केला पण तो निष्फळ झाला व १६१६ सालीं राजानें गोन्झालीसचा पराभव केला व सन्द्वीप बेट घेतलें. १६६४सालीं बंगालचा अधिकारी शाएस्तेखान यानें पोर्तुगीज लोकांस धाक देऊन आपल्या बाजूस मिळविलें. १७६५ सालीं हा जिल्हा कंपनीसरकारच्या हातीं आला. १७७२ सालीं येथें एक कलेक्टर नेमण्यांत आला. पुढें १७८१ सालीं टिप्पेरा व नौखाली मिळून एक जिल्हा करण्यांत आला. त्यास 'भुलुवा' म्हणत असत. १७८७ सालीं हा जिल्हा मैमनसिंगच्या कलेक्टरशिपखालीं घेण्यांत आला पण १७९० सालीं पुन्हां वेगळा करून टिप्पेराकडे परत देण्यांत आला. सन १८२२ त नौखाली हा टिप्पेरापासून वेगळा करून एक स्वतंत्र जिल्हा करण्यांत आला. १८६० सालीं ह्याच्याकरितां एका वेगळ्या कलेक्टराची नेमणूक झाली.

जिल्ह्याची लो. सं. १९२१सालीं १४७२७८६ होती. एकंदर जिल्ह्याची जमीन सुपीक असून हवामान आरोग्यकारक आहे. तागाच्या लागवडीच्या वाढीमुळें जिल्ह्याच्या वायव्यभागांतील लोकसंख्या बरीच वाढली आहे. सुधाराम हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून मोठें गांव आहे. भाषा 'चातगेया' असून शेंकडा ७६ लोक हिंदु आहेत. बहुतेक सर्व मुसुलमान शेख जातीचे आहेत. जुगी जातीचे लोक विणण्याचा धंदा करतात. कैवर्त, चान्डाल, कायस्थ, मधिया वगैरे इतर जातींचे धंदेवाईक लोक आहेत.

मुख्य पीक तांदुळाचें असून कडधान्य वगैरे इतर पीकहि होतें. मेघनेच्या मुखांतील बेटांत असलेल्या जमिनीचा दिवसेंदिवस शेतकीकडे जास्त उपयोग होत आहे. थोडया प्रमाणावर सुती कापड विणलें जातें निर्गत माल तांदुळ,सुपारी,अंडीं, चामडें वगैरे असून आयात माल परदेशी कापड, मीठ, राकेल तंबाखू, साखर, गुळ, सूत, पितळेचीं व कांश्याचीं भांडीं, वगैरे आहे. पूर्व बंगालांत सर्वांत अधिक तांदूळ ह्या जिल्ह्यांत पिकतो. येथून तांदूळ कलकत्ता किंवा चितागांगकडे जातो. भवानीगंज व सुधाराम येथून बारीसालला जाण्याकरितां बोटींची व्यवस्था आहे. सुधाराम व फेनी असे जिल्ह्याचे विभाग केले आहेत. ह्या जिल्ह्यांत हिलटिप्पेराच्या राज्याच्या ताब्यांत असलेली चाकला–रोशनाबाद इस्टेट आहे. शिक्षणाच्या दृष्टीनें हा जिल्हा मागासलेला आहे.

पोट विभाग.—नौखली जिल्ह्याचा एक प्रमुख पोटविभाग. क्षेत्रफळ १३०१ चौरस मैल असून ह्यांत मेघनेच्या मुखांतील बेटांचा समावेश होतो. सन्द्वीप व हातिया बेटेंहि यांतच येतात. लोकसंख्या (१९११) ९६९५२७. सुधाराम हा एक मोठा गांव असून २०५६ खेडीं आहेत.

**नौगांव,** जिल्हा.—आसामांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ३८४३ चौ. मै. उत्तरेस ब्रह्मपुत्रा; पूर्वेस सिबसागर; दक्षिणेस नौगांव उत्तर काचार टेंकड्या; पश्चिमेस जैन्टिया टेंकड्या व कामरूप व इशान्येकडील भागांत मिकीर टेंकड्या आहेत. नौगांवचा इतर प्रदेश सपाट आहे. दक्षिण व पश्चिम भागांत लहान लहान 'कामाख्य टेंकड्या आहेत. टेंकड्यांवरून दाट जंगल आहे. मुख्य नदी ब्रह्मपुत्रा असून तिच्या दक्षिण प्रदेशांत बरेंच गवत उगवलेलें असतें. कापिली खोऱ्यांत जंगल बरेंच आहे. सर्व आसाम-खोऱ्यांत नौगांव हा जिल्हा फार जंगलमय आहे.

सपाटीच्या प्रदेशाची जमीन काळी माती व रेती मिश्रित आहे. पहाडांवर हिरवेंगार जंगल असतें. ठिकठिकाणीं सालवृक्ष आहेत. हत्ती, गेंडे, वाघ, चित्ते, अस्वल, व तऱ्हतऱ्हेचीं हरणें आढळतात. रानटी हत्तींमुळें पिकास फार नुकसान पोचतें. हवामान आसाम-खोऱ्यांतील इतर जिल्ह्यांप्रमाणेंच आहे. नोव्हेंबर ते मार्च हवा थंड व आल्हाददायक असते. इतर दिवसांत मात्र उष्ण असते. पारा ९० अंशावर कधींहि नसतो. पहाडाच्या पायथ्याच्या प्रदेशाची हवा रोगकारक असते. जिल्ह्यांत पाऊसपाणी ७० ते ८० इंच असून कापिली खोऱ्यांत पाऊस फक्त ४० इंच पडतो.

*इतिहासः—नौगांव जिल्ह्याचा स्वतंत्र असा इतिहास* नाहींच. आसाम–खोऱ्याला जो इतिहास तोच ह्याचा. १३ व्या शतकांत कामरूपचा हिंदु राजा ' जंगल ' ह्याची ' रहा ' नजीक राजधानी होती. ह्या राजाचा जेव्हां काचारी राजानें पराजय केला व ह्यास मारिलें तेव्हां त्यास अनुलक्षून रहा, जागी व कजलिमुख हीं गांवें वसविलीं गेलीं. एके वेळीं ह्या जिल्ह्याचा बराच भाग काचारी लोकांच्या ताब्यांत होता पण स. १५३६ मध्यें त्यांचा अहोम राजांनीं पराजय केला व त्यांचें राजधानीचें शहर दिमापूर लुटलें. ह्यानंतर कलंग ही नदी या राज्याची उत्तरेकडील सीमा होती. अहोम राज्याचा नाश झाल्यानंतर ब्रह्मी लोकांनीं ह्या जिल्ह्यांत येऊन फार जाळपोळ केली व येथील लोकांस त्रास दिला. ब्रिटिशांनीं ह्या प्रदेशाचा ताबा स. १८२६ मध्यें घेतला त्यावेळीं हा जिल्हा कामरूपचा एक भाग समजत असत. त्यावेळीं धनसिरी ही पूर्वेकडील सीमा होती व ह्यांत मिकीर टेंकड्या, उत्तर काचारचा कांहीं भाग, व नागा टेंकड्या ह्यांचा समावेश होत असे. परंतु नागा टेंकड्या व मिकिर टेंकड्यांचा स. १८६६ मध्यें एक नवीन जिल्हा तयार करण्यांत आला. मिकीर टेंकडयांचा कांहीं भाग मात्र नौगांव जिल्ह्यांत घेण्यांत आला. अफूची लागवड बंद केल्यामुळें येथील लोकांनीं असिस्टंट कमिशनराचा खून केला होता.

सिलहटजवळ कामाख्य येथें एक हिंदु देवालय आहे. तें १८ व्या शतकाच्या मध्यांत बांधलें गेलें असावें. बहुतेक काचारी राजांच्या वेळीं बांधलेल्या कांहीं देवालयांचे व किल्ल्यांचे मोडके अवशेष कोपिली खोऱ्यांत आहेत. यांत नौगांव हें एक गांव असून १४९४ खेडीं आहेत. लोकसंख्या (१९२१) ३९७९२१. ह्या जिल्ह्यांत 'काळा आजार' म्हणून एक रोगाची सांथ येत असते. शेंकडा ६४ लोक हिंदु असून. शेंकडा ६६ लोक आसामी बोलतात. शिवाय मिकीर व इतर भाषाहि प्रचारांत आहेत. मिकीर, ललुन्ग व काचारी हे मूळचे रहिवाशी आहेत. बहुतेक लोक शेतकीचा धंदा करतात. सपाट प्रदेशांस पुरांमुळें फार त्रास होतो. तांदुळाचें पीक मुख्य असून त्याचे साळी,आहु,बाओ असे तीन प्रकार आहेत. चहा, ऊंस, नीळ, कापूस, हीं इतर पिकें आहेत. कापसाची लागवड बहुतेक मिकीर लोक पहाडांतून करतात. चहाची लागवड येथें पहिल्यानें स. १८५४ मध्यें करण्यांत आली. नौगांव जिल्ह्यात एकंदर दहा संरक्षित जंगलें आहेत. यांत साल आणि इमारतींचें लांकूड पुष्कळ आहे. रबर थोडया प्रमाणावर तयार होतो. मिकिर टेंकडयांत लोखंड सांपडतें. देवपाणी, हरियानजान व यमुना यांच्या पात्रांत चुनखडी सांपडते. लंगेली टेंकडयांत कोळसा सांपडतो. रेशमी व सुती कापड विणणें, तांब्याचीं, काश्यांचीं व लोखंडी भांडीं तयार करणें हे येथील लोकांचे धंदे होत. येथून लाख बाहेर पाठविली जाते. व्यापार बहुतेक मारवाडयांच्या हातीं आहे. चहा, मोहरी, कच्चा कापूस, लाख, बांबूच्या चटया, चामडें हा निर्गत माल असून आयात माल तांदूळ, चणे व इतर धान्यें,साखर,मीठ,मातीचें तेल,अफू,तूप हा आहे. *नौगांव, रहा व चापरमुख हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें* होत. बहुतेक व्यापार नद्यांच्या पात्रांतून चालतो. ह्या जिल्ह्यांतून आसाम–बंगाल रेलवे जाते. एकंदरींत दळणवळणाची सोय ठीक आहे.

जिल्ह्याचा अधिकारी डेप्युटी कमिशनर असून त्याचे दोन मदतनीस आहेत. अपिलाचें मुख्य कोर्ट कलकत्त्याचें हायकोर्ट होय. येथील जमाबंदी रयतवारीपद्धतीवर केलेली आहे. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा अजून मागासलेला आहे.

गांव.—आसाम. नौगांव जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें कलंग नदीच्या डाव्या तीरावर आहे. लोकसंख्या(१९११) ५४३३. सन १८९७ मधील भूकंपामुळें या गांवाची फार नुकसानी झाली. उंच असलेला भाग खालीं गेला व खालीं असलेला पूर्वीचा पाणथळ भाग वर आला. येथील हवामान फार उष्ण असून बहुतेक रोगकारक असतें. १८९४-९५सालीं म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. येथील व्यापार बहुतेक मारवाडी लोकांनीं हस्तगत केला आहे. निर्गत माल कापूस, लाख आणि आयात माल मीठ, तेल कापूस, कापड व धान्य. येथें एक हायस्कूल आहे.

**नौगांव**—मध्यहिंदुस्थान छत्रपूर संस्थानांतील एक छावणीचें ठिकाण. हें बुंदेलखंडांतील पोलिटिकल एजन्टचें राहण्याचें मुख्य ठिकाण आहे. उ.अ.२५°४' व पू. रे. ७९°२७'. लोकसंख्या ( १९०१ ) ११५०७. येथें १८४७ सालीं छावणी वसविण्यांत आली. येथील शिपाई बंडांत सामील झाले होते पण त्यांनीं ब्रिटिशांस कांहीं त्रास दिला नाहीं. ह्या गांवास व्यापारी महत्व नाहीं. येथें दोन दवाखाने व एक हायस्कूल आहे.

**नौरंगपूर**—मद्रास इलाखा. विजगापट्टम् जिल्ह्यांतील उरिया-एजन्सी विभागांतील एक तहशील. हिचा कांहीं भाग मध्यप्रांतांतील बस्तर व कालाहंडी ह्या दोन संस्थानांमध्यें पसरला आहे. हा भाग अगदीं उघडा असून तेल व इन्द्रावती नदीच्या उपनद्या ह्या तहशिलींतून वहातात. कांहीं ठिकाणीं चांगलें जंगल असून खोऱ्यांतील शेती फार उत्तम पिकते. क्षेत्रफळ २१७२ चौरस मैल. लोक संख्या (१९२१) १७०४९२. खोन्ड व इतर पहाडी लोकांची वस्ती येथें आहे. ह्या तहशिलींत ११६४ खेडीं आहेत. तहशिलीचें मुख्य ठिकाण नौरंगपूर हें असून तेथें नौरंगपूरची राणी रहाते. येथून जयपूर व मध्य प्रदेशांतील संस्थानांशीं व्यापार चालतो.

**नौशहर** तहशील.—पंजाब. जालंदर जिल्हा सतलज नदीच्या किनाऱ्यावर असणारी तहशील. क्षेत्रफळ २९९ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) १७७६९२. हींत ३ शहरें व २७६ खेडीं आहेत.

गांव.—पंजाब, जालंधर जिल्ह्यांतील याच नांवाच्या तहशिलीचें मुख्य ठिकाण. लोक संख्या ( १९११ ) ४४७५. हें तारासिंग नांवाच्या सरदाराचें मुख्य ठाणें होतें. रणजितसिंग मरण पावल्यानंतर हें ब्रिटिश साम्राज्याला जोडलें गेलें. येथें एक म्युनिसिपल आंग्लोव्हर्नाक्युलर शाळा आहे.

**नौशहर**, तहशील.—पंजाब. भावलपूर संस्थान, खानपूर निझामतींतील तहशील. क्षेत्रफळ २८४ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) ८२६५९. हींत ७३ खेडीं आहेत. तहशिलीमधून हक्रा नदी वहाते.

गांव.—पंजाब. भावलपूर संस्थानांतील याच नांवाच्या तहशिलीचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ( १९०१ ) ४४७५. येथें एक तांदूळ सडण्याची गिरणी व एक दवाखाना आहे.

**नौशेरा**, तहशील.—वायव्य सरहद्दीवरील प्रांत; पेशावर जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ ७०२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १३७२०७. ही काबूल नदीच्या दोन्ही कांठांवर वसली आहे. हिच्यांत खट्टारडा निलाब हाच पर्वत असून याचें सर्वांत उंच शिखर चेचानासर हें ५१३६ फूट उंच आहे. चेरात हें हवा खाण्याचें ठिकाण आहे. या तहशिलींतील निम्मा भाग खडकाळ आहे. वायव्येकडील भागाला काबूल नदीच्या कालव्यानें पाणी पुरविलें जातें. हिच्यांत २ शहरें व १४० खेडीं आहेत.

गांव.—जिल्ह्यांतील एक छावणीचें शहर व याच नांवाच्या पोटविभागाचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें नॉर्थ-वेस्टर्न रेल्वेवर आहे. लोकसंख्या ( १९११) २५४९८ ( छावणी १४५४३ व गांव १०९५५ ). छावणी काबूल नदीच्या कांठानें ३ मैल लांब आहे. काबूल नदीवर बोटींचा पक्का पूल आहे. येथें एक सरकारी दवाखाना व व्हर्नाक्युलर मिडलस्कूल आहे.

**न्याय (दर्शन)**—संस्कृत वाङ्मयामध्यें जीं षड्दर्शनें प्रसिद्ध आहेत त्यांपैकीं न्याय हें सहावें व सर्वांत उत्तरकालीन दर्शन होय. वैशेषिक दर्शन व न्यायदर्शन या दोन्ही दर्शनांचा प्रतिपाद्य विषय, मुख्यतः एकच आहे. या दोन्ही दर्शनांमध्यें अनुमान कसें काढावें यासंबंधी मुख्यतः विवेचन आहे. तथापि वैशेषिक व न्याय यांमध्यें फरक एवढाच कीं वैशेषिकाप्रमाणें न्यायदर्शन हें केवळ अनुमान कसें काढावें एवढ्याचेंच विवेचन करून न थांबतां तत्त्वज्ञानासंबंधींहि त्यांत उहापोह केलेला आहे.

या न्यायदर्शनाचा कर्ता गौतम होय. याला अक्षपाद हें टोपण नांव होतें. यानें खि. पू. १५० च्या सुमारास न्यायसूत्रें रचिलीं. या न्यायसूत्रांच्या प्रारंभीं गौतमानें तर्काला मूलभूत असे १६ पदार्थ सांगितले आहेत व त्यांचें यथार्थ ज्ञान झालें असतां मोक्षपद मिळतें असें म्हटलें आहे.

यथार्थ ज्ञान कोणत्या तऱ्हेनें होऊं शकेल यासंबधींची मीमांसा कमी अधिक प्रमाणांत सहाहि दर्शनांत आहे. तथापि न्यायदर्शनांतच त्यासंबंधीं सांगोपांग मीमांसा केलेली आढळते. या दर्शनांत यथार्थज्ञानाचीं प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द हीं चार साधनें सांगितलीं आहेत. या चार साधनांपैकीं अनुमान हेंच साधन तत्त्वज्ञानाची प्राप्ति होण्याला सर्वांत श्रेष्ठ साधन आहे. अनुमान हें तीन प्रकारचें असतें. ( १ ) पूर्ववत् अनुमान--आकाशांत ढग आले असतां त्यावरून लवकरच पाऊस पडणार असें अनुमान काढतात तें. ( २ ) शेषवत् अनुमान—कार्यापासून कारणाकडे जाणाऱ्या

पद्धतीला शेषवत् अनुमानपद्धति असें नांव आहे. उदाहरणार्थ, नदीला पूर आला असतांना, उंचीवरील प्रदेशांत पाऊस झाला असावा असें अनुमान काढणें,( ३ ) सामान्यतो दृष्ट—म्हणजे सामान्यापासून सामान्यत्वासंबंधींचें अनुमान काढण्याची पद्धत. जसें इंद्रियावरून इंद्रियत्वाचें अनुमान काढणें.

पाश्चात्य तर्कशास्त्राचे सामान्यावरून विशेष व विशेषावरून सामान्य अनुमान काढण्याच्या पद्धतींवरून डिडक्टिव व इंडक्टिव असे जे दोन भाग पाडण्यांत येतात तद्वत् भारतीय न्यायशास्त्रांत पाडण्यांत येत नाहींत. भारतीय न्यायशास्त्रांत सामान्यावरून विशेष अनुमानपद्धति उर्फ डिडक्टिव पद्धतीचा अवलंब केलेला आढळतो. या अनुमानाचीं न्यायदर्शनांत पांच अंगें सांगितलीं आहेतः—(१) प्रतिज्ञा, ( २ ) हेतु, (३) दृष्टांत, (४)उपनय,व(५)निगमन. आपण प्रत्यक्ष उदाहरणानेंच या पंचांगी अनुमानपद्धतीचें विशदीकरण करूं. पर्वत हा वन्हिमान आहे असें आम्हाला विधान करावयाचें आहे. तसें विधान केलें म्हणजे ती प्रतिज्ञा झाली. ती प्रतिज्ञा आपण का केली त्याचें कारण सांगितलें म्हणजे हेतु सांगितल्यासारखें झालें. जसें पर्वत हा वन्हिमान आहे कारण त्यांतून धूर निघत असलेला दिसतो.यांत धूर हा हेतु झाला.पण नुसतें कारण सांगितलें तरी तेवढ्यावर भागत नाहीं. कारण आपलें अनुमान निर्दोष आहे असें दाखवावयाचें असल्यास इतर ठिकाणींहि, सदृश गोष्ट दिसून येते किंवा नाहीं हें सांगितलें पाहिजे.यासाठीं दृष्टांताची आवश्यकता भासूं लागते.उदाहरणार्थ पर्वत हा वन्हिमान आहे कारण त्याच्यावर धूर दिसतो. ज्या ज्या ठिकाणीं धूर दिसतो त्या त्या ठिकाणीं अग्नि असतो असें व्यवहारांत आढळतें. उदाहरणार्थ स्वयंपाकगृहांत धूर दिसतो त्यावेळीं तेथें अग्नीचें वास्तव्य असतें हें दृष्टांताचें उदाहरण झालें. चवथें अंग उपनय होय. जसें पर्वत हा धूमवान आहे. शेवटचें अंग निगमन; जसें पर्वत धूमवान आहे म्हणून तो वन्हिमान आहे. वास्तविक वरील पांच अंगांपैकीं चवथें व पांचवें अंग म्हणजे पहिल्या व दुसऱ्या अंगांचीच पुनरुक्ति आहे. यास्तव तीं गाळून टाकलीं असतां चालतील व गाळल्यास पाश्चात्य अनुमान पद्धतीप्रमाणेंच भारतीय अनुमानपद्धतीहि त्र्यंगीच राहते. या भारतीय अनुमानपद्धतीच्या मुळाशीं व्याप्तीची कल्पना आढळून येते. ज्या ज्या ठिकाणीं धूम असतो त्या त्या ठिकाणीं वन्हि असतो असें म्हणणें म्हणजेच धूमाच्या ठिकाणीं वन्हीची व्याप्ति आहे असें म्हटल्यासारखेंच आहे.

कार्यकारणवादासंबंधींची कल्पना इतर दर्शनांहून थोडीशी भिन्न आहे. इतर दर्शनांच्या मतें कोणत्याहि कार्याची, उपादान व नैमित्तिक अशीं दोनच कारणें असतात पण न्यायदर्शनांत दोन कारणांऐवजीं तीन कारणें मानलेलीं आढळतात. उपादान कारणाच्या ऐवजीं न्यायदर्शनांत समवायीकारण असा शब्दप्रयोग रूढ आहे. निमित्तकारण हें सर्व दर्शनांमध्यें रूढ आहे. या दोन कारणांशिवाय न्यायदर्शनामध्यें असमवायीकारण म्हणून तिसरें कारण कल्पिलें आहे. उदाहरणार्थ, पटामधील तंतु हें पटाचें उपादान उर्फ समवायीकारण आहे. पट विणणारा,त्याचीं हत्यारें वगैरे बाह्य उर्फ नैमित्तिक कारण होय. तंतूंचे, लहानमोठेपणा, जाडी अगर पातळी इत्यादि गुण हें पटाचें असमवायीकारण होय या महत्त्वाच्या विषयाशिवाय, तर्क, निर्णय हेत्वाभास, छल, स्वव्याघातक, निग्रहस्थान इत्यादि अंगभूत विषयांचेंहि विवेचन न्यायदर्शनांत आलें आहे.

पण एवढ्यावरच न्यायदर्शन थांबलें नाहीं. या अनुमानविषयाशिवाय तात्त्विक प्रश्नांचेंहि विवेचन या दर्शनांत आलेलें आढळतें. न्यायदर्शनांतील अध्यात्म व मानसशास्त्र हीं वैशेषिक दर्शनांतील अध्यात्म व मानसशास्त्राचें विकासित स्वरूप आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. वैशेषिक व न्याय या दोन्ही दर्शनांनीं प्रारंभीं ईश्वरास्तित्ववाद अमान्य केला होता पण कालांतरानें वैशेषिक व न्याय यांचा एकत्र विचार करण्यांत येऊं लागल्यापासून या दोन्ही दर्शनांनीं सेश्वरवाद स्वीकृत केला, तरी पण प्रकृतीला कोणी जनक आहे हें मत मात्र त्यांनीं कबूल केलें नाहीं. या दोन्ही दर्शनांचा एकत्र विचार ज्यांत केला आहे तो ग्रंथ म्हणजे उदयनाचार्यांचा कुसुमांजलि हा होय. हा सुमारें १२०० च्या सुमारास लिहिला गेला असावा. या ग्रंथांत ईश्वर हा इतर नित्य व अनंत आत्म्यांप्रमाणेंच एक विशिष्ट आत्मा असून तो सर्वज्ञ व सर्वशक्तिमान आहे असें त्यांत म्हटलें आहे.

गौतमाच्या न्यायसूत्रांना अतिशय मान्यता मिळाली आहे. या सूत्रांतील पारिभाषिक संज्ञा सर्व प्रकारच्या भारतीय तत्त्वज्ञानांतील ग्रंथांत रूढ झाल्या आहेत व यांतील अनुमान काढण्याची पद्धतीहि सर्वमान्य झाली आहे. [ *संदर्भग्रंथः—गौतम–न्यायसूत्रें; माधवाचार्य–सर्वदर्शन संग्रह;मॅक्समुल्लर–सिक्स सिस्टिम्स ऑफ इंडियन फिलॉसफी* ]

**न्यायपद्धति**—सांप्रतची न्याय पद्धति 'कोर्ट' या लेखाखालीं पहा.

भा र ती य.—प्रजेचा न्यायनिवाडा करणें हें राजाचें एक आद्य कर्तव्य आहे. तथापि राजाला सर्व धर्मशास्त्रें व स्थानिक रूढि माहीत असणें शक्य नसल्यामुळें विद्वान ब्राह्मणांच्या मदतीनें न्याय द्यावा ( व्यवहारान्नृपः पश्येत् विद्वद्भिर्ब्राह्मणैः सह–याज्ञवल्क्य,२. १; ५. १. ) त्याचप्रमाणें राज्यांतील सर्व खटल्यांचें काम चालविण्याकरितां व अपीलें ऐकण्याकरितां निरनिराळीं कोर्टें नेमावीं असें धर्मशास्त्रांत सांगितलें आहे. ब्राह्मण नेमणें ते वेद, मीमांसा, व्याकरण व धर्मशास्त्र यांत पारंगत असावे. प्राड्विवाक नांवाचें दुय्यम दर्जाचें कोर्ट नेमावें, आणि कनिष्ठ प्रकारचीं कोर्टें निरनिराळ्या गांवीं स्थानिक खटले तोडण्याकरितां नेमावीं. यांशिवाय लवादकोर्टें ( आर्बिट्रेशन कोर्टें ), ( १ ) पुग

( निरनिराळ्या धंद्यांतील इसमांचें ), ( २ ) श्रेणी ( एका विशिष्ट धंद्यांतील इसमांचें ), ( ३ ) कुल ( नातेवाईक इसमांचें ) या तीन प्रकारचीं असत. नात्यांतल्या किंवा गांवांतल्या इसमांचें लवादकोर्ट असल्यानें त्यांना खटल्याची बरोबर माहिती असते व त्यामुळें यथायोग्य न्याय मिळतो.

व्यवहारः—म्हणजे खटल्यांचे प्रकार हल्लींप्रमाणें दिवाणी व फौजदारी असे बरोबर नसून एकंदर पुढीलप्रमाणें अठरा प्रकार संमिश्रपणें सांगितले आहेत; तेः—( १ ) ऋणादान ( कर्जफेड ); ( २ ) निक्षेप ( गहाण ); ( ३ ) अस्वामिविक्रय (स्वतःचा नाहीं अशा मालाची विक्री करणें;) ( ४ ) संभूयसमुत्थान ( पार्टनरशिप = भागीदारी ); ( ५ ) दत्तानपर्क ( देऊं केलेलें दान न देणें ); ( ६ ) वेतनादान ( पगाराबद्दलचें देणें ); ( ७ ) संविद्व्यतिक्रम ( करार मोडणें ); ( ८ ) क्रयविक्रय ( विक्रीखरेदी ); ( ९ ) स्वामीपालयोः विवादः ( मालकनोकरांतील भांडण ); ( १० ) सीमाविवाद ( हद्दीविषयीं तंटे ); (११) दण्डपारुष्य (दुखापत);( १२ ) वाक्पारुष्य ( बेअब्रु ); (१३) स्तेय ( चोरी ); ( १४ ) साहस ( अपक्रिया ); ( १५ ) स्त्रीसंग्रहण ( स्त्रीला फूस लावून नेणें ); ( १६ ) स्त्रीपुंधर्म ( नवराबायकोंतील तंटे ); ( १७ ) दायविभाग ( वारसाहक्क ); ( १८ ) द्यूतसमाव्हय ( जुगार ).

खटल्याची सुरवातः—प्रथम फिर्यादी स्वतः आपलें म्हणणें कोर्टाकडे जाऊन सांगे त्याचें म्हणणें कोर्टाचा कारकून लिहून घेई. नंतर फिर्याद योग्य आहे असें न्यायाधिशास वाटल्यास प्रतिपक्षास समन्सानें बोलावीत असत. समन्स व वॉरंट असा फरक पूर्वी नव्हता. समन्साप्रमाणें हजर राहण्याचा हुकूम मोडणारास शिक्षा होत असे. प्रतिवादी किंवा आरोपी ( प्रत्यर्थी ) हजर झाल्यावर त्याच्या समक्ष पुन्हां वादीची ( अर्थी ) फिर्याद पुन्हा नांव, गांव, दाव्याचा विषय वगैरे सर्व तपशीलासह लिहून घेत. एकाच दाव्यांत अनेक असंबद्ध ( अनेक पदसंकीर्ण ) मागण्या मागतां येत नसत. कर्जफेडीच्या दाव्यास मुदतीची अट लावून मुदतीबाहेरचे ( अतीतकाल ) दावे घेऊं नयेत असें नारदस्मृतींत सांगितलें आहे.

वादीची फिर्याद ( पूर्वपक्ष ) लिहून घेतल्यानंतर प्रतिवादीची कैफियत ( उत्तरपक्ष = रिटन स्टेटमेंट ) लगेच कोर्टांतच लिहून घेत; किंवा जरूर तर एकदोन दिवस ते एक वर्षपर्यंतहि कैफियतीस मुदत देण्याबद्दल गौतमस्मृतींत सांगितलें आहे.

पुरावाः—फिर्याद व कैफियत लिहून घेतल्यानंतर त्यांवरून पुराव्याचा बोजा कोणावर पडतो तें न्यायाधीश ठरवीत व तावडतोब पुरावा हजर करण्यास सांगत. पुराव्याचे मुख्य प्रकार मानुष व दैवी असे दोन असून मानुष पुराव्याचे ( १ ) लिखित ( डॉक्युमेंटरी ), ( २ ) साक्षि ( ओरल ), व ( ३ ) भुक्ति ( उपभोग किंवा वहिवाट ) असे तीन पोटभेद असत आणि दैवी पुराव्याचे ( १ ) घट, ( २ ) अग्नि, ( ३ ) उदक, ( ४ ) विष व ( ५ ) कोश असे पांच पोटभेद असत. ‘ मानुष ’ पुरावा नसेल तरच ‘दैवी’ पुरावा घ्यावा असा नियम असे. मानुष पुराव्यांपैकीं तोंडी पुराव्याचे ( १ ) लिखित ( २ ) स्मारित, (३)यदृच्छागत, ( ४ ) गूढसाक्षी ( स्पाय ) आणि ( ५ ) उत्तरसाक्षी ( हिअरसे ); साक्षीदारांना पोटगीभत्ता ( पुरुषभृति ) देत असत. साक्षीदारांनां प्रश्न न्यायाधीशच विचारीत असत. हे प्रश्न व त्यांचीं उत्तरें कारकून लिहून घेत असत. लेखी पुराव्याचे राजकीय ( पब्लिक डाक्यूमेन्टस ) आणि लौकिक (प्रायव्हेट डाक्युमेंट)असे दोन प्रकार असून राजकीय पुराव्याचे ( १ ) शासनपत्र ( २ ) जयपत्र,( ३ )आज्ञापत्र,आणि ( ४ ) प्रज्ञापत्र असे चार भाग असत, आणि खाजगी लेखी पुराव्याचे स्वकृत आणि अन्यकृत असे दोन मुख्य भेद होते. खाजगी दस्तैवजांत ( १ ) उपगतसंज्ञित ( रीसिट ); ( २ ) अधिपत्र ( गहाणपत्र ); ( ३ ) क्रयपत्र ( खरेदीपत्र ); ( ४ ) संधिपत्र, ( ५ ) विशुद्धिपत्र, ( ६ ) विभागपत्र ( वांटणीपत्र ); ( ७ ) दानपत्र; ( ९ ) सीमाविवादपत्र आणि ( १० ) स्थितिपत्र असे दहा प्रकार असत.

निकाल ( निर्णय ):—पुरावा घेतल्यावर निकाल देण्याकरितां निर्णयपत्र तयार करीत, त्यांत वादाचा विषय, त्यावरील पुरावा आणि निकाल व त्याचीं कारणें लिहून देत. विजयीपत्राला ‘जयपत्र’ आणि पराभूत पक्षाला ‘हीनपत्र कोर्टाकडून मिळे. जयपत्राचा एक उपयोग ‘पूर्वन्याय’ ( रेस ज्युडिकेटा ) झाला असल्याचें सिद्ध करण्याकरिता होत असे. कोर्टफी म्हणून विजयीपक्षानें निकालांतील रकमेचा एकविसांश, आणि पराभूत पक्षानें रकमेचा एकदशांश दंड द्यावा असें विष्णुस्मृतींत आहे.

याप्रमाणें प्राचीन न्यायपद्धति मनु, याज्ञवल्क्य, नारद, कात्यायन, बृहस्पति वगैरेंच्या स्मृतिग्रंथांत थोड्याबहुत फरकानें दिली असून आधुनिक पद्धतींतील बहुतेक गोष्टी तिच्यांत आहेत. तथापि प्राचीन हिंदु व प्रस्तुत ब्रिटिश पद्धतींत कांहीं महत्त्वाचे फरक आहेत; तेः—(१) प्राचीन सर्व दर्जाच्या कोर्टांत एक जज्ज कोर्टच नसे, तर पंच किंवा लवादकोर्टाप्रमाणें एकाहून अधिक इसम न्यायाधीश असत. या जुन्या पद्धतीचें सांप्रतच्या ज्यूरी व जज्जयुक्त पद्धतीशीं साम्य आहे. एक न्यायाधीश-पद्धतीचे दोष अगदीं उघडाउघड असून पाश्चात्य राष्ट्रांत सर्व दिवाणी व फौजदारी खटले जज्ज व ज्यूरी मिळूनच निवडतात. (२) प्राचीन न्यायाधीश-मंडळांत (बेंच) कायदेपंडित इसम असून शिवाय धंदेवाईक व श्रीमंत शिष्टहि असत, त्यामुळें कायदा, रूढी आणि विशिष्ट परिस्थिति यांनां अनुसरून योग्य न्याय मिळेल असा लोकांचा विश्वास असे. (३) दिवाणी व फौजदारी कोर्टें निरनिराळीं नसत.सांप्रत हिंदुस्थानांत ज्युडिशियल

( न्याय ) व एक्झीक्युटिव्ह ( अंमलबजावणी ) हीं दोन कामें निरनिराळ्या अधिकाऱ्यांकडे ठेवण्याची सुधारणा करण्याबद्दल विचार चालू आहे. (५) पूर्वी सरकारी कोर्टांबरोबर प्रत्येक ठिकाणीं लवादकोर्टें असत. हल्लीं तीं नष्ट झालीं आहेत. पण तीं पुन्हां स्थापणे फार हितावह आहे, असें व्हिन्सेंट स्मिथ वगैरे अनेक विद्वानांनीं मत दिलें आहे.(६) फिर्याद व कैफियत ही दोन्ही, कोर्टांत वादीप्रतिवादी यांच्या समक्ष लिहून घेत, ही मोठी फायद्याची गोष्ट प्राचीन पद्धतींत होती. हल्लीं फिर्याद–कैफियतीनंतर जरूर तर कोर्टानें वादीप्रतिवादींच्या जबान्या कोर्टांत घ्याव्या असा कायदा आहे. परंतु ही पायरी बहुधां गाळण्यांत येते. पण हल्लीं पुराव्याला सुरवात करण्यापूर्वी मुद्दे काढण्यांत येतात व त्यामुळें पुराव्याचें काम सोयीचें होतें. ही मुद्दे काढण्याची रीत प्राचीन पद्धतींत आढळत नाहीं. ( ७) प्राचीन मिळकतीच्या तफदीलींत कबजा देणेघेणें अवश्य असे; बिनामी व्यवहार होत नसत. बिनामी व्यवहारांची पद्धति मोंगल अंमलांत आली. (८) अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्राचीन न्यायपद्धतींत 'वकील' वर्गाचें अस्तित्व मुळींच दिसत नाहीं. वकील हा शब्दच फारशी असून मुसुलमानी न्यायाधीशांनां हिंदु कायद्यांची माहिती सांगण्याकरितां हा वर्ग प्रथम अस्तित्वांत आणला असें दिसतें. कारण १५ व्या शतकांतील स्मृतिचंद्रिकेंतहि यांचा उल्लेख नाहीं. [ संस्कृत स्मृतिग्रंथ; गुरुराजाराव–एन्शट हिंदु ज्युडिकेचर. ]

मुसुलमानी अमदानी.—मोंगल बादशहांनां आपण सर्वश्रेष्ठ न्यायाधीश आहों ही अभिमानपूर्वक जाणीव होती व शहाजहान आणि औरंगझेब यांनीं बुधवार हा आठवड्यांतील एक दिवस केवळ खटले ऐकण्याकरीतां राखून ठेवलेला होता. बादशहा न्यायदानाचें काम काझी, उलेमा, कोतवाल वगैरेंच्या मदतीने करीत असे. बादशहाच्या कोर्टांत शेवटचीं अपीलें व महत्त्वाचे अव्वल दावे हीं दोन्ही प्रकारचीं कामें चालत. शिवाय प्रत्येक सुभ्याच्या ठिकाणीं एकेक काझीचें कोर्ट असे, पण त्याच्या खालीं कनिष्ठ कोर्टें बादशहांनीं स्थापिलीं नव्हतीं. पण जुन्या हिंदु पद्धतींतील श्रेणी व कुल या प्रकारचीं लवाद कोर्टें गांवोगांव असत.

मराठी अंमल.—शिवाजीनें मराठी राज्य थोडेसें हातीं येतांच न्यायखातें सुरू करून स. १६६१ मध्यें निराजी रावजी यास न्यायाधीश नेमलें. नंतर स. १६७४ मध्यें राज्याभिषेकाच्या वेळीं अष्टप्रधान नेमले; त्यांत सातवा अधिकारी न्यायाधीश हा असून या पदाचीं वस्त्रें पटक्याखेरीज करून इतर मंत्र्यांप्रमाणें असत. स. १६७४ मध्यें बाळाजी पंडित, स.१६९२ मध्यें निराजी रावजी, स.१७१३ मध्यें होनाजी अनंत, स.१७३९मध्यें काशी अनंत व स.१७५० मध्यें खंडेराव काशी याप्रमाणें न्यायाधिशाच्या जागी नेमणूका झाल्या. शाहूच्या मृत्यूनंतर पेशव्यांनीं राज्यकारभाराची सर्व व्यवस्था पुण्यास चालविल्यामुळें न्यायाधीशहि पुण्यास नेमला गेला व १७६० सालीं हा अधिकार रामशास्त्री प्रभुणे यास, नंतर अशाच विद्वान व योग्य इसमांनां या जागीं नेमलें होतें. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दींत बाळकृष्ण शास्त्री टोकेकर या अधिकारावर होते. या वरिष्ठ न्यायाधिशाच्या हाताखालीं कमाविसदारांचीं कोर्टें असत. कमाविसदारांनां दिवाणी व फौजदारी, दोन्ही प्रकारचे खटले चालविण्याचा अधिकार असे. दिवाणी दाव्यांत दावा जिंकणाऱ्याकडून 'हरकी' नांवाची फी आणि दावा बुडेल त्याच्याकडून 'गुन्हेगारी' नांवाचा दंड कोर्ट वसूल करी व ही एक सरकारी उत्पन्नाची बाब असे. दिवाणी दाव्यांत 'पैशाचे दावे' ( मनी- सूट्स ) क्वचित असून बहुतेक वतन, दत्तक, वांटणी, भागीदारी, जमिनीच्या हद्दी वगैरे प्रकारचे दावे असत. खटले चालविणें ते जुन्या हिंदु पद्धतीप्रमाणें चालवीत. वर सांगितलेल्या वरिष्ठ दर्जाच्या कोर्टाशिवाय गांवोगांव लवाद किंवा पंचायत कोर्टें असत.

[ संदर्भग्रंथ—जदुनाथ सरकार—मोंगल ॲडमिनिस्ट्रेशन; म. गो रानडे--इंट्रोडक्शन टु पेशवाज डायरीज; वि. गो. भिडे--अष्टप्रधानांचा इतिहास. ]

**न्यासा**—हें मध्य आफ्रिकेंतील मोठ्या तलावांत तिसऱ्या प्रतीचें मोठें सरोवर आहे याची सर्वांत मोठी लांबी ३५० मैल व रुंदी ४५ मैल आहे, व क्षेत्रफळ ११००० चौरस मैल आहे. हें समुद्रसपाटीपासून १६५०. फूट उंच आहे. हें खडकांच्या मध्यें असून मधून मधून चुन्याच्या दगडाचे भाग त्यांत आहेत व याची सर्वांत जास्त खोली २८६ यार्ड आहे. उत्तरेकडील डोंगरांतून वाहणाऱ्या झऱ्यांचें पाणी या तलावांत येत असतें. १८७६ सालपर्यंत लिव्हिंग्स्टन आलब्रेच, रोशर व यंग यांनीं येथें बरेच शोध लावले. त्यानंतर स्कॉटिश मिशनऱ्यांनीं येथें बरेंच काम केलें. या तलावाचा किनारा इंग्लिश व पोर्तुगीज लोकांच्या हातीं आहे.

**न्युन**—हा वायु चेतनारहित वायुवर्गापैकीं एक आहे. या वर्गांत पुढील वायू येतातः अर्गोन, सौर, क्रिप्त, न्युन व झेन. हे वायू खालील रीतीनें मिळतात. हवा व प्राण यांच्या मिश्रणामधून विजेच्या ठिणग्या जाऊं दिल्यास हवेमधील नत्राच्या $\frac{1}{८४}$ भागाखेरीज सर्व नत्राचें नत्रप्राणिद रूपांत रूपांतर होतें. हीं नत्रप्राणिदें अनाम्लाच्या योगानें काढून टाकतां येतात. बाकी राहिलेल्या $\frac{1}{८४}$ नत्राचा भाग प्राणाशीं प्राणिद देत नाहीं. याच भागांत हे चेतनारहित वायू असतात. कारण या भागाचें द्रवीभवन केल्यास त्यांत वरील वायू सांपडतात. या द्रवाचें आंशिक उर्ध्वपातन केलें असतांना प्रथमतः न्युन, सौर व थोडचा चिकटून राहिलेल्या नत्रासह अर्गोन, हे बाहेर पडतात. क्रिप्त व झेन तसेच राहतात. नंतर जास्त वायुपरिणामी वायू हे एका भांड्यामध्यें दाबाखालीं ठेवून द्रवीभूत हवेच्या योगानें द्रवित करतात, व कमी परिणामी वायू वारंवार आंशिकऊर्ध्वपातनाच्या योगानें इतरांपासून व एकमेकांपासून ( क्रिप्त व झेन ) वेगळे करतां येतात. याच रीतीनें न्यून व सौर हेहि एकमेकांपासून वेगळे

करतां येतात. सौर व न्युन यांच्या मिश्रणाभोंवतीं द्रवीभूत उज्ज ठेवल्यास न्युन पांढऱ्या घन स्वरूपांत मिळतो व वर राहिलेला सौर वात–निष्कासक यंत्रा( एअर–पंप )च्या साहाय्यानें काढून घेतां येतो. त्यांचे पदार्थ–वैज्ञानिक गुणधर्म खालील कोष्टकांत दिले आहेत —

पदार्थवैज्ञानिक गुणधर्म दाखविणारें कोष्टक.

| वायु | हजार घनफूट हवेंतील प्रमाण | परमाणु भारांक | वितळण्याचा बिंदु | उकळण्याचा बिंदु | स्थित्यंतर |
|---|---|---|---|---|---|
| सौर | ०.००१४ | ३.९९ | ... | −२६८.७° | −२६८° |
| न्युन | ०.०१५ | २०.२ | −२५३° | −२३३° | −२२०° |
| अचेष्ट | ९.३७ | ३९.८८ | −१८८° | −१८६° | −११७° |
| क्रिप्त | ०.००००५ | ८२.९२ | −१६९° | −१५२° | − ६३ |
| क्षेन | ०.००००००६ | १३०.२२ | −१४०° | −१०९° | + १५° |

रासायनिक रीत्या हे सर्व वायू अचेतन असल्याकारणानें त्यांचे कोणतेहि रासायनिक संयुक्त पदार्थ मिळत नाहींत. म्हणून या वायूंस शून्य–मूल्यकत्व आहे असें समजतात. विद्युत्शक्तीच्या योगानें या वायूंस चेतनायुक्त केल्यास हे एक प्रकाश–पट्टा देऊं शकतात. आतां अण्वायनत्व. हा अचेतन असतो. पण तोच त्याच्या परमाण्वीय स्थितीमध्यें सचेतन असतो, यावरून आर्मस्ट्रांग यानें असें ठरविलें कीं, अचेतन वायूमधील अणू दोन किंवा अधिक परमाणूंच्या योगानें बनलेला असून ते इतक्या घट्ट रीतीनें सांधले गेलेले आहेत कीं कोणत्याहि ज्ञात रसायनक्रियेच्या योगानें वेगळे करतां येत नसावेत. कांहीं लोक ते एकमूल्यक आहेत असें समजतात पण त्यास फारसा आधार नाहीं. निरनिराळी द्रवक्षमता असलेल्या वायूस छिद्रयुक्त पदार्थांतून जाऊं दिल्यास निरनिराळे करतां येतात. या वरील कृतीच्या योगानें न्युन ह्या वायूमध्यें दोन प्रकारचे वायू ज्यांचे परमाणुभारांक अनुक्रमें १९.९ व २२.१ आहेत असे आहेत, पण त्यांच्या पदार्थवैज्ञानिक स्थितींत फरक दिसून येत नाहीं.

**न्युमिडिया**—हें नांव प्राचीन काळीं उत्तर आफ्रिकेंतील प्रांताला होतें, याचा रोमन इतिहासांत बराच संबंध येतो. हा प्रांत भूमध्यसमुद्राच्या कांठीं असून मॉरेटॅनियाच्या सरहद्दीपासून आफ्रिकेंतील रोमन प्रांतापर्यंत पसरलेला होता. ख्रिस्ती सनापूर्वी ३ ऱ्या शतकांत रोमन व कार्थेजियन यांचा पहिला खटका उडाला त्यावेळीं मुलुचा नदीपासून (सध्यांच्या मुलुया) कार्थेजियन प्रांतापर्यंतच्या प्रदेशाला ( म्हणजे सध्याचा ट्युनिस राज्याइतका प्रदेश त्यांत येतो ) रोमन प्रजासत्ताक राज्याचा शेवट होईपर्यंत न्युमिडिया हें नांव देत असत. दुसऱ्या प्युनिक युद्धाच्या वेळीं पूर्वेकडील भागावर मॅसिनिसा राज्य करीत असून तो रोमन पक्षाचा होता. पश्चिम भागावर सिफॅक्सचा अंमल होता व त्यानें कार्थेजियनांचा पक्ष घेतला. या युद्धांत रोमन लोक विजयी होऊन त्यांनीं सिफॅक्सचें राज्य खालसा करून तें मॅसिनिसा याला दिलें यामुळें न्युमिडियाचें राज्य समुद्रबाजूखेरीज कार्थेजच्या भोंवतीं पसरलें. मॅसिनिसा वयातीत होऊन ख्रि. पूर्व १४८ त मेला व त्याचा मुलगा मिसिप्सा ख्रि. पूर्व ११८ त वारला. याचा पुतण्या जुगर्था यानें विश्वासघातानें व युक्तीनें सर्व राज्य बळकाविलें. याच्या कांहीं कृत्यानें रोमनें याच्याशीं युद्ध सुरू केलें. जुगर्थानें रोमन सैन्याला बरेच दिवस झुलविलें परंतु अखेरीस एका छाप्यांत तो रोमन लोकांच्या हातीं सांपडला व ख्रि. पूर्व १०६ त रोम येथें मरण पावला. या राज्याचा पश्चिम भाग मॉरेटॅनियाचा राजा बोकस यास मिळाला व बाकीच्यावर देशी राजे अंमल करीत होते. न्युमिडियाचा राजा पहिला जुबा यानें पांपेचा पक्ष घेतला. त्यामुळें सीझरनें त्याचा पराभव केला जुबानें आत्महत्या केली ( ४६ ख्रि. पूर्व ) न्युमिडियाला 'आफ्रिका नोव्हा' नांवाखालीं रोमन प्रांत केला.परंतु ॲक्टीयमच्या युद्धानंतर ऑगस्टसनें हें राज्य दुसऱ्या जुबास ( पहिल्या जुबाचा मुलगा ) दिलें. ख्रि. पूर्व २५ त जुबाला मॉरेटिनसच्या राज्यावर बसवून त्याचें राज्य खालसा केलें. आफ्रिका व्हेटेस नांवाच्या प्रांतावर प्रोकॉन्सल असून येथें रोमन सैन्य खास सीनेटच्या देखरेखीखालीं असे. ग्रेस यानें येथील लष्करी व मुलकी कारभार वेगळा केला व सेप्टिमसनें आफ्रिका व्हेटसपासून हा प्रांत अगदीं वेगळा केला डायोक्लेटियननें आफ्रिकेंतील सातप्रांतांपैकीं एक प्रांत बसविला व याचें नांव न्युमिडिया सिर्टेंचा असून कान्स्टन्टाईननंतर याला कॉन्स्टन्टाईन प्रांत म्हणत. हा सध्याच्या फ्रेंच कान्स्टन्टाईन प्रांताइतका होता. या काळांत याची फार सुधारणा होऊन यांत मोठालीं शहरें वसलीं. इ. स. ४२८ तील व्हॅंडालच्या स्वारीनें प्रांत खालावत चालला. ८ व्या शतकांत अरबांनीं हा भाग उध्वस्त केला त्यानंतर यांत सर्वत्र अंदाधुंदी असून अखेरीस १८३३ सालीं फ्रेंचांनीं अलजिरिया प्रांत सर केला.रोमन काळांतील न्युमिडियांतील शहरें सरी–राजधानी; याला कान्स्टन्टाईननें दिलेलें कान्स्टंटाईन हें

नांव अद्यापि लावतात. याचें बंदर रुसिकेंडा. हिपोरेजियस, थेव्हेस्टे ( तेवेसा ), लॅवेसिस ह्रीं दुसरीं शहरें होत.

**न्यूअर्क**—अमेरिका. न्यूजर्समधील इसेक्स विभागांतील एक मोठें शहर व प्रवेशबंदर. हें न्यूयॉर्क शहराच्या पश्चिमेस आठ मैलांवर वसलेलें आहे. १९१० सालच्या खानेसुमारीप्रमाणें येथील लोकसंख्या ३४७४६९ होती. इंग्लिश, जर्मन, आयरिश, इटालियन वगैरे परकीयांची संख्या दृश्य प्रमाणांत आढळून येते. शहराच्या रस्त्यांची मांडणी सुव्यवस्थित असून ब्रॉडस्ट्रीट, मार्केट स्ट्रीट वगैरे रस्ते प्रेक्षणीय आहेत. येथें बऱ्याच भव्य व प्रसिद्ध इमारती असून त्यांपैकीं सिटीहॉल, कोर्टहाऊस, रोमन कॅथोलिक चर्च, वगैरे प्रेक्षणीय आहेत. येथें रमणबागाहि बऱ्याच आहेत; त्यांपैकीं वॉशिंग्टन, मिलिटरी, लिंकन, या प्रसिद्ध आहेत.

येथील "न्यूअर्क ॲकॅडमी" नांवाची शिक्षणसंस्था प्रसिद्ध आहे. याखेरीज शहरांत रात्रीच्या शाळा, धंदेविषयक शाळा, वगैरे आहेत. येथें एक मोठें सार्वजनिक वाचनालय असून धर्मादाय संस्थाहि बऱ्याच आहेत. उद्योगधंद्यासंबंधीं हें शहर सुप्रसिद्ध आहे कापड, कातडी काम, साखर, लोखंडी काम, रासायनिक द्रव्यें, सिगारेट, बटनें वगैरेंचे मोठाले कारखाने येथें चालतात. या सर्व कारखान्यांतून अंदाजें एकंदर १५००५५२२७ डॉलर किंमतीचा माल तयार होतो. विशेषतः जोडे व इतर कातडी काम, फेलटटोप्या, लांकडी काम, धातू शुद्ध करणें व ओतणें वगैरे संबंधींचे कारखाने अवाढव्य असून त्यासंबंधीं या शहराची सर्व अमेरिकेंत प्रसिद्धि आहे. येथें कांहीं नामांकित विमाकंपन्या ('प्रूडेन्शल,' 'म्यूच्युअल बेनिफिट' व 'अमेरिकन फायर कंपनी') आहेत. यांचें कार्यक्षेत्र बरेंच विस्तृत आहे. येथें विम्याच्या धंद्याला त्यामुळें बरेंच प्राधान्य दिलें जातें.

मेयर लोकनियुक्त असून त्याची अधिकाराची मुदत २ वर्षेपर्यंत असते. १६९३ सालीं येथें कार्पोरेशन स्थापन झाली असून १८३६ सालापासून शहराचे अधिकार मिळाले.

**न्यू आर्लियन्स**—अमेरिका, संयुक्त संस्थानें. लुसियाना संस्थानमधील मिसिसीपी नदीच्या डाव्या तीरावर वसलेलें शहर. याचें क्षेत्रफळ १९६.२५ चौरस मैल आहे. येथील नदीचें पात्र फार रुंद व खोल असल्यामुळें येथे बरींच जाहजें असतात पश्चिम तीरावरील व्यापारी पेठेकडे जाण्यास आगबोट आहे. संयुक्त प्रांताचें आरमार येथें असतें. येथील हवा समशीतोष्ण आहे.

येथील प्रख्यात ऐतिहासिक इमारतींत सेंट चार्लस हॉटेल, ला फेटे स्क्वेअर, सेंट पाट्रिक चर्च यांची व आणखी दुसऱ्या मोठ्या इमारतींची गणना होते. त्याचप्रमाणें सिटी पार्क व आडुबाँ पार्क यांनांहि ऐतिहासिक महत्त्व आहे. येथील कबरस्थानें फारच निरनिराळ्या प्रकारचीं व सुंदर आहेत. १९१७ सालीं येथील एकंदर वस्ती ३७७०१० होती. यांत जर्मन इटालियन, आयरिश, फ्रेंच, इंग्रज वगैरे सर्व यूरोपीय लोक येतात. लोकांच्या देणग्यांवर चालणारीं लहान मोठीं दवाखानें व धर्मार्थसंस्था ५६ आहेत. येथें शिक्षण देण्याकरितां बऱ्याच सरकारी शाळा आहेत. लुसिटानियाचें टूलेन विश्वविद्यालय काढण्यास पैसा न्यू ऑर्लियन्सच्या टुलेन नांवाच्या व्यापाऱ्यानें दिला. हें विश्वविद्यालय गोऱ्या लोकांकरितांच आहे. याशिवाय दुसरीं कांहीं कॉलेजें गोऱ्या लोकांकरितां आहेत. नीग्रोंकरितां ज्या दुय्यम शाळा आहेत त्या लेलंड विश्वविद्यालयास जोडल्या आहेत.

१८०३ सालीं न्यू आर्लियन्स हें व्यापारी बंदर संयुक्त प्रांतानें विकत घेतले याचें कारण त्याचें व्यापारी महत्त्व होय. आजूबाजूच्या सुपीक प्रांतांतील धान्य, कापूस, तंबाखू वगैरे धान्याचा व्यापार येथें बराच चालतो. स. १९०० पासून येथील व्यापाराचें स्वरूप बदललें आहे. नैर्ऋत्येकडे कालवा बांधला असून आगबोटी थेट वेस्ट इंडीज, मध्य अमेरिका, यूरोप, न्यूयॉर्क, जपान येथें जाऊं शकतात. रेल्वेचे फांटे उघडुन ते बहुतेक सर्व मोठ्या फांट्यांशीं जोडण्यांत आले आहेत. साखरेचा धंदा फार मोठ्या प्रमाणावर आहे. त्याचप्रमाणें सरकीचें तेल काढणें, कपडे शिवणें, दारू गाळणें, कापडाच्या गिरण्या असे बरेच धंदे येथें आहेत. शहराचे मेयर व दुसरे अधिकारी दर ४ वर्षांनीं निवडण्यांत येतात.

इ ति हा स.—न्यू आर्लियन्स हें १७१८ त जीन बॅप्टिस्टे लेमाइन यानें वसविलें व त्याला फ्रान्सच्या रीजंटचें नांव दिलें. १७२२ सालीं ती लुसिटानियाची राजधानी झाली. १८६२ सालीं हें शहर यूनियन सरकारनें घेतलें.

**न्यूकॅसल** ( टाईनवरचें ).— इंग्लंड. नार्दम्बरलंड परगण्याचें मुख्य बंदर व शहर. हें म्युनिसिपल, काउंटी व पार्लमेंटरी बरो असून टाईन नदीच्या उत्तर तीरावर वसलेलें आहे. लोकसंख्या ( १९२१ ) २८६०६१. पूर्वी हें रोमन ठाणें होतें. परंतु त्याचे जुने अवशेष नाहींसे होत चालले आहेत. येथील किल्ला एका उंचवट्यावर असून तो दुसऱ्या हेनरीनें ११७२ ते ११७७ च्या दरम्यान बांधला. हा फार बळकट किल्ला होता. यांत पुराणवस्तुसंग्रहालय असून हा किल्ला न्यूकॅसलच्या पुराणवस्तुसंशोधनमंडळाच्या ताब्यांत आहे. येथें दोन जुनीं व कांहीं नवीं प्रार्थनामंदिरें आहेत. याशिवाय कार्पोरेशनची इमारत, व्यापारपेठ, वुडच्या स्मरणार्थ बांधलेली इमारत, ग्रे-स्मारक वगैरे पाहण्यासारख्या इमारती आहेत. येथें डरहॅम विश्वविद्यालयाला जोडलेली वैद्यक व शास्त्रीय शिक्षणाचीं दोन कॉलेजें आहेत, व दुसऱ्या शिक्षणविषयक संस्था बऱ्याच आहेत. लांग चित्रसंग्रहालय, वाङ्मय व तत्त्वज्ञानसंस्था, मेकॅनिक्स इन्स्टिट्यूशन, वगैरे पुष्कळ लोकोपयोगी संस्था आहेत. येथें पुष्कळ पार्क व बगिचे आहेत. न्यूकॅसल येथील मुख्य रेल्वे स्टेशन मोठें असून इमारतहि सुरेख आहे.

न्यूकॅसलची नदीवरील जागा व त्याच्या आसमंतांत सांपडणाऱ्या दगडी कोळशाच्या खाणी यांमुळें, ह्या शहराची

प्रसिद्धि आहे. कोळसा, रासायनिक द्रव्यें, लोखंडी काम, पोलाद, यंत्रें, मातीचीं भांडीं वगैरे पदार्थ निर्यात होतात. आयात पदार्थांत फळें, गहूं, पेट्रोलियम, अशुद्ध लोखंड, लांकूड व बटाटे हीं मुख्य आहेत. जहाजें बांधण्याचे, धातुकामाचे, दोऱ्या वळण्याचे व रसायनें करण्याचे कारखाने आहेत. येथील एल्सविक कारखाने जगप्रसिद्ध आहेत. येथून पार्लमेंटमध्यें दोन सभासद पाठविण्याचा हक्क आहे.

**न्यू गिनी**—अथवा पापुआ. हें ऑस्ट्रेलिया खेरीजकरून जगांतील सर्वांत मोठें असें बेट आहे. हें ऑस्ट्रेलियाच्या उत्तरेस आहे. राजकीय दृष्ट्या हें हॉलंड, जर्मनी व ग्रेटब्रिटन यांच्या ताब्यांत आहे. यांपैकीं हॉलंडच्या ताब्यांत या बेटाचा पश्चिम भाग असून ईशान्य व आग्नेयीकडील भाग अनुक्रमें जर्मनी (महायुद्धापूर्वी) व ग्रेटब्रिटन यांच्या ताब्यांत आहे. या बेटाच्या आंतील भाग डोंगराळ आहे, व त्याविषयीं फार त्रोटक माहिती उपलब्ध आहे. चार्लस लुई पर्वत, स्नोई अथवा स्नोऊ ( याचें वील्हेल्मीना नांवाचें शिखर १५,८०० फूट उंच आहे ) वगैरे पर्वत डच न्यूगिनीमध्यें आहेत; ओवेन स्टन्ले ( याचें त्याच नांवाचें शिखर, १३१२० फूट ) व सर्क्यूग हे पर्वत ब्रिटिश गिनींत आहेत या बेटांत नाव्य नद्या आहेत. त्यांपैकीं मुख्य अम्बेर्नो, कायसरिन आगस्टा व फ्लाय या आहेत. या बेटांत पर्जन्य बेताचाच पडतो. येथील हवा आल्हादकारक आहे येथील वनस्पती मलायन व ऑस्ट्रेलियन वनस्पतीसारख्या आहेत. येथें सस्तन प्राणी फार थोडे आहेत, पण पक्षी असंख्य आहे. या बेटांतून बिचोडीमेर ( समुद्रांतील जळू ), खोबरें, हस्तिदंत, चंदनाचें लांकुड, रबर, मातीचीं भांडीं, शिंपा, मोतीं, साबूदाणा, कॉफी, सोनें व कोको हे जिन्नस परदेशीं पाठवितात येथील खनिज पदार्थांविषयीं अजून कांहीं माहिती नाहीं. या बेटांतील आपआपले प्रांत हॉलंड, जर्मनी व ग्रेटब्रिटन यांनीं अनुक्रमें १८४८, १८८४ व १८८५ सालांत मिळविले. या बेटांतील लोक मेलानेसीयन वर्गाचे असून त्यांना पापुअन ही संज्ञा आहे. येथील बहुतेक जातीचे लोक नरहत्या करणारे व नरमांसभक्षक आहेत

**ड च न्यू गि नी.**—डच लोकांनीं किनाऱ्यावरील डोरेहसारखीं कांहीं व्यापारी ठाणीं आपल्या ताब्यांत ठेवून बाकी राहिलेला प्रदेश टिडोरच्या सुलतानाच्या नामधारी सत्तेखालीं राहूं दिला आहे. या डच न्यू गिनी प्रदेशाचें क्षेत्रफळ १५१७८९ चौरस मैल असून लोकसंख्या २ लक्षांवर आहे.

**ज र्म न न्यू गि नी.**—अथवा कायसर विल्यमचा प्रदेश. येथील राज्यव्यवस्था चालविण्याकरितां एक गव्हर्नर नेमलेला असे. या भागांत कैसरविल्हेम्स लँड आणि बिस्मार्क द्वीपसमूह यांचा समावेश होतो. हा भाग जर्मनीच्या ताब्यांत गेल्याबरोबर तेथें वखारी, व्यापारी सुधारणा, आणि राज्यकारभार हीं सुरु करण्यांत आलीं. याचे दोन भाग करण्यांत येऊन दोहोंची राज्यव्यवस्था निराळी केली आहे. या दोहोंवर एक गव्हर्नर नेमलेला असे. राजधानीचें ठिकाण हर्बर्टशोहो हें आहे. साधारण क्षेत्रफळ ७० हजार चौरस मैल आहे व १९१४ सालीं ऑस्ट्रेलियन सैन्यानें हा प्रदेश काबीज केल्यापासून तो ब्रिटिश लष्कराच्या ताब्यांत आहे.

**ब्रि टि श न्यू गि नी.**—या प्रदेशाचें पापुआ हें नांव असून याचें क्षेत्रफळ ९०५१० चौरस मैल आहे. येथील लोकसंख्या ४५०००० आहे. ह्याची एक क्राऊन कॉलनी ह्या नात्यानें राज्यव्यवस्था होते. येथें लेफ्टेनन्ट गव्हर्नर असून त्याला मदतनीस म्हणून एक संयुक्त कायदेकौन्सिल व एक अंमलबजावणीकौन्सिल हीं आहेत. मुख्य शहर पोर्ट मोरेस्बी हें आहे. चटया, जाळीं, दगडी अवजारें, मातीचीं भांडीं, होड्या तयार करणें हे उद्योगधंदे आहेत. येथें सोनें, खोबरें, साबुदाणा वगैरेहि जिन्नस होतात

**न्यू ग्रॅनडा**—प्रस्तुत ज्यास कोलम्बिया म्हणतात त्या दक्षिण अमेरिकेंतील भागास हें पूर्वीचें स्पेनच्या अंमलाखालीं असतांना मिळालेलें नांव आहे. "न्यू ग्रॅनडा" या नांवाखालीं कोलम्बियाखेरीज व्हेनेझुएला व इक्वेडोर यांचा समावेश होत असे. १५३७ सालीं बोगोटा पठार जिंकल्यानंतर त्या भागाला "लिओरेनोडी ग्रॅनडा" हें नांव देण्यांत आलें, व १५५० सालीं हा भाग पेरूच्या सुभ्याला जोडण्यांत आला. पेरूच्या सुभ्याचें क्षेत्र अवाढव्य झाल्यामुळें, स. १७१८ सालीं, उत्तरेकडील टंबुजपासून तों पनामाच्या उत्तर टोंकापर्यंत व पूर्वेकडील ओरिनोकोपर्यंतचा सर्व भाग वेगळा काढण्यांत आला व या भागाला "नेव्हा ग्रॅनडा" अगर न्यू ग्रॅनडा हें नांव देण्यांत आलें "न्यू ग्रॅनडा" ही स्पॅनिश वसाहत असे, व त्यावेळीं यांत टेराफर्मा ( प्रस्तुतचें पनामाचें प्रजासत्ताक राज्य ), माराकाइबो, कराकस, कुमाना, ग्वायना, वगैरे बऱ्याच स्पॅनिश वसाहतींचा समावेश होत असे. सध्यां यांपैकीं कांहीं वसाहती व्हेनेझुएला व इक्वेडोर यांत समाविष्ट होतात. बाकीचा सर्व भाग म्हणजे आजचें "कोलंबियाचें प्रजासत्ताक राज्य" होय.

**न्यू जर्सी**—उत्तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक संस्थान. क्षेत्रफळ ८२२४ चौरस मैल; पैकीं ७१० चौ. मैलांचा प्रदेश पाण्यानें व्यापिला आहे. लोकसंख्या (१९१५) २८४४३४२; पैकीं २७३९५६० गोरे आणि ९५८२१ निग्रो लोक होते. १९१८ सालची लोकसंख्या ३०८०३७१ होती. ट्रेन्टॉन हें राजधानीचें शहर आहे. न्यूअर्क हें स्टेटमधील सर्वांत मोठें शहर असून येथील लोकसंख्या ( १९१७ ) ४१८७८९ आहे. एकंदर लोकसंख्येच्या शेंकडा ७५ लोक शहरांतून राहतात. शेंकडा ५१.५ लोक रोमन कॅथोलिक धर्माचे आहेत. त्यांच्या खालोखाल अनुक्रमें मेथॉडिस्ट, प्रेसबिटेरियन, बॅप्टिस्ट आणि, प्रॉटेस्टंट एपिस्कोपल या धर्मसंप्रदायांचे लोक आहेत.

प्राथमिक शिक्षण सक्तीचें असून तें मोफत दिलें जातें. ७ ते १५ वर्षें वयाच्या मुलांकरितां शिक्षण सक्तीचें केलें आहे. उच्च शिक्षणाकरितां, ' प्रिन्स्टन युनिव्हर्सिटी ', ' इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी,' इत्यादि संस्था आहेत. त्याचप्रमाणें, २ वेड्यांचीं इस्पितळें, २ अनाथपंगुगृहें, १ क्षयरोग्यांकरितां दवाखाना आणि आंधळ्यामुक्यांकरतां एक शिक्षणशाळा याप्रमाणें उपयुक्त सार्वजनिक संस्था येथें आहेत.

१९१७ सालीं संस्थानचें उत्पन्न व खर्च अनुक्रमें १५११३८३५३ डॉलर व १२०२०८९० डॉलर होता. शेतकी आणि बागाईत हे या संस्थानचे मुख्य धंदे आहेत. मका, चारा आणि बटाटे हीं मुख्य पिकें आहेत. फळफळावळहि पुष्कळ पिकते. घोडे, गायी, मेंढ्या आणि डुकरें इत्यादि प्राणी सर्वत्र आढळतात. लोखंड, जस्त, मँगनीज, शंखजिरें, अभ्रक, ग्रॅफाईट यांच्या खाणी येथें आहेत. तथापि लोखंड आणि जस्त या दोनच धातू हल्लीं खाणींतून मोठ्या प्रमाणावर खणून काढतात. सिमेंट, माती, मातीचीं भांडीं, विटा इत्यादि वस्तू बाहेरदेशीं रवाना होतात. तेलें शुद्ध करणें, स्फोटक द्रव्यें तयार करणें, टाईप पाडणें आणि रेशमाचें कापड विणणें इत्यादिकांचे कारखाने न्यू जर्सी स्टेटमध्यें आहेत. १९१८ सालीं संस्थानांत, २४५५ मैल लांबीचा वाफेच्या गाडीचा आणि १३०२ मैल लांबीचा विजेच्या गाडीचा रस्ता तयार झाला.

२१ सभासदांचें वरिष्ठ मंडळ ( सेनेट ) आणि ६० सभासदांचें प्रतिनिधिमंडळ ( जनरल असेंब्ली ) असतें. काँग्रेस मध्यें, न्यू जर्सी स्टेटतर्फे वरिष्ठ मंडळांतील आणि प्रतिनिधिमंडळांतील अनुक्रमें २ व १२ सभासद पाठविले जातात. या संस्थानाचे २१ परगणे पाडण्यांत आले आहेत.

**न्यू झीलंड**—ही एक ब्रिटिश वसाहत आहे. दक्षिण अक्षांश ३४° २५' ते ४७° १७' व पूर्वरेखांश १६६° २६' ते १७८° ३६' यांवर दक्षिण पॅसिफिक महासागरांत असलेल्या बेटांचा हा समूह आहे. हा द्वीपसमूह टास्मानिया व व्हिक्टोरिया यांच्या पूर्वेस आहे. याची राजधानी वेलिंग्टन सिड्नेहून १२०४ मैल दूर आहे. दूर असलेल्या कांहीं बेटांपैकीं चॅथॅम, ऑकलंड व कॅंवेल बेटें फक्त महत्त्वाचीं आहेत. हीं सर्व गवतानें आच्छादित आहेत, व चॅथॅम बेटांत शेळ्या पाळणारे वसाहतवाले आहेत. ऑकलंड बेटांत पॅसिफिक महासागरांतील दोन छानदार बंदरें आहेत. न्यूझीलंडच्या उत्तरेस६००मैलांवर कर्मेडेक्सवर फार सुंदर वनस्पती आहेत. पॉलमेशिया १८९३ सालीं न्यूझीलंडच्या ताब्यांत आला. कुक समूहांतील रॅरोंगा, मॅनगैआ व नियें हीं मोठीं बंदरें आहेत; पेनऱ्हीन व सुवारो लहान आहेत. न्यूझीलंड नॉर्थ ( उत्तर ) आणि साउथ ( दक्षिण ) बेटें व रॅकिडरा बेटें यांचें बनलेलें आहे. नॉर्थ व साउथ बेटें यांच्यामध्यें कुक सामुद्रधुनी आहे व साउथ बेट आणि रॅकिडरा यांच्यामध्यें फोव्होन सामुद्रधुनी आहे. नॉर्थ व साउथ बेटांचें एकंदर क्षेत्रफळ १०४४७१ चौरस मैल व रॅकिडराचें ६२१ चौरस मैल आहे.

याचें मुख्य नैसर्गिक वैशिष्ट्य म्हटलें म्हणजे ईशान्येस कुक सामुद्रधुनीपासून ईस्ट केपपर्यंत जाणाऱ्या अखंड पर्वतश्रेणी या होत. या सर्वांत उंच शिखर इकुरंगी आहे. रुआपेहू ज्वालामुखी केव्हां केव्हां जळत असतो, गारुहोमधून धूर व वाफ नेहमीं निघते. एगमॉट फार प्रेक्षणीय आहे. पहिल्या दोन ज्वालामुखीपर्वतांच्या उत्तरेस टॉपो सरोवर ( क्षे. फ. २३८ चौरस मैल ) आहे. या सरोवरापासून ५००० चौरस मैल उष्णोदकाच्या झऱ्यांचा प्रदेश माउंट रॅपेहूपासून व्हाइट आयलंडपर्यंत पसरलेला आहे. या झऱ्यांच्या पाण्याचा रोगनाशकत्वाबद्दल फार ख्याति आहे. सुंदर सरोवरें, धबधबे, थंड, समशीतोष्ण व उकळणाऱ्या पाण्याचीं डबकीं, कढत पाण्याचे झरे ( गेशर ) व चिखलाचे ज्वालामुखीपर्वत हीं पाहण्यासाठीं पुष्कळ प्रवासी येथें येतात. रोटोरुआ सरोवरावर सरकारी आरोग्यमंदिर आहे व टॉपो सरोवराजवळ व इतर ठिकाणीं खाजगी स्नानगृहें आहेत. दक्षिण बेटांत उष्णोदकाचीं सरोवरें आहेत व हॅन्मर मैदानांत सरकारी आरोग्यमंदिर आहे. संधिवात, कातडीचे रोग यासारख्या रोगांवर या उष्णोदकानें गुण येतात असा अनुभव आहे. वायकोटो व वायट्टू उत्तरेस वाहतात. रॅंगिटैकी ईशान्येस व मोकौ, मंगानुइ व रॅंगिटिकी या नद्या पश्चिमेस अथवा नैर्ऋत्येस वाहतात. वायकोटो ७० मैल नाव्य आहे. वैकारेमोना हें सुंदर, खोल व मोठें सरोवर आहे. वायकोटोच्या मुखापासून केप टेराव्हिटीपर्यंत २० ते ४० मैल रुंदीचा पश्चिम किनाऱ्यावरील प्रदेश चराऊ व दुधदुभत्याच्या धंद्यांकरितां चांगला आहे. पूर्वकिनारा असाच सुपीक आहे. दक्षिणेस चारा व गळिताचीं धान्यें यांना योग्य हवा आहे. बेटाच्या टोंकाचा प्रदेश निकस आहे. येथें पोर्ट निकोलसन नांवाचें छानदार बंदर आहे. जरी कांहीं भागाची जमीन निकस व दुभागलेली आहे तरी बेटाचा फारच थोडा भाग लागवडीस किफायतशीर होणार नाहीं डोंगरपठार व पर्वतांचा उंच प्रदेश खेरीजकरून सर्वत्र पुरेसा पाऊस, सौम्य हिंवाळे व मजेदार उन्हाळे अनुभवास येतात. दक्षिण बेटाचा किनारा उंच व अडचणीचा आहे, यावर चांगलीं बंदरें नाहींत. दक्षिण बेटाचा प्रदेश डोंगराळ आहे. नद्या लहान असून त्या दळणवळणाला निरुपयोगी आहेत. परंतु त्या पाटबंधाऱ्यांच्या उपयोगी पडूं शकतात. सर्वांत मोठी नदी क्लुथा ८० मैल लांब आहे. पश्चिमेस बुलर व ग्रे या नद्या आहेत. टे ॲनाव व वाकाटिपु हीं मुख्य सरोवरें आहेत. मॅनापौरी हें फार मनोवेधक सरोवर आहे. आवरंगी हें उंच शिखर आहे, या बेटांत धबधबे व बर्फाच्या नद्या आहेत. टास्मान ( १८ मैल लांब ) व मुर्चिसोन ( १० मैल लांब ) या बर्फाच्या नद्या आहेत. सदरलंड धबधबा १९०४ फूट उंच आहे. ओटिरा

नांवाचा सुंदर बोगदा असून यांतून पूर्व किनाऱ्याहून पश्चिम किनाऱ्याला जातां येतें. पश्चिम व मध्यभागांत सोनें व कोळसा सांपडतो. येथील हवा आरोग्यकारक आहे. पर्जन्यवृष्टि सालीना ३०–५० इंच होते.

व न स्प ती.—फुलें येणाऱ्या सुमारें १००० वनस्पतींच्या जाती येथें आहेत. फर्न वगैरे झाडें विपुल व निरनिराळ्या प्रकारचीं आहेत.

प्रा णी.—टुइ, मॅकोमॅको हे गाणारे पक्षी, अप्टेरिक्तेस, काकापो, वेका आणि रिटच हे जंगली पक्षी आहेत जंगलाच्या बाहेर पंख नसलेला वेका पक्षी आढळतो तर आल्पसुमध्ये की नांवाचा ससाण्यासारखा हिरवा पोपट शेळ्या राखतो. पुकेको असंख्य आहेत; रानटी बदकें आहेत; ऑयस्टर, शार्क वगैरे जातीचे मासे सांपडतात. रानटी कुत्रे व जंगली डुकरें आहेत. रॅबिट, चिमण्या वगैरे विनाशक प्राणीहि आहेत.

लो क सं ख्या.—१९२० सालच्या खानेसुमारींत न्यूझीलंडची लोकसंख्या १२५७४१७ भरली. येथें यूरोपियन व मेओरी लोकांची वस्ती जास्त आहे.शिवाय चिनी, सीरियन व हिंदु लोक आहेत. १९१६ त १८१ हिंदु होते.१९०५ सालीं येथील संपत्ति माणशीं २९२ पौंड होती. खाजगी आणि सार्वजनिक संपत्ति २७ पौंड आहे.

व्या पा र.—आस्ट्रेलिया, संयुक्तराज्य, संयुक्तसंस्थानें, हिंदुस्थान, फिजी बेटें वगैरेंशीं व्यापार चालतो. १९२१सालीं आयात-निर्गतीचे आंकडे अनुक्रमें ५५६५८५०२ आणि १३११६५१४ पौंड असे आहेत. लोंकर, शेळ्या, व गोठलेलें मांस बाहेर देशीं पाठवितात. ताग देखील बाहेर जातो.

ख नि ज प दा र्थ.—सोनें, कौरीडिंक, कोळसा, रुपें, पेट्रोलियम, संगमरवरी ( मार्बल ), व इतर इमारती दगड, तांबें, लोखंड, शिसें, जस्त, अँटिमनी, क्रोम व मँगनीज हीं खनिज द्रव्यें येथें सांपडतात.

उ द्यो ग धं दे.—मांस गोठणें; कातडें कमावणें, व लोंकर कातणें व ताग बनविणें, बूट व जोडे तयार करणें, लोंकरीचें कापड व कपडे बनविणें; लोणी व चक्का दहीं काढणें, दारूच्या भट्या लावणें, छापखाने; लोखंडाचे कारखाने; शेतकीचीं आउतें; व यंत्रांचीं दुकानें; साबण व मेणबत्त्या यांचे कारखाने; गाड्या बांधणें व सामान बनविणें हे येथील धंदे आहेत. १९०६ ते १६ च्या दरम्यान सुमारें ४६७० कारखाने होते व त्यांतून ६० हजार लोक कामाला होते.

रा ज्य व्य व स्था.—न्यूझीलंडची वसाहत प्रथमपासून एका मध्यवर्ती सत्तेच्या ताब्यांत नव्हती. सहा निरनिराळ्या वसाहती ( ऑकलंड, वेलिंग्टन, नेल्सन, न्यूप्लायमऊथ, . कँटरबरी, व ओटागो ) येथें होत्या. १८५२ सालच्या कायद्यान्वयें यांचे निरनिराळे प्रांत बनविण्यांत आले. प्रत्येक प्रांतांत कौन्सिल व सुपरिन्टेंडेन्ट नेमण्यांत आले व सर्वांत एकच वसाहतीकायदा सुरू केला. १८७६ सालीं ही पद्धति रद्द करण्यांत आली. सार्वजनिक सभा, गव्हर्नर, कायदे करणारें कौन्सिल व प्रतिनिधिमंडळ यांची बनलेली असते. गव्हर्नरची नेमणूक स्वतः राजा करतो; परंतु त्याचा पगार वसाहतीस द्यावा लागतो. कायदेकौन्सिलच्या सभासदांची नेमणूक सात वर्षांकरितां गव्हर्नर कौन्सिलच्या मदतीनें करतो; यांची संख्या ४५ असते. मतदार लोकांनीं निवडलेल्या८०सभासदांचें प्रतिनिधिमंडळ बनलेलें असतें. दोन्ही मंडळांच्या सभासदांना पगार मिळतो. या मंडळाची मुदत तीन वर्षांची असते. गव्हर्नर जेव्हां ही सभा बरखास्त करतो तेव्हां पुन्हां निवडणूक होते. प्रतिनिधिमंडळाचे चार सभासद मेओरी लोकांनीं निवडलेले त्यांच्या जातीचे असले पाहिजेत. राज्यकारभार पार्लमेंटरी राज्यव्यवस्थेच्या धोरणावर चालतो इंग्लंडमध्यें येथील एक प्रतिनिधि हायकमिशनर असतो. स्थानिक कारभार स्थानिक लोकनियुक्त संस्था पाहतात. यांना कर बसविण्याचा अधिकार असतो. जकात, स्टँप, जमीनमहसूल, प्राप्तीवरील व दारूवरील कर, टपाल व तारखातें यांचें उत्पन्न, रेल्वे–उत्पन्न, सरकारी जमिनींच्या विक्रीचें उत्पन्न व त्यांचा महसूल या उत्पन्नाच्या बाबी आहेत.

शि क्ष ण.—१८७७ च्या शिक्षणाच्या कायद्यानें शिक्षण सात व तेरा वर्षांच्या दरम्यान वयाच्या मुलांकरितां मोफत, व सक्तीचें केलें आहे. शाळांत हजर असलेल्या मुलांच्या सरासरीतील प्रत्येक मुलामागें कांहीं ग्रँट देण्यांत येते, प्राथमिक शाळांतून दुय्यम शिक्षणाच्या शाळेकरितां व शिक्षक तयार करण्याच्या शाळांत, शिष्यवृत्त्या देण्याकरितां देणग्या ठेविल्या आहेत. सार्वजनिक जमिनी मोठ्या प्रमाणावर प्राथमिक व दुय्यम प्रतीच्या, व विश्वविद्यालयांतील शिक्षणाकरितां राखून ठेविल्या आहेत. विद्यार्थ्यांच्या पालकांच्या स्कूलकमिट्यांनीं निवडलेल्या प्रांतिक शिक्षणबोर्डांच्या ताब्यांत सर्व प्राथमिक शिक्षणाच्या व कांहीं दुय्यम प्रतीच्या शिक्षणसंस्था असतात. एतद्देशीय खेड्यांत सुद्धां शाळा स्थापल्या आहेत. शिवाय धंदेशिक्षण अनाथाश्रम, बहिरे, मुके व आंधळे यांच्याकरितां शाळा आहेत. न्यू–झीलंडचें विश्वविद्यालय परीक्षा घेतें आणि पदव्या देतें. या पदव्या ब्रिटिश साम्राज्यांतील विश्वविद्यालयांच्या पदव्यांप्रमाणें ब्रिटिश राज्यांत मानल्या जातात. ऑकलंड, वेलिंग्टन, ख्राइस्टचर्च, ड्युनेडिन व नेल्सन येथें विद्यालयें आहेत. धर्मासंबंधीं ढवळाढवळ सरकार करीत नाहीं.मुलें आपआपल्या पंथाच्या धार्मिक शाळांत रविवारच्या शाळांतून धर्मशिक्षण घेतात. सरकार सालीना सुमारें ३५०० पौंड हस्तकला व धंद्यांच्या शिक्षणाकरितां खर्च करतें. इंजिनियरिंग व कृषिकर्म यांचीं दोन विद्यालयें युनिव्हर्सिटी कॉलेजला जोडलीं आहेत, व खाणीचें काम शिकविण्याच्या शाळा इतर कित्येक आहेत.

खाजगी शाळा देखील आहेत व त्यांमधून शेकडा १० मुलांनां शिक्षण मिळतें.

कारखान्यांत काम करणाऱ्याचें वयोमान चवदा वर्षे ठरविल्यामुळें मुलांच्या शिक्षणाची सोय उत्तम झाली आहे. १९१६ सालच्या खानेसुमारीवरून पहातां शेंकडा ८३ लोक साक्षर आहेत असें दिसतें. १९१९–२० सालीं शिक्षणाप्रीत्यर्थ २५४४००० पौंड खर्च करण्यांत आले.

वृ द्ध वे त न.—वसाहतींत पंचवीस वर्षे राहिलेल्या व पासष्ट किंवा त्यांहून जास्त वयाच्या इसमांस सालीना १८ पौंड पेन्शन देण्याचा कायदा स. १८९८मध्यें करण्यांत आला. पेन्शनर, गरीब ब्रिटिश रहिवाशी असून गुन्हेगार अथवा इतर कोणत्याहि प्रकारें वाईट चालीचा इसम नसला पाहिजे. पुढें हे पेन्शन सालीना २५ पौंड झालें.

इ ति हा स.—न्यूझीलंडमध्यें मनुष्यांची वसाहत केव्हां झाली हें निश्चित नाहीं. चवदाव्या शतकांत पॉलिनेशियन नावाडी याच्या उत्तर किनाऱ्यावर कित्येकदां आले. १६४२ त हे लोक साउथ बेटांत पसरले होते. १२७ वर्षांनीं कुक यानें या किनाऱ्याची बरीच माहिती मिळविली. हा देश ब्रिटिश राज्यांत समाविष्ट केला; परंतु ब्रिटिश सरकारनें हें कृत्य मान्य केलें नाहीं. यानंतर फ्रेंच, रशियन, स्पॅनिश व अमेरिकन नाविक सील, देवमासे पकडणारे व ताग व सागवान यांचा शोध करणारे व्यापारी आले. स. १८१४ मध्यें इंग्लिश मिशनरी आले. परंतु स. १८३९पर्यंत शांतता व ख्रिस्ती धर्म यांची भरभराट झाली नाहीं. वेकफील्ड यानें न्यूझीलंड ब्रिटिश राज्यास जोडलें जाण्याबद्दल निष्फळ प्रयत्न केला व अखेरीस पैसे देऊन जमिनी खरेदी करण्याचा व वसाहतवाल्यांस एका जहाजांत न्यूझीलंडमध्यें पाठविण्याचा बेत केला. फ्रेंच सरकार फ्रेंच कंपनी न्यूझीलंडला पाठविणार आहे हें वर्तमान ऐकल्यावर ब्रिटिश सरकारनें नाइलाजानें कॅप्टन हॉब्सनला न्यूझीलंड शांततेनें खालसा करण्याकरितां पाठविलें. १८४० सालीं येथें येऊन हॉब्सननें एतद्देशीय नायकांनां त्यांचें राज्य त्यांच्याकडे कायम ठेवण्याचें आश्वासन देऊन ब्रिटिश वर्चस्वाखालीं आणिलें. त्या बेटावर युनियन जॅक उभारलें. फ्रेंच कंपनी मागाहून आली. परंतु नाइलाजानें ते ब्रिटिश प्रजाजन बनले. वेकफील्डचे वसाहतवाले न्यूझीलंड कंपनीपासून जमिनी विकत घेतल्या म्हणून स्वामित्वाचा हक्क सांगूं लागले. परंतु त्याचे हक्क ब्रिटिश सरकारनें कबूल केले नाहींत. ऑकलंड वसविल्यानंतर हॉब्सन मेला. याच्या मागून फिट्झरॉय आला व एका एतद्देशीय लढाईत गुंतला. अखेरीस ग्रेला पाठविण्यांत आलें. यानें गोरे व एतद्देशीय पिंगट वर्णाच्या लोकांमध्यें समतोलपणा राखला व वसाहत करण्याकरितां साउथबेट व इतर पुष्कळ जमीन विकत घेतली.

१८५२ सालीं इंग्लंडनें याला स्वराज्य दिलें व बरीच ओरड झाल्यावर स. १८५६ मध्यें पूर्ण पार्लमेंटरी पद्धत व जबाबदार मंत्रिमंडळें स्थापण्यांत आलीं. यानंतर वीस वर्षांच्या राजकीय इतिहासांत दोन मुख्य गोष्टी घडून आल्या. पहिली, ऑकलंड अथवा वेलिंग्टन येथील मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकार यांच्यामधील लढे व दुसरी, जातिविषयक लढाई या होत. एतद्देशीय लोक हुषार व शूर होते व जमिनी विकण्याच्या विरुद्ध त्यांनीं एक संघ करून उरलेला साउथ बेटाचा भाग आपणाकरितां राखण्याचा व आपला एक राजा स्थापण्याचा निश्चय केला. स. १८७१ नंतर मेओरी लोकांनीं लढाई थांबविली व वसाहतवाले सुद्धां लढाईला कंटाळून जाऊन समेट करण्याचे उपाय योजूं लागले, व त्यांनीं मेओरी लोकांचे प्रतिनिधी पार्लमेंटांत घेतले. बाकीचा समेट एतद्देशीय धोरणी मंत्री सर डोनाल्ड मॅक्लीन यानें घडवून आणला. बारा वर्षांनंतर रस्ते बांधणें, इत्यादि काढून घेणें वगैरे उपायांनीं उत्तर बेटांतलि वसाहतीचें काम पुन्हां सुरू झालें. ग्रे वसाहतीच्या प्रधानाशीं भांडला. त्याची नोकरी स. १८६८ मध्यें संपली. याच्या मागून बोवेन, फर्ग्युसन, रॉबिनसन हे आले व यांनीं शांततेनें व पद्धतशीरपणें गव्हर्नरचें काम केलें. देशांतील हवा चराईस अनुकूल असल्यामुळें वसाहतवाले जंगल जाळून त्या जमिनींत इंग्लिश गवताची लागवड करीत व शेळ्या पाळीत. हा धंदा फार किफायतशीर ठरला. पुढें सोन्याच्या खाणी सांपडल्या. लोकर, सोनें उत्पन्न करणें हेच प्रमुख धंदे बनले. सोनें सांपडल्यामुळें पुष्कळ लोक खाणीच्या कामाकरितां आले व येथेंच कायम राहिले. स. १८७० मध्यें शांतता पूर्णपणें स्थापित झाली नव्हती; धंदे ऊर्जितावस्थेला आले नव्हते. याच वेळेस व्होगेल नांवाच्या फडणविसानें १० लक्ष पौंडाचें कर्ज काढून रेल्वे बांधणें व जमिनी खरेदी करून नवीन वसाहतवाल्यांस देणें या कामीं खर्च करण्याचें सुचविलें. प्रथम या धोरणानें कांहीं भरभराट झाली. परंतु स. १८७९ मध्यें लोकर व गहूं यांचे भाव कमी झाले व सोळा वर्षेपर्यंत आपत्ति ओढविली. यानंतर भरभराटीचीं आठ वर्षे गेलीं. शांतता, रेल्वे, तारायंत्रें ( यूरोपशीं तारेचें दळणवळण ) शेतकी यंत्रें व मोठी लोकसंख्या यामुळें न्यूझीलंडची मूळची स्थिति अजीबात पालटली. १८७६सालीं प्रांतिक सरकार बंद करण्यांत आलें व त्याची सत्ता मध्यवर्ती सरकार व लहान सत्ताहीन स्थानिक संस्था यांच्यामध्यें विभागण्यांत आली. मेओरी लोकांची लढाईहि थांबली होती. यामुळें संपत्ति व उदारमतवाद्यांचें राजकारण यामध्यें लढे सुरू झाले. ग्रे हा उदारमतवादी मुत्सद्दी होता. इ. सन १८७७ मध्यें मोफत, सक्तीचें आणि धर्मसंबंधीं ढवळाढवळ न करणाऱ्या शिक्षणाची व्यवस्था करण्यांत आली. राष्ट्रसंपत्ति ही सरकारी अधिकाऱ्यांच्या हातांत दिलेली सार्वजनिक ठेव आहे. जनतेला चौकशी करण्याचा अधिकार देणारा कायदा व सरकारनें काढलेली सार्वजनिक आयुष्यांच्या विम्याची संस्था, या दोन गोष्टींवरून येथील समाजसुधारणावाद्यांच्या मतांचा कल कोणीकडे होता हें स्पष्ट दिसत होतें. ग्रे चांगला फडणवीस

व लोकनायक ठरला नाहीं. व त्यानें बसविलेल्या जमीनीवरील करानें शेतकरी घाबरले. स.१८७९ च्या सांपत्तिक आपत्तीमुळें खजिना रिक्त झाला. ग्रेला जागा सोडावी लागली व जॉन हॉल व हॅरी एट्किन्सन यांनीं कारभार हातीं घेतला. ठोकळमानानें स.१८७९ ते १९०८ पर्यंतच्या या वसाहतीच्या औद्योगिक व व राजकारणाच्या इतिहासाचे दोन भाग करतां येतील. सोळा वर्षांच्या आपत्तीनंतर स.१८९५–१९०८पर्यंत समृद्धतेचीं तेरा वर्षे गेलीं. पुराणमतवादीपक्षाच्या हातीं बारा वर्षे सत्ता राहिल्यानंतर उदारमतवाद्यांनीं सतरा वर्षे सत्ता धारण केली. १८८० मध्यें राष्ट्रीय कर्ज २५०००००० पौंड होतें. जमीनीवरील जबर कर व स. १८७९मध्यें कांहीं काळपर्यंत जकातीचे वाढविलेले कर या उपायांनीं सांपत्तिक समता कायम ठेवण्यांत आली. याशिवाय पगार व रोजमुरे $\frac{1}{10}$ नें कमी करण्यांत आले होते. प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर देखील वाढविण्यांत आले. स. १८७९–१८९० मध्यें मुख्य राजकारणी पुरुष सर हॅरी एट्किन्सन हा होता. जॉन बॅलन्स याच्या आधिपत्याखालीं प्रागतिक पक्षानें एट्किन्सनची पिच्छेहाट केली. १८९३ पर्यंत (या सालीं बॅलन्स मेला) एट्किन्सनचें दूरदर्शी सांपत्तिक धोरण चालविलें. मजूरसंघांनीं स.१८९०च्या सार्वजनिक निवडणुकींत मजूरपक्षाचे मेंबर निवडून दिले. बॅलन्सनें कांहीं राजकारणसुधारणा व सामाजिक प्रयोग केले. बॅलन्सच्या नंतर रिचर्ड सेडन स्थानापन्न झाला. बायकांनां मत देण्याचा अधिकार देणारा कायदा यानें स. १८९३ मध्यें पास केला. शिवाय, १८९३ मध्यें दारूच्या नियंत्रणाचा कायदा स.१८९४ मध्यें वसाहतवाल्यांस आगाऊ कर्ज देण्यासंबंधीं कायदा व भांडवलवाले व मजूर यांसंबंधीं कायदे पास करण्यांत आले. १८९५ त नोकरनोंदणीच्या कचेऱ्यांसंबंधीं कायदा करण्यांत आला व वसाहतीच्या किनाऱ्यावरील व्यापार करणाऱ्या जहाजांच्या मालकांस स. १८९७ त वसाहतींतील मजुरांच्या दराप्रमाणें मजुरी द्यावयास लावली. इतक्यांत औद्योगिक समेट व मध्यस्थितीचा कायदा करण्यांत आला. स. १८९८ मध्यें म्हाताऱ्या लोकांनां पेन्शनें देण्याचा कायदा पास झाला. स.१८९९मध्यें अपघाताच्या विम्यांची व आगीच्या विम्यांची सरकारी ऑफिसें स्थापण्यांत आलीं. स. १८९९ मध्यें बोअर लढाई उपस्थित झाल्यामुळें न्यु–झीलंड रहिवाश्यांनीं मातृदेशाला सैन्याची मदत केली. १८९५ सालीं व्यापाराची अभिवृद्धि होऊं लागली. गुरें पाळणें, सोनें खणून काढणें, गोठलेलें मांस व दुभतें यांची नीट व्यवस्था हीं व्यापारवृद्धीचीं कारणें होतीं. स. १८७९–१९०८ या काळांत सात गव्हर्नर व दोन प्रधानमंडळें झालीं. देशांत, बाहेर देशाच्या लोकांनां येण्याची मनाई करणारा कायदा राजानें पास केला नाहीं.

१८९७, १९०३ व १९०७ या सालीं लंडन येथें भरलेल्या साम्राज्य–परिषदेंत न्यू–झीलंडचे मुख्य प्रधान हजर असल्यामुळें वसाहतीचा साम्राज्याशीं फारच निकट संबंध जडला.

अर्वाचीन इतिहास.—१९०६–१२ सालीं वॉर्डचें प्रधान मंडळ अधिकारारूढ होतें. या प्रधानमंडळाच्या अमदानींत लॅण्डसेटलमेंट, फायनॅन्स ॲक्ट, पब्लिकडेट एक्स्टिंक्शन ॲक्ट, नॅशनल प्रॉव्हिडंट ॲक्ट, लायसेन्सिंग ॲमेंडमेंट ॲक्ट, वुइडोज पेन्शन ॲक्ट इत्यादि लोकोपयोगी कायदे पसार झाले. पण या सर्वांत प्रमुख कायदा म्हणजे सक्तीचें लष्करी शिक्षण सुरू करणें हाच होय. जर्मनीनें आपलें आरमार वाढविण्यास सुरवात केल्यामुळें इंग्लंडला आपल्या आरमारी वर्चस्वाच्या शाश्वतीबद्दल भीति वाटूं लागली होती, व त्यामुळें इंग्लंडला आपलें आरमार वाढविण्याची काळजी उत्पन्न झाली. न्यूझीलंडनें, वसाहतीसाठीं एक क्रूझर बांधण्यासाठीं परवानगी मिळविली व १९१२सालीं हें काम सुरू झालें. सक्तीच्या लष्करी शिक्षणाची एक योजना तयार करण्यांत येऊन ती १९१० सालीं पसार झाली. याच सुमारास लॉर्ड किचनेर हा न्यू–झिलंडमध्यें आला होता. त्यानें २० हजार सैन्य उभारण्याची न्यू–झीलंडला शिफारस केल्यामुळें त्या अर्थाचा नवीन कायदा पसार करण्यांत आला. १९१३–१४ सालीं खडें सैन्य ५७८, टेरिटोरियल्स २५९०२, सीनीयर कॅडेट्स २५६५९ व लष्करी खात्यावरील खर्च ५११२९४ पौंड होता.

१९११ सालीं नवीन निवडणुकीला सुरवात झाली- या वेळीं देशांत लिबरल, लेबर, रिफॉर्मर व इंडिपेंडन्ट असे चार पक्ष होते. लिबरल पक्षाच्या लोकांनां मान्य होण्यासारखा कोणताच कार्यक्रम नसल्यानें व त्यांच्या २१ वर्षांच्या राज्यकारभारांत पक्षपातीपणा दिसून येऊं लागल्यानें लोकांनां रिफॉर्मर पक्षाची सरशी व्हावी असें वाटूं लागलें होतें. लेबर उर्फ मजूरपक्षहि लिबरल पक्षापासून स्वतंत्र झालेला होता. व लिबरल पक्षाविरुद्ध त्यानें मोहीम चालविली होती. यामुळें नव्या निवडणुकींत लिबरल पक्षाचा जरी पराभव झाला नाहीं तरी सरशीहि झाली नाहीं. लिबरल व रिफॉर्म पक्षाचे सारखेच लोक निवडून आले. त्यामुळें अद्यापिहि लिबरल पक्षच अधिकारारूढ राहिला. वॉर्डनें मात्र प्रधानकीचा राजीनामा दिला व त्याच्या जागीं मॅकेंझी हा प्रधान निवडून आला. पण पार्लमेंटच्या पहिल्या बैठकींतच लिबरल पक्षाचा पराभव होऊन प्रधानमंडळाला राजीनामा देणें भाग पडलें व त्यामुळें मॅसी या रिफॉर्म पक्षाच्या पुढाऱ्यानें आपलें प्रधानमंडळ बनविलें.

रिफॉर्म पक्षाच्या अमदानींत शासनघटनेंत बरेच फेरफार करण्यांत आले. मतदानपद्धतीचें संकुचित स्वरूप नाहींसें करून तिला व्यापक स्वरूप देण्यांत आलें. पण सर्वांत महत्त्वाचा जो जमिनीचा प्रश्न तोहि या प्रधानमंडळानें चांगल्या तऱ्हेनें निकालांत काढला. वॉर्डच्या प्रधानमंडळानें पूर्वीची कायमधारापद्धति नाहींशी करून त्या जागीं मुदतबंदीची पद्धत अमलांत आणली होती. ६६ अगर ९९ वर्षांच्या करारानें शेतकऱ्यांनां जमीन द्यावयाची व तेवढी मुदत संपल्यानंतर जमिनीला जो तत्कालीन दर येईल त्याप्रमाणें खंडानें द्यावयाची पद्धत वॉर्डच्या प्रधानमंडळानें

खाजगी शाळा देखील आहेत व त्यांमधून शेंकडा १० मुलांनां शिक्षण मिळतें.

कारखान्यांत काम करणाऱ्यांचें वयोमान चवदा वर्षें ठरविल्यामुळें मुलांच्या शिक्षणाची सोय उत्तम झाली आहे. १९१६ सालच्या खानेसुमारीवरून पहातां शेंकडा ८३ लोक साक्षर आहेत असें दिसतें. १९१९–२० सालीं शिक्षणाप्रीत्यर्थ २५४४००० पौंड खर्च करण्यांत आले.

वृ द्ध वे त न.—वसाहतींत पंचवीस वर्षें राहिलेल्या व पासष्ट किंवा त्यांहून जास्त वयाच्या इसमांस सालीना १८ पौंड पेन्शन देण्याचा कायदा स. १८९८मध्यें करण्यांत आला. पेन्शनर, गरीब ब्रिटिश रहिवाशी असून गुन्हेगार अथवा इतर कोणत्याहि प्रकारें वाईट चालीचा इसम नसला पाहिजे. पुढे हे पेन्शन सालीना २५ पौंड झालें.

इ ति हा स.—न्यूझीलंडमध्यें मनुष्यांची वसाहत केव्हां झाली हें निश्चित नाहीं. चवदाव्या शतकांत पॉलिनेशियन नावाडी याच्या उत्तर किनाऱ्यावर कित्येकदां आले. १६४२ त हे लोक साउथ बेटांत पसरले होते. १२७ वर्षांनीं कुक यानें या किनाऱ्याची बरीच माहिती मिळविली. हा देश ब्रिटिश राज्यांत समाविष्ट केला; परंतु ब्रिटिश सरकारनें हें कृत्य मान्य केलें नाहीं. यानंतर फ्रेंच, रशियन, स्पॅनिश व अमेरिकन नाविक सील, देवमासे पकडणारे व ताग व सागवान यांचा शोध करणारे व्यापारी आले. स. १८१४ मध्यें इंग्लिश मिशनरी आले. परंतु स. १८३९पर्यंत शांतता व ख्रिस्ती धर्म यांची भरभराट झाली नाहीं. वेकफील्ड यानें न्यूझीलंड ब्रिटिश राज्यास जोडलें जाण्याबद्दल निष्फळ प्रयत्न केला व अखेरीस पैसे देऊन जमिनी खरेदी करण्याचा व वसाहतवाल्यांस एका जहाजांत न्यूझीलंडमध्यें पाठविण्याचा बेत केला. फ्रेंच सरकार फ्रेंच कंपनी न्यूझीलंडला पाठविणार आहे हें वर्तमान ऐकल्यावर ब्रिटिश सरकारनें नाइलाजानें कॅप्टन हॉब्सनला न्यूझीलंड शांततेनें खालसा करण्याकरितां पाठविलें. १८४० सालीं येथें येऊन हॉब्सननें एतद्देशीय नायकांनां त्यांचें राज्य त्यांच्याकडे कायम ठेवण्याचें आश्वासन देऊन ब्रिटिश वर्चस्वाखालीं आणिलें. त्या बेटांवर युनियन जॅक उभारलें. फ्रेंच कंपनी मागाहून आली. परंतु नाइलाजानें ते ब्रिटिश प्रजाजन बनले. वेकफील्डचे वसाहतवाले न्यूझीलंड कंपनीपासून जमिनी विकत घेतल्या म्हणून स्वामित्वाचा हक्क सांगूं लागले. परंतु त्यांचे हक्क ब्रिटिश सरकारने कबूल केले नाहींत. ऑकलंड वसविल्यानंतर हॉब्सन मेला. याच्या मागून फिट्झरॉय आला व एका एतद्देशीय लढाईंत गुंतला. अखेरीस ग्रे ला पाठविण्यांत आलें. यानें गोरे व एतद्देशीय पिंगट वर्णाच्या लोकांमध्यें समतोलपणा राखला व वसाहत करण्याकरितां साउथबेट व इतर पुष्कळ जमीन विकत घेतली.

१८५२ सालीं इंग्लंडने याला स्वराज्य दिलें व बरीच ओरड झाल्यावर स. १८५६ मध्यें पूर्ण पार्लमेंटरी पद्धत व जबाबदार मंत्रिमंडळें स्थापण्यांत आलीं. यानंतर वीस वर्षांच्या राजकीय इतिहासांत दोन मुख्य गोष्टी घडून आल्या. पहिली, ऑकलंड अथवा वेलिंग्टन येथील मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकार यांच्यामधील लढे व दुसरी, जातिविषयक लढाई या होत. एतद्देशीय लोक हुषार व शूर होते व जमिनी विकण्याच्या विरुद्ध त्यांनीं एक संघ करून उरलेला साउथ बेटाचा भाग आपणाकरितां राखण्याचा व आपला एक राजा स्थापण्याचा निश्चय केला. स. १८७१ नंतर मेओरी लोकांनीं लढाई थांबविली व वसाहतवाले सुद्धां लढाईला कंटाळून जाऊन समेट करण्याचे उपाय योजूं लागले, व त्यांनीं मेओरी लोकाचे प्रतिनिधी पार्लमेंटांत घेतले. बाकीचा समेट एतद्देशीय धोरणी मंत्री सर डोनाल्ड मॅक्लीन यानें घडवून आणला. बारा वर्षांनंतर रस्ते बांधणें, हत्यारें काढून घेणें वगैरे उपायांनीं उत्तर बेटांतलि वसाहतीचें काम पुन्हां सुरू झालें. ग्रे वसाहतीच्या प्रधानाशीं भांडला. त्याची नोकरी स. १८६८ मध्यें संपली. याच्या मागून बोवेन, फर्ग्युसन, रॉबिनसन हे आले व यांनीं शांततेनें व पद्धतशीरपणें गव्हर्नरचें काम केलें. देशांतील हवा चराईस अनुकूल असल्यामुळें वसाहतवाले जंगल जाळून त्या जमिनींत इंग्लिश गवताची लागवड करीत व शेळ्या पाळीत. हा धंदा फार किफायतशीर ठरला. पुढे सोन्याच्या खाणी सांपडल्या. लोंकर, सोनें उत्पन्न करणें हेच प्रमुख धंदे बनले. सोनें सांपडल्यामुळें पुष्कळ लोक खाणीच्या कामाकरितां आले व येथेंच कायम राहिले. स. १८७० मध्यें शांतता पूर्णपणें स्थापित झाली नव्हती; धंदे ऊर्जितावस्थेला आले नव्हते. याच वेळेस व्होगेल नांवाच्या फडणविसानें १० लक्ष पौंडाचें कर्ज काढून रेल्वे बांधणें व जमिनी खरेदी करून नवीन वसाहवाल्यास देणें या कामीं खर्च करण्याचें सुचविलें. प्रथम या धोरणानें कांहीं भरभराट झाली. परंतु स. १८७९ मध्यें लोंकर व गहूं यांचे भाव कमी झाले व सोळा वर्षेंपर्यंत आपत्ति ओढविली. यानंतर भरभराटीचीं आठ वर्षें गेलीं. शांतता, रेल्वे, तारायंत्रें (यूरोपशीं तारेचें दळणवळण) शेतकी यंत्रें व मोठी लोकसंख्या यामुळें न्यूझीलंडची मूळची स्थिति अजीबात पालटली. १८७६सालीं प्रांतिक सरकार बंद करण्यांत आलें व त्याची सत्ता मध्यवर्ती सरकार व लहान सत्ताहीन स्थानिक संस्था यांच्यामध्यें विभागण्यांत आली. मेओरी लोकांची लढाईहि थांबली होती. यामुळें संपत्ति व उदारमतवाद्यांचें राजकारण यामध्यें लढे सुरू झाले. ग्रे हा उदारमतवादी मुत्सद्दी होता. इ. सन १८७७ मध्यें मोफत, सक्तीचें आणि धर्मसंबंधीं ढवळाढवळ न करणाऱ्या शिक्षणाची व्यवस्था करण्यांत आली. राष्ट्रसंपत्ति ही सरकारी अधिकाऱ्यांच्या हातांत दिलेली सार्वजनिक ठेव आहे. जनतेला चौकशी करण्याचा अधिकार देणारा कायदा व सरकारनें काढलेली सार्वजनिक आयुष्यांच्या विम्याची संस्था, या दोन गोष्टींवरून येथील समाजसुधारणावाद्यांच्या मतांचा कल कोणीकडे होता हें स्पष्ट दिसत होतें ग्रे चांगला फडणवीस

व लोकनायक ठरला नाहीं. व त्यानें बसविलेल्या जमीनीवरील करानें शेतकरी घाबरले.स.१८७९ च्या सांपत्तिक आपत्तीमुळें खजिना रिक्त झाला.ग्रेला जागा सोडावी लागली व जॉन हॉल व हॅरी एट्‌किन्सन यांनीं कारभार हातीं घेतला. ठोकळमानानें स.१८७९ ते १९०८ पर्यंतच्या या वसाहतीच्या औद्योगिक व व राजकारणाच्या इतिहासाचे दोन भाग करतां येतील. सोळा वर्षांच्या आपत्तीनंतर स.१८९५–१९०८पर्यंत समृद्धतेचीं तेरा वर्षें गेलीं. पुराणमतवादीपक्षाच्या हातीं बारा वर्षें सत्ता राहिल्यानंतर उदारमतवाद्यांनीं सतरा वर्षें सत्ता धारण केली. १८८० मध्यें राष्ट्रीय कर्ज २५०००००० पौंड होतें. प्राप्तीवरील जबर कर व स. १८७९मध्यें कांहीं काळपर्यंत जकातीचे वाटविलेले कर या उपायांनीं सांपत्तिक समता कायम ठेवण्यांत आली. याशिवाय पगार व रोजमुरे $\frac{1}{10}$ नें कमी करण्यांत आले होते.प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर देखील वाटविण्यांत आले स. १८७९–१८९० मध्यें मुख्य राजकारणी पुरुष सर हॅरी एट्‌किन्सन हा होता. जॉन बॅलन्स याच्या आधिपत्याखालीं प्रागतिक पक्षानें एट्‌किन्सनची पिच्छेहाट केली. १८९३ पर्यंत (या सालीं बॅलन्स मेला) एट्‌किन्सनचें दूरदर्शी सांपत्तिक धोरण चालविलें मजूरसंघांनीं स.१८९०च्या सार्वजनिक निवडणुकींत मजूरपक्षाचे मेंबर निवडून दिले. बॅलन्सनें कांहीं राजकारणसुधारणा व सामाजिक प्रयोग केले.बॅलन्सच्या नंतर रिचर्ड सेडन स्थानापन्न झाला. बायकांनां मत देण्याचा अधिकार देणारा कायदा यानें स. १८९३ मध्यें पास केला. शिवाय,१८९३ मध्यें दारूच्या नियंत्रणाचा कायदा स.१८९४ मध्यें वसाहतवाल्यांस आगाऊ कर्ज देण्यासंबंधीं कायदा व भांडवलवाले व मजूर यांसंबंधीं कायदे पास करण्यांत आले. १८९५ त नोकरनोंदणीच्या कचेऱ्यांसंबंधीं कायदा करण्यांत आला व वसाहतीच्या किनाऱ्यावरील व्यापार करणाऱ्या जहाजांच्या मालकांस स. १८९७ त वसाहतींतील मजुरीच्या दराप्रमाणें मजुरी द्यावयास लावली. इतक्यांत औद्योगिक समेट व मध्यस्थितीचा कायदा करण्यांत आला स. १८९८ मध्यें म्हाताऱ्या लोकांनां पेन्शनें देण्याचा कायदा पास झाला. स.१८९९मध्यें अपघाताच्या विम्यांचीं व आगीच्या विम्यांचीं सरकारी ऑफिसें स्थापण्यांत आलीं. स. १८९९ मध्यें बोअर लढाई उपस्थित झाल्यामुळें न्यु–झीलंड रहिवाश्यांनीं मातृदेशाला सैन्याची मदत केली.१८९५ सालीं व्यापाराची अभिवृद्धि होऊं लागली. गुरें पाळणें, सोनें खणून काढणें, गोठलेलें मांस व दुभतें यांची नीट व्यवस्था हीं व्यापारवृद्धीचीं कारणें होतीं. स. १८७९–१९०८ या काळांत सात गव्हर्नर व दोन प्रधानमंडळें झालीं. देशांत, बाहेर देशाच्या लोकांनां येण्याची मनाई करणारा कायदा राजानें पास केला नाहीं.

१८९७, १९०३ व १९०७ या सालीं लंडन येथें भरलेल्या साम्राज्य–परिषदेंत न्यू–झीलंडचे मुख्य प्रधान हजर असल्यामुळें वसाहतीचा साम्राज्याशीं फारच निकट संबंध जडला.

अर्वाचीन इतिहास.—१९०६–१२ सालीं वॉर्डचें प्रधानमंडळ अधिकारारूढ होतें. या प्रधानमंडळाच्या अमदानींत लॅण्डसेटलमेंट, फायनॅन्स ॲक्ट, पब्लिकडेट एक्सिस्टंगन ॲक्ट, नॅशनल प्रॉव्हिडंट ॲक्ट, लायसेन्सिंग ॲमेंडमेंट ॲक्ट, वृद्धोज पेन्शन ॲक्ट इत्यादि लोकोपयोगी कायदे पसार झाले. पण या सर्वांत प्रमुख कायदा म्हणजे सक्तीचें लष्करी शिक्षण सुरू करणाचा होय. जर्मनीनें आपलें आरमार वाढविण्यास सुरवात केल्यामुळें इंग्लंडला आपल्या आरमारी वर्चस्वाच्या शाश्वतीबद्दल भीति वाटूं लागली होती, व त्यामुळें इंग्लंडला आपलें आरमार वाढविण्याची काळजी उत्पन्न झाली. न्यूझीलंडनें, वसाहतीसाठीं एक क्रूझर बांधण्यासाठीं परवानगी मिळविली व१९१२सालीं हें काम सुरु झालें. सक्तीच्या लष्करी शिक्षणाची एक योजना तयार करण्यांत येऊन ती १९१० सालीं पसार झाली. याच सुमारास लॉर्ड किचनेर हा न्यू–झिलंडमध्यें आला होता. त्यानें २० हजार सैन्य उभारण्याची न्यू–झीलंडला शिफारस केल्यामुळें त्या अर्थाचा नवीन कायदा पसार करण्यांत आला. १९१३–१४ सालीं खडें सैन्य ५,७८, टेरिटोरियल्स २५९०२, सीनीयर कॅडेट्स २५६५९ व लष्करी खात्यावरील खर्च ५१९२९४ पौंड होता.

१९११ सालीं नवीन निवडणुकीला सुरवात झाली- या वेळीं देशांत लिबरल, लेबर, रिफॉर्मर व इंडिपेंडन्ट असे चार पक्ष होते. लिबरल पक्षाच्या लोकांनां मान्य होण्यासारखा कोणताच कार्यक्रम नसल्यानें व त्यांच्या २१ वर्षांच्या राज्यकारभारांत पक्षपातीपणा दिसून येऊं लागल्यानें लोकांनां रिफॉर्मर पक्षाची सरशी व्हावी असें वाटूं लागलें होतें. लेबर उर्फ मजूरपक्षहि लिबरल पक्षापासून स्वतंत्र झालेला होता. व लिबरल पक्षाविरुद्ध त्यानें मोहीम चालविली होती. यामुळें नव्या निवडणुकींत लिबरल पक्षाचा जरी पराभव झाला नाहीं तरी सरशीहि झाली नाहीं.लिबरल व रिफॉर्म पक्षाचे सारखेच लोक निवडून आले.त्यामुळें अद्यापिहि लिबरल पक्षच अधिकारारूढ राहिला. वॉर्डनें मात्र प्रधानकीचा राजीनामा दिला व त्याच्या जागीं मॅकेंझी हा प्रधान निवडून आला. पण पार्लमेंटच्या पहिल्या बैठकींतच लिबरल पक्षाचा पराभव होऊन प्रधानमंडळाला राजीनामा देणें भाग पडलें व त्यामुळें मॅसी या रिफॉर्म पक्षाच्या पुढाऱ्यानें आपलें प्रधानमंडळ बनविलें.

रिफॉर्म पक्षाच्या अमदानींत शासनघटनेंत बरेच फेरफार करण्यांत आले. मतदानपद्धतीचे संकुचित स्वरूप नाहींसें करून तिला व्यापक स्वरूप देण्यांत आलें. पण सर्वांत महत्त्वाचा जो जमिनीचा प्रश्न तोहि या प्रधानमंडळानें चांगल्या तऱ्हेनें निकालात काढला. वॉर्डच्या प्रधानमंडळानें पूर्वींची कायमधारापद्धति नाहींशी करून त्या जागीं मुदतबंदीची पद्धत अमलांत आणली होती. ६६ अगर ९९ वर्षांच्या करारानें शेतकऱ्यांनां जमीन द्यावयाची व तेवढी मुदत संपल्यानंतर जमिनीला जो तत्कालीन दर येईल त्याप्रमाणें खंडानें द्यावयाची पद्धत वॉर्डच्या प्रधानमंडळानें

पाडली. पण ही पद्धत सरकारी जमिनीला लागू नव्हती, हा त्यांतील दोप होता. तो मॅसीच्या प्रधानमंडळानें काढून टाकला.

पण याच सुमारास मजूरपक्षामध्यें असंतोप माजला होता. मजुरांचीं गाऱ्हाणीं ऐकून तीं दूर करण्यासाठीं १८९४ सालीं जें लवादकोर्ट नेमण्यांत आलें होतें त्याचा पक्षपात मजुरांच्या नजरेस येऊं लागल्यामुळें हें लवादकोर्ट मोडण्यांत यावें अशा प्रकारचें गाऱ्हाणें मजुरांनीं गाण्यास सुरवात केली होती. न्यूझीलंड 'फेडरेशन ऑफ लेबर' ही संस्था या मजुरांच्या मागणीला विरुद्ध होती. त्यामुळें तींतील कांहीं मंडळी फुटली. वैही येथील खाणीवाल्या लोकांच्या संघानें आपली स्वतंत्र संस्था स्थापून ती रजिस्टर करून घेण्याचा या सरकारजवळ हट्ट धरला व तो पुरा करून घेतला. त्यामुळें फेडरेशन ऑफ लेबर संस्थेनें संप पुकारला, पण तो यशस्वी झाला नाहीं. पण स. १९१३ च्या आक्टोबर महिन्यात पुन्हां दि वेलिंग्टन वॉटर साईड वर्कर्स युनियननें संप केला; पण तोहि थोड्याशा प्रयासानें कां होईना मिटविण्यांत आला.

महायुद्धः—इंग्लंडनें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारल्याची बातमी न्यूझीलंडमध्यें पसरतांच न्यूझीलंडमध्यें सर्वत्र उत्साहच दिसून आला. स्वयंसेवकांचीं पथकेंच्या पथकें उभारलीं गेलीं. पार्लमेंटनें महायुद्धासंबंधीचीं १३ बिलें मंजूर केलीं. त्यांपैकीं महत्त्वाचीं बिलें म्हणजे बँक नोट्सना मान्यता देणें, निर्गतीला बंदी करणें, मजूरविपयक कायद्यामध्यें फेरफार करणें, हीं होत. याशिवाय वॉर रेझोल्यूशन ॲक्ट नांवाच्या बिलान्वयें, गव्हर्नर जनरलला न्यूझीलंडच्या संरक्षणार्थ व महायुद्ध चालू ठेवण्यास लागेल ते उपाय योजण्याची परवानगी मिळली. महायुद्धाच्या गडबडीमुळें, पक्षभेदाला ओहोटी लागली. पुढें थोडक्याच दिवसांनीं जी पार्लमेंटरी निवडणूक झाली तींत रिफार्म पार्टीचा अवघ्या एका मतानें जय झाला

महायुद्धासंबंधीची जी एक स्वतंत्र कमिटी नेमण्यांत आली होती तिच्या कामकाजामध्यें गैरव्यवस्था आढळून आल्यामुळें कमिटीविरुद्ध फार गवगवा झाला पण उभय पक्षांच्या समंजसपणामुळें तो मिटविण्यांत आला. रिफार्म पक्षाचा कारभार जनतेला समाधानकारक वाटत नव्हता तरी पण सर्वांचें लक्ष महायुद्धाकडे लागल्यामुळें तिकडे लोकांनीं फारसें लक्ष पुरविलें नाहीं. महायुद्धामध्यें जवळ जवळ ६३००० लोकांनीं स्वयंसेवक म्हणून नावें नोंदविलीं होतीं. याशिवाय सक्तीनें सैन्य उभारण्याचें बिलहि मंजूर करून घेण्यांत आलें होतें. जेम्स ॲलन याच्याकडे युद्धविषयक जबाबदारीचें कार्य सोंपविण्यांत आलें होतें. त्यानें सक्तीची लष्करभरती करण्यास सुरवात करतांच मजूर चवताळले व कोळशाच्या खाणींतील मजूरांनीं १९१७ सालीं संप पुकारला. त्यामुळें या सक्तीच्या लष्करभरतीच्या बिलांत थोडासा फरक करणें भाग पडलें. युद्धापायीं जो अतोनात खर्च होत होता. त्यामुळें न्यूझीलंडवर नवीन कर लादणें भाग पडल्यामुळें वॉर्डनें कोणते कर लादण्यांत यावेत यासंबंधीचें एक बिल पुढें आणलें. जमीनीवर कर वाढविण्यांत आला. सालीना ३०० पौंडांवर ज्यांचें उत्पन्न होतें त्यांच्यावर इन्कमटॅक्स बसविण्यांत आला. जकात, पोष्ट, रेल्वे यांचे दर वाढवण्यांत आले. अशा रीतीनें १९१८–१९ सालीं न्यूझीलंडचें वार्षिक उत्पन्न १,३८,०१,६४३ पौंड होतें. याशिवाय खास, लढाईला लागणारा खर्च भागविण्यासाठीं निरनिराळ्या राष्ट्रांतून कर्ज काढण्यांत आलें. १९२० सालीं न्यूझीलंडचें राष्ट्रीय कर्ज २०१,१७०,७५५ पौंड होतें.

१९२१ सालीं न्यूझीलंडमधील आयात–निर्गतीचे आंकडे अनुक्रमें १५६५८५०२ व १३१९६५१४ पौंड होते.

महायुद्धाच्या अमदानीमध्यें, वॉरपेन्शन्स ॲक्ट, डिस्चार्ज्ड सोल्जर्स सेटलमेंट ॲक्ट्स इत्यादि कायदे करण्यांत येऊन युद्धामधील जखमी व नालायक झालेल्या माणसांची तरतूद करण्यांत आली. धान्यासंबंधीचे नियमहि करण्यांत आले.

शांततापरिषदेच्या बैठकीला हजर राहण्याकरितां मॅसी व वॉर्ड हे गेले होते ते १९१९ सालीं परत आले. न्यूझीलंडमध्यें येतांच वॉर्ड यानें राजीनामा दिला. त्यामुळें मॅसीला नवीन निवडणूक होईपावेतों आपलें मंत्रिमंडळ बनवावें लागलें. मॅसीपुढें अनेक अडचणी उभ्या होत्या. लिबरल पक्ष त्याच्यामागें हात धुवून लागला होता. मजूरपक्षानें आपली स्वतंत्र संघटना केली होती तरी पण मॅसीनें या सर्वांनाहि तोंड दिलें. १९१९ सालीं जी निवडणूक झाली तींत रिफार्म पक्षालाच सर्वांत अधिक मतें मिळालीं. त्यामुळें पुन्हां मॅसी हाच प्रधान झाला. पण मजूरपक्ष हा पराभवामुळें चिडून जाऊन मॅसीच्या कारभाराला अधिकाधिक विरोध करूं लागला. निरनिराळ्या मजूरसंस्थांनीं संप पुकारल्यामुळें, न्यूझीलंडमध्यें माल कमी तयार होऊं लागला. व त्याचा विपरीत परिणाम होऊं लागला. तेव्हां मॅसेनें सर्वपक्षीय परिषद बोलावून, कसावसा समेट घडवून आणला. मजुरांचें दैनिक वेतन वाढविण्यात आलें, व त्यांना बऱ्याच सवलती देण्यांत आल्या.

याच सुमारास प्रिन्स ऑफ वेल्सनें न्यूझीलंडला भेट दिली त्यामुळें इंग्लंड व न्यूझीलंड यांमधील संबंध दृढतर झाला. १९२० सालीं मॅसीनें आपलें नवीन मंत्रिमंडळ बनविलें. त्यानें आरमारीखात्यांत सुधारणा करण्याचें ठरविलें. याच संधीस ग्रेटब्रिटनच्या आरमारीखात्याचा सेनापति जेलीको यानें न्यूझीलंडला भेट दिली, व त्यानें इंग्लंड व ऑस्ट्रेलेशिया या राष्ट्रांनीं मिळून पूर्वेकडील भागांत मोठें आरमार ठेवावें अशी एक योजना प्रसिद्ध केली. त्या योजनेप्रमाणें न्यूझीलंड डिव्हिजन ऑफ दि रॉयल नेव्ही' नांवाचें आरमारी सैन्य उभारण्यांत आलें.

[ संदर्भग्रंथः—राईट अँड रीव्हज-न्यूझीलंड (१९०८); रॉबर्ट मॅक्नत -हिस्टॉरिकल रेकार्ड्स ऑफ न्यूझीलंड; शोलेफील्ड-न्यूझीलंड इन एव्होल्यूशन ( १९०९); कोवन-दि मेमरिस ऑफ न्यूझीलंड (१९११); पार्क-दि जीऑलजी ऑफ न्यूझीलंड ( १९१० ); कॉकन- न्यूझीलंड ह्रट्स अँड देअर स्टोरीज ( १९१० ); वॉफोर्ड-दि कॉन्स्टिटयूशनल हिस्टरी अँड लॉ ऑफ न्यूझीलंड (१९१४);रसेल-न्यूझीलंड टुडे ( १९१९ ); रॉसमॅनॉल अँड स्टेवर्ट- स्टेट सोशियालिझम इन न्यूझीलंड ( १९११ ). ]

**न्यूटन, सर ऐझाक** ( १६४२--१७०७ )—हा इंग्रज सृष्टिशास्त्रज्ञ ( नॅचरल फिलॉसफर। ता. २५ डिसेंबर, १६४२ रोजीं लिंकनशायरमधील वुलस्थॉर्प येथें जन्मला. हा जन्मण्यापूर्वीच त्याचा बाप वारला होता व नंतर दोन वर्षांनीं त्याच्या आईनें पुनर्विवाह लावला. लहानपणीं शाळेंत असतांनाच बारीकसारीक यंत्रें करण्याकडे त्यांनीं प्रवृत्ति दिसूं लागली. पवनचक्की, जलघटिकायंत्र, पतंग, घड्याळ वगैरे वस्तू त्यानें बनविल्या. त्यानें एक चारचाकी गाडी ( बसणारानेंच गति देऊन चालविण्यासारखी) तयार केली होती असें म्हणतात. न्यूटनचा दुसरा बापहि स. १६५६ मध्यें वारल्यानंतर त्याची आई वुलस्थॉर्प येथें परत आली व तिनें न्यूटनचें शिक्षण बंद करून त्याला शेतींत घातलें; पण त्याचा मामा ट्रिनिटि कालेजचा ग्रॅज्युएट होता त्यानें न्यूटनची यांत्रिक व गणिती बुद्धि पाहून त्याला पुन्हां शाळेंत घातलें व १६६१ सालीं तो मॅट्रिक झाला, व कालेजचें शिक्षण त्यानें चालू केलें. त्यावेळीं त्यानें ज्योतिषाचें पुस्तक वाचावयास घेतलें तें समजावें म्हणून ट्रिग्नामेट्री (त्रिकोणमिति)चा व डेकार्टकृत जॉमेट्री ( भूमिति )चा व यूक्लिडचा अभ्यास केला, व गणित विषयाच्या उच्च शाखेंत प्रगति केली. याच काळांत ( १६६३-६४) त्यानें भूमितींतील अनेक विषयांवर, वक्राभवन, लेन्सेससंबंधींच्या चुका, वगैरे विषयांवर निबंध लिहिलेलें एक चोपडें उपलब्ध झालें आहे. १६६५ सालीं न्यूटन बी. ए. झाला. १६६७ सालीं त्याला ट्रिनिटि कॉलेजचा फेलो निवडण्यांत आलें व १६६८ सालीं तो एम्. ए. झाला. प्रिझम व लेन्स यांच्यासंबंधीं त्याचे प्रयोग चालू होते. स. १६६९ मध्यें केंब्रिज येथें त्याला प्रोफेसरची जागा मिळाली. तो आप्टिक्स(दृक्शास्त्र) वर व्याख्यानें देत असे १६७२ सालीं त्याला रॉयल सोसायटीचा फेलो निवडण्यांत आलें लवकरच त्यानें किरणाचा विच्छेद झाल्यानें दिसणाऱ्या स्पेक्ट्रमचा शोध लावला. यासंबंधीं बऱ्याच लोकांशीं त्याला वादविवाद करावा लागला. त्यानें डबल रिफ्रॅक्शन, पोलरायझेशन, बायनॉक्यूलर,व्हिजन वगैरे विषयांवर निबंध लिहून चंद्र व स्थिर तारे यांच्यामधील अंतर पाहण्याकरितां रिफ्लेटिंग सेक्स्टंट नांवाचें यंत्र तयार केलें स.१६६६ पासूनच त्याचें लक्ष गुरुत्वाकर्षण(ग्रॅव्हिटि) विषयाकडे लागलें होतें. झाडावरून पडणारें फळ पाहून त्याला या विषयाचें चिंतन लागलें, अशी कथा सुप्रसिद्ध आहे. सदरहू वृक्ष १८२० सालपर्यंत हयात होता व नंतर तो मेल्यामुळें त्याचीं लाकडें तोडून काळजीपूर्वक जतन करून ठेविलीं.

ज्योतिषशास्त्रांतील न्यूटनचे गुरुत्वाकर्षणाचे सिद्धांत आकृतीसह ५ व्या विभागांत (पृ. ३४७-३५१) विवेचिले आहेत न्यूटन यानें केप्लरच्या तत्त्वांचा आधार घेऊन ग्रहांच्या कक्षा वर्तुळाकार असून सूर्य हा त्यांच्या मध्यबिंदूशीं असतो अशी कल्पना करून प्रत्येक ग्रहावर असणारी सूर्याची आकर्षक शक्ति ही त्याच्यापासून असणाऱ्या सूर्याच्या अंतराच्या वर्गाच्या व्यस्त प्रमाणांत असते असें सिद्ध केलें. इ. स १६८५ व १६८६ या वर्षांत न्यूटन यानें ज्योतिषविषयक बरेच नवीन नवीन विचार प्रदर्शित केलेले आढळतात. त्यानें शनीची कक्षा (न+१):न (केप्लरच्या तत्त्वाप्रमाणें) या प्रमाणापेक्षां बरीच कमी आढळून आल्याचें एक पत्र त्यावेळीं प्रख्यात असलेला ज्योतिषी फ्लॅमस्टेड याच्याकडे पाठविलेलें सांपडलें आहे, व इतर पत्रांतूनहि हें वरील प्रमाण सर्वत्र लागण्याबद्दल त्याचें मन शंकाग्रस्त दिसतें. १६८५ च्या उन्हाळ्यांत द्रव्यराशिमधील असणारें आकर्षण त्यानें दाखवून सार्वत्रिक गुरुत्वाकर्षणाचें तत्त्व ( लॉ ऑफ युनिव्हर्सल ग्रॅव्हिटि ) प्रस्थापित केलें.व ह्याच वर्षांत त्यानें 'प्रिन्सिपिया' या ग्रंथाचा दुसरा भाग तयार केला. ह्या ग्रंथाचा पहिला भाग म्हणजे त्याचा रॉयल सोसायटीमध्यें नमूद असलेला गतिविषयक निबंध होय. १६८७ सालीं दुसरा भाग छापला व लवकरच त्यानें सोसायटीस तिसराहि भाग देऊन त्याच वर्षांत सर्व पुस्तक प्रसिद्ध केलें. ह्या पुस्तकाच्या योगानें यूरोपमध्यें बरीच खळबळ उत्पन्न झाली व स. १६९१ पर्यंत ह्या पुस्तकाच्या सर्व प्रती खपल्या न्यूटन हा प्रिन्सिपियाचा दुसरा व तिसरा भाग लिहितांनाच केंब्रिज- विश्वविद्यालयांत दुसरा जेम्स राजा यानें ढवळाढवळ करण्याचा घाट घातला व त्याच्या म्हणण्याप्रमाणें जेव्हां विश्वविद्यालयाचे चालक ऐकेनात तेव्हां त्यांच्यामध्यें लढा उत्पन्न होऊन विश्वविद्यालयाचे चालक व प्रतिनिधी (डेप्युटीज)यांनां त्यानें कोर्टापुढें जाब देण्यास बोलाविलें. त्या प्रतिनिधींत न्यूटन हा एक असून त्यानें राजाच्या या टवाळीविरुद्ध विश्वविद्यालयाच्या हक्कांचें रक्षण करण्याची शिकस्त केली. पण खटल्याचा निकाल सरकारच्या बाजूचा झाला. इ. स. १६९२ व १६९३ या वर्षी न्यूटन बराच आजारी होता, असें त्या वर्षांच्या त्याच्या पत्रव्यवहारावरून दिसतें.

विश्वविद्यालयाच्या हक्कांच्या संरक्षणाचें फळ न्यूटन यास पार्लमेंटमध्यें विश्वविद्यालयाचा प्रतिनिधी निवडण्यांत त्याच्या मित्रांनीं दिलें तो पार्लमेंटमधील वादविवादांत फारसा भाग घेत नसे. त्याच्या मित्रांनां त्याच्यासारख्या विद्वान माणसानें नुसती कॉलेजमधील फेलोशिप घेऊन किंवा प्रोफेसर होऊन राहावें हें बरें वाटेना व म्हणूनच त्याच्या

मित्रांपैकीं एक चार्लस् मॉंटेग्यु हा कोशाध्यक्ष झाल्यावर त्यानें खटपट करून त्यास टांकसाळीवरील अधिकाऱ्याची जागा दिली पुढें दोन वर्षांनीं तेथेंच तो मुख्य अधिकारी झाला. १७०४ सालीं त्यानें दृकशास्त्रावर एक निबंध लिहिला. हें प्रकाशाच्या पृथक्करणासंबंधीं विवेचन ५ व्या विभागांत ( पृ. ५१८–५२० ) केलेंच आहे. १७०७ सालीं विल्यम व्हिस्टन यानें, न्यूटनचीं केंब्रिज येथें बीजगणितावर दिलेलीं व्याख्यानें छापलीं. त्याच्या गणितविषयक शोधां-मध्यें त्यानें १६९६ सालीं बर्नोली यानें टाकलेले दोन प्रश्न म्हणजे ( १ ) एका सरळ उभ्या रेषेमध्यें नसलेल्या दोन बिंदूंचें लघुत्तमावरोहण वक्र व ( २ ) अशी एक वर्तु-लाकृति शोधून काढायाची कीं, अ या स्थिर बिंदूपासून $प_1$ व $प_2$ या बिंदूंस मिळणारी अशी एक रेषा काढली असतां $अप_1^म + अप_2^म$ ही बेरीज स्थिर असेल; हे सोडवि-ण्याच्या रीती त्यानें दाखविल्या. पहिल्या प्रश्नाचें उत्तर म्हणजे ती वक्र रेषा चक्राभास आहे असें दाखविलें व ह्याच रीतीनें त्यानें दुसराहि प्रश्न सोडविला. १६९९ सालीं न्यूटन हा फ्रेंच विश्वविद्यालयाकडूनहि गणिती व भौतिकशास्त्रज्ञ म्हणून गणला गेला. न्यूटन हा टांकसाळीवर असतांना त्याच्या जागीं व्हिस्टन हा काम करूं लागला व १७०१ सालीं न्यूटन यानें प्रोफेसरशिपचा राजीनामा दिल्यावर तो तेथें कायम झाला. १७०१ सालीं तो पार्लमेंटमध्यें सभासद होता. नंतर १७०५ सालीं तो पुन्हां उमेदवार म्हणून उभा राहिला होता पण त्याचीं मतें व्हिग पक्षाचीं असल्यामुळें तो निवडला गेला नाहीं. १७०३ सालीं रॉयल सोसायटीचा अध्यक्ष लॉर्ड सोमर्स याची जागा रिकामी झाल्यावर न्यूटन याची नेमणूक त्या जागीं झाली. तो अध्यक्ष असतांना राज्ञीभर्ता डेन्मार्कचा राजपुत्र जॉर्ज हा या सोसायटीचा फेलो असल्याकारणानें त्याचा व ह्याचा बराच संबंध येत असे व त्यामुळें राणीला त्याचे गुण माहीत झाले व लवक-रच तिनें न्यूटनला १७०५ सालीं सरदाराची वस्त्रें दिलीं. १७१३ सालीं त्याच्या प्रिन्सिपिया ग्रंथाची दुसरी आवृत्ति बाहेर पडली. १७१४ सालीं बऱ्याच लोकांचें लक्ष समुद्रा-वरील रेखांश काढण्याच्या रीतीकडे वेधलें होतें व त्या-प्रमाणें ४ रीती सुचविण्यात आल्या त्याः—( १ ) बरोबर चालणाऱ्या घड्याळावरून, ( २ ) गुरूभोंवतीं फिरणाऱ्या चंद्राच्या ग्रहणावरून, ( ३ ) चंद्राच्या स्थितीवरून व ( ४ ) किंवा डॉ. डिटन याच्या नवीन रीतीप्रमाणें. या चारहि रीतींवर न्यूटन यानें टीका लिहून त्यांत असणारे दोष दाखवून दिले व ह्या त्याच्या कृत्यामुळें योग्य व बिनचूक रीत शोधून काढणारास पार्लमेंटकडून बक्षीस लावण्यांत आलें. याच सुमारास त्यानें कालगणनेची एक नवीन रीत शोधून काढली. ती रीत हस्तें परहस्तें अशी एका फ्रेंच शास्त्रज्ञाच्या हातांत पडली. त्यानें तिचें भाषांतर करून छापलें. हें जेव्हां न्यूटन याच्या दृष्टोत्पत्तीस आलें तेव्हां त्यानें ही भाषांतरांत नक्कल आहे असें सिद्ध केलें. १७२८ सालीं हीच रीत जरा वाढवून प्रसिद्ध केली गेली न्यूटन याचा धर्मशास्त्राचा व्यासंग प्रथमपासूनच फार होता, व त्यानें धर्मशास्त्रावर एक दोन ग्रंथहि प्रसिद्ध केले. त्यानें रसायनशास्त्राचाहि अभ्यास केला होता. त्यानें सिद्ध केलेले कांहीं प्रयोग त्याच्या हस्तलिखित लेखावरून दिसून येतात. त्याच्या आयुष्याच्या शेवटीं शेवटीं त्याला मुतखड्याच्या आजारानें न समजतां लघवी होण्याचा रोग जडला होता. तो त्याच्या काळजीपूर्वक वर्तनानें बराच दबला गेला होता पण शेवटीं ह्याच विकारानें त्याचा तारीख २०, मार्च १७२७ सोमवार रोजीं अंत झाला [पेंबर्टन-ए व्ह्यू ऑफ सर ऐझॉक न्यूटन्स फिलॉसॉफी ( १७२८ ); सर डी ब्र्यूस्टर-मेमॉइर्स; वाल-एसे ऑन न्यूटन्स प्रिन्सिपिया; जी. जे. ग्रे यानें न्यूटनच्या लेखांची संपूर्ण यादी तयार केली आहे ( केंब्रीज, १८८० ) व डॉ. होर्स्लेनें न्यूटनचे सर्व लेख एकत्र प्रसिद्ध केले आहेत ].

**न्यूफाउंडलंड**—उत्तर अमेरिका खंडाच्या पूर्वकिनाऱ्या-पासून बरेंच वर असलेलें महत्त्वाचें व उंचीवर वसलेलें एक मोठें बेट.ही ब्रिटिश वसाहत आहे. हें बेट उत्तर अक्षांत ४६° ३६' ५०" ते ५१° ३०' आणि पश्चिम रेखांश ५२° ३७' व ५९°, २४', ५०" यांवर आहे. दक्षिणोत्तर केप रेपासून केप नॉर्मनपर्यंत याची लांबी अंदाजें ३१७ मैल असून पूर्वपश्चिम रुंदी सरासरी ३१६ मैल आहे. याचें एकंदर क्षेत्रफळ ४०२०० चौरस मैल आहे. हें बेट तीन मोठ्या द्वीपकल्पांचें बनलेलें असून उत्तरेस "पेरिट नॉर्डे" द्वीपकल्प व आग्नेयीस ॲव्हालॉन द्वीपकल्प आहे. ॲव्हालॉन द्वीपकल्पांत लोकवस्ती दाट असून दोन उपसागरांनीं हें विभागलें गेलें आहे. "सेंट जॉन" ही याची राजधानी असून ती द्वीपकल्पाच्या पूर्व बाजूस वसलेली आहे.

**पर्वत.**—हें बेट बऱ्याच लहानमोठ्या पर्वत ओळींनीं व्यापलेलें असून त्यांपैकीं, केप रेपासून पश्चिमकडे वर २०० मैल लांब पसरणारी पर्वतश्रेणी ( लॉंग रेंज ) व त्याचप्रमाणें "ॲंग्विलारेंज" व "ब्लॅमिडोनरेंज" या पर्वतश्रेणी महत्त्वाच्या आहेत. लांगरेंजवर बरींच शिखरें असून तीं २००० फूट उंचीवर आहेत. ब्लामिडॉनरेंज या पर्वतश्रेणीची उंची २०८४ फूट आहे. ॲव्हालॉन द्वीपकल्प डोंगराळ असून त्यांपैकीं ईशान्येकडील डोंगर नमूद करण्यासारखा आहे. अंतर्भागीं बरींच सुळकेवजा शिखरें असून त्यांना टोलटस हें स्थानिक नांव आहे.

**नद्या.**—आकारमानानें या बेटांत फारशा नद्या नाहींत. एक्स्लोइट, हंबर, व गँडर ह्या तीन नद्या महत्त्वाच्या आहेत. एक्स्लॉइट नदी २०० मैल वहात जाऊन एक्स्लॉ-इटच्या उपसागरास मिळते. हिच्या कांठीं बरींच बेटें आहेत. त्यांपैकीं ग्वॉर्ट नांवाचें बेट महत्त्वाचें आहे. नदी एकंदर ३–४ हजार मैलांचा मुलूख धुवून काढते. नदीमुखापासून

चवदा मैलांवर धवधब्यांची मालिका आहे. त्यांपैकीं, विशप व ग्रँड या नांवाचे धवधबे प्रसिद्ध आहेत, त्याचप्रमाणें हंबर नदी आयलंडच्या उपसागराला व गँडर नदी हॅमिलटन साउंडच्या उपसागराला मिळते. यांशिवाय, सेंट लॉरेन्सच्या आखातास मिळणारी कॉड्राय नदी नमूद करण्यासारखी आहे.

स रो व रें.—या बेटांत बरींच सरोवरें व तळीं आहेत ही गोष्ट ह्या बेटासंबंधीं विशिष्ट अशी आहे. त्यांपैकीं ग्रँडलेक हें सरोवर ५६ मैल लांब व ५ मैल रुंद असून त्याचें एकंदर क्षेत्रफळ१९२चौरस मैल आहे.या सरोवराच्या कांठीं एक बेट आहे. त्याचप्रमाणें रेडइंडियन लेक, ग्रँडर लेक, डीयर लेक हीं सरोवरें महत्त्वाचीं आहेत. यांखेरीज मिचेल सँडी,व्हिक्टोरिया, हिंडस्, टेरा नोव्हा वगैरे लहान सरोवरें आहेत.

उ प सा ग र.—बेटाचा किनारा बऱ्याच उपसागरांनीं विच्छेदलेला आहे. प्लयासेन्शिया बे, नोटर डेम, फॉर्चुन, कन्सेप्शन, आयलंड व सेंट जॉर्ज हे उपसागर महत्त्वाचे आहेत. कन्सेप्शन उपसागर हा सर्वांत मोठा व महत्त्वाचा उपसागर असून याच्या किनाऱ्यावर बरीच लोकवस्ती आहे.

लो क व स्ती.—इ. स. १९०१ च्या खानेसुमारीप्रमाणें या बेटाची एकंदर लोकसंख्या २१७०३७ होती. बेटाची राजधानी सेंट जॉन शहर असून त्याची लोकसंख्या ११५९४ आहे. १९११ सालीं लोकसंख्या२६४०५६९ होती.येथें निरनिराळे खिस्ती धर्मपंथ आहेत.

शे त की.—या बाबतींत अलीकडे सुधारणा होऊं लागली आहे. कॉड्रायची थडी व सेंट जॉर्ज उपसागरालगतचा मुलुख विशेष सुपीक आहे. १९०१ सालीं ८५५३२ एकर जमीन लागवडीखालीं होती. ओट, बटाटे, टरनिप वगैरे भाजीपाला व गवत वगैरे माल पिकतो बेटांत गुरेंढोरें पाळण्याच्या धंद्याला बरेंच महत्त्व येऊं लागलें आहे.

ख नि वि ष य क.—तांबें,लोखंड, जस्त वगैरेंच्या खाणी बेटांत आढळतात. तांब्याच्या खाणींसंबंधीं नॉटरडॅम उपसागरांतील टिलट कोव्ह व बेटस् कोव्ह ह्या दोन खाणी व लोखंडाच्या खाणींसंबंधीं कन्सेप्शन उपसागरांतील बेल नामक बेट येथील खाणी प्रसिद्ध आहेत. १९०५ सालीं ६३५३५० टन लोखंड परदेशीं रवाना झालें. याखेरीज कांहीं ठिकाणीं अल्प प्रमाणांत, जस्त, सोनें, रुपें, अन्टिमनी वगैरे धातू आढळतात. १९१९ सालीं तांबें काढण्याचें काम सुरु झालें. १९२१ सालीं दि-आंग्लो पर्शियन ऑईल कंपनीनें तेलाच्या खाणी शोधण्याची परवानगी मिळविली. शुद्ध सरकारतर्फे कोळशाच्या खाणी खणण्याचें काम सुरू झालें आहे.

उ द्यो ग धं दे.—औद्योगिक बाबींत हें बेट फारसें पुढें आलेलें नाहीं. इ. स. १९०१ सालच्या खानेसुमारीप्रमाणें एकंदर १९५ हरवतकामाच्या गिरण्या चालू होत्या. याखेरीज कागद, साबण, बूट व जोडे, सिगारेट वगैरे जिनसा तयार होतात. स. १९१०-२० या अवधींत, न्यूफाउंडलंडची फार भरभराट झाली. न्यूफाऊंडलंडमध्यें, मासे धरण्याचा धंदा फार भरभराटीचा असल्यामुळें त्यावर या राष्ट्रानें फार फायदा मिळविला. तसेंच, सुरंबा तयार करणें, कागद तयार करणें व लोखंडाच्या खाणी खणणें हे धंदेहि मोठ्या प्रमाणांत चालले होते. पण १९२० सालानंतर या धंद्यांना उतरती कळा लागली, याचें कारण सरकारानें उद्योगधंद्यांवर आपला ताबा सुरु केला हें होय असें पुष्कळ लोकांचें म्हणणें आहे. १९१९-२० सालीं न्यूफाउंडलंडमध्यें ४०५३३३८७ डॉ. किंमतीचा माल आला व ३४८५४४७ डॉलर्सचा परदेशीं गेला. १९१९-२० सालीं जवळ जवळ तीन कोटी डॉलर्सच्या किंमतीचे मासे येथून बाहेरगांवीं नेण्यांत आले.न्यूफाउंडलंडमधील जंगलाचें क्षेत्रफळ १५००० चौ. मै. आहे. येथें स्प्रूस झाडांची समृद्धि असल्यामुळें त्या झाडापासून कागद तयार करण्याचा धंदा येथें मोठ्या प्रमाणावर चालतो. या ठिकाणीं लॉर्ड नॉर्थक्लिफनें कागद तयार करण्याचा प्रचंड कारखाना काढला. याशिवाय देवदार वगैरे निरनिराळ्या झाडांचीहि येथें समृद्धि आहे.

१९१७ सालीं न्यूफाउंडलंडमध्यें निरनिराळ्या ठिकाणीं रेल्वे सुरू करण्यांत आली. पण अद्यापिहि सर्व ठिकाणीं रेल्वे झालेली नाहीं, व महायुद्धामुळें, न्यूफाउंडलंडची सांपत्तिक स्थिति खालावल्यामुळें ती लवकर होण्याचा संभव दिसत नाहीं. समुद्राच्या कांठानें सर्वत्र तारायंत्राचें दळणवळण सुरु करण्यांत आलें आहे. त्याचप्रमाणें प्रमुख ठिकाणीं बिनतारी विद्युत्संदेशगृहें स्थापन करण्यात आलीं आहेत. महायुद्धाच्या अमदानींत ब्रिटिश आरमारखात्यानें माउंट पर्ल येथें एक बिनतारी विद्युत्संदेशगृह उभारलें. टेलिफोनची सोयहि येथें नुकतीच करण्यांत आली आहे. महायुद्ध चालू असतांना, जलमार्गानें ब्रिटन, कानडा, व अमेरिकेशीं चालू असलेलें दळणवळण बंद पडलें होतें पण तें पुन्हांच सुरू करण्यांत आलें आहे.

१९१४ सालीं महायुद्ध सुरु झालें त्या वेळीं मॉरिश हा न्यूफाउंडलंडचा प्रधान होता. त्यानें ५०० लोकांचें सैन्य इंग्लंडच्या मदतीला पाठवण्याचें कबूल केलें. आरमारांतहि त्यानें पुष्कळ वाढ केली. महायुद्धात न्यूफाउंडलंडनें एकंदरींत ६५०० सैन्य व आरमारी सैन्य रवाना केलें. त्यांपैकीं सुमारें १३०० लोक मृत्युमुखीं पडले.

रा ज्य प द्ध ति.—न्यूफाउंडलंड ही एक ब्रिटिश वसाहत असून पूर्णपणें बादशहाच्या अमलाखालीं आहे. १८५५ सालापासून येथें " जबाबदार राज्यपद्धति " सुरू करण्यांत आली. मुख्य अधिकारी " गव्हर्नर " असून याची नेमणूक बादशहाकडून होते. " हाऊस ऑफ असेम्ब्ली " व "कायदेकौन्सिल"अशीं दोन कार्यकारी मंडळें आहेत. हाउस ऑफ असेम्ब्लीचे सभासद लोकनियुक्त असतात. मताधिकार युक्त असे एकंदर १७जिल्हे आहेत. वरिष्ठ न्यायकोर्टहि आहे. मुख्य न्यायाधिशाची नेमणूक बादशहाकडून होते.

इतिहास.—इ. स. १९१३ मध्यें ज्या नवीन निवडणुकी झाल्या त्यांमध्यें पॅरिसचें मंत्रिमंडळ पुन्हां निवडून आलें. विरोधक पक्षाचे पुढारी सर रॉबर्ट बॉंड, व विल्यम कोकर हे होते. पुढें रॉबर्ट बॉंडनें व कोकरचें न पटल्यामुळें बॉंडनें राजीनामा दिला व त्याच्या बदली केंट हा पुढारी झाला. महायुद्ध सुरू होतांच दोन्ही पक्षांनीं एकमतानें दोस्तसरकारला मदत देण्याचें ठरविलें. केंटमागून लॉइड हा विरोधक पक्षाचा पुढारी झाला. १९१७ सालीं राष्ट्रीय सरकार स्थापण्यांत आलें व प्रधानमंडळामध्यंहि ६ सरकारी व ६ विरोधी पक्षांची भरती करण्यांत आली. पार्लमेंटची मुदत वाढविण्यासंबंधीचा ठराव पास करण्यांत आला. स. १९१७ च्या अखेरीस मॉरिस हा पीयर झाल्यानें त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला व त्याच्या बदली लॉइड हा प्रथम निवडून आला. पुढें लवकरच (स १९१९ मध्यें) ज्या निवडणुकी झाल्या त्यांत फिशरमेन्स पक्षाची सरशी होऊन स्क्वायर हा मुख्य प्रधान झाला. कोकर हा फिशरी ( मत्स्यखात्याचा ) मंत्रि झाला. स्क्वायरच्या अमदानींत, आरोग्यासंबंधींचे ठराव पास करण्यात आले. सेंट जॉन येथें मजूरांसाठीं चाळी बांधण्यांत आल्या क्षयरोगाविरुद्ध मोहीम सुरू करण्यांत आली. शिक्षणामध्यें इष्ट फेरफार करण्यांत आले. व्यापारी वर्गांत संघटणा झाली. रेल्वे, टेलिग्राफ इत्यादि दळणवळणाचीं साधनें वनविण्यांत आलीं खाणीकायद्यांत लोकांनां पाहिजे त्या दुरुस्या करण्यांत आल्या. मद्यपानप्रतिबंधासंबंधींच्या कायद्यांमधील व्यंगें नाहींशीं करण्यात आलीं, व कर कमी करण्यांत आला.

[ संदर्भग्रंथः—इयरबुक ऑफ न्यूफाउंडलंड (१९२१); न्यूफाउंडलंड गाइड बुक; पी. टी. मॅकक्राप–न्यूफाउंडलंड इन १९२१; जेम्स पी हौले–मिनरल रिसोर्सेस ऑफ न्यूफाउंडलंड ( सेंटजॉन्स १९०५ ).]

**न्यूबिआ**—ईशान्य आफ्रिकेंतील एक भाग. उत्तरेस मिसरदेश; पूर्वेस व पश्चिमेस अनुक्रमें तांबडा समुद्र, व लिबियन मरुभूमि असून हा प्रदेश दक्षिणेस खारटुमचे अक्षांशापर्यंत पसरला आहे. वस्तुतःपाहातां न्यूबिआला स्पष्टपणें आंखलेल्या अशा मर्यादाच नाहींत. ती एक भौगोलिक संज्ञा आहे इतकेंच. प्राचीन लोकांनां या नांवाची बिलकुल माहिती नव्हती. नोबॅटी या निग्रो लोकांच्या नांवाच्या न्यूबि या अरेबिक स्वरूपावरून अर्वाचीन न्यूबिआ हें नाव निघालें आहे.वर निर्दिष्ट केलेल्या मर्यादांच्या आंतील देश बहुतेक निर्जन, रुक्ष व खडकाळ आहे. या देशाचा बहुतेक भाग निर्जल कटिबंधांत आहे. राजकीयदृष्ट्या पाहातां न्यूबिआ हा मिसरदेशाचा अथवा आंग्ल–मिसरदेशीय सुदनचाच एक भाग असून त्याला निराळी शासनपद्धति नाहींच.

न्यूबिआमध्यें तीन निरनिराळ्या वंशांचे लोक राहतात. सेमिटिक अरब; ( २ ) राष्ट्रजातींपैकीं बेजा कुळांतील लोक; (३) न्यूबिअन्स मिसरदेशाच्या पलीकडील भागांतील मूळ रहिवाशी म्हटले म्हणजे युआयुआ हे होत. रोमन लोकांच्या आगमनापर्यंतच्या संबंध ऐतिहासिक काळात नाईल -देशांत निग्रो लोक रहात असत. इ.सनानंतर ३ऱ्या शतकांत ब्लेमीइज् अथवा सध्याचे जे बेजा लोक त्यांनीं युआयुआ लोकांचा मुलूख लुटण्यास सुरुवात केली. सहाव्या शतकांत यांनां नाईल खोऱ्यातून पूर्वेकडे हांकून देण्यांत आलें. ते नाईल व तांबडा समुद्र यांमधील आक्झमपासून मिसरपर्यंतचा प्रदेश व्यापून राहणाऱ्या आपल्याच नात्याच्या इतर लोकांस जाऊन मिळाले. या ठिकाणीं ते ' बेजा ' या नावानें प्रसिद्धीस आले.

७ व्या शतकांत अरबांनीं लोअर न्यूबिआंत प्रवेश केला. १४ व्या शतकांत अरब लोक या सर्व प्रदेशाचे मालक झाले पुढें बोस्नियन लोकांनीं येथें येऊन लोकसंख्येत भर घातली. हे लोक अरबांशीं व न्यूबिअनांशीं लग्न लावीत. न्यूबिअन लोक मजबूत बांध्याचे, युद्धप्रेमी, व उत्साहि शेतकरी आहेत. ते इमानी, मोकळ्या मनाचे व आनंदी स्वभावाचे आहेत. या लोकांनीं मुसुलमानी धर्माची दीक्षा घेतली आहे.

प्राचीन न्यूबिअनांच्या भाषेविषयीं विशेष माहिती आज उपलब्ध नाहीं. सध्यां जे न्यूबिअन हस्तलिखित ग्रंथ हयात आहेत ते मध्ययुगकालीन असून ग्रीक व कॉप्टिक लिपींसारख्या लिपींत लिहिले आहेत. हॅमिटिक लोकांत प्रचारांत असलेल्या सहा प्रकारच्या लेखनपद्धतींत ' नुबी ' ही एक पद्धत होती. हे प्राचीन न्यूबिअन हस्तलिखित ग्रंथ अर्वाचीन न्यूबिअन भाषेच्या जननी होत. व्याकरणविषयक लिंगांचा पूर्ण अभाव, अत्यंत जुनी स्व पद्धत, व कठोर व्यंजनसंघाला मृदुत्व देण्याची तऱ्हा, इत्यादिकांवरून या भाषेचें शुद्ध निग्रो वळण दिसून येतें. न्यूबी भाषेच्या तीन मुख्य प्रांत भाषा आहेत; ( १ ) उत्तर–देशीय यानी केंझ; ( २ ) मध्यदेशीय–महाइ; व ( ३ ) दक्षिणदेशीय–डांगोलावी.

**न्यूमन, कार्डिनल** (१८०१–१८९०)—जॉन हेनरी न्यूमन कार्डीनल हा लंडन येथें जन्मला. त्याचें उच्च शिक्षण ऑक्सफोर्ड व लिंकनइन् येथें झालें. १८२८ सालीं त्याला ऑक्सफोर्ड येथील सेंटमेरीचा उपाध्याय नेमिलें, व यावेळेपासूनच इव्हॅन्जेलिक पंथांतून तो फुटून निघाला. कांहीं दिवसानंतर त्यानें दक्षिण यूरोपमध्यें प्रवास केला व या प्रवासांत त्यानें बऱ्याच लहान लहान कविता लिहिल्या.अँगलिकन चर्चमध्यें कॅथोलिक संस्कारांचें पुनरुज्जीवन करणें आपलें कर्तव्य आहे असें तो समजत असे. ट्रॅक्ट ८५ मध्यें त्यानें धर्मासंबंधीं कांहीं अडचणी व धर्मग्रंथातील नियम यांचें

विवरण केलें आहे. याच्यांत दुसऱ्याचें मन आपणांकडे ओढून घेण्याची शक्ति होती व आपणांला कांहीं तरी एक विशिष्ट काम करावयाचें आहे असें त्याचें ठाम मत झालें होतें. लोकांचें धुरीणत्व संभाळण्याकरितां लागणारे गुण त्याच्या अंगीं नव्हते तरी पण एखादा वृत्तपत्रकार होण्यास तो योग्य होता. त्याच्या लेखाच्या कांहीं भागांतून व्यापक धर्मशास्त्राबद्दल त्यानें बरीच सहानुभूति दाखविली आहे पास्कलप्रमाणें त्याची बुद्धि संशयवादी असून त्याचें अंतःकरण गूढवादाप्रमाणें होतें. जगांतील धार्मिक चळवळींवर त्याची बारीक नजर असून त्यांच्या परिणामाबद्दल आपलें मत त्याला देतां येत असे. तो सन १८९० त मरण पावला.

त्याचे प्रसिद्ध ग्रंथ.—दि ऑरिजन्स ऑफ दि फोर्थ सेंचरी ( १८३३ ); ट्वेल्व लेक्चर्स ( १८५० ); लेक्चर्स ऑन दि प्रेझेंट पोझिशन ऑफ दि कॅथोलिक्स ( १८५१ ); अॅपोलोजिआ ( १८६४ ); दि ड्रीम ऑफ जेरॉन्टिअस ( काव्य ) इ.

न्यूमनची बुद्धि सूक्ष्मगामी असून जोरदार व अत्युत्कृष्ट भाषा लिहिण्यांत त्याचा हातखंडा असे. पुष्कळांना त्याचें सूक्ष्म विवेचन तर्कटी वाटे. धार्मिक बाबतींत त्याचे कट्टे प्रतिपक्षी असणाऱ्यांवरहि पुष्कळ वेळां त्याच्या मताचा पगडा बसे. आपल्या प्रवचनांच्या योगें त्यानें आंग्ल धर्मोपदेशकांत उच्चस्थान पटकाविलें आहे.

**न्यूमार्केट**.—इंग्लंडमधील केंब्रिजशायरच्या न्यूमार्केट पार्लमेंटरी विभागांतील बाजारगांव. लोकसंख्या ( १९०१ ) १०६८८.या शहराचा कांहीं भाग सफोकमध्यें आहे.न्यूमार्केटची प्रसिद्धि येथील शर्यतीवरून आहे. या शर्यती पहिल्या जेम्सपासून चालू झाल्या. शर्यतींचें मैदान गांवाच्या नैर्ऋत्येस आहे. येथें सैतानाचा खंदक म्हणून एक खंदक व टेंकाड आहे. आसमंतात रोमन काळचे अवशेष सांपडले आहेत.

**न्यू मेक्सिको**.—उत्तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक संस्थान. क्षेत्रफळ १२२६३४ चौरस मैल असून त्यापैकीं १३१ चौ. मैलांचा प्रदेश पाण्यानें व्यापिला आहे. लोकसंख्या सुमारें ४३७०१५. सान्टा फे हें राजधानीचें शहर आहे. अल्बुकर्क हें संस्थानांतील सर्वांत मोठें शहर आहे. यांत रोमन कॅथोलिक लोकांचा भरणा सर्वांत अधिक असून त्याच्या खालोखाल प्रॉटेस्टंट पंथाचे लोक आहेत. प्राथमिक शिक्षण मोफत दिलें जातें. ७ ते १४ वर्षे वयाच्या मुलांमुलींकरतां प्राथमिक व दुय्यम शिक्षण सक्तीचें केलें आहे. उच्च शिक्षणाकरितां १ शेतकी कॉलेज ( ॲग्रिकल्चरल कॉलेज ), १ यंत्रशास्त्र शिकण्याचें कॉलेज, आणि १ लष्करी शिक्षण देण्याचें कॉलेज,अशीं तीन कॉलेजें येथें आहेत. आंधळे आणि मुके यांच्याकरितां संगोपनगृहें आहेत.

१९१८ सालीं संस्थानचें उत्पन्न आणि खर्च अनुक्रमें ३८४५४०६ डॉलर आणि ३५१५४५८ डॉलर होता. १९१८ सालीं संस्थानला ३३८५५०० डॉलर कर्ज होतें. मका, गहूं, बटाटे, कापूस हीं मुख्य पिकें आहेत. भाजीपाला आणि फळफळावळहि संस्थानांतील कित्येक ठिकाणीं होते. घोडे, गाई, मेंढ्या आणि डुकरें इत्यादि जनावरें न्यू मेक्सिकोंत मुख्यत्वेंकरून आढळतात. सोनें, चांदी, तांबें, शिसें, जस्त, कोळसा, ग्रॅनाइट, कुरुंदाचा दगड, संगमरवरी दगड, आणि चुनखडी यांच्या खाणी येथें असून १९२५ सालीं या संस्थानांतून २५५४९१६१ डॉलर किंमतीचा खनिज माल बाहेरदेशीं रवाना झाला. न्यू मेक्सिकोची खनिज संपत्ति विशेष महत्त्वाची व अमूल्य आहे. संस्थानांत लॉकर आणि सीमेंट यांचे अनेक कारखाने आहेत. १९१६ सालीं न्यू मेक्सिको संस्थानांत ३०३९ मैल लांबीचा वाफेच्या गाडीचा आणि १० मैल लांबीचा विजेच्या गाडीचा रस्ता तयार होता. १८४८ सालीं न्यू मेक्सिकोचा यूनियनमध्यें समावेश झाला. २४ सभासदांचें वरिष्ठमंडळ ( सेनेट ) आणि ४९ सभासदांचें प्रतिनिधिमंडळ ( हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हज् ) असतें. संस्थानचे २६ परगणे ( कौन्टिज् ) पाडण्यांत आले आहेत.

**न्यूयॉर्क, संस्थान**.—हें अमेरिकेंतील संयुक्त प्रांतांतील मूळ १३ संस्थानांपैकीं एक असून तें उ. अ. ४०°२९′४०″ ते ४५°०′ २″ आणि पू. रे. ७१°५१′ ते ७९°४५′ ५४′४″ यांच्यामध्यें आहे. न्यूयॉर्कच्या पूर्वेस व्हरमाँट मॅसाचुसेट्स् व कनेक्टिकट हे प्रांत आहेत. दक्षिणेस अटलांटिक महासागर, न्यूजर्सी व पेनसिल्व्हानिया असून पश्चिमेस एरी सरोवर व नायगारा नदी आहे. हें संस्थान त्रिकोणी असून याची पूर्वपश्चिम रुंदी ३२६.४६. मैल व व दक्षिणोत्तर लांबी यापेक्षां ३०० मैल जास्त आहे. याशिवाय या संस्थानांत लाँग आयलंड व स्टेटन आयलंड या बेटांचा समावेश होतो. न्यूयॉर्क संस्थानचें भूपृष्ठक्षेत्रफळ ४७६५४ चौरस मैल असून त्यांतील जलपृष्ठभागाचें क्षेत्रफळ १५५० चौरस मैल आहे व एकंदर सर्व क्षेत्रफळ ४९२०४ चौरस मैल आहे.

न्यूयॉर्कमधील सरोवराच्या बाजूला ७५ मैलांचा किनारा आहे. तेथें जहाजांची रहदारी फार आहे, व यांतील बफेलो हें सर्वांत मोठें बंदर आहे.

समुद्रकिनाऱ्यावर हवा खाण्याचीं ठिकाणें आहेत. किनाऱ्याजवळ समुद्र फारसा खोल नाहीं. येथील हवा उन्हाळ्यांत फार उष्ण व हिंवाळ्यांत फार थंड आहे तरी प्रकृतीला ती विघातक नाहीं. पाऊस सरासरी ४० ते ४५ इंच पडतो. हें संस्थान अमेरिकेंतील संस्थानांत क्षेत्रफळाच्या मानानें तिसावें आहे, तरी लोकवस्ती व व्यापार यांत याचा नंबर पहिला आहे. त्याचा व्यापार वाढण्याचें कारण त्याचें भौगोलिक स्थान हें होय.

अमेरिकेंतील पश्चिमेकडील संस्थानांपेक्षां शेतीमध्यें न्यूयॉर्क मागें आहे तरी गवत, धान्य, बटाटे व भाजीपाला तेथें बराच पिकतो. गाई व दुसऱ्या पाळीव जनावरांची वाढहि फार झपाट्यानें होत असून सरकारनें या कामांत

लोकांनां आर्थिक मदत दिली आहे. येथील सरोवरांत मासे धरण्याचें काम मोठ्या प्रमाणावर होत असतें. निरनिराळ्या तलावांत मासे सोडून त्यांची संतति वाढविण्याचे प्रयत्न मोठ्या प्रमाणावर करून येथील लोकांनीं बराच फायदा करून घेतला आहे.

खाणी:—न्यूयॉर्कमध्यें खाणी बऱ्याच आहेत. पेट्रोलियम, पिग् आयर्न नांवाचें लोखंड, दगड, सीमेंट, मीठ, विटा, कौलें, वगैरे करण्यास उपयोगी पडणारी माती येथें बरीच मिळते. त्याचप्रमाणें पिंगट रंगाच्या हॅमेटाईट व कारबोनेट ओगर या धातूहि सांपडतात. येथें राकेलच्या विहीरी असून त्यांपासून बरेंच तेल काढण्यांत येतें. व्यापारी महत्त्व असलेलें असे चाळीसावर झरे येथें असून त्यांतील पाणी विकलें जातें. नायगारा फॉल व न्यूयॉर्क येथें रासायनिक द्रव्यें तयार होतात. न्यूयॉर्क शहरीं बरेच धंदे चालतात.

येथील मुख्य रेल्वे म्हणजे मोहाक व हडसन ही होय. ही अलबनीपासून शेनेकटडीपर्यंत जाते. न्यूयॉर्क सेंट्रल रेल्वे न्यूयॉर्कपासून बफेलोपर्यंत जाते. दुसऱ्याहि कांहीं रेल्वे येथें आहेत. त्याचप्रमाणें येरी चामप्लेन व आसवेगो हे कालवे वाढविण्याकरितां सरकारनें बरेच पैसे खर्च केले असून यांतून लहान जहाजें जाऊं शकतात. लोकसंख्या १९१८ सालीं १०६४६९८९ होती.

राज्यव्यवस्था:—येथें प्रत्येक २१ वर्षांच्या मनुष्याला मत देण्याचा अधिकार आहे. १९१० सालीं बायकांनां आर्थिक प्रश्नावर ज्या खेड्यांत त्यांची मालमत्ता आहे तेथें मत देतां यावें असा अधिकार देण्यांत आला आहे. सीनेट मंडळांत५१लोकनियुक्त सभासद असतात. हे सभासद दर दोन वर्षांनीं निवडले जातात. शिवाय १५० सभासदांची असेंब्ली आहे. कॉंग्रेसमध्यें या संस्थानातर्फे २ सीनेटर व ४३ प्रतिनिधी ( रिप्रेझेंटेटिव्ह ) बसतात.

*न्यायखातें*:—येथील वरिष्ठकोर्टाचे १७ न्यायाधीश असतात. या कोर्टाकडे अपिलेंहि करण्यांत येतात. याशिवाय अपिलें करण्याचें एक कोर्ट असून लहानसहान कामें लहान कोर्टांकडे सोपविण्यांत येत असतात.

प्रांतिक सरकार:—संस्थानचे ६२ भाग केले असून प्रत्येकावर एक 'बोर्ड ऑफ सुपरवाइझर' सभा असते; यांतील सभासद दर दोन वर्षांनीं निवडण्यांत येतात. त्यांच्याकडे राज्यव्यवस्थेचें सर्व काम सोपविण्यांत येतें.

दानधर्मः—याची व्यवस्था पाहण्याकरितां एक कमिशन असतें. संस्थानांत दवाखाने उघडणें, पोरक्या मुलांनां पोसणें व शिक्षण देणें, वेड्या मुलांचीं व्यवस्था व गरीब लोकांनां पोसणें या गोष्टी या कमिशनकडे सोपविण्यांत येत असून त्या तें करीत असतें.

शिक्षण:—संस्थानीं विश्वविद्यालयाकडे शिक्षणाचें काम असतें. हें विश्वविद्यालय बोर्ड ऑफ रीजंट्सच्या अधिकारांत आहे. शाळांची व्यवस्था पाहण्याकारितां एक कमिशनर असतो. ७ पासून १६ वर्षांपर्यंत वयाच्या सर्व मुलांमुलींस शिक्षण सक्तीचें आहे. स. १९१६ च्या शिक्षणविषयक कायद्यानें प्राथमिक व दुय्यम शाळांतील ८ वर्षांवरील वयाच्या विद्यार्थ्यांनां शारीरिक शिक्षण सक्तीचें केलें आहे. १६ ते १९ वयाच्या विद्यार्थ्यांनां लष्करी शिक्षण सक्तीचें आहे.

१९१७ सालीं या संस्थानांत २१४८ वृत्तपत्रें चालत होतीं; पैकीं २१० दैनिकें व ४२ द्विसाप्ताहिकें, १०२९ साप्ताहिकें, ६८९ मासिकें व ७२ त्रैमासिकें होतीं. १७५३ पत्रें इंग्रजी भाषेंत निघत होतीं व ५५ जर्मन होतीं; इतर निरनिराळ्या भाषांतूनहि कांहीं पत्रें चालत होतीं.

शहर.—हें न्यूयॉर्क संस्थानांतील सर्वांत मोठें शहर आहे. हें हडसन व नॅरो ईस्ट रिव्हर या नद्यांच्या संगमावर वसलें आहे.हें उत्तर अक्षांश ४०° ४२' ४३" व पूर्व रेखांश ७४° ०' ३" यांवर वसलेलें आहे. पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत या शहराची रुंदी १६ मैल व दक्षिणोत्तर लांबी ३२ मैल आहे. या शहराच्या भागांनां बरो म्हणतात. येथें मॅन्हॅटन, ब्रॉक्स, क्वीन्स, ब्रुक्लीन, रिचमण्ड असे बरो आहेत.

जगाच्या मोठ्या बंदरांत न्यूयॉर्क हें एक अत्यंत सुंदर व फार उत्तम बंदर आहे. येथील हवा फार दमट आहे व हवेच्या उष्णमानांत फरक नेहमीं होत असतात. येथें सेंट्रल पार्क,प्रॉस्पेक्ट पार्क,ब्रॉन्क्स पार्क असे विस्तीर्ण व सुंदर बगीचे आहेत.

ज्या बेटावर येथील व्यापार चालतो तें बेट लहान व व्यापार वाढत्या प्रमाणावर चालल्यामुळें तेथील इमारती फार उंच बांधाव्या लागत आहेत. यांत सिंगर शुइंग कंपनीची ६१२ फूट उंचीची इमारत आहे. मेट्रॉपॉलिटन विमाकंपनीची इमारत ही ६९३ फूट उंच आहे. याहिपेक्षां उंच इमारत वुलवर्थ बिल्डिंग होय. हिचे चाळीस वर मजले आहेत. या वुलवर्थनें पैसा 'फाइव्ह ॲन्ड टेन सेंट' स्टोअरवर मिळवला. अशाच आणखी कित्येक भव्य इमारती येथें आहेत. चार्लस ब्रॉकडेन ब्राऊन, आयर्व्हिंग, कूपर ब्रायंट, ड्रेक चार्लस हाफमन, विलिल एडगर ॲलन पो यांच्यासारखे कित्येक विख्यात ग्रंथकार या शहरांत होऊन गेले. या शहरांत नाना प्रकारचे लोक राहतात. येथें जगांतील बहुतेक सर्व भाषा बोलणारे लोक असल्यामुळें यूरोपांतील सर्व भाषांत व आशियांतील चार पांच भाषांत पत्रें आढळतात. १८५६ सालापासून शिक्षणबोर्डाकडे शिक्षणाची व्यवस्था आली १८७५ सालीं सक्तीच्या शिक्षणाविषयीं कायदा पास झाला. कोलंबिया विश्वविद्यालय व न्यूयार्क विश्वविद्यालयें अशीं दोन विश्वविद्यालयें येथें आहेत. न्यूयार्क लायब्ररी नांवाचें येथें एक प्रचंड पुस्तकालय आहे; त्याला एकंदर साडेसतरा लाख पौंडांच्या देणग्या नुसत्या आस्टर घराण्यानें दिल्या आहेत. याशिवाय दुसरीं वाचनालयें येथें बरींच आहेत. येथील लोकसंख्या अमेरिकेंतील कोणत्याहि दुसऱ्या शहरापेक्षां जास्त असून हें लंडनच्या खालोखाल

दुसरें लोकवस्तीचें शहर आहे. येथील लोकसंख्या ( १९१७ ) ५७३७४९२ आहे. बर्लिनशिवायकरून जर्मनीतील कोणत्याहि शहरापेक्षां जास्त जर्मन लोक न्यूयार्क येथें आहेत. त्याचप्रमाणें डब्लिन सोडून आयर्लंडमधल्या कोणच्याहि शहरापेक्षां जास्त आयरिश लोक येथें आहेत.

शहरांत विजेच्या ट्राम्वे, आगगाड्या वगैरे साधनें आहेत. अमेरिकेंतील किराण्या जिनसांचा व दुसरा व्यापार याच-ठिकाणीं फार मोठ्या प्रमाणावर चालतो. येथील बाजारहि फार मोठे आहेत. येथें मुख्य उद्योग म्हणजे कपडे शिवण्याचीं दुकानें, छापखाने, साखर व पेट्रोलियम शुद्धकरणें व तयार कपड्यांचे कारखाने हे होत. यांशिवाय येथील आयातहि फार मोठी आहे. न्यूयॉर्क बंदरांत येणारा माल वर्षानुवर्ष वाढत्या प्रमाणावर येत आहे. येथील आयातींत सुंदर वस्तू, लोंकर, हिरे, साखर, कॉफी, मसाल्याचीं द्रव्यें, कोको, रबर, सिगारेटच्या पेट्या, टिनचे डबे, लोणी, डुकराचें मांस, जनावरांचीं कातडीं, कोंकरांच्या कातड्यांचे हातमोजे, रासायनिक द्रव्यें, औषधें, तांबें, जाळावयाचें तेल, यंत्रें व लोखंडी सामान या वस्तू आहेत न्यूयार्क हें किराण्याच्या व कपड्याच्या व्यापाराचें केंद्रस्थान आहे.

येथील मुख्य अधिकारी मेयर असतो. लोकांकडून त्याची निवड झाल्यावर चार वर्षेपर्यंत याची जागा कायम करण्यांत येते. सर्व खात्यांचे मुख्य हाच नेमतो, व याच्या तंत्रानें सर्व व्यवस्था चालते.

स. १६६४ त ड्यूक ऑफ यॉर्क यानें पाठविलेल्या आरमारानें हें शहर घेऊन त्याला न्यूयॉर्क हें नांव दिलें. १६७३ सालीं डच लोकांनीं हें शहर पुन्हां घेऊन त्याला न्यूॲम्स्टरडॅम हें नांव दिलें. पण वेस्ट मिनिस्टरच्या तहानें १६७८ सालीं तें पुन्हां इंग्रजांना देण्यांत आलें.

**न्यूरेंबर्ग**—आगगाडीच्या रस्त्यानें म्यूनिचच्या जवळ वायव्येस १२ मैलांवर असलेलें जर्मनीचें एक बव्हेरियांतील शहर. लोकसंख्या ( १९१० ) ३३३१४२. सर्व बव्हेरियांत ह्या शहराचा आकारमानांत दुसरा, पण व्यापारांत पहिला नंबर लागतो. प्राचीन कालीं साम्राज्यांतील सधन व महत्त्वाच्या स्वतंत्र शहरांत हें गणलें जात असे. यूरोपांत ज्या कांहीं थोड्या शहरांनीं आपलें मध्ययुगीन स्वरूप आजपावेतों कायम ठेवलें आहे त्यांपैकीं हें एक शहर आहे. येथील बहुतेक खाजगी इमारती १६ व्या शतकांतील आहेत; आणि शहराचें मूळ सौंदर्य कायम राखण्याकरितां नवीन इमारती देखील जुन्या पद्धतीवरच बांधलेल्या आहेत.

शहराच्या उत्तरेस खडकावर असलेला येथील जुना किल्ला बहुधां ११ व्या शतकाच्या आरंभीं बांधला असावा. येथें कित्येक सुरेख देवळें असून, त्यांपैकीं तीन फारच नांवाजलेलीं आहेत. त्यांत जर्मन कलेचें कौशल्य चांगलें पहावयास मिळतें. येथील नगरभवन ही इटालियन पद्धतीची इमारत असून तिजवर स. १४४६ मध्यें झालेल्या न्यूरेंबर्गच्या सामन्याचें उठावाचें खोदीव काम आहे. स. १८०६ त नेपोलियनच्या आज्ञेवरून गोळी घालून मारलेला स्वदेशाभिमानी पुस्तकविक्या व घड्याळाचा शोधक पिटर हेन्लीन ह्यांचीं घरें या शहरांत पहावयास सांपडतात. येथें असलेलें जर्मन राष्ट्रीय पदार्थसंग्रहालय फार मोठें असून महत्त्वाचें आहे. ह्यांत १५ व्या व १६ व्या शतकांतील उत्तम उत्तम जर्मन चित्रांनीं नटलेला एक दिवाणखाना आहे.

न्यूरेंबर्ग हें यूरोपांतील उद्योगधंद्यांत व व्यापारांत प्रमुख असलेल्या शहरांपैकीं एक आहे. येथील लांकडी, हस्तिदंती व धातूंचीं खेळणीं, व शोभेच्या वस्तू फार प्रसिद्ध आहेत. हें आगगाडीच्या रस्त्यांचें केंद्रस्थान असून येथें असलेल्या डॅन्यूब व मेन नद्यांना जोडणाऱ्या लुडविग कालव्यामुळें व्यापाराची आणखी सोय झाली आहे. ह्या शहराचा १०५० सालच्या कागदपत्रांत पहिला खात्रीलायक उल्लेख आढळतो.

वास्को डि गामानें हिंदुस्थानला जाण्याचा जलमार्ग शोधून काढल्यावर न्यूरेंबर्गच्या उद्योगधंद्यांस उतरती कळा लागली; व त्यांना यूरोपांतील ३० वर्षांच्या लढाईत पुन्हां मोठा धक्का बसला. हें शहर १८०६ सालीं बव्हेरियाला जोडलें गेलें.

**न्यू हॅम्पशायर**—उत्तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक संस्थान. याचें क्षेत्रफळ ९३४१ चौरस मैल असून त्यापैकीं ३१० चौरस मैलांचा प्रदेश पाण्यानें व्यापिला आहे. लोकसंख्या ( १९१८ ) ४४६३५२. कॉन्कॉर्ड हें राजधानीचें शहर आहे. मँचेस्टर हें संस्थानांतील सर्वांत मोठें शहर आहे. शेंकडा ६३ लोक रोमनकॅथोलिक आहेत. त्याच्या खालोखाल कॉंग्रिगेशनल, बॅप्टिस्ट, मेथाडिस्ट, आणि प्रॉटेस्टंट एपिस्कोपल या धर्मपंथांचे लोक आहेत. ८ ते १४ वर्षे वयाच्या मुलांकरितां प्राथमिक शिक्षण सक्तीचें केलें आहे. उच्च शिक्षणाकरितां ३ कॉलेजें आहेत. अनाथांच्या मदतीकरितां अनाथ पंगुगृहें आहेत. १९१८ सालीं, संस्थानचें उत्पन्न व खर्च अनुक्रमें ४३६७४२२ डॉलर व ४० ६२०४९ डॉलर होता.

वाळलेलें गवत, बटाटे, ओट, आणि गव्हिताचीं धान्यें इत्यादि मुख्य पिकें होतात. हें संस्थान कृषिप्रधान आहे. घोडे, मेंढरें, गायी, डुकरें इत्यादि उपयुक्त जनावरें येथें पुष्कळ आढळतात. ग्रॅनाईट हें या संस्थानांत सांपडणारें मुख्य खनिज द्रव्य होय. अभ्रक, धार लावण्याचे दगड आणि माती यांच्याहि कांहीं खाणी आहेत. बूट, जोडे, कापसाचें आणि लोंकरीचें कापड यांची निर्गत बरीच होते. १९१६ सालीं, संस्थानात, १२५२ मैल लांबीचा वाफेच्या गाड्यांचा रस्ता तयार होता. १९१७ सालीं संस्थानांत १० सेव्हिंग्ज बँका असून त्यांत २५२०५ लोकांनीं ठेवी ठेविल्या होत्या.

चोवीस सभासदांचें वरिष्ठमंडळ ( सेनेट ) आणि १९० पासून ४०९ सभासदांचें प्रतिनिधिमंडळ ( हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्ह ) असतें. दोनहि मंडळांतील सभासदांची दर

दोन वर्षांनीं नवी निवडणूक होते. फेडरल कॉंग्रेसमध्यें न्यू हॅम्पशायर स्टेटतर्फे वरिष्ठमंडळांतील आणि प्रतिनिधिमंडळांतील दोन दोन सभासद जातात. हें संस्थान १० परगण्यांमध्यें विभागलें गेलें आहे.

**न्यू हेवन**—अमेरिका. कनेक्टिकट संस्थानांतील सर्वांत मोठें शहर. न्यू हेवनचें मुख्य ठाणें येथें आहे. हें येल विद्यालयाचें स्थान आहे. लॉंग आयलंड साउंडहून ४ मैलांवर व न्यू हेवनच्या आखाताजवळ हें वसलें आहे. १९१७ त येथील लोकसंख्या २०१४८१ होती, हींत आयरिश, इटालियन, जर्मन, स्वीडिश, हे लोक आहेत. न्यू हेवनचें क्षेत्रफळ १७.९१ चौरस मैल होतें. त्यांतील अर्धा भाग १९०० पर्यंत घेण्यांत आला. न्यूयॉर्क हार्ट फोर्ट रेल्वेच्या पांच फांट्यांनीं न्यूयॉर्क व न्यू हेवन यांचा संबंध जोडण्यांत आला आहे. येथील ईस्टरॉकवर कनेक्टिकट शिपायांचें थडगें आहे. येथें १२ बगीचे असून एजवुड पार्क व बिव्हर पॉंड पार्क हे त्यांतील मोठे आहेत. येथील इमारतींत तीन देवळें, जुनेपणांत दुसऱ्या नंबरच्या व सुप्रसिद्ध येल विश्वविद्यालयाच्या इमारती, विश्वविद्यालयाचें वाचनालय वगैरे मुख्य इमारती आहेत. येथील मुख्य धंदे म्हणजे लोखंडी सामानाचे कारखाने, दारूसामान व बंदुकांचे कारखाने, गाड्या, दारू, कागदाच्या पेट्या यांचे कारखाने वगैरे होत. हे धंदे बऱ्याच मोठ्या प्रमाणावर चालतात.

**न्यौंगलेबिन,** टा उ न शि प.—ब्रह्मदेशांतील पेगू जिल्ह्याची उत्तरेकडील एक टाउनशिप. क्षेत्रफळ ८२३ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ८३३६७ यांत ७९ गांवें आहेत. टाउनशिपचें मुख्य ठिकाण न्यौंगलेबिन येथें आहे. पश्चिम भाग टेंकाड व जंगली आहे.

गां व.—न्यौंगलेबिन पोटविभागाचें व टाउनशिपचें मुख्य ठिकाण. जिल्ह्याच्या ईशान्य भागांत सुपीक प्रदेशांत हें वसलेलें आहे. पेगूहून ४६ मैल; व रंगूनहून ९३ मैल आहे. लोकसंख्या सुमारें सात हजार.

**न्हावी**—हिंदुस्थानांतील यांची लोकसंख्या (१९११) ३०१३३९९ असून त्यांत हिंदु व मुसुलमान आहेत. ही जात प्राचीन आहे. बुद्धाचा पट्टशिष्य उपाली हा न्हावीच होता यांना प्रांतभेदानें क्षौरक, केलाशी, नायेड, खवास, महाल, भंडारी, मंगला, नायिंदा, हजाम, कारागीर इत्यादि नांवें आहेत. शंकराच्या अथवा शेषाच्या नाभी( बेंबी ) पासून हे झाले अशी दंतकथा आहे. मराठी न्हाव्यांचीं नांवें, आडनांवें, देवकें व चालीरीती महाराष्ट्रांतील मराठ्यांप्रमाणें असल्यानें ते व मराठे पूर्वी एकाच जातीचे असावेत असा तर्क आहे. अद्यापि कांहीं ठिकाणीं उच्च मराठ्यांच्या जेवणावळींत न्हावी हा पाणी वाढतो व नाशिक आणि खानदेशांत या मराठ्यांनां त्यांच्या हातचा स्वयंपाकहि चालतो. ( सेन्सेस रिपोर्ट १९११. पु. ७ भा. १, पृ. २६१, पहा ). हे अस्पृश्यांची हजामत करीत नाहींत. कांहीं वाजंत्र्याचा धंदा करतात. यांच्यांत मराठा व कोंकणी असा पोटभेद आहे. मराठ्यांमध्यें आठ कुळ्या आहेत. यांच्यांत पंचायती आहेत. महाराष्ट्रांत यांचे ठिकठिकाणीं गट आहेत यांचे उपाध्याय ब्राह्मण असतात. विश्वनाथ नांवाच्या न्हाव्यानें अलीकडे एक नापित ( नाभिक ) पुराण रचिलें. यांच्यांत सेना न्हावी नांवाचा एक वारकरी साधु झाला होता. शिवाजीचा अंगरक्षक जिऊ महाला हा न्हावी होता. सांप्रत या जातींत इंजिनियर, कंत्राटदार वगैरे धंदेवाले आहेत. बडोद्याचे प्रसिद्ध सनई वाजविणारे रा. गणपतराव पिराजी वसईकर हे न्हावी जातीचे आहेत त्यांनीं सनईवादनावर पुस्तकें लिहिलीं आहेत. मुंबईस पहिला न्हावीखाना (हेअर कटिंग सलून) के. लोणकर व वडनेरकर यांनीं काढला म्हणतात. गुजराथेंत हे लोक लग्न जुळविण्यांत मध्यस्थ असतात. पूर्वी हे लोक शस्त्रक्रिया करून तुंबड्या लावीत. यांच्या बायका सुयिणीचा धंदा करतात. यांच्यांत पांच पोटभेद आहेत. त्यांत लिंबाचिआ लोक श्रेष्ठ आहेत. यांच्यांत दिराशीं पुनर्विवाह लावतात. यांचे संस्कार व चालीरीती कुणब्यांप्रमाणें आहेत. यांच्या पंचायतीस एकडा म्हणतात. मध्यप्रांतांतील यांचे पोटभेद स्थानिक आहेत. यांच्या चालीरीती कूर्मी किंवा कुणब्यांप्रमाणें आहेत. न्हावी हा गांवगाड्यांतील एक बलुतेदार आहे. परदेशी हिंदुस्थानी न्हावी लग्नाची मध्यस्थी करून, बहुतेक लग्नांतील कामें करतो. त्याच्या हातचें हुक्का पाणी त्या लोकांनां चालतें. तीर्थक्षेत्रांतील न्हावी यात्रेकरूंस फार त्रास देतात. यांच्या बायका चिंचेच्या झाडासमोर बुरखा घेतात. म्हैसूरकडे हे लोक शेतीहि करतात. तिकडे यांचे मोराशु, उप्पिना, नाडीगुर, राद्धिभूमी, शिलावंत ( हे लिंगायत आहेत ) हे पोटभेद आहेत. कानडी पोटजातींत गोत्रें आहेत. इकडे यांच्यांतील एखादी मुलगी जन्मभर कुंवारीहि राहते. मुलीच्या लग्नास वयोमर्यादा नाहीं. आसामांतील हे लोक स्वच्छ व टापटिपीचे असल्यानें त्यांच्या हातचें पाणी तिकडील ब्राह्मण पितात. आसाम खिर्डीतील लोक कलिता जातीचे असावेत. पंजाबांतील हिंदु न्हावी आपल्यास क्षत्रियांचे व मुसुलमान न्हावी मोंगलांचे वंशज म्हणवितात. काश्मिरांतील यांची जात निरनिराळ्या जातींची मिळून झाली आहे. [ सेन्सेस ऑफ इंडिया. १९११ पु ३, ७, १४, २०, २१; रसेल व हिरालाल पु ४; रोझ-ग्लॉसरी. पु. ३; क्रुक्स-ट्राईब्ज ॲन्ड कास्ट्स. पु. ४; रा. म. सा. मांडे. बडोदे यांच्या माहितीचा सारांश. ]

प—समासांतीं प आल्यास त्याचा अर्थ (१) पिणारा, उदा०पादप, मधुप, इ. (२) रक्षक, उदा०गोप, नृप, इत्यादि. असा होतो.

प = ᒐ U प प

अ क्ष र वि का स.—या वर्णाला आजचें स्वरूप प्राप्त होण्यापूर्वी तीन मोठ्या अवस्थांतून जावें लागलें. पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार लेखांत ( इ.स. पूर्वी ३ र्‍या शतकांतल्या ); दुसरी, महाक्षत्रप शोडास याच्या वेळच्या मथुरा येथील जैन लेखांत ( इ. स. पूर्वी पहिल्या शतकाच्या आसपास ) व तिसरी अवस्था इ. स. चवथ्या शतकाच्या मध्याच्या आसपासच्या काळांतील गुप्तवंशी राजा समुद्रगुप्त याच्या अलाहाबादच्या स्तंभावरी ल लेखांत दृष्टीस पडते.

**प-आन**—दक्षिण ब्रह्मदेशाच्या थटोन जिल्ह्यांतील एक टाउनशिप.क्षेत्रफळ१००७चौरस मैल. सालविन नदी यामधून जाते. लोकसंख्या ( १९११ ) १०२५९०. यांत ११५ खेडीं असून मुख्य ठिकाण प-आन सालविन नदीवर आहे.मुख्यतः करेण लोक यांत आहेत.

**पंका**—पणिका, पण. पणो. यांची विशेष वस्ती विहार-ओरिसा ( ४६४०४६ ) व वऱ्हाड-मध्यप्रांत (२१४८९४) यांतून आहे. एकंदर लोकसंख्या (१९११) ७९६९७२. ही कपडे विणणारांची व मजुरांची जात आहे. हे लोक गोंड वर्गांत मोडतात. गोंड लोकांपेक्षां यांचा दर्जा थोडा उच्च आहे. यांच्यांत दोन मुख्य वर्ग आहेत. एक कबीर ( कबीरपंथी ); हे मद्यमांस सेवीत नाहींत. दुसरा सुकट; हे मद्यमांस सेवितात. यांच्यांत परस्पर विवाह होत नाहींत. पण एका वर्गाची मुलगी दुसऱ्या वर्गाच्या माणसाकडे गेलीच तर कांहीं एक विधि न करतां ती त्याची बायको होते. सुकट हे हिंदु देवतांची पूजा करतात; कबीरपंथी करीत नाहींत. यांच्यांत झाडें व प्राण्यांच्या नांवावरून देवकें आहेत.

पंका लोक कबीराची पूजा करतात. यांचा मुख्य गुरु महंत असतो व त्याच्या हाताखालीं दिवाण नांवाचा त्याचा मदतगार असतो. या जातींत एक विधि करून नव्या माणसास आपल्या धर्मांत घेतात. हे लोक जाडे भरडे कपडे व खादी विणतात. [ रसेल व हिरालाल. ]

**पकोक्कू, जि ल्हा.**—वरच्या ब्रह्मदेशाच्या मिनवू विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ६२१० चौरस मैल. उत्तरेस वरचा व खालचा चिंदविन जिल्हे; पूर्वेस चिंदविन व इरावती नदी; दक्षिणेस मिनवू जिल्हा; व पश्चिमेस चिन टेंकड्या. यांत पोंडौंग व टंग्यी या टेंकड्या व मिथ्या व याव नद्या आहेत. पोंडौंगच्या पूर्वेकडील भागाची हवा आरोग्यदायक पण जरा उष्णच आहे. पोंडौंगच्या पश्चिम भागांत पाऊस बराच पडतो. जिल्ह्याच्या पूर्वभागांत पाण्याचा नेहमीं दुष्काळ असतो. ब्रिटिशांनीं वरचा ब्रह्मदेश घेण्यापूर्वी पकोक्कू हें एक लहानसें खेडें होतें व त्यावेळीं ' कुनिव ' हें मुख्य व्यापाराचें ठिकाण होतें.

१८८६ सालीं ह्या जिल्ह्याचा बराच भाग श्वेगिओवियू राजाच्या अमलाखालीं मोडत असे. मिंयेग येथें ब्रह्मी वंडखोरांचा बीमोड करण्यांत आला. १८८८सालीं पगन जिल्हा काढून टाकण्यांत येऊन पकोक्कू जिल्हा तयार करण्यांत आला, व पकोक्कू हें त्या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण करण्यांत आलें. ह्या जिल्ह्यांत प्राचीन देवळें (पागोडे)बरींच आहेत. खुद्द पकोक्कू गांवांत 'श्वेगू' पागोडा आहे. इरावती नदीवर पगनच्या समोरचा टंगियस्वेदव पागोडा, कुनिव, शिन्मडौंग व थमेन्ग हीं तीन देवालयें असून पैकीं कुनिन ह्या पगनच्या राजानें ( अलौंग सिधु ) राणीच्या घडग्यावर उभारला.

येसागियो टाउनशिपमध्यें पकंगियी येथें सिथूशिन, शिन्मडौंग, व दत्तपौंग म्येथ्रू अशा तीन गौतमबुद्धाच्या सुप्रसिद्ध मूर्ती आहेत. पगनच्या अनवरत राजानें चीन देशांतून आणलेला गौतमबुद्धाचा दांत टंगिस्वेदव पागोड्यांत ठेवलेला आहे असें म्हणतात. पकंगिई येथील तीन मूर्ती चंदनाच्या असून १२ व्या शतकांत त्यांची स्थापना झाली असावी. पगनचा सुप्रसिद्ध शूर राजा नरपदीसिथू ह्यानें त्यांची स्थापना केली असें म्हणतात.

पौक टाउनशिपमध्यें यमडवच्या समोर आणि यवननदीच्या पश्चिम तीरावर श्वेपौंगलौंग व श्वेमुकव नांवाचे दोन पागोडे आहेत. त्याच ठिकाणीं पगनचा राजा धम थवक ह्यानें १०९१ सालीं एक लहानसा पागोडा बांधला होता.

लोकसंख्या ( १९२१ ) ४६५७७१; शेंकडा ९६ लोक ब्रह्मी भाषा बोलतात. बहुतेक लोक ब्रह्मी आहेत. याव व मिथ्य-नद्यांच्या खोऱ्यांत चीन लोक रहातात. यावच्या खोऱ्यांत टौन्गयस लोक रहातात. हे लोक चीन लोकांची लई भाषा बोलतात. तसेंच हे लोक बौद्धधर्मीय असून मोठे मेहनती व शेतकींत लक्ष घालणारे आहेत.

शेंकडा ६२ लोक शेतकीवर उपजीविका करतात. मुख्य पीक ज्वारीचें आहे. बागाईत इकडे फार करीत नाहींत. खेड्यापाड्यांतील लोकांनीं शेतास पाणी देण्याकरितां याव व मिथ्या नद्यांचे लहान लहान पाट आपल्या शेतांतून नेले आहेत. जंगलापासून फारसें उत्पन्न नाहीं. इरावतीच्या उजव्या तीरावर पगननजीक येनेंगियन येथें रॉकेल तेल सांपडतें. पूर्वी चौंगझोनगियीजवळ टोनबो येथें लोखंडाची खाण होती.

खुद् पकोक्कू येथें होड्या तयार करतात. तसेंच येथें तांदुळाच्या हातचक्क्या असून तांन्यांचें काम चांगलें होतें. ह्या जिल्ह्यांत सुती व लोखंडी विणकाम चांगलें होतें. यव येथें कपड्यांस रंग फारच चांगल्यापैकीं देतात. पकोक्कू येथें लहान लहान घंटा फारच चांगल्यापैकीं तयार होतात. येनेंगियन येथें तेल गाळतात. निर्गत माल इमारती लांकूड, चामडें,मातचिंतेल वगैरे असून आयात माल-सडलेला तांदूळ, खारे मासे, व मीठ. पकोक्कू हा व्यापाराचा मुख्य गांव आहे. इरावती व चिंदविन नद्यांच्या पात्रांतून होड्या चालतात.

टाउनशिप व गांव.—पकोक्कू जिल्ह्याची एक टाउनशिप. ही इरावती नदीच्या उजव्या अंगास आहे. क्षेत्रफळ ४०३ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ८६५०१. यांत १ गांव (पकोक्कू) व९२खेडीं आहेत.हें इरावती तीरीं वसलें आहे.लोकसंख्या (१९११) २००१०. बहुतेक लोक ब्रह्मी आहेत. रेशीम काढणें, लांकडावरील नक्षीकाम, तिळाचें तेल काढणें व चांदीवरील नक्षीकाम हे येथील स्थानिक धंदे आहेत. येथील आयात माल चामडें, सागवान व बांबू हा आहे. येथें म्युनिसिपालिटी १८८७ सालीं स्थापन झाली.

**पंगतारा**—ब्रह्मदेशांतील दक्षिण शान संस्थानाच्या नेलट विभागातील एक संस्थान. क्षेत्रफळ ८६ चौरस मैल. उत्तरेस लवकसवक; दक्षिणेस पोईल; पूर्वेस मवसून; पश्चिमेस येंगन व कयइवक्‍कू. पश्चिम भागात उंच डोंगर आहेत. ख्रवगईच्या उपनद्यामुळें पाणी मुबलक मिळतें. पंगतारानजीक तांदूळ बराच पिकतो. अंदाजें २६०० एकर जमीन वहीत आहे. लोकसंख्या (१९११) १६७८९. यांत ९ खेडीं असून उत्पन्न सुमारें १८ हजार आहे. संस्थानास ब्रिटिश सरकारास खंडणीदाखल रु. ९५०० द्यावे लागतन.

**पगन,** टाउनशिप.—वरच्या ब्रह्मदेशांतील मिग्नीयन जिल्ह्याच्या मध्यभागीं असलेली एक टाउनशिप. ही इरावती नदीच्या किनाऱ्यालगत आहे. क्षेत्रफळ ५६९ चौरस मैल. जमीन चांगली पिकाऊ नाहीं.फक्त तीळ,कडधान्यें व ज्वारीचें उत्पन्न होतें. लोकसंख्या (१९११) ७०८०५. यांत एक गांव (न्यांगु) व ११९ खेडीं आहेत.

गांव.—ब्रह्मी राज्याचा सांप्रत मोडकळीस आलेला एक प्राचीन राजधानीचा गांव. उ अ. २१° १०' व पू. रे. ९४° ५३'. हें खेडें इरावती नदीच्या तीरावर न्यौंन्गु गांवानजीक आहे. लोकसंख्या (१९०१) ६२५४. इ. स दुसऱ्या शतकात टौन्गे खेड्याजवळील पुगमा हें राजधानीचें (ब्रह्मी राज्याच्या) गाव होतें. तदनंतर थिरिप्पिस्सया व तदनंतर तम्पवडी हीं राजधानीचीं शहरें होतीं. नवव्या शतकापासून १३ व्या शतकापावेतों पगन हें राजधानीचें शहर होतें. येथील तटाचे व खंदकाचे अवशेष अजूनहि दृष्टीस पडतात. शहराच्या पश्चिमेस इरावती नदी असून तीन बाजूंनीं खंदक होता.

अर्धवट नाश पावलेल्या इमारती व देवालयें:—बुपया पागोडा, मनूह देवालय, ननपया देवालय, श्वेझिगन पागोडा, नगयोन पागोडा, आनंद देवालय, श्वेगुगई पागोडा, थट्टविन्यू व सुलमनी देवालयें व गवदवपलिन, दमयझिक, महबवदी पागोडे इत्यादि.

**पंगमी**—ब्रह्मदेशांतील दक्षिण शान संस्थानच्या म्येलट विभागांतील एक लहान संस्थान. क्षेत्रफळ ३० चौरस मैल. यांतील प्रदेश डोंगराळ असून पूर्व भाग सोडून इतरत्र पाणी मुबलक आहे. लोकसंख्या (१९११) ३५२९. यांत खेडीं ३४ असून दाणू व टौंगियो नांवाचे लोक आहेत. संस्थानचें उत्पन्न (१९०४-०५)३५००रु.असून यास ब्रिटिश सरकारास प्रतिवर्षी खंडणीदाखल २००० रु. द्यावे लागतात.

**पंच**—पंचांचे दोन प्रकार आहेत; एक न्यायपंच (ज्यूरी), व दुसरा व्यवस्थापंच (ट्रस्टी).हिंदु न्यायपद्धतींत प्राचीन काळापासून लवाद किंवा पंचायत कोर्टें आलेलीं आहेत (न्यायपद्धति पहा.).पाश्चात्य देशांत 'ज्यूरी' (पंच) च्या मदतीनें न्याय देण्याची पद्धति १३ व्या शतकानंतर रूढ झाली. तीच पद्धति अल्पांशानें ब्रिटिश अमदानींत हिंदुस्थानात चालू करण्यात आली.

न्यायपंच उर्फ ज्यूरी.—दिवाणी किंवा फौजदारी खटल्यामध्यें पुराव्याच्या गोष्टींतील खरेपणा ठरविण्याकरितां बोलावलेले व शपथ केलेले इसम, अशी इंग्रजी कायद्यांत ज्यूरी शब्दाची व्याख्या आहे. ज्यूरीची निकालपद्धति ही इंग्रजी कायदेशास्त्रानें केलेली फार मोठी कामगिरी असें मानतात, आणि हीच ज्यूरीपद्धति पुष्कळ देशांत अलीकडे सुरू केली आहे. फ्रान्समधील पद्धतीवरून नॉर्मन राजांनीं इंग्लंडमध्यें ज्यूरीपद्धति सुरू केली, असें बहुतेक कायदेपंडित व इतिहासकारांचें आता एकमत झालें आहे. शिवाय अलीकडील एकंदर ऐतिहासिक संशोधनाचा निष्कर्ष असा निघतो कीं, सर्व देशांतच ज्यूरीपद्धतीशीं बरेंच साम्य असलेली निकालपद्धति मूळ होती.

ज्यूरीचे प्रकारः—इंग्लंडमध्यें ज्यूरीचे तीन प्रकार आहेतः—(१) थोरली ज्यूरी, (२) लहान ज्यूरी व (३) मयताची ज्यूरी.

(१) थोरली ज्यूरीः—यामध्यें १२ पासून २३ पर्यंत इसम असतात. फौजदारी कोर्टांत फिर्याद दिली म्हणजे ती खरी असल्याचें ठरविण्याकरिता या ज्यूरीकडे पाठवितात. तें ठरवितांना हे लोक फिर्यादी पक्षाचे साक्षीदार मात्र तपासतात. वकिलानां काम चालविण्याची परवानगी नसते; किंवा आरोपीचाहि साक्षीपुरावा घ्यावयाचा नसतो. फक्त फिर्यादीच्या साक्षीपुराव्यावरून फिर्याद खरी आहे कीं नाहीं एवढा निकाल देण्याचें या ज्यूरीचे काम असतें.

पूर्वी इंग्लंडांतील जुलमी राजे व त्याच्या अंकित न्यायाधीश असत. तेव्हां या थोरल्या ज्यूरीपद्धतीमुळें लोकांचा फार बचाव होत असे. हल्लींच्या सुधारलेल्या चौकशीच्या कायद्याप्रमाणें जज्जांनांच फिर्याद खरी करून घेण्याचें काम

प्रथम करावें लागतें. पण न्यायाधिशांवर राज्यकर्त्यांचें दडपण पडण्याचा जेथें जेथें संभव असतो तेथें तेथें ही पद्धति असणेंच जरूर आहे. इंग्लंडमध्येंहि ती अद्याप चालू आहे.

(२) धाकटी ज्यूरीः—थोरल्या ज्यूरीनें फिर्याद खरी आहे असें ठरविल्यास आरोपी इसमावर फिर्याद अर्जांतील गुन्हा कायद्याप्रमाणें बरोबर शाबित होतो कीं नाहीं हें ठरविण्याचें काम धाकट्या ज्यूरीकडे असतें. इंग्लंडमध्यें दिवाणी दाव्यांतहि ही ज्यूरीची पद्धति आहे. हिंदुस्थानांत फौजदारी कामांतच आणि सेशनकोर्टांत व हायकोर्टमधील खटल्यांत मात्र ज्यूरी बोलतात. शिवाय सेशनकोर्टासंबंधानें सर्व जिल्ह्यांतील लोकांनाहि ज्यूरीपद्धतीचा हक्क दिलेला नाहीं. थोरल्या ज्यूरीची पद्धत तर हिंदुस्थानांत कोठेंच नाहीं. धाकट्या ज्यूरींमध्यें ८ ते १२ पर्यंत इसम असतात आणि ते गुन्हा घडलेल्या ठिकाणचे किंवा त्या कौंटींतील रहिवाशी असतात. त्यामुळें गुन्ह्याविषयीं खरी माहिती त्यांनां बहुतकरून असते.

(३)मयताची ज्यूरीः—आकस्मित किंवा अपघातानें मृत्यु आला असल्यास, किंवा तुरुंगांतील किंवा वेड्यांच्या इस्पितळांतील इसम मयत झाल्यास, किंवा गुप्तद्रव्य कोणास सांपडलें असेल अशा वेळीं पंच बोलावून पंचनामा करतात व ते मृत्यूचें कारण नमूद करतात.

ज्यूरीच्या पद्धतीचा विशेष फायदा अनियंत्रित व जुलमी राज्यपद्धतींत होतो. इंग्लंडमध्यें अलीकडे बऱ्याच दिवाणी व फौजदारी कामांतून ज्यूरीची पद्धत काढून टाकिली आहे.

व्यवस्था पंच ऊर्फ ट्रस्टी.—हिंदूंच्या जुन्या परंपरेंत व्यवस्थापंच' ही संस्था फार जुनी आहे. गांवोगांव देवस्थानांची व त्यांच्या उत्पन्नाची व्यवस्था पाहण्याचें काम गांवांतील पंचांकडे असे व हल्लींहि पुष्कळ ठिकाणीं आहे. शिवाय मयत इसमाच्या इस्टेटीचा वारस अल्पवयी असल्यास त्या इस्टेटीची व्यवस्थाहि गांवचे पंच पहात असत. ब्रिटिश अमदानींत 'प्रायव्हेट ट्रस्ट' अॅक्टाप्रमाणें ट्रस्टी नेमण्याची पद्धत रूढ झाल्यामुळें जुनी 'गांवपंच' ही संस्था खाजगी मिळकतीच्या व्यवस्थेत हात घालूं शकत नाहीं. तथापि भाऊबंदकीच्या वांटण्या गांवपंचामार्फत करून घेण्याची पद्धत अद्यापहि खेडेगांवांतून खालच्या जातीच्या लोकांत रूढ आहे.

रोमन व इंग्रज लोकांत वरील विषयावरील कायदा फार उशीरां उदयास आला. इंग्रजांचा कायदा म्हणजे अर्थात रोमन लोकांच्या कायद्याची पुनरावृत्ति होय. एकाच्या पारिभाषिक शब्दसमूहांत व तन्निर्दिष्ट कल्पनेंत दुसऱ्या कायद्याच्या त्या त्या शब्दांचा व कल्पनांचा अनुवाद केलेला आहे इंग्रजींत या कायद्यास ट्रस्टचा कायदा म्हणतात.

ट्रस्ट म्हणजे कायः—ट्रस्ट म्हणजे जिनगी व तिचें उत्पन्न यांचें सुरक्षण व्हावें असा भावी भोक्त्याचा हक्क. अशा तऱ्हेनें सुरक्षण करण्याचें काम जो आपल्याकडे घेतो त्यास त्या जिनगींतून स्वतःचा फायदा करून घेण्याची अपेक्षा असतां कामा नये. असा ट्रस्ट मृत्युलेखानें किंवा हयातींत करतां येतो. या ट्रस्टचें निरनिराळ्या मुद्द्यावर निरनिराळ्या तऱ्हेचें वर्गीकरण करतात. उदा॰ सामान्य व सार्वजनिक किंवा वाच्य, व्यंग व कायद्यानिर्मित इ.

पंच व भावी भोक्ता कोणास होतां येतेः—'अज्ञान' अवस्थेंत असणारे, वेडे, तसेंच परमुलखांत वसाहत केलेले, अघोर गुन्हा करणारे किंवा राजद्रोही किंवा कर्जबाजारी व भावी भोक्ते इतके वजा करून कोणासहि पंच होतां येतें. फक्त सार्वजनिक संस्थेस राजाज्ञेवांचून होतां येत नाहीं.

ट्रस्टची उत्पत्ति व अंतः—ट्रस्ट हा एखाद्या व्यक्तीच्या कृतीनें किंवा कायद्याच्या व्यापारानें अस्तित्वांत येतो. तो करतांना पूर्वी लेख करण्याची आवश्यकता नसे. परंतु "स्टॅच्यूट ऑफ फ्रॉड्स" यानें त्यांत असा फरक केला कीं ज्या कोणास ट्रस्ट करण्याच्या कायद्यानें अधिकार असेल त्यानें स्थावर जिनगीबद्दल तरी अवश्य लेख करून त्यावर सही केली पाहिजे किंवा मृत्युपत्र केलें पाहिजे, एरव्हीं तो ट्रस्ट रद्द समजला जाईल. यावरून जंगम जिनगीबद्दल केलेला ट्रस्ट तोंडी असला तरी चालतो. धर्मादायविषयक ट्रस्टखेरीज इतर ट्रस्टच्या बाबतींत भावी भोक्ता म्हणजे कोणी तरी विशिष्ट व्यक्ति असली पाहिजे. इ. सन १८६० पूर्वी पंचांत एखादा नवीन इसम दाखल करून घ्यावयाचा झाल्यास मूळ ट्रस्ट लेखांत तसा अधिकार दिल्याबद्दल निर्देश किंवा कोर्टाचा हुकूम लागत असे. परंतु १८९३ सालच्या ट्रस्टी अॅक्टच्या १० व्या कलमाप्रमाणें अवशिष्ट पंच किंवा पूर्वीच्या अवशिष्ट पंचाचा वारसदार यांनीं एक किंवा अनेक नवीन पंच लेखी ठरावानें दाखल करून घ्यावेत. पंचाच्या कामगिरींतून आपली सुटका करून घेण्याची इच्छा करणाऱ्या पंचास अधिकारावर असलेल्या पंचांनीं लेखी रुकार देऊन मुक्त करावें. ट्रस्ट कायदेशीर पाहिजेत म्हणजे प्रचलित कायद्याच्या किंवा नीतिनियमाच्या विरुद्ध असून उपयोगाचे नाहींत. सावकारांस फसविण्याकरितां केलेले ट्रस्ट रद्द होतात. व्यक्तिविषयक ट्रस्ट इतके धर्मादायविषयक ट्रस्टांस कडक नियम लावीत नाहींत. त्यांच्या बाबतींत धर्माचा मुख्य निर्दिष्ट हेतु साधत नसला तरी त्याच्या जवळ जवळ साध्य होण्यासारख्या विषयाकडे ट्रस्टविषयक जिनगीचा उपयोग करतात. याप्रमाणें मूळांत केवळ धर्मादायाकडे लावण्यास सांगितलेल्या देणग्यांचा शैक्षणिक बाबतींत उपयोग केल्याचीं उदाहरणें आहेत. धर्मादाय ट्रस्टच्या बाबतींत मताधिक्याच्या जोरावर पंचांस एखादी गोष्ट करतां येते परंतु खाजगी किंवा व्यक्तिविषयक ट्रस्टमध्यें बहुसंख्यांकांचा निर्णय अल्पसंख्यांकांस किंवा ट्रस्ट जिनगीस बंधनकारक होत नाहीं. इतर जिनगीसंबंधाचे सामान्य कायदे ट्रस्ट जिनगीसहि साधारणपणें लागू पडतात. ट्रस्टच्या उत्पत्तीप्रमाणें त्यांचा अंत-वैय्यक्तिक कृतीनें किंवा कायद्याच्या व्यापारानें घडून येतो.

पंचांचे हक्क व कर्तव्यः—(१) पंचानें एक वेळ काम करण्याचें पत्करलें म्हणजे त्यास आपलें काम सोडून देतां येत नाहीं किंवा दुसऱ्यावर सोंपवितां येत नाहीं कारण आपल्या विश्वासास पात्र म्हणून देणाऱ्यानें तो अधिकार त्याच्याकडे दिलेला असतो. त्यानें पाहिजे तर आपल्या कामाचा राजिनामा द्यावा व तसें करतांना कायद्यानें त्यास आपला प्रतिनिधि निवडून देण्यास बराच अधिकार दिला आहे. (२) पंचास आपला अधिकार किंवा जबाबदारी दुसऱ्यावर टाकतां येत नाहीं या तत्त्वाच्या बाबतींत इ. सन १८९३ च्या ट्रस्टी ॲक्टनें कलम १७, यानें असा अधिकार एखाद्या पंचास सॉलिसिटरकडे कांहीं गोष्टींत देतां येतो या प्रमाणें बदल केला आहे. (३) ट्रस्टचें काम सर्व पंच-मिळून संगनमतानें केलें पाहिजे. (४) एखादा पंच मयत झाला तर त्याच्या जागीं त्याचे वारस (एक किंवा अनेक) येतात. (५) एक पंच तदितर पंचाच्या कृतीबद्दल जबाब-दार नाहीं. पैसे पावल्याबद्दल जरी आपण पावतीवर सही केली तरी पैसे खरोखर दुसऱ्या पंचानें घेतले अशाबद्दल पुरावा देण्याचा पंचास अधिकार आहे.

(६) ट्रस्ट–जिनगीमधून पंचानें स्वतःचा फायदा करून घेतां कामा नये. परंतु जर ट्रस्ट–रोख्यांत त्यास कांहीं वेतन देण्याबद्दल स्पष्ट उल्लेख असेल तर त्यास तें घेतां येईल.

(७) पंचाचें मुख्य कर्तव्य म्हटलें म्हणजे ट्रस्ट-जिन-गीची व्यवस्था करणें, ती सुरक्षित ठेवणें, व योग्य तारणावर व्याजी लावणें हें होय. त्यानें आपला स्वार्थ आपल्या कर्त-व्याच्या आड येऊं देऊं नये. पंच आपल्या पदावर असतां भावी भोक्त्यापासून ट्रस्ट–जिनगी किंवा तिचा अंश विकत घेतां कामा नये. कायद्यानें निर्दिष्ट केलेल्या जागींच तेवढी त्यानें जिनगी गहाण टाकावी किंवा व्याजीं लावावी. इ.

भावी भोक्ता आणि त्याचे हक्क व कर्तव्येंः—हे हक्क व कर्तव्यें काय असावींत हें पंचांचे वर दिलेले हक्क व कर्तव्यें यांवरून सहज कळून येईल. ट्रस्ट-जिनगीची योग्य रीतीनें व्यवस्था ठेवण्यांत यावी, हिशोब नीट रीतीनें ठेवण्यांत यावेत व जिनगीवरील उत्पन्नाचा नीट उपभोग मिळावा असा भावी भोक्त्याचा हक्क आहे. भावी भोक्ता यानें पंचांच्या सल्ल्यानें चालावें. जेव्हां पंचावरच विरुद्ध काम चालविणें असेल तेव्हां गोष्ट निराळी.

कोर्टमार्फत पंचव्यवस्थाः—जेव्हां ट्रस्ट करणाराकडून किंवा ट्रस्ट करण्याची इच्छा असणाऱ्याकडून किंवा त्यांच्या तर्फे पंचाची नेमणुक करण्याबद्दल न्यायकोर्टास अर्ज केला जाईल तेव्हां कोर्टानें आपल्यास योग्य वाटेल त्याप्रमाणें दुसऱ्या पंचाबरोबर किंवा स्वतंत्रपणें किंवा पूर्वीचे पंच रद्द करून एक किंवा अनेक पंचांची नेमणूक करावी. अशा रीतीनें नेमलेल्या पंचांच्या कामावर कोर्टाच्या इतर कामगारांप्रमाणें कोर्टाची देखरेख असते. त्यांच्या कामाबद्दल ट्रस्ट-जिनगीमधून त्यास वेतन देण्यांत येतें. वर्षातून त्यांचा हिशोब तपासतात. या पंचाला आपल्या जागेबद्दलचा जामीन द्यावा लागतो. कोर्टानें पसंत केलेल्या पेढीवरच त्यानें व्यवहार करावा. जिनगीसंबंधीचे कागदपत्र जेथें ठेवण्याबद्दल कोर्टाचा हुकूम होईल तेथेंच ठेवावेत.

**पंचजन**—वैदिक वाङ्मयामध्यें पंचजनांचे, पंचजनाः, पंचमानवाः, पंचमानुषाः, पंचकृष्टयः इत्यादि निर-निराळ्या नांवांनीं उल्लेख आले आहेत, पण हे पंचजन कोण असावेत यासंबंधीं मात्र विद्वानांमध्यें बराच मतभेद आढ-ळून येतो. खुद्द ऐतरेय ब्राह्मणांत, पंचजन म्हणजे देव, गंधर्व व अप्सरस्, मनुष्य, सर्प व पितर हे होत असें म्हटलें आहे. औपमन्यवाच्या मतें चार वर्ण व निषाद असा पंचजनांचा अर्थ आहे. सायणाचें मत औपमन्यवाप्रमाणेंच आहे. यास्कानें पंचजन म्हणजे गंधर्व, पितर, देव असुर, व राक्षस होत असें निरुक्तांत म्हटलें आहे. तात्पर्य पंचजन म्हणजे कोण याविषयीं पौरस्त्य पंडितांमध्येंहि मतैक्य नाहीं. पाश्चात्त्य पंडितांमध्येंहि हीच स्थिति आढळून येते. पंचजन म्हणजे चारी दिशेला रहाणारे लोक व त्या सर्वांच्या मध्य भागीं रहाणारे आर्यन लोक, म्हणजे सर्व पृथ्वीवरील लोक होत असें रॉथ व गेल्डनर यांचें म्हणणें आहे. पण झिमरला हें म्हणणें मान्य नाहीं. तो म्हणतो कीं, वैदिक ऋषींनीं आर्यांबरोबर दासांचीहि गणना पंचजनामध्यें केली असावी हें म्हणणें चुकीचें होईल. जनासः अगर मानवाः यांच्यामध्यें आर्येतरांची गणना ऋषी कधींहि करणार नाहींत. पंचजनामध्यें सोमाचाहि उल्लेख केलेला ऋग्वेदाच्या ९ व्या मंडळांत आढळतो तात्पर्य झिमरच्या मतें पंच-जनानें आर्यन लोकांचाच निर्देश होत असून ऋग्वेदांत अनु, यदु, द्रुह्यू, तुर्वश व पुरु या ज्या लोकांचा उल्लेख आला आहे ते पंचजन होत व त्यांचा देव इंद्र असल्यानें इंद्राला पांचजन्य हें नांव प्राप्त झालें आहे. तुर्वश हे जातिविशिष्ट नांव नसून यदू लोकांच्या राजाचें नांव होतें. यास्तव झिम-रचें म्हणणें चुकीचें आहे असें हॉपकिन्सनें म्हटलें आहे. पण त्यांत विशेष तथ्य नाहीं. पंचजन हे भरताच्या विरुद्ध होते असें शतपथ व ऐतेरेय ब्राह्मणांत म्हटलेलें आहे. पंच-जन व पांचाल हे एकच होत असे वेबरनें प्रतिपादन केलें आहे. तात्पर्य, पंचजन यानें कोणते लोक विवक्षित आहेत याचा अद्यापि निर्णय लागलेला नाहीं. तथापि तो शब्द वरील पांच इंद्रपूजक राष्ट्रांस लावीत असावे हेंच सयुक्तिक दिसतें

**पचधा**—पंजाबांतील एक जात असून यांची लोकसंख्या (१९११) ३२४२५. हे सर्व मुसुलमान असून हिसार व कर्णलमध्यें आढळतात. पचधा ही स्थलवाचक संज्ञा असून भटिंडा व हरियाना या भागांत मुसुलमान, जाट किंवा सत-लजच्या पश्चिमेकडील प्रदेशांतून आलेल्या रजपूत लोकांस ती संज्ञा लावतात. गुरें चारणें हा त्याचा पिढीजाद धंदा आहे. परंतु आजकाल ते शेतकीहि करूं लागले आहेत.

त्यांच्याजवळ राहणारे लोक त्यांना राठ असें म्हणतात. [ से. रि. ( १९११ ) पु. १४.]

**पंचभद्रा**—राजपुतान्यांतील जोधपूर संस्थानच्या पंचभद्रा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें जोधपूर-विकानेर लाईनवरील स्टेशनापासून ५ मैल दूर आहे. लोकसंख्या (१९०१) ३१९४. हिंदुस्थानांत या ठिकाणीं उष्णता सर्वांत अधिक असते. पारा थंडींतच १२२° वर असतो. गांवाच्या पश्चिमेस ५ मैलांवर मीठ ज्यापासून तयार करतात तो तलाव आहे. पण जोधपुर दरबारनें तो ब्रिटिश सरकारास मक्त्यानें दिला आहे.

**पंचमढी**—मध्यप्रांतांतील हुशंगाबाद जिल्ह्याच्या सोहागपूर तहशिलीमधील एक थंड हवेचें ठिकाण. हें सातपुडा डोंगरसपाटीवर असून ग्रेट इन्डियन पेनिनशुला रेल्वेच्या पिपरिया स्टेशनापासून ३२ मैलांवर आहे. पचमढीची उंची ३५०० फुटांहून अधिक आहे. क्षेत्रफळ २३ चौरस मैल. बहुतेक भाग जंगलानें व्यापलेला आहे. मध्यप्रांताचा गव्हर्नर येथें उन्हाळ्यांत रहावयास येतो. पंचमढी हें नांव पंचमठी ह्या शब्दाचा अपभ्रंश होय, व त्याप्रमाणें येथें पांच गुहा आहेत. ह्या बौद्धकालीन असाव्यात.

धूपगड, महादेव, चौरागड हीं शिखरें आहेत.मे महिन्यांत पारा ८५° अंशावर असतो. आक्टोबरमध्यें येथील हवा फार थंड व मनाला आल्हादकारक असते. वार्षिक पाऊसपाणी ७७ इंच पडतें. १८८५सालीं म्युनिसिपालिटीची स्थापना झाली असून येथें एक लष्करी छावणीहि आहे.

**पंचमहाल**—मुंबई इलाख्याच्या उत्तर विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १६०६ चौरस मैल. रेवाकांठा एजन्सींतील बारिया संस्थानाच्या लांबट भागामुळें ह्या जिल्ह्याचे दोन भाग पडले आहेत. प्रदेश डोंगराळ व जंगली आहे. या जिल्ह्यांत माही, अणास व पानम या नद्या आहेत. पानम नदीजवळ ओरवाडा तलाव आहे. जिल्ह्याचे नैर्ऋत्यभागांत पावागड डोंगर आहे. तो भोंवतालच्या प्रदेशापासून २५०० फूट उंच असून वर एक किल्ला आहे. गोध्र्याच्या पश्चिमेस १० मैलांवर तुवा येथें उष्ण पाण्याचे झरे आहेत. येथें कोळी व भिल्ल लोक मार्च महिन्यांत महादेवाची पूजा करण्यास येतात. हालोल पेट्यांत पाऊस ४१ इंच व दोहदमध्यें ३० इंच पडतो. या जिल्ह्यांत पाऊस फार उशीरां पडतो.

इ ति हा स.—पंचमहालाचा इतिहास व नामशेष झालेल्या चंपानेर शहराचा इतिहास एकसारखाच आहे. हिंदू काळांत चम्पानेर (८ व्या शतकाच्या शेवटीं शेवटीं हें शहर वसविलें गेलें ) अनहिलवाड्याच्या राजांचें व तुवर वंशाच्या राजधानीचें शहर होतें. तुवरानंतर चव्हाण आले व स. १४८४ त महमद बेगडा येईपर्यंत हें शहर व भोंवतालचा प्रदेश चव्हाणांच्या ताब्यांत होता पुढें स. १५३६ पावेतों चंपानेर गुजराथची राजधानी होती स. १५३५ मध्यें हुमायूननें हें शहर लुटलें व १५३६ सालीं येथून राजधानी अमदावाद येथें नेण्यांत आली. १८ व्या शतकाच्या मध्यकालाच्या सुमारास शिंद्यांनीं हा जिल्हा आपल्या ताब्यांत घेतला, व स. १८५३ मध्यें हा ब्रिटिशांकडे आला. ह्याबद्दल स. १८६१ मध्यें शिंद्यास झांशीजवळील कांहीं जमीन सरकारनें दिली. ह्यावेळीं हा जिल्हा रेवाकांठाच्या पोलिटिकल एजंटच्या ताब्यांत देण्यांत आला. स. १८७७ मध्यें ह्या जिल्ह्यास एका वेगळ्या कलेक्टराची नेमणूक करून देण्यांत आली. स. १८५८ मध्यें तात्या टोपीनें येथें गडबड केली होती. व १८६८ सालीं कोणी नायकडांनीं बंड केलें होतें पण लवकरच सैन्य पाठवून तें मोडण्यांत आलें व जोरिया यास फांशीवर चढविलें.

पावागडावर ‘ सातमहालाचा ’ अवशेष भाग आहे. त्याचप्रमाणें माची हवेली,मकई कोठार व नवलाख कोठार या वाड्यांचेहि अवशेष आहेत. डोंगराच्या शिखरावर कालिकामातेचें देवालय आहे. कांहीं इतर देवालयेंहि आहेत. चंम्पानेरची जुम्मा मशीद प्रसिद्धच आहे. शिवाय जंगलांत कांहीं मशिदी व थडगीं आहेत. शहरें चार; पैकीं गोध्रा, दोहद, झालोद हीं तीन मुख्य महत्त्वाचीं आहेत. खेडीं ६५६ असून लोकसंख्या (१०२१) ३७४८६०. शेंकडा ८० हिंदु आहेत. शेंकडा ९७ लोक गुजराथी भाषा बोलतात. मूळचे रहिवासी भिल्ल व नायकडे असून हे धान्य, लांकूडफांटा व गवत विकतात. हे हालोलच्या जंगलांत रहातात. शेंकडा ७१ लोक शेतकीवर उपजीविका करतात. व्यापार बहुतेक वनिया व वोहरी लोकांच्या ताब्यांत आहे. इमारती लांकडाचा बहुतेक व्यापार वोहऱ्यांच्याच हातीं आहे.

गोध्र्याच्या वायव्येस मळेवजा जमीन आहे. ‘ माळ ’ जमीन म्हणजे काळसर जमीन गोध्र्याच्या दक्षिणेस आहे. ह्या पलीकडे गोराडु जमीन आहे. पूर्वभागाची जमीन काळी आहे, व पाण्याच्या विपुलतेमुळें मोठी सुपीक आहे. मुख्य पीक मका, चणे, गहूं आहे. रयतवारी, तालुकदारी, मेवाशी व मक्त्यानें देणें ह्या धारापद्धती जिल्ह्यांत आहेत. शेंकडा १८ एकर जमीन इनामांत व जहागिरींत अडलेली आहे. मुख्य पीक मक्याचें आहे. दोहद तालुक्यांत बहुतेक सर्व मकाच पेरतात. मक्याच्या खालोखाल बाजरीचें पीक आहे. इतर पिकें तांदूळ, चणे, तीळ, तूर, एरंडी. कालोल व हालोलमध्यें कापूस पेरतात. जंगल ३३१ चौरस मैल असून इमारती व जळाऊ लांकूड बाहेरगांवीं पाठविलें जातें. शिवाय मोहाच्या फुलांचा जंगी खप आहे. ह्या जिल्ह्यांत सांपडणारे खनिज पदार्थ लोखंड, शिसें, मॅंगनीज व अभ्रक हे होत. गोध्रा ते रतलाम आगगाडी झाल्यापासून ह्या जिल्ह्याच्या व्यापारास तेजी आली आहे. येथून गुजराथकडे धान्य, मोहाचीं फुलें, इमारती लांकूड व गळिताचीं धान्यें हा माल जात असून आयात माल तंबाखू, मीठ, नारळ, धातूंचें सामान हा आहे.

**पंचमहाशब्द**—पूर्वकाळीं पंचमहाशब्दांचा अधिकारी फक्त राजाच असे. इतरांनां तीं वाद्यें वाजविण्याचा अधिकार

नसे. ताम्रपटांतून "समधिगतपंचमहाशब्द" असा राजाबद्दलचा विशेषणप्रयोग येतो. हीं वाद्यें पुढीलप्रमाणें:—(१) शृंग ( शिंग, कर्णा ), (२) राम्मट ( ताशा ),(३) शंख, (४) भेरी ( नगारा ), (५) जयघंटा ( तास, घड्याळ ). बाणभट्टानें (१) पटह (नगारा ), (२)नान्दी ( झांझ ? ), ३ कुंज, (४)काहळ, (५) शंख हीं वाद्यें सांगितलीं आहेत. राजाची स्वारी निघाली म्हणजे इतकीं वाद्यें त्याच्यापुढें वाजत. हर्षवर्धनाच्या प्रत्येक पावलाबरोबर सोन्याच्या टिपरीनें नौबतीवर एकेक ठोका देण्यांत येई असें ह्युएनत्संगनें म्हटलें आहे. [ मध्य. भारत. भा. १ .]

**पंचांग**—तिथि, वार, नक्षत्र, योग आणि करण असे पांच अवयव ज्यामध्यें असतात त्यास पंचांग अशी संज्ञा आहे.

ति थि.—रवि आणि चंद्र या दोघांच्या भोगामध्यें १२ अंश अंतर पडलें असतां एक तिथि होते. याप्रमाणें शुद्ध प्रतिपदेला रवि व चंद्र यांचें क्रांतिवृत्तीय अंतर १२ अंश, द्वितीयेला २४ अंश, याप्रमाणें वाढत जातें. रविचंद्रांतर ( १२×३० = ) ३६० अंश असल्यास ३० वी तिथि म्हणजे अमावास्या किंवा अमातिथि असें म्हणतात. याच तिथीस दर्श अशीहि संज्ञा आहे. अमाशब्दाचा अर्थ एकत्र होणें असा आहे. दर्शतिथीस सूर्य-चंद्र यांचा योग होतो. याप्रमाणें तीस तिथि झाल्या असतां एक चांद्रमास होतो. भास्कराचार्यांनीं सिद्धांतशिरोमणीमध्यें असें सांगितलें आहे कीं रविचंद्रांची युति झाल्यापासून पुन्हां दुसरी युति होईपर्यंत जो काल जातो त्यास विधुमास म्हणजे चांद्रमास असें म्हणतात; एवढ्या कालामध्यें तीसच तिथी होतात. या चांद्रमासास पैत्र्य धुरात्र म्हणजे पितरांचें अहोरात्र म्हणतात.

न क्ष त्र.—नक्षत्रचक्राच्या आरंभस्थानाबद्दल एकमत नाहीं. याबद्दल पांचव्या विभागांत ज्योतिषशास्त्राचा इतिहास देतांना स्पष्ट विवेचन केले आहे (ज्ञा. को. वि. ५, पृ. ३६८–३६९ ). शुद्ध पंचांगप्रवर्तन कमिटीच्या ( टिळकपंचांगाच्या ) मतें निःशर रेवती योगतारा आरंभस्थान आहे. चंद्र या निःशररेवती योगतारेपासून ( इंग्रजींत ज्याला झीटापिशियम असें म्हणतात त्या तारेपासून ) क्रांतिवृत्तांतील ८०० कला गेला असता त्या गेलेल्या ८०० कलांस अश्विनी नक्षत्र असें म्हणतात. याप्रमाणे प्रत्येक आठशें अंशांचा एक नक्षत्रविभाग होतो व त्यास अश्विनी, भरणी, कृत्तिका इ. नांवें आहेत. याप्रमाणें २७ नक्षत्रें आहेत. अभिजित् म्हणून एक अठ्ठाविसावें नक्षत्र धरतात. त्याची स्थिति अशी–उत्तराषाढा नक्षत्राचा चतुर्थ चरण आणि श्रवणाचा तिथ्यंश म्हणजे पंधरावा हिस्सा यास अभिजित् नक्षत्र म्हणतात

यो ग.—रेवतीयोगताऱ्यापासून ( झीटापिशिअमपासून ) मापलेले रवीचे भोग (लांजिटयूड) आणि चंद्राचा भोग यांची बेरीज ८००कला झाली असतां विष्कंभयोग असें म्हणतात. याप्रमाणें ८०० कलांचा एक याप्रमाणें विष्कंभ, प्रीति, आयुष्मान इत्यादि २७ योगांची गणना करतात. या योगांचा उपयोग असा होतो कीं, तिथीवरून रवि व चंद्र यांचें अंतर समजतें, व योगावरून रवि व चंद्र यांच्या भोगांची बेरीज समजते. त्या बेरीज व वजाबाकीवरून रवि व चंद्र किती किती आहेत हें सहज काढतां येईल. कारण

$$अ - ब = म \quad आणि$$

$$अ + ब = ड.$$

या दोन समीकरणांवरून

$$२ अ = म + ड$$

$$\therefore अ = \frac{म+ड}{२}$$

अ समजल्यावर ब निघेल. शिवाय योगांचा उपयोग रविचंद्रांच्या क्रांतिसाम्याविषयीं होतो. रवि व चंद्र यांची बेरीज ६ राशी किंवा १२ राशी झाली असतां क्रांतिसाम्य सुमारानें होतें. याविषयीं पूर्ण विचार खानापूरशास्त्री यांच्या ग्रहलाघवाच्या सोपपत्तिक भाषांतरांत पाताधिकारामध्यें दिला आहे.

क र ण.—तिथीच्या अर्धास करण असें म्हणतात. म्हणजे रवि व चंद्र यांच्यामध्यें सहा अंशांचें अंतर झालें असतां एक करण होतो हे करण ११ आहेत. बव, बालव, कौलव, तैतिल, गर, वणिज, भद्रा, शकुनि, चतुष्पाद, नाग, व किंस्तुघ्न; यांपैकीं पहिले ७ करण चल आहेत आणि पुढील ४ करण स्थिर आहेत. दर तिथीला दोन करण असतात. शुक्ल प्रतिपदेच्या उत्तरार्धापासून कृष्णपक्षाच्या चतुर्दशीच्या पूर्वार्धापर्यंत चल करण ( रोज दोन असे ) ओळीनें येतात. कृष्णपक्षाच्या चतुर्दशीच्या उत्तरार्धापासून शुक्ल प्रतिपदेच्या पूर्वार्धापर्यंत स्थिर करण असतात.

याप्रमाणें सात चल करणांची स्थिति निरनिराळी असते. या सात चल करणांचे फेरे एका चांद्रमहिन्यांत ८ वेळां होतात. यावरून ७×८ = ५६ चल करण आणि ४ स्थिर करण मिळून ५६+४ = ६० करण होतात. तिथीच्या अर्धासच करण संज्ञा असल्यामुळें ३० तिथींत ६० च करण होणार हें उघड आहे.

वा र.—वार सात आहेत. रविवार, सोमवार, मंगळवार, बुधवार, गुरुवार, शुक्रवार आणि शनिवार. प्राचीन ग्रहकक्षाभंगीवरून वारांचा क्रम आंखण्यांत आलेला दिसतो. मध्यें पृथ्वी, त्याभोंवतीं चंद्राची कक्षा, नंतर बुध, शुक्र, रवि, मंगळ, गुरु व शनि यांच्या कक्षा अशा तऱ्हेची प्राचीन ग्रहकक्षाभंगी आहे. प्रत्येक वाराच्या स्वामीचा होरा एक तास याप्रमाणें असतो. अर्थात आज सूर्योदयीं रवीचा होरा असल्यास दुसऱ्या दिवशीं सर्व ग्रहांचे तीन फेरे होऊन सूर्योदयीं चंद्राचा होरा येतो. नंतर दुसऱ्या दिवशीं मंगळ याक्रमानें ग्रह येतात.

*तिथ्यानयन प्रकारः*—स्पष्ट चंद्रांतून स्पष्ट रवि वजा करून जें शेष राहील त्याचे अंश करून त्यांस १२ नीं भागून जो

भागाकार येईल त्या गततिथी येतील, आणि अंशादि जी बाकी राहील ती वर्तमान भुक्ततिथी म्हणजे वर्तमान तिथीचा गेलेला भाग होईल. तो १२ अंशांतून वजा करून जी बाकी राहील ती वर्तमान भोग्यातिथि म्हणजे वर्तमानकालीं भोगावयाची राहिलेली तिथि होईल. नंतर भुक्ततिथि आणि भोग्यातिथि यांच्या विकला करून त्यांस प्रत्येकीं ६० नीं गुणून जो गुणाकार येईल त्यास, रवि आणि चंद्र यांच्या स्पष्टगतींच्या अंतराच्या विकलांनीं भागून जीं घटिकादि पळें येतील तीं अनुक्रमें भुक्ततिथि व भोग्यातिथी यांच्या घटिका व पळें निघतील.

उदाहरण, स्पष्ट रवि, १ राशि ५ अंश, ४२, कला ३७ विकला आहे व स्पष्ट रवीची स्पष्टगति ५७ कला ३६ विकला आहे. आणि स्पष्टचंद्र ६।२४।१४।५४ इतका राश्यादि आहे, व त्याची गति ८१९ कला आहे तर तिथि कोणती व किति घटिका आहे हें सांगा?

याचें उत्तर असें:—दिलेल्या स्पष्टचंद्रांतून ( ६।२४।१४। ५४ ) स्पष्ट रवि ( १।५।४२।३७ ) वजा करून ५।१८।३२। १७ इतकें शेष राहिलें. याचे अंश १६८।३२।१७ यांस १२ नीं भागून १४ गततिथी आल्या व बाकी ०।३२।१७ राहिली. ही भुक्तपौर्णिमा १२ अंशांतून वजा करून ११।२७।४३ ही भोग्यपौर्णिमा निघाली आतां भुक्ततिथीच्या विकला १९३७; यांस ६० नीं गुणून गुणाकार ११६२२० इतका आला. यास रविचंद्रांच्या स्पष्टगतींच्या अंतराच्या ४५६८४ विकलांनीं भागून २घटिका, ३२पळें आलीं.पौर्णिमातिथीचीं भुक्त घटी हीं पळें आलीं. पुन्हां भोग्यतिथीच्या विकला ४१२६३ यांस ६० नीं गुणून २४७५७८० इतका गुणाकार आला. यास ४५६८४ ह्या गत्यंतर विकलांनीं भागून ५४ घटिका ११ पळें आलीं; हीं पौर्णिमेचीं भोग्यघटी–पळें झालीं.

नक्षत्रानयन प्रकारः—स्पष्टचंद्राच्या कला करून त्यांस ८०० नीं भागून जो भागाकार येईल तीं गतनक्षत्रें येतील व बाकी राहील तें वर्तमाननक्षत्रांपैकीं भुक्तनक्षत्र म्हणजे भोगून गेलेलें नक्षत्र येतें. तें भुक्तनक्षत्र ८०० कलांतून वजा केलें असतां भोग्यनक्षत्र म्हणजे पुढें भोगावयाचें नक्षत्र येतें. नंतर भुक्तनक्षत्र व भोग्यनक्षत्र यांच्या विकला करून त्यांस प्रत्येकीं ६० नीं गुणून आलेल्या गुणाकारास चंद्राच्या स्पष्टगतीच्या विकलांनीं भागिलें असतां अनुक्रमें भुक्तनक्षत्र व भोग्यनक्षत्र यांचीं घटी–पळें येतील.

योगानयन प्रकारः—स्पष्टरवि आणि स्पष्टचंद्र यांच्या बेरजेच्या कला करून त्यांस ८०० नीं भागून जो भागाकार येईल ते गतयोग येतात. आणि जी बाकी राहील तो वर्तमानकालीं भुक्तयोग होतो व तो भुक्तयोग ८०० कलांतून वजा करून जें शेष राहील तो भाग योग व भोग्ययोग होईल. नंतर भुक्तयोग व भोग्ययोग यांच्या विकला करून त्यांस प्रत्येकीं ६० नीं गुणून आलेल्या गुणाकारास रविचंद्राच्या स्पष्टगतींच्या बेरजेच्या विकलांनीं भागिलें असतां अनुक्रमें भुक्तयोग व भोग्ययोग यांचीं घटीपळें निघतात.

करणानयन प्रकारः—गततिथींच्या संख्येस २ नें गुणून व ७ नीं भागून जें शेष राहील तें बवापासून तिथीच्या पूर्वार्धाचें करण होतें. त्यांत १ मिळविला असतां तिथीच्या उत्तरार्धाचें करण होतें. चार स्थिर करण पूर्वी सांगितलेले आहेत त्यावांचून वरील रीत घ्यावी, आणि उदाहरणांत घटी–पळें आणावयाचीं झाल्यास भोग्यतिथींतून भुक्ततिथि वजा करून जें शेष राहील त्याचें अर्ध करावें म्हणजे घटी–पळें येतात.

तिथिक्षयवृद्धि.—चंद्र व सूर्य यांमध्यें १२ अंश अंतर जर दोन सूर्योदयांच्या आंतच पडलें तर त्या तिथीस क्षयतिथि असें म्हणतात. म्हणजे जी तिथि दोन्हीहि सूर्योदयांस व्यापून नसते ती क्षयतिथि होय. तसेंच रवि व चंद्र यांच्यामध्यें १२ अंश अंतर होण्यास जर एका दिवसापेक्षां जास्त काळ लागला तर त्या तिथीस तिथिवृद्धि असें म्हणतात.

नक्षत्रक्षयवृद्धि.—एका सूर्योदयानंतर आणि दुसरा सूर्योदय होण्यापूर्वी ज्या नक्षत्राची आरंभसमाप्ति होते त्या नक्षत्राचा क्षय झाला असें म्हणतात.

. .क्षयवृद्धि.—तिथींच्या व नक्षत्राच्या क्षयवृद्धीप्रमाणेंच योगाचे क्षयवृद्धि होतात. एका तिथीमध्यें दोन करण असल्यामुळें करणास कधींहि क्षयवृद्धि नसते.

पं चां गा व लो क न.—पंचांगाच्या पत्रांत प्रथम तिथीचें कोष्टक देतात. नंतर वारकोष्टक लिहून त्या तिथींच्या घटिका व पळें दिलेलीं असतात.नंतर योग मांडून योगाचीं घटी–पळें देतात. नंतर करण देऊन त्यांचीं घटी–पळें दिलेलीं असतात. नंतर रोजचें दिनमान दिलेलें असतें. नंतर पारशी तारीख, मुसलमानी तारीख आणि इंग्रजी तारीख देतात. नंतर रवीचा उदय किती वाजतां होईल हें दिलेलें असत, व पुढें रवीचा अस्त किती वाजतां होईल हें दिलेलें असतें, व पुढच्या कोष्टकांत चंद्र कोणत्या राशींत त्या दिवशीं आहे हें दिलेलें असतें. पुढच्या कोष्टकांत शास्त्रार्थ देतात, व खालच्या बाजूस रव्यादि स्पष्टग्रह पौर्णिमेच्या दिवशीं सूर्योदयीं कोणत्या राशींत आहेत हें दिलेलें असतें. शुक्लपक्ष असल्यास पौर्णिमातिथीच्या सूर्योदयाचे स्पष्ट ग्रह असतात. आणि कृष्णपक्ष असल्यास अमावास्येच्या सूर्योदयाचे स्पष्टग्रह दिलेले असतात. ग्रहांच्या कोष्टकांत ४ अंक दिलेले असतात त्यापैकीं पहिला अंक, ग्रहाच्या दुसऱ्या राशी जितक्या झाल्या असतील तत्तुल्य असतो; दुसरा अंक, वर्तमानराशीपैकीं किती अंश पुरे झाले आहेत त्याचा द्योतक असतो. तिसरा व चवथा अंक हे क्रमानें पुऱ्या झालेल्या कला व विकला यांचे द्योतक असतात. असेंच बाकीच्या ग्रहांविषयीं समजावें ग्रहाच्या खालीं त्याच्या रोजच्या गतीच्या कला व विकला देतात. तशीच एक कुंडली ( कोणता ग्रह कोणत्या राशींत आहे हें पाहण्याचा नकाशा ) देतात. त्यावरून कोणताहि ग्रह कोणत्या राशींत आहे, हें समजतें. हा क्रांतिवृत्तांतील १२ राशींचा नकाशा

आहे, व त्यांतील जो राशि क्षितिजाला त्यावेळीं संलग्न असेल तो कुंडलीच्या मध्यें मांडून पुढें अपसव्यक्रमानें बाकीच्या राशींचे अंक मांडलेले असतात, व त्यावेळीं ग्रह ज्या ज्या राशींत असतील तसे त्या त्या ठिकाणीं लिहितात. निरनिराळ्या प्रांतांतील पंचांगें,पंचांगाचें गणित,दृक्प्रत्ययद पंचांगें, सायननिरयन मानांचें ग्राह्याग्राह्यत्व व पंचांगसुधारणेचे अर्वाचीन प्रयत्न यांची सविस्तर माहिती पांचव्या विभागांत ( ज्योतिषशास्त्राचा इतिहास-पृ. ३६२-३६९ ) आली आहे तेव्हां त्याविषयीं या लेखांत पुनरुच्चारण केलें नाहीं.

**पंचाल**—पांचाल पहा.

**पंचासर**—मुंबई, पालनपुर संस्थान. राधनपुरपासून दक्षिणेस ३० मैलांवरील लहान शहर. १७ व्या शतकांत चावडाच्या जयशेखरची ही राजधानी होती. पंचासरजवळ राणतोडा व सांकेश्वर येथें दोन मंदिरें आहेत.

**पंजाब**—हिंदुस्थानांतील अगदीं उत्तरेकडचा प्रांत. एकंदर क्षेत्रफळ ११५२८ चौ. मैल या प्रांतांतून मोठ्या ५नद्या वाहतात म्हणून यास हें नांव मिळालें. यांत सृष्टिसौंदर्य, सुपीकपणा, व पाण्याचा पुरवठा चांगला आहे; सखल मैदानें नद्यांच्या गाळांनीं भरलेलीं आहेत. मिठाच्या डोंगरांच्या ओळी व हिमालयांतील प्रस्तरावशेष यांवरून अत्यंत पुरातन काळीं या भागांत समुद्र असावा असें वाटतें; एकोणिसाव्या शतकापर्यंत इकडे सिंह दिसत होते; कस्तुरीमृग व रानहत्ती हिमालयाच्या बाजूस आहेत.उन्हाळा व हिंवाळा कडक असतो. डिसेंबर-मार्च व जून-सप्टेंबर असा दोनदां पावसाळा आहे; तो हिमालयालगे सर्वांत जास्त, पठारावर मध्यम व पश्चिम बाजूस कमी असतो. धरणीकंप (विशेषतः कांग्रा भागांत) फार होतात. सिंधू, झेलम, चिनाब, रावी, सतलज, बिआस, व यमुना अशा सात नद्या मुख्य आहेत. यांच्या पुरामुळें पुष्कळदां नुकसानहि होतें. फिरोझ तुघलखानानें या नद्यांपासून कालवे काढून हा प्रांत सुपीक बनविला.

फार प्राचीन काळी आर्य लोकांनीं येथें वसाहत केली. ऋग्वेदाचा कांहीं भाग येथें तयार झाला. कुरुक्षेत्र ( ठाणेश्वराजवळ ) येथें भारतीयुद्ध झालें. पौरवांनीं दिल्ली (इंद्रप्रस्थ) येथें राज्य स्थापिलें. युधिष्ठिरानंतर निरनिराळ्या हिंदू राजवंशांचा अंमल पंजाबावर होता. नंद, मौर्य, ग्रीक, युएची, शक, रजपूत, मुसुलमान, शीख व इंग्रज यांच्या हातीं क्रमाक्रमानें पंजाब आला. हा प्रांत सरहद्दीवरील असल्यानें त्यास परकीय लोकांच्या स्वाऱ्यांमुळें सतत त्रास होतो;पण त्यामुळें तेथील लोक काटक बनले आहेत. बाबा नानकानें स्थापिलेला शीखधर्म मूळचा धार्मिक असतां, मुसुलमानांच्या छळामुळें तो वीरधर्म बनला आणि पुढें मुसुलमानी बादशाहीच्या नाशास त्यानें मदत केली. या लोकांत शिपाई बाणा तेव्हांपासून आतांपर्यंत बाणलेला आहे. त्याचाच परिणाम म्हणजे रणजितसिंहानें स्वतंत्र शीख राज्याची स्थापना करणें हा होय. नानागर्दीच्या ( १८५७ ) वेळीं प्रथम प्रथम यांनीं उचल केली होती. परंतु इंग्रजांनीं लष्करी दडपशाही सुरू केल्यानें शीख पलटणी स्वस्थ राहिल्या. एवढेंच नाहीं तर त्यांच्या नवीन १८ पलटणी उभारून इंग्रजांनीं त्यांच्याकडूनच नानागर्दी मोडविली. झिंद, पतियाळा, वगैरे संस्थानिकांनींहि या वेळीं इंग्रजांना मदत केली. त्यापूर्वीच ई. इं. कंपनीनें रणजितसिंगाचें राज्य हस्तगत केलें होतें.पंजाबांत १८५९ त आगगाडीचा पहिला रस्ता तयार झाला. सांप्रत तर लष्करीदृष्ट्या आगगाडीचे अनेक फाटे पंजाबांत तयार झाले आहेत. पंजाबांतीलच कांहीं भागाचा वायव्यसरहद्दीचा प्रांत स.१९०१ मध्यें नवीन बनविला.सर्व पंजाब खालसा केल्यावर प्रथम तो एका चीफ कमिशनरच्या, नंतर ले. गव्हर्नरच्या व सांप्रत गव्हर्नरा( इन-कौन्सिल )च्या ताब्यांत दिला गेला. मांटेग्यु-चेम्सफर्ड-सुधारणेप्रमाणें हल्लीं ( १९२५ ) या गव्हर्नरास कार्यकारी सरकारी दिवाण व लोकनियुक्त दिवाण हे मदत करतात. मुंबई, मद्रास वगैरे प्रांतांप्रमाणेंच प्रांतिक कायदेमंडळहि दिलें आहे.

पंजाबात पुराणवस्तूंचे अवशेष फारसे सांपडत नाहींत. ग्रीक स्वाऱ्यांसंबंधाचे अवशेष मुळींच नाहींत असें म्हटलें तरी चालेल; अशोककालीन मात्र कांहीं सांपडतात. उदा० दिल्ली, शहाबाझगढी, मानेश्वर, शाहधेरी इ. गांवाचे अवशेष. एक तर नद्यांच्या पुरानें ते वाहून गेले व दुसरें मुसुलमानांच्या उत्पातानें त्यांची वाताहात झाली. उदा० दिल्लीची जुम्मा मशीद २७ देवळें पाडून त्यांच्या सामुग्रीनें बांधिली आहे. मुसुलमानी शिल्प सांप्रत बरेंच हयात आहे व त्यांतहि निरनिराळे प्रकार आहेत.

पंजाबची लोकसंख्या (१९२१) २५१०१०६०.मलेरिया फार असतो. भाषा मुख्यतः पंजाबी व उर्दू. इकडे जातीनिर्बंध कडक नाहींत. हिंदु मुसुलमानांची लोकसंख्या निम्मेनिम असल्यानें दोहोंत नेहमीं तंटेभांडणें उपस्थित होतात. सांप्रत आर्यसमाज व अकाली शीख यांनीं आपापल्या पंथांची संघटना करण्याकडे विशेष लक्ष्य घातलें आहे. दयानंदानें स्थापिलेल्या आर्यसमाजाचा प्रसार इकडे फार आहे. ख्रिस्ती मिशनेहि या प्रांतांत पुष्कळ आहेत. शेतकरी लोक शेंकडा ५० आहेत. सर्वांत जास्त गहूं पिकतो. खनिज धातूंत लोखंड फार सांपडतें. विणकाम हा धंदा इकडे मुख्य आहे. लांकडी कोरीव काम व मातीचीं भांडींहि होतात. शीख लोकांचीं चंबा, पतियाळा वगैरे लहानमोठीं संस्थानें व जैतो, अमृतसर वगैरे गुरुद्वारें पंजाबात बरींच आहेत. त्यांपैकीं मोठीं संस्थानें आतां हिंदुस्थान सरकारच्या देखरेखीखालीं गेलीं आहेत; पंजाबाच्या गव्हर्नरच्या हाताखालीं नाहींत. हिंदुस्थानांतील इतर प्रांतापेक्षां पंजाबांत शेतसाऱ्याचा दर बराच हलका आहे, व कालव्यांमुळें शेती सुपीक आहे. एकंदर जमीनमहसुलाचें उत्पन्न ३ कोटी आहे. खेडयांपाडयांतून अजून गांवपंचायती आहेत. सर्व हिंदुस्थानापेक्षां या

तुकडे तुकडे केले (जुलै १८१५). डफ म्हणतो कीं, हें कृत्य रावबाजीनें डेंगळयाच्या मदतीनें केलें. उलट कांहींचें म्हणणें कीं, सिताराम या दिवाणानें शास्त्रयाचा खून करविला. यावेळीं सितारामानें धार येथें सैन्य जमविलें होतें. थोड्याच दिवसांत सितारामास इंग्रजांनीं अटकेंत ठेविलें. यावरून या म्हणण्यास पुष्टि मिळते. क. वॉलेस म्हणतो कीं, शास्त्रयाच्या खुनांत पेशव्यांस कांहीं फायदा नव्हता. कारण त्यामुळें गुजराथ हातची जात होती. म्हणून त्याला जिवंत ठेवण्यांतच त्याचा फायदा होता. [ गंगाधरशास्त्रयानें आपलें स्वतःचें लिहून ठेविलेलें चरित्र उपलब्ध झालें असून तें भा इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध झालें आहे. याशिवाय डफ; रूलर्स ऑफ बडोदा; इति. संग्रह. जुन्या. ऐति. गोष्टी पहा. ]

**पटवर्धन घराणें**—सांप्रत दक्षिण महाराष्ट्रांत जीं पटवर्धन आडनांवाचीं संस्थानिकांचीं घराणीं आहेत, त्या सर्वांचा मूळपुरुष हरभट होता. हा रत्नागिरी जिल्ह्यांतील कोतवडे गांवचा रहिवासी. याचा पुत्र बाळंभट, त्याचे हरि, केशव, व विठ्ठल असे तीन पुत्र. याच हरिभटाच्या वंशांतील पुरुषांनीं मराठी राज्यांतील तासगांव, कुरुंदवाड, मिरज, सांगली, मिरजमळा, मंगळवेढें, आंबे येथील जहागिरी मिळविल्या.या वंशांतील पुरुष शूर असून नानासाहेब पेशव्यांपासून रावबाजीच्या कारकीर्दीअखेर मराठ्यांनीं परकीय शत्रूंशीं केलेल्या बहुतेक सर्व मोहिमांत हजर होते. या वंशांतील जितकीं माणसें सरकारकामीं लढाईंत ठार झालीं तितकीं महाराष्ट्रांतील दुसऱ्या कोणत्याहि कुटुंबांतील झालीं नाहींत. त्यांची हकीकत त्यांच्या त्यांच्या संस्थानच्या नांवाखालीं देण्यांत आली आहे.

**पटवर्धन, पांडुरंग नरसिंह**—एक महाराष्ट्रीय इतिहाससंशोधक. हे जानशीकर घराण्यांतील; होत यांचे वडील हेडमास्तर होते.स्कूलफायनल परीक्षा पसार झाल्यावर कांहीं दिवस पांडोबा सरकारी नोकर होते. पण त्यांच्या मानी स्वभावास नोकरी न पचल्यानें त्यांनीं ती सोडली. पुढें यांनीं मराठ्यांच्या इतिहासाकडे लक्ष्य घालून त्यांत पुष्कळ गति करून घेतली होती. इतिहाससाधनसंशोधनाचें कामहि त्यांनीं पुष्कळ दिवस केले व त्यांत हातीं लागलेली अभिनव माहिती प्रसिद्ध केली व विशेषतः पेशवे घराण्याविषयीं ते विशेष परिश्रम घेत असत. त्यांनीं मिळविलेली माहिती, कागदपत्रें, चित्रें, वस्तू वगैरे संग्रह पुण्याच्या भारत इतिहास मंडळांत आहेत. ते ह्या मंडळाचे एक कार्यकर्ते सभासद होते. तत्कालीन राष्ट्रीय चळवळींतहि ते भाग घेत असत. त्यांनीं राष्ट्रहितैषी नांवाचें एक वर्तमानपत्र कांहीं दिवस चालविलें होतें. शेवटीं शेवटीं राष्ट्रीय सभा व स्वराज्यसंघ यासाठीं ते काम करीत होते. ते साध्या रहाणीचे, तीव्र बुद्धीचे व निश्चयी होते. ते १९२१ सालीं वारले, त्यावेळीं त्यांचें वय सरासरी ४० वर्षांचें होतें.

**पटवेकरी**—अथवा पटवेगार.मुंबई इलाख्यांत यांची लो.सं. दोन हजारांवर आहे हे बहुधां दक्षिण जिल्ह्यांतून आढळतात. आपल्याला ते क्षत्रिय म्हणवीत असून जानवें वापरतात. ते गुजराथमधून इकडे आले असावे असें त्यांच्या बोलण्यावरून नजरेस येतें. त्यांची भाषा गुजराथीवरून बनलेली आहे. त्यांचें उदरनिर्वाहाचें साधन म्हणजे गळ्यांत घालावयाचे सोन्याचे दागिने रेशमी दोऱ्यांत पटवून गांठवावयाचे होय. शिवाय हे लोक गंडे, ताईत, कडदोरे, अनंत-अनंती करून विकतात.हे दुसऱ्या कोणत्याहि जातीनें तयार केलेलें अन्न खात नाहींत.वऱ्हाड-मध्यप्रांतांत यांची संख्या ६ हजारांवर आहे. यांना त्या भागांत इलाकेबंद, पटवा, पटवी, पट्टा अशीं नांवें आहेत. [ मुं. सेन्सस रिपोर्ट; रसेल व हिरालाल. ]

**पटुआखली**—बंगाल, बकरगंज जिल्ह्याचा आग्नेयीकडील पोटविभाग. क्षेत्रफळ १५२१ चौरस मैल व लोकसंख्या (१९११) ५७४९७२. यांत एक शहर व १२८८ खेडीं आहेत. या पोटविभागातील प्रदेश सुपीक आहे. पटुआखली हे याच पोटविभागाचें मुख्य ठिकाण असून तें पटुआखली नदीच्या कांठीं वसलेलें आहे. लोकसंख्या सुमारें पांच हजार आहे.

**पटेल-पाटील**—प्राचीन ग्रामसंस्थेंत हा गांवचा मुख्य अधिकारी होता. सर्वच पटेल किंवा पाटील शूद्र वर्णांचे नाहींत. कांहीं ठिकाणीं ब्राह्मण, प्रभु, सारस्वत वगैरे लोकहि पाटील आहेत. बापाच्या मरणोत्तर वतनाचे हिस्से पाडून ते सर्व मुलांत विभागून देण्याच्या हिंदु वहिवाटीमुळें, मूळ पाटलाचे सर्वच वंशज आपणास पाटील म्हणवितात. या वंशजांपैकीं ज्याच्याकडे ग्रामव्यवस्थेचें काम असे त्यास मुकद्दम अशी संज्ञा होती. जमिनीच्या लागवडीवर देखरेख ठेवणें, गांवाचा बंदोबस्त राखणें, लोकांच्या करमणुकीकरितां खेळ वगैरे करविणें, गांवाच्या लोकांचे लहानसहान कज्जे स्वतःच मिटविणें किंवा आवश्यकता असल्यास पंचायतीमार्फत निकाल देवविणें आणि आपल्या गांवाचें संरक्षण करणें हीं सर्व कामें पाटलाकडेच होतीं.

दुसऱ्या कित्येक किरकोळ हक्काशिवाय पाटील, चौधुले, व कुळकर्णी यांना सर्वांना मिळून,गांवाच्या जमिनीचा ⅙ वा हिस्सा साऱ्यावांचून देण्याचा शिरस्ता होता. कोंकणांतील बहुतेक भागांत पाटलांचा अधिकार खोतांकडे आला आहे. तरी देशांत मात्र प्रत्येक गांवास ज्याचा त्याचा पाटील आहे.

**पटेलिया**—मुंबई इलाख्यांत यांची वस्ती मुख्यत्वेंकरून पंचमहाल जिल्ह्यांत आहे. लोकसंख्या सुमारें १४ हजार. चंपानेरच्या रजपुतांपासून आमची उत्पत्ति आहे असें त्यांचें म्हणणें आहे. १४९५ सालीं महंमद बेगडा यानें जेव्हां चंपानेर काबीज केलें त्यावेळेस हे लोक दोहद व बरैया येथें गेले.मागें त्यांच्या बायका तशाच राहिल्या. नंतर त्यांनीं भिल्लांच्या बायकाशीं लग्नें केलीं.यावरून त्यांना वेताळिग अथवा

अशुद्ध म्हणूं लागले. बहुधां हे शेतकी अगर शेतांत मजुरी काम करणारे असतात. लग्नें मोठेपणीं करतात. लग्नाचा खर्च येऊं नये म्हणून मुलींना पळवून नेण्याची चाल यांच्यांत प्रचारांत आली आहे. त्यांचा मुख्य देव इंद्र व देवी हिंगलाज. त्यांचे उपाध्याय औदीच ब्राह्मण अथवा श्रीगौडब्राह्मण आहेत. [ से. रि. ( मुंबई ) १९११. ]

**पटौडी संस्थान**—पंजाब. अंबाला विभागांतील एक संस्थान. हें ब्रिटिश गुरगांव जिल्ह्यांत आहे. क्षेत्रफळ ५२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) १८०९७. मुख्य गांव पटौडी. इतर गांवांची संख्या ४० आहे. येथील संस्थानिक एका साधु अफगाण घराण्याचा वंशज आहे. ह्या वंशापैकीं तलव फैजखान मराठ्यांच्या पदरीं नोकरीस असून, त्याला रोहटकची जहागिरी होती. १८०३ साली मराठ्यांचा पराभव झाल्यावर लॉर्ड लेक यानें त्याला आपल्या पदरीं ठेवून १८०६ सालीं पटौडीचा प्रदेश त्यास कायमचा दिला. १८२६ सालीं भरतपूरच्या वेढ्यांत त्यानें इंग्रजांस मदत केली. संस्थानचा मुलकी कारभार तहशिलदाराकडे आहे, व त्यावर नाझीम नांवाचा अधिकारी देखरेख ठेवतो. न्यायाचें कामहि नाझीमकडेच असतें. संस्थानचें उत्पन्न सुमारें १ लाख रुपये आहे.

**पट्टण**—बडोदे संस्थान, कडी प्रांतामध्यें याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें राजपुताना-माळवा रेल्वेच्या मेहसाणा स्टेशनपासून निघणाऱ्या गायकवाड स्टेट रेल्वेच्या फांट्यावर आहे. लोकसंख्या (१९०१) ३१४०२. रूपसुंदरी राणीचा मुलगा वनराज यानें हें गांव इ. स. ७४६ किंवा कांहींच्या मतें इ. स. ७६५या वर्षी वसविलें.त्याचें पूर्वीचें नांव अनाहिलवाड किंवा अनहिलपूर असें होतें. या अनहिलवाडचा इतिहास त्या नांवाखालीं दिला आहे. अनहिलवाडच्या मोठेपणाची साक्ष देणारे कांहीं अवशेष अद्यापहि दृष्टीस पडतात त्यांपैकीं ११ व्या शतकांत बांधलेली "राणी वाव" नांवाची एक मोठी विहीर आहे. एका जैन देवळांत असलेल्या वनराजाच्या संगमरवरी पुतळ्यावर १४६७ सालांतील शिलालेख आहे.

अर्वाचीन शहर व किल्ला मराठ्यांनीं बांधलेला आहे; गांवांत जैनांची १०८ किंवा ११० देवालयें असून त्यांत ताडपत्रावरील लेख नीट जपून ठेवलेले आहेत. येथें तरवारी, अडकित्ते, पातळें, कशिद्याचें काम, मातीची भांडीं वगैरे जिन्नस तयार होतात. येथील मातीचीं भांडीं सर्व गुजराथेंत प्रसिद्ध आहेत.येथें लांकडी खोदकाम व लोखंडी कातकामहि होतें.

**पट्टदकल**—मुंबई इलाखा, विजापुर जिल्हा. पूर्वी याला किसुव्होलाल म्हणत असत. हें मलप्रभेच्या तीरावर 'बदामी'च्या आग्नेयीस आठ मैलांवर आहे. येथें द्राविडी धर्तीवर बांधलेलीं देवळें आहेत. या देवळांत बारा शिलालेख आहेत. पापनाथाचें देऊळ पांचव्या शतकांत बांधलेलें असून अखिल हिंदुस्थानांत सर्वांत जुनें असावें असें दिसतें.

**पट्टा**—नाशिक जिल्हा. देवळालीच्या दक्षिणेस ५ कोसांवर हा किल्ला आहे. उंची साडेचार हजार फूट. शेजारींच एक कोसावर औंध नांवाचा दुसरा एक किल्ला आहे. हे किल्ले बहामनी राजवटींत बांधले गेले. पुढें ते नगरच्या निजामशाहींत आले व १६२७ सालीं मोगलांच्या ताब्यांत गेले. ते ४५ वर्षांनीं शिवाजीनें घेतले. पुढें १६७५ पासून १८१८ पर्यंत ते मराठ्यांच्या ताब्यांत होते. पट्टयास जटायूचा डोंगर असेंहि म्हणतात. [ नाशिक ग्याझे; शिवदिग्विजय. ]

**पट्टिकोंडा**, तालुका व गांव.—मद्रास इलाखा, कर्नूल जिल्ह्याचा अगदीं पश्चिमेचा तालुका. क्षेत्रफळ ७४७ चौरस मैल. लोकसंख्या(१९२१)१०१४०३.या तालुक्यांत१०४ खेडीं असून मुख्य ठिकाण पट्टिकोंडा. या तालुक्यांतून तुंगभद्रा व हिंद्री या नद्या वहातात. वार्षिक पाऊस २३ इंच पडतो. पट्टिकोंडा येथें सुमारें चार हजार वस्ती आहे. येथें १८२७ सालीं मद्रासचा गव्हर्नर सर थॉमस मनरो वारला.

**पट्टी**, तहशील.—संयुक्त प्रांतांत,प्रतापगड जिल्ह्यांतील पूर्वेकडील तहशील. क्षेत्रफळ ४६७ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) २७५४४६. यांत ८०१ खेडीं असून मोठें गांव एकहि नाहीं. यांतून गोमती नदी वहाते म्हणून येथील जमीन सुपीक आहे.

**पठाण**—यांची वस्ती हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांतून आहे. लोकसंख्या सुमारें ४० लाख आहे. सर्वांत जास्त वस्ती संयुक्तप्रांत व वायव्य सरहद्द प्रांत यांत आहे. ही शुद्ध मुसुलमानांची जात असून यांच्या चालीरीती इतर मुसुलमानांप्रमाणेंच आहेत. शेतकी व सैन्यांत नोकरी करणें हेच यांचे मुख्य धंदे होत.

खलीदबरोबर जी अफगाण लोकांची टोळी गेली, व जिनें अफगाणिस्तानांत प्रथम मुसुलमानी धर्म स्वीकारला त्या टोळीच्या अबदुलरशीद नांवाच्या नायकास महंमद पैगंबरानें दिलेल्या पठाण पदवीवरून पठाण हा जातिवाचक शब्द निघाला असें अफगाणिस्तानांतले ग्रंथकर्ते म्हणतात. पठाण शब्दाची व्युत्पत्ति लावण्याचा प्रयत्न अनेकांनीं केला असून, पुख्तन ( वेलो ), पैठण ( हरकिसन कौल ) इत्यादि मूळ शब्द सुचविण्यांत आले आहेत. कदाचित ऋग्वेदांत आढळणाऱ्या पक्थ या राष्ट्रवाचक शब्दाशीं याचा संबंध असावा.

**पठाणकोट**, तालुका.—पंजाब. गुरुदासपूर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ३६७ चौरस मैल. या तालुक्यांत डलहौसी हें हवा खाण्याचें ठिकाण व बलून आणि बकलोह हीं लष्करी ठाणीं आहेत. यांत पांच मोठीं गांवें व ४०० खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९२१ ) १२९५०२.

गांव.—पठाणकोट तालुक्याचें मुख्य ठिकाण. नार्थवेस्टर्न रेल्वेची अमृतसर-पठाणकोट शाखा येथें संपते.

लोकसंख्या सुमारें ६ हजार प्राचीन कालापासून हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. येथें सांपडलेल्या नाण्यांवरून कनिंगहॅम यानें असें ठरविलें आहे कीं, पुराणांत वर्णिलेले त्रिगर्त व कुलिंद आणि कपिस्थल यांच्याबरोबर आलेले उदुंबर लोक प्राचीन काळापासून येथें रहात होते; व याच लोकांच्या नांवावरून दहमेरीच्या राज्याचें नांव पडलें. त्या संस्थानची राजधानी कांग्रामध्यें नुरपूर येथें होती, तरी पठाणकोटहि महत्त्वाचें असलें पाहिजे. कारण नुरपुरच्या पठाणिया रजपुतांचें नांव या गांवावरूनच पडलें आहे. तें प्राचीन काळापासून रजपूत सरदारांच्या ताब्यांत आहे; त्यांपैकीं राजा भक्तमल हा मानकोट येथें शिकंदरसूरी ( शूर )च्या बाजूनें लढला; वासुदेवानें अकबराविरुद्ध, सुराजमल्लानें जहांगिराविरुद्ध आणि जगसिंगानें शहाजहानच्या विरुद्ध बंड केलें. पठाणकोटचें संस्थान १८१५ सालीं रणजितसिंगाच्या ताब्यांत गेलें. १८६७ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें ब्लॅकेटें व शालजोडया तयार करतात.

**पठारी संस्थान**—मध्यहिंदुस्थान. भोपाळ एजन्सीमधील एक छोटें संस्थान. क्षेत्रफळ २२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ३८६६. याला वरो-पठारी किंवा चोरपठारी असेंहि म्हणतात. येथील संस्थानिक भोपाळ घराण्याचे वंशज असून बारकझई कुळांतील पठाण आहेत.पहिल्या जहागिरदाराचा बाप मुरीद महंमदखान याला रहटगडची ( मध्यप्रांतांत ) जहागीर होती, ती महादजी शिंद्यानें काढून घेतली. परंतु नंतर ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या मध्यस्थीनें त्याच्या मुलाला ( हैदर महंमदखानाला ) १७९४ सालीं दौलतराव शिंद्याकडून पठारीची जहागीर मिळाली. संस्थानिकाला नबाब असें म्हणतात. मुख्य गांव पठारी हें एका तळ्याच्या कांठीं, टेंकडीवर फार सुंदर रीतीनें वसलेलें आहे. जी. आय. पी रेल्वेच्या कुल्हार स्टेशनपासून तें ११ मैल आहे. सर्वत्र पुतळ्यांचे अवशेष व हिंदु देवालयांचे काढलेले खोदीव दगड दृग्गोचर होतात. गांवाच्या पूर्वेस असलेला भव्य स्तंभ पहाण्यासारखा आहे. उत्तरेकडील बाजूवर इ. स. ८६१ मध्यें लिहिलेला, ३८ ओळींचा एक शिलालेख आहे.

**पडदा**( व्हाल्व )—हे पुष्कळ जातीचे असतात, व निरनिराळ्या वामाकरितां वापरतात. ह्यांचा उपयोग त्यांमधून जाणारा प्रवाही पदार्थ-उदाहरणार्थ, तेल, वाफ, पाणी वगैरे जाऊं देणें किंवा थांबविणें यासाठीं करतात. तसेंच त्यांमधून जाणाऱ्या पदार्थाचें प्रमाण कमी जास्ती करण्याकडे याचा उपयोग होतो. ते बहुतकरून पितळेचे किंवा बिडाचे केलेले असतात. तसेंच निरनिराळ्या पदार्थांच्या गुणधर्मांप्रमाणें हे केलेले असतात. वाफेचे निराळे असतात, पाण्याचे निराळे असतात व आमोनियाचे तर त्याहूनहि निराळे असतात. पाण्यासाठीं लहान असल्यास पितळेचे पडदे वापरणें चांगलें. वाफेचे (व्हाल्व) पडदे बहुतेक लोखंडी असतात.अमोनियाचे व्हाल्व्ह सर्वस्वी लोखंडीच असावे लागतात. आणि असल्या व्हाल्व्हमध्यें त्यांची बैठक बहुधां शिशाची असावी लागते. बहुतेक सर्व पडदे दोन्ही बाजूंनीं उघडे असून त्यांची उघडझांप करण्याची योजना मध्यें असते.आंत येणारा जलरूप प्रवाही पदार्थ खालच्या बाजूनें आंत येतो व व्हाल्वच्या बैठकींतून बाहेर येऊन दुसऱ्या बाजूनें निघून जातो. याच्या उलट लावल्यास केव्हां केव्हां त्या पदार्थाच्या जोरानें इतकें दडपण पडद्यांना खालीं होणाऱ्या भागावर पडतें कीं त्यांमुळें पडदा उघडत नाहीं. वायुरूप पदार्थांमध्यें ही अडचण फारशी येत नाहीं. तथापि त्यांतसुद्धां पदार्थ खालच्या बाजूनें येईल व वरच्या बाजूनें जाईल असाच जोडणें जास्त चांगलें. व्हाल्व्ह ( पडदा ) खालीं वर करण्यासाठीं पडद्याचा खालीं वर होणारा भाग एका दांड्यावर बसविलेला असतो; त्या दांड्याला कांहीं भागांवर आटे पाडलेले असतात. असेंच परंतु आंतले आटे पडद्याचा दुसऱ्या एका भागावर पाडलेले असतात त्यांमधून पडद्याचा दांडा बाहेर येतो. तेथें त्याच्यावर एक चाक बसविलेलें असतें. तें चाक जसें फिरवावें तसाच पडद्यामधला उघड झांप करणारा भाग खालीं वर होतो, व त्यानें पडदा मिटतो व उघडतो. निरनिराळ्या कामाला लागतील त्याप्रमाणें पडद्यांचीं आंत व बाहेर येणारीं तोंडें सदोदित एकाच पातळींत न राहतां तीं काटकोनांत किंवा दुसऱ्या कोणच्याहि कोनांत जरूर असेल त्याप्रमाणें पडदे करणारे करून देतात. याशिवाय एकाच बाजूनें चालणारे किंवा जरूर असेल त्याप्रमाणें चालणारे किंवा पडद्यावर ठरवलेला दाब आल्यानंतर पडदा चालू होणारे अशा तऱ्हेचे निरनिराळ्या कामांत उपयोगांत येणारे निरनिराळ्या जातीचे पडदे असतात. पदार्थाचा प्रवाह एका बाजूनें जावा व तो दुसऱ्या बाजूनें परत येऊं नये अशी ज्या वेळेस जरूरी असते अशा ठिकाणीं जो पडदा वापरतात त्याला चेक व्हाल्व्ह म्हणतात. असल्या जातीचे पडदे विशेषेंकरून वाफेच्या तापकावर ( बॉयलरवर ), त्यांत जाणारें पाणी जावें पण तें परत येऊं नये यासाठीं लावतात. दुसऱ्या जातीचे पडदे, ज्यांच्यामध्यें ठराविक दाबापेक्षां जास्त दाब झाल्यास आपोआप उघडावे व दाब कमी झाल्यावर मिटावे अशा तऱ्हेच्या पडद्यांना संरक्षक पडदे ( सेफ्टी व्हाल्व्ह ) असे म्हणतात. ते वाफेच्या तापकावर तापकांमध्यें ठरलेल्यापेक्षां जास्त दाबाची वाफ होऊन तापक धोक्यांत येऊं नये म्हणून त्यावर बसवितात. तसेंच पुष्कळ वेळां हवा भरण्याचीं भांडीं व दाबलेलें पाणी धरण्याचीं भांडीं यांवरहि हे बसवितात. या पडद्यांच्या खालींवर येणाऱ्या भागांवर मोठ्या स्प्रिंगचें किंवा वजनाचें दडपण घातलें असतें. अगदींच विशेष कामासाठीं लागणारे असेहि कांहीं पडदे असतात. [ ले. वा. ह. मनोहर ].

**पडवळ**—ही भाजी भोपळयाच्या वर्गांतील आहे. पडवळीचे वेल असतात. याची फुलें पांढरीं असतात.फळें हिरवट अगर पांढरीं पट्टेदार असतात. आंखूड फळांची ( सुमारें हात दीड हात लांब ) व लांब फळांची (सुमारें दोन हातभर लांब ) अशा हिच्या दोन जाती आहेत. फळ पिकल्यावर त्याचा रंग केशरी होतो व नंतर तें सडूं लागतें. सडण्याच्या सुमारास आंतील पक्व बीं काढून धुवून अगर राखेंत घोळून सुकवून ठेवावें. पुण्याच्या आसपास पडवळाची लावणी अक्षय्यतृतीयेच्या सुमारास करतात म्हणजे आषाढ–श्रावणांत पडवळांचा बहार येतो. मुंबईच्या आसपास शिवरात्रीनंतर थंडी नाहींशी झाल्यावरोबर लावणी करतात. आळीं सांखळया करून पाटाचें पाणी देतात. आळयांत कुजलेलें खत पुष्कळ दिलेलें असावें. प्रत्येक आळयांत ४-५ बिया लावतात व वेल वाढूं लागले म्हणजे त्यांस चढण्यास काठया रोंवितात व सुमारें ५–६ फूट उंचीचे मांडव घालून त्यांवर वेल पसरूं देतात. फळें कोंवळीं असतांनाच तोडून बाजारांत नेलीं पाहिजेत. दर वेळास ८ ते १० अगर जास्तींहि फळें येतात. कडू पडवळ जंगलांत अगर कुंपणांत उगवतें. त्याचीं फळें टींचभर असतात. तीं उत्तम औषधी आहेत.

**पडवा**—मद्रास इलाख्यांत विजगापट्टम् जिल्ह्याच्या एजन्सीप्रदेशांतील एक तहशील. हा डोंगरसपाटीचा प्रदेश असून उंची सर्वसाधारण ३ हजार फूट आहे.क्षेत्रफळ १३८३ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) १०१८६७. मुख्य ठिकाण पडवा हें खेडें असून माधुगुळ,जेयपुर,व पाचिपेन्ट ह्या जमीनदारांच्या ताब्यांत ही तहशील आहे.

**पंडित, शंकर पांडुरंग** ( इ. स.१८४०–१८९४ )—एक महाराष्ट्रीय विद्वान. हे सारस्वत ब्राह्मण असून यांचा जन्म सावंतवाडी संस्थानांत वांवुळीगांवीं झाला. लहानपणीं साधारण मराठी अभ्यास होऊन हे कुळकर्णीपणाचें काम करूं लागले;पुढें यांनां इंग्रजी शिकण्याची इच्छा झाली. इ. स. १८६५ मध्यें एम्. ए. परीक्षा उत्तीर्ण झाले; हे प्रथम कांहीं दिवस एलफिन्स्टन कॉलेजांत फेलो होते; पुढें पुण्याच्या कॉलेजांत फेलो व दक्षिणा प्राईझ कमिटीचे सेक्रेटरी झाले; यांनीं पुण्यास संस्कृत व जर्मन भाषांचा अभ्यास करून त्यांत प्राविण्य संपादिलें. १८६८ सालीं डेक्कन कॉलेजांत असि. प्रोफेसर व मागाहून ओरिएंटल भाषांचे प्रोफेसर झाले. पुढें खानदेश व सुरत येथें डेप्युटी कलेक्टरचें काम केलें; १८७४ सालीं सरकारनें त्यांनां इंटरनॅशनल कॉंग्रेसला प्रतिनिधि म्हणून यूरोपांत पाठविलें; तिकडून आल्यावर मुंबईस इन्कमटॅक्स कलेक्टर, ओरिएंटल ट्रॅन्सलेटर वगैरे हुद्यांचीं कामें करून शेवटीं पोरबंदर संस्थानचे ॲडमिनिस्ट्रेटर झाले; यांचा विद्याव्यासंग त्याचप्रमाणें लेखन दांडगें होतें. यांनीं अथर्ववेदाचें संपादन केलें. 'वेदार्थयत्न'सारखा प्रचंड ग्रंथ यांच्या दीर्घोद्योगाची साक्ष देतो. तुकारामाच्या अभंगांची गाथा हा यांचा ग्रंथहि प्रसिद्ध आहे. यांचा स्वभाव फार करारी, बाणेदार व सत्यप्रिय होता. यांचा मृत्यु १८ मार्च १८९४ रोजीं झाला.

**पंडितराव**—हा अष्टप्रधानांतील एक असून त्याच्याकडे पुढील कामें असत. शास्त्रार्थ सांगणें, देवस्थानांस वगैरे दिलेल्या नेमणुकांची व्यवस्था पाहणें, सरकारांतून होणारे विधी व दानधर्म यांच्यांवर देखरेख ठेवून व्यवस्था लावणें, वगैरे. पंडितराव यास न्यायशास्त्री असेंहि म्हणत असत राज्याभिषेकाच्या वेळेस 'पंडितराव' असें नांव ठेविलें. रघुनाथभट्ट उपाध्ये चंदावरकर यांस शिवाजीनें सन १६६१ त दानाध्यक्ष केलें. त्यासच राज्याभिषेकसमयीं पंडितराव पद मिळालें. हा विद्वान् पंडित शिवाजीच्या मर्जीतील होता. फारशी भाषा काढून दरबारांत संस्कृत भाषेचा प्रवेश करण्यास शिवाजीला रघुनाथपंताची मदत होती. ' राजव्यवहारकोश ' याच रघुनाथपंतानें केला.

शिवाजी वारल्यावर रघुनाथपंत सोयराबाईच्या पक्षास मिळाला,म्हणून संभाजीनें पंडितराईचा अधिकार त्याच्याकडून काढून त्याचा मुलगा मोरेश्वर रघुनाथ राजोपाध्ये यास दिला. पुढें संभाजी मरण पावला. रघुनाथ पंडित व मोरेश्वरभट हे राजारामाबरोबर चंदीस नव्हते. त्यांच्याकडे पुढें पंडितराई चालली नाहीं. तें पद राजारामानें श्रीकराचार्य कालगांवकर यांस दिलें. तो पुढें ताराबाईच्या पक्षास राहिला. शाहू परत आल्यावर ताराबाईकडून राज्य परत मिळविण्यांत आवीं ( दौंडजवळील ) येथील मुद्गलभटानें पुष्कळ खटपट केली; म्हणून शाहूनें त्यास पंडितराईचें पद देऊन अधिकार,इनामें दिलीं व सातारा शहरांतील अष्टाधिकार दिले,आणि सालीना पंधरा हजार होनांची नेमणूक करून दिली. तसेंच कटक ज्योतिषपणाची वृत्ति दिली मुद्गलभट हा लढवय्या होता. त्यानें अनेक प्रसंगीं शाहूची उत्कृष्ट सेवा केली होती.मुद्गलभट शंभर वर्षे जगून १७२९ सालीं मरण पावला. नंतर त्याचा वडील पुत्र रघुनाथभट यास पंडितराईचें पद मिळालें. मध्यंतरीं ताराबाईनें त्याची पंडितराई काढून घेतली होती. तो सन १७५९ त वारला. रघुनाथ हा आपल्य नांवापुढें ' राव ' असें लावूं लागला, तेव्हांपासून भट हा शब्द गळाला. पुढें या कुटुंबांत भाऊबंदकीचा तंटा वाढला, तो थोरल्या माधवरावानें तोडून रघुनाथभटाचा मुलगा रामचंद्रराव यांस पंडितराईचा सर्व अधिकार दिला. रामचंद्रराव सन १७९४ त वारल्यावर त्याचा मुलगा रघुनाथराव भाऊसाहेब हा पंडितराव होऊन तोहि सन १८२८ त मरण पावला.त्याचा मुलगा रामचंद्रराव हा सातारचें राज्य खालसा होईपर्यंत पंडितराईच्या कामावर होता. त्यास रघुनाथराव नांवाचा पुत्र होता. त्याचे चिरंजीव श्री. रामचंद्रराव उर्फ बाबासाहेब पंडितराव हे सांप्रत विद्यमान आहेत ( १९२५ ). यांनां सातारा जिल्ह्यांत चिंचणेर व पुणें जिल्ह्यांत आवीं मुद्गल वगैरे गांवें जहागीर आहेत. यांचा जुना वाडा

सातान्यास माचीवर आहे [ अष्टप्रधानांचा इतिहास; मराठी रिसायत, भा. १; कैफियती. ]

**पंडु**—एक कुरुवंशीय राजा व पांडवांचा पिता. विचित्रवीर्य–स्त्री अंबालिका हीस व्यासापासून पंडु झाला यास कुंती व माद्री अशा दोन स्त्रिया होत्या. कोणी एक मृगरूप ऋषि स्त्रीसमागमांत असतां पंडूनें बाणानें त्याला घायाळ केल्यावरून त्याच्या शापानें याला स्त्रीसंग वर्ज होता दुर्वासापासून मिळविलेल्या मंत्रप्रभावानें याला कुंतीपासून ५ पुत्र लाभले. शापोल्लंघनानें हा मृत्यु पावला.

**पंडुआ**—बंगाल. माल्दा जिल्ह्यांतील हें एक गांव असून हें पूर्वीचें पौंड्रवर्धन असावें असें येथील प्राचीन हिंदु अवशेषांवरून वाटतें. येथें कांहीं दिवस मुसुलमानी राजधानी होती त्या वेळच्या कांहीं इमारती आहेत.

**पडौंग**—दक्षिण ब्रह्मदेशांतील प्रोम जिल्ह्याच्या श्वेनडौंग पोटविभागांतील एक टाउनशिप. ही इरावती नदीच्या पश्चिम भागीं आहे. क्षेत्रफळ १०१९ चौरस मैल असून लोकसंख्या ( १९११ ) ५३१९१. चीनी लोकांची संख्या ६ हजार असून हे लोक बहुतकरून अराकानयोमाच्या उताराच्या प्रदेशांत रांहतात. यांत १०३ खेडीं असून पडौंग हें मुख्य ठिकाण इरावती नदीच्या पश्चिम तीरावर आहे.

**पंढरपूर**, ता लु का.—मुंबई इलाखा, सोलापूर जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ ४७८ चौरस मैल. यांत पंढरपूर व करकम्ब हीं दोन गांवें व ८४ खेडीं आहेत.लोकसंख्या सुमारें एक लाख आहे प्रदेश अगदीं उघडा व सपाट असून मुख्य नद्या भीमा व माण या होत. नदीकिनाऱ्याच्या प्रदेशांत जमीन अस्सल काळी असून भीमेच्या पूर्व थडीवरील जमीन अत्यंत सुपीक आहे.इतरत्र जमीन बरड वगैरे जातीची आहे. हवा कोरडी असून पाऊसपाणी फार कमी व तेंहि अनिश्चित आहे.

गां व.—पंढरपूर तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें भीमा नदीच्या दक्षिण तीरावर व बार्शी लाईटरेल्वेवरील स्टेशन आहे. लो. सं. ( १९११ ) सुमारें २९ हजार. पंढरपूरला नेहमीं यात्रेकरू जातात येतात, तेव्हां लोकसंख्या कमीजास्त होत असते. भीमेच्या पैलतीरावरून गांवाचा फारच रमणीय देखावा दृष्टीस पडतो. विष्णुपद व नारद हीं दोन देवालयें नदीच्या पात्रांत आहेत. येथें विठोबाचें देवालय असल्यामुळें हिंदू हें क्षेत्र अत्यंत पवित्र मानतात. विठोबाची मूर्ति फार प्राचीन असून ती तिसऱ्या शतकांतील भिलसाजवळील उदयगिरि लेण्यांतील मूर्तीप्रमाणें दिसते. देवळांतील सर्वांत जुना शिलालेख शके ११५९ मधील आहे. सर्वांत जुनें शिल्पकाम नामदेव दरवाज्याचें आहे. वर्षांतून चार मोठ्या यात्रा येथें भरतात. पहिली चैत्री, दुसरी आषाढी, तिसरी कार्तिकी व माघी. शिवाय प्रत्येक महिन्यांत शुक्लपक्षांतील एकादशीस यात्रा भरते ती वेगळीच. यात्रांच्या वेळीं माणशीं ४ आणे डोईपट्टी वसूल करतात. या कराचें उत्पन्न बरेंच भरतें. येथें म्युनिसिपालिटीची स्थापना १८५५ सालीं झाली. येथें एक हायस्कूल, एक औद्योगिक शिक्षणाची शाळा व एक अनाथ बाळसंगोपनगृह आहे.

**पणि**—यांचा उल्लेख ऋग्वेदांत अनेकदां विशेषत: देवांच्या गाई चोरल्याबद्दल आलेला आहे. हे व्यापारी होते. बहुधां हे फिनिशियन असावेत. ( ज्ञानकोश विभाग ३. पृष्ठ पहा. )

**पतंग**—पतंगाचें झाड लहान व कांटेरी असून हिंदुस्थानच्या द्वीपकल्पाचा पूर्व व पश्चिम भाग पेगू, तेनासेरीम वगैरे भागांत आढळतें इतर कांहीं ठिकाणींहि तीं लावलेलीं आहेत. याच्या लांकडापासून उत्तम तांबडा रंग निघतो. अनिलिन रंग निघण्यापूर्वी हिंदुस्थानांतून यूरोपांत याची बरीच निर्गत होत असे. परंतु अलीकडे तो व्यापार बराच खालावला आहे. शेंगा व साली यांपासून रंग मिळतो. पतंगाचा रंग सिरकिकारानें निघून जातो.

**पतंजलि**—पाणिनीच्या अष्टाध्यायीवरील महाभाष्याचा कर्ता. योगसूत्रकार पतंजलि व हा एकच कीं काय तें समजत नाहीं ( ज्ञानकोश विभाग ५ पृ. १९६ पहा ).

**पतियाळा**, सं स्था न.—पंजाबांतील सर्वांत मोठें संस्थान. याचा मुलूख एकत्र नसून पसरलेला आहे. या संस्थानांत मोठी नदी नाहीं. घग्गर नदी संस्थानांतून वाहते. शिसू, चिंच, खैर वगैरे झाडें आढळतात. येथील आंबे विशेष प्रसिद्ध आहेत. चितळ, कस्तुरीमृग, चित्ता वगैरे प्राणी आढळतात. हवा सामान्यत: निरोगी पण निरनिराळ्या भागांत निरनिराळी आहे. पावसाचें प्रमाणहि ४० पासून १२ इंचपर्यंत आहे.

इतिहास.—पतियाळा संस्थानचा आरंभीचा इतिहास फुलकियन संस्थानांच्या इतिहासांत मोडतो. येथील संस्थानिक अलासिंग याला अहमदशहा दुराणीनें १७६२ सालीं राजा हा किताब दिल्यापासून या संस्थानच्या इतिहासाला नांवाला सुरवात होते; परंतु खरी सुरवात १७६३ सालीं, शीख लोकांनीं अहमदशहाच्या सुभेदारापासून सरहिंदचा किल्ला घेऊन सर प्रांताची विभागणी केली तेव्हांपासून होते. या विभागणींत, सरहिंद व त्याच्या आजूबाजूचा प्रदेश राजा अलासिंगाच्या वांट्याला आला. तो १७६५ सालीं वारल्यानंतर त्याचा नातू अमरसिंग गादीवर बसला. याला अहमदशहा दुराणीकडून राजा-इ-राजगान हा किताब मिळाला होता. १७८१ सालीं त्याच्या मृत्यूपर्यंत, त्यानें पैल, तिब्बा, पिंजौर, गोविंदगड, सैफाबादचा किल्ला, फत्तेहाबाद, सिरस, वगैरे मुलूख व किल्ले सर केले होते. १७७९ सालीं मोंगल सैन्यानें पतियाळा घेण्याचा प्रयत्न केला परंतु त्याला केवळ भै लुटून परत जावें लागलें अमरसिंगामागून त्याचा साहेबसिंग नांवाचा ५ वर्षांचा मुलगा गादीवर आला; याच्या कारकीर्दीत त्याच्या नातलगांनीं बंडें केल्यामुळें दिवाण नानुमल यानें मराठ्यांना मदतीकरितां बोलावून देशांत शांतता स्थापन केली, परंतु ही शांतता कायम टिकली नाहीं.

साहेबसिंग व त्याची बायको यांच्यामध्येंहि भांडण उपस्थित झालें; स.१८०५त त्याचा कलस होऊन राणीनें नाभा व जिंद यांवर हल्ला केला. आपला शिरकाव करण्यास ही संधि बरी आहे असें पाहून रणजितसिंगानें १८०६ सालीं सतलज-नदी ओलांडली; व १८०७ सालीं वनूर व कांहीं जिल्हे राणीस देऊन, तो नारायणगडावर चाल करून गेला. रणजितसिंगाच्या स्वाऱ्यांपासून संरक्षण करण्याकरितां, १८०८ सालीं पतियाळा, जिंद व कैटल या संस्थानांनीं दिल्लीच्या ब्रिटिश रेसिडेंटाकडे मदतीची मागणी केली. त्याप्रमाणें १८०९ सालीं रणजितसिंगाशीं तह झाल्यानंतर, ब्रिटिशांनीं या संस्थानांचें संरक्षण करण्यासंबंधींचा जाहीरनामा काढला. यानंतर संस्थानच्या अंतर्व्यवस्थेंत कांहीं गडबड झाल्यामुळें ब्रिटिश एजंटानें मध्यें पडून महाराणी असकौर हिच्याकडे सर्व अधिकार दिले. महाराजा साहेबसिंगाचा १८१३ सालीं मृत्यु होईपर्यंत तिनें राज्यकारभार फार उत्तम चालविला होता.

साहेबसिंगानंतर करमतसिंग, नरेंद्रसिंग, मोहिंद्रसिंग, व राजेंद्रसिंग हे अनुक्रमें गादीवर बसले. हल्लींचे महाराजा भूपेंद्रसिंग यांचा जन्म १८९१ सालीं झाला व स. १९०० मध्यें हे गादीवर आले. लाहोरच्या ॲटकिन्सन कॉलेजांत त्यांचें शिक्षण झालें आहे. पंजाबच्या संस्थानिकांत यांचा नंबर पहिला असून त्यांस १९ तोफांची सलामी मिळते. १९१८ सालीं इंपिरियल वॉर कॉन्फरन्सकरितां हिंदी संस्थानिकांतर्फे यांची निवड करण्यांत आली होती. १८५८ सालीं दत्तक घेण्याचा, त्याचप्रमाणें देहांतशिक्षा करण्याचा अधिकार येथील महाराजास मिळाला आहे. १९१८ सालीं 'इंपिरियल वॉर कान्फरन्स' करतां यांची संस्थानिकांतर्फे निवड करण्यांत आली होती.

झेलम नदीच्या दक्षिणेकडील भागांत पिंजौरइतके पुराणावशेष दुसऱ्या कोठेंहि नाहींत. सुनाम येथें हिंदुस्थानांतील सर्वांत जुन्या मशिदींपैकीं एका मशिदीचे अवशेष आहेत. नरनाळा येथें असलेली इब्राहीमशहाची कबर हा पगाणी शिल्पाचा फार सुंदर नमुना आहे. पतियाळा व बहादुरगड येथें पतियाळाच्या संस्थानिकांनीं बांधलेले सुंदर किल्ले आहेत.

संस्थानचीं, ११ मोठीं गांवें आणि ३६०७ खेडीं मिळून एकंदर लोकसंख्या (१९२१) १४९९७३९ आहे. पैकीं शेकडा ५५ हिंदु आहेत. पतियाळा हें पंजाबांत शीखांचें प्रमुख संस्थान असूनहि येथें शीखांची संख्या शेकडा २२ म्हणजे मुसुलमानांपेक्षां थोडी कमी आहे. शेकडा ८८ लोक पंजाबी भाषा बोलतात. शेकडा ६२ लोकांचा उदरनिर्वाह शेतीवर होतो. कालव्यामुळें शेतकी सुपीक आहे. जंगलहि महत्त्वाचें आहे. राजपुरा–भटिंडा रेल्वे ही संस्थानच्या मालकीची आहे. ई. आय. रेल्वे, बी. बी. सी. आय. रेल्वे व नॉर्थ वेस्टर्न रेल्वे या संस्थानांतून जातात. संस्थानांत कायदेकौन्सिल नाहीं.

इजलास–इ–खास (महाराजांचें कोर्ट) हें शेवटलें अपील कोर्ट आहे. फांशीची व काळ्या पाण्याची शिक्षा महाराजांच्या संमतीशिवाय कायम होत नाहींत. कांहीं पंचायती स्थापन झाल्या असून त्यांचें काम फार समाधानकारक रीतीनें चाललें आहे.

मांडलिकांमध्यें भदौरचे सरदार प्रमुख असून त्यांच्याकडे ७० हजार रुपयांची जहागीर आहे. खेमानानमधील खेड्यांच्या सर्व जहागीरदारांना मिळून संस्थानाकडून वर्षास ९० हजार रुपये मिळतात. संस्थानचें उत्पन्न सुमारें १ कोटी १५ लाख रुपये आहे.

पतियाळाची म्युनिसिपालिटी स.१९०४ मध्यें व नरनाळाची स. १९०६ मध्यें स्थापन झाली. शिक्षणाच्या बाबतींत, पंजाबमधील मोठ्या संस्थानांत पतियाळा सर्वांत मागसलेलें आहे. लोकसंख्येंत साक्षरांचें प्रमाण शेकडा २.४ आहे. संस्थानामध्यें २ आर्ट कॉलेजें, व बऱ्याच दुय्यम व प्राथमिक शाळा आहेत. संस्थानांत रुग्णालयें व दवाखानेहि बरेच आहेत.

गां व.—पतियाळा संस्थानची राजधानी. ही अंबालाच्या पश्चिमेस ३४ मैलांवर असून हें नॉर्थ वेस्टर्न रेल्वेच्या राजपूर–भटिंडा शाखेचें स्टेशन आहे. येथून नाभा व संगूरकडे जाण्याला पक्क्या सडका आहेत. लोकसंख्या सुमारें ४७ हजार. स.१७३६ त सरहिंद पडल्यानंतर राजा अलासिंगानें पतियाळा येथें दगडी किल्ला बांधला. तेव्हांपासून संस्थानची राजधानी येथेंच आहे. येथें स्थानिक व्यापार बराच चालतो. जुना राजवाडा गांवाच्या मध्यभागीं असून बाजारपेठांतील रस्ते सरळ व रुंद आहेत. गांवहि कमी देखणें नाहीं. परंतु बाजूबाजूच्या भागांत बागा आणि वृक्षाच्छादित रस्ते, महाराजांचें रहाण्याचें ठिकाण आणि सार्वजनिक कचेऱ्या वगैरे असल्यामुळें तो भाग फारच सुंदर दिसतो. मोहिंद्र कॉलेज, राजेंद्र व्हिक्टोरिया ज्युबिली वाचनालय, राजेंद्र रुग्णालय, बारादरी किंवा राजाचें रहाण्याचें ठिकाण, मोतीबाग, व व्हिक्टोरिया मेमोरियल पुअर हाउस या इमारती पहाण्यालायक आहेत. गांवाची आरोग्यव्यवस्था फार चांगली आहे परंतु गांव सखलभागीं वसल्यामुळें पुरांपासून त्याचें वारंवार नुकसान होतें. येथील म्युनिसिपालिटी १९०४ सालीं स्थापन झाली. गांवांत सदर आणि लेडी डफरिन हीं रुग्णालयें, व मिडवाईफ व नर्सचें शिक्षण देणारें लेडी कर्झन ट्रेनिंगस्कूल आणि व्हिक्टोरिया गर्ल्स्कूल या शाळा आहेत.

**पत्तुकोट्टई**, ता लु का व गां व.—मद्रास इलाख्यांत तंजावर जिल्ह्याचा दक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ ७७० चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) २७७७९८. पत्तुकोट्टई हें मुख्य गांव व अदिरामपट्टम् हें लहानसें बंदर आहे. खेडीं ७९२ आहेत. हा तालुका शिक्षणाच्या बाबतींत तंजावर जिल्ह्यांत सर्वांत मागासलेला आहे. मुख्य ठिकाण पत्तुकोट्टई; हें

रेल्वेस्टेशन आहे. लोकसंख्या सुमारें ९ हजार. मोडकळीस आलेल्या किल्ल्यांत सांपडलेल्या एका शिलालेखावरून असें समजतें कीं,हा किल्ला स. १६८६–८७त वानाजी पंडित यानें शहाजी महाराजांच्या स्मरणार्थ बांधला. स.१८१५ त नेपोलियनवर इंग्रजांना मिळालेल्या विजयाच्या स्मरणार्थ तंजावरच्या राजा सरभोजी यानें येथें लहानसा किल्ला व स्तंभ बांधला आहे. गांवांत पितळी भांडीं, चटया, व जाडेंभरडें सुती कापड हे जिन्नस तयार होतात.

**पर्थेग्यी**—वरच्या ब्रह्मदेशांतील, मंडाले शहराच्या पूर्वेकडील टाउनशिप. क्षेत्रफळ २१३ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें २९ हजार. मुख्य गांव पर्थेग्यी असून खेडीं १५२ आहेत. पश्चिम भागांत श्वेताच्छौंग कालव्याच्या पाण्यावर भाताचें पीक होतें. मध्य भागांत शेतीकरितां मंडाले कालव्याचें पाणी पुरविलें जातें. पूर्व भाग उंचवट्याचा असून त्यांत बिनपाण्याचीं पिकें होतात.

**पथ्यापथ्यविचार**—पथ्य म्हणजे ( शरीरास ) हितकर व अपथ्य म्हणजे अहितकारक हा अर्थ दृष्टीसमोर ठेवून आहारांत येणाऱ्या पदार्थांचा विचार या लेखांत सामान्यतः आधुनिक समजुतीप्रमाणें केलेला आहे. जुन्या समजुतीप्रमाणें अमुक पदार्थ वातुळ व तमुक पदार्थ पित्तकर असें मोघम विधान न करतां अन्नाचे ( १ ) नत्रयुक्त-पौष्टिक,(२) पिष्टमय, (३) वसामय, व ( ४ )क्षारयुक्त, असे जे प्रकार अन्न या सदराखालीं वर्णिलेले आहेत त्यांपैकीं नानाविध रुग्णस्थितींत व शैशव, वार्धक्य, गर्भिणी इत्यादि शारीरिक अवस्थांत कोणते पदार्थ इष्ट व कोणते अनिष्ट याचें विवेचन त्या त्या स्थळीं बहुतेक केलेलें आहेच तथापि सामान्यतः या विषयाचें आणखी थोडें विवेचन केल्यानें तो सुबोध होऊन त्यांत अद्याप न आलेलीं अंगें समाविष्ट करतां येतील.अन्नाचें शरीरांतील मुख्य कार्य म्हणजे त्याच्या पचनानें ( ज्वलनानें ) शरीरांत उष्णता, चैतन्य व शक्ति उत्पन्न होते. तसेंच अन्नामुळें शरीराची रोज होणारी झीज भरून येते, व त्यामुळें शरीरांतील पाचक रस व इतर उपयुक्त प्रवाही पदार्थ आणि रचना निरोगी व कार्यक्षम स्थितींत राहतात. वरील सर्व प्रकारच्या अन्नांमध्यें न पचणारे असे चोथट, तंतुमय व जड पदार्थ असतात त्यांची विष्ठा बनते. ज्या अन्नांत हे टाकाऊ पदार्थ अधिक सांपडतात ते पैशाच्या दृष्टीनेंहि प्रायः स्वस्त असतात.मांसादींच्या अर्कांमध्यें व रसामध्यें उत्तेजक व रुचीस दीपन करण्याचे गुण आहेत. स्निग्ध अगर वसामय पदार्थ व पिष्टमय पदार्थ हेहि नायट्रोजनयुक्त पदार्थांप्रमाणें शरीरांत उष्णता, चैतन्य व शक्ति उत्पन्न करतात व यांचा फाजील पुरवठा झाल्यास तो शरीरांत मेदोरूपानें रहातो. प्राण्यास व मनुष्यास बंद कोठडींत कोंडून त्याच्या श्वासाबरोबर आंत जाणारी शुद्ध हवा व बाहेर येणारी अशुद्ध हवा, त्याचे मलमूत्रादि सर्व मल व त्यानें खाल्लेलें अन्न या दोहोंच्या आय व व्ययाविषयीं नाना प्रकारचे हजारों प्रयोग केले आहेत व हिशोब बसविले आहेत.

नानाविध व्यवसाय व धंदे करणाऱ्या, उपाशी व काम करीत असणाऱ्या लोकांवर हजारों प्रयोग करून कोणत्या स्थितींत कोणता आहार मानवतो यांचीं प्रमाणें शोधून काढलीं आहेत. तसेंच कोणत्या अन्नापासून किती उष्णता मिळूं शकते या तत्त्वावर नाना धंद्यांतील लोकांचा आहार ठरवतां येतो. बौद्धिक कामें करणें हा शक्तीचा व्ययच असल्यामुळें अशा व्यवसायी लोकांना युक्त आहार कोणता व नाना प्रकारच्या अन्नांत वर सांगितलेल्या चार प्रकारच्या सत्वांचें शेंकडा प्रमाण किती याचीं पुष्कळच कोष्टकें उपलब्ध आहेत; तीं सर्व देणें शक्य नसल्यामुळें कांहीं पुढें दिलीं आहेत.

### विविध अन्नांतील सत्वांश

| अन्नाचा प्रकार | नत्रयुक्तपदार्थ प्रोटीन शें. | स्निग्ध वसामय शें. | पिष्ट पदार्थ शें. |
|---|---|---|---|
| मांस | ९८ | ९८ | ... |
| मासे | ९६ | ९७ | ... |
| कोंबडीं, बदकें | ९६ | ९७ | ... |
| अंडीं | ९७ | ९८ | ... |
| दूध, लोणी | ९७ | ९६ | ९८ |
| केवळ मांसाहार | ९७ | ९७ | ९८ |
| बटाटे | ७३ | ... | ९८ |
| मुळे, नवलकोल, इ. | ७२ | ... | ९७ |
| कोबी वगैरे | ... | ... | ८३ |
| द्विदलधान्यें, डाळी | ७८ | ९० | ९५ |
| ओट धान्याचें पीठ | ७८ | ... | ९७ |
| मका | ८० | ... | ९९ |
| गिरणीची कणीक | ८३ | ... | ९३ |
| घरीं दळलेली कणीक | ७५ | ... | ९२ |
| पाव | ८८ | ... | ९८ |
| कोंड्यासकट भाजलेला पाव. | ८२ | ... | ९४ |
| तांदुळ | ७६ | ... | ९१ |
| फळें, खारिक, खजूर इ. | ८० | ८६ | ९६ |
| साखर, पिष्ट पदार्थ | ... | ... | ९८ |
| केवळ शाकाहार | ८५ | ९० | ९७ |
| मिश्र (शाक व मांस) आहार | ९२ | ९५ | ९७ |

वरील कोष्टकावरून प्रोटीन(ओजसद्रव्य)स्निग्ध व पिष्ट पदार्थांच्या प्रमाणाचें वैचित्र्य दिसून येतें. एकंदरीनें मांसामध्यें प्रोटीन व स्निग्धांचे व शाकपदार्थांत पिष्टाचें आधिक्य असतें. खवा, साय व मलईमध्यें प्रोटीन व स्निग्ध यांचें प्रमाण मोठें आहे. पण कोणत्याहि पदार्थांत हीं पौष्टिक सत्वें अधिक प्रमाणांत कोष्टकांत दिसलीं तरी त्या पदार्थांचा पचनास हलकेपणा अगर जडपणाचा विचार कर्तव्य आहे.

उदा०–साय ही पचनास जड आहे. सर्व धान्यांत पिष्ट पदार्थ विपुल (२/३ ते ३/४ या प्रमाणांत) असतो व तो पौष्टिक आहे. कपाशी, करडई, भुइमूग, ऑलिव्ह फळें यांपासून विपुल गोडें तेल निघतें. खजूर खारिकांदिमध्यें प्रोटीन व स्निग्ध पदार्थ बरेच असतातः फळांत शर्करा बहुत असते. पालेभाजांत पौष्टिक व चैतन्योत्पादक गुण नसतात तरी अति उपयोगी क्षार व ॲसिड असल्यामुळें रक्ताच्या व इतर रचनांच्या आरोग्यासाठीं त्या अवश्य आहेत. आहारांतील पदार्थांत चारी प्रकारच्या सत्त्वांपैकीं एखादें कमी प्रमाणांत असल्यास त्याचें पौष्टिक कार्य दुसऱ्या प्रकारचें सत्त्वान्न कांहीं मर्यादेपर्यंत करूं शकतें. आहारांत कमतरता पडल्यास ( उदा०–उपवासामध्यें ) शरीरांतील नायट्रोजनयुक्त व वसामय रचनांची क्षीज होऊन शरीरव्यापार चालतात व अशीं शिल्लक वसा वगैरे पदार्थ शरीरांत असतात त्यांच्या जोरावर कमी अधिक श्रम, दुखणीं, उपवास, चिंता इत्यादि आपत्तींमध्यें अल्पहारावर प्राणी राहूं शकतो. बुद्धिवर्धक अन्न कोणतें याचा नक्की शोध लागला नाहीं. तथापि मत्स्याहारामध्यें फॉस्फरस अधिक म्हणून त्यांत व बदामांत वगैरे हा धर्म असल्याची समजूत आहे पण ती निराधार आहे. अन्न हें सर्पण आहे व त्याचें शक्तींत रूपांतर होतें हा उष्णताविषयक नियम प्राण्यांसहि लागू आहे. नवीन व आपोआप शक्ति प्राण्यांत अन्नाशिवाय येणें शक्य नाहीं; व या सर्पणाच्या हिशोबाच्या मानानेंच चैतन्य व शक्ति प्राण्यांत प्रगट होते. तथापि अन्नांतील चोथट भाग, जो उष्णता उत्पन्न करीत नाहीं तो प्रयोगाच्या हिशोबांत वगळावा लागतो. एक क्यालरी म्हणजे एक किलोग्राम पाणी एक सेंटिग्रेडपर्यंत तपासण्यास जी उष्णता लागते तीस माप समजून त्या मापानें हरएक तऱ्हेचें अन्न प्राणवायूंत जाळण्यास किती उष्णता लागते हें प्रयोगानें पाहिलें आहे. हे प्रयोग अगदींच पूर्णपणें प्रमाणभूत नसले तरी बरेच विश्वसनीय आहेत. प्रोटीन अन्न, पिष्टमय अन्न व स्निग्धान्नाचा एकेक ग्राम जाळण्यास अनुक्रमें ४.१, ४.१५ आणि ९.४० क्यालरी उष्णता लागते असा ठोकळ हिशोब आहे. खालील कोष्टकांत या रीतीनें नाना प्रकारच्या अन्नांचें पृथक्करण व ज्वलनशक्ती दर्शविल्या आहेत.

अन्नाचे प्रकार, त्यांतील द्रव्यें व ज्वलनशक्ति.

| अन्नाचे प्रकार | चोथा | पाणी | प्रोटीन | स्निग्ध | पिष्टान्न | खनिज | ज्वलनशक्ति |
|---|---|---|---|---|---|---|---|
| बदाम, अक्रोड वगैरे फोडून खाण्याचीं फळें | ४५–५८ | २.७ | ११.५ | ३० | ९.५ | १.१ | १३००–१५०० |
| स्ट्रॉबेरी, संत्रीं, द्राक्षें, केळीं, सफरचंद, टोम्याटो इ. | २५–३५ | ४५–५५ | .८ | .४ | १४ | .४ | २९५ |
| बटाटे. | २० | ६२ | १.८ | .१ | १४.७ | .८ | २००–२९५ |
| कोबी, नवलकोल, कालीफ्लावर | १५–२० | ७० | १.३ | .१ | ७.७ | .९ | १६० |
| घेवडे, वाटाणे | १०–१२ | १२ | २२.५ | १.८ | ५९ | ३.५ | १५३० |
| पिठी–पीठ–स्टार्च | ... | ... | ... | ... | ९० | ... | १६८० |
| साखर | ... | १२.६ | २२.५ | १.८ | ५९.६ | ३.५ | १५२० |
| बिस्किटें | ... | ६.८ | ९.७ | १२.१ | ६९.७ | १.७ | १९२५ |
| गिरणीच्या पिठाचा पाव | ... | ३५.३ | ९.२ | १.३ | ५३.१ | १.१ | १२०० |
| गिरणीचें पीठ | ... | १२ | ११.४ | १ | ७५.१ | .५ | १६३५ |
| तांदूळ | ... | १२.३ | ८० | .३ | ७९ | .४ | १६२० |
| मका (पीठ) | ... | १२.५ | ९२ | १९ | ७५.४ | १० | १६३५ |
| ओट | ... | ७.७ | १६.७ | ७.३ | ६६.२ | २.१ | १८०० |
| दूध (सायरहित) | ... | ९०–९५ | ३.४ | .३ | ५.१ | .७ | १६५ |
| दूध (तापवलेलें) | ... | ८७ | ३.३ | ४.० | ५.७ | .७ | ३१० |
| खवा, साय, मलई | ... | ३४.२ | २५.९ | ३३.७ | २.४ | ३.८ | १८८५ |
| लोणी व डुकराची चरबी | ... | ११ | १.० | ८५ | ... | ३० | ३४१ व ३५५५ |
| कालवें, नाना तऱ्हेचे मासे | ३०–४४ | ४०.२ | १६ | .४ | ... | १८.५ | ३००–९०० |
| अंडीं | ११.२ | ६५.५ | १३.१ | ९.३ | ... | .९ | ६३५ |
| बदकें | १७.६ | ३८.५ | १३.४ | २९.८ | ... | .७ | १४७५ |
| विलायती कोंबडा (टर्की) | २२.७ | ४२.४ | १६.१ | १८.४ | ... | .८ | १०६० |
| कोंबडीचें पिलू | २५.९ | ४७.१ | १३.७ | १२.३ | ... | .७ | ७६५ |
| डुकराच्या मांसाचे (खारवलेले) स्थानपरत्वें प्रकार | १३–१९ | ४८ | १३.५ | २५.९ | ... | ६.८ | १३००–१६०० |
| मेंढीच्या मांसाचे ( स्थानपरत्वें ) प्रकार | १६–१८ | ५१ | १५ | १४.५ | ... | .८ | १४००–१७०० |
| वांसराच्या मांसाचे नाना ( स्थानपरत्वें ) प्रकार | १६–२१ | ५७.५ | १६.५ | ९ | ... | .९ | ६२५–७४५ |
| म्हैस व गोमांसाचे ( स्थानपरत्वें ) प्रकार | १६–२० | ५२–५६ | १५–१६ | १७–२१ | ... | .८ | १०२५–११३५ |

हे प्रयोग यूरोप, अमेरिका व जपानांतील स्त्री, पुरुष, मुलें, सैन्य व आरमारांतील शिपाई, ऑफिसर, मजूर, तांदूळ कांडणारे, लाकूडफोडे व धोंडफोडे, पैलवान, कैदी, कसबी, कारागीर, चांभार, शिंपी, विद्यार्थी, व्यापारी, वैद्यक शिकणारे विद्यार्थी, डॉक्टर, म्हातारे, बैठें काम करणारे वगैरे सर्व दर्जाच्या लोकांवर केले आहेत. समान स्थितींतील स्त्रीपेक्षा पुरुषाचा आहार अधिक असतो व मुलांपेक्षा स्त्रियांचा आहार अधिक. तसेंच बैठेंकाम करणाऱ्यापेक्षां अंगमेहनत करणारा अधिक खातो. साधारण मेहनत करणारा पुरुष हा मूलभूत प्रमाण कल्पिलें तर जास्त मेहनत करणारा त्याच्या १.२ पट खातो. तसेंच त्याच्या .९ पट १६ वर्षांचा मुलगा अगर बैठेंकाम करणारा पुरुष; १३ वर्षांचा मुलगा व १५ वर्षांच्या मुलीचा आहार .८ पट; अशक्त बाई व १२ वर्षांचा मुलगा अगर १३ वर्षांच्या मुलीचा आहार .७ पट; १०–११ वर्षांचा मुलगा अगर मुलीचा आहार .६ पट; सहा ते नऊ वर्षांचें मूल आणि २ ते ५ वर्षांचें मूल याचा आहार अनुक्रमें .५ व .४ पट व त्याखालील वयात .३ आहार असतो. हे हिशोब भूमितीच्या सिद्धांताप्रमाणें बिनचूक आहेत असें मानीत नाहींत; पण ते विश्वसनीय व विचारार्ह आहेत.

आतां कोणी किती अन्न खावें हें कोष्टकावरून ठरवितां येईल; परंतु ज्याच्या कोठ्याला जें अन्न अनुभवानें पचतें व मानवतें तेंच त्याला पथ्यकर होय. दूध, अंडीं, मांस, गहूं हीं व असले पदार्थ पौष्टिक व पथ्यकर खरे, परंतु निरोगी असणाऱ्या कित्येक व्यक्तींना ते पचत व मानवत नाहींत. म्हणून "एकास जें पथ्यकर तें दुसऱ्यास विषमय होय," ही सार्थ म्हण पडली आहे. या कामीं दुराग्रह व ठाम नियम बसवितां येत नाहीं, व रुचि आणि व्यक्तिवैचित्र्य हेंच कारण मानून त्या व्यक्तीस पथ्यकर आहार दिला पाहिजे. आता एवढें खरें कीं अशी लहरीरुचीच्या व्यक्तींची संख्या मोठी नसल्यामुळें वरील कोष्टकात पौष्टिक व पथ्यकर जे पदार्थ दिले आहेत त्यांचे गुणधर्म बहुतेक लोकांपुरते खरे मानून चालण्यास कांहीं हरकत नाहीं. मात्र हीं कोष्टकें एकेक व्यक्तीचा आहार ठरविण्यापेक्षा सैन्य, आरमार, तुरुंगशाळा इत्यादींतील व्यक्तिसमूहाचे आहार ठरविण्यास विशेष उपयुक्त आहेत.

अन्नास शिजवणें वगैरे संस्कार करण्यानें तें पथ्यकर बनतें. कारण पुष्कळ प्रकारचें जें अन्न त्याच्या स्वाभाविक म्हणजे न शिजवलेल्या अगर भाजलेल्या स्थितींत भक्षिलें असता पौष्टिक व पथ्यकर एरवीं झालें नसते तें भाजल्यानें अगर शिजविल्यानेंच पचनास योग्य होतें; आपणास अनुभवहि असाच येतो कीं उष्णतेनें धान्य-मांसादींचें स्वरूप पार बदलून अन्न चर्वण व विविध पचनरसाच्या संस्कारास अनुकूल स्थितींत तयार होतें व त्याचा उग्र वास व स्वरूप मावळून तें दिसण्यांत अधिक सुंदर व खाण्यास रुचकर बनतें व त्याच्या स्वादिष्ट वासानेंच घ्राणेंद्रिय उद्दीपित होऊन तोंडात लाळ सुटून मनुष्य मिटक्या मारतो व त्यामुळें जठररसादि पाचक रस उद्दीपित होतात; व ह्या गोष्टी पूर्ण अन्नपचनास आवश्यक आहेत. दुसरा शिजवण्याचा उपयोग हा आहे कीं, दिसण्यांत शुद्ध असे जे हिरव्या स्थितींतील अन्नांत स्वाभाविक प्राणिज व उद्भिज्ज जंतू व सूक्ष्म कृमी असतात ते अन्न शिजतांना मृत झाल्यामुळें आरोग्यवृद्धि होते. मांसादि अन्न व बिनमांसाचें अन्न हें स्वभावतः या जंतूंमुळें लवकर नासण्यासारखें असल्यामुळें त्याचें सांठवण, जपणूक, व शिजवणें यांत अत्यंत निष्ठापूर्वक स्वच्छता ठेवली पाहिजे. मनुष्यास ती स्वच्छता जर पाहिजे असेल तर जें आपण खातों त्यात आपल्या आरोग्यासाठीं व मनास निर्मळ वाटावें म्हणूनहि अत्यंत दक्षता अगोदर ठेवली पाहिजे. त्यानंतर शारीरिक व स्त्रीची, घरादाराची व गांवाची, आणि देशाची स्वच्छता होय असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं. खाण्याच्या जिनसांत किडे, कृमी, सांपडतात व नवे उत्पन्न होतात ते न कंटाळता निवडले पाहिजेत. घाणेरड्या जागेंत उघड्यावर अन्न, धान्य, फळें, मीठ, भाज्या, इत्यादि पदार्थ ठेवतां कामा नये, घाणेरड्या भांड्यांत अन्न वाढूं नये व घाणेरड्या माणसांकडून अगर घाणेरड्या जागेंत स्वयंपाक करूं नये. याविषयींचे सर्व नियम व आचार पाळणें श्रेयस्कर आहे.

अन्नाच्या स्वस्ताई व महर्गतेचा विचार करून पथ्यकर कोणतें हेंहि कळलें पाहिजे जें स्वस्त तें उत्तम ही व्यावहारिक म्हण अन्नाच्या बाबतींत जरा दृष्टीआड केली पाहिजे. जे खाण्याचे पदार्थ दिसण्यांत सुंदर, स्वादिष्ट व खर्चानें महाग ते तेवढे चांगले असाहि अर्थ नाहीं. अन्नाचा महागपणा त्याच्या पथ्यकर गुणावर नसतो तर तो जिभेस चवदार व गिऱ्हाईकांच्या त्यावर उड्या असल्या म्हणजे तो महागतो, व म्हणून अमुक प्रकारचें धान्य, फळें, भाजी, अगर मांस व मासे महाग आहेत म्हणून ते पथ्यकर व पौष्टिक आहेतच असें मानूं नये. प्रोटीन हें पथ्यकर सत्त्व, मांसांत व शाकाहारांतहि असतें परंतु दोन्ही प्रकारचें अन्न खाणाऱ्यांचा अनुभव असा आहे कीं मांसान्न पचनास हलकें असून चवीस विशेष लज्जतदार असतें, व म्हणून या दृष्टीनें विचार केल्यास समान वजनाच्या दोन्ही प्रकारच्या अन्नांपैकीं मांसान्नास अमळ किंमत जास्त द्यावी लागली तरी पोषणाच्या दृष्टीनें तें स्वस्त व शहाणपणाचें असें मानणें चूक नाहीं. परंतु हा रुचीचा व आवडीनावडीचा प्रश्न आहे. जें अन्न केवळ लज्जतदार आहे व पौष्टिक धर्म मात्र ज्यांत मध्यम आहेत असें अन्न जास्त पैसे देऊन खाणें हें अंगावर दागिने घालण्याप्रमाणें चैनीची गोष्ट होय व ती ऐपतदारांनीं वाटल्यास करावी, पण ती अन्नाच्या काटकसरीच्या दृष्टीनें अयोग्य आहे. जें आरोग्यवर्धक, स्वस्त, स्वच्छ व पौष्टिक तेंच उत्तम व स्वस्त अन्न असें मानून चालावें, किंमतीची बाजू लक्षात ठेवून निरनिराळ्या अन्नांचें महत्त्व दर्शविणारें कोष्टक खालीं दिलें आहे तें कांहींसें मार्गदर्शक आहे पण त्यांत चुकीचा संभव आहे हें विसरूं नये.

## निरनिराळया अन्नांचें महत्त्वदर्शक कोष्टक.

| अन्नाचे प्रकार. | दर रत्तली किंमत. | बारा आण्यांस विकत मिळणारे पदार्थ | | | | अन्नज्वलन-शक्ति ( कयालरी ) |
|---|---|---|---|---|---|---|
| | | सर्व प्रकारचें अन्न, रत्तल. | एकंदर पौष्टिक द्रव्यें. | | | |
| | | | प्रोटीन | स्निग्धान्न | पिष्टान्न | |
| साखर | ८३ | ६.८ | ... | ... | ६.८ | १२७६० |
| शेंगा, घेवडे वगैरे | ८२ | ४.० | १.०५ | .१० | ३.४७ | ८९६० |
| बटाटे | ८२ | १५.० | .२५ | .०३ | ३.६० | ५६०५ |
| तांदूळ | ८३ | ५.५ | .४५ | .०२ | ५.२७ | १०७९५ |
| ओटधान्य ( पीठ ) | ... | ... | १.११ | .५४ | ५ ५४ | १४८३५ |
| कणीक | ८२ | ५ . ६४ | .७२ | .०७ | ६.०१ | १२११० |
| पाव | ८२ | १०. ६७ | .७६ | .१३ | ५.५७ | १२४८१ |
| खवा | ८८ | १ .५० | .६० | .७७ | .०४ | २८६५ |
| अंडीं (१२ आणे डझन प्रमाणें) | ८८ | १ .०० | .१९ | .१३ | ... | ६३५ |
| लोणी | ८१२ | .६७ | .०१ | .५४ | ... | २३२० |
| साय काढलेलें दूध | ८६ | ८. ० | .४० | .०३ | .६१ | २०८५ |
| निरसें दूध | ८६ | ६. ० | .१९ | .२३ | .३० | १९१५ |
| कॉड मासा | ... | ३. ० | .३४ | .०१ | ... | ७१० |
| डुकराचें मांस | ८७ | १ .७१ | .०३ | १.४० | ... | ६०२५ |
| मेंढीचें मांस ( मटण ) | ८९ | १ .३३ | .२० | .२० | ... | १२४५ |
| म्हशीचें व गाईचें मांस | ८९ | १ .२० | .१९ | .२० | ... | १३६० |

*याशिवाय कांहीं विशेष परिस्थितींत असलेल्या व्यक्तिस-*मूहांतील दर एक व्यक्तीस देण्यास योग्य अशा आहाराचा विचार केला पाहिजे. तुरुंगांतील कैदी, धर्मार्थ भोजनालयें (*दुष्काळ वगैरे आपत्तींतील*) तसेंच सुधारलेल्या देशांत भिकाऱ्यास भीक मागूं न देतां त्यास बंदिशाळेंत ठेवून त्यास काम करावयास लावून जेवूं घालतात; व अशक्त, वृद्ध, दुबळे, अनाथ, पोरके यांसहि सार्वजनिक खर्चानें जेवूं घालतात. त्यांनां पथ्यकर असा आहार निवडतांना ही गोष्ट लक्षांत ठेवावयाची कीं यांपैकीं कांहींनां केवळ प्राणधारणेसच पुरेल एवढया बेताचें साधें अन्न द्यावयाचें; हेतु हा कीं, साध्याऐवजीं पुरेसें व लज्जतदार अन्न दिल्यास आळशी व ढोंगी लोकांस अनाथपणाचें सोंग आणण्यास मोह पडूं नये, अगर तुरुंगांत खाणें पुरेसें असतें म्हणून गुन्हा करून तेथें जावें अशी इच्छा होऊं नये अशाच प्रकारचें तें साधें व मोह न पाडणारें कांजी, पेज, भाकरी असें अन्न असतें तुरुंगांत ज्याची चौकशी व्हावयाची आहे त्यांनां ( जे घरून अन्न आणवीत नाहींत अशांनां ) व थोड्या शिक्षेच्या कैद्यांनां अशा प्रकारचेंच अन्न देतात. तसेंच जे कैदी तुरुंगाची शिस्त मोडण्याचा गुन्हा करतात त्यांस शिक्षा म्हणून नुसत्या कांजीवर अगर नुसती भाकर व पाणी अशा अन्नावर ठेवतात, अधिक मुदतीचे कैदी तेथील कायम रहिवासी समजून त्यांच्याकडून जशीं कमी अगर अधिक सक्तमजुरीचीं कामें करून घ्यावयाचीं असतील त्याप्रमाणें साधें व मनांत न भरण्यासारखें परंतु मुबलक व पौष्टिक अन्न त्यास मिळतें. कांहीं सुधारलेल्या देशांत त्यास मजुरीचे पैसे मिळत असल्यामुळें सरकारी अन्नाखेरीज त्यास हवें असल्यास स्वतःच्या खर्चानें चहा, कॉफी, अधिक दूध, तंबाखू, विड्या वगैरे पदार्थ ठराविक दिवशीं सरकारी मक्तेदाराच्या तुरुंगांतील दुकानांत त्यास विकत घेतां येतात. त्यामुळें श्रम करून मनाप्रमाणें जिनसा मिळविण्यास व यामुळें आपलें शील सुधारण्यास त्यास संधि मिळते. ही पद्धति या देशांतील तुरुंगांत नसल्यास ती रोग्यास पथ्यकारक म्हणून अनुकरणीय आहे. हें खाणें देतांना स्त्री, पुरुष, वृद्ध, मुलें व आजारी असा फरक करून त्याप्रमाणें अन्न दिलें जातें व रोजचे दिवस आणि रविवार व थोडे सणाचे दिवस यांतील अन्नामध्यें शक्य तोंपर्यंत इष्ट बदल केला जातो. सैन्य व आरमारांतील शिपायांनां भरपूर अन्न त्यांच्या कामाप्रमाणें व कोष्टकांतील प्रमाणबद्ध रीतीनें दिलें जातें व अडचणीच्या वेळीं वाळवलेलीं फळें, भाज्या व डब्यांतील दूध, मांस व मासे, लोणी व तूप पुरविलें जातें.

**पदार्थविज्ञानशास्त्र**—या शब्दाची व्याख्या करणें कठिण आहे. कारण सृष्टींतील सर्व पदार्थांसंबंधीं ज्ञान देणारें शास्त्र असा याचा वास्तविक अर्थ होतो. परंतु हा शब्द सध्यां इतक्या व्यापक अर्थी न उपयोगितां विशिष्ट अर्थानेंच वापरला जातो. उदाहरणार्थ, प्राणवायु, कर्ब, लोह इत्यादि पदार्थांच्या गुणधर्मांचें ज्ञान करून देणाऱ्या शास्त्रास रसायनशास्त्र म्हणतात तर वनस्पती, प्राणी, दगड इत्यादि

पदार्थांची माहिती वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूस्तरशास्त्र इत्यादि शास्त्रांत आढळते. सध्यां पदार्थविज्ञानशास्त्रामध्यें फक्त पदार्थांच्या घन, द्रव, वायु इत्यादि स्थिती; उष्णता, ध्वनि, प्रकाश, विद्युत्, चुम्बकत्व इत्यादि निरनिराळीं शक्तींची स्वरूपें, गुरुत्वाकर्षण वगैरे संबंधीचे नियम इत्यादि गोष्टींचाच फक्त या शास्त्रांत विचार केलेला आढळतो. तथापि विद्युद्रसायनशास्त्र यासारख्या शाखांमध्यें रसायनशास्त्र व पदार्थविज्ञानशास्त्र यांमधील रेषा अस्पष्ट होत जाते व जसजशी या निरनिराळ्या शास्त्रांची प्रगति होत जाईल तसतशी यांमधील विभाजक रेषा अधिकाधिक अस्पष्ट होत जाऊन कांहीं सिद्धांत सर्व शास्त्रांस आधारभूत आहेत असें आढळून येईल. सध्यां मात्र पदार्थविज्ञानशास्त्राचें क्षेत्र वर दाखविल्याप्रमाणें नियमित आहे. तसेंच वर उल्लेखिलेल्या या शास्त्रांत अंतर्भूत होणाऱ्या निरनिराळ्या गोष्टींवर स्वतंत्र लेख दिले असल्यामुळें त्यांचें येथें विवेचन करणें अनवश्यक होय. या शास्त्राचा इतिहास पांचव्या विभागांत ( प्र. १२ ) दिलाच आहे.

**पदुआ**—इटली. बॅचीग्लिऑनी नदीवर व्हेनिसच्या पश्चिमेस २५ मैलांवरील एक शहर. लोकसंख्या सुमारें एक लाख. या शहरांत पॅलेझोडेलारोझिआनी ही एक मोठी इमारत असून तींत एक उत्तम दिवाणखाना आहे. १४२० सालीं या शहराला आग लागून बरेंच नुकसान झालें. बॅसिलिका हें प्रसिद्ध प्रार्थनामंदिर आहे. या मंदिरास ७ घुमट आहेत. या मंदिराच्या समोर डॅनेटोलीचा पुतळा आहे. ॲन नाझिआटा मंदिरांत गिओटाच्या हातच्या पुष्कळ तसबिरी आहेत. पदुआ हें विश्वविद्यालय विद्येकरितां आणि कलेकरितां फार प्रसिद्ध असून या ठिकाणीं उद्योगधंदे फार भरभराटीस आले आहेत. येथें धान्य, दारू, गाद्या, शेतकीचीं अवजारें आणि धातूचीं भांडीं तयार होतात. पदुआ हें शहर घोडे आणि लोकरीकरितां फार प्रसिद्ध आहे. ५४० सालीं पदुआ शहर ग्रीक लोकांच्या ताब्यांत गेलें १४०५ सालीं पदुआ व्हेनिसच्या ताब्यांत गेलें. तें सन १७९७ पर्यंत तसेंच राहिलें. यानंतर पदुआवर ऑस्ट्रियाची सत्ता होती. पुढें १८६६ सालच्या लढाईमुळें ऑस्ट्रियाच्या सत्तेचा नाश होऊन पदुआ इटलीच्या ताब्यांत गेलें.

**पद्मगुप्त**—नवसाहसांकचरित या ग्रंथाचा कर्ता. यानें आपलें नांव पहिल्या सर्गाच्या अंतीं नामनिर्देशभागामध्यें दिलें आहे. तेथेंच त्यानें आपल्या बापाचें नाव मृगांकगुप्त होतें असेंहि दिलें आहे. हा कवि वाक्पतिराजदेवाचा आणि त्याच्या नंतर त्याचा धाकटा भाऊ सिंधुराज यांचा भाट होता असें या काव्यांतच म्हटलें आहे. शिलालेख व ताम्रपट यांच्या साहाय्यानें या दोन्ही राजांचा काल जवळ जवळ निश्चित झाला आहे आणि त्यावरून प्रस्तुत कवीचा काल ९७५–१००० पर्यंत ठरतो. पद्मगुप्ताचें दुसरें नांव परिमल असेंहि होतें.

न व सा ह सां क च रि त.—याच नांवाचें दुसरें एक काव्य श्रीहर्षानें लिहिलें असे उल्लेख आहेत, पण तें काव्य उपलब्ध झालें नाहीं. परिमलाचे दुसरे कांहीं ग्रंथ असतीलच. क्षेमेंद्रानें औचित्यालंकारांत याचे पुष्कळ श्लोक घेतले आहेत पण ते यांत सांपडत नाहींत. जे श्लोक सांपडत नाहींत ते त्याच्या ज्या काव्यांतून घेतले त्याचा विषय, तैलपानें ( अनहिलपट्टणच्या ) मूळराजावर केलेली स्वारी हा असावा. तैलप व परिमल हे समकालीन असावेत अशी कांहींची कल्पना आहे. परिमल हा कालिदास, गुणाढ्य, बाण व मयूर याचा उल्लेख करतो. या काव्याचे सर्ग १८, ग्रंथसंख्या सुमारें १५२५ व १९ प्रकारचीं विविध वृत्तें आहेत. एक प्रत लंडन येथील "रायल एशियाटिक सोसायटी" च्या ताब्यांत आहे. आणि दुसरी प्रत तंजावर येथील ग्रंथशाळेंत आहे.

सर्ग १ लाः—उज्जयिनीवर्णन–राजवर्णन. राजाचें नांव सिंधुराज असून त्याचीं इतर नांवें नवसाहसांक, अवंतीश्वर इत्यादि.

सर्ग २ राः—राजा "स्वनामधेय चिन्ह" बाण ठिपक्यांच्या व गळ्यांत सोन्याची माळ घातलेल्या हरिणावर सोडतो. मृग निसटतो.

सर्ग ३ राः—राजा मृग शोधितो पण तो सांपडत नाहीं. राजास एका हंसानें चोरलेली मुक्ताभाला सांपडते; त्या मुक्तामालेवरील "अक्षरतति" वाचून ती माला शशिप्रभेची आहे, हें राजास कळतें, व राजा जिज्ञासोत्कंठ होतो.

सर्ग ४ थाः—कोणी तरुणी हरवलेलें शोधीत आहे असें राजास दिसतें. ती कन्या त्यास वृत्तांत सांगते.

सर्ग ५ वाः—नायिका शशिप्रभा नागराजकन्या. मृग व राजनामांकित बाण शशिप्रभेस दिसतो व तीहि उत्कंठित होते इतक्यांत तिच्या मुक्तामालेची हंसाकडून चोरी होते. तिच्या शोधार्थ माणसें पाठविलीं जातात. त्यांतील पाटला नांवाची सखी राजास रेवाकांठावर शशिप्रभेस भेटण्यास सांगते.

सर्ग ६ वाः—शशिप्रभा सिंधुराजविषयक प्रश्न सख्यांस विचारीत सुटते, व सर्गांतीं सिंधुराज तिच्या भेटीस येतो.

सर्ग ७ वाः—राजा, मंत्री, शशिप्रभा, व सख्या यांचा संवाद. खुणा करून शशिप्रभा राजावरील आपलें प्रेम व्यक्त करते.

सर्ग ८ वाः—शशिप्रभेस नागनगरी भोगावती येथें नाग अदृश्यपणें उचलून नेतात. राजा सारस पक्ष्याचा मंत्र घेऊन नदी ओलांडून पलीकडे जातो. तेथें प्रत्यक्ष रेवा नदीचें ( देवतेचें ) त्यास दर्शन होतें.

सर्ग ९ वाः—वज्रांकुश असुर हा नागांचा शत्रु आहे. त्याचा नाश केल्यास शशिप्रभेच्या जातीस आनंद होईल. वज्रांकुशाच्या नाशासाठीं नागराजानें प्रतिज्ञा केली आहे कीं, वज्रांकुश आपल्या क्रीडावनांत एक सुवर्णकमल वाढवीत असतो तें जो मनुष्य आणून देईल त्यास शशिप्रभा द्यावयाची आहे. वज्रांकुशाची राजधानी

रत्नावती ही मयानें वसविली असून ५० गव्युती (१५०मैल) दूर आहे. तिच्या रस्त्यावर तुला वंकु मुनींची भेट होईल असें नर्मदा, राजास सांगते.

सर्ग १० वाः—राजा व मंत्री यांचा वादविवाद. एक पोपट येतो आणि सांगतो कीं मी रत्नचूड नांवाचा शंखचूडाच्याच जातीचा नाग आहे, शापामुळें पोपट झालों आहे. आपण माझ्यावरोबर शशिप्रभेस निरोप दिला तर मी शापमुक्त होईन. रत्नचूडाजवळ राजा आनंदानें निरोप पाठवितो.

सर्ग ११ वाः—राजा व मंत्री रत्नावतीकडे पाताळमार्गें जातात. वंकुमुनींची भेट, परमारकथा व प्रवासप्रयोजन वंकूस रामांगद सांगतो आणि राजांची यादी देतो. कार्य सफल होईल म्हणून राजा कांहीं वेळ तेथेंच रहातो व झोंपतो.

सर्ग १२ वाः—राजाच्या स्वप्नांत शशिप्रभेची भेट.

सर्ग १३वाः—विद्याधराधीपसमागम. एक विद्याधरांचा राजा मुनिशापामुळें वानर झाला तथापि नर्मदादत्त नामक कंकण सिंधुराजानें त्याच्या हातीं घालतांच त्याचा उद्धार झाला. तो विद्याधर सेना घेऊन राजाच्या मदतीस येतो.

सर्ग १४ वाः—विद्याधरराज शशिकंद हा मंत्रसामर्थ्यानें राजाचा रथ आकाशमार्गें नेतो व गंगानदीवरील क्रीडावनांत राजा जातो.

सर्ग १५ वाः—जलक्रीडा.

सर्ग १६ वाः—शशिप्रभेची सखी पातला ही शशिप्रभेचें पत्र घेऊन राजाकडे येते. सुवर्णकमल घेऊन मी येईन असा राजा निरोप पाठवितो. राजा सामोपायानें सुवर्णकमल वज्रांकुशापासून मिळविण्याचा यत्न करतो पण तो यत्न फसतो.

सर्ग १७ वाः—असुरांचें नागांशीं व विद्याधरांशीं युद्ध. वज्रांकुश रामांगदास मारतो व तो सिंधुराजहस्तें मरतो.

सर्ग १८ वाः—लग्न-लग्नप्रसंगीं हरिण खियकाचा (श्रीहर्पदेव म्हणजे सिंधुराजाचा बाप ) द्वारपाल होता तो शापमुक्त होऊन वेत्रधारी होतो थेट शंकरापासून—आदिकवि-कपिल या परंपरेनें आलेलें शिवलिंग शंखपाल सिंधुराजास देतो. [ इ. अँ. ]

**पद्मनाभपुरम्**—मद्रास इलाख्यांतील त्रावणकोर संस्थानाच्या कलकुलम तालुक्यांतील एक गांव. हें त्रिवेंद्रम्‌पासून ३२ मैल दूर आहे. लोकसंख्या सुमारें तीन हजार आहे. हें गांव अगदीं प्राचीन काळीं त्रावणकोरची राजधानी होती. गांवाभोंवतीं मोडकळीस आलेला तट आहे. येथील 'महाराजांचा वाडा' फार उत्तमपैकीं बांधलेला आहे. हें पद्मनाभपुरम् जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे.

**पद्मपुराण**—अठरा पुराणांपैकीं एक पुराण. या पुराणाच्या खंड अथवा पर्व संख्येचा मेळ बसत नाहीं. आनंदाश्रम संस्थेनें छापलेल्या पद्मपुराणांतील खंडांचा अनुक्रम (१) आदिखंड, ( २ ) भूमिखंड, ( ३ ) ब्रह्मखंड, (४) पाताल खंड, ( ५ ) सृष्टिखंड व ( ६ ) उत्तरखंड असा आहे. परंतु याच प्रतींत सृष्टिखंडांत या पुराणाची ( १ ) पौष्कर, ( २ ) तीर्थ, ( ३ ) राज, ( ४ ) वंशानुचरित व ( ५ ) मोक्ष अशीं पांच पर्वे असून श्लोकसंख्या ५५ हजार असल्याचा उल्लेख आहे ( सृष्टिखंड, अ. १, श्लोक ५४-५६ ) परंतु याच पुराणाच्या उत्तरखंडांत याची ( १ ) सृष्टिखंड, ( २ ) भूमिखंड, ( ३ ) पातालखंड, ( ४ ) पुष्कर व ( ५ ) उत्तर अशी खंडवार विभागणी केली आहे. यावरून या ग्रंथाच्या प्राचीन प्रतींचें स्वरूप उत्तरकालीं बरेंच बदलत गेलें असल्याचें दिसतें. पाद्म अथवा पद्मपुराण या अवाढव्य ग्रंथाच्या संशोधित अशा दोन निरनिराळ्या प्रती आहेत. त्यांतील जुनी बंगाली लिपींतली ' बंगाली ' प्रत आहे. त्यांत पांच खंड आहेत.

पहिलें खंड, सृष्टिखंड. यांत सृष्ट्युत्पत्तीच्यावेळीं ब्रह्मा हा ज्या पद्मांत ( कमलांत ) असलेला दिसतो त्या कमलाचें वर्णन आहे. विश्वाच्या उत्पत्ती व घटना यांविषयींच्या कल्पित कथा इतर पुराणांतल्या सारख्याच यांत दिलेल्या आहेत. पण या खंडांत विष्णूस आदिकारण मानलें नसून ब्रह्मदेव आदिकारण असें दिलें आहे. तथापि यांतहि विष्णूसंबंधीं पुष्कळ कथा असल्यानें याला वैष्णव पंथाचें स्वरूप आहेच. यांतील एका भागांत पुष्कर सरोवराचें ( अजमीरमधील ) वर्णन आहे. हें ब्रह्मदेवाचें पवित्र स्थान म्हणून यात्रेचें ठिकाण होय असें सांगून त्याचें माहात्म्य वर्णिलें आहे.

दुसरें खंड भूमिखंड- पृथ्वीबद्दलचा भाग. याच्या आरंभीं प्रसिद्ध विष्णुभक्त प्रल्हाद याची गोष्ट दिली आहे. ती विष्णुपुराणांतील कथेप्रमाणेंच आहे पृथ्वीचें वर्णन देऊन शिवाय पुष्कळ पवित्र तीर्थस्थानांबद्दल पावित्र्यनिदर्शक अशा अनेक दन्तकथा सांगितल्या आहेत. या पवित्र स्थानांनांच 'तीर्थ' असें म्हटलें आहे इतकेंच नव्हे तर, गुरु, पिता किंवा पत्नी इत्यादि व्यक्तींनांहि 'तीर्थ' संज्ञा दिली आहे. पत्नीलाहि ' तीर्था'प्रमाणें कां मानावें याबद्दल सुकलेची गोष्ट दिली आहे. हिचा नवरा हिला टाकून तीर्थयात्रा करावयास गेला; त्यामुळें तिला दारिद्र्य आणि दुःख भोगावें लागलें. तरी सुद्धां कामदेव व देवांचा राजा इंद्र यांच्या प्रयत्नांनां ती वश झाली नाहीं; तर तिनें आपलें पातिव्रत्य राखिलें; म्हणून जेव्हां तिचा नवरा परत आला तेव्हां त्याच्या बायकोच्या सद्गुणांबद्दल त्याला देवांनीं वर दिले. याच ठिकाणीं पुत्राला 'तीर्थाप्रमाणें' कां मानावें यानंतर्याी महाभारतांत पूर्वीच आलेली ययाती व त्याचा पुत्र पुरु यांची गोष्ट आली आहे.

तिसरें खंड, स्वर्गखंड. यांत सूर्य, इंद्र, अग्नि, यम इत्यादि देवांच्या लोकांचें वर्णन आहे, व त्यांत पुष्कळ गोष्टी व कथा दिल्या आहेत. एके ठिकाणीं राजा भरताचा उल्लेख आल्यावरोबर तेथें शकुंतलेचें आख्यान दिलें आहे; तें महाभारतांतील गोष्टीहून जरा निराळें आणि कालिदासाच्या' शाकुंतल '

नाटकाशीं जुळणारें असें आहे. "अप्सरालोका"चें वर्णन करतांना पुरूरवस् आणि उर्वशी यांची गोष्ट दिली आहे. अशा दुसऱ्या अनेक गोष्टी महाकाव्यांत पूर्वीं आलेल्या येथें पुन्हां दिल्या आहेत. तसेंच आश्रमधर्म व जातिधर्म यांचा उपदेश आणि विष्णुपूजा, इतर विधी आणि नीतिनियम वगैरे यांत दिलेले आहेत.

चवथें खंड, पातालखंड. यात प्रथम पाताळांतील प्रदेशांचें वर्णन असून विशेषतः नाग किंवा सर्प देवतांच्या निवासस्थानांची माहिती आहे. रावणाचें नांव येतांच सगळी श्रीरामकथा सांगितली आहे व ती बरीचशी कालिदासाच्या रघुवंश काव्याशीं तंतोतंत जुळणारी आहे. येथेंच ऋष्यशृंगाची महाभारतांत आहे त्यापेक्षां जुन्या प्रकारची दन्तकथा दिली आहे. श्रीरामकथेच्या आधीं रामचंद्राच्या पूर्वजांची हकीगत आहे. त्यांत सूर्य-देवतेचा मुलगा मनु आणि त्याची जलप्रलयामधून सुटका, यांची माहिती सांगितली आहे.

पातालखंडाच्या शेवटीं अठरा पुराणांविषयीं सविस्तर माहिती दिली आहे. येथें असें म्हटलें आहे कीं, व्यासांनीं प्रथम पद्मपुराण सांगितलें, नंतर दुसरीं सोळा पुराणें आणि शेवटीं भागवत पुराण सांगितलें. या भागवत पुराणाला विष्णुपूजकांनीं सर्वश्रेष्ठ म्हणून वर्णिलें आहे.

पांचवें खंड, उत्तरखंड. हा वैष्णवपंथाचा आधारग्रंथ असून यांत विष्णूच्या पूजेचा सविस्तर पण अगदीं असहिष्णुक रीतीनें उपदेश केला आहे. त्यातील कथा पुढीलप्रमाणें.—एकदां ऋषींनीं भृगूस देवांपैकीं कोणत्या देवामध्यें चांगलेपणाचा गुण सर्वांत अधिक आहे आणि त्यामुळें कोणता देव सर्वांत अधिक मानायला योग्य आहे, हें पाहण्याकरितां पाठविलें. भृगु प्रथम शंकराकडे गेले, परंतु शंकर आपल्या स्त्रीबरोबर विलासांत रममाण असल्यामुळें भृगूनां अन्तःप्रवेशच मिळाला नाहीं. नंतर ते ब्रह्मदेवाकडे गेले; ब्रह्मदेवाच्या भोंवतीं ऋषींचा घोळका बसलेला होता; ब्रह्मदेव आपल्याच नादांत होते, आणि भृगुऋषि आल्याची दादहि त्यांनीं घेतली नाहीं असा उद्दामपणा त्यांनीं केला. नंतर भृगु विष्णूकडे गेले पण ते झोंपेंत होते. तेव्हां ऋषींनीं विष्णूच्या छातीवर लाथ दिली आणि त्यानां जागें केलें. विष्णु उठले, त्यांनीं हळूंच ऋषीच्या पावलाला स्पर्श केला, आणि ऋषीच्या पादस्पर्शानें आज आपण फार आनंदित व धन्य झालों, असें विष्णू म्हणाले. या सौजन्यानें ऋषि इतके संतुष्ट झाले कीं त्यांनीं एकदम जाहीर केलें कीं, परम-ईश्वर म्हणून विष्णूच काय ते पूजनाला योग्य आहेत.

या खंडांत भगवद्गीतेचेंहि माहात्म्य दिलें आहे; त्यांत प्रत्येक अध्यायाच्या पठनाचें स्वतंत्र फल गोष्टी देऊन वर्णिलें आहे. या उत्तर खंडाला एक पुरवणी "क्रियायोगसार" म्हणून जोडली आहे; त्यांत असें सांगितलें आहे कीं, केवळ ध्यानयोगानें विष्णूची आराधना होत नाहीं; तर पवित्र पुण्य कर्में म्हणजे गंगेच्या यात्रा, यज्ञ, विष्णूचीं व्रतें वगैरे केलींच पाहिजेत.

बहुतकरून हीं सर्व खंडें म्हणजे निरनिराळे ग्रंथच असावे, व त्या सर्वांनां एकत्र करून पद्मपुराण नांव दिलें असावें; व त्यांपैकीं पहिल्या तीन खंडांत, पण मुख्यतःसृष्टिखंडांतच जुन्या पद्मपुराणाचे भाग घातलेले असावे. अशीं पुष्कळ माहात्म्यें, स्तोत्रें वगैरे पद्मपुराणांतलींच असल्याचा उल्लेख आढळतो.

**पद्मिनी**—ही सिंहलद्वीपच्या हमीरसिंग राजाची मुलगी, चितोडचा राणा लक्ष्मणसिंग याचा चुलता भीमसिंग याची ही बायको; ही अतिशय सुंदर होती म्हणून अल्लाउद्दीन खिलजीनें हिच्या लोभानें चितोडवर स्वाऱ्या केल्या होत्या. पहिल्या स्वारींत पुष्कळ दिवस वेढा देऊनहि त्याच्या हातीं चितोड पडेना तेव्हां एकवार पद्मिनीस पाहून मी परत जातो असा त्यानें निरोप पाठविला. आरशांत तिचें दर्शन तुम्हांस मिळेल असें भीमसिंगानें उत्तर दिलें. त्याप्रमाणें अल्लाउद्दीन थोड्या लोकांसह गडांत जाऊन त्यानें पद्मिनीचें दर्शन घेतलें व परत निघतांना विश्वासानें पोंचवावयास आलेल्या भीमसिंगास किल्ल्याबाहेर पडल्यावर त्यानें कैद केलें आणि पद्मिनी मिळाल्याशिवाय सोडणार नाहीं असें त्यास सांगितलें. हे पद्मिनीस समजतांच तिनें चमत्कारिक युक्ति केली. मी माझ्या इतमामाप्रमाणें भेटीस येतें असें सांगून तिनें सुरक्षाच्या ७०० पालख्या तयार केल्या. प्रत्येकींत एक एक निवडक व शूर हत्यारबंद शिपायी होता. दरेक पालखीचे सहा भोईहि हत्यारें छपविलेले शिपायीच होते. नेमलेल्या वेळीं पालख्या अल्लाउद्दिनाच्या छावणींत दाखल झाल्या व बादशहानें पद्मिनीस नवऱ्यास भेटण्यास अर्ध्या तासाची मुदत दिली. त्याच्या मनांत भीमसिंहास ठरल्याप्रमाणें सोडावयाचें नव्हतें. परंतु कांहीं रिकाम्या पालख्या किल्ल्यांत परत गेल्या त्यांपैकीं एकींत बसून तो पळून गेला. पद्मिनी वास्तविक आलीच नव्हती वेळ भरल्यावर बादशहानें विचारपूस केली तेव्हां रजपूत शिपायी बाहेर पडून त्यांनीं बादशहाच्या सैन्यावर हल्ला केला.परंतु अखेर खिलजीनें त्यांचा मोड केला. फजिती झाल्याचें पाहून व दिल्लीस बंडाळी झाल्याचें ऐकून बादशहा वेढा उठवून निघून गेला ( १३०३ ). यावेळीं ज्या सातशें रजपुतांनीं भीमसिंगास सुखरूप किल्ल्यांत जाण्यासाठीं बादशहास अडवून धरिलें होतें त्यांचे मुख्य सरदार दोन होते. ते पद्मिनीच्या माहेरचे असून त्यांचीं नांवें गोऱ्हा व बादल हीं होतीं. त्यांनीं अत्यंत पराक्रम करून किल्ल्याच्या दारापाशीं आपले प्राण अर्पण केले परंतु भीमसिंहास सुखरूप आंत जाऊं दिलें. यांच्यावर रजपूत भाटांनीं कवित्तें केलीं आहेत. बादल सारा १२ वर्षांचा होता. पुन्हां पुढल्याच वर्षी ( १३०४ ) अल्लाउद्दिनानें चितोडास वेढा दिला. या वेळींहि रजपुतांनीं लढण्याची कमाल केली. शेवटीं आपला इलाज चालत नाहीं असें पाहून त्यांनीं बायकांचा जोहार करून स्वतः सर्वांनीं रणांगणांत प्राण अर्पण केले.

अलाउद्दिनानें चितोड घेतलें परंतु जिच्यासाठीं त्यानें एवढी खटपट केली ती पद्मिनी जोहारांत जळून खाक झाली होती. राजपुतान्यांत पद्मिनीला व तिच्याबरोबरच गोन्हा व बादल यांसहि फार पूज्य मानितात. तिच्यावर भाट लोकांनीं अनेक काव्यें केलीं आहेत. गडावर तिचा महाल अजूनहि पडक्या अवस्थेंत आहे. किस्सेपद्मावति नांवाचें एक फारशी काव्य हुसेन गझनीकर यानें लिहिलें आहे. भाख भाषेंत मलिक महंमद यानेंहि एक काव्य केलें आहे. स. १६५२ मध्यें राय गोविंद मुनशी यानें तुकफत–उल–कुलुब या फारशी गद्य-ग्रंथांत तिचें चरित्र दिलें आहे [ टॉड–राजस्तान. मेवाड; खोमानरासा; बील; फेरिस्ता ].

**पद्रौणा**—संयुक्त प्रांतांतील गोरखपूर जिल्ह्याची एक ईशान्येकडील तहशील. क्षेत्रफळ ९२८चौरस मैल.लोकसंख्या (१९०१) ५९५७०६. यांत एक गांव व१३०० खेडीं आहेत. उत्तरेस सालवृक्षांचें जंगल असून ईशान्येस 'मोटी गंडकी' नदी वहाते. ऊंस, तांदूळ, नीळ हीं पिकें मुख्य आहेत. पाटांतून विहिरीचें व तलावांचें पाणी खेळवितात. मुख्य गांव पद्रौणा असून येथेंच कुर्मी जमीनदार राहतो. गांवाची लोकसंख्या सात हजार आहे.

**पनवेल, तालुका.**—मुंबई इलाख्यांतील कुलाबा जिल्ह्याचा एक उत्तरेकडील तालुका. क्षेत्रफळ ३०९ चौरस मैल.पनवेल व उरण हीं दोन गावें असून२१६ खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९०१) ११२५१५. पनवेलमध्यें उरणपेट्याचा समावेश होतो.पूर्व सरहद्दीवर बावामलंगड, माथेरान व प्रबळ पर्वतश्रेणी आहेत. शिवाय आग्नेय सरहद्दीवर माणिकगड पर्वतश्रेणी आहे. उत्तर दक्षिण कर्नाळा डोंगरओळ असून उरणच्या भागांत खारी तांदुळाची जमीन आहे. तालुक्यांतून गाढी नदी वहाते. उन्हाळ्यांत पाण्याचें दुर्भिक्ष असतें.

**गांव.**—हें मुंबई--पुण्याच्या रस्त्यावर आहे लोकसंख्या सुमारें दहा हजार म्यु स्थापना१८५६सालीं झाली.हें एक बंदर आहे. येथें बैलगाड्यांचीं चाकें फार उत्तमपैकीं बनवितात. देशी औषधें तयार करण्याचा येथें एक मोठा कारखाना असून भात सडण्याच्या गिरण्याहि आहेत. या गावीं एक खाजगी हायस्कूल आहे पनवेल बंदराचा यूरोप देशाशीं १५७० सालीं व्यापार चालत असे.

पनवेलीस शिवाजीच्या आरमाराचें एक लहानसें ठाणें होतें. पुढें मराठ्यांच्या वेळीं हा कसब्याचा गाव होता. याच्या आसपास मराठयाच्या व इंग्रजांच्या नेहमीं झटापटी होत असत. कारण दोघांच्या सरहद्दी याला लागून जवळ जवळ होत्या.

**पनामा, राज्य.**—मध्यअमेरिका पनामा संयोगीभूमीच्या प्रदेशाचें हें प्रजासत्ताक राज्य आहे. उ. अ. ७°१५' ते ९° ३९' आणि पश्चिम रेखांश ७७° १५' ते ८३° ३०' यांच्या दरम्यान आहे.क्षेत्रफळ सुमारें ३१५०० ते ३२८०० चौरस मैल असून सर्वांत जास्त रुंदी ११८ मैल आणि लांबी ४३० मैल आहे. पनामा आखातांत १६ मोठीं व १०० लहान बेटें आहेत. येथें टयूरा, चेपो व चेग्रेस या तीन मोठया नद्या आहेत. भूकंप बरेच होतात. अति पर्जन्यामुळें जमीन उंचसखल झाली आहे. सपाट मैदानें फार थोडीं आहेत. येथें दोनच ऋतू असून पावसाळा एप्रिलमध्या-पासून डिसेंबरमध्यापर्यंत असतो. सर्वांत अधिक पाऊस १२५ इंच कांहीं भागात पडतो. सोनें, तांबें, मीठ, लोखंड वगैरे खनिज द्रव्यें सांपडतात; खनिजोदकाचे झरे येथें पुष्कळ आहेत. रंगाच्या व औषधी वनस्पती, इमारती लांकूड, रबर वगैरे जंगलांतील माल आणि सुपीक जमीनींत सोन-केळीं, कॉफी, कोको, तंबाखू वगैरे पिकें होतात. कोलोन, पनामा व बोकस डेलटोरो हीं मुख्य बंदरें असून पनामारेल्वे, तारायंत्र, बिनतारी विद्युत्संदेशयंत्र वगैरे दळणावळणाचीं साधनें आहेत.

लोकसंख्या सुमारें चार लाख असून येथील रहिवाशी इंडियन, नीग्रो व स्पॅनिश या मिश्र जातींचे आहेत. कोलोन, पनामा, बालबोआ, आकनबोकस-डेल-टोरो, पोर्टोबेलो, नॉम्ब्रे-डी-डिओस वगैरे मुख्य शहरें आहेत.

येथें १९०४ सालापासून प्रजासत्ताक राज्य स्थापन झालें असून लोकांनीं निवडलेले प्रेसिडेंट व नॅशनल असेंब्ली हीं राज्यकारभार चालवितात. २१ वर्षांवरील सर्व पुरुषांस मताधिकार आहे. राज्यव्यवस्थेकरितां संस्थानचे पनामा, कोलोन, कोकल, लाससांटोस, व्हेराग्वास, चिरिक, बोकासडेल–टोरो असे सात भाग आहेत. प्राथमिक शिक्षणाचा प्रसार बराच झाला असून उद्योगधंदे व कलाशिक्षणाच्या आणि शिक्षक तयार करण्याच्या शाळा आहेत. ' बलबोआ ' नांवाचें सोन्याचें नाणें येथें चालतें, त्याची किंमत अमेरिकन डॉलर ( अदमासें ३ रु. २ आ. ) इतकी आहे.

१४९९ सालीं आलोन्सो डे ओजेडा नांवाचा यूरोपीयन गृहस्थ पनामाच्या संयोगीभूमीस प्रथम आला असावा. नंतर कोलंबस ( १५०२ ), डीएगो डी निक्यु व मार्टिन फर्नांडीझ डी एन्सीसो (१५१०) यांनीं वसाहती स्थापिल्या. स. १५१९ मध्यें पनामा शहर वसविलें. स. १६९८ मध्यें स्कॉटिश लोकांनीं एक वसाहत केली पण ती १७०० मध्यें स्पॅनिश अधिकाऱ्यानीं उठविली. स.१८१९ मध्यें कोलंबियांत आणि स. १८३१ मध्यें ग्रेनाडांत पनामा समाविष्ट करण्यांत आलें होतें पण १८४१सालीं पुन्हां पनामा हें पृथक् पण पर-तंत्र संस्थान बनलें.स. १९०३ मध्यें पनामानें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें व स. १९०४ मध्यें प्रजासत्ताक राज्यपद्धति स्थापिली. स. १९०३ मध्यें युनायटेड स्टेटसला 'कॅनॉल झोन' नामक प्रदेश ३१२५०००रु. एकदम आणि ८४३७५० रु. दरसाल खंडणी मिळण्याच्या करारावर पनामा सरकारनें दिला.

१९१५ सालीं हेरारा हा नवीन प्रांत पनामा रिपब्लिकच्या ताब्यांत आला. १९२० सालीं पनामाचा १४९०३८५ पौंड वसुल व १४९०३८५ पौंड खर्च होता. १९२० सालीं १७०९२२७० बलबोआ ( डॉलरइतक्या किंमतीचें नाणें ) इतकी आयात व ३६४०४५२ बलबोआ किंमतीच्या मालाची निर्गत झाली.

१९१८ सालीं दर १० हजार माणसांना एक सभासद असे. ३३ सभासदांचे एक चेंबर निर्माण करण्याचें ठरविण्यांत आलें. १९२० सालीं प्रांताधिपती हे लोकनियुक्त असावेत असें ठरलें. १९१४ सालीं पनामाचें स्वातंत्र्य कोलंबियानें मान्य केलें. पनामा हे राष्ट्रसंघाचें सभासद आहे. १९२१ सालीं पनामा व कोस्टारिका यांच्यामध्यें सरहद्दीसंबंधानें पुन्हां भांडण उपस्थित होऊन दोन्ही राष्ट्रांमध्यें कांहीं किरकोळ चकमकी झडल्या पण अमेरिकेच्या मध्यस्तीनें दोन्ही राष्ट्रांत कसाबसा सलोखा घडून आला आहे.

श ह र.—राजधानीचें शहर व मुख्य बंदर. लोकसंख्या (१९१०) ३०००. शहराच्या भोंवतीं दगडी तटाचे अवशेष आहेत. तेथें राजवाडा, नाटकगृहें, कलाभुवन, दवाखाने, उपहारगृहें वगैरे इमारती आहेत.शहरांत विजेचे दिवे, विद्युत्साहाय्यानें चालणाऱ्या आगगाड्या, तारायंत्रें, टेलिफोन वगैरे सोयी आहेत. शहरांत साबण व चाकोलेटचे कारखाने आहेत. हें शहर १५१९ सालीं पेड्रो आरिआस डी अव्हिला यानें वसाविलें असून अमेरिकेंतील सर्वांत जुनें यूरोपीय शहर हेंच होय. या शहरांत भूकंप बरेच झाले आहेत.

**पनामा कालवा**—' कालवे ' पहा.

**पन्ना, सं स्था न.**—बुंदेलखंड पोलिटिकल एजन्सीखालीं येणारें मध्यहिंदुस्थानांतील एक सनदी संस्थान. क्षेत्रफळ २५९६ चौरस मैल. याचा बराच प्रदेश पन्ना पर्वतश्रेणीनें (विन्ध्याद्रीचा एक भाग)व्यापलेला आहे. केन नदी पन्नाच्या सरहद्दीवरून वहाते. पन्नाच्या डोंगरांत हिऱ्याच्या खाणी आहेत. जंगलानें बराच प्रदेश व्यापलेला आहे. त्यांत साग व इतर लांकूड सांपडतें. वाघ, अस्वलें, साम्बर व रानडुकरें हे प्राणी आढळतात. हवामान उष्ण पण प्रकृतीस हितकारक आहे. पाऊस अजमासें ४२ इंच पडतो.

इतिहासः—पन्ना संस्थानिक बुन्देल रजपुत असून ओर्छा घराण्यांतील होत. १६३५ सालीं झुंझारसिंग मरण पावल्यानंतर सर्व बुंदेलखंडांत अव्यवस्था माजली. या संधीचा फायदा घेऊन उदोतसिंगाचा नातू व ओर्छाच्या मधुकराचा बंधु चंपतराय यानें बराच मुलूख आपल्या ताब्यांत घेतला.यानेंहि आपलें संस्थान बरेंच वाढविलें त्याचाच पुत्र छत्रसाल ('छत्रसाल'पहा). छत्रसालची पहिली राजधानी कालिंजर होती. नंतर वेळोवेळीं पन्ना, छत्रपूर व जैतपूर करण्यांत आल्या. छत्रसाल १७३२ सालीं मरण पावला.छत्रसालास बावीस औरस पुत्र व तीस अनौरस पुत्र होते. त्यांच्याच वंशजांकडे सध्यां पन्ना, चरखारी, अजयगड, बिजावर, सरीला, जसो, जिगनी व लुगासी हीं संस्थानें आहेत. पूर्व धानसा प्रदेशांत पन्नाचा महाराज बुंदेले राण्यांचा मुख्य समजला जातो. स. १७३२ मध्यें हिर्देसा ( १७३२–३९ ) गादीवर आला. त्याच्या नंतर सभासिंग ( १७३९–५२ ) गादीवर आला. ह्याच्या अमदानींत हिऱ्याच्या खाण कामास सुरवात झाली. त्याच्या नंतर अमानसिंगनें ( १७५२–५८ ) राज्य केलें पण ह्याचा भाऊ हिंदुपत यानें ( १७५८–७७ ) ह्याचा खून करून गादी बळकावली. हिंदुपतनंतर त्याचा पुत्र अनिरुद्ध गादीवर आला. ह्यानें १७७७–७९ पर्यंत राज्य केलें. अनिरुद्ध हा अज्ञान असल्यामुळें कारभाऱ्यांत दुहीं माजली. अनिरुद्धाच्या मरणानंतर बेणीहजूरी, खेमराज व सोनेसा पोंवार ह्यांनीं मैहार, पालदेव, छत्रपूर हीं संस्थानें वसविलीं. अनिरुद्धाचा बंधु धोकलसिंग हा १७८५ सालीं गादीवर आला. व ह्यानें १७९८ पर्यंत राज्य केलें. पेशव्यांचा अनौरस पुत्र समशेर बहाद्दर याचा मुलगा गोसाईचा नाईक हिंमतबहाद्दर याने बुंदेलखंडावर बऱ्याच स्वाऱ्या केल्या. याचा दोस्त अलिबहाद्दर यानें तर धोकलसिंग वगैरे संस्थानिकांस सनदपत्रें दिलीं.

जेव्हां ब्रिटिश अंमलास सुरवात झाली त्यावेळीं किशोरसिंग हा नामधारी राजा होता. किशोरसिंगानंतर हरवंशराय ( १८४०–४९ ) व हरवंशरायानंतर नृपतसिंग(१८४९–७०) गादीवर आला. बंडाच्या सालीं बंडखोरांस दमोह जिल्ह्यांतून हांकलण्यास ब्रिटिश सरकारास यानें मदत केली. तेव्हां सरकारनें खूप होऊन ह्यास २० हजार रु. व समरिया परगणा दिला. १८६९ सालीं ह्यास महेन्द्र हा किताब दिला. ह्याच्या नंतर रुद्रप्रतापसिंग गादीवर आला. ह्यानें १८७०–९३ पर्यंत राज्य केलें. ह्याच्यानंतर लोकपाल गादीवर आला. यानें चार वर्षें राज्य केलें व नंतर माधवसिंग हा गादीवर बसला. पण राव राजा खुमानसिंग ह्याच्या खुनाशीं याचा संबंध आहे असें दिसून आल्यावरून ह्यास १९०२ सालीं गादीवरून काढून टाकलें. सध्यांचा राजा महाराजा यादवेन्द्रसिंग हा आहे. संस्थानची लोकसंख्या दोन लाख आहे. राजधानीचा गांव पन्ना असून इतर १००८ खेडीं आहेत.

शेंकडा ३८ लोक शेतकीवर अवलंबून आहेत. येथील हिऱ्याच्या खाणीं १७ व्या शतकापासून प्रसिद्ध आहेत. १७५० सालीं ह्या संस्थानास खाणीपासून एकंदर वर्षाचें ४ लाख रु. उत्पन्न होतें. धान्य व इमारती लांकूड यांचा मोठा व्यापार चालतो. पन्नाचे ११ परगणे पाडले आहेत.

गां व.—हा पन्ना संस्थानच्या राजधानीचा गांव असून याची लोकसंख्या अकरा हजार आहे. पूर्वी हा प्रदेश गोंड लोकांच्या ताब्यांत होता पण १३ व १४ व्या शतकांत रेव्याच्या वाघेल्यांच्या ताब्यांत गेला. १४९४ सालीं शिकंदर लोदीनें ज्या वेळीं भैरा राजावर स्वारी केली तेव्हां हा गांव घेतला. १५६३ सालीं हा राजा रामचंद्र देवाच्या

ताब्यांत होता. १७ व्या शतकांत राजा छत्रसालनें हा गांव काबीज केला व १६७५ सालीं येथें आपली राजधानी केली. हा गांव एका खोऱ्यांत असून भोंवतालीं डोंगर आहेत. येथील नवा राजवाडा मोठा भव्य आहे. शिवाय गांवांत देवालयें बरींच आहेत.

**पन्हाळा**—कोल्हापुरच्या वायव्येस ६ कोसांवरील किल्ला. उंची ३॥ हजार फूट, घेर ४॥ मैल. हा शिलाहार भोजानें १२ व्या शतकांत बांधला तेव्हांपासून ब्राह्मणी, आदिलशाही व मराठे यांच्या ताब्यांत तो होता. शिवाजीनें प्रथम तो स. १६५९ त घेतला. ताराबाईनें येथें स्वतंत्र राज्य स्थापिलें; तेंच हल्लींचें कोल्हापुरचें राज्य. गडावरच स. १७८२ पर्यंत याची राजधानी होती. येथील हवा फारच उत्तम आहे. आदिलशाहींतील जुन्या इमारती व पाण्याचीं टांकीं पहाण्यासारखीं आहेत. हल्लीं हा कोल्हापुर राज्यांतील एक पेटा आहे.

**पंप**—कोणताहि प्रवाही पदार्थ द्रवरूप किंवा वायुरूप असला तरी त्याला खालच्या पातळीवरून उचलून वरच्या पातळीवर नेणें किंवा त्याला जोरानें दावणें यासाठीं जें यंत्र लागतात त्याला पंप असें म्हणतात. पंपाचा मुख्य उपयोग दाब उत्पन्न करण्याकडे होतो. पंप मुख्यतः दोन जातींचे असतात. एका पंपामध्यें पदार्थावर प्रत्यक्ष दाब घालून तो पुढें लोटला जातो व दुसऱ्यामध्यें पदार्थाला इतकी वाटोळी गति दिली जाते कीं, तो आपोआपच त्यांत उत्पन्न होणाऱ्या केंद्रोत्सारी (सेंट्रिफ्यूगल) बलानें त्याला जोडलेल्या नळीमधून आपोआप बाहेर जात असतो. यावरून असें दिसून येईल कीं, कोणत्याहि जातीचा पंप असला तरी त्याचें मुख्य कार्य पदार्थ एका बाजूनें ओढून दुसऱ्या बाजूला लोटणें हेंच आहे. वर सांगितलेल्या पहिल्या प्रकारच्या पंपाला प्लंजर पंप असें म्हणतात व दुसऱ्या जातीच्या पंपाला सेंट्रिफ्यूगल पंप असें म्हणतात.

**प्लं ज र पं प.**—यांत एका पंचपात्रा(सिलिंडरा)मध्यें एक दट्टया ( पिस्टन ) मागें पुढें होत असतो. सिलिंडरवर दोन पडदे बसविलेले असतात. एक दट्टया पुढें जावयास लागला म्हणजे आंत उत्पन्न होणाऱ्या पोकळीमुळें लागणाऱ्या ओढीनें आपोआप उघडतो व त्यामधून पदार्थ,पाणी,हवा वगैरे जें असेल तें सिलिंडरमध्यें आंत येतें. दट्टयाची धांव पुरी झाली व तो परत यावयास लागला म्हणजे हा पडदा आपोआप बंद होतो. सिलिंडरवर त्याच बाजूला आणखी एक पडदा बसविलेला असतो. दट्टया मागें जावयाला लागला म्हणजे आंत असलेला प्रवाही पदार्थ दाबला जातो. त्या दाबानें हा दुसरा पडदा उघडतो व आंत आलेला पदार्थ बाहेर जातो. दट्टया पुरा मागें जाईपर्यंत हा पदार्थ बाहेर जात असतो. दट्टया मागें परतला म्हणजे हा पडदा बंद होतो व पहिला पडदा पुन्हां उघडतो, अशा तऱ्हेनें हा पंप चालू असतो. दट्टया खालीं येतांना उघडणाऱ्या पडद्याला शोषक पडदा आणि दुसऱ्याला उत्सर्जक पडदा असें म्हणतात. जर सिलिंडर दोन्ही बाजूंनीं बंद असेल आणि त्याच्या दोन्ही बाजूंना वर सांगितलेले दोन दोन पडदे असतील तर त्याला दुहेरी ( डबल ) पंप असें म्हणतात. जेव्हां पडदे एकाच बाजूला असतात त्या वेळीं पंप एकाच बाजूनें चालतो; त्या वेळेस त्या पंपाला एका फेरीचा (सिंगल ॲक्टिंग) पंप असें म्हणतात. ह्या जातीचे पंप आडवे किंवा उभे असतात. तळघरांत पाणी भरणें हवा दावणें वगैरे पुष्कळ कामाला हे पंप उपयोगी पडतात. विशेषतः कमी शक्तीनें काम होणें या गोष्टीकडे लक्ष नसून काम बरोबर झालेंच पाहिजे अशा सर्व ठिकाणीं याच जातीचे पंप वापरतात. तसेंच वायु किंवा द्रवरूप पदार्थांना या जातीचे पंप चालतात.

**सें ट्रि फ्यू ग ल पं प.**—हे बहुतकरून पाणी चढण्यासाठीं वापरतात व तेलालाहि वापरतात. या पंपामध्यें एक बाहेरचा आंतून पोकळ असा भाग असतो. यामध्यें वाटीच्या पंख्याच्या आकाराचा भाग फिरत असतो. या जातीच्या पंपामध्यें पाणी पंपाच्या मध्यभागीं आंत येतें व पंपाच्या बाहेरच्या भागापासून बाहेर जातें. पंप चालू केला म्हणजे या मधल्या बाजूस असलेलें पाणी मधल्या फिरत्या घड्यावरोबर खूप जोरानें फिरल्यामुळें त्या पाण्याच्या अंगीं त्या पंख्याच्या टोंकाकडे जोरानें जाण्याची शक्ति उत्पन्न होते व तिकडे तें पाणी जातें. त्याच जोरानें तें बाहेरच्या भागाला जोडलेल्या नळीमधून बाहेर जातें. हें पाणी बाहेर जात असल्यामुळें पंपाच्या मध्यभागीं जी पोकळी उत्पन्न होते त्या पोकळीच्या जोरानें लागणाऱ्या ओढीमुळें जें पाणी पंप करावयाचें असतें तें आंत येतें; अशा रीतीनें हा पंप चालतो. पंपामध्यें बहुतकरून आंत फिरणारा एकच भाग असतो. एका फिरत्या भागाच्या पंपामुळें पाणी ५० ते ७५ फूट पर्यंत उंच जातें. यापेक्षां पुष्कळ जास्त उंचीवर किंवा फार लांबीवर पाणी न्यावयाचें असल्यास एका शेजारीं एक असे २–३ फिरते भाग बसवावे लागतात. ते एकमेकांपासून अगदीं निरनिराळे असतात. एकांतलें पाणी त्यांतून फिरून बाहेर पडल्यानंतर मागून दुसऱ्यांत, जरूर असल्यास तिसऱ्यांत किंवा चवथ्यांत सुद्धां पुढें पुढें जातें. असल्या पंपामध्यें जितक्या वेळां पाणी पुन्हां फिरतें तितक्या पटीनें पाण्याची उंचावर जाण्याची शक्ति वाढते. असल्या जातीचे पंप १४–१५ फुटांपेक्षां फारच तर २० फुटांपेक्षां जास्त उंच पाणी फेकूं शकत नाहींत. तसेंच त्यांची पाणी खेंचण्याच्या बाजू मध्यें हवा वगैरे मुळींच जाणार नाहीं अशा तऱ्हेनें बंद करावी लागतात.

**रो ट री पं प.**—रोटरी पंप म्हणून एक आणखी पंपाची जात आहे. ह्यामध्यें प्लंजर पंप व सेंट्रल पंप या दोहोंच्या क्रिया घडत असतात पण विशेषतः प्लंजर पंपाचीच क्रिया

जास्त असते. याच्याहि दोन जाती आहेत. एकामध्यें दांते बसविलेलीं दोन चक्रें फिरत असनात. तीं एका टांकी( बॅरल )मध्यें बसविलेलीं असतात. यामध्यें पाणी किंवा तेल जें पंप करावयाचें असेल तें येतें. दांतांचीं चाकें फिरावयास लागलीं म्हणजे त्यांच्याबरोबर हें पाणी लोटलें जातें. तें पाणी बाहेर जाण्याच्या वाटेनें बाहेर पडतें. व दुसरें खालच्या बाजूनें पाणी आंत येतें. दुसऱ्या जातीमध्यें दोन चाकें नसून एकच चाक असतें व त्याला समोरासमोर फक्त दोनच दांते असतात. हे दोन दांते व टांकीचा आंतला भाग यांमध्यें फार थोडें अंतर असतें. यामुळें पाणी लोटलें जात असतांना हा पंप इकडून तिकडे जात नाहीं. पाणी सरळ बाहेर जाण्याच्या वाटेनें बाहेर जातें व आंत येण्याच्या वाटेनें आंत येतें. याचे आणखीहि पुष्कळ प्रकार आहेत. पण ते सर्व याच तत्त्वावर आहेत. शोषक पंप व 'प्रक्षेपक' पंप असे आणखीहि दोन प्रकार कोणी मानतात. शोषक पंपामध्यें फक्त पाणी खेंचलें जातें पण तें पंपाच्या पातळीच्या वरती जाऊं शकत नाहीं. पण प्रक्षेपक (फोर्स) पंपमध्यें पाणी लागेल तितक्या उंचीवर चढवितां येतें. शोषक पंपाला फक्त शोषण पडदा असतो, उत्सर्जक नसतो. या जाती फक्त लुंजर पंपांत असतात सेंट्रिफ्यूगल, रोटरी व इतर सर्व पंप शोषक ( सक्शन ) व प्रक्षेपक (फोर्स) दोन्ही कामें करतात [ले. वा. ह. मनोहर ].

**पपनस**—हें फळ मूळचें मलाया आर्चिपेलागोमधील असावें. ते हिंदुस्थानांत १७ व्या शतकांत जाव्हा बेटांतून आलें असावें असा समज आहे. मुंबईकडील पातळ सालीचीं फळें उत्तम असतात. पपनसाचें झाड निंबोणीएवढें असतें. त्याला बाराहि महिने फळें येतात. अरुचीवर हीं फळें देतात.

**पपया**—हें झाड मूळचें अमेरिकेंतलें असून तें बहुधा सतराव्या शतकांत इकडे आलें असावें. पपया हा शब्द अंबबई या अमेरिकन शब्दाचा अपभ्रंश झाला आहे व याच शब्दाचीं निरनिराळीं रूपांतरें अनेक भाषांत झालेलीं आहेत. १६५६ सालीं हें फळ हिंदुस्थानातून चीन देशांत गेलें असा उल्लेख आहे. पपयाची लागवड अमेरिकेंतील सर्व उष्णकटिबंधांत, हवे, आस्ट्रेलिया, आफ्रिका, मलाया, सिलोन वगैरे देशांत फार होते. मुंबई इलाख्यात याची लागवड देशावर, अहमदाबाद वगैरे शहराच्या आसपास फार होते. पपयाच्या पानांत कांहीं वेळ मांस ठेऊन दिलें म्हणजे तें चांगलें व लवकर शिजतें. या फळाच्या अंगीं पाचकशक्ति फार आहे. पपयाचें झाड बहुतेक सर्व ठिकाणीं होतें, गोल पपयाच्या बियांपासून नर झाडें फार होतात. पपयामध्यें नर व मादी अशीं भिन्न झाडें असतात. नराला फुलांचे लांब लांब तुरे येतात व मादीला पानाच्या काखांत फुलें येतात. कित्येक लोक दरएक ठिकाणीं दोन दोन झाडें लावतात. उद्देश हा कीं त्यांतील अर्धीं जरी नर निघालीं तरी बाकीचीं अर्धीं मादी निघतील. पपयाची लागवड बियांपासून करतात. शिवाय त्याचीं आंब्यासारखीं कलमें बांधूनहि झाडें तयार करतां येतात.

पपयापासून पपेन नांवाचें एक औषध काढतात. सिलोनमध्यें जें पपेन तयार करतात तें फार उंची असून त्यामध्यें अर्ध्या तासांत पपेनच्या दसपट केसीन विरविण्याचा धर्म असतो. त्या देशांत पपेन करण्याचा धंदा फार मोठया प्रमाणावर होत असून तो वाढत आहे. १९११ सालीं ६६०० पौंड पपेन तयार झालें व १९१३ सालीं तेंच १८५०० पौंड तयार झालें. पपेन विशेषतः इंग्लंड, जर्मनी व अमेरिका या देशांत रवाना होतें, व याचा उपयोग अजीर्ण, अग्निमांद्य वगैरे विकारांवर होतो.

**पंपा सरोवर**—रामायणांत हें सरोवर किष्किंधेजवळ असल्याचें सांगितलें आहे. सांप्रतचें तुंगभद्रेवरील अनागोंदी शहर हीच प्राचीन किष्किंधा असें पुष्कळांचें म्हणणें आहे. त्यावरून पंपा सरोवर हें हल्लींच्या हंपीगांवाजवळ तुंगभद्रेच्या उत्तरतीरावर होतें, व पुढें विस्मरणानें सरोवर हें नांव जाऊन त्याला तामीळ रामायणकारानें ( पंपा ) नदी हें नांव दिलें होतें, असें कृष्णस्वामी अय्यंगार यांचें मत आहे. [ भारतवर्षीय भूवर्णन; अय्यंगार—एन्शन्ट इंडिया ].

**पॅंफिलिआ**—आशियामायनरच्या दक्षिणेकडचा एक प्राचीन प्रदेश. हा सिलिआ व सिलिसिआ यांमध्यें असून भूमध्यसमुद्रापासून टॉरसपर्वतापर्यंत पसरला आहे. पॅंफिलियन व पिसिडियन लोक एकच आहेत. सध्यां या ठिकाणीं ग्रीस, क्रीट व बाल्कन प्रांत येथील वसाहतवाले आहेत. प्रथम लिडियांतील मर्म्नाद राजांनीं पॅंफिलिआ जिंकिलें. नंतर तें इराणी व मॅसिडोनियन राजांच्या ताब्यांत गेलें. पुढें हा रोमन प्रांताचा भाग झाला. यानंतर याचा इतिहासांत उल्लेख नाहीं.

**पॅफ्लॅगोनियन लोक**—आशियामायनरमधील अत्यंत प्राचीन राष्ट्रांपैकीं एक. पॅफ्लॅगोनिया हा देश आशियामायनरमधील अनेक राष्ट्रांबरोबर प्रथम इराणच्या नंतर मॅसेडोनियाच्या सत्तेखालीं गेला. इराणच्या सत्तेखालीं असतां त्याचा पृथक् मांडलीक राजा असे. अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर हा प्रांत युमेनेसच्या ताब्यांत गेला. आणि शेवटीं तो पॉंटसच्या राज्याला जोडण्यात आला ( ख्रि पू. तिसरें शतक ) व तेव्हांपासून तेथील मांडलीक राजाचा कारभारहि बंद करण्यांत आला. इ. सनाच्या पहिल्या शतकांत हा प्रदेश रोमन लोकांच्या ताब्यात गेला. पांचव्या शतकांत हा स्वतंत्र प्रांत होता. पॅफ्लॅगोनियन लोक बहुधा सेमिटिक वंशाचे असावेत. या लोकाचा उल्लेख होमरच्या काव्यामध्यें ट्रोजन लोकांचे दोस्त म्हणून आला आहे. क्सर्क्सीसच्या सैन्यामध्यें हे लोक असत.

**पवना**, जि ल्हा.—बंगाल, आग्नेयीकडील एक जिल्हा. क्षेत्रफळ १६७८ चौरस मैल. गंगा व ब्रह्मपुत्रा यांच्या संगमामुळें तयार झालेल्या कोनामध्यें हा जिल्हा आहे. एकंदर

प्रदेश सपाट व सखल आहे. यांत जंगली प्रदेश नसून लाल सरकीच्या कापसाचीं व फणसांचीं झाडें पुष्कळ आहेत. हवामान समशीतोष्ण असून पाऊस सरासरी ६१ इंच पडतो.

प्राचीन पौण्ड्रवर्धन राज्याच्या नांवावरून पबना हें नांव पडलें असें कनिंगहॅम साहेबाचें म्हणणें आहे. ह्या जिल्ह्याचा व राजशाही विभागाचा अर्वाचीन इतिहास एकच आहे. १८३२ सालीं राजशाहीपासून हा वेगळा जिल्हा पाडण्यांत आला. लोकसंख्या ( १९२१ ) १३८९४९४. यांत पबना व सिराजगंज हीं दोन गांवें व २५३७ खेडीं आहेत.

मुख्य भाषा उत्तर बंगाली आहे. ¾ लोक मुसुलमान आहेत. शेंकडा ६८ लोक शेतकीवर उदरनिर्वाह करतात. पद्मा व यमुना या नद्यांचा गाळ जमून येथील जमीन अत्यंत सुपीक झाली आहे. तांदूळ व कडधान्यें पिकतात. तागाची लागवड वाढत्या प्रमाणावर आहे. हातमागावरचें कापड, काशाचीं, पितळेचीं, व मातीचीं भांडींहि तयार होतात. ह्या जिल्ह्यांतून बऱ्याच मालाची—ने आण होते. व्यापार मुख्यत्वेंकरून कलकत्ताशहराशीं चालतो. ताग, तांदूळ, कडधान्यें व मोहऱ्या हा निर्गत माल असून आयात माल परदेशी कापड, मीठ, राकेल तेल, तांदूळ, तंबाखू हा आहे. व्यापाराची मुख्य गांवें पबना, सिराजगंज, बेरा, उलापार, धापारी, पान्गासी. जिल्ह्याच्या नैर्ऋत्य भागांतून पूर्व बंगाल-स्टेट रेल्वे जाते. बरल, हुरासागर, पद्मा व ब्रह्मपुत्रा ह्या नद्या असल्यामुळें बहुतेक मालाची ने-आण नद्यांच्या पात्रांतूनच होते. जिल्ह्याचा कारभार इतर ठिकाणाप्रमाणें चालतो. पबना व सिराजगंज येथें म्युनिसिपालिट्या आहेत. शेंकडा पांच लोकांस लिहितां वाचतां येतें.

पो ट वि भा ग.—पबना जिल्ह्याचा मुख्य पोटविभाग. क्षेत्रफळ ८९४ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें ६ लक्ष. हा प्रदेश पाणथळ व पाटाच्या पाण्याचा असल्यामुळें येथील हवा रोगकारक आहे. यांत एक गांव ( पबना ) व १९४१ खेडीं आहेत.

गां व.—हें इच्छामती नदीवर वसलेलें आहे. लोकसंख्या सुमारें वीस हजार आहे. १८७६सालीं म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. येथें वरीच हायस्कुलें व एक कॉलेज आहे.

**पयागले** ( पेगू )—खालचा ब्रह्मदेश. पेगू जिल्ह्याचा मध्य तालुका (टाउनशिप). क्षेत्रफळ १३९४ चौरस मैल. मोठें गांव पेगू व ९२ खेडीं आहेत. पेगूच्या उत्तरेस १४ मैलांवर पयागले हें तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. तहशिलीची लोकसंख्या(१९११)८८७४७. पश्चिम भाग डोंगराळ व पूर्वभाग सपाट आहे. लोकवस्ती फार विरळ म्हणजे दर चौरस मैलास ७५ आहे.

**पयोष्णी अथवा पूर्णा नदी**—सातपुडा व अजिंठा या डोंगरांवरील पाणी अनेक लहान लहान नद्यांनीं पयोष्णी उर्फ पूर्णा या नदीस मिळून तापीस जाऊन मिळतें. पयोष्णी(पूर्णा) नदीची गणना पवित्र नद्यांत केली आहे. हिचा उल्लेख पुष्कळ जागीं आला आहे. पयोष्णीमाहात्म्य म्हणून ग्रंथ असून त्यांत तिच्या कांठच्या स्थळांचें वर्णन आहे. पयोष्णीच्या कांठची सांवळापूर येथील विष्णुमूर्ति फारच चित्ताकर्षक आहे. पूर्णा वऱ्हाडांतून वहात येऊन पूर्वखानदेशांत चांगदेव येथें तापीला मिळते. या संगमावरच ज्ञानदेवाची बहीण मुक्ताबाई हिनें जलसमाधि घेतली. तिचें व चांगदेव ( ज्ञानेश्वरकालीन ) यांचें मंदिर येथें आहे. येथून पुढें वास्तविक तापी वहात जाते. परंतु तिलाहि थेट सुरतेपर्यंत पयोष्णी असें नांव कोणी कोणी देतात.

**परकाल**—हैद्राबाद संस्थान, करीमनगर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ५०९ चौरस मैल. जहागिरीसुद्धां लोकसंख्या सुमारें एक लाख. यांत ११० गांवें ( पैकीं पांच जहागिरीचीं गांवें ) आहेत. मुख्य गांव अंबाल आहे.

**परजा**—हे लोक गोंडांचीच एक शाखा होत. मध्यप्रांतांत यांची संख्या १३ हजार आहे. यांचें हें नांव उत्पत्तिवाचक नसून केवळ भेद दाखविणारें आहे. हे लोक जरी गोंडांचीच शाखा आहेत तरी यांच्यांत खोंडांचेंहि मिश्रण कोठें कोठें झालेलें आढळतें. यांच्यांत देवकांच्या भेदावरून कांहीं कुळें बनलेलीं आहेत. जर नकळत एखाद्या वेळेस देवकाचा प्राणी मेला तर मडकीं फोडून, व कपडे धुवून आंबा किंवा जांभूळ यांच्या सालीच्या पाण्यानें घर धुवून काढलें पाहिजे. ज्यांचें बोकड देवक आहे त्यांनीं जर का बोकडाचें मांस खाल्लें तर ते आंधळे होतात असा समज आहे. हे लोक देवकप्राण्याच्या प्रेताला शिवत देखील नाहींत.

एकाच कुळांत विवाह निषिद्ध आहे. पण कुळें थोडीं असल्यामुळें एकाच गांवांत राहणारीं कुळें नसलीं तरी चालतात. मुलीबद्दल प्रथम मागणी वराकडून होते. वराचा बाप बाजारांत मुलीच्या बापास गांठून त्याला द्रोणभर मद्य देतो व आपला उद्देश कळवितो. जर मुलीच्या बापास वर पसंत नसला तर तो मुलाच्या बापास द्रोणभर मद्य बाजारांतच परत करतो.

हे सर्व लोक शेतकरी आहेत. कोणी रखवाली करतात. हे लोक मगर, साप, व कोल्हे खेरीज बाकीचें तें मांस खातात. कोणी कोणी तर गोमांस सोडलेलें आहे. जर उच्च जातींतल्या स्त्रीस किंवा पुरुषास परजाबरोबर व्यभिचार केल्यामुळें बहिष्कार घातला असेल तर त्या बहिष्कृतास हे आपल्या जातींत घेतात. [ रसेल व हिरालाल ]

**परडा जमीनदारी**—मध्यप्रांत, भंडारा जिल्हा. साकोली तहशील आणि खैरागड संस्थान यांच्या दरम्यान ही जमीनदारी आहे. क्षेत्रफळ२८चौरस मैल. खेडीं ७असून बराच भाग जंगलमय आहे. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं ही जमीनदारी चिमणाजी भोंसले ह्यांनीं ओरिसामध्यें जय मिळवून परत आल्याबद्दल आपणाबरोबर आलेल्या कारु गोंड यास दिली. हिची लोकसंख्या ३००० व उत्पन्न ५००० रुपये आहे.

**परतवाडा**—'एलिचपूर' पहा.

**परधान**—मध्यप्रांतांतील गोंडांची ही एक जात आहे. यांचा धंदा वाद्यें वाजविणें व गोंडांचें पौरोहित्य करणें हा आहे. यांची संख्या १२०००० आहे. यांच्यांत राजपरधान, गोंडपरधान व थोटियापरधान असे तीन वर्ग आहेत. यांचे विवाह करण्यासंबंधानें गोंडासारखेच निरनिराळे वर्ग आहेत. गोंड लोक यांस वैशाखांत बडा देवाची पूजा करण्यास बोलावतात. परधान लोक गोंडांप्रमाणेंच वाटेल त्या प्राण्याचें मांस खातात.

**पॅरॅफिन** (अल्पस्नेहक)—रसायनशास्त्रांत, क$_{न}$ उ$_{२न+२}$ या सामान्य सूत्रानें दर्शविल्या जाणाऱ्या उत्कर्वास दिलेलें जातिवाचक नांव. यापैकीं बरेच निसर्गांत आढळतात. अल्कमय क्षारांचें संस्करण करूनहि त्याचें संयेगीकरण करतां येतें. संस्करण करण्याकरितां सोडियम (सिंधु), पारदमेल, जस्त व उज्जहरिकाम्ल,निविष्ट उज्जहराम्ल, अल्युमिनम पारदमेल, किंवा जस्त-तांबें यांचें युगल; यांपैकीं एखाद्याचा उपयोग केला जातो.

या मालिकेमध्यें मुख्य मुख्य पदार्थ आहेत तेः—मिथुन, इथुन, मेदुन, सामान्य दधुन, दधुन, सामान्य पंचुन, द्वितीय पंचुन, तृतीय पंचुन, षड्डुन, सप्तुन, अष्टुन, इत्यादि.

या मालिकेंतील कांहीं पदार्थ वायुरूप व कांहीं स्फटिकाकार घन आहेत. मालिकेंतील खालच्या अल्पस्नेहकांवर बहुतेक रासायनिक द्रव्यांचा कांहींच परिणाम होत नाहीं. ज्यांतून धूर निघत आहे अशा गंधकाम्लांत खालचे पदार्थ द्रवतात व मध्य आणि उच्च पदार्थांचीं गंधोनिकाम्लें बनतात. बलवान नत्राम्लाचा, मालिकेंतील मध्य व उच्च अल्प स्नेहकांवर परिणाम होऊन कर्बाम्ल, काष्ठाम्ल, दार्बम्ल व सक्सीनिकाम्लें बनतात. हराची अल्पस्नेहकांवर प्रतिक्रिया झाली असता उज्जची जागा हर घेतो.

बा जा री अ ल्प स्ने ह क —बाजारी अल्पस्नेहक हें पांढरें किंवा निळसर पांढरें, अर्धवट पारदर्शक, मेणासारखे, वास व रुचिरहित, आणि रासायनिकरीत्या उदासीन असतें. त्यांत सुमारें शें. ८५ कर्ब व शें. १५ उज्ज असतो. घनरूप अल्पस्नेहकाचे गुणधर्म शोधून काढण्याचें ( १८३० ) श्रेय जरी कार्ल रायशेनबाक यास आहे तरी पेट्रोलियममधील अल्पस्नेहकाचें अस्तित्व तत्पूर्वी कांहीं दिवस माहीत झालेलें होतें. या पदार्थाच्या अंगच्या उदासीनत्वामुळें रायशेनबाक यानें त्याला अल्पस्नेहक असें नांव दिलें.

**परभणी**, जि ल्हा.—हैदराबाद संस्थानाचा औरंगाबाद विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ५१२७ चौरस मैल त्यांत जहागिरी व पैगाह जमिनी ९९५ चौरस मैल येतात. यांत सह्याद्रि व बालाघाट डोंगर आणि गोदावरी, पैनगंगा, पूर्णा व धुदना या मुख्य नद्या आहेत. येथील हवा प्रकृतीस हितावह व कोरडी आहे. पाऊस सरासरी ३४ इंच पडतो हा जिल्हा पूर्वी देवगिरीच्या यादवांकडे होता. पण१४ व्या शतकाच्या सुमारास हा जिल्हा अल्लाउद्दीन खिलजीनें घेतला. तेव्हांपासून तो मुसुलमानांकडेच आहे. जहागिरीसह गावें व खेडीं १५१३ आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ७७९६७४. शेंकडा ९० लोक हिंदु असून शेंकडा ८८ लोक मराठी भाषा बोलतात. शेंकडा ५३ लोक शेतकीवर उपजीविका करतात.

मुख्य पीक ज्वारी असून, इतर गहूं, बाजरी व तांदूळ होत. कापूस सर्वत्र होतो. जंगल २५५ चौरस मैल असून पैकीं ५५ चौरस मैल राखीव आहे. या जिल्ह्यांत जाडेभरडें कापड तयार होतें. परभणी येथें म्युनिसिपालिटी आहे. शेंकडा २.५ लोकांस लिहितां वाचतां येतें.

ता लु का.—याचें क्षेत्रफळ ५४६चौरस मैल असून जहागिरी धरून लोकसंख्या(१९११)१३१९५२. परभणी हें एकच गांव असून तालुक्याचें व जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. इतर खेडीं २५२; पैकीं १० जहागिरी आहेत. दक्षिण भागांतून गोदावरी नदी वहाते.

**परमगुडी**, त ह शी ल व गां व.—मद्रास इलाख्यांतील मदुरा जिल्ह्यांत असलेल्या रामनाद पोटविभाग व इस्टेटमधील एक जमिनदारी तहशील. लो. सं. (१९०१)१४२६६५. यात गांव एक ( परमगुडी ) व खेडीं ३७५. गावांतून वैगई नदी वहाते. गांवाची लोकसंख्या १६ हजारांवर आहे, येथें रेशमी कापड व चिटें तयार होतात.

**परमानंद चक्रवर्ती**—परमानंद चक्रवर्ती भट्टाचार्य हा बंगाल्यांत रहाणारा असून यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशावर 'विस्तारिका' नामक टीका लिहिली आहे. या टीकेंत सुबुद्धिमिश्र, दीपिकाकर्ता जयंतभट्ट, दर्पणकर्ता विश्वनाथ यांचीं नांवें आढळतात. प्रतापरुद्र ग्रंथाचा कर्ता वैद्यनाथ याचेंहि नांव याच्या टीकेंत आढळतें हा नैयायिक होता. (वि. वि. पुस्तक २२, अंक १-२ ).

**परमार घराणें**, ( धारचें )—हें घराणें जुनें असून मूळचें अबूचें व मागून धारचें झालें. भोजराजाच्या वेळीं हें घराणें विद्वत्तेबद्दल फार प्रख्यात होतें. या घराण्याचा मूळ पुरुष कृष्णराज होता. याच्या मागील वंशाचा पत्ता लागत नाहीं. उदेपूरप्रशस्तींतील कृष्णराजाच्या मागील वंशाची यादी अविश्वसनीय आहे. बुल्हरनें या घराण्याचा संगतवार इतिहास लिहिण्याचा प्रयत्न केला आहे ( इंडि. ॲंटि. पु.१ पृ. २२३ ). प्रथम कृष्णराज हा कनोजचा मांडलिक होता; पण पुढें तें राज्य दुर्बळ पाहून इ. स. ९१० च्या सुमारास त्यानें स्वतंत्रता धारण केली. या घराण्याची मूळ गादी उज्जनीस होती, नंतर ती धारेस गेली. कृष्णानंतर वैरिसिंह व सीयक गादीवर आले. सीयकानें हूणांचा पराभव केला. परमारांचें राजचिन्ह गरुड आहे व सीयकालाहि गरुड म्हणत ( ९७३ ). याचा मुलगा मुंजराज हा या घराण्यांत फारच प्रसिद्ध झाला. हा स्वतः विद्वान, दाता, कवि व शूर होता. याच्या पदरीं हलायुध, धनपाल वगैरे विद्वान होते. मुंजानें राष्ट्रकूट, चोल, केरळ वगैरे राजे जिंकले. याच्या अनेक

दंतकथा उपलब्ध आहेत ( उ० तैलपाच्या कैदेंत त्याच्या बहिणीशीं विवाह व मुंजाचा शिरच्छेद ). पण त्यांनां सबळ ऐतिहासिक आधार नाहींत. तैलप--चालुक्याचा त्यानें अनेकदां पराभव केला. परंतु शेवटच्या लढाईंत तो ठार झाला ( ९९५ ). यानें अनेक देवळें, तलाव, घाट, धर्मशाळा बांधल्या. याच्या मागून ( हा निपुत्रिक असल्यानें ) सिंधुराज गादीवर आला. हा पराक्रमी असल्यानें याला नवसाहसांक असे टोपण नांव पडलें व त्याचेंच चरित्र पद्मगुप्त(पद्म)कवीनें रचिलें आहे. सिंधु राजामागून प्रसिद्ध भोजराज राजा झाला ( १०१० ) याच्याइतका प्रख्यात राजा या वंशांत झाला नाहीं. हा दानशूर, पराक्रमी व विद्वान होता. याच्या पदरीं १४०० पंडित होते म्हणतात. विक्रमादित्य-शालिवाहन यांच्यासारखें याचेंहि नांव प्रख्यात आहे. हा सिंधु राजाचा पुत्र होय. याच्याबद्दलहि ( मुंजानें याला लहानपणीं ठार मारण्याचा प्रयत्न केला वगैरे)अनेक दंथकथा आहेत. यानेंच राजधानी उज्जनीहून काढून धारेस आणली व तेथें अनेक इमारती वगैरे बांधून व सुधारणा करून शोभा आणली. यानें हैहय, चालुक्य, कलचुरी, चेदि वगैरे अनेक राजांना जिंकलें. महंमूद गझनीकर याच्याशीं याच्या कांहीं झटापटी झाल्या.यानें त्रिपुरीच्या गांगेयदेवाचा व तलंगणच्या राजाचा पराभव करून त्याप्रीत्यर्थ एक लोखंडाचा विजयस्तंभ उभारला. तो हल्लीं धारेस 'तेलीकी लाट' म्हणून प्रसिद्ध आहे. उत्तम प्रकारें राज्य करून हा १०४५ च्या सुमारास वारला. त्यानें चंबळा ते गोदावरीपर्यंत आपलें राज्य वाढविलें. विद्यावृद्धीसाठीं यानें फार प्रयत्न केले. स्वतः त्यानें बरेच ग्रंथ केले. याला भारतीय ऑगस्टस म्हणतात. हा परधर्मसहिष्णु होता. यानें अनेक कलाकौशल्याचीं व प्रजावृद्धीचीं कामें केली. याच्यामागून जयसिंह उदयादित्य, लक्ष्मदेव, नरवर्मदेव, यशोवर्मन्, सुभट, अर्जुन, देवपाल, जयसिंह, दुसरा भोज, आणि शेवटचा जयसिंह हे राजे झाले हे बहुतेक राजे विद्वान् व विद्वानाचे पोशिंदे होते. या राजांनीं रचिलेले ग्रंथ शिलालेखरूपानें सांप्रत बरेच सांपडले आहेत. लक्ष्मदेवाच्यावेळीं उत्तरेकडील परमार घराणीं खालीं दक्षिणेंत आली. ११०७ त यशोवर्म्यानें गुर्जरराज सिद्धराज जयसिंह याची खोडी काढल्यावरून त्यानें धारेवर स्वारी करून यशोवर्म्यास पकडून कैदेंत ठेविलें. नंतर कांहीं दिवसांनीं त्याला सोडलें परंतु त्याचा पुष्कळ प्रांत खालसा केला. या नंतरचें परमारांचें स्वातंत्र्य नष्ट होऊन ते गुर्जरराजांचे मांडलिक बनले. देवपाळाच्या वेळीं दिल्लीच्या मुसुलमान पातशहांचे(अल्तमश) हल्ले माळव्यावर होऊन त्यांनीं कांहीं भाग काबीज केला व महाकालेश्वर फोडला ( १२३५ ). यानंतर धारेहून राजधानी हलवून मांडवगडास नेली. तेथें या राजांनीं पुष्कळ इमारती व सुखसोयींचीं साधनें निर्माण केलीं. दुसरा भोज हा पहिल्या भोजाप्रमाणें विद्वान होता. शेवटच्या जयसिंहापासून अल्लाउद्दीन खिलजीनें राज्य हिसकून घेतलें. सारांश या परमार घराण्यानें माळव्यावर जवळ जवळ ५०० वर्षें राज्य केलें. हे शैव असून जैनधर्मास त्यांचा आश्रय असे. यांच्याबद्दल साग्र माहिती हिंदुस्थानविभागांत दिली आहे [ स्मिथ--अ. हि. इंडिया; लेले--धारचा इतिहास; वैद्य-म. भा. भाग १, २ ]

**परमेश्वर**—जगांतील प्राचीन वन्य लोकसमाज परमेश्वर म्हणजे एक महाद्भुत होय असें मानीत; भूतपिशाच्चें यांच्यावर व आधिभौतिक तापांवर नियंत्रण ठेवणारी व्यक्ति म्हणजे परमेश्वर असा त्यांचा समज असे. त्याचीं नांवें मात्र निरनिराळ्या देशांत निरनिराळीं योजीत. वैदिक काळांत उषा, इन्द्र, रुद्र, सूर्य, वायु, पृथ्वी, वरुण वगैरे पांच भौतिक कर्दम व त्यांचे मूळ यांस देव मानण्यांत येई. ऑस्ट्रेलियाचे प्राचीन लोक देवास (सर्वांचा) पितामह म्हणून संबोधीत. हिब्रू पुराणांत भूत या अर्थी देवाचा निर्देश केलेला फारसा आढळत नाहीं तर होमरच्या ऑलिंपियनच्या कल्पनेंत देवी (गुण) अर्थाचा समावेश होत नाहीं. उपनिषत्कालांत महद्भूत हें नाव ब्रह्मास लावीत व ब्रह्म हें निर्विकार, निरामय पण सत्य, ज्ञानी व आनंदरूप मानीत. महद्भूत या कल्पनेनंतरची ( पिता किंवा ) पितामह ही कल्पना आहे. पितामहासच महद्भूत म्हणण्याची जी रीत यूरोपीयन संशोधकांनीं पाडली आहे ती चुकीची आहे. कोठें महद्भूत या कल्पनेची परिणति महद्वस्तु या कल्पनेंत झाली. वन्य समाजात प्रत्येक टोळीचा एक मुख्य नायक असे, त्यावरून त्या समाजानें परमेश्वर म्हणजे सर्व भौतिक वस्तूंना नायक ( पिता ) असावा असा समज पसरविला. तसेंच हा पिता मृत्युदेवतेच्या पूर्वी जन्मलेला असून अजूनहि तो वर स्वर्गांत वास करतो, तो अमर आहे, तेथून तो जगांतील प्राण्यांच्या सर्व क्रिया साक्षीभूत होऊन पहातो, मात्र स्वतः त्यांत भाग घेत नाहीं, अशी त्यांची समजूत आहे. ऑस्ट्रेलियांत या देवाचें नांव अत्नतु ( आत्मन् ? ) असें आहे. हिंदुस्थानांत पौराणिक कालांत ब्रह्मदेव हा प्रजापति मानून त्यानेंच सर्व सृष्टि उत्पन्न केली असा समज उद्भवला.

मुरामुरा, कुटवी अशींहि नांवें या पितामहास कांहीं वन्यसमाजांत ( ऑस्ट्रेलियाच्या ) आहेत. मात्र त्याचें कार्य अत्नतुसारखेंच आहे. कामीलारोइ, यौहलई या जातींत बइमे, बोयम असें परमेश्वराचें नांव असून, मिशनरी लोक म्हणतात कीं, हा बोयम (ब्रह्म?) आमच्या ख्रिस्ती धर्मांतील पिता व पुत्र या जोडीचा निदर्शक आहे. हा बोयम स्वर्गांत रहातो व त्याचा सहवास सच्छील माणसांनां मृत्यूनंतर घडतो. या देवाचे बरेच उपदेव ( किंवा पुत्र ) असून जगांतील निरनिराळ्या जातींचे कुलदेव व मूळ उत्पन्नकर्ते आहेत अशी या यौहलई लोकांची समजूत होती. युगांडामध्यें देव ही कृषिप्रधान देवता मानतात.

इच्छुमुंडी, करमुंडी या दुसऱ्या प्राचीन समाजांचा देव थथपुली, थुर्लोग हा असून तो मेलेल्या माणसांचा न्याय करून त्यांनां स्वर्ग व नरक देतो. फिजी बेटांत परमेश्वर म्हणजे एक मोठा सर्प आहे असें मानतात.

परमेश्वराची कल्पना उत्तरोत्तर जी सुधारत गेली ती ज्या देशांत खाण्याची विपुलता आहे व ज्याचा सामाजिक विकास होत आहे, अशा ठिकाणींच सुधारत गेली; म्हणजे देवाच्या कल्पनेंत विकास होण्यास मनुष्यसमाजाचीहि सर्वांगीण उन्नति व्हावयास पाहिजे असें दिसतें.

निर्जल, निर्धान्य अशा देशांतील लोकांची कल्पना देव हें एक क्रूर महद्भूत आहे व तो माणसाना कडक रीतीनें वागवितो अशी आढळते; तर सजल सफल देशांतील देवकल्पना तो पितामह, दयाळु, धारणपोषणकर्ता आहे अशी असते. निर्माता, पिता, न्यायाधीश व मित्र असें देवाचें निरनिराळें रूप निरनिराळया लोकसमाजांत आढळतें. इस्त्रायल समाजांत वरील त्रयींची ( निर्माता-पिता-शासनकर्ता ) कल्पना आहे.

या परमेश्वराच्या पूजेचे प्रकारहि हळू हळू सुधारत गेले. भूतपिशाच्चयांनां ज्याप्रमाणें बळी देतात त्याप्रमाणें देवास नरबळी व प्राण्यांचा बळी देण्याची चाल प्राचीन समाजांत होती. त्यानंतर यज्ञयागादि क्रियेने त्यानां संतुष्ट करण्याचा प्रघात पडला व पुढें नुसत्या प्रार्थना प्रचारात आल्या.

अरबी ( मुसुलमानपूर्व ), असुरी, बाबिलोनियन, ख्रिस्ती, बौद्ध, केल्टिक, चिनी, इजिप्शियन, ग्रीक, हिब्रू, हिंदु, इराणी, जपानी, ज्यू, मिश्र, मुसुलमान, रोमन, स्लाव्ह, ट्युटानिक आणि वैदिक इत्यादि लोकसमाजांच्या देवविषयक कल्पना काय होत्या त्याबद्दलची माहिती त्या त्या नांवाखालीं आली असल्यानें ती येथें दिला नाहीं. याशिवाय 'देव' व 'देवक' पहा.

**परलकोट जमीनदारी**--मध्यप्रांत. बस्तर संस्थानांतील उत्तरेकडील जमीनदारी. क्षेत्रफळ ६४० चौरस मैल. लोकसंख्या सुमारें ६ हजार. यांतील १६५ गांवांपैकीं ९८ उजाड आहेत. मुख्य गांव परलकोट आहे. जमीनदारीचा सारा ८३६ रुपये आहे.

**परवर**—ही एक फार नाजूक राजमान्य भाजी आहे. ही तोंडल्याच्या जातींतील आहे. महाराष्ट्रांत कोठेंहि हिची लागवड नाहीं. वडोद्याच्या आसपास कांहीं ठिकाणीं हिची लागवड करतात. उत्तरहिंदुस्थान व बंगाल्यांत विशेष लागवड आहे. परवराचीं फळें लहान तोंडल्याएवढीं असतात व त्यांची भाजी तोंडल्यासारखीच करतात. ही भाजी आजाऱ्यास पथ्यकर आहे असें म्हणतात. परवराच्या वेलाचे बुंधे, तोंडल्याप्रमाणें अगर नागवेलांप्रमाणें अनेक वर्षे टिकतात. उन्हाळयाच्या शेवटीं जुने वेल छाटून टाकितात म्हणजे बुंध्यांस वसंतऋतूंत नवे धुमारे फुटतात.

**परवूर** (परूर)—मद्रास इलाख्यांत त्रावणकोर संस्थानांमध्यें याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें कोचीन-शोरनूर रेल्वेच्या एर्नाकुलम स्टेशनच्या उत्तरेस २५ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें १४हजार. एके काळीं परूरचा राजा येथें राज्य करीत होता. स. १७६२ त हें गांव कोचीनकडून त्रावणकोरकडे देण्यांत आलें. टिप्पूनें त्रावणकोरच्या दुसऱ्या स्वारींत याचा बराच नाश केला.

**परशुराम**—भृगुवंशीय जमदग्निऋषीचा पुत्र व विष्णूचा सहावा अवतार. यानें कार्तवीर्यास मारिलें तेव्हां त्याच्या पुत्रांनीं जमदग्नीचा वध केला. यामुळें परशुरामानें क्षत्रियांचा संहार करण्याची घोर प्रतिज्ञा करून त्याप्रमाणें २१ वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली पुढें दाशरथी रामानें याचें तेजोहरण केलें कोंकण प्रांत यानें वसविल्याचें सांगतात. परशुरामाच्या नांवानें एक शक सुरू आहे. त्याचें पहिलें वर्ष शालिवाहन शकापूर्वी १२५२ हें आहे. रा. वि. का. राजवाडे हे परशुराम हा पर्शु (अर्वाचीन पारसिक) राष्ट्रांतील वीर होता असें विधान करतात ( भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलनवृत्त )

**परशुराम**--एक महाराष्ट्रीय शाहीर. हा जातीचा शिंपी; नाशीक जिल्ह्यापैकीं सिन्नर तालुक्यांतील वावीचा रहाणारा. गंगथडी प्रांतात याची ख्याति आहे. याच्या कवनावर जुन्या कवींची छाप दिसते. विठोबा खत्री म्हणून याचा लावण्यांचा गुरू होता पौराणिक आख्यानें, मल्हारराव होळकर, खंडेराव होळकर, गायकवाड वगैरे ऐतिहासिक व्यक्तींवर ( मुंबईकर इंग्रजांवरहि एक ) याच्या लावण्या व पोवाडे आहेत. याशिवाय शृंगारिक व बैठकीच्याहि लावण्या आहेत. त्याचा स्वतःचा तमाशा असे. तो घेऊन तो हिंडे व त्यांत स्वकृत कवनच म्हणे. पैशाची त्यानें फारशी पर्वा केली नाहीं. एकदां कोपरगांवीं रावबाजींचा मुक्काम असतां, त्रिंबकजी डेंगळ्यानें याची हजिरी श्रीमंतांपुढें लाविली तेव्हां त्यांनीं खूप होऊन त्यास इनाम देण्याचें ठरविलें, परंतु 'माझ्या सुईदोऱ्याला हयाती असो' असें म्हणून त्यानें तें घेण्याचें नाकारलें. बाबा देवपूरकर हा त्याचा मोक्षगुरु होता, त्याच्यापुढें मात्र तो लावणी म्हणत नसे. शेवटच्या दुखण्यांत त्यानें आसपासच्या सर्व शाहिरांस त्यांच्या तमाशासह बोलावून आणून जलसा करविला व त्यांत आपणहि शेवटची लावणी म्हटली. नंतर उदईक आम्ही मरणार तरी आमच्यापुढें (नाच्या) पोऱ्यावर साज घालून तुम्ही चालावें असें त्यानें सांगितलें. त्याप्रमाणें तो दुसऱ्या दिवशीं मेल्यावर त्याची ही इच्छा तृप्त करण्यांत आली. [ कविचरित्र; महा. सारस्वत ]

**परशुरामभाऊ पटवर्धन**—हा सवाईमाधवराव पेशवे यांच्या कारकीर्दींतील मराठी सेनापति होता. याचें मूळचें गांव रत्नागिरी जिल्ह्यांतील कोतवडें. मूळ पुरुष हरिभट असून यानें पुण्याच्या गणपतीजवळ १२ वर्षे दूर्वारस पिऊन अनुष्ठान केलें. त्यास ७ पुत्र झाले; त्यांचाच विस्तार सांप्रतच्या दक्षिणमहाराष्ट्रांतील पटवर्धन संस्थानिकांचा

होय. हरिभट हे घाटावर आल्यानंतर इचलकरंजीकरांचे उपाध्याय बनले. हरिभटाचा सहावा पुत्र रामचंद्रपंत व त्यांचे पुत्र परशुरामभाऊ होत. रामचंद्रपंत हे पुण्यास पेशव्यांजवळ असत व स्वाऱ्याशिकारीस त्यांच्याबरोबर जात. त्यांचा पराक्रम पाहून थोरल्या बाजीरावानें त्यांना अडीच हजार स्वारांचे पथके केले. माळव्याची स्वारी (१७३५) व वसईची मोहीम (१७३९) यांत पंतानें पराक्रम गाजविला होता. त्यामुळें वसई किल्ल्याची फडणविशी त्यांना मिळाली. पुढें उत्तरेकडील एका स्वारींत भागिरथीकांठीं शिवपुरास पंत वारले (१७४३) परशुरामभाऊचा जन्म १७३९ सालीं झाला बाप वारल्यावर मग भाऊंची मुंज झाली; बापाचे पथक त्यांच्यामागें भाऊकडे आलें. तेव्हां भाऊ लहान म्हणून पुरुषोत्तम दाजी पटवर्धन हे कारभार पहात असत दमाजी गायकवाडाच्या साताऱ्यावरील स्वारींत हें पथक होतें (१७५१). सावनूर (१७५५-५६)च्या मोहिमेंत भाऊ प्रथम लढाइवर गेले. मुख्य सरदारी गोपाळराव पटवर्धन करीत असत. ते निजगलच्या लढाईनंतर (१७७०) थोड्याच दिवसांनीं वारले; मरणापूर्वी त्यांनीं भाऊंस माझें नांव तूंच रक्षण कर असें सांगितलें होतें. त्यानंतर भाऊंस सरकारचाकरी करण्यासाठीं नेहमीं पुण्यास राहावें लागे व मोहिमेवर जावें लागे हैदरावरील एका स्वारींत भाऊंची एकामागून एक अशीं तीन घोडीं मेलीं, तरीहि भाऊनीं शौर्य गाजवून हैदराचा पराभव केला. त्यामुळें पेशव्यानीं त्यांना वीस हजाराची तैनात दिली. पुढें १७७६ सालच्या पावसाळ्यानंतर पुन्हां भाऊंस हैदरावर पाठविलें होतें; परंतु त्यावेळीं त्यांचा मदतनीस निजामाचा सरदार धौंशा यानें हैदराकडून लांच खाऊन लढाईचा मामला बिघडविला, त्यामुळें भाऊ परत फिरले. बारभाईंचें कारस्थान सुरु होण्यापूर्वी दादासाहेबांच्या निजामावरील स्वारींत भाऊ दाखल होते. गंगाबाईस पुण्याहून काढून मिरजेस नेण्याचा भाऊंचा बेत होता पण तो जुळलें नाहीं (१७७३). पटवर्धनी फौजेवर भाऊंची मुख्य सरदारी १७७७ सालीं सुरू झाली. १७८० सालचा दसरा झाल्यावर, कोंकणप्रांतांचें इंग्रजांपासून संरक्षण करण्याकरितां ज्या सरदारांची रवानगी झाली, त्यांत भाऊहि होते. १७८१ सालच्या आरंभीं इंग्रज सेनापति गॉडर्ड यानें बोरघाट काबीज करून मुख्य सैन्यास खंडाळा येथें पाठविलें व तो स्वतः खोपवली येथें राहिला. तेव्हां भाऊनीं कोंकणांत उतरून गॉडर्डच्या सैन्यास अतिशय त्रास देऊन व त्यानें मुंबईशीं असलेलें दळणवळण बंद पाडून त्याचा पुरा पराभव केला, व त्यास पिटाळून लाविलें. यावद्दलची वरीचशी माहिती नाना फडणवीस या नांवाखालीं आली आहे. १७८५ सालीं टिप्पूनें नरगुंदकर देसायावर आपलें सैन्य पाठविलें, तेव्हां भाऊ व गणेशपंत बेहरे हे देसायास कुमक करण्याकरितां गेले. देसाई हा पटवर्धनांच्या आप्तांपैकींच असल्याकारणानें भाऊ त्याला मदत करण्यास विशेष उत्सुक होते. परंतु नाना फडणविसाची तूर्त टिप्पूशीं लढण्याची इच्छा नसल्यामुळें मराठ्यांची टिप्पूशीं तडजोड झाली व भाऊ पुण्याकडे परतले परंतु तिकडे टिप्पूनें लगेच तह मोडून नरगुंदकराचें पारिपत्य केलें.

या प्रकरणीं नानानीं आपणांस देसायास कुमक करण्याच्या कामीं अडथळा केल्यामुळें देसाई टिप्पूच्या विश्वासघातास बळी पडून सर्वस्वीं नागावला गेला या गोष्टीचा भाऊंस फार राग आला, म्हणून त्यांनीं टिप्पूवरील पुढील मोहिमेच्या प्रसंगीं उदासीनपणा धरला व कांहीं तरी सबब काढून ते स्वतः मोहिमेंत हजर राहिले नाहींत. दोस्तांच्या श्रीरंगपट्टणावरील स्वारींत २५००० सैन्यासह टिप्पूच्या उत्तरेकडील मुलुखावर चालून जाण्यासाठीं तारीख ५ मे सन १७९० रोजीं भाऊ पुण्याहून निघाले. या मोहिमेची समग्र हकीकत ज्ञा. को. च्या १४ व्या भागांत टिप्पू सुलतान या नांवाखालीं आली आहे. पुढें टिप्पूशीं तह होऊन (१७९२ मार्च) दोस्तांचीं लष्करें आपापल्या मुलुखाकडे जावयास निघालीं, तेव्हां इंग्रजांनीं मराठ्यांना नजर केलेल्या १७ मोठमोठ्या तोफा भाऊंबरोबर देण्यांत आल्या होत्या. खर्ड्याच्या (१७९५) लढाईत पटवर्धनाचें ७ हजार सैन्य होतें, व स्वतः पटवर्धन मराठ्यांच्या सर्व लष्कराचे मुख्य सेनापति होते. या लढाईत एके प्रसंगीं भाऊ जखम लागून खालीं पडले असता त्यांचा वडील पुत्र हरिपंत यानें मोठ्या शौर्यानें लढून बापाचा जीव वांचविला (खर्ड्याची लढाई पहा). सवाईमाधवरावास अपघात होतांच नानानीं पुण्यास तातडतोब निघून येण्याविषयीं भाऊंस निरोप पाठविला (१७९५). आपण ठरविलेला दत्तकाचा बेत हाणून पाडून रावबाजीस मसनदीवर बसविण्याचा दौलतराव शिंद्याचा विचार आहे असें नानांस समजतांच त्यांनीं पुन्हां निकडीनें बोलावणें पाठविलें भाऊहि अवघ्या ४८ तासांत १२० मैलांची मजल करून फौजेसह पुण्यास येऊन दाखल झाले. तेथें नानांच्या व त्यांच्या विचारें शिंद्यापूर्वी आपणच रावबाजीस गादीवर बसवावें असें ठरल्यामुळें ते जुन्नरास गेले, व रावबाजीस पुण्यास घेऊन आले (१७९६). या व पुढील प्रसंगाची विस्तृत हकीकत नाना फडणवीस यांच्या नांवाखालीं पहावी.

रावबाजीस नानानीं आणल्यावर शिंदा सैन्य घेऊन पुण्याकडे यावयास निघाला. तेव्हां भाऊनीं शिंद्यांशीं लढाई देण्याचा नानांस सल्ला दिला. पण नाना घाबरले व भाऊंस रावबाजीजवळ ठेवून आपण पुण्याहून चालते झाले (१७९६). धाकट्या चिमाजीआप्पास यशोदाबाईस दत्तक देऊन कारभार तुम्हीं करावा असें बाळोबा तात्यानें भाऊंस म्हटलें, तेव्हां त्यांनीं नानांचा सल्ला विचारला. रावबाजीस आपल्या ताब्यांत घेऊन मग ही गोष्ट करावी असें नानानीं मत

दिलें. परंतु भाऊनीं नानांचें ऐकलें नाहीं व चिमणाजीस मसनदीवर बसवून रावबाजीस मात्र आपल्या ताब्यांत घेतलें नाहीं. चिमणाजीकरितां पेशवाईचीं वस्त्रें स्वतः नानानींच छत्रपतीपासून मिळविलीं व तीं घेऊन तें स्वतः पुण्यास आले असते, परंतु भाऊनीं रावबाजीस आपल्या ताब्यांत घेतलें नाहीं असें पाहून त्यांचें मन भाऊंविषयीं साशंक झालें.

इकडे भाऊहि नानांच्या विरुद्ध गेले. ज्या नानांनीं भाऊंस योग्यतेस चढविलें तेच भाऊ अखेर नानांवर उलटले. त्यांच्या चरित्रावर हा एक मोठा कलंक आहे. भाऊनीं नानांना धरण्याकरितां साताऱ्यास धरणें पाठविलें. तेव्हां नाना वाईस गेले. तेथेंहि फौज गेल्यानें ते महाडास गेले. पावसाळ्यामुळें भाऊंच्या फौजेचा लाग लागला नाहीं. इकडे भाऊनीं नानांची सर्व जहागीर व वाडे जप्त केले पुढें नानांचें महाडचें कारस्थान फलद्रूप होऊन भाऊ कैद झाले व नाना पुण्यास येऊन कारभारी होऊन रावबाजी पेशवे (१७९६) झाले (नाना फडणवीस पहा). भाऊंस आनंदराव रास्त्यानें संभाळण्याची हमी घेतली व त्यानें नगर व मांडवगण येथील किल्ल्यांत कैदेंत ठेविलें (१७९८). माधवराव रास्त्यास साताऱ्च्या महाराजांच्या लोकांनीं साताऱ्याजवळून हांकून लाविलें, व कोल्हापूरकराशीं मिसळून दंगा उभारला. तेव्हां १५ लक्ष रुपयाचा जबर दंड घेण्याचें ठरवून पेशव्यानीं भाऊंस कैदेंतून सोडविलें व दंगा मोडण्यावर त्यांची नेमणूक केली (१६ जून). तेव्हां भाऊनीं रास्त्याच्या मदतीनें १० हजार फौज उभी केली; व भर पावसाळ्यांत महाराजांच्या सैन्यावर वेणा नदी उतरून अचानक हल्ला केला व पुन्हां पूर्वीप्रमाणें किल्ला काबीज करून सर्व स्थिरस्थावर केलें. यानंतर रावबाजीनें फौज कमी करण्याची गोष्ट काढली. परंतु फौजेचा पगार द्यावयास पैसा नाहीं अशा सबबीवर भाऊनीं टाळाटाळ केली. पुढें १७९९ सालीं उन्हाळ्यांत इंग्रजांचें टिपूशीं जें युद्ध झालें त्यात इंग्रजांना मदत करण्याकरिता मराठी सैन्यावर भाऊंची नेमणूक झाली. तेव्हा नाना व भाऊ यांचा सलोखा होऊन असें ठरलें कीं, भाऊंस दंडाची रक्कम माफ करून धारवाड व दुसरीं कर्नाटकांतील कित्येक ठिकाणें जहागीर द्यावीं व भाऊनीं धोंडोपंत गोखले, रास्ते, विंचूरकर व दुसरे ब्राह्मण यांच्या फौजा घेऊन इंग्रजांच्या तुकडीसह टिप्पूशीं लढण्यास जावें. पण पुढें रावबाजी दौलतरावाच्या सल्ल्याप्रमाणें चालल्याकारणानें लढाईवर जाण्याचें कारण पडलें नाहीं. यापुढें भाऊनीं बाळोबा तात्याचा व नानांचा समेट करून दिला.

याच सालच्या (१७९९) पावसाळ्यात भाऊंस कोल्हापुरकराचा पुंडावा मोडवून धरण्याचें काम सांगण्यांत आलें. कोल्हापुरकर भाऊंच्या मुलुखास अलीकडे बराच उपद्रव देत होते. कांहीं दिवसांपूर्वी तर त्यांनीं तासगाव लुटून, तेथें भाऊनीं बराच खर्च करून बांधलेला नवीन वाडा जाळून फस्त केला होता. भाऊंचें व त्यांचें पुष्कळ दिवसांचें हाडवैर होतें. वरील कृत्यांनीं भाऊंस इतका त्वेष आला होता कीं, वृद्धापकाळामुळें त्यांची शक्ति क्षीण होत चालली होती, तरी त्यांनीं सर्व पावसाळाभर कोल्हापूरकरांशीं युद्ध चालू ठेवून घटप्रभा व मलप्रभा ह्या नद्यांमधील ठाणीं परत घेतलीं.

या सुमारास पटवर्धन घराण्यांत गृहकलहास प्रारंभ झाला (जून). गंगाधरराव मिरजकर व चिंतामणराव सांगलीकर यांचें भांडण जोरांत सुरू झालें. भाऊनीं केलेली मध्यस्थी गंगाधररावानें मान्य केली नाहीं, म्हणून चिंतामणरावानें आपलें पथक घेऊन भाऊंचा गोट सोडला (जुलै) व तो मिरजकरांचीं ठाणीं घेत चालला. कुरुंदवाडकर व मिरजकर हे आंतून करवीरकरांशीं सामील झाले होते. त्यामुळें त्यांनीं कोणीहि भाऊंस मदत केली नाहीं. यावेळीं भाऊंच्या फौजेची फार हलाखी झाली होती; साऱ्या दोन तोफा त्यांच्याबरोबर होत्या. खुद्द भाऊंची प्रकृतीहि बरी नव्हती व सैन्याच्या हालचाली बहुधा त्यांचा मुलगाच करी. त्याला अद्यापि लष्करी धोरण चांगलेसें समजलें नव्हतें. शेवटीं पट्टणकुडी येथें भाऊंचा मुक्काम पडला असतां त्यांच्यावर कोल्हापूरकर एकदम चालून आले. भाऊनीं त्यांना अंगावर घेऊन मग हल्ला करण्याचें ठरविलें, परंतु पुढें गोंधळ उडाला. रामचंद्र आप्पा याने लढाईत आघाडीवर चांगला पराक्रम गाजविला. पण तो जखमी झाल्यानें फौज फुटली. तेव्हां कोल्हापुरकरांनीं तिचा पाठलाग केला. त्यावेळीं भाऊ आजारी असताहि त्यांनीं शत्रूस अडथळा केला. त्यांत त्यांना तीन जखमा होऊन ते एकाएकीं घोड्याखालीं आले व शत्रूच्या हातीं लागले. अशा वेळीं त्यांच्या सोबतीचे सर्व लोक पळून गेले होते. आसन्नमरणावस्थेंत भाऊंना कोल्हापूरच्या महाराजांपुढें नेलें असतां, त्यांनीं भाऊंस ठार मारण्यास सांगितलें व त्याप्रमाणें भाऊंचा शेवट झाला. खरेशास्त्री म्हणतात " भाऊ जखमांनीं घायाळ होऊन आपोआपच मृत्युपंथास लागले होते, असें असता महाराजांनीं त्यास मुद्दाम मारवून दुष्कीर्ति संपादन केली " (१७ सप्टेंबर, १७९९). [खरे—ऐ. ले. संग्रह, भा. ७–११; हरिवंशबखर; सवाई माधवरावाची रोजनिशी; डफ; पेशव्यांची बखर; नाना फडणविसाचें चरित्र.]

**परसगड किल्ला**—मुंबई इलाखा, बेळगांव जिल्हा. सौंदत्तीच्या दक्षिणेस सुमारें एक मैलावर हा किल्ला आहे. इ. स. १६७४ मध्यें शिवाजीनें हा किल्ला बांधला. इ. स. १७४६ मध्यें हा किल्ला मराठ्यास सावनूरच्या नबाबास दोन भाग पडले परंतु इ. स. १७५६ मध्यें तो परत सावनूरच्या नबाबास द्यावा लागला.

**परसा भागवत**—याला परिसा भागवत असेंहि म्हणतात. हा जातीचा ब्राह्मण असून पंढरपूरचा राहणारा होता. हा मोठा भगवद्भक्त असे. परसा भागवताचें नामदेवाच्या ठिकाणीं फार प्रेम होतें. नामदेवाच्या कथेंत याचा उल्लेख येत असतो. यानेंहि कांहीं पदें केलीं आहेत.

**परसुर,** ता लु का व गां व.—पंजाव प्रांतांत सियालकोट जिल्ह्याचा मध्य तालुका. क्षेत्रफळ ३९४ चौरस मैल. लोकसंख्या ( १९०१ ) १९३७४६. मुख्य ठिकाण परसुर. किलासोभासिंग हें दुसरें मोठें गांव आहे. खेड्यांची संख्या ४४३. परसुर गांव सियालकोट--अमृतसर रस्त्यावर सियालकोटच्या दक्षिणेस १८ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें ८०००.या गांवच्या संस्थापकानें तें परशुराम नांवाच्या ब्राह्मणाला इनाम दिलें होतें; त्यावरून याच्या पूर्वी परसुर असें म्हणत. या गांवांत जहांगीरच्या वेळचें एक मोठें तळें आहे. येथें हातानें वेलबुट्टी काढलेलें सुती कापड तयार होतें.

**परळी**—उर्फ सज्जनगड. हा किल्ला सातारा जिल्ह्यांत साताऱ्यापासून ५ मैलांवर असून येथें समर्थ रामदासस्वामी यांची समाधि आहे. हा किल्ला भोजशिलाहारानें बांधला असें म्हणतात.

**परळी वैद्यनाथ**—हैद्राबाद संस्थान, बीड जिल्ह्यामध्यें अंबा तालुक्यांतील एक गांव. परभणीपासून चवदा कोस दक्षिणेस किंवा अंबाजोगाईपासून सात कोस ईशान्येस हें क्षेत्र आहे. तेथें गांवाबाहेरच जगमित्रनागाचें स्थान व रामाचे तीन मठ आहेत. काळ्या रामाच्या देवालयांत एका खांबावर पत्रा असून त्यावर लेख कोरला आहे.

बारा ज्योतिर्लिंगांपैकीं येथील वैद्यनाथ हें एक ज्योतिर्लिंग असून त्याचें देवालय प्रचंड आहे. भोंवतालीं मार्कंडेय, हरिहर इत्यादि मोठमोठालीं तीर्थें आहेत.पेशव्यांनीं या गांवाच्या समस्त ब्राह्मणांनां ४४ चाहूर जमीन ( ५२८० विघे ) इनाम दिलेली आहे. वैद्यनाथाच्या देवालयांत एक शिलालेख आहे. शके १७०६ मध्यें अहिल्याबाईनें या मंदिराचा जीर्णोद्धार केला. [ भा. इ. सं. मं अहवाल १८३४. ]

**पॅराग्वे**—दक्षिण अमेरिकेंतील एक प्रजासत्ताक राज्य. हें द. अ. २०° १६' ते २६° ३१' आणि प. रे. ५४° ३७' ते ६२° यांच्या दरम्यान आहे. याच्या वायव्येस बोलिव्हिया; उत्तरेस व पूर्वेस ब्राझिल, आग्नेय, दक्षिण व पश्चिम या बाजूंस अर्जेन्टिना आहे. लोकसंख्या सुमारें दहा लाख असून तींत ग्वारानी इंडियन अधिक आहेत. क्षेत्रफळ ६५ हजार चौरस मैल आहे.

स्वा भा वि क र च ना.—पॅराग्वे नदी उत्तरेकडून दक्षिणेकडे वहात जाऊन या देशाचे तिनें दोन भाग केले आहेत; पैकीं पूर्वेकडचा अथवा पूर्व पॅराग्वे हा फार महत्त्वाचा आहे. पश्चिमेकडील भाग ग्रॅन चाको नांवाच्या मोठ्या मैदानाचा विभाग असून याचा बऱ्याच अंशीं शोध लागलेला नाहीं. मुख्य पॅराग्वे अथवा पॅराग्वे व पाराना या नद्यांमधील प्रदेशांतून कॉर्डिलेरा अम्बाया, कॉर्डिलेरा युरुकुरी, वगैरे उंचवट्याची पट्टी गेली आहे व ब्राझिलमधील डोंगरपठाराचाच हा एक भाग आहे. असन्शन डोंगरपठारापासून दक्षिणेस पॅराग्वे व पाराना नद्यांच्या संगमापर्यंत दलदलीचा विस्तीर्ण प्रदेश आहे. दलदलीचे प्रदेश व नदीकांठचा प्रदेश खेरीजकरून जमीन कोरडी, निचऱ्याची व वालुकामय आहे.

भू स्त र व र्ण न.—या देशाची भूस्तरविषयक माहिती फार थोडी आहे. या देशाचा बराच भाग क्वाटेर्नरी थरांनीं आच्छादिलेला आहे. टेंकड्या व डोंगरपठार गारेच्या दगडांचे बनलेले आहेत.

ख नि ज प दा र्थ.—सोन्याच्या खाणी जेसुईट लोकांनीं बुजवून टाकल्या असें म्हणतात पण त्या अजिबात नसाव्यात हेंच खरें दिसतें. लोखंड लोपेझला इविकुई येथें सापडलें होतें. तांबें, मॅंगेनीज आक्साइड, संगमरवरी दगड, चुना व मीठ सांपडतें; परंतु या देशाची खरी संपत्ति म्हटली म्हणजे येथें उत्पन्न होणाऱ्या वनस्पती होत.

ह वा व प्रा णी.—या देशांत वर्षांतून उन्हाळा व हिंवाळा असे दोनच ऋतू येतात. उन्हाळा आक्टोबरपासून मार्चपर्यंत, व हिंवाळा एप्रिल ते सप्टेंबरपर्यंत असतो. सरासरी ४६ इंच पाऊस दरवर्षी पडून सर्व वर्षभर सारखा पडत असतो. उत्तरेकडून व दक्षिणेकडून वारे वाहत असतात. वादळें दक्षिणेकडून बहुशः वाहत असतात.

या देशांत ब्राझिलप्रमाणेंच प्राणी सांपडतात. कायमन, वॉटरहॉग, निरनिराळ्या प्रकारचीं हरिणें, औंस, ओपोसम, आर्माडिलो, व्हाम्पायर, अमेरिकन शहामृग, इबिस, जाबिरु, पार्ट्रिज, बदक, पोपट वगैरे प्राणी येथें आढळतात. येथें किडे विपुल आहेत. या देशांत तांबडी मुंगी विशेषेंकरून आढळते, व मधमाशा खेड्यांतून पाळलेल्या असतात.

लो क सं ख्या.—येथील बरेच लोक इंडियन (ग्वारानी) लोकांचे वंशज आहेत.त्यांच्यांत सुधारणा फार झालेली नाहीं. साधारणपणें पॅराग्वेचे लोक विशेषतः पुरुष आळशी असतात. हवामानाप्रमाणें विशेष कपडे घालण्याची गरज नसते. कापसाच्या कापडाचा सदरा (चेमिस) व पांढरा फेटा ( मांटा ) मूर लोकांप्रमाणें गुंडाळलेला असतो. हाच बायकाचा पोषाख होय; कापसाच्या कापडाचें शर्ट व पायजमा हा पुरुषांचा पेहराव होय. फक्त वरिष्ठ प्रतीचे लोक जोडे व बूट वापरतात. गळ्यांतील ढालेसारख्या गांठीची वाढ व रक्तपिती हे मुख्य रोग आहेत; परंतु एतद्देशीयांनां हगवण व अपचन हे रोग होतात. या देशांतील भाषा ग्वारानी आहे,तरी कांहीं भागांत टुपी भाषा बोलतात. येथील व्यापाराच्या ठिकाणाजवळ राहणाऱ्या लोकांनां थोडीशी स्पॅनिश भाषा समजते. असन्शन ( राजधानी ), व्हिलारिका, कन्सेप्शन, व व्हिलाडेलपिलर हीं मोठीं शहरें आहेत. पाराना नदीवरील एन्कारनॅशन या शहरीं ने आणीचा व्यापार चालतो.

रा ज्य व्य व स्था.—कायदे करण्याची सत्ता कार्यकारीसभा (सिनेट) व प्रतिनिधिसभा(चेंबर ऑफ डेप्युटीज) यांच्या बनलेल्या एका शासनसंस्थेच्या हातीं असते. प्रत्येक १२००० लोकांस एक सिनेटर व प्रत्येक ६००० लोकांस एक डेप्युटी निवडतात. कॅाँग्रेसच्या प्रत्येक मेंबरला दरमहा ३००० डॉलर

पगार मिळतो. कार्यकारीमंडळाचा मुख्य अध्यक्ष असतो. याला मतदारसंघ चार वर्षांपुरतें निवडतें. याच्या मदतीस कॉंग्रेसला जबाबदार अशा पांच मंत्र्यांचें एक मंडळ असतें. जर अध्यक्ष मुदत संपण्याच्या अगोदर मेला अगर अन्य कारणांमुळें काम करूं शकत नसला तर त्याच्या जागीं उपाध्यक्ष निवडतात. न्यायखात्यांतील मुख्य सत्ता वरिष्ठ कोर्टाकडे आहे. या कोर्टाला कॉंग्रेसनें पास केलेले कायदे सनदशीर आहेत किंवा नाहींत याचा निर्णय करण्याचा अधिकार असतो. या कोर्टाचे तीन सभासद अध्यक्षाच्या संमतीनें कॉंग्रेसनें चार वर्षांकरितां नेमलेले असतात. पांच अपील कोर्टें व शहरांतून हलक्या प्रतीचीं कोर्टें आहेत. अर्जेन्टिनाचे दिवाणी व फौजदारी कायदे कांहीं एक फरक न करतां उपयोगांत आणतात. राज्यकारभाराच्या सोईकरितां या देशाचे तेवीस विभाग ( कौंटी ) व पोटविभाग (कॅम्यून) केलेले आहेत.

ध र्म व शि क्ष ण.—रोमन कॅथोलिक पंथ हा येथील धर्म आहे. परंतु कायद्यानें सर्व धर्मपंथानां स्वातंत्र्य मिळालें आहे. येथील शिक्षण मागसलेलें आहे; याकडे फार दिवसांचें दुर्लक्ष्य होतें. कायद्यानें शिक्षण मोफत व सक्तीचें आहे; परंतु बऱ्याच जिल्ह्यांतून मुलें शाळेंत येत नाहींत. स १९१७ मध्यें प्राथमिक शिक्षणाच्या शाळा १०४६ असून शाळेंत जाणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या ६२६५७ होती. येथें एक विश्वविद्यालय व पांच कॉलेजें आहेत. राष्ट्रीय ग्रंथालय, राष्ट्रीय दप्तर, पदार्थसंग्रहालय, वनस्पति-प्राणि-संग्रहालय हीं सरकारच्या देखरेखीखालीं आहेत.

रा ज्य र क्ष ण.—घोडदळ, पायदळ, व तोफखाना मिळून २५०० लोकांचें सैन्य असून आरमारहि आहे.

ज मा खं र्च.—या देशाला इंग्लंड, ब्राझिल, अर्जेन्टिना वगैरे देशांचें कर्ज देणें आहे, शिवाय देशांतर्गत कर्जहि आहे. आयात मालावरील जकात हीच उत्पन्नाची बाब आहे, व सरकारी, लष्करी, शाळाखात्यांतील लोकांचे पगार देणें व कर्ज फेडणें या खर्चाच्या बाबी आहेत. १९१५ सालची जमा ११०५९११ पौंड असून खर्च १०७१३३२ पौंड होता.

उ द्यो ग धं दे.—शेती, येर्बाम टी ( पॅराग्वे-चहा ) बनवणें, गुरें पोसणें, फळें पिकविणें, तंबाखू लावणें व इमारती लांकूड तोडणें हे मुख्य धंदे आहेत. ब्युनॉस आरीस, रोझॅरिओ व मॉटेव्हिडिओ या शहरीं नारिंगें पुष्कळ पाठवितात. येथील जंगलांत क्रेब्रेचो, सिडर, कुरुपे, लॅपॅचो व उरुंडे वगैरे झाडें विपुल आहेत. पंधरा वनस्पतींपासून रंग तयार होतात व आठांपासुन सूत निघतें. रम, साखर, विटा, कमावलेलें कातडें, सामान व मांसाचा अर्क येथें तयार करतात.

व्या पा र.—विणलेलें कापड, लोखंडी सामान, दारू, तांदूळ, कणीक, टीनच्या डब्यांत घातलेले पदार्थ व इतर खाण्याचे जिन्नस बाहेर देशांतून येथें येतात; व येर्बाम टी, चामडें, केंस, सुकविलेलें मांस, लांकूड, नारिंगें व तंबाखू हीं बाहेरदेशीं रवाना होतात.

द ळ ण व ळ णा चे मा र्ग.—महासागरांत चालणाऱ्या असंख्य बोटी ब्राझिल व अर्जेन्टिना या देशाच्या आहेत. नद्यांतून लहान जहाजें जातात. पॅराग्वे "सेंट्रल रेल्वे" हीच मुख्य रेल्वे आहे या रेल्वेनें असन्शन शहर एन्कारनॅशनला जोडलें आहे. पॅराग्वे युनिव्हर्सल पोस्टल युनिअनमध्यें १८८४ सालीं सामील झालें. या संस्थानांत पांच मोठ्या बँका आहेत. सोन्याचें किंवा चांदीचें चलन प्रचारांत नाहीं. मात्र कांहीं निकल नाणीं आहेत. नोटा हेंच सार्वत्रिक चलन आहे.

इ ति हा स.—१५२७ सालीं सेबास्टियन कॅबट पॅराग्वेला आला व त्यानें येथें सँटो इस्पिरिटु नांवाचा किल्ला बांधला. सं. १५३५ मध्यें असन्शन वसविण्यांत आलें, येथून स्पॅनिश लोक पॅराग्वेच्या पूर्वेस पाराना नदीच्या पलीकडे गेले. स.१७७६ पर्यंत ब्युनॉसआरीस आणि पॅराग्वे हे एका व्हाइसरायाच्या हातीं देण्यांत आले १५४२ ते १५६० या काळांत येथें पांच ख्रिस्ती मिशनें स्थापन करण्यांत आलीं. १७५० मध्यें स्पेनच्या सहाव्या फर्डिनंड राजानें लाग्वेरा जिल्हा पोर्तुगीज लोकांना दिला. जेसुइट लोकांनीं या गोष्टीस प्रतिकार केला पण स्पेन व पोर्तुगॉल यांच्या संयुक्त सैन्यानें जेसुइटांचा पराभव केला,व स.१७६९मध्यें त्यांनां हांकून लाविलें. १८११ मध्यें पॅराग्वे स्पेनपासून स्वतंत्र झालें. स. १८१४ त डॉ. फ्रँकिआच्या हाताखालीं हा प्रांत होता. याच्या मागून याचा पुतण्या कार्लोस अन्टोनिओ लोपेझ व नंतर त्याचा मुलगा फ्रान्सिस्को लोपेझ हे एकतंत्री अधिकारी झाले. सं. १८६४ त लोपेझ व ब्राझिल सरकार यांच्यांत भांडण उपस्थित झालें. ही लढाई पांच वर्षेंपर्यंत चालली. या लढाईत पॅराग्वेचे बरेच लोक मारले गेले.

लोपेझच्या मरणानंतर येथील राज्यकारभार सिरिलो रिव्हॅरोला, कार्लोस लोइझागा, जोसेडिआझ डेबेडोझा या त्रयीनें चालविला; अखेरीस स.१८७०त सध्यांची राज्यपद्धति स्थापित झाली. पॅराग्वे खालसा करण्याचें ब्राझिलचें कांहीं कालपर्यंत धोरण होतें, परंतु ब्राझिल व अर्जेन्टिना यांच्यामधील मत्सरानें पॅराग्वेला स्वतंत्र राहता आलें. स.१८७० नंतर कांहींच घडामोड झाली नाहीं. फक्त १८८१, १८९४ व १८९८ त कांहीं राज्यक्रांतिकारक बंडें झालीं होतीं. परंतु देशाच्या भरभराटीला धोका पोंचला नाहीं. प्रेसिडेंट इगुस्क्रिझा (१८९४-१८९८)च्या कारकीर्दींत बोलिव्हिआच्या सरहद्दीचा प्रश्न उपस्थित झाला, परंतु राज्यक्रांति झाल्यामुळें लढाई झाली नाहीं व प्रेसिडेंटला राजिनामा द्यावा लागला. पॅराग्वेचा अर्वाचीन इतिहास राजकारणाचा नसून आर्थिक महत्त्वाचा आहे व्यापाराची हळू हळू वृद्धि झाली, १८९५ त जमाबंदी-सुधारणा झाल्या व १९०६ नंतर "पॅराग्वे सेंट्रल रेल्वे" वाढविण्यांत आली. ह्याच महत्त्वाच्या गोष्टी १८७० पासून १९१० पर्यंतच्या काळांत घडून आल्या.

**परांतिज**—मुंबई इलाख्यांत अमदावाद जिल्ह्याचा एक तालुका. ह्यांत मोडासा पेट्याचा समावेश होतो. क्षेत्रफळ ४४७ चौरस मैल. यांत परांतिज व मोडासा हीं दोन मोठीं गांवें व १४९ खेडीं आहेत. लोकसंख्या (१९०१) ८०५४४६. परांतिज गांवाची लोकसंख्या ८ हजारांवर आहे.

**पराया**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक अस्पृश्य जात. 'पराय' (=ताशा, नगारा) या तामिळ शब्दापासून या ज्ञातिनामाची उत्पत्ति लावितात; कारण ताशेवाले याच जातीचे असतात. सर्वच अस्पृश्य जातींनां 'पराया' हें नांव देणें चुकीचें होईल. शिवाय ही जात अगदींच कनिष्ठ दर्जाची नाहीं (उदा० चांभार यांच्यापेक्षां हलके आहेत). पराया लोक शेतकी करतात. त्यांची संख्या १९११ सालीं २४४८२९५ होती. मद्रास इलाख्यांतील यूरोपीयनांजवळ बहुधा पराया नोकरच असतात; म्हणून यांची प्रसिद्धि झाली असून सामान्यतः सर्व हलक्या जातींनां चुकीनें यांचें नांव दिलें जातें. या पराया जातीला बरेच जुने हक्क आहेत. मद्रास इलाख्यांतील बहुतेक खेड्यांचे कनिष्ठ अधिकारी परायाच असतात. हे मृतांनां पुरतात, बहुतेक इतर हिंदु जातीप्रमाणें जाळीत नाहींत.

**पराशर**—एक वैदिक व पौराणिक ऋषि असून याचा वैदिक इतिहास तिसऱ्या विभागांत दिला आहे (पृ. ७१). पुराणांत हा मैत्रावरुणि व वसिष्ठाचा पौत्र व शक्ति ऋषींचा पुत्र असल्याचें सांगितलें आहे. याच्या मातेचें नांव अदृश्यंति असें होतें आपला पिता एका राक्षसानें भक्षिला म्हणून यानें राक्षससत्र सुरू करून असंख्य राक्षस जाळून भस्म केले. याला सत्यवतीपासून कृष्णद्वैपायन व्यास हा पुत्र झाला.

**पराशरस्मृति.**—एक धर्मशास्त्रावरील ग्रंथ. याचें पराशरसंहिता असेंहि दुसरें नांव रूढ आहे. मनु, याज्ञवल्क्य यांच्याप्रमाणें हा ग्रंथ बराच मोठा आहे. याचे बारा अध्याय आहेत. हा ग्रंथ व्यास--पराशर यांच्या संवादात्मक आहे. या स्मृतीच्या पहिल्या अध्यायांतच कृतयुगांत मानव, त्रेतायुगांत गौतम, द्वापारांत शंखलिखित आणि कलियुगांत पराशर या स्मृतींचा उपयोग करावा अशा अर्थाचा श्लोक (२४) आहे परंतु या स्मृतीलाच हल्लीं तसें वैशिष्ट्य नाहीं.

या स्मृतीचीं आचार व प्रायश्चित्त अशीं दोन कांडें असून अध्याय बारा आहेत. या ग्रंथावर माधव (सायण) याची टीका आहे तीस पराशरमाधवी असेंहि नांव देतात. यांतील वाक्यास बाधक अशीं वाक्यें कोणत्याहि स्मृतिग्रंथांत नाहींत असें टीकाकार माधव म्हणतो. या स्मृतीच्या पहिल्याच अध्यायांत मानव, वसिष्ठ गोतम, अत्रि, विष्णु, दक्ष, याज्ञवल्क्य इत्यादि अठरा स्मृतींचा उल्लेख आहे. या स्मृतींत आचार आणि प्रायश्चित्त यास महत्त्व देऊन व्यवहारशास्त्र अगींयात गाळलें आहे. म्हणून टीकाकार माधव यानें "व्यवहारमाधवीय" नामक ग्रंथ लिहून ती उणीव भरून काढली आहे. हा माधवाचा ग्रंथ तेलगू लिपींत छापला आहे. यांत व्यवहारशास्त्राचा सोपपत्तिक विचार केला आहे. या ग्रंथामुळें विजयानगरच्या राजकीय परिस्थितीवर चांगला प्रकाश पडतो. पराशरस्मृतींतील दान हा विषय बराच महत्त्वाचा आहे.

**परिक्रमणकंपवायु**(लोकोमोटर-अलेक्सी पृष्ठवंशपश्चाद्रज्जुधाराक्षीणता)—पृष्ठवंशरज्जूच्या मागें असणाऱ्या मज्जाधारा व इतर मज्जाख्यानें क्षीण होऊन परस्परसंबंधानुरूप व शिस्तवार स्नायूंचें चलन न झाल्यामुळें रोग्याची चालण्याची ढब व स्थिरशक्ति बिघडते. या रोगांत पुढील प्रमुख लक्षणें असतातः—रोगी चालतांना पाय भुईवर आपटल्याप्रमाणें चालतो; त्यानें डोळे मिटले कीं त्यास नीट उभें रहातां न आल्यामुळें त्याचे झोंक जातात; त्यास थोडें अंधत्व येतें व त्याची डोळ्यांतील बाहुली बारीक व न हलणारी होते. या रोगाकडे प्रथम रॉम्बर्ग या डॉक्टरानें १८५१ सालीं लक्ष्य नेलें; व १८५८ सालीं दुसऱ्या एका डॉक्टरानें शोधक बुद्धीनें याचें सविस्तर लक्षणपूर्वक उत्तम वर्णन केल्यामुळें या रोगास वैद्यकशास्त्रांत स्थान मिळालें व त्याचें मुख्य लक्षण जो 'कंप" त्यावरून त्यास वरील नामाभिधान प्राप्त झालें. पुढें १८६९ सालीं आर्गाइल राबर्टसन यानें असा शोध नजरेस आणला कीं, रोग्याची कनीनिका, जवळचे अथवा दूरचे पदार्थ पहातांना मोठी अगर बारीक होते; परंतु निरोगी माणसाच्या कनीनिकेप्रमाणें उजेडांत ती बारीक व्हावी व अंधारांत मोठी व्हावी तसें मात्र कांहीं घडत नाहीं. या एकाच लक्षणावरूनहि या रोगाचें निदान करणें सोपें जातें. या रोगाचीं अनेक व नानाविध लक्षणें किती असतात याचें ज्ञान उत्तरोत्तर जास्त होऊं लागलें आहे. यामुळें राम्बर्ग यानें दिलेलें "पृष्ठवंशपश्चाद्रज्जुधाराक्षीणता" हें नांवच यास अधिक सार्थ आहे असें मज्जाशास्त्रज्ञ लोकांस आतां वाटूं लागलें आहे. "परिक्रमण कंपवायु" ह्या संज्ञेवरून रोगांतील मुख्य लक्षणाचा बोध होतो हें जरी खरें आहे तरी तें लक्षण रोगाच्या प्रथमावस्थेंत नसतें हा त्या नांवांत मोठा दोष काढतां येण्यासारखा आहे रोगास आरंभ झाल्यानंतर पुष्कळ वर्षांनीं शरीरकंप सुरू होतो, व त्याच्या अगोदर कांहीं आकस्मिक व आगंतुक दुखणें येऊन त्यांतच रोगी मेला तर त्यास हा रोग असून कंप मुळींच नव्हता अशीं उदाहरणेंहि घडतात.

आतां बहुतांशीं हें मान्य झालेलेंच आहे कीं ज्या माणसास आनुवंशिक अगर स्वार्जित असा कोणत्याहि तऱ्हेचा उपदंशरोग झाला नसेल त्याला हा रोग होत नाहीं, व ज्यांनां हा रोग होतो त्यांनां उपदंश झाल्यापासून सरासरी दहा वर्षांच्या आंतबाहेर तो होतो. या रोगाच्या (१) पूर्वकंपावस्था, (२) कंपावस्था व (३) शय्याग्रस्तावस्था अशा तीन अवस्था असतात पहिली अवस्था कमींतकमी एक-दोन वर्षें व जास्तींत जास्त वीस अगर अधिक वर्षेंहि

असें शकने, व त्यांत नाना प्रकारचीं लक्षणें होतात; सर्दीनें हातापायांस कळा लागत आहेत असें रोग्यास वाटतें; परंतु वास्तविक या रोगामुळें एकदम चमक मारल्याप्रमाणें वेदना येतात व जातात. डॉक्टरनें त्यास तपासलें तर गुडघ्यावर आघात केला असतां जानुक्षेप मुळींच होत नाहीं असें आढळून येईल व आर्गाइल रॉबर्टसन यानें शोधून काढलेलें कनीनिकालक्षण आढळून येईल व बारीक चौकशी केली तर रोग्यास लघवीस आरंभ होण्यास अंमळ पंचाईत पडते व लघवीस लागल्यावर ती त्यास फार वेळ दाबून धरवत नाहीं व लघवी केली तरी थोडी लघवी मूत्राशयांत शिल्लक राहून मूत्राशय साफ झाल्याप्रमाणें रिक्त वाटत नाहीं, हीं लक्षणें असल्याचें समजतें. नेत्राच्या आंतील अगर बाहेरील स्नायूंत जडत्व येऊन डोळा तिरवा किंवा रोग्यास दोन दोन वस्तू दिसतात. दृष्टि मंद होऊन शेवटीं अंधत्व येतें. मधून मधून वांती होण्याची खोड लागते. आपोआप व न दुखतांहि हाडें भंग पावतात, व पुढें संभोगशक्ति कमी होत जाऊन नपुंसकत्वहि येतें. हें लक्षण झालें म्हणजे बहुधा रोगी डॉक्टरास प्रकृति दाखवितो व आपणास हा रोग झाला आहे असें त्यास कळतें. अद्याप त्यास कंप बहुधा सुरू झालेला नसतो. रोग्यास अन्य कारणामुळे मरण आलें नाहीं तर सर्व रोग्यांनां कालक्रमेंकरून द्वितीयावस्थाहि प्राप्त होतेच व व त्यामुळें त्यास अंधारांत चालतां येत नाहीं. डोळे मिटून उभे रहाण्यास त्यास सांगितलें तर त्यास झोंक जाऊन पडण्याची भीति वाटते. स्पर्शज्ञानांत बिघाड झाल्यामुळें तो भुईवर चालतांना आपण मऊ कापसावरून चाललों आहों असें त्यास वाटतें. अंग बधिर आणि मुंग्या आल्याप्रमाणें होऊन कधीं स्पर्शज्ञानच नष्ट होतें, व म्हणून वेदना, स्पर्श, शीतोष्णसंवेदन हें कांहींच कळेनासें होतें. हा चमत्कार बहुधा पावलें, पाय व चवथ्या ते सातव्या बरगडीपर्यंत असलेला छातीचा व कमरेचा भाग यापुरता असतो व म्हणून छातीभोंवतीं पट्टा बाधला आहे असा रोग्यास भास होतो. बाहु, दंड यांच्या आंतील अंगासहि बधिरपणा येतो.व स्नायूचा वेशिस्तपणा पायाप्रमाणें हातांतहि पहाण्यांत येतो. त्या स्नायूमध्यें कृशता वगैरे नसते. रोग्याचे झोंक गेल्यामुळें चालण्याची हव एकदां पाहिली म्हणजे लवकर विसरत नाहीं. हें लक्षण होण्याचें कारण हात, पाय, स्नायू, सांधे, अस्थी, व स्नायुबंधनें यांतील खोल असणाऱ्या भागांनां आपोआप मार्गदर्शक सूचना मिळावी ती मिळत नाहीं व त्यांतील मज्जाबिंदू बिघडलेले असतात. पावलांची त्वचाहि पण या विकृतींत सामील असते व या सर्व कारणामुळें चालण्याच्या कामीं पाय कसा व कोठें टाकावा हें नीट समजण्यासाठीं त्या रोग्यास आपल्या नजरेचा नीट उपयोग करावा लागतो, व यासाठीं त्यास वांकावें लागतें. तसेंच त्यास तोल संभाळण्यासाठीं पाय फांकून व एक अगर दोन काठ्या टेंकण्यास घेऊन चालावें लागतें. चालतांना पाऊल पुढें टाकण्याच्या वेळीं पाय सहज न टाकतां त्यास हिसडा देऊन टाकतो व जमिनीवर पाऊल आपटल्याप्रमाणें पडतें. हाताचे स्नायू बिघडले तर डोळे मिटून रोग्यास नाकाच्या शेंड्यास बोट लावण्यास सांगितलें असतां त्यास तसें नेमकें व झटकन करतां येत नाहीं. कमी अधिक काळ लोटल्यानंतर स्नायू क्षीण होऊन त्याच्या ते ताब्यांत नसल्यामुळें त्याचा लोळागोळा होऊन रोगी अंथरुणाला खिळला जातो. ही रोगाची तृतीयावस्था समजावी. या रोगामध्यें आगंतुक दोष व दुष्परिणाम बरेच होतात. मूत्राशय शुद्ध न राहिल्यामुळें दाह, शय्याक्षतें, फुफ्फुसदाह, रक्तवाहिन्या विकृत होणें, हृदयरोग हीं यापैकीं कांहीं उदाहरणें होत. शेंकडा दहा रोग्यांनां सपक्षाघातचित्तभ्रम होतो यांत नवल नाहीं; कारण दोन्ही रोगांचें मुख्य कारण एकच असल्यामुळें मज्जाशास्त्रवेत्ते अलीकडे म्हणूं लागले आहेत कीं हे दोन्ही भिन्न रोग नव्हेत; तर एकच रोग वेगवेगळ्या मज्जास्थानांनां झाल्यामुळें वेगळ्या रूपानें प्रगट होतो इतकेंच. स्त्रियांपेक्षां पुरुषांनां मात्र हा रोग फारकरून होतो.

उपचार.—मज्जाशक्तीस ताण न बसेल अशी वागणूक ठेवावी. शारीरिक, मानसिक व रागलोभादि मनोधर्मासंबंधीं अत्याचार करूं नयेत. मद्यादि उत्तेजक पदार्थ वर्ज करून जितक्या साध्या वृत्तीनें रहातां येईल तितकें रहावें. खाणेंपिणें व आहारविहारामध्यें साधेपणा ठेवावा. या रोगाचा प्रसार अधिक वाढूं नये अशी खरी इच्छा असल्यास स्त्रीसंभोग अगदीं वर्ज केला पाहिजे, व रोगवृद्धि थांबविण्याचा हा एक उत्तम उपाय आहे यांत संशय नाहीं. लघवी वरचेवर जरूरीप्रमाणें करण्यात आळस बिलकूल उपयोगी नाहीं; तर ती मूत्राशय पूर्ण रिकामा होईपर्यंत सावकाशपणें करावी नाहीं तर मूत्र कोंडण्याची भीति असते, व तीहि खोटी नसते. उपदंश पूर्वी झाला असल्यास पारद मलम नियमितपणें चोळावें व चार पांच वर्षांच्या आंतील रोग असल्यास पोटॅशियम आयोडाइड हें चांगलें औषध आहे. आरंभींच साल्व्हरसन हें औषध टोंचल्यानें गुण वाटतो. पण रोग वाढल्यावर तें निरुपयोगी आहे. वेदना शमविण्यासाठीं ॲंटिपायरीन, भांगेचा अर्क, ॲस्पिरीन वगैरे अनेक उपयुक्त औषधें आहेत. पोटशूळासाठीं पलिस्तर मारावें किंवा मार्फिया टोंचून घालावा. घसा मिळून येऊन जीव कोंडल्यास आमिल नायट्रेट हुंगणें व घशास कोकेन लावणें हे उपाय जरूरीप्रमाणें योजावेत.रोज तीन वेळां स्नायू आकुंचन संकोचन करण्याचा व्यायाम व अंग चोळणें, रगडणें हेंहि उपयुक्त आहे.

**परिंडा**—हा किल्ला अतिशय जुना व मजबुतीबद्दल प्रख्यात आहे. हा प्रथम नगरच्या निजामशाहींत होता; एके काळीं तर तो निजामशाहीची राजधानीहि होता. याच्या स्वामित्वासाठीं आदिलशाही व निजामशाही यांत नेहमीं झगडे होत. निजामशाही बुडाल्यावर हा आदिलशाहींत सामील झाला.

स.१६६५च्या सुमारास मोंगलांचा अंमल त्यावर बसला. शिवाजीनें याच्या आसपासचा सर्व प्रांत स. १६७० त लुटला. मराठ्यांचा डोळा या किल्ल्यावर पुष्कळ दिवसांपासून होता. हैद्राबादकर निजामाच्या कारकीर्दीत परिंडा मराठ्यांच्या हातीं येण्याचा २।३ वेळ प्रसंग आला पण तो कायमचा असा त्यांनां मिळाला नाहीं. हा सांप्रत निजामाच्या राज्यांत तुळजापुराजवळ उस्मानाबाद जिल्ह्यांत आहे. [ पेशव्यांची बखर; जेधे शकावली. ]

पॅरिस—हें शहर फ्रान्स देशाची राजधानी असून सीन नदीच्या दोन्ही तीरांवर उ. अ. ४८° ५०' १४" व पू. रे. २° २०' १४" यांच्यामध्यें वसलें आहे. समुद्रसपाटीपासून याची उंची ८० फुटांपासून ४२० फुटांपर्यंत आहे. स. १८४० पासून शहरासभोंवतीं तट आहे. त्याच्या आंतील शहराचें क्षेत्रफळ १९२७९ एकर आहे. येथील हवामान फारसें बदलणारें नाहीं उष्णमान सरासरी ४९. ८०° फॅरेन हीट असतें. हें शहर तीन निरनिराळया तटांनीं संरक्षिलेलें असून त्यांवर तोफा आहेत. उत्तरेकडील व पूर्वेकडील भाग बहुधां उद्योगधंद्याकरितां आहे. पश्चिमेस श्रीमंत लोकांची वस्ती आहे. करमणुकीचा भाग सीन नदीच्या उत्तर तीरावर आहे. सीन नदीवर बरेच पूल असून बाजूंनीं पूर अडविण्याकरितां भिंती बांधल्या आहेत.

पॅरिसच्या मध्यभागीं टुलेरीज नावाचा एक सुंदर बगीचा आहे. लक्सेम्बर्ग बगीच्या सीनेटच्या पॅलेससमोर आहे. दुसरेहि अनेक सुंदर बागिचे येथें आहेत. पॅरिसमध्यें सर्वांत महत्त्वाचें 'नातर दाम' नांवाचें स. ११६३ मध्यें बांधलेलें एक देवालय आहे. पॅरिसच्या नाटकगृहापैकीं ऑपेरा, ऑपेरा कॉमिक थिएटर, फ्रान्सेस व ओडिऑं हीं मुख्य होत. मॅजिक सिटी नांवाची करमणुकीची जागा आहे तेथें प्रदर्शनांतल्याप्रमाणें निरनिराळे खेळ, स्वीचबॅक ( आलपाईन ) रेल्वे, सरकशी, वगैरे नाना तऱ्हेचीं करमणुकीचीं साधनें आहेत. माणशीं फी १ फ्रँक असते तरी येथें बारामास दररोज रात्रीं १२ वाजेपर्यंत सारखी गर्दी असते. तेथें एका ठिकाणच्या १०-१२ बायास्कोपमध्यें नग्न स्त्रियांचींहि चित्रें दाखविण्यांत येत असतात. पॅरिस हें फ्रान्सचें क्रीडाभुवन असल्यामुळें निरनिराळ्या क्रीडांच्या मुख्य कचेऱ्या येथें आहेत; त्या फुटबॉल, टेनिस, घोड्यांच्या शर्यती वगैरेंची व्यवस्था करतात. पॅरिसच्या संग्रहालयांपैकीं सर्वांत मुख्य लूव्हरमध्यें आहे. यांत अनेक जुन्या व सुंदर वस्तूंचा फार मोठा संग्रह आहे. याशिवाय लक्सेम्बर्गचें वस्तुसंग्रहालय व दुसरीं कित्येक संग्रहालयें येथें आहेत.

पॅरिस येथील रेल्वेस्टेशन गारदुनार फारसें भपकेदार नाहीं. येथील प्रेक्षणीय स्थलांपैकीं नेपोलियनचें थडगें हें एक होय. नेपोलियन सेंटहेलेना बेटांत मरण पावल्यानंतर २५ वर्षांनीं त्याचीं हाडें आणून तीं येथें एका मंदिरांत पुरून ठेवलीं आहेत. येथील आरसपानाकरितां लाखो रुपये खर्चिले आहेत. निरनिराळ्या देशांशीं युद्धें करून नेपोलियननें त्या वेळीं जिंकून आणलेलीं शेंकडों निशाणें येथें टांगिलीं आहेत. दुसरें स्थळ व्हर्सेल्स राजवाडा; येथील भोंवतालचा बाग व आंतील कारागिरी पाहून जुन्या फ्रेंच राजांच्या वैभवाची चांगली कल्पना येते. येथें भिंतींवर लटकावलेल्या ऑईलपेंटिंगच्या असंख्य तसबिरांतून, नेपोलियनचें सर्व चरित्र दाखविलें आहे. तिसरें स्थळ म्हणजे जगांतील सर्वांत उंच ९८४फूट उंचीचा एफिल टॉवर हें होय. याच्या शिखरापर्यंत एकंदर १९२७ पायऱ्या आहेत. हल्लीं शिखरावर जाण्यास लिफ्टची सोय आहे. या शिखरावर बिनतारेच्या तारायंत्राचें आफिस आहे. चवथें ठिकाण विजेचें घर; येथें झाडण्याचीं, जेवतांना वाढण्याचीं वगैरे कामें विजेच्या शक्तीनें करून घेतात. तेथें टेबलाजवळ जाऊन बसतांच, डोक्यावरील रिकामी पर्शी घेतलेली एक बाहुली जवळ येते, व तिला खुणेनें जे पदार्थ सांगावे ते आपल्या टेबलावर, आसपास कोणी मनुष्य नसतांहि, येऊन पडतात.

पॅरिसची लोकसंख्या सुमारें ३० लक्ष आहे. येथें गुजराथेंतील ५०-६० जवाहिरी, व्यापाराच्या उद्देशानें सहकुटुंब जाऊन राहिले आहेत त्यांनां येथें व्यापारांत चांगले पैसे मिळतात. तसेंच कांहीं हिंदी विद्यार्थीहि आहेत. पॅरिसच्या विश्वविद्यालयांत वैद्यक, कायदा, शास्त्रें, वाङ्मय वगैरे विविध विषयांचेंहि शिक्षण देण्यांत येतें. येथील वेधशाळा प्रख्यात आहे.

पॅरिसचें पूर्वीचें नांव लुटेसे होतें स. २९२ ते ३०६ पर्यंत हें कॉन्स्टंटियर क्लोरस याची राजधानी होतें. ९८७ सालीं ही फ्रान्सची राजधानी झाली. सहाव्या चार्लस राजाच्या वेळीं येथें मोठें बंड होऊन फार भयंकर गोष्टी घडल्या. १४२० सालीं सहाव्या चार्लसची मुलगी इंग्लंडच्या पांचव्या हेनरीला देण्यांत येऊन तिच्याबरोबर बहुतेक फ्रान्सचें राज्यहि त्याच्याकडेच गेलें पुढें इंग्लंडकडून तें परत घेण्यांत आलें. १८ व्या शतकाच्या अखेरीस फ्रेंच राज्यक्रांति होऊन राजाचा वध, नेपोलियनचें राज्यारोहण वगैरे वगैरे गोष्टी घडल्या.

१८७० सालामध्यें फ्रान्सची जर्मनीबरोबर जी लढाई झाली तींत पॅरिसची बरीच नासाडी झाली पण यांतून पॅरिसनें पुन्हां डोकें वर काढून आपलें पूर्वीचें सौंदर्य वाढविलें. गेल्या महायुद्धांत जर्मन सैन्य पॅरिसजवळ आलें होतें व पॅरिस शहरावर तोफेची सरबत्तीहि झाली होती पण तें बचावलें.

**परिहार वंश**—हे जेजाकभुक्ती ( बुंदेलखंड ) चे व कनोजचे प्राचीन राजे होत. यांनां प्रतिहार, पढिहार व परिहार अशींहि नांवें आहेत. स्मिथच्या मतें, हे परकीय गुजरवर्गीय वाहांच्या वंशांतील आहेत. रा. वैद्यांचें मत असें कीं, हे मूळचे हिंदुस्थानांतील क्षत्रिय होत. जोधपूरच्या एका शिलालेखांत यांच्या उत्पत्तीचा उल्लेख पुढीलप्रमाणें आढळतो—

एका ब्राह्मणानें ब्राह्मण व क्षत्रिय अशा दोन वर्णांच्या स्त्रियांशीं विवाह केला; ब्राह्मणस्त्रीवंशजांना ब्राह्मण पढिआर व क्षत्रियस्त्रीवंशजांनां क्षत्रिय पढिआर म्हणतात. परिहारांची पहिली राजधानी मौसहनीय या ठिकाणीं होती. हें ठिकाण छत्रपूर व नौगांव यांच्या दरम्यान आहे. परिहारांच्या पूर्वी बुंदेलखंडचे राजे गहरवाल (गढवाल) क्षत्रिय होते. परिहारांनीं सातव्या ते दहाव्या शतकापर्यंत साधारण तीनशें वर्षे या प्रांतावर राज्य केलें. यांच्यांतील प्रख्यात राजा म्हणजे भिनमाळचा नागभट्ट होय. त्यानें इ. स. ८१६ त कनोजचें राज्य जिंकिलें होतें (ज्ञा. को. वि. १५. 'नागभट्ट' पहा ). कनोज ही राजधानी या परिहार वंशानें पुष्कळ दिवस कायम राखिली होती. नागभट्टानंतर रामभद्र (८२५-४०) गादीवर होता. याची माहिती फारशी महत्त्वाची नाहीं. यापुढील या घराण्याची माहिती १० व्या विभागांत कनोज या नांवाखालीं पहावी. [स्मिथ–अर्लि. हिस्टरी ऑफ इंडिया; वैद्य–मध्य. भारत. पु. १. ]

**परीक्षित**—इक्ष्वाकुवंशीय अभिमन्यूचा मुलगा व अर्जुनाचा नातू. हा गर्भाशयांत असतांना अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रापासून कृष्णानें यास वांचविलें. पांडवानंतर हा राज्यावर बसला. यानें एकदां शमीक ऋषीच्या गळ्यांत मृतसर्प घातल्यावरून त्या ऋषिपुत्राच्या शापानें हा सर्पदंश होऊन मेला.

**परुषाम्ल** ( पिक्रिक ॲसिड )—हा एक ज्वालाग्राही व रंगास उपयुक्त असा पदार्थ आहे. तो नीळ, अनिल, राळ, रेशीम, लोंकर, कातडें वगैरेंवर तीव्र नत्राम्लाच्या क्रियेच्या योगानें तयार करतां येतो.सम त्रि–नत्रउदिनाचें अनाम्लिक विद्रावामध्यें पालाश लोही–कर्बनत्रिदाच्या योगानें प्राणिदीकरण केलें असतां परुषाम्ल मिळतें. त्याचे स्फटिक पिंवळ्या चकत्यांसारखे असतात. त्याचा वितळण्याचा बिंदु १२२.५° आहे. तें सावकाश तापविलें असता वाष्परूप होतें पण जलद तापविलें असतां त्याचा एकदम भडका होतो. तें जोरदार अम्ल असून त्याची चव कडू आहे. तें तांबूस, पिंगट रंगाचे बरेंच क्षार देतें. बरेच उत्कर्ष ह्याच्या मिश्रणाच्या योगानें स्फाटिकीभूत पदार्थ देतात. लोंकर व रेशीम यांस याच्या योगानें पिंवळा रंग देतां येतो. याचा मुख्य उपयोग ज्वालाग्राही पदार्थ करण्याच्या कारखान्यांत करतात. पुढील परुष–चूर्णें महत्त्वाचीं आहेतः–(१) मेलिनाईट (द्रवीत परुषाम्ल व अग्निकार्पासाचें मिश्रण), (२) लिडाईट ( इंग्लिश; युद्धोपयोगी ज्वालाग्राही ), ( ३ ) शिमोज ( जपानी युद्धोपयोगी ज्वालाग्राही ). लिडाईट व शिमोज हीं दोन्हीहि मेलिनाइटप्रमाणेंच असतात.

**परेंडा**—हैद्राबाद संस्थानांत, उस्मानाबाद जिल्ह्याच्या पश्चिम भागांतील सर्फ–इ–खासमधील तालुका. क्षेत्रफळ ३३४ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ९७५३३. यांत १०१ गांवें ( पैकीं ६ जहागिरीचीं गांवें ) आहेत. मुख्य गांव परेंडा असून त्याची लोकसंख्या चार हजार आहे.

**परोपनिषदी**—काबूल प्रांताचें प्राचीन नांव. सांप्रतच्या हिंदुकुश पर्वतास प्राचीन ग्रीक लोक परोपनिषस या नांवानें ओळखीत असत. त्याच्या लगतचें जें राज्य व जो प्रांत होता त्यास अर्थातच परोपनिषदी हें नांव त्यांनीं दिलें. परोपनिषस यास हिंदु कॉकेशस असें म्हणतात. [ स्मिथ-अर्लि हिस्टरी ऑफ इंडिया. ]

**पार्किन, सर विलयम हेनरी** (१८३८—१९०७)—हा इंग्रज रसायनशास्त्रज्ञ लंडन येथें १८३८ सालीं जन्मला. लहानपणापासून याचा कल रसायनशास्त्र शिकण्याकडेच होता. तो ए. डब्ल्यू. होफमन याच्या हाताखालीं काम करूं लागला. लवकरच तो आपल्या खाजगी मोडक्या तोडक्या रसायनशाळेंत कृत्रिम कोयनेल तयार करण्याचा प्रयत्न करूं लागला. अनिलीन गंधकित व पालाशद्विक्रुमित यांचा एके दिवशीं त्यानें संयोग करून पाहिला तों त्याला निळा सांका पडलेला दिसला. लगेच त्यानें या निळ्या रंगाचें पेटंट घेतलें व १८५७ सालीं ग्रीनफर्डग्रीन येथें त्यानें रंगाचा कारखाना उघडला. अशा रीतीनें पुढें जर्मनींत मोठ्या प्रमाणावर तयार होणाऱ्या डांबरी रंगाचा उगम झाला. मंजिष्ठाच्या झाडापासून निघणारा अलिझरीन (तांबडा) रंग त्यानें कृत्रिम तयार करून त्याचेंहि पेटंट घेतलें. १८७४ सालीं त्यानें त्या रंगाच्या कारखान्याचा नाद सोडला व इतर रासायनिक शोध सुरू केले.त्याच्या कामाबद्दल त्याला पुष्कळ पदकें मिळालीं. १९०६ सालीं त्याला " सर " ही पदवी मिळाली. तो हॅरो येथें १९०७ सालीं मरण पावला.

**पर्गामम**—अथवा पर्गामस (आधुनिक बेर्गामा). आशियामायनरमधील एक प्राचीन शहर. हें शिल्पशास्त्राकरितां प्रसिद्ध होतें. प्रथम ग्रीक व नंतर रोमन लोकांच्या ताब्यांत हें शहर गेलें. हें एक [illegible] धर्मक्षेत्र होतें. १४ व्या शतकांत येथें मुसुलमानी [illegible] सुरू झाला. अद्यापि येथें नाटकगृहें, वेदी वगैरे ग्रीको–रोमन अवशेष सांपडतात. लोकसंख्या सुमारें वीस हजार आहे.

**पर्गी**—हैद्राबाद संस्थानांत, महबूब जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ३७७ चौरस मैल. जहागिरीसुद्धां लोकसंख्या (१९११) ११६००६ यांत २५९ खेडीं ( पैकीं २२ जहागिरीचीं गांवें) आहेत. मुख्य ठिकाण पर्गी.

**पर्थ**—हें स्कॉटलंडमधील पर्थशायर परगण्यांतलें मुख्य शहर. याची लोकसंख्या ( १९०१ ) ३३५६६. प्राचीन काळीं पर्थ हें शहर फार प्रसिद्ध होतें. १२ व्या शतकारंभापासून इ. स. १४३७ पर्यंतच्या काळांत स्कॉटिश पार्लमेंटच्या बऱ्याच बैठकी येथें झाल्या. येथें म्युनिसिपालटीच्या इमारती, नगरभवन, या मुख्य इमारती आहेत. येथें सँडमनग्रंथसंग्रहालय, पदार्थसंग्रहालय, वेधशाळा, व पुष्कळ शिक्षणसंस्था आहेत. येथून बाल्टिक नांवानें इमारतींचें

लांकूड, दगडी कोळसा, मीठ व खत यांची आयात होते आणि धान्य, बटाटे, व पाटया यांची निर्गत होते. पर्थ हें रंग देणें व धुणें यावद्दल फार प्रसिद्ध आहे. येथें कांच, शाई, मलमल, हिंदी शाली, तागाचा माल, लोंकरीचीं वस्त्रें वगैरे बराच माल तयार होतो.

**पर्लकिमेदी संस्थान**—'किमेदि' पहा.

**पर्शु**—अर्वाचीन पारसिक राष्ट्र. ऋग्वेदांतर्गत दाशराज्ञ युद्धांत या राष्ट्रजातीचा उल्लेख येतो. पाणिनीनेंहि ५, ३, ११७ या सूत्रांत यांचा उल्लेख केला आहे. परशुराम हा एक पर्शू-वीर असावा असें कांहीं संशोधक म्हणतात. ( 'परशुराम' पहा ).

**पर्सिस** ( आधुनिक फार्स )—हा इराणचा नैर्ऋत्यभाग आहे. पार्सा ( फार्स ) या इराणी जातीवरून पर्सिस नांव पडलें असावें. झोरोआस्टरच्या धर्माचें ग्रीक संस्कृतीपासून संरक्षण याच प्रांतानें केलें. याची राजधानी इस्टाखर होती.

**पर्सेपोलिस**—हें इराणमधील प्राचीन शहर शिराझच्या ईशान्येस ४० मैलांवर होतें. सध्यां याला नक्शी रुस्तुम नांव आहे. शिलालेखांवरून असें अनुमान काढतां येतें कीं, पहिल्या दरायसनें पर्सेपोलिस वसवून तीं इराणची राजधानी केली. शिकंदर बादशहानें हें शहर जाळलें. इ स. पूर्वी ३१६ त पर्सेपोलिस पर्सिसची राजधानी होतें. पुढें हळू हळू या शहराचा नाश झाला. सस्सानियन राजांचे बरेच लेख येथें सांपडतात.

**पलनाद**—मद्रास इलाख्यांतील गन्तूर जिल्ह्याच्या अगदीं पश्चिम भागचा एक तालुका. क्षेत्रफळ ११४१ चौरस मैल व लोकसंख्या (१९२१) १५६९५८. यांत ८९ खेडीं असून गुरुझाल हें मुख्य गांव आहे.

**पलमनेर**—मद्रास इलाख्यांतील चित्तूर जिल्ह्याच्या पश्चिम भागांतील एक तालुका. क्षेत्रफळ ४११ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१)५०४३४. यांत ८५ खेडीं आहेत. पलमनेर खेडें हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. त्याची लोकसंख्या ५ हजार आहे. येथील हवा थंड आहे. तालुक्याजवळ एक धबधबा आहे.

**पलव**—खालच्या ब्रह्मदेशांतील मेरगुई जिल्ह्याची एक अगदीं उत्तरेकडील टाउनशिप. क्षेत्रफळ ७८५ चौरस मैल. लोकसंख्या (१९११)२८५८८. यांत ४२ खेडीं आहेत. मुख्य गांव पलव असून तें बंदर आहे. हा तालुका जंगलमय आणि डोंगराळ आहे.

**पलवल**—पंजाब इलाख्यांतील गुरगांव जिल्ह्याची एक तहशील. क्षेत्रफळ ३८२ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) १३१७६०. यांत दोन मोठीं गांवें व १८७ खेडीं आहेत. पलवल हें मुख्य ठिकाण असून लोकसंख्या १२ हजार आहे.

**पलाद**—हा एक प्लातिनवर्गांतील धातु आहे. ब्राझिली सुवर्णयुक्त मृत्तिकेमध्येंहि हा धातु पुढील रीतीनें शुद्ध करतात. प्रथमतः कच्या प्लातिन धातूंतून बहुतेक प्लातिन अम्ल-प्लातिन-हरिद या स्वरूपांत काढून टाकतात, व इतर अवशिष्ट असलेले धातु लोहाच्या योगानें सांकारूपानें खालीं ठेवतात. हा राहिलेला अवशेष अथवा सांका हरिदाबरोबर तापवून त्यांत बाष्पनत्राम्ल टाकून सुका करतात सुका अवशिष्ट भाग पाण्याशीं मिश्रित करून पुष्कळशा पालाश-हरिदांच्या योगानें पलाद हा पलाद-पालाश-हरिदस्वरूपांत आणतां येतो. हे पलाद-पालाश-हरिद शुद्ध करण्याकरितां परत उष्णोदकाशीं मिसळून दार्वम्लासह तापवून सुके करतात. नंतर त्यावर पालाश-हरिदाची क्रिया करून प्लातिन-हरिद मिळ.त्यास गाळून टाकतात. गाळून खालीं राहिलेल्या भागांतूनच शुद्ध पालाश-पलाद-हरिद मिळतें. हें हरिद उज्जवायूच्या वातावरणामध्यें तापविलें असतां शुद्ध पलाद धातु मिळतो. अम्ल-पलाद-हरिद जर उज्जवायूच्या झोतामध्यें सोजित केलें तर शुद्ध पलाद मिळतें.

या धातूस रजताप्रमाणें चकाकी असून हा चिवट आहे. प्लातिन-वर्गांतील सर्व धातूपेक्षां याची द्रवक्षमता जास्त आहे. याचा वितळण्याचा बिंदु १५३०°-१५५०° सें.ग्रे.असून विजेच्या भट्टींत तो लवकर वितळतो. याचें विशिष्टगुरुत्व ११.९७ आहे. पलादाचा उपयोग मिश्रधातूमध्यें दंतरोगाकडे व घड्याळांतील कमानी ( स्प्रिंग्स ) करण्याकडे बराच करतात. उष्ण व जास्त विशिष्टगुरुत्वाच्या गंधकाम्लाची यावर तावडतोब क्रिया होते. व हराम्लाची जर धातू चूर्ण स्थितींत असेल तर किंचित होते. नत्राम्लाची क्रिया त्यामध्यें नत्रप्राणिदें असतील तर फार जलद होते. हरप्लवाशीं तें मंद उष्ण केलें असतां संयोग पावतें. पलाद धातु उज्ज किंवा इतर वायूचें अपशोषण करतो. या धातूपासून दोन तऱ्हेचे रासायनिक संयोग (पलादस प्राणिद व पलादिक प्राणिद) मिळतात. त्यांपैकीं पहिल्या प्रकारचे पदार्थ स्थिर असतात. ह्या धातूचे क्षार तप्त केले असतां मूळ धातु अवशिष्ट रूपात मिळतो, व विद्रावित क्षारांपासूनहि लोह, शिसें वगैरेंच्या क्रियेनेंहि मूळ धातु वेगळा करतां येतो.

**पलामऊ**—(पलामऊ म्हणजे 'आश्रयस्थान') बंगाल इलाख्याच्या छोटा नागपूर पोटविभागामधील एक जिल्हा. क्षेत्रफळ ४९७४ चौरस मैल. शोणनदी जिल्ह्याच्या उत्तरसरहद्दीवरून वहाते. कोएल नदी मुख्य असून तिला औरंगा व अमानत ह्या नद्या येऊन मिळतात. गोंडवनाच्या पहाडात बरेच खनिज पदार्थ सांपडतात. औरंगा, हुतर व दत्तनगंज येथें दगडी कोळसा सांपडतो. जिल्ह्यांत वाघ, चित्ते, अस्वलें, साम्बर वगैरे वन्य श्वापदें आढळतात. हवामान समशीतोष्ण व पाऊस ४९ इंच पडतो.

इतिहास.—इ. सन १६०३ च्या पूर्वीचा पलामऊ जिल्ह्याचा खात्रीलायक इतिहास उपलब्ध नाहीं. वरील सालीं भगवंतराय ह्यानें चेदोच्या मदतीनें रक्षेल रजपुतांस हांकून दिलें. त्यावेळीं येथील स्थानिक राजा समारंभाकरितां गुरगुजास गेला होता. चेदो रजपुतांनीं २०० वर्षेंपर्यंत अंमल गाजविला. त्यांच्यापैकीं मेदिनीराय ( १६५९ ते १६७२ )

हा सुप्रसिद्ध राजा होऊन गेला. त्यानें गया, हजारीबाग व सुरगुजा आपल्या राज्यास जोडलें. सन १६६० मध्यें दाऊदखाननें पलामऊच्या किल्ल्यावर हल्ला करून तो काबीज केला. सन १७२२ त राजा रणजितरायाचा कोणी खून केला. पुढें त्याचा नातू जयकिसन व गोपालराय असे गादीवर आले ह्या वेळेपासून पलामऊचा रामगडच्या सरकारी जिल्ह्यांत समावेश होऊं लागला. गोपाळराय पाटणा येथें १७८४ सालीं मरण पावला, तेव्हां चूडामणराय गादीवर आला. पण १८१३त त्यानें दिवाळें काढलें व कर्जफेडीकरितां पलामऊ विकावयास काढावें लागलें. तें सरकारनें कर्जफेड करून आपल्या पूर्णपणें ताब्यांत घेतलें. पुढें तीन वर्षांनीं खरवार व चेरो घराण्यांत पुन्हां द्वेषभाव उत्पन्न झाला. तेव्हां गयेमधील देवघराण्यास पलामऊ इनाम देण्यांत आलें पण त्यांचा कारभार लोकांस जाचक झाल्यामुळें लोकांनीं बंड केलें. तेव्हां सरकारनें पुन्हा आपल्या हातीं व्यवस्था घेतली.१८३४ सालीं पलामऊचा लोहारडागा ( रान्ची ) जिल्ह्यांत समावेश करण्यांत आला व स. १८९२ त त्याचा एक वेगळा जिल्हा तयार करण्यांत आला.

जिल्ह्याची एकंदर लोकसंख्या ( १९२१ ) ७३३३९४. जिल्ह्याच्या उत्तर भागाची हवा आरोग्यदायक आहे. यांत दोन मोठीं गावें व ३१०१ खेडीं आहेत. दक्षिण व पश्चिम भाग जंगली असून त्यांत जंगली लोक रहातात. हे लोक गळिताचीं धान्यें,मका,कापूस व मोहाचीं फुलें ह्यांचा व्यापार करतात. शेंकडा ५ लोक हिंदी भाषा बोलतात. मुख्य लोक भूमिया, खरवार व अहीर आहेत. द्रविडी लोकांच्या भोगता, कोरवा, नागेशिया व पराया या पोटजाती ह्या प्रदेशात रहातात. शेंकडा ७२ लोक शेतकीवर उपजीविका करतात.

उत्तर कोयेलच्या खोऱ्यांत तीस चौरस मैल जागेंत दाल्तनजंग येथें दगडी कोळसा सांपडतो. औरंगा आणि हुतर येथेहि कोळशाच्या खाणी आहेत पण दाल्तनजंग येथील कोळसा सर्वांत उत्तम असतो. १९०२ सालीं राजहरा व सिग्रा येथेंहि दगडी कोळसा खणण्याच्या कामास सुरवात झाली आहे.

जाडेंभरडें कापड, तांब्याचीं भांडीं, चांदीचे व लाखेचे दागिने,काबळी,लहान बंदुका वगैरे माल तयार होतो. निर्गत माल, चामडें, लाख, तूप, असून आयात माल पाश्चत्त्य देशांतील कपडालत्ता, मीठ, तांब्याचीं भांडीं, साखर, तंबाखू, राकेल तेल, तांदूळ वगैरे आहे. व्यापाराचीं गरवा,दाल्तनगंज, हरिहरगंज, हुसेनाबाद पद्मा व चंदवा हीं ठिकाणें आहेत. ह्या जिल्ह्यांतून ईस्ट इंडियन रेल्वे जाते. शेंकडा १.९ लोकांस लिहितां वाचतां येतें.

**पलाली**—मुंबई इलाखा. काठेवाडामधील एक लहान संस्थान.

**पॅलेर्मो**—इटली, सिसिलीमधील एक शहर. याची लोकसंख्या सुमारें तीन लाख आहे. हें शहर पॅलेर्मो बेटाच्या वायव्येस आहे. पॅलेर्मो मूळची फोनेशियन लोकांची वसाहत होती. पुढें हें ग्रीक, रोमन, सारसेन वगैरे लोकांच्या ताब्यांत होतें स.१८६० त गॅरिबाल्डीनें यास स्वातंत्र्य दिलें येथें कुराणांतील कांहीं उतारे प्राचीन काळच्या इमारती--खांबावर कोरलेले आढळतात. पॅलेर्मो येथें १८०५ सालीं विश्वविद्यालय स्थापण्यांत आलें; तें सध्यां चांगलें भरभराटींत आहे.

**पॅलेस्टाईन**—आशियाच्या पश्चिमेकडचा एक प्रांत. कोणत्या प्राताला पूर्वीं पॅलेस्टाईन नांव होतें हें नक्की नाहीं. हिब्रू लोकांच्या माहितीवरून असें दिसतें कीं पॅलेस्टाईनमध्यें भूमध्यसमुद्राच्या पूर्व किनाऱ्यावर असलेला कासिमिया व वादिपुज या नद्यांच्या मधील प्रदेश येत असावा. जार्डन नदीमुळें पॅलेस्टाईनचे पूर्व व पश्चिम असे दोन भाग पडले आहेत. या प्रदेशाची लांबी सुमारें १४० असून रुंदी उत्तरेंत २३ व दक्षिणेंत सुमारें ८० मैल आहे पॅलेस्टाईनचें क्षेत्रफळ सुमारें ६०४१ चौरस मैल आहे. पॅलेस्टाईन हें इंग्लंडच्या $\frac{1}{9}$ आहे. पश्चिम पॅलेस्टाईनचे ( १ ) समुद्रकांठचा प्रदेश व ( २ ) डोंगराळ प्रदेश असे दोन नैसर्गिक भाग असून त्यांत पहिला भाग विशेष सुपीक आहे. दुसऱ्या भागांत गॅलिलीन पर्वत आहे. त्याच्या सर्वांत उंच शिखराचें नांव जेबेल जर्मोक असून उंची ३९३४ फूट आहे. पूर्व पॅलेस्टाईनमध्यें यार्मुक व झेर्का नांवाच्या नद्या मुख्य आहेत. समुद्रकाठच्या प्रदेशांत वार्षिक उष्णमान सुमारें ३०° ते ९०° च्या दरम्यान असतें. पूर्व पॅलेस्टाईनमध्यें हिवाळ्यांत पर्वतांचीं उंच शिखरें बर्फानें आच्छादिलेलीं असतात. नोव्हेंबर महिन्याच्या शेवटीं पावसाळा सुरू होऊन एप्रिल महिन्यांत संपतो. पॅलेस्टाईनमध्यें—विशेषतः शहरांत—भिन्न धर्माचे, भिन्न भाषा बोलणारे व भिन्न मानवजातीचे लोक आहेत. पॅलेस्टाईनच्या लोकाचे भटकणारे व बैठे असे दोन वर्ग पडतात. भटकणारे लोक विशेषतः पूर्व पॅलेस्टाईनमध्यें आढळतात.प्रत्येक शहरांत विशेषतः अरब लोक जास्त असतात व ते बहुधां श्रीमंत व मोठ्या घराण्यांतील आढळतात. तुर्कांची संख्या अल्प आहे. मोठ्या शहरांत व्यापाराकरितां आलेले आर्मेनिया, ग्रीस, व इटली येथील लोकहि असतात. आशियाच्या पूर्व भागांतील लोकहि येथें येऊन राहतात.

पॅलेस्टाईनची लोकसंख्या सुमारें ६५०००० असावी. परंतु सरकारी खानेसुमारीच्या अभावीं कांहीं खात्रीलायक माहिती मिळत नाहीं. या लोकसंख्येपैकीं $\frac{5}{6}$ मुसुलमान व बाकीचे निरनिराळ्या पंथांचे ख्रिस्ती व ज्यू आहेत. पॅलेस्टाईनमध्यें जेरुसलेम हें सर्वांत मोठें शहर आहे. पॅलेस्टाईनचे बेरत विलायत (प्रांत), सिरिया विलायत ( प्रांत ) व जेरुसलेम संजाक असे तीन विभाग आहेत. या प्रदेशांत दळणवळणाकरितां सांडणीचा उपयोग करतात. हल्लीं आगगाडी झाली आहे.

उपासमार होण्याची पाळी आली होती. अर्थात ब्रिटिशांनीं पॅलेस्टाईनचा ताबा घेतल्यावर त्यांनां प्रथम पॅलेस्टाइनमधील रहिवाश्यांनां अन्न मिळवून देण्याकडे आपलें लक्ष्य पुरवावें लागलें. सर गिलबर्ट क्लेटन याला यावेळीं या प्रांताचा अधिपति नेमण्यांत आलें होतें, त्यानें पॅलेस्टाईनमधील लोकांनां अन्न व काम देण्याची तजवीज केली. मध्यंतरीं व्यापार अजीबात बंद झाला होता तो हळू हळू पुन्हां सुरू झाला. ब्रिटिश लोक पुन्हां पॅलेस्टाईन प्रांत ज्यूंच्या ताब्यांत देणार आहेत असा गैरसमज पसरला होता तो खोटा आहे असें त्यानें जाहीर केलें. गाझा, गाफा, जेरुसलेम येथें लष्करी अधिकारी नेमण्यांत आले मुसुलमानांनीं ज्या धार्मिक कार्यासाठीं देणग्या दिल्या होत्या त्या त्यांच्याच कार्याकरितां लावण्यांत आल्या पोलीस ठाणीं चहूंकडे बसवण्यांत आलीं. शाळा व न्यायकोर्टें स्थापन करण्यांत आलीं. रस्ते वगैरे नवीन बांधण्यांत आले. अशा रीतीनें पॅलेस्टाईन प्रांतांत पुन्हां व्यवस्था व शिस्त नांदूं लागली.

महायुद्ध संपल्यानंतर पुन्हां पॅलेस्टाईनची नवी घटना झाली. हल्लीं पॅलेस्टाईनचे पांच जिल्हे पाडण्यात आले असून त्या प्रत्येक जिल्ह्यावर एक अधिकारी नेमण्यात आला आहे. अशा रीतीनें पॅलेस्टाईनमध्यें जरी शांतता नांदू लागली तरी पण ज्यू व मुसुलमान यांच्यामध्यें खटके उडतच असत. जॉर्डनपलीकडील अरब अद्यापि धुमाकूळ घालीत होतेच. अशी स्थिति असल्यामुळें १९२० सालच्या एप्रिल महिन्यांत ज्यू व मुसुलमान यांच्यामध्यें कांहीं चकमकी उडाल्या व त्यांत दोन्ही बाजूंची बरीच प्राणहानि झाली तथापि ब्रिटिश सैन्यानें लवकरच चहूंकडे शांतता प्रस्थापित केली. १९२० च्या जुलै महिन्यांत सर हर्बर्ट सॅम्यूअल हा सानरेमियो येथील परिषदेच्या ठरावाप्रमाणें पॅलेस्टाईनचा हायकमिशनर झाला व त्याच्या मदतीसाठीं मुसुलमान, ख्रिस्ती व ज्यू यांचें मिळून, १० लोकांचें एक मंडळ देण्यांत आलें. हिब्रू भाषा ही अरबी व इंग्लिशप्रमाणेंच दरबारी भाषा समजण्यांत येऊं लागली. मुद्रणस्वातंत्र्य देण्यांत आलें. स. १९२० च्या डिसेंबरमध्यें पॅलेस्टाईन व फ्रेंच सीरिया यांच्यामधील सरहद्द ठरविण्यांत आली. जॉर्डन नदीच्या पलीकडील टापूवर अरबांचें स्वामित्व मान्य स्थापण्यात आलें. पॅलेस्टाईनमध्यें सुव्यवस्था स्थापन झाल्यामुळें बहिष्कृत ज्यू लोक पुन्हां पॅलेस्टाईनमध्यें येऊं लागले. येथें येतांच ज्यूंनीं आपलें लक्ष शेती बागाइतीकडे नेटानें लावलें. झियोनिस्ट पंथाच्या सभेनें या कामीं फार मेहनत केली. त्यामुळें थोडक्याच काळांत पॅलेस्टाईन प्रांतांत ज्यू लोकांनीं छोटया छोटया शेतकीच्या वसाहती स्थापन केल्या. ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं पॅलेस्टाईनमधील निरनिराळ्या धर्मांच्या माणसांमध्यें सलोखा घडवून आणण्यासाठीं पुष्कळ खटपट केली व त्यांत त्यांनां पुष्कळ यश आलें.

स. १९११ च्या खानेसुमारींत पॅलेस्टाईनची लोकसंख्या ६४७८५० होती. पॅलेस्टाईनमध्यें एकंदर २२ म्युनिसिपॅलिटया आहेत. निरनिराळ्या धर्मपंथांनीं आपापल्या पुष्कळच शाळा स्थापन केल्या आहेत. पॅलेस्टाईनच्या संरक्षणासाठीं स. १९२१ मध्यें ७७०० लोकांचें लष्कर ठेवण्यांत आलें होतें. त्याशिवाय ७८ अधिकारी व १३९२ पोलीस असें पोलीसदळहि कायमचें नेमण्यांत आलें आहे.

महायुद्ध चालू असतांना तुर्कांनीं आपापल्या आवश्यक अशा कांहीं रेल्वे बांधल्या. पुढें ब्रिटिशांच्या देखरेखीखालीं पॅलेस्टाईन आल्यापासून ब्रिटिशांनीं क्कांटारा ते रोमानी ( १९१६ ), रोमानी ते एल आरिश ( १९१७ ), एल आरिश ते राफा ( १९१७ ), राफा ते कर्म ( १९१८ ) व लुड्ड ते रांती इत्यादि अनेक रेल्वे बांधल्या. स. १९२० मध्यें पॅलेस्टाईन प्रांतांतून ६९३७०२ ( ईजिप्शियन ) पौंड मालाची निर्गत व ४२४२०६७ ( ईजिप्शियन ) पौंड मालाची आयात झाली. पॅलेस्टाईनमध्यें गाझा, जाफा व हैफा हीं तीन प्रमुख बंदरें आहेत व या बंदरांतून मोठा व्यापार चालतो.

ज्यू, ख्रिस्ती व मुसुलमान या लोकांच्या पवित्र जागा पॅलेस्टाईनमध्यें आहेत. महंमदअलीच्या कालापर्यंत पॅलेस्टाईनमध्यें निरनिराळ्या मठांतील लोक हेच काय ते परकीय होते. पहिल्या प्रॉटेस्टंट मिशनऱ्यांनीं जेरुसलेममध्यें १८२३ सालीं वसाहत केली. ऑलिव्ह लांकडांच्या जिन्नसांचा व्यापार त्यांनींच सुरू केला. अमेरिकन लोकांनींहि येथें वसाहत केली आहे. एडवर्ड रॉबिनसन नांवाच्या एका अमेरिकन पाद्र्यानें पॅलेस्टाईनमधून प्रवास करून प्रवासवृत्त लिहिलें असून त्याच्यानंतर टिटस टोब्लर यानेंहि आपलें प्रवासवृत्त लिहिलें आहे. इ. स. १८६४ मध्यें पॅलेस्टाईनसंबंधीं शोध लावण्याकरितां एक फंड उभारण्यांत आला. त्याचप्रमाणें फ्रेंच, जर्मन व अमेरिकन शोधकानींहि संस्था स्थापल्या असून त्यांनींहि नवीन शोध लावले आहेत.

१९२१ ते १९२५:—१९२१ सालीं येथील लोकसंख्या ७००००० असून त्यांत ७६००० ज्यू, ७७००० ख्रिस्ती, व बाकीचे मुसुलमान होते. १९२५ सालीं एकूण लोकसंख्या ८०६००० असून त्यांत १०८००० ज्यू आहेत. पॅलेस्टाईन हें ज्यू लोकांचें राष्ट्र बनविण्याच्या योजनेला १९२२ आगस्टमध्ये लंडनला गेलेल्या अफगाण: मिशननें हरकत घेतली. १९२२च्या सप्टेंबरमध्ये पॅलेस्टाईनात ब्रिटिशांना मॅंडेट मिळाल्याचें जाहीर होऊन सर हर्बर्ट साम्युअल यास ब्रिटिश कमिशनर नेमण्यात आलें. त्याविरुद्ध अरबांनीं दुकानें बंद करून व १९२३ च्या फेब्रुवारींत भरलेल्या अरब काँग्रेसमध्यें ठराव करून निषेध केला, आणि ब्रिटिश सरकारनें स्थापन केलेल्या कायदेमंडळा ( लेजिस्लेटिव्ह कौन्सिल ) च्या निवडणुकींवर बहिष्कार घातला, तथापि ब्रिटिश सरकारनें आपला राज्यकारभार चालू ठेवला १९२५ च्या एप्रिलमध्यें अरब नॅशनल पार्टीनें कलोनियल सेक्रेटरी एल्. एम्. आमेरी याजकडे

डेप्युटेशन पाठवून राज्यकारभाराचे संपूर्ण हक्क मागितलेः पण अरबांनां सेक्रेटरीनें कसलेंहि अभिवचन दिलें नाहीं. १९२५ च्या जूनमध्यें लार्ड प्लूमर हा नवा हायकमिशनर नेमका गेला व तो ज्यू नसल्यामुळें अरबांनां समाधान झालें आहे. पॅलेस्टाईनकरितां ब्रिटिश खजिन्यांतून १९२२-२४ सालीं १४०:००० पौंड खर्च झाले.

ज्यू लोकांची आयातः—पॅलेस्टाईन हें ज्यू लोकांचें राष्ट्र करण्याचें ठरल्यापासून परदेशांतून ज्यू लोक स्वदेशीं येण्यास सुरवात होऊन १९२३ सालीं ७२५४ व १९२४ सालीं सुमारें दोन हजार ज्यू आले, आणि ब्रिटिशांचा ताबा झाल्यापासून एकंदर ४० हजार ज्यू येऊन राहिले आहेत. तथापि नव्या ज्यूपैकीं उद्योगधंद्यांच्या अभावीं बरेच लोक बेकार झाले, कांहींनीं दारिद्र्यामुळें आत्महत्या केली आणि १९२३ सालीं ३८६६ ज्यू पॅलेस्टाईन सोडून दुसरीकडे गेले. तथापि १९२४-२५ पासून, शेतकी, कणीक, साबण वगैरेंचे कारखाने व व्यापार यांची वाढ झपाट्यानें होत असून ज्यू लोकांतील बेकारी कमी होत आहे. शिवाय तेथें तेल, तांबें, मीठ व पोटॅश यांच्या खाणींची वाढ होण्यास पुष्कळ क्षेत्र आहे. मृतसमुद्रांत आठ अब्ज पौंड किंमतीचा पोटॅश विद्रावित स्थितींत असल्याचा अंदाज केला असून तत्संबंधीं कारखान्यांच्या योजनांनां मदत देण्यास ब्रिटिश सरकार तयार आहे. शेतकीकरितां कालवे खोदण्याच्या योजना तयार झाल्या आहेत.

**पलौंग**—ब्रह्मदेशांतील एक राष्ट्रजात. उत्तर-शान संस्थानांच्या उत्तरभागांतील डोंगरसपाटीच्या प्रदेशात हे लोक रहातात. तसेंच वरच्या ब्रह्मदेशांतील रुबीमाइन्स जिल्ह्याच्या पूर्व भागांतहि हे रहातात. टौंगपेंग नांवाचें उत्तरशान संस्थान पलौंग लोकांचा रहाण्याचा मध्यप्रदेश आहे ह्या संस्थानचे बहुतेक सर्व रहिवाशी पलौंग आहेत. शानसंस्थानांत पलौंग लोकांनां ' कुनलोई ' म्हणतात. ह्या लोकांचे दोन भाग पडले आहेत; एक पलौंग व दुसरे पले.

नम्हशान व त्याच्या भोंवतालच्या प्रदेशांत रहाणाऱ्या लोकांनां पलौंग म्हणतात व या मर्यादेच्या बाहेर रहाणाऱ्यांस पले म्हणतात. पलौंग लोकांची संख्या सुमारें ६० हजार आहे; पैकीं अर्धे लोक उत्तर शानसंस्थानांत रहातात. हे लोक बौद्धधर्मीय आहेत. हे स्वभावानें गरीब व शांतताप्रिय आहेत. पुरुष शान लोकांसारखाच पोषाख करतात. पलौंग लोकांची कुचूर म्हणून एक जात आहे. ते रंगीत कपडे अंगांत घालतात. तरुण व वयांतील स्त्रिया डोक्यावरचे केस कापतात. हे लोक चहाची लागवड फारच चांगल्यापैकीं करतात.

**पॅलमाइरा**—एका प्रसिद्ध पौरस्त्य शहरानें ग्रीक व लॅटिन नांव. शिलालेखांत हें टॅडमार नांवानें प्रसिद्ध होतें. व अद्यापि अरब लोक त्याच नांवानें त्याला संबोधितात. याची जागा दमास्कसच्या ईशान्येस १५० मैलांवर असून सैरियन ओसाड मैदानांतील एका ओलवणांत सुमारें १३०० फूट उंचीवर हें वसलें होतें.

इ. स. पूर्वी १ मध्यें पॅलमाइरा हें रोमन व पार्थियन सत्यांतील व्यापाराचें केंद्र झालें होतें. ह्या ठिकाणची संस्कृति ही अरबी, अरेमाइक, ग्रीक व रोमन या संस्कृतींचें मिश्रण होय.

पॅलमाइराचा राजकीय दृष्ट्या उदय सीरियन किनाऱ्यावरील रोमन वसाहतीपासून झाला. येथील राज्यकाभार एक मंडळ व लोक यांच्या हातीं असे. यासाठीं कांहीं दिवाणी कामगार असून त्यांनां ग्रीक पदव्या असत. ३ ऱ्या शतकारंभीं पॅलमाइरा रोमन वसाहत झाली व तिला सर्व रोमन हक्क प्राप्त झाले. तिसऱ्या शतकांतील युद्धांत पॅलमाइरा अतिशय पुढें आलें व मोठ्या योग्यतेस चढलें. पॅलमाइराच्या ओडैनथनें जगाच्या इतिहासांत देखील उच्च स्थान पटकाविलें आहे. तेथील वीरपत्नी झेनोबिया ही तर प्रसिद्धच आहे. ( ' झेनोबिया ' पहा ).

येथील भाषा म्हणजे पश्चिम अरेमाइकची एक शाखा होती. उत्तर सैबेरिया व पूर्वेकडील अरब यांच्याप्रमाणें पॅलमाइरा येथील धर्म होता. येथील मुख्य देव समास, अथवा शमाश (सूर्य) अथवा बेल किंवा मॅलकबेल होता. याशिवाय अॅग्लीबोल (चंद्रदेवता,) अॅथर अॅथेह, अलाथ ( प्राचीन अरबांची मुख्य देवी ) यांची पूजा चालू होती.

**पल्लडम**—मद्रास इलाख्यांतील कोईम्बतूर जिल्ह्याच्या मध्यभागीं असलेला एक तालुका. क्षेत्रफळ ७४१ चौरस मैल लोकसंख्या सुमारें तीन लक्ष. यात एक गांव (तिरुप्पूर) व १९३खेडीं आहेत. पैकीं पल्लडम हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून याची लोकसंख्या तीन हजार आहे.

**पल्लव घराणें**—हें घराणें दक्षिणेंत कांची ( कांजीवरम ) येथें ३ ऱ्या, ७ व्या व ८ व्या शतकांत स्वतंत्रपणें राज्य करीत होतें. चोल, चेर, पाण्ड्य व चालुक्य वगैरे आसपासच्या राजेलोकांशीं यांनां नेहमीं झगडावें लागे. हे परकीय पह्लवांचे वंशज होते असें पुष्कळ पाश्चात्य विद्वानांनीं म्हटलें आहे, परंतु, अलीकडे लागलेल्या शोधांवरून हे पल्लव वाह्य पह्लवांहून भिन्न व येथीलच रहिवाशी क्षत्रिय होते असें सिद्ध झालें आहे, व तें व्हिन्सेन्ट स्मिथनेंहि कबूल केलें आहे. ह्युएनत्संग याच्या राज्यांत गेला होता, त्यानें यांचें मराठ्यांप्रमाणें वर्णन केलें आहे. यांचें राज्य दोन वेळां भरभराटीस आलें होतें; एकदां तिसऱ्या शतकांत व एकदां सातव्या शतकांत. आसपासच्या राजांच्या बलाढ्यपणामुळें यांच्या राज्याचा संकोच होई. हे जैन व बौद्धधर्मी लोकांस चांगले वागवीत; मात्र ते स्वतः शैव होते. इ. स. २०० च्या सुमारास कुमारविष्णु या पल्लवानें शिलाहारांच्या कांचीकडील भागांत कांची येथें स्वतंत्र राज्य स्थापिलें. हा या पूर्व पल्लव घराण्याचा मूळ पुरुष. पुढें या वंशांत शूर राजे न निपजल्यानें समुद्रगुप्तानें त्यांनां मांडलिक बनविलें ( ३३८ ).

या व पुढील उत्तर पल्लवांनीं कांचीं येथें मोठमोठीं शंकराचीं व विष्णूचीं देवळें बांधिलीं. या उत्तर पल्लवांचा काळ पूर्व-चालुक्यांचा समकालीन असून, त्या दोघांत झालेल्या राजांची संख्याहि सारखीच आहे. हें घराणें ५८० ते ७४५ पर्यंत राज्य करीत होतें यांचा पहिला राजा सिंहविष्णु हा होता. तो पराक्रमी असून त्यानें चोल, पाण्ड्य देशांबरोबरच सिंहलद्वीपहि जिंकलें होतें. त्याचा नातु नरसिंह, याच्या वेळीं ह्युएनत्संग कांचीस गेला होता. नरसिंह फार शूर असून त्यानें पुलकेशी ( दुसरा ) चालुक्य याचा पराभव केला होता. तीन महाराष्ट्राप्रमाणें पल्लवांचेहि तीन देश ( त्रैराज्य पल्लव ) होते. चालुक्यांचें व पल्लवांचें हाडवैर होतें. एकमेकांनीं परस्परांचा अनेकदां पराभव केला होता. शेवटीं विक्रमादित्य ( दुसऱ्या ) चालुक्यानें शेवटचा पल्लवराज नंदीपोतवर्मा याचा पराभव करून त्याचें राज्य खालसा केलें ( ७४२ ). हे *पल्लवराजे विद्येचे व शिल्पांचे फार चहाते होते* [ डिनॅस्टीज कानडी डिस्ट्रिक्टस; साऊथ इंडियन पॅलिओग्राफी. ]

**पवनगड**—सह्याद्रीच्या पन्हाळाफाट्यावर पन्हाळगडाच्या पूर्वेस अर्ध्या मैलावरील किल्ला. दोन्हीं गडांत एक खोल दरी आहे. याच्या भोंवतीं सर्वत्र १५ ते २५ फूट उंच कडे तुटलेले असल्यानें नैसर्गिक मजबुती आली आहे; त्यांच्या वर १४ फूट उंचीचा तट आहे. शिवाजीनें स. १६६० च्या सुमारास हा घेतला. औरंगझेबानें हा स १७०१ त पन्हाळ्यावरोबरच काबीज केला होता. परंतु पुढें रामचंद्रपंत अमात्यानें थोड्याच दिवसांत परत घेतला. तेव्हांपासून तो मराठ्यांच्याच ताब्यांत आहे. यास पावनगड असेंहि म्हणतात. पन्हाळ्यावरोबरच हाहि भोजशिलाहारानें बांधला. [ कोल्हापूर गाझे. ]

**पवनी**—मध्यप्रांत, भंडारा जिल्हा. भंडाराच्या दक्षिणेस ३० मैलावर वैनगंगा नदीतीरीं असलेलें एक तटबंदी गांव लोकसंख्या सुमारें नऊ हजार. पौराणिक राजा पवन याच्या नांवावरून या गांवास पवनी हें नांव पडलें आहे. पूर्वी या गांवाचें पद्मावती असेंहि नांव होतें. तें तेथील राणीवरून पडलें असावें. गांवाला तीन बाजूंनीं मातीची भिंत असून जागोजाग बुरूज आहेत. इ स. १८१८ मध्यें ब्रिटिशांनीं हें ठाणें सर केलें. इ. स. १८६७ मध्यें येथें म्युनिसिपालिटीची स्थापना झाली येथें रेशीमकाठी वस्त्रें चांगलीं तयार होतात.

**पवायान**—संयुक्त प्रांतांत शहाजहानपुर जिल्ह्यांतील ईशान्येकडील तहशील. हींत पवायान, बरागांव व खुनार असे तीन परगणे आहेत क्षेत्रफळ ५९१ चौरस मैल. लोकसंख्या अडीच लाख. खेड्यांची संख्या ६८०. मुख्य गांव पवायान तालुक्याच्या मध्यभागांतून गोमती नदी वहात गेलेली आहे.

**पवार घराणें**—या घराण्यापैकीं धारच्या पवार घराण्याची हकीकत धार या नांवाखालीं दिली आहे. बहुतेक पवारांचें गोत्र अगस्ती असून ते सूर्यवंशी, अष्टपदागायत्रीचे अधिकारी, ऋग्वेदी आहेत त्यांच्या निशाणावर व लग्नीवणावर हनुमानाचें चित्र असतें. कुलस्वामी काळभैरव व अबूची देवी; देवक धारतरवारीचें, व निशाण लाल असतें. पुणें जिल्ह्यांत मलठण येथें एक पवार घराणें आहे. धारच्या पवारांचें हें मूळ ठिकाण होय असें म्हणतात. मलठणकर हेहि आपणांस विश्वासराव म्हणवितात. सुपें येथेंहि एक पवार घराणें असून तें आपल्यास चंद्रराव म्हणवितात. हे बुवाजी पवारापैकीं होत. यांच्यांतील मानाजी याला शाहूनें ५० स्वारांच्या पथकासाठीं सरंजामी इनाम दिलें. मानाजी हा उत्तरहिंदुस्थानांत एका लढाईंत ठार झाला. त्याचा पुत्र यादव हा महादजी शिंद्याच्या फौजेंत होता. त्यानें याला *जहागीरगांव दिला होता. याचा मुलगा इंमजी असदानी झाली* तेव्हां होता. त्या वेळीं त्यास पांच हजारांचा जातसरंजाम होता. यांचा मूळ पुरुष बुवाजी पवार यास शाहूनें ७९२०२ रुपायांचा सरंजाम दिला होता हा सरंजाम यांच्याकडे होळकराच्या दंग्यापर्यंत चालत होता. पुढें रावबाजीनीं तो १० हजारांपर्यंत कायम केला आणि एलफिन्स्टननें तर ५ हजाराचाच कायम केला. [वाड–कैफियती; धारचा इतिहास.]

**पॅडिंआ**—इटली. पाडिआ देशाच्या राजधानीचें शहर. हें मिलनच्या दक्षिणेस रेल्वेनें २२॥ मैलांवर आहे. हें शहर समुद्रसपाटीपासून २५३ फुटावर आहे. लोकसंख्या सुमारें तीस हजार. येथें कांहीं सुंदर मंदिरें आहेत. इ. स. १३६१ मध्यें दुसरा गॅलेझो यानें येथें एक विद्यापीठ स्थापिलें; या विद्यापीठांतील वाचनालयांत ख्रिस्तोफर कोलंबस याची राख ठेवली आहे. व्होल्टानें येथें विद्युत्प्रयोग केले. गरीब विद्यार्थ्यांच्या सोईकरितां येथें दुसरीं दोन लहान कॉलेजें आहेत. येथील विद्यापीठ वैद्यकशास्त्रेकरितां फार प्रसिद्ध आहे. येथें लोखंडाचें सामान तयार करण्याचे कारखाने आणि विजेच्या साहाय्यानें चालणारे दुसरे कारखाने आहेत. पॅव्हिआ हें मिलनहून जिनोवास जाणाऱ्या रेल्वे–लाईनवर आहे. पॅव्हिआच्या उत्तरेस ५ मैलांवर अत्यंत प्रसिद्ध असा कार्थ्युजिअन मठ आहे.

**पशुवैद्यक**—पशुवैद्यकशास्त्र म्हणजे ज्या शास्त्रामध्यें पशूंच्या रोगांचें निदान व त्या रोगांची चिकित्सा म्हणजे त्यांवर औषधयोजना यासंबंधीं विचार केला जातो तें शास्त्र. या शास्त्रास संस्कृतांत शालिहोत्र असें म्हणतात. पशु हा शब्द फार व्यापक असून त्यामध्यें सर्व चतुष्पाद प्राण्यांचा समावेश होतो. हें शास्त्र अद्याप बरेंच बाल्यावस्थेंत आहे तरी मनुष्याच्या सुखसोईसाठीं म्हणून जे प्राणी निर्माण केले आहेत त्यांच्यासंबंधीं शास्त्रज्ञ लोकांनी बरीच मेहनत घेतली असून अद्यापहि प्रत्यहीं घेत आहेत जरी या शास्त्रामध्यें अद्यापि पुष्कळ सुधारणा व्हावयाची आहे

तरी पण आजपर्यंत झालेल्या शोधांवरून आपला ज्या जनावरांशीं नित्य संबंध आहे अशा जनावरांच्या रोगांची व त्यांवरील उपचारांची वरीच माहिती उपलब्ध झाली आहे. आज जी माहिती मिळाली आहे तीवरून असें दिसून येतें कीं मनुष्यप्राण्याला होणारे बहुतेक सर्व रोग इतर प्राणिमात्रांनां होतात, एवढेंच नव्हे तर कित्येक रोग असे आहेत कीं त्यांवर उपाय योजणें हें मनुष्यमात्राच्या सुखसोईला अवश्य होऊन बसलें आहे. हिंदुस्थान देश हा शेतीवर अवलंबून आहे व जनावरांशिवाय शेती करणें अशक्य आहे.

जनावरांच्या रोगांचे मुख्यतः दोन प्रकार करतां येतील. ते प्रकार म्हणजे सांसर्गिक सांथीचे रोग आणि दुसरे इतर सर्व रोग. हिंदुस्थानांत गुरांचे सांसर्गिक रोग जे पाहण्यांत येतात ते येणेंप्रमाणेः-लाळ अथवा खुरकूत, डरंगळ्या अथवा देवी, फऱ्या, फांशी व घटसर्प. घोड्यांमध्यें आढळणारे सांसर्गिक रोग असतात तेः-शेंबा अथवा गर ( ग्लँडर आणि फांशी ), सांसर्गिक वेलीरोग ( लिंफॅंगिटिस एपिझूटिक ), गर्मी ( डूराइन ), सरा, शिंगाडा ( स्ट्रँग्लर ). कुत्र्यामध्यें डिस्टेंपर, व पिसाळणें( रॅबिज ). शेतकरी व इतर लोकांनां सांथीच्या रोगांसंबंधीं थोडीशी माहिती असणें फार अवश्य आहे. ती थोडक्यांत खालीं देत आहों.

लाळ अथवा खुरकूत.—हा रोग लहानमोठ्या गाई म्हशी, शेळ्या,मेंढरें यांनां होतो. यांत ताप, लाळ गळणें, तोंडांत व जिभेवर चट्टे पडणें; शिंगें व खूर गरम होणें; व पायांच्या दोन्ही नख्यांमधील जागेंत फोड येऊन फुटणें व जनावर लंगडूं लागणें वगैरे रोग होतात. या रोगांत शेंकडा एक दोन जनावरें मरतात. उपचार करणें असल्यास तोंडांतील चट्टे तुरटीच्या अगर टांकणखाराच्या पाण्यानें दिवसांतून दोन चार वेळ धुवावेत. जनावराच्या नख्यांमधील जागा मिठाच्या कोंवट पाण्यानें धुवून काढावी; तापावर काडेचिराइताचा काढा पोटांत द्यावा. गुरांचे पाय नीट स्वच्छ धुतले नाहींत तर जखमांमध्यें किडे पडतात व जनावर जायबंद होतें अशा वेळीं फिनाईलच्या पाण्यानें पाय धुवून काढावेत व नंतर डांबर व मोरचूत यांचें मिश्रण वर लावावें. वरील उपचार पांच सहा दिवस काळजीपूर्वक केल्यास जनावर वरें होतें जनावरास खाण्यास नरम व ओलें गवत,कोथिंबीर, विलायती गवत, तांदळाची पेज, ज्वारीच्या अगर बाजरीच्या पिठाची कांजी हीं ताकद वाढण्याकरितां दिलीं पाहिजेत. या रोगानें आजारी असलेल्या जनावराचें दूध तापवून प्यावें व तें लहान मुलांनां मुळींच देऊं नये.

डरंगळ्या अथवा देवी(रिंडरपेस्ट).—हा रोग बराच घातुक आहे. यांत शेंकडा ५० जनावरें मरतात. हा रोग गाई, म्हशी व शेळ्यामेंढ्यांनां होतो. रोगाची मुदत नऊ दिवस असते. निगा नीट राखली तर जनावर सहसा न दगावतां नऊ दिवसांनीं वरें होतें. या रोगांत ताप येतो, डोळ्यांतून पू व पाणी येतें, डोळे लाल होतात, जनावराचा गुलाब होतात, शेणामध्यें रक्त अथवा शेंव व केव्हां केव्हां आंतड्याच्या आंतील त्वचा पडते, जनावर लाळ गाळतें, ओंठाच्या आंतील बाजूस टांचणीच्या डोक्याएवढीं बारीक छिद्रें पडतात, नाकांतून शेंबूड येत असतो व केव्हा केव्हां तर अंगावर चोहोंकडे देवीसारखे फोड येतात. गाभणी जनावरें गाभ टाकतात व दुभत्या जनावरांचें दूध एकदम नाहींसें होतें. औपधोपचार करणें तो तुरटीच्या अगर टांकणखाराच्या पाण्यानें तोंड रोज चार वेळ स्वच्छ धुवून टाकावें, नाक, डोळे, ढुंगण स्वच्छ ठेवावें, पोटांत काडेचिराईताचा काढा द्यावा, नाक अथवा चिंचेचा कोळ पाजावा व कातची पूड जुलाब थांबण्याकरितां द्यावी. वारंवार कांजी पाजीत असावें. इतर जनावरांनां रोग होऊं नये म्हणून स्थान जनावरांच्या डॉक्टरांकडून देवी ( इनॉक्युलेशन ) काढवून घ्याव्या त्यांपासून जनावरांनां कोणताहि अपाय होत नसून त्यांचें रोगापासून संरक्षण होतें.

फऱ्या.—हा रोग वयानें लहान व सशक्त अशा गुरांनां होतो. हा रोग फार घातुक असून या रोगानें पछाडलेलें जनावर फारच लवकर म्हणजे एक दोन दिवसांत मरतें. यात ताप येतो, जनावर सुस्त होतें, लंगडूं लागतें, अंगावर बहुतकरून मागील पायाच्या मांडीवर सूज येते व ती हात लावून पाहिली असतां गार लागते व दाबली असतां आंत पोकळ असून हवा असल्यामुळें चरचर वाजते. जनावर एका बाजूस खालीं मान घालून उभें रहातें किंवा जमिनीवर पडून रहातें. या सांथींत मृत्युसंख्या शेंकडा ९५ पर्यंत असते. हा रोग म्हशींनां फार थोड्या प्रमाणांत होतो. या रोगावर अद्याप खात्रीलायक उपाय सांपडला नाहीं तरी हा रोग ठराविक ऋतूंमध्यें व ठराविक जागेंत होतो असें अनुभवानें ठरल्यास रोग सुरू होण्याच्या पूर्वी एक महिनाभर गुरांच्या डॉक्टरांकडून देवी काढविल्यास रोग त्या सालीं होत नाहीं असें आढळून आलें आहे.

फांशी ( अँथ्रॅक्स ).—हा रोग सर्व प्राण्यांनां व मनुष्यमात्राला सुद्धां होतो. परंतु हा हिंदुस्थानांत फार मोठ्या प्रमाणांत कधींहि होत नाहीं. हा फारच घातुक असतो. यानें शेंकडा ९९ जनावरें मरतात. यांत ताप येतो; शरीरावर कोठेंहि सूज येते, पोटांत दुखतें, सूज कठिण, गरम असून दुखत असते. बहुतकरून औपधोपचार करण्यापूर्वीच जनावर मरतें. रोगप्रतिबंधक लस टोंचून घेतली असतां जनावरांचा बचाव होतो.

घटसर्प ( हिमरेज सेप्टिकॅमिआ ).— हा रोग बहुतकरून म्हशी व रेडे यांनां फार होतो. तो गाईबैलांनां सुद्धां होतो. मृत्यूचें प्रमाण शेंकडा ९० पर्यंत असतें. या रोगांत ताप येतो, घशाखालीं अगर नरडीवर सूज येते. जनावर लाळ गाळतें, जीभ सुजून बाहेर लोंबू लागते, खाणेंपिणें बंद होतें व श्वासोच्छ्वास करतां येत नाहीं, तेणेंकरून जनावर

गुदमरून मरतें. या रोगावर खात्रीलायक असा उपाय नाहीं. रोगप्रतिबंधक लस टोंचल्यानें फायदा होतो.

या सर्व रोगांमध्यें रोगाचा प्रसार होऊं नये म्हणून रोगी जनावरें निराळीं बांधावीत. रोगी व निरोगी जनावरांनां एके ठिकाणीं अगर एका भांड्यांत पाणी पाजूं नये रोगी जनावरांचें मलमूत्र व त्यांच्या पुढील चारावैरण सर्व जाळून टाकावी. मेलेलीं जनावरें न फाडतां सबंध पुरून टाकावींत. हे सर्व रोग विषारी जीवजंतूंपासून उत्पन्न होतात तेव्हां जंतुनाशक औषधें पोटांत द्यावींत.रोगी जनावरांचें दूध उपयोगांत आणूं नये मांस सुद्धां अपायकारक असतें सबब तेंहि वर्ज्य करावें.

शें वा अ थ वा ग र (ग्लँडर्स व फारी).—हा रोग घोडे, खेंचरें यांमध्यें होतो. हा सर्व प्राण्यांनां व मनुष्यांनां सुद्धां होतो. यामध्यें खालच्या जबड्याच्या हाडावर कठिण गांठ येते. नाकांतून चिकट शेंबूड तारेसारखा लोंबत राहतो. नाकपुड्यांच्या मधील पड्द्यावर व्रण पडतात, पाय सुजतात, पायांवर जागोजागीं गांठीं येतात व त्या फुटतात. हा रोग असाध्य आहे. सरकारी कायद्याप्रमाणे ह्या रोगानें जनावर मारून टाकावें लागतें.

सां स र्गि क वे ली रो ग (लिंफॅंगिटिस एपिझूटिका).—हा रोग घोडे, खेंचरें, गाढवें यांनां होतो. याचा प्रसार फार नसतो. रोगाचा प्रसार होऊं नये म्हणून कायद्यानें या रोगाचे घोडे मारावे लागतात.

ग र्मी ( डूराइन ).—मनुष्याच्या विकाराप्रमाणें हा रोग असून तो वळू घोड्यांत आढळतो. हिंदुस्थानांत हा फारसा आढळत नाहीं,

स रा.—या रोगानें घोडा सहा सहा महिने तापाच्या पाळ्या येऊन आजारी पडतो, पायावर, पोटाखालीं व छातीखालीं सूज येते, डोळ्याच्या आंतील त्वचेवर तांबडे व जांभळे चट्टे दिसतात. जनावर अशक्त व सुस्त असतें. त्याचें रक्त तपासलें असतां त्यांत सूक्ष्म जंतू दिसतात. याला खात्रीलायक औषध नाहीं. रोगाचा प्रसार होऊं नये म्हणून घोडे मारावे लागतात. कांहीं ठिकाणीं यांसंबंधीं कायदा आहे.

शिं गा डा ( स्ट्रॅंगल्स ).—गळ्याखालील जागेमध्यें अगर कानशिलाच्या बाजूस गांठ येऊन सूज येते, घोड्यास ताप व नाकांतून शेंबूड येतो. सर्दी होते. खोकला होतो, गांठ पिकल्यावर फोडून टाकावी व स्वच्छ धुवून औषधोपचार करावा. बहुतकरून हा रोग वयानें लहान अशा शिंगरांनां फार होतो.

डि स्टें प र.—हा रोग पाळीव कुत्र्यांनां होतो; त्यांनां ताप येतो, हगवण लागते, पोटावर फोड येतात, खोकला येतो, शेंबूड येतो, डोळे चिकटतात व त्यांतून पू येतो. हा रोग औषधोपचारानें बरा होण्यासारखा आहे.

पि सा ळ णें (वेड).—पिसाळलेला कुत्रा जगत नाहीं; परंतु त्याच्या दंशामुळें दुसरीं जनावरें व माणसें यांनां धोका असल्यानें अशा रोगाचें कुत्रें मारुन टाकावें. पिसाळलेलें कुत्रें थंड जागेंत आणि अंधेरांत बसतें, विनाकारण भुंकत असतें, अवाज घोगरा येतो, कुत्रें लाळ गाळतें, जीभ लोंबत असते व पायांमध्यें शेंपूट घालून सरळ रेषेंत मागेंपुढें न पाहतां पुढें असेल त्याला चावीत पळत जात असतें. पिसाळलेल्या कुत्र्यावर लस टोंचण्याची सोय हल्लीं बऱ्याच जिल्ह्यांच्या ठिकाणच्या दवाखान्यांत करण्यांत आली आहे.

जनावरांच्या सांथींच्या रोगाच्या खालोखाल महत्त्वाचे बिनसांथीचे जे कांहीं रोग आहेत, त्यांमध्यें जनावरांच्या पायांनां होणाऱ्या रोगांचा प्रथमतः विचार होणें जरूर आहे. कारण. जनावराचे पाय जर कांहीं कारणानें अधू होतील तर तें जनावर कामास निरुपयोगी होईल. पायांनां होणारे, ज्यामुळें जनावर लंगडूं लागतें ते, बहुतेक सर्व विकार जनावरांची नीट निगा राखल्यास टाळतां येण्यासारखे आहेत. उदाहरणार्थः—हाड किंवा सांधा निखळणें किंवा मोडणें. निष्काळजीपणानें जनावर पडल्यास किंवा मारहाण केल्यानें अशा तऱ्हेच्या इजा होतात. दुसरे कांहीं विकार म्हणजे हड्डी वाढणें हे होत. ह्यामध्यें बेरहड्डी, मुतरा, चक्रावळ वगैरे घोड्यांनां होणाऱ्या रोगांचा समावेश होतो. लचक ही सांध्यामध्यें ( स्नायूमध्यें ) अथवा नसेमध्यें होऊं शकते. पाय उगाळल्यामुळें ( तापलेल्या खडकाळ रस्त्यावरून जनावरांची पुष्कळ चाल झाल्यामुळें ) किंवा गोठ्यांत अगर तबेल्यांत घाण सांचून ती जनावरांच्या पायांच्या गेळ्यांत (पुतळींत) राहूं दिल्यानें तो भाग सडून किडे पडतात त्यामुळें जनावरें लंगडूं लागतात. नालबंदीच्या वेळेस सुंभ फार कापल्यानें किंवा मेखा वर्मी लागल्यानें जनावर लंगडूं लागतें. उपचार करण्यापूर्वी रोगाचें निदान खात्रीलायक झालें पाहिजे. वरपासून खालपर्यंत पाय नीट तपासून पहावा. ज्या पायाच्या भागांत इजा किंवा लंगडण्याचें निमित्त असेल तो भाग किंचित गरम व लाल झालेला दिसेल, दाबलें असतां दुखेल व कदाचित तेथें सूजहि येऊं शकेल. ज्या कारणानें जनावर लंगडतें तें कारण शोधून काढल्याशिवाय उपचार करण्याच्या भानगडींत पडूं नये, व उपचार करणें असल्यास ज्या भागांत इजा आढळून येईल त्या भागापुरताच उपचार करावा. नाहींतर अडाणी लोक फऱ्यापासून खालीं सुंभापर्यंत सर्व पाय चीक घालून किंवा डागून किंवा इतर औषधोपचार करून सुजवतात त्यामुळें जनावरांनां फायदा होण्याच्या ऐवजीं विनाकारण त्रास मात्र होतो व अशा उपचारापासून कांहीं एक उपयोग होत नाहीं साधारणपणें उपचार करणें ते नाल काढून टाकावा व सुंभांमध्यें विकार झाला असल्यास सर्व सुंभ स्वच्छ धुवून काढावेत. कुजका- नासका भाग कापून काढावा. पोटीस ( भुस्साचें ) बांधावें. लचक किंवा हाड वाढलें असल्यास पलिस्तर किंवा डाग द्यावेत. नसा, स्नायू वगैरेंमध्यें लचक भरली असल्यास शेकण्यानें ( गरम

पाण्याच्या वाफेनें ) किंवा थंड पाण्याची सारखी धार धरल्यानें, मालिश केल्यानें, किंवा टरपेन तेल, मोहरीचें तेल, खोबरेल तेल वगैरे लावल्यानें लचक बरी होते.

जनावरांनां कोणत्याहि कारणानें जखम झाल्यास त्या जखमेवर माशा बसून अंडीं घालतात व पुढें किडे पडतात त्यामुळें जनावरांनां चैन पडत नाहीं, जखमेला सूज येते, रक्त वाहूं लागतें व बाजूच्या भागास इजा होते. अशा वेळीं जखमा, फिनाइल मिश्र पाणी करून किंवा मिठाचें पाणी करून त्यानें स्वच्छ धुवून काढाव्यात. सडका भाग काढून टाकावा, किडे चिमट्यानें काढावेत, जखमेभोंवतालची जागा स्वच्छ ठेवावी. रक्त वाहात असल्यास रक्तस्राव बंद होईतों बोटानें रक्तवाहिन्यांचीं तोंडें थोडा वेळ दाबून धरावीत. जखमेंतील पू व पाण्याचा निचरा झाला म्हणजे अर्धे काम झालें असें समजावें. किडे मारण्याकरितां कापूर एक भाग, टरपेन तेल दोन भाग व गोडें तेल चार भाग यांचें मिश्रण करून कापसाचा बोळा जखमेंत बसवावा. दोन चार दिवस असें केल्यानें किडे तेव्हांच मरतील. जनावरांच्या अंगावर किंवा पायांत असलेली जखम केव्हांहि उघडी टाकूं नये, कारण मनुष्यांप्रमाणें जनावरांनांहि–विशेषतः घोड्यांनां–धनुर्वात ( टिटॅनस ) हा रोग जखमेंतून त्या रोगाचे जंतू जाऊन होतो. घोड्यांनां बरसात म्हणून एकप्रकारचा वनस्पतिजन्य रोग, डोळ्याखालीं, गालावर, पायाच्या सांध्यावर जखमा होतात; त्या जखमांमध्यें पेरूच्या बियांसारखा एक कठिण पदार्थ सांपडतो. ते सर्व नाहींसे होईपर्यंत जखम बरी होत नाहीं व चरत जाते. या रोगास पावसाळ्याच्या आरंभीं सुरवात होते व तो सहा महिनेपर्यंत सुद्धां बरा होत नाहीं. ही जखम मोरचुताचा खडा रोज लावीत राहिल्यास लवकर बरी होते.

जनावरांच्या शरीरावरील कातडीला होणारे सर्व रोग मनुष्यांमध्यें होणाऱ्या रोगांप्रमाणें असतात. उदाहरणार्थः — गजकर्ण, नायटे, इसब, खरूज वगैरे. ह्या सर्व रोगांमध्यें विकार झालेली जागा गरम पाणी व साबू यांनीं साफ धुवून काढून कोरडी करावी. केंसाळ भाग असल्यास केंस कापून काढावे, व शुद्ध केलेला गंधक एक भाग, डांबराचें तेल दोन भाग व गोडें तेल चार भाग हीं एकत्र करून चोळून लावावीं व प्रत्येक चार दिवसांनीं असेंच करावें. जनावरांकरितां उपयोगांत आणलेले जिन्नस, उदा० हातळी, झूल, ब्रश वगैरे स्वच्छ कढत पाण्यांत उकळून काढावे. कारण या रोगांचे जंतू फार सूक्ष्म असून त्यांपासून रोगाचा प्रसार होतो.

जनावरांच्या अंगावर गोचिड्या, उवा, पिसवा वगैरे प्राणी आपलें उपजीवन करून जनावरांचें रक्त शोषण करितात व त्यामुळें त्यांच्या विषारी दंशामुळें नाना तऱ्हेचे रोग होतात; अशा रोगांचे शोध लागत आहेत. गोचिड्या, उवा यांच्यामुळें दरसाल कित्येक जनावरें मरतात. हे प्राणी दिसण्यांत जरी लहान असले तरी त्यांच्याकडून अपाय फार होतो. तेव्हां त्यांचा नायनाट केल्यानें जनावरांनां सुख लागून देशाचाहि फायदा होतो. गोचिड्यांची वाढ फार जलद व पुष्कळ होते. त्यांच्यामध्यें नर व मादी असते. त्यांचा नायनाट करावयाचा म्हणजे त्यांच्या माद्या शोधून काढून त्या मारून टाकल्या पाहिजेत. हे प्राणी फिनाईलचें पाणी, तंबाखूचें पाणी, तपकीर, कडू तेल वगैरे चोळल्यानें खालीं पडतात; परंतु मरत नाहींत. नुसतें अंगावरून खालीं पाडल्यानें काम भागत नाहीं.त्यांनां,तर जाळून टाकलें पाहिजे.मादी साधारणपणें दिसण्यांत मोठी, रंग काळसर तांबूस, पोट मोठें, चालण्यांत सुस्त अशी असते.

जनावर प्रथमतः कामास लावल्यास त्याचा खांदा व घोड्याची छाती सुजते किंवा पावसाळ्याच्या आरंभीं बऱ्याच दिवसांच्या विश्रांतीनंतर एकदम आउताच्या कामास जनावर लावल्यानें खांदा सुजतो, जनावराला खालीं मान करून पाणी पितां येत नाहीं,किंवा चारा खातां येत नाहीं,व सुजलेला भाग दुखतो व कढत लागतो. अशा वेळीं जनावरास काम न देतां मान शेकून काढावी; ती काव व खोबरेल तेल एकत्र करून मर्दून काढावी. मानेवर जूं अगर आउत ठेवण्याच्या जागीं लहानमोठ्या गांठी येतात. केव्हां केव्हां गळवें होतात किंवा नुसते चट्टेहि पडतात.मोठ्या शहरांमध्यें गुरांनां असे चट्टे कायमचे पडून खांदा ओबडधोबड, जाड व गलिच्छ राहतो. गळवांमध्यें पू, पाणी किंवा नासकें रक्त असतें. यावर वेळींच शस्त्रक्रिया करून घेतल्यास पुष्कळ उपयोग होतो.

जनावरें एकमेकांशीं झुंजतांना ( लढतांना ) किंवा खालीं पाडलीं जातांना किंवा कोठें तरी अडकून त्यांच्या शिंगाचें कवच भिंगून येतें व आंतील गाभा लालभडक व रक्तबंबाळ होतो; अशा वेळीं गाभा स्वच्छ धुवून काढून तेलांत चिंधी भिजवून ती गाभ्याच्या भोंवतीं गुंडाळावी व वर दुसरें फडकें बांधावें. केव्हां केव्हां शिंग आडवें मोडून पडतें, रक्तस्राव फार होतो; तेव्हां करवतीनें शिंगाचा मोडका भाग सरळ कापून त्यावर राळेची पूड लावून वर तापलेल्या उलथण्यानें चरका द्यावा म्हणजे रक्त बंद होऊन राळेच्या योगानें शिंगाचें मोडकें टोंक उघडें पडत नाहीं. नंतर दोन दोन किंवा चार चार दिवसांनीं शिंग स्वच्छ धुवून काढून त्यावर डांबरामध्यें कापूस बुडवून बोळा बसवीत जावा.

शिं ग ड.—या नांवाचा आणखी एक विकार शिंगांनां होतो. त्यामध्यें शिंगाला आंतून कीड लागून आंतील भाग सडतो, शिंग हळू हळू वांकडें होऊं लागतें, मुळाशीं हलूं लागतें व कांहीं दिवसांनीं गळून पडतें. शिंग गळून पडल्यानंतर जनावर बरें न होतां खंगत जाऊन मरतें. शिंगाला अतिशय घाण येते. यावर अद्याप खात्रीलायक उपाय सांपडला नाहीं. शिंग वांकडें होऊं लागलें आहे असें दिसून येतांच तें मुळांत कापून काढावें व उपचार करावा म्हणजे बरें होण्याचा संभव असतो.

जनावरांच्या कानांत मळ फार झाल्याकारणानें त्याचे कान ठणकूं लागतात, कानातून पू वाहूं लागतो व मान बाजूला कललेली असते. कानांत कोमट पाण्याच्या पिचकाऱ्या मारून कान आंतून धुऊन काढावा. तुरटीची लाही करून तिची वस्त्रगाळ पूड कानांत फुंकून घालावी.

मोटेच्या व आउताच्या कामाच्या बैलांच्या कानांना दोरीचा घट्ट वळसा घातल्यानें कान निर्जीव होतो व वांकून खालीं गळलेला दिसतो. रंवथ करून करून अगर चर्वणानें जनावरांच्या दाढांना धार येते,त्यामुळें तोंडांतून फेंस गळतो, गालांत घास राहतो व अर्धवट चावलेला चारा बाहेर पडतो. यास दाढांची धार घांसून काढली म्हणजे गुण येतो.

केव्हां केव्हां जनावरांच्या टक्करीमध्ये नसेला झालेल्या इजेमुळें डोक्यापासून तोंडापर्यंत एक बाजू लुली पडते, त्या बाजूच्या गालांत घांस रहातो, डोळा बारीक दिसतो, कान गलित दिसतो व जनावर अर्धांगवायु झाल्याप्रमाणें दिसतें.

जनावरांच्या जिभला, ओठाच्या आंतील बाजूस, गालफडांत, जिभेखालीं, टाळयावर किंवा पडजिभेला कांहीं इजा झाल्यास तोंड गरम लागतें, तोंडातून लाळ अगर फेंस येतो, जनावाराला खातां येत नाहीं, व ढास लागते. अशा वेळीं तुरटी अथवा टाकणखार व बाभळीच्या सालीच्या पाण्यानें तोंड धुवून काढावें. केव्हां केव्हां कणसाचा बुडखा, कडब्याचें बाटूक, आंब्याची कोय किंवा असाच एखादा पदार्थ नरडींत अडकला म्हणजे जनावराचा जीव घाबरा होतो, डोळे तारवटलेले असतात., जनावर ऊठबस करतें, पोट फुगतें व उपचार वेळेवर न केल्यास जनावर गुदमरून मरून जातें. अशा वेळीं तोंड नीट उघडून पहावें.काहीं पदार्थ अडकलेला असल्यास तो त्वरित काढून टाकावा व काढून टाकणें शक्य नसल्यास वारंवार गोड्या तेलाचे घोट देऊन तोंडांतील पदार्थ हळू हळू चोळून पोटाकडे हाताने ढकलावा.

जनावराच्या जबड्याच्या हाडाला एखादी कठिण गांठ येते व ती बरीच मोठी होते. केव्हां केव्हां तींत पू होतो, त्याला मांजरी असें म्हणतात. कधीं सगळी जीभ लांकडासारखी कठिण होते, ती वळत नाहीं अशा वेळेला जनावराला खाता न आल्यामुळें जनावर अशक्त व रोड होतें. पालाशअदिद ( पोटॅशिअम आयोडाइड ) नांवाचें इंग्रजी औषध देत राहिल्यास आठ पंधरा दिवसांत गुण येऊन जीभ नरम होऊन जनावर नेहमींप्रमाणें खाऊं लागतें. डोळयाला होणारे विकार म्हणजे खुपऱ्या, वडस, मोतीबिंदु वगैरे होत. या रोगावर माणसांना उपयोगीं पडणारीं औषधें जनावरांना उपयोगीं पडतात.

जनावरांना पचनेंद्रियाचे रोग मोठया प्रमाणात होतात. अजीर्ण, जुलाब, आंव, पोटदुखी, पोटफुगी वगैरे नेहमीं दिसून येतात.यांतील बहुतेक विकार खाण्यापिण्याच्या हयगयीमुळें होतात. पोटफुगीपासून मृत्यूहि येतात. डाव्या बाजूची कूस फुगलेली दिसते. आंत हवा भरलेली असते. जनावर ऊठबस करतें, वारंवार थोडी थोडी लवडी होते; पाय ताणतें व वेळेवर उपचार न झाल्यास जनावर मरतें. त्याच्यावर तात्कालिक व सोपा उपाय म्हणजे अर्धा ते एक तोळा हिंग, दोन ते चार तोळे टरपेन तेल व अर्धाशेर गोडें तेल एकत्र करून द्यावें, जनावर फिरतें ठेवावें, व पोट उतरल्यानंतर दोन तासांनीं पाणी व वैरण घालावी.दुसऱ्या दिवशीं एखादें जुलाबाचें औषध द्यावें. अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं औषध मिळालें नाहीं व पोट अतिशय फुगलें आहे असें दिसून आल्यास एक जाड खिळा लाल तापवून डावी कूस जेथें फार फुगलेली असेल त्या फुगेच्या मध्यावर त्या खिळयानें भोंक पाडावें म्हणजे आतील हवा निघून जाऊन जनावर तावडतोब बरें होतें. खिळयानें पाडलेलें भोंक औषधोपचारानें भरुन येतें. शाळूचें पीक अगदीं कोवळेपणीं जनावरानें खाल्ल्यास त्यांत असलेल्या विषापासून ( ॲसिड हायड्रोसिअन ) जनावर तावडतोब मरतें व त्याला किरळ लागलें असें म्हणतात. पीक खाता न येईल असें मुसकें घातल्यास जनावरांना असे अपघात कमी होतील.

घोडयाचा पोटदुखी हा रोग फार घातुक असतो. रोगाचें निदान झाल्याशिवाय औषध नीट लागू पडत नाहीं. घोडयाच्या पोटदुखीला साधारणपणें कुरकुरी म्हणतात' काळीज, प्लिहा वगैरे पोटातील रोग फार थोडया प्रमाणांत होतात व त्यांची चिकित्सा करणें फार कठिण असतें.घोड्यांना कावीळ होते; तिचीं चिन्हें माणसाला होणाऱ्या काविळीसारखीं असतात. लघवी पिंवळी व लाल होते, लीद पांढरी असते, डोळे, नाक व तोंड यांची आंतील त्वचा पिंवळी दिसते, भूक मंद होते, किंचित ताप असतो, व काळजाच्या जागेवर दाबलें असतां दुखतें.

गाईम्हशींच्या व मेंढयांच्या काळजांत किडे पडतात. त्याचीं चिन्हें-जबडयाखालीं धावरे येतें, परसाकडेस पातळ व काळें होतें, त्यास घाण येते व कितीहि उपचार केले तरी गुण येण्याचा संभव नसतो. मुबलक मीठ खाण्यास दिल्यास यावर उपयोग होऊं शकेल.माणसाप्रमाणें जनावरांना विशेषतः पित्त अंगावर उसळतें, अंगाला कंड सुटून गोधडीसारखे ओवडधोवड चट्टे पडतात व थोड्या वेळानें मावळतात. जनावरांना त्यांच्या पोटांत व आंतडयांत निरनिराळे जंत होतात. ते वाटोळे, लांब, बारीक सुतासारखे, चपटे, व नाडीसारखे असतात. विशेषतः लहान वासरें व घोडे यांना वाटोळे लांब जंत होतात. टरपेन तेल, हिंग, सँटोनाईन पोटांत दिल्यानें गुण येतो. बारीक सुतासारखे जंत बहुधा घोडयांना फार होतात. जुलाबाचें औषध पोटांत देऊन टरपेन तेल अगर मीठ यांच्या पाण्याचा बस्ती दिल्यास गुण येतो. चपटे नाडीसारखे जंत कुत्र्यांना बऱ्याच मोठया प्रमाणांत होतात. त्यांच्यावर चिकणी सुपारी उगाळून देतात.जनावरांना पुष्कळ वेळां अवरोध होतो. सावणाच्या पाण्याचा बस्ती दिल्यास तात्पुरता गुण येतो.

फुप्फुसांचा दाह, सूज, जलोदर, हृदयाचे विकार वगैरे सर्व रोग जनावरांनां होतात. दुभत्या जनावरांची कांस सुजून आंतून दुधाऐवजीं पाणी, पू, रक्त किंवा दुधाच्या गांठी येतात. सगळें दूध न काढल्यानें, थंडीमुळें, कोणत्याहि प्रकारें कांसेला इजा झाल्याकारणानें हा रोग होतो; ह्याला घांवरें असें म्हणतात. याच्यावर उपाय करणें तो खाणें अगदीं कमी करून आंबोण, सरकी वगैरे बंद करावी. वारंवार कांस पिळून काढावी. दिवसांतून दोनचार वेळ बोळयाच्या वाफेनें शेक द्यावा. जनावरें व्याल्यानंतर अशक्तपणामुळें वेणा बंद पडून वार पडत नाहीं. ती वार लवकर काढून घ्यावी नाहीं तर त्यापासून धुपणीचा विकार होतो व जनावर दुधाला कमी पडून अशक्त होतें. मनुष्यांप्रमाणें गुरांनांहि क्षय होतो; पण तो हिंदुस्थानांतल्या जनावरांत फार थोड्या प्रमाणांत असतो. क्षयी जनावरांचें दूध पिऊं नये. प्रसूतीच्या वेळीं पुष्कळ वेळां वासरूं आडवें येतें. त्याचे पुष्कळ प्रकार आहेत. वेळींच योग्य तऱ्हेनें उपाय न केल्यास दोघांच्याहि जीवास धोका पोंचतो.

खच्ची करणें.—पशुवैद्यकामध्यें शस्त्रक्रिया करण्याचे विशेष प्रसंग येतात. त्यांतल्या त्यांत जनावरें खच्ची करण्याचे उद्देश निरनिराळे असतात. वाईट बैलापासून उत्पत्ति चांगल्या तऱ्हेनें होत नाहीं असें सिद्ध झाल्यानें अशा बैलांनां खच्ची करण्याचा प्रघात आहे. खच्ची केलेलें जनावर लवकर माणसाळतें, रागीट होत नाहीं व शरीराच्या ठेवणींत फरक पडतो. पुठ्ठा व ढुंगण हीं चांगलीं भरतात, वशिंड, खांदा व मान मांसल होत नाहींत व त्यामुळें जनावर चपळ रहातें. सुधारलेल्या शेतकीच्या हलक्या आउतांनां जोडण्याचे बैल लहानपणीं खच्ची केलेले असावेत. जुन्या पद्धतींचीं आउतें, ज्यांमध्यें शक्तीचा उपयोग जास्त लागतो, त्यांस उपयोगांत आणावयाचे बैल पूर्ण वयांत आल्यावर खच्ची करावेत. खच्ची करण्याच्या पूर्वी ज्या कामाला, जनावर उपयोगांत आणावें लागेल त्या कारणाचा प्रथम विचार केला पाहिजे. हलकें काम असल्यास लहानपणीं खच्ची करणें चांगलें. जड व शक्तीचीं कामें असल्यास पुरी वाढ झाल्यावर करणें चांगलें. खच्ची करण्याचा मुख्य परिणाम म्हणजे नराची मादीवर चढण्याची इच्छा नाहींशी होते. जनावराचें वृषण काढल्यानें वीर्य उत्पन्न होत नाहीं. वृषण काढण्याच्या पूर्वीच्या ज्या कांहीं पद्धति आहेत त्यांमुळें मुक्या जनावरांनां अतिशय दुःख होतें. एका पद्धतींत वृषण ठेंचून काढतात. दुसऱ्यामध्यें दोऱ्या तोडतात किंवा मळतात. पहिल्या पद्धतींत अतिशय वेदना व रक्तस्राव फार होतो. दुसऱ्या तऱ्हेनें खच्ची केल्यास पोटाखालीं सूज फार येते, जनावर खातपीत नाहीं, व दोऱ्या अर्धवट तोडल्या गेल्यास खच्ची करण्याचा उद्देश सिद्धीस न जातां जनावर मारकट व त्रासदायक होतें. पाश्चात्त्य पद्धतीप्रमाणें खच्ची करणें चांगलें. यामध्यें वृषणावरच्या पिशवीस शस्त्रानें चीर पाडून वृषण बाहेर ओढून धरतात व ज्या शिरांनां अगर नसांनां वृषण लोंबत असतें त्या शिरा चिमट्यांत दाबून धरून त्या शिरा दुसऱ्या चिमट्याच्या साहाय्यानें हळू हळू तुटेपर्यंत पीळ देतात यामुळें रक्तस्राव मुळींच होत नाहीं, वेदना होत नाहींत, सूज येत नाहीं, व जनावर खाणेंपिणें बंद करीत नाहीं. या कृतीमध्यें वैगुण्य म्हणजे, अशा रीतीनें जखम झालेली असते की तिच्याकडे मालकाचें दुर्लक्ष होतां कामा नये. जखम नीट धुवून स्वच्छ ठेवल्यास जनावर आठ दहा दिवसांत बरें होतें. रबारी, धनगर, व भिल्ल लोक शस्त्राच्या ऐवजीं धारेच्या गारगोटीच्या योगानें चीर पाडतात व वृषण कापून काढतात. खेडेगांवांतून बहुतकरून मांग लोक जनावरें जुन्या पद्धतीनें खच्ची करतात व तीं नीट रीतीनें होत नसल्याकारणानें केव्हां केव्हां जनावरें जायबंदी होतात व दगावतात. जनावरांच्या दवाखान्यांतून शस्त्रक्रियेनें खच्ची करणें चांगलें.

पैदाशीचीं मूलतत्त्वें.—पशुवैद्यकामध्यें जनावरांची पैदास हा एक महत्त्वाचा भाग आहे. जनावरांची शास्त्रीय रीत्या पैदास केल्यास शेतीचीं व दुभत्याचीं जनावरें सुधारतां येतात. इकडे आपल्या लोकांचें जितकें लक्ष जावें तितकें जात नाहीं म्हणून हल्लीं दिवसानुदिवस जनावरें खुजीं व अशक्त निपजूं लागलीं आहेत. आपल्या इकडल्या गाईला वेळेस दोन तीन शेर दूध आलें म्हणजे पुष्कळ झालें असें वाटतें; पण अशा गाईपासून शास्त्रीय रीत्या दोन तीन पिढ्या पाद्यशुद्ध पैदास केल्यास पुढील होणाऱ्या गाई वेळेस दहा पंधरा शेर दूध देऊं शकतील. जनावरांची पैदास करणारांनीं खालील तत्त्वें पूर्णपणें लक्षांत वागविलीं पाहिजेत. तीं अशीं:— (१) पैदासीकरितां उत्तम वळू असावा (२) वाईट मादीपासून पैदास करूं नये. (३) ज्या जातीच्या माद्या असतील त्या जातीपेक्षां चांगल्या जातीचा वळू ठेवावा; कारण वळू वाईट असल्यास प्रजा वाईट होईल. (४) अगदीं जवळ नातें असलेल्या नरमादींपासून पैदास करूं नये. (५) लहान कालवडी व गोऱ्हे यांची जोपासना नीट रीतीनें ठेविली पाहिजे. ज्याप्रमाणें उत्तम जमीन असली तरी उत्तम धान्य उत्पन्न करण्यास उत्तम बियाण्याची जरूर लागते त्याप्रमाणें जनावरांची पैदास करून अवलाद सुधारण्यास उत्तम माद्यांप्रमाणें उत्तम नरांचीहि जरूर असते. जर वळू चांगला नसेल तर त्यापासून होणारी प्रजा चांगली होणार नाहीं. कारण, त्याच्यापासून होणाऱ्या प्रजेच्या शरीरांतील ठेवणीचा भाग पुष्कळसा वळूच्या ठेवणीवर अवलंबून असतो. तान्ह्या जनावरांचा बांधा बहुतकरून त्यांच्या आईसारखा असतो व गुण मात्र बापाच्या (वळूच्या) गुणांप्रमाणें असतात. मादी प्रथमतः माजावर आली म्हणजे तिला चांगलाच वळू दाखविला पाहिजे. जर तिला एकदां वाईट वळू मिळाला तर तिच्या मनावर व कोठ्यावर जो परिणाम होतो त्यामुळें तिला पुढील खेपेस चांगला वळू दाखविला तरी प्रजा चांगली निपजत नाहीं.

म्हणून पहिलटकरीण मादीस उत्तम वळू दाखविण्याची खबरदारी घ्यावी. वळूची पुरी वाढ झाल्याशिवाय त्याला मादीवर चढूं देऊं नये कारण त्याच्या पूर्वी तो चांगला वयांत आला नसल्याकारणाने त्याच्यापासून प्रजोत्पत्ति चांगली होत नाहीं व कित्येक वेळां गर्भधारणा होत नाहीं. प्रत्येक तीन चार वर्षांनीं वळू बदलावा. वळूशिवाय इतर अंडील नर कळपामध्यें येऊं देऊं नयेत. वळूला निराळी चंदी अथवा खुराक देणें जरूर आहे. वळू देखणा, नमुनेदार, असावा व त्याची प्रकृति तनदुरुस्त असावी. त्याचीं जननेंद्रियें पूर्णत्वास आलेलीं असावींत व त्याच्यांत मादी फळविण्याची उमेद व ताकद असली पाहिजे. जनावरांची उत्तम निपज होण्यास दुसऱ्या एका गोष्टीकडे कानाडोळा करतां कामा नये. ती गोष्ट म्हणजे लहानपणीं जनावरांची खाण्यापिण्याची आबाळ होऊं देतां कामा नये. मादी वयस्क झाली म्हणजे तिच्यापासून पैदास करूं नये. [ ले. यशवंत नारायण मराठे ].

**पसारगडी**—हें प्राचीन इराणी शहर सांप्रतच्या मुर्घाब मैदानात वसलेलें होतें. हें पूर्वी एका इराणी जातीचें नाव असून या जातीपासूनच सायरस व दरायस यांचीं राजकुलें उदयाला आलीं. सायरसनें अस्त्यागसशीं शेवटची लढाई येथें केली. विजयानंतर सायरसनें एक शहर वसवून यांत एक राजवाडा व स्वतःची छत्री बांधविली. इराणच्या प्रत्येक राजास ह्या ठिकाणीं राज्याभिषेक होई. प्रत्येकाला सायरसचा झगा घालून अंजीर व टरपेन्टाईनफळाचें जेवण व दहीं घ्यावें लागे. पसारगडी नंतर दरायसनें वसविलेलें पर्सेपोलीस शहर राजधानी झालें. ख.३३६ त शिकंदरनें येथें असलेला खजिना घेतला. सध्यां येथें एक चौक व सायरसचा लेख असलेल्या तीन इमारतींचे अवशेष आहेत. शहराबाहेर मनोऱ्यासारख्या दोन कबरी, व सायरसची कबरहि आहे.

**पहरा**—बाघेलखंडाच्या पोलिटिकल एजन्टच्या देखरेखीखालील मध्यहिंदुस्थानातील एक चौबे जहागीर. क्षेत्रफळ २७ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें साडेतीन हजार. ही इस्टेट स. १८१२ मध्यें, कालिंजरचा रामकृष्ण ह्याचा पुत्र शालिग्राम चौबे यास देण्यात आली. १८५७ सालीं मधुसूदन यानें ब्रिटिशास चागली मदत दिली. स. १८६८ मध्यें रावबहादुर राधाचरणजू हा गादीवर आला. जहागिरीचें उत्पन्न १३००० रु. आहे.

**पहलवी**—किंवा पेहलवी. झोरोआस्टरचे अनुयायी आपल्या पवित्र ग्रंथाचीं जुनीं भाषांतरें ज्या लिपींत लिहिलीं आहेत तिला पेहलवी अशी संज्ञा देतात. ही संज्ञा फार जुन्या काळापासूनची आहे. फरदौसी(१० वें शतक) वारंवार आपल्या इतिहासांत पेहलवी ग्रंथ आधारभूत झाले असा उल्लेख करतो व पहिल्या खुश्रू( इ. स. ५३१–५७९ )च्या कारकीर्दीत इराणांत पेहलवी-लिपीखेरीज दुसरी लिपीच नव्हती असें सांगतो. आठव्या शतकांतील विद्वान इब्नमोकाफा, इराणांत पेहलवी ही राजभाषा होती असें प्रतिपादन करतो. अरबी काळापूर्वी कोणत्या अक्षरमालांना पहलवी म्हणत असत हें ठरवितां येत नाहीं. कदाचित पहलवी हें नांव कांहीं भाषांना त्या काळीं असेल असेंहि निश्चित सांगतां येत नाहीं. तरी पण एका विशिष्ट तऱ्हेच्या लिपीलाच ही संज्ञा असावी असें वाटतें. हल्लीं पहलवी ग्रंथांतील लिपीला व या ग्रंथासारखेच लिहिलेले जे शिलालेख व धातुलेख आहेत त्यांतील लिपीला पहलवी ही संज्ञा लावतात.

पहलवी ग्रंथांकडे नजर टाकल्याबरोबर त्यांतील भाषेची चमत्कारिक भेसळ कळून येते. शुद्ध सेमिटिक शब्द फारसी शब्दांशीं जोडलेले आहेत. बऱ्याच ठिकाणीं सेमिटिक शब्दांचे संधी नियमबाह्य आहेत व कांहीं सेमिटिक शब्दांना फारसी प्रत्यय जोडण्यांत आलेले आहेत. सध्यांचे झोरोआस्ट्रियन लोक वाचतात त्यांतील कांहीं शब्द सेमिटिकहि नाहींत व फारसीहि नाहींत. त्यांची उच्चारपरंपरा विश्वसनीय नाहीं हें लगेच कळून येतें. लिपि तर फर्डेशाही (भरभर लिहिलेली) व अनेकार्थी आहे. 'न', 'व' आणि 'र' करितां एकच सेमिटिक चिन्ह आहे, तसेंच य, ड आणि ग ह्या वर्णांबद्दल बरेच दोष घडून येतात. पहलवी सेमिटिक आहे ह्याबद्दलचा वाद आतां मिटला व असें सिद्ध झालें कीं पर्शियन सेमिटिक लिपीमध्यें लिहितात; डोळ्यांना फक्त सेमिटिक शब्द दिसतात पण कानांना ते फारसी ऐकूं येतात. तेव्हां ही एक पर्शियन शब्द कांहीं अंशीं समानार्थ सेमिटिक शब्दांमध्यें दर्शवणारी पर्शियन लोकांची लिहिण्याची पद्धत आहे. इब्न मोकाफा यानें पुष्कळ पहलवी ग्रंथ अरबींत लिहिलेले आहेत. तो म्हणतो कीं, ज्याचा पर्शियनमध्यें उच्चार करीत पण निराळ्या तऱ्हेनें लिहीत असे, एक हजार शब्द पर्शियन लोक वापरीत असत. भाकरी म्हणावयाची असल्यास ते 'नॉन्' असा उच्चार करीत पण 'लुह्मा' असें लिहीत. तसेंच मांसाला गोष्त असें म्हणत पण 'बुसरा' असें लिहीत. इंग्लिश भाषेमध्यें ज्याप्रमाणें एल् (लिब्रा) चिन्हाचा 'पौंड' असा उच्चार करतात किंवा 'आय इ' अक्षरें लिहून 'दॅट इज' असें वाचतात त्याचप्रमाणें पर्शियन लोक अशा तऱ्हेचा उपयोग फार मोठ्या प्रमाणावर करीत. पर्शियनमध्यें समानार्थी अशीं सेमिटिक शब्दांचीं रूपें करतांना फार घोंटाळा दृष्टीस पडतो. एक क्रियापद पूर्णभूतकाळांत तर दुसरें अपूर्णभूतकाळांत। कधीं पर्शियन समानार्थी शब्दांकरितां सेमिटिक चिन्ह जें वापरावयाचें तें वाटेल तें दडपून दिलें आहे. जसें, पर्शियनमध्यें 'खवेश' आणि 'खवत' ह्या दोहोंचा अर्थ स्वतः असा आहे; पण पहिलें 'न् फ् श् ह्' व दुसरें 'घ् न् फ् श् ह्' असें लिहितात. पुरुषवाचक सर्वनामें 'ल' हा उपसर्ग लावून चतुर्थी विभक्तींत योजीत असत; जसें:'तू' = तूं बद्दल 'लक्'; अमा = आम्ही बद्दल 'ल् न् ह्'. कधीं कधीं दोन निरनिराळ्या परंतु सारख्या ध्वनींच्या फारसी शब्दांबद्दल तेंच सेमिटिक चिन्ह वापरतात. एका सेमिटिक शब्दानें दोन फारसी शब्द दाखविले जातात, अशा प्रसंगीं

केव्हां केव्हां लेखकाचा इच्छित चटकन् लक्षांत येण्यासाठीं सेमिटिक फारसी प्रत्यय लावतात.

पहलवी वाचतांना ज्या ज्या अडचणी येतात त्या कांहीं पहलवी अक्षरें जीं १, २, ३, +, – यासारखीं कल्पनाबोधक चिन्हें आहेत तीं समजून घेतल्यास कमी होतील. संदिग्ध व अनेकार्थी अक्षरांच्या संघाला कोणता सेमिटिक शब्द वापरावा हें जरी कळलें नाहीं तरी त्यांचा फारसी शब्द बनतो हें ओळखण्याला कधींहि अडचण पडत नाहीं; मात्र नेहमींच त्या वेळच्या ग्रंथकारांनीं केलेला उच्चार व आतां होत असलेला उच्चार जमतीलच असें नाहीं. ज्यांतील वाङ्मय फार जुनें आहे अशा पुष्कळ भाषांमध्यें शब्दांचें रूप जुनें, पण उच्चार नवे असा चमत्कार दृष्टीस पडतो. इंग्रजींत 'थ्रू' ह्या शब्दांतील 'ग' ह्या कंठ्यवर्णाचा उच्चार करीत नाहींत; तसेंच ह्या एल् ए यू जी एच् या अक्षरसमुच्चयाचा 'लाफ' असा उच्चार होतो. अक्षरें भराभर लिहिण्याच्या पद्धतीपासून फारच घोटाळे उडाले आहेत. कांहीं अक्षरसंघ असे आहेत कीं ते शेंकडों रीतींनें वाचतां येतील. हल्लीं एकच दिसणाऱ्या अक्षरांत पूर्वीच्या काळीं कांहीं तरी थोडा फरक होता. ज्यांनीं ही भाषा समजे, त्यांनां आपणाला आतां वाटतात तितक्या अडचणी भासत नव्हत्या. अरब लोकांनीं अशाच तऱ्हेच्या संदिग्ध व अनेकार्थी लिपीचा पुष्कळ दिवस उपयोग केला पण त्यांच्याहि पूर्वी तयार केलेल्या उच्चारभेददर्शक खुणा त्यांनीं घेतल्या नाहींत हें विशेष आहे.

सध्यांच्या हस्तलिखित ग्रंथांतून वेळोवेळीं कांहीं उच्चारभेददर्शक खुणा केलेल्या आढळतात. पण यांपेक्षां पहलवी मूलग्रंथांतून अवेस्ता हा धर्मग्रंथ ज्या लिपींत लिहिला आहे त्या सुबोध लिपींत उतरलेल्या पाझंद ग्रंथाचा फार उपयोग होतो. हा ग्रंथ (हा उतारा) भाषाशास्त्रदृष्ट्या निर्दोष नसेल व नाहीं, पण पहलवीची कल्पना येण्यास पाझंदची फार जरुरी आहे ग्रंथकर्त्यांचे स्वतःचे उच्चार (त्याच्या लिखाणाचे) कांहीं अंशीं जसेच्या तसे देण्यास आणखी गुणदोषविवेचनासंबंधीं परिश्रम केले पाहिजेत.

मागाहून गादीवर आलेले सस्सानिद राजे, तबरिस्तानचे अधिपती आणि प्राचीन अरबांच्या काळांतील सुभेदार यांनीं पाडलेल्या नाण्यांवरील लिपी व पहलवी हस्तलिखितांतील लिपी जवळ जवळ सारखीच आहे. अगदीं जुन्या नाण्यांवरील अक्षरें स्पष्ट वाचतां येतात. हीच गोष्ट जुन्या सस्सानियन कारकीर्दीतल्या रत्नांवरील व इतर लहान आटनर्णाकारीनें केलेल्या जिन्नसांवरील कोरीव लेखांविषयीं आहे. पण सुबोध व सुवाच्य म्हटलें तर तिसऱ्या आणि चवथ्या शतकांतील सस्सानियन शिलालेख. हीं नाणीं, रत्नें व शिला यांवरील भाषेंतील अक्षरें व लिहिण्याचें वळण आणि हस्तलिखितांतील लिपि व वळण, हीं दोन्हीं मुळांत एकच आहेत. भाषा शुद्ध फारसी व कांहींशीं सेमिटिक भाषेमध्यें गुरफटलेली आहे. सविस्तर रीतीनें पाहिलें असतां खोदीव लेखांतील पहलवी व ग्रंथांतील पहलवी ह्यांमध्यें पुष्कळ फरक आहेत; तथापि पहलवी इतिहासांतील बऱ्याच लहान मोठ्या मुद्द्यांवर ह्या खोदीव लेखांनीं चांगला प्रकाश पाडला आहे.

कांहीं अति प्राचीन सस्सानियन खोदीव लेखांबरोबर एक लिखाण सांपडलें. त्यांतील लिपि कांहींशी निराळी आहे. ही लिपि सुद्धां कांहीं रत्नांवर व शिक्क्यांवर आढळते. हिला खाल्डिअो पहलवी म्हणतात. ही पार्थियांतील लिहिण्याची पद्धत व दुसरी अरेमाईक पहलवी ही इराणची पद्धत आहे असें ओलशॉसेन म्हणतो.

पहलव हें नांव जुन्या पार्थव शब्दाचें पर्शियनमधील रूपांतर होय; तेव्हां पहलवी म्हणजे पार्थियन. ह्यावरून असें सिद्ध होतें कीं, ह्या लिहिण्याच्या पद्धतीची वाढ पार्थियन काळामध्यें झाली असावी; ह्याला इतर पुरावेहि आहेत; पण तिची वाढ कशी झाली हें अद्यापि गूढच आहे. एवढें निश्चित आहे कीं, हखामनी राज्यांत अरेमाईक लिहिणें व वाचणें राज्यकारभारात सुद्धां, अरेमाइक प्रदेशांबाहेर चालत असे. तेव्हां इराणी लोकांनां स्वतःची उपयुक्त लिपि नसल्याकारणानें, जशी त्यांनीं पुढें अरबी लिपि उसनवार घेतली, त्याचप्रमाणें सहजगत्या हीं अरेमाइक वर्णाक्षरें घेतलीं असण्याचा संभव आहे पण ह्यावरून, फारसी शब्दांच्या नांवीं सेमिटिक शब्द लिहून ते फारसी म्हणून वाचावयाचे, ही चमत्कारिक चाल कशी पडली ह्याचा उलगडा होत नाहीं. ही एकाच व्यक्तीनें काढलेली कल्पना होऊं शकणार नाहीं, कारण तसें असतें तर त्यांत विसंगतता राहूं शकली नसती, व पहलवी भाषेंत दोन किंवा अधिक प्रकार दिसले नसते. खालच्या टायग्रिस आणि युफ्रेटिस प्रदेशांत, लेखनाची चांगली व सुबोध तऱ्हा निघाल्यावर सुद्धां पुष्कळ दिवसपर्यंत गुंतागुंतीची कीलाकृति अरेमाइक वर्णमाला चालू होती व ती तेथेंच अस्तित्वांत पण आली होती व तेथून इराणी लोकांनीं ती आणली. प्राचीन काळच्या अखेरीस देखील, बहुधा थोड्याच पर्शियन लोकांस लिहितां वाचतां येत असे. झोरोआस्ट्रियनांची, बहुधा सहाव्या शतकांतील पवित्र धर्मग्रंथांचीं भाषांतरें, मुख्यतः मिनोई-खिर्द आणि बुंदाहिश हे ग्रंथ पहलवी वाङ्मयांत येतात.

नवीन राज्य, नवीन धर्म, नवीन (फारशी) भाषा आणि नवीन लिपि अस्तित्वांत आल्यावर सुद्धां पुष्कळ दिवसपर्यंत झोरोआस्ट्रियन धर्मगुरु जुन्या (पहलवी) लिपीचा व भाषेचा उपयोग करीत. एके काळीं भ्रष्ट, धर्मबाह्य वाङ्मय फार असे; त्यापैकीं पुष्कळसें, अरबी व नवीन पर्शियन भाषेमध्यें उतरून घेतलें आहे. अद्याप कांहीं थोडें वाङ्मय पहलवीमध्यें शिल्लक आहे.

**पळस**—एक प्रकारचें मध्यम प्रतीचें झाड. हें हिंदुस्थान व ब्रह्मदेश येथें बरेंच आढळतें. याचीं फुलें लाल व

भपकेदार रंगाची असतात. त्यांपासून पिंवळा-कच्चा रंग तयार होतो. या झाडावर लाखेचा किडा पोसला जातो. याच्या-पासून गोंद निघतो; त्याला चुनियागोंद, कमरकस, पळसकी इत्यादि नांवें आहेत.

रंग व कातडें कमावणें या दोन्ही कामीं या गोंदाचा उपयोग होतो. सालीपासून एक प्रकारचा तंतु निघतो. याच्या बियांपासून स्वच्छ व चकचकित तेल काढतात, तें औषधी आहे. म्हशीस याच्या पानांची वैरण होते. लांकूड जमिनीवर टिकत नाहीं परंतु पाण्यांत फार चांगलें टिकतें. याच गुणास्तव त्याचे पोहरे, खांब, खुंट, वगैरे बनवितात.

**पळसगड जमीनदारी**—मध्यप्रांत, चांदा जिल्हा. क्षेत्रफळ २६२ चौरस मैल. हींत ९० खेडीं आहेत. पैकीं ओसाड पांच. ११७ चौ. मैल जमिनीची पाहणी झाली नसून तेथें सर्व जंगल आहे. लागवडीखाली एकंदर जमीन १३००० एकर असून मुख्य पीक भात आहे. एकंदर उत्पन्न ६९३३ रु. टांकोळी ६२० रु. आणि इतर कर २२० रु. आहे. लोकसंख्या सुमारें ८ हजार असून यांत पळसगड, कुरखेडी आणि मल्लिवार हीं मुख्य खेडीं आहेत. येथील घराणें राजगोंड आहे.

**पळसगांव जमीनदारी**—( १ ) मध्यप्रांत जिल्हा भंडारा. हींत फक्त दोनच खेडीं ( पळसगांव आणि पिपरी ) आहेत. पळसगांव येथें एक सुंदर तळें आहे. हल्लींच्या रजपूत घराण्यास ही इ. स. १७५१ च्या सुमारास मांडल्याचा राजा निजामशहा यानें दिली असें दिसतें. हिचें उत्पन्न ५४० रु. व टांकोळी २८० रु. आहे.

( २ ) हिचें एकंदर क्षेत्रफळ ७२ चौरस मैल आहे; पैकीं ⅔ जंगल आहे. घराणें हलबा जातीचें आहे. हींत एकंदर १३ खेडीं आहेत. उत्पन्न ४००० रुपये व टांकोळी ९६५ रुपये आहे.

**पळासनी**—मुंबई इलाखा, रेवाकांठामधील एक लहान संस्थान.

**पळासविहीर**—मुंबई इलाखा, डांग संस्थानसंघामधील एक लहान संस्थान.

**पक्षितीर्थ** ( तिरुक्कलुकुन्नम )—हें मद्रास व चिंगलपट्टम् यांच्या दरम्यान आहे. येथें टेंकडीवर दोनप्रहरीं दोन गरुड पक्षी येतात असें सांगतात. टेंकडीच्या पायथ्याशीं शंखतीर्थ आहे.

**पक्षी**, लक्षणें.—पक्षी हे सर्पाप्रमाणें प्राणी असून त्यांच्या अंगावरील बाह्यकवच बाह्यत्वचेंतून झालेल्या पिसांचें बनलेलें असतें. तसेंच त्यांच्या चोंचीवरील शृंगमय आवरण व अंगुलीवरील नख्या हीं पण बाह्यकवचाच्या सदराखालीं येतात. पक्षी उभा राहिला असतां त्याच्या शरीराचा सर्व भार पश्चिमगात्रांवर पडून तोलला जातो व ह्या गात्रांचा संधिभाग शरीराच्या पूर्व दिशेस कललेला असतो. पूर्वगात्राच्या जोडीचें पंखामध्यें रूपांतर झालेलें असतें. व पक्षी हवेंत उडत असतांना शरीर तोलण्यास त्यांनां मोठीं पिसें लावलेलीं असतात. ग्रीवाकशेरू व अलग अलग असलेले वक्षःकशेरु ( थोरॅसिक ) यांचे घन ( स्यूट्रम १ बॉडी ) वेळेवर पूर्वखात ( प्रोकॉइलस ) अथवा द्विखात ( अँफिकॉइलस ) असूं शकतात. त्रिककशेरू ( सॅक्रम ) हे कटिकशेरूशीं संयोजित झालेले असतात, व ह्या एकत्र झालेल्या कशेरूशीं कांहीं शेवटचे वक्षःकशेरु व कांहीं आदिम पुच्छकशेरूहि संयोग पावतात व ह्या सर्व एकत्र एकजीव झालेल्या कशेरूंपासून एक संयुक्तत्रिकास्थि ( सिन्सॅक्रम ) बनते, त्याला श्रोणिमंडला( पेल्व्हिक गर्डल )चे कटिकपाल ( इलियम ) जोडले जातात. शेवटचे पुच्छकशेरू एकत्र होऊन त्यांपासून एक हलास्थि ( प्लाउशेअरबोन ) बनते व त्याला अर्धवर्तुळाकाररीत्या पुच्छाचीं पिसें लागलेलीं असतात. करोटीचीं सर्व निरनिराळीं हाडें लवकरच एकमय होऊन जातात. पश्चिम कपालास्थी( ऑक्सिपिटल )ला एकच वाटोळें संध्यर्बुद बनलेलें असतें. दोन्ही बाजूंचे पूर्वमुखास्थी (प्रिमॅक्सिलॅक) मिळून वरचा जबडा झालेला असतो; खालच्या जबड्याची प्रत्येक बाजू पांच सहा अस्थी मिळून झालेली असते व तो जबडा करोटीशीं हनुसंधानास्थीच्यामुळें जुळलेला असतो ( किंवा जोडला जातो ). पृष्ठवंशीय पर्शुकांनां फांटे झालेले असतात व त्या उरःफलकाच्या ( स्टर्नम ) पर्शुकांबरोबर संयोग पावतात. उरःफलक फार रुंद झालेलें असतें व त्याला एक नौतलासारखी उभी धार उदरतलाच्या भागीं झालेली असते. अंसचंचू ( कोरॅकॉइड ) हे साधारण स्तंभासारखे बनलेले असतात. अंसफलक ( स्कॅप्यूला ) हे असिसमान झालेले असतात. व जत्रू ( क्लॅव्हिकल ) व अंतर्जत्रू ( इंटर क्लॅव्हिकल ) हे जुळून त्यांची एक उलटी कमान झालेली असते. विद्यमान पक्ष्यांमध्यें अंतिमकूर्चशिरोस्थि ( डिस्टलकार्पल्स ) व करभास्थि ( मेटाकर्पिल्स ) मिळून एक संयुक्तहाड ज्याला कूर्चशिरकरभास्थि ( कार्पोमेटाकार्पल ) म्हणतात तें झालेलें असतें. पक्ष्यांच्या पूर्वगात्राला बहुतकरून तीनच अंगुली झालेल्या असतात. त्यांचें कटिकपाल ( इलिअम ) आकारानें मोठें असतें. कुकुंदरास्थि ( इलिअम ) व भगास्थि ( प्यूबिस ) हे शरीराच्या पश्चिम दिशेकडे वळलेले असतात, व एक अपवादाखेरीजकरून ह्यांच्या जोडअस्थींचा एकमेकांशीं कधींच संधि होत नाहीं. उर्वस्थीचें ( फर्मर ) शीर्ष त्याच्या दांड्याबरोबर समकोनी असें बनलेलें असतें. आदिमपादकूर्चशिरोस्थी ( प्रॅक्झिमल टॉर्सल ) हे जंघास्थीच्या ( टिबिअर ) अंतिम टोंकाशीं संयुक्त झालेले असून त्यांच्यापासून जो एक अस्थि बनतो त्याला जंघकूर्चशिरोस्थि ( टिबिओ टार्सल ) म्हणतात. बहिर्जंघास्थि (फिब्यूला ) अगदींच खिरटें बनलेलें असतें. अंतिम पादकूर्चशिरोस्थि व द्वितीय, तृतीय व चतुर्थ पादकरभास्थि (मेटाटार्सल्स) ह्या सर्व अस्थींचा संयोग होऊन त्यांचा एकच अस्थि बनलेला असतो त्याला पादकूर्चशिरकरभास्थि

( टुर्सोमेटाटार्सस ) म्हणतात. प्रथम पादकरभास्थि सुटा अथवा स्वतंत्र असतो व पांचवा पादांगुलीय अस्थि बनलेलीच नसते.

तृतीय कालांतील ( टर्शिअर पीरिअड ) व विद्यमानकाली सर्व पक्ष्यांत तोंडाच्या जबड्यांना दांत लागलेले नसतात. त्यांच्या अन्ननलिकेला बहुशः एक फुगारा बनलेला असतो त्यास अन्नकोश (क्रॉप) म्हणतात व आमाशया( स्टमक )चे दोन भाग झालेले असून, पहिला भाग पिंडयुक्त ( ग्लँड्युलर ) असून त्यास पूर्वआमाशय ( प्रोव्हेंट्रिक्युलस ) म्हणतात. त्याच्या पुढचा भाग अतिशय जाड मांसल किंवा स्नायूंचा बनलेला असून त्याला मंथनिका ( गिझर्ड ) म्हणतात. तन्वांत्राच्या व बृहदांत्राच्या संयोगाच्या भागाला दोन अधोत्र (कोएका) लागलेले असतात. पक्ष्यांचे फुप्फुस आंतून फार जाळीदार असतात परंतु ते स्थितिस्थापक नसल्यामुळे फुगले जात नाहींत. त्यांच्या आंत जाणाऱ्या श्वासनलिकांच्या शाखा त्यांच्या पृष्ठावर येऊन पातळ निराळ्या वायुकोशां( एअरसॅक्स )मध्यें उघडतात, व ह्या वायुकोशांचा कांहीं अस्थींमधील पोकळ्यांशीं संयोग झालेला असतो. पक्ष्यांमध्यें ध्वनिमंजूषा (सायरिंक्स), त्यांची महाश्वासनलिका जेथें तिच्या दोन शाखांमध्यें दुभागली जाते तेथें बनलेली असते व तेथून पक्ष्यांमध्यें ध्वनि उत्पन्न होतो हृदय हें दोन संचयकर्ण ( ऑरिकल्स ) व दोन निःसारकर्ण मिळून (व्हेंट्रिकल्स ) चार कर्णांचें बनलेलें असतें. उजवीकडील संचयकर्ण व निःसारकर्ण यांच्यामधील पडदा स्नायूंचा झालेला असतो. प्रौढदशेंत महाधमनीची कमान ( एओर्टिक आर्च ) एकच असून ती उजवीकडे गेलेली असते. पक्ष्यांत वृक्कोन्मुखी शिरा ( रेनलपोर्टल ) नामशेप झालेल्या असतात. त्यांच्यांत रुधिररक्तपेशी अंडाकार व चैतन्यकेंद्रयुक्त ( न्यूक्लिएटेड ) असतात. रुधिराचें उष्णमान जास्त असतें. पूर्वमस्तिष्क ( फोअर ब्रेन ) व अनुमस्तिष्क ( हाइडब्रेन, सेरिबेलम ) हीं विस्तृत असून एकमेकाला जोडलीं जातात त्यामुळें चक्षुमस्तिष्कशकलें बाहेरच्या अंगाला कललीं जातात. पक्ष्यांत घ्राणमस्तिष्क ( अलफॅक्टरीलोब्स )फारच थोड्या प्रमाणावर विकास पावतात. नेत्र विशाळ असतात व त्यांच्या आंत कांहीं एका प्रकारचे तगट बनलेले असतात. कर्णेंद्रियाच्या शुल्कयाचा भाग मोठा व वळलेला असा झालेला असतो. प्रत्येक वृक्क ( किडने ) तीन भागांचें बनलेलें असून तें परिपूर्तितावस्थेंतील अंतिम वृक्कनलिका समूहा( मेटॅनेफॉस )पासून झालेलें असतें, कारण मध्यमवृक्कनलिकासमूह विनाश पावतो. पक्ष्यांत मूत्राशय बनलेलें नसतें. उजवीकडील अंडकोश ( ओव्हरी) व अंडस्रोतस ( ओव्हिडक्ट ) हीं बहुतकरून अगदीं खिरटीं बनून दिसेनाशीं होतात.

पक्षी अंडज आहेत व त्यांचें अंडें मोठें असतें व त्यांत अन्नमय बलक पुष्कळ सांठतो. अंडें अंडस्रोतसांतून बाहेर पडत असतांना त्याला पांढऱ्या निबल बलकाचें वेष्टण मिळतें व या बलकाच्या सभोंवतीं एक दुहेरी पापुद्र्याप्रमाणें अंतर्कवचावरण तयार होतें, आणि या अंतःकवचावरणाच्या सभोंवतीं कवच बनतें. परिपूर्तितावस्थेंत अंडें विकास पावत असतांना त्याच्यांत भ्रूणउदककोश ( ॲमिअन ) व नाल ( अॅलॅन्टॉयी ) हीं तयार होतात व एक बलककोश( योल्कसॅक )हि बनतो. अंडें उबवून नुकतेंच बाहेर निघालेलें पक्ष्याचें पिलूं कांहीं पक्ष्यांमध्यें पिसांनीं आच्छादित असतें व त्याला चालतां किंवा पोहतां येतें व तें स्वतः चारा खातें;तर कांहीं पक्ष्यांमध्यें पिलाला पिसें आलेलीं नसतात, त्याची त्वचा उघडी असते व त्याला स्वतः चारा खातां येत नसून त्याला नर किंवा मादी चारा घालीत असते. पहिल्या प्रकारच्या पिलाला बालपक्व ( प्रिकोशिअस ) असें म्हणतात तर दुसऱ्या प्रकारच्या पिलाला अबालपक्व म्हणतात. वरील विवेचनावरून तुलनात्मक रीत्या पाहिलें असतां सशीर्ष प्राण्यांपैकीं पक्ष्यांमध्यें पुष्कळ बाबतींत विशिष्टपणा आढळून येतो. या वर्गांतील सर्व प्राणी हवेंत राहण्याला योग्य असे बनलेले आहेत. आणि यांच्या शरीररचनेंतील प्रत्येक भागांत या असामान्य परिस्थितीला अनुकूल असे फरक झालेले आहेत; ते असे कीं उष्णताप्रवाहप्रतिरोध असें पंखांचें आच्छादन; पूर्वगात्रांचें पंखांमध्यें रूपांतर; पंखांची हालचाल घडवून आणणाऱ्या स्नायूंचें उगमस्थान बनतील अशा प्रकारचीं उरःफलक व अंसमंडल यांची संघटना; भूतलावर उभें राहिलें असतां शरीराचा सर्व भार सहन केला जाईल अशा प्रकारचीं श्रोणिमंडलें व पश्चिमगात्रें यांची रचना; हे सर्व विशिष्ट गुण म्हटले म्हणजे हवेंत उडण्याला अनुकूल असे फेरबदल होत. याशिवाय दुसरे मोठे विशिष्ट गुण म्हटले म्हणजे विद्यमान पक्ष्यांमधील दंतविहीनता, प्रधान अथवा महाधमनीच्या डाव्या बाजूच्या कमानीचा आणि उजव्या अंडकोशाचा व अंडस्रोतसाचा लोप, मस्तिष्काची विशिष्ट रचना, घ्राणमस्तिष्काचा खिरटेपणा,डोळ्यांच्या वाढीचें परिणत स्वरूप व त्यांचा असामान्य मोठेपणा हे होत. असले विशिष्ट गुण इतर कोणत्याहि वर्गांत आढळून येत नाहींत.

दुसरी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं मत्स्य, स्थलजलचर व उरग या वर्गांच्या गणांतील व्यक्तिव्यक्तींमध्यें जे शरीररचनेचे फरक आढळून येतात ते विद्यमान सबंध पक्षिवर्गांतील व्यक्तींमध्यें फारसे आढळून येत नाहींत. कारण यांच्यांत फारशी भिन्नता दिसून येत नाहीं. यामुळें वर्गीकरण करतांना इतर प्राण्यांचे गणविभाग करण्यास भिन्नतादर्शक ठळक गुणांचा उपयोग करतां येतो तसे ठळक गुण या वर्गांतील प्राण्यांत आढळून येत नसल्यामुळें यांचे गणविभाग करतांना अगदीं क्षुद्र भेदांचा उपयोग करणें प्राप्त होतें. तथापि जे कांहीं फरक दिसून येतात त्यांच्या साहाय्यानें पक्ष्यांचें वर्गीकरण करतांना त्यांचे दोन उपवर्ग करतात ते येणेंप्रमाणेः—( १ ) मध्ययुगीनपक्षी

( आर्चीओर्निथस = दंतधारी ); व ( २ ) नवयुगी पक्षी ( निओऑर्निथस = निर्दंत ). या दुसऱ्या उपवर्गाचे दोन भाग होतात ते ( अ ) निर्नौतलोरःफलक व ( ब ) नौतलोरःफलक हे होत. निर्नौतलोरःफलकांत सात गण मोडतात व नौतलोरःफलकांत एकवीस गण मोडतात. निर्नौतलोरःफलकांत शहामृग व दुसरे पक्षी येतात. यांच्या उरःफलकाला नौतलासारखी उभी धार उदरतलाच्या भागीं झालेली नाहीं, म्हणून हे पक्षी वर हवेंत उडण्याच्या कामीं निरुपयोगी बनतात. नौतलोरःफलकामध्यें बहुतेक पक्षी हवेंत उडणारे आहेत. उदाहरणार्थ, बगळे, गरुड, घार, कपोत, पोपट, घुबड, बदक, पानकोळी, कोंबडी इत्यादि.

नैसर्गिक वांटणी किंवा फैलावा अथवा विस्तार ह्या दृष्टीनें पाहिलें असतां कांहीं जातींचे पक्षी कांहीं विविक्षित भागांतच आढळून येतात. पक्षी नानातऱ्हेचीं घरटीं बनवितात व ते आपल्या पिलांची जोपासना किती आस्थापूर्वक व कळकळीनें करतात ह्याविषयीं सर्वसाधारण माहिती सर्वांना विदित आहेच. कांहीं पक्षी कालमानानें व ऋतुमानानें देशपर्यटण करतात ही गोष्ट पुष्कळांना माहीत आहेच तेव्हां विस्तारभयास्तव त्याचें वर्णन देण्याचें कारण नाहीं.

कपोत खबुतर किंवा पारवाः—पक्षीवर्गांतील कपोत, खबुतर अथवा पारवा हा प्राणि प्रतिरूप कल्पून त्याचें सर्वसाधारण शास्त्रीय वर्णन खालीं दिलें आहे. बाळगिलेल्या खबूतरांचे प्रकार पुष्कळ आहेत, जसें लक्का, गिरेवाज इत्यादि; परंतु ज्या मूळ जातिविशेषापासून हे प्रकार विस्तार पावले तो एकच असून सर्वत्र आढळण्यांत येतो व त्याला पारवा अथवा जंगली खबूतर म्हणतात व बहुतेक त्यालाच अनुसरून खालील वर्णन आहे.

कपोताच्या कवंधाचा भाग पूर्वशेवटीं निमुळता होत जाऊन चंचलशीर्षामध्यें शेवट पावतो व त्या शीर्षाचा मस्तिष्कावरणाचा भाग वाटोळा झालेला असून त्याला ठळक चोंच असते व ही चोंच शृंगमय वेष्टनानें आच्छादित अशा वरच्या व खालच्या जबड्यांची बनलेली आहे. शीर्ष, ग्रीवा व कवंध हीं सर्व पिसांनीं गर्द आच्छादिलीं असून त्या पिसांची गति शरीराच्या पश्चिम शेवटाप्रत असते व तीं पिसें एकमेकांवर मढवलेलीं असतात. कवंधाच्या पश्चिम शेवटीं कांहीं विभक्त असलेलीं परंतु एकवटून लागलेलीं पिसें असतात त्यांनांच पुच्छ असें म्हणतात. कवंधाच्या पूर्वभागापासून पूर्वगात्रांची जोडी पिसांनीं आच्छादित अशी पंखरूपानें बनलेली असते व हे पंख पक्षी विश्रांति घेत असतांना मिटले जाऊन त्यांच्या शरीराच्या पार्श्वभागीं चिकटून राहतात. कवंधाच्या पश्चिमशेवटच्या भागापासून पश्चिम गात्रांची जोडी झालेली असते, परंतु पिसांच्या आच्छादनामुळें जिवंतपणांत फक्त गात्राचा शेवटच्या पायाचा भागच दिसण्यांत येतो. या पायाच्या भागावर खवले लागलेले असतात व त्याला एकंदर चार बोटें असून त्यांतील तीन पुढल्या अंगाला वाढलेलीं असतात व चवथे एकच पाठीमागच्या दिशेस वळलेलें असतें.

ग्रीवा किंवा मान हिच्या आकाराची खरी कल्पना कपोताच्या अंगावरील सर्व पिसें काढून टाकल्याशिवाय होत नाहीं. ती लांबलचक, फार चंचल व लंबवर्तुळाकार असून शीर्ष व कवंध ह्यांच्यापेक्षां अगदीं निराळीच दिसते. पुच्छ म्हणजे कवंधाचा अगदीं थोडासा निमुळता पश्चिमशेवटाचा भाग होय व त्यालाच पुच्छपिसें लागलेलीं असतात. त्याच्या पृष्ठभागीं एक तैलपिंड ( ऑइल ग्लँड ) बनलेला असतो त्यांतून तेलासारखें द्रव्य निघतें तें पक्षी आपल्या चोंचीनें पिसें गुळगुळीत करण्याकडे उपयोगांत आणतात.

पूर्वगात्राचे प्रगंड, प्रकोष्ट व हस्त हे मुख्य भाग तीन असून ते पंखामध्यें बनलेले दिसतात तरी हस्ताचा भाग कातडीनें अगदीं आवळला जाऊन त्याच्यांत फक्त प्रथम, द्वितीय व तृतीय अंगुलींचे भाग अस्पष्टरीतीनें झालेले दिसतात. प्रगंड व प्रकोष्ट या भागांवरसुद्धां कातडीचें वेष्टन पसरलेलें असतें. पक्षि उडतांना हे पंख उघडले जातात व त्यावेळीं त्यांची अक्षरेषा कवंधाच्या मध्यरेषेशीं समकोनावर असते. पश्चिम गात्रांतील ऊरूचा भाग तोकडा असून शरीराला लागूनच असतो, परंतु तो उदरतलीं व पूर्व दिशेस वळलेला असतो. जंघा गुडघ्याच्या खालच्याबाजूस व पश्चिम दिशेस वळलेली असून तिच्या पुढचा भाग म्हणजे पायाच्या तळाचा भाग अथवा पाद हा होय. या भागाचे दोन विभाग स्पष्ट दिसतात ते एक आदिम पादकूर्चशीर्षकरभा( टार्सो मेटाटार्सल )चा भाग व दुसरा अंतिम चार पादांगुलींचा होय. या चार पादांगुलींपैकीं पायाचा आंगठा वर सांगितल्याप्रमाणें पाठीमागच्या दिशेस वळलेला असतो. चारी पादांगुलींना शेवटीं नख्या असतात.

मुखाचा भाग शीर्षाच्या एका शेवटाला असून त्याला वर सांगितल्याप्रमाणें चोंचरूपी दोन जबडे असतात; ते उघडले असतां मुखाचा आ विस्तृत असा पसरला जातो. चोंचीच्या वरच्या भागाच्या तलपृष्ठावर नासाद्वाराला लागून एक कातडीचा मृदु भाग झालेला असतो त्याला 'सिरी' असें म्हणतात. नेत्र मोठे असून प्रत्येकाला तीन पापण्या असतात. एक वरची, दुसरी खालची व तिसरी पारदर्शक चंचल मध्य पापणी होय नेत्रांच्या पश्चिम भागीं थोड्याशा अंतरावर कर्णरंध्र असतें तें पिसांनीं झांकून गेलेलें असतें. त्यापासून बाह्यकर्णविवराचा ( एक्सटर्नल ऑडिटरी मिआटस ) मार्ग सुरू होऊन तो विवराच्या आंत खालीं कर्णपटला( टिंपॅनम )च्या योगानें कुंठित होतो. गुदद्वार अथवा पश्चिमबाह्यत्वचाविवरमुख ( क्लोॲकल ॲपरचर ) पक्ष्यांमध्यें आडवें झालेलें असून पुच्छाच्या व कवंधाच्या संयोगभागीं उदरतलावर असतें.

बाह्यकवच ( स्केलेटन ) हें बाह्यत्वचे ( एपिडॉर्मिस) पासून बनलेलें असून पिसांच्या रूपानें झालेलें असतें; तसेंच त्याचा

कांहीं भाग शृंगमय झालेला असून तो चोंचीवर व पादांगुलींच्या शेवटीं नखांच्या रूपानें दिसतें. तसाच खवल्याच्या रूपानें पादकूर्चशीर्षकरभाच्या भागावर व पादांगुलींवर पसरलेला असतो. ह्या शेवटच्या लक्षणावरून उरगवर्गाशीं थोडी साम्यता दिसते. पिसें शरीराच्या सर्व एकंदर पृष्ठभागापासून उत्पन्न झालेलीं नसून त्यांची उत्पत्ति कांहीं नेमक्या पृष्ठाच्या भागांवरून होत असते; तरी त्यांची रचना एकमेकांवर पसरून झालेली असल्याकारणानें सर्व शरीराचा सबंध पृष्ठभाग त्याच्यामुळें आच्छादिला जातो. ह्याप्रमाणें शरीरासभोंवतीं एक अति हलकें परंतु गच्च व उष्णताप्रवाहप्रतिरोधक ( नॉनकंडक्टिंग ) असें हें वेष्टन झालेलें आहे.

अस्थिपंजरः–इतर सर्व सशीर्ष प्राण्यांच्या पृष्ठवंशा( व्हर्टिब्रलकॉलम )पेक्षां ह्या प्राण्यांच्या पृष्ठवंशांत मुख्य लक्षणें दिसून येतात तीं हीं कीं मानेचा भाग फार लांब व सहज हालणारा असा बनलेला असतो, व कबंधाचा भाग ताठर झालेला असून पुच्छाचा भाग अगदींच थोडा राहिलेला असतो. वक्षःकशेरू ( थोरॅसिक व्हर्टिब्री ) हे ओळखण्याची रीति म्हटली म्हणजे त्यांना पर्शुका ( रिब्स ) लागलेल्या असतात. व त्या उरःफलका( स्टर्नम )शीं संयोग पावतात. शेवटले दोन ग्रीवाकशेरू ( नेक व्हर्टिब्री ) यांना आंखूड पर्शुका लागलेल्या असतात परंतु त्या उरःफलकाशीं संयोग पावत नाहींत. चवथ्या किंवा पांचव्या वक्षःकशेरूनंतर पुढें बहुतेक बारा कशेरू एकमेकांनां संलग्न होऊन त्यांचा एकजीव बनलेला असतो व ह्या संयुक्तकशेरूंच्यामुळें झालेल्या भागाला दोहों बाजूंवर विशेष वाढ झालेलें श्रोणिमंडल (पेल्विक गर्डल) जोडलें जातें. ह्या पृष्ठवंशाच्या संयुक्त भागाला संयुक्तत्रिकास्थि ( सिन्सॅकम ) हें नांव दिलें जातें, कारण हा भाग श्रोणिमंडल जोडण्यास उपयोगी पडतो. ह्याच्या पुढें सहा पुच्छकशेरू आहेत. व त्यांच्या पुढें म्हणजे पृष्ठवंशाच्या शेवटीं एक वरच्या अंगाला वळलेला व चपटलेला असा अस्थि बनलेला असतो त्याला हलास्थि ( प्लाऊशेअर बोन )म्हणतात. बहुशः हा चार अथवा अधिक शेवटचे पुच्छकशेरू मिळून झालेला असतो. उरःफलक हा पक्ष्यांमध्यें सर्वांत लाक्षणिक अस्थि होय. तें हाड एका रुंद तगटाप्रमाणें झालेलें असून त्याच्या उदरतलीं ऊर्ध्व मध्याक्षरेषेवर एक उभी नौतल( कील )रूपी धार झालेली असते. तिच्या पश्चिम कडेवर दोन कात्रे झालेले असतात व पूर्व कडेवर दोन खांचण्या बनून त्यांत अंसचंचू ( कोरेकॉइड ) जोडले जातात.

करोटि( स्कल )चा मस्तिष्कावरणा(क्रॅनिअल केव्हिटी)चा भाग घाटोळा असून तिचा अक्षिकोश( आयपिट )चा भाग विशाल असतो व तिला पुढच्या अंगाला निमुळती होऊन शेवट पावलेली चोंच लागलेली असते. कपालमहाविवर ( फोरॅमन मॅग्नम ) पश्चिम भागीं खालच्या बाजूस वळलेलें असतें म्हणून तें करोटीच्या उदरतलीं दिसतें व त्याच्या पूर्व कांठावर एकच वाटोळें संध्यर्बुद ( कॉन्डाइल ) झालेलें असतें. करोटीला नेहमीप्रमाणें बहुतेक अस्थी लागलेले असतात. परंतु ते अशा रीतीनें संयोग पावलेले असतात कीं त्यांच्यामधील संधिरेषा ( सुचर ) दिसून येत नाहींत. चोंचीचा वरचा भाग बहुतेक पूर्वमुखास्थी ( प्रिमॅक्झिली )चा झालेला असतो व मुखास्थी ( मॅक्झिली ) अगदीं खिरटे बनलेले असतात. चोंचीचा खालचा भाग म्हणजे खालचा जबडा पांच अस्थींचा मिळून झालेला असतो व तो हनुसंधानास्थी( क्वाड्रेट )च्या योगेंकरून वर करोटीशीं जोडला जातो. सशीर्षांच्या अंसमंडला(पेक्टोरल गर्डल)च्या घटनेपेक्षां पक्ष्यांच्या अंसमंडलाची घटना निराळी असते. अंसचंचूची जोडी बनलेली असून ते स्तंभासारखे असतात व त्यांची दिशा पूर्वबाह्य व ऊर्ध्व अशी असून ते उरःफलकाच्या पूर्व कांठावरील खांचण्यांशीं संयोग पावतात. अंसफलक ( स्कॅप्युला ) हें असिसमान बनलेलें असून त्याची दिशा पश्चिम भागीं वळलेली असते. तें पर्शुकांवर पसरलेलें असतें व एका संधिबंधनानें ( लिगॅमेंट ) अंसचंचूच्या पृष्ठाकडील शेवटास जोडलें जातें. अंसचंचू व अंसफलक यांच्या ह्या संयोगानें एक अंसगर्त ( ग्लेनॉइड कॅव्हिटी ) तयार होते. त्याला प्रगंडास्थी( ह्यूमरस )चें शीर्ष जोडलें जातें. अंसफलकाला आंतल्या बाजूस त्याच्याशेवटीं एक खिरटें अंसकूट ( ॲक्रोमिअम ) असतें व त्याला एका संधिबंधनानें पातळ उलट कमानदार जत्रु व अंतर्जत्रु (क्लॅव्हिकल व इंटर क्लॅव्हिकल) मिळून बनलेला एक अस्थि जोडलेला असतो; तो पश्चिमशेवटीं उरःफलकाला जवळ जवळ जाऊन मिळतो.

पूर्वगात्रांतील हाडें सुद्धां विशेष लाक्षणिक आहेत. प्रगंडास्थीचें शीर्ष पसरट असतें व त्याला ठळक धार असते. तिला अंसस्नायु ( पेक्टोरल मसल्स ) जोडलेले असतात. अक्षक ( रेडिअस ) पातळ व सारखें सरळ असतें व कूर्परास्थि ( उल्ना ) जाड असून थोडा कमानदार असतो. दोन कूर्चशिरोस्थी ( कार्पल ) सुटे असून त्यांना पुढें कूर्चशिर-करभास्थि ( कार्पो–मेटाकार्पल ) नांवाचें एक द्वित्त हाड लागलेलें असते.

विद्यमान सपृष्ठपूर्णवंशीय प्राण्यांच्या श्रोणिमंडलाशीं पक्ष्यांच्या श्रोणिमंडलाचें साम्य मुळींच दिसून येत नाहीं. कटिकपाल(इलिअम)लांबलचक असून त्याचा पूर्व भाग ऊर्वस्थिसंधिविवरा(असेटाब्युलम)च्या पूर्वभागीं वाढलेला असून तेवढाच मोठा दुसरा भाग पश्चिम भागीं वाढलेला असतो. कटिकपाल संयुक्तत्रिकास्थीशीं जोडलें जातें. नेहमींप्रमाणें ऊर्वस्थिसंधिविवराच्या उदरतलाचा भाग कुकुंदरास्थि (इस्किअम )व भगास्थि ( प्यूबिस ) ह्यांच्यापासून झालेला आहे व ह्या दोन्ही अस्थींची वाढ ऊर्वस्थिसंधिविवरापासून पश्चिम दिशेस झालेली असते.

कुकुंदरास्थि रुंद असून त्याचें पश्चिम शेवट कटिकपालाच्या पश्चिम शेवटीं जुळलेलें असतें त्यामुळें कटिकपाल व कुकुंदरास्थि ह्यांच्यामध्यें पूर्वभागीं थोडी रिकामी जागा रहाते त्याला कुकुंदरास्थिछिद्र असें म्हणतात. भगास्थि ही वांकड्यादांड्याप्रमाणें असून कुकुंदरास्थीच्या उदरतलाच्या कांठावरोवर समांतर रहाते. कुकुंदरास्थि किंवा भगास्थि हे आपल्या जोडीदारावरोवर अथवा जोडअस्थीवरोवर कधींच संयोग पावत नाहींत.

पश्चिम गात्राचे उर्वस्थी हे तुलनात्मकरीत्या पाहिले असतां तें वरेंच आंखूड हाड आहे व त्याचें शीर्ष त्याच्या दांड्यावरोवर समकोनी असें वनलेलें असतें. त्याच्यापुढें त्याच्याशीं संयोग पावलेलें लांब संयुक्त हाड ही जंघकूर्चशिरोस्थि( टिबिओ-टार्सस ) होय.वहिर्जंघास्थि लहान असतो व तो पश्चिम शेवटीं निमुळता होत जातो. ह्या जंघकूर्चशिरोस्थीच्या पुढें त्याच्या शेवटीं असेंच दुसरें संयुक्त हाड वनलेलें असतें त्याला पादकूर्चशिरकरभास्थि म्हणतात. तो अंतिम पादकूर्चशिरोस्थि व द्वितीय, तृतीय व चतुर्थ पादकरभास्थि मिळून झालेला आहे. तेव्हां उरगवर्गांतील प्राण्यांच्या प्रमाणें पक्षांमध्यें सुद्धां पायाच्या खुवा हा आदिम व अंतिम पादकूर्चशिरोस्थीच्या मध्यें त्यांचा संधि होऊन झालेला आहे. वरील एकंदर अस्थिपंजराच्या वर्णनावरून सहज दिसून येतें कीं पक्षांच्या अस्थिपंजराच्या सर्व भागांत कांहींना कांहीं तऱ्हेचा विशिष्टपणा भरलेला आहे. दुसरी गोष्ट ही कीं ह्यांच्या हाडामध्यें अस्थिभेद नसून त्यांच्या पोकळींत जिवंतपणीं हवा भरलेली असते व त्यामुळें तीं हलकीं वनतात. कपोतामध्यें मात्र प्रकोष्ट, हस्त व ऊरु ह्या भागांतील हाडांमध्यें हवा नसते.

स्नायूंची रचना.—पूर्वगात्रांनां लागलेल्या स्नायूंच्या नेहमीच्या रचनेमध्यें पक्ष्यांत पुष्कळ फरक झालेला आहे.हवेमध्यें पक्षी वर उडतो व पुढें मार्ग आक्रमण करतो ही क्रिया तो पंखाचा जवर प्रहार खालच्या दिशेस करतो तेव्हां घडून येते व पंखाचा खालच्या दिशेस हा प्रहार होण्यास अंसस्नायू कारणीभूत होतात व हे स्नायू उरःफलकाच्या नौतलाला लागून विकास पावतात व ते नौतलाच्या प्रत्येक वाजूस इतके वाढलेले असतात कीं पक्ष्याचा उदरतलाचा वहुतेक भाग ह्यांचाच झालेला असतो व ह्यांचें वजन सुमारें एकपंचमांश शरीराच्या वजनाइतकें भरतें. पंख वर उचलून घेणारे स्नायू सकृद्दर्शनी वाटतात तसे शरीराच्या पृष्ठभागावर झालेले नसून ते अधोजत्रुस्नायू (सवक्लेव्हिअस)च्या योगानें उचलले जातात व हे स्नायू उरःफलकाच्या तवकडीच्या पूर्वकांठीं लागलेले असतात. शरीराचा पृष्ठभाग साधारणतः ताठर वनलेला असल्यामुळें त्या भागावरचे स्नायू विशेष खिरटे वनलेले असतात. परंतु नेच्या व पुच्छाच्या भागांवर स्नायू चांगले वाढलेले असतात.

पश्चिम गात्रांतील कांहीं स्नायूंची रचना पक्ष्याला सहजगत्या झाडांच्या फांद्यांवर किंवा अशाच दुसऱ्या आधारावर वोटें मिटून वसतां येईल अशी झालेली आहे. एका स्नायुवंधना(टेंडन)ला ताण पडला असतां सर्व वोटें मिटलीं जातात. वर सांगितल्याप्रमाणें ह्या गात्राच्या भागांच्या वळणामुळें ह्या स्नायुवंधनाला पक्षी वसला असतां त्याच्या वजनानेंच ताण पडतो व अशा रीतीनें पक्षी निर्धास्त झाडांच्या फांद्यांवर झोंपीं जातात.

पचनेंद्रियें:—तोंडाच्या खालच्या व वरच्या वाजूला शृंगमय चोंचीचें आवरण असून दांतांचा मागमूसहि नसता. जिव्हा मोठी असून तिचा शेवटचा भाग अणकुचीदार असतो. गलविवरा(फरिंक्स)च्या पुढच्या वाजूला विस्तृत होऊं शकेल अशी अन्ननलिका(ओइसोफॅगस)असते व तिला पुढें थोड्या अंतरावर एक फुगारा वनलेला असतो त्यास अन्नकोश म्हणतात. हा मानेच्या तळाजवळ त्वचा व मांस यांच्यामध्यें, उरःफलकाच्या अगदीं पूर्वेस झालेला असतो. याच्या विवरामध्यें अन्न पचण्यास सुरवात होते. अन्नकोशापासून पश्चिमेस अन्ननलिका जठरापर्यंत गेलेली असते. जठर ( स्टमक ) अथवा आमाशय ( प्रोव्हेंट्रिक्यूलस ) याचे दोन भाग झालेले असतात. पहिला भाग पूर्व आमाशय आणि दुसरा भाग मंथनकर्ण ( गिझर्ड ) अथवा मंथनिका होय. पूर्व आमाशय हा वाहेरून अन्ननलिकेचा थोडा वृद्धि पावलेला भाग आहे असें दिसतें. पण त्याच्या आंतील श्लेष्मकला ( म्यूकसमेंब्रेन ) ही फार जाड असून तिच्यामध्यें वरेच आम्लपिंड (पेप्टीक ग्लँडस)वनलेले असतात. ते इतके ठळक असतात कीं नुसत्या डोळ्यांनीं ते दिसूं शकतात. मंथनिका ही द्विवहिर्गोल असते. हिच्या मांसल भित्ती फार जाड असून तिच्या आंतील विवर आगदीं लहान असतें. तिची अंतर्कला ( एपिथेलिअम ) ही फार जाड व श्रृंगमय असून तिचा रंग पिवळा अथवा हिरवा असतो. तिच्या विवरामध्यें नेहमीं लहान लहान वाटोळे दगड असतात. हे दगड पक्षी गिळीत असतो.ते अशासाठीं कीं अन्नाचें चूर्ण करण्याच्या कामीं त्यांची मंथनिकेला मदत व्हावी म्हणून. पक्काशयाचा(मोडेनम) उगम पूर्व आमाशय ज्या ठिकाणीं मंथनिकेला मिळतो त्या ठिकाणीं जवळच होतो व त्याची एक स्वतंत्र मुदन झालेली असते व या मुदनींतच पक्कपिंड वसलेलें असतें. तन्वात्रांचे (स्मॉल इंटेस्टाइन ) तीन भाग आहेत. प्रथम एक ज्याची मुदन झाली आहे तो, नंतर दुसरा चक्रव्यूहाकार वळणें झाली आहेत तो व शेवटीं तिसरा दुसरी एक मदन होऊन झाला आहे तो. हीच पुढें सरळ होऊन तिचें ऋज्वांत्र ( लार्ज इन्टेस्टाइन ) वनतें. या दोहोंच्या संयोगाच्या ठिकाणीं दोन लहान अंधनलिका असतात त्यांनां अंधांत्र म्हणतात. पश्चिमवाह्यत्वचाविवराचे ( क्लोएका ) मुख मोठें असतें. या विवराचे तीन भाग होतात व त्यांत गुदद्वार ( ॲनस ) वृक्कस्रोतसांची

( युरेत्र ) वाह्यछिद्रें व जननेंद्रियांच्या स्रोतसाची बाह्य छिद्रें स्थापित झालेलीं आहेत.

मुखकोंडामध्यें उघडणारे कांहीं लहान पिंड आहेत पण ह्यांतील एकाला सुद्धां लालापिंड म्हणतां येणार नाहीं. यकृत मोठें असून त्याचे दोन भाग झालेले आहेत. ते आपआपल्या स्रोतसानें पक्वाशयांत उघडतात. पित्ताशय बनलेलें नाहीं. पक्वपिंड हें आटपशीर व तांबूस असून पक्वाशयाच्या मुद्दींत असतें. याला तीन स्रोतसें आहेत त्यांच्या द्वारानें तें आपला रस पक्वशयांत सोडतें.

प्लीहा:—ही तांबडी व लांब गोलाकार आहे. हिचें आकारमान लहान आहे. ही पूर्व आमाशयाच्या उजव्या बाजूस उदरगुहाकले ( पेरिटोनिअम )च्या योगेंकरून लागलेली आहे.

श्वसनेंद्रियें आणि स्वरोत्पादक इंद्रियें:—ध्वनिमंजूपाद्वार ( ग्लॉटिस ) जिव्हेच्या उगमस्थानाच्या पाठीमागें असतें व ध्वनिमंजूपे( लारिंक्स )त जाणारा मार्ग त्या वाटेनें आहे. ध्वनिमंजूपेला तरुणास्थी( कार्टिलेजिस )चा आधार झालेला आहे. इतर सपृष्ठवंशाप्रमाणें या ध्वनिमंजूपेच्यामुळें पक्ष्यांत ध्वनि उत्पन्न होत नाहीं. महाश्वासनलिकेचा ( ट्राकिआ ) पूर्व भाग नेहमींप्रमाणें अन्ननलिकेच्या उदरतलीं असतो परंतु त्याच्या पुढचा भाग अन्नकोशामुळें डाव्या बाजूस सारला जातो व पुढें ती महाश्वासनलिका शरीरगुहेमध्यें जेव्हां शिरते तेव्हां तिला फिरून नेहमींचें ठिकाण प्राप्त होतें. या ठिकाणीं तिला डावी व उजवी अशा दोन शाखा फुटतात. श्वासनलिकेला आधार देणारी घटककंकणें ( रिंग्ज ) तरुणास्थीचीं बनलेलीं नसून अस्थिमय आहेत. महाश्वासनलिका व तिच्या शाखा यांच्या संयोगाच्या ठिकाणीं एक स्वरसंदूक ( सिरिंक्स ) झालेली असून ती खरी ध्वनिमंजुपा होय. अशा प्रकारची विलक्षण ध्वनिमंजुपा दुसऱ्या कोणत्याहि वर्गांत आढळत नाहीं. महाश्वासनलिकेची शेवटचीं तीन अथवा चार घटककंकणें आणि प्रत्येक श्वासनलिकाशाखेचें पहिलें घटक-कंकण यांच्यांत आकारभेद उत्पन्न होऊन किंचित् विस्तृत अशी ती स्वरसंदूक बनली आहे. हिला " टिंपेनम " हें नांव आहे. हिच्या आंतील श्लेष्मकला दोन्ही बाजूंला जाड झालेली असते व तिच्या पोकळींत ही जाड श्लेष्मकला अर्धचंद्राकारांत्या पुढें आलेली असते व ह्या पुढें आलेल्या भागाला एका तरुणास्थीच्या दांड्याचा आधार असतो. त्या अर्धचंद्राकार भागांच्या थरारानें पक्ष्यांचा स्वर उत्पन्न होतो व या स्वरसंदूकेला लागलेल्या स्नायूंच्या संकोचविकासामुळें स्वराचा नाद बदलतो.

शरीराच्या आकारमानानें फुप्फुसें फार लहान आहेत व तीं फारच कमी प्रसरणशील असतात स्थलजलचर (अँफिबिआ ) व उरग ह्यांच्यामधील फुप्फुसांप्रमाणें हीं घडया पडलेल्या पिशव्यांसारखीं नाहींत. यांचा पृष्ठभाग पर्शुकांच्या मधील जागेंत अगदीं चिकटून बसलेला असतो व त्यावर फलेचें ( मेंब्रन ) आच्छादन नाहीं ह्यांचा उदरतलाचा भाग तंतुमय धातूच्या ( फायब्रस टिशूज) मजबूत पटानें आच्छादित झालेला असतो त्याला फुप्फुसफला ( प्ल्यूरल मेंब्रन ) म्हणतात.

महाश्वासनलिका शाखा ( ब्रांक्स ) फुप्फुसांत शिरून त्याच्या शेवटापर्यंत जाते व तेथें तिचे दोन भाग होतात. प्रत्येक फुग्याच्या आवारांच्या वायुकोशांत ( एअर सॅक ) शेवट पावतो. हा वायुकोश म्हटला म्हणजे श्वासनलिकेच्या आंतील वलेचा विस्तार होऊन बनलेला फुगा होय. पहिला वायुकोश आन्त्राच्या वेटोळ्यामध्यें गुरफटलेला आहे. त्याला आन्त्रवायुकोश ( अब्डॉमिनल ) म्हणतात. दुसरा शरीरभित्तीला लागून आहे, त्याला पश्चिमवक्षवायुकोश ( पोस्टीरिअर थोरॅसिक ) म्हणतात श्वासनलिकाशाखा फुप्फुसांत शिरते त्या मार्गी तिला आणखी तीन फांटे फुटतात ते सर्व वायुकोशांशीं जोडले जातात. त्यांपैकीं एक पूर्ववक्षवायुकोश ( ॲंटिरिअर थोरॅसिक ) पश्चिमवक्षवायुकोशाच्या पुढच्या अंगाला असतो तो होय. दुसरा अंतर्जात्रववायुकोश ( इंटर क्लॅव्हिक्युलर ) होय; हा मध्यरेंदत असून एकटाच आहे व याचा संबंध दोन्ही फुप्फुसांशीं असतो. तिसरा ग्रीवावायुकोश होय. अंतर्जात्रवाच्या दोन्ही बाजूंपासून एकएक वायुकोश निघून खाकेच्या खांचेंत बसलेला असतो. अंतर्जात्रववायु कोशाशिवाय बाकीचे सर्व वायुकोश डाव्या व उजव्या बाजूस जोडीनें झालेले आहेत. या वायुकोशांचा अस्थिगत वातपोकळ्यांशीं संबंध असतो.

कपोत उभा असतांना उरःफलकाच्या खालीं वर होण्यानें शरीरगुहा ( कॉलोम ) लहान मोठी होते; यामुळें फुप्फुसांतील हवा बाहेर व आंत येते. उरःफलकाचें हें खालीं वर होणें अंतःपर्शुकस्नायु यांच्या संकोचविकासानें घडून येतें. जेव्हां पक्षि उडत असतो तेव्हां त्याच्या शरीराचा सर्व भार पंखावर असतो यामुळें उरःफलक चलनहीन होतो. या स्थितींत कबंधाचा पृष्ठभाग खालीं वर होऊन फुप्फुसांत हवेचें चलनवलन घडवून आणतो. या दोन्हींहि स्थितींत आंत घेतलेली हवा फुप्फुसांमधून वायुकोशांत शिरते व तेथून अस्थिगतवातपोकळ्यांत प्रसरण पावते. या कारणास्तव इतर प्राण्यांच्या फुप्फुसांमध्यें उच्छ्वासानंतर फेरबदल न झालेली हवा जशी शिल्लक रहते तशी पक्ष्यांत फेरबदल न झालेली हवा फक्त वायुकोशांत व श्वासनलिकेच्या उपशाखांत राहते. याचा परिणाम असा होतो कीं रक्ताचें प्राणवायूशीं संमिश्रण अगदीं पूर्णपणें होतें व त्यामुळें त्याचें उष्णमानहि त्याच प्रमाणांत चढतें. या अर्थी एक लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं हवेंत उडणारा दुसरा प्राण्यांचा वर्ग म्हणजे कीटकवर्ग; याच्याशीं पक्ष्यांचें या बाबतींत साम्य आहे. कारण या दोन्ही वर्गांत प्राणवायूचें

रुधिराशीं संमिश्रण होणें ही क्रिया नुसत्या श्वसनेंद्रियासारख्या अकुंचित जागेतच न होतां ती सर्व शरीरभर होते.

रुधिराभिसरणः—पक्ष्याचें हृदय नकाच्या हृदयाप्रमाणें चार कर्णांचें (चेंबर्स) झालेलें असून त्याला डावा व उजवा असे दोन संचयकर्ण ( आरिकल्स ) व डावा आणि उजवा असे दोन निःसारकर्ण ( व्हेंट्रिकल्स ) असतात. उजवा निःसारकर्ण डाव्या निःसारकर्णाभोंवतीं थोडा वळसा घेतो व त्याचा आडवा छेद केल्यानें त्याचें विवर अर्धचंद्राकार दिसतें. डावा संचयकर्ण व डावा निःसारकर्ण यांच्या मध्यंतरातील पडदा ( व्हॉल्व ) वलेचा बनलेला असून त्याला दोन दळें आहेत व त्यांचे काठ निःसारकर्णातील विवराच्या पृष्ठभित्तीशीं तंतुबंधनांच्या योगेंकरुन जोडलेले असतात. परंतु हृदयाच्या उजवीकडील बाजूवरचा असा पडदा हा स्नायूचा झालेला आहे व तो पक्ष्यामध्येंच बनलेला असतो. उजव्या संचयकर्णामध्यें उजवी व डावी पूर्वमहाशिरा ( प्रीकॅव्हल किंवा सुपीरिअर व्हेना केव्हा ) व पश्चिम महाशिरा ( पोस्टकेव्हल किंवा इन्फि. व्हेके ) उघडतात. डाव्या संचयकर्णांत चार फुप्फुसशिरा उघडतात. उजव्या निःसारकर्णापासून फुप्फुसधमनी (पल्मनरी आर्टरी) निघते व तिचे लगेच दोन फाटे होऊन त्यापासून उजवी व डावी अशा फुप्फुसधमन्या बनतात. डाव्या निःसारकर्णापासून महाधमनीची ( एरोर्टा ) उजवी कमान बनलेली असते. पक्ष्यांत महाधमनीची डावी कमान बनलेली नसते. सर्व शरीराच्या धमन्या या महाधमनीच्या उजव्या कमानीपासूनच उगम पावतात व त्यांच्यामधून शुद्ध रक्ताभिसरण पावतें. अशा प्रकारें शुद्ध रक्त सर्व शरीरभर धमन्यांच्या वाटें पसरणें ही रुधिराभिसरणाची मोठी वरची पायरी होय. महाधमनीची कमान उजव्या श्वासनलिकेवरून कमान घेऊन कबंधाच्या पृष्ठभागाकडे वळते व नंतर ती पश्चिम दिशेस गति घेत महाधमनी या नांवानें आळखिली जाते. महाधमनीच्या कमानीपासून एक उजवी व दुसरी डावी अशा दोन अनामिक धमन्या ( इनॉमिनेट ) निघतात व त्यापासून प्रत्येक बाजूवरील ग्रीवाधमनी (कॅरोटिड), अत्रुधमनी ( सबक्लेव्हन ) व अंसधमनी(पेक्टोरल) ह्या उगम पावतात. अंसस्नायू वर सांगितल्याप्रमाणें विशेप प्रमाणानें विकास पावलेले असतात म्हणून ह्या अनामिकधमन्या—ज्यांच्यापासून अंसधमन्यांची उत्पत्ति झालेली असते त्या विशेष जाड बनलेल्या असतात; त्या इतक्या कीं त्यांच्या उगमानंतर पुढें महाधमनी ही बारीक बनते. बहिरूरु ( फेमोरल ) धमनी व अंतरूरु ( सियाटिक ) धमनी ह्या पश्चिम गात्रांच्या रचनेप्रमाणें फार पूर्व दिशेस उगम पावलेल्या असतात. पुच्छधमनी ( कॅडल ) ही निसर्गतः फारच लहान असते. रुधिराभिसरणातील एक मुख्य लाक्षणिक गोष्ट आहे ती ही कीं, वृक्कोन्मुखी शिरांची रचना झालेली नाहीं. तशा दोन वृक्कोन्मुखीशिरा पुच्छशिरा दुभागून जाऊन झालेल्या आहेत. परंतु त्या तशाच मुख्यतः वृक्कांमध्यें केशवाहिन्यांत अंतर्भूत न होतां त्यांच्यातून बाहेर निघून पडतात व त्याच्या बाजूवरील बहिरूरुशिराशीं संयोग पावून उभयोरुगामी ( कॉमन इलिॲक ) शिरा बनतात व नंतर या दोन्ही उभयोरुगामी शिरा एकमेकांशीं संयोग पावतात व ह्या संयोगापासून वर जाणारी एक शिरा बनते तिला अधोमहाशिरा ( इनफिरिअर व्हेनाकेरा ) अथवा पश्चिम महाशिरा म्हणतात. पुच्छशिरा जेथें दुभागली जाते त्याच ठिकाणाहून एक जाणती शिरा उगम पावून वर गति घेत यकृतोन्मुखीशिरेला मिळते तिला पुच्छकलाशिर म्हणतात. मासे, स्थलजलचर व उरग ह्या तिन्ही वर्गांतून दिसून येणारी रुधिराभिसरणाची योजना म्हणजे पुच्छ व श्रोणी या भागांतून अभिसरण पावणारें रुधिर पहिल्या प्रथम वृक्कांमध्यें जाऊन नंतर वृक्कशिरांच्या योगेंकरून वर हृदयाकडे जाणें, हिचा पक्ष्यांमध्यें लोप होऊन या भागातून अभिसरण पावणारें रुधिर एकदम वर हृदयाकडे वळणें. रक्तरुधिरपेशी सकेंद्र असून अंडाकृति आहेत. रुधिर जास्त उष्ण असून त्याचें उष्णमान ३८° सेंटिग्रेड असतें.

ज्ञानेंद्रियव्यूहः—मेंदू मस्तिष्ककोशांत गच्च भरून गाहिलेला असतो व तो आकृतीनें विशेष रुंद व वाटोळा असा असतो. सुषुम्नाशीर्षाला (मेडयुला ऑब्लॉगाटा) उदरतलभागीं बराच बांक असतो. अनुमस्तिष्क ( सेरिबेलम ) बरेंच मोठें असतें व त्याचा प्रथम भाग मोठा झालेला असून त्याच्या प्रत्येक बाजूला एक एक लहान पार्श्वभाग बनलेला असतो. अनुमस्तिष्क चतुर्थमस्तिष्कविवराला ( फोर्थ व्हेन्ट्रिकल) झांकून टाकतें. गुरुमस्तिष्क ( सेरिब्रम ) पाठीमागें पसरलेलें असून अनुमस्तिष्काला मिळतें. त्यामुळें चक्षुमस्तिष्क शकलें बाहेरच्या अंगाला कललीं जातात व तीं जीं पृष्ठभागीं असावयाचीं तीं पार्श्वभागीं असतात व प्रत्येक खंड आकृतीनें वाटोळें असतें. घ्राणमस्तिष्क ( ओलफॅक्टरी लोब्स ) फारच थोड्या प्रमाणानें झालेलें असतें, कारण पक्ष्यांमध्यें घ्राणेंद्रिय फारसें विकास पावत नाहीं.

वृक्क ( किडने ) जननेंद्रियेंः—प्रत्येक बाजूवर एक एक वृक्क असून तें चपटलेलें असतें व त्याचे तीन भाग दिसतात व ते तीन्ही भाग कबंधाच्या श्रोणिविभागांतील खळग्यांत अगदीं बरोबर बसलेले असतात. वृक्काची उत्पत्ति परिपूर्तितावस्थेंतील पश्चिम वृक्कनलिकासमूहांतून ( मेटॅनि फेरॉस ) झालेली असते. प्रत्येक वृक्कस्रोतस ( युरेटर ) अगदीं अरुंद नालिकेप्रमाणें असून पश्चिमशेवटीं सरळ गति घेत पश्चिम बाह्यत्वचाविवराच्या मधल्या भागात उघडतें.

मुष्कः—मुष्क दोन आहेत प्रत्येक मुष्क (टेस्टीज) अंडाकृति असून वृक्काच्या उदरतलीं पूर्वशेवटीं वलेनें लागलें आहे. त्याच्या वाढीचें प्रमाण परिणत दशेवर अवलंबून असतें.

प्रत्येक मुष्काच्या अंतःकांठापासून नागमोडी असलेलें शुक्रस्रोतस (व्हासडेफरन्स) वृक्कस्रोतसाच्या समांतरी राहून पश्चिम शेवटीं गति घेत पश्चिम वाह्यत्वचाविवराच्या मधल्या भागांत एका उंचवटयाच्या टोंकाला उघडतें. शुक्रस्रोतसाचें पश्चिमशेवट थोडेसें फुगरट बनलेलें असतें त्याला शुक्राशय (सेमिनल व्हेसिकल) म्हणतात. शिश्नासारखें इंद्रिय कपोतामध्यें नसतें व तें बऱ्याच पक्ष्यांमध्यें झालेलें नसतें. कांहीं पक्षी–जसें बदक, शहामृग इत्यादि–यांच्यांत शिश्नरूपी एक घन अवयव पश्चिम वाह्यत्वचाविवराच्या उदरतलाच्या भागापासून झालेलें असतें.

स्त्रीजननेंद्रियांपैकीं उजव्या बाजूवरील अंडकोश (ओव्हरी) व अंडस्रोतस (ओव्हिडक्ट) यांचा लोप होतो व ही गोष्ट यांत विशेष होय. परिणत दशेमध्यें डावीकडील अंडकोश मोठा असून त्याच्या पृष्ठभागावर लहान लहान व निरनिराळ्या आकाराच्या अंडोत्पादक पिशव्यांचा समूह (फोलिक्ल) बनलेला दिसतो व त्या प्रत्येक अंडोत्पादक पिशवींत एक अंडें तयार होतें. तसेंच डावीकडील अंडस्रोतस लांब व नागमोडी रीतीनें वळलेला असतो. त्याचा पूर्व शेवट रुंद गळणीच्या तोंडासारखा असतो व त्यांत अंडोत्पादक पिशव्यांतून अंडीं बाहेर पडलीं कीं, प्रवेश करतात. बाकीचा भाग स्नायुयुक्त जाड्या नलिकेप्रमाणें असून त्याच्या आंतील विवराला पिंडपेशीयुक्त कलेचें (ग्लॅंडयुलर मेंब्रेन) आच्छादन झालेलें असतें. हा अंडस्रोतस पश्चिम वाह्यत्वचाविवराच्या मधल्या भागांत उघडतो.

उजवीकडील अंडकोशाचा व अंडस्रोतसाचा जरी लोप झालेला असतो तरी एखाद्या वेळीं क्वचित खिरट्या रूपानें तीं दिसतात.

अंडीं अंडस्रोतसांत असतांना फलद्रूप होतात. फलद्रूप झालेलीं अंडीं अंडस्रोतसांतून बाहेर पडत असतांना त्यांच्या पिंडपेशीयुक्त कलेच्या योगेंकरून त्यांच्यावर आवरणरूपी कांहीं पुटें लागलीं जातात. प्रथम सभोंवती पांढऱ्या शुभ्र बलकानें वेष्टण तयार होतें; नंतर त्याच्यावर पापुद्र्याप्रमाणें अंतःकवचावरण (शेलमेंब्रेन) बनतें व या अंतःकवचावरणाच्या भोंवतीं शेवटीं चुनखडीक्षारयुक्त असें कवच बनलें जातें. कपोतामध्यें मादी एका वेळीं दोन अंडीं, घरटें करून त्यांत घालते व त्याच्यावर नर व मादी हीं दोघेंहि बसून तीं उबवितात. चवदा दिवसांत अंडें उबून पिलूं तयार होतें. पिलूं पक्कें तयार झाल्यावर तें आपणच कवच फोडून बाहेर निघतें. प्रथम त्याच्या अंगावर मऊ पिसें असतात व त्याला उभयतां नर मादी आपल्या पूर्व आमाशयांतील दुधासारख्या रसानें पोशितात. या पूर्व आमाशयांतील पांढऱ्या रसाला "कपोताचें दूध" असें नांव देतात.

**पाइनगंगा**—वऱ्हाड. बुलडाणा जिल्ह्याच्या पश्चिम सरहद्दीवर ही नदी उगम पावून वणी तालुक्याच्या आग्नेय कोपऱ्यांत जुगद येथें वर्धा नदीस मिळते. तेथून तिला प्राणहिता म्हणतात. या नदीची एकंदर लांबी ३०० मैल आहे.

**पाइनघाट** (अथवा पायांघाट)—वऱ्हाडच्या उत्तरेस सातपुडयाचा मेळघाट तालुका व दक्षिणेस बालाघाट उर्फ घाट यांमधील जो भाग पूर्णानदीनें व्यापला आहे त्यास "पाईनघाट उर्फ पायांघाट" असें नांव आहे. हा भाग अस्सल काळ्या जमिनीचा व गाळवट असून फार सुपीक आहे. इमादशाहींत खानदेश व वऱ्हाडच्या बालाघाटाच्या उत्तरेकडील सखल जमीन व मेळघाट यांसुद्धां सर्व पूर्व–पश्चिम लांबीचा एक सुभा करून त्यास पायांघाट सुभा असें नांव दिलें होतें. [काळे-वऱ्हाडचा इतिहास.]

**पाईक**—मध्यप्रांतांतील एक जात पूर्वी यांचा धंदा सैन्यांतील पायदळांचा असे. लोकसंख्या सुमारें ३००० आहे. दमोह व जबलपूर येथें यांहीं पाईक लोक आढळतात पण ते स्वतःला रजपूत म्हणवितात. पण रजपूत त्यांच्या मुली करीत नाहींत. संबळपुरांतील पाईक लोकांचीं कुलनामें तर डुबे, चालकवंसी, छिनकरन, इत्यादि आहेत. समाजांत यांचा दर्जा फार हीन आहे.

**पाऊस**—सृष्टीला जीवन देणारा जो पाऊस त्याची महती फार पुरातन काळापासून गायिलेली आहे. ऋग्वेदांत, इंद्र अंतरिक्षांतील पावसाला अडवून धरणाऱ्यांचें निर्दालन करतो; वादळांचे देव मरुत् त्याला साहाय्य करतात. पुराणांतून इंद्र हीच पावसाची अधिष्ठात्री देवता कल्पिली आहे. पण वेदकालीं पर्जन्यदेवता स्वतंत्र होतीसें दिसतें. या पर्जन्यदेवतेची माहिती वेदविद्या विभागांत (पृ. ३३४--३३५) दिलेली आहे. प्रत्येक प्राचीन राष्ट्रांत एक पर्जन्यदेवता कल्पिलेली असे व तिची आराधना करण्यांत येई. आतां पाऊस म्हणजे काय व तो कोणत्या प्रमाणांत पडतो याचा थोडक्यांत विचार करूं.

धुक्याच्या बारीक कणांपासून पावसाचे थेंब बनतात. वाऱ्याच्या योगानें हे बारीक कण एके ठिकाणीं जमून हवेंतून खालीं उतरतांना त्यांचे पावसाचे थेंब बनतात. मेघ व पाऊस यांचा अगदीं निकट संबंध आहे. आणि ज्या कारणानें मेघ बनतात तींच कारणे पावसाचीं होत. त्यांपैकीं मुख्य कारणें म्हणजे (१) निरनिराळ्या उष्णमानांच्या प्रवाहांचा संयोग, (२) उंचवर चढणारी हवा व (३) उष्ण व थंड हवेचा जमिनीशीं होणारा संयोग. बहुतेक सर्व पाऊस ढगांमधून किंवा वादळी वाऱ्यांपासून अगर पावसाळी वाऱ्यांच्या योगानें पडतो. ज्या ठिकाणीं वरील कारणें आढळत नाहींत त्या ठिकाणीं पाऊस क्वचितच पडतो.

पृ थ्वी व री ल पा व सा चें प्र मा ण—समुद्रसपाटीपेक्षां जास्त असणारी उंची व अक्षांश यांवर पावसाचें प्रमाण अवलंबून आहे. व्यापारी वारे ज्या प्रदेशांत पोंहोंचतात तेथें पावसाचें प्रमाण बरेंच असतें. परंतु ज्या प्रदेशांतून वारे वाहात जातात त्या प्रदेशांत मात्र पाऊस कमी असतो. उंच पर्वतावर

जेव्हां वारे वाहातात तेव्हां त्या ठिकाणीं जास्त पाऊस पडतो. विशेषतः जे उष्ण वारे समुद्रावरून वाहात जातात त्यांच्यामुळें पाऊस अधिक पडतो. परंतु असे वारे पर्वतांनीं आडले गेले म्हणजे पर्वताच्या दुसऱ्या बाजूस मुळींच पाऊस पडत नाहीं. विषुववृत्ताजवळील शीतकटिबंधांत साधारण बराच पाऊस पडतो. ह्या प्रदेशांतून एक पावसाळा व दुसरा उष्ण काळ असे दोन ऋतू असतात. शिवाय समुद्रकिनाऱ्यालगतच्या प्रदेशावर पाऊस जास्त असतो. समुद्रापासून लांबवर असणाऱ्या प्रदेशांत पाऊस फारच कमी असतो. समशीतोष्ण कटिबंधात निरनिराळे प्रकार आढळतात. पुष्कळ पावसापासून तो मुळींच पाऊस न पडणारे देश ह्यांत असतात. वारे, समुद्राचें सान्निध्य, वादळी वारे वगैरे गोष्टींवर एकंदर ऋतुमान अवलंबून असतें. जेथें जंगल असतें तेथें पाऊस जास्त पडण्याचा संभव असतो.

पृथ्वीवरील बहुतेक सर्व ठिकाणीं पर्जन्यमान ४० इंचांपेक्षां कमी असतें. ६०° अक्षांशापर्यंत समुद्राजवळच्या प्रदेशांत तें सामान्यतः ४०ते१०० इंच असतें व अगदीं समुद्राजवळच्या विषुववृत्तावरील कांहीं भागांत १०० वर पाऊस पडतो. आसामांत चेरापुंजी या ठिकाणीं पाऊस ५००ते६०० इंच पडतो. ह्याच जगांतील अतिशय पावसाचा प्रदेश आहे. तिबेट, गोबीचें वाळवंट व सहारा या ठिकाणीं पाऊस मुळींच पडत नाहीं म्हटल्यास चालेल.

पावसाचा काल सर्व ठिकाणीं एक नसतो. मद्रास इलाख्याच्या पूर्व भागासारख्या ठिकाणीं वर्षांतून दोन वेळां पाऊस पडतो. इंग्लंड, जपान यांसारख्या देशात बारा महिने पाऊस असतो. पावसाचें मान इंचांत सांगतात. आकाशांतून पडणाऱ्या वर्फाच्या कणांचा थर १० इंच जाडीचा झाला म्हणजे त्यापासून एक इंच खोलीचें पाणी तयार होतें.म्हणून इंग्लंडांत वर्फावरून पर्जन्यमान पहातात.

पाऊस मोजण्याचें यंत्र.—अगदीं साधें यंत्र म्हणजे एक विंचेस्टर बाटली व तिच्यावर बसविलेलं एक नरसाळें ह्या नरसाळ्यांत पडणारें सर्व पावसाचें पाणी खालील बाटलींत सांचतें व तें एका कांचेच्या मापाच्या पेल्यानें मोजतात आतां ह्या बाटलीच्या ऐवजीं नांव्याचें वर्तुलाकार उंच भांडें उपयोगांत आणतात, व ह्या भांड्यावर नरसाळें बसविलेलें असून वर दुसरें त्याच आकाराचें भांडें बसविलेलें असतें. त्याच्या योगानें वर्फ पडल्यास तें सर्व विरळून त्याचें पाणी खालील भांड्यांत सांचतें. हें पाणीहि एका कांचेच्या मापानें मोजतात. ह्या भांड्याचा व वरील नरसाळ्याचा व्यास ८ इंच असतो. हें यंत्र जमिनींत पुरून बसवावयाचें असतें. हें घरें, भिंती, झाडें, वगैरेंच्या पसून लांब अंतरावर असलें पाहिजे, व जमिनीच्या वर एक फूट उंच असलें पाहिजे.

पाणी हें मनुष्यप्राण्याचें जीवन असल्यानें तें मिळविण्यासाठीं त्याची खटपट असणारच. तेव्हां पुष्कळ जुन्या समाजांतून पाऊस पाडण्याकरितां जादूटोणे, मंत्राभिषेक, नाच वगैरे धार्मिक संस्कारांसारखे जे उपचार केले जातात ते पाहून नवल वाटण्याचें कारण नाहीं. आजच्या सुधारलेल्या जगांतहि असे उपचार चालतात; पण ते अर्थातच शास्त्रीय स्वरूपाचे असणार. अमेरिकेंतील हॅटफील्ड नांवाचा एक शास्त्रज्ञ आकाशांत विद्युत्प्रवाह सोडून त्याच्या साहाय्यानें पाऊस पाडीत असतो. विल्यम हेट नांवाचा दुसरा शास्त्रज्ञ एका रसायन मिश्रणाच्या साहाय्यानें हें काम करतो. तेव्हां आतां मेघराजाकडे डोळे लावून बसण्याचें कारण न राहतां शेतकीचें उत्पन्नहि अनिश्चित रहाणार नाहीं.

**पाकपट्टन**—पंजाब इलाख्यातील मॉन्टगॉमेरी जिल्ह्याची एक तहशील. क्षेत्रफळ १३४६ चौरस मैल. याच्या आग्नेय सरहद्दीवरून सतलज नदी वाहाते. लोकसंख्या ( १९२१ ) १४१४१७.ह्यांत एक गांव व ४२० खेडीं आहेत. मुख्य गांव पाकपट्टन असून हें पूर्वीचें यौधेय ( सध्यांची जोहीय जात ) लोकांचें अजोधन होय.

**पाकौर खेडें**—बंगाल इलाख्यांतील संताळ परगणा जिल्ह्याच्या पाकौर पोटविभागाचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या सुमारें दीड हजार. एकंदर पोटविभागाची लोकसंख्या २३८६४८ असून १०५५ खेडीं आहेत.

**पाखाल**—हैद्राबाद संस्थान. वारंगळ जिल्ह्याचा एक तालुका.क्षेत्रफळ७२० चौरस मैल.लोकसंख्या जहागिरी धरून पन्नास हजार आहे. जंगल बरेंच आहे. हवा मलेरियाजनक आहे. यांत खेडीं १५५ व ३ जहागिरी आहेत. मुख्य ठिकाण नरसमपेठ हें आहे. या तालुक्यांत पाखाल नांवाचा विस्तीर्ण तलाव आहे.

**पॉगेनडार्फ, जोहान ख्रिश्चिअन**( जन्म १७९६ )—एक जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. यानें एक शास्त्रीय मासिक बावन वर्षें चालविलें होतें. गणितज्ञ, खगोलशास्त्रज्ञ पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ व रसायनशास्त्रज्ञ यांचीं चरित्रें व त्यांचीं कार्यें यांविषयीं त्यानें एक ग्रंथ प्रसिद्ध केला.शास्त्रज्ञ या दृष्टीनें पॉगेनडार्फ याची योग्यता फारशी उच्च ठरवितां येत नाहीं. त्याच्या ठायीं गणितासंबंधीं कौशल्य नव्हतें व शास्त्रीय शोधापासून सर्वसामान्य तत्त्व काढण्याची बुद्धि नव्हती. परंतु प्रयोगाची रचना करण्यात तो फार कुशल होता. त्यानें विद्युत्‌क शास्त्रीय उपकरणें तयार केलीं आहेत. शास्त्रीय वाङ्मयात्मक आणि शास्त्रीय शोधात्मक असें जें कार्य त्यानें केलें त्यामुळें सर्व यूरोपभर त्याची ख्याति व बहुमान झाला. संपादकीय लेखनादि व्यवसाय व शास्त्रीय शोध यांतच त्यानें आपला काल घालविला. त्याचे बहुतेक सारे शोध विद्युच्छास्त्र आणि चुंबकशास्त्र यांसंबंधींच आहेत.

**पाच** ( लॅविअटी )—एक लहानसें झुडूप. याच्या मंजिरीस मधुर वास येतो व त्यापासून अत्तर काढतात. लागवड रेताड जमीनींत रोप लावून करतात. स्ट्रेट सेटलमेंट, आसाम, मध्यप्रांत वगैरे प्रदेशांत हें विशेष आढळतें.

**पाच**—यास गरुडपाच, राजतीळ, हरिन्मयी, मरकतमणी, पन्नगमणी इत्यादि नांवें आहेत. यास फारसींत जमरुद म्हणतात. हें वैडूर्य मण्याच्या जातींतील एक हिरव्या रंगाचें रत्न असून याचे गुणधर्म बहुतांशीं वैडूर्य मण्याच्या गुणधर्मांशीं जुळतात. याचे स्फटिक षट्नमपार्श्व असतात. इतर रत्नांच्या मानानें पाच तितकी कठिण नाहीं. याचें विशिष्ट गुरुत्व २.६९ आहे. यामध्यें प्रकाशाचें वक्रीभवन व उत्सर्जन करण्याची शक्ति फार नाहीं म्हणून पाच फार चकाकत नाहीं. यामध्यें क्रुम नामक धातु असतो म्हणून याला हिरवा रंग येतो.

हल्लीं कोलंबियाची राजधानी (मुख्य शहर) जी बोगोटा तिच्या आसपास पाच सांपडते. मुझो येथें प्रसिद्ध खाण आहे. सन १८३० मध्यें उरल पर्वतांत पाच आकस्मिक सांपडली व सध्यां इकेटेरिन्बर्गच्या ईशान्येस ६० मैलांवर टाकोवाया नदीवर सांपडते. पाचेची किंमत रंगाप्रमाणें कमी जास्त होते. हिंदुस्थानांत खंबायत व अजमीर या ठिकाणीं क्वचित पाच सांपडते. उत्तम गडद हिरव्या रंगाची बिनछटेची पाच असेल तर तिला दर रत्तीस २०० ते ३०० रुपये किंमत पडते.

या रत्नांत रोग बरे करण्याची शक्ति आहे असें प्राचीन काळीं लोक मानीत. पाच अंगावर घातली असतां मूर्च्छा येणें, हगवण लागणें इत्यादि रोग जातात असें मानीत. यानें स्त्रिया कांहीं इजा न होतां प्रसूत होतात, भुतेंखेतें पळतात व पाच गळ्यांत घालणाऱ्या स्त्रीचें पातिव्रत्य कायम राहतें असें समजत. पाच पोटांत घेतल्यास फार गुणकारी आहे व हिरव्या रंगामुळें पाच डोळ्यांस फार चांगली असें मानीत.

**पांचकळशी** (सोमवंशी क्षत्रिय, पाठारे)—पांचकळशी ही जात मुख्यत्वेंकरून ठाणें जिल्ह्यांत व मुंबई शहरांत आढळते. तिचें दुसरें नांव 'सोमवंशी क्षत्रिय पाठारे' असें आहे. त्या लोकांत धंदेवाचक वरेच पोटविभाग असून त्यांचीं नांवें भिन्न आहेत. उदाहरणार्थ—सुतार, वाडवळ [ वाडी म्हणजे बागाईत करणारे ( वाडी—फळबाग ) ] वगैरे. सर्व पोटविभागांनां सारखा लागू होणारा शब्द 'पांचकळशी' हा होय. ह्या जातीची नक्की लोकसंख्या देणें कठिण पडतें. तथापि अजमासें पुढील आंकडे देतां येतील. साष्टीकर पांचकळशी ६०००, अष्टागरकर पांचकळशी ३०००, व वाडवळ पांचकळशी ८ हजार. पांचकळशी हा शब्द प्राचीन काळापासून अस्तित्वांत असून त्याचा अर्थ एवढाच कीं यांच्या लग्नप्रसंगीं सिंहासनासारख्या चौरंगावर सभोंवार पांच कलश ठेविलेले असतात. वसई व माहीम तालुक्यांत शेतीवाडीचा धंदा करणारा पांचकळशी वर्ग आहे. त्या वर्गांत लग्नप्रसंगीं अद्यापि वराची मिरवणूक लांकडाच्या तयार केलेल्या सिंहासनावर काढतात. सिंहासन पुष्पमालांनीं वगैरे सुशोभित करून त्यावर पांच कलश ठेवितात.

पाताणे किंवा पाठारे प्रभूंप्रमाणेंच यांचा इतिहास आहे. तेराव्या शतकांत गोदावरीच्या कांठीं असणाऱ्या पैठण शहराहून राजा बिंब अथवा भीम ज्या वेळेस मुंबईस व ठाण्यास आला तेव्हां त्याच्याबरोबर हे लोक आले असा इतिहास मिळतो. मारवाडांतून काठेवाड–गुजराथच्या मार्गे अनहिलवाडपट्टणच्या बिंबाबरोबर आम्ही आलों असें कांहीं म्हणतात, व या विधानाच्या पुष्टीस्तव पुरावेहि देतात. बिंबाच्या इतिहासांत एक मांडणी करण्यांत आली आहे तिच्याबद्दल सविस्तर विचार केला जाईल. बिंबाच्या सैन्यांत हे योद्धे होते. वसईच्या वेढ्यांतहि यांनीं मराठ्यांनां मदत दिली आहे. अलीकडे त्यांनीं शेती, सुतारकाम व शिल्पकाम यासारखे उद्योग आरंभिले आहेत. मुंबईस कारकुनीचीं कामें करणारे पांचकळशी पुष्कळ असून स्वतंत्र उद्योगधंदे करणारेहि थोडे आहेत.

रावबहादुर यशवंतराव सूर्यराव देसाई यांनीं 'दहा वर्षांपूर्वीं आम्ही" या छोट्या पुस्तकांत या ज्ञातींतील लोकांचें शिक्षण व धंदे याची आंकडेवार माहिती दिली आहे. तीवरून पहातां साष्टीकर व अष्टागरकर पांचकळशी पुरुषांपैकीं बहुतेक निम्मे मेस्त्री, कॉंट्रॅक्टर, ड्राफ्टसमन यांसारख्या इंजिनियरिंग धंद्यांत पडलेले आहेत. ¼ कारकून आहेत, ⅙ शेतकी करतात व बाकीचे डॉक्टर, व्यापारी, शिंपी वगैरे धंदा करणारे आहेत. शेंकडा ४४.५ पुरुष इंग्रजी शिकलेले आहेत. शेंकडा ४६ स्त्रिया साक्षर आहेत.

पांचकळशांत (१) अष्टागरकर–(अ) शुद्ध, (आ) जंजिरा व (इ) मालेकर माळी किंवा चेउलकर; (२) साष्टीकर व (३) वाडवळ असे तीन वर्ग आहेत. अष्टागरकर व साष्टीकर यांच्यांत कधीं कधीं लग्नव्यवहार होतो परंतु ह्या उभयवर्गांचा व वाडवळ पांचकळशी यांचा परस्परांशीं अन्नव्यवहार व लग्नव्यवहारहि होत नाहीं. वाडीचा धंदा करणारांनां वाडवळ ही संज्ञा सामान्यतः वसई व माहीम प्रांतांत देण्यांत येते. तेथें वाडीचा धंदा करणाऱ्या ख्रिस्ती लोकांनां सुद्धां वाडवळ म्हणून संबोधण्यांत येतें. ह्यावरून हें नांव धंदेवाचक असून परस्पर वर्गांचा भिन्नपणा दाखविण्याकरितां पुढें रूढीनें प्रचारांत आलें असें दिसून येतें. इतर वर्गांपासून वाडवळ पांचकळशांची फारकत १४ व्या शतकापासून झाली असावी असें दिसतें. ह्या वर्गांचा उल्लेख शंकराचार्य व पांचकळशांचा उपाध्यायवर्ग पळशीकर ब्राह्मण यांनीं कागदोपत्रीं "पांचकळशी सोमवंशी क्षत्रिय पाठारे" असा केलेला आहे. साष्टीकरांतील प्रो. ताकसाव हे सर्व पोटविभाग मूळ एकाच वंशाचे आहेत असें मानतात. अष्टागरकरांनांहि परके लेखण्याची कांहीं साष्टीकरांची वृत्ति दिसून येते. परंतु संकुचित मनोवृत्तीच्या योनक अशा चळवळींचा समाज जसजसा सुधारेल तसतसे हे निर्बल होत जातील व कालांतरानें सर्व वर्ग एक होतील अशी आशा

करण्यास जागा आहे असें या समाजांतील प्रागतिक भावनांचे पुढारी म्हणतात.

या ज्ञातींत प्रत्येकाला गोत्र असतें व सगोत्र विवाह इतर हिंदु जातींप्रमाणें निषिद्ध मानतात. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. लग्नविधि इतर उच्च वर्गाप्रमाणेंच आहे. पुनर्विवाह संमत आहे, घटस्फोट नाहीं. मासे, मांस व मद्य पांचकळशी खातात. ब्राह्मणांवांचून इतर जातींच्या हातचें अन्न हे खात नाहींत. प्रत्येक कुटुंबांत एक एक कुलदेवता असतेच. उदा॰ महालक्ष्मी, एकवीरा, वज्रेश्वरी, जोगेश्वरी इत्यादि. त्यांचे उपाध्याय स्थानिक देशस्थ ब्राह्मण असतात, त्यांनां पळशीकर असें नांव आहे. पांचकळशांमधील पंचायत-संस्था पुष्कळ दिवसांपासून अस्तित्वांत असून पुढें जरी पुष्कळ प्रकारच्या राज्यक्रांत्या व सामाजिक क्रांत्या झाल्या तरी त्यानां न जुमानता अजूनपर्यंत ती टिकून आहे. अलीकडे मात्र मुंबई शहरांत पंचायत-संस्थेच्या सत्तेला थोडीशी ओहोटी लागली आहे.

पांचकळशांच्या प्रत्येक वर्गांत एकेक स्वतंत्र जातिसंस्था असते. पंचांचा हुकूम अमलांत आणणारे मानकरी लोक पिढीजाद असतात. परंतु जर एखादा मानकरी निपुत्रिक मरण पावला तर त्याच घराण्यापैकीं कोणाची तरी नेमणूक बहुमतानें होते.

साष्टीकर पांचकळशांत सर्वांत खालची पंचायत म्हणजे ग्रामसभा होय. ती बहुतकरून वसई-साष्टी तालुक्यांतल्या खेड्यांत भरते. कारण साष्टीकर पांचकळशी या भागांत पुष्कळ राहतात. त्याप्रमाणेंच त्यांचा भरणा मुंबईच्या गिरगांव, माझगांव, परेळ वरळी व माहीम या भागांत विशेष असल्यामुळें त्या ठिकाणींहि ग्रामसभा आहेत. अपीलें ऐकण्याचा किंवा अखेर निर्णय देण्याचा अधिकार महासभेकडे असतो. या सभेचे प्रमुख मालाडचे देसाई असतात. मालाडकर देसाई हे फार प्राचीन काळापासून मुख्य असून सुमारें ७० वर्षांपूर्वी शंकराचार्यांनीं यांनां सनद देऊन यांची सत्ता कायम केली आहे. १८९० सालीं मुंबई हायकोर्टानें या महासभेनें केलेला निर्णय कायम धरला होता.

अष्टागरकर पांचकळशांत मुख्य मानकऱ्याला अधिकारी ही संज्ञा असून त्याचें राहण्याचें ठिकाण चेऊल येथें असतें. वडवाळ पांचकळशांत सबंध जातीवर नियंत्रण चालविणारा असा अधिकारी नाहीं. गांवोगांवीं पंचायतींत पाटील प्रमुख असून साधारण वादाचा निकाल पंचायतींत बहुमतानें केला जातो, व त्या पंचायतीचा प्रमुख म्हणून समजला जाणारा मानकरी दुसऱ्या गांवच्या मानकऱ्यांनां त्यासंबंधाची खबर देतो. सदर निकाल असमाधानकारक असल्यास त्याजवर अपील पंचक्रोशींत किंवा तालुकापंचायतींत चालतें. धर्मशास्त्रासंबंधानें वादविवादाचा निर्णय कधीं कधीं शंकराचार्यांमार्फत करून घेतात. शंकराचार्यांनीं इ. स. १८३६ त एक व १८५२ त एक अशा तऱ्हेचे निकाल दिलेले आहेत. त्यांच्या नकला उपलब्ध आहेत.

ह्या समाजांत पद्माक्ष, भद्राक्ष, विश्वामित्र, वकदाल्भ्य, त्र्यंबक, कश्यप, कण्व, वसिष्ठ, गौतम, इत्यादि गोत्रें आहेत. साष्टीकर व अष्टागरकर पांचकळशांत म्हात्रे, मंत्री, राउ्टे, वरळीकर, ताकखाव, घरत, पाठारे वगैरे आडनांवें आहेत. विशेष उत्तेजन देणाऱ्या "क्षात्रैक्यसमाजा" सारख्या संस्था आहेत. "क्षात्रदूत" व "क्षात्रवृत्त" अशीं दोन मासिकें चालतात. वाडवळ पांचकळशांत म्हात्रे, ठाकूर, राऊत, चौधरी, वर्तक, सावे, चुरी, पाटील, घरत, राय वगैरे आडनांवें आहेत. 'सोमवंशी क्षत्रिय समाजोन्नति संघ' ही संस्था समाजोन्नतीचें काम करीत असून तींत जातीच्या लोकसंख्येच्या मानाने सभासदांचें प्रमाण बरेंच मोठें आहे. हें त्या संस्थेच्या वार्षिक अहवालावरून दिसून येतें. अलीकडे "क्षात्रसेवक' नांवाचें त्रैमासिक ज्ञाति-उन्नतीच्या चळवळीस प्रोत्साहन देण्याकरितां निघत असतें.

वरील संस्थांनीं पाठविलेल्या माहितीचा हा लेख तयार करण्याच्या कामीं उपयोग केला आहे. याशिवाय एन्थोवेन-ट्राइब्स अँड कास्ट्स् ऑफ बाँबे; बॉम्बे ग्याझेटियर, बॉम्बे सेन्सस रिपोर्ट वगैरे पुस्तकें उपयुक्त वाटतील अशींच आहेत.

**पांचगणी**—मुंबई इलाख्यांतील सातारा जिल्ह्याच्या वांई तालुक्यामधील एक हवाशीर ठिकाण. समुद्रसपाटीपासून याची उंची ४३७८ फूट आहे. लोकसंख्या (१९०१) १३१२. युरोपियन, व पारशी मुलांकरितां त्या जातींचीं हायस्कुलें व वसतिगृहें आहेत हिंदु मुलांकरितां रा. पंडित यांनीं एक वसतिगृह-हायस्कूल चालविलें आहे. येथें कॉफीची लागवड चांगली होते.

**पांचरात्र**—पांचरात्र हें नांव मूळच्या भागवत धर्माला लावण्यांत येत असे. चार वेद, सांख्य व योग अशा पांचांचा यांत समावेश होतो म्हणून याला पांचरात्र हें नांव प्राप्त झालें आहे असें महाभारताच्या शांतिपर्वामध्यें म्हटलें आहे. पण ही उपपत्ति समाधानकारक नाहीं. पांचरात्र हें नांव कसें रूढ झालें, यासंबंधीं कांहींच निश्चित मत देतां येत नाहीं. जैन धर्माचा उदय होण्यापूर्वीच म्हणजे ख्रिस्ती शकापूर्वी नवव्या-दहाव्या शतकांतच हा पांचरात्रधर्म प्रचलित होता असें युल्हरनें म्हटलें आहे.

मूळच्या भागवतधर्माला उर्फ पांचरात्राला पुढें निरनिराळीं स्वरूपें प्राप्त झालीं व पांचरात्रधर्म हा वैष्णव धर्माच्या अनेक पंथांपैकीं एक प्रमुख पंथ होऊन बसला. प्रथमतः पांचरात्र उर्फ भागवतधर्म हा निष्काम कर्मपर होता. त्यांत वासुदेवभक्तीलाच केवळ प्राधान्य नव्हतें पण पुढें भागवतधर्मांत निष्काम कर्मापेक्षां भक्तीलाच अधिक प्राधान्य येऊन बसलें (यासंबंधींची माहिती ज्ञानकोश प्रस्तावना खंड, भाग ४, बुद्धोत्तर जग, प्रकरण ६ वें यांत सविस्तर रीतीनें वाचकांनां वाचावयास मिळेल).

पांचरात्रमत हल्लीं रामानुज मतांतच मोडतें. या मताचीं मुख्य तत्त्वें येणेंप्रमाणें आहेत— या जगताचा कर्ता व उपादानकारण ईश्वर असून तो पुरुषोत्तम, वासुदेव या शब्दांनीं ओळखला जातो. हा वासुदेव कल्याणगुणसंयुत असा असून परब्रह्म आहे तो जीवांचा नियामक आहे. तो परम कारुणिक, व भक्तवत्सल असून आपल्या उपासकांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें फल देण्याकरितां, आपल्या लीलेनें, अर्चा, विभव, व्यूह, सूक्ष्म व अंतर्यामी अशा पांच स्वरूपांत राहिला आहे. प्रतिमादि देवांचीं स्वरूपें यांना अर्चा म्हणतात. रामादि अवतारांना विभव अशी संज्ञा आहे. वासुदेव ( परब्रह्म ) त्यापासून संकर्षण ( जीव ), संकर्षणापासून प्रद्युम्न ( मन ), व प्रद्युम्नापासून अनिरुद्ध ( अहंकार ) अशा प्रकारचा हा वासुदेवाचा चतुर्विध व्यूह होय. सूक्ष्म म्हणजे संपूर्ण व संपूर्ण षड्गुण असें परब्रह्म होय. सकल जीवांच्या ठिकाणीं राहून त्यांना प्रेरणा करणारा जो वासुदेव त्याला अंतर्यामी असें म्हणतात. या पांच स्वरूपांची यथाक्रमानें उपासना करून पापनाश झाल्यावर मग पुढच्या पंचविध उपासनांचा अंगीकार करावा. अभिगमन, उपादान, ईज्या, स्वाध्याय, योग अशा पांच उपासना पंचरात्र मतांत सांगितल्या आहेत. देवळाच्या भोंवतालचा केर काढून ती जागा स्वच्छ ठेवणें याला अभिगमन हें नांव आहे. गन्धपुष्पादि पूजेच्या सामुग्रीला उपादान म्हणतात. देवतांच्या पूजनाला ईज्या म्हणतात. अर्थानुसंधानपूर्वक मंत्राचा जप करणें, वैष्णवसूक्तांचा व स्तोत्रांचा पाठ करणें, नित्य नामसंकीर्तन करणें व तत्त्वप्रतिपादक शास्त्रांचा अभ्यास करणें या गोष्टी स्वाध्यायांत येतात. योग म्हणजे देवतानुसंधान होय. अशा रीतीनें पंचविध उपासना केल्या असतां, विज्ञान उत्पन्न होऊन बाह्यविषयांबद्दलची आसक्ति नष्ट होते व वासुदेव हा अशा भक्ताला आपल्या स्थानाकडे नेतो व त्याला पुनर्जन्मादिकांची बाधा होत नाहीं, अशा प्रकारच्या मुक्तांच्या ठिकाणीं सर्व कर्तृत्वशक्तीशिवाय बाकी सर्व, परमात्म्याचे गुण उदय पावतात. पांचरात्र रहस्यांत म्हटलें आहे कीं मुक्तामध्यें व वासुदेवामध्यें फरक येवढाच कीं वासुदेवाचें सर्वकर्तृत्व मुक्ताच्या अंगीं येत नाहीं. चित् शब्दानें जीवात्म्याचा बोध होतो. अचित् शब्दानें दृश्य व जड अशा भोग्य, भोगोपकरण, व भोगायतन अशा त्रिविध जगाचा निर्देश होतो. चित् हा अणु, नित्य व नानाविध असून तो परमात्म्याहून भिन्न आहे.

अशा रीतीनें पांचरात्र मताचीं तत्त्वें आहेत. या पांचरात्र मताचा मुख्य कर्ता कोण हें निश्चित नाहीं. कांहीं विद्वानाच्या मतें, सांख्ययोगाचा कर्ता पंचशिख हाच पांचरात्राचा कर्ता होय. तें खरें असो वा नसो, भागवत धर्मावर उर्फ पांचरात्रधर्मावर सांख्ययोग तत्त्वाची बरीच छाप पडलेली दिसते एवढी गोष्ट मात्र खरी आहे. तसेंच सात चित्रशिखंडी ऋषींनीं रचिलेला पांचरात्र ग्रंथ प्रसिद्ध आहे त्यावरूनहि पांचरात्र मत निघालें असण्याचा संभव आहे. तथापि यासंबंधीं निश्चयात्मक असें कांहींच सांगतां येत नाहीं. पांचरात्र मताचें विवरण करणारे मुख्य ग्रंथ म्हणजे, महाभारतांतील नारायणीयोपाख्यान, शांडिल्यसूत्रें, भागवतपुराण, नारदपंचरात्र, नारदसूत्रें व रामानुजाचार्यादिकांचे ग्रंथ हे होत.

[ संदर्भग्रंथः—रामानुजदर्शनम्; भांडारकर—वैष्णविझम्, शैविझम् ॲंड अदर सेक्ट्स; लो. टिळक-गीतारहस्य; फर्कुहर—ॲन औटलाईन ऑफ रिलिजस लिटरेचर, इन इंडिया. ]

**पांचवड**—मुंबई इलाखा, सातारा जिल्ह्याच्या वांई तालुक्यांतील एक गांव. हा गांव बाळाजीपंत नातू यांना साताऱ्याच्या महाराजाकडून जीं गांवें मिळालीं त्यांत मिळाला. तत्पूर्वी हा वैराटगडकर डबीर याजकडे चाकरीसाठीं इनाम होता. थोरले बाजीराव पेशवे हे कोल्हापूरकर संभाजी व सातारकर शाहू महाराज यांना समेट करून पुण्याकडे परत येत असतां त्यांचा पांचवड येथें मुक्काम पडला होता. येथील घांट व विष्णुमंदिरांतील विष्णूची मूर्ति प्रेक्षणीय आहे.

**पांचाल**—गंगायमुनेचा जो दुआब ( अंतर्वेदी ) आहे तोच पांचाल देश होय. कनोजच्या राज्यास पांचाल देशाचेंच राज्य म्हणत असत. या पांचालांच्या अहिच्छत्र, कांपिल्य, कनोज, कांवेरी, वारी वगैरे राजधान्या होत्या.

पांचालदेशज ते पांचाल; पुराणाप्रमाणें पुरुवंशांतीलच हे होत. त्यांचा मूळपुरुष सृंजय; त्याचा उल्लेख ऋग्वेदांत ( ६.२७ ) येतो. नंतर सोमक व सहदेव यांचीं नांवें आढळतात. हाच सहदेव द्रौपदीच्या बाप( द्रुपदा )चा चवथा पूर्वज होय. यानें राजसूय यज्ञ करून मोठी कीर्ति मिळविल्याचें ऐतरेय ब्राह्मणांत आहे. पांचालांना ऋग्वेदकालीं सृंजय व ब्राह्मणकालीं पांचाल म्हणत. महाभारतांत या दोहोंशिवाय सोमक हेंहि एक नांव येतें. हरिवंशांतील पांचालाची व्युत्पत्ति ( एका राजाचे पांच पुत्र ) काल्पनिक आहे. कुरु, तुर्वश, क्रिवि, सृंजय वगैरे पांच जाती मिळून पांचाल झाले असावेत. शतपथ ब्राह्मणांत व ऋग्वेदांत या निरनिराळ्या जातींच्या एकीकरणाचा उल्लेख आहे. हे कुरुपांचाल फार शूर असून त्यांनीं सर्व भरतखंडावर राज्य केलें. त्यांनी पूर्वीच्या कोसल-विदेहांचा पराभव केला. महाभारतात हें देशाचें व राजाचें नांव म्हणून पुष्कळदा येतें. द्रौपदीस पांचाली असें म्हटलेलें आहे. [ गार्गीसंहिता; महाभारत; कनिंगहॅम—आर्कि. रिपोर्ट, भा. ११; वैद्य-मध्य. भारत. पु. २; अय्यंगार—एन्शन्ट इंडिया. ]

**पांचाल**—ही दक्षिणेकडील जात आहे. त्यामुळें हिचा पांचाल राष्ट्राशीं कांहीं संबंध नसावा व पंचाल नांव अधिक बरोबर असावें एकंदर पंचालांची लोकसंख्या सुमारें ( कम्माल धरून ) दहा लाखांवर आहे. पैकीं सर्वांत जास्त म्हैसूर संस्थानांत ( १२८०९८ ), व त्याच्या खालोखाल हैदराबाद संस्थानांत ( ११७७१० ) आहेत. यांच्यांत सोनार, सुतार, तांबट, लोहार व गवंडी

असे यांच्या धंद्यांचे वर्ग आहेत म्हणून यांनां पंचाल असें नांव पडलें. मद्रास इलाख्यांत यांनां कम्माल असें नांव आहे ( 'कम्माल' पहा ). म्हैसूर संस्थानांतील पंचालांपैकीं एक-चतुर्थांश लोक म्हैसूर जिल्ह्यांत आहेत. सोनार -सुतार--लोहारकाम वगैरे यांचे धंदे आहेत. निम्म्याहून अधिक लोक शेतकी करतात. भाषांवरून व वस्तीवरून यांच्यांत कांहीं भेद पडले आहेत. हे यज्ञोपवीत धारण करतात. मांसभक्षण किंवा मदिरापान करीत नाहींत. विधवाविवाहास मोकळीक नाहीं. पोटजातींत परस्परांत विवाह होतात; ब्राह्मणांप्रमाणें यांच्यांत गोत्रें आहेत. कामाक्षी अम्मा ही त्यांची कुलदेवता आहे.

मुंबई इलाख्यांत या लोकांची लोकसंख्या ( १९११ ) ८१०८३ आहे. हे कर्नाटक व दक्षिणप्रांतांत मुख्यत्वेंकरून आढळतात.

पंचालाच्या जातीच्या इतिहासांतील एक विशिष्ट गोष्ट म्हणजे पांच धंद्यांच्या लोकांनीं निरनिराळ्या धंद्यांच्या लोकांमध्यें लग्नव्यवहार सक्तीचा केला ही होय. ही क्रिया प्रत्येक धंदा हें निराळें गोत्र असें धरून व सगोत्री लग्न बंद करून केली. या जातीच्या विस्तारावरून व प्राचीन कानडी ग्रंथांत तिच्या उल्लेखांवरून ही चळवळ फार प्राचीन काळीं सुरू झाली असावी असें दिसतें. या चळवळीचीं अंगें येणेंप्रमाणें होतीं.--कारागीर वर्गांत परस्पर विवाह वाढवून एकी करणें व कारागीरपणाचें ब्रह्मकर्मतुल्य पावित्र्य वाढविणें. सामाजिक सुधारणेच्या महत्त्वाच्या प्रयत्नात "पांचाल" चळवळीचा उल्लेख प्रामुख्यानें आला पाहिजे (विद्यासेवक वर्ष २ रें, अंक २ रा पहा ) या चळवळीचा परिणाम हिंदुस्थानभर अजून होत आहे पण तो पंचाल वर्गांत मोडणाऱ्या जातींशीं लग्नें वाढविण्यांत होत नसून ब्राह्मण हें अभिधान मागण्यापुरताच होत आहे. महाराष्ट्रांतील पांचालांची माहिती "विश्वब्राह्मण" या नांवाखालीं त्यांच्या इच्छेवरून घातली आहे.

**पाचोरा**—मुंबई इलाख्यांतील पूर्व खानदेश जिल्ह्याचा एक तालुका. त्यांत भडगांव पेट्याचा समावेश होतो. क्षेत्रफळ ५४२ चौरस मैल. यात पाचोरा नगरदेवळें व भडगांव हीं तीन गांवें असून १८६ खेडीं आहेत. लोकसंख्या सुमारें सव्वा लक्ष आहे. हवा आरोग्यकारक आहे. नदी–गिरणा; हिचा जामदा कालवा बांधला आहे. मुख्य ठिकाण पाचोरा हें रेल्वे स्टेशन असून तेथें कापसाचा व्यापार आहे. लोकसंख्या सहा हजार आहे.

**पाटडी**—मुंबई इलाखा, काठेवाड पोलिटिकल एजन्सीमधील एक संस्थान. क्षेत्रफळ ४० चौरस मैल. लोकसंख्या दोन हजार. हें काठेवाडांत चवथ्या प्रतीचें संस्थान आहे.

**पाटण**—( १ )मुंबई इलाखा, सातारा जिल्ह्याचा अगदीं आग्नेयीकडील तालुका. क्षेत्रफळ ४३८ चौरस मैल. यात २०३ खेडीं आहेत. मुख्य गाव पाटण. लोकसंख्या सुमारें एक लाख. उन्हाळ्यांत हवा थंड व आरोग्यकारक असते. परंतु इतर ऋतूंत ज्वरकारी असते. वार्षिक पाऊस ६० इंच पडतो. यांत कोयना, तारळी, वगैरे नद्या असल्यामुळें हा सुपीक आहे. मुख्य ठिकाण पाटण असून त्याची लोकसंख्या सुमारें चार हजार आहे. येथें पाटणकर देशमुखाच्या दोन शाखा आहेत.

( २ )मुंबई, पूर्वखानदेश. चाळिसगांवच्या नैर्ऋत्येस १० मैलांवर सातमाळ घाटाच्या पायथ्याशीं असलेलें एक ओसाड खेडें. हें गाव फार प्राचीन आहे. येथील एका देवळांत इ. स. ११७३ चा बालबोध शिलालेख आहे.

याच्या आग्नेयीस आर्ध्या मैलावर डोंगराच्या बाजूस शृंगारचवरी, सीता न्हाणी व नागार्जुन या नांवाचीं तीन लेणीं आहेत.

(३)नेपाळांतील एक गांव. हें बाघमतीच्या दक्षिण कांठापासून जवळच, खाटमांडूच्या आग्नेयीस सुमारें २ मैलांवर आहे. याला ललितपट्टण असेंहि म्हणतात. लोकसंख्या सुमारें ३००००. हें गांव इ. स. २९९ त वसलेलें आहे. गांवाच्या मध्यभागीं असलेला मुख्य चौक व जुना दरबार हीं प्रेक्षणीय आहेत. दक्षिणेस प्राचीन काळचें एक भव्य बौद्ध देवालय आहे. सतराव्या शतकाच्या पूर्वार्धापासून, नेपाळच्या खोऱ्यांतील तीन नेवारी संस्थानांपैकीं पाटण हें एक होतें. १७६८–६९ त तें गुर्ख्यांच्या ताब्यांत गेलें. हल्लीं येथें गुर्खा सरकारची शिबंदी आहे.

**पाटणा संस्थान**—बिहार–ओरिसामधील मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ २३९९ चौरस मैल. हें महानदीच्या खोऱ्यांत असून याच्या उत्तरेस संबळपूर, पश्चिमेस रायपूर जिल्हा, दक्षिणेस कलाहंडी संस्थान, व पूर्वेस बौद संस्थान आहे. मुख्य ठिकाण बोलांगीर हें असून संबळपूरपासून ७५ मैलांवर आहे. या संस्थानांत १६६३ गांवें असून एकंदर लोकसंख्या चार लाख आहे.

**पाटणा**, जिल्हा.—बिहार–ओरिसा प्रांतांत, पाटणा विभागांतील जिल्हा. क्षेत्रफळ २०७५ चौरस मैल. मर्यादाः उत्तरेस गंगानदी व पलीकडे सारण, मुझफरपूर आणि दरभंगा हे जिल्हे; दक्षिणेस गया जिल्हा; पूर्वेस मोंघीर; व पश्चिमेस शहाबाद जिल्हा. गंगा, शोण, पुनःपुन, फल्गु इत्यादि नद्या आहेत. हवेमध्यें फरक फार होतात.

इतिहासः—प्राचीन मगध राज्यांत पाटणा, गया व शहाबाद जिल्हे मोडत असून; त्याची राजधानी राजगृह येथें होती. त्याचा इतिहास मगध व बिहार ( मगधचा समावेश पुढें बिहारमध्यें झाला ) यांच्या इतिहासांत मोडतो. प्रारंभींचा इतिहास पाटणा शहरच्या पाटलीपुत्र इतिहासाशीं बराच संलग्न आहे. अर्वाचीन इतिहासांतील गोष्टी म्हणजे पाटणाची कत्तल ( १७६३ ) व १८५७ चें बंड ह्या होत.

पुराणवस्तुसंशोधनाच्या दृष्टीनें, राजगृह, मनेर, पाटणा शहर, बिहार व गिरिअक हीं गांवें महत्त्वाचीं आहेत. तेथावान

व जगदीशपूर येथें बुद्धाचे भव्य पुतळे व तेल्हारा आणि इस्लामपूर येथें बौद्ध मठांचे अवशेष आहेत.

लोकवस्तीः—१९२१ सालीं जिल्ह्याची लोकसंख्या १५७४२८७ होती. येथें विहारी हिंदीची मगधी नांवाची पोटभाषा चालते. शें. ८८.३ हिंदू व शें. ११.५ मुसुलमान आहेत. शें. ६२.३ लोकांचा शेतकीवर व शें. १७.१ लोकांचा उद्योगधंद्यावर निर्वाह होतो.

शेतकीः—बिहार पोटविभाग जिल्ह्याच्या इतर भागांपेक्षां सखल असल्यामुळें येथें भाताचें पीक चांगलें होतें; व बार पोटविभागांत रब्बी पिकें चांगलीं होतात.

व्यापार व दळण वळणः—गालिचे, किनखाप, कशियाचें काम, मातीचीं भांडीं, पितळेचें काम, खेळणीं, लाखेचे दागिने, चांदीची व सोन्याची तार आणि वर्ख, कांचेचीं भांडीं, बूट व जोडे, आणि खणांच्या पेट्या ह्या जिनसा पाटणा शहरीं तयार होतात; सुलतानगंज, पीरबहोर, व चौक येथें गालिचे, आणि चौक व ख्वाज कलन ठाण्यांत कशियाचें काम होतें. दिनापूरचें लांकडी सामान मजबूत असतें. बाढ विभागांत चमेलीचें तेल, जाडेंभरडें कापड व पितळेचीं आणि कांशाचीं भांडीं; व बिहार पोटविभागांत साबण, रेशमी कापड, हुक्क्याच्या नळया, मलमल, आणि पितळेचीं व लोखंडी भांडीं होतात. पाटणा शहरांतील एका सरकारी कारखान्यांत अफू करतात. बांकीपूर आणि दिनापूर येथें लोखंडी ओतकामाचे कारखाने व बांकीपूर येथें बर्फाचा व सोडावाटर करण्याचा कारखाना आहे.

आयात व निर्गतः—तांदूळ, मीठ, दगडी कोळसा, राकेल, विलायती कापड व गोणाचीं पोतीं हा मुख्य आयात माल असून गहूं, जवस, कडधान्य, मोहरी, कातडीं, साखर, तंबाखू व अफू हा मुख्य निर्गत माल आहे.

श ह र.—पाटणा जिल्ह्याचें मुख्य शहर. हें गंगा व शोण यांच्या संगमाच्या खालीं कांहीं मैलांवर गंगेच्या उजव्या तीराला आहे. याच शहराच्या म्युनिसिपल हद्दींतील बांकीपूर हें पाटणा जिल्ह्याचें व पाटणा विभागाचें मुख्य ठिकाण आहे. ईस्ट इंडियन रेल्वेनें हें कलकत्त्यापासून ३३२ मैल दूर आहे.

पाटणा शहराचा इतिहास फार प्राचीन आहे. याला प्राचीन काळीं पाटलिपुत्र, ग्रीक लोक पालिबोथ्र व गुप्त राजांच्या वेळीं कुसुमपूर असें म्हणत असत. हें शहर पुत्रक, बलराम किंवा उदय यांपैकीं कोणीं तरी स्थापन केल्याबद्दल निरनिराळ्या कथा आहेत. हें अनुक्रमें शिशुनाग, नंद, मौर्य, गुप्त, हर्ष, मुसुलमान व इंग्रज यांच्या अंमलाखालीं होतें. बौद्ध सांप्रदायिक अवशेष येथें बरेच आहेत. येथें म्युनिसिपालिटी १८६४ मध्यें स्थापन झाली. सध्यां हें बिहार-ओरिसा प्रांताचें राजधानीचें शहर आहे. येथें विश्वविद्यालयहि स्थापन झालें आहे. ( पाटलीपुत्र पहा )

**पांटलावडी**(१)—पांटलावडी अकबरखान. हें मुंबई इलाख्यांत रेवाकांठामध्यें एक लहान संस्थान आहे. संस्थानिकांना खान म्हणतात.

(२)पांटलावडी केसरखान. हेंहि मुंबई इलाख्यांतील रेवाकांठामध्यें एक लहान संस्थान आहे.

**पाटलीपुत्र**—यास कुसुमपुर असेंहि नांव होतें. ख्रिस्तीशकाच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या शतकांत झालेल्या गार्गीसंहितेंत कुसुमध्वज असाहि एक पाटलीपुत्राचा उल्लेख येतो. पुरच्या ऐवजी ध्वज ही कदाचित चूक असावी (मक्समुल्लर–हिंदुस्थान ). पुष्पपुर हेंहि एक दुसरें नांव पाटलीपुत्रास लावतात. सर्वांचा अर्थ एक( फुलांचें शहर)च आहे. पाटली हें एका (पाद्री ) फुलाचें नांव होय. अजातशत्रूनें (ख्रि. पू. ५५४ ) या शहराचा पाया घातला. पूर्वी पाटली नांवाचें हें एक खेडें होतें. अजातशत्रूनें तेथें एक किल्ला बांधला. शोण व गंगा यांच्या संगमाच्या दक्षिणेस हा किल्ला होता. नंतर अजातशत्रूच्या नातवानें (उदयानें) शहराचा विस्तार केला. या वेळेपासून पुढें अनेक शतकें हें गांव राजधानी म्हणून प्रख्यात राहिलें. मौर्यांच्या वेळीं फक्त मगधाचीच नव्हे तर साऱ्या हिंदुस्थानची ही राजधानी होती. महापरिनिर्वाणसुत्तांत येथील किल्ल्याची गोष्ट आली आहे. वायुपुराणांत उदयासंबंधीं व या शहराच्या वसाहतीची कथा आहे. अशोकानें हें शहर जरी आपली कायमची राजधानी केली, तरी तत्पूर्वींहि चंद्रगुप्ताचें हें एक आवडतें राहण्याचें ठिकाण होतें; येथेंच त्याची भेट मेगॅस्थेनीसनें घेतली होती (बील,२). ग्रीक लोक याला पालिबोथ्रा म्हणत असत. चिनी लोक यास कुसुमापुलो म्हणत. ग्रिकडशेपांतच फक्त पाटलीपुत्र हें नांव येतें, बाकी सर्वत्र पाटलीपुर असें येतें. प्रख्यात जोतिषी आर्यभट्ट हा येथीलच राहणारा होता. मेगॅस्थेनीसनें केलेलें यांचें वर्णन असें–"पालिबोथ्रा हें इंडियाचें मुख्य ठिकाण असून तें इरानाबो (हिरण्यवाह = शोण) व गंगा यांच्या संगमावर आहे. त्याची लांबी ८०स्टाडिआ व रुंदी १५ स्टाडिआ असून सभोंवतालचा खंदक ३० क्युबिट खोल आहे. शहराभोंवतालच्या तटास ५७० बुरुज ६४ वेशी आहेत. सेल्युकस निकेटर याच्या वेळीं शहराचा घेर १२॥ कोस होता. अजातशत्रु हा येथील किल्ला बांधीत असतां गौतमबुद्धानें भविष्य केलें कीं, पुढें हें मोठें शहर होईल" ( दीक्षित–भा. ज्यो. ). पुढें हूणांनीं स्वारी करून गुप्तांचा पाडाव केला व हें शहर उध्वस्त केलें. यानंतर कनोज शहरास महत्त्व प्राप्त झालें. [ स्मिथ; अ. कोश; बुद्धोत्तर जग, प्र.१२ ]

**पाँटस**—काळ्या समुद्रावरील आशियामायनरच्या ईशान्येस असलेल्या प्रदेशास प्राचीनकाळीं पाँटस म्हणत असत. ख्रि. पू. ४०० वर्षी या प्रदेशांत पहिल्या एरिओबार्झेनस यानें एक राज्य स्थापन केलें. पुढें सहाव्या मिथ्रिडेटसच्या कारकीर्दीत हें राज्य फार भरभराटीस आलें. यानें

रोमन लोकांशीं पुष्कळ लढाया केल्या. या प्रदेशांतील मुख्य शहर म्हटलें म्हणजे ट्रॅपिझस अथवा ट्रिबीझॉंड हें होय.

**पाटोड**—हैद्राबाद संस्थानांत, बिड जिल्ह्यांतील नैर्ऋत्येकडील तालुका. क्षे. फ. ३५२ चौ. मै. लो. सं. सुमारें तीन हजार. या तालुक्यांत ७४ खेडीं आहेत ( पैकीं जाहागिरी गांवें तीन ). मुख्य गांव पाटोड. पश्चिमेकडील डोंगराळ भागांत माजरा नदी उगम पावते.

**पॉस्ट्डॅम**—प्रशियांतील ब्रँडेनबर्ग प्रांताच्या राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण. हें बर्लिनच्या नैर्ऋत्येस १५ मैलांवर हॅवेल नदीच्या दोन्ही तटीं वसलेलें आहे. हीं फ्रेडरिक दि ग्रेटची राहण्याची आवडती जागा होती म्हणून त्याच्या वेळच्या पुष्कळ वस्तू येथें पहावयास सांपडतात. येथील उद्योगधंदे म्हटले म्हणजे, रेशमी सामान, रासायनिक द्रव्यें, खोली सुशोभित करण्याचें सामान, चॉकोलेट, तमाखू, दर्यंत्रें इत्यादि जिनसा तयार करणें हे होत.

**पांडव**—पंडु राजाच्या ज्या दोन स्त्रिया कुंती व माद्री होत्या त्यापासून झालेले युधिष्ठिर, भीमसेन, अर्जुन नकुल आणि सहदेव हे पांच पुत्र. या पांडवांचा इतिहास महाभारताचें मुख्य कथानक बनला आहे.

**पांडवगड**—मुंबई इलाख्यांतील सातारा जिल्ह्याच्या वाई तालुक्यामधील एक किल्ला.हा समुद्रसपाटीपासून ४१७७ फूट उंच असून वाईच्या वायव्येस ४ मैलांवर आहे. पन्हाळ्याचा दुसरा भोज ( ११७८–९३ ) कोल्हापूर शिलाहार संस्थानिक ह्यानें हा किल्ला बांधला म्हणतात. शिवाजीनें तो १५७३ मध्यें घेतला.

**पॉंडिचेरी**—हिंदुस्थानातील फ्रेंचांच्या वसाहतींची मुख्य जागा. कारोमांडल किनाऱ्यावर हें शहर उ. अ. ११° ५६' आणि पू. रे. ७९°४९' यावर कुडालोरच्या उत्तरेस सुमारें १२ मैलांवर आहे. पॉंडिचेरी प्रांताची लोकसंख्या १६६७९३ (१९१७) व शहरची ४७३२१ होती. फ्रेंचांनीं हें शहर १६७४ त वसविलें. १६९३ सालीं डच लोकांनीं हल्ला करून घेतलें. १६९९ सालीं पुन्हां डच लोकांपासून फ्रेंचांनीं परत मिळविलें. इंग्लिश लोकांनीं चार वेळा वेढा देऊन सर केलें. परंतु १८१६ च्या तहानें तें फ्रेंचांकडेच राहिलें. सरहद्दीसंबंधीं तंटयाचा निकाल करण्याचा अधिकार दक्षिण अर्काटच्या कलेक्टरास आहे. शिवाय येथें एक इंग्रज कॉन्सुलर एजंट असतो. पॉंडिचेरी येथें म्युसिपालिटी १८८० सालीं स्थापन झाली. येथें पाण्याचा पुरवठा उत्तम प्रकारचा आहे. शहरांतील रस्ते उत्कृष्ट आहेत. पॉंडिचेरीस एक कॉलेज आहे. त्यात फ्रेंच बी. ए. पर्यंत शिक्षण मिळतें. पॉंडिचेरीस मुख्य धंदा विणकामाचा आहे. गुजराथी व्यापारी येथून माल (कपडा) खरेदी करून सिंगापुरास पाठवितात. येथें चार कापडाच्या गिरण्या आहेत. मुख्य निर्गत माल तेलच्या बिया होत. पॉंडिचेरीस बंदर नसून किनाऱ्यापासून १ मैल लांब अंतरावर जहाजें नांगरलेलीं असतात.

**पाडिनालकनाड**—दक्षिण हिंदुस्थानांतील कुर्ग संस्थानचा पश्चिमेकडील तालुका. क्षेत्रफळ ३१९ चौरस मैल लोकसंख्या ( १९११ ) २६८६७. यांत ६० खेडीं आहेत. यांत सह्याद्रीचें शिखर तडियान्डमोल ( ५७२९ फूट ). आहे. यांत जंगल पुष्कळ असून वेलदोडयाचें उत्पन्न चांगलें होतें. जंगली भागांत कादु(मराठी लोक)आणि कदव लोक रहातात. ह्या तालुक्यांत देवरकादू नांवाचीं पवित्र मानलेलीं पुष्कळ वनें आहेत.

**पांडु**—मुंबई इलाखा, रेवाकांठामधील एक लहान संस्थान.

**पांडुरोग** निदान.—अति व्यायाम, अंबट व खारट पदार्थ फार खाणें, दारू पिणें, माती खाणें, दिवसां झोंप घेणें, मोहरी, मिरें यांसारखे तीव्र पदार्थ फार खाणें इत्यादि पित्त वाढवणारे पदार्थ फार खाल्यानें पित्तविशिष्ट दोष कुपित होतात. बलवान वायु तें कुपित झालेलें पित्त हृदयांतून मुख्य मुख्य दहा धमनींत आणतो. नंतर तें सर्व शरीरांत पसरतें. तें शरीरांतील मांस, रक्त, कफ, व त्वचा यांसहि बिघडवितें आणि तें पित्त विशेषेंकरून त्वचा व मांस यांत रहातें, त्यामुळें त्वचेवर पांढरा, हिरवा, किंवा पिवळा, रंग येतो. परंतु फार करून पांढराच रंग फार वेळां आढळतो म्हणून यास पांडुरोग असें म्हणतात या रोगानें अंगाला जडपणा येतो. ओजाचे गुण कमी होतात तसेंच धातु आणि इंद्रियें शिथिल होतात. रक्त व मेद फारच कमी होतात, अंग दुखतें, हृदयाला पाझर फुटल्यासारखें वाटतें, डोळयांचीं पोटें सुजतात, रागीटपणा येतो, थुंकी फार सुटते, बोलूं नयेसें वाटतें,अन्नाचा द्वेष, थंड पदार्थांचा द्वेष, अग्निमांद्य, केंस गळून पडणें, मांडया गळून जाणें, दमा, कानांत आवाज, भोंवळ, आणि थकल्यासारखें वाटणें हीं लक्षणें होतात.

या रोगाचीं पूर्वरूपें ( चिन्हें ) पुढीलप्रमाणें होतात–हृदय धडधडणें ( स्पंदन ), त्वचा रुक्ष होणें, अरुचि, लघवी पिवळी, घाम न येणें, अग्निमांद्य, आय.सांवांचून थकवा, अंग गळणें. पांडुरोग पांच प्रकारचा आहे. वात, पित्त, कफ, संनिपात, आणि माती खाण्यापासून होणारा; यापैकीं वातानें होणाऱ्या पांडुरोगांत अंग दुखतें, टोंचतें, व कांपतें, शिरा, नखें, विष्ठा, मूत्र, व नेत्र, हीं काळीं, रुक्ष व अरुण वर्णाचीं असतात; सूज येते, पोट फुगतें, तोंड बेचव होतें, मळाचा खडा होतो, बरगडया व डोकें दुखतें. पित्तानें होणाऱ्या पांडुरोगांत, शिरा, नखें, विष्ठा, व मूत्र आणि नेत्र, हीं हिरवट किंवा पिंवळसर होतात; डोळयांपुढें अंधेऱ्या, ताप, तहान, घाम, बेशुद्धि, थंड पदार्थांची इच्छा, दुर्गंधि व कडु तोंड, शौचास पातळ, धडाशीं आवट, अंगाची आग वगैरे लक्षणें होतात.

कफानें होणाऱ्या पांडुरोगांत शिरा, नखें, विष्ठा, व मूत्र, हीं पांढरीं होतात; डोळयावर झांपड, तोंड खारट, रोमांच उभे रहाणें, आवाज बसणें, खोकला, ओकारी हीं लक्षणें

हरकत घेतली. यानंतर लवकरच व्हाईटहेड व हॉवेल यांनीं स्वतंत्र यंत्रेच पाणतीरांत बसवून गति देण्याची युक्ति १९व्या शतकाच्या शेवटल्या चतुर्थकांत काढली. पण पाणतीर सरळ जाण्याकरितां भोंवऱ्याची (जीरोस्कोप) युक्ति व्हाईटहेडच्या टॉर्पेडोंत असल्यामुळें व्हाइटहेड टार्पेडोच सर्वमान्य झाला. गति अधिक देण्याकरितां त्यांत अलीकडे बऱ्याच सुधारणा करण्यांत आल्या आहेत.

पाणतीराचा व्यास १४ ते २१ इंचांच्या दरम्यान असतो. त्याचें पुढलें टोंक बोंथट असतें. त्याच्या मागच्या टोंकास जोरानें नेणारे जोडदांडे असून त्याच्या पुढच्या बाजूस वल्हीं जोडलेले व आडवे फिरणारे पंखे असतात व पाणतीरास समुद्राच्या योग्य खोलींतून सरळ नेण्याच्या कामीं याच पंख्यांचा उपयोग होतो. टार्पेडोच्या पुढच्या टोंकांत व्यवस्थित रीतीनें तयार केलेल्या कप्प्यांमधून बंदुकींची दारू भरलेली असते व तोफेच्या कान्याप्रमाणें यालाहि एक काना असून अमक्या एका अंतरावर जाईपर्यंत ही कान्यांतील दारू ओली होऊं नये म्हणून या कान्यावर एक यांत्रिक टोपण बसविलेलें असतें. नेम चुकून कोणत्याहि बोटीवर आघात न होतां हें शस्त्र दुसरीकडे गेल्यास तें कोणीकडे गेलें हें समजण्याकरितां त्याच्या कान्यांतील एका बाजूस होल्स लाईट या नांवाचा एक कॅलशियम धातूचा तयार केलेला दिवा ठेवलेला असतो. पाणतीर धांवल्यावर या कॅलशियम धातूवर पाण्याचा परिणाम होऊन बराच धूर उत्पन्न होऊन ज्वालाहि उठतात व त्यामुळें तें कोणीकडे गेलें त्याची दिशा समजते. टार्पेडोच्या पुढच्या टोंकांत हवेचा एक कप्पा असतो. हा कप्पा म्हणजे एकतृतीयांश इंच जाडीची पोलादी पोकळ नळी असून एका चौरस इंचावर २२५० रत्तल इतका हवेचा दाब ती सोसूं शकते या पोकळींत पंपानें हवा भरली जाऊन आंतील एंजिनें चालविण्याकडे या हवेचा उपयोग होतो. पाणतीराचा तोल संभाळणारे व तो सोडल्यानंतर त्याला योग्य खोलींत ठेवणारे पंखे चालविण्याकरितां लागणारी यंत्रसामुग्री पाणतीराच्या डोक्यांतील तिसऱ्या कप्प्यांत असते. तोल संभाळण्यास उपयोगी पडणाऱ्या या कप्प्याच्या पाठीमागें हवेच्या दाबानें चालणारीं मोठीं इंजिनें ठेवलेलीं असून एका तासांत ८५ किंवा त्यापेक्षांहि जास्त मैल वेगानें हें अस्त्र नेण्याचें यांच्यांत सामर्थ्य असतें. पाणतीर तरते ठेवण्याकरितां बसविलेला भोंवरा (जीरोस्कोप) या एंजिनाच्या मागें असतो. जीरोस्कोपमधील चाक ज्या पातळींत फिरतें ठेवलेलें असतें त्याच पातळींत तें सारखें फिरत राहतें आणि या चाकाचा व उभ्या पातळींत फिरणाऱ्या बाहेरच्या पंख्यांचा संबंध जोडलेला असतो. प्रथम स्थितींत फिरूं लागलेल्या पातळींतच एकसारखे फिरत असलेल्या या भोंवऱ्याच्या चाकाच्या साहाय्यानें फिरणारे हे पंखे टार्पेडोस प्रथम सोडतांना दिलेल्याच दिशेंत सारखें ठेवतात. पाणतीरांतील भोंवरा हें यंत्र फारच सूक्ष्म व बारीक असून त्याची किंमत ७५० रुपये असते. पाणतीर तरते ठेवण्यास उपयोगी असलेला भोंवरा, पाणतीर सोडल्यावर सुरू केलेला असतो. पाणतीर एखाद्या वेळीं नेम चुकून दुसरीकडे गेला व त्याचा वेग संपला म्हणजे भोंवरा पूर्ववत् चालूच असल्यामुळें तो पाण्याच्या सपाटीवर तरंगूं लागतो. युद्धाच्या वेळीं असेल तरंगत असलेले पाणतीर शत्रूला व स्वतःलाहि घातक असल्यामुळें वेग संपल्यावर ते वर येऊन तरंगूं नये म्हणून ज्या कप्प्यांत हा भोंवरा ठेवलेला असतो तो कप्पा वेग संपतांक्षणीं पाण्यानें भरून जाऊन पाणतीर बुडून तळाशीं जावा अशी योजना केलेली असते. पाणतीराचा शेवटचा भाग म्हणजे त्याची शेपटी हा होय. या शेपटीचा पाणतीरास गति देणाऱ्या दांड्याशीं संबंध जोडलेला असल्यामुळें तिचा सुकाणूच्या ऐवजीं उपयोग होतो.

पाणतीरापासून लढाऊ जहाजाचें रक्षण करण्याकरितां जहाजांवर पोलादी तारेचीं जाळीं ठेवतात व पाहिजे त्या वेळीं जहाजाभोंवतीं तीं पसरतात. हीं जाळीं जहाजांच्या बाजूंपासून तीस फुटांवर असून पाण्याच्या खालीं २०–२५ फूट खोल राहतील अशी त्यांची योजना करण्यांत आलेली असते. जहाजांच्या संरक्षणासाठीं अशीं अभेद्य जाळीं असलीं तरी पाणतीर आपल्या जहाजाला लागण्याच्या पूर्वी पाणबुडीवर जोराचा गोळीबार करणें व तीस बुडावयास लावणें हाच त्यापासून बचाव करण्याचा उत्तम उपाय आहे. [ब्रिटानिका; केसरी १४।१०।१९१५.]

**पाणबुडे**—आपल्याकडे पाण्यांत बुडी मारण्याचा धंदा पाणबुडे लोकच करतात. धंदा म्हणून त्याच्यासाठीं निरनिराळी सामुग्री घेऊन कोणी कांहीं करीत नाहीं. यूरोपमध्यें या धंद्यामध्यें पुष्कळच प्रगति झालेली आहे; तेथें यासाठीं एक निराळा पोषाख केलेला असतो. हा घातला असतां पाण्यांत पुष्कळ वेळ राहतां येतें व पाण्यांत कामहि करतां येतें. यालाच डायव्हिंग अॅपरेटस असें म्हणतात. पाण्यांत माणूस उतरला असतां माणूस पाण्यापेक्षां हलका असल्यामुळें तो आपोआप तरतो हें सर्वांना माहीत आहेच. म्हणून हा पोषाख, पाण्यापेक्षां माणसाला जड करील इतका तो जड असावा लागतो

याचे विशेष मुख्य भाग म्हणजे शिशाचे किंवा दुसरे जड केलेले जोडे व डोक्यावर घालावयाचें लोखंडी शिरस्त्राण. या लोखंडी शिरस्त्राणाला डोळ्यासमोर येतील अशीं दोन भोंकें असतात व त्यांत दिसण्यासाठीं जाड कांचेचे तुकडे बसविलेले असतात. जुन्या पद्धतीमध्यें पाण्यांत बुडणाऱ्या माणसाला वरच्या जहाजावरून रबरी नळीनें हवा पोंचवावी लागत असे यामुळें काम करतांना फार त्रास होत असे. पण अलीकडे दाबलेली हवा बाटलींत भरून घेऊन ती बाटली पाठीवर घेऊन पाणबुड्या बुडी मारतो. यामुळें काम करण्याम फार सोपें जातें व मनुष्य गुदमरला जात नाहीं. त्या जातीचा

पोषाख घालून मनुष्याला ५०-६० फुटांपेक्षां जास्त खोल पाण्यांत जातां येत नाहीं. कारण पाण्यांत जसजसें खोल जावें तसतसा मनुष्याच्या अंगावरील पाण्याचा दाब वाढत जातो. फार खोल गेलें असतां हा दाब इतका वाढतो कीं, मनुष्याला तेथें उभें राहणें व काम करणेंच शक्य होत नाहीं. यासाठीं अगदीं नव्या तऱ्हेचे पाणबुड्याचे पोषाख निघाले आहेत. या तऱ्हेचा पोषाख सर्वस्वी जाड लोखंडी पत्र्याचा केलेला असतो. मनुष्याच्या अंगाचा कोणताहि भाग केव्हांहि बाहेर येत नाहीं हात सुद्धां आंत असतात व बाहेर बोटांच्या जागीं नुसते आंकडे किंवा चिमटे बसविलेले असतात, ते हालवून मनुष्यें काम करतात. हा पोषाख मनुष्याच्या वजनाच्या कितीतरी पट मोठा असतो. उघड्या हवेंत हा पोषाख घालून हालणें सुद्धां शक्य नाहीं, पोषाखासुद्धां मनुष्याला यारीनें उचलून आंत सोडावा लागतो, खोल पाण्याच्या दाबाच्या वजनानें पोषाखाचें वजन हलकें होतें व मनुष्याला आंत हलतां येतें. असल्या जातीच्या पाणबुड्या पोषाखांनीं २-३॥ फूट खोल पाण्यांत सुद्धां काम करतां येतें [ ले. वा. ह. मनोहर ]

पाणबुडी घंटा.—समुद्रांत अथवा खाडींत तळाशीं कांहीं काम करावयाचें असल्यास पाणबुडी घंटेचा उपयोग करतात. प्रथम ही कल्पना इ. स. १२५० त रॉजर बेकन नांवाच्या मनुष्यानें पुढें आणली. परंतु त्यानें काय युक्ति योजिली होती, ती समजत नाहीं. कारण तत्संबंधीचें लिखाण अस्तित्वांत नाहीं. त्यानंतर पांचव्या चार्लसच्या वेळीं झालेल्या जॉन टस्नेरच्या एका पुस्तकांत या गोष्टीचा १५३८ तील एक उल्लेख येतो. त्यावेळीं स्पेनमध्यें दोन ग्रीक पाणबुड्यांनीं ही युक्ति अंमलांत आणली. एका पालथ्या चहादाणीसारख्या पात्रांत हे दोघे बसून समुद्राच्या तळाशीं गेले होते. तेथें कांहीं वेळ राहून न भिजतां, एवढेंच नव्हे तर, आंत लाविलेली मेणबत्ती न विझतां, ते वर आले. त्या पात्राला दोर लावून तें खालीं सोडण्यांत आलें होतें. यानंतर या पात्राच्या आकारांत निरनिराळे फेरफार होऊन व निरनिराळ्या शास्त्रीय उपकरणांची जोड देऊन हल्लींची पाणबुडी तोली करण्यांत आली आहे. चहादाणीनंतर घंटेच्या आकाराचें पात्र करण्यांत आलें होतें. हल्लीं आंत दोन ते चार पाणबुडे व त्यांनीं कामाचीं हत्यारें आणि समुद्रांतील काढलेल्या वस्तू टेवण्यास लागणारीं भोर्डी वगैरे राहतील अशी ही खोली असते. पूर्वी हें पात्र खालीं जाण्यास बाह्य ( शिसें, दगड वगैरे ) वजनें लागत व पात्र लांकडी किंवा पत्र्यानें असे. हल्लीं हें पोलादी, जाड व वजनदार पत्र्यानें असून, तें त्याच्याच वजनानें तळाशीं जातें. माणूस आंत शिरण्यास व आंतून बाहेर पडण्यास पत्र्यांच्या योजना असतात व ते पडदे हवेच्या व पाण्याच्या दाबानें उघडले व झांकले जातात. आंत श्वासोच्छ्वासासाठीं गहाजावरून रबरी अथवा शिशाच्या नळ्या सोडलेल्या असतात. शिवाय खोलींत पाहिजे तेवढी हवा दाबून ठेवलेली असते. यासाठीं जहाजावर हवा दाबणारे पंप ठेवावे लागतात. त्यामुळें पाण्याच्या खालीं साधारण २।४ तास काम करतां येतें. शिवाय महाजावरील लोकांशीं बोलतां येण्यासाठीं टेलिफोनची व्यवस्था आणि प्रकाशासाठीं विजेच्या दिव्यांची योजना असते. या घंटेच्या पत्र्याची मजबुती समुद्राच्या खोलीवर अवलंबून असते. साधारणतः प्रत्येक दहा फुटांस पाण्याचें वजन अथवा दाब दर चौ. इंचावर ४½ पौंड असतो. ही घंटा वांकडी तिकडी न होतां सरळ पाण्यांत खालीं जाण्यास निरनिराळ्या वजनांच्या योजना सांप्रत केल्या आहेत. हल्लीं दोराऐवजीं साखळी व वाफेच्या यान्या यांच्या योगानें ही घंटा खालीं-वर आणतां येते. परंतु सांप्रत या घंटाच कमी वापरतात. या घंटा जास्तींत जास्त ५० ते ६० फूट खोलीपर्यंत जाऊं शकतात. पाणबुड्याचे कपडे जाड लोकरीचे असून पाणी आंत न शिरणारे मांड्या पर्यंतचे बूट असतात. पाणबुड्यांनां दर ताशीं १ शिलिंग १५ पेन्स पर्यंत मजुरी मिळते. या घंटेचा लहान आकार ३ फूट रुंद, ४॥ फूट लांब व तितक्याच उंचीचा असतो, आणि तिचें वजन २॥ टन असून तींत दोन माणसें बसतात व तिला ६०० ते १५०० पौंड खर्च येतो.. मोठी घंटा १०॥ फूट रुंद, ७ फूट उंच, १७ फूट लांब, आंत ४ माणसें बसण्याजोगी, ३५ ते ४२ टनी असून तिला १४ हजार पौंड खर्च येतो [ एन्सा. ब्रिटा. ]

पाणिनि, काल.—वैयाकरण पाणिनि (कारण कांहीं लोक दोन पाणिनी मानितात ) हा ख्रिस्त पूर्व दहाव्या शतकांत झाला असावा असें आतां बहुतेक ठरलें आहे. कात्यायनाप्रमाणें त्याच्या लेखांत दक्षिणेचा उल्लेख मुळींच येत नाहीं. तेव्हां त्याच्या पूर्वी पाणिनि झाला असावा. तो स्वकालीन सर्वशब्दरूप असा वैयाकरण होता. काम्बोज (४. १, १७५), यवन (४. १, ४ ), संकलादिभ्यश्च ( ४. २, ७५ ), पर्श्वादियौधेयादिभ्योऽणञौ ( ५. ३, ११७ ) या त्याच्या सूत्रांवरून पाणिनीचा काल ख्रि. पू. ९०० च्या सुमारचा ठरतो. निदान त्याच्या अलीकडे येत नाहीं. यवन लोक ( ग्रीक अयोनियन ) हे ख्रि. पू. १२०० पासून ९०० पर्यंत विशेष चमकले. त्यांची लिपि ख्रि. पू. ९०० च्या नंतर निर्माण झाली. लिपिवाचक यवन शब्द पाणिनि देत नाहीं; नुसता लोकवाचक यवन शब्द देतो. यावरून तो ख्रि. पू. ९०० च्या पूर्वी झाला असावा. प्राकृत हा भाषावाचक, तसाच संस्कृत हा भाषावाचक शब्द पाणिनि देत नाहीं. त्यामुळें असे अर्थ या शब्दांचे होण्यापूर्वी तो झाला. अष्टाध्यायींत बुद्धाचें नाव नाहीं. त्यामुळें बुद्धाच्या पूर्वी त्याचा काल येतो. सेकंदर अलेक्झांडरनें जुडविलें ( ख्रि पू. ३२७ ), अर्थात त्याच्या पूर्वी पाणिनि झाला होता. पर्शु ( पर्शियन ) व असुर ( असीरियन ) यांच्या समकालीन पाणिनि असल्यामुळें त्याला हे लोक आयुधजीविसंघ आहेत हें माहीत होतें.

असुरांचें राज्य ख्रि. पू. १८३०–५३८ पर्यंत व पर्शूचें राज्य ख्रि. पू. ८५०–३२९ पर्यंत होतें. राजवाचक शक हा शब्द पाणिनीस माहीत नव्हता. शकराज्य ख्रि. पू. ७००–५५० पर्यंत होतें.पाणिनि ख्रि पू. ७०० च्या पूर्वी झाला. आणि वर सांगितल्याप्रमाणें लिपिवाचक यवन ( यवनानी ) शब्द त्याला माहित नसल्यानें तो ख्रि. पू. ९०० च्याहि पूर्वी झाला असावा असें दिसतें. याच्या व्याकरणासंबंधीं माहिती विज्ञानेतिहासांत दिली आहे ( ज्ञा को. विभाग ५, पृ १९५ पहा ) [ राजवाडे–भा. इ. अहवाल १८३२ ]

**पाणिहाटी**—बंगाल इलाख्यांतील चोवीस परगणे जिल्ह्याच्या बराकपूर पोटविभागामधील एक गांव. हें हुगळीच्या डाव्या तीरावर आहे. लोकसंख्या अजमासें अकरा हजार. येथें तांदुळाचा बराच मोठा व्यापार चालतो. म्युनिसिपालिटीची स्थापना १९०० सालीं झाली.

**पाणी**, रासायनिक.—पाणी हें वास्तविक उज्जाचें प्राणिद असून त्याचें सूत्र उ२प्र असें आहे. परंतु सामान्य व्यवहारांत ज्याला आपण पाणी म्हणतों तें शुद्ध नसून त्यांत निरनिराळ्या प्रकारचे अन्य पदार्थ कमजास्त प्रमाणांत मिसळलेले असतात. या अन्य पदार्थांचे प्रमाण शें ०.१ पेक्षां बहुधां जास्त नसतें. समुद्र हा पाण्याचा सर्वांत मोठा नैसर्गिक सांठा असून बाकीचें सर्व पाणी त्यापासूनच मिळतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. समुद्राच्या पृष्ठभागापासून वर वातावरणांत एकसारखे वाफेचे लोट जातात व थंड प्रदेशांत त्या वाफेचें पाऊस, बर्फ, दंव वगैरेंत रूपांतर होतें. त्यापैकीं ⅘ भाग पुन्हां समुद्रांत परत जातो व बाकीचा भाग जमीनीवर पडून नद्या, तळीं, वगैरेंत सांठविला जातो, किंवा जमीनींत जिरून तो झर्‍यांच्या रूपानें दृग्गोचर होतो. समुद्राच्या पाण्यांतील कोणतेहि क्षार उडून जाण्यासारखे नसल्यामुळें पावसाच्या पाण्यांत हवेंतील प्राणनत्र व कर्बद्विप्राणिद ह्यांखेरीज इतर वायूंचें मिश्रण नसतें. पावसाच्या पाण्यांत अमोनिया व अंशतः नत्राम्ल हे पदार्थहि असतात. ज्या डोंगराच्या उतारावरील पाणी तळ्यांत येतें त्यावर द्राव्य पदार्थ फारसे नसतील तर तळ्याचें पाणी इतर ठिकाणच्या पाण्याच्या मानानें बरेंच शुद्ध असतें. सर्व नद्यांच्या पाण्यांत अन्य पदार्थांचें मिश्रण एकसारखें नसतें एवढेंच नव्हे तर एकाच नदीच्या पात्रांतहि तें सर्व ठिकाणीं सारखें नसतें. झर्‍यांच्या मानानें नदीच्या पाण्यांत द्रवलेले क्षार कमी परंतु अद्राव्य पदार्थ जास्त असतात. झर्‍यांचें पाणी, पृथ्वीच्या पोटांतील निरनिराळ्या थरांतून गाळून निघाल्यामुळें तें स्वच्छ म्हणजे अद्राव्यपदार्थरहित असें असतें परंतु त्यांत खनिज व प्राणिज पदार्थ व वायूहि बरेच द्रवलेले असतात. सामान्यतः पाण्यांत द्रवणारे मुख्य खनिज पदार्थ म्हणजे खटकर्बित किंवा गंधकिद आणि मीठ हे होत. पाण्यांत कर्बाम्ल असेल तरच त्यांत खटकर्बित द्रवतें, व उघड्या हवेंत पाणी ठेविलें असतां कर्बाम्ल निघून जाऊन खटकर्बिताचा सांका खालीं बसतो.

नैसर्गिक घटकांखेरीज पाण्यांत इतरहि पदार्थ असतात हें वर सांगितलेंच आहे नत्रयुक्त प्राणिज पदार्थांमुळें पाणी अपायकारक होतें; कारण ते पदार्थ रोगांच्या सूक्ष्म जंतूंना वाढण्याला मदत करतात. परंतु सुदैवाची गोष्ट कीं निसर्गानें यावर उपाय योजिलेला आहे. नदीच्या पाण्यांत नत्रयुक्त प्राणिज पदार्थ द्रवलेले असल्यास एक प्रकारच्या सूक्ष्म जंतूंच्या योगानें त्यांचें विघटन होऊन अमोनिया व दुसरे निरुपद्रवी पदार्थ बनतात. कोणत्याहि प्रकारचें पाणी, अतिशय अशुद्ध नसल्यास, उकळल्यानंतर निरुपद्रवी होतें.सामान्य खाऱ्या पाण्याच्या घटकांपैकीं, फक्त मग्न व खट यांचे क्षार जास्त प्रमाणांत असल्यास आरोग्यास विघातक असतात. खटकर्बितापासून अपाय होत नाहीं. परंतु त्यापासून फायदा होतो हा समज चुकीचा आहे कारण हाड बनण्याकरतां लागणारा चुना स्फुरिता(फास्फेत्स)खेरीज इतर स्वरूपांत कितपत कामास येत असेल हा एक प्रश्नच आहे. धुण्याकरितां पाणी योग्य आहे कीं नाहीं हें त्याच्या हलकेपणावरून (सॉफ्टनेस) ठरवितात. ज्या पाण्यांत चुना किंवा मग्नाचे क्षार द्रवलेले असतात, तें पाणी धुण्याकरतां वापरल्यास साबणांतील स्निग्ध अम्लांबरोबर चुना व मग्न यांचे अद्राव्य क्षार तयार होऊन तेवढा साबण फुकट जातो खटकर्बितामुळें आलेला जडपणा पुढील दोन रीतींनीं सहज काढून टाकितां येतोः—( १ ) पाणी उकळलें असतां कर्बाम्ल वाफेबरोबर निघून जाऊन खटकर्बित सांक्याच्या रूपानें खालीं बसतें, व नंतर पाणी गाळून तें काढून टाकितां येतें; किंवा पाणी कांहीं वेळ तसेंच ठेवून सांका खालीं बसल्यावर वरचें निवळ पाणी ओतून घेतां येतें. ( २ ) पाण्यांत चुन्याची निवळी घेनाची घालून कर्बाम्लाचें कर्बितांत रूपांतर केलें असतां पूर्वीचें व नवीन बनलेलें कर्बित सांक्याच्या रूपानें खालीं बसतात; व नंतर पूर्वीच्या रीतीनें निराळे करितां येतात कोणत्याहि अदूषित नैसर्गिक पाण्यापासून शुद्ध पाणी सहज तयार करितां येतें. द्रवीभूत क्षार ऊर्ध्वपातनानें (अभिपवानें–डिस्टिलेशन) काढून टाकितां येतात; व वाफ द्रवीभूत ( कंडेन्स ) करण्याकरितां चांगलें भांडें (प्लातिनम किंवा चांदीचें भांडें उत्तम. नेहमींच्या कामाकरितां तांब्याचें किंवा कथलाचें भांडेंहि चालेल ) वापरलें असल्यास, हवेंतील वायूखेरीज इतर पदार्थ पाण्यांत राहूं शकत नाहींत. हे वायुरूप पदार्थ काढून टाकणें असल्यास तें पाणी अरुंद व लांब तोंडाच्या भांड्यांत तापवून उकळूं लागल्यावर भांड्याचें तोंड बंद करून, पाणी थंड होऊं द्यावें. बहुतेक सर्व कामांकरितां यापेक्षां जास्त शुद्ध पाण्याची जरूर नसते. पूर्णपणें शुद्ध असें पाणी तयार करणें फार कठिण आहे.

वाटेल तितकें शुद्ध पाणी सहज मिळतें; यामुळें वजनें व मापें ठरवितांना आणि पदार्थांच्या गुणधर्मांची परिमाणात्मक

व्याख्या देतांना, प्रमाणभूत पदार्थ म्हणून पाण्याचा मोठ्या प्रमाणावर उपयोग केला जातो. उदाहरणार्थ, एक " ग्यालन " म्हणजे ३० इंच दावाच्या व ६२° उष्णमानाच्या हवेंत ज्या पाण्याचें वजन १० पौंड अवॉर्डुपॉइज आहे, अशा पाण्याचें ( ६२° उष्णमान असतां ) आकारमान. त्याचप्रमाणें एक " किलोग्रॅम " म्हणजे ४° सें. उष्णमानाच्या एक घन डेसिमीटर पाण्यांतील द्रव्यराशि होय. उष्णमानमापक यंत्रावरील दोन स्थिर बिंदूंपैकीं खालचा बिंदु (०° सें. किंवा ३२° फॅ. ), ज्या उष्णमानाला वर्फ वितळूं लागतें तें उष्णमान दर्शवितो व वरचा बिंदु(१००° सें. किंवा २१२° फॅ. ), ज्या वेळीं उकळत्या पाण्यापासून निघणाऱ्या वाफेचा जोर ७६० मिलिमीटर किंवा ३० इंच पाऱ्याच्या दावाबरोबर असतो तें उष्णमान दर्शवितो पाण्याची विशिष्ट उष्णता १ धरून त्याप्रमाणें इतर पदार्थांची विशिष्ट उष्णता काढण्याचा प्रघात आहे ( कांहीं एक प्रमाणांत पाण्याबरोबर मिसळलेल्या मिथिल अल्कोहल खेरीज ) इतर सर्व घन व द्रवरूप पदार्थांची विशिष्ट उष्णता पाण्यापेक्षा कमी आहे. त्यामुळें जलवेष्टित भाग.त हवा समशीतोष्ण असते. भूप्रकृतिवर्णनविषयक दृष्टीनें ( फिजिऑग्रॉफिकल ) पाण्याचा दुसरा विशिष्ट गुण म्हणजे बहुतेक सर्व द्रवपदार्थ घनीभूत झाल्यानंतर आकारमानानें कमी होतात, परंतु पाण्याचें वर्फ झाल्यावर त्याचें आकारमान वाढतें; इतर बहुतेक द्रवपदार्थांची गोष्ट याचत्र उलट आहे. ०° सें. ला. ११ भाग वर्फाचें १० भाग पाणी होतें. तें पाणी हळू हळू तापविलें असतां ४° सें. पर्यंत त्याचें आकारमान न वाढतां उलट कमी होतें ( हाहि पाण्याचा अपवादात्मक धर्म आहे ). ४° सें. नंतर आकारमान दर अंशाला जास्त जास्त वाढत जाऊन १००° सें. ला ४° सें. च्या १.०४३ पट आकारमान होतें.

प्राचीन काळीं, पाणी हें पंचमहाभूतांपैकीं एक समजलें जात असून त्याला मूलद्रव्य असें म्हणत. इंग्लंडांत बॉयले याच्या वेळेपूर्वी उद्हराम्ल किंवा गंधकाम्ल मिश्रित पाण्यांत लोखंड, जस्त, किंवा, कथिल या धातु द्रवून एक प्रकारचा ज्वालाग्राही दुर्गंधयुक्त वायु तयार होतो ही गोष्ट माहीत होती. हा वायु म्हणजे दुर्गंधी व ज्वालाग्राही तेलांच्या मिश्रणानें दूषित झालेली नेहमींची हवाच होय असा बॉयले याचा समज होता परंतु तो शुद्ध केला असतां त्याला घाण येत नाहीं व त्याचे गुणधर्म नेहमींच्या हवेपेक्षां फार भिन्न आहेत—कारण तो पेटविला असतां जळू लागून वरीच उष्णता बाहेर पडते व पाणी तयार होतें—ही गोष्ट १७८४ सालीं कॅव्हेंडिश यानें सिद्ध केली. त्यानें आणखी असेंहि सिद्ध केलें कीं ह्या वायूचे--उज्जाचे -४२३ भाग जळण्याकरितां १००० भाग हवा लागते. त्या हवेंत २१० भाग प्राण असतो; म्हणजे दोन भाग ( मापानें ) उज्जाचा एक भाग प्राणाशीं संयोग होऊन पाणी तयार होतें.

भूप्रकृतिविषयक.—ज्या शक्तींच्या योगानें भूपृष्ठ व भूकवच यांमध्यें फेरफार होतात त्या सर्वांत पाण्याला अग्रस्थान दिलें पाहिजे. पाणी तीन स्थितींत असू शकतें:—( १ ) वायुरूप स्थितींत त्याला वाफ म्हणतात, ( २ ) द्रव स्थितींत पाणी म्हणतात व ( ३ ) घन स्थितींत त्याला वर्फ म्हणतात- हवेंत पाणी असतें तें वाष्पस्थितींतच असतें. पृथ्वीच्या पाठीवर जे समुद्र, नद्या, सरोवरें, हिमनद्या वगैरे पाण्याचे साठे आहेत त्यांतून सर्वकाळ पाणी वाष्परूपानें हवेंत जात असतें. वाफ उंच थंड भागांत गेली किंवा थंड हवेच्या प्रवाहांत मिसळली किंवा कोणत्याहि इतर कारणानें थंड झाली म्हणजे तिचे पाण्याचे लहान बिंदू हवेंतील सूक्ष्म कणावर तयार होतात. नंतर ढग तयार होऊन जड झालेले बिंदू पाऊस, गारा, वर्फ वगैरे रूपानें खालीं पृथ्वीवर पडतात. भूपृष्ठाचा तीनचतुर्थांश भाग समुद्रमय असल्यानें बहुतेक वाफ समुद्रांतूनच हवेंत जाते व त्याचप्रमाणें खालीं पडणारें पाणी बरेचसें समुद्रांत पडतें परंतु जमीनीवर जें पाणी पडतें तेंच भूपृष्ठावर फेरफार घडवून आणतें व म्हणून या ठिकाणीं जमीनीवर पडणाऱ्या पाण्याचाच फक्त विचार करावयाचा आहे. यामध्यें पाऊस,झरे, नदीनाले, सरोवरें, वर्फ वगैरेंचा समावेश होतो.

पाऊसः—पावसाचीं कामें दोन प्रकारचीं आहेत. ( १ ) त्याचा खडक, दगड माती वगैरेंवर रासायनिक परिणाम होऊन त्यांच्यांत बदल घडवून आणणें व ( २ ) त्याच्या पडण्याच्या व प्रवाहाच्या जोरानें खडक, माती हीं एकीकडून दुसरीकडे नेऊन जमीनीवर फरक घडवून आणणें.

रासायनिक क्रियाः—पावसाची रासायनिक क्रिया पाऊस हवेंतून खालीं पडतांना ज्या प्रमाणांत हवेंतील वायु व इतर पदार्थ शोषून घेईल त्यावर अवलंबून राहील. पावसाच्या पाण्यांत हवा विरघळते त्यामुळें हवेंतील वायु पावसाच्या पाण्यांत असतात व त्याशिवाय हवेंतील इतर पदार्थहि पावसाबरोबर खालीं वाहून येतात. पावसाच्या पाण्याचें पुष्कळ वेळां पृथक्करण झालेलें आहे. त्यावरून सरासरीनें पावसाच्या १००० मापी भागांत २५ भाग हवा द्रवलेली असते असें आढळतें. त्याचप्रमाणें द्रवलेल्या हवेंत साधारणतः शेंकडा मापांत ६४.१७ मापें नत्र ( नैट्रोजन ), ३३.७६ मापें प्राण ( ऑक्सिजन ) व १.७७ मापें कर्बाम्ल ( कॅर्बॉनिक ॲसिड ) असतें. नेहमींच्या हवेंत आणि पाण्यांत विरघळलेल्या हवेंत निरनिराळ्या वायूंचीं प्रमाणें भिन्न आहेत. याचें कारण असें आहे कीं, पाण्यांत प्राण ( ऑक्सिजन ) नत्रा( नैट्रोजन )पेक्षां व कर्बाम्ल ( कॅर्बॉनिक ॲसिड ) प्राणा( ऑक्सिजन )पेक्षां फार जास्त प्रमाणांत विरघळतात. तसेंच पाण्यांतील हवेंत अम्ननत्रित ( अमोनियम नैट्रेट ), मिठ्हरिद ( सोडियम क्लोराइड ) सूक्ष्म प्रमाणांत विरघळलेले असतात. हवेंत तरंगत असलेले सेंद्रिय पदार्थांचे सूक्ष्म कण व अति सूक्ष्म जंतू हे सुद्धां

पावसाच्या पाण्यांत वाहून येतात. या सर्व पदार्थांमुळें व विशेषतः प्राण ( ऑक्सिजन ), कर्वाम्ल ( कॅर्बानिक ॲसिड ) आणि सेंद्रिय पदार्थाचे कण यामुळें पावसाच्या पाण्याची खडक व खनिज पदार्थ यांवर रासायनिक क्रिया घडून येते. पावसाच्या पाण्याची रासायनिक क्रिया व इतर पाण्याची रासायनिक क्रिया एक तऱ्हेची असल्यानें ती येथें दिल्यावर पुन्हां पुन्हां देण्याची जरूर नाहीं. रासायनिक क्रिया पूर्वीच सांगितल्याप्रमाणें फक्त वायुमुळें किंवा फक्त पाण्यामुळें होत नाहीं.तर त्या एकमेकांच्या मदतीनेंच होतात; म्हणून खालील रासायनिक क्रिया हवेची व पाण्याची आहे असें समजावें.

रासायनिक क्रियेचे प्रकारः रासायनिक क्रिया पांच प्रकारानें खडकावर आघात करतेः ( १ ) प्राणिदीकरण (ऑक्सिडेशन), ( २ ) विप्राणिदीकरण ( डी ऑक्सिडेशन ), ( ३ ) पदार्थ विरघळणें, ( ४ ) कर्वितें (कार्बोनेटस,करणें, ( ५ ) पाणी शोषून घेणें.

ऑक्सिडेशन (प्राणिदीकरण):—प्राण(ऑक्सिजन )आणि पाणी यांच्या सान्निध्यांत खडकांतील कांहीं द्रव्यें प्राणवायू (ऑक्सिजन )घेतात व त्याचा परिणाम असा होतो कीं एक पातळ पापुद्रा खडकावर तयार होतो हा पापुद्रा लवकर निघून गेला नाहीं तर जाळ होतो परंतु तो ठिसूळ असल्यानें केव्हांहि निघून जातोच व खडकाचा नवीन भाग पाणी व प्राणवायु ( ऑक्सिजन ) यांच्या सान्निध्यांत येतो त्याचीहि वरच्या सारखीच विल्हेवाट लागते. लोखंडावर जसा गंज चढतो तशाच तऱ्हेचा हा गंज असतो. ज्या द्रव्यात प्राण ( ऑक्सिजन ) घेण्याची शक्ति असते त्यांच्यावर प्राणिदीकरणाचा ( ऑक्सिडेशनचा ) विशेष परिणाम होतो. हार्नब्लेंड सारख्या द्रव्यांचा ऑक्सिडेशननें अगदीं भुगा होतो. प्राणिदीकरणानें ( ऑक्सिडेशननें ) खडकाला पिंवळा किंवा तांबूस रंग येतो. लोखंडाचें गंधकिद (स्ल्फाइड) असल्यास ऑक्सिडेशननें त्याचें गंधकित ( सल्फेट ) तयार होतें.

विप्राणिदीकरण ( डी ऑक्सिडेशन ):—विप्राणिदीकरणक्रिया प्राणिदीकरणाच्या उलट आहे. यांत खडकांतील प्राणवायू (ऑक्सिजन) सेंद्रिय पदार्थ ओढून घेतात व म्हणून खडकांतील प्राणाचें ( ऑक्सिडेशनचें ) प्रमाण कमी होतें. पावसाच्या पाण्यांत हवेंतील सेंद्रिय पदार्थ येतात व या सेंद्रिय पदार्थांत प्राण( ऑक्सिजन )शीं रासायनिक क्रिया घडवून आणण्याचा विशेष गुण आहे व यामुळें खडकांवर पावसाच्या पाण्याचा परिणाम होऊन खडकांचें पीठ होतें. त्याप्रमाणें खडकांच्या भेगांतून सेंद्रिय पदार्थ कुजत असले व त्यावरून पावसाचें पाणी वाहूं लागलें तरीहि वरच्यासारखाच परिणाम होतो. विप्राणिदीकरणानें ( डी ऑक्सिडेशननें ) गंधकितांचें (सल्फेटचें) गंधकिद (सल्फाइड) होतें. जिप्सम हें खटगंधकित ( कॅल्शियम सल्फेट ) आहे. त्याचें सेंद्रिय पदार्थांच्या सान्निध्यानें खटगंधकिद ( कॅल्शियम सल्फाइड ) तयार होतें व याचा पावसाच्या पाण्यांतील कर्वद्विप्राणिद ( कार्बन डाय ऑक्साइड )मुळें खटकर्वित ( कॅल्शियम कार्बोनेट ) म्हणजे चुन्याचा दगड व गंधकयुक्त उज्ज ( सल्फ्युरेटेड हायड्रोजन) वायु होतो. गंधकयुक्त उज्ज (सल्फ्युरेटेड हायड्रोजन)चें पुढें प्राणिदीकरण (ऑक्सिडेशन) होऊन गंधक तयार होतें. या क्रियेमुळें पुष्कळ ठिकाणीं चुन्याच्या दगडाचे व गंधकाचे थर तयार होतात.

द्रावणः—कांहीं पदार्थ पाण्यांत सहज विरघळतात परंतु कित्येक पदार्थ पाण्यांत जवळ जवळ विरघळतच नाहींत असें म्हटलें तरी चालेल. परंतु पाणी एक सारखें वर्षानुवर्षें वहात असल्यास असले पदार्थ सुद्धां थोड्याबहुत प्रमाणांत पाण्यानें वाहून नेले जातात.पावसाच्या पाण्यांत कर्वद्विप्राणिद ( कार्बन डाय ऑक्साइड ) असतो त्यामुळें पाण्याची कर्वित (कार्बोनेट) पदार्थ विरघळण्याची शक्ति पुष्कळ वाढते. याच कारणामुळें चुनखडी पाण्यांत विरघळते.

कर्वितें ( कार्बनेट्स ) करणें:—पावसाच्या पाण्यांत कर्वद्विप्राणिद ( कार्बन डाय ऑक्साइड ) असल्यानें त्याची विरघळण्याची शक्ति वाढते असें वर सांगितलें आहे. अशा पाण्याचा सोडा, पालाश ( पोटॅश) व खटसिकित (कॅल्शियमच्या सिलिकेट )वर परिमाण होऊन सोडा, पालाश ( पोटॅश ) व खट कर्वितें ( कॅल्शियमचे कार्बोनेट ) होतात. व गार निराळी निघते. फेलस्पार म्हणून जो खनिज पदार्थ आहे त्यामध्यें वरील सिकिता( सिलीकेट )खेरीज स्फटसिकित (ॲल्युमिनियम सिलीकेट) असतें तें मात्र तसेंच राहतें. त्यांतून वरचें सिकर्वित ( सिलीकेट कार्बनेट )होऊन गेलें व सिलोका दूर झाला म्हणजे त्याला केओलिन किंवा चायना क्ले म्हणतात. फेलस्पारप्रमाणें ऑगाइट, हार्नब्लेंडसारख्या खनिज पदार्थांवर परिणाम होऊन कार्बोनेट्स तयार होतात.

पाण्याचें शोषणः—कांहीं खनिज पदार्थ पाणी शोषून घेतात. अशा पदार्थांवर पाणी पडल्यास ते आकारानें वाढतात व खडक ठिसूळ होऊन त्यांचें पीठ होण्यास मदत होते.

पावसाच्या जोरानें होणाऱ्या क्रियाः—रासायनिक क्रियेशिवाय पावसाच्या पडण्याच्या जोरानें खडकांतील कण सुटे करणें व ते इकडून तिकडे वाहविणें हें पावसाचें काम चालू असतें अशा तऱ्हेचें काम किती व कोणत्या वेगानें होतें हें, वर्षांत किती पाऊस पडतो ह्यावर अवलंबून आहेच; परंतु विशेषतः पाऊस वर्षभर थोडाथोडा पडतो किंवा थोड्या वेळांत सर्व पडतो यावर अधिक अवलंबून असतें. ज्या ठिकाणीं चार महिन्यांत सर्व पाऊस पडून जातो त्या ठिकाणीं जसा त्याचा मारा खडकांवर होतो तितक्या जोराचा मारा तितकाच पाऊस बारा महिन्यांत वांटून गेल्यास होत नाहीं. पावसाची क्रिया जशी पावसाच्या मापावर अवलंबून असते तशी ती खडकाच्या परिस्थितीवरहि अवलंबून असते.

**पाणी देणें**—पाणी देणें म्हणजे पोलादाच्या अंगीं कांहीं विशिष्ट गुण आणून आणि हे गुण आणण्यासाठीं पोलादाला तापवून पाण्यांत बुडवावें लागतें म्हणून पाणी देणें हा शब्द रूढ झाला आहे. पाणी दिल्यामुळें पोलादाच्या अंगीं नरमपणा, कडकपणा, चिवटपणा, इत्यादि निरनिराळे गुण आणतां येतात. पाणी हें निरनिराळ्या प्रकारचें असतें; घड्याळ ची कमान, चाकूचें पातें, वस्तऱ्याचें पातें, कातर वगैरे निरनिराळ्या हत्यारांचें निरनिराळें पाणी असतें याचें कारण प्रत्येकाच्या अंगीं निरनिराळे गुण असावे लागतात. पाणी देणारे लोक याचे नरमपाणी, कडकपाणी, जांभळेंपाणी, पिवळेंपाणी असे पुष्कळ भेद करितात. पाणी दिलें असतां साधारण नरम धातूवर ज्याची धार झिजत नाहीं त्याला नरम पाणी असें म्हणतात. पण ज्या पोलादाला पाणी दिलें असतां व त्याला धार लाविली असतां काम करतांना जी धार बसत नाहीं परंतु त्याच्यावर जोर टाकिल्यास मोडून जाते त्याला कडक पाणी असें म्हणतात. पाणी देण्याच्या वेळेस पोलाद विस्तवांत घालून तापवावें लागतें. तें तापत असतांना त्याच्याकडे नीट लक्ष ठेविल्यास असें दिसतें कीं, जसजसें पोलाद तापत जातें तसतसें त्याचे रंगहि बदलत जातात. पहिल्यानें काळसर, मग काळसर तांबूस, मग तांबडा, पिवळा व शेवटीं पांढरा असे त्याच्यावर रंग येत जातात. ज्या रंगापर्यंत तापलें असतांना पाणी देण्यासाठीं पाण्यांत बुडवितात त्या रंगाचें पाणी त्याला दिलें असें म्हणतात. काळ्यापासून पांढऱ्यापर्यंत रंग जसजसे चढत जातात तसतसें त्याचें पाणी कडक होत जातें. याप्रमाणें आपल्याला हवें तसें पाणी देतां येतें. [ वा. ह. मनोहर ]

**पाण्डुवंश**—हा राजवंश आठव्या शतकांत कोसल येथें राज्य करीत होता. याचें व पल्लवराजाचें वांकडें असे. या वंशांत उदयन, इंद्रबल, नन्नदेव, तीवरदेव असे राजे झाल्याचा उल्लेख आढळतो वरील उदयनाचा पराभव पल्लवराज नंदिवर्मा यानें केला( ७३५ ), हा उल्लेख ज्या लेखांत आहे त्यांत या उदयनास शबर( अथवा शभर )म्हटलें आहे. हे दोन्ही उदयन एकच होत असें म्हणतात. [ माबेल डफ—इंडियन क्रॉनॉलाजी. ]

**पाण्ड्य**—पाण्ड्य हें फार प्राचीन राष्ट्र व राज्य होतें. महाभारत ( सभा, भीष्म व कर्णपर्व ), पुराणें व बृहत्संहिता यांत या राष्ट्राचा उल्लेख येतो. वराहमिहिर तर पाण्ड्यराज, ताम्रपर्णीनदी व मोत्यांचा समुद्र अशीं नांवें उल्लेखितो. सांप्रतचे मद्रास इलाख्यांतील मदुरा व तिन्नेवेल्ली हे रुंद जिल्हे आणि त्रिचनापल्ली जिल्हा व त्रावणकोरचें राज्य यापैकीं कांहीं भाग पूर्वीच्या या पाण्ड्यराज्यांत सामील होत असे. या भागावर जें राज्य असे त्यास पंचपाण्ड्य म्हणत, कारण हीं लहान लहान पांच राज्यें होतीं. परंतु या राज्यावद्दलची नाणीं, शिलालेख, वंशावळी व काव्यें यावरूनहि तपशीलवार माहिती आढळत नाहीं ख्रिस्ताच्या काळीं ( १ लें शतक ) या देशाची राजधानी मदुरा उर्फ कुडाळ होती. त्या पूर्वी कोरकई आणि त्याच्याहि आधीं अत्यंत प्राचीन काळीं मदुरा किनाऱ्यावरील दक्षिण मणलूर हें गांव पाण्ड्यांची राजधानी होती. दंतकथेवरून असें दिसतें कीं, कोरकई हीच राजधानी व पाण्ड्य, चेर, चोल या तीन पौराणिक भावांची जन्मभूमि असून साऱ्या दक्षिण हिंदुस्थानांतील सुधारणेचें हें माहेरघर होतें. त्यावेळीं हें फार भरभराटीचें बंदर होतें, येथें मोत्यांचा व्यापार फार मोठा चाले व या व्यापारामुळें पाण्ड्यराज्याला भरपूर उत्पन्न होई. हल्लीं हें गांव ताम्रपर्णी नदीवर आहे. परंतु तें आतां अगदीं लहान खेडें राहिलें आहे. पुढें जेव्हां राजधानी मदुरेस गेली तेव्हांहि दर्यावरील व्यापाराच्या देखरेखीसाठीं पाण्ड्ययुवराज हा येथेंच राही म्हणून त्यास कोरकई आंदार अशी पदवी असे. कांहीं काळानें रेती येत येत हें बंदर रेतीनें भरून निघालें व त्यामुळें तें मागें पडत गेलें ( ७०० ). त्या नंतर कायल हें नवीन बंदर तयार करण्यांत आलें. येथेंच १३ व्या शतकांत मार्कोपालो हा प्रवासी उतरला होता. त्यानें हें बंदर अतिशय श्रीमान असल्याचें लिहिलें आहे. येथें पोर्तुगीज लोकांनीं पुढें एक वखार स्थापिली होती परंतु कांहीं वर्षांनीं तेथेंहि गाळ व रेती येऊन तें बंद करावें लागलें. हल्लीं येथें कोळ्यांच्या झोपड्या आहेत. कोरकई येथील टांकसाळींत जीं नाणीं पाडीत त्यांवर कुऱ्हाड व हत्तीचें चित्र असे. मदुरेच्या नाण्यांवर एक अथवा दोन मासे कोरीत. कात्यायनानें पाण्ड्यांचा उल्लेख केला आहे ( ख्रि. पू. ४ थें शतक ). मॅगॅस्थेनीसनेंहि पाण्ड्यांची एक दंतकथा दिली आहे. कुलशेखर पाण्ड्य हा या सर्व वंशाचा मूळपुरुष असून त्यानें मदुरा स्थापिली. तो चंद्रवंशी होता.

ग्रीक व रोमन लोकांना पाण्ड्य देशाची माहिती चांगली होती. ते या देशाशीं व्यापार करीत असत. मदुरा येथें नदीच्या वाळवंटांत रोमन नाणीं सांपडतात. स्ट्रावो म्हणतो कीं, पांडियन राजानें ऑगस्टस कायसर (ख्रि.पू.२०) याच्याकडे वकील पाठविले होते. पेरिप्लसचा (८०) कर्ता व भूगोलवेत्ता टॉलेमी ( १४० ) यांना पाण्ड्य देशांतील निरनिराळ्या बंदरांची व बाजारपेठांची उत्तम माहिती होती. अलेक्झांड्रिया येथील करकल्लाच्या कत्तलीमुळें ( २१५ ) रोमन लोकांचा ईजिप्त व दक्षिणहिंदुस्थान येथील व्यापार बुडाला.

प्राचीन पाण्ड्यराजांची माहिती नक्की सांपडत नाहीं अलीकडे ती मिळूं लागली आहे; पण त्यांतील नांवांचा व कालाचा गोंधळ आहे. अशोकाचे धर्मप्रसारक पाण्ड्य देशांत आले होते. अशोकानंतर आंध्रांच्या साम्राज्याखालीं पाण्ड्य राज्य होतें. ज्याला कांहीं ऐतिहासिक महत्त्व देता येईल असा नेदुमचेलियन नांवाचा पाण्ड्य राजा हा पहिला होय. हा दुसऱ्या शतकांत झाला; त्यामुळें तो नेदुमुडी

किळी चोल (करिकाल चोलाचा नातू) राज व चेंकुतुवन चेरराज आणि सिंहलद्वीपचा पहिला गजवाहु यांचा समकालीन होता. गजवाहु याचा काल (१७३—१९१) बहुतेक ठरला आहे. या पाण्ड्य राज्यांत एक अतीशय महत्त्वाची संस्था त्या वेळीं असे. ती वाङ्मयविषयक असून मदुरा येथें असे. तिला संगम असें म्हणत. त्या संस्थेकडून विद्येस उत्तेजन मिळे. व तिचे सभासदहि स्वतः अनेक प्रकारचे उच्च दर्जाचे ग्रंथ लिहून वाङ्मयांत भर टाकीत. कूरल, मणिमेखला, शिलाप्पधिकारम् यासारखीं नांवाजलेलीं काव्यें व ग्रंथ पहिल्या व दुसऱ्या शतकांत झाले. ह्युएनत्संग हा ६४० सालच्या पावसाळ्यांत कांची येथें बरेच दिवस राहिला होता. तो स्वतः पाण्ड्य देशास गेला नव्हता तरी पण कांची येथें त्यानें पाण्ड्याबद्दल ऐकीव माहिती मिळविली. त्यानें पाण्ड्य देशाला मलकूट (मदुरा) म्हटलें आहे. या वेळीं पांड्यराज हा कदाचित कांचीच्या नरसिंह पल्लवराजाचा मांडलिक असावा. पांड्य देशांत बौद्धधर्म मुळींच राहिला नव्हता. जैन व हिंदुधर्म भरभराटींत असून त्यांचीं देवळें व मठ पुष्कळ होते आणि बौद्ध विहारांचा नाश झाला होता. तेथील लोकांचें लक्ष्य विद्येपेक्षां व्यापाराकडे, विशेषतः मोत्यांच्या व्यापाराकडे फार होतें. एका शिलालेखांत, आठव्या शतकाच्या मध्यापासून दहाव्याच्या आरंभापर्यंतच्या कालांत झालेल्या पाण्ड्य राजांचीं नांवें आलीं आहेत. परंतु त्याशिवाय जास्ती माहिती त्यांत नाहीं. आठव्या शतकांतील अरिकेसरी पाण्ड्यानें पल्लवांचा पराभव केला. वरगुणवर्मा पाण्ड्याचें राज्यारोहण ८६२–६३ सालीं झालें. यावेळीं चोल राज्य बहुतेक नामशेष झाल्यामुळें पाण्ड्यांचा व पल्लवाचाच झगडा चालू असे. तसेंच आसपासच्या राजांशींहि पाण्ड्य झटापटी करीत. असल्या झटापटींचें बरेंचसें वर्णन शिलालेखांतून आलेलें आहे; परंतु त्यांत विशेष लक्ष देण्यासारखें कांहीं नाहीं. मात्र पाण्ड्यांनीं वेळ येईल त्याप्रमाणें दबून अथवा चढाईकरून आपलें अस्तित्व पुष्कळ शतकांपर्यंत ठेविलें होतें. प्रख्यात राजराज चोलानें पाण्ड्य राजाला आपला मांडलिक बनविल्यापासून (९९४) पुढें दोन शतकांपर्यंत पाण्ड्य दबलेलेच राहिले. तेराव्या शतकाच्या पूर्वार्धांत मात्र त्यांनीं आपलें डोकें वर काढिलें. या राजांनीं पुढें जैन धर्मीना फार छळ केला. ह्युएनत्संगाच्या कांचीं येथील मुक्कामानंतर ही गोष्ट घडली (६४०). कून किंवा सुंदर उर्फ नेडुमारण हा पाण्डयराज प्रथम जैन (कांहींच्या मतें बौद्ध) धर्मानुयायी होता (१०६४). त्याची बायको चोल राजकन्या होती. चोल राजे हे कट्टे शैव होते. त्यामुळें सुंदराला त्याच्या राणीनें व तिरुज्ञानसंबंदर या साधूनें जैन धर्माचा त्याग करावयास लावून शैव धर्मी बनविलें. पुढें या सुंदर राजानें जैनधर्मी लोकांचा फार छळ केला. कोणी म्हणतात कीं त्यानें ८ हजार जैन लोक (ते आपला धर्म सोडीनात म्हणून) ठार केले. यांत अतिशयोक्ति असावी, पण एवढें खरें कीं, या वेळेपासून दक्षिणेंतून जैन धर्माचें प्राबल्य पुष्कळ कमी झालें. या घराण्यांतील वरगुण पाण्ड्याचा गंगराजानें कुंभकोणाजवळ पराभव केला होता.

सिंहलद्वीपच्या राजांचीं व पाण्ड्यांचीं नेहमीं युद्धें होत असत. त्यांतील सिंहलद्वीपच्या पराक्रमबाहूनें पाण्ड्य देशावर केलेली स्वारी (११६६) फार प्रख्यात आहे. यावद्दची हकीकत महावंशांत व अर्पकम येथील शिलालेखांत आलेली आहे. त्यावरून दिसतें कीं, प्रथम जरी पराक्रमबाहूचा जय झाला, तरी अखेरीस दक्षिणेंतील बहुतेक राजांनीं पाण्ड्य राजास मदत करून पराक्रमबाहूस तोंड देऊन त्याचा पराभव केला. यापुढील ११०० ते १५६७ पर्यंतच्या पाण्डय राजांचीं नांवें व काळ कीलहॉर्न यानें दिला आहे. परंतु त्या राजांपैकीं कांहीं निव्वळ जहागीरदार आहेत. कुलोत्तुंग चोलानंतर चोल राज्य नामशेष करण्यास पाण्डय राजा हा काकतीय व केरळ राजा यांचा मदतनीस होता (१८१८). या काळांतील जयवर्मन सुंदर (१२५१—७१) हा शूर असून, यानें नेल्लोर ते कन्याकुमारीपर्यंतचा सर्व पूर्व किनारा हस्तगत केला होता. पुढें (१३१०) मलिककाफर यानें जरी स्वारी केली तरी हें पाण्ड्य संस्थान सर्वस्वीं नष्ट झालें नाहीं. साधारणपणें पाण्डय राज्याची मर्यादा उत्तरेस वेल्लार नदी, दक्षिणेस कन्याकुमारी, पूर्वेस कारोमांडल किनारा व पश्चिमेस त्रावणकोर संस्थानांतील अछहनकोवील (मोठी वेस) घाट अशी असे. पाण्डय हें नांव पाण्डवांचा बाप पण्डु याच्यापासून निघालें व पाण्ड्यन् हा त्याचा तामील अपभ्रंश आहे असें काल्डवेल वगैरे म्हणतात, यनेलचें मत, मूळ शब्द पाण्डयन् व पाण्ड्य हें त्याचें संस्कृतीकरण होय.

जरी या वंशांतील पुरुषांची माहिती नक्की आढळत नाहीं, तरी जी आढळते तिचा अगदीं त्रोटक सारांश पुढें देतों. याचा मूळपुरुष कुलशेखर त्यानेंच मदुरा स्थापिली. त्याचा पुत्र मलयध्वज यानें चोल राजकन्येशीं लग्न लाविलें. त्याच्या मुलीचा मुलगा सुंदर हा पराक्रमी होता. तो व त्याची बायको मीनाक्षी यांची त्या प्रांतांत अद्यापि देवासारखी पूजा करितात. याचा पुत्र उग्र, त्याचा वीर, नंतर अभिषेक, पुढें विक्रम, यानें जैनधर्म स्वीकारला. याचा पुत्र राजशेखर हा विद्वान् होता. याचा कुलोत्तुंग, त्याचा अनंतगुण हा जैनांचा द्वेष्टा होता. त्याचा कुलभूषण, याच्यावर चेदिराज चालून आला होता, पण उलट त्याला माघार घ्यावी लागली. कुलभूषणाचा राजसिंह, त्याचा राजेंद्र, यानें चोल राजकन्येशीं जबरीनें लग्न केल्यानें दोघांची लढाई झाली व तींत चोलांचा मोड झाला. राजेंद्राचा राजेश (राजेश्वर), त्याचा राजगंभीर त्याचा वंशप्रदीप, त्याचा पुरुहूत, त्याचा वंशपताक, त्याचा सुंदरेश्वर पादशेखर, यानें पुष्कळ देवळें बांधिलीं, याचें व चोलांचें युद्ध झालें. याचा पुत्र प्रख्यात वरगुण. याच्या

कारकीर्दीत भद्रय्या नांवाचा नामांकित गवई झाला. वरगुणानें चोलांचा पराभव केला व चेरांस मांडलिक बनविलें. याच्या नंतर २६ वा पुरुष कीर्तिभूषण झाला. या राजाच्या वेळीं ह्या घराण्याची ही पहिली शाखा नष्ट होऊन दुसरी प्रसिद्धीस आली. तिचा प्रस्थापक वंशशेखर होय. नदीच्या पुरानें मदुरा वाहिली त्यामुळें यानें तिची नवी वसाहत करून तट वगैरे बांधला; चोलाचा पराभव केला व ( कांहींच्या मतें यानेंच ) संगम ही विद्वत्सभा स्थापिली याच्यानंतरचा १६ वा पुरुष कुलेश हा विद्वान होता. अरिमर्दन, यानें जैनांना फार छळिलें. याचा प्रधान माणिक्य हा फार विद्वान व शैवपंथी असून त्यानेंच वरील जैनांच्या छळास सुरुवात केली. अरिमर्दनाचा दहावा वंशज कून ऊर्फ कुब्ज किंवा सुंदर याचें वर्णन वर आलेंच आहे. यानें चोलाचा नाश करून उरय्यूर व तंजावर जाळलें व त्यांना मांडलिक बनवून एका चोल राजपुत्राला पाण्ड्य ही पदवी दिली. कून याच्यावेळीं मदुरा येथें अरब लोक आले होते. याचा पुत्र वीर हा या पाण्ड्य शाखेचा शेवटचा (७४ वा) पुरुष होय याला औरस संतति नव्हती, मात्र त्याचे दासीपुत्र पुष्कळ होते; त्यांच्यांत हें राज्य वाटलें गेलें.

यापुढें जी तिसरी वंशावळ मिळते ती सोमशेखरपासून मिळते. त्याच्यापासून ६ वा मेरुसुंदर यानें चोल-चेर यांना जिंकिलें. याचा ४ था वंशज मकरध्वज हा फार शूर होता. याचा नातू कुवलयानंद यानें दर्यावरील व्यापार वाढविला. हा दर्यावरील सफरींत असतांच वादळानें बुडून मेला. याचा २७ वा वंशज पराक्रमराज उर्फ सुंदर हा मलिक काफरच्या वेळीं होता ( १३११ ). यानें आपल्या बापाचा खून केला, तेव्हां याला त्याचा भाऊ वीरराज यानें हांकलून दिलें. त्यानें मलिक काफरास मदत केली व मदुरा त्यांच्या हातीं दिली. त्यामुळें प्राचीन पाण्ड्य राज्य समूळ नाश पावलें यापुढें ६० वर्षे मदुरेस मुसुलमानाचा अंमल होता ( १३११-७२ ). शेवटचा मुसलमान जहागीरदार फंदक मलिक यास विजयानगरचा सेनापति कंपन उडैयार यानें जिंकून मदुरा घेतली. नंतर या उडैयार घराण्यानें व निरनिराळ्या नायक राजांनीं येथें राज्य केलें ( १३७२-१६२३ ). मुसुलमानांनीं पाडून टाकलेलीं मदुरेचीं चार गोपुरें या नायकांनीं पुन्हां बांधिलीं. हे नायक विजयानगरचे मांडलिक असत. त्यांच्यांत प्रख्यात विश्वनाथ नायक झाला (१५५९). वरील (१३७२-१६२३) काळांत मदुरेच्या खालच्या भागांत एक पाण्ड्य घराणें जहागिरदाराप्रमाणें अस्तित्वांत होतें. ह्या पाण्ड्य राजाचीं नांवें शिलालेखांतून आलेलीं आहेत. शेवटचा राजा सुंदर पाण्ड्य हा १६२३ त होता त्याचा बाप अतिवीर हा तामीळ कवि व विद्वान होता.त्याची तामीळ प्रांतांत अद्यापि प्रख्याति आहे. पुढें या सर्व पाण्ड्यांची सत्ता तिरुमल नायक ( १६२३-५९ ) यानें नष्ट केली पाण्ड्य राजांच्या कालानुक्रमाची एक सविस्तर यादी के. दि. ब. स्वामी कन्नू पिल्ले यांनीं निरनिराळ्या शिलालेख व ताम्रपटांवरून एपि. इंडिकामध्यें व इंडि. अँटिक्वरी, पु. ४२ पृ. १६३-७२ व २२१ २९ मध्यें दिली आहे. तिच्यावरून एकाच काळीं पांच पाण्ड्य घराणीं राज्य करीत होतीं असें त्याचें म्हणणें आहे.

[ संदर्भग्रंथः—विल्सन-हिस्टॉरिकल स्केच; नेल्सन-मदुरा मॅन्युअल; काल्डवेल-हिस्टरी ऑफ तिनेवेल्ली; टॉलेमी; तामाळस एटीन हंड्रेड इयर्स अँगो; इंडि. अँटि. पु. ६,१८ कॉइन्स ऑफ तिनेवल्ली; भांडारकर-आर्लि हिस्टरी ऑफ धि डेक्कन; स्ट्रॅबो; फोक साँग्ज ऑफ सदर्न इंडिया; आय्यंगार-एन्शन्ट इंडिया; त्रावणकोर आर्किऑलॉजिकल सेरीज. पु. ७. ]

**पातन किंवा ऊर्ध्वपातन**—या क्रियेचा उपयोग पदार्थांचे अर्क काढणें, संयुक्त पदार्थांचें पृथक्करण करणें या क्रियेकडे होतो. हिंदुस्थानांत व चिनांत ख्रिस्ती शकापूर्वी हजारों वर्षें या कृतीनें अर्क काढीत असत. हिंगुळांतून पारा काढण्याच्या कृतीचें तत्त्व हेंच.

ज्या पदार्थाचा अर्क काढणें असेल तो पदार्थ किंवा ज्या मिश्रणाचें पृथक्करण करणे असेल तें मिश्रण भांड्यांत घालून तापविलें म्हणजे त्यांतील ज्या पदार्थाची वाफ लवकर होईल तो पदार्थ बाष्परूपानें बाहेर पडतो. त्या वाफेला कोणत्या तरी प्रकारानें-विशेषतः थंड पाण्याच्या प्रवाहानें-थंड करण्यात येतें व मग त्याचें द्रवरूप किंवा प्रसंगविशेषीं घनरूप होतें.

अल्कहल ( मद्यसार ) व पाणी यांच्या मिश्रणासारख्या मिश्रणांतील दोन द्रवाचे पृथक्करण करतांना ज्या द्रवाचा बाष्पबिंदु कमी असतो तें लवकर बाष्परूप होतें व त्याची वाफ प्रथम बाहेर पडते. तिचें द्रवरूप करून एका भांड्यांत सांठवितात. परंतु त्यांत देखील दुसऱ्या द्रवाचा थोडासा अंश असतोच. याकरतां या अर्काचें पुन्हां ऊर्ध्वपातन करावें लागतें. जर दोन्हि द्रवांचे बाष्पबिंदू जवळ जवळ असले तर हीच कृति पुन्हा पुन्हां करावी लागते.

हल्लीं या क्रियेचा उपयोग दारू तयार करण्याकडे फार होतो. ज्या प्रकारच्या पदार्थापासून व ज्या प्रकारची दारू तयार करणें असेल किंवा डांबरापासून जे पदार्थ पाहिजे असतील त्या त्या परिस्थित्यनुरूप ऊर्ध्वपातनयंत्राची योजना निरनिराळी केलेली असते.

हल्लीं प्रचारांत असलेल्या यंत्रांत अशी रचना केलेली असते कीं, तिनें पुन्हां पुन्हां ऊर्ध्वपातन करण्याचें कारण पडत नाहीं. त्या यंत्राची द्रवीकरणनळी अशी केलेली असते कीं, जसजशी मिश्र वाफ वर वर चढते तसतसें त्यांतील एका द्रवाचें प्रमाण कमी कमी होत जातें. याशिवाय नायट्रोबेंझीन व इतर कांहीं पदार्थ शुद्ध करतांना भांड्याला प्रत्यक्ष विस्तवानें न तापवितां, त्यांत एका बाजूनें पाण्याची वाफ सोडतात. म्हणजे तो पदार्थ बाष्परूपानें पाण्याच्या वाफेबरोबर निघून ग्राहकपात्रांत येतो.

**पाताल**—पाताल म्हणजे मृतांचें निवासस्थान. ही कल्पना पृथ्वीवरील बहुतेक लोकांत व धर्मांत आढळते. तथापि कित्येक धर्मांत व विशेषतः प्राथमिक अवस्थेंतील लोकांत मृताचा आत्मा कबरस्थानाजवळ राहतो असा समज असतो, कारण थडग्याजवळ खाण्यापिण्याचे व इतर पदार्थ ठेवण्याची व थडग्यावर मोठमोठ्या इमारती बांधण्याची पद्धत पुष्कळ लोकांत आहे. तथापि पुष्कळशीं थडगीं एकत्र होऊन अनेक मृतांचे आत्मे जवळ जवळ आहेत या कल्पनेवरूनच पुढें पाताल नामक मृतांच्या स्वतंत्र निवासस्थानाची कल्पना उद्भूत झाली असावी. सूर्य सकाळीं पृथ्वीच्या किंवा पूर्वेकडे समुद्राच्या खालून उगवतो व संध्याकाळीं पश्चिमेकडे समुद्राखालीं जातो या प्रत्यक्ष देखाव्यावरून पृथ्वीच्या खालीं निराळा पाताल लोक असावा ह्या कल्पनेस दृढता प्राप्त झाली. तथापि पातालांत सूर्य प्रकाशत नाहीं, सर्वत्र निबिड अंधःकार असतो ही कल्पना पुष्कळ धर्मांत असते. बाबीलोनी, हिब्रू, मिसरी, ग्रीक, रोमन वगैरे प्रगत संस्कृतीच्या लोकांत पातालाची कल्पना नष्ट न होतां दृढतर झालेली दिसते.

भारतीयांची पातालाची कल्पना म्हणजे भूमीच्या अधोभागीं जे सात बिलस्वर्ग आहेत त्यांतील सातव्यास व इतरांस पाताल हें साधारण नांव असून त्या सातांचीं नांवें:—अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल, आणि पाताल. येणेंप्रमाणें आहेत. पातालांत नागांची वस्ती असून त्यांच्याबद्दलच्या कथा अनेक पुराणांतून आहेत.

**पातुर**—वऱ्हाड, अकोला जिल्ह्याच्या बाळापुर तालुक्यांतील गांव. लोकसंख्या सुमारें सहा हजार. येथें जवळच्या डोंगरांत कोरीव लेणीं असल्यामुळें यास प्राचीनवस्तुसंशोधकांच्या दृष्टीनें महत्त्व आहे. पूर्वी या लेण्यांची कोणी काळजी घेत नव्हतें परंतु इ. स. १८८१ मध्यें हीं सर्व स्वच्छ करण्यांत आलीं आहेत. हीं सर्व बौद्ध लेणीं असावींत असें दिसतें. परंतु एका लेण्यांत महादेवाची पिंडी कोरली आहे. यांत एक शिलालेख व एक जैनमंदिर आहे.

**पाथरघाट**—बंगाल, भागलपूर जिल्ह्यांतील गंगेच्या कांठीं असलेला एक डोंगर. डोंगराच्या उत्तर बाजूला कोरीव लेणीं आहेत. त्यांपैकीं चौऱ्यांशीं स्वामींच्या मूर्ती पहाण्यासारख्या आहेत. डोंगरावरील ५ गुहांपैकीं बटेश्वर नांवाच्या गुहेंत ब्रांझ व चांदीचे कांहीं अवशेष सांपडले आहेत.

**पाथरवट**—दगडावर काम करणाऱ्यांची एक जात. महाराष्ट्रांत यांनां पाथरवट असें म्हणतात. आम्ही रजपूतवंशज आहोंत असें हे लोक सांगतात. मराठा, कामाठी व तेलंगी असे तीन वर्ग यांच्यांत आहेत. हे मराठी भाषा बोलतात.यांची रहाणी स्वच्छ असते. कुलोपाध्याय बहुतकरून यजुर्वेदी ब्राह्मण असतो. सर्व धार्मिक विधि व आचार मराठे कुणब्यांप्रमाणेंच असतात. जातींतील तंटे, एक पंचायत व एक अधिकारी नेमून, मिटविण्यांत येतात.

**पाथरी**—ही वनस्पति हिंवाळ्यांत व उन्हाळ्यांत जरी ज्वारीच्या शेतांत उगवणाऱ्या तृणांपैकीं आहे. हिचा जमीनीस चिकटून ५–६ पानें असतात. फुलाचा रंग पांढरट पिंवळा असतो. फुलें एकेरी मखमलीसारखीं पण लहान येतात. ही भाजी कुणबीलोक खातात. ही औषधी आहे. खेडेगांवच्या बाजारांत ही भाजी कधीं कधीं दृष्टीस पडते. पण बहुशः हिचा घरगुती उपयोग करितात.

**पाथरी**, ता लु का—हैद्राबाद संस्थानातील परभणी जिल्ह्याचा पश्चिमेकडील तालुका. क्षेत्रफळ ६०० चौरस मैल. जहागिरी सुद्धां लोकसंख्या सुमारें सव्वालाख. मोठीं गांवें पाथरी व मानवत. खेड्यांची संख्या १६७ ( पैकीं १९ जहागिरी गांवें ). मुख्य गांव पाथरी. लोकसंख्या सुमारें सहा हजार. यास पूर्वी पार्थपूर असें नांव होतें. निजामशाहीचा मूळ पुरुष येथला राहाणारा होता.

**पादांगुलिक्षत**—हे एक प्रकारचें क्षत पायाच्या अंगठ्यावर अगर करंगळीस होतें व तें होण्याचें कारण पृष्ठवंशरज्जूपासून निघणाऱ्या मज्जातंतूच्या विकृतीमुळें, त्यांतील पोषण शक्तीचा ऱ्हास होऊन त्याचा परिणाम या ठिकाणीं क्षत पडण्यांत होतो. कारण त्यामुळें इजा, दाब वगैरे साध्या कारणांमुळें होणारी झीज आपोआप भरून याबी अशा पायांतील नैसर्गिक शक्तीच्या अभावामुळें पायांतील त्राणशक्ति कमी होते. तशांत बहुधां त्या माणसास कंपरोग मधुमेह, महारोग अगर पृष्ठवंशरज्जुजन्य ग्रंथिरोग यांपैकीं एखादा रोग असल्यास हा रोग फार करून होतो. प्रथम पायाच्या बोटाम घट्टा पडल्याचें निमित्त होऊन व्रणास आरंभ होऊन तो व्रण चरतो, परंतु पसरत नाहीं; तर आंत खोल पोखरत जातो. व त्यामुळें तेथें लासूर म्हणजे नलिकाकार छिद्र पडून तें बरें होत नाहीं व बंद होत नाहीं, तर त्यावर कीट व कोंड्याची वाढ होत जाते;त्यांत दुःख व वेदना आंत तपासण्यासाठीं सळई घातली तरी होत नाहीं. त्या पोखरणीमुळें बोटामधील सांधा उकलतो. व तेथील हाड कुजून पायाच्या तळव्यास तेथें आरपार छिद्र पडतें. व यामुळें कधीं पाऊल सडण्यासहि आरंभ होतो. पाऊल गार लागतें व तुसत्या त्याच भागास घाम येतो.व पावलात आणि पायाच्या खालील एकतृतीयांश भागांत वेदना व स्पर्शसंवेदनशक्ति नाहींशी होते. गुडघा ढिला सोडून त्यावर हातानें आडवा आघात केल्यानें निरोगी माणसाचा गुडघा उडतो तसा या रोग्याचा उडत नाहीं. उपचारः—फार दिवस पाय न हलवून पावलांस विश्रांति दिल्यानें व्रण बरा होण्याचा संभव असला तरी तेथें चिरून आंतील नासकें कुजलेलें हाड काढून टाकून रोगट रचना मुळाशीं जमलेला कीट खरडून काढण्यानें व व्रणाचें मुख खरडून मोकळें व स्वच्छ ठेवल्यानें व्रण भरून येण्याचा संभव असतो. नंतर रोगी हिंडूं लागल्यावर पुनःतळव्यावर दाब पडूं नये म्हणून त्यानें जो जोडा अगर बूट वापरावयाचा त्याच्या तळांत पूर्वीच्या व्रणासमोर

लहान खड्डा अगर छिद्र जोडयाच्या अगर बुटाच्या तळव्यास पाडलें म्हणजे तेथील चामडीवर दाब न पडून पुनः व्रण होणार नाहीं. अनेक लासुरें आंत खोल गेलीं असलीं तर पाऊल अगर पायाचा खालील ⅓ भाग कापून काढावा लागतो.

**पादांगुष्ठ वातरोग**, रोगाचें स्वरूप — या रोगांत सांध्यामध्यें दाह उत्पन्न होतो; कारण रक्तामध्यें सोडियम बाय यूरेट नामक दाहोत्पादक क्षार जमत गेल्यामुळें त्या क्षाराचें कीट विशेषतः पाऊल व पायाचा आंगठा या ठिकाणीं सूज उत्पन्न करतें. पण हात व इतर सांध्यांच्या ठायीं हा दाह व सूज होत नाहीं असें नव्हे. रोगास मधून मधून तीव्रपणाचा भर येतो व मध्यंतरीं शरीरांत मूत्रपिंड व इतर ठिकाणीं विकृती होतात; यावरून हा केवळ संधिगत वात नसून सर्व शारीरिक रोग आहे असें हल्लीं मानतात.

कारणें.—आनुवंशिकता हें एवढें कारण असल्यामुळें मोठेसें कारण न घडता साधारणपणें तरुणवयांत (२० व्या वर्षी) एखाद्या व त्यांत विशेषेंकरून पुरुषांस कांहीं कुटुंबांत हा रोग दिसून येतो. पण अशीं उदाहरणें वगळल्यास चाळिशी उलटल्यावर अगर त्यापुढील म्हातारपणाचा हा रोग आहे. याहूनहि चमत्कारिक व अपवादात्मक प्रकार हा कीं, आठ ते दहा वर्षांच्या मुलांत देखील हा रोग कधीं कधीं आढळतो. हा रोग श्रीमंतांना तवढा होतो असा समज आहे पण तो समज अगदीं सर्वस्वीं खरा नाहीं. नैट्रोजनयुक्त व मोठा आहार ज्यांचा आहे व त्यांत मदिरा सेवन वगैरे असल्यानें रक्तामध्यें व शरीरांतील सांधे, इंद्रियादि रचनेमध्यें विकृति घडविण्यास अनुकूल स्थिति तयार होते. मदिराप्रकारांपैकीं पोर्ट, शेरी व माल्टपासून तयार झालेल्या दारूमुळें हा रोग विशेष होतो. व ब्रांडी, व्हिस्की व इतर प्रकारांमुळें कमी होतो असा अनुभव आहे. यांतच व्यायामाच्या अभावाची भर पडल्यास रोगवृद्धि विशेष जलद होते. सुखवस्तू अगर श्रीमंत रोगी जो व्यवसाय अगर धंदा करीत असेल त्यामुळें त्यास व्यायाम कमी घडून खाण्यापिण्याचे मोह अगर जरूरी विशेष असेल तर, किंवा टाईप पाडणारे, तेलाचे रंग देण्याचें काम करणारे अशा गरीब लोकांमध्यें शिशाच्या विकारामुळें हा रोग होण्यास फावतें. ज्यांना एकदां हा रोग झाला आहे त्यास खाणें पिणें यांतील नियम जराहि मोडल्यास अगर काळजी, दुःख, संकटें, इजा वगैरे कारणामुळें पुनःपुनः रोग उलटतो.

*रोगलक्षणें*.—हा रोग निरंतर जडल्यामुळें त्याच्या तीव्र व जुनाट दशा दोन अवस्था आहेत; त्यापैकीं तीव्रावस्थेचें वर्णनः-प्रथम पायाच्या आंगठ्याच्या मागील हाडाच्या सांध्याजवळ हा वात व ठणका प्रथम प्रगट होतो. त्याच्या अगोदर सूचक अशीं कांहीं अधिक लक्षणें कांहीं रोग्यांना होतात तीं अशीं:—आपली प्रकृति फार उत्तम आहे असें वाटून भूक व आनंद वाटणें हेंहि एक लक्षण आहे. पण त्यापेक्षां औदासिन्य येऊन झोंप नीट न लागणें, अंग खाजणें, पेटके येणें, कानांत नाद, लाळ सुटणें, पोटशूळ, वांती, नव्याश्रित वात हीं लक्षणें होतात. लघवींत बदल होऊन ती युरेट नामक क्षारामुळें गढूळ होणें हें लक्षण असतें व या लक्षणांना आरंभ होऊन दोन दिवस होतात न होतात तोंच एके दिवशीं पहाटे सुमारें दोन तीन वाजतां पायाचा आंगठा दुखूं लागल्यामुळें रोगी जागा होऊन तें दुःख व ठणका वाढल्यामुळें रोग्यास अगदीं चैन पडत नाहीं. थोडी अगर जास्त थंडी वाजून थोडासा ज्वरहि येतो. असह्य ठणका कांहीं तास टिकून नंतर तो आपोआप शमन होण्यास आरंभ होऊन त्यामुळें रोग्याचा डोळा लागतो. व जागा झाल्यानंतर पहातो तों दुखणारा आंगठा लाल होऊन सुजला आहे असें त्यास आढळतें दुःख व सूज इतकी असते कीं तीवर बोट लावूं देत नाहीं. व लावलें व जरा दाबलें तर तेथें किंचित् खळगा पडतो. सुजेवर तकाकी व टणकपणा असून त्यावर फुगलेल्या शिरा दिसतात. दिवसा हें दुःख सह्य असतें पण संध्याकाळ व रात्र झाली कीं पहाटेप्रमाणें असह्य वेदना, थंडी, ताप, यातना, जागरण हीं लक्षणें पूर्ववत होऊन दुसरा दिवस उजाडून रात्रीं मागील लक्षणांची पुनरावृत्ति होते मात्र सूज अधिक वर चढते आणि हा क्रम पांच सहापासून तेरा चवदा दिवसपर्यंतसुद्धां चालतो. त्या अवधींत सुजेचा रंग काळसर होऊन नंतर फिका होतो व शेवटीं सुजेवरील त्वचेचे जाडी पापुदरे व कोंडा निघून पडतो व नंतर पाय पूर्ववत् होतो. कधींकधीं हे पापुदरे गळत नाहींत व क्वचित् प्रसंगीं एक दोन नखें गळून पडतात. ज्वर बहुधा १०१° पेक्षां अधिक नसतो. परंतु त्यामुळें जिभेस बुरशी, अरुचि, तहान, मळमळणें, पोटास फुगवटी, शौचास साफ अगर मुळींच न होणें, पाढऱ्या अगर मातट रंगाचा मळ पडणें (पित्ताभावामुळें) इत्यादि लक्षणें होतात. क्वचित् रोग्यांमध्यें यकृतावर दाबल्यास दुखतें. लघवीची स्थिति वर सांगितली आहे. हल्लीं असें कळलें आहे कीं साध्या निरोगी माणसांपेक्षां या वाताची खोड लागलेल्या रोग्यांच्या नेहमींच्या लघवींत रोजचें युरिक ॲसिड वाजवीपेक्षां कमी प्रमाणांत सांपडतें व हा तीव्र रोगप्रकार घडण्याच्या अगोदर तर तें त्याहूनहि कमी होतें. पण सांध्यांच्या सुजेस आरंभ झाल्याबरोबर हें प्रमाण झपाट्यानें वाढूं लागून त्याचा कळस दुसऱ्या अगर तिसऱ्या दिवशीं झाल्यावर पुनः लघवीचा रंग, रूप व घनता पूर्ववत् होऊं लागते तीव्र लक्षणांच्या वेळीं रक्तांतहि युरेटच्या रूपानें युरिक ॲसिड जास्त प्रमाणांत सांपडतें. रक्तांतील पांढऱ्या पेशींचें प्रमाण व व्यापार अधिक जोरानें चालतात. ही तीव्रावस्था संपल्यावर रोग्यास पूर्वी बरेच दिवस अननुभूत असा आराम व आनंद वाटतो. व कित्येक महिने अगर दोन तीन वर्षेंपर्यंत त्यास कोणत्याहि प्रकारची पीडा, त्रास पुनः होत नाहीं. अगर या रोगलक्षणांची आठवणहि होत नाहीं. नंतर

अनपेक्षितपणें दुसऱ्यांदाहि अशाच तीव्र लक्षणांचा त्याच सांध्यांत अगर दुसऱ्या पायाच्या आंगठ्यांत आरंभ होतो. व पूर्ववत् लक्षणें होतात. अगर मनगट, घोटा, हात या ठिकाणीं रोग प्रगट होतो. तिसऱ्या खेपेस तीव्र रोग पुनः प्रगट होतो. तो मात्र अंमळ पूर्वीपेक्षां लवकर होतो व यापुढें येणाऱ्या दोन तीव्र रोगांतील अवधि कमी कमी होत जातो. व दर वेळीं कोणताना कोणता तरी नवा सांधा अगर दोन्हीं सांधे धरलेगेल्यामुळें ते विकृत होऊन शेवटीं रोगी सांधे जखडल्यामुळें अगदीं लुला, पांगळा होतो. या अवस्थेसच जुनाट रोग म्हणतात. अंगठे वगैरेंच्या सांध्यांतून प्रथम आरंभ होऊन हातापायाचे बारके सर्व सांधे क्रमाक्रमानें विकृत होतात. परंतु खांदा व जांघाड येथील सांध्यांत थोड्याच रोग्यांमध्यें अशा तऱ्हेनें विकृति उत्पन्न होते असें पाहण्यांत आलें आहे. हाताच्या बोटांचे सांधे उघडलेल्या अगर मिटलेल्या स्थितींत सुजून मोठे होऊन आंखडतात व हात आंतील बाजूकडे वक्र होऊन जखडतो. त्याचप्रमाणें विकृति होऊन बोटांवर माणूस उभें रहातें त्या स्थितींत पाऊल व घोटा आंखडतो. व गुडघा आणि कोपर अर्धवट अगर पूर्ण वांकड्या स्थितींत आंखडतात. सांध्यावर टेंगळें उत्पन्न होतात. त्यांवरील चामडी प्रथम तुळतुळीत व फुगलेल्या शिरा दिसत असलेली दिसते. नंतर ती फाटून त्यांतील साईसारखा अगर खडूसारखा स्राव थोडथोडा वहातो. अगर त्यांत पू उत्पन्न झाल्यास तो त्वरित वाहून जातो. हीं टेंकाळें बोटें, खोंवणी स्नायुबंधनें, कानाची कूर्चा वगैरे इतर ठिकाणीं सुद्धा असतात. हा स्राव सूक्ष्मदर्शक यंत्रांतून तपासल्यास त्यांत सोडियम बाय युरेटचे सुईच्या आकाराचे असंख्य स्फटिक कॅल्शिम युरेट अगर फास्फेट व सोडियम क्लोराइड (मीठ) यांच्या स्फटिकांशीं मिश्रित असलेले आढळतात. कधीं कधीं या रोगाचा प्रारंभ वर वर्णिलेल्या व पुनः पुनः प्रगट होणाऱ्या तीव्र स्वरूपांत न होतां त्यास एकदमच जुनाट अगर अर्धतीव्र स्वरूप येतें. अशा वेळीं साध्या संधिवाताप्रमाणें सांध्यांत पुष्कळ लसेचें पाणी जमल्यामुळें तो खूप सुजतो, परंतु लाली फार कमी असते. अनियमित प्रकारचा रोग हा या रोगाचा तिसरा प्रकार असून त्यामुळें शरीरांतील नाना इंद्रियांत प्रथम सूज व दाह होतो अगर त्यांचे व्यापार व त्यांच्या क्रिया अवरोधित होतात व म्हणून या कारणांमुळें जठर व आंत्राच्या ठायीं दाह होऊन वांती जुलाब, अजीर्ण, श्वासनलिकादाह, नेत्रपुटदाह, कनीनिकापटलदाह, मूत्रनलिकादाह, शिश्नमूलग्रंथिदाह, शिरादाह, मज्जादाह, व कोणी म्हणतात कीं, जुनाट यकृत्दाह सुद्धां यामुळें होतो. तसेंच मूत्रपिंडदाह तर हटकून होतोच व त्या पिंडांत युरेट क्षाराचें कीट मनस्वी जमतें. तितकें तें सांध्यांत जमत नाहीं. त्या दाहामुळें इसब, धमनीकाठिण्य रोग व हृदय-स्नायूमध्यें मेदोवृद्धि हे रोग उत्पन्न होतात. इंद्रियव्यापार अवरोधित झाल्यामुळें माथेशूळ, अर्धशिशी, भोंवळ, दमा, श्वास छातींत व हृदयामध्यें वेदना, स्नायूमध्यें पेटके, उसण व लचक भरणें वगैरे रोग होतात. पण हे शेवटी सांगितलेले रोग स्वतंत्रपणेंहि (या पादांगुष्ठवाताचा उपद्रव नसतांहि) होतात.

संधिगत विकृतीचें स्वरूप.—सोडियम बाय युरेटच्या स्फटिकांचें कीट सांधे व तदनुषंगिक शिरा, स्नायु, स्नायुबंधनें व त्वचा या सर्व ठिकाणीं जमून दाहामुळें त्या रचना विरल व विकृत झाल्यामुळें सांध्यांच्या हाडांमधील कूर्चास्थि कुरतडून नष्ट होतात व सांधे आंखडतात. हें कीट मूत्रपिंड, मेंदूचा मागील भाग व पृष्ठवंशरज्जूचें आवरण या ठिकाणींहि जमतें.

*रोगाच्या स्वरूपाची उपपत्तिः*—वरील प्रकारचें कीट शरीरांतील सांध्यांत, इंद्रियांत व रक्तांत जमतें हें सांगितलेंच आहे. परंतु हें इतकें यूरिक ॲसिडचें कीट उत्पन्न कां होतें व तें स्वतः विषरूपी नसतांना अप्रत्यक्षपणें विषरूपी होऊन रोगोद्भव कसा करतें याविषयीं तज्ज्ञांनीं सयुक्तिक कल्पना बसविल्या आहेत. त्यापैकीं कांहीं पुढें दिल्या आहेत-शरीरांतील रचनांमध्यें न्यूक्लिओ प्रोटीड नामक नैट्रोजनयुक्त पदार्थ असतो. आहारामध्यें मांस वगैरे नैट्रोजनयुक्त पदार्थांचें पचन होतांना झँथिन हायपोझँथीन व एमिनो ॲसिड हे द्रवरूपी पदार्थ बनून त्यावर शरीरांतील पाचक द्रव्याचें पचनकार्य घडल्यानें त्यांचें यूरिक ॲसिड बनतें व त्यावर शरीरांतील थायमिनिक ॲसिडांत मिळून आणखी पचनक्रिया होऊन त्याचें द्रवरूपी रूपांतर होतें. व ज्याचें असें रूपांतर होत नाहीं त्या युरिक ॲसिडचें कीट जमूं लागतें. आतां पाचक रसाच्या कमतरतेमुळें असें होतें किंवा मूत्रपिंडामार्गें विषोत्सर्जन नीट न झाल्यामुळें कीट जमतें याविषयीं वाद चालू आहेत. पुष्कळांच्या मतें आंतड्यांमध्यें अपचनामुळें जें आत्मविषशोषण पचनक्रियेच्या वेळीं पुष्कळ रोग्याच्या आंतड्यांत चालू असतें त्यामुळें या दोन्ही कारणांस उत्तेजन मिळतें अगर या आत्मविषशोषणाच्या योगें शरीरांतील पोषण व उत्सर्जन यासंबंधीं आय व व्यय या क्रियेंत बिघाड होऊन या सोडियम बाय युरेटचें कीट जमण्यास प्रारंभ होतो. या कीटाच्या स्फटिकाचे कण सांधा वगैरे रचनेच्या ठिकाणीं खुपूं लागून त्या सांध्यांत दाह, सूज वगैरे उत्पन्न करून त्याच्या हालचाली व क्रियेंत व्यत्यय आणतात. हें सोडियम *बाय युरेट रक्तामध्यें मात्र द्रव स्थितींत असल्यामुळें सहजासहजीं* मूत्रपिंडावाटे त्याचें उत्सर्जन होऊं शकत नाहीं. आणि म्हणून ठराविक मर्यादेपेक्षां तें रक्तांत अधिक जमलें कीं त्याचा सांखा जमून तें कीट सांधे व इतर इंद्रियांत सांठूं लागतें. अमक्याच ठिकाणीं कीट कां जमतें याचें उत्तर असें आहे कीं, जेथें रक्तवाहिन्या कमी व जेथें जोम व शक्ति कमी झालेली असते व ज्या ठिकाणीं इजा व धक्के अधिक बसण्याचा संभव असतो त्या ठिकाणीं तें जमतें व हीं सर्व कारणें

पायाच्या आंगठयाच्या ठायीं संभवतात हें उघड आहे. याखेरीज असेंहि एका विद्वान शोधकाचें मत आहे कीं, कूर्चा, सांधे या ठिकाणीं सोडियम द्रव्य विपुल असल्यामुळें त्याशीं संयुक्त होऊन वाय युरेट सांठण्यास अनुकूल स्थिति असते व तशांत ओल, थंडी हीं कारणें असल्यानें या रोगास आरंभ होतो दुसरा शोधक म्हणतो कीं, या ठिकाणीं रचनाविकृति झाल्यामुळें तेथें वाय युरेट क्षार जमावा अशीच परिस्थिति आपोआप उत्पन्न होते.

रोगनिदानः—रात्रीच्या वेळेस सांधा ठणकून अशा तऱ्हेनें एकाएकीं रोगास प्रारंभ झाल्यानें या रोगाविषयीं संदेह उरत नाहींच. पण तो तीव्र संधिवात आहे असें वाटण्याचें कारण नाहीं, कारण त्याच्या सुजेमध्यें अशी फारसर लाली नसते व ताप आणि घाम फार अधिक प्रमाणांत असतो. अधिक सांधे धरले असले तरी या दोहोंमधील निदान करण्यास अडचण पडत नाहीं. हाताच्या मार्गे या रोगामुळें लाली व सूज येते त्यावेळीं हें गळूं आहे असा भास होण्याचा संभव आहे. पण गळवांतील विलविलीतपणा चाचपतां येतो व दुखण्याच्या आरंभाची हकीकत विचारल्यानें अशी चूक होणार नाहीं. इतर कांहीं ज्वराचे या रोगाशीं साम्य वाटण्याचा संभव आहे. रोगनिदान करण्यास ग्यारोडचा रक्तांतील असणारें युरिक ॲसिड ओळखण्याचा प्रयोग उपयोगी आहे. मात्र प्रयोग करण्याच्या अगोदर रोग्यानें पथ्याहारावर रहावें लागतें निरोगी व विन पथ्यावर राहणाराच्या रक्तांतहि युरिक ॲसिड असतें पण १०० क्यू. सें. रक्तामध्यें २ मिलिग्रामपेक्षां जर तें अधिक सांपडलें तर हा रोग आहे असें समजावें. हा रोग तीव्र स्वरूपांत नसल्यास या प्रयोगानें रोगनिदान सुकर होतें. अर्धशिशि, फुफ्फुसदाह व मूत्रपिंडदाह या रोगांत मात्र हा रोग नसूनहि युरेट क्षार ६ मिलिग्रामपर्यंतहि सांपडतात. दुसरा प्रयोग असा आहे कीं नैट्रोजनयुक्त ( ज्यास प्युरिन म्हणतात ) पदार्थ आहारात विशेषपणें आणल्यानें निरोगी माणसाच्या लघवींतील यूरिक ॲसिडचें प्रमाण जलद वाढतें, तसें या रोगानें ग्रस्त झालेल्या माणसाच्या लघवींत जलद वाढत नाहीं.

साध्यासाध्यविचारः—एकदां रोग स्थापित झाला कीं त्याचें बिऱ्हाड कायम होऊन तीव्र स्वरूपात तो वारंवार प्रगट व्हावयाचा हें ठरलेलेंच असतें; मात्र आहार, पथ्य वगैरेंची व्यवस्था ठेवल्यास उपयोग होतो. रोगास आरंभ उतार वयांत झाल्यास त्यामुळेंच अयुष्य कमी होतें इतकी त्याची पीडा होत नाहीं व तो रोग, पथ्यानें साध्य असतो. पण त्यामुळें मूत्रपिंडदाह, रक्तवाहिनीकाठिन्यरोग अर्धांगवायु यांपैकीं एखादा रोग जर फार सांधे धरले असतील तर होण्याचा संभव आहे. हा रोग तरुणपणीं झाल्यानें अगर तो आनुवंशिक असल्यास मात्र वार्धक्यदशेच्या अगोदरच बहुधां मृत्यु येतो.

रोगोपचारः—वरील यूरिक ॲसिडाच्या उत्पत्तीसंबंधीं कल्पना प्रमाणभूत धरल्यास तें हरयत्नानें शरीरांत जमूं न देणें व जें कीट जमलें असेल त्याचें उत्सर्जन करणें प्राप्त आहे. योग्य पथ्याहार, व्यायाम व कांहीं थोडीं औषधें यांच्या योगें हें साध्य आहे. वरील कल्पना ज्यांना मान्य नाहीं व ज्यांची रोगोत्पत्तीविषयीं दुसरी उपपत्ति आहे त्याच्या मतेंहि रोग्यास व्यायाम व पथ्याहार आवश्यक असतोच. अन्न थोडें खावें व त्यांत नैट्रोजन युक्त जड पदार्थ व शर्करायुक्त पदार्थ वर्ज्यावेत. नवी कल्पना अशी आहे कीं नैट्रोजनयुक्त आहारासहि हरकत नाहीं पण त्यापैकीं ज्यांत प्यूरीन, नामक सत्त्व असते तेवढे पदार्थ वर्जावे म्हणजे झालें. ( १ ) ज्यांत सत्व नाहीं असे पदार्थ–दूध, अंडीं, लोणी, खवा, पाव, तांदूळ, साबूदाणा, फळें, कोबी, कॉलीफ्लावर, सालीट, वगैरे भाज्या, ( २ ) ज्यांत तें माफक प्रमाणांत असतें असे पदार्थ कीं जे थोडे बहुत चालतातः—बटाटे, वाटाणे, ओटधान्य, घेवडे, ॲस्परेगस सालमन, मासे, कॉडमासा कॉबर्डाचें पिलूं, मटन, ( ३ ) फार प्रमाण असल्यामुळें वर्ज्य पदार्थ–मटनखेरीज बहुतेक मांस, काळजाचें ( यकृत ) मास, गोड पक्वान्नें वगैरे. या यादींत प्रत्येकाची आवडनिवड, संवय, धर्म समजुतींचा विचार करूनहि खाण्यास पुरेसे विविध पदार्थ सांपडतील. दारू वर्जावी हें उत्तम, परंतु उंची मद्यांत प्यूरिन नसतें; व बीयर, मद्य, चहा व काफी यांत तें माफक असतें.थोडी क्लारेट अगर शेरीमद्य अगर पुष्कळ पाणी घालून ब्रांडी अगर व्हिस्की त्यांची संवय जडलेल्या रोग्यांना चालतील. इतरांनीं त्यापासून अलिप्त असावें. साखरेऐवजीं दूध, चहा व काफींत साखरेचें सत्त्व ( डांबरी साखर म्हणजे सॅचुरेटेड शुगर)वापरावे. व्यायामामुळें अन्नपचन होऊन तें अंगीं लागतें म्हणून तो आवश्यक आहे. प्रातःस्नान करून त्या वेळीं खरखरीत रुमालानें अंग खूप चोळावें. वाफारा घेणें, अंग रगडणें, चेपणें हेंहि या रोगांत प्रशस्त होय.

औषधोपचारः–या रोगावरील औषधामध्यें अन्नपचनाचा व मलोत्सर्जनाचा गुण विशेष पाहिजे. पोटाशियम व लिथियम सायट्रेट व थायनिलिक ॲसिड हीं तीं औषधें होत. तीं यथाप्रमाणांत दिलीं म्हणजे रक्तांतील युरिक ॲसिडाशीं संयुक्त होऊन ते द्रवरूपी बनल्यानें त्याचें कीट जमणें टळतें. हीं औषधें रोज ३ वेळां घ्यावीं. रोग जुनाट झाल्यावर फार रेचकें घेणें, रक्त काढणें, असे शक्तिपात होणारे इलाज करूं नयेत. कॉलचिकम हें औषध थोड्या प्रमाणात द्यावें. तसेंच, ग्वायाकम, पोटॅशियम आयोडाइड, अमोनिया बेंझोएट, बेंझोइक ॲसिड, सोडासॅलिशिलेट, क्वीनीन हीं औषधें उपयुक्त आहेत. पोटांत सोडा लिथियम हे क्षारयुक्त रेचक व तसल्या झऱ्याचें पाणी, ताजी हवा व उत्तम वनश्रींमध्यें हवापालट करणें फायदेशीर आहे. तीव्र रोग असेल तेव्हां सुजलेला पाय घडवंचीवर अगर खुर्चीवर आडवा टेवावा.त्याला

वेदनाशामक बेलाडोना वगैरे तेल लावून कापसांत गुंडाळून ठेवावा. जळवा, शेक, पोटिंस, बर्फ हे उपचार करूं नयेत; दूध व पातळ पदार्थ फक्त द्यावेत. वृद्धांना मात्र अंमळ अधिक पदार्थ द्यावेत. कॉलचिकम ( १५–२५ थेंब ) हें औषध यावेळीं फार उपयोगी आहे व तें पोटॅशियम अगर लिथियम सैट्रेटशीं मिश्रित करून द्यावें. त्याच क्षाराचीं रेचक औषधें द्यावीं. अतिवेदना असल्यास मार्फिया टोंचून घालावा.

**पाद्रा**, ता लु का व गा व.—बडोदा संस्थानांतील बडोदा प्रांताचा पश्चिमेकडील एक तालुका. क्षेत्रफळ १९५ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ७६२५२. यांत एक मोठें गांव आहे. मुख्य गांव पाद्रा व ८२ खेडीं. हें बडोदा शहराहून १४ मैल आहे. लोकसंख्या ( १९११ ) ७८५३. कापडावर चित्रें छापण्याचें व इतर रंगाचीं कामें येथें होतात. मल्हारराव गायकवाडास येथें कांहीं काळपर्यंत बंदींत ठेवलें होतें.

**पानगल**—हैद्राबाद संस्थानांत महबूबनगरजिल्ह्याच्या नगर-कर्नूल तालुक्यामधील एक किल्ला. हा पानगल खेड्याच्या दक्षिणेस आहे. समुद्रसपाटीपासून उंची १८००फूट असून येथें वरंगळ व विजयानगरचे राजे व फिरोजशहा बहामनी यांमध्यें १४१७ सालीं लढाई झाली होती. १५१३ सालीं सुलतान महंमद कुलीकुत्बशहानें येथें विजयानगरच्या राजास जिंकिलें.

**पानरोटी**—मद्रास इलाख्यांतील दक्षिण अर्काट जिल्ह्याच्या कुड्डलूर तालुक्यामधील एक गांव. लोकसंख्या सुमारें पंधरा हजार आहे. येथें भुईमुगाचा मोठा व्यापार चालतो. जिल्ह्यांतील व्यापाराचें मुख्य ठिकाण हेंच होय. येथें विटा व सुंदर खेळणीं तयार करतात.

**पानविभ्रम व पानासक्ति** पा न वि भ्र म.—हा चित्तभ्रम अट्टल दारुबाजांना होतो व तो होण्याच्या अगोदर ते नेहमींपेक्षा फार दारु पीत असल्याची हकीकत ऐकू येते. अगर दारूची दोन तीन दिवस शिसारी येऊन अगर कांहीं अस्थिभंग वगैरे इजा फुप्फुसदाहादि मोठें दुखणें, मनास जबर धक्का या कारणांनीं ( विशेष अपरिमित मद्यपानाशिवाय ) हा भ्रम होतो.

लक्षणें:—प्रथम, झोंप नीट न लागणें, सारखी चळवळ, चिडखोरपणा व तोंडास चव नसणें हीं लक्षणें सुरू होऊन झोंपेंत भयंकर अगर वाईट साइट स्वप्नें पडतात व रोगी झोंपेंत एकसारखा बरळतो. सकाळीं रोगी थोडा बरा असतो पण रात्रीं चित्तभ्रम व बरळणें पुनःपुनः सुरू होतें.

त्या भ्रमाचा प्रकार येणेंप्रमाणें:—भोंवतालच्या वास्तविक अगर काल्पनिक व्यक्तीस उद्देशून रोगी एकसारखा बडबडत असतो. हें बोलणें त्याच्या गृहस्थितीविषयीं अगर कामधंद्याविषयीं असून त्यांत विषयांतर मनस्वी असतें. "हें काय बडबडतों" असें विचारल्यानें तो थोडा वेळ शुद्धीवर येतो पण पुनः भ्रम व बरळणें सुरू होतें. त्या भ्रांतींत अंथरुणांतून उठून निरगुट पांघरुणें तो अस्ताव्यस्त फेंकतो. असें करतांना कंपामुळें हातपाय लटपटतात व बोलतांना जीभ, ओंठ हीं अडखळतात. नंतर मन, नेत्र, कान वगैरे इंद्रियांस भ्रांति होऊन तेथें नसलेले किडे कुत्रीं, मांजरें, उंदीर, झुरळें इत्यादि प्राणी त्यांस डोळ्यापुढें दिसूं लागून त्याच्या अंगावर व पांघरुणांत तीं आहेत असा त्यास भ्रम पडतो. अंथरुण, पलंग, कपाटें, पडदे, उभीं असलेलीं माणसें यांच्या मागें व खालीं पुनःपुनः तो पहातो व सर्व तपासतो; व भोंवतालची मंडळी आपणांस मारणार अगर इजा करणार आहेत असें त्यास वाटतें. खोलींत असलेल्या निर्जीव वस्तू या त्यास जनावरें अगर प्राणी आहेत असें वाटूं लागतें व तो पराकाष्ठेचा संशयखोर बनून तेथें असणारांस मारहाणहि करतो. पण जर कोणी दरडावलें तर मात्र तो भिऊन गप्प बसतो व त्याचें मन चालू भ्रमापासून दुसऱ्या विषयाकडे वळविणें कठिण नसतें. त्याचा चेहरा लाल, पापण्या फुगीर, जिभेस फार कोरड बुरशी, अशक्त व फार जलद नाडी व १०२ ते १०३ अगर अधिकहि ज्वर हीं लक्षणें असतात. घाम येतो, लघवी थोडी व लाल आणि आल्ब्युमिनयुक्त असते. हाठिमज्जातंतूस कधीं कधीं दाह रोग होतो. भ्रमाच्या तिसऱ्या दिवशीं रात्रीं इतके दिवस नीट येत नसलेली झोंप आठ नऊ तास गाढ लागते व जागे झाल्यावर त्यास हुषारी वाटून भ्रम व कंप कमी होतो. व हळुं हळुं इतर बाबतींतहि सुधारणा होत जाते. असाध्यभ्रम असल्यास या सुधारणेऐवजीं चेहरा फिका होऊन गुंगी वाढते व झटके, मोठा ज्वर, फुप्फुसदाह, हृदयक्रिया बंद पडणें इत्यादि निमित्तामुळें रोगी मरतो.

उपचार:—खोलींत इतरांस जाण्याची बंदी करून तींत अंधार राहील असें करावें व तेथें गडबड करूं नये. दांडगाई बंद करण्यासाठीं पुरुष परिचारक असलेले बरे व त्यांनीं प्रसंगविशेषीं रोग्यास पट्ट्यांनीं खाटेस अगर पांघरुणांनीं मनगटें, घोटे, खांदे यांठिकाणीं बांधून ठेवल्यानें त्याचें उठून पळणें व लोकांस मारणें बंद होतें. बांधतेवेळीं श्वासासाठीं छाती पोट व खुलें ठेवावें. हत्यारें, विषारी औषधें उचलून न्यावींत, उडी मारूं नये म्हणून खिडक्या बंद कराव्या, दर दोन तीन तासांनीं त्यास थोडें गरम गरम दूध अगर मांसार्क अगर मांसक्वाथ देत जावा. इतर औषधें नकोत पण झोंप–गुंगी आणणारी क्लोरल, मार्फिया, सल्फोनल, अफू, ब्रोमाइड, पराल्डिहाइड हीं औषधें चांगलीं आहेत. मात्र तीं वरचेवर देऊन शरीरांत सांचून विषबाधा न व्हावी ¼ ग्रेन मार्फिया व $\frac{1}{100}$ ग्रेन हायोसीन टोंचून घालण्यास हायड्रोब्रोमाइड अगर १५।२० ग्रेन क्लोरल पोटामध्यें देण्यास हरकत नाहीं. त्यांतील एक कोणतेतरी दर सहा तासांनीं द्यावें. जर ग्लानीचा अतिरेक झाला तर उत्तेजक औषधें हवींतच व त्यासाठीं प्रथम ईथर अमोनिया यांचा उपयोग करून पाहून नाइलाज झाल्यास अल्कोहोल द्यावा. फक्त अशा वेळीं अल्कोहोल त्यास उपयोगी पडतो.

पा ना स क्ति —( दारूबाजपणा ) या विषयाचें विवेचन येथेंच करणें बरें. एखाद्या वेळींच फक्त खूप दारू प्याल्यानें मोठी गुंगी येते. कारण मद्यांत अल्कोहोल हें निशा आणणारें विष असतें. अतिमद्यपानाची संवय असलेले व नसलेले लोक कधीं कधीं मद्यपान करतात.परंतु कांहीं काळानें तें विष शरीराबाहेर निघून गेलें म्हणजे धुंदी उतरून तो मनुष्य सावध होतो. तथापि त्या मद्यपानाची कमाल झाली असल्यास बेशुद्धींतच हृदय व श्वसनक्रियांत शैथिल्य येऊन शेवटीं त्या बंद पडून प्राणोत्क्रमण होतें. त्याच्या अगोदर डोळयाची बाहुली विस्तृत व अचल अगर संकोचित होऊन बारीक नाडी,चिकट घाम व घशांत श्वासाची घरघर, व कधीं कधीं आंचके, झटके व वातामुळें बडबड हीं लक्षणें होतात. असा बेशुद्ध मनुष्य मद्यपानामुळें गुंगी येऊन पडला आहे किंवा घुरें अगर फेंपरें येऊन नंतरच्या बेशुद्धींत आहे किंवा मस्तकाच्या कवटीस भयंकर इजा होऊन अगर अफूच्या विषारामुळें किंवा मूत्रपिंडदाहरोगाच्या अन्त्यावस्थेंत युरिया क्षाराच्या विषारामुळें किंवा अतिथंड प्रदेशांत व देशांत केवळ अति थंडीनें गोठून पडला आहे याचा निर्णय डॉक्टरांच्या साहाय्यानें केला पाहिजे.

अतिमद्यपानाचा तात्कालिक परिणामः—हा सुरू होण्यास मनुष्याची प्रकृति व मद्याचें प्रमाण यांच्या मानानें कमी अधिक वेळ लागतो. पान केल्यानंतर आपण बहुत खुप आहों व आपणांस अत्यंत मजा वाटत आहे असें वेडें समाधान प्रथम मद्यप्यास वाटून त्याची बुद्धि व विचार यांस एकदम चलन मिळून त्यास तरतरी व हुपारी वाटते व म्हणून त्याचें बोलणें बेफिकीरीचें येऊन व संभाषणांत विशेष चातुर्य नसलें तरी भाषण ओरडत व अडखळत व जोरानें होतें. नंतर हळूच जसें दृष्टीपुढें धुकें यावें तसें ही सर्व तरतरी हुपारी असून बोलण्यांत मधून मधून खंड पडतो व दृष्टीस नीट दिसनासें होतें. आपलें डोकें ठिकाणावर नाहीं असें त्याचें त्यासच वाटतें व शरीराचा तोल संभाळण्यास पंचाईत पडूं लागते. भोंवतालच्या वस्तू त्यास दुहेरी अगर धांवतांना दिसतात. विचारशक्ति नष्ट होते व ज्या गुप्त गोष्टी बोलूं नयेत त्या तो बोलत सुटतो; गुप्तपणा त्याजपाशीं रहात नाहीं.नंतर त्याची दांडगाई व वेडेचार अगदींच उपहासास्पद होऊन केवळ पशूप्रमाणें तो वर्तन करतो. पण शेवटीं त्याचें त्यास भान नसून उलट आपणाभोंवतालच्या अखिल चराचर वस्तु मद्यपानानें धुंदींत असून मीच तेवढा सावध आहे असें त्यास वाटत असतें. आपलें वस्त्र, शरीर श्रेष्ठ-कनिष्ठ माणसें, लाजलज्जा, काळ, वेळ, स्थळ, घाण यांपैकीं कांहींच त्यास कळेनासें होऊन वेड्याप्रमाणें तो गुंगींत वर्तन करतो व शेवटीं गुंगीचा भर येऊन मुडद्यासारखा निचेष्ट असा गुंगून कांहीं वरेच तास तो पडतो. शुद्धीवर आल्यावर त्यास ज्वर आल्याप्रमाणें अंग मोडून येतें व ओकारी, भोंवळ, कानांत नाद, छाती धडधडणें, व भयंकर मस्तकशूळ हीं लक्षणें होऊन त्यास पराकाष्ठेची ग्लानि येते. या विषाचा प्रथम परिणाम बुद्धिस्थान जो मेंदु त्यावर होऊन नंतर तो पृष्ठवंश रज्जूवर हळू हळू होतो व पूर्ण लौल्य व बेशुद्धि सर्वांगास येते. फक्त रुधिराभिसरण व श्वसनक्रियासंयामक मज्जास्थानें पूर्ण नाहीं तरी बरींच शाबूत असतात. पण मद्यातिरेक झाल्यास त्यासहि लौल्य बाधा होऊन मरण येतें. हें विष शरीरांतून आपोआप निघून जाण्याची नैसर्गिक शक्ति असते. परंतु शुद्धीवर आल्यावर वर्णन केलेली ग्लानि, ओकारी, भोंवळ, मस्तकशूळ हीं लवकर जात नाहींत,तीं लक्षणें पुनःमद्य घेतलें म्हणजे चटकन नाहींशीं होतात हा चमत्कार अत्यंत घातुक होय. कारण यामुळें मद्यपानाची संवय सहज होऊन बसतेच बसते व या मद्यापानापासून धोका आहे. त्यामुळें थोड्या काळांत इच्छाशक्ति व विचारशक्ति आणि नीति यांना उत्तरोत्तर पूर्ण ऱ्हास होऊन मनुष्य पूर्ण पागल बनतो. त्यास मोह आवरत नाहीं, कारण परिणामी ग्लानि येऊन क्लेश होतात, तरी पुन पान केल्यानें चटकन् तें सर्व थांबतें हेंहि त्यास कळल्यामुळें तो व्यसनाच्या पूर्ण ताब्यांत सांपडतो. त्यास मद्यपानाचा पूर्ण त्याग करणें याशिवाय खरोखरी एकहि खरा उपाय नाहीं. कारण कांहीं उपाय म्हणून व त्यांत टोंचण्याची लस यांसारखे सुद्धां निघाले आहेत.

दीर्घकालपर्यंत व्यसनाधीन झाल्याचे परिणामः—या रोग्याची मज्जास्थानें, पचनशक्ति, यकृत, मूत्रपिंड हीं इंद्रियें जुनाट दाहामुळें बिघडतात व त्याच्या रक्तवाहिन्यांत काठिण्य येऊन त्या फुटून अनेक ठिकाणीं रोग उत्पन्न करतात. हा परिणाम बेशुद्धि येईपर्यंत दीर्घकाल मद्यपानानेंच येतो असें नसतें तर नेहमीं व बराचकाळ मद्यपानामुळें होतो. हात आडवे स्थिर धरण्यास अगर तोंडाबाहेर जीभ काढण्यास रोग्यास सांगितलें तर हातास अगर जिभेस कंप सुटतो, हें मज्जास्थानविकृतीचें पहिलें लक्षण होय. रोग्याची एकसारखी चळवळ, झोंप न लागणें, जागें झाल्यावर ग्लानि व त्यामुळें पुनः पान करण्याची प्रवृत्ति त्याखेरीज जीव खचित जातो असें वाटून मद्यपानाचा मोह न आवरणें हीं लक्षणें आरंभीं होतात. नंतर कांहीं अगदीं साधें व सोपें कृत्य करणें झालें अगर अल्पस्वल्प कांहीं काळपर्यंत मानसिक श्रम करावे लागले तरी एक प्याला घेतल्यावांचून त्यास कांहीं करतां येत नाहीं. कानांत घरघर, मस्तकांत भणभण, भोंवळ, कापरें, दचकणें, काजवे दिसणें व माथेशूळ हीं लक्षणें होऊन मज्जातंतुदाहाचें पूर्वचिन्ह म्हणून पायास कळा सुरू होतात, मन, बुद्धि, विचारनीति, इच्छाशक्ति, संयमशक्ति यांच्या ठायीं पराकाष्ठेचा कमकुवतपणा येऊन रोगी नादान व पाजी बनतो. मनाचा एकहि निश्चय करवत नाहीं, हातानें एकहि कृत्य घड होत नाहीं असें होऊन वऱ्यावाईट मार्गानें व हरप्रयत्नानें सदासर्वकाळीं मद्यपानानें शरीर व मन उत्तेजित केल्यावाचून मात्र तो सोडीत नाहीं. नंतर त्यास हातापायास कळा, फेंपरें, अर्धांग

अगर हात अगर पायांत लौल्य, सुनवाहिरेपणा, वेड, मतिभ्रंश, भ्रम, औदासिन्यरोग, खूळ, म्हातारचळ यांपैकीं कांहीं रोग होतात. मज्जाविकृतीच्या आरंभापासून पचनविकृतीमुळें बर्गे होतांच वांति होऊन फराळ, जेवण रोग्यास जात नाहीं, भूक मंद असते. जिभेस घुरशी, तोंडास घाण, डोळे फुगीर व चेहरा पिंवळट व गालावर व नाकावर लाली असें स्वरूप असतें. यकृत वाढतें, लघवींत अलब्यूमिन व कधीं शर्करा सांपडते, हृदय व रक्ताभिसरण बिघडतें. मद्यपी मनुष्यास मुलें होण्याच्या वयाची स्त्री असल्यास मद्यपानारंभीं जें शरीर स्थूल झालेलें असतें तें पुढें कृश होऊन हातापायाच्या काड्या व पोटाचा नगारा होतो. नंतर पोटांत पाणी जमून जलोदर होतें व पायांवर सूज येते; लघवी फार कमी येते, कोणताहि फुप्फुसदाह व विषमज्वरासारखा मोठा रोग झाला असतां मद्यपी लोक इतर रोग्यांप्रमाणें दुखण्यांत टिकाव धरीत नाहींत.

उपचार.—कोणत्याहि सबबी पुढें न करतां मद्यपान पूर्ण बंद झालेंच पाहिजे, तें बंद झाल्यास क्किनीन, सिंकोना, कुचला, कॉडलिव्हर तेल या पौष्टिक व पाचक औषधांनीं रोग्यास बरें वाटतें. झोपेसाठीं अफू व मार्फिया खेरीज इतर औषध द्यावें. पाण्यांत बसणें, वाफारे वगैरे जलचिकित्सा रोग्यानें बंधनें व पथ्य पाळल्यास व मद्यपान वर्ज्य केल्यास फार उपयोगी आहे.

**पानसे घराणें**—मूळपुरुष यशवंतराव पानसे यानें तीनशें स्वारांनिशीं शाहूच्या पदरीं नोकरी धरली. पुढें शाहूनें यशवंतरावास पेशव्यांच्या तैनातीस दिलें. पेशव्यांच्या दरबारी यानें चांगला लौकिक मिळविला. नानासाहेब पेशव्यांनीं सावनूरकर नवाबावर स्वारी केली त्यावेळीं यशवंतराव बरोबर होताच. त्या लढाईंत त्यानें अतिशयच शौर्यानें काम केलें. याचवेळींच त्याच्या पायास भाल्याची जखम झाली म्हणून श्रीमंतांनीं त्यास अंबारी व साहेबी नौबत दिली. यशवंतरावानंतर सरदारीचीं वस्त्रें त्याचा पुत्र भिवराव यास मिळालीं. राक्षसभुवनाच्या लढाईत यानें शौर्य दाखविलें. पुढें त्याची नेमणूक कोंकणांत बंड मोडण्यावर झाली. तिकडे त्यानें तोतयाचें पारिपत्य करून प्रांताचा बंदोबस्त केला. तळेगांव ( दाभाडे ) येथील इंग्रज मराठ्यांच्या लढाईत यानें इंग्रजांचा सेनापति इट्टर फाकडा ('कॅ. स्टुअर्ट') यास ठार मारिलें व तोफखान्याचा मारा करून इंग्रजी फौज मागें हटविली या त्याच्या शौर्याबद्दल त्यांस चौघडा, जरीपटका, नव्वद हजार रुपयांचा सरंजाम व सात गांवांचा मोकासा आणि किरकोळ जमीनी इनाम दिल्या. भिवरावानंतर त्याचा धाकटा भाऊ जयवंतराव यानें सरदारीचें काम केलें, रघुनाथराव दादा याजबरोबर गोहदच्या स्वारींत यानें पराक्रम दाखवून किल्ल्यावर बावटा रोवला. मंहीच्या लढाईत इंग्रजांवर चालून गेला असतां त्यास गोळी लागून जबर जखम झाली. आनंदमोगरी व बाबापीरचा घाट व रासदेर वगैरे ठिकाणच्या लढाईत जयवंतराव यानें बरेंच शौर्याचें काम केलें. तेव्हां श्रीमंतानीं तोफखान्याच्या मजमूचा दरख व सांगवी हा गांव जयवंतराव यास इनाम करून दिला. जयवंतरावाचा धाकटा भाऊ कृष्णराव कर्नाटकांत फौज व तोफखान्यासुद्धां प्रांताच्या बंदोबस्ताकरतां हमेश रहात असे. त्र्यंबकमामा पेठे यानीं हैदरावर स्वारी केली, तींत कृष्णरावहि होता. पुढें हिरेहाळच्या लढाईत कृष्णराव यास गोळी लागून तो सरकारकामीं ठार झाला. सबब त्याच्या वंशजांस पेशव्यांनीं गंगापूर हा गांव इनाम करून दिला नंतर कृष्णरावाचा कनिष्ठ बंधु सखारामपंत यानें बदामी किल्ल्यावरील हल्ल्यांत बरेंच शौर्य दाखविलें. खर्डें येथेंहि त्यानें उत्तम कामगिरी केली म्हणून सरकारांतून त्याला बरेंच इनाम दिलें.

पेशवाईनंतर सखारामपंत यांचे पुत्र यशवंतराव यांस कंपनीनें अकरा हजार रुपयांचा सरंजाम करून दिला. तो त्यांच्या हयातीपावेतों चालला. नंतर त्यांच्या पत्नी यमुनाबाई यांनीं वामनरावास दत्तक घेतलें. त्यांच्याकडे कंपनीनें फक्त हजार रुपयांचेंच इनामवृत्तीचें उत्पन्न मात्र ठेविलें. यशवंतरावाचा चवथा पुत्र म्हणजे सखारामपंताचा कनिष्ठ बंधू विश्वासराव यानें फत्तेगडच्या स्वारींत विनीवाले यास पुष्कळ मदत केली इंग्रज सेनापति गाडर याचा बंदोबस्त करण्याकरितां श्रीमंतांनीं विश्वनाथरावास पाठविलें. बारभाईंच्या मसलतींत विश्वासराव होता. महादजी शिंदे यांस देशी सरंजाम मिळवून देण्यांत विश्वासराव यानें पुष्कळ मदत केली. तेव्हां शिंद्यानीं नाणवली हा गांव त्यास इनाम करून दिला. पुरुषोत्तमराव ( विश्वासरावाचा धाकटा भाऊ ) पुणें मुक्कामीं राहून फौज, तोफखान्यासंबंधीं हिशोब वगैरे सर्व कारभार करीत असे.

गणपतराव विश्वनाथ हा बदामी, पट्टण वगैरे स्वारींत गेला होता. पुणें मुक्कामीं श्रीमंताजवळ तोफखान्याचा कारभार गणपतरावहि करीत असे. खर्ड्याच्या लढाईत गणपतराव होता. पुढें सखारामपंत परलोकवासी झाले. तेव्हां फौजेचा सरंजाम भिवराव याच्या नांवें होता, तो गणपत विश्वनाथ याच्या नांवें करून दिला. सांप्रत यांचा वंश सोनोरी व पुणें येथें नांदत आहे. [ वाड–कैफियती; पेशव्यांची बखर; खर्ड्याची बखर. ]

**पानिपत, तहशील**.—पंजाब इलाख्यांतील कर्नाळ जिल्ह्याचा एक दक्षिणेकडील तालुका. हा यमुनानदीच्या पश्चिमभागीं आहे. क्षेत्रफळ ४६० चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) १७३७९६. हींत एक गांव ( पानिपत ) व १७३ खेडीं आहेत. हा प्रदेश भरभराटीचा आहे. उंच भागास पश्चिम यमुनाकालव्याचें पाणी मिळतें.

गांव.—पानिपत तहशिलींतील एक गांव. लोकसंख्या सुमारें २५ हजार. हा गांव फार जुना आहे. युधिष्ठिरानें दुर्योधनाजवळून मागितलेल्या पांच गांवांपैकीं हा एक आहे असा महाभारतांत उल्लेख सांपडतो. मुसुलमान अमदानींत त्यास

सध्यांपेक्षां फार मोठें महत्त्व होतें. १३९० मध्यें पानिपतहून हुमायून तुघलखनें दिल्ली शहर लुटलें व मग त्याचा अबूबकरनें पराभव केला. पुढें ७ वर्षेपर्यंत पानिपत तातारखानाच्या ताब्यांत होतें. पण तैमूरलंगाच्या आगमनसमयीं त्यानें तें सोडून दिलें बहलोल लोदीचा पुत्र शिकंदरलोदी ह्याच्या ताब्यांत हा गांव होता. उत्तर हिंदुस्थानांतील सर्वांत मोठ्या तीन लढाया येथें झाल्याः ( १ )१५२५ सालीं बाबरनें इब्राहिम लोदीचा पराभव केला ( २ ) १५५६ त आदिलशहाचा हिंदु सेनापति हिमू ह्याचा अकबरानें पराभव केला व ( ३ ) १७६१सालीं अहमदशहानें मराठ्यांचा पराभव केला. शिवाय येथें १७६७ सालीं दिल्लीपति व शीख लोक ह्यांच्यामध्यें लढाई झाली. मराठ्यांनीं पानिपतचा परगणा जनरल पेरनला दिला होता. तो १८०३सालीं ब्रिटिशांकडे परत आला.

मुसुलमान साधु कलंदर ह्याची येथें समाधि आहे. पानिपत हें १८५४ पावेतों जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. म्युनिसिपालिटीची स्थापना १८६७ सालीं झाली. भांडीं, चांदीचा मुलामा दिलेले पेले वगैरे जिन्नस येथें तयार करतात. येथे कापसाचे जिन व प्रेस आहेत.

**पानिपतचें युद्ध**—पानिपतास झालेली तिसरी लढाई. या प्रसंगाची सविस्तर हकीकत अन्यत्र येणार असल्यानें येथें फक्त तिचा थोडासा सारांश दिला आहे.

**युद्धाचीं कारणें.**—अब्दालीनें १७५५ त नजीबखान यास दिल्लीच्या बादशाहीचा सेनापति केलें होतें, त्यास १७५७ त वजीर गाजीउद्दीनाच्या सांगण्यावरून राघोबादादा पेशवे यांनीं पदच्युत केलें. सरहिंद येथें असलेल्या अब्दालीच्या सुभेदारास गाजीच्याच सांगण्यावरून दादांनीं हांकलून पंजाब दुराण्यांच्या हातून सोडविला ( १७५८ ). गाजीच्याच सांगण्यावरून दत्ताजी शिंद्यानें नजीबखानावर रोहिलखंडांत स्वारी केली ( १७५९ ). मराठ्यांचें वर्चस्व दिल्लीदरबारांत होऊन, पातशहा काढणें अथवा ठेवणें हा त्यांच्या हातचा मळ झाला. त्यांनीं मनात आणल्यास मुसुलमानी पातशाही खालसा करण्याची हिंमत त्यांच्या अंगीं होती ही गोष्ट मुसुलमानांस असह्य झाली. या कारणांनीं ही लढाई किंवा भाऊगर्दी ( आगष्ट १७५९ ते मार्च १७६१ ) पानपत येथें झाली.

**अब्दाली येतो.**—अब्दालीच्या मनांत मराठ्यांचा दिल्ली येथील वचरष्मा काढून तेथें आपली सत्ता स्थापावी व मग संधि साधल्यास आपण दिल्लीचा पातशहा व्हावें असें होतें. पण मध्यंतरीं मराठ्यांचा कांटा होता. पातशहाची सावत्र आई मलिका अज्जमानी, नजीबखान व थोडाबहुत स्वतः पातशहा दुसरा अलमगीर ही मंडळी मराठ्यांच्या विरुद्ध होती. त्या सर्वांचें सूत्र पुष्कळ दिवसांपासून अब्दालीशीं होतें. दत्ताजीनें नजीबवर स्वारी केली तेव्हां त्यानें अब्दालीस तावडतोब बोलाविल्यावरून तो तत्काळ अटक ओलांडून आला. ही बातमी ऐकून दत्ताजीनें नजीबानें लाविलेलें तहाचें बोलणें मान्य केलें. इतक्यांत अलमगीरचा अब्दालीशीं चाललेला गुप्त पत्रव्यवहार सांपडल्यानें गाजीउद्दीनानें त्याचा वध केला व शहाअलमास गादीवर बसविलें. अब्दालीनें लाहोर घेऊन, यमुनेच्या कांठीं असलेल्या दत्ताजीच्या तोंडावर थोडी फौज ठेवून यमुना ओलांडली व मग आपली पिछाडी बळकट करून परत यमुना ओलांडून दिल्लीजवळ त्यानें दत्ताजीच्या बगलेवर एकाएकीं हल्ला केला. त्यांत दत्ताजी ठार होऊन त्याच्या सैन्यानें माघार घेतली ( जानेवारी, १७६० ). यावेळीं मल्हारराव होळकरास मदतीसाठीं निकडीचीं अनेक बोलावणीं गेलीं असतां, तो गेला नाहीं. या पानिपत प्रकरणांत मल्हारजीनें अथपासून इतीपर्यंत अंग चोरून काम केलें आहे. दत्ताजीचा पराभव झाल्यावर मग मल्हारजीनें अब्दालीची रसद मारण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत त्याला अब्दालीनें पिटाळून लाविलें.

**भाऊसाहेब निघतात.**—शिंदेहोळकरांच्या पराभवाची बातमी ऐकल्याबरोबर पेशव्यांनीं भाऊसाहेब यांस उदगीरहून पटदूर येथें परभारें बोलाविलें. त्यापूर्वी त्यांनीं उद्गीरच्या लढाईंत निजामाचा पुरा पराभव केला होता. पटदुरास पेशवे पूर्वीच आले होते. एक आठवडा वाटाघाट होऊन भाऊसाहेब हे विश्वासरावासह अब्दालीवर निघाले ( मार्च ). त्यांच्या बरोबर मेहेंदळे, समशेरबहादर, विंचूरकर पुरंदरे वगैरे सरदार होते. शिवाय चंबळा ( चमेली ) ओलांडण्यापूर्वीच होळकर, शिंदे, गायकवाड, पवार, बुंदेले वगैरे सरदार त्यांना मिळाले. रजपूत राजे मात्र त्यांना मिळाले नाहींत; याचें कारण दोन वर्षांपूर्वी राघोबादादांनीं व जयाप्पा शिंद्यानें त्यांचा पुरा पराभव केला होता. हें शल्य त्यांच्या मनांत होतें. साऱ्या पानिपतच्या युद्धांत या रजपुतांनीं मराठ्यांना एकदांहि मदत केली नाहीं किंवा रसदहि पुरविली नाहीं. सुरजमल्ल जाट हा मल्हारजीमुळें भाऊसाहेबांना मिळाला. या दोघांचें म्हणणें, गनिमीकाव्यानें लढून अब्दालीला माघार घ्यावयास भाग पाडावें असें होतें. परंतु इब्राहिमखान गारद्याचें म्हणणें दुराणीशीं समोरासमोर लढाई द्यावी असें होतें. त्यांची एकवाक्यता भाऊसाहेबांना करतां आली नाहीं. शिवाय नुकताच उद्गीर येथें इब्राहिमखानाच्या तोफखान्यामुळें व कवाइती पलटणामुळें त्यांना जय मिळाल्यानें त्याचा कल खानाकडेच झुकला. त्यांनीं दिल्लीस येऊन व तोफांचा मारा करून किल्ला घेतला. नंतर पावसाळा आल्यानें भाऊसाहेबांनीं आपली छावणी दिल्लीस केली. परंतु पुढें पुढें रसद मिळेना व जवळचा पैकाहि संपला. तेव्हां बादशाही दरबारच्या दिवाणखान्याचें रुपेरी छत त्यांनीं काढून त्याचें नाणें पाडिलें. यामुळें सुरजमल्ल रागाऊन निघून गेला; त्याला फोडण्याचा प्रयत्न अब्दालीनें केल्याचा उल्लेख आहे.

डा व पें च.—भाऊसाहेब हे दिल्लीस असतां, अब्दाली हा गंगाकाठीं अनूपशहर येथें होता. त्यानें नजीबाच्या मार्फत सुजाउद्दौला यास आपल्याकडे वळवून घेतलें. मराठ्यांनीं आपल्या बापाच्या विरुद्ध मार्गें कारवाई केल्याचा द्वेश सुजाच्या मनांत होता. परंतु उघडपणें मराठ्यांशीं वैर करण्याची त्याची हिंमत नसल्यानें अगदीं शेवटच्या दिवसापर्यंत त्यानें अब्दाली व मराठे यांच्यांत तडजोड घडवून आणण्याचा आव घालण्याचा व मराठ्यांनां नादीं लावण्याचा धूर्तपणें प्रयत्न चालविला होता. त्याला फोडण्याचा-निदान तटस्थ ठेवण्याचा-प्रयत्न भाऊसाहेबानीं केला; परंतु तो फुकट गेला. एवढेंच नाहीं तर शहाआलम दिल्लीस नसल्यानें भाऊसाहेबानीं जवानबख्त यास पातशहा करून सुजास वजीर केलें; तरीहि सुजा वळला नाहीं. नंतर भाऊसाहेबानीं नारो शंकरास दिल्लीस ठेवून स्वतः कुंजपुरा घेतला. हें समजतांच अब्दालीनें अनुपशहराहून निघून व एकीकडे भाऊसाहेबांनां तहाच्या बोलण्यांत अडकावून,मोठी खटपट करून यमुना ओलांडली(आक्टोबर). दुसऱ्या दिवशीं दोन्ही सैन्यांच्या बिनीची चकमक झाली. याचवेळींच अब्दालीवर चढाई करावी असा इब्राहिमखानाचा सल्ला मल्हारजीनें मोडून काढला. तेव्हां दक्षिणेस हटून भाऊसाहेबानीं पानिपत येथें छावणी करून, तिच्या भोंवतीं खंदक खोदला व मोर्चेबंदी केली. अब्दालीनेंहि मराठ्यांच्या समोर,पानिपत ते दिल्ली या रस्त्याच्या मध्यें छावणी टाकून मोर्चेबंदी केली व मराठ्यांचा दिल्लीचा मार्ग रोखला.त्याचें जवळ जवळ १लाख, ३० हजार खडें सैन्य व तोफखाना होता; शिवाय इतकेच बाजारबुणगे होते. मराठ्यांचें सैन्य तोफखान्यासह सारें ७० हजार म्हणजे अब्दालीच्या निम्म्याइतकें होतें.

अ खे र चा प्र य त्न.—अब्दालीची रसद गोविंदपंत बुंदेले नेहमीं लुटीत असे, पण एकदां गैरसावध असतां अब्दालीच्या एका सरदारानें त्याला ठार केलें. त्यामुळें तहाची आशा संपली. इतक्यांत दिल्लीहून खजिना व रसद घेऊन येणारी मराठ्यांची टोळी चुकून अब्दालीच्याच गोटांत गेल्यानें, त्याचा आयता फायदा झाला. मराठ्यांकडे अन्नाची टंचाई पडूं लागली. तेव्हां एके दिवशीं मल्हारजीनें अब्दालीच्या डाव्या बगलेवर अचानक हल्ला करून त्याची फळी फोडली ( २६ नोव्हें. ) त्यानंतर दोहों सैन्यांत किरकोळ चकमकी होत. पुढें २२ दिसेंबरला शहावली ( अब्दालीचा वजीर ) हा बाहेर पडला असतां, मराठ्यांनीं एकदम त्याच्यावर हल्ला केला. तेव्हां अब्दालीचीहि फौज त्याच्या मदतीस आली; परंतु मराठ्यांनीं तिला पिटाळून लाविली. मात्र या लढाईंत बळवंतराव मेहेंदळे पडले. अब्दालीस,सुजा व नजीब यांनीं मराठ्यांवर एकदम चढाई करण्यास आग्रह केला. पण त्यानें अन्नाच्या टंचाईनें मराठे गार बनल्यावरच चढाई करण्याचें ठरविलें. त्याच्या अजमासाप्रमाणें पुष्कळ दिवस उपास काढून मराठे कंटाळले व अखेर त्याच्या विनंतीवरून भाऊसाहेबांनीं १४ जानेवारी १७६१ रोजीं पहाटे अब्दालीवर सर्व सैन्यानिशीं चाल केली. प्रथम तोफांची सरबत्ती होऊन मग हातघाईची लढाई सुरू झाली. दुपारपर्यंत इब्राहिमखानाच्या अर्ध्या पलटणी मारल्या गेल्या. पण त्यानें समोरच्या ८ हजार रोहिल्यांस कापून आपल्या बाजूला लढाई जिंकली.भाऊसाहेब,विश्वासराव व पवार हे मध्यें होते; त्यांनीं अब्दालीच्या करमण्यांतील वजीराची फळी फोडली. तेव्हां अब्दालीनें (हा मागें राहून युद्धाचें निरीक्षण करीत होता) दहा हजार स्वार वजीराच्या मदतीस धाडले. अब्दालीच्या डाव्या(नजीब व सुजा यांच्या)बगलेनें समोर होळकर व समशेर-बहाद्दरावर हल्ले केले.परंतु त्यांनीं ते परतविले.या दिवशीं मराठ्यांची सर्व फौज ( मल्हाररावाशिवाय ) जिवावर उदार होऊन लढली. आतांपर्यंत मराठ्यांचाच जय होता. इतक्यांत सायंकाळच्या सुमारास दुर्दैवानें विश्वासरावानां गोळी लागली व ते ठार झाले. तें पाहून मल्हारजीस बायकामुलांनां परत नेण्याचें काम सांगून भाऊसाहेब हत्तीवरून उतरून घोड्यावर बसून गर्दींत शिरले. दोन्ही खाविंद दिसेनासे झाल्यानें मराठी फौजेचा धीर सुटला व तिनें पाय मागें घेतला. त्यामुळें सर्व पारडें फिरलें. अब्दालीनें एकदम हल्ले करून मराठ्यांचा नाश केला. मल्हारजी बरोबरच गायकवाड विंचूरकर,राजेबहाद्दर हे पळाले.जनकोजी शिंदे,समशेरबहाद्दर व इब्राहिमखान हे जखमी होऊन हातीं लागल्यावर गिलच्यानीं त्यांचा खून केला. यशवंतराव पवार व भाऊसाहेब हे रणांगणांत पडले. मराठ्यांपैकीं फक्त $\frac{1}{4}$ लोक परत आले. नानासाहेब हे भाऊसाहेबांची निकडीची बोलावणीं आल्यावरून फौजेसह त्यांच्या मदतीस निघाले होते; परंतु वाटेंतच त्यानां हें दुःखकारक वर्तमान समजलें. त्या,दुःखानें ते पुण्यास परत आल्यावर थोड्याच दिवसांनीं वारले. तिकडे अब्दालीनें शहाआलमास गादीवर बसवून, सुजास वजीर व नजीबास सेनापति करून तो स्वदेशीं परत गेला. त्याचें या मोहिमेंत इतकें नुकसान झालें कीं त्यानंतर तो ११वर्षें जगला असताहि त्यानें पुन्हां हिंदुस्थानास फारसा त्रास दिला नाहीं. [ पानिपतची, भाऊसाहेबांची, पेशव्यांची व काशिराजाची बखर. ]

पापनाशम्—मद्रास इलाख्यांतील तिनेवेल्ली जिल्ह्याच्या अम्बासमुद्रम् तालुक्यामधील एक यात्रेचें ठिकाण. हें अम्बासमुद्रम् गांवापासून ६ मैलांवर आहे. येथें ताम्रपर्णी नदीचा धबधबा आहे हा धबधब्यास लोक पवित्र मानतात व दरवर्षी पुनीत होण्याकरितां हजारों यात्रेकरू लोटतात. येथें शंकराचें देवालय असून पांच छत्र्या आहेत.

पाँपी—एक प्राचीन रोम शहर. हें व्हेसुवियस पर्वताच्या अगदीं पायथ्याशीं आहे. याचा खिस्तपूर्व ७९ पर्यंतचा इतिहास नीटसा लागत नाहीं. इ. सनाच्या पहिल्या शतकांत पाँपी शहर फार ऊर्जित दशेला आलें. त्यावेळीं येथें रोमनसाम्राज्यांतील श्रीमान लोक मौजेसाठीं व चैनीसाठीं येऊन राहत असत. त्यांची चैन व त्याबरोबरचं त्यांची

अनीति यांचा त्याकाळीं इतका अतिरेक झाला होता कीं, थोड्याच अवकाशांत ज्वालामुखीच्या सान्निध्यामुळें जें संकट आलें तें केवळ या शहरांतील लोकांस शिक्षा करण्याकरितांच आलें, असें तिकडील लोक मानीत.

इ. स. ६३ मध्यें या शहरास धरणीकंपाचे धक्के बसून बहुतेक मोठमोठ्या सार्वजनिक इमारती जमीनदोस्त झाल्या त्या मग पुन्हां बांधाव्या लागल्या. इ. स. ७९ मध्यें व्हेसुवियस पर्वताचा स्फोट होऊन, सबंध पाँपी शहर या पर्वतांतून निघणाऱ्या राखेंत व भूगर्भरसांत पुरलें गेलें. मध्ययुगांत या शहरची जागा लोक विसरले. १७६३ सालीं हें शहर पद्धतशीर रीतीनें खणून काढण्याचा प्रयत्न सुरू झाला. अलीकडे कोट्यावधी रुपये खर्च करून या शहराच्या बहुतेक भागावरील माती काढून टाकली असून राहिलेला भाग खुला करण्याचे काम चालू आहे.

या शहराची रचना बहुतेक पौरस्त्य शहराप्रमाणेंच आहे. फोरम ( बाजारपेठ व चौक ) हें या शहरांतील व्यापार व इतर हालचालींचें केंद्रस्थान होतें. ही जागा मोठमोठ्या राजांच्या आणि लोकांच्या पुतळ्यांनीं सजवून टाकली होती. ग्रीक आणि रोमनशिल्प यांमधील अशी येथील इमारतींच्या बांधणीची पद्धत आहे.

या शहरांतील जुन्या काळचे लोक मूर्तिपूजक असल्यामुळें प्रत्येक घरांत एकेक देवघर असलेलें आढळतें. एका जुन्या स्मशानांत, वर प्रेतें ठेवून तीं जाळण्यासाठीं पक्क्या बांधून काढलेल्या जागा आहेत. कांहीं ठिकाणीं प्रेतें पुरून त्यांवर आपल्या इकडील छत्र्यांसारखे कांहीं डेरेहि बांधलेले आहेत. घराखालीं दारू ठेवण्याचीं भुयारें आहेत. त्यांवरून तेव्हां दारूचा खप फार असावा असें ठरतें. तसेंच पूर्वीचा फोरम ( लोकसभेची जागा ) व आगडाची जागा पहावयास मिळतात. आगडाच्या जागेंत पूर्वकालीन रोमन लोक स्वतःच्या चैनीसाठीं गुलाम म्हणून पाळलेल्या लोकांस हत्यारें वगैरे देऊन कोणा एकाचा तरी जीव जाईपर्यंत बक्षिसाच्या आशेनें एकमेकांशीं लढावयास लावीत व आपण दूर अंतरावरून मौज पहात. येथें इ. सनाच्या सुरुवातीस लॅटिन व ऑस्कन या दोन निरनिराळ्या भाषा चालत असाव्यात.

**पापीरस**—ह्या वेतासारख्या झाडाची लागवड ईजिप्तमध्यें नाईल नदीच्या दुआबांत प्राचीन काळीं फार करीत असत. याचा उपयोग विशेषतः लिहिण्याचा कागद करण्याकडे व चटया, दोऱ्या, कापड, इतर व कामांकडे होत असे. यांतील गीर हिरवा किंवा शिजवून खात असत. झाडाच्या बुंध्याच्या बोटी करीत व इतर लांकडाचा उपयोग जळण म्हणून करीत. पापीरस कागदाचा लिहिण्याकडे उपयोग ग्रीक व रोमन लोकहि करीत असत. सर्वांत प्राचीन पापीरस कागद आस्सा राजाच्या कारकीर्दीची ( खि पू. ३५८०–३५३६ ) हकीकत लिहिलेला हल्लीं उपलब्ध आहे. हे जुने नमुने कबरींत पुरून ठेवलेल्या ममी ( थडग्या ) मध्यें सांपडतात. प्राचीन काळापासून मध्ययुगापर्यंतचे ग्रीक, लॅटिन, अरबी वगैरे भाषांतले पापीरस कागदावरचे लेखहि हल्लीं पुष्कळ उपलब्ध आहेत.

**पापुअन लोक**—मॅलेनेशियांतील न्यू गिनी व इतर कांहीं बेटांत राहणारे लोक. हे शरीरानें नीग्रॉइड लोकांच्या नमुन्याचे असून पूर्व आफ्रिकेंतील लोकांशीं त्यांचें साम्य असल्यामुळें त्यांनां 'पौरस्त्य नीग्रो' असेंहि म्हणतात. हे लोक लहान लहान टोळ्या करून राहतात व एका टोळींतील लोक बहुतेक एकमेकांचे नातलग असतात. यांच्यांत बहुभार्यात्व रूढ आहे. यांच्या धार्मिक व सामाजिक चालीरीती इतर रानटी लोकांप्रमाणेंच आहेत. ते डुकरें व इतर लहान पशु, पक्षी व मासे खातात व शाकाहारहि करतात. पापुअन स्त्रिया अंगावर कपडे व शिंपा-रांचमण्याचे दागिने वरेच वापरतात. हे लोक लहान लहान होड्या व जहाजें उत्तम बांधतात. ते गाण्यानाचण्याचेहि फार शोकी आहेत. हे आपलीं घरें किनाऱ्यावर किंवा टेंकडीच्या बाजूवर ओटा ( डबरी जोतें ) करून त्यावर बांधतात. कांहीं घरें ५०० ते ७०० फूट लांब असतात व त्यांत अनेक कुटुंबें राहतात. एकेका कुटुंबाचें एकेक पृथक् घर अशीं घरें प्रत्येकीं ६० ते ७० फूट लांबीचीं असतात. कांहीं घरें दुमजली असतात. हे लोक धनुष्यबाण, सुरे, भाले, लांकडी ढाल वगैरे हत्यारें वापरतात. पापुअन लोकांना लोखंडाची माहिती नसल्यामुळें त्यांचीं हत्यारें पूर्वी दगडाचीं असत. लढाईच्या वेळीं हे लोक अंगाला रंग लावतात व कित्येक लोक तोंडाला भयंकर दिसणारे मुखवटेहि बसवतात व शंख वाजवून सैन्याला इशारत देतात. पापुअन लोकांच्या भाषा पुष्कळ आहेत; कारण या लोकांच्या अनेक टोळ्या परस्परांतील वैरभावामुळें एकमेकांत न मिसळतां राहतात. एका बेटांतील लोकांमध्यें सुद्धां अनेक भाषा असतात.

**पांबन**—मद्रास इलाख्यांतील मदुरा जिल्ह्यांत असलेल्या रामनाड इस्टेटींत हें द्वीप आहे. इस्टेटीचा हा एक भाग आहे. पश्चिमेस मदुरा जिल्हा व पूर्वेस सिंहलद्वीप यांच्या मध्यें हें बेट वसलेलें आहे; उत्तरेस पालकची सामुद्रधुनी असून दक्षिणेस मानारचें आखात आहे. लांबी व रुंदी अनुक्रमें ११ व ६ मैल आहे. पूर्वार्ध निवळ वालुकामय असून त्यावर रामाचा सेतु आहे, मुख्य गांव-रामेश्वर; हा गांव प्राचीन देवालयाकरितां प्रसिद्ध आहे. पांबन हें मदुरा जिल्ह्यांतील एक मोठें महत्त्वाचें बंदर आहे. लोकसंख्या सुमारें तीन हजार. येथें एक उंच दीपगृह आहे. मदुरा ते मंडपम् आगगाडी झाल्यापासून येथें येणाऱ्या यात्रेकरूंची संख्या बरीच वाढली आहे. हवा जरा थंडच आहे. डच लोकांनीं बांधलेल्या किल्ल्याचा जीर्णावशेष येथें अजूनहि दृष्टीस पडतो. येथें पूर्वी संयोगभूमि असावी असा अंदाज निघतो. येथील खाडी

म्हणून तीतूनच (सिंव्हलद्वीपाला वळसा घालून नेण्याच्या ऐवजी) बोटी नेतात.

**पामरस्टन, लॉर्ड** (१७८४—१८६५).—हेनरी जॉन टेंपल तिसरा व्हायकौंट. एक सुप्रसिद्ध इंग्रज मुत्सद्दी. याचें घराणें इंग्लंडमध्यें फार प्रसिद्ध होतें. स्वतः पामरस्टन हा लहानपणापासूनच मोठा बुद्धिमान, मेहनती व उमद्या स्वभावाचा असे. आपल्या वयाच्या चोविसाव्या वर्षाच्या सुमारास तो न्यूटॉउन परगण्यातर्फे पार्लमेंटमध्यें निवडून आला व थोडक्याच दिवसांत त्याला जूनियर लॉर्ड करण्यांत आलें. १८०९ साली त्यानें युद्धखात्याच्या सेक्रेटरीची जागा पत्करली. या जागेवर तो जवळ जवळ २० वर्षें होता तो टोरी पक्षाचा होता. लोकसत्ताक राज्यपद्धति त्याला पसंत नव्हती. १८२९ सालापासून मात्र त्यानें आपलें लक्ष्य परराष्ट्रीय प्रश्नांकडे वळविलें. १८३० सालीं लॉर्ड ग्रेनें त्याला परराष्ट्रीय खात्यावरील मंत्री नेमिलें व या वेळेपासून सुमारें वीस वर्षेपर्यंत या खात्यावर पामरस्टननें अनियंत्रित सत्ता गाजविली म्हटलें तरी चालेल.

१८३० सालच्या फ्रेंच क्रांतीमुळें सर्व यूरोपभर बेदिली माजून राहिली होती. अशा स्थितींतहि पामरस्टननें अनेक राजकारणें करून यूरोपमध्यें शांतता प्रस्थापित केली. पूर्व यूरोपमधील राजकारणामध्यें पामरस्टन हा प्रथमपासूनच मोठ्या आस्थेनें भाग घेत असे ग्रीक वॉर ऑफ इंडिपेंडन्स मध्यें त्यानें ग्रीकांच्या बाजूनें भाग घेतला होता. पण १८३० सालापासून तुर्की साम्राज्य स्थापन होऊन तें नांदणें अत्यंत आवश्यक आहे असें त्याचें मत बनलें. तेव्हां त्यानें फ्रान्सखेरीज सर्व यूरोपीय राष्ट्रांशीं खलबत करून तुर्की साम्राज्याचा बचाव करण्याची कल्पना तडीस नेली.

इ. सन १८४१ ते १८४६ सालपर्यंत पामरस्टन हा अधिकाराच्या जागेवर नव्हता. १८४६ साली व्हिगपक्षाचें प्रधानमंडळ अधिकारारूढ होतांच पामरस्टन हा पुन्हां परराष्ट्रीय खात्याचा मंत्री झाला. त्यानें तत्कालीन इटली-हंगेरींतील क्रांतिकारकांना जाहीर रीतीनें पाठबळ दिलें त्यामुळें यूरोपियन राष्ट्रांनां ब्रिटनबद्दल संशयित वृत्ति झाली. अर्थात पार्लमेंटमध्यें पामरस्टनविरुद्ध फारच खळबळ उडाली. पामरस्टनच्या अनियंत्रित कारभाराचा खुद्द राणीलाहि वीट आलेला होता, म्हणून शेवटीं याच्या हातून परराष्ट्रीय खात्याचा अधिकार काढून घेण्यांत आला. पुन्हां १८५२ सालीं त्याला गृहमंत्र्याची जागा मिळाली. पुढें क्रिमियन युद्धाच्या वेळीं पार्लमेंटमध्यें फूट पडल्यामुळें नवी निवडणूक होण्याचें ठरलें. त्यावेळीं पामरस्टन हा मुख्य प्रधान झाला. या जागेवर असतांना त्याच्या सुदैवानें पुष्कळ महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या व त्यांत त्याला यश आल्यामुळें त्याची लोकप्रियता वृद्धिंगत झाली. मुख्य प्रधानाच्या जागेवर असतांना पामरस्टननें शांततेचेंच धोरण अवलंबिलें होतें. त्यानें आपल्या सार्वजनिक कारभारांत अनियंत्रित सत्ता जरी गाजविली होती तरी तो जात्या फार उदात्त विचाराचा असे. [ लॉर्ड डालिंग—लाइफ ऑफ पामरस्टन (दोन भाग १८७०); सँडर्स—लाईफ ऑफ पामरस्टन (१८८८). ]

**पामिदि**—मद्रास इलाख्यांतील अनंतपूर जिल्ह्याच्या गुत्ती तालुक्यामधील एक गांव हें पेन्नर नदीच्या उत्तर तीरावर असून गुत्ती गांवाच्या दक्षिणेस १४ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें दहा हजार आहे. येथें मराठे लोकांनीं वसाहत केली आहे. हे लोक जातीनें रंगारी आहेत. पामिदीचें रंगीत कापड प्रसिद्ध आहे.

**पामीर**—मध्य आशियांतील हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीच्या लगतचा डोंगराळ मुलुख. या अतिशय मोठ्या पठाराला 'जगाचें छप्पर' असें म्हणतात. यापासून बहुतेक पर्वतांचा उगम होतो. इ. स. १८८५ सालानंतर, या मुलुखासंबंधीं, रशियन व हिंदुस्थान सरकार, व त्याचप्रमाणें इतर संशोधक यांनीं बरेच भूगोलविषयक शोध लावले आहेत. अनेकवेळां यावर मोहिमा पाठविण्यांत आल्या. वरील शोधांमुळें या मुलुखासंबंधींची बरीच भूगोलविषयक माहिती आजमितीस उपलब्ध आहे.

मुलुखाचा मुख्य भाग म्हणजे सारिकोल पर्वत हा होय. या पर्वतावरच हिमालयाच्या उत्तरेकडे, एक सर्वांत उंच असें शिखर ( मझराघ अटा ) आहे. या पर्वतामुळें पामीर मुलुखाचे दोन भाग होतात. पश्चिमेकडील पामीरच्या भागाचे (१) मोठें पामीर, (२) लहान पामीर, (३) पामीर-इ वाखन, (४) अलिचर, (५) सरेझ पामीर असे पांच पोटविभाग करतां येतील. अलिचरच्या ईशान्येस, रंगकुल व कारा-कुल पामीर हीं आहेत.

सारिकोल पर्वताच्या पूर्व बाजूस टकडंबस पामीर आहे. हा भाग, चीन व कंजुत अथवा हंझ यांच्या सरहद्दीवर आहे. येथें दोन घाट ( वेविक व वाकझीर ) नमूद करण्यासारखे आहेत. पूर्वेकडे दुसरें ( मरियम ) पामीर आहे. पामीर भागांत प्रसिद्ध अशीं सरोवरें म्हणजे व्हिक्टोरिया, चकमकटिन, रंग—कुल, कारा—कुल वगैरे आहेत. एकंदर भाग १५० मैल लांब व १५० मैल रुंदीचा असून त्यापैकीं एकदशांश भाग अरण्यमय व बाकीचा सर्व डोंगराळ आहे. येथील फिरस्ते रानटी लोक ( किरगिझ ) हे सुनी पंथाचे मुसुलमान आहेत.

अलिचर, रंग—कुल, काराकुल, आणि सरेझ पामीर हे सर्व भाग रशियाच्या राज्यांत मोडले जातात. या भागांत एकंदर लोकवस्ती सरासरी १५०० आहे. मरियम पामीर चीनच्या राज्यांतील समजलें जातें. वर्षांतून सहा महिनेपर्यंत पामीर बहुतेक बर्फाच्छादित असतें; त्याचप्रमाणें, सरोवरें गोठलेलीं असतात. व या वेळीं घाटांत प्रवास करणें अशक्यच असतें.

आर्य लोक याच पर्वतातून ( हिंदूकुश प्रमाणें ) वायव्येकडून पंजाबांत आले. कनिष्काच्या राज्यांत हा पर्वत येत

होता ह्युएनत्संगनें हा इ. स. ६४५ मध्यें ओलांडला व वंग ह्युएनत्सी यानें ६५७ त ओलांडला. पुढें ७१३ च्या सुमारास चीनची सरहद्द येथपर्यंत येऊन भिडली होती. [ स्मिथ-अर्लि हि. इं. ]

**पायथॅगोरस** ( ख्रि. पू. ५८२-५०० )—हा ग्रीक तत्त्ववेत्ता सॅमॉस येथें जन्मला इटलीमध्यें क्रोटोना या गांवीं त्यानें तत्त्वज्ञान व धर्म या विषयाची चर्चा करणारी एक संस्था स्थापन केली. हा मेटापाटूम येथें मरण पावला.

पा य थॅ गो रे स चीं म तें.—तत्त्ववेत्ता या दृष्टीनें पाहूं गेलें असता यास ग्रीस देशांतील तत्त्ववेत्त्यांमध्यें बराच वरचा नंबर द्यावा लागेल. याच्या मतापैकीं मुख्य म्हणजे पुनर्जन्म, नीतिनियम व संख्यावाद हीं होत.

( १ ) पुनर्जन्मः—जगातील सर्व वस्तूंचा परस्परसंबंध आहे, म्हणूनच हिंसा हें महापातक आहे, व ज्या अर्थी परस्परसंबंध आहे, त्या अर्थी आत्मा एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत जात असला पाहिजे. अतएव जन्ममरणाचें एक चक्र आहे असेंहि गृहीत धरण्यास हरकत नाहीं. या चक्रास आपण संसारचक्र म्हणूं. हें संसारचक्र दुःखमय आहे, तरी या चक्रांत गिरक्या खात बसण्यापेक्षां यातून मुक्तता करून घेतली पाहिजे. अशा प्रकारचे पुनर्जन्मासंबंधीं त्याचे विचार होते. वरील विचारात व हिंदुधर्माच्या मतांत बरेंच साम्य आहे ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे.

( २ ) नीतिनियमः—मानवी आयुष्क्रमाचे ३ प्रकार आहेत. जग ही एक जत्रा आहे अशी कल्पना केली तर या जत्रेंत येणाऱ्या लोकांचे ३ प्रकार आढळतील ते असेः— ( अ ) केवळ खेळण्याकरिता येणारे. ( आ ) व्यापार धंद्यानिमित्त येणारे व ( इ ) केवळ प्रेक्षक म्हणून येणारे. पायथॅगोरसच्या मतें तिसऱ्या प्रकारच्या लोकांप्रमाणें मनुष्यानें आपला आयुःक्रम ठेवावा. अशा प्रकारच्या आयुःक्रमास तो " चिंतनमार्ग " असें म्हणे. ( आपल्या देशांतील वेदांती या अर्थी " साक्षिन् " हा शब्द वापरतात ).

( ३ ) संख्यावादः—पायथॅगोरसला अंकगणिताचा फार नाद असल्यामुळें अंक हेंच सर्व वस्तूंचें अंतिम स्वरूप आहे असें याचें मत होतें.

यानें वरील मतांचा एक वेगळा पंथ स्थापन केला व आपल्या अनुयायांच्या सोईकरितां व आपल्या मतांचा प्रसार करण्याकरितां एक मठाहि स्थापन केला. या मठाचें स्वरूप श्री समर्थांच्या मठाप्रमाणें असे. याच्या शिष्यापैकीं फायलोलॉस हा फार विद्वान होऊन गेला. पायथॅगोरसबद्दल आणखी माहिती व त्याचे भूगोल-ज्योतिषशास्त्रीय शोध व इतर मतें हीं 'विज्ञानेतिहास' विभागात ( पृ २३५-२३७ ) दिलीं आहेत.

( नू त न ) पा य थॅ गो रि य न म त.—इ. सनाच्या पहिल्या शतकांत टायनाचा आपोलोनिअस व गेडसचा माडरेटस यांनीं प्रतिपादिलेलें ग्रीको-अलेक्झांड्रियन मत. केवळ निरपेक्ष तत्त्वज्ञानाच्या उतरत्या काळांत या मताचा जन्म झाला. स्टोईकांचा 'पूर्ण मनुष्य' चैनी व व्याधिग्रस्त ग्रीको रोमनसमाजांत आढळणें कठिण होतें. समाजांत जबाबदारीची जाणीव उत्पन्न होण्याकरितां तार्किकवाद-विवादप्रधान-नितिशास्त्राहून कांहीं तरी अधिक लागतें. पुनरुच्चारानें शुष्क झालेल्या अनुमानसिद्धांताचा पतित समाजावर बिलकुल परिणाम होत नाहीं.या नूतन मतानें धर्मलंडांनीं शुष्क बाह्यस्वरूपवादाच्या जागीं धर्मतत्त्वें स्थापिण्याचा व तीं मतें पायथॅगोरस व प्लेटो यांचीं आहेत, असें भासवून त्यांस परंपरागत मतांचें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. पण हे निव्वळ थोताड आहे. चांगुलपणा व ईश्वरी एकतत्त्व यांचा मिलाफ करणाऱ्या नूतन प्लेटोमताकडे वळून आत्मा व शरीर यातील भेदांवर या मतानें विशेष भर दिला. ईश्वरोपासना आत्मिक भावनेनें अंतःकरणद्वारा करावी केवळ बाह्यसंस्कारिक कृतीनें करूं नये.संन्यस्त आयुष्यक्रमानें शरीराच्या बाह्य आवरणांतून आत्मा मुक्त करावा. शारीरिक सुखें व विषयाकडील कल हीं आत्मिक पवित्रतेस विघातक म्हणून त्यांचा त्याग करावा; ईश्वर चांगुलपणाचें मूळ व प्रकृति वाईटाचें मूळ आहे. हीं या मताचीं प्रमुख तत्त्वें आहेत. यांत पायथॅगोरसचें संन्यासमत व प्लेटोचा गूढवाद याचा मिलाफ झाला आहे यानें प्लेटोचीं आदिरूपें स्वयंवर्तमान नाहीत; तीं आत्मिक कार्याचीं मूलतत्त्वें आहेत असें प्रतिपादन केलें. या मतानें प्लेटोचें तत्त्वज्ञान व नूतन प्लेटोमत याचा संबंध जोडला; व स्टोईक संन्यासपद्धतीच्या ओळींत प्लेटोचें मत बसविलें. या मतानें दिलेल्या आयुधामुळेंच नतन प्लेटोमतास ख्रिस्ती मताशीं शेवटची झुंज करता आली.

**पायरोल्यूसाइट** (अग्निप्रक्षालक ).—हा खनिज पदार्थ मंगलद्विप्राणिदाचाच बनलेला असतो. हा मऊ, काळा, रवेदार व तंतुमय असतो. याचे खडे धातूप्रमाणें चकाकतात व यानें निळीकाळी रेघ उमटते. बोटानीं चुरडला तर तो बोटास चिकटतो. याचें विशिष्टगुरुत्व ४.८ आहे. मंगलिता ( $म_2 प्र_3. उ_2 प्र.$ ) दगडाचें प्राणिदीकरण व निर्द्रवीकरण होऊन याचे स्फटिक बनतात. यामुळेंच याच्या स्फटिकात थोडेंसे पाणी असतें. पोलिनाइट खनिजात याचे नैसर्गिक स्फटिक पाहण्यास मिळतात. ते चतुष्कोनी असतात. चुनखडीसारख्या खडकाचें पृथक्करण होऊन जी चिकण माती तयार होते त्या चिकणमातींत हा खनिज तयार होतो. कांहीं झऱ्याच्या गाळात व खोल समुद्राच्या तळाशीं हा खनिज सांपडतो.

थुरिंजियामध्यें ल्मीना व इतर कित्येक ठिकाणें, मोरेव्हिया मध्यें व्होर्डेर रेन्डार्फ,बोहिमियामध्यें प्लेटन व्हरमॉन्ट, व्हर्जीनीया व अर्कान्सस इत्यादि ठिकाणीं अमेरिकेंतील संस्थानांत, नोव्हास्कोशिया व ब्रेझिल इत्यादि ठिकाणीं हा खनिज सांपडतो.

पायरोल्यूसाइट व सिलोमिलेन याचे कित्येक आर्थिक उपयोग आहेत.मंगल पोलाद व मंगल ब्रांझ यांचें मेलन

करण्याकडे याचा उपयोग होतो. हा प्राणिदीकारक असल्यानें हरवायु, परिमंगालेटें इ. करण्याकडे याचा उपयोग होतो. चिटें रंगविण्याकरितां व काच, मातीचीं भांडीं व विटा यांस अस्मानी, पिंवळा व काळा रंग देण्याकरितां याचा उपयोग करतात.

**पारघाट**—मुंबई इलाख्यांत, साताऱ्याहून कोंकणांत जातांना सह्याद्रि पर्वतांत लागणारा घाट. महाबळेश्वराच्या पश्चिमेस ५ मैलांवर व प्रतापगडाला लागून दक्षिणेस असलेल्या पारपार व पेटपार या गांवांच्या नांवावरून या घाटाचें नांव पडलें आहे. १८६४ सालीं कुंभारली घाट व १८७६ सालीं फिट्झजीराल्ड घाट होईपर्यंत साताऱ्याहून कोंकणांत जाण्याकरितां पारघाट हाच मुख्य रस्ता असे.

**पारद**—पारा. परमाणुभारांक २००. रासायनिक संज्ञा रा. हा एक धातु आहे. नेहमींच्या उष्णमानावर हाच धातु द्रवरूपांत असतो. बाकीचे धातू घनरूपांत असतात. याचा शोध खि. पूर्व ३०० या वर्षी लागला. तेव्हां हिंगूळ, तांबें व द्राक्षासव यांचें मिश्रण करून हा काढीत असत. डायोस्कोरिडीज यानें हिंगुळांत लोखंडाचे तुकडे घालून हा तयार केला होता. ते लोक समजत कीं हें एक मूलद्रव्य आहे व हें सर्व धातूंत असल्यामुळें सर्व धातू चकाकतात. इसवी सनाच्या १६ व्या शतकांत रसायनशास्त्र व औषधीशास्त्र हीं एकत्र झालीं, तेव्हां याचा उपयोग औषधांत फार होऊं लागला.

हिंगुळाचे दगड हेच या धातूचे अशुद्ध दगड होत. या दगडांत कधीं कधीं शुद्ध पाराहि थोड्या प्रमाणांत असतो या दगडांचा मुख्य साठा स्पेनमध्यें आल्मादीन, इलिरियामध्यें इड्रिया व अमेरिकेंत कॅलिफोर्निया व टेक्सस् या ठिकाणीं आहे शिवाय हे दगड रशिया, बव्हेरिया, इटाली, ट्रान्सिल्व्हानिया, बोहिमिया, मेक्सिको व पेरू या देशांतहि सांपडतात.

एकेकाळीं इड्रिया व आल्मादीन येथील खाणींतूनच पारा निघत असे. परंतु हल्लीं बहुतेक पारा कॅलिफोर्निया व टेक्सस् येथून येतो. तेथील मूळचे रानटी लोक या दगडांनीं आपलीं अंगें रंगवीत असत अमेरिकेंत उटा, नेव्हाडा, ऑरेगॉन, व ॲरिझोना येथें पारा सांपडतो. मद्रास इलाख्यांतहि कांहीं ठिकाणीं पारा सांपडतो.

पारा एका जागेहून दुसऱ्या जागेवर पोलादी बाटल्यांतून पाठवितात. या बाटल्यांना मळसूत्री बुचें बसवितात. एका बाटलींत ७५–७६ पौंड पारा भरतात. लहान कारखान्यांतून बकरीच्या कातड्याच्या पिशव्यांत भरूनहि पारा पाठवितात.

शुद्ध धातू काढण्याची कृति.—पारा शुद्ध करण्याची कृति फार सोपी आहे. पाऱ्याची वाफ लवकर होते व हिंगूळ तापविला असतां त्याशीं लोखंड, चुना किंवा हवेंतील प्राणवायु यांचा संयोग होऊन अनुक्रमें लोहगंधकित, खटगंधकित व गंधकप्राणिद हे तयार होऊन पारा निराळा होतो. याकरितां लोखंडाचें ऊर्ध्वपातन यंत्र उपयोगांत आणीत असत. सध्यां हिंगूळ एका भांड्यांत घालून त्यावर प्राणदायक ज्योत सोडतात म्हणजे गंधक जळून पारा बाहेर निघतो. व तो बाहेर काढून भांड्यांतून सांठवितात. आल्मादीन येथील दगडांत शेकडा ५ ते ७ भाग पाऱ्याचें प्रमाण असतें परंतु इतर ठिकाणच्या दगडांत पाऱ्याचें प्रमाण याहून देखील कमी असतें. आपल्याकडे पाऱ्याचें ऊर्ध्वपातन करण्याकरितां डेकी यंत्र वापरीत.

हल्लीं प्रचारांत असलेली पारद काढण्याची भट्टी येणेंप्रमाणेः—चुन्याच्या भट्टयांप्रमाणें उभ्या भट्टया केलेल्या असतात. त्यांत वरून अशुद्ध धातूचे दगड टाकतात व खालून एका भोंकांतून जाळ लावितात व दुसऱ्या भोंकातून राहिलेला गाळ काढून टाकण्यांत येतो. भट्टीच्या वरच्या तोंडाजवळ ऊर्ध्वपातन यंत्रासारखी रचना केलेली असते. त्यांतून पाऱ्याच्या वाफा बाहेर निघून त्या द्रवीकरणयंत्रांतून जातात. तेथें त्याचें द्रवरूप होतें व पारा तयार होतो. या पाऱ्यांत पुष्कळस काजळ असतें. याकरितां त्यास पुन्हां शुद्ध करावा लागतो. हें काजळ काढून टाकण्याकरितां एक लोखंडी नाटोळा डबा केलेला असतो. या डब्याच्या बुंधाला पुष्कळ छिद्रें पाडलेलीं असतात. व आंत ताक करण्याच्या रवीसारखें चक्र फिरत असतें या फिरणाऱ्या रवीनें, काजळ हलकें असल्यामुळें त्यास गति मिळते व तें उडून वर आऊं लागतें व खालच्या छिद्रांतून पारा गळून खालीं पडतो. याला पुन्हां शुद्ध करण्याकरितां शामॉय नांवाच्या कातड्यांतून गाळतात. किंवा एका बारीक छिद्राच्या चाळी( नरसाळें )तून गाळतात. किंवा शून्यावकाशांत ऊर्ध्वपातन करून त्याला शुद्ध करतात. किंवा पारदसनत्रित व नत्राम्ल यांचें मिश्रण करून त्यांतून याचे फवारे सोडतात किंवा या मिश्रणाऐवजीं गंधकाम्लचा उपयोग करतात. असा शुद्ध झालेला पारा कागदावर टाकला असतां त्याची गोळी होते. या गोळीवर आघात केला असतां त्याच्या बारीक गोळ्या होतात, परंतु त्या कागदास चिकटत नाहींत. जर पारा कागदाला चिकटला तर तो शुद्ध झाला नाहीं असें समजावें.

गुणधर्मः—पारा हा अस्निग्ध द्रव आहे. यांत पदार्थ टाकला असतां त्याला तो चिकटत नाहीं. याचा रंग चांदीसारखा पांढरा असतो. याच्या पातळ थरातून निळ्या रंगाचा प्रकाश जातो. हा –३९° उष्णमानावर घनरूप होतो. तेव्हां हा घनवर्धनीय, तन्य, रंगानें पांढरा व चाकूनें कापण्याइतका मऊ असतो. याला तपविला असतां हा एकसारखा प्रसरण पावतो व ३६०° अंशावर याचा वाफ होते हा जड, द्रवरूप व लवकर वाफ न होणारा असा असल्यामुळें याची उष्णमानमापकयंत्रें करण्याकडे योजना करितात. य वे वि. गु. १३.६ आहे. य च. उपयोग भारमापकयंत्रांत करतात.

निर्द्रव हवा, प्राणवायु, नत्रसप्राणिद व कर्बद्विप्राणिद यांचा शुद्ध पाण्यावर कांहीं परिणाम होत नाहीं. म्हणून हे वायू जमा करण्याकरितां पाण्याऐवजीं पाऱ्याचा उपयोग करतात. ओल्या हवेंत याचा हळू हळू पारदसप्राणिद तयार होतो. उघड्या हवेंत थोडा वेळ तापविल्यास याचा तांबडा पारदिकप्राणिद ( हिंगूळ ) तयार होतो. या प्राणिदास आणखी तापविल्यास पृथक्करण होऊन पारा व प्राणवायु हे अलग होतात. हरसंघ व गंधक यांशीं पारा संयोग पावतो. मंद गंधकाम्लांत हा विरघळत नाहीं परंतु अम्ल तीव्र असल्यास त्यांच्या संयोगापासून गंधकाद्विप्राणिद व पारदस किंवा पारदिकगंधकित तयार होतें. पारा जलराजांत (ॲक्वारेजिया) विरघळतो. पाऱ्यांत इतर धातू विरघळतात व त्यांच्या संयोगापासून त्या त्या धातूंचे पारदमेल तयार होतात.

लवणें—पाऱ्याचे दोन प्रकारचे क्षार तयार होतात. ( १ )पारदसक्षार व ( २ ) पारदिकक्षार.

(१)पारदसप्राणिदः—पारदस हरिदाशीं पालाशदाहकाचा संयोग झाला असतां हा प्राणिद बनतो. याचा रंग तांबूस असतो. हा फार अस्थिर असतो. याचें प्रकाशानें पृथक्करण होऊन पारदिक प्राणिद बनतो.

( २ )पारदिक प्राणिद हा दोन तऱ्हांनीं बनतो. पारा हवेंत तापविला असता हा प्राणिद बनतो. याचा रंग लाल असतो. किंवा पारदिक क्षार व दाहक पालाश यांचा संयोग केला असता हा तयार होतो. तेव्हां याचा रंग पिंवळा असतो. याला ४०० अंशापर्यंत तापविला असता याचा लाल रंगाचा प्राणिद बनतो. लाल रंगाचा प्राणिद थोडा तापविला असता काळा पडतो व थंड केल्यावर पुन्हां लाल होतो. ६३० अंशापर्यंत तापविल्यास याचें पारा व प्राणवायु यांत पृथक्करण होतें,

( ३ ) पारदस हरिद व पारदिक हरिदः—हे दोन फार महत्त्वाचे क्षार आहेत.

( ४ ) पारदसनत्रितः—थंड व क्षीण नत्राम्लांत पारा विरघळून या नत्रिताचे पांढरे स्फटिक बनतात. हे पाण्यांत विरघळतात.

( ५ ) पारदिक नत्रितः—पारदिक प्राणिद नत्राम्लांत विरघळला म्हणजे एक द्रव तयार होतो. यांत तीव्र नत्राम्ल घातला म्हणजे पारदिकनत्रिक तयार होतो. याची पांढरी पूड बनते.

( ६ ) पारदस गंधविदः—पारदस हरिदांत उज्जगंधविद व कर्बद्विप्राणिद घातलें असतां हा तयार होतो.

( ७ ) पारदिक गंधविद उर्फ रससिंदूरः—याचा, अंगाला लावावयाच्या रंगांत उपयोग होतो.

( ८ ) पारदस गंधकितः—पारदसनत्रित व सिंधुगंधवित यांच्या संयोगानें हा तयार होतो. याचा रंग पांढरा असतो.

( ९ ) पारदिक गंधकितः—उष्ण व तीव्र गंधकाम्लांत पारा घातला असतां हें तयार होतें. याचा रंग पांढरा असतो व हें पाण्यांत विरघळतें.

औषधोपयोग — ग्रीक व रोमन लोकांच्या वेळेस याचा उपयोग करीत नसत याचा उपयोग १६ व्या शतकापासून लोक करूं लागले. पारा किंवा पारदसक्षार यांचा कांहीं उपयोग होत नाहीं परंतु हीं पोटांत गेल्यावर त्यांचे पारदिक क्षार बनतात व त्यांचा शरीरावर परिणाम होऊं लागतो. पारदिकहरिद व अदिद हीं जंतुमारक आहेत, तरी यांचा उपयोग यंत्रें धुण्याकडे करीत नाहींत कारण यानें धातूंचीं यंत्रें गंजतात खरजेवर यांचा उपयोग करतात. काळजाच्या विकारावर रक्तशुद्धीकरितां याचा उपयोग कितपत होतो याची शंकाच आहे. परंतु उपदंशावर याचा उपयोग फार होतो हे निर्विवाद आहे.

पारदिकहरिद हें जालीम विष आहे. हें पोटांत गेल्याबरोबर आंतड्यांत आग होते, वांती येते व भाताच्या पेजेसारखे जुलाब होतात. अंड्यांतील बलक हें एकच औषध यावर लागू होतें. थोडा थोडा पारा पोटांत गेल्यास हळूहळू त्याचा विपरीत परिणाम होतो, खातांना दांत दुखूं लागतात व हिरड्यांची आग होते व त्यांतून रक्तस्राव होतो तोंडांतून सतत लाळ गळते व दांत पडण्यास सुरवात होते. तोंड व जीभ यावर फोड येतात. सर्वांगाची आग होऊं लागते. यानंतर रोगी फार दिवस जगण्याची आशाच नाहीं. याला औषध म्हणजे पालाशअदिद हें थोडेथोडें रोज देत जावें.

इतर उपयोग.—पारा दुसऱ्या धातूंशीं त्वरित संयोग पावत असल्यानें कलाकौशल्याच्या कामांत त्याचा फार उपयोग होतो. कथील व पारा यांचें मिश्रण लावून आरसे करतात. शास्त्रीय यंत्रें करण्याच्या कामीं पाऱ्याचा चांगला उपयोग होतो

**पारधी**—शिकारी. यांची एकंदर लोकसंख्या सुमारें ६६ हजार आहे. पैकीं मध्यहिंदुस्थानांत २५ हजार आहे. मुंबई इलाख्यांत यांची लोकसंख्या सुमारें १८ हजार आहे. तेथें ही फिरती जात मुख्यत्वेंकरून खानदेश, नाशिक, सोलापूर, विजापूर व कच्छ वगैरे प्रांतांत आढळते. दक्षिण प्रांतांत यांना फांसेपारधी हें नांव असून विजापूर जिल्ह्यांत यांना अटवीसंचार म्हणतात. रजपूत, कोळी, वाघरी, धनगर व कोरच्या लोकांपासून हे लोक आलेले आहेत असें मानण्यास आधार आहेत. त्यांची स्वतःची भाषा निराळी असून बाकी इतर भाषांत ते व्यवहार करूं शकतात. त्यांचा मुख्य धंदा म्हणजे डुकर, तितर, लावा व पोपट वगैरे पक्षी धरून बाजारांत विकणें हा आहे. त्यांच्यापैकीं कांहीं लोक दगडांचीं जातीं करतात. चोरी करण्यांत पटाईत म्हणून त्यांची प्रसिद्धि आहे. फांसेपारधी, हरणपारधी, मीर, कोरचर, व वाघरी असे यांचे पांच वर्ग आहेत. सर्व पारधी जातींत देवक कल्पना साधारण आहे. नवरानवरीवर अक्षता टाकणें हाच कायतो मुख्य लग्नविधि होय. विधवेचें दिराशीं लग्न होतें.

उपकरणे इराणमध्यें जाऊन आणावीं लागलीं त्याअर्थी आतष बेहरामाची स्थापना ते संजान येथें आल्यापासून पांच वर्षांनीं झाली असावी ( इ. स. ७९०; य. ज. १५९). या वेळीं त्यांस कांहीं अधिक धार्मिक पारशी येऊन मिळाले असल्या-बद्दलचा उल्लेख आहे. हे लोक बहुतकरून ज्यावेळीं हिंदुस्थानांतील पारशी लोक इराणांत आपलीं उपकरणें आणण्यास गेले त्यावेळीं येथील धार्मिक स्वातंत्र्याची हकीकत ऐकून त्याजबरोबर इराणांतून आलेले दुसरे त्यांचे पारशी धर्मबन्धू असावे.

वसाहतीः—याप्रमाणें संजान येथें ३०० वर्षे राहिल्यावर कांहीं पारशी लोक तेथून निघून दुसरीकडे जाऊं लागले व हा क्रम सुमारें २०० वर्षे चालला होता. इतक्या अवधींत त्यांनीं वांकानेर, भडोच, वरिआव, अंकलेश्वर, खंबायत व नवसरी या ठिकाणीं वसाहती केल्या. यावेळीं संजानमध्यें फक्त कांहीं दस्तुर ( उपाध्याय ) राहिले होते.

पथकोत्पत्तिः—याच्या पुढील हकीकतीचा किस्से इ. संजानमध्यें कांहीं एक उल्लेख नसून किस्से. इ. झरतुष्टिआन इ-हिंदुस्तानमध्यें असा उल्लेख आहे कीं, यावेळीं(अग्निमंदिर स्थापनेनंतर ५०० वर्षांनीं म्हणजे इ. स. १२९०; य. ज. ६५९) पारशी दस्तुर यांच्या वृत्तीबद्दल भांडणें होऊं नयेत म्हणून गुजराथ प्रांताचे पांच पथक केले ते असेः—( १ ) संजान—पारनदीपासून दंतुर नदापर्यंत, ( २ ) नवसरी—पार नदीपासून वरिआव पर्यंत, ( ३ ) गोदारे ( गोदावरे )—वरिआव नदीपासून अंकलेश्वरपर्यंत, ( ४ ) भडोच—अंकलेश्वरपासून खंबायतपर्यंत आणि ( ५ ) खंबायत—( कुमारिकाक्षेत्र ). नंतर कांहीं वर्षांनीं संजान हे पोर्तुगीज अंमलाखालीं गेल्यावर नवसरी येथील भगरिया यांनीं आपल्या पथकांतील वलसाड हें गांव संजान येथील दस्तुर लोकांस वृत्तीकरितां दिलें.

वलसाड गांव नवसरी पथकामधून संजानपथकांत गेल्याचा कालः—पोर्तुगीज लोकांनीं चेंगीझखान यास सुरतेवर स्वारी करण्यास मदत केल्यामुळें त्यानें त्यास दमण व संजान हे प्रांत दिले ( इ. स. १५६० ). परंतु ही गोष्ट इ. स. १५३३–३४ मध्यें झाली असावी. यावर्षी सुलतानबहादुर यानें पोर्तुगीज लोकांबरोबर तह करून त्यांस वसई व तिच्या खालील प्रदेश दिला. बहादुरशहानें इ. स. १५३४ मध्यें पोर्तुगीज लोकांशीं तह करून त्यानें वसई शहर त्यांस कायमचें दिलें. याच वर्षी धर्मांतराच्या भीतीनें पारशी लोक ठाण्याहून कल्याण येथे पळून गेले. बहादुरशहाच्या कारकीर्दींतहि(हि. स. ९४१; इ. स.१५३४) पोर्तुगीज लोकांनीं गुजराथच्या राजाची स्वल. दमण व दीव हीं बंदरें घेतलीं. हें स्वल बंदर म्हणजे हल्लींचें सुरतेजवळचें 'सुमारी ' असावें.

संजानवरस्वारीः—या नंतरची हकीकत किस्से. इ. संजानमध्यें याप्रमाणें आहे. यानंतर ( अग्निमंदिराच्या स्थापनेनंतर ७०० वर्षांनीं सुलतान महमूद याचा सरदार अलफखान यानें संजानच्या राजावर स्वारी केली. त्यांत अरदेसर-याच्या हाताखालीं पारशी लोकांनीं त्यास मदत केल्यामुळें अलफखान याचा पराभव झाला. परंतु अलफखान याच्या दुसऱ्या स्वारींत त्यास यश येऊन संजानचा राजा व त्याच्या बाजूनें लढणारे वरेच पारशी मारले गेले. तेव्हां राहिलेले पारशी अग्नि घेऊन जवळच्या बाहरूत पर्वतावर पळून गेले व तेथें बारा वर्षे राहून पुन्हा अग्नि घेऊन बान्स्दा येथे परत आले ( १४९० ).

बाहरूतपर्वत व बान्स्दाः—या लढाईमधून जे वांचले त्यांनीं अग्नि घेऊन जवळच्या बाहरूत पर्वताचा मार्ग धरिला. तेथें बारा वर्षे ( इ. सन १५०२ पर्यंत ) राहून नंतर ते अग्नि घेऊन वलसाडजवळ असलेल्या बान्स्दा गांवीं आले.

नवसरीः—तेथें १४ वर्षे राहिल्यावर तो अग्नि नवसरी येथील एक मुख्य रहिवाशी चांगाशा यानें, बान्स्दा येथें जाण्यास वगैरे लोकांस त्रास होत असे व तेथील पुजाऱ्यासहि त्रास होत असे म्हणून नवसरी येथें ( १५१६ ) आणिला. किस्से. इ. संजानमध्यें येथपर्यंतचीच हकीकत आहे. पुढें ' किस्से. इ. झरतुष्ट्रिआन. इ. हिंदुस्तानमध्यें पुढील हकीकत आहे.

पथकांमधील तंटेः—नवसरी येथें अग्नि आल्यावर अग्नीचे संजानयेथून आलेले तीन पुजारी व नवसरी येथील उपाध्याय याच्यामध्यें वितुष्ट येऊं नये म्हणून चांगाशा यानें असा लेखी करार लिहून टाकला कीं संजाना येथील दस्तुर लोकांनीं फक्त अग्निपूजेचें उत्पन्न घ्यावें व नवसरी येथील उपाध्याय लोकांनीं सर्व लोकांचे-संजान येथून आलेल्या दस्तुरांचेहि-संस्कार चालवावे. हा करार सर्वांनीं मान्य केला. यानंतर ७० वर्षे शांततेंत गेलीं. नंतर नवसरी येथील भिक्षुकवर्ग व गृहस्थ यामध्यें तंटा उपस्थित झाला व संजानचें दस्तुर गृहस्थ वर्गास मिळालें.पुढें त्यांच्यांत मारामारी होऊन दोहीं बाजूचे कांहीं लोक मारले गेले. नंतर गृहस्थ लोकांनीं सुरतेस जाऊन तेथील देसाई याच्या मदतीनें फिर्याद केली. तेथील नबाबानें जसवल यास सैन्य देऊन नवसरीस पाठविलें व त्यानें तेथून कांहीं भिक्षुकांना कैद करून आणून तुरुंगांत टाकिलें ( १६८६ ). यावेळीं सुरत येथें कुवरजी मोदी या नांवाचे एक गृहस्थ होते.त्यांच्याकडे सुरतचे भिक्षुक आले. तेव्हां त्यांनीं खटपट करून त्या तुरुंगांतील भिक्षुकांस सोडविलें.या गोष्टीमुळें संजान भिक्षुकांस आनंद झाला व त्यांना नवसरी येथील भिक्षुकी आपणास मिळेल असें वाटलें.त्यावेळीं नवसरी येथील भिक्षुकांनीं संजान भिक्षुकांस बजाविलें कीं, तुम्ही येथील गृहस्थवर्गाचीं धर्मकृत्यें चालवाल तर तुमचा आमचा तंटा होईल. परंतु त्यांच्यामधील हा तंटा तसाच चालू राहिला.

पुढें नवसरी येथें खोरशेद देसाई या नांवाचा एक मनुष्य होऊन गेला. यानें नवसरी येथील भिक्षुकांच्या वतीनें तेथील राजा गंगाजी गायकवाड याजपुढें फिर्याद मांडली. या फिर्यादीचा निकाल असा झाला कीं त्यांचीं सर्व धर्मकृत्यें नवसरी येथील भगरिया भिक्षुकवर्गानें चालवावीं ( १७३५ ). नंतर खोरशेद देसाई यानें भगरिया भिक्षुकांस असें दाखवून दिलें कीं, त्यांस संजान येथील जे भिक्षुक नवसरी येथें आले होते त्यांचींहि धर्मकृत्यें चालविण्याचा अधिकार आहे.

संजान भिक्षुकांनीं मूळ प्रत पाहण्यास मागितली ती दाखविल्यावर थोडा वेळ ते स्वस्थ बसले, पण पुढें त्यांनीं तेथील राजा दमाजी गायकवाड याजकडे फिर्याद केली. यावेळीं दमाजीची कचेरी सोनगडावर असे. तेव्हां दोन्ही बाजू ऐकून घेऊन दमाजीनें निकाल दिला कीं, संजना भिक्षुक हे आपल्या करारापासून पराङ्मुख झाले असून त्यांची वृत्ति नवसरी नसून संजान ही आहे. तेव्हां संजान भिक्षुक म्हणूं लागले कीं यापेक्षां आम्ही आपला अग्नि घेऊन निघून जातों दमाजीनें याबद्दल देसाई यास विचारल्यावर त्यानें आपली हरकत नाहीं असें उत्तर दिलें.

वलसाडः—तेव्हां संजान भिक्षुक दमाजीचा परवाना घेऊन व बरोबर अग्नि घेऊन नवसरी सोडून वलसाड येथें गेले. ( १७४० ).

उदवाडाः—वलसाड येथें ते दोन तीन वर्षें राहिले. नंतर तेथून ते राजा दुर्जनसिंग याच्या आश्रयाखालीं उदवाडा येथें गले ( १७४२ ).

वलसाड येथें दोन वर्षें राहिल्यानंतर येथील उपाध्याय मांडवीचा राजा दुर्जनसिंगजी यास ते भेटले. यावेळीं तो पार्डी येथील किल्ल्यांत रहात असे. त्यानें त्यास आश्रय देण्याचें कबूल करून त्यांस समुद्रकिनाऱ्यावरच्या कांहीं खेड्यांपैकीं एखादें खेडें पसंत करण्यास सांगितलें. उदवाडा येथें त्यावेळीं कांहीं पारशी रहात असून तेथें एक शांतिमंदिर ( पारशी स्मशानभूमि ) होतें म्हणून तें ठिकाण त्यांनीं पसंत केलें. तेव्हां राजानें त्यांना कांहीं हक्क व सवलती देऊन एक सनद करून दिली.

सुरतः—वरील हकीकतींत एका गोष्टीचा उल्लेख आलेला नाहीं. ही गोष्ट म्हणजे इ. स. १७३३ पासून १७३६ पर्यंत नवसरी येथून सुरतेस अग्नि नेल्याबद्दलची होय. यावेळीं देशांत सर्वत्र अस्वस्थता माजली होती, दिल्ली येथील सत्तेचा ऱ्हास होत असून मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष होत होता. बाजीराव हा जरी शाहूचा नांवाला प्रधान होता तरी त्याच्या हातीं अनियंत्रित सत्ता होती. प्रतिनिधि, पेशवा व सेनापति यांच्यामध्यें अधिकाराबद्दल चढाओढ लागली होती. यामुळें आजूबाजूच्या प्रांतांत मराठे नेहमीं लुटालूट करीत असत. म्हणून इ. स १७३३ पासून १७३६ पर्यंत अग्नि तात्पुरता नवसरी येथून सुरत येथें नेण्यांत आला होता. याच सुमारास पुष्कळसे पारशी लोक मराठ्यांच्या लुटालुटीस कंटाळून सुरत येथें येऊन राहिले होते. सुमारें एकदोन हजार पारशी लोक. नवसरी मराठ्यांच्या ताब्यांत गेल्यावर तेथील कांहीं अंमलदारांस कंटाळून सुरत येथें येऊन रुस्तमपुरा वसवून तेथें राहिले. याला रुस्तमनाणक ( इ. स. १६३५–१७२१ ) याचें नांव दिलें नवाब मोमिनखान यानें इ. स. १७१५ मध्यें शान्तिमंदिर ( स्मशानभूमि ) बांधण्यास जमीन दिली व याच्या करितां इ. स. १७२२ मध्यें पारशी लोकांनीं वर्गणी जमविण्याकरितां एक सभा बोलविली होती.

नवसरी येथें दुसऱ्या अग्निमंदिराची स्थापनाः—नवसरी येथून अग्नि गेल्यानंतर कांहीं दिवसांनीं नवसरी येथें इ. स. १७६५मध्यें अग्निमंदिर बांधून त्यांत आतषवेहरामची स्थापना केली.

याप्रमाणें पारशी लोक इराणांतून येऊन हिंदुस्थानांत स्थायिक कसे झाले व त्यांची अग्निपूजेची परंपरा त्यांनीं नियमितपणें अखंड कशी राखली यासंबंधींची हकीकत दिली आहे. पारशांसंबंधीं मुसुलमानी इतिहासांत उल्लेख आढळतात ते येणेंप्रमाणेः— १५९५ सालीं पारसी दस्तुर कैकोबाद माहियार यास अकबरानें पूर्वी २०० बिघे जमीन दिली होती. त्याच्या जोडीस आणखी १०० बिघे दिली.

पारशांचा प्रवेश मुंबईमध्यें पोर्तुगीज अमलाखालींच झाला. इंग्रजांना मुंबई मिळाली त्यावेळेस दोराबजी नानाभाई नांवाचा एक पारशी पोर्तुगीजांच्या नोकरीस होता आणि मुंबई देतेवेळेस पोर्तुगीजांनीं त्याची इंग्रजांकडे शिफारस केली. सुरतेच्या इंग्रजांस व्यापारावर जकातीची माफी औरंगझेबाकडून मिळवून देण्यास एक पारशी मोबेद जमशेट बिन कैकोबाद ( मुक्काम सुरत ) कारण झाला असें पारशी प्रकाश ( भाग १, पृ. १५ ) म्हणतें व समर्थनार्थ कांहीं अर्जाच्या व हुकुमाच्या कविता दिल्या आहेत. पण त्या कोठून व कशा मिळविल्या इत्यादि माहिती दिली नाहीं ( १६६० ).

अंजिऱ्याच्या शिद्द्यानें मुंबईवर हल्ला केला त्यावेळेस मुंबईचें संरक्षण करण्यामध्यें रुस्तुम ( दोराबजी नानाभाईचा मुलगा ) यानें प्रमुखपणानें काम केलें ( १६९२ )

पा र शां ची सा मा जि क मा हि ती.—गुजराथेंत राहिलेले पारशी शेती व ताडी काढण्याचा धंदा मुख्यतः करीत. शिवाय सुरत वगैरे मोठ्या शहरीं सुतारकीचा, जहाजें बांधण्याचा आणि युरोपीयांच्या फॅक्टरींत दलालीचा धंदा करीत. सुरत येथें १९ व्या शतकांत पारशांचीं सुमारें २०००० कुटुंबें होतीं. दिल्लीच्या मोगल दरबारांतहि त्यांना चांगला मान व वजन असे. ब्रह्मदेश व चीन येथेंहि त्यांनीं व्यापारी संस्था स्थापल्या. गुजराथेंत जे दुष्काळ पडले त्यावेळीं पारशांची वस्ती मुंबई शहरांत वाढूं लागली आणि तेथें इंग्रजांच्या बरोबरीनें त्यांची भरभराट होऊन १९ व्या शतकांत मुंबई शहर व बेट यांची जी वाढ झाली तिचें बरेचसें श्रेय पारशी समाजाला आहे, ही गोष्ट मुंबईत जे अनेक थोर पारशी

गृहस्थांचे पुतळे उभारलेले आहेत त्यावरून सहज लक्षांत येईल. सर दिनशा पेटिट, जमशेटजी जिजिभाई, रेडिमनी, भावनगरी, फेरोजशहा मेथा, दादाभाई नवरोजी, वगैरे पुढारी होऊन गेले. पाश्चात्त्य शिक्षणाचा फायदा घेणाऱ्यांत पारशी हे पहिले होत. साक्षरतेचें प्रमाण पारशांमध्यें सर्वांहून अधिक (१००० पैकीं साक्षर पारशी ६५०, ख्रिस्ती २९२, जैन २६९, हिंदु ५९ व मुसुलमान ४१) आहे इंग्रजी भाषा जाणणारांचें प्रमाण पारशांतच अधिक (१००० संख्येंत पारशी २५८, ख्रिस्ती २०९, जैन९, हिंदु४ व मुसुलमान२) असून इंडियन स्पेक्टेटर, व्हॉईस ऑफ इंडिया, ईस्ट अँड वेस्ट यांचे संपादक पारशी गृहस्थ होते. स्त्रीशिक्षणाचा प्रसारहि पारशांतच सर्वांहून अधिक असून बी. ए., एम. ए., एलएल. बी., एम. डी. वगैरे पदव्या मिळविलेल्याहि पारशी स्त्रिया आहेत उच्च शिक्षणांतहि त्यांची प्रगति फार झाल्यामुळें डॉक्टर, वकील, इंजिनियर, वरिष्ठ सरकारी नोकर, राजकीय पुढारी, हिंदुस्थानांतील प्रांतिक व वरिष्ठ कायदेमंडळांत आणि इंग्लंडांतील पार्लमेंटांत सभासद, देशी संस्थानांचे दिवाण वगैरे सर्व प्रकारच्या उच्च धंद्यांत व नोकऱ्यांत पारशी इसम पुष्कळ आहेत. ब्रिटिश पार्लमेंटांतले पहिले हिंदी सभासद दादाभाई नवरोजी हे पारशी होत. पाश्चात्त्य संस्कृति हिंदुस्थानांत दिसूं लागल्यापासून हिंदूंप्रमाणें पारशांतहि पुराणमतवादी व सुधारक असे दोन पक्ष उद्भवले, आणि 'रास्त गोफ्तार' नामक वर्तमानपत्रानें गेलें अर्धें शतक सुधारक पक्षाचीं मतें फैलावण्याचें काम केलें. पारशी लोक घरांत व सार्वजनिक व्यवहारांत गुजराथी भाषा बोलतात. आपसांतील खासगी व सामाजिक तंटे तोडण्याकरितां सुरत, मुंबई, बडोदें नवसरी, वगैरे सर्व ठिकाणीं पारशी पंचायती १७ व्या शतकापासून असून पंचायतीच्या मुख्याला दावर असें म्हणतात. अलीकडे पारशी विवाह, घटस्फोट, वारसा, वगैरे बाबींचे कायदे पास झाले असून सरकारी कोर्टांत तत्संबंधीं खटले चालतात. तरी पारशी पंचायती अस्तित्वांत असून त्या धर्मादाय फंडाची व्यवस्था ट्रस्टी या नात्यानें पाहातात.

*धर्म.*—झोरोआस्ट्रियानिझम धर्माचा मूळ संस्थापक झोरोआस्टर (मृत्यु ख्रिस्तपूर्व ५८३) यास मानतात (पहा) पण वास्तविक हा मूळ धर्मसंस्थापक नसून केवळ धर्मसुधारक होता. पारशी लोक हे प्राचीन आर्यलोकांचीच एक शाखा असून त्यांचा धर्म भारतीयांच्या वैदिक धर्माप्रमाणें फार जुना आहे इतकेंच नव्हे तर त्याचें वैदिक धर्माशीं फार साम्य आहे. त्यांच्या जुन्या धर्माला पोईरीओत्कएश हें नांव असून अग्नि, सूर्य, चंद्र, आकाश, वगैरेंनां ते स्वतंत्र देवता मानीत. आथ्रवन हे त्यांचे पुजारी व यजन (यज्ञ) करणें व हओम (सोम) रस पिणें, हे मुख्य धर्मविधी होते झरथुष्ट्र (झोरोआस्टर) यानें त्यांत सुधारणा करण्याकरितां मुख्य तत्त्व हें प्रतिपादिलें कीं परमेश्वर एक आहे व इतर देवता त्याच्या अंकित आहेत. जगतांत जें वाईट आहे तें परमेश्वरानें उत्पन्न केलें नसून तें उत्पन्न करणारी अहरिमन् ही दुष्ट शक्ति आहे. परमेश्वराचें नांव अहुरमज्द व त्याचा मुख्य गुण वोहुमन (उत्तम मन) हा आहे व त्याचा अर्थ परोपकार किंवा प्रेम असा आहे. पारशांचा मुख्य धर्मग्रंथ अवेस्ता असून पारशांचे मुख्य धर्मविधी नामकरण, विवाह, नवजोत, व मृतसंस्कार हे चार आहेत. विशेष माहिती 'बुद्धपूर्व जग' (विभाग तिसरा, प्र. ८, पर्शुभारतीय संस्कृति) यांत पहा.

पारशी लोकांत जशी जूट दिसून येते तशी हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याहि जातींत नाहीं. स्वबांधवांनां मदत करण्याकरितां श्रीमान पारशी लोक नेहमीं तयार असतात. त्या समाजांत निरनिराळे धर्मार्थ फंड आहेत व त्यांचा विनियोग उत्तम प्रकारें केला जातो हें पुढील पारशी (मुंबई) धर्मपंचायतीच्या (१९२३ सालच्या) अहवालांतून घेतलेल्या त्रोटक माहितीवरूनहि दिसून येईल.—

*पारशी पंचायतीमार्फत चाललेल्या धर्मखात्याचे तीन* प्रकार आहेतः (१) ज्या खात्यांच्या कामाची वहिवाट खुद्द पंचामार्फत केली जाते अशीं खातीं, अशीं खातीं एकंदर ४५ आहेत. (२) ज्या खात्यांच्या कामाची वहिवाट पंचांमार्फत होत नसून दुसऱ्या व्यवस्थापकामार्फत केली जाते अशीं खातीं, अशा खात्यांची संख्या ७० आहे. (३) खाजगी लोकांच्या नांवांनें असलेलीं खातीं, याची संख्या ३१४ आहे.

स्थावर मिळकतः -(मुंबई) ह्युजरोडजवळील घरांची संख्या १८ असून त्यांची किंमत रु. ७८९१५६-६-९ आहे. शिवाय इतर ठिकाणीं सुमारें १७ मिळकती असून त्यांची किंमत २३६६२३९-११-२ आहे या मिळकतींत दोन सॅनिटेरियम, चार इस्पितळें, एक आरामगृह, एक रवानगी (प्रेत) गृह; दोन धर्मशाळा, व गृहें इत्यादिकांचा अंतर्भाव होतो.

सन १९२३ *ह्या वर्षाच्या सुरवातीला* रु. ११४१४८३८-०-८ जमा होती, ती त्याच वर्षाच्या शेवटीं रु. ११९४२११८-३-९ झाली, म्हणजे ह्या वर्षी ४४७२८०-३-१ वाढ झाली. अहवालाच्या सालीं सहा स्त्री-पुरुषांना धार्मिक स्वरूपांत मदत देण्यांत आली प्रेतवाहक खातीं रु. ५०२४९-६-४ खर्च झाला. गरीबांनां अन्नवस्त्र, औषधपाणी वगैरे देण्याच्या कामीं रु. १३६७-८-० खर्च झाला. मुंबईतील पारशी धर्मशाळेबाबत रुपये १९८८३-१४-६ खर्च झाला मुंबईतील आंधळ्या-पांगळ्या पारशी लोकांनां रु. २७४५६ मदतीदाखल खर्च झाले. मुंबईतील अडचणींत सांपडलेल्या कुलीन लोकांना रु. ६७३५ मदतीदाखल देण्यांत आले गरीब असहाय विधवांनां रु. ९६४८ मदत म्हणून देण्यांत आले. मुंबईतील गरीब असहाय लोकांनां प्रेतयात्रेकरितां मदतीदाखल रु. १९६४-१२-० देण्यांत आले. गरीब बालसंरक्षणखातीं पुष्कळ मदत देण्यांत आली. गरीब असहाय मुलींचीं लग्नें करण्यासाठीं रु. २९२५ मदत देण्यांत आली. खेड्यापाड्यांतील असहाय लोकांना वर्षश्राद्ध वगैरे धार्मिक

कार्यावरितां मदत म्हणून रु. १०-३४-६-० खर्च केला मुंबईंतील अनाथ पारशांनां फुक्ट धान्य वांटण्याबाबत रु. ५४६-१२-६ खर्च झाला. गरीब व आजारी लोकांनां मदत म्हणून रु. १९०७-८-० देण्यांत आले. पारशी लोकांचें धर्मशिक्षण व विद्यादान याबाबत रु. ६३९२ खर्च झाला शिक्षकांचा पगार म्हणून रु. ७१८८ व विद्यार्थ्यांनां शिष्यवृत्तीदाखल रु. ३०९० खर्च झाले. ना. सर जमशेटजी जिजीभाई मापांतर फंडामधून २२ पुस्तकांनां मदत म्हणून रु. ४५३२-१३-० व अनाथ बालकें व अनाथ विधवा यांनां दरमहा मदत म्हणून रु. ४९६६-९-६ खर्च झाला. विद्यार्थ्यांनां पुस्तकांची मदत म्हणून रु. ७५-४-० खर्च झाला सराफाशिक्षणफंड व सर जमशेटजी जिजीभाई फंड यांतून अनुक्रमें रु. १५७४५-४-० व रु. ४५९३-५-४ खर्च झाला. पारशी लोकांनां रहाण्यासाठीं म्हणून १९२३साल अखेर १७ इमारती बांधण्यांत आल्या.

१९२३सालीं ट्रस्टी लोकांची सभा भरली होती. देवळाली येथील जमीन लॅण्ड अक्विझेशनमध्यें जाणार होती त्या विरुद्ध केलेल्या खटपटीला यश आलें. डुंगरवाडीसमोर नवीन १५ झोंपड्या रु. १०००० खर्चून प्लेगनिवारणार्थ म्हणून बांधण्यांत आल्या.

आजच्या गरजा:—(१) प्रेतसंस्कार फंडाची वाढ. (२) असहाय लोकांनां मदतफंड—वाढ. (३) मुंबईंतील अंध-पंगूंनां मदत फंड-वाढ. (४) चौपाटीवरील धर्मशाळेंतील अनाथांनां मदत फंड-वाढ. (५) गरीबांनां औषधपाणी वगैरे फंड-वाढ. (६) मुंबई व इतर ठिकाणच्या शाळांबाबत फंड. (७) गरीब व असहाय विधवांनां मदत-फंड. (८) गरीब व अनाथ विधवा व मुलें मदतफंड. (९) पारशांनां रहाण्याला इमारती किंवा भाड्याचा खर्च कमीकरण्याबाबत फंड इत्यादि.

पारशी कायदा.-(जुना)हा फक्त वारसाच्या बाबतींतील आहे. सन १८३५ सालीं एक पारशी मयत झाला होता. त्याच्या थोरल्या मुलानें दावा केला कीं, माझ्या मयत बापाच्या ईस्टेटीचा वारस मी एकटाच आहे. त्यावरून त्यावेळच्या पारशी लोकांनीं नामदार इंग्रजसरकारास अर्ज केला कीं त्यास इंग्लंडचा स्थावर मिळकतीचा कायदा लागू पडूं नये. सबब इंग्रजसरकारनें तारीख १५ माहे मे, सन १८३७ रोजीं सन १८३७ चा ॲक्ट नंबर ९ 'दि पारशी चॅटल रिपील ॲक्ट' पसार केला कीं, इंग्लंडांतील स्थावर मिळकतीसंबंधींचा कायदा प्रेसिडेन्सी शहरांतील पारशी लोकांस लागू पडत नाहीं.मुंबई शहराच्या बाहेरगांवीं जे पारशी रहात होते त्यांच्या ईस्टेटीची वांटणी त्यांच्या मरणानंतर सन १८२७ रेग्युलेशन नंबर ४ प्रमाणें होत असे.

ह्याप्रमाणें प्रेसिडेन्सी शहर आणि बाहेरगांवांतील पारशी लोकांचा कायदा एक नसल्याकारणामुळें सन १८६२ सालीं पारशी लोकांकरितां एक कमिशन नेमण्यांत आलें होतें त्यानें आपला तारीख १३।१०।६२ रोजीं एक रिपोर्ट प्रसिद्ध केला आहे; त्यांत त्यानें असें लिहिलें आहे कीं सन १८६२ च्या पूर्वी मुंबई शहरांतील पारशी लोकांच्या मरणानंतर त्यांच्या ईस्टेटीची वांटणी दि इंग्लिश स्टॅट्युट ऑफ डीस्ट्रिब्यूशनप्रमाणें करण्यांत येत होती. त्या कामीं कमिशनच्या आधारें इंग्रजसरकारनें दि पारशी ईनटेस्टेट सक्सेशन ॲक्ट ता. २१ एप्रिल सन१८६५ चा तारीख १०।४।१८६५ रोजीं पसार केला आहे.

दि लॅण्ड् केलॉट्स् ॲक्ट:-हा ॲक्ट सन १८७४ चा ॲक्ट १५ प्रमाणें सन १८६५ चा ॲक्ट २१ शेड्युल डिस्ट्रिक्ट शिवायकरून सर्व हिंदुस्थानांत लागू करण्यांत आला.

सन १८७४ च्या दि शेड्युल ॲक्टप्रमाणें खालीं लिहिलेल्या शेड्युलड डिस्ट्रिक्टवर नमूद केलेला कायदा लागू करण्यांत आला आहे. सिंध पश्चिम नाट पायगुरी, हजरीबाग लाहोरडागा, मानभुम परगणा, डाटभुम डिस्ट्रिक्ट व सिंगभुम डिस्ट्रिक्टांतील लॉट होज जोहनसी डिस्ट्रिक्ट मुक्मोजान व गरला, मिरझापुर डिस्ट्रिक्टमधील दि शेड्युलड भाग, जोसरवापेशावर, कोहट बाजु डेराईस्माईलखान, डेरागाझीखानचे डिस्ट्रिक्ट, अजमेर व मेरवाड व सिलहट डिस्ट्रिक्ट दि नार्थ वेस्टर्न ऑव्हीजसंसत राईचे शेड्युलड डिस्ट्रिक्ट

सदरहु कायद्याप्रमाणें जर एखादा पारशी पुरुष मयत झाला तर त्याच्या मरणानंतर त्याच्या स्थावर-जंगम मिळकतीची वांटणी अशी करावी कीं दरएक मुलीस एक, विधवास दोन व दर एक मुलास चार भाग मिळावे.

जर एखादी पारशी बाई मयत झाली तर तिच्या स्थावर जंगम मिळकतीची वांटणी अशी करावी कीं तिच्या दरएक मुलास एक भाग व तिच्या नवऱ्यास दोन भाग मिळावे.

एखाद्या पारशी पुरुषाच्या मरणाच्या वेळीं जर त्याची स्त्री हयात नसली तर त्याच्या स्थावर-जंगम मिळकतीची वांटणी अशी करावी कीं, दरएक मुलीस एक व दरएक मुलास चार भाग मिळावे.

एखाद्या पारशीबाईच्या मृत्युसमयीं जर तिचा नवरा हयात नसला तर तिच्या स्थावर जंगम मिळकतीची वांटणी अशी करावी कीं दरएक मुलास सारखा हिस्सा मिळावा.

जर एखाद्या पारश्याचा मुलगा व मुलगी त्याच्या हयातींत मरण पावली असेल तर त्याची विधवा अगर भ्रतारास व त्याच्या ट्रस्टीस त्याच्या मयत बापाचा अगर आईचा हिस्सा मिळावा.

जर एखाद्या पारशाच्या मृत्युसमयीं त्याची विधवा अगर एखादा पारशी बाईच्या मृत्युसमयीं तिचा नवरा हयात असेल तर त्यास, कांहीं शेती नसल्यास त्याच्या स्थावर जंगम मिळकतीचे दोन भाग करावे व त्यांतील एक भाग मयताची आई व बाप यास किंवा एक हयात असेल त्यास

मिळावा व मयताची विधवा अगर तिच्या नवऱ्यास दुसरा भाग मिळवा.

जर मयताचे आईबाप दोघेहि जिवंत असतील तर आईचा हिस्सा बापाच्या हिश्श्यापेक्षां निम्मा असावा. कदाचित मयताची आई किंवा बाप जिवंत नसल्यास खालीं दिलेल्या परिशिष्ट अ प्रमाणें मयताच्या बापाच्या नातेवाइकांस त्यांच्या नंबराप्रमाणें निम्मा हिस्सा मिळवा परंतु पुरुष वारसाचा हिस्सा स्त्रीवारसापेक्षां दुप्पट असावा जर ह्याच्या तर्फे कोणी नातेवाईक नसेल तर मयताची विधवा किंवा भ्रतार यास सर्व इस्टेट मिळावी.

जर एखाद्या पारशी पुरुषाच्या आईच्या मरणाच्या समयीं त्यास संतति नसेल व त्याची विधवा किंवा मयत स्त्रीचा भ्रतार नसेल तर परिशिष्ट आ मध्यें नमूद केलेल्या त्याच्या मिळकतीचे वारस यांस त्याच्या नंबराप्रमाणें सर्व मिळकत मिळावी. परंतु एका स्त्रीवारसाचा हिस्सा पुरुषाच्या हिश्याच्या निम्यानें असावा.

पारशी लोकांस दि इंडियन सेक्सेशन ॲक्ट १० सन १८६५ चा भाग ३ व ४ यांतील सेक्शन २५ शिवाय करून भाग ५ वा सेक्शन ४३ लागू पडत नाहीं. बाकीचे सर्व भाग व सेकशन्स पारशी लोकांस लागू आहेत.

परिशिष्ट अः—भाऊ व बहीण ह्यांपैकीं कोणीहि मयतापूर्वी मेले असतील तर त्याचा औरस संतति. आजा व आजी काकी व आत व तिची औरस संतति ह्यांपैकीं कोणी मयताच्या हयातींत वारले असतील तर. पणजा व पणजी व याचे मुलगे व मुली आणि ह्यांपैकीं जर कोणी मयताच्या हयातींत वारले असतील तर त्याची औरस संतति.

परिशिष्ट आ; बाप व आईः—भाऊ व बहीण ह्यांपैकीं कोणी मयताच्या हयातींत वारले असेल तर त्यांची औरस संतति आजा व आजी, काका व आत ह्यांपैकीं कोणीहि मयताच्या हयातींत मरण पावले असतील तर त्यांची औरस संतति. पणजा व पणजी, पणजा व पणजीचे मुलगे व मुली ह्यांपैकीं कोणी मयताच्या हयातींत वारले असतील तर. आईच्या तर्फे भाऊ म्हणजे पहिल्या घरचे भाऊ व बहीण व दुसऱ्या घरचे भाऊ व बहीण ह्यांपैकीं मयताच्या हयातींत कोणीहि मरण पावले असेल तर त्याची औरस संतति. आईचा बाप व बहीण, आईच्या बापाचे मुलगे व मुली ह्यांपैकीं जर कोणी मयताच्या हयातींत वारले असतील तर त्याची औरस संतति. सून-जर तिनें मयताच्या वेळीं किंवा अगोदर पुनर्विवाह केला नसेल तर. भावाची विधवा—जर तिनें मयताच्या मरणाच्या वेळीं किंवा अगोदर पुनर्विवाह केला नसेल तर. आज्याच्या मुलाची विधवा-जर तिनें मयताचे मरणाच्या वेळीं किंवा अगोदर पुनर्विवाह केला नसेल तर. आईच्या आज्याच्या मुलाची विधवा-तिनें मयताच्या मरणाच्या वेळीं किंवा अगोदर पुनर्विवाह केला नसेल तर. मयताच्या मुलीचा भ्रतार-जर मुलीनें मयताच्या मरणाच्या वेळीं किंवा अगोदर दुसरें लग्न केलें नसेल तर. आईच्या आज्याचे आईबाप. आईच्या आज्याच्या बापाचे मुलगे व मुली ह्यांपैकीं जर कोणी मयताच्या हयातींत मरण पावले असतील तर त्यांची औरस संतति. बापाच्या आजीचे आईबाप बापाच्या आजीच्या बापाचे मुलगे व मुली ह्यांपैकीं जर कोणी मयताच्या हयातींत मरण पावले असतील तर त्यांची औरस संतति. [ ले. बमनजी पेस्तनजी, वकील ] ( नुकताच नवीन ॲक्ट झाला आहे )

**पारसनाथ**—बंगाल इलाख्यांत हजारीबाग जिल्ह्याच्या गिरिधी पोटविभागाच्या पूर्वभागीं असलेली एक टेंकडी व जैन लोकांचें पवित्र स्थान. या डोंगराची उंची समुद्रसपाटीपासून ४४८० फूट आहे. दर वर्षी १०००० लोकांचा मेळा ह्या निर्वाण क्षेत्रीं भरतो. पारसनाथाच्या टेंकडीस पूर्वी 'समेतशिखर' म्हणत असत.

**पारसनीस घराणें**—हें घराणें पुणें येथें नांदत आहे. या घराण्याचा मूळपुरुष भिमराव हा शाहूच्या दरबारीं 'फारसनविसीच्या कामावर होता. मराठी दरबारातून परकीय दरबारांशीं जो पत्रव्यवहार होई तो त्यावेळच्या रीतीस अनुसरून फारशींत होई. या कामासाठीं असे फारसनवीस बहुतेक दरबारीं असत. पत्राचा मसुदा प्रथम मराठींत लिहून तो त्याच्या हवाली करीत व मग त्याचें भाषांतर हा करी आणि त्यावर सरकारी शिक्का-मोर्तब होऊन तें पत्र पाठविलें जाई. असले मसुदे ( कांहीं नाना फडणवीस यांच्या हातचे ) या घराण्यांत अद्यापि पहावयास सांपडतात. पुढें पेशवाई झाल्यावर थोरले बाजीराव यानीं भिमरावचा पुत्र बापूजी यास साताऱ्याहून पुण्यास आणून ठेविलें बापूजीनंतर त्याचा पुत्र कृष्णराव यानें व कृष्णरावानंतर त्याचा पुत्र नारायणराव यानें पेशवाई अखेरपर्यंत फारसनविसीचें काम केलें [ वाड-कैफियती ].

**पारिजात**—कुसळें असलेल्या फांद्या व कातरीदार पानें व पतंगाप्रमाणें फुलें असलेल्या झाडांचा वर्ग ( एरिथ्रिना ). हिंदुस्थानांत या झाडाचे सात आठ प्रकार असून त्यांची लागण वन्य व प्रमाणावर केलेली आढळते संस्कृतमध्यें यास पारिजात हें नांव असून मंदार व मदर हीं त्याचीं दुसरीं जातिवाचक नांवें आहेत. याचें फूल नाजूक असून त्याचा सुवास मधुर असतो. समुद्रमंथनापासून काढिलेल्या चौदा रत्नापैकीं हें एक होय. हा वृक्ष इंद्राच्या नंदनवनांतून कृष्णानें द्वारकेस आणल्याची कथा आहे.

**पारियात्र**—परिपात्र, पारियात्रिक अशीं हि नांवें यास आहेत. विंध्यपर्वताचा हा उत्तरभाग असावा.'परिपात्र'हें रूप नाशिकच्या एका लेखावरून काढलेलें आहे. मंदसोर येथील एक शिलालेखांत 'परियात्र' हें रूप आढळतें.

**पारी घराणें**—चोल साम्राज्यांतील, हें एक परंबुनाड येथील प्राचीन व छोटेसें संस्थानिक घराणें होतें. करिकाल चोलाच्याहि पूर्वीपासून हे या ठिकाणीं नांदत होते. या

संस्थानांत ३०० गांवें असत. प्रसिद्ध तामिळ कवि कपिलर यास या घराण्यांतील वेळपारी याचा आश्रय होता. या संस्थानच्या सरहद्दीवर परंबु नांवाचा डोंगर होता. सांप्रत हा प्रांत म्हैसूर संस्थानांतील नीलगिरी ते कोलेरून व कावेरी ते सह्याद्रि यामधील मुलुख होय. वेळपारी हा विद्वानांचा पोशिंदा असल्यानें चेर, चोल व पाण्ड्य या राजांनां त्याच्याबद्दल इतका मत्सर वाटला कीं त्या तिघांनीं मिळून त्याच्यावर चढाई करून त्याचें राज्य खालसा केलें. या राज्याची राजधानी मूळ्ळूर नांवाच्या गांवीं होती. [ अय्यंगार–एन्शन्ट इंडिया ]

**पारोन** ( नरवर )—सेंट्रल इंडिया एजन्सींत ग्वाल्हेरच्या रेसिडेंटच्या देखरेखीखालीं असलेली मध्यम प्रतीची जहागीर. हिच्यामध्यें पारोन गांवाभोंवतालचा सुमारें ६० चौरस मैलांचा प्रदेश आहे. येथील जहागीरदाराचें घराणें फार प्राचीन आहे. तरी हल्लींची जहागीर १८१८ पासूनच चालू आहे. कारण १९ व्या शतकाच्या आरंभीं दौलतराव शिंद्यानें जहागीरदाराच्या पूर्वजांनां पारोनहून घालवून दिलें होतें. १८१८ सालीं ग्वाल्हेरच्या रेसिडेंटच्या मध्यस्थीनें पारोनची जहागीर ( सैन्य काढून टाकून लुटालूट बंद करण्याच्या अटीवर ) माधवसिंगाला मिळाली. १८५७ सालच्या बंडांत माधवसिंगाच्या मागून आलेला त्याचा पुतण्या बंडवाल्यांस सामील झाला होता. परंतु लवकरच इंग्रजास तो शरण गेला यामुळें त्याची जहागीर काढून घेण्यांत आली नाहीं. पुढें त्यानें तात्याटोपी यास पकडून इंग्रजांच्या हवाली केलें, याबद्दल त्याला वंशपरंपरागत वार्षिक १००० रुपयांची नेमणूक मिळाली. त्याच्या मागून त्याचा मुलगा गजेंद्रसिंह गादीवर बसला. हल्लींचा राजा महेंद्रसिंग हा १८९९ सालीं गादीवर बसला. येथील जहागीरदाराला राजा अशी पदवी आहे. जहागिरीची लोकसंख्या ( १९११ ) ६१९९; पैकीं शेकडा ८२ हिंदु आहेत; शेकडा १ साक्षर आहेत. मुंडेरी हें सर्वांत मोठें गांव असून तेंच जहागिरीचें मुख्य ठिकाण आहे. तेथें एक शाळा व दवाखाना हीं उघडण्यांत आलीं आहेत. जहागिरीचें वार्षिक उत्पन्न २५००० रुपये आहे.

**पारोळें**—मुंबई इलाख्यांतील पूर्वखानदेश जिल्ह्यामध्यें अंमळनेर तालुक्यांतील एका पेट्याचें मुख्य ठिकाण. हें ग्रेट–इंडियन–पेनिनशुला–रेल्वेच्या म्हसवड स्टेशनपासून पश्चिमेस २२ मैलांवर आहे. लो. सं. सुमारें १४ हजार. येथील म्युनिसिपालिटी १८६४ सालीं स्थापन झाली. १७२७ सालच्या सुमारास येथील विस्तृत किल्ला बांधला असें सांगतात. या किल्ल्याच्या अवशेषांचें शिल्पकाम फार सुंदर आहे. १८५७ सालीं हें गांव इंग्रजांनीं जप्त करून त्याची तटबंदी पाडून टाकिली. येथें गुरेंढोरें, कापूस, लुगडीं व धान्य यांचा व्यापार चालतो. गांवांत कापसाचे गठ्ठे करण्याचे कांहीं कारखाने आहेत. नैर्ऋत्येस पांच मैलांवर, बोरी नदींतील एका बेटावर महादेवाचें एक सुंदर देवालय आहे.



**पार्डी**, ता लु का व गां व.—मुंबई इलाख्यांतील, सुरत जिल्ह्याचा अगदीं दक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ १६३ चौरस मैल. यांत मुख्य ठिकाण पार्डी व ८० खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ६३६०६. हवा वाईट. वार्षिक पाऊस सरासरी ७२ इंच; म्हणजे सुरत जिल्ह्यांत सर्वांत जास्त पडतो. पार्डी हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. हें बॉंबे-बरोडा आणि सेंट्रल इंडिया रेल्वेच्या फांट्यावर आहे. लोकसंख्या सुमारें चार हजार

**पार्थिआ**—ऋग्वेदामध्यें पृथु राष्ट्राचा उल्लेख, सुदासाचे सहकारी म्हणून आढळतो. कुंतीसहि पृथा असें नांव होतें. ती कदाचित पार्थिआची राजकन्या असेल. पृथूंच्या देशासच पार्थिआ हें नांव असावें. पार्थिआ देश कास्पियन समुद्राच्या आग्नेयीस होता. हा एलबुर्झ पर्वताच्या ओळीपासून हिरातपर्यंत पसरला होता. याच्या उत्तरेस हरकेनियाचें सुपीक मैदान, व दक्षिणेस इराणचें क्षारमय ओसाड मैदान होतें. हा सध्यांचा खोरासान प्रांत होय. त्यांत एक इराणी जात असून तिचें पार्थव नांव दरायसच्या शिलालेखांत आढळतें. प्रथम हा प्रांत ॲकिमेनियन व नंतर मॅसिडोनियन साम्राज्यांत होता. पार्थिआची राजधानी हेकॅटोम्पिलास या ग्रीक नांवानें प्रसिद्ध होती. हें पहिल्या सेल्युकसनें वसविलें असें म्हणतात.

आर्सेसीजनें पार्थिआच्या अंड्रागोरस नांवाच्या सत्रपास मारून पार्थिअन राज्याची स्थापना केली. सेल्युसिद साम्राज्यांत चाललेल्या उलाढालीमुळें याचें चांगलेंच फावलें. याला बॅक्ट्रिआच्या डिओडोटसची फार भीति वाटत असे. दुसऱ्या सेल्युकसनें पूर्वेस स्वारी केली होती. परंतु त्याला लवकरच परत जावें लागल्यामुळें आर्सेसीजनें आसाक येथें स्वतःस राज्याभिषेक करविला. भटकणारे सिथियन लोक राज्यकर्ते झाले; त्यांनां जहागिरी देण्यांत आल्या. पुढें लवकरच हे सिथियन लोक पार्थियन लोकांत मिसळले व त्यांनीं झोरोआस्टर धर्म स्वीकारला. त्यांच्या भाषेस व लिपीस पह्लवी ( म्हणजे पार्थियन ) हें नांव अलीकडील इराणी लोकांनीं दिलें. या राज्यांत ग्रीक संस्कृतीचा थोडा बहुत अंमल होताच. आर्सेसिज नंतरच्या राजांसंबंधीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. पहिल्या फ्राएटीसनें मीड ( मग ) जातीला वठणीवर आणिलें. पहिल्या मिथ्रिडाटीसनें (ख्रि.पू.१७०-१३८) पार्थियन साम्राज्याचा पाया घातला. याला बॅक्ट्रियांतील ग्रीकांशीं बरेंच झगडावें लागलें. चवथ्या ॲंटिओकसच्या मरणानंतर (ख्रि.पू.१६३) यानें मीडिआ जिंकला व ऱ्हेगी शहराची आर्सेसीया नांवानें पुन्हां स्थापना केली; ख्रि.पू. १४१ त बॅबिलोनियावर स्वारी केली. यानें व याचा मुलगा दुसरा फ्राएटीस यांनीं हें राज्य युफ्रेटीसपर्यंत वाढविलें. याच्या

पुढील इतिहासाच्या माहितीसाठीं ज्ञानकोश विभाग ४ पृ. ५२-५५ पहा.

**पार्नेल, चार्लस स्टुअर्ट** ( १८४६-१८९१ ).—एक आयरिश पुढारी. याच्या घराण्यामध्यें पुष्कळ प्रसिद्ध कवी व मुत्सद्दी होऊन गेले होते. पार्नेलचें घराणेंच इंग्रजद्वेषी होतें. तेव्हां पार्नेलच्याहि मनांत उपजतच इंग्रजांविषयीं द्वेषबुद्धि असल्यास त्यांत नवल नाहीं. पार्नेलची घरची स्थिति सुसंपन्न होती. त्याचें शिक्षण केम्ब्रिज येथील मॅग्डेलन कालेजमध्यें झालें.

आपल्या पूर्वआयुष्यांत त्यानें राजकारणाच्या बाबतींत मुळींच लक्ष घातलें नाहीं. पण १८६७ सालीं मँचेस्टर येथें जो दंगा झाला त्यामुळें त्याचें राजकारणाकडे प्रथम लक्ष वेधलें. एका पोटनिवडणुकींत तो निवडून आला. यावेळीं पार्लमेंटमध्यें आयरिश लोकांचें अगर सभासदांचें नेतृत्व आयझॅक बट याजकडे होतें. पार्लमेंटमध्यें अडवणुकीनें कार्यभाग साधण्याचा मार्ग त्याला बिलकुल पसंत नसे. पार्नेलची स्थिति मात्र याहून निराळी होती. तो इंग्रजांचा पक्का द्वेष्टा असल्याकारणानें अडवणुकीच्या मार्गानें कार्यभाग साधून घेण्याच्या पूर्ण मताचा तो होता. तेव्हां पार्नेल व जोसेफ बिगर या दोघांनीं मिळून शक्य तितक्या सूचना पार्लमेंट सभेपुढें आणून पद्धतशीर रीतीनें पार्लमेंटच्या कामकाजांत अडथळा आणण्यास सुरवात केली. या कामांत जहाल लोकांचीहि त्यांनां सहाय्य मिळालें. फीनियन म्हणजे उवलज्जहाल लोकांनां हा मार्ग असावा तितका पसंत नव्हता. पण 'तुमच्या दांडगाईच्या चळवळी तरी आजपर्यंत अयशस्वी ठरल्याच कीं नाहीं ? मग हा मार्ग तरी एकदां अवलंबून पहा' असें त्यांनां तो सांगत असे. अशा रीतीनें फीनियन लोकांची त्यानें समजूत घालण्यास सुरवात केली. सन १८७९ मध्यें आयरिश शेतकऱ्यांवरील बोजा कमी करण्यासाठीं व त्यांचें इंग्रजांपासून रक्षण करण्यासाठीं म्हणून लँडलीग नांवाची एक संस्था मायकेल डेव्हिडप्रभृति पुढाऱ्यांनीं स्थापन केली. पार्नेलनेंहि त्या संस्थेला आपली संमति दिली होती.

पार्लमेंटमध्यें त्यानें शेतकऱ्यांसंबंधींची चळवळ सुरू केली. त्यानें शेतकऱ्यांनां आपल्या हितशत्रूंवर बहिष्कार घालण्याचा उपदेश केला व त्याप्रमाणें उदाहरणें घडून येऊं लागलीं. सर्व देशांत खळबळ उडाली, यामुळें अधिकारी लोकांनीं पार्नेल वगैरे पुढाऱ्यांवर खटला केला. पण ज्यूरीमध्यें मतभेद झाल्यामुळें तो व इतर पुढारी दोषमुक्त ठरले. ग्लॅडस्टननें आपलें नवीन लॅंडलीग बिल पुढें आणलें व पार्नेलच्या मताला न जुमानतां पास करून घेतलें. त्यांतील कलमें आयरिश लोकांस सर्वस्वीं मान्य नसल्याकारणानें पुनः कर न देण्याची चळवळ सुरू झाली. तिकडे दंगे सुरू झाले. पॅर्नेलला पकडल्यांशिवाय या कायद्याची अंमलबजावणी करतां येणार नाहीं असें वाटल्यावरून ग्लॅडस्टनच्या परवानगीनें तो १८८१सालीं आक्टोबरच्या १७व्या तारखेस पकडला गेला.

पण पॅर्नेल तुरुंगांत गेल्यानेंच त्याचें वजन लोकांमध्यें वाढूं लागलें. कर मुळींच न देण्याचे जाहीरनामे पार्नेल व इतर पुढाऱ्यांच्या सहीनें जिकडे तिकडे फडकविण्यांत आले; व त्यामुळें ही चळवळ अधिकच फैलावली. ग्लॅडस्टन यास दडपशाहीचें धोरण पसंत नसल्यामुळें त्यानें पार्नेलशीं तडजोडीचें बोलणें सुरू केलें; व पार्नेलचा मित्र कॅप्टन ओशी याच्या खटपटीनें पुष्कळ भानगडीनंतर एकदांचा तह झाला. या तहाला किलमैनहॅमचा तह असें म्हणतात. या तहान्वयें असें ठरलें कीं, जर शेतकऱ्यांच्या डोक्यावर शिलकी खंडाचा बोजा पडलेला आहे तो कसा तरी फेडून घेण्यास सरकार तयार असेल तर पार्नेलप्रभृति पुढाऱ्यांनीं खंड न देण्यासंबंधींचा जाहीरनामा परत घ्यावा. तसेंच हे जुलमी कायदे रद्द होऊन इंग्लंडप्रमाणेंच आयर्लंडवरहि सढळ हातानें राज्य करण्यांत यावें, अशीहि इच्छा पार्नेलनें त्यांत प्रदर्शित केली होती. अशा रीतीनें तह झाल्यावर पार्नेल व इतर पुढारी यांची सुटका झाली. पण हा तह फार दिवस टिकला नाहीं, कारण थोड्याच दिवसांनंतर आयर्लंडचे नवीन सेक्रेटरी कॅव्हेंडिश, व बर्क नांवाचे एक गृहस्थ या दोघांचा एका दुष्ट मनुष्यानें खून केला. पार्नेलनें डिलन व डेव्हिड या पुढाऱ्यांच्या मदतीनें एक जाहीरनामा काढला व त्यांत या कृत्याचा जोरानें निषेध केला. पण या फिनिक्स पार्कमधील हकीकतीच्यानंतर पार्लमेंटमध्यें पार्नेल फारसा झळकला नाहीं. पुष्कळ सभांनां तो हजर देखील राहूं शकला नाहीं. थोडक्याच दिवसानंतर पॅार्लमेंटच्या निवडणुकीचा खर्च भागविण्याकरतां व आपली त्याच्या संबंधीची कृतज्ञता व्यक्त करण्याकरितां आयरिश लोकांनीं त्याला ३७ हजार पौंडांची थैली अर्पण केली.

लँडलीग नाहींशी झाल्यावरोबर तिच्या जागीं पार्नेलनें १८८२ सालीं आयरिश नॅशनल लीग या नांवाची एक नवीन संस्था स्थापन केली. त्या संस्थेचें ध्येय आयर्लंडला स्वतंत्र पार्लमेंट मिळवून देणें व सनदशीर रीतीनें राजकीय चळवळ करणें असें जाहीर करण्यांत आलें. पार्नेल हा त्या संस्थेचा अध्यक्ष होता.

ग्लॅडस्टननें पुन्हां १८८६ सालीं होमरूलबिल पुढें आणलें, पण दुर्दैवानें तें नापास झालें व प्रधानमंडळानें राजीनामा दिला. यावेळीं पार्नेलचें वजन इंग्लिश लोकांच्या वरच्या वर्गामध्यें फार होतें त्याच्या शब्दाला हॅाउस ऑफ कामन्समध्येंहि विलक्षण मान असे. त्याचें व लिबरल पक्षाचें चांगलें सूत होतें. त्यानें पूर्वी जे ठराव पुढें मांडलेले होते तें त्यावेळीं जरी नापास झाले होते तरी शेवटीं त्यांपैकीं पुष्कळ पार्लमेंटनें मंजूर केले होते; व १९ व्या शतकाच्या अखेरीस आयर्लंडला जें बरेंच स्वातंत्र्य मिळालें तें पार्नेलच्या प्रयत्नामुळें मिळालें होतें. यामुळें तो आयर्लंडचा

अनभिषिक्त राजा असें म्हणवून घेण्यास सर्वस्वी पात्र झाला होता व लोकहि तसेंच म्हणत असत.

१८८७ सालीं त्याची लोकप्रियता वाढण्याला एक नवीनच कारण झालें. पार्नेलचा पहिल्यापासून द्वेष करणारें लंडन टाईम्स वर्तमानपत्र यानें, पार्नेलचा सूड घेण्याच्या निमित्तानें 'पार्नेलची चळवळ व अत्याचार' या नांवाखालीं लेखमाला छापण्यास सुरुवात केली. ही लेखमाला पार्नेलच्या पिगट नांवाचा एका शत्रूनें लिहिण्यास सुरुवात केली. त्या देशद्रोह्यानें कांहीं खोटीं बनावट पत्रें तयार करून पार्नेलला फिनिक्स पार्कमधील खून पसंत होते असें दाखविण्याचा निंद्य प्रयत्न केला होता. यामुळें पार्नेलच्या विनंतीस्तव एक स्वतंत्र कमिशन आरोपाच्या चौकशीसाठीं नेमण्यांत आलें. त्यांत पिगट नांवाच्या इसमाचें कृत्य उघडकीला येऊन त्याला पकडण्याच्या अगोदरच त्यानें आत्महत्या केली. पार्नेल यास निर्दोषी ठरविण्यांत आलें. यामुळें त्याची लोकप्रियता तर अधिकच वाढली व यामुळें ग्लॅडस्टनच्या मंडळांत त्याचा व त्याच्या मित्राचा मोठ्या मानानें प्रवेश झाला. पुढें १८८९ सालीं, पार्नेलनें ग्लॅडस्टनसाहेबाची मुलाखत घेऊन होमरूलाविल पुढें आणण्यासंबंधीं वाटाघाट केली.

अशा रीतीनें पार्नेलच्या यशाचा जरी कळस झाला होता तरी पण पार्नेलच्या दुर्दैवानें त्याचें हें यश टिकलें नाहीं. कारण कॅप्टन ओशि या नांवाच्या एका आयरिश सभासदानें पार्नेलशीं व्यभिचार केल्याच्या आरोपावरून आपल्या बायकोवर घटस्फोटाचा दावा केला. अर्थातच पार्नेल हा त्यांत प्रतिवादी होता. तो राजकीय पुढारी असतांना त्याला पुष्कळ सुंदर स्त्रिया भेटल्या होत्या. तरी पण त्याच्या हातून कधींहि गैरवर्तन घडलें नव्हतें. पण या स्त्रीनें प्रथम भेटीलाच पार्नेलला मोहपाशांत अडकविलें. सदरहू दाव्यांत पार्नेलनें आपल्या बचावाचा प्रयत्न केला नाहीं व त्यामुळें कॅप्टन ओशी याला घटस्फोटाची परवानगी मिळून नंतर पार्नेलचें व मिसेस ओशि बाईचें इ. स. १८९१ मध्यें लग्न झालें.

वास्तविक पहातां एखाद्या कर्तृत्ववान पुढाऱ्याच्या खासगी आचरणांत एखादा दोष आढळून आला तर राष्ट्रहिताच्या दृष्टीनें त्याच्याकडे दुर्लक्ष करणें जरूर होतें; ग्लॅडस्टन हा सच्छील व पापभीरु मनुष्य असून धर्माभिमानी लोकांच्या हातांत असल्यामुळें त्यानें आयरिश सभासदांस पार्नेलचें पुढारीपण रद्द करण्यास लावलें. यापुढें पार्नेल आयरिशांचा पुढारी म्हणून राहिला नाहीं.

पार्नेलमध्यें इंग्रजांविषयींचा द्वेष बलवत्तर असल्याकारणानेंच त्याच्या हातून एवढें प्रचंड कार्य घडून आलें. या इंग्रजांच्या द्वेषावरच त्यानें आयर्लंडमधील सर्व पक्ष आपल्या बाजूला ओढून घेतला. १० वर्षें आपल्या पक्षामध्यें अभेद्य एकी ठेवून त्या एकीच्या द्वारें आयर्लंडमध्यें उत्साह व जोम उत्पन्न करून त्या जोरावर आयर्लंडमध्यें अभूतपूर्व अशी जागृति त्यानें केली. ओकोनेल हा पार्नेलपेक्षांहि जाडा विद्वान व वक्ता होता. पार्नेलला आयरिश इतिहासाचें अगर धर्माचेंहि जवळ जवळ मुळींच ज्ञान नव्हतें तरी लोकमताची नाडी ओकोनेल, बट वगैरे पुढाऱ्यांपेक्षांहि त्याला अधिक समजत होती. लोकमत आपल्या बाजूला ओढण्याची कला त्यानें चांगली साध्य करून दाखविली. पण इंग्रजांविषयीं हाडवैर, लोकपक्षाची सहानुभूति व पार्लमेंटमध्यें दाखविलेलें चातुर्य या तीन गुणांवर त्यानें आपल्याला आयर्लंडचा अनभिषिक्त राजा ही पदवी प्राप्त करून घेतली.

**पार्मा**—इटली एका प्रांताची राजधानी. हें पो नदीस मिळणाऱ्या पार्मा नदीच्या तीरावर असून बलोन्जच्या वायव्येस ५५ मैलांवर आहे. येथील लोकसंख्या १९१२ सालीं ५४५८४ होती. हें शहर लोम्बार्डच्या सुपीक मैदानांत आहे. पुष्कळ ठिकाणीं पार्मा नदीचे कालवे पसरले आहेत. शहरांत एक भव्य चौक असून त्यांत गव्हर्नरचा वाडा व म्युनिसिपालिटी अशा दोन सुंदर इमारती आहेत. तेथें असम्शन नांवाचें एक संगमरवरी दगडाचें भव्य प्रार्थनामंदिर आहे.

इसवी सन १६०१ सालीं पडिल्ला रानिसओ यानें येथें एक विद्यापीठ स्थापिलें. या पीठांत कायदा, वैद्यक आणि सृष्टिशास्त्र ह्यांच्या शाखा असून एक प्राणिसंग्रहालय आहे. येथें धान्याचा आणि जनावरांचा व्यापार असून एक गोरसशाला (डेरी) आहे.

ख्रिस्ती शकाच्या पूर्वी १८३ सालीं पार्मा ही रोमन लोकांची वसाहत होती. ११,१२ आणि १३ ह्या तीन शतकांत चालू असलेल्या ग्यूलेफ आणि घिबेलाइनच्या तंट्यांत पार्मा सामील होतें. पार्माचे लोक ग्यूलेफच्या बाजूनें लढत होते. दुसरा फ्रेडरिक यानें १२४८ सालीं पार्माला वेढा दिला. परंतु त्याचा कांहीं फायदा झाला नाहीं. इसवी सन १३०७ सालीं हें कॉरोडीओ घराण्यांत गेलें. परंतु पुन्हां लवकरच स्वतंत्र झालें. १३४६ सालीं व्हायकाउंटनें तें विकत घेऊन तेथें एक बालेकिल्ला बांधला. इसवी सन १५१२ पासून ४५ पर्यंत पार्मा येथें पोपची सत्ता होती. यानंतर पार्मा येथें ८ ड्यूकांनीं राज्य केलें.

**पार्लमेंट**—ग्रेटब्रिटन व आयर्लंड या संयुक्त राज्याचें जें कायदेमंडळ त्याला पार्लमेंट म्हणतात. हें कायदेमंडळ राजा, लार्डांची सभा व कामन्स सभा मिळून बनलें आहे. या कायदेमंडळांत राजाला सर्वांत श्रेष्ठ प्रतीचा दर्जा असून लार्डांच्या सभेंतील इसम तोच नेमतो. पार्लमेंट भरविणें, भरण्याचें ठिकाण व काळ ठरविणें, पार्लमेंट सभा तहकूब करणें किंवा बरखास्त करणें व नव्या निवडणुकीचे हुकूम करणें हे सर्व राजाचे अधिकार आहेत. पार्लमेंट दरसाल भरविलीच पाहिजे अशाबद्दल कायदा तिसऱ्या एडवर्ड राजाच्या वेळेपासून अनेकदां पास झाला, पण त्याचें उल्लंघनाहि अनेक

राजांनीं केलें, आणि दुसरा चार्लस व विल्यम आणि मेरी यांच्या कारकीर्दीत तर तो कायदा रद्द करण्यांत आला. तीन वर्षांत एकदां तरी पार्लमेंट भरविलें पाहिजे असा हल्लींचा कायदा आहे. पण सरकारी जमाखर्चाला पार्लमेंटची मंजुरी दरसाल घ्यावी लागत असल्यामुळें दर वर्षास पार्लमेंट भरविणें राजास भागच पडतें. पार्लमेंटची दरसालची बैठक भरली कीं, तींत प्रथम राजा स्वतः किंवा प्रतिनिधी-मार्फत भाषण करून सभा बोलावण्याचीं कारणें सांगतो आणि नंतर कामास सुरवात होते. लॉर्ड व कामन्स दोन्ही सभांत जे ठराव मंजूर होतात त्यांनां शेवटीं राजाची संमति मिळाल्यावर त्यांस कायद्याचें स्वरूप येतें. राजाला व्हीटोचा म्हणजे दोन्ही सभांनीं मंजूर केलेला ठराव रद्द करण्याचा अधिकार आहे, पण या अधिकाराचा उपयोग करण्याचा प्रसंग राजा आणीत नसल्यामुळें तो अधिकार असून नसल्यासारखाच झाला आहे.

लॉर्डांच्या सभेचे अधिकार.—लॉर्ड दोन प्रकारचे—एक गृहस्थ पेशाचे (टेंपोरल) व दुसरे भिक्षुकी पेशाचे (स्पिरिच्युअल)—असतात. लॉर्ड ही पदवी कांहींना वंशपरंपरा असते व कांहींना फक्त तहाहयात असते. ही पदवी देण्याचा अधिकार राजाला असतो. वंशपरंपरा लॉर्ड व स्पिरिच्युअल लॉर्ड हे मिळून राजाचें कायमचें सल्लागार-मंडळ बनलेलें असतें. सर्व लॉर्डांची सभा हें राज्यांतील सर्वांत वरिष्ठ न्यायकोर्ट होय. या न्यायकोर्टाला लॉर्डांचे खटले, लॉर्ड वगैरे पदव्याबाबतचे दावे, स्कॉटलंड व आयर्लंडमधील दाव्यांतील शेवटचीं अपीलें, आणि इंपीचमेंटचे (बड्या अधिकाऱ्यांचे सरकारी गुन्हे) खटले चालविण्याचा अधिकार आहे. लॉर्डांच्या सभेच्या मंजुरीशिवाय कोणत्याहि ठरावास कायद्याचें स्वरूप येत नाहीं; पण अलीकडे हा अधिकार मर्यादित करण्यांत आला आहे.

कामन्स सभेचे अधिकार.—या सभेचे कांहीं विशिष्ट हक्क आहेत. त्यांपैकीं सर्वांत महत्त्वाचा अधिकार असा आहे कीं, कर बसविण्याबाबत आणि सरकारी नोकरांच्या पगारादि खर्चाबाबत मूळ ठराव आणण्याचा अधिकार फक्त याच सभेस आहे, म्हणजे जमाखर्चाबाबत कोणताहि ठराव लॉर्ड सभेला स्वतः पुढें आणतां येत नाहीं, तर कामन्स सभेनें पास केलेले ठराव पास-नापास करण्याचा अधिकार लॉर्डांनां आहे कामन्स सभेच्या सभासदाच्या निवडणुकीबाबत खटले चालविण्याचा अधिकार या सभेस होता, पण १८६८ च्या कायद्यानें हा अधिकार न्यायकोर्टास देण्यांत आला आहे.

पार्लमेंटचे हक्क.—दोन्ही सभांनां कांहीं विशेष हक्क आहेत. या सभाचे हुकूम मोडणारा, सभेच्या कामकाजासंबंधीं उपमर्द करणारा, सभासदांवर हल्ला, त्यांची बेअब्रु किंवा अपमान करणारास त्याच्या गुन्ह्यांची चौकशी करून कैद किंवा दंड करण्याचा अधिकार लार्डांच्या सभेस आहे व कामन्स सभेला कैदेची शिक्षा करण्याचा अधिकार आहे. सामान्य कोर्टांनां या बाबतींत हात घालतां येत नाहीं, किंवा कच्च्या कैद्यास जामिनावरहि सोडण्याचा अधिकार नाहीं.

भाषणस्वातंत्र्याचा हक्क या दोन्ही सभांच्या सभासदांस आहे. सभासदानें कसल्याहि प्रकारचें भाषण केलें तरी त्याबद्दल फिर्याद कोणत्याहि न्यायकोर्टाला घेतां येत नाहीं. तथापि सभेच्या शिस्तीला सोडून कोणी भाषण केल्यास त्याबद्दल निषेध किंवा इतर शिक्षा करण्याचा अधिकार या सभांसदानांच असतो.

तिसरा महत्त्वाचा हक्क कैद न होण्याबद्दलचा. कोणताहि इसम जोंपर्यंत पार्लमेंटचा सभासद आहे तोंपर्यंत कोणत्याहि दिवाणी खटल्याबाबत त्याला कैद करतां येत नाहीं. फौजदारी खटल्यांत मात्र हा हक्क नाहीं. पूर्वीं सभासदांची इस्टेट जप्त करूं नये व त्यांच्या नोकरांनांहि कैद करूं नये असे हक्क होते पण ते काढून घेण्यांत आले. पार्लमेंटच्या कामाकरितां बोलावलेल्या पक्षकार, वकील वगैरेंनांहि हे हक्क आहेत.

पार्लमेंटच्या कामाची पद्धत.—नव्या निवडणुकीनंतर राजा हा पार्लमेंटच्या बैठकीचा दिवस मुक्रर करीत असतो. त्या दिवशीं दोन्ही सभांचे सभासद आपपल्या सभागृहांत जमतात. नंतर कॉमन्स सभेच्या सभासदांना लॉर्डांच्या सभागृहांत बोलावून लार्ड चॅन्सलर, 'दोन्ही सभासदांनीं प्रथम शपथविधि करावा व नंतर राजा पार्लमेंट बोलावण्याचीं कारणें सांगणारें भाषण करील' असें सांगतो; आणि शपथविधीच्याहि अगोदर कामन्स सभेचा स्पीकर (अध्यक्ष) निवडा असेंहि तो सांगतो. त्यानंतर लगेच कामन्स सभेचे सभासद स्वतःच्या सभागृहांत परत येऊन स्पीकरची निवड करतात. दुसऱ्या दिवशीं स्पीकरसह कॉमन्स सभेचे सभासद लॉर्डांच्या सभागृहांत पुन्हां जातात. व तेथें स्पीकरच्या निवडणुकीला राजा संमति दर्शवितो व नंतर स्पीकर कॉमन्स सभेचे अमुक अमुक हक्क व अधिकार आहेत, असा ठराविक पद्धतीनें उच्चार करतो. यानंतर स्पीकर स्वतःच्या सभागृहांत परत येऊन प्रथम स्वतः व नंतर सभासदांकडून राजनिष्ठेच्या शपथा घेववितो. शपथविधि उरकण्यास दोनचार दिवस लागतात. तें काम उरकल्यावर राजा स्वतः किंवा प्रतिनिधीमार्फत आपलें भाषण (किंग्जस्पीच) करून पार्लमेंट भरविण्याचें कारण सांगतो. या भाषणावर टीकात्मक भाषणें उभय सभांत होऊन राजाला पार्लमेंट सभांचें उत्तरात्मक भाषण (ॲड्रेस इन ॲन्सर) सादर करण्यांत येतें.

यानंतर दोन्ही सभा आपापल्या कामकाजाला लागतात. सरकारच्या जमेच्या व खर्चाच्या बाबी ठरविण्याकरतां कमिटया नेमतात. कायद्यांचे मसुदे (बिल्स) व ठराव (मोशन्स) सभेपुढें आणल्या जातात, व त्यांच्या विचाराकरितां कमिटया नेमल्या जातात. लॉर्डांच्या सभेचा अध्यक्ष लॉर्ड चॅन्सलर आणि कॉमन्स सभेचा अध्यक्ष स्पीकर असतो. लॉर्डांच्या

सभेला कोरम तीन जणांचा (मतमोजणीच्या डिव्हिजन-वेळीं तीसजणांचा) आणि कॉमन्स सभेला चाळीसजणांचा असतो.

प्रत्येक गोष्ट दोन्ही सभांत अखेर अध्यक्षाकडून प्रश्न रूपांत पुढें मांडली जाऊन त्यावर होय किंवा नाहीं असा निर्णय नमूद करण्यांत येतो, किंवा ठराव मागें घेण्यांत येतोः किंवा उपसूचना जोडण्यांत येतात. नव्या ठरावाबद्दलची सूचना आगाऊ द्यावी लागते. व दररोजच्या कामकाजाचा खर्डा प्रसिद्ध करण्यांत येतो. अध्यक्षानें प्रश्न पुढें मांडल्यावर वादविवाद सुरू होतो व शेवटीं मतें घेऊन निर्णय लागतो. निर्णय लागलेली गोष्ट त्याच बैठकींत (सेशन) पुन्हां विचाराकरतां घेतां येत नाहीं.

वादविवादाच्या वेळीं प्रत्येक सभासदाला आपल्या जागेवरच उभें राहून भाषण करण्याचा हक्क असतो, एकाच वेळीं एकाहून अधिक सभासद भाषणाकरितां उभे राहिल्यास प्रथम बोलण्याचा निर्णय स्वतः लॉर्ड आपणच आपल्या सभेंत करतात, व कॉमन्स सभेत स्पीकर करतो. बोलण्याची परवानगी मिळाल्यावर सभासदानें सभेपुढील गोष्टीला धरूनच भाषण केलें पाहिजे, अप्रस्तुत व गैरलागू असें भाषण बंद करण्याचा अधिकार अध्यक्षास असतो व तो बजावण्याची वेळ वरचेवर येते. प्रत्येक सभासदाला फक्त एकदाच भाषण करण्याचा अधिकार असतोः मात्र इतरांचा गैरसमज दूर करण्याकरितां किंवा सभेच्या शिस्तीचा नियम नजरेस आणण्याकरितां वाटेल तितक्या वेळां बोलतां येतें. तसेंच मूळ ठराव मांडणाऱ्या सभासदाला अखेर प्रत्युत्तरात्मक भाषण करण्याचा हक्क असतो. अध्यक्षाचे हुकूम स्वतः अध्यक्षच अमलांत आणतो, पण कोणी सभासद हुकूम अमान्य करून सभेच्या कामास अडथळा करूं लागल्यास स्पीकर त्याचें नांव मोठ्यानें उच्चारतो व त्याचें सभासदत्व तात्पुरतें रद्द करणें किंवा इतर शिक्षा करणें ती एकंदर सभेच्या हुकुमाप्रमाणें करतो.

वादविवाद संपल्यावर ठराव मागें न घेतला गेल्यास, त्यावर सभेचें होय किंवा नाहीं हें मत विचारलें जातें, आणि नंतर मतमोजणी होते. तींत अनुकूल-प्रतिकूल मत नांवनिशीसह द्यावें लागतें. मतनोंदणी ही सभागृहाच्या उजव्या बाजूच्या लॉबींत अनुकूल, व डाव्याबाजूच्या लॉबींत प्रतिकूल याप्रमाणें होते. सभासदांची संख्या मोजण्याकरितां प्रत्येक लॉबीशीं दोन सभासद उभे असतात, व शेवटीं त्यांच्यापैकीं एकजण अध्यक्षाच्या टेबलाजवळ येऊन मतांची संख्या जाहीर करतो. अनुकूल व प्रतिकूल मतांची संख्या सारखी भरल्यास लॉर्डांच्या सभेंत एका जुन्या नियमानुसार तो ठराव नापास झाला असें मानतात; पण कॉमन्स सभेंत स्पीकरचें निर्णायक मत (कास्टिंग व्होट) घेऊन तदनुसार ठराव पास किंवा नापास ठरतो.

ठराव पास करण्याची पद्धत.—ठरावांचे सरकारी व खाजगीः असे दोन प्रकार असतात. कॉमन्स सभेंत ठराव मांडण्याला प्रथम सभेची परवानगी मिळाल्यावर बिलाचें वाचन होऊन तें बिल छापून वाटतात. नंतर दुसऱ्या वाचनाच्या वेळीं बिलांतील मुख्य तत्त्वावर वादविवाद होऊन तें तत्त्व मान्य झाल्यास बिलाचा कलमवार विचार, सर्व सभासदांच्या कमिटींत होतो व त्यांत दुरुस्त्या वगैरे झाल्यावर पुन्हां तें तिसऱ्या वाचनाला घेतात, व त्यावेळीं उपसूचनांचा विचार होऊन शेवटीं मतें घेतात; व ठराव पास झाल्यास तो लॉर्डांच्या सभेंत पाठवितात. तेथेंहि वरीलप्रमाणें तीन वाचनें होऊन ठराव मंजूर झाल्यास तो राजाच्या मंजुरीकरतां पाठवितात व ती मंजुरी मिळाली कीं त्याला कायद्याचें स्वरूप प्राप्त होतें. लॉर्डांच्या सभेनें कांहीं उपसूचना पास केल्यास त्या परत विचाराकरितां कॉमन्स सभेकडे पाठवितात व मतभेद दूर करण्याकरितां जरूर तर उभय सभांची एकत्र बैठकहि भरवितात. याशिवाय प्रजाजनांना लॉर्ड व कॉमन्स सभेकडे अर्ज पाठविण्याचा हक्क असतो व अशा अर्जांची व्यवस्था करण्याकरितां एक कमिटी नेमलेली असते.

इतिहासः—ब्रिटिश पार्लमेंटचें मूळ, ॲंग्लोसॅक्सन काळांत (इ. स. ५००–१०००) सांपडतें. सॅक्सन लोकांनीं इंग्लंड जिंकल्यावर त्यांच्या निरनिराळ्या पुढाऱ्यांनीं अनेक लहान लहान राज्यें स्थापिलीं, व पुढारी राजे बनून आपल्या बरोबरच्या सॅक्सन प्रजेच्या संमतीनें राज्यकारभार करूं लागले. राजाचे नातेवाईक, मोठाले जमीनदार आणि चर्चमधील बिशप, आर्चबिशप वगैरे अधिकारी यांचें सल्लागारमंडल बोलावून राजा राज्यकारभार चालवी, हें हल्लींच्या लार्ड सभेचें मूळ होय. शिवाय राज्यांमध्यें टाउन-मूट, हंड्रेड्-मूट, शहर मूट वगैरे सामान्य लोकांच्या सभा असत. या सर्वांहून वरिष्ठ सभा विटेनगेमूट उर्फ शहाण्या लोकांची सभा असून तींत सर्व राज्यांतील शहाणे इसम राजा बोलावी व त्यांचा सल्ला राज्यकारभाराच्या कामीं घेई. विटेनगेमूट हेंच हल्लींच्या कॉमन्स सभेचें मूळ होय. पण या प्रकारच्या सॅक्सन राज्यपद्धतींत नार्मन लोकांच्या स्वारीनंतर एकदम बदल झाला. नार्मन राजे अनियंत्रित राज्यपद्धतींत मुरलेले होते. त्यांनीं इंग्लंडांत सरंजामी पद्धत (फ्यूडल सिस्टिम) सुरू करून केवळ तरवारीच्या जोरावर राज्य केलें. सॅक्सन लोकांच्या जमिनी नार्मन राजांनीं हिरावून घेतल्यामुळें ते उपरी कुळांप्रमाणें शेतकरी किंवा शेतमजूर बनले. या राज्यक्रांतीमुळें सॅक्सन अमलांतील नियंत्रित राज्यपद्धति पूर्ण नष्ट झाली. तथापि नॉर्मन राजांनीं उत्पन्न केलेले फ्यूडल लॉर्ड किंवा बॅरन लोक हेच त्या राजांच्या अनियंत्रित सत्तेचेच नव्हे तर प्रत्यक्ष राज्यसत्तेचे शत्रू बनले आणि आपसांत अनेकवेळां युद्धें होऊन बॅरन लोकांचीं निरनिराळीं घराणीं राज्यपद पावलीं. या भांडणांत बॅरन लोक जनतेची मदत घेत आणि

नॉर्मन बॅरनांचा परकेपणा कमी होऊन ते सॅक्सन लोकांत मिसळूं लागले. जॉन नांवाच्या राजाबरोबर भांडून बॅरन लोकांनीं सन १२१५ मध्यें 'मॅग्नाचार्टा' नांवाची प्रजेच्या हक्काची सनद मिळविली, आणि पुढें तिसऱ्या हेनरीच्या कारकीर्दीत (१२६५) सायमन डी मॉंटफर्ड नांवाच्या बॅरननें राजाला कैद करून स्वतः राज्यकारभार हातीं घेतला व राज्यकारभार चालविण्याच्या कामीं मदतीकरितां पार्लमेंट ह्या नांवाची संस्था कायमची प्रस्थापित केली. तींत बिशप, ॲबट, अर्ल व बॅरन असून शिवाय प्रत्येक शायरमधून दोन दोन नाईट व प्रत्येक बरो (५०हजार वस्तीचें गांव) मधून दोन दोन बर्गेस (नागरिक) याप्रमाणें सभासद होते. पहिल्या एडवर्डच्या कारकीर्दींत या पार्लमेंटच्या बैठकी वेस्टमिनिस्टर येथें भरूं लागल्या व तिसऱ्या एडवर्डच्या वेळीं पार्लमेंटांतील अर्ल,बॅरन वगैरे बड्या लोकांच्या आणि सामान्य लोकप्रतिनिधींच्या बैठकी पृथक् जागेंत भरूं लागून लार्डांची सभा व कामन्सची सभा असे पार्लमेंटचे दोन भाग झाले. सभासदांनां दररोज २ शिलिंग भत्ता मिळे. शिवाय पार्लमेंट सभेंत मुख्यतः राजा प्रजेवर कर बसविण्याची परवानगी मागणार हें ठाऊक असल्यामुळें व आपला उद्योगधंद्याचा वेळ फुकट जाऊं नये म्हणून लोकांचे पुष्कळ प्रतिनिधी सभेला हजर रहात नसत. या वेळीं लार्डांच्या सभेंत अर्ल व बॅरन यांची संख्या ४० पर्यंत असे व ते सर्व बहुधां राजाचे नातेवाईक असत. कामन्स सभेला प्रत्यक्ष कायदे करण्यांत भाग नसे, तर ती सभा विनंतीअर्जाच्या स्वरूपांत आपलें मागणें राजापुढें मांडीत असे व राजा त्या अर्जांनां उत्तरें देत असे. प्रत्यक्ष कायदे स्वतः राजा सांगेल त्याप्रमाणें होत. त्यांत लोकांच्या अर्जांनुरूप कांहीं वेळां कायदे होत,पण कित्येक वेळां लोकांच्या मागणीविरुद्धहि राजा कायदे करी. तथापि हळू हळू कामन्स सभेचे लोक अधिक धीटपणें वागून आपले अधिकार प्रस्थापित करूं लागले. १३७६त पीटर डी ला मेयर नांवाच्या स्पीकरनें त्या वेळच्या युद्धांतील व्यवस्थेबद्दल व लोकांवरील करांच्या जड बोजाबद्दल तक्रार केली व सरकारी खर्चाचा खरा हिशोब सांगण्याबद्दल पार्लमेंटपुढें काम चालविलें (इंपीचड).या शूर स्पीकरला कैदेंत टाकण्यांत आलें; पण पुढील कारकीर्दींत तो सुटला व कामन्स सभेचा पुन्हां स्पीकर (अध्यक्ष) झाला. पुढें ट्यूडर घराण्याच्या वेळीं लार्डांच्या सभेंत बिशप व आर्चबिशप हे भिक्षुकीपेशाचे (स्पिरिच्युअल) लार्ड आणि ड्यूक, मार्किस, अर्ल, व्हायकौंट व बॅरन अशा निरनिराळ्या पांच पदव्यांचे गृहस्थपेशाचे (टेंपोरल) लार्ड असत. टेंपोरल लार्डांची संख्या १५ व्या शतकापर्यंत पन्नासाहून कमी असे; ती एलिझाबेथ राणीच्या वेळीं५९ व तिसऱ्या विल्यमच्या वेळीं १५० होती. कामन्स सभेंत पहिल्या एडवर्डच्या वेळीं २७५, तिसऱ्या एडवर्डच्या वेळीं २५०, व सहाव्या हेनरीच्या वेळीं ३०० सभासद होते, आणि आठवा हेनरी तों दुसरा चार्लस पर्यंतच्या काळांत वेल्समधील २७ व इतर १३० इतके अधिक सभासद कामन्स सभेंत दाखल झाले.

एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत कामन्स सभा राणीचें लग्न, पुढील वारस, व्यापारी परवाने (मोनॉपोली) वगैरे अनेक बाबतींत धीटपणानें स्पष्ट मतें प्रतिपादूं लागली. पहिल्या दोन स्टुअर्ट राजांच्या वेळीं राजा व पार्लमेंट यांच्यामधील भांडण विकोपास जाऊन उभय पक्षांत प्रत्यक्ष युद्ध झालें आणि सैन्याचा पाठिंबा मिळाल्यामुळें कामन्स सभेनें राजाला फांशीं देऊन कॉमनवेल्थ नांवाची लोकशाही राज्यपद्धति स्थापली. ती जरी फार दिवस टिकली नाहीं तरी कॉमन्स सभेनें फारसें नमतें न घेतां पुढील स्टुअर्ट राजांबरोबरहि हक्कांबद्दल निकरानें झगडा केला व अखेर १६८८ च्या राज्यक्रांतीनें पार्लमेंट व राजा यांचे राजकीय हक्क स्पष्टपणें नमूद करून नियंत्रित राज्यपद्धति (लिमिटेड मानर्की) कायमची प्रस्थापिली. पुढें स्कॉटिश यूनियन (१७०७) व आयरिश यूनियन (१८००) यांच्या मुळें १६ स्कॉटिश व २८ आयरिश पीअरांची संख्या लार्डांच्या सभेंत, आणि ४५ स्कॉटिश प्रतिनिधी आणि १०० आयरिश प्रतिनिधी इतकी संख्या कॉमन्स सभेंत वाढली. तिसऱ्या जार्जच्या वेळीं १७७१ पासून पार्लमेंटमधील कामकाजाचा रिपोर्ट प्रसिद्ध करण्याची पद्धत सुरू झाल्यामुळें कामन्स सभेंतील प्रतिनिधींच्या वर्तनावर लोकमताचा अधिक दाब पडूं लागला. यानंतर १९ व्या शतकांत कॉमन्ससभेंत अन्तर्गत सुधारणेला सुरवात होऊन १८३१, १८६७ते१८६८ आणि १८८४ ते१८८५ या तीन सुधारणांच्या कायद्यांनीं (रिफार्म ॲक्ट्स) मोडकळीस आलेल्या गांवांचे प्रतिनिधी पाठविण्याचे हक्क रद्द करून नव्या लोकसंख्या वाढलेल्या व्यापारी शहरांनां प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क देण्यांत आला आणि मतदानाच्या लायकीच्या अटी अधिक सैल करून मतदारांची संख्या वाढवण्यांत आली. ५० हजार लोकसंख्येस एक प्रतिनिधि याप्रमाणें सर्व शहरें व गांवें आणि कौंटी यांच्यातर्फे पाठवावयाच्या प्रतिनिधींची संख्या निश्चित करण्यांत आली व त्यामुळें कामन्ससभेची प्रतिनिधिसंख्या ६७० झाली, जुन्या लंडनतर्फे २; ग्रेटर लंडनतर्फे ६०; लिव्हरपूलतर्फे ९; ग्लासगो ७; एडिंबरो, डब्लिन व बेलफास्ट यांस प्रत्येकीं ४ याप्रमाणें प्रतिनिधी निवडण्याचे हक्क मिळाले.मतदारीचा हक्क कौंटीमध्यें दरसाल जमीनीवरील कर ५ पौंड देणारांस, किंवा सालीना १२ पौंड घरभाडें भरणारांस आणि शहरांत पुअर-रेट्स भरणाऱ्या सर्व लोकांस आणि दरसाल घरभाडें १० पौंड भरणारांस मिळाला. पार्लमेंटच्या नव्या निवडणुकीपूर्वी त्रैवार्षिक (ट्राएनियल ॲक्टप्रमाणें) व नंतर १७१६ पासून सप्तवार्षिक (सेप्टेनियल ॲक्टप्रमाणें) होत असत त्या १९११ पासून पंचवार्षिक होण्याचें ठरलें.

लार्डांच्या सभेचा प्रश्न.—लार्डांच्या सभेचे कामन्स सभेशीं-विशेषतः लिबरल पक्षाचें प्रधानमंडळ असे तेव्हां

फार खटके उडत, कारण लार्डांची सभा ही बहुतांशीं पुराणमतवादी (कॉन्झर्व्हेटिव्ह) असते. १८८०–१८८५ च्या दरम्यान तिसऱ्या रिफार्म ॲक्टच्या वेळीं हे मतभेद फार वेळां झाल्यामुळें लार्डांची सभा सुधारावी किंवा अजीबात बंद करावी अशा सूचना उघडपणें होऊं लागल्या. १८८६ त कामन्ससभेंत लार्डांच्या सभेंतील वंशपरंपरा समासदत्वाची पद्धत नाहींशी करावी, असा ठराव आला, पण ग्लॅडस्टननें विरोध करून तो नापास केला. १८८८ व १८९२ते१८९५ त पुन्हां या प्रश्नासंबंधींच्या ठरावावर बरेच वादविवाद झाले, पण कोणताहि महत्त्वाचा ठराव पास झाला नाहीं. पुढें १९०७ त सर कँबेल बॅनरमनच्या रॅडिकल प्रधानमंडळाच्या वेळीं असा ठराव झाला कीं, कामन्ससभेनें एखादा ठराव तीन वेळां पास केल्यास तो लार्डांच्या सभेच्या मंजुरीवांचूनहि राजाच्या संमतीनें कायदा व्हावा. १९०८ त लॉर्ड रोजबरीच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या कमिटीनें लार्डांच्या सभेंतील वंशपरंपरेच्या हक्कासंबंधानें व नवे लार्ड बनविण्यासंबंधानें महत्त्वाच्या सूचना केल्या. १९०९ त लाईड जॉर्जचें बजेट लार्डांच्या सभेनें नापास केल्यापुढें स्दरहू सुधारणेचा प्रश्न पुन्हां जोरानें पुढें आला. १९१० त या मुद्द्यावर पार्लमेंटची नवी निवडणूकहि झाली, पण त्यावेळीं लिबरल व युनियनिस्ट पक्षाचे समसमान सभासद निवडून आले, तरी आस्क्विथचे तीन महत्त्वाचे ठराव पास झाले तेः (१) कोणताहि पैशासंबंधीं ठराव (मनीबिल) नापास करण्याचा हक्क लार्डांच्या सभेस नसावा, (२) पैशाखेरीज इतर बाबींचे ठराव कामन्स सभेनें तीन वेळां लागोपाठ पास केल्यास लार्डांची संमति नसली तरी तो कायदा व्हावा. व (३) पार्लमेंटची मुदत सात ऐवजीं पांच वर्षांची असावी. यामध्येंच थोडा फेरफार होऊन १९११ चा पार्लमेंटचा कायदा पास झाला त्यांतील मुख्य कलमें:—

(१) कॉमन्स सभेनें एखादें मनीबिल (करवाढीचें कर कमी करण्याचें, जादा कर बसविण्याचें, इत्यादि स्वरूपाचें) पास केलें तर लॉर्डांच्या सभेनें त्याला मंजुरी दिली नाहीं तरी एक महिन्यानंतर तें या नवीन कायद्यान्वयें राजाच्या सहीनें अंमलांत येऊं शकतें. (२) मनी बिलाव्यतिरिक्त दुसरें एखादें 'पब्लिक बिल' कॉमन्स सभेनें पास केलें तर तें नापास करण्याची सत्ता लॉर्डांच्या सभेला नाहीं. फक्त तें बिल लॉर्डांची सभा फार झालें तर लांबणीवर टाकूं शकेल. उदाहरणार्थ १९१४ च्या गव्हर्नमेंट ऑफ आयर्लंडच्या ॲक्टच्या बाबतींत, अशी स्थिति झाली कीं, कॉमन्स सभेने जें आयर्लंडच्या शासनव्यवस्थेसंबंधीं बिल पास केलें तें लॉर्डांनीं तिन्ही बैठकींत फेटाळून लावलें. तथापि राजाच्या परवानगीनें कामन्स सभेनें पास केलेलें बिल अंमलांत आलें. कॉमन्स सभेला, लॉर्डांच्या सभेच्या संमतीशिवाय, कोणतेंहि बिल मंजुरीसाठीं राजाकडे पाठविण्याचा अधिकार १९११ च्या पार्लमेंटच्या कायद्यान्वयें मिळाला. कॉमन्स सभेच्या स्पीकरनें मात्र तें बिल पार्लमेंटच्या सेक्शन नंबर २ च्या नियमानुसार असल्याचें शिफारसपत्र दिलें पाहिजे. तात्पर्य १९११ च्या कायद्यानें कॉमन्स सभेला पुष्कळच अधिकार प्राप्त झाले व लॉर्डांच्या सभेचे अधिकार सामान्यतः कमी झाले असें म्हणावयास हरकत नाहीं.

त्याचप्रमाणें पार्लमेंटच्या, वसाहतींवरील अधिकारांतहि बराच फरक घडून आलेला आहे. साम्राज्यहितविषयक प्रश्नाखेरीज, इतर सर्व वसाहतविषयक अंतर्गत बाबतींत वसाहतींनां, स्वतंत्रपणा देण्यांत आला आहे. वसाहतींसंबंधींचा इंपीरियल पार्लमेंटचा जो मूलभूत कायदा आहे तो रद्द करण्याचा, पार्लमेंटच्या संमतीशिवाय परकीय राष्ट्रांशीं तह करण्याचा अगर इंग्लंड व इतर राष्ट्रें यांच्यांत लढाई सुरू झाली असतां तटस्थ राहण्याचा अधिकार मात्र वसाहतींनां नाहीं.

१९११ च्या कायद्यान्वयें पार्लमेंटच्या अधिकारांत जे फेरफार घडून आले त्यांचे परिणाम फार महत्त्वाचे आहेत. या कायद्यान्वयें, कॉमन्स सभेच्या स्पीकरला बाजवीपेक्षां फाजील अधिकार प्राप्त झाला. पार्टीसिस्टिम उर्फ पक्षशासन पद्धतीला अधिक उत्तेजन मिळालें. मतदारांच्या इच्छेविरुद्ध देखील एखादें बिल पास करण्याचा अधिकार कॉमन्स सभेला प्राप्त झाला. इंग्लंडमध्यें आतांपर्यंत जी लिखित शासन–घटना नव्हती ती थोड्याफार अंशानें अस्तित्वांत आली.

**कामन्ससभेचीअन्तर्गतसुधारणा.**–पार्लमेंटच्या सभासदानें एका विषयावर किती वेळ बोलावें, एखाद्या ठरावाला उपसूचना किती आणाव्या, एका ठरावावर वादविवाद किती चालावा, यासंबंधीं नियम ठरलेले नव्हते. त्यामुळें अधिकारारूढ पक्षाला अडविण्याच्या व त्रास देण्याच्या अनेक युक्त्या विरोधी पक्षानें काढल्या. या अवढणुकीच्या मार्गाचा, १८७५ मध्यें पार्नेल व त्याची आयरिश नॅशनॅलिस्ट पार्टी यांनीं अवलंब केला. १८८१ मध्यें प्रोटेक्शन ऑफ पर्सन्स अँड प्रॉपर्टी (आयर्लंड) बिल हें अगोदर घ्यावें या सूचनेला पार्नेलनें बावीस तास विरोध केला, आणि त्या बिलावरील प्रास्ताविक वादविवाद चार बैठकी (सिटिंग्ज) चालविला, त्यांपैकीं चवथी बैठक एकेचाळीस तास चालली होती. त्या वेळच्या अधिवेशनांत (सेशन) स्पीकरला ९३५ वेळां, आणि कमिटींतील चेअरमनला ९३९ वेळां शिस्तीच्या नियमाचें उल्लंघन केल्याबद्दल ताकीद द्यावी लागली, म्हणजे प्रत्येक ताकिदीच्या वेळीं पांच पांच मिनिटें मोडलीं असें धरलें तरी या ताकीदी देण्यांतच अजमासें १५० तास खर्च झाले. अशल्या प्रकारामुळें वादविवादाला कालमर्यादा घालणें अत्यंत अवश्य झालें. तेव्हां ग्लॅडस्टननें असा ठराव पास करून घेतला कीं, स्पीकरला किंवा चेअरमनला वादविवाद पुरेसा झाला असें वाटतांच त्यानें तो बंद करण्याची सूचना (दि क्लोझर) आणावी व सभेच्या

संमतीनें वादविवाद बंद करावा.पुढें अशी सूचना कोणांहि सभासदानें आणावी असा ठराव पास झाला.याप्रमाणें वादविवादाला मर्यादा घालण्याचा उपाय योजल्यानंतर मूळ ठरावाला ओळीओळीस उपसूचना आणून अडथळा करण्याच्या विरोधी पक्षाच्या धोरणाला आळा घालण्याकरितां 'दि गीलोटीन' म्हणजे प्रत्येक बिलावर वादविवाद किती दिवस चालावा हें आगाऊ ठरविणें, ही युक्ति १८८७ पासून अमलांत आणण्याचें ठरलें. या सालीं क्राईम्स बिलावर कमिटींत फार वेळ वाद चालून फक्त ६ कलमेंच पुरीं झालीं, तेव्हां तेथेंच काम थांबवून उरलेलीं १४ कलमें कमिटीनें वादविवादाखेरीजच पसंत करून पाठविलीं. १८९३ सालीं ग्लॅडस्टनच्या होमरूल बिलाच्या वेळींहि 'गीलोटीनचा' उपयोग करण्यांत आला. बजेटवरील वादविवाद फारच वाढतात, त्यामुळें गीलोटीनचा उपयोग करून अनेक कलमें वादविवादाखेरीजच पास करून घेण्याचा प्रसंग नेहमीं येतो. पार्लमेंटच्या सभा करण्याच्या वेळेंतहि अलीकडे फरक झाला आहे. पूर्वी सभा सायंकाळीं सुरू होऊन रात्रभर चालत; पण अलीकडे सोमवार ते गुरुवार चार दिवस सभेला सुरवात २-४५ वाजतां आणि शुक्रवारीं १२ वाजतांच होते आणि साधारणतः मध्यरात्रीनंतर काम चालत नाहीं.

**पार्वती**—शिवपत्नी. 'उमा' व 'देवी' पहा.

**पार्वतीपुरम्**—मद्रास इलाख्यांतील,विजगापट्टम् जिल्ह्यांतील जमीनदारी तालुका. क्षेत्रफळ ७९९ चौरस मैल. मुख्य ठिकाण पार्वतीपुरम्. खेड्यांची संख्या ४९८. उत्तर भाग डोंगराळ व बाकीचा सपाट आहे.मुख्य ठिकाण पार्वतीपुरम् याची लोकसंख्या (१९११) १६७७३.हें बंगाल, जयपूर, पालकोंडा व विजयानगर यांच्या रस्त्यावर असल्यामुळें येथील व्यापार वाढत चालला आहे.

**पासोली**—राजपुतान्यांतील, उदेपूर संस्थानामध्यें याच नांवाच्या जहागिरीचें मुख्य ठिकाण. हें उदेपूर शहराच्या ईशान्येस ८४ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९०१ )८३१. जहागिरींत एकंदर ४० गांवें आहेत. जहागीरदार वेदला घराण्यांतील चव्हाण रजपूत असून त्याला राव असें म्हणतात. जहागिरीचें उत्पन्न सुमारें २०हजार रुपये आहे.

**पाल**—मुंबई इलाख्यांत, काठेवाडमधील एक लहान संस्थान. यांत पांच गांवें असून तालुकदार जाडेजा रजपूत आहेत.

**पालक**—ही एक पालेभाजी आहे. पालकाचें बीं विलायती वीटच्या बियासारखें असतें. बीं म्हणून जें लावितात तें पालकाचें फळ आहे. पालकाचें झाड जमीनीसरसेंच वाढतें. त्यास दांडा नसतो. पानें हिरवीं, तकतकीत, जाडी, २।३ इंच रुंद व ६ ते ९ इंच लांबीचीं असतात बाजारांत पालकाच्या निराळ्या गड्डया येत नाहींत. शेपू व पालक या दोहोंच्या एकेठिकाणीं गड्डया बांधून विकण्यास आणतात. ही भाजी कनिष्ठ लोकांत विशेष खपते. नुसत्या पालकाची मोकळी भाजी होते.

**पालकोंडा**—मद्रास इलाख्यांतील विजगापट्टम् जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ३३४ चौरस मैल. लोकसंख्या(१९११) २१७१९३. यांत शहरें ३ व खेडीं ३२८ आहेत. मुख्य शहर पालकोंडा. वस्ती दहा हजार.

**पालकोल्लू**—मद्रास इलाख्यांतलि कृष्णा जिल्ह्याच्या नरसापूर तालुक्यामधील एक गांव.हें निडदवोलु स्टेशनपासून २९मैल आहे. लोकसंख्या सुमारें दहा हजार. सातव्या शतकाच्या मध्यकालीं डच लोकांनीं येथें वसाहत केली होती.

**पाल, ख्रिस्तोदास** ( १८३८-१८८४ )—एक बंगाली. हा जातीनें तेली होता. लहानपणापासून, त्याला वक्तृत्वाची व वादविवाद करण्याची फार हौस असे. राजकारणाचीहि त्याला फार आवड असे. कॉलेजचें शिक्षण अर्धवट सोडून बाहेर पडतांच त्यानें वृत्तपत्राच्या धंद्यांत मन घातलें. कॉलेजमध्यें असतांनाच तो 'मॉर्निंग क्रॉनिकल' व 'सिटिझन' या वृत्तपत्रांनां लेख लिहून देत असे; व त्याबद्दल त्याला थोडें फार वेतनहि मिळत असे. पुढें तो हरीशचंद्र मुकरजीनें काढलेल्या 'हिंदु पेट्रियट' या पत्रांत लेख लिहूं लागला. १८६० सालीं मुकरजी वारल्यानंतर त्या पत्राचा तोच संपादक झाला; व आपल्या मरणापर्यंत त्यानें त्या पत्राच्या संपादकाचें काम फार चोख रीतीनें केलें. ख्रिस्तोदास हा उत्कृष्ट लेखक असल्यामुळें कोणत्याहि विषयाचा पूर्ण अभ्यास करून नंतर त्यावर लिहिण्याची त्याची पद्धत असल्यामुळें हिंदु पेट्रियट हें पत्र थोडक्याच अवधींत मोठें वजनदार पत्र होऊन बसलें. वर्तमानपत्राच्या संपादकाशिवाय तो फावल्या वेळांतहि कामें करीत असे. बंगाल जमीनदारांच्या वतीनें असिस्टंट सेक्रेटरी व पुढें सेक्रेटरी या नात्यानें 'ब्रिटिश इंडियन असोसिएशन' या संस्थेमध्यें त्याने काम केलें. १८६३ मध्यें त्याला म्युनिसिपल कमिशनरची जागा व जे. पी.; रावबाहादूर; सी. आय. ई. हे किताब मिळाले. तो व्हाइसरॉयच्या कौन्सिलचा सभासदहि झाला. ख्रिस्तोदास पाल हा मूळचा अत्यंत गरीब होता. तो मनाचा फार उदार असे. त्याचें मत जातिभेदाविरुद्ध असून पुनर्विवाहादि सुधारणेस अनुकूल होतें. १८९४ सालीं त्याचें स्मारक म्हणून कलकत्ता येथें लॉर्ड एल्गिनच्या हस्तें एक मोठा पुतळा उभारण्यांत आला. त्याशिवाय तो ज्या गल्लींत रहात असे त्या गल्लीला त्याचें नांव देण्यांत आलें आहे. [ नगेंद्रनाथ घोष-ख्रिस्तोदास पाल ए स्टडी; ख्रिश्चन लिटरेचर सोसायटी फॉर इंडिया -सम नोटेड इंडियन्स ऑफ मॉडर्न टाइम्स १९०२ ]

**पालखेडा, जमीनदारी**—मध्यप्रांत, जिल्हा भंडारा. गोंदिया स्टेशनपासून पालखेडा १० मैल आहे. क्षेत्रफळ ४१ चौरस मैल. एकंदर खेडीं २१. कामठा जमीनदारीचा मूळपुरुष कोळू पाटील याच्या वंशांतील पांचवा पुरुष देव नांवाचा होता, तोच या जमीनदार घराण्याचा मूळपुरुष

होय. लोकसंख्या सुमारें आठ हजार. उत्पन्न ५५००. टाकोळी ३००० रुपये.

**पालघाट**—मद्रास इलाख्यांतील मलबार जिल्ह्याचा एक अगदीं दक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ ६४३ चौरस मैल. ह्यांत तेरा आमसाम(खेडीं)आहेत.लो.सं.(१९११)४१४००९. मुख्य गांव-पालघाट. लोकसंख्या सुमारें ४५ हजार. पालघाट हें मलबारांत दुसऱ्या प्रतीचें शहर असून येथें एक कॉलेज आहे. येथें धान्याचा व लांकडाचा मोठा व्यापार चालतो.

**पालदेव**—मध्य हिंदुस्थान. वाघेलखंडामधील पोलिटिकल एजन्सीच्या ताब्यांत असलेली एक मध्य हिंदुस्थानांतील चौबे जहागीर. क्षेत्रफळ २८ चौरस मैल. १८१२ मध्यें कालिंजरच्या चोबेवंशाच्या मुख्यास ( दर्यासिंग) ही जहागीर देण्यांत आली. लोकसंख्या सुमारें नऊ हजार. खेडीं २०. उत्पन्न २५००० रुपये. ह्या संस्थानांत हिरे सांपडतात. मुख्य ठिकाण-नवगांव हें कालिंजरच्या दक्षिणेस २४ मैलांवर आहे.

**पालनपूर**, ए ज न्सी.—मुंबई इलाख्याच्या अगदीं उत्तरेस गुजराथमधील एक संस्थानांचा संघ. क्षेत्रफळ ६३९३ चौरस मैल. एजन्सीचें मुख्य ठिकाण–पालनपूर गांव. एकंदर प्रदेश वालुकामय व निर्वृक्ष आहे. मुख्य नद्या बनास व सरस्वती या आहेत. पालनपूर येथें पाऊस ३० इंच पडतो.

अनहिलवाड्याचे रजपूत राजे, दिल्लीचीं खिलजी व तुघ्लखशाही घराणीं, अहमदाबादचे सुलतान, मोंगल पातशहा, मराठे व इंग्रज ह्यांनीं पालनपूर एजन्सीचे वेळोवेळीं, संधि साधून बरेच लचके तोडले. पालनपूर संस्थानाशीं ब्रिटिशांचा संबंध १८०९ पासून आला. राधनपूर संस्थानाशीं १८१३ व इतर संस्थानांशीं ( कांक्रेज सोडून ) १८१९ पासून आला. सिंधच्या लुटारू लोकांपासून फार त्रास पोहोंचूं लागल्यामुळें ह्या एजन्सींतील संस्थानिकांनीं ब्रिटिश सरकारच्या मदतीची अपेक्षा केली. ब्रिटिश सरकारचा कांक्रेजशीं संबंध १८१९–२० पासून आला ह्याच सुमारास महीकांठा-एजन्सी अस्तित्वांत आली. १८४४ पावेतों कांक्रेजचा समावेश महिकांठांत होत असे. पण पालनपूरच्या तें जवळ असल्यामुळें पालनपूर एजन्सींत तें घेण्यांत आलें. पोंवार योद्धा प्रल्हादन देव ह्यानें पालनपूर संस्थान जिंकलें होतें म्हणून पूर्वी त्यास प्रल्हादन पाटण म्हणत असत. १४ व्या शतकांत पालन्सी चव्हाणानें हा गांव फिरून वसविला. १६०० च्या सुमारास झालोरी अफगाणांनीं पालनपूर व डीसा हीं दोन संस्थानें काबीज केलीं होतीं. राधनपूर संस्थान एके काळीं वाघेल्यांकडे होतें. राधनखान नांवाच्या वलुच्यावरून हें नांव पडलें. स.१६९३मध्यें हें कोणा बाबी अधिकारी झाफरखान ह्याच्याकडे सोंपविण्यांत आलें होतें. तें अजून बाबीकडेच आहे. थराड हें पूर्वी चव्हाण रजपुतांच्या ताब्यांत होतें. पण १३ व्या शतकांत तें गांव मुसुलमानांच्या ताब्यांत गेलें तेव्हांपासून त्यांच्याकडेच आहे.

१८२१ सालीं ब्रिटिश सरकारनें थराड संस्थानाचें उत्पन्न दीडपटीनें वाढेपर्यंत त्याच्याजवळून खंडणी घ्यावयाची नाहीं असें ठरविलें. स. १८२५ पासून सर्वांसच खंडणीची माफी देण्यांत आली.स.१८२६मध्यें संस्थानिकांनीं आपल्या संस्थानांत कोळी, रजपूत किंवा इतर शस्त्रधारी मनुष्यांस थारा देणार नाहीं असें कबूल केलें. कदाचित असा एखादा कोणी येऊन राहिल्यास त्यास तावडतोब ब्रिटिशांच्या किंवा बडोदे सरकारच्या ताब्यांत देण्यांत यावें व खो लोकांचें बंड मोडण्यास सर्व प्रकारची सैन्यमदत द्यावी असें ठरलें. ब्रिटिश अमदानीस सुरवात झाल्यापासून सर्वच सुरळीत चाललें आहे. लोकसंख्या ( १९२१ ) ५१८५६६. पालनपूर, राधनपूर व डीसा हीं गांवें असून व ११८८ खेडीं आहेत. एकंदर ई जमीन वहीत आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं उत्तमपैकीं काळी कापसाची जमीन आहे.कापूस, बाजरी, गहूं,कडधान्यें, मूग व ऊंस हीं मुख्य पिकें होत. कांक्रेजचे बैल नांवाजलेले आहेत

एजन्सीच्या उत्तर व ईशान्य भागांतून जंगल आहे. येथें सोरा तयार करतात. निर्गत माल सोरा, धान्य, बीं, एरंड्या, तीळ, कापूस, केवड्याचें व चाफ्याचें अत्तर, गुरें,तूप हा असून आयात माल तंबाखू, फळफळावळ, मसाले, खडीसाखर, साखर, सुती व रेशमी कापड हा आहे.

पालनपूरच्या व राधनपूरच्या संस्थानिकांना आपल्या संस्थानांत पूर्ण हक्क आहेत. परंतु ब्रिटिश सरहद्दींतील लोकांवर खटला करण्याच्या अगोदर पोलिटिकल एजंटची परवानगी घ्यावी लागते. सर्वांवर पोलिटिकल एजंटची देखरेख असते. एकंदर एजन्सीचें उत्पन्न २७ लाखांचें आहे. म्युनिसिपालिटया ४ ठिकाणीं आहेत. डीसा येथें ब्रिटिश सैनिकांची छावणी आहे. शिक्षण मोफत असून शेंकडा ८ लोकांस लिहितांवाचतां येतें.

सं स्था न.—हें मुंबई इलाख्यांतील पालनपूर एजन्सीमधील एक संस्थान. आहे. याचें क्षेत्रफळ १७६६ चौरस मैल. पालनपूरचा संस्थानिक लोहाणी वंशाचा आहे. १६८२ मध्यें औरंगझेबानें झालोर व साचोर घेतलीं तेव्हां लोहाणी पालनपुरास गेले.ह्यांचा ब्रिटिशांशीं संबंध१८०९ मध्यें आला. ह्या वर्षी येथील संस्थानिकाचा खून करण्यांत आला. तेव्हां त्याचा अज्ञान पुत्र गादीवर बसवून राज्यकारभार पाहण्याकरितां ब्रिटिशांस प्रतिनिधित्व दिलें, व त्यांच्या वतीनें त्याचा चुलता राज्यकारभार पाहूं लागला. १८१७ पावेतों चुलत्यापुतण्याचें बिलकुल जमेना. तेव्हां चुलत्यानें बंडावा पुकारला. पण ब्रिटिशांनीं सर्व बंडावा मोडून उत्तम व्यवस्था प्रस्थापित केली व तरुण राजास गादीवर स्थिर केलें व राज्यकारभार एका पोलिटिकल सुपरिन्टेंडेंटकडे सोंपविला. येथील संस्थानिकांस ११ तोफांची सलामी आहे. लोकसंख्या (१९२१) २३६६९४ यांत १ गांव ( पालनपूर ) व ५१० खेडीं आहेत. उत्तर व पश्चिम भागांतील जमीन रेताड आहे. ह्या जमिनींतून वर्षांतून

बहुधा एकदांच पीक काढतात. दक्षिण व पूर्व भागांची डोंगराकडील जमीन काळी, सुपीक आहे. मुख्य पिकें गहूं, तांदूळ, इतर धान्यें व ऊंस हीं आहेत. कापूस, कापडचोपड, धान्य, साखर व तांदूळ यांचा व्यापार चालतो. संस्थानचें उत्पन्न ९ लाखांचें आहे. बडोद्याच्या गायकवाडास येथील संस्थानिक रु. ३८४६२ खंडणी दाखल देतो

गां व.—पालनपूर पोलिटिकल एजन्सीचें हें मुख्य ठिकाण असून पालनपूर संस्थानिकाची राजधानी आहे. गांव खोलांत असून भोंवतालीं टेंकड्या आहेत. १७५० सालीं दिवाण बहादूर खानवीनें उभारलेला तट गांवाभोंवतीं आहे. हवा रोगट आहे. अनहिलवाड्याच्या चावडा वंशाचा संस्थापक वनराजा ( ७४६–८० ) ह्याचें संगोपन येथेंच झालें. १३ व्या शतकाच्या आरंभीं ह्यास प्रल्हादनपाटण असें म्हणत असत, व चन्द्रावतीच्या पोंवार घराण्याच्या प्रल्हादन देवाच्या वेळीं हें राजधानीचें शहर होतें. नंतर हें निर्जन झालें. पण पालनसी चव्हाणानें पुन्हां येथें लोकवस्ती केली. या ठिकाणीं दोन हायस्कुलें आहेत.

**पालनी**—मद्रास इलाख्यांतील मदुरा जिल्ह्याच्या उत्तर भागांत असलेल्या डिन्डीगल नामक पोटविभागामधील एक तालुका. क्षेत्रफळ ५९९ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) २२४४५३. यांत एक गांव (पालनी) व ११७ खेडीं आहेत. तालुक्याच्या दक्षिणेस पालनी टेंकड्या आहेत. षण्मुख, नन्गानजी व नल्लटंगा या नद्या आहेत. मुख्य ठिकाण पालनी ( १७५०१ ) असून येथें सुब्रह्मण्याचें देवस्थान आहे.

**पालम**–हैद्राबाद संस्थानांत परभणी जिल्ह्याच्या दक्षिण भागांतील एक जहागीर. क्षेत्रफळ ५४३ चौरस मैल. जहागीर धरून लोकसंख्या सुमारें एक लाख. गंगाखेड व सोनपेट हीं दोन गांवें आणि १५३ खेडीं आहेत. जहागिरी ३२ असून मुख्य ठिकाण पालम होय. हिच्या उत्तर सरहद्दीवरून गोदावरी नदी वहाते.

**पालमकोट्टा**—मद्रास इलाख्यांतील तिनेवेल्ली जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें तिनेवेल्ली तालुक्यामध्यें असून ताम्रपर्णी नदीपासून एक मैल व तिनेवेल्ली गांवापासून २॥ मैल आहे. पूर्वी गांवाभोंवतीं तट होता. लोकसंख्या ( १९२१ ) ४६६४३. म्युनिसिपालीटीची स्थापना १८६६ सालीं झाली. हवा आरोग्यदायक आहे पण पाण्याची कमतरता भासते. येथें मुलींकरितां एक कॉलेज आहे.

**पालमपूर.**—पंजाब इलाख्यांतील कांग्रा जिल्ह्याची एक तहशील. क्षेत्रफळ ५२३ चौरस मैल. उत्तरेस धवलधार ते दक्षिणेस बिआसपर्यंत सर्व प्रदेश डोंगराळ आहे. ह्या प्रदेशातून बिआस नदीच्या उपनद्या वहातात. लोकसंख्या ( १९२१ ) १३७०५२. हिच्यांत ११३ खेडीं आहेत.

**पालमिरास शिखर**—बंगाल इलाख्यांतील, कटक जिल्ह्याच्या केन्द्रापारा पोटविभागामधील एक भूशिर. उ. अ. २०°४६′ व पू. रे. ८६°५९′ असून दक्षिणेकडून वर हुगळी नदीच्या पात्रांत चढणाऱ्या जहाजाकरितां येथें धक्का आहे.

**पाल राजे, बंगालचे**—यांची विशेष माहिती बंगाल व हिंदुस्थान यांवरील लेखांत पहावयास सांपडेल. यांचा इतिहास ताम्रपटांतून चांगला आढळतो. आठव्या शतकांत कनोजची साम्राज्यसत्ता नष्ट होत चालली तेव्हां बंगल्यांतील सर्व सरदारांनीं गोपाल या सरदारास–तो शूर व मुत्सद्दी असल्यानें आपला राजा केलें. त्याची राजधानी प्रथम पाटणा व मग मोंगीर झाली. त्यानें सर्व बंगाल आपल्या हाताखालीं घातला. हा बौद्धधर्मी होता, तरी हिंदुधर्म मानीत असे; व स्वतःस सूर्यवंशी क्षत्रिय म्हणवी. हा या घराण्याचा मूळपुरुष होय. यानें राष्ट्रकूट, वर्म व वत्स या राजांशीं लढाया केल्या. याची कारकीर्द ७८०–८०० पर्यंत झाली. याच्यानंतर याचा मुलगा धर्मपाल ( ८००–२५ ) गादीवर आला; त्याने कनोजच्या सम्राट इंद्राचा पराभव केला, परंतु पुढें सम्राट नागभटानें धर्मपालाचा पराभव केला, तेव्हां त्याचा सासरा गोविंद ( तिसरा ) राष्ट्रकूट यानें नागभटाचा मोड केला. धर्मपालानंतर देवपाल ( ८२५–५० ), विग्रहपाल ( ८५०–७५ ), नारायणपाल ( ८७५–९०० ), राज्यपाल ( ९००–९२५ ), दुसरा गोपाल ( ९२५–५० ), दुसरा विग्रह ( ९५०–७६ ) व महिपाल ( ९७६–१०२६ ) हे राजे झाले. महिपालाच्या वेळेस गझनीकर महमूदच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर झाल्या; त्यांत याचें राज्य एकदां गेलें होतें, परंतु तें त्यानें पराक्रमानें मिळविलें. याच्यानंतर नयनपाल व दुसरा विग्रहपाल हे राजे झाले. हें घराणें अस्सल क्षत्रिय असल्याने याचे वैवाहिक संबंध राष्ट्रकूट, हैहय या घराण्यांशीं होत. हे प्रथम जरी बौद्ध होते तरी पुढें शैव बनले. त्यांनीं हजारों शिवमंदिरें बांधविलीं, राज्यकारभारांत अनेक सुधारणा केल्या. मात्र भाडोत्री परकीय सैन्य ठेवण्याची घातुक रीतहि यांनींच प्रथम उपयोगात आणली. यांच्या राज्यांत सांप्रतचा बंगाल, बहार, ओरिसा व आसाम इतके देश येत असत. [ स्मिथ–अर्लि हिस्टरी ऑफ इंडिया; वैद्य–म. भारत, पु. २; इंडि. अँटि. पु. ११, १४, १५, २१. ]

**पाललहरा**—ओरिसामधील एक मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ ४५२ चौरस मैल. उत्तरेस बोनई संस्थान; पूर्वेस केओंझर संस्थान; दक्षिणेस तालचेर संस्थान; व पश्चिमेस बामड़ा. संस्थानाच्या पूर्वेस व उत्तरेस डोंगर आहेत. अत्युच्च शिखर मलयगिरी (३८९५ फूट); येथें एक हलक्या प्रकारचे धान्य व गळिताचीं धान्यें पिकतात. येथें व्यापार नाहीं. पहाडांत उत्तमपैकीं सालवृक्ष आहेत. पूर्वी पाललहरा हें केओंझरचें मांडलिक संस्थान होतें व अजूनहि मांडलिक महालांच्या सुपरिटेन्डेंटच्या मार्फत येथील संस्थानिक केओंझरला खंडणी भरतो. संस्थानाचें उत्पन्न २९००० रु. आहे. इंग्रज सरकारास खंडणी २६७ रु. द्यावी लागते. लोकसंख्या

( १९२१ ) २५६८० असून २१५ खेडीं आहेत. यांत चाम व पान लोकांचा भरणा अधिक आहे.

**पालाश** ( परमाणुभारांक ३९.२१४ )—एक धातुरूप रासायनिक मूल द्रव्य. निसर्गांत हें स्वतंत्र स्वरूपांत कधींच आढळत नाहीं. तरी संयुक्त स्थितींमध्यें मात्र तें विस्तृत प्रमाणावर आढळतें. समुद्राच्या पाण्यांत, जर्मनींत स्ट्रासफुर्ट येथील खाणींत, सर्व पृथ्वीवर शैलितांच्या रूपांत व वनस्पतींच्या राखेंत ( पोटॅशियम ) पालाश पुष्कळ असतो. आघाडा, पारिजातक, अडुळसा, व तंबाखू यांच्या राखेंत पालाशाचें प्रमाण विशेष असतें, व सामान्यतः मोठ्या झाडांचे बुंधे व डहाळ्या यांच्या राखेपेक्षां लहान झुडुपांच्या राखेंत पालाश अधिक असतो. प्राण्यांच्या शरीरांत ( पोटॅशियम ) पालाश हा एक अत्यावश्यक अल्कलीपैकीं आहे असें लीबीग म्हणतो. मेंढ्यांच्या अंगांतील बहुतेक अल्कली घामाच्या रूपानें बाहेर येतो व त्यांच्या लोकरीच्या वजनापैकीं सुमारें एक तृतियांश वजन पालाशयुक्त पदार्थांचें असतें.

हा धातु निराळा करण्याचें श्रेय सर हंफ्रे डेव्ही याला आहे. हल्लीं कित्येक रीतींनीं हा धातु तयार करतां येतो. परंतु त्याच्याऐवजीं बहुतेक सर्व कामांत सिंधु ( सोडियम ) या स्वस्त धातूचा उपयोग करण्यास हरकत नसल्यामुळें पालाशाला विशेष मागणी नसते व तो फार तयार केला जात नाहीं.

शुद्ध पालाश हा रुपेरी पांढऱ्या रंगाचा धातु असून त्याजवर थोडी निळसर छटा असते;परंतु हवेंत कांहीं वेळ ठेवल्यास त्यावर प्राणवायूमुळें एक पापुद्रा तयार होतो व आणखी कांहीं वेळ तसाच राहूं दिल्यास हवेंतील आर्द्रता शोषण केली जाऊन उज्जित व कर्बित यांचें द्रावण बनतें. अगदीं कोरड्या प्राणवायूचा पालाशावर परिणाम होत नाहीं. उष्णमान ०° च्या खालीं असतां हा धातू साधारण कठिण व ठिसूळ असतो; परंतु नेहमींच्या उष्णमानांत बोथट चाकूनें सुद्धां तो कापला जातो. हा धातु पाण्यापेक्षांहि हलका आहे. त्याचें विशिष्टगुरुत्व ०.८६५ आहे. ह्या धातूला हवा व पाणी लागल्यास स्फोट होण्याचा संभव असल्याकारणानें तो नेहमीं रॉकेल तेलांत बुडवून ठेवावा लागतो.

पालाशचे प्राणिद, उज्जित, हरिद, ब्रमिद, नैलद, कर्बित, गंधाकिद, गंधकित वगैरे क्षार होतात. बहुतेक सर्व अधातुरूप द्रव्यांशीं या धातूचा संयोग होऊन क्षार तयार होतात. त्यापैकीं महत्त्वाचे येणेंप्रमाणें:—

**पालाश उत्प्राणिद**.—पालाश धातु अथवा त्याचें प्राणिद यांचें पाण्यांत विद्रावण केल्यास पालाश उत्प्राणिद मिळतें. परंतु तें बहुधां पालाशकर्बित व विरलेला चुना यांच्या मिश्रणापासून करतात. सिंधुउत्प्राणिदाप्रमाणें नवीन वैद्युतिक पद्धतींनेंहि तें करण्यांत येतें. पालाश उत्कर्षिताच्या कांड्या नेहमीं बाटलींत ठेवून तिचें बूच घट्ट बसवावें लागतें. नाहींतर तें हवेंतील आर्द्रता व कर्बद्विप्राणिद यांचें फार जलद शोषण करतें. त्वचा व इतर पुष्कळ प्राणिज पेशिजाल पालाशउत्प्राणिदाच्या द्रावणांत तावडतोब द्रवतात. यामुळें पूर्वीं शस्त्रक्रियेंत कांड्यांचा उपयोग केला जात असे. हल्लीं याचा मुख्य उपयोग मऊ साबण करण्याकडे होतो.

**पालाश हरिद**.—हा पदार्थ सैंधवासारखाच आहे. तो समुद्राच्या पाण्यांत, त्याचप्रमाणें खनिज पाण्यांत आढळतो, व जर्मनींत स्ट्रासफुर्ट येथील खाणींत सांपडणाऱ्या पदार्थांत यांचें प्रमाण बरेंच आहे. याचे खडे (स्फटिक) मिठाप्रमाणेंच घनाकृति असतात. याची चव खारट व शांतप्रद असते. हरित, कर्बित, क्रुमित, नत्रित वगैरे पालाशक्षार, तुरटी व विशेषतः कृत्रिम खतें करण्याकरतां या क्षाराचा उपयोग केला जातो. पालाशचे सर्व उपयुक्त क्षार हल्लीं स्ट्रासफुर्ट येथील पालाशक्षारापासून प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षपणें तयार केले जातात.

**पालाशब्रुमिद व नैलद**.—यांचा उपयोग औषधांत बराच होतो.

**पालाशहरित**.—हा पूर्वीं दाहकपालाश अथवा पालाश कर्बिताच्या द्रावणांत हरितवायु सोडून तयार करीत असत. हल्लीं चुना आणि पाणी यांच्या मिश्रणांत प्रथम हरवायु सोडून त्यानें संपृक्त झाल्यावर थोडें वाष्पभिवन होऊं देऊन त्यांत पालाशहरिद मिळवितात व तें मिश्रण उकळून थंड करतात, म्हणजे पालाशहरित निराळें होतें. पालाशहरिताचा प्राणवायु तयार करण्याकडे बराच उपयोग होतो. हें बलवान प्राणिदीकारक असल्यामुळें आगकाड्या व शोभेची दारू करण्याकरतांहि याचा उपयोग केला जातो. चीट छापण्याकरितां व प्रयोगशाळेंतहि हें बरेंच उपयोगांत येतें. फार प्रमाणांत पोटांत गेल्यास हें विष आहे. पूर्वीं तांबडा आजार व रक्तपित्ति वगैरे रोगांवर हें देत असत. व अद्यापहि घशाची सूज कमी करण्याकरितां याचा उपयोग करतात.याच्या अंगीं प्राण देण्याची किती जबरदस्त शक्ति आहे हें पुढील गोष्टीवरून दिसून येईल. याची पूड निखाऱ्यावर टाकल्यास तावडतोब जाळ होतो. पालाशहरित व गंधक यांचें खलबत्यांत थोडेंसें मिश्रण करूं लागल्यास मोठा स्फोट होतो. व मिश्रणावर हातोडा मारल्यास मोठा बार होतो.रक्तस्फुर व पालाशहरित या पदार्थांची अत्यंत थोडी पूड घेऊन पिसानें फार काळजीपूर्वक त्यांचें मिश्रण केल्यास त्या मिश्रणाला कांचेच्या कांडीनें अगदीं हलकें ठोकलें तरी बार होतो.

*पालाशनत्रित अथवा सोरा*.—बंगाल, ईजिप्त, सीरिया, इराण, हंगेरी व अमेरिका वगैरे देशांत नैसर्गिक सोरा सांपडतो. हिंदुस्थानांत सोरा तयार करून विकणें हा कांहीं लोकांचा धंदाच आहे; त्यांना सोरावाले म्हणतात. हिंदी सोरा इटालियन लोकांनीं प्रथम यूरोपांत नेऊन औषधी व रासायनिक कामाकरतां उपयोगांत आणला; व

बंदुकीच्या दारूकरतां मागणी फार वाढल्यावर तिकडे तो तयार करण्यांत येऊं लागला. जर्मनींत स्ट्रासफुर्ट येथें पालाशहरिद पुष्कळ प्रमाणांत सांपडूं लागल्यापासून कृत्रिम सोरा तयार करण्याकडे त्याचा बराच उपयोग होऊं लागला आहे. बाजारांत सोऱ्याच्या स्फटिकाकार कांड्या किंवा पूड मिळते. याची चव कडू, खारट व शीतप्रद असते. सोरा पाण्यांत विरघळविल्यास पाणी पहिल्यापेक्षां थंड होतें. सोऱ्याचा उपयोग प्रयोगशाळेत, औषधांत, मांस न नासतां रहावें म्हणून त्यांत घालण्याकरतां व शोभेची दारू करण्याकडे व मुख्यतः बंदुकीची दारू करण्याकडे केला जातो.

पा ला श क नि द.—मॅक आर्थर फॉरेस्टच्या पद्धतींत खाणींतून काढलेल्या इतर पदार्थांशीं मिसळलेले सोन्याचे अखेरचे बारीक कण परत मिळविण्याकरितां या क्षारांचा बराच उपयोग केला जातो.

**पालिठाणा**, सं स्था न.—मुंबई इलाखा, कांठेवाड पोलिटिकल एजन्सीमधील एक संस्थान. क्षेत्रफळ २८९ चौरस मैल. दक्षिणेस बडोदा संस्थान; उत्तर, पूर्व व पश्चिमेस भावनगर संस्थान. या संस्थानांतून वाहणाऱ्या नद्या शत्रुंजी व तिच्या उपनद्या राजवळ व खारी या होत. हवा उष्ण असून तापाची सांथ नेहमीं येते. वार्षिक पाऊस २५ इंच असतो.

येथील राजराण्याचा उदय भावनगरचा संस्थानिक, सेजकजी ह्याचा द्वितीय पुत्र शहाजी ह्याच्यापासून झाला. वडील पुत्र भावनगरचा संस्थानिक असून कनिष्ठ लाठीचा संस्थानाधिपति आहे.

ह्या राजघराण्याचें शत्रुंजय टेंकडीच्या मालकीविषयीं जैन लोकांशीं वरेंच वर्षे भांडण होतें. १८६३ सालीं कौटिंगनें असें ठरविलें कीं, जैनधर्मप्रतिनिधींनीं संस्थानिकांस दरसाल १० हजार रुपये द्यावेत व संस्थानिकानें प्रत्येक यात्रेकरूवर आकारला जाणारा कर माफ करावा. स. १८८६ पासून संस्थानिकांस १५ हजार रुपये देण्यांत येऊं लागले. येथील संस्थानाधिपति हिंदु आहे. लोकसंख्या (१९११) ६०६६०.

राजधानीचा गांव पालिठाणा असून यांत खेडीं ९५ आहेत. मुख्य पीक धान्यें, कापूस, ऊंस असून एकंदर उत्पन्न ६३ लाख रुपये आहे बडोद्याच्या गायकवाडास व जुनागडच्या नवाबास मिळून खंडणी १०३६५ रुपये आहे. येथें म्युनिसिपालिटी आहे.

गां व.—पालिठाणा संस्थानचा राजधानीचा गांव. शत्रुंजय टेंकडीच्या पूर्व पायथ्याशीं आहे. लोकसंख्या सुमारें १२०००. पूर्वी हें मोंगल परगण्याचें मुख्य गांव होतें. शत्रुंजय पहाडावर जैनांचा तीर्थंकर आदिनाथ ह्याचें पवित्र स्थान आहे. याची उंची समुद्रसपाटीपासून १९७७ फूट आहे. दोन उंच शिखरांमधील खिंडीचा प्रदेश एका जैन व्यापाऱ्यानें बांधून काढिला. शिखरावर अनेक देवालयें आहेत; त्यापैकीं मुख्य देवालयांचीं नांवें:—आदिनाथ, कुमारपाल, विमलसह, संप्रीतिराजा व चौमुख. पैकीं चौमुख सर्वांत उंच व भव्य आहे. शत्रुंजय ह्या जैनांचा अत्यंत पवित्र डोंगर आहे. 'रासमाला' ह्या ग्रंथात किलोन्च फोर्ब्स ह्यांनें ह्याविषयीं मोठें रसभरित वर्णन दिलें आहे.

पहाडावर खाण्याची किंवा स्वयंपाक करण्याची कोणासहि परवानगी नाहीं. येथें चिरेबंदी देऊळ बांधलें असतां मुक्ति मिळते अशी जैन लोकांची समजूत आहे.

**पालियाद**—मुंबई इलाख्यांतील कांठेवाडमधील एक लहान संस्थान. यांत १७ गांवें असून पालियाद हें महत्त्वाचें गांव आहे.

**पाली**—राजपुतान्यांतील जोधपूर संस्थानांतील पाली जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हे बान्डी नदीच्या वामतीरावर आहे. लोकसंख्या ( १९११ ) १२९३९. मुख्य उद्योगधंदे पितळेचीं भांडीं करणें, हस्तिदंतावर नक्षी काढणें, रंग देणें, सुती कापडावर छाप देणें हे आहेत. गांवाचे जुना पुरा व नवा पुरा असे दोन भाग आहेत. दोन मोठीं देवालयें आहेत. सोमनाथ मंदिरांत ११४३ सालचा लेख आहे व नवलाख ह्या देवालयाच्या आवारांत एक मसजीद आहे. परमार व परिहार रजपुतांनीं पाली ब्राह्मणांस इनाम दिलें होतें. १२१२ सालीं हे रावसिंहजीच्या ताब्यांत गेलें.

**पाली**—पाली भाषा संस्कृतपासून झाली नसली तरी तिला संस्कृतची धाकटी बहीण म्हटल्यास अयोग्य होणार नाहीं. पाली या शब्दाची व्युत्पत्ति प्रकट पासून असल्याचें रा. राजवाडे देतात. विंटरनिझ "पाली" चा मूळ अर्थ 'रांग' समजतो [ विभाग १, प्र. ३ पहा ]. या भाषेचें व्याकरण बहुतेक संस्कृतच्या धर्तीवरच आहे. लिपि ब्राह्मी आहे, व तिची सिंहली, ब्रह्मी, कांबोजी वगैरे वळणें आहेत. ज्या देशचें लिखाण असतें त्या ब्रम्ही, सिंहली, किंवा कांबोजी लिपींत ही भाषा लिहिण्यांत येते. पाली व संस्कृत भाषाव्याकरण यांत फारसा फरक आढळणार नाहीं. संस्कृत स्वर-व्यंजनांप्रमाणें पालींतहि स्वर-व्यंजनें आहेत. पण ॠ व ऌ हे स्वर नाहींत; तसेंच ऐ व औ हे स्वरद्वय नाहीं; तर अ, इ, उ हे तीन ऱ्हस्व स्वर; आ, ई, ऊ, ए व ओ हे पांच दीर्घ स्वर, व अम्, इम्, उम् हे तीन अनुनासिक स्वर आहेत.

व्यंजनें दोन प्रकारचीं मानितात, घोसवा ( आवाजी ) व अघोसा (मुकी). घोसवाः—क, च, ट, त, प या पांच वर्गांतील शेवटचीं तीन तीन व्यंजनें, व य्, र्, ल्, व् आणि ह्. अघोसाः—पांच वर्गांतील पहिलीं दोन दोन व्यंजनें, व स्. पाली शब्दांच्या अंतीं नेहमीं स्वर असतो त्यामुळें विभक्तिप्रत्यय लावतांना संस्कृतप्रमाणें फारसा त्रास पडत नाहीं. पाली भाषेंत तीन लिंगें, दोन वचनें ( द्विवचन बहुधां उपयोगांत आणीत नाहींत ) व आठ विभक्तया आहेत. भवादि, रुधादि, दिवादि, स्वादि, क्रियादि, तनादि, चुरादि असे क्रियापदांचे सात वर्ग संस्कृतप्रमाणें पाडतात. वर्तमान आणि

अपूर्णभूत हे विशिष्ट काळ, व पूर्णभूत, अद्यतनभूत, भविष्य व संकेतार्थ असे सामान्य चार काळ मानतात. अव्ययें, धातुसाधितें वगैरे संस्कृतांतल्याप्रमाणेंच होतात. द्वंद्व, तत्पुरुष कर्मधारय, अव्ययीभाव हे समास आढळतात.

ही भाषा. ख्रि. पू. ७ व्या शतकापासून उत्तर हिंदुस्थानांत चांगले सुधारलेले लोक उपयोगांत आणीत आहेत. आजहि ती ब्रह्मदेश, सयाम व सिलोन यांची वाङ्मयीन भाषा आहे. जगांत ज्या कांहीं थोड्या वाङ्मयीन भाषा महत्त्वास चढल्या आहेत त्यापैकीं पाली ही एक आहे. धार्मिक व राजकीय कारणांमुळें पालीला हें महत्त्व प्राप्त झालें. ख्रि पू. ७ व्या शतकांत कोसल राष्ट्राच्या उत्कर्षामुळें, पाली भाषेला मोठी मान्यता मिळाली व आजच्या इंग्रजीप्रमाणें ती जागतिक दळणवळणाची साधयम होऊन बसली. गौतमबुद्धानें या भाषेच्या द्वारेंच आपला धर्म पसरविला. ल्यूथरच्या धर्मसुधारणेच्या चळवळीमुळें जर्मन भाषेला जी प्रसिद्धि मिळाली तीच या बौद्धसंप्रदायी पाली भाषेला प्राप्त झाली.

प्राचीन काळीं या पाली भाषेला मागधी भाषा म्हणत. मागधी म्हणजे मगध देशांत बोलली जाणारी भाषा नव्हे, तर कोसल आणि मागधाचा सम्राट जो अशोक त्याच्या दरबारीं प्रचारांत असलेली भाषा होय. भाषाशास्त्रदृष्ट्या मागधी हें नांव चूकीचें असलें तरी ऐतिहासिकदृष्ट्या तें अगदीं योग्य होईल. पाली भाषेचीं निरनिराळीं रूपें दृष्टीस पडतात. पण आज पाली हें नांव फक्त बौद्ध धर्मग्रंथाच्या भाषेला लावणें योग्य होईल. तिपिटक किंवा बौद्धधर्मशास्त्र पालीमध्यें आहे त्याचें सविस्तर विवेचन 'बुद्धोत्तरजग' या विभागांत एका स्वतंत्र प्रकरणांत (११ वें) केलें आहे. तिपिटकेतर पाली ग्रंथांची यादी त्या प्रकरणाच्या शेवटीं जोडली आहे. सिलोन, ब्रह्मदेश, वगैरे ज्या प्रदेशांत बौद्ध संप्रदाय–विशेषतः त्याचा हीनयान हा पंथ–प्रचलित होता तेथें पाली भाषा बरीच दृढमूल झाली व त्या देशांतील प्राचीन धार्मिक वाङ्मय याच भाषेंत रचलें गेलें. अर्वाचीन काळीं मात्र या भाषेस संस्कृत भाषेचीच स्थिति प्राप्त झाली आहे व ही बोलण्याच्या प्रचारांतून गेली असून नवीन वाङ्मयहि तींत क्वचितच तयार होतें.

**पाले**—वरचा ब्रह्मदेश, खालच्या चिन्दविन जिल्ह्याची नैर्ऋत्येकडील एक टाउनशिप. क्षेत्रफळ ४५८ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ३५२४५. खेडीं ७४ असून मुख्य ठिकाण पाले आहे. पूर्व भागांत जमीन सपाट असून पाणी पुरेसें आहे. ह्या टाउनशिपमध्यें पोन्डौंग डोंगराची ओळ आहे.

**पालेज**—मुंबई इलाख्याच्या महीकांठा प्रांतांतील एक लहान संस्थान.

**पालकची सामुद्रधुनी**—मद्रास इलाख्याचा पूर्वकिनारा व सिंहलद्वीपचा उत्तर भाग यांमध्यें असणारा पालकचा उपसागर म्हणजे एक आखातच होय. उ. अ. ९° १०' आणि पू. रे. ९७° ८०'. मद्रासचा गव्हर्नर (१७५५–६३) रॉबर्ट पाल्क याच्या नांवावरून हें नांव ठेवण्यांत आलें.

**पावटा**—याला गुजराथींत वाल; हिंदी पोपट; कानडी-अवरे वगैरे नांवें आहेत. याच्या अनेक जाती असून त्या दक्षिण गुजराथेंत आहेत. कोंकणांतहि वर्णा, कडवी, वाल, पावटा, वगैरे जाती आहेत. सुरतेकडे वालपावडी, माखण्या वालपापडी, चपटी सांवळ, पांढरी सांवळ, घोटवाळ वगैरे जाती आढळतात.

पावट्याचे वेल निरनिराळ्या जातींप्रमाणें लांब, फार लांब व आंखूड असतात; व शेंगाहि आंखूड, लांब, चपट्या, अशा दिसतात. पावट्याच्या झाडास उग्र वास येतो. वेल गुरांस फार आवडतात. कोंकण व गुजराथेंत चांदा, भंडारा, वालाघाट वगैरे ठिकाणीं पावट्याचें पीक फार होतें. देशावर पोयटयाच्या जमिनींत नदीकांठीं व कर्नाटकांत मळ्ळांत, पावटे भात काढल्यावर रब्बीच्या हंगामांत घेतात. पावट्याचें पीक रब्बी हंगामांत होतें. पावटे स्वतंत्र पेरितात. दक्षिण-गुजराथेंत सर्वसाधारणपणें पावटे व एरंडी एकेठिकाणीं घेण्याची चाल आहे. देशावर व गुजराथेंत कांहीं ठिकाणीं पावटे जोंधळ्यांत मिसळून पेरितात.

कोंकणांत भातकापणी झाल्यावर कार्तिकांत जमिनीची उखळेपर करून हातानें बीं पेरतात. नंतर खुटावळीनें ढेकळें फोडून जमीन सारखी करतात. दर एकरीं बीं स्वतंत्र पेरतात, तेव्हां ५०–६० पौंड लागतें, व गुजराथेंत पावटे ३०–४० पौंड व एरंड्या ८–१० पौंड दर एकरीं पेरितात. फाल्गुनांत (फेब्रुवारी, मार्च) पीक काढण्यास तयार होतें. कोंकणांत वर्णा व कडवे या दोहोंच्या शेंगा शेतांत हातानें काढतात. नंतर झाडें कापून गुरांसाठीं घरीं नेतात. वर्णा हें पीक सोमेश्वराकडे (रत्नागिरी जिल्हा) जास्त प्रमाणावर करतात. रत्नागिरी जिल्ह्यांत सोमेश्वरी वर्णे प्रसिद्ध आहेत. त्याचा दाणा गोड असून मोठ्या पावट्याएवढा असतो. याचा पेरा भाद्रपदांत भात उभें असतांना ऊंवर जमिनींत करतात. शेतांत फुटाफुटाच्या अंतरानें विळ्यानें टोंच्या मारून त्या टोंच्यांत दोन दोन दाणे पेरितात. भातकापणीच्या वेळीं हे वेल वगळून ठेवितात. या वेलांची उंची यावेळीं सहा इंच असते. हें पकि काढण्याला मार्गशीर्ष–पौष महिन्यांत तयार होतें. याचे वेल व पानें गुरांना उडदाच्या गुळ्या(भुसा)पेक्षां कमी दर्ज्याचीं समजतात. वर्णा हें धान्य खाण्याला मिष्ट लागतें, परंतु तें वातूळ आहे.

रो ग.—पावट्याचा वेल फार नाजूक असतो. याला तुरबंट व किडे फार लागतात. ते पानें खाऊन टाकतात. शेंगा आल्यावर त्यावर फार सूक्ष्म असे पांढरे किडे पडतात त्यांस चिकटा म्हणतात. पावट्याच्या दाण्यालाहि किडींपासून फार अपाय होतो. कोंकण व मलबारांत स्वतंत्र पिकाचें उत्पन्न

सरासरीं दर एकरीं ५००–६०० पौंड, गुजराथ, उत्तर-कोंकण व कर्नाटक येथील स्वतंत्र पीक दर एकरीं हजार ते बाराशें पौंड व मिसळीचें चारशें ते पांचशें पौंडांपर्यंत होतें. भुशाचें वजन साधारणपणें पावट्याइतकेंच असतें. कोंकणांत, मावळांत, बेळगांवाकडे व गुजराथेंत पावट्याचा विशेष उपयोग करतात. हिरवा पावटा दुभत्या गुरांनां फार आवडतो. पावट्याच्या लागवडीपासून जमिनीस फार फायदा होतो. याच्या मागून भाताचें पीक चांगलें होतें.

**पावागड**—मुंबई. पंचमहाल जिल्ह्यामध्यें कालोल तालुक्यांतील डोंगरी किल्ला. हा वडोद्याच्या पूर्वेस सुमारें २८ मैलांवर असून त्याची समुद्रसपाटीपासून उंची २८०० फूट आहे; त्याच्याभोंवतीं विस्तीर्ण मैदान आहे. डोंगराच्या उत्तर टोंकाच्या पूर्व बाजूला पुष्कळ सुंदर जैन देवालयांचे अवशेष आहेत; व पश्चिम बाजूला अर्वाचीन मुसुलमानी इमारती आहेत, त्यांचा एके काळीं धान्याचीं कोठारें म्हणून उपयोग करीत असत असें म्हणतात. दक्षिण टोंकाला २५० फूट उंचीचें शिखर असून त्यावर कालीदेवीचें देवालय आहे. तटबंदीच्या आंत लहानसा दगडी किल्ला असून त्याला मजबूत बुरुज आहेत. या किल्ल्याला एकाच्या आंत एक असे तीन तट आहेत.

जुन्या शिलालेखांत या गडाला पावकगड असें नांव आहे. चांद नांवाचा शाहीर आपल्या लेखांत तुंअर (तोमर) रामगौड याला पावाचा अधिपति असें म्हणतो. हा या गडाचा इतिहासांतील पहिला उल्लेख होय. मुसुलमानी इतिहासांतहि हा बराच महत्त्वाचा असून सुलतान बेगडा, हुमायून यांनीं हा रजपुतांपासून घेतला होता. पुढें शिंद्यांकडून हा ब्रिटिशांकडे आला.

**पावित्र्य**, भा र ती य.—ब्राह्मणजात पावित्र्य, शुद्धता व स्वच्छपणा यांनां जितकी जपते तितकी इतर कशासहि जपत नसेल. त्यांच्या रोजच्या आचरणांतील प्रत्येक बाबतींत पावित्र्य ही प्रमुख कल्पना असते. त्यामुळें संस्कृत धर्म-(स्मृती) ग्रंथांत अशौच व शुद्धि यांसंबंधींच्या नियमांस प्रमुख स्थान असतें, इतकेंच नव्हे तर याच विषयावर 'अशौचनिर्णय', 'शुद्धितत्त्व', 'शुद्धिमयूख' इत्यादि नांवाचे स्वतंत्र ग्रंथ आहेत. मृताच्या नातलगांनां १० दिवस अशौच पाळावें लागतें व प्रेतवाहकांनां स्नान करावें लागतें. या अशौचाच्या काळांत इतर माणसांनां किंवा वस्तूंनां स्पर्श न करतां अगदीं अलगपणें राहावें लागतें. अशौच संपल्यानंतर स्नानानें व इतर प्रकारें शुद्धि करावी लागते. जननाचें अशौचहि वरीलप्रमाणें १० दिवस असतें. ऋतुमती स्त्रियांनां ४ दिवस मासिक अस्पृश्यता पाळावी लागते. अशा स्त्रीला, प्रेताला, अतिशूद्र मानलेल्या अगदीं खालच्या जातीच्या इसमाला, श्मश्रू केलेल्या इसमाला स्पर्श केल्यास व इतर कित्येक प्रसंगीं पवित्रता राखण्याकरितां स्नान केलें पाहिजे असा नियम आहे. तसेंच मलमूत्रोत्सर्ग केल्यावर तो विशिष्ट शरीरभाग व हातपाय धुवून स्वच्छता व शुद्धि करावी लागते. मनुष्य जन्मास येतो तो अशुद्ध व अपवित्र स्थितींत असतो व म्हणून शुद्धीकरणाकरितां चौल, मौंजीबंधन, इत्यादि संस्कार करावे असें ब्राह्मण धर्मांत सांगितलें आहे (मनु २.२७). शरीराच्या बाह्य शुद्धीपेक्षांहि अंतःशुद्धीनें महत्त्व अधिक मानलें आहे व त्याकरितां आहारासंबंधानें नियम फार कडक आहेत. दारू पिणें हें ब्राह्मणवध, मातृगमन वगैरे महापातकांइतकें घोर पातक मानतात. ब्राह्मणानें शूद्रादि हलक्या जातींच्या माणसाच्या हातचें अन्नपाणी घेतल्यास पराक (बारा दिवस उपवास) किंवा सांतपन (एक दिवस गोमय व गोमूत्रयुक्त पंचगव्यावर राहून दुसरा दिवस उपवास) नांवाचें प्रायश्चित्त घ्यावें लागतें. घरांत वापरण्याचीं भांडीकुंडीं व वस्त्रप्रावरणें यांच्या शुद्धीसंबंधाचेहि नियम आहेत. दारू वगैरेंनीं अशुद्ध झालेलें धातूचें भांडें अग्नींत तापवून शुद्ध करावें लागतें आणि लांकडी व मातीचें भांडें असल्यास तें कायमचें फेंकून द्यावें लागतें. रोजच्या स्वयंपाकांतील भांड्यांची अशुद्धता मातीनें किंवा राखेनें घासून किंवा पाण्यानें धुवून घालवितात. गाय ही पवित्र मानली असून शुद्धीकरणाचे गुण तिच्यांत आहेत. गंगा वगैरे पवित्र मानलेल्या नद्यांत स्नान करणें हें पवित्रीकरणाचें एक मोठें साधन आहे. वस्त्रांत लोकरीचीं वस्त्रें फार शुद्ध मानतात. हल्लीं आगगाड्या, ट्रामगाड्या, यांमुळें हलक्या जातींच्या स्पर्शामुळें होणाऱ्या विटाळाबद्दलच्या कल्पना बदलत चालल्या आहेत तथापि हल्लीं काश्मीर वगैरे ठिकाणीं अस्पृश्य वर्गांतील लोकांनीं जवळ येऊन बोलण्याऐवजीं दुरून खुणांनीं अर्थ दर्शविण्याची रीत आहे. बंदुकांकरितां केलेल्या नव्या काडतुसांनीं हिंदु शिपायांनां बाटविण्याचा कंपनीसरकारचा हेतु आहे, हा १८५७ सालच्या बंडाच्या वेळचा समज प्रसिद्ध आहेच. शूद्राला स्पर्श केल्यानें येणारी अशुद्धता टाळण्याकरितां रोग्याच्या मनगटाला प्रथम रेशमी कपडा गुंडाळून मग त्याची नाडी कांहीं ब्राह्मण वैद्य पाहतात. ब्राह्मणवर्गांतील वस्त्रप्रावरणविषयक सोंवळ्याओंवळ्याच्या आणि खाद्यपेयपदार्थविषयक निर्लेपखरकट्याच्या कल्पना शुद्धतेच्या व स्वच्छतेच्या तत्त्वांवर उभारलेल्या आहेत.

*बौ द्ध व जै न.—या लोकांतहि अशौच व शुद्धि यांसंबंधीं* नियम ठरलेले आहेत. बौधधर्म हा ब्राह्मण धर्मांतील स्पृश्यास्पृश्यता, जातिभेद, सोंवळेंओवळें, यज्ञयाग वगैरेंविरुद्ध असल्यामुळे त्या धर्मांत बाह्य शुद्धाशुद्धता कमी झाली; तथापि अन्तःकरणाच्या व नैतिक आचरणाच्या शुद्धतेचे त्या धर्मांतील नियम कडक आहेत. जैनधर्मांत नैतिक शुद्धतेचो इतकी परमावधी झाली कीं, जैनांनां 'परघरपवेसा' (दुसऱ्याच्या घरांत शिरण्यास योग्य) असें शिफारसपत्र मिळालें. अहिंसा, ब्रह्मचर्य, वगैरे बाबतींतले त्यांचे धर्मनियम अत्यंत कडक आहेत. इतकेंच नव्हे तर, अतिरेकाला गेलेले व हास्यास्पद भासतात.

इ रा णी.—प्राचीन पारशी किंवा झोरोआस्टरपंथी लोकांचे अशौच, शुद्धि, वगैरेसंबंधी नियम हिंदूंच्यासारखे असून पाणी, गोमूत्र व अग्नि हीं शुद्धीकरणाचीं मुख्य साधनें आहेत व तत्संबंधी विस्तृत नियम वेंदिदादमध्यें दिले आहेत.

चि नी.-या लोकांतील शुद्धीकरणाच्या साधनांत स्नान,साधा आहार किंवा पूर्ण उपोषण, ब्रह्मचर्य, वगैरे गोष्टींचा समावेश होतो. मृतावद्दलचें अशौच बरेच दिवस पाळतात, व त्यांत विशेष हें आहे कीं,पूर्वी सरकारी नोकरांनां मृताशौचाबद्दल तीन वर्षे नौकरी सोडून घरीं बसावें लागे, कारण अशौचांत नोकरी केल्यास सरकारी कामकाज बिघडेल अशी त्यांची समजूत होती.

ख्रि स्ती.—या धर्मांतहि प्रथम आचरणविषयक शुद्धीला फार महत्त्व होतें. व त्यामुळेंच संसार सोडून मठांत संन्यस्तवृत्तीनें राहण्याचा उपक्रम ख्रिस्ती धर्मानें केला पण अविवाहित स्त्रीपुरुषांचा एकत्र मठनिवास दुराचरणास कारणीभूत झाल्यामुळें लूथरकृत धर्मसुधारणेनें मठनिवास त्याज्य ठरविला.

**पावूगड**—म्हैसूर प्रांतांत, तुमकूर जिल्ह्याचा ईशान्य तालुका. याच्या बहुतेक सर्व बाजूंनीं मद्रास इलाख्याचा प्रदेश आहे. क्षे. ५२३ चौ. मै. व लो. सं. (१९११) ६११७१. मुख्य गांव पावूगड (लोकसंख्या अडीच हजार). खेड्यांची संख्या १३४. पश्चिम व उत्तरभाग डोंगराळ असून त्यांतील निडुगल (उंची३७७२फूट) नांवाचें शिखर सर्वांत उंच आहे. या तालुक्यांत थोडी तंबाखू व कापूस पिकतो. लोखंड व तांदूळ हे जिन्नस बाहेर जातात.

**पाशुपतदर्शन**—माहेश्वरी पंथाचें हें एक दर्शन होय. या दर्शनाचा उगम महाभारतामध्यें दिसून येतो. महाभारतामध्यें विष्णुदेवतेला जितका मान देण्यांत आलेला आहे तितका शिवदेवतेला आढळत नाहीं. तथापि शिवासंबंधीच्या थोड्याफार कथा महाभारतांत आढळून येतात. या कथांमध्यें शिवाची जगताचा ईश्वर म्हणून स्तुति करण्यांत आली आहे. विष्णुसहस्रनामाप्रमाणें शिवसहस्रनाम नांवाचें एक प्रकरण महाभारतांत आहे. त्याचप्रमाणें महाभारतांत शिवाच्या लिंगाची प्रशंसा अतिशय करण्यात आली आहे. महाभारतानंतर वायुपुराणाच्या पूर्वभागांत या पाशुपत मताचा उल्लेख आला आहे. ११ ते १५या अध्यायांत पाशुपतयोगाचें वर्णन आलें आहे. पाशुपतमताचा संस्थापक लकुली नांवाचा एक योगी होता. त्याच्या नांवावरून या मताला नकुलीश अगर लकुलीश पाशुपत असेंहि नांव रूढ आहे. पाशुपताचा काळ ख्रि. पू. दुसऱ्या शतकांत आहे असें डॉक्टर भांडारकर म्हणतात.

पाशुपत हें नांव पशुपति या शब्दापासून निघालें आहे. पशुपति हें नांव रुद्रदेवतेला दिलेलें वैदिक वाङ्मयांत आढळतें. पशुपति याचा अर्थ, पशूंचा पालक असा आहे. पण पुढें पशुपतीचा तात्विक अर्थ करण्यांत येऊं लागला. पशु म्हणजे जगत् तेव्हां पशुपति म्हणजे जगत्पति असा त्याचा अर्थ करण्यांत आला.

पाशुपत मताचीं तत्त्वें १५ व्या शतकांतील अद्वैतानंद नांवाच्या एका विद्वान टीकाकारानें आपल्या ब्रह्मविद्याभरण ग्रंथांत सांगितलीं आहेत. सर्वदर्शनसंग्रहांतहि या दर्शनाचीं तत्त्वें ग्रथित केलीं आहेत. या दर्शनाचे पांच अध्याय आहेत. ग्रंथाच्या प्रारंभीं 'अथातः पशुपतेः पाशुपतयोगविधिं व्याख्यास्यामः' असें सूत्र आहे. यानंतर दुःखान्ताचें विवेचन सुरू करण्यांत आलें आहे. दुःख हें दोन प्रकारचें आहेः (१) सात्मक व(२) अनात्मक.दृक् व क्रिया या शक्तींच्या ऐश्वर्यानें जो दुःखान्त होतो त्याला सात्मक दुःखान्त म्हणतात. सर्व दुःखांच्या अत्यंतोच्छेदाला अनात्मक दुःखांत हें नांव आहे. जें पराधीन असतें त्याला कार्य म्हणतात. या कार्याचे विद्या, काल, व पशु असे तीन भाग आहेत. पशु म्हणजे आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व प्राणीः त्यांच्या गुणाला विद्या म्हणतात. विद्येचे बोधस्वभावा व अबोधस्वभावा असे दोन प्रकार आहेत. त्या बोधस्वभावाविद्येला चित् असें नांव आहे. या चित्शक्तीनें प्राण्यांनां बाह्य विषयांचें ज्ञान होतें.

कला ही स्वतः अचेतन असून चेतनावर अवलंबून असते. कार्य व कारण असे हिचे दोन भेद आहेत.कार्यांत पृथिव्यादि पंचतत्त्वें व त्यांचे रूपादि पांच गुण यांचा समावेश होतो. कारणकलेंत ज्ञानेंद्रियपंचक, कर्मेंद्रियपंचक, बुद्धि, अहंकार व मन अशा तेरांचा अंतर्भाव होतो. पशु हा द्विविध आहे, साञ्जन व निरञ्जन. शरीर व इंद्रियें यांशीं संबंध असलेल्या जीवाला साञ्जन व तद्रहित जीवाला निरञ्जन पशु म्हणतात. चित्ताच्या द्वारानें आत्मा व ईश्वर यांचा जो संबंध घडतो त्याला योग म्हणतात. जपध्यानादिरूप योगाला क्रियायोग म्हणतात. क्रियोपरम योगांत, क्रियेचा अभाव असतो. धर्माचें साधनव्यापाराला विधि अशी संज्ञा असून त्याचे प्रधान व गौण असे दोन भाग आहेत. भस्मस्नान, भस्मशय्या, उपहार, जप, प्रदक्षिणा इत्यादिरूप जी चर्या तिला प्रधानविधि म्हणतात.क्राथन,स्पंदन,मंदन, शृंगारण, अवितत्करण, अवितद्भाषण असे द्वाररूप चर्येचे सहा प्रकार असून ते दीक्षा न घेतलेल्या लोकांच्या समोर करावयाचे नसतात. लाभपंचक, मलपंचक, उपायपंचक, देशपंचक, अवस्थापंचक, विशुद्धिपंचक, दीक्षाकारीपंचक व बलपंचक या अष्टपंचकाचें आचरण केलें असतां पुरुषार्थसिद्धि होते. या सिद्धीसाठीं, भिक्षा अगर अकस्मात मिळालेलें अन्न यावर उपजिविका करावी असें सांगितलें आहे.

या शास्त्राचें वैशिष्ट्य पुढीलप्रमाणें आहे—इतर शास्त्रांप्रमाणें, दुःखःनिवृत्ति म्हणजे दुःखान्त होतो तर याच्यामतें कार्य अनित्य नसून नित्य आहे. इतर शास्त्रकार सापेक्ष कारणवादी आहेत तर हें निरपेक्षकारणवादी आहे. अन्य शास्त्रांच्या मतें स्वर्गभोगानंतर जीव पुन्हां संसारी होतो तर या शास्त्राच्या मतें जीवाला पुनरावृत्ति येईलच असें नाहीं.ज्ञानानें

अगर साक्षात्कारानें मोक्ष प्राप्त होत नसून तत्त्वनिश्चयानेंच खरी मोक्षप्राप्ति होते असें या शास्त्राचें मत आहे.

[ संदर्भग्रंथ:— महाभारत; वायुपुराण; लिंगपुराण; सर्वदर्शनसंग्रह; डॉ. भांडारकर—वैष्णविझम्; शैविझम अँड मायनर रिलिजस सेक्ट्स. ].

**पाश्चूर, लुई** ( १८२२–१८९५ )—हा फ्रेंच रसायनशास्त्रज्ञ डोल (फ्रान्स ) येथें स. १८२२ त जन्मला. याचा बाप कातडीं कमावण्याचा धंदा करीत असे. डोल येथील शाळेंतच त्याच्या शिक्षणक्रमास सुरवात झाली. पुढें तो पॅरिस येथें उच्च शिक्षण घेण्याकरितां गेला. परंतु तो स्वभावानें धीट नव्हता व त्याची प्रकृतीहि पॅरिस येथें असतांना विघडली. यामुळें तो डोल येथें परत गेला व तेथेंच त्यानें बी ए. आणि बी. एस्. सी. या पदव्या मिळविल्या. त्याच्या पदवीपत्रकांत " रसायनशास्त्रांत साधारण " असा शेरा होता. ते शब्द त्याला फार लागले व त्यामुळेंच तो उद्योगी बनला व ही काम करण्याची त्याची संवय मरेपर्यंत कायम होती.

तार्तरिकाम्लें दोन प्रकारचीं असतात, त्यांची घटना एकच असते परंतु आंतील अणूंची रचना मात्र भिन्न असल्यामुळें त्यांचे गुणधर्म निराळे असतात हें यानें प्रथम सप्रयोग सिद्ध करून दाखविलें. याचा महत्त्वाचा शोध आंबण्याच्या क्रियेसंबंधीं ( फरमेंट ॲक्शन ) होय द्राक्षांचा रस, दूध इत्यादि पदार्थ हवेच्या संसर्गानें आंबतात त्यावेळेस हवेंतून विशिष्ट प्रकारचे जंतू ( मायक्रोबी ) त्यात पडतात. हवेंतून हे जंतू काढून टाकून किंवा मारून शुद्ध केलेल्या हवेंत जर द्राक्षांचा रस, दूध, इ. पदार्थ ठेवले तर ते आंबत नाहींत व अशा शुद्ध हवेंत जखम न सडतां स्वच्छ राहते. या त्याच्या शोधांमुळें दारूच्या धंदेवाल्यांस व शस्त्रक्रिया करणारांस फार मदत झाली. या शोधांमुळें त्याची प्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञांत गणना होऊं लागली. पुढें स. १८६५ त फ्रान्सच्या दक्षिण भागांत कांहीं रोगामुळें रेशमाचे किडे मरूं लागले व रेशमाच्या धंद्यास धोका येईल असें दिसूं लागलें. तेथें पाश्चूर डूमास नावाच्या मित्राच्या आग्रहावरून गेला.त्याला त्यांत यश येण्याची आशा नव्हती परंतु आपल्या भगीरथप्रयत्नांनीं शेवटीं पाश्चूरनें त्या रोगापासून किड्यांना वांचविण्याचा उपाय शोधून काढला. याचा अत्यंत महत्त्वाचा शोध हा कीं, जनावरांस व मनुष्यास होणाऱ्या बहुतेक रोगाचे विशिष्ट प्रकारचे जंतू असतात, त्याच जंतूंचें वीष सौम्य करून माणसाच्या अंगांत पिचकारीनें घातल्यास पुढें त्यास त्या रोगाची भीति रहात नाहीं, इतकेंच नव्हे तर त्या रोगानें पछाडलेल्या माणसास जर त्याच रोगाच्या विषाची पिचकारी मारली तरी देखील रोग हटतो. या उपयुक्त शोधाचा प्रयोग प्रथम फ्रान्समध्यें कोंबड्यांनां कॉलरा झाला होता तेथें त्यानें केला, तेथें त्याला पुष्कळ यश आलें. पुढें पिसाळलेला कुत्रा चावलेल्या माणसास त्यानें कुत्र्याच्या विषाच्या पिचकाऱ्या मारून बरें करून दाखविलें. स. १८८८ त पॅरिस येथें विषारी जनावरें चावलेलीं माणसें बरीं करण्याचा एक दवाखाना उघडला गेला व त्याला पाश्चूर इन्स्टिट्यूट असें नांव देण्यांत आलें. तेथें असे कित्येक रोगी दरसाल बरे होत आहेत. असे दवाखाने आतां कित्येक ठिकाणीं उघडलेले आहेत. हिंदुस्थानांतहि कसोली, कुनूर व अलीकडे मुंबई, पुणें इत्यादि ठिकाणीं असले दवाखाने उघडले आहेत. पाश्चूर यानें असले उपयुक्त शोध लावून मनुष्यमात्रावर अनंत उपकार करून ठेवले आहेत. त्याच्या रोगविषयक जंतु-सिद्धांताचें विवेचन विज्ञानेतिहासांत ( पृ. ४३८–४४० ) केलें आहे.

**पाषाणचुंबक**—पाषाणचुंबक हा एक खनिज पदार्थ आहे. या खनिज पदार्थापासून लोखंड काढतां येतें. हा पाषाण लोखंडाप्रमाणेंच काळा, अपारदर्शक आणि कठिण असून त्याच्या अंगीं धातूप्रमाणेंच चकाकी आहे. याचें काठिण्य ६ या प्रमाणांत आहे. त्याचें विशिष्टगुरुत्व ४.९ पासून ते ५.२ पर्यंत आहे. याचें रासायनिक पृथक्करण केलें असतां हा संयुक्त पदार्थ असून त्याची रासायनिक सारणी $फ_3$ $आ_4$ आहे असें आढळतें. यांत दुसरीं कांहीं मूलद्रव्यें थोड्या प्रमाणांत मिश्रित झालेलीं सांपडतात. याच्या अंगीं चुंबकत्व असतें हें सांगावयास नकोच. हा पाषाण स्फटिक-विशिष्ट स्थितींत सांपडतो.

या पाषाणाचे घट्ट बसलेले थरच्या थर नॉर्वे, स्वीडन, फिनलंड आणि उरल या ठिकाणीं विस्तृत प्रमाणांत सांपडतात. अमेरिकेंत न्यूयॉर्क, न्यु जर्सी, पेन सिल्व्हानिया आणि मिचिगन व कानडा या ठिकाणीं हा पाषाण आढळतो. पृथ्वीवरील आणखी दुसऱ्या कांहीं भागीं हा पाषाण सांपडतो. या पदार्थाला शास्त्रज्ञ लोकांच्या कौतुकास्पद दृष्टीशिवाय जास्त महत्व नाहीं; म्हणून याचें विशेष विस्तारपूर्वक वर्णन केलें नाहीं.

**पासली**—पासलीचीं पानें युरोपियन लोकांत कोथिंबिरीऐवजीं उपयोगांत आणतात.ते कोथिंबीर खात नाहींत. पासलीस विलायती कोथिंबीर म्हटलें तर चालेल.जशा हिंदु स्त्रिया कोथिंबीर परसांत पेरतात तशा यूरोपीयन स्त्रिया पासली जमिनींत, कुंड्यांत अगर खोक्यांत लावतात विकण्याकरितां हिची लागण करणे झाल्यास प्रथम रोप करून तें वितीच्या अंतरानें लावितात, अगर वाफ्यातच बीं फेकून नंतर तें विरळ करून वाढूं देतात. पासलीचा वास पुंगट व उग्र असतो.

**पासी**—एक जात. यांची लोकसंख्या सुमारें १५ लाख असून मोठी वस्ती संयुक्त प्रांतांत ( १३ लाख ) आहे. त्याच्या खालोखाल बिहार–ओरिसांत (१॥ लाख) आहेत. हे लोक महाद्राविड जातींतले आहेत; यांचा धंदा ताडी काढणें हा होय.संयुक्तप्रांतांत आयोध्या भागांत हे विशेषेंकरून राहतात. रामकोट गांव ( हल्लींचें बांगरमऊ शहर [ उन्नाव जिल्हा ] ) यांचें मुख्य शहर होतें. यांचा शेवटचा पासी राजा

सामर या नांवाचा होता; त्यानें कनोजच्या राजाचें वर्चस्व झुगारून दिलें. त्यामुळें राजा जयचंदानें तो देश आल्हा व उदल यांस दिला व त्यांनीं रामकोट गांवाचा नाश केला अशी दंतकथा आहे. यांच्या नांवावरून असें दिसतें कीं हे ताडीचा धंदा करूं लागण्यापूर्वी यांचें दुसरें कांहीं नांव असावें व बहुधां भार लोकांची ही शाखा असावी. यांच्या उत्पत्तिकथा विविध आहेत. यांच्यांत वन्याच लोकांचें मिश्रण झालें आहे. बहेलिया, चिडियामार व घुडचळा, खाटिक, गुजर व मांगता या उपजातींच्या नांवावरून यांच्या मिश्रणाची कल्पना येईल. यांचीं लग्नें वराच्या घरीं होतात. लग्नापूर्वी वराची आई विहिरीवर बसून आंत उडी घेण्याचें सोंग करते, मग वर तिची समजूत घालून तिला घरीं आणतो. यांच्यांत वैवाहिक नीति फारशी कडक नाहीं. अनौरस संतति उघडपणें जातींत घेतात. हे लोक पूर्वी चोऱ्या करीत असत. आतां ताडी व खजुराचें मद्य तयार करतात. कांहीं लोक मजुरीहि करतात.

**पाळोन्चा**—हैद्राबाद संस्थानमध्यें वरंगळ जिल्ह्याचा एक अगदीं पूर्वेकडील तालुका. क्षेत्रफळ १२९७ चौ. मैल व लो. सं. ( १९०१ ) जहागिरी धरून ३१३२९. ह्या तालुक्यांत ८९ खेडीं आहेत; पैकीं ४८ जहागिरी आहेत. मुख्य ठिकाण बोर्गमपाड आहे. जंगलमय प्रदेश बराच असून हवा मलेरियाजनक आहे. पूर्व सरहद्दीवर गोदावरी नदी वहाते. मूळ रहिवाशी गोंड व कोयस आहेत. याच्या पूर्वेस पाळोन्चा संस्थान आहे.

**पाळोन्चा संस्थान**—हैद्राबाद संस्थानांतील वरंगळ जिल्ह्याच्या आग्नेयीकडील एक ( मांडलिक इस्टेट ) संस्थान. ह्यांत सहा पोटतालुके आहेत क्षेत्रफळ अंदाजें ८०० चौरस मैल. लोकसंख्या ( १९०१ ) ३८७४२. एकंदर उत्पन्न रु. ७०००० निझामास खंडणीदाखल रुपये ४५८७५ देण्यांत येतात. निझामाकडून संस्थानिकास देशमुखीबद्दल रुपये ४७१५ मिळतात. या संस्थानिकांच्या ताब्यांत मद्रास इलाख्यांतील गोदावरी जिल्ह्यांत असलेल्या भद्राचलम् व रेकपल्ली इस्टेटी आहेत. वरंगळच्या प्रतापरुद्राच्या अगोदरपासून हें संस्थान अस्तित्वांत असावें असें वाटतें; कारण प्रतापरुद्रानें येथील राजास 'अश्वराव' हा किताब दिला होता. मुसुलमानांनीं वरंगळ घेतल्यानंतर स. १३२४ मध्यें दिल्लीपतीनें हसनाबाद व शंकरगिरी ( पाळोन्चा ) ह्या दोन परगण्यांची व्यवस्था अण्णप्पा अश्वरावाकडे सोंपविली व स. १६९८ पावेतों हे परगणे ह्यांच्याकडेच राहिले. स. १७६९ मध्यें जाफर-उद्दौल्यानें लढाईत नरसिंह अश्वरावास मारिलें व त्याचा खजिना लुटून त्याच्या ताम्रपत्रावर लिहिलेल्या सनदा वगैरे पळविल्या. सन १७९८ मध्यें निझामानें व्यंकटराम विश्वराव ह्यास सनद देऊन त्यास २००० घोडेस्वार व ३००० पायदळ नोकरीस ठेवण्याची परवानगी दिली पण त्याच्या वंशांत कांहीं भांडणें उपस्थित झाल्यामुळें हैद्राबादचा प्रधान सर सालरजंग ह्यानें राजा सीतारामचंद्रास नवीन सनद दिली. ह्याच वेळीं भद्राचलम् व रेकपल्ली हे दोन तालुके ब्रिटिश सरकारनें आपल्याकडे घेतले. पुढें हा राजा बिनवारशी मरण पावला. १८१५ सालीं राजमातेनें मरणसमयीं आपल्या नातवास (मुलीच्या मुलाला) मांडीवर (दत्तक) घेतलें. पहिल्यानें पाळोन्चा हें संस्थानाचें मुख्य ठिकाण होतें; नंतर भद्राचलम् झालें व सध्यां अश्वरावपेठ आहे. याचा बराच भाग जंगलानें व्यापलेला असल्यामुळें येथील हवा रोगकारक व मलेरियाजनक आहे. गोदावरी नदी ह्या संस्थानांतून वहाते. नदीचें पाणी खोल असल्यामुळें तिचा शेतीकडे उपयोग करतां येत नाहीं.

**पिकांचे रोग**—मनुष्यप्राण्यास व त्यानें पाळलेल्या जनावरांस जसे अनेक प्रकारचे रोग होतात तसेंच वनस्पतींनाहि पुष्कळ प्रकारचे रोग होतात. त्या रोगांपासून कित्येक वेळां पिकाचें पुष्कळच नुकसान होतें हें शेतकऱ्यांस पुष्कळ दिवसांपासून माहीत आहे. तथापि वनस्पतींच्या रोगांचीं कारणें व व त्यांवरील उपाय यांविषयीं मात्र लोकांना अद्यापि फारच कमी माहिती आहे. यूरोपमध्यें देखील वनस्पतींच्या जीवनव्यापारांचा अभ्यास सुरू होऊन चार शतकेंहि लोटलीं नाहींत. त्यापूर्वी वनस्पतींचा विचार केवळ व्यवहारिक दृष्टीनें त्यांच्या कृषिविषयक व औषधिगुणांकडेच लक्ष्य देऊन होत असे. पण जसजसें वनस्पतींच्या जीवनव्यापाराचें ज्ञान वाढत गेलें तसतसें वनस्पती या प्राण्यांप्रमाणेंच सजीव असून त्या उभयतांच्या जीवनव्यापारामध्येंहि विलक्षण साम्य आहे हें स्पष्ट दिसूं लागलें ( 'जीवनकार्यविचार' पहा ), व पुढें स्वाभाविकपणेंच वनस्पतींच्या प्रकृतीप्रमाणेंच वनस्पतींच्या विकृतींचा अभ्यास शास्त्रीय पद्धतीनें होऊं लागला. हा अभ्यास सुरु होऊन अद्यापि पुरीं पाऊणशें वर्षेंहि झालीं नाहींत हें ध्यानांत ठेविलें असतां त्याविषयीं आपलें ज्ञान फारच थोडें आहे याबद्दल आश्चर्य वाटावयास नको. तथापि या थोड्या ज्ञानानेंहि शेतकरी वर्गास बराच फायदा झालेला आहे व पुढें जसजसे अधिक शोध लागत जातील तसतसा अधिक फायदा होत जाईल असा भरंवसा आहे. म्हणून पिकांच्या रोगासंबंधीं आज उपलब्ध असलेल्या माहितीचा सारांश येथें द्यावयाचा आहे.

पि कां च्या रो गां चें व र्गी क र ण.—प्राण्यांच्या रोगांचें वर्गीकरण सामान्यतः रोगांच्या लक्षणाप्रमाणें करण्यांत येतें पण वनस्पतींच्या रोगांच्या लक्षणांवरून वर्गीकरण करणें सोयीचें होत नाहीं. कारण एकच लक्षण अत्यंत भिन्न अशा अनेक कारणांपासून उद्भवूं शकतें. लक्षणांमधील सूक्ष्म भेद ध्यानांत येण्याइतकी या विषयाच्या ज्ञानाची प्रगति अद्यापि झालेली नाहीं; उदाहरणार्थ पानें पिवळीं होणें हें एक झाडांच्या रोगाचें सामान्य लक्षण आहे. पण हें लक्षण पाणी फार कमी किंवा फार जास्त होणें, प्रकाश अति मंद किंवा अति प्रखर असणें, कीटकांनीं झाडांच्या मुळ्या खाऊन टाकणें, जमिनींत लोह नामक द्रव्याचा अभाव असणें, जमिनींत किंवा हवेंत कांहीं विवक्षित स्थितींत कांहीं विषारी वायु उत्पन्न होणें,

व परोपजीवी वनस्पतींपासून उपद्रव होणें वगैरे एकमेकांपासून अगदीं भिन्न अशा अनेक प्रकारच्या कारणांनीं उत्पन्न होऊं शकतें. शिवाय कमी पाण्यानें आलेला पानांचा पिंवळेपणाहून दिसण्यांत भिन्न नसल्यामुळें वनस्पतींच्या रोगाचें वर्गीकरण त्या रोगाच्या कारणांवरून करणें जास्त सोयीचें आहे. ह्या रोगांचीं कारणें व ह्यांचे प्रकार खालील कोष्टकावरून ध्यानांत येतील.




या कारणांपैकीं "आंतर ( अंतःस्थ ) कारणजन्य" म्हणून ज्यांचा उलेख केला आहे त्या संबंधानें वस्तुतः कांहींच ज्ञान झालेलें नाहीं. ज्या लक्षणांचा कोणत्याहि कारणाशीं स्पष्ट संबंध जोडतां येत नाहीं तीं लक्षणें त्या वनस्पतींच्या प्रकृतिगुणामुळेंच उत्पन्न झालीं असेंच म्हणणें सध्याच्या स्थितींत शक्य आहे. कांहीं वनस्पतींमध्यें नेहमींचा हिरवा रंग कांहीं कारणामुळें तयार होत नाहीं किंवा कमी प्रमाणांत तयार होतो. त्यामुळें अशा झाडांच्या पानांचा रंग पाढरा किंवा पांढरट होतो. मनुष्यप्राण्यास कोडरोग होतो त्या स्वरूपाचाच हा एक वनस्पतींचा रोग आहे व तो अंतस्थ कारणानीं होतो. अशा रोगासंबंधीं आपलें ज्ञान अत्यंत अल्प आहे. तथापि पिकांच्या निरनिराळ्या जातींत रोग होणें किंवा न होणें हें कित्येक वेळां केवळ त्या जातींच्या प्रकृतिगुणावर अवलंबून असतें. म्हणजे रोगाचें बाह्य कारण हजर असूनहि कित्येक वनस्पतींनां त्यापासून रोग होत नाहीं. अशा रोगांवर उपाययोजना करतांना ज्या प्रकृतिगुणांवर ते अवलंबून असतात त्यांचा विचार करावा लागतो. बऱ्याच वेळां हे प्रकृतिगुण आनुवंशिक असतात व अलीकडे आनुवंशिक गुण एका पिढींतून दुसऱ्या पिढींत कसे उतरतात यासंबंधानें बराच सप्रयोग अभ्यास असंख्य शास्त्रज्ञांकडून होत असून आजपर्यंत याविषयीं महत्त्वाचे शोधहि लागलेले आहेत. या शोधापैकीं अत्यंत महत्त्वाचा शोध ग्रेगर मेंडेल नामक आस्ट्रियन जोगी होता त्यानें १८६५ त लावला. मेंडेलच्या प्रयोगावरून असें अनुमान निघतें कीं एका पिढींतून दुसऱ्या पिढींत जे गुण उतरतात ते उगाच कसे तरी उतरत नसून नियमबद्ध रीतीनें उतरत असतात. व योग्य प्रयोग करून कोणता गुण कसा उतरेल हें बऱ्याच निश्चयानें सांगतां येतें. या ज्ञानाच्या योगानें दोन किंवा अनेक पोटजातींचा संकर करून रोगाच्या बाह्य कारणांना न जुमानतां आनुवंशिकत्वानें आलेल्या केवळ प्रकृतिगुणांमुळेंच निरोगी राहणाऱ्या पिकांच्या जाती निर्माण करणे आतां शक्य झालें आहे. याखेरीज या अंतःकारणांविषयीं जास्त कांहीं सांगतां येत नाहीं.

आतां बाह्य कारणांचा विचार करतांना प्रथम हें सहज लक्षांत येतें कीं एखाद्या झाडाची वाढ तें ज्या जमिनींत व हवेंत वाढतें त्यावर अवलंबून असते. वनस्पतींचें पोषण जमिनींतील निरनिराळे क्षार व हवेंतील कार्बन डाय ऑक्साइड वायु याजवर होतें. हे क्षार जमिनींतील पाण्यांत विरघळलेले असतात व ह्या पाण्याबरोबर मुळांवाटे वनस्पतींकडून शोषिले जातात. कॅर्बॉलिक ॲसिड वायूमधील कार्बन हें द्रव्य वनस्पतीच्या मुख्य घटकापैकीं एक आहे. व तें हवेंतून मिळविण्याच्या कामीं एका विशिष्ट प्रखरतेच्या प्रकाशाची जरूर असते. तसेंच वनस्पतींचे जीवनव्यापार उष्णतेच्या एका विशिष्ट मर्यादेंतच उत्तम रीतीनें चालतात. यावरून असे दिसून येईल कीं वनस्पतींची प्रकृति चांगली किंवा वाईट असणें हें बहुतांशीं जमीन, पाणी, प्रकाश, उष्णता, या निर्जीव परिस्थितीवरच अवलंबून आहे.

अनेक पिढ्यांच्या अनुभवानें सर्व देशांतील शेतकरीवर्गास आपल्या पिकाला कोणत्या प्रकारची जमीन लागते, व पाणी, प्रकाश वगैरे बाबतींत त्यांच्या आवश्यकता काय असतात याचें बरेंच ज्ञान प्रत्यक्ष झालेलें असतें. जमिनीची मशागत, खताची योजना, पाणी देणें, पिकाची निवड व निरनिराळ्या ऋतूंमध्यें निरनिराळ्या पिकांची योजना या सर्व गोष्टी चांगले शेतकरी सामान्यतः जाणतात. पीक चांगलें किंवा वाईट येणें हें या बाबतींत असलेल्या ज्ञानावर व घेतलेल्या काळजीवर अवलंबून असतें. निरनिराळ्या पिकांनां या निर्जीव परिस्थितीपैकीं कोणता भाग अनुकूल व कोणता प्रतिकूल असतो व त्याचे इष्ट व अनिष्ट परिणाम काय होतात हें कृषिकर्मविद्या या विषयाखालीं येत असल्यानें त्याचा

विस्तार येथें करण्याची जरूरी नाहीं. येथें येवढेंच सांगितलें पाहिजे कीं, जसजशी वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र व भूगर्भशास्त्र या विषयांमध्यें प्रगति होत आहे तसतसें वनस्पती कोणत्या जमिनींत चांगल्या वाढतात, निरनिराळ्या वनस्पतींस त्यांची उत्तम वाढ होण्यास कोणत्या द्रव्यांची जरूरी लागते, उष्णता व प्रकाश यांचा परिणाम निरनिराळ्या वनस्पतींवर कशा प्रकारचा होतो इत्यादि विषयांसंबंधीं ज्ञान वाढत जाऊन निरोगी पिकें उत्पन्न करण्याचें काम अधिकाधिक सोपें होत चाललें आहे. या कामांत अलीकडील सूक्ष्मजीवशास्त्रांतील शोधांचा फारच उपयोग झालेला आहे व होणार आहे. या शोधांवरून जमिनींचा सुपीकपणा केवळ तींतील क्षारांवर अवलंबून नसून तींत असणाऱ्या सूक्ष्म जीवांवरहि ( प्राणी व वनस्पती ) अवलंबून असतो ही गोष्ट अलीकडे नजरेस आली आहे व या शोधाचें व्यवहारिक महत्त्व फार आहे.

आतां सजीव परिस्थितीमुळें प्राप्त होणाऱ्या वनस्पतींच्या रोगांचा विचार करूं. हा विचार करतांना एक गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेवली पाहिजे ती ही कीं, सृष्टीमध्यें जे असंख्य जीव ( प्राणी व वनस्पती ) आहेत त्या सर्वांमध्यें मोठया प्रमाणावर जीवनार्थ कलह अहर्निश चाललेला आहे. या पृथ्वीवर कांहीं विशिष्ट संख्येपर्यंतच जीव राहूं शकतील; त्यापेक्षां अधिक जीव उत्पन्न झाले कीं त्यांची उपासमारीची पाळी येणार. जगामध्यें जनन व मरण यांचें प्रमाण पाहिलें तर थोडया हिशोबानें असें लक्षांत येईल कीं केवळ स्वाभाविक कारणांखेरीज इतर कोणत्याहि कारणानें जगांतील जीवांना मरण न येतें तर थोडयाच वेळांत पृथ्वीवरील सर्व जागा प्राण्यांनीं व वनस्पतींनीं गच्च भरून गेली असती. पण अशी स्थिति प्रत्यक्ष प्राप्त होत नाहीं याचें कारण प्रत्येक जीवजातीचा थोडया फार वेळानें इतर जीवजातींशीं जीवनार्थ कलह सुरू होतो, व अशा परिस्थितींत राहाण्यास योग्य अशा जातींची सरशी होऊन इतर जाती मागें पडतात. या "जीवनार्थकलहा" संबंधीं विशेष खुलासा डार्विनच्या उत्क्रांतितत्त्वाची माहिती देणाऱ्या भागांत अन्यत्र केला आहे. येथें एवढेंच सांगितलें म्हणजे पुरें कीं, कलहाचा परिणाम "जीवो जीवस्य जीवनम्" या सूत्रांत फारच थोडक्यांत दर्शविला आहे. म्हणजे जगांतील जीव खरोखरीच एकमेकांस खावयास बसले आहेत, हें लक्ष्यांत ठेविलें असतां वनस्पतींचा इतर जीवांशीं ( प्राण्यांशीं व वनस्पतींशीं) जो प्रत्यहीं संबंध येतो त्यावर त्यांची चांगली किंवा वाईट स्थिति बऱ्याच अंशांनीं अवलंबून असते हें सहज समजेल. येथें आपण पिकांच्या रोगांसंबंधीं मुख्यतः विचार करीत असल्यानें पिकांचा इतर जीवांशीं संबंध येऊन त्यांचें त्यांवर स्वास्थ्य कसें अवलंबून असतें हें एका उदाहरणानें सिद्ध करून दाखवूं. एखादें गव्हाचें शेत घ्या. त्यामध्यें असंख्य गव्हाचीं काडें असतात. त्यांतील प्रत्येक काडाला कांहीं विशिष्ट प्रमाणांत पोषक द्रव्यें, पाणी, प्रकाश इत्यादि गोष्टींची जरूर असते. याकरितां प्रत्येक काडाला त्या शेतांतील थोडी थोडी जागा आपल्या स्वतंत्र उपयोगाकरितां मिळणें जरूर आहे. ती मिळाली तर त्या काडांची वाढ उत्तम व निरोगी होते. पण ती न मिळाली तर तें काड खुरटलेलें व रोगट होतें. शेतकऱ्यास हें अनुभवानें कळलेंच आहे म्हणूनच ते पिकाकरितां जमीन कसतांना एवढी मेहनत करतात खताचा पुरवठा करतात. व बीं पेरतांना गर्दी न होतां व प्रत्येक रोपाला पुरेशी जागा व उजेड मिळेल अशी योजना करतात. पण येवढयानेंच भागत नाहीं. जी जमीन शेतकरी मोठया मेहनतीनें आपल्या गव्हाच्या पिकांकरितां तयार करतो ती साहजिक इतर रानटी झाडें, झुडुपें, तणें, व रानगवतें यांनांहि आपली वाढ करण्यास सोयीची असते व त्यांनां थोडी संधि मिळाली तर तीं आपला तळ त्या शेतावर ठेवून दिल्याशिवाय रहात नाहींत. शेतकऱ्यांचा असा नित्य अनुभव आहे कीं वरच्यावर खुरपणी केली नाहीं तर लवकरच हीं आगंतुक रानगवतें आपल्या पिकाचें अन्न लुबाडून घेऊन त्याच्या जागीं आपणच शेताचे धनी होऊन बसतात. बरें, आतां जमिनीची मशागत चांगली केली आहे व रानगवतेंहि वाढूं दिलीं नाहींत तर निश्चितपणें आपला गहूं चांगला येईल म्हणून स्वस्थ बसावें म्हटलें तर तसें होत नाहीं कारण मनुष्यप्राण्यास जसें गव्हाचें पीक पाहिजे असतें तसेंच तें इतर बऱ्याच लहान मोठया जनावरांसहि पाहिजे असतें. म्हणून योग्य तजवीज केली नाहीं तर पिकाला ( खाण्यास ) गुरें, पक्षी, उंदीर, कीटक या अनेक जातींच्या प्राण्यांपासून वरच्यावर त्रास होईल व शेताची वाढ चांगली होणार नाहीं. बरें, असल्या प्राण्यांचा बंदोबस्त करून भागेल म्हणावें तर तेंहि नाहीं. कारण उघडपणें खुरपणीनें न मरणाऱ्या अशा कांहीं चोरटया, परोपजीवी वनस्पती त्या गव्हाच्या पिकांवर आपला निर्वाह करावयास तयार असतात. गव्हांवरील 'तांबेरा' व 'काजळी' किंवा "कायणी" हे रोग असल्या परोपजीवी सूक्ष्म वनस्पतींपासूनच होतात ही गोष्ट अलीकडे सिद्ध झाली आहे. सारांश, कोणत्याहि वनस्पतीची वाढ तिच्याशीं निरनिराळया रीतीनें असलेल्या जड उपाधीप्रमाणें अनेक प्राण्यांवर व वनस्पतींवर अवलंबून असते.

वरील उदाहरणावरून वनस्पतींच्या सचेतन उपाधींचा प्रकृतिस्वास्थ्यावर परिणाम होणें कसें शक्य आहे हें लक्ष्यांत आलें असेल. आतां पिकांमध्यें नासधूस करणाऱ्या व त्यांवर निरनिराळे रोग पाडणाऱ्या प्राण्यांचा व वनस्पतींचा विचार करूं.

पिकांची नासाडी करणारीं लहान मोठीं जनावरें.— गवत खाणारीं रानटी व पाळीव जनावरें, हरणें, रानडुकरें, हत्ती, उंदीर, ससे वगैरे प्राणी या सदराखालीं येतात. यांच्यापासून होणाऱ्या पीडेला रोग ही संज्ञा साधारणपणें देण्यांत येत नाहीं हें खरें, पण पिकांच्या दृष्टीनें पाहिलें असतां एखादें झाड

अशा जनावरांनीं तुडवून, मोडून, चावून किंवा कुरतडून कोणत्याहि रीतीनें दुखविलें असतां त्याची प्रकृति बिघडते ही गोष्ट निर्विवाद आहे.

तृणधान्यांच्या पिकांत जेथें असंख्य झाडें एकेका शेतांत असतात तेथें व्यक्तिशः कांहीं झाडांचें अशा कारणानें नुकसान झालें तर शेतकरी तें जुमानीत नाहींत. पण जेथें फळझाडें किंवा इमारती लांकडाचीं झाडें यासारखीं व्यक्तिशः महत्त्वाचीं झाडें लावण्यांत येतात तेथें अशा लहानमोठ्या जनावरांनीं उत्पन्न केलेल्या जखमा, मोडतोड वगैरे विकृतींनां विशेष महत्त्व येतें व त्यांचा " रोग " या दृष्टीनें विचार करून त्यांवर उपाययोजना करणें जरूर पडतें. अशा जखमा केवळ जखमा म्हणूनच वाईट नसतात, कारण जखमा भरून काढण्याचें सामर्थ्य वनस्पतींच्या अंगीं प्राण्यांप्रमाणेंच स्वाभाविक असतें, परंतु त्या जखमांवाटे रोगजनक जंतू शिरण्याचा फार संभव असतो, म्हणून अशा जखमांची योग्य काळजी घेणें हें फळझाडाच्या वगैरे लागवडींत अत्यंत महत्त्वाचें आहे.

कीटक.—या प्राण्यांचा स्वतंत्रपणें उल्लेख करण्याचें कारण ते साधारणपणें बरेच सूक्ष्म असतात. पण त्यांची वाढ इतकी जलद होते, आणि त्यांची संख्या इतकी मोठी असते कीं, हां हां म्हणतां सर्व पीक उध्वस्त होतें, व त्यामुळें वर सांगितलेल्या मोठ्या प्राण्यांच्या पेक्षांहि शेतावर पडलेल्या किडींकडे शेतकऱ्याचें अधिक लक्ष जातें. शिवाय बऱ्याच कीटकांचा जीवनक्रम मोठा गूढ असतो. त्यांचीं अनेक रूपांतरें होत असतात व ते अंडीं केव्हां घालतात, कोठें घालतात, त्यांतून आळ्या केव्हां होतात, त्यांचीं पाखरें केव्हां होतात व या अनेक स्थित्यंतरांपैकीं कोणत्या स्थितींत ते पिकास हानिकारक होतात हें पुष्कळ वेळां समजण्यास फार कठिण असतें व त्यामुळें कीटक व त्यांनीं केलेली इजा यांचा कार्यकारण संबंध सहसा लक्ष्यांत येत नाहीं. " रोग " या नांवानें उल्लेखिलेले पिकांचे बरेच विकार कीटकांपासून होतात असें सिद्ध झालें आहे व त्यांचा अभ्यास करण्याचें एक स्वतंत्र कीटकशास्त्रच उत्पन्न झालें आहे.

रोगोत्पादक वनस्पतीः—या दोन प्रकारच्या असतात. कांहीं स्वतंत्र रीतीनें निर्वाह करणाऱ्या व कांहीं परोपजीवी. पहिल्या प्रकारांत तण, व अनिष्ट झाडेंझुडपें, जीं आपल्या वाढीनें पिकांच्या वाढींत व्यत्यय आणतात त्यांचा समावेश होतो. तणाविषयीं येथें विशेष लिहिण्याची जरूरी नाहीं पण मोठ्या झाडापासून केव्हां केव्हां पिकांना इजा होते याविषयीं येथें थोडा उल्लेख केला पाहिजे. शेताभोंवती किंवा शेतामध्यें मोठीं झाडें असलीं तर त्यांच्या छायेपासून पिकांनां त्रास होतो ही गोष्ट पुष्कळांनां माहीत आहेच पण कांहीं कांहीं झाडांच्या मुळांच्या टापूंत इतर कोणत्याहि वनस्पती वाढूं शकत नाहींत. हा केवळ त्यांच्या छायेचा परिणाम नसून त्यांच्या मुळांतून निघालेल्या विषारी द्रव्यांचा परिणाम होय हें अलीकडे समजलें आहे. चिंच, बाभूळ, कळकीचें बेट यांच्या आसपास कांहीं अंतरापर्यंत कोणतेंच झाड वाढत नाहीं तें अशा कारणामुळेंच होय. शेजारीं शेजारीं वाढणाऱ्या वनस्पतींचे एकमेकांवर होणारे परिणाम हा अलीकडे एक महत्त्वाचा विषय होऊन बसला आहे व बरेच रसायनशास्त्रज्ञ व वनस्पतिशास्त्रज्ञ याविषयीं शोध करण्यांत गुंतले आहेत.

आतां दुसऱ्या प्रकारच्या म्हणजे परोपजीवी वनस्पतींविषयीं विचार करूं. प्रथमतः परोपजीवी वनस्पती म्हणजे काय हें थोडक्यांत सांगितलें पाहिजे. आपण साधारणपणें ज्या वनस्पती पाहतों त्या जमिनींत स्वतंत्रपणें उगवतात व वाढतात व आपल्यास लागणारीं पोषक द्रव्यें जमिनींतून पाण्यावाटें आपल्या मुळांनीं शोषून घेतात. शिवाय त्यांच्या पानामध्यें किंवा इतर कोणत्या तरी भागांत हिरव्या रंगाचे कण असतात. त्या कणांत असणाऱ्या हरिद्रव्याच्या योगानें या वनस्पतींनां हवेंतील कॅर्बानिक ॲसिड पृथक्करण सूर्यप्रकाशाच्या साह्यानें करतां येतें. कॅर्बानिक ॲसिडमध्यें कार्बन व ऑक्सिजन अशीं दोन मूलद्रव्यें असतात. तीं या पृथक्करणामुळें निरनिराळीं होतात. ऑक्सिजन हवेंत परत जातो व कार्बन वनस्पतींच्या शरीरांत घेतला जातो. तेथें मुळ्यांवाटे शोषून घेतलेल्या अनेक द्रव्यांशीं त्याचे निरनिराळे रासायनिक संयोग होऊन शर्करा, पिष्ट, तेल इत्यादि पदार्थ तयार होतात व या पदार्थांचा अन्नाप्रमाणें उपयोग करून या वनस्पती आपली वाढ करतात. परोपजीवी वनस्पती आपलें अन्न वरील प्रकारानें तयार न करतां थोड्याफार प्रमाणांत तें इतर जीवांकडून ( प्राणी किंवा वनस्पती यांजकडून ) आयतेंच तयार असलेलें मिळवून आपली उपजीविका करतात. परोपजीवी झाडांचीं परिचित अशीं उदाहरणें म्हटलीं म्हणजे आंब्यावर वगैरे वाढणारें " बांडगुळ " किंवा ऊंस, ज्वारी वगैरेंच्या मुळ्यांवर वाढणारा " टारफुला " अथवा "टवळी" ही होत. बांडगुळाचें बीं दुसऱ्या कोणत्या तरी झाडाच्या फांदीवर रुजतें व इतर झाडें ज्याप्रमाणें जमिनींतून आपलें अन्नसाहित्य शोषून घेतात त्याप्रमाणें बांडगुळ हें या फांदींतून आयतें तयार झालेलें अन्न चोरून घेतें. बांडगुळामध्यें किंवा टारफुल्यामध्यें ही परोपजीवी वृत्ति अद्यापि पूर्णपणें आली नाहीं असें म्हटलें पाहिजे, कारण त्यांचीं पानें कांहींशीं हिरवीं असतात व त्यांतील हरितकणांच्या योगानें त्यास आपल्या अन्नाचे कांहीं घटकपदार्थ तयार करतां येतात. पण परोपजीवित्वाच्या पुढच्या पायरीस पोंचलेल्या दुसऱ्या पुष्कळ वनस्पती आहेत. ह्या सर्वस्वीच परावलंबी असतात, त्यांच्यामध्यें हिरवा रंग मुळींच नसतो किंवा नष्टप्राय असतो. याचें उदाहरण लसुणघांसावर वाढणारी अमरवेल किंवा निमाळी ( आकाशवेल ); हिचा रंग पिवळसर असतो, पानें अगदींच खुरटलेलीं असतात व त्यामध्यें हिरवा रंग नसतो. ही वेल दुसऱ्या वनस्पतीस वेढून टाकते व जेथें जेथें या दोघांचा संबंध येतो तेथें तेथें या वेलीस लहान

लहान शोषणेंद्रियें फुटतात व त्यांच्या योगानें तिला दुसऱ्या वनस्पतीनें तयार केलेलें अन्न शोषून घेतां येतें. असलेंच आणखी एक उदाहरण म्हणजे तंबाखूच्या मूळांवर उगवणारा "बंबाखू" याचें होय.

आपल्या डोळयांस स्पष्ट दिसणाऱ्या मोठ्या सपुष्प वनस्पतींपैकीं परावलंबी वनस्पतींचींहि उदाहरणें वर दिलीं व आणखीहि कांहीं देतां येतील पण परोपजीवित्व ज्यांमध्यें पूर्णत्वास जाऊन पोंचलें आहे असे दोन मोठे वनस्पतिवर्ग आहेत. त्यांतील वनस्पती सामान्यतः नुसत्या डोळयांपुढें सहसा न दिसणाऱ्या अशा अति सूक्ष्म आकाराच्या असतात, या वर्गांतील अति मोठ्या वनस्पती म्हणजे ज्यांस आपण "कुत्र्याच्या मुताची छत्री" किंवा "अलिंबें" म्हणतों त्या होत.आपण "बुरा अथवा बुरशी" म्हणतों तो तर या वनस्पतिवर्गांतील एका वनस्पतीचें एक अरण्यच होय. यावरून त्यांच्या आपणास सूक्ष्मत्वाची कल्पना होईल. या दोन परावलंबी वनस्पतिवर्गांपैकीं एकास "अलिंब वर्ग" असें नांव दिलें आहे व दुसऱ्यास "जंतुवर्ग" ही संज्ञा आहे. या जंतुवर्गांतील कित्येक जाती प्लेग, महामारी, विषम, क्षय वगैरेसारख्या भयंकर रोगांचीं कारणें म्हणून हल्लीं प्रसिद्ध आहेत. या दोन वर्गांतील कोणत्याहि वनस्पतींत वर सांगितलेलें हरितद्रव्य असत नाहीं व त्यामुळें त्यांचा निर्वाह अन्य प्राण्यांच्या किंवा वनस्पतींच्या शरीरापासून आयत्या तयार मिळालेल्या अन्नावरच होतो, अलिंबवर्ग व जंतुवर्ग यांच्याविषयीं स्वतंत्र माहिती पुढें दिली असल्यामुळें येथेंच त्यांच्या शरीररचनेविषयीं विस्तृत विवेचन करावयास नको. एवढेंच सांगितलें म्हणजे पुरें आहे कीं, हे दोनहि वर्ग अपुष्प वनस्पतींपैकीं आहेत व त्यांची शरीररचना अत्यंत साधी असते. त्यांचा आकार अति सूक्ष्म असतो, पण त्यांची पुनरुत्पत्ति फारच झपाट्यानें होत असल्याकारणानें त्यांच्या आकाराचा कमीपणा त्यांच्या संख्येनें भरून काढला जातो. यांपैकीं कांहीं मृत जीवावर आपली उपजीविका करतात; त्यांस शवोपजीवी म्हणतात आणि बाकीच्या जिवंत जीवांवर निर्वाह करतात त्यांस जीवोपजीवी म्हणावें. शवोपजीवी अलिंब व जंतू मृतावर उपजीविका करणारे असल्यामुळें वनस्पतींच्या रोगाच्या दृष्टीनें त्यांचें महत्त्व नाहीं. पण जीवोपजीवी अलिंब व जंतू हे वनस्पतींमध्यें अनेक प्रकारचे रोग उत्पन्न करतात. शेतकऱ्यांच्या परिचयाचे अलिंबजन्य रोग म्हटले म्हणजे गव्हांवरील "तांबेरा," ज्वारी-बाजरी वगैरेंवरील "काजळी" किंवा "काणी" व द्राक्षांवरील "भुरी" हे होत. जंतुजन्य रोगांचें उदाहरण म्हणजे बटाट्यावरील "चक्री" किंवा "बांगडी" हा रोग होय. असले रोग फार पुरातन कालापासून माहीत आहेत व त्यांच्यापासून कित्येक वेळां पिकें फारच थोड्या अवधींत साफ बुडालेलीं आहेत. पण हा दैवी क्षोभाचा परिणाम, अशीच केवळ हिंदुस्थानांत नव्हे तर इतर देशांतहि सुमारें पाउणशें वर्षांपूर्वीपर्यंत कल्पना होती. सन १८५० च्या सुमारास या रोगाचा अभ्यास शास्त्रीयपद्धतीनें करण्यास सुरवात झाली. ड बारी या प्रसिद्ध जर्मन वनस्पतिशास्त्रज्ञानें १८६६ या वर्षीं अलिंब व जंतुवर्गाविषयीं एक जगप्रसिद्ध ग्रंथ प्रसिद्ध केला व त्या ग्रंथानेंच वनस्पतींच्या रोगांचा व अलिंब वर्गाचा कार्यकारणसंबंध प्रथम दाखविला. त्यानंतर गेल्या ६०।७० वर्षांत पिकांचे बरेच रोग काळजीपूर्वक तपासले जाऊन त्यांचा विवक्षित अलिंबांशीं संबंध प्रयोगानें सिद्ध करून दाखविण्यांत आला आहे. 'वनस्पतिरोगविचार' असें एक नवीन शास्त्रच अलीकडे निर्माण झालें आहे व सर्व देशांत या विषयांत शोध चालू आहेत. पिकांच्या रोगांचीं निरनिराळीं कारणें जीं वर सांगितलीं आहेत त्या सर्वांत कांहींअंशीं जास्त महत्त्वाचें कारण हे जीवोपजीवी अलिंब व जंतू होत असें म्हणण्यास हरकत नाहीं, कारण हे फार सूक्ष्म असल्यानें त्यांचें स्वरूप लवकर लक्ष्यांत येत नाहीं व त्यांनीं उत्पन्न केलेले रोग इतके नकळत येतात व इतक्या झपाट्यानें फैलावतात कीं त्यापुढें मनुष्याची मति गुंग होऊन जाते. या रोगापासून नुकसानहि अतोनात होत असतें हें खालील आंकड्यावरून दिसून येईल.

| रोगाचें नांव | देशस्थान | वार्षिक नुकसान रु. |
|---|---|---|
| गव्हांवरील तांबेरा | हिंदुस्थान | ४ कोटी |
| ,, ,, | आस्ट्रेलिया | ४॥ कोटी |
| ज्वारीवरील काजळी | मुंबई इलाखा | २ कोटी |
| सुपारीवरील "गळ" किंवा "कोलेरोग" | कारवार व रत्नागिरी | १० लाख |
| द्राक्षावरील "भुरी" | नाशिक | २ लाख |
| ओटवरील "काजळी" | अमेरिका | १९ कोटी |
| बटाट्यावरील रोग | ,, | १० कोटी |

असेच आणखी पुष्कळ रोग आहेत व त्यांपासून नुकसानहि पुष्कळ होतें. हे रोग बहुधा सांथीच्या स्वरूपाचे (सांसर्गिक) असतात व थोड्याच वेळांत पिकांचा पूर्ण नाश करतात. जमिनीची मशागत उत्तम झालेली असतां खत, खुरपणी, वगैरे योग्य वेळीं दिली असतांहि असे रोग उत्पन्न होतात व त्यांचें कारणहि सहसा लक्षांत येत नाहीं. तेव्हां इतर कारणांपासून झालेल्या विकारांपेक्षां याच कारणांपासून झालेल्या विकारांनां रोग ही संज्ञा प्रामुख्यानें लाविली जाते, व वनस्पतिरोगविचार या शास्त्रास प्रत्यक्ष व्यवहारांत पुष्कळ वेळां अलिंबविचार आणि वनस्पतिरोगचिकित्सक यांस अलिंबशास्त्रज्ञ असें कां म्हणतात त्याचा उलगडा होईल. आतां कांहीं सुप्रसिद्ध अलिंबजन्य रोगांचें थोडक्यांत वर्णन देतो.

"तांबेरा रोग":—हा ज्वारी,बाजरी,गहूं विलायती गवत लसूण घांस, एरंडी वगैरे निरनिराळ्या जातींच्या पिकांवर व जंगली झाडांवर होतो. पानांवर, देठावर किंवा झाडाच्या

दुसऱ्या कोणत्याहि भागावर तांबूस, पिंवळसर किंवा उदी रंगाचे ठिपके पडतात. या निरनिराळया पोषक वनस्पतींवरचा तांबेरा निरनिराळया जातींचा असतो व एकीवरचा तांबेरा दुसरीवर सहसा होत नाहीं पण रोगांचीं लक्षणें व शिलिंध्राचा जीवनक्रम साधारणपणें सर्वांमध्यें सारखाच आहे. म्हणजे तें पोषक वनस्पतीच्या शरीराच्या आंत राहून त्यांचे रेणु मात्र बाहेर दृष्टीस पडतात. हे रेणू वायु व कृमिकीटक वगैरेंकडून जिकडे तिकडे पसरले जातात व त्यांपासून रोगाची पुनरुत्पत्ति होते. तांबेऱ्याचे ठिपके या रेणूनेंच बनलेले असतात त्यांचे निरनिराळे रंग हे कालमानाप्रमाणें भिन्नजातींचे रेणू तयार होतात त्यामुळें प्राप्त झालेले असतात. या रोगानें कांहीं पिकांचें फार नुकसान होतें. गव्हांचे दाणे सुरकुतलेले हलके होतात. या रोगांमुळें हिंदुस्थानांत दरवर्षी ४कोटी रुपयांचें नुकसान होतें म्हणून मागें कोष्टकांत सांगितलेंच आहे.निरोगी जाती शोधून काढणें याशिवाय या रोगावर उपाय नाहीं.

"काजळी" अथवा "काणी" रोगः—हा ज्वारी, बाजरी, राळा, मका, ऊंस इत्यादि पिकांवर होतो. रोगजनक शिलिंध्रक रोगी झाडाच्या आंत वाढून फुलें यावयाच्या सुमारास फुलांत दिसूं लागतें. व दाण्यांतील सत्वांश खाऊन त्यांच्या जागीं आपले असंख्य रेणु उत्पन्न करतें. "काजळी" ची काळी पूड या रेणूंचीच असते.या रेणूपासून रोगाची पुनरुत्पत्ति होते. वरील सर्व पिकांवरील "काजळीवर" उपाय अद्यापि सिद्ध झाले नाहींत, तरी ज्वारीवरील रोगावर मात्र एक चांगला उपाय आहे तो हा-पेरण्यापूर्वी बीं मोरचुताच्या पाण्यांत भिजवून वाळवून पेरणें. सोलापूर, सातारा व बेळगांव या जिल्ह्यांत काजळीपासून बरेंच नुकसान होतें. वरील सोपा उपाय केला असतां तें वांचेल.

द्राक्षांवरील "भुरी" रोगः—या रोगापासून मुंबई इलाख्यांत बरेंच नुकसान होतें. द्राक्षांच्या पानांवर व फळांवर राखेसारखी भुकटी पडते. ती भुकटी ह्या रोगाच्या रेणूंनीं झालेली असते. हे रेणू एका वेलीवरून दुसरीवर जातात व तेथें त्यांच्यापासून पुन्हां रोग होतो. द्राक्षांवर मोरचूत, कळीचा चुना, व सावण यांचें मिश्रण शिंपडलें असतां हा रोग बराच कमी होतो. गुलाबावरहि एक भुरीरोग होतो त्यावर वरील मिश्रण शिंपडलें असतां उपयोग होईल.

ऊस गाभ्यांत रंगणेंः—हाहि एक शिलिंध्रकजन्य रोग आहे. उंसाचा गाभा लाल होतो व त्यांत मध्यें मध्यें पांढुरके ठिपके लंबवर्तुलाकार व आडवे असे दिसतात व बाहेरून ऊंस हलके हलके वाळू लागतो असीं या रोगाचीं लक्षणें आहेत. हा रोग मुंबई इलाख्यांत पुष्कळ ठिकाणीं आढळतो. हा जर मोठया प्रमाणावर झाला तर पिकाची फार नासाडी होते. रोगट बियाण्यापासूनच हा रोग मुख्यत्वें पिकास होतो. याकरतां रोगट बीं न लावण्याची खबरदारी घेतली पाहिजे. जेथें रोग मुळींच नाहीं अशा ठिकाणाहून बीं मिळविलें पाहिजे. लावणीच्या वेळीं ऊंस सबंध न लावतां कांडीं कांडीच लावावीं व ज्या कांड्याच्या टोकांमध्यें यत्किंचित लाल रंग दिसेल तें लावूं नये. त्यांत रोग असण्याचा संभव असतो.

"केवड्या" किंवा "गोसावी" रोग.—हा बाजरी, ज्वारी, राळा वगैरे पिकांवर होतो. बाजरीचीं पानें प्रथम केवड्याच्या रंगाचीं होतात. व नंतर तीं वाळून उभीं चिरलीं जाऊन त्यांचे धागे धागे सुटतात कणसामध्यें दाण्याच्या जागीं लहान लहान हिरवीं सुरळी झालेलीं पानें येतात. हा रोग उत्पन्न करणाऱ्या अलिंबाचा जीवनवृत्तात अद्यापि पूर्ण समजलेला नाहीं व यावर अद्यापि उपायहि निश्चित झाला नाहीं.

सुपारीवरील 'कोळे'रोग.—हा कारवार व म्हैसूरकडे पुष्कळ होतो .यासच रत्नागिरीकडे "गळ" असे म्हणतात. हा मुख्यतः फळांवर पावसाळ्याच्या आरंभीं होतो. रोगजनक अलिंब फळाच्या त्वचेंत शिरून फळें कुजून खालीं पडतात. अशा कुजलेल्या फळांचे ढीगच्याढीग रोग झालेल्या बागेंत दृष्टीस पडतात. या रोगानें फक्त कारवार जिल्ह्यांतच कमींत कमी ९ लाख रुपयांचें दरसाल नुकसान होतें. या रोगावर, म्हैसूर संस्थानांतील डॉक्टर कोलमन म्हणून एक तज्ज्ञ कामदार आहेत त्यांनीं मोरचुताचें एक विशिष्ट मिश्रण फळांवर शिंपडण्याकरतां शोधून काढलें आहे व गेलीं चार वर्षे त्याचा त्यांनीं तिकडे उपयोग करून पाहिला आहे. त्यानें रोगजन्य नुकसान बरेंच कमी होतें असें सिद्ध झालें आहे. मुंबई इलाख्यांत आणि रत्नागिरी जिल्ह्यांत हा उपाय करून पाहिला आहे. व त्यापासून फायदाहि झालेला आहे.

बटाटयावरील "चक्री" किंवा "बांगडी"रोग.—ह्या रोगाचें प्रथम चिन्ह म्हटलें म्हणजे झाडें एकाएकीं वाळून मरूं लागतात. रोगी झाडापासून झालेला एखादा बटाटा मधोमध चिरला असतां सालीच्या आंत सुमारें पाव किंवा अर्ध्या इंचावर एक तपकिरी रंगाची किंवा काळसर अशी वर्तुळाकार रेषा दिसून येते. व चिरलेला बटाटा चिमटींत धरून दाबला असतां या रेषेंतून एक पिंवळसर रंगाचा चिकचिकीत सूक्ष्म पदार्थ निघतो. हा जंतूंचा बनलेला असतो. रोगी बटाटयाच्या झाडांतील जलवाहिन्या या जंतूंनीं गच्च भरून गेलेल्या आढळतात. व त्यामुळेंच पानांकडे पाणी जावयाचें बंद होऊन झाड मरतें. या रोगाचा प्रसार मुख्यतः रोगी बियाण्यापासून होतो, म्हणून रोग होऊं लागला असतां बटाटे सबंध न लावतां कापून लावणें चांगलें; म्हणजे रोगदर्शक रेषा असलेले बटाटे लावले जाणार नाहींत. शिवाय हा रोग उत्पन्न करणारे जंतू जमिनींत २।३ वर्षे तरी सहज जिवंत राहूं शकतात असें मानण्यास जागा आहे. म्हणून एखाद्या शेतांत "चक्री" रोग झाला असतां त्याच जमिनींत पुन्हां बटाटयाचें पीक ३ वर्षेपर्यंत तरी घेऊं नये.

वटाट्यान्या वर्गांतीलच वांगीं, टोम्याटो वगैरे पिकांनांहि असलाच रोग होत असतो. तेव्हां हीं पिकेंहि रोग झालेल्या जमिनींत न घेण्याची खबरदारी घेतली पाहिजे. आतां सांगितलेल्या रोगांखेरीज दुसरे अनेक अलिवजन्य रोग पिकांवर होतात. त्यांपैकीं कांहीं परदेशांत होतात व कांहीं या देशांत होतात. ते फारसे महत्त्वाचे नाहींत. कांहींविषयीं अद्यापि बरीच माहिती मिळवावयाची आहे, म्हणून त्यांचा उल्लेख येथें केलेला नाहीं. आतांपर्यंत पिकांच्या रोगांच्या कारणांचा विचार झाला. विवेचनाच्या सोयीसाठीं जरी हीं कारणें भिन्न म्हणून दर्शविलीं आहेत तरी प्रत्यक्ष व्यवहारांत हीं निराळीं कारणें पुष्कळ वेळां परस्परांस पोषक होऊन एक किंवा अधिक रोग उत्पन्न करतात हें येथें सांगितलें पाहिजे. उदहरणार्थ, पुष्कळ अलिवजन्य रोगांचा फैलाव हवेमधील ओलाव्यावर व उष्णतेवर अवलंबून असतो व म्हणून यांपैकीं बरेच रोग पावसाळ्यांतच होतात. कित्येक अलिवजन्य रोग कांहीं किड्यांच्या मागोमागच नेहमीं येतात. नाहींतर येतच नाहींत. उदाहरणार्थ, पेरू संत्रीं,जांभूळ वगैरे फळझाडांच्या पानांवर काजळासारखी काळी भुरी " मावा " नांवाच्या किड्यापासून निघालेल्या गोड द्रव्यावर येते. या ठिकाणीं रोगाचें मूळ कारण अलिव नसून "मावा" हें होय व ह्यावरच उपाय करणें जरूर असतें. या उदाहरणावरून उपाययोजना करतांना रोगांच्या कारणांचा किती खोल विचार करणें जरूर आहे हें लक्ष्यांत येईल.

आतां वनस्पतींच्या रोगांचीं लक्षणें कशीं असतात हें सांगितलें पाहिजे. हीं लक्षणें बहुधा सामान्य स्वरूपाचीं असतात व त्यांमुळें निरनिराळ्या कारणांपासून एकच लक्षण किंवा लक्षण-समुच्चय उद्भवतो असें पुष्कळ वेळां घडतें.

झा ड पि व ळें प ड णें.—झाडांचा नेहमींचा तजेलदार हिरव्या रंगाऐवजीं पिवळसर किंवा पिका रंग येणें हें नेहमीं आढळणारें रोगाचें लक्षण आहे. गर्दीमुळें किंवा छायेमुळें मिळालेला अपुरा प्रकाश,अपुरी उष्णता,जमिनीमध्यें लोह द्रव्याचा अभाव, मुळांभोंवतीं साचलेलें पाणी, अतिशय कोरडी हवा, हवेमध्यें मोठमोठ्या शहरांत विशेषतः कारखान्यांच्या शेजारीं आढळणारे दूषित किंवा विषारी वायु, मुळांस किंवा इतर भागावर लागलेले कीटक किंवा परोपजीवी वनस्पती, हीं झाड पिवळें पडण्याचीं मुख्य कारणें होत.

को ड किं वा चि त्र वि चि त्र रं ग.—या लक्षणाचें कारण किंवा कारणें अद्यापि निश्चित नाहींत; तीं बहुधा अंतस्थ असतात. असलीं लक्षणें दाखविणाऱ्या झाडामध्यें व साध्या झाडांमध्यें रासायनिक दृष्ट्या बरेंच अंतर दिसून येतें. कलमें किंवा डोळे बांधतांना कित्येक वेळां असें आढळलें आहे कीं, हीं लक्षणें कलमांतून खुंटावर जातात. कांहीं शोधकांच्या मतें हीं लक्षणें कांहीं ठिकाणीं तरी विवक्षित जंतूमुळें होतात. ( वरील दोनहि लक्षणांचा परिणाम एकच होतो. तो हा:—झाडांमध्यें हरितद्रव्य कमी होतें व त्यामुळें शर्करा,पिष्ट इत्यादि पदार्थ कमी तयार होतात व झाडांची उपासमार होते ).

पा ना व री ल नि र नि रा ळ्या रं गां चे ठि प के व भों कें— यांपैकीं बरेचसे अलिवजन्य असतात. कित्येक कीटकांमुळें उत्पन्न होतात. प्रत्येक अलिव किंवा कीटक कांहीं विशिष्ट तऱ्हेचे ठिपके उत्पन्न करीत असतात. या ठिपक्यांच्या रंगरूपाचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां त्यांचें कारण निश्चित करणें सोपें होतें. उदाहरणार्थ, ठिपक्यांवर पांढरट किंवा करड्या रंगाची पूड असेल तर तें भुरी रोगाचें लक्षण आहे (अलिवजन्य),पिवळ्या, शेंदरी तांबड्या किंवा काळ्या रंगाचे ठिपके बहुधां " तांबेरा " नामक अलिवजन्य रोगाचें लक्षण असतात. पुष्कळ पानांवर खवले पडल्यासारखे दिसतात ते एक जातीचे किडे आहेत. कित्येक वेळां पानांवर पडलेल्या पाण्याच्या थेंबांतून सूर्यकिरणांचें केंद्रीभवन होऊन तेवढाच भाग जळला जाऊन ठिपके पडतात.

मा ळू न जा णें —पुष्कळ पिकांमध्यें कांहीं झाडें हलके हलके किंवा एकदम वाळून गेलेलीं दिसतात. याचें कारण पाण्याची कमतरता असें एकतद्दर्शनीं वाटतें पण बारीक नजरेनें पाहिलें असतां पाणी भरपूर करूनहि हें लक्षण प्राप्त झालेलें दिसतें. अशा ठिकाणीं बहुतकरून त्या झाडांच्या मुळ्यांस किडे किंवा अलिव यांनीं उपद्रव केलेला असतो. कापूस, तूर वगैरे पिकांमध्यें हा रोग फार आढळतो. त्यास कांहीं ठिकाणीं "मूळखाई" हें अन्वर्थक नांव दिलें जातें. हा एक अलिवजन्य रोग आहे. बटाट्यावर " बांगडी " म्हणून रोग असतो तो झाडांवर झाला म्हणजे झाडें अशींच अकालीं मरतात. हा रोग जंतुजन्य आहे.

पा नें ज ळ णें.—या लक्षणाचें कारण बहुधां पाण्याचा अभाव हें असतें. यांत पानें जळून गेल्यासारखीं दिसतात. याशिवाय पांढरा, तपकिरी, लाल किंवा तांब्यासारखा असे निरनिराळे रंग केव्हां केव्हां येतात. त्या सर्वांचीं कारणें अद्यापि निश्चित झालेलीं नाहींत. या सर्वांचा परिणाम मात्र एकच होतो कीं, हरितद्रव्याचें काम ह्यांच्या योगें मंदावतें व त्यामुळें रोगी झाडांची उपासमार होते.

कृ त्रि म व स्वा भा वि क ज ख मा.—जंगलाच्या व फळझाडांच्या लागवडींत कापणी किंवा छाटणी करतांना झाडांना कृत्रिम जखमा कराव्यांत येतात. त्याशिवाय जंगली व पाळीव जनावरें, झंझावत, वीज व गारा पडणें वगैरेंच्यामुळेंहि झाडांस लहानमोठ्या जखमा होतात. या जखमा भरून काढण्याची योजना वनस्पतींच्या अंतररचनेंत केलेली असते. तथापि जखमा मोठ्या असल्या तर त्या भरून येण्यापूर्वींच त्यांमध्यें निरनिराळे दोष उत्पन्न करणारे किडे, जंतु व अलिव प्रवेश करतात व पुष्कळ वेळां झाडांवर वाहती गळवें, टेंगळें व दुष्ट ( कितीहि प्रयत्न केले तरी बरें न होणारे व्रण ) असे उत्पन्न करतात म्हणून

जखमांची जोपासना हें जंगलाच्या व फळझाडांच्या लागवडींत विशेष महत्त्वाचे काम आहे.

फोड व गांठी.—खपल्या वगैरे लक्षणें बहुतकरून कीटक किंवा इतर लहान प्राणी किंवा अलिंब व जंतू यांच्यामुळें उद्भवतात. उंबराच्या पानावरील फोड, बटाट्यावरील फोड ( देवी ), वांगीं, मिरच्या वगैरे झाडांच्या मुळ्यांवरील गांठी, संत्रीं, द्राक्षें वगैरेंच्या पानांवर, किंवा फळावर तपकिरी रंगाच्या खपल्या पुष्कळांच्या पहाण्यांत आल्या असतील. यांपासून झाडाच्या पोषणांत कमी अधिक व्यत्यय येऊन त्या मानानें नुकसान होतें. कित्येक वेळां या गांठी किंवा फोड पुष्कळ मोठे होतात. खैराच्या फांद्यांवर सुपारीपासून तो नारळाएवढ्या मोठाल्या असंख्य गांठी दिसतात. त्या एक जातीच्या अलिंबापासून होतात. हें लक्षण उत्पन्न करणारे किडे किंवा अलिंब जर फुलांवर किंवा कोंवळ्या पानांवर किंवा पानांच्या वळ्यांवर किंवा मुळांवर लागले तर झाडांचें अतोनात नुकसान करतात म्हणून ह्यांच्यापासून सावध राहिलें पाहिजे.

साव व कुजणें.—या सदराखालीं अनेक भिन्न कारणांपासून वनस्पतींच्या निरनिराळ्या भागांमध्यें उत्पन्न होणाऱ्या लक्षणांचा समावेश केला आहे झाडांच्या मुळ्या किंवा फळें कुजणें हें कीटक, अलिंब किंवा जंतु या तिन्ही कारणांनीं ( एकत्र किंवा स्वतंत्रपणें असतांना ) संभवतें. उघड्या जखमांमधून निरानिराळ्या तऱ्हेचे डिंकासारखे चिकट व बुळबुळीत पदार्थ निघतात ते याच कारणानें. शेवग्याच्या झाडावर एक प्रकारचा किडा असतो, तो जेथें जेथें पोखरतो तेथून मांसासारखा दिसणारा चीक किंवा गोंद निघतो, तो पुष्कळांनीं पाहिला असेल. तो लक्ष्यांत आणला असतां या लक्षणाचें साधारण स्वरूप लक्षांत येईल. तसेंच सांठविलेले बटाटे, त्यांत आळ्या झाल्यावर किंवा झाल्या नसल्या तरी निरनिराळ्या कारणांनीं कुजतात. या कुजण्यांत दोन प्रकार आहेत; एकांत कुजणाऱ्या पदार्थाला पाणी ( ओलें कुजणें ) सुटतें. व दुसऱ्यांत पाणी सुटत नाहीं ( कोरडें कुजणें). लक्षणांचा बारीक रीतीनें तपास करून त्यांचें मुख्य कारण कोणतें व आनुषंगिक कारणें कोणतीं यांचा विचार करून उपाययोजना करणें जरूर असतें.

वठणें.—सबध झाड किंवा झाडाच्या कांहीं फांद्या वठतात. हें या प्रकरणाच्या आरंभीं सांगितलेल्या सर्व तऱ्हेच्या कारणांनीं संभवतें. स्वाभाविक अंतस्थ कारणांपैकीं झाडाच्या जुनेपणामुळें हा परिणाम दृष्टीस पडतो. किंवा आग, वीज, पाण्याचा अभाव, प्रखर ऊन, कडक थंडी इत्यादि अचेतन उपाधी, किंवा बाडगुळ किंवा इतर परोपजीवी वनस्पती ( अलिंब वगैरे ), टोळधाडी वगैरे सजीव परिस्थितीचे प्रकार यामुळें हीं झाडें वठून जातात.

विद्रूपता.—ही पुष्कळ निरनिराळ्या कारणांनीं संभवते व या लक्षणांत प्रत्येक झाडाच्या विवक्षित आकारामध्यें व रूपांमध्यें जे कांहीं विशेष बदल होतात व ज्यांच्या योगानें त्या झाडाला इजा होऊन तें मरण्याचा संभव असतो, त्या सर्वांचा समावेश केला आहे. बाजरीच्या ताटाला कणीस येण्याच्या ऐवजीं लहान लहान पानांचाच एक गुच्छ पुष्कळदां येतो ( त्याला गोसावी रोग असें म्हणतात ). पुष्कळ झाडांच्या फांद्याफांद्यामधील अंतर स्वाभाविकपणें असावयाचें त्याऐवजीं पुष्कळच कमी होऊन पुष्कळसा फांद्यांचा एक झुबकाच तयार होतो ( उदाहरणार्थ, पिंपरीच्या झाडावर ); व झाडाचा आकार अगदीं खुरटलेला होतो, पानांचा आकार फार लहान होतो व पानें चुरमुडल्यासारखीं दिसतात ( उदाहरणार्थ, वांगी व मिरच्या यांचा "गोजा" किंवा "बोकड्या" रोग) हे विद्रूपतेचेच प्रकार होत. विद्रूपतेचीं कारणें देखील आरंभीं दर्शविलेल्या सर्व प्रकारचीं असूं शकतील.

फुलें व फळें अकालीं गळून पडणें, दाणे न भरणें.—पिकाच्या संबंधानें या लक्षणांबद्दल वारंवार तक्रारी येतात. यांचीं सुद्धां अत्यंत भिन्न भिन्न कारणें असतात व कोणतें कारण किंवा कारणें लागूं पडतील याचा फार बारकाईनें विचार करावा लागतो. पुष्कळदां हीं कारणें अत्यंत गूढ असतात. जसजसा या विषयाचा अधिकाधिक अभ्यास होईल तसतसा त्यावर जास्त प्रकाश पडत जाईल. सध्यां याविषयीं फारच कमी माहिती आहे.

आतां वनस्पतिविषयक रोगनिवारणाच्या सामान्य तत्त्वांचें थोडें दिग्दर्शन करूं. रोगनिवारणाचीं दोन मुख्य अंगें आहेत; एक प्रतिबंधन व दुसरें औषधोपचार. इंग्रजींत एक म्हण आहे तिचा अर्थ "औषधोपचारानें रोग बरा करण्यापेक्षां रोग मुळींच होऊं न देणें हें अधिक चांगलें" असा आहे. ही म्हण वनस्पतींच्या रोगांना तर फारच लागू आहे. कारण या रोगांचें—विशेषतः अलिंबजन्य रोगांचें—अस्तित्वच आधीं रोगानें सर्व काम करून टाकल्याशिवाय उघडकीस येत नाहीं. पुष्कळ अलिंबांचें तंतुमय शरीर, ज्यानें पोषकापासून अन्नरस चोरला जातो तें—अंतं गुप्त असतें. व सर्व अन्नसंचय फस्त झाल्यानंतर संततिकार्यासाठीं जेव्हां त्यापासून रेणू ( बीज ) उत्पन्न व्हावयाचे असतात तेव्हांच कायतीं तीं अलिंबें बाहेर नजरेस पडतात. म्हणून त्यांनीं उत्पन्न केलेल्या रोगांवर औषधोपचार करून ते बरे करणें फार कठिण, जवळ जवळ अशक्यच असतें. पण रोगाचें कारण व त्याच्या साद्यंत क्रमाची माहिती झाल्यावर मग तो रोग होऊं न देण्याबद्दल प्रतिबंधक उपायांची योजना करणें अधिक सोपें आणि उपयोगाचें होतें.

वनस्पतींच्या रोगासंबंधानें आणखी एक गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे की, व्यक्तिशः कांहीं झाडांना रोग झाला तर त्याचें विशेष महत्त्व शेतकऱ्यास वाटत नाहीं व जोंपर्यंत एकंदर पिकांवर त्याचा फारसा परिणाम होत नाहीं तोंपर्यंत व्यक्तिशः होणाऱ्या झाडांच्या व्याधींना ते रोग हें नांवच देत नाहींत.

पण मनुष्यप्राण्याच्या रोगाप्रमाणेंच वनस्पतींच्या रोगांनां सुद्धां वेळोवेळीं सांथीचें स्वरूप येतें. तें येणें किंवा न येणें हें पुष्कळ कारणांवर अवलंबून असतें, व रोगनिवारण करतांना त्या कारणांचा विचार करणें जरूर असतें. कोणत्याहि रोगास सांसर्गिक किंवा सांथीचें स्वरूप यावयास पुढें सांगितलेल्या गोष्टींची आवश्यकता असते—(१)रोग ज्यामध्यें होईल अशा पुष्कळ व्यक्ती जवळ किंवा एके ठिकाणीं असाव्या लागतात. (२)संसर्गाचीं साधनें असावीं लागतात.व (३) रोगजनक कारणांस अनुकूल परिस्थिति असावी लागते.

यांपैकीं पहिली स्थिति शेतकीच्या व्यवहारांत सहजच प्राप्त होते. एकाच जातीचीं असंख्य झाडें एके ठिकाणीं वाढविणें हेंच शेतकऱ्यास सोयीचें वाटतें, कारण एकाच जातीच्या झाडांनां एकाच प्रकारची जमीन व मशागत लागते पण रोगाच्या दृष्टीनें असें करणें वाईट आहे. कारण एका झाडावरचा रोग शेजारच्या सजातीयांवर सहज जातो. दुसरी गोष्ट संसर्गाचीं साधनें; यांचाहि फार बारीक रीतीनें विचार केला पाहिजे. विशेषतः कीटकजन्य व अलिंबजन्य किंवा जंतुजन्य रोगासंबंधानें त्यांचा प्रसार कसा होतो हें नीट ओळखिलें पाहिजे. कीटकजन्य रोगासंबंधानें स्वतंत्र माहिती येणार आहेच. येथें फक्त अलिंबजन्य व जंतुजन्य रोगांचा प्रसार कोणत्या रीतीनें होतो तें थोडक्यांत सांगितलें पाहिजे.

अलिंबजन्य व जंतुजन्य रोगांचा प्रसार कसा होतो हें लक्षांत यावयास रोगजनक अलिंब व जंतू यांच्या जीवनक्रमाची पूर्ण माहिती करून घेणें जरूर आहे. या वनस्पतींची पुनरुत्पत्ति सूक्ष्म बीजापासून होते व ती फार झपाट्यानें होते. हीं बीजें एका झाडावरून दुसऱ्यावर जातात. तेथें योग्य परिस्थिति असेल तर तीं रुजतात व रोग उत्पन्न करतात. कित्येक वेळां बीजांची सुद्धां जरूर नसते. पुष्कळ अलिंबांच्या तंतुमय शरीराची वाढ जवळजवळ अमर्याद असते. म्हणजे त्यांतील एखादा जंतु तुटून दुसरीकडे जाऊन त्याला योग्य परिस्थिति मिळाली तर त्याची स्वतंत्रच वाढ होते. मोठ्या झाडांचीं कलमें लावून त्यांची पुनरुत्पत्ति बीजाशिवाय होते ह्यापैकींच हा प्रकार आहे. अलिंबाचीं बीजें किंवा बीजाप्रमाणें काम करणारे इतर अवयव हीं एका झाडावरून दुसऱ्या झाडावर कशीं नेलीं जातात याचा विचार केला असतां रोगसंसर्गाचीं साधनें कोणतीं याचा खुलासा होईल. प्रथमतः रोगी झाडाशीं संबंध येणारे हवेचे व पाण्याचे प्रवाह, लहानमोठे प्राणी (किडे, गोगलगायी, माशा, ससे वगैरे) हे बीजवहनाच्या कामीं मदत करतात. त्यांत मनुष्यप्राण्याच्या आगगाड्या, आगबोटी वगैरे प्रवासाचीं साधनें व पोष्ट ऑफिसचा व्यवहार यानें मोठीच भर पडते. म्हणजे या साधनांनीं हजारों मैलांवरचे रोग एका ठिकाणाहून दुसरीकडे नेले जातात. पिकांचे कांहीं भयंकर रोग याप्रमाणें एका देशांतून दुसऱ्या देशांतहि गेले आहेत व हें समजल्याचा एक परिणाम हल्लीं असा झाला आहे कीं, पुष्कळ राष्ट्रांनीं आपल्या देशांत अनिष्ट रोग अशा रीतीनें येऊं नयेत म्हणून वनस्पतिरोगप्रतिबंधक कायदे केले आहेत. या कायद्यांमुळें एका देशांतून दुसरीकडे झाडें, बीं, कंद वगैरे कांहीं पाठवावयाचें असल्यास त्या देशांत नसलेले रोग या परकी झाडांबरोबर न जातील अशाबद्दल दोनहि देशांतील झाडें, बीं, कंद वगैरेंच्या व्यापाऱ्यांनीं योग्य तजवीज केलीच पाहिजे, अशी सक्ति केली जाते. हिंदुस्थानांतहि या तऱ्हेचे कांहीं कायदे झाले आहेत.

अलिंबजन्य रोगांच्या प्रसाराचा दुसरा मार्ग म्हणजे अलिंबाचीं बीजें किंवा इतर अवयव, रोगी झाडाच्या बियाबरोबर किंवा इतर भागाबरोबर एका ठिकाणाहून दुसरीकडे नेले जातात. ज्वारीवरील "कांजळी" किंवा "कायणी" रोगाचें बीं, किंवा वटाट्यावरील "वांगडीचें" बीं याच तऱ्हेनें एका पिकावरून दुसऱ्या पिकावर जातें. कित्येक रोगजनक अलिंब व जंतु यांनां रोग उत्पन्न करण्यासारखीं झाडें नसलीं तरी त्यांच्याशिवाय जमिनींत मृत जीवांपासून प्राप्त होणाऱ्या अन्नावर शवोपजीवी वृत्तीनें राहतां येतें. अशा जमिनींत पुढें एखाद्या वेळीं त्यांनां योग्य अशीं झाडें मिळालीं कीं हींच अलिंबें शवोपजीवित्व टाकून जीवोपजीवी वृत्ति धारण करतात, व त्या झाडांनां पछाडून त्यांमध्यें रोग उत्पन्न करतात. या वृत्तीच्या अलिंबापासून होणाऱ्या रोगावर प्रत्यक्ष रीतीनें उपाययोजना करणें अशक्य असतें. बरींच अलिंबें प्रसंगानुसार निरनिराळ्या जातींचीं बीजें उत्पन्न करतात व यांचा परस्परसंबंध प्रथम सहसा लक्ष्यांत येत नाहीं. ज्या अवस्थेंत एखादें अलिंब रोगजनक असतें त्याकडेच आपलें लक्ष्य जातें, पण त्याचें भक्ष्य ज्या वेळेस त्यास मिळेनासें होतें त्यावेळीं त्या अलिंबास रूपांतर करून भक्ष्याशिवाय राहण्याची शक्ति प्राप्त होते असें पुष्कळदां घडतें एवढेंच नव्हे तर कांहीं अलिंबांची या बहुरूपतेच्याहि पुढें मजल गेलेली असते. म्हणजे तीं आपल्या निरनिराळ्या अवस्थेंत निरनिराळ्या जातींच्या वनस्पतींचा आश्रय करतात व त्यामुळें त्या अवस्थांचा परस्पर संबंध लक्ष्यांत येणें फार कठिण होतें. गव्हांवरील "तांबेरा" उत्पन्न करणाऱ्या अलिंबामध्यें ही बहुरूपता (अवस्थांतर) व ही आश्रयांतर करण्याची शक्ति हीं उत्कृष्टपणें दृष्टोत्पत्तीस येते. संसर्गाच्या साधनांचा विचार करतांना अलिंबाच्या स्थित्यंतरांत त्यांनां आश्रय देणाऱ्या झाडांचा विचार करणें अवश्य आहे.

रोगाला सांथीचें स्वरूप येण्यास आवश्यक अशी तिसरी गोष्ट म्हणजे रोगजनक अलिंबास व जंतूस अनुकूल अशी परिस्थिति. जरी भिन्न भिन्न अलिंब व जंतू यांच्यामध्यें या बाबतींत थोडाबहुत फरक दिसून येतो तरी साधारणपणें असें म्हणतां येईल कीं रोगजनक अलिंबांनां थोड्याबहुत ओलाव्याची व उष्णतेची जरूर असते. पावसाळ्यांतहि अनुकूल स्थिति स्वाभाविकपणेंच प्राप्त होते. याशिवाय

कोणत्याहि जमिनींतील व हवेंतील दोषानें वनस्पतींची प्रकृति अशक्त झाली असतां त्यांच्यावर उपजीविका करणाऱ्या कीटक व परोपजीवी वनस्पतींचा त्यांच्यावर अधिक जोर होतो. उदाहरणार्थ, पाणी अधिक झाल्यामुळें व रोपामध्ये गर्दी झाल्यामुळें किंवा अन्य कारणांनीं प्रकाश कमी झाल्यामुळें ज्या पिकांचे तरवे किंवा रोपे करण्याचा प्रघात आहे त्यांमध्यें असा नेहमीं अनुभव येतो कीं, रोपे उंचच्या उंच व पिंवळसर रंगाचे व अशक्त असे होतात, व लवकरच त्यांचा ताठपणा जाऊन ते पडतात व कुजून जातात. कांहीं जातींचीं अळिंबें व जंतू त्या अशक्त झाडावर सहज जाऊं शकतात व त्यांच्यामुळेंच ही कुजण्याची क्रिया सुरू होते. दुसरीं कित्येक अळिंबे तीं ज्या वनस्पतींचा आश्रय घेतात त्या वनस्पतींच्या विवक्षित वयोमर्यादेंत त्यामध्यें प्रवेश करूं शकतात. उदाहरणार्थ, कोंवळ्या पानांवर किंवा फळांवर पुष्कळ अळिंबें फार लवकर जोर करूं शकतात. कोंवळेपणा एकदां सुरक्षितपणें निभावून गेला कीं, मग अशा रोगाची फारशी भीति नसते. यामुळें केव्हां केव्हां औषधयोजना जरी शक्य नसली तरी रोगाची नेहमीची वेळ टाळण्याकरितां लवकर किंवा उशीरां तयार होणाऱ्या पिकांच्या जाती पसंत करून रोगापासून होणारें नुकसान वांचवितां येतें. मुंबई इलाख्यांत देशी भूईमुगावर एक " टिका " नांवाचा अळिंबजन्य रोग सुमारें १५ वर्षांपूर्वी ( १९००–०४ ) पुष्कळच होत असे व त्यामुळें पीक मुळींच येईनासें झालें होतें. हा रोग पीक सरासरी ३॥ ते ४ महिन्यांचें झाल्यावर होत असे. त्यामुळें दाणे भरावयाच्या वेळेसच सर्व पानें गळून जाऊन पिकाचा नाश व्हावयाचा. यावेळीं मुंबई इलाख्यांतील शेतकीखात्यानें अमेरिकन व जपानी भूईमुगाचें बीं आणविलें. या जाती ३॥ महिन्यांत तयार होतात व त्यामुळें त्यांच्यावर "टिका" रोग पडत नाहीं असें जरी नाहीं तरी तो पडावयाच्या वेळीं पीक जवळ जवळ तयार होत असल्यानें ह्या रोगाला सांथीचें स्वरूप येण्यापूर्वीच तें काढलें जातें, व त्यामुळें रोगापासून होणारें नुकसान वांचतें. या उदाहरणावरून व वरील एकंदर विवेचनावरून रोगनिवारण्याच्या कामीं रोगाचीं प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कारणें, त्याच्या प्रसाराचीं साधनें व त्याच्या प्रसारास अनुकूल परिस्थिति कोणती वगैरेबद्दल किती बारीक रीतीनें चौकशी करणें जरूर आहे हे ध्यानांत येईल. आतां रोगप्रतिबंधनाचे मुख्य मार्ग खालीं सांगितले आहेत.

झाडांत अंतर ठेवणें:—झाडें दाटीनें लाविलीं असतां त्यांनां प्रकाश पाहिजे तितका मिळत नाहीं, त्यांची उपासमार होते, त्यांच्यामध्यें हवा चांगली खेळत नाहीं व त्यामुळें त्यांस अशक्तता प्राप्त होते. अशा अशक्त अवस्थेंत रोगजनक अळिंबांचा त्यांच्यामध्यें सहज शिरकाव होतो, व त्यांच्या वाढीस झाडांस प्रतिबंध करतां येत नाहीं.

पाण्याचा निचरा व जमिनीची मशागतः—पाणी सांचल्यानें मुळामध्यें हवा खेळण्याचें बंद होतें व अळिंबाच्या रेणूंस ( बीजांस ) रुजण्यास आवश्यक असा ओलावा त्यास सहजच मिळतो, व रोग पसरण्यास मदत होते. नांगरणें, कुळवणें, कुळपणें, वगैरे शेतीच्या नेहमींच्या कामांनीं जमीन चांगली तयार झाली म्हणजे तींत जीं झाडें येतात तीं चांगलीं सशक्त व सदृढ अशीं होतात, त्यांच्यामध्यें रोगप्रतिकार करण्याचें सहजच सामर्थ्य येते. तेव्हां या कामांत मुळींच हलगर्जीपणा उपयोगी नाहीं. रानझाडें, रोगी पिकांचे अवशिष्ट भाग वगैरे सर्व काढून जाळून त्यांचा नाश केला पाहिजे, नाहीं तर रोगजनक अळिंबांचीं बीजें, कीटकांचीं अंडीं वगैरे त्यांवर राहून पुढच्या पिकास उपाय होण्याचा संभव असतो.

पिकांत फेरबदल करणें:—एकच पीक वर्षानुवर्ष एकाच जमिनींत घेऊं नये. पुष्कळ अळिंब किंवा कीटक कांहीं विशिष्ट जातींच्याच पिकांवर वाढतात व पिकांमध्यें बदल केला असता त्यांस त्यांच्या पोषक वनस्पती न मिळाल्यामुळें नाश होतो. याच कारणाकरिता सरांस एक जातीचें पीक न घेतां मिश्र पिक घेणें चांगलें. भिन्न जातींच्या वनस्पतींमध्यें अळिंबांची व कीटकांची गति खुंटते.

*बियाण्याची तपासणी आणि रोगनिवारण*—बीं लावतांना तें चांगलें तपासून लावावें. पुष्कळ रोग बियांमधून रोप्यास लागतात. रोगी पिकांपासून आलेलें बीं होतां होईतों लावूं नये. अळिंबनाशक किंवा कृमिनाशक विषारी पदार्थांचें मिश्रण पिकांवर योग्य वेळीं शिंपडावें. यापासूनहि पुष्कळ रोगाचें निवारण होतें. या विषारी पदार्थांत मोरचूद, गंधक व चुना, केरोसीन, तंबाखूचें पाणी वगैरे आहेत. यांचा व दुसऱ्या कांहीं द्रव्यांचा उपयोग परदेशांत पुष्कळ होत असून पुष्कळ रोग त्यानें हटविले जात आहेत. जखमांस व व्रणांस रोगप्रतिबंधक औषधें लावावींत. कांहीं पिकांची, विशेषतः फळझाडांची मधून मधून छाटणी करावयाची असते. छाटणीनें झाडास पुष्कळ व्रण होऊन अळिंबाचीं बीजें जेथें रुजतील अशीं पुष्कळ मर्मस्थानें तयार होतात. अशा ठिकाणीं डांबर, मेण वगैरे रोगप्रतिबंधक पदार्थ लावावेत. जेथें मुळींच औषधोपचार लागूं पडत नाहीं अशा ठिकाणीं आणखी एक इलाज उपयोगी पडण्यासारखा असतो. पुष्कळ वनस्पतींच्या अनेक पोटजाती असतात. त्यांमध्यें एखादा रोग सर्वांनांच सारखा होतो असें नाहीं. कांहींनां पुष्कळ होतो, कांहींनां कमी होतो, तर कांहींनां मुळींच होत नाहीं. हा भेद त्यांच्या प्रकृतींतच असतो व हा आनुवंशिक असतो. म्हणजे तो जनकापासून संततींत उतरतो. आनुवंशिक गुण कोणत्या नियमांनीं संततीमध्यें उतरतात याविषयीं हल्लीं यूरोपमध्यें अनेक विद्वान मोठ्या काळजीनें व परिश्रमानें शोध करीत आहेत व आजपर्यंत त्यांनां त्यांत यशहि पुष्कळ मिळालें आहे. त्यावरून अपत्यामध्यें जे गुण उतरतात ते उगीच कसे तरी उतरत नसून नियमबद्धरीतीनें उतरत असतात व प्रयोगानें कोणता

गुण कसा उतरेल हें बऱ्याच निश्चयानें सांगतां येते. या ज्ञानाच्या प्रयोगानें दोन किंवा अनेक पोटजातींचा संकर करून जींमध्यें आपल्यास इष्ट तेवढेच गुण आहेत अशी प्रजा प्रयोगाअंतीं निर्माण करणें शक्य झालें आहे. तेव्हां एखाद्या रोगावर सर्व उपाय थकले असतां अशी निरोगी जात प्रयोग करून, उत्पन्न करून तिचेंच बीं पुढें आणतां येईल. गव्हावरील ' तांबेरा ', कापसावरील ' मूळखाई ' ह्या रोगांवर याच प्रकारचा इलाज इंग्लंड, अमेरिका वगैरे देशांत यशस्वी झालेला आहे.

अ लिं ब ना श क द्र व्यें,बोर्डो नामक मिश्रणः—हें सर्वांत अधिक उपयोगी व महत्त्वाचें आहे. यांतील द्रव्यें व प्रमाणें पुढें लिहिल्याप्रमाणें असतात. अच्छेर मोरचूद, अच्छेर कळीचा चुना, एक ग्यालन किंवा ५० शेर पाणी. मोरचुदाची पूड करून ती एका खादीच्या पिशवींत घालून तिचें तोंड बांधावें व ती एका लांकडाच्या टिपांत किंवा मातीच्या भांड्यांत ठेवावी व तिवर सुमारें १० शेर गरम पाणी ओतावें. मोरचुत चांगला विरघळेपर्यंत ती पिशवी वरचेवर काठीनें किंवा दोरीनें हालवावी.

दुसऱ्या टिपांत कळीचा चुना अच्छेर घेऊन त्यावरहि सुमारें १० शेर पाणी ओतावें व नंतर मोरचुताच्या पाण्यांत हें चुन्याचें पाणी ओतून काठीनें हालवून चांगलें मिश्रण करावें व मग बाकी राहिलेलें पाणी ( ३० शेर ) त्यामध्यें घालावें म्हणजे मिश्रण तयार झालें. हें मिश्रण पावसानें धुवून जाऊं नये म्हणून त्यांत साबण,गूळ किंवा राळ यांसारखे चिकट पदार्थ केव्हां केव्हां घालावे लागतात. मिश्रणांत असतो तितकाच साबण अथवा गूळ घ्यावा. द्राक्षांवरील " भुरी " रोगावर साबणमिश्रित बोर्डो मिश्रणाचा उपयोग होतो. राळेचा उपयोग करावयाचा असल्यास मोरचुताच्या निम्म्यानें राळ व पावपट सोडा ( पापडखार ) घेऊन हे दोनहि पदार्थ एक तासभर थोड्या-मोजून घेतलेल्या-पाण्यांत कढवावे. कढवितांना काठीनें एकसारखे ढवळावें,व नंतर मोरचुताच्या व चुन्याच्या मिश्रणांत तें मिळवावें. एकंदर पाणी साध्या बोर्डोमिश्रणाच्याच प्रमाणांत असावें. सुपारीवरील " कोळे " रोगावर या मिश्रणाचा उपयोग होतो.

मोरचुतानें पाणीः—नुसत्या मोरचुताच्या पाण्याचा बाजरीवरील " काजळी " या रोगावर उपयोग होतो. तो उपाय करण्याची कृति पुढें लिहिल्याप्रमाणेः—१० तोळे मोरचुत घेऊन तो पक्या १२॥ शेर पाण्यांत विरघळावा. या पाण्यांत ज्वारीचें बीं एका पिशवींत घालून १० मिनिटें भिजूं द्यावें, नंतर तें सावलींत वाळवून पेरावें. पाणी संपेपर्यंत जितकें बीं भिजेल तितकें भिजवावें. मोरचुतानें पाणी किंवा मिश्रण करावयाचें असल्यास लांकडी किंवा मातीच्याच भांड्याचा उपयोग करावा.लोखंडी भांड्याचा करूं नये.याखेरीज कॉपरकार्बोनेट, गंधक, सब्लिमेट फॉर्मलीन इत्यादि द्रव्यें सुद्धां शिलिंध्रघातक आहेत व त्यांना विशिष्ट प्रसंगीं उपयोग होतो.

हीं द्रव्यें शिंपडण्याकरितां निरनिराळ्या प्रकारच्या पिचकाऱ्या किंवा शिंपडण्याचीं यंत्रें यूरोप व अमेरिकेंत तयार झालीं आहेत व त्यांमध्यें नवीन नवीन सुधारणा होऊन औषधें शिंपडण्याचें काम लहान किंवा मोठ्या प्रमाणावर करणें सोपें होत चाललें आहे. मुंबई इलाख्यांत द्राक्षांच्या लागवडींत व कारवार व म्हैसूर इकडे सुपारीच्या लागवडींत अशा सुधारलेल्या पिचकाऱ्यांचा उपयोग हल्लीं शेतकरी करूं लागले आहेत.

[ संदर्भ ग्रंथः—या विषयावर मराठींत ग्रंथ किंवा लेख म्हणण्यासारखे नाहींतच. 'शेतकी व शेतकरी' या मुंबई इलाख्यांत निघणाऱ्या मासिकांत व शेतकीखात्याच्या हस्तपत्रकांत व बुलेटिन्समध्यें पिकांच्या कांहीं रोगांविषयीं माहिती मिळेल. याखेरीज इंग्रजींत हिंदुस्थानांतील कांहीं पिकांच्या रोगांविषयीं स. १९१८ पर्यंत उपलब्ध असलेल्या माहितीचें एक पुस्तक आहे. याशिवाय ॲग्रिकल्चर रिचर्स इन्स्टिट्यूट ( डॉ. ई. जे. बट्लेस-फंगी ॲंड डिसीज इन् प्लॅन्ट्स ), पुसा व निरनिराळ्या प्रांतांच्या शेतकीखात्यातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या शेतकीविषयक लेखामध्येंहि हिंदुस्थानांतील पिकांच्या रोगाविषयीं माहिती प्रसिद्ध झाली आहे. यूरोप व अमेरिका खंडांत गेल्या पन्नास वर्षांत या विषयावर बरेच लेख व ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. त्यांची यादी इंग्रजी भाषेंतील कोणत्याहि ज्ञानकोशांत पहावयास सांपडेल ] [ले. प्रो. आजरेकर]

पिकें—सर्व पिकांचे दोन वर्ग करतां येतात. एक अन्न पुरविणारीं पिकें व दुसरीं अन्नेतर पिकें. पहिल्या वर्गांत तृण, धान्यें, कडधान्यें, कांहीं कंद, व मुळें, कांहीं गळिताचीं धान्यें जसें भुईमूग, तिळ वगैरे यांचा समावेश होतो. यानंतर ऊंसापासून होणारा गूळ, साखर, काकवी, व त्याप्रमाणें मसाल्याचीं पिकें ( मोहरी, जिरें, शहाजिरें, मिरची, मिरें, ) वगैरेंचा खाण्याच्या धान्यांना चव आणण्यास उपयोग होतो. अन्नेतर पिकांत तंतू पिकें, रंगाचीं पिकें, तंबाखू, गांजा, अफूसारखीं कैफ आणणारीं पिकें, व बरींच गळिताचीं धान्यें यांचा समावेश होतो. वरील दोन वर्गांत कांहीं पिकें कोरडवाहू ( जिराईत ) व कांहीं बागाईत आहेत. पहिल्या वर्गांत कांहीं खरीफ व कांहीं रब्बी पिकें आहेत. कोरडवाहू होणारीं खरीफ व रब्बी हंगामांतील पिकें सर्वस्वीं जमीन, हवा, पाऊस व मशागत वगैरेंवर अवलंबून असतात. भाताला उष्ण व दमट हवा लागते म्हणून तें जास्त पाऊस पडणाऱ्या प्रदेशांत होतें. कापूस व जोंधळा या पिकांना सुमारें ३० इंचपावेतों पाऊस लागतो. बाजरीला थोडथोडा पाऊस कांहीं दिवसांच्या अंतरानें पडल्यास तें पीक चांगलें येतें. या पिकाला १२ते१५ इंच सुद्धां पाऊस पुरतो. सर्व रब्बी पिकांना हस्तनक्षत्र व त्यानंतरच्या पावसाची फार जरूरी असते. खरीफ

हंगामांतील पिकें पावसावर अवलंबून असल्यामुळें तीं साधारणपणें सर्व तऱ्हेच्या जमिनीवर होतात. परंतु गहूं, हरभरा, जवस वगैरे रब्बी पिकांकरितां काळी, खोल, ओलावा राखून ठेवणारी जमीन लागते. रब्बी पिकें उष्ण व कोरड्या हवेंत चांगलीं येतात. मात्र या पिकांनां सकाळीं पडणाऱ्या दहिंवरानें जास्त फायदा होतो. बागाईत पिकांत जमीनीपेक्षां खत व पाणी हीं फार महत्त्वाचीं आहेत. बागाइतांत जमीन निचऱ्याची असावी. पाणभरती पिकें अगदीं वाळूच्या जमीनींत सुद्धां चांगलीं येतात. ठाणें जिल्ह्यांतील वसई, माहीम वगैरे समुद्रकांठच्या तालुक्यांत, वाळीच्या (वाळूच्या) जमीनींत केळीं, पानवेली, ऊंस, आलें वगैरे पिकें उत्तम होतात. मात्र जमीन पोकळ असल्यामुळें पाण्याचा व खताचा जास्त खर्च येतो. बागाईत पिकें काळ्या भारी जमीनींत चांगलीं होत नाहींत. कारण ह्या जमिनींत पाण्याचा निचरा चांगला होत नसून शिवाय त्या उघाडीच्या दिवसांत फार भेगाळतात.

फळझाडांची लागवड करण्यास काळ्या खोल जमीनीखेरीज करून सर्व तऱ्हेच्या जमिनी चालतात. फळझाडांच्या लागवडींत निचऱ्याकडे जास्त लक्ष दिलें पाहिजे. दोन, तीन फूट खोल जमीन असून खालीं मुरूम असल्यास ती जमीन फळझाडांस उत्तम समजली जाते. फळझाडांची लागवड करण्याचें काम साधारण शेतकरी कधींहि हातीं घेत नाहींत. कारण या लागवडींत फळें धरूं लागेपावेतों पहिलीं चार पांच वर्षे खताचा, पाण्याचा, रोपांचा, जमीन तयार करण्याचा, खड्डे वगैरे खणण्याचा जास्त खर्च येत असून त्याचा मोबदला त्याला फारसा मिळत नाहीं; याकरितां असलीं कामें बहुतकरून भांडवल असणारे श्रीमंत शेतकरीच हातीं घेतात. फळफळावळीची लागवड करण्याला भांडवलाखेरीज फळबागांची माहिती, फळे तयार झाल्यावर तीं कशी काढावीं, तीं खोक्यांत किंवा टोपलींत कशीं भरावीं, वेंद कशीं करावीं, ने आण करण्याच्या सोयी, विक्रीकरितां बाजारहाट, अशा अनेक बाबींसंबंधीं माहितीची जरूरी असते. याकरितांच फळबागांखालील क्षेत्र विहिरीखालीं इकडे तिकडे लहान लहान तुकड्यांत आढळतें.

आंबा, फणस, नारळ, सुपारी, काजू वगैरे वगळून बाकी फळझाडें मध्यम प्रतीच्या पावसाच्या प्रदेशांत चांगलीं होतात. फळझाडांच्या तसेंच कांहीं विशेष पिकांच्या लागवडींत समुद्रसपाटीपासून उंची, पाऊस, जमीन, हवा, पाणी वगैरेंचा बराच विचार करावा लागतो. उदाहरणार्थ—चहा, कॉफी, सिंकोना, स्ट्राबेरी, पीच, सफरचंद वगैरें पिकें उंचवट्याच्या ( महाबळेश्वर, निलगिरी, आसाम) प्रदेशांत चांगलीं होतात. खाण्याच्या धान्यांत तृणधान्यें व कडधान्यें हीं फार महत्वाचीं होत. या धान्यांत मनुष्याला अन्न व गुरांनां चारा या दोहोंची सोय असते. तृणधान्यांपैकीं, तांदूळ, जोंधळा, बाजरी व गहूं हीं हिंदुस्थानांतील लोकांचीं खाण्याचीं मुख्य पिकें होत. प्रत्येक शेतकरी या पिकांपैकीं कांहीं धान्यें दरवर्षी पेरितो. आपल्याला पुरेसें धान्य व गुरांनां चारा हीं ठेवून बाकी विकून टाकतात. हवामानाच्या परिस्थितीप्रमाणें कोंकण, मावळी भाग व तैलंगणखेरीज करून प्रत्येक शेतकरी आपल्या जमीनांपैकीं निदान दोनतृतीयांश जमीन माल विकून जास्त पैसे करतां येतील अशा पिकांनीं पेरितो. अशीं पिकें म्हणजे कापूस, भुईमूग, गहूं, जवस, एरंडी, हरभरा वगैरे होत. इ. स. १९१४–१५ मध्यें एकंदर लागवडीखालीं २६०६४०७९८ एकर क्षेत्र होतें, त्यांत ३३०२९६६६ एकर दुपिकी क्षेत्र वजा जातां बाकी २२७६११९३२ एकर निव्वळ पिकाखालीं होतें.

खालीं दिलेल्या कोष्टकावरून गेल्या सोळा सतरा वर्षांत मुख्य पिकाखालीं असलेल्या क्षेत्रांत कसा फरक होत गेला आहे हें सहज लक्ष्यांत येईल. ( पिकांच्या नांवापुढें दिलेले आंकडे हजारांचे असून एकर जमीनीचे आहेत ).

## पिकांत होणारा फरक

| पिकाचें नांव | १८९७ सालीं | १९०४ सालीं | १९०९ सालीं | १९१४ सालीं |
|---|---|---|---|---|
| भात | ७०७८१ | ७३५२५ | ७८७३१ | ७७६६८ |
| गहूं | १९९४६ | २३५०९ | २२७६९ | २५४५१ |
| ज्वारी | २३८०२ | २३०८० | २१६०१ | २१२२३ |
| बाजरी | १२८९८ | १०३६९ | १६३०३ | १६०४१ |
| हरभरा | १०१९३ | १०९०५ | १३१५३ | १४३६४ |
| जवस | २३४६ | ३०५७ | २२५६ | २५२५ |
| तीळ | ३३०६ | ४०२३ | ४७४० | ४४७८ |
| सरसव व मोहरी | ... | ३२४० | ४०९३ | ४१४४ |
| भुईमूग | ... | ... | ... | २३७७ |
| ऊंस | २७८४ | २५६९ | २४४२ | २३०२ |
| कापूस | ८९१६ | १३०१७ | १३१७२ | १५२२१ |
| ताग | २१५९ | २९४१ | २७५६ | ३३०८ |
| चहा | ४५६ | ५०५ | ५२५ | ५८४ |
| कॉफी | १५१ | ९९ | ९४ | ८६ |
| तंबाखू | १०४८ | ९६४ | १०१३ | १०५६ |

पि कां चें व र्गी क र ण.—( १ ) तृणधान्यें, ज्वारी अगर जोंधळा, बाजरी, गहूं, भात, जव, ओट, मका, नागली अगर नाचणी, वंटी अगर बरटी, कोद्रा अगर हरीक, वरी, सावा, चिनो, वराटी, कांग अगर राळा, भादली, डेंगळी वगैरे

( २ ) द्विदल, कडदण अगर डाळीचीं धान्यें:—तूर अगर अरहर, हरभरा अगर चणा, लाख अगर लांग, वाल, पावटा, कडवा व वर्णा, कुळीथ अथवा हुलगा, मूग, उडीद, मसुर, चवळी, मटकी, गवारी, वाटाणा, वगैरे.

(३) गळिताचीं धान्यें:—तीळ, जवस, करडई, कारळा, खुरासणी अगर रामतीळ, मोहरी अगर शिरस, भुईमूग, एरंडी, सूर्यफूल, वगैरे.

(४) मसाल्याचीं पिकें:—आलें, हळद, मिरची, लसूण, जिरें, बडिशेप, बाळंतशोप, ओंवा, अहाळिव, मेथी, धने, वेलदोडे, मिरीं, पिंपळी, विड्याचीं पानें, सुपारी, मोहरी.

(५) तंतुजन्य पिकें:—कापूस, ताग, अंबाडी, वगैरे.

(६) रंग:—नीळ, हळद.

(७) औषधी व अंमल आणणारीं पिकें:—तंबाखू, अफू आणि गांजा.

(८) ऊंस.

भाजीपाल्याचीं पिकें, कंदमुळें, भाज्या:—अळकुड्या, कणगरें, कोन, कारिंदा, सुरण, गोराडू, गाजर, रताळीं, बटाटे, कांदा, मुळा, नोलकोल, बीट, लीक, सलगम(टरनीप) पालेभाज्या:—अळू, अंबाडी, करडई, घोळ, चंदनबटवा, चाकवत, चुका, तांदुळजा, पालक, पोकळा, मेथी, राजगिरा, शेपू, माठ, कोबी, ब्रसेल, स्प्राउट, सालीट, सेलरी. फुलभाज्या:—केळफूल, कॉलीफ्लावर. फळभाज्या:—करटुली, कांकडी, कारलें, काशीफळ, भोंपळा, चक्री, कोहोळा, खिरा, घोसाळें, टरकांकडी, तोंडली, दुध्या, दोडका, भेंडसी, पडवळ, फणस, भेंडी, मोगरी, डिंगरी, वांगीं, चोचो, टोमाटो. शेंगभाज्या:—आवई, गवार, घेवडा, चवधारी घेवडा, चवळी, वालपापडी, शेवगा, डबलबी, पावटा, वाटाणा, वाल. मसालेभाज्या:—अहळिव, कोथिंबीर, पुदीना, पार्सली, वगैरे.

यांपैकीं महत्त्वाच्या सर्व पिकांवर स्वतंत्र लेख दिले आहेत.

**पिंगळे, पुणें करघराणें.**—या घराण्याचा मूळ पुरुष गोविंदराव भगवंत हा कृष्णराव काळे, पेशवे सरकारचे मुत्सद्दी, यांजकडून सरकारांत थोरल्या माधवरावांच्या वेळीं कामकाजांत होता. गोविंदराव हुषार व विश्वासू असल्यामुळें नाना, बापू व काळे हे त्यास आपल्या मसलतींत घेऊं लागले. निजामाकडे काळे यांच्याबरोबर यांची वकिलाच्या जागेवर नेमणूक झाली होती (१७९१). तो हैद्राबादेहून परत पुण्यास १७९७ सालीं आला, व नानांच्या कारभारी मंडळांत राहिला. नानांना जेव्हां शिंद्यानें अटक केली तेव्हां त्याच वेळीं रावबाजीनीं यालाहि शनवारवाड्यांत कैदेंत ठेविलें. पुढील सालीं सैन्यांत दंगा झाला तेव्हां तो मोडण्यासाठीं नारोपंत चक्रदेवास कैदेंतून सोडविण्याविषयीं यानेंच रावबाजींनां सुचविलें व त्याप्रमाणें त्यानीं चक्रदेवास व त्याबरोबर यासहि सोडिलें. यानंतर १८०७ सालीं गोविंदराव वारल्यावर व्यंकटराव गोविंद यास निजामाकडील वकिलीचीं वस्त्रें पेशवेसरकारनें दिलीं. नंतर त्यानें दोन तीन वर्षे वकिलीचें कामकाज केलें आणि तो १८१० सालीं मरण पावला. पुढें शामराव गोविंद यास वकिलीचीं वस्त्रें मिळालीं. हा पेशवाईअखेरपर्यंत या कामावर होता. त्याचा पुत्र नरहर हा १८३३ सालीं हयात होता. याचा वंश हल्लीं पुण्यास शनिवार पेठेंत नांदत आहे.

गोविंद भगवंतास निजामानें तीन गांवें वंशपरंपरा इनाम दिलीं होतीं (१७७८). पुढें (१७८९) पेशवेसरकारनें याला दहा हजार रुपयांची जातनेमणूक पालखीसुद्धां करून दिली. या नेमणुकीसाठीं चार गांवें इनाम दिलीं. खर्ड्यांच्या लढाईंत गोविंदरावानें चांगलें काम केल्यानें त्याच्या मुलांच्या नांवें पालखी व दोन गांवें इनाम दिलीं. शामराव गोविंदच्या पदरीं प्रथम सदाशिव माणकेश्वर होता. वसईच्या तहाच्या वेळीं शामराव हा वसईंत होता, व त्याचा भाऊ भगवंत हा हैद्राबादेस कामावर होता. मध्यंतरीं पेशव्यांनीं शामरावाकडील वकिलीचें काम काढून सदाशिव माणकेश्वरास सांगितलें. इंग्रजी अंमल झाल्यावर इंग्रजांनीं इनामाची फक्त पांच गांवें ठेऊन बाकीचीं सर्व जप्त केलीं. शामराव वारल्यावर आणखी दोन गांवें जप्त केलीं. [ वाड—कैफियती. ]

**पिचब्लेंड**—युरेनियम व रेडियम हीं द्रव्यें ज्यांत सांपडतात असें एक खनिज; हें फार वजनदार (विशिष्ट-गुरुत्व ९ ते ९.७) असून त्याचा रंग डामरासारखा काळा असतो. यावरून त्याला पिचब्लेंड हें नांव मिळालें. याचे स्फटिक फार क्वचित होतात. युरेनियम प्राणिदाखेरीज त्यांत थोरियम, सीरियम, यिट्रियम व शिसें यांचीं प्राणिदें व थोड्या प्रमाणांत खट (कॅलशियम) लोह, मग्न (म्याग्नेशियम), मंगल (म्यांगॅनिज), वाळू, व पाणी हीं द्रव्येंहि असतात. धातुरूप युरेनियमपेक्षां या खनिजाच्या अंगीं प्रकाश देण्याची शक्ति जास्त आहे; व याच्या गुणावरून त्यांतील रेडियम, पोलोनियम व ॲक्टीनियम या मूल द्रव्यांचा शोध लागला. हें खनिज जाळल्यास किंवा पातळ गंधकाम्लांत द्रवविल्यास एक वायु निघतो, त्यांत हेलियम व अर्गान हे वायू बऱ्याच प्रमाणांत असतात.

**पिंजारी**—कापूस पिंजणाऱ्यांची जात. पिंजारी बहुधां मुसुलमान असतात. पण ते खरे मुसुलमान नसून बाटलेले हिंदूच होत. त्यांपैकीं बरेचसे कुणब्यांप्रमाणें दिसतात. गिरण्या झाल्यापासून यांचा धंदा बुडाला. आतां ते गाद्या व उशांचा कापूस पिंजून त्या भरतात. तेव्हां पुष्कळजण हा धंदा सोडून नोकरी धरतात. म्हैसूर संस्थानांत हे मुसुलमान आहेत तरी ते इतर मुसुलमानांशीं लग्नें करीत नाहींत. किंवा इतर कोणत्याच प्रकारचा संबंध ठेवीत नाहींत.

**पिंजौर, तहशील.**—पंजाब, पतियाळा संस्थानांतील पिंजौर निझामतमधील एक तहशील. क्षेत्रफळ २३५ चौरस मैल. लोकसंख्या १९११ सालीं ५७२२२ होती. तहशिलींत १०५३ खेडीं असून पिंजौर येथें तहशिलीचें ठाणें असतें.

गांव.—पिंजौर निझामत व तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें सिमला रस्त्यावर काल्क्यापासून ३ मैलांवर आहे हें पंचापूर या शब्दाचा अपभ्रंश आहे. पंचापूर हें शहर फार जुनें असून सन १०१० मध्यें अबू रिहाव या नांवाच्या मनुष्यानें तें वसविलें.

१७५९ सालीं पतियाळा संस्थानिकानें पिंजौरला वेढा देऊन तेथें असलेल्या हिंदु संस्थानिकाचा पाडाव करून शहर काबीज केलें. येथें शिलालेख व हिंदु देवळें पुष्कळ आहेत. धारमंडल या नांवाचें एक पवित्र सरोवर आहे.

**पिट, विल्यम** (१७०८–१७७८)—(थोरला)अर्ल ऑफ चॅथॅम; हा इंग्रज मुत्सद्दी रॉबर्ट पिटचा धाकटा मुलगा आणि मद्रासचा गव्हर्नर थॉमस पिट याचा नातू. याला पूर्वजांचा संधिवात रोग लहानपणापासून जडल्यामुळें ग्रॅज्युएट होण्यापूर्वीच शिक्षण सोडावें लागलें. स. १७२७ त बाप वारल्यावर त्यानें सैन्यांत नोकरी धरली. पण त्याचा थोरला भाऊ स.१७३४ च्या निवडणुकींत ओकहॅम्पटन व ओल्ड सेरम या दोन्ही मतदारसंघांतर्फे निवडून आला व पार्लमेंटच्या नियमाप्रमाणें त्यांपैकीं दुसरी जागा विल्यम पिटला मिळाली, त्यामुळें लष्करी नोकरी सोडून तो पार्लमेंटचा सभासद बनला. लहानपणापासूनच पिटला प्रख्यात ग्रीक वक्ता डेमॉस्थेनिस याचीं व्याख्यानें वाचण्याचा विशेष नाद असे व त्याच्याप्रमाणें प्रसिद्ध वक्ता बनण्याचे प्रयत्न पिटने चालविले होते. पार्लमेंटांत वालपोलविरोधी 'पेट्रियट्स' म्हणून प्रसिद्ध असलेल्या पक्षांत पिट सामील झाला. वक्त्याला लागणारे सर्वगुण-नाटकी हावभाव, तीक्ष्ण भेदक दृष्टि, अत्यंत लवचिक (लहान मोठा होणारा) आवाज आणि वजनदार चेहरा–त्याच्या ठिकाणीं होते. वालपोलाविरुद्ध त्यानें अनेक भाषणें केलीं, पण पार्लमेंटांतील कामाचा रिपोर्ट प्रसिद्ध करण्यास त्यावेळीं मनाई असल्यामुळें पिटचे मूळ भाषण आज एकहि उपलब्ध नाहीं. १७४६ त प्रधानमंडळांत प्रवेश होऊन त्याला लवकरच पेमास्टर–जनरलची जागा मिळाली. ही पुष्कळ पैसे मिळविण्याची जागा असूनहि पिटनें पगाराखेरीज एक पैहि घेतली नाहीं, त्यामुळें पार्लमेंटांत व देशांत पिटचें वजन एकदम फार वाढलें. प्रधानमंडळांत शिरल्यामुळें पिटचीं कांहीं मतें बदललीं, पण परिस्थिति बदलते त्याप्रमाणें मतें बदलणें, हा इंग्रज मुत्सद्दी दोष मानीत नाहींत. स १७५५ पर्यंत पिटनें वरील जागेवर काम केलें; पण न्यूकॅसल या मुख्य प्रधानाशीं अनेकदां मतभेद झाल्यामुळें पिटला प्रधानमंडळांतून काढून टाकण्यांत आलें. या सुमारास सप्तवार्षिक युद्ध सुरू होऊन न्यूकॅसलला तें नीट न चालवितां आल्यामुळें पिटला प्रधानमंडळांत घेण्याबद्दल लोकांची मागणी इतकी वाढली कीं, अखेर स. १७५७ त न्यूकॅसल व पिट यांच्यांत तडजोड होऊन पिटच्या हातीं युद्ध चालविण्याची सर्व सत्ता आली. ही सत्ता फक्त १७६१ पर्यंत त्याच्या हातीं होती. पण तेवढ्यांत इंग्लंडला यूरोप, अमेरिका व हिंदुस्थान येथें सर्वत्र विजय मिळत गेले, वसाहतींचें साम्राज्य स्थापण्याच्या चढाओढींत फ्रान्सचा पूर्ण पराजय झाला आणि अद्वितीय युद्धमंत्री म्हणून सर्व राष्ट्रानें एकमतानें त्याची स्तुति केली. पण नुकतांच राज्यावर आलेला तिसरा जॉर्ज तहास उत्सुक झाल्यामुळें पिटला राजीनामा द्यावा लागला. पुढें स. १७६६त राजानें पिटला पुन्हां मुख्य प्रधान नेमलें व अर्ल ही पदवी दिली; पण त्यामुळें पिटचें लोकांतील वजन कमी झालें. शिवाय त्याचा मूळचा रोगहि बळावला म्हणून त्यानें स. १७६८ त राजीनामा दिला, तथापि लार्डांच्या सभेंत मधूनमधून हजर राहून तो भाषण करीत असे; व स. १७७८ त त्या सभेंत अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धाच्या बाबतींतच भाषण करीत असतां मूर्च्छा येऊन तो एकदम पडला व त्यांतच त्याचा अंत झाला.

धा क टा ( १७५९–१८०६ )—हा इंग्रज मुत्सद्दी अर्ल ऑफ चॅथॅमचा दुसरा मुलगा. त्याचें शिक्षण केंब्रिज युनिव्हर्सिटींत होऊन त्याला सतराव्या वर्षीं मास्टर ऑफ आर्ट्स ( एम्. ए. ) ही पदवी मिळाली. पुढें कायद्याचा अभ्यास करून स. १७८३ त तो वकिली करूं लागला शिवाय पार्लमेंटांतील वादविवादपद्धतीचा त्यानें बारकाईनें अभ्यास चालविला होता. लवकरच पार्लमेंटचा सभासद होऊन त्यानें स. १७८१ त पहिलें भाषण केलें. त्याची बर्क, फॉक्स वगैरे प्रख्यात वक्त्यांनींहि स्तुति केली. लॉर्ड शेलबोर्नच्या प्रधानमंडळांत त्याला चॅन्सलर ऑफ एक्सचेकरची जागा मिळाली ( जुलै १७८२ ) पण तें प्रधानमंडळ लवकरच मोडलें. लॉर्ड नॉर्थ व फॉक्स यांच्या प्रधानमंडळानें फॉक्सचें इंडिया बिल आणलें तें तिसऱ्या जॉर्जला न आवडल्यामुळें राजानें त्या दोघांचे राजीनामे घेऊन पिटला मुख्य प्रधान नेमलें त्यावेळीं पिटला अवघें पंचविसावें वर्ष होतें. तथापि त्यानें मोठ्या चातुर्यानें वागून आपलें प्रधानमंडळ स. १७८४ पासून१८०१ पर्यंत टिकविलें. त्याच्या कारकीर्दीचे १७९२ पर्यंत शांततेचा व पुढें फ्रान्सबरोबरच्या युद्धाचा असे दोन कालविभाग पडतात. चांगला अर्थशास्त्रज्ञ असल्यामुळें त्यानें पहिल्या शांततेच्या काळांत राष्ट्राचा जमाखर्च उत्तम ठेवून राष्ट्रीय कर्ज कमी केलें, उद्योगधंद्यास उत्तेजन दिलें व व्यापार वाढविला. त्यामुळें तो फार लोकप्रिय झाला. चॅथॅम, वालपोल किंवा मार्लबरो यांचेंहि पार्लमेंटांत पिटच्याइतकें वजन नसे. कामन्ससभेची सुधारणा, नीग्रोगुलामपद्धति, मुद्रणस्वातंत्र्य वगैरे महत्त्वाच्या प्रश्नांसंबंधीं पिटचीं भाषणें व वर्तन व्हिग उर्फ लिबरल पक्षाला शोभेल असेंच असे. पण पुढें फ्रान्सबरोबरच्या युद्धाची व्यवस्था त्याला मुळींच साधली नाहीं; त्यामुळें आरमारांत अव्यवस्था माजून संप झाले व जमीनीवरच्या लढायांत एकहि विजय इंग्लंडला मिळाला नाहीं. आयर्लंडनें बंडाची तयारी केली. इतक्या प्रतिकूल परिस्थितींतहि अनेक युक्त्याप्रयुक्त्यांनीं पिटनें पार्लमेंटांत आपलें बहुमत कायम राखून स्वतःचें वैगुण्य राष्ट्राच्या नजरेस येऊं दिलें नाहीं शिवाय आयर्लंडबरोबर पार्लमेंटरी यूनियन घडवून आणली ( १८०० ). पण या यूनियनकरितां आयरिश कॅथॉलिकांनां देऊं केलेल्या हक्कांस जॉर्ज राजा परवानगी देईना म्हणून पिटनें राजीनामा दिला. १८०४ त पिट पुन्हां मुख्य प्रधान झाला व नेपोलियनबरोबर लढण्याकरितां त्यानें अनेक

यूरोपीय राष्ट्रांचा संघ बनविला. तरी पण नेपोलियननें ऑस्ट्रियन सैन्याचे उलम व ऑस्टरलिझ येथें दोन मोठे पराभव केले. त्याचें वृत्त ऐकून पिटच्या मनाला मोठा धक्का बसला व त्यानेंच तो मरण पावला.

**पिटर दि ग्रेट** ( १६७२–१७२५ )—रशियाचा एक राजा; हा अलेक्सिस मिखेलोव्हीं झारचा पुत्र मास्को येथें स. १६७२ त जन्मला. जहाजें बांधणें,जहाजांतून प्रवास करणें, कवाईत करणें, खोटया लढाया करणें हे त्याचे लहानपणचे खेळ असत. स. १६८२–१६८९ पर्यंत पिटरची वहीण सोफिया, ही त्याच्या नांवानें राज्यकारभार पहात असे. राज्यसूत्रें हातीं आल्यावर पिटरनें रशियन आरमार तयार केलें.

गोलंदाजी, शारीरशास्त्र, जहाजें तयार करणें, खोदकाम वगैरे अनेक गोष्टी पिटरनें शिकून घेतल्या; त्यानें आपल्या देशांत सुधारणा सुरू केली. दाढया, मिशा काढून टाकून पोषाखांतहि फरक करण्याचा त्यानें हुकूम सोडिला. सप्टेंबरमध्यें वर्षारंभ न करतां जानेवारींत करावा असें स. १६९९ त ठरविण्यांत आलें. उत्तरेच्या धुरीणत्वासाठीं पिटरनें जें युद्ध सुरू केलें त्यावद्दल १७०० हें वर्ष संस्मरणीय झालें आहे. त्यानें तुर्क लोकांवरोवर तह करून बाल्टिक समुद्रावर आपलें वर्चस्व स्थापण्याकरितां स्वीडनशीं युद्ध चालविलें; जगांतील व्यापारांत योग्य भाग घेण्यासाठीं बाल्टिकवर ताबा असणें उचित होतें. २१ वर्षांच्या युद्धांत पिटरचा थोडासा फायदा झाला. मोठया परिश्रमानें त्यानें इन्ग्रिया जिंकून सेन्ट पिटर्सबर्ग शहर वसविलें. परंतु प्रुथ येथें झालेल्या तहाच्या योगानें अझोव स्वारींत मिळालेला सर्व देश सोडून देणें पिटर यास भाग पडलें. उत्तमोत्तम वाल्टिक प्रांतावरील स्वीडननें आपला हक्क सोडून दिला. स. १७११ त पिटरनें कार्यकारी मंडळाची स्थापना केली. सहकारितेचा अभाव, जुलूम, निष्काळजीपणा इत्यादि गोष्टींपासून येणारीं संकटें टाळण्यासाठीं त्यानें वरीच खटपट केली.

शेवटच्या चार वर्षांत त्याचें लक्ष्य मुख्यतः पूर्वेकडे होतें. यूरोपमध्यें त्याच्या सर्व इच्छा सफल झाल्या होत्या; इराणांत येवंदशाही झाल्यामुळें त्या देशावर स्वारी करण्याची पिटर यास संधि मिळाली याकु व डर्बेंट हीं शहरें व आणखी कांहीं प्रांत त्याला मिळाले. या लढाईच्या परिश्रमामुळें त्याची प्रकृति विघडली व तो स.१७२५त मरण पावला. रशियाला कोणत्या गोष्टींची अवश्यकता आहे हें ओळखून त्या देशाच्या कल्याणासाठीं त्यानें आजन्म परिश्रम केले; यामुळें त्याचें नांव संस्मरणीय झालें आहे. त्यानें आपल्या राज्यांतील मोठमोठया हुद्याच्या जागा परकीय लोकांनां न देतां रशियन लोकांनाच उत्तम प्रकारचें शिक्षण देऊन सर्व खातीं त्यांच्याकडे दिलीं. रशियाचा सर्व कारभार रशियन लोकांकडेच असला पाहिजे, त्यांत परकीय लोकांचें बिलकुल अंग असतां कामा नये हा आपला उद्देश तडीस नेण्यासाठीं त्यानें आटोकाट प्रयत्न केला; व शेवटीं तो सिद्धीस गेला.

**पिटरमारिट्झबर्ग**—नाताळच्या राजधानीचें शहर. द. अ. २९° ४६′ व पू. रे ३०° १३′. दरबानच्या वायव्येस रेल्वेनें हें ४९ मैल आहे. समुद्रसपाटीपासून उंची २२०० फूट असून १९११ सालीं येथील लोकसंख्या ३०५५५ होती; पैकीं ७७८९ हिंदी व आशियाटिक लोक होते. रिनायसन्स पद्धतीवर बांधलेलें सुंदर सभागृह व कबेऱ्या येथें आहेत. येथें सेन्टसेविअर नावाचें मुख्य अँग्लिकन प्रार्थनामंदिर व नेटल युनिव्हर्सिटी कॉलेज आहे. हवा आरोग्यकारक असून वार्षिक उष्णमान ६५° असतें. येथें २८ इंच पाऊस पडतो.

१८३९ सालीं हें डच लोकांनीं वसविलें. पायट रेटिफ व गेरिट मारिट्झ या डच पुढाऱ्यांच्या नांवांवरून यास पिटर मारिट्झबर्ग म्हणतात. पहिल्यापासून नाताळच्या बोअर लोकांच्या व्हाल्क्सराड सभेचें हें ठिकाण होतें. १८४२सालापासून हें राजधानीचें शहर झालें. १८८८ सालीं येथें म्युनिसिपालीटी स्थापन झाली. येथून दरबानवरून थेट जोहान्सबर्गपर्यंत रेल्वे आहे. रेल्वेचे डबे व गाडया येथेंच तयार होतात.

**पिट्सबर्ग**—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील पेन्सिल्व्हेनियामधील दुसरें मोठें शहर. आलेघनी काउंटीचें हें मुख्य स्थान आहे. लोकसंख्या ( १९१४ ) ५९५०००. हें सुमारें ८ निरनिराळ्या रेल्वेचें केंद्रस्थान आहे. त्याचप्रमाणें येथील तिन्ही नद्यांवर जहाजांची रहदारी असते. तीन नद्यांच्या संगमावर कचेऱ्या, व्यांका, नाटकगृहें व दुकानें यांची गर्दी आहे. नद्यांच्या तीरावर मैलच्या मैल गिरण्या पसरलेल्या आहेत व म्हणूनच या शहराला धूम्रनगरी हें नांव आहे. शेनले पार्क नांवाचा बगीचा फार मोठा असून प्रेक्षणीय आहे. पिट्सबर्ग विश्वविद्यालय १७८७ सालीं स्थापन झालेलें आहे.

पिट्सबर्ग हें कोळशाच्या खाणींच्या मध्यें वसलेलें असून रेल्वेचें केंद्रस्थान असल्यामुळें व त्याचप्रमाणें येथील बंदरहि मोठें असल्यामुळें व्यापार बराच मोठा आहे. त्याचप्रमाणें लोखंड व लोखंडाचे दगडहि येथें आणले जाऊन त्यांचा व्यापार चालतो. संयुक्त संस्थानांत येथील लोखंड व पोलाद यांचा व्यापार पहिल्या प्रतीचा आहे. याशिवाय माल्ट दारू, सिगारेट, तांबें, कांच वगैरे वस्तूहि येथें तयार होतात. विजेचीं यंत्रें करण्याचे कारखानेहि येथें आहेत.

**पिठोरो**—मुंबई, सिंध. थर आणि पारकर जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ ४८२ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ३५५२७. तहशिलींतील गांवांची संख्या १०८ असून तहशिलीचें मुख्य ठिकाण समरो आहे. जोधपुर बिकानेर रेल्वे पिठोरो तहशिलीमधून गेलेली आहे. मिथराव, जामराव आणि हिरल असे ३ कालवे आहेत. मुख्य पीक तांदूळ व कापूस आहे.

**पिंडदादनखान**—पंजाब, झेलम जिल्ह्यांतील एक तह्शील आणि पोटविभाग. क्षेत्रफळ ७०६ चौरस मैल असून लोकसंख्या ( १९२१ ) १४३३३८. तहशिलींत २०९ खेडीं आहेत. मुख्य ठिकाण पिंडदादनखान झेलम नदीच्या उजव्या किनाऱ्यावर असून वायव्येकडील रेल्वेच्या सिंदसागर फांट्यावर स्टेशन आहे. लोकसंख्या सुमारें ८हा हजार. येथें पितळेचीं भांडीं व लुंग्या फार चांगल्या तयार करतात. मातीच्या भांड्याची प्रसिद्धि विशेष आहे, व येथें इंग्लिश नमुन्या बरहुकूम चामड्याचे चाबूक उत्कृष्ट बनवितात.

**पिंडीघेब**—पंजाब, अटक जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ १५०८ चौरस मैल. वायव्यसरहद्दीवरून सिंधु नदी वाहते. मुख्य ठिकाण पिंडीघेब असून एकंदर खेड्यांची संख्या १३४ आहे.

**पितृपूजा**—मृत पितरांच्या संबंधींच्या विधिसमूहाला पितृपूजा म्हणतात. पितृपूजा ही धर्माच्या अनेक शाखांपैकीं एक महत्त्वाची शाखा आहे. पृथ्वीवरील सर्व प्राचीन व अर्वाचीन राष्ट्रांत थोड्या फार फरकानें हिचें अस्तित्व आढळतें. मनुष्य मेला म्हणजे त्याचें पुढें काय होतें यासंबंधींच्या कल्पना निरनिराळ्या लोकांमध्यें निरनिराळ्या तऱ्हेनें आढळून येतात. मृत मनुष्य हा पृथ्वीवरून जरी नाहींसा झाला तरी दुसऱ्या एखाद्या लोकांत वास करतो अशी कल्पना बहुतेक लोकांत आढळते. मृत मनुष्यासंबंधींची वरील कल्पना मान्य केल्यावर साहजिकच असा प्रश्न उद्भवतो कीं या मृत मनुष्यांचा उर्फ पितरांचा, पृथ्वीवरील जिवंत प्राण्यांशीं व त्यांतल्यात्यांत आपल्या आप्तेष्टांशीं संबंध येऊं शकतो किंवा नाहीं; व संबंध असला तर तो कोणत्या प्रकारचा असूं शकेल. पुष्कळ लोकांत अशी समजूत आढळते कीं पितर हे मृत्यूनंतर आपल्या घराण्याशीं चांगल्या रीतीचा संबंध ठेवतात, आपल्या घराण्यांतील माणसांचें अगर आप्तेष्टांचें कल्याण करण्यासाठीं झटतात व आपल्या माणसांच्या शत्रूंचा नाश करण्याचा प्रयत्न करतात. तथापि याच्या उलट कांहीं जातींमध्यें व राष्ट्रांमध्यें अशीहि कल्पना प्रचलित असलेली आढळते कीं पितर हे आप्तेष्टांशीं व आपल्या माणसांशींहि चांगल्या तऱ्हेनें वागत नाहींत. त्यामुळें ज्या ज्या जातींची पितरांसंबंधींची जशी चांगली अगर वाईट कल्पना असेल त्या त्याप्रमाणें त्यांच्यामध्यें पितृपूजेच्या विधींमध्यें फरक आढळून येतात. पितर हे आपल्या आप्तेष्टांचें कल्याण करण्याविषयीं झटतात ही कल्पना रानटी लोकांत बहुतेक सर्वत्र आढळून येते; व त्यामुळें पितरांशीं चांगल्या रीतीनें संबंध ठेवण्याची, त्यांची स्मृति ठेवण्याची, त्यांचा परलोकवास सुखाचा जावा यासाठीं अन्नपाणी अगर मृतांनां आवडतील ते पदार्थ अर्पण करण्याची चाल अशा लोकांत आढळून येते. पितरांसंबंधींची ज्यांच्यामध्यें भयोत्पादक कल्पना आहे त्यांच्यांत पितरांनां येन केन प्रकारें संतुष्ट ठेवून त्यांचा पृथ्वीवरील माणसांशीं संसर्ग न होण्याची तजवीज करण्याची चाल आहे. तात्पर्य कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी पितृपूजेचें अस्तित्व सर्व राष्ट्रांमध्यें आहे असेंच दिसून येतें यावद्दल संशय नाहीं. ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, टास्मानिया इत्यादि देशांत पितृपूजा अगदीं अस्फुट स्वरूपांत आढळते. तर पॉलिनेशिया, मेलॅनेशिया इत्यादि देशांत ती चांगली प्रस्थापित झालेली दिसते. सेमिटिक राष्ट्रांमध्यें पितृपूजा अस्तित्वांत होती किंवा नाहीं यासंबंधीं निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. आफ्रिकेंत बंटु लोकांमध्यें व विशेषतः पश्चिम आफ्रिकेंत पितृपूजा राजमान्य झालेली आढळते. ईजिप्तमध्येंहि व मलायाद्वीपकल्पांतहि हिचें अस्तित्व दिसून येतें. पण हिंदुस्थान, चीन व जपान यांत या पितृपूजेचें महात्म्य सर्वांत अधिक आढळून येतें. मृत पितरांच्या आत्म्यांनां संतुष्ट ठेवणें हें पवित्र कर्तव्य आहे असें चिनी लोक मानतात. आपण चांगलीं कृत्यें केलीं तर आपल्या पूर्वजांचा पारलौकिक दर्जा वाढतो अशी यांच्यांत समजूत असलेली दिसते. आपले पितर आपण पृथ्वीच्या पाठीवर कोणकोणतीं कृत्यें करतों हें पहातात अशी कल्पना जपानी लोकांत आहे. १९०४–०५ च्या रुसो–जपानी युद्धांत या भावनेनेंच जपानी लोकांनीं अद्भुत पराक्रम गाजविला. हिंदुस्थानांतहि पितृपूजेची चीनप्रमाणेंच महती असलेली आढळते. आपल्या पितरांची स्मृति बाळगणें व त्यांनां संतुष्ट ठेवणें हें प्रत्येक हिंदूचें कर्तव्य आहे अशी हिंदूंची भावना असते. पितरांनां संतुष्ट ठेवण्याचें काम मुख्यतः मुलाकडे असतें व जर एखाद्याला मुलगा नसेल तर तो दुसऱ्याचा मुलगा दत्तक घेतो. दत्तकाच्या चालीचें मुख्य कारण या पितृपूजेंत सांपडतें. दत्तविधानाचा हेतु पिण्डोदकक्रियादान आहे असें शास्त्रांत म्हटलेलें आहे. तात्पर्य, हिंदूंमध्यें पितृपूजेचें माहात्म्य फार आहे असें आपल्याला दिसून येतें ( विशेष माहितीकरितां ‘ श्राद्ध ’ यावरील लेख पहा ).

रोममध्यें देखील पितृपूजा सर्रास अस्तित्वांत असलेली आढळते. प्राचीन रोममध्यें प्रसिद्ध मृत माणसांचीं मेणाचीं चित्रें त्यांच्यावर मृतांची माहिती लिहून सार्वजनिक अगर खाजगी दिवाणखान्यांत ठेवण्याची पद्धत असे. या चित्रांमध्यें मृत पितरांचा वास असतो अशी चिनी लोकांप्रमाणेंच रोमन लोकांचीहि समजूत होती किंवा कसे यासंबंधीं निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. प्रत्येक रोमन कुटुंबांतील पुरुषांवर पितरांची स्मृति ठेवण्याची व त्यांनां संतुष्ट राखण्याची पवित्र जबाबदारी असे. त्याचप्रमाणें रोमन लोकांतील निरनिराळ्या जातीहि आपल्या जातींतील प्रसिद्ध मृत माणसांचे वार्षिक स्मृतिदिन पाळीत असत. ‘ ज्याला पितरांनां पिंड देण्याचा अधिकार त्यालाच दाय हक्काचा अधिकार ’ हें जें हिंदूधर्मांतील एक तत्त्व आहे तशाच प्रकारचें तत्त्व रोमन कायद्यांतहि आढळतें

जगांतील सर्व धर्मांच्या मुळाशीं पितृपूजा होती असें हर्बर्ट स्पेन्सरनें प्रतिपादन केलें आहे. त्याच्या मतें प्राचीनकाळच्या पितरांनांच पुढें देवतास्वरूप प्राप्त झालें आहे. पण

हें मत बरोबर नाहीं असें आतां सिद्ध झालें आहे. संकटसमयीं पितरांना कौल लावला असतां ते आपल्या वंशजांना भविष्य सांगतात अशी समजूत पूर्वी पुष्कळ राष्ट्रांत रूढ असे. ग्रीस, इटली, मेलॅनेशिया, ऑस्ट्रेलिया, आफ्रिका इत्यादि ठिकाणीं ही चाल होती असें इतिहासावरून दिसून येतें. पितरांची पूजा योग्य तऱ्हेनें करण्यांत आली नाहीं तर ते नाना संकटें उत्पन्न करतात अशी समजूतहि कित्येक लोकांत प्रचलित आहे. अशा प्रकारचे लोक आपल्यावर कोणतेंहि संकट प्राप्त झालें असतां त्याचा संबंध पितरांच्या कोपाशीं जोडतात. सेलेबिस, नाताळ, युगांडा इत्यादि ठिकाणीं ही कल्पना अद्यापि आढळून येते.

देवकपूजा व पितृपूजा यांचाहि परस्परसंबंध आहे असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. कांहीं जातींत विशिष्ट प्राण्यांमध्यें पितर वास करतात अशी समजूत असून ते त्या प्राण्यांची पूजा करतात. उदाहरणार्थ, सुमात्रामधील रहिवाशी वाघांमध्यें पितर राहतात असें मानतात, व त्यांची पूजा करतात. आफ्रिका, मेलॅनेशिया इत्यादि देशांतील खालच्या जातींत ही चाल अद्यापि आढळून येते. देवकपूजेची पुढची पायरी पितृपूजा होय असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. पितृपूजेचा एक महत्त्वाचा परिणाम म्हणजे मूर्तिपूजा होय. पितृपूजेचें अस्तित्व ज्या ज्या लोकांत रूढ होतें त्या त्या लोकांनीं पितरांच्या सन्मानार्थ इमारती अगर मंदिरें बांधावींत यांत आश्चर्य नाहीं. या चालीवरून पुढें देवतांच्या मूर्ती करून देवालयांत ठेवण्याची पद्धत पडली असावी.

वरील विवेचनावरून आपल्याला असें आढळून येईल कीं, पितृपूजेचें तत्त्व फार प्राचीन काळापासून अस्तित्वांत आहे. कुटुंबपद्धति ज्या राष्ट्रांमध्यें जास्त आहे त्या राष्ट्रांत पितृपूजेला बरेंच महत्त्व आहे. पितृपूजेच्या मुळाशीं पितरांशीं चांगला संबंध ठेवण्याची वृत्ति अगर मृत पितरांचें भय अगर क्वचित ठिकाणीं संकटसमयीं पितरांना कौल लावून भविष्य विचारण्याची पद्धत हीं तीन तत्त्वें असलेलीं आढळून येतात. पितृपूजेनें मृत व जिवंत माणसांचा संबंध जोडतात. पितृपूजेनें कुटुंबीयांमध्यें व राष्ट्रांतील लोकांमध्यें सलोखा नांदतो, त्यामुळें अनेक इष्ट असे सामाजिक परिणाम घडून येतात. [ संदर्भ ग्रंथः—स्पेन्सर-प्रिन्सिपल्स ऑफ सोशियालजी; टेलर प्रिमिटिव्ह कल्चर; जेव्हॉन्स-इंट्रोडक्शन टु दि हिस्टरी ऑफ रिलिजन्स ( १८९६ ). ]

**पिन्स्क**—रशिया. मिंस्क प्रांतांतील शहर. हें स्ट्रुमेन व पिना नद्यांच्या संगमाच्या ठिकाणीं आहे. लोकसंख्या ३८ हजार. येथें बराच व्यापार चालतो. कारण पिना नदीच्या योगानें नीपर नदीच्या आसपासच्या सुपीक प्रदेशाशीं हें शहर जोडलें आहे. मातीचीं भांडीं, कमावलेलीं कातडीं, तेल, साबण हे येथील व्यापाराचे मुख्य जिन्नस होत. १०९७ सालीं हें किफच्या राजाच्या ताब्यांत होतें. पुढें ( ११३२ ) मिन्स्क संस्थानांत हें शहर मोडलें जात होतें. १२३९-४२ च्या मोन्गल स्वारीनंतर ते एका निराळ्या संस्थानाचें मुख्य स्थान होतें. १३२० सालीं तें ल्युथिनियाला जोडण्यांत आलें. १५६९ सालीं बेस प्रांताचें मुख्य शहर होतें. कोसॅक बंडाच्या वेळीं हें शहर पोल लोकांनीं घेतलें. ८ वर्षांनंतर रशियन लोकांनीं हें शहर जाळलें. १७९५ सालीं पिन्स्क रशियाला जोडण्यांत आलें.

**पिपलियानगर**—मध्यहिंदुस्थानांतील भोपाळ एजन्सीमधील एक लहानसें संस्थान. याचें क्षेत्रफळ २ चौरस मैल असून लोकसंख्या सुमारें ८०० आहे. संस्थानचें उत्पन्न २ हजार रुपयांचें आहे.

**पिपलोदा**—मध्यहिंदुस्थान. माळवा पोलिटिकल एजंटाच्या नजरेखालीं असलेलें संस्थान. क्षेत्रफळ ३५चौरस मैल. येथील संस्थानिकाचे पूर्वज दोरिया रजपुत होते. काळूजी नांवाच्या मनुष्यानें १२८५ सालीं पिपलोदापासून ७ मैलांवर सबलगड नांवाचा किल्ला घेतला. काळूजीचा वंशज शार्दुलसिंगानें १५४७ सालीं आपला अंमल बसवून पिपलोदा शहर वसविलें. मराठ्यांनीं वारंवार संस्थानवर हल्ले केल्यामुळें त्याचा विस्तार बराच कमी झाला आहे हल्लीं केसरसिंग नांवाचे ठाकूर आहेत. येथील जमीन सुपीक आहे. संस्थानचें उत्पन्न ९५ हजार रुपये आहे. देवासहून २५३ रुपये व जावराहून एक हजार तनखा येतो. लोकसंख्या ( १९११ ) ८ हजार. संस्थानांत तुरुंग आणि शाळा आहेत. एक सबळगड नांवाचा जुना किल्ला (पूर्वीची राजधानी ) पिपलोदापासून सात मैलांवर आहे.

**पिंपळगांव राजा**—मध्यप्रांत बुलढाणे जिल्हा, मलकापूर तालुका. मलकापूराच्या आग्नेयीस २६ मैलांवर हा गांव आहे. हा गांव सुमारें ८०० वर्षांपूर्वी पिरतसिंग नांवाच्या गवळी राजानें वसविला असें म्हणतात. लोकसंख्या सुमारें पांच हजार. गांवाच्या बाहेर रेणुका देवीचें एक खडकांत खोदलेलें देवस्थान आहे. समोर एक पाण्याचें टांकें आहे. स. १६१९ च्या सुमारास येथें प्रसिद्ध ग्रहलाघवकार गणेश दैवज्ञ होऊन गेला.

**पिंपळनेर, तालुका.**—मुंबई, पश्चिम खानदेश जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ९२३ चौरस मैल. तालुक्यांत एकंदर १४६ खेडीं आहेत. लो. सं. ( १९११ ) ७२०५३. तहशिलीचें ठाणें साक्री येथें असतें. भिल्ल लोकांची वस्ती डोंगराळ भागांत विशेष आहे. हवा वाईट आहे. पाण्याचा पुरवठा भरपूर आहे. पावसाचें मान दरसाल २० इंच असतें.

गां व.—पिंपळनेर तालुक्याचें पूर्वीचें मुख्य ठिकाण. हें पांझरा नदीवर धुळ्याच्या पश्चिमेस ४० मैलांवर आहे. हें जुनें गांव असावें. येथें रोशेल तेल तयार होतें. नदीकांठावर जुना किल्ला आहे. गांवांत एक तळें व महादेवाचें देऊळ आहे. यांखेरीज पांझरेच्या दक्षिणेस डोंगराच्या पायथ्याशीं हेमाडपंती देवळांचे अवशेष असून त्यांमध्यें खोदकाम केलेले दगडी खांब बरेच आढळतात. दुसाण गांवाच्या वायव्येस

मालपूर रस्त्यावर इंद्र या गांवीं एक हेमाडपंती तलाव आहे.

**पिंपळी**—हिची लागवड बहुतकरून दक्षिण गुजराथेंत बागाईत जमीनींत करतात. हिचे वेल गोराडु जमीनींत जेथें पाऊस सुमारें ४० ते ५० इंच पडतो तेथें उत्तम वाढतात. मध्यप्रांतांत उमरावती अकोटकडे याची लागवड पानमळ्यांत जुजवी होते.

फळें सुरवातीला हिरवट पिंवळ्या रंगाचीं असतात व पुढें तीं तयार होऊं लागलीं म्हणजे हिरवींगार होतात व त्यांना तिखट, गोड स्वाद येऊं लागतो. फळांची ( पिंपळीची ) लांबी $\frac{1}{8}$ ते $\frac{1}{2}$ ते $\frac{3}{4}$ इंच असते.

दर एकरीं पिंपळीचें उत्पन्न ११। तेरा हजार पौंड होतें. दर मणीं (४० पौंड) ५ ते ८ रुपये किंमत पडते. हिरवी पिंपळी चार दिवस उन्हांत वरचेवर हलवून वाळवितात. ती वाळविली म्हणजे ४० पौंडांची वाळून ८ पौंड भरते. वाळलेल्या पिंपळीस दर मणीं ( ४० पौंड ) ३० ते ३५ रुपये पडतात.

खारीपिंपळीतयारकरण्याचीरीत.—पिंपळी खुडून आणली म्हणजे दर चाळीस पौंड पिंपळींत पंधरा पौंड मीठ घालितात व तें मिश्रण एका मोठया तोंडाच्या लोखंडी हौदांत घालून दडपून एक आठवडाभर टेवितात. हौद सुमारें चार फूट उंच असून त्याचें तोंड तीन फूट रुंद असतें. तो बुडाजवळ निमुळता म्हणजे सुमारें एक फूट रुंद असतो. सात आठ दिवसांत पिंपळ्या मिठाचें पाणी बरेंच शोषून घेतात सात दिवसांनंतर त्या बाहेर काढून वाळवितात. या पद्धतींत एक मण ( ४० पौंड ) खारवलेल्या पिंपळ्यांचें वजन अजमासें २५ पौंड भरतें व त्याचा दर मणामागें १२ ते १६ रुपये भाव असतो.

**पिपीलिकाभक्षक**—दंतहीन प्राण्यांच्या वर्गांतील प्राणी. हा मुख्यत्वें दक्षिण अमेरिकेंत सांपडतो. या प्राण्याच्या दोन जाती आहेत. एका जातीच्या अंगावर फार केंस असतात व दुसऱ्या जातींत केंसांऐवजीं खवले असतात. पिपीलिकाभक्षक हा प्राणी आपल्या तीक्ष्ण पंजांनीं वाळवीचें वारूळ फोडतो आणि आपल्या फूट दीड फूट लांब जिभेनें त्यांतील वाळवी ओढून घेऊन गिळून टाकतो. अशा रीतीनें तो वारुळांतील सर्व वाळवी फस्त करतो. याचें तोंड लांबट असून, दांत नसल्यामुळे हा प्राणी लहान लहान खडे सहज गिळून टाकतो व त्यांनीं अन्नाचें चूर्ण करतो.

**पिरली**—या तामिळी ब्राह्मणानें अज्ञानतः एका अंत्यज मुलीशीं लग्न लाविलें होतें; पुढें तिला टाकून तो बरींच वर्षें यात्रा करीत फिरला पण पुन्हां तिची गांठ पडून तिच्या सद्वर्तनाची व पातिव्रत्याची त्याला प्रचीती आली. शेवटीं तो तिजसमवेत राहूं लागला पण मुलें मात्र संभाळीत नसे. अवैय्यर, अपग्गा, कपिलर इत्यादि त्याचीं मुलें होत. यांपैकीं बहुतेक मुलें तामिळी वाङ्मयांत ग्रंथकार व कवि म्हणून प्रसिद्ध आहेत.

**पिरामिड** ( ईजिप्तमधील मनोरे )—बहुभुजी (पॉलीगोनल) पायावर क्रमानें लहान लहान भिंती बांधून वर निमुळतें शिखर बनविलें आहे अशा ईजिप्तच्या मध्यभागांत प्राचीन मिसरी राजांच्या थडग्यांवर बांधलेल्या एका विशिष्ट प्रकारच्या प्रचंड इमारतीस पिरामिड म्हणतात. या ईजिप्शियन पिरामिडच्या नमुन्याचीं थडगीं थीब्ज, मेरो, रोम वगैरे ठिकाणीं बांधलीं आहेत पण तीं लहान व मिश्र नमुन्याचीं आहेत.प्राचीन मिसरी राजांच्या चवथ्या ते बाराव्या घराण्यापर्यंतच्या राजांच्या काळांत (ख्रि. पू. ३००० पूर्वी) हे मनोरे बांधले गेले असून त्यांपैकीं प्रमुखांची माहिती येणेंप्रमाणेः—

महत्त्वाचे मनोरे

| ठिकाण | राजा | काल ख्रि. पू. | पाया | उंची (फूट) | दिगंश (अक्षिमथ) |
|---|---|---|---|---|---|
| मेदूम | स्नेफेरू | ४७५० | ५६८२.० | ३६११ | २४'२५'' प. |
| गिझह | खुफू | ४७०० | ९०६८.८ | ५७७६ | ३'४३'' प. |
| ,, | खाफ्रा | ४६०० | ८४७४.९ | ५६६४ | ५'२६'' प. |
| ,, | मेनकौरा | ४५५० | ४१५३.६ | २५८१ | १४' ३'' पू. |
| दहशूर | ... | ... | ७४५९.० | ४१३४ | ९'१२'' प. |
| दहशूर | ... | ... | २०६४.६ | २०३४ | १०'१२'' प. |

प्रागैतिहासिक काळांत राजांच्या थडग्यांवर लहानसहान बांधकाम करण्याच्या पद्धतीपासून सुरवात होऊन हें बांधकाम वाढतां वाढतां थडग्यांवर सदरहू मनोऱ्याइतक्या प्रचंड इमारती बांधण्यांत आल्या. साधारण घडलेल्या दगडांचे एकावर एक थर चुन्यामध्यें बसवून हे मनोरे बांधलेले असतात. अंतर्भाग कसाहि असला तरी बाह्यभाग चांगले घडीव दगड उत्तम रीतीनें एकाशीं एक जुळवून चांगला बांधला आहे, आणि बांधकाम इतकें भक्कम आहे कीं, ते शत्रूंच्या रोषास बळी न पडते तर या मनोऱ्यांपैकीं प्रत्येक मनोरा आजलाहि चांगल्या स्थितींत टिकला असता. प्रत्येक मनोऱ्याच्या आंतल्या बाजूस भूपृष्ठाच्याहि खालीं एक खरें थडगें असतें; मध्यंतरीं खोटें थडगें अथवा राजाराणींचीं दालनें असतात व तेथें जाण्यास उत्तरेच्या बाजूने वाट असते. चवथ्या, ५ व्या, व ६ व्या घराण्यांतील बहुतेक व नंतरच्याहि कांहीं राजांच्या थडग्यांवर असले मनोरे उभारले असल्याचें शिलालेखांत लिहिलें आहे. मेदूम येथील मनोरा हा पहिला होय. गिझे येथील सर्वांत मोठ्या मनोऱ्यानें १३ एकर जागा व्यापली आहे व तो सेंट पॉल कॅथिड्रलहून १५० फूट अधिक उंच आहे. [ वाइस—ऑपरेशन्स ॲट दि पिरॅमिड्स् (१८४०); प्रो सी. पिआझी स्मिथ—लाईफ ॲंड वर्क ॲट दि पिरॅमिड; डब्ल्यू. एम्. फ्लिंडर्स-पिरॅमिड्स् ॲंड टेंपल्स ऑफ गिझेह ]

**पिराव**—राजपुताना, टोंक संस्थानांतील एक परगणा. हा माळव्याच्या पोलिटिकल एजंटाच्या देखरेखीखालीं

आहे. क्षेत्र फळ २६८ चौरस मैल. लोकसंख्या १९११ साली २४८३० होती. या परगण्यांत एकंदर ११६ खेडीं आहेत. मुख्य जाती सोंधि,मिना,डांगी आणि चमार. अकबराच्या पूर्वी सदरहू परगण्याचा इतिहास कांहीं उपलब्ध नाहीं. कारण त्यावेळीं तो फक्त माळव्यांतील एका सुभ्याचा भाग समजला जात होता. शहाजहान बादशहानें रतलामच्या रतनसिंगाला जो भाग इनाम दिलेला होता तो याच परगण्यांत समाविष्ट होत होता. परंतु जयपुरचे सवाई जयसिंग हे माळव्यांत सुभेदारीवर होते तेव्हां त्यांनीं पिराव परगणा बाजीराव पेशवे यांच्याकडे दिला. त्यानंतर होळकर सरकारकडे त्याची वहिवाट आली. सन १८०६ मध्यें यशवंतराव होळकरानीं अमीरखानाला त्याची मुखत्यारी सांगितली व पुढें इंग्रज सरकारशीं जो १८१७ सालीं तह झाला त्यांत पिराव परगणा कायमचा अमीरखानाकडेच राहिला.

पिरावची लोक वस्ती सुमारें चार हजार आहे. हें शहर टोंकच्या दक्षिणेस १४० मैलांवर आहे. जैन शिलालेखावरून पिराव अकराव्या शतकापासून अस्तित्वांत आहे असें दिसतें. सध्यां तेथें एक छोटेखानी किल्ला, पोस्टऑफिस, तारऑफीस,एक लहान तुरुंग, दवाखाना व शाळा हीं आहेत.

**पिरिनीज**—यूरोपांतील एक पर्वत. बिस्केच्या उपसागरापासून या पर्वताची लांबी सुमारें २४० मैल असून हा फ्रान्स व स्पेन या देशांच्या सरहद्दीवर आहे.सामान्यतः मध्य, पश्चिम किंवा ॲटलांटिक,व पूर्व असे याचे तीन भाग करतात. बहुतेक मध्य भागांत या पर्वताचीं सर्व अत्युच्च शिखरें आहेत. या पर्वतासंबंधीं पुढील चार गोष्टी लक्ष्यांत ठेवण्याजोग्या आहेतः—(१) सरोवरांचा अभाव (आल्प्सच्या उलट); (२) रस्ते थोडे असून चढण फार आहे; (३) पाण्याचे लहानमोठे धबधबे व (४) दर्‍यांचा वरचा भाग अर्धवर्तुळाकार असून त्याभोंवतीं उंच उंच तुटके कडे आहेत. गॅव्हेर्नीचा धबधबा (१५१५ फूट) सर्वांत मोठा आहे. रस्ते तर इतके थोडे आहेत कीं, फ्रान्स व स्पेन यांच्या दरम्यान दोनच गाडीरस्ते आहेत. येथें लोखंड बरेंच सांपडतें, तरी एकंदरींत येथील अशुद्ध धातू विशेष महत्त्वाच्या नाहींत. स्पेनच्या बाजूस चांगल्या कोळशाच्या खाणी आहेत तर फ्रान्सकडील भागांत लिग्नाइट कोळसा सांपडतो. खनिज झरे चांगले व विपुल असून विशेषतः गंधक (सल्फर) युक्त उष्ण झरे बरेच आढळतात. पश्चिम भागावर पाऊस बराच पडत असल्याकारणानें तो वनस्पतींनीं पूर्णआच्छादित असतो. परंतु बाकीचा भाग अगदींच उजाड व निर्वृक्ष आहे व येथेंच ग्रानाइट सांपडतें. पश्चिमेकडील वनस्पतिसमूह मध्ययूरोपच्या वळणावर आहे परंतु जसजसें पूर्वेकडे जावें तसतसा तो (वनस्पतिसमूह) भूमध्यसमुद्रकांठच्या प्रदेशासारखा आहे.

**पिऱ्हो**—याच्या चरित्राविषयीं विशेष माहिती उपलब्ध नाहीं. तथापि हा ॲरिस्टॉटलचा समकालीन होता हें मात्र खास. हा एलिस येथील (ग्रीसमध्यें) राहणारा होता. पूर्वी होऊन गेलेल्या डेमॉक्रिटस या तत्त्ववेत्त्याच्या लेखनांनीं प्रेरित होऊन यानें तत्त्वज्ञानविषयाचा अभ्यास सुरू केला. थोडयाच दिवसांनीं यानें स्वतःचीं कांहीं मतें प्रस्थापित केलीं.हळूहळू याच्याभोंवतीं बरेच शिष्यहि जमूं लागले. या शिष्यांपैकीं टायमन हा प्रसिद्ध तत्त्ववेत्ता होऊन गेला. पिऱ्हो ख्रि. पू. सुमारें २७० मध्यें मरण पावला असा अंदाज आहे.पिऱ्हो म्हणे कीं वस्तूंचें ज्ञान होणें अशक्य असल्यामुळें मनुष्यानें उदासीन असावें. दोन परस्परविरोधी मतांपैकीं सत्य कोणतें व असत्य कोणतें याविषयीं मन गोंधळून गेलें असतां पिऱ्हो यास हा "संशयवाद" सुचला. हा संशयवादाचा आद्य पुरस्कर्ता होय. संशयवाद पिऱ्होच्या नांवानेंहि प्रसिद्ध आहे. "संशयवाद म्हणजे मानवबुद्धीचें विश्रामस्थान नव्हे" अशी या वादावर कांट यानें टीका केली आहे.

**पिलिभित, जिल्हा.**—संयुक्तप्रांत.बरेली भागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १३५० चौरस मैल. आणि लोकसंख्या सुमारें ५ लाख आहे. या जिल्ह्यांत शारदा व गोमती या नद्या आहेत. पिलिभित जिल्ह्याचें जंगल विशेष रमणीय असून पुरणपूर भागांत वन्य पशू आढळतात. दरसाल पाऊस ४९ इंच पडतो. पिलिभित जिल्ह्याचा इतिहास दहाव्या शतकापासून उपलब्ध आहे. छिंद नांवाचें घराणें उत्तरेकडे राज्य करीत होतें, त्यांनीं एक कालवा खोदला असें एका शिलालेखावरून समजतें. अठराव्या शतकांत पिलिभित, रोहिल्यांचा पुढारी हफीज रहिमतखान याच्याकडे होतें. तो स्वतः येथेंच रहात असे. या गांवाला तट, मशीद,व बाजार यानेंच बांधविली. १७७४ सालीं कतराच्या लढाईत रहिमतखान मारला गेला. लढाईनंतर पिलिभित अयोध्येच्या नबाबाकडे गेलें. १८०१ सालीं अयोध्येच्या नबाबानें खंडणी न दिल्यामुळें इंग्रज सरकारकडे तें कायमचें वहिवाटीला आलें. पिलिभित जिल्ह्यांत १०६८ खेडीं असून ५ मोठीं शहरें आहेत. हवा रोगट असल्यामुळें लोक बहुधा बाहेरदेशीं जातात. यांत ३ तालुके आहेत. पिलिभित तालुक्याच्या वायव्येकडील जमीन काळी व पाऊस अतिशय असल्यामुळें तांदुळाचें पीक उत्तम येतें. जिल्ह्यांत गहूं आणि हरभरा चांगला पिकतो. उंसाचें पीकहि वाढत्या प्रमाणांत आहे. साखर करण्याचा धंदा पिलिभित जिल्ह्यांत फार असे. होडया करणें व लांकडी खोदींव काम करणें वगैरे सुतारकाम, धातूचीं भांडीं, गोणपाट, पोतीं तयार करणें हीं कामें येथें होतात. शिक्षणाच्या बाबतींत पिलिभित जिल्हा मागसलेला नाहीं.

**तहशील.**—पिलिभित जिल्ह्याची एक तहशील. हिच्यांत पिलिभित व जहानाबाद हे दोन परगणे असून क्षेत्रफळ ४७४ चौरस मैल आहे. लोकसंख्या (१९११) १९५७४९. तहशिलींत ३२० खेडीं असून तहशिलीचें ठाणें पिलिभित येथें आहे. देवहा व कटना या दोन नद्या तहशिलींतून

वाहतात.उन्हाळयांत पिण्याच्या पाण्याकरतां विहिरी खणतात; त्यांनां पाणी जवळच लागतें.

गां व.---पिलिभित जिल्ह्यांतील मुख्य गांव; हें लखनौ-सीतापूर बरेली रेल्वेवर आहे. लोकसंख्या (१९११)३१५५४. अठराव्या शतकानंतरचा इतिहास उपलब्ध आहे. रोहिला पुढारी हफीज रहिमतखान या ठिकाणीं रहात असे त्यामुळें त्यानें गांवाला विटांचा कोट १७६९ सालीं बांधला. कांहीं दिवस पिलिभित गांवाला हफिजाबाद म्हणत असत. हफीज रहिमतखानाच्या अमदानींत हें शहर भरभराटींत होतें. खानाचा पराभव होऊन तो मरण पावल्यावर शहराला उतरती कळा लागली. जुम्मा मशीद इमारत फार प्रेक्षणीय आहे; ती दिल्लीच्या जुम्मा मशीदीचीच नक्कल आहे. जिल्ह्याचे अधिकारी येथें राहतात. येथें १८९५ सालीं म्युनिसिपल कमिटी स्थापन झाली. तांदूळ, गहूं, साखर आणि तागाचा व्यापार पुष्कळ प्रमाणांत चालतो.

**पिलोषण प्रांत**—संयुक्तप्रांतांतील एक प्राचीन शहर व प्रांत. ह्युएनत्संग अहिच्छत्राहून पिलोषण येथें गेला होता. हें शहर कोणतें याविषयीं संशय आहे. गंगेच्या जुन्या पात्रावर सोरन म्हणून गांव आहे. कालिंदी नदीवर अत्रंजी म्हणून खेडें आहे. तसेंच पिलकुनी किंवा पिलोकुनी म्हणून दुसरें खेडें आहे; यांपैकीं कोणतें तरी पिलोषण असावें. दोन, तीन प्रमाणांवरून अत्रंजी हेंच पिलोषण असें कनिंगहॅम यानें सिद्ध केलें आहे. या गांवाचेंच नांव त्याच्या आसपासच्या प्रांतास पडलें होतें.

ह्युएनत्संगानें ह्या प्रांताचा घेर ३३३ मैल सांगितला आहे. हल्लीं बुलंद शहरापासून यमुनेवरील फिरुजाबादपर्यंत व गंगेवरील कादिरगंजपर्यंत या राज्याची हद्द असावी, असें भोंवतालच्या प्रांतांच्या मर्यादांवरून दिसतें. परंतु एवढ्या भागाचा घेर २५० मैल आहे, ३३३ येत नाहीं. [ कनिंगहॅम एन्शन्ट जिऑ. इंडिया; दीक्षित—भार. भूवर्णन. ]

**पिशाच व पिशाचपूजा**—पिशाच हा शब्द हल्लीं वाईट अर्थानें वापरण्यांत येतो. अगदीं प्राचीन काळीं हा शब्द वाईट अर्थानें योजण्यांत येत नसे. पिशाच्याचा वाचक जो डीमन शब्द इंग्लिश भाषेंत आढळतो तो ख्रिश्चन धर्माचा उदय होण्यापूर्वी वाईट अर्थानें वापरण्यांत येत नसे. पण ख्रिश्चन धर्मानें ज्यावेळीं मूर्तिपूजकांच्या धर्माची निंदा करण्यास सुरवात केली त्यावेळीं या शब्दाचा वाईट तऱ्हेनें अर्थ करण्यांत येऊं लागला. आपल्याकडेहि याचें प्रत्यन्तर दृष्टीस पडतें. प्राचीन काळीं इराणमधून ज्यावेळीं आपले पूर्वज हिंदुस्थानांत आले त्यावेळीं इराणच्या देवांबद्दल त्यांनीं वाईट बोलण्यास सुरवात केली. यावरून पिशाच हा शब्द पूर्वी वाईट अर्थानें वापरला जात नसून त्याच्याशीं वाईटाची कल्पना मागाहून जोडण्यांत आली, असें दिसून येतें. हिंदुस्थानांत वैदिक काळींहि पिशाचाची कल्पना अस्तित्वांत होती. ऋग्वेदांत पिशाच शब्दाचा उल्लेख आहे ( ज्ञानकोश विभाग ३, पूर्वार्ध, पृ. १७० पहा. ) अथर्ववेदांत पिशाचाचीं अनेक नांवें आढळतात. मागाहूनच्या वेदकालांत पिशाचवेद अगर पिशाचविद्या म्हणून प्रसिद्ध आहे.

पिशाचाचे तीन वर्ग पाडण्यांत येतात. ( १ ) आपल्या परिचयाच्या माणसांचीं भुतें, ( २ ) पितर व ( ३ ) दुष्ट भुतें. पिशाचें देहधारी असतात अशीहि कल्पना कांहीं राष्ट्रांत आढळते. मनुष्यप्राण्याच्या सर्व व्यावहारिक कृत्यांवर पिशाचांचा ताबा असतो अशी प्राचीन हीन संस्कृतींच्या राष्ट्रांतील लोकांची कल्पना असे. समुद्र, पृथ्वी, वायू, आकाश इत्यादि सर्वांवर ताबा ठेवणारीं स्वतंत्र भुतें असून तीं दुष्ट आहेत अशी एस्किमो लोकांची कल्पना होती; व त्यांनां संतुष्ट ठेवण्याकरितां ते या भुतांची पूजा करीत असत. आपल्या आयुष्यक्रमात एखादी वाईट गोष्ट घडून आली कीं त्याचा संबंध बाबिलोनियन लोक या भुतांशीं जोडीत असत मलायाद्वीपकल्पांतील लोकांत, प्रत्येक रोगाचें एक स्वतंत्र भूत आहे अशी कल्पना होती; व त्या त्या भूताला संतुष्ट ठेवलें असतां तो तो रोग नाहींसा होतो असें मानण्यांत येई मनुष्यप्राण्याचें रक्त पिणारें एक देहधारी भूत असल्याची कल्पना मलायाद्वीपकल्पांत आढळते. स्वप्नात पिशाचें येऊन तीं माणसाला झोंप येऊं देत नाहींत असें ऑस्ट्रेलियन लोक मानीत असत. तात्पर्य, पिशाचांसंबंधींच्या निरनिराळ्या वाईट कल्पना निरनिराळ्या राष्ट्रांत आढळून येतात.

नवीन धर्मस्थापनेबरोबर जुन्या धर्मांतील देवांनां पिशाचाची पदवी प्राप्त होते असें प्राचीन धर्मांच्या इतिहासावरून आढळून येतें. हिब्रूधर्मीय भविष्यवेत्ते आपल्या जुन्या राष्ट्रदेवतांनां पिशाचाप्रमाणें कमी लेखीत. हल्लींहि यूरोपीय लोकांत पूर्वींच्या मूर्तिपूजक लोकांच्या देवतांनां कमी लेखण्याची चाल पडलेली दिसते. पिशाचांचा त्रास होऊं नये यासाठीं कांहीं प्राचीन राष्ट्रांत पिशाचांची पूजा करण्याचा प्रघात असे. त्याचबरोबर इतर कांहीं राष्ट्रांत पिशाचबाधा होऊं नये म्हणून त्यांनां मंत्रानें घालवून देण्याची चाल दिसून येते.

पिशाच या शब्दानें हल्लीं जरी वाईटाचा बोध होतो तरी दुष्ट पिशाचांप्रमाणें, चांगल्या पिशाचांची कल्पनाहि प्राचीन काळीं अस्तित्वांत असलेली दिसते. विशेषतः परिचयाच्या माणसांचीं भुतें अगर पितरांचीं भुतें हीं चांगल्या पिशाचांच्या समूहांत मोडतात.आपल्या आप्तेष्टांवर एखादें संकट येत असल्यास हीं चांगलीं पिशाचें आप्तेष्टांनां त्यांच्या स्वप्नांत येऊन अगर अन्य तऱ्हेनें सावधगिरीचा इषारा देतात अशी कल्पना प्राचीन कालीन राष्ट्रांत आढळून येते.अशा प्रकारच्या चांगल्या पिशाचांची आदरानें पूजा करणें, त्यांनां प्रसन्न ठेवणें इत्यादि प्रकार प्राचीन काळीं अस्तित्वात होते असें निदर्शनास येतें.

**पिशुलोस** ( सेल्युलोज )—उद्भिज पेशीतत्त्वधारकास पिशुलोस असें म्हणतात. ह्या पिशुलोसमध्यें संयुक्त कर्बोज्जित

असून त्यांवर जलक्रिया केली असतां शेवटचा पदार्थ एकोज हा मिळतो. एका प्रकारच्या पिशुलोसची प्रयोगसिद्ध सारणी $क_{६} उ_{१०} प्र_{५}$ अशी असून ती पिष्टसत्वाच्या सारणीशीं जुळती आहे. पिशुलोसचे व सत्वाचे कांहीं कांहीं गुणधर्म बरेच जुळतात. वर सांगितलेला पिशुलोस कापसांतील असून तो कच्च्या स्वरूपापासून हर किंवा स्तंभ वायुयुक्त क्षीण व उकळणाऱ्या अनाम्लाच्या क्रियेनें वेगळा करतां येतो. या प्रकारचा पिशुलोस पुन्हां क्षीण अनाम्लासह उकळला असतां शुद्ध स्वरूपांत मिळतो. पिशुलोसवर्गाखालीं येणारे बरेच पदार्थ या कापसापासून काढलेल्या पिशुलोससारखे गुणधर्म दाखवितात तरी ते कांहीं बाबतींत भिन्न गुणधर्मीय आहेत. उदाहरणार्थ, संयोगीकरणाच्या बाबतींत ते सधर्मी असून विघटनेच्या बाबतींत विधर्मी आहेत.

खुद्द पिशुलोस हा जरी पेशींच्या मळ जीवनरसांत उत्पन्न होत असला तरी त्यामध्यें नत्र नसतो पण अपुष्प वनस्पतींच्या पेशीबंधांतून हें नत्राचें प्रमाण शें. २–४ पर्यंत दिसून येतें, व अशा पिशुलोसवर जलक्रिया केली असतां आपणास एकोजशिवाय चिकस-अमिन व दार्वोम्ल ( निरनिराळ्या पदार्थांतील ) मिळतील. सपुष्प वनस्पतींच्या पिशुलोसमध्यें कांहींचें मिश्रण व कांहींचा रासायनिक संयोग झालेला असतो; ह्यास संयुक्त पिशुलोस म्हणतात. ह्यामध्यें जे पदार्थ त्याच्याशीं संयुक्त झालेले असतात त्यावरून त्यांचे पेक्टो, लिग्नो, क्यूटो यांसारखे निरनिराळे वर्ग करणें सोपें जातें. यांपैकीं पेक्टो पिशुलोसमध्यें कर्वोज्जिनें त्यांच्या प्राणिदीकृत पदार्थांसह असून त्यांवर जलक्रिया केली असतां पिक्टिकाम्ल मिळतें. लिग्नोपिशुलोसमध्यें काष्ठीभूत पेशिजाल असून त्याच्या अ-पिशुलोस भागास लिग्नोन म्हणतात. क्युटो पिशुलोस हे उद्भिज द्वाररक्षक आच्छादनामध्यें असून त्याच्या विघटनापासून स्निग्धवर्गांतील अम्लासारखे निरनिराळे पदार्थ मिळतात. अंबाडीच्या वाखांतील तंतू हे पहिल्या प्रकारचे आहेत. धान्ययुक्त गवताच्या देठांमध्येंहि याच प्रकारचे पिशुलोस सांपडतात. खुद्द तागामध्यें लिग्नो पिशुलोस असतात, व लांकडामध्यें हे पिशुलोस असल्याकारणानें ते बऱ्याच ठिकाणीं सांपडतात. व्यापारी दृष्ट्याहि त्यांचा बराच उपयोग आहे. उद्भिजाच्या बाह्य रचनेंत क्यूटो पिशुलोसांचा प्रादुर्भाव असून त्यावर बऱ्याच रासायनिक द्रव्यांची क्रिया होत नाहीं, व म्हणूनच त्याच्याकडून उद्भिजाच्या अंतर्भागाचें संरक्षण केलें जातें.

पि शु लो स व व न स्प ति शा स्त्र.–गुरांनीं खावयाच्या वनस्पतींपासून व भाजीपाल्याच्या वनस्पतींपासून अम्लिक व अनाम्लिक जलक्रिया करून राहिलेला अवशिष्ट मूळतंतु हा त्या वनस्पतींमध्यें असणाऱ्या पिशुलोसचें प्रमाण मोजण्यास उपयुक्त असतो. ह्या मूळ तंतूचें प्रमाण बीजामध्यें ( म्हणजे गहूं, तांदूळ; व तैलयुक्त म्हणजे सरकी वगैरे) शें. २.८ ते १० पर्यंत, गुरांच्या चाऱ्यास उपयोगी पडणाऱ्या धान्यांत शें. २ ते ४, गवत वगैरेंमधून शें. ६० ते ७५ इतकें असतें. पचल्या जाणाऱ्या भागाचें प्रमाण हें ह्या आंकड्यांच्या उलट प्रमाणांत मोजलें जातें. वनस्पतींतील सर्वच भाग पचला जात नाहीं. हिरवा चारा, वाळकें गवत व इतर धान्यें वगैरेंचें पचनाचें प्रमाण शें. २० ते ७५ पर्यंत आहे. पचन न झालेले पदार्थ हे, जास्त पाचक पदार्थ लवकर पचविण्यास उपयोगी पडतात. आतां हे पचन झालेले पदार्थ इतर पेशीयुक्त पदार्थांशीं मिश्रित करून त्यांचा जमिनींत खताकडे उपयोग केला गेला तर ते आपले तंतू जमिनींत असणाऱ्या खनिज पदार्थांशीं मिश्रित होऊन त्यांनां कमजोर करतात. वातावरणांतील वायु व आर्द्रता ह्यांचा जमिनींत शिरकाव करण्यास मदत करतात. कांहीं संयुक्त कलायडल् द्रव्यांवरहि यांची क्रिया होत असून ह्यूमस नांवाचा एक पदार्थ तयार होतो व या दृष्टीनें त्यांचा रासायनिक उपयोग बराच आहे.

पि शु लो स व र सा य न शा स्त्र.—कापसापासून काढलेला शुद्ध पिशुलोस हा एकोसचा संयुक्त पदार्थ आहे. त्यावरच गंधकाम्लाची क्रिया करून मिळालेल्या संयुक्त द्रवावर जलक्रिया केली असतां विभक्त होऊन द्राक्षशर्करा मिळते. पिशुलोसची प्रयोगसिद्ध सारणी $क_{६} उ_{१०} प्र_{५}$ आहे. म्हणून त्यास द्राक्षशर्करेचें बहुपद अनुज्जिद असें म्हणतात. त्याचा सार्धी इथे उत्प्राणिदाशीं ३उ. प्र : $क_{६} उ_{१०} प्र_{५}$ या प्रमाणानें संयुक्त होऊं देण्याचा गुणधर्म व त्यांचा कर्वोज्जिताशीं असणारा संबंध लक्षांत घेऊन ग्रोन यानें खालील सारणी सुचविली.

कउ उप्र. कउ. कउ उप्र<br>
| >प्र >प्र.<br>
कउ उप्र. कउ $कउ_{२}$

आपणास हेंच मूलमान धरून पिशुलोसची सारणी बसवितां येईल आणि हें मूलमान जर लहान असेल तर प्राण-सांखळी वाढवून मोठी करतां येईल असें ग्रीनचें मत आहे.

कउ उप्र<br>
कउ. <कउ. उप्र. / कउ. उप्र> $कउ_{२}$<br>
कउ उप्र

याप्रमाणें दुसरीहि पिशुलोशच्या मूलमानाची सारणी सुचविलेली आहे. आतां कप्र आणि $कउ_{२}$ यांच्या सान्निध्यांत त्यांचें कप्रउ व कउ यांमध्यें रूपांतर होत असल्यानें जास्त पदें घालून हें मूलमान मोठें करतां येतें. या सारणीच्या योगानें आपणास कोळसा उत्पन्न होण्याच्या वेळीं त्यांत होत असलेलें कर्बाचें दृढीकरण, कांहीं पिशुलोसच्या बाबतींत जलक्रिया न होण्याचा गुणधर्म व सत्वाच्या गुणधर्माहून पिशुलोसमध्यें असलेल्या गुणधर्मांची भिन्नता चांगलीच निदर्शनास येते. वास्तविक पहातां आज पिशुलोस आपणास ज्या स्थितींत मिळतो त्या स्थितींत असतांना किंवा त्यावर रासायनिक क्रिया करीत असतांना त्याची घटना साध्या सारणीच्या योगानें दर्शवितां येत नाहीं. त्याचे कलायडल् गुणधर्म लक्षांत घेतले

असतां असेंहि म्हणतां येईल कीं पिशुलोस हें अन्वीय पिंडीकरण व इतर अवशिष्ट भाग या दोहोंविरुद्ध ध्रुवीभवनसमर्था होणाऱ्या संयोगांतील स्थिति आहे. आणि ही स्थिति अस्थिर असून पिशुलोसवर रासायनिक क्रिया होत असतांना ती सारखी बदलत जाते.

*मूळ पिशुलोस हा तंतुमय पदार्थ असून नेहमीं क्लेदयुक्त* असतो. सुका असतांना तो विद्युद्विन्यस्त असतो, पण ओलसर केल्यास त्यामधून विद्युत् जाऊं शकते. पाण्यामध्यें त्याचा द्रव होत नाहीं. शे. ४० ते ५० अशा जशद–हरिदामध्यें किंवा अम्नयुक्त ताम्रप्राणिदामध्यें त्याचा द्रव मिळतो. ह्या त्याच्या द्रावणापासून पहिल्यामध्यें अल्कहल टाकलें असतां व दुसऱ्यामध्यें अल्क टाकलें असतां पुष्कळ जलयुक्त असा सांका मिळतो. व्यापारी दृष्टया या अम्ल–द्रवाचा बराच उपयोग असून त्यापासून (सांकायुक्त द्रावणामध्यें हे द्राव टाकले असतांना मिळणाऱ्या घनापासून ) निरनिराळ्या लांबीचे तंतू काढतां येतात. हे पुन्हां तयार केलेले तंतू आकारविशेषरहित असतात ह्या तंतूंसच कृत्रिम रेशीम म्हणतात. ह्या पिशुलोसमध्यें मूळ पिशुलोसचे साधारण गुणधर्म दिसून येतात. हे त्याच्यापेक्षां जास्त स्वेदयुक्त असून हवेमधून जास्त आर्द्रता ओढून घेतात.

पिशुलोसपासून उत्पन्न होणाऱ्या पदार्थांत सेंद्रिय किंवा निरिंद्रिय अम्लापासून तयार होणारीं संयुक्त इथ्रें बरींच महत्त्वाचीं आहेत. हीं संयुक्त इथ्रें देतेवेळेस हे पिशुलोश त्रिउज्ज-अल्कहलाप्रमाणें क्रिया देतात. ह्याच्यापासून नत्राम्लाची किंवा गंधकाम्लयुक्त नत्राम्लाची क्रिया केली असतां नत्रितें मिळतात. या नत्रितांपासून कृत्रिम रेशीम, सेल्युलाईड वगैरे तयार करतां येतात. ह्या नत्रितांचा उपयोग स्फोटक द्रव्यें म्हणून केला जातो, दार्विक अनुजिदांबरोबर संयुक्त इथ्रें मिळतात. अनाम्लिक पिशुलोस व कर्बद्विगंधकिद याच्यापासून पिशुलोसपितितें मिळतात व अलीकडील ‘व्हिक्सोस’ व इतर कांहीं कारखान्यांतून ह्यांचा बराच उपयोग केला जातो. कापसांतील पिशुलोसवर शे. १५ ते २० दाहक सोड्याची क्रिया केली असतांना अनाम्लिक पिशुलोश मिळतात. या अनाम्लीकरणाच्या योगानें मूळ पिशुलोसमधील सुरकुत्या वगैरे सर्व जाऊन तंतूस एक प्रकारची तकाकी येते. या कृतीस इंग्रजीमध्यें ‘मर्सरायझेशन’ असें म्हणतात.

विघटन.—पिशुलोसचा गंधकाम्लांतील द्राव पातळ करून खूप उकळला असतां, त्यावर जलक्रिया होऊन आंबल्या जाणाऱ्या शर्करा मिळतात. याच रीतीनें चिंध्यांपासून चिक्कल–शर्करा मिळते. थंड व क्षीण अम्लाची क्रिया यांच्यावर फारशी दिसून येत नाहीं पण ह्या क्रियेचा उपयोग पिशुलोस रंगविण्याकडे किंवा ओपविण्याकडे फार केला जातो. आम्लिक प्राणिदीकरणापासून प्राण–पिशुलोस तयार होतात. पण व्यापारी दृष्टया त्यांचें अनाम्लिक प्राणिदीकरण महत्त्वाचें आहे. कारण तें लवकर सुरू करतां येऊन थांबवितांहि येतें व त्याच्या योगानें मूळ पिशुलोसला कांहीं धक्का न लावतांना पिशुलोसला चिकटलेले कांहीं पदार्थ व रंगहि काढतां येतात. पिशुलोसवर विपाकक्रिया होत नाहीं व ज्या कांहीं थोडयावर होते त्यांच्या विघातानें कर्ब–द्वि–प्राणिद वगैरे मिळूं शकतें. पिशुलोस तेजयुक्त ज्योतीनें जळतात. गंधकाम्लाशीं मिश्रित केलेल्या कुमिताम्लाच्या योगानें पिशुलोसचें प्राणिदीकरण पूर्ण होऊन आपणास कर्बाम्ल व पाणी मिळतें.

लिग्नो पिशुलोस.—वर सांगितलेले पिशुलोसचे बरेच गुणधर्म याहि पिशुलोसमध्यें दिसून येतात. ह्यामध्यें पिशुलोसचा भाग शें. ८० ते ५० पर्यंत दिसून येतो, व इतर लिग्नोनभाग असतो. लिग्नोनची सारणी $क_{११} उ_{२२} प्र$ किंवा $क_{२६}उ_{३०}प्र_{१०}$ अशी असावी. कांहीं क्रियांच्या योगानें पिशुलोस व लिग्नोन निरनिराळे करतां येऊन लिग्नोनचे विद्रुत होणारे पदार्थ मिळतात. ह्या पिशुलोस हरयुक्त होत असतांना मिळालेले पदार्थ द्विगंधकितामध्यें विद्रुत होणारे असतात. नुसत्याच द्वि–गंधकिताची पिशुलोसवर क्रिया करून मिळालेले गंधकित पदार्थ पाण्यामध्यें विद्रुत होणारे असे असतात. या दुसऱ्या क्रियेचा उपयोग सकोन झाडांच्या पिशुलोसपासून कागद तयार करण्याकडे करतात. लिग्नोपिशुलोसे निलीन क्षाराशीं संयोगानें पिवळा रंग देतात. अद्युक्तपालाशअदिदांतील अद हें पिशुलोसमध्यें शोषलें गेल्याकारणानें पिंगट पिवळसर रंग मिळतो. वर सांगितलेले हरयुक्त पदार्थ व गंधकायितासह मिळणारे पदार्थ महत्त्वाचे आहेत. नत्राम्लाच्या योगानें लिग्नोपिशुलोसपासून लिग्नोन निराळे करतां येतात. लिग्नोनचें पूर्ण प्राणिदीकरण केलें असतां त्यापासून आपणांस काष्ठाम्ल, कर्बाम्ल, दार्वम्ल, पुत्तलिकाम्ल वगैरे अम्लें मिळतात. एकंदर क्रिया लक्ष्यांत घेतल्या असतां लिग्नोन पिशुलोसची सारणी ‘बेंझनाइड’ धर्तीवर आहे. क्युटो पिशुलोसचें अद्याप निर्णायक असें संशोधन झालें नाहीं.

पिशुलोसचा व्यापारी दृष्टया उपयोग —ह्या उपयोग त्यांच्या दोन गुणधर्मांवर अवलंबून असतो. ते गुणधर्म म्हणजे (१) रचना व (२) रासायनिक गुणधर्म; त्यांपैकीं पहिल्या गुणधर्मांचा उपयोग कागदांच्या वगैरे कारखान्यांतून होतो. रासायनिक गुणधर्मांच्या बाबतींत. त्याच्यावर हवा, पाणी वगैरे द्रव्यांची रासायनिक क्रिया होत नसल्यानें ते चांगल्या रीतीनें वापरतां येतात. सकोन झाडांच्या पिशुलोसपासून कागद तयार होत असल्याकारणानें ज्या ठिकाणीं अशा झाडांची निपज फार आहे त्या ठिकाणींच हे कारखाने जोरानें चालतात. पिशुलोस नत्रितांचा उपयोग स्फोटक द्रव्याकडे केला जातो. विद्युद्वाहक तारांना पिशुलोसदार्वित लावलें असतां विद्युद्विन्यस्त होतात. वर सांगितलेल्या मर्सरायझेशनच्या योगानें तंतूंस बरीच तकाकी

आणतां येते. पिशुलोसपासून खालील तीन प्रकारांनीं कृत्रिम रेशीम तयार करतां येतें.(१)पिशुलोस नत्रित हें इथ-अल्कोहलमध्यें विद्रुत करून तें कांचेच्या अगदीं बारीक नळीमधून कारंज्यासारखें पाण्यामध्यें किंवा हवेमध्यें सोडलें असतां मिळालेल्या घन पदार्थापासून बारीक बारीक धागे काढतां येतात. यापासून आपणांस पाहिजे त्या जाडीचा धागा तयार करतां येतो.(२)पिशुलोसच्या ताम्र अम्नद्रावापासून अशाच प्रकारानें हा द्राव अम्लामध्यें जोरानें गरगर फिरवून मिळालेल्या घन पदार्थांपासून निरनिराळ्या प्रकारचे धागे काढतां येतात. (३) पिशुलोस पितजिनिकाम्ल यास व्हिस्कोज असें म्हणतात. यापासून कृत्रिम रेशीम तयार करतां येतें. प्रथमतः हें अन्नामध्यें किंवा अम्लामध्यें ओतलें असतां मिळणारा पदार्थ हेंच कृत्रिम रेशीम होय. याचा आणखीहि उपयोग कागदपांजणीकडे, कागदास चोपडण्याकडे, धागे विणण्याजोगे करण्याकरितां, पुस्तकास लागणारें कापड व निरनिराळ्या रचना असलेले घन तयार करण्याकडे करतात.

**पिसा**—इटलीमध्यें याच नांवाच्या प्रांताच्या राजधानीचें शहर. हें फ्लॉरेन्सच्या पश्चिमेस रेल्वेनें ४९ मैल आहे. या शहराची लोकसंख्या १९१५ सालीं ६७२८५ होती.या शहराभोंवतीं ६। मैल घेराचा जुना तट आहे.येथील इमारती आणि सडका फार चांगल्या आहेत. येथील सेन्टस्टीफन नांवाचें प्रार्थनामंदिर १५६२ सालीं बांधलें. या शहरांत खुद्द बादशहा आणि बिशप यांचे भव्य वाडे असून सेन्टस्टीफनचा संगमरवरी दगडांचा वाडा आहे. येथें एक विद्यापीठ, रुग्णालय आणि मोठमोठीं दुकानें आहेत. या शहरांत एक कलाभुवन असून त्यांत चित्रांचीं दालनें आहेत.

टस्कनीच्या मार्किसच्या कारकीर्दीत हें शहर भरभराटीस आलें. नंतर १३ व्या शतकांत वरेंच खालावलें. पण गॅलिलिओनें त्याला पुन्हां प्रसिद्धीस आणिलें. येथील सुप्रसिद्ध झुकता मनोरा इ. स. ११७४ त बांधलेला आहे.

**पिसिडिया**—आशियामायनरच्या दक्षिणेस असलेल्या देशाचें नांव. याच्या दक्षिणेस पॅम्फिलिया; उत्तरेस फ्रिजिया; पूर्वेस लिकाओनिया, इसोरिया, व सिलिशिया; व पश्चिमेस व नैर्ऋत्येस लिसिया व फ्रिजियाचा कांहीं भाग आहे. प्राचीनकाळीं ह्या देशांत रानटी व कायद्यास न जुमानणारे असे डोंगरी लोक रहात असत. शिकंदर बादशाहाच्या अगतीला ह्या लोकांनीं चांगलाच विरोध केला होता.नंतर हे लोक रोमन सत्तेखालीं गेले.

पिसिडिया म्हणजे उंच असें पठार असून त्यांत बेशहेर (प्राचीन कॅरालीस) व एगरेडीरगेल (प्राचीन लिम्नाई) अशीं दोन सरोवरें होतीं. सेस्त्रुस व युरीमेदन ह्या दोन नद्या होत्या. पिसिडियांत कांहीं प्रसिद्ध शहरें होतीं. त्यांचीं नांवें:—टर्मेसस, क्रेम्ना, सॅगेलेसस, व अँटिओक. सध्यां इस्वर्ती शहर प्रसिद्ध असून, येथें पाशा राहतो. पिसिडियन लोक कोणत्या वंशाचे व जातीचे असावेत ह्याची अद्यापि माहिती लागली नाहीं.

**पिस्ता**—हें छोटें झाड सीरिया, दमास्कस, मेसापोटेमिया, टेरेक, ओर्फा, व खोरासान प्रांतांत ३००० फूट व त्याच्याहूनहि जास्त उंचीच्या प्रदेशांत होतें. या झाडापासून समामस्तकीच्या झाडासारखा चीक निघतो. पानांनां बहुतकरून गांठी येतात. या गांठी,फळाची साल, व फळें नसलेला बीजकोश यांचा रेशीम रंगविण्याकडे उपयोग करतात. इराण, तुर्कस्तान, व हिंदुस्थान या देशांत यांची निर्गत होते. या झाडांच्या फळांनां पिस्ते असें म्हणतात. तीं अंडाकृति असून, ज्या मानानें झाडांची लागवड झाली असेल त्यामानानें या फळांचा आकार असतो. हीं फळें अफगाणिस्तानांतून मोठ्या प्रमाणांत हिंदुस्थान, इराण व तुर्कस्तान या देशांत जातात. हिंदुस्थानांत श्रीमान लोकांचें हें खाद्य आहे. यांत थोडेंसें मीठ घालून लोण्यांत तळतात व गरम असतांनाच खातात. मेवामिठाई व आईस्क्रीम यांत पिस्ते घालतात. पिस्त्यांत शेंकडा ६० प्रमाणांत तेल असतें. औषधोपयोगासाठीं म्हणून तें काढून घेतात.

**पिस्तुल**—हें स्फोटक हत्यारां( फायरआर्म )पैकीं आहे. तोफा, बंदुकांपेक्षां पिस्तुल (सर्वांत लहान), तावडतोब कामीं येणारें, लगतच्या शत्रूपासून स्वतःचें संरक्षण करणारें व एका हातानें वापरतां येणारें हत्यार आहे. हें हत्यार मूळ इटालींतील पिस्टोइआ नांवाच्या गांवीं कॅमिनेलो व्हिटेली या इसमानें तयार केलें ( १५४० अदमासें ); म्हणून याला पिस्तुल हें नांव पडलें असें मानतात. १६–१७व्या शतकांत एडिन्बरा येथें सुंदर रुपेरी पिस्तुलें होत असत व तीं हायलँडर लोक वापरीत. यूरोपांतील द्वंद्वयुद्धाच्या प्रघातामुळें पिस्तुलांनां मोठें महत्त्व आहे. रिव्हाल्व्हर ही पिस्तुलाच्या पुढील पायरी आहे, म्हणजे पिस्तुल एक किंवा दोन बार असतें तर रिव्हाल्व्हरमधून काडतुसांच्या योगानें एकामागून एक पटापट पुष्कळ बार उडवितां येतात. त्यामुळें अलीकडे पिस्तुल मागें पडून रिव्हाल्व्हर प्रचारांत आलें. तथापि अगदीं अलीकडे 'ऑटोमॅटिक पिस्तुल'ची युक्ति निघाली असून त्यामुळें रिव्हाल्व्हर मागें पडतील असें तज्ज्ञांचें मत आहे. कारण आटोमॅटिक पिस्तुलांनीं अधिक दूर अंतरावरचा नेम मारतां येतो व त्यांची गतीहि अधिक असते. तथापि या पिस्तुलांची यांत्रिक रचना अधिक गुंतागुंतीची व बोजड असल्यामुळें हीं एका हातानें झाडण्यास व नेहमीं गुप्तपणें स्वतःबरोबर बाळगण्यास सोयीचीं नाहींत. म्हणून रिव्हाल्व्हरच अधिक सोयीचा होय.

**पीठापुरम्, इस्टेट**.—मद्रास, गोदावरी जिल्ह्यांतील जमीनदारी इस्टेट. क्षेत्रफळ ३८३ चौरस मैल. या जमीनदारीचा बराच भाग कोकोनाडा तहशिलीमध्यें मोडतो. हींत १६८ खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९०१ ) २८०३१७. पीठापुरम् इस्टेटीचा इतिहास फार जुना आहे. सन १५७२

मध्यें गोंवळकोंड्याचे सुलतान पीठापुरम्‌वर सत्ता चालवीत होते. नंतर १६४७ सालीं राऊचंद्ररायनम्‌ याच्याकडे पीठापुरम्‌चा अधिकार आला. नंतर सन १७२४ पर्यंत विशेष असें कांहीं घडलें नाहीं. तोंपर्यंत पीठापुरम्‌ कोणालाहि खंडणी देत नव्हतें. अखेर असंफजहा, निजामुल्मुल्क यानें पीठापुरम्‌पासून खंडणी घेतली. सरलष्कर रुस्तुमखान याचा अंमल फार कडक होता. त्याच्या मृत्यूनंतर ( सन १७४२ मध्यें) पीठापुरम्‌ पुन्हां पूर्व स्थितीवर आलें. इंग्रज आणि फ्रेंच यांच्या धामधुमींत पीटापुरम्‌ फारसें पडलें नाहीं. स. १८०२ पर्यंत इस्टेटीची व्यवस्था उत्तम प्रकारें होती. ही जमीनदारी फार सुपीक आहे. गोदावरी नदीचे कालवे असून तलावहि आहेत. उत्पन्नाच्या सोई अनेक आहेत. मुख्य पीक तांदूळ हें असून तूर, हरभरा, जवस, तीळ वगैरे धान्यें विपुल पिकतात. इस्टेटीचें उत्पन्न ९॥ लक्षपर्यंत वाढलें आहे. जमीनदारीमध्यें कोकोनाडा, सामलकोट व पीठापुरम्‌ अशीं मुख्य ३ शहरें आहेत.

तह शी ल.-मद्रास, गोदावरी जिल्ह्यांतील एक जमीनदारी तहशील. क्षेत्रफळ १९३ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) ९२५६६. तहशिलींत कालवा आहे व पीठापुरम्‌ हें एकच शहर असून त्याची लोकसंख्या १५ हजार आहे. येथें यात्रा भरते व भांडी वगैरे तयार होतात. येथील देवळांत एक शिलालेख आहे.

**पीतज्वर**—कांहीं विवक्षित प्रदेशांत आढळून येणारा हा सांथीचा, थोडे दिवस टिकणारा ज्वर असून त्यांत अंग पिंवळसर दिसणें, जठर व आंतडीं यांच्या ठिकाणीं दाहक्रियेमुळें विकार होणें, अलब्युमिनमेह व मूत्राघात म्हणजे मूत्र बंद होणें हीं प्रमुख लक्षणें असतात. उत्तर व दक्षिण अमेरिका आणि पश्चिम आफ्रिकेचा किनारा या ठिकाणीं हा रोग प्रचलित असून यूरोपियन वैद्यांनां त्याचा शोध १६४७ सालीं लागला. वरील प्रदेश ४८° अक्षांश आणि ३५° अक्षांशांच्या दरम्यान आहेत व हा रोग बहुधा येथेंच आढळतो. पण क्वचित्‌ काळीं तो अन्य देशांतहि जातो. उदाहरणार्थ, इंग्लंडांत स्वानसी येथें १८६५ त ही सांथ आली होती. पण अन्य ठिकाणीं ही सांथ फार टिकून रहात नाहीं. वरील देशांत समुद्रालगतच्या प्रांतांतील शहरांतील विशेष गर्दी व गलिच्छतेच्या वस्तींत हा ज्वर आढळतो. बहुतकरून समुद्रसपाटीवर—निदान त्याहून एक हजार ते दोन हजार फुटापेक्षां अधिक उंचावर नाहीं अशा ठिकाणीं—हा रोग असतो. पण अपवादात्मक थोडीं उदाहरणें ११ व १४ हजार फूट उंचीवरील शहरांतहि घडलेलीं आहेत. हवेचें ७०° ते ७२° उष्णमान या सांथीस अनुकूल आहे. तथापि ६५° वर पारा असतांहि सांथ आलेली आहे. कडक उन्हाळा, मेपासून आगष्ट महिन्यांची गरम हवा व अति थंड वर्फमय हवेमुळें सांथ थांबते. सर्व प्रकारच्या स्त्री, पुरुष, मुलें वगैरे लोकांनां हा ज्वर येतो. पण त्यांतल्या त्यांत मुलांपेक्षां मोठ्या माणसांनांच विशेषेंकरून जास्त येतो. तद्देशीय काळ्या शिद्दी लोकांनां ही सांथ अगदींच पछाडीत नाहीं असें नाहीं; केव्हां केव्हां त्या जातींत सांथीचा खूप जोर दिसला तरी एकंदरीनें बहुधा त्या लोकांमध्यें ही सांथ जरा सौम्यच असते. ही नैसर्गिक प्रतिबंधनशक्ति, जाति व वर्णविशिष्टत्वामुळें आलेली नसून तो रोग कायमच रहिल्यानें व त्याच्या दीर्घ सान्निध्यानें त्या लोकांनां आलेली आहे असें येथील अनुभविक डॉक्टरांचें मत आहे. एकदां ज्वर येऊन गेल्यावर त्याच माणसास बहुधा पुन्हां तो ज्वर येत नाहीं. ज्याप्रमाणें हिंवताप व निद्रारोग विषारी डांसांच्या दंशामुळें मनुष्याच्या शरीरांत प्रवेश करतो त्याचप्रमाणें या ज्वराचा विषारी डांस असून तो शहरांत आढळतो व ओल, दलदल, घाणेरीं डबकीं यांत त्याची वाढ न होतां त्याची वाढ स्वच्छ पाण्यांत होते. तळीं, पिंपें, जुन्या उघडया वाटल्या, डबे, झाडांच्या कुंडया इत्यादींत पाणी सांठून तेथें याची वाढ होते. या डांसाच्या जातीस व्याघ्रमशक म्हणतात. या रोगाचे प्राणिज जंतू दोन प्रकारचे शोधून काढले, परंतु स. १९१५ सालीं इंग्रज सरकारनें पीतज्वरसंशोधक कमिशन नेमलें होतें. त्याच्या मतें वरील जंतू हें ज्वराचें कारण नसून खऱ्या रोगजंतूंचा अद्याप शोध लागला नाहीं.

ल क्ष णें.—ज्वर सुमारें पांच दिवस सुप्तावस्थेंमध्यें असतो, म्हणजे विषारी डांसाचा दंश झाल्यापासून सुमारें पांचव्या दिवशीं, कधीं सावकाशपणें मरगळ येऊन, तर कधीं एकाएकीं डोकें दुखून व अंग मोडून येऊन बारीक अगर मोठी थंडी वाजून येऊन बराच ज्वर येतो व तो दोन दिवसांत १०५° अगर त्याहून जास्त होतो. कपाळ, कमर व सांधे मनस्वी दुखतात, तापाच्या मानानें नाडीचा वेग १०० ते १२० हून अधिक वाढत नाहीं. जिभेच्या कडा लाल असून जिभेवर चिकट, दाट व पांढरी बुरशी येते, पोटांत दाबल्यास व आपोआप देखील थोडें दुखतें; मळमळणें, कोरडी ओकारी व वांती हीं लक्षणें असतात. ज्वराच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीं डोळ्यांस पिंवळेपणा येऊन नंतर सर्वांगभर कावीळ पसरते. युरिआ व युरिक ॲसिडचें प्रमाण फार कमी असलेली अशी थोडी लघवी होते व तींत दुसऱ्या-तिसऱ्या दिवसापासून अल्ब्यूमिन सांपडू लागतें व नंतर लघवींत पित्तक्षार व पिंवळा रंग येतो. चौथ्या दिवशीं ज्वर बराच कमी होऊन इतर लक्षणें व वेदना कमी होतात व बहुधा येथपासून रोगास उतार पडत जाऊन कावीळ, लघवींतील अल्ब्यूमिन, वगैरे लक्षणें हळू हळू कमी होऊन दोन तीन आठवड्यांत रोगी बरा होतो. परंतु असें नेहमीं न होतां पुष्कळ रोग्यांमध्यें पहिलींच तीव्र लक्षणें व वेदना व ज्वर तसाच चालू राहून अगर कमी झालेला ज्वर पुनः वाढून १०३° अगर १०४° पर्यंत पुनः चढतो. नाडीचा वेग मात्र वाढत नाहीं, परंतु लक्षणें जास्त तीव्र व भयंकर होत चाललीं तर नाडीचा वेग पूर्वीहून सावकाश होतो. हें लक्षण एका शोधक डॉक्टरानें

नजरेस आणलें आहे. काविळ जाऊन त्वचेवर फुटल्याप्रमाणें लाल डाग दिसतात. लघवी आणखी कमी होऊन तींतील अलब्यूमिनचें प्रमाण वाढतें व तींत मूत्रपिंडांतील कोंडा वाहून येतो; युरिआक्षार कमी होतो व नंतर कांहीं दिवस लघवीची उत्पत्ति बंद होते. ओकारी वाहून तींत प्रथम अन्न, नंतर पित्तमिश्रित व नंतर काळें रक्तमिश्रित अशी काळी वांती होते व तीस, कॉफी शिजविल्यावर खालीं गाळ रहातो तसा रंग येतो. या वांतीच्या अगोदर केव्हां केव्हां तार असलेल्या चिकट पाण्यासारखी वांती होते. काळी वांती होऊं लागली म्हणजे रक्तमिश्रित काळी मलशुद्धि होते. नाक, तोंड, हिरड्या यांतून रक्तस्राव होतो. जिभेची टुरशी पार नाहींशी होऊन ती काळी, पिंगट, सोललेली, वर कीट कोंडा व खपल्या जमलेली दिसते. वात होऊन रोगी बडबडूं लागतो व शक्तिपातामुळें ग्लानि, गुंगी, बेशुद्धि येऊन रोगी मरतो. सांथीच्या सौम्यतेच्या अगर तीव्रतेच्या मानानें मरणाऱ्या रोग्यांचें शेकडा प्रमाण ५ पासून ७५ असतें. अति कडक ज्वर येऊन आरंभापासून थोड्या तासांत रोगी मेल्याचीं कांहीं उदाहरणें घडतात; पण बहुधा प्रास्ताविक ताप कमी झाल्यावर शक्तिपात, विपुल रक्तस्राव, बेशुद्धि, मूत्रपिंडाची लघवी उत्पन्न करण्याची शक्ति नाहींशी होणें या कारणांमुळें मृत्यु येतो. मृत्यूनंतर लागलीच पाहिलें तर ज्वर १०८° ते ११०° पर्यंत असल्याचें आढळतें.

रोगामुळें शरीरांत होणारे फरकः—मृत रोग्याच्या यकृतांत रुधिर कमी असून त्यांत वसावृद्धि फाजील होते. जठरांत दाह, लाली, सूज व जठर, फुप्फुस व फुप्फुसावरणामध्यें रक्तस्राव; हृदयस्नायूंत फिकटपणा व पिवळट पिंगटपणा, वसावृद्धि, रक्तस्राव व तशीच स्थिती मूत्रपिंडांची होते. प्लीहेंत विकृति, हिंवतापांत होते तशी होत नाहीं हा चमत्कार आहे. रक्तांतील लाल रंग कमी होतो पण त्यांत युरिआक्षाराचें फाजील प्रमाण होतें. पांढरे रोगरक्षक रक्तांतील पेशी कमी होतात. रोगनिदान करण्यास सांथ असली म्हणजे अडचण पडत नाहीं. आरंभीं सांथ नसली म्हणजे हा फुप्फुसदाहरोग अगर देवीचा ज्वर आहे की काय असें वाटण्याचा संभव आहे. नंतर तो हिंवताप आहे कीं, काय असेंहि वाटणें साहाजिक आहे. हिंवतापांत पाणथरी मोठी होते, तापाचा कमी जास्त होण्याचा अगर साफ निघण्याचा ठराविक क्रम असतो व ताप नसला म्हणजे रोगी आजारी देखील दिसत नाहीं, हिंवताप येऊन गेला तरी तो पुन्हां येणें संभवनीय असतें, तसें या ज्वराचें नसतें. हा 'सप्तदिन पुनरावर्ती' ज्वर आहे काय असें काविळीमुळें वाटणें बरोबर आहे. पण त्यांत पाणथरी वाढते. ज्वर येऊन गेल्यावर सात दिवसपर्यंत पुन्हां ताप उलटेपर्यंत रोगी चांगला बरा असतो तसें या ज्वराचें नसतें. यकृताच्या पीताकुंचनरोगास काविळीनेंच आरंभ अति सावकाशपणें होतो, तसा या ज्वरांत होत नाहीं.

उपचार.—ज्वरशमनाच्या कामीं क्विनाइनचा उपयोग हिंवतापांत होतो तसा येथें होत नाहीं; ताप उतरल्यावर पौष्टिक औषध म्हणून तें उपयोगी पडतें. आरंभीं रोग्यास रेचक औषध द्यावें; अगर बस्ती देऊन कोठा साफ करावा व नंतर सौम्य क्षारयुक्त मल-मूत्र-स्वेदोत्सर्जक औषधें द्यावींत. ज्वर मोठा असल्यास सर्वांग थंडगार पाण्याच्या बोळ्यानें वरच्यावर चोळावें अगर अशा प्रकारचे शीत उपचार करावे, वांतीशमनार्थ बर्फाचे बारीक तुकडे चघळण्यास द्यावे किंवा पोटांत क्लोरोडाइन अगर मार्फिया किंवा चुन्याची निवळ देतात. ऊन पाण्यांत बसणें व वाफारा अशा उपायांनीं मूत्रपिंडाची क्रिया जागृत ठेवतात. खाण्यास पातळ पदार्थ थोडे पण वरचेवर द्यावे. अल्कोहोल नामक ब्रांडी (पुष्कळ पाणी घालून) अगर शांपेन हा मद्यार्क देण्याची जरूरी लागणें साहजिक आहे. त्यामुळें ग्लानि व शक्तिपात टळतो. वांति. लघवी बंद होणें ही वाईट लक्षणें टाळण्यासाठीं पुढील पुष्कळदां अनुभव घेतलेलें मिश्रण दिल्यानें पुष्कळ रोगी बरे झाले आहेतः—चाळीस औंस स्वच्छ पाण्यांत १५० ग्रेन सोडाबाय कार्बोनेट व $\frac{1}{3}$ ग्रेन रसकापूर विरघळवून तें मिश्रण दर तासातासानें बर्फाच्या पाण्याइतकें थंड करून द्यावें. प्रतिबंधक उपायः—हिंवतापाप्रमाणें शक्य त्या विविध साधनांनीं डांस कमी व नाहींसे करून त्यांचे माणसांना दंश न होतीलसें करावें. म्हणजे गंधक, फार्मालीन, कापूर, कॅर्बालिकॲसिड, चंदन वगैरे पदार्थ जाळून त्यांच्या धुरानें डांस जातील असें करावें. याचा उपयोग अमेरिकन शहरांत उत्तम झाला. निजतांना निरोग्यांनीं मच्छरदाण्या वापराव्या, देशांत माणसें पांच दिवस क्वारंटाईनमध्यें वेगळीं ठेवावीं व रोग्याची वर्दी आरोग्यखात्यांत द्यावी. पूर्वी ताप येऊन गेला असल्यास त्या देशांत माणसास वेगळें टेवूं नये. ज्वराच्या पहिल्या तीन दिवसांत डांस रोग्यास चावून ते डांस नंतर दहा दिवसांनीं पूर्ण विकारी बनून निरोगी माणसांत दंश करून ज्वर पसरवितात. व त्यांच्यांत ही शक्ति कित्येक आठवडेपर्यंत टिकून असते.

**पीताम्ल**—ह्या अम्लाच्या ताम्राच्या क्षाराचा रंग पिवळा असल्याकारणानें यास पीताम्ल म्हणतात. ह्या अम्लाचे क्षार अल्कोहलितावर कर्बद्वि-गंधकिदाची क्रिया केली असतां मिळतात. या अम्लाच्या पालाशक्षारावर क्षीण गंधकाम्लाची क्रिया केल्यास पीताम्ल मिळतें. हें एक रंगहीन तेल असून २५° उष्णतेस कर्ब-द्वि-गंधकिद व अल्कोहलमध्यें विघटित होतें. ह्याचा पालाशक्षार, निर्जल अल्कोहलमधील दाहक पालाश कर्ब-द्वि-गंधकिदासह हलविला असतां मिळतो. पालाश पीतिनाचा उपयोग निळ्या रंगांत छपाई करण्यास करतात. हें वनस्पतीवर पडणाऱ्या उवांसारख्या किड्यांस प्रतिबंधक म्हणून वापरतात. याचें संयुक्त इथ्र बनविण्याच्या कृतीचा उपयोग टरपेन तयार करण्याकरितां करतात.

**पुकेट**—पुकेट हें मलायाद्वीपकल्पाच्या पश्चिम किनाऱ्यावर सयामचें बंदर असून त्याच नांवाच्या सयामच्या प्रांताचें हें मुख्य ठिकाण व कमिशनरची रहाण्याची जागा आहे. या शहराच्या खालीं व आसपास कथिल सांपडतें व प्राचीन काळापासून चिनी लोक तें काढीत आहेत. १६ व्या शतकापासून येथें यूरोपीयन व्यापारी रहातात. येथील लोकसंख्या सुमारें ३० हजार आहे.

**पुंगनूरु**, तहशील व जमीनदारी.—मद्रास, उत्तर अर्काट जिल्हा. लोकसंख्या (१९०१)९६८५२.या जमीनदारींत खेड्यांची संख्या५६४असून तहशिलीचें मुख्य ठिकाण पुंगनूरु. ( लो. सं. सु. ६३५३. ) येथें जमीनदाराचा वाडा व पदार्थसंग्रहालय आहे. एकंदर उत्पन्न ८१००० रु. आहे. येथें शिकार पुष्कळ सांपडते. सन १८३२ त मालक जमीनदार मरण पावला. त्यास संतान नव्हतें म्हणून वारसाबद्दल तंटा उत्पन्न झाला. १८६१ सालीं सरकारनें कायमची सनद देऊन निकाल केला. जमीनदार लिंगायत पंथाचे आहेत.

जमीनदार.—या घराण्याचा मूळपुरुष सितप्पा गौनिवारु हा होय. यानें तेराव्या शतकामध्यें प्रथम या प्रांतांत वास्तव्य करून बरीच जमीन मिळविली. स. १२४९ मध्यें यानें पुंगनूर हा किल्ला बांधला व गांव वसविलें स. १४७९ मध्यें या घराण्यांतील पुरुष तिम्मप्पा गौनिवारु यानें कोलार हा किल्ला बांधला व गांव वसविलें. यानंतर याचा पुत्र इम्मदि तिम्मप्पा यानें विजयानगरचा कृष्णदेवराय याच्या बाजूनें आदिलशाही मुसुलमानाशीं युद्ध केलें. यानें इ. स.१५१० मध्यें आणखी तीन किल्ले बांधले. याचा मुलगा चिक्कराय तिम्मया या नांवाचा होता. विजयानगरकर याचा फार बहुमान ठेवीत असत. यानें पुष्कळ मुलुख मिळविला व पुंगनूरुचा किल्ला बांधला. याचा मुलगा चिक्करायवस हा लहानपणीं गादीवर बसला. याच्यावर इ. स. १६३९ मध्यें मुसुलमानांनीं स्वारी करून त्याचा बराचसा प्रदेश घेतला. परंतु बाकीच्या प्रदेशावर त्यांनीं यालाच जमीनदार नेमून सनद दिली. याचा मुलगा वीर चिक्कराय यास मुसुलमानांनीं चांगल्या तऱ्हेनें वागविलें. परंतु याच्या नंतरचा जमीनदार इम्मदि चिक्कराय याजपासून त्यांनीं खंडणीच्या बाकीबद्दल बराचसा प्रदेश घेतला. याच्या मुलानें कडाप्पाच्या नवाबाच्या बाजूनें मराठ्यांशीं युद्ध केलें त्यांत तो मारला गेला ( १७५७ ). यावेळीं मराठ्यांस जय मिळून जमीनदारी त्यांच्या ताब्यांत गेली. पुढें १७७५ सालीं ती हैदरअल्ली याच्या हातांत आली. नंतर येथील जमीनदार मराठ्यांशीं हैदराच्या बाजूनें लढत असतां लढाईंत पडला ( १७८० ). त्याचा पुत्र तो खंडणी देण्यास असमर्थ असल्यामुळें पळून इंग्रजांच्या पक्षास मिळाला व त्यानें टिप्पूविरुद्ध झालेल्या युद्धांत इंग्रजांस फार मदत केली. टिप्पूच्या मरणानंतर या जमीनदारास व याच्या वंशजांस ही जमीनदारी मिळाली. परंतु हल्लीं त्यांच्याकडे ती फक्त इजाऱ्यादाखल चालत आहे. [ डिर्के ० साऊथ इंडिया; नॉर्थ अर्काट डिस्ट्रिक्ट म्यॅनुअल. ]

**पुंड्र देश**—पूर्व बंगालमधील एक जुनें राष्ट्र. ऐतरेय ब्राह्मणांत याचा जातिवाचक उल्लेख आहे. ( ज्ञानकोश, विभाग ३, पृष्ठ ३६९ पहा ). याच्या ईशान्येस प्राग्ज्योतिप अथवा कामरूप व पश्चिमेस महानंदा नदीः पूर्वेस करतोया नदी व दक्षिणेस बंगाल ( वंग )आहे. या प्रदेशांत सध्यां रंगपूर, दिनाजपूर, पूराणिया, माल्दा, राजशाही, बोग्रा आणि पबना हे जिल्हे येतात. राजधानीचें मुख्य ठिकाण महास्थान होतें. ख्रि. पू. तिसऱ्या शतकांत हें राष्ट्र अस्तित्वांत होतें. श्रीकृष्णाच्या वेळीं पुंड्र देशांत पौड्रक वासुदेव नावाचा राजा होता असें (भारत स.प. अ. ३० ) म्हटलें आहे. अशोक राजाचा भाऊ महिंद्र भिक्षु होऊन याच ठिकाणीं राहत असे. सातव्या शतकांत हें चांगल्या स्थितींत होतें असें ह्युएनत्संग म्हणतो. त्यानंतर आठव्या शतकांत तर तें एक बलिष्ठ राज्य होतें. बृहत्संहितेंत या देशांत हिरे सांपडत असें म्हटलें आहे. भविष्यपुराणांत या देशाचे पुढील सात विभाग केले आहेत, व त्यांचें वर्णन दिलें आहे गौड, वरेंद्र, नुंभाजवळचा निवृत्ति, नारीखंड, वराहभूमि, वर्धमान व विंध्यपार्श्व इत्यादि [ बृहत्सं. अध्याय ५, ९, १०, ११ व १६; इं. अॅ. पु. २०, पृ. ४१८–२१. ]

**पुणतांबें**—मुंबई, अहमदनगर जिल्ह्यांत कोपरगांव तालुक्यांतील एक गांव. हें गोदावरीच्या कांठीं असून धोंड-मनमाड रेल्वेवर स्टेशन आहे. हें कोपरगांवच्या आग्नेयीस १२ मैलांवर आहे.लोकसंख्या५८९०; येथील व्यापारी मारवाडी व ब्राह्मण आहेत. पुणतांब्यास १४ मोठीं देवळें आहेत. गंगेला दोन घाट आहेत; एक अहिल्याबाई होळकरणीनें बांधलेला असून दुसरा शिवराम दुमालू याचा आहे. या ठिकाणीं चांगदेवाची समाधि आहे.

**पुणें**, जिल्हा.—मुंबई इलाखा. क्षेत्रफळ ५३५० चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ). १००९०३४. याच्या उत्तरेस नगर जिल्हा ;पूर्वेस नगर व सोलापूर जिल्हे; दक्षिणेस नीरा नदी आणि फलटण व भोर संस्थानें; आणि पश्चिमेस कुलाबा, ठाणें व भोर संस्थान आहे.

नद्या व घाटः—पश्चिमेस बहुतेक सह्याद्रीची रांग आहे. त्यांतून कोंकण व देश यांच्यामध्यें पुष्कळ घाट आहेत; त्यांपैकीं नाणेघाट; पोखरीचा, केंदूरचा, कात्रजचा, बाबदेवचा, दिव्याचा व बोरघाट हे मुख्य आहेत. बोरघाटामधून बैलगाडी व आगगाडी जाण्या-येण्याचे रस्ते बोगदे कोरून केलेले आहेत. बोरघाट हा ख्रि. पू १०० ते इ. स. ३०० पर्यंत विशेष रहदारीचा रस्ता होता. घाटामधून बऱ्याच लहान लहान नद्या वाहतात.घोड, भीमा, भामा, वेळ,पवना, कऱ्हा, नीरा, इंद्रायणी, मुळा, मुठा, वगैरे लहानमोठ्या नद्या पश्चिमेकडील घाटांत उगम पावतात. आणि बहुतेक सर्व

भोमेस मिळतात. पुणें शहराला पाण्याचा पुरवठा खडकवासला तलावापासून मुख्यत्वेंकरून होतो.

किल्लेः—हरिश्चंद्रगड, शिवनेरी, नारायणगड, लोहगड, विसापूर, सिंहगड, पुरंदर, मल्हारगड व वज्रगड, हे आहेत. दक्षिणेस, पर्वत व उत्तरेसहि पर्वत आणि वरघांट, मध्यभागीं पुणें, आसपास घाट व त्यांतून निघणाऱ्या नद्या, नाले यामुळें एकंदर जिल्ह्याला व विशेषेंकरून पुणें शहराला विशेष नैसर्गिक सौंदर्य आलेलें आहे.

जमीन व मावळेः—दक्षिणोत्तर प्रदेशाचा पश्चिम भाग डोंगराळ व उंचवटयावर असून त्यांत खोल खिंडी आहेत. त्याच्या तळाशीं पुष्कळ जमीन सपाट व सुपीक आहे. या खिंडीनां त्यांतून वाहणाऱ्या नद्यांवरून किंवा गांवांवरून नांवें पडलीं आहेत. उत्तरेकडे त्यास नेर म्हणतात; उदा० घोडनेर, मीमनेर, भामनेर; मध्यभागीं त्यांनां मावळ म्हणतात; उदा० नाणेंमावळ; दक्षिणेकडे त्यांस खोरें म्हणतात; उदा० पौड खोरें, मुसाखोरें. पूर्व-पश्चिम प्रांत सपाट आहे.

पीकः—सह्याद्रीच्या उंचवटयावरून नद्यांबरोबर खालीं गाळ येतो व तो खोऱ्यांत बसतो. त्यामुळें हीं खोरीं सुपीक आहेत त्यांत उत्तम भात व थोडें कडधान्य होतें. उत्तरेकडील सर्व भाग बागाईत आहे. यांतील घाटांत वनस्पती असंख्य आहेत. जिल्ह्याच्या कांहीं भागांत बागबगीचे आहेत. कांहीं तालुके डोंगराळ असल्यानें जेथें नेहमीं दुष्काळाची भीति असते तेथें कालवे काढले आहेत. आंबे, जांभळें, पेरू, कागदी लिंबें, संत्रीं, केळीं, अंजीर, द्राक्षें, डाळिंबें वगैरे फळें बरींच पिकतात. गहूं, हरभरा, ज्वारी, मूग, मटकी, हीं धान्यें होतात बागाइतींत ऊंस, भुईमुग, बटाटे, कांदे, विडयाचींपानें वगैरे होतात.

वाघ, चित्ते व अस्वलें या वन्यपशूंची संख्या कमी आहे. मात्र हरणें व सांबर आढळतात. समुद्रसपाटीपासून पुणें भाग १८०० फूट उंच आहे. उष्णमान नवंबर महिन्यांत ४८° आणि मे महिन्यांत १०८° वर असतें. जुन्नर, खेड, हवेली आणि मावळ तालुक्यांत पाऊस जास्त असतो. मधील पट्टयांत कमी असून लोणावळे–१८५ इंच व पूर्वेकडे सरासरी २० इंच असतो.

उत्पन्नः—लहानमोठे तलाव आहेत, दोन मोठे कालवे एक मुठेचा व दुसरा नीरेचा; मुठेच्या कालव्याचे दोन फांटे आहेत. पुणें शहरानवळून जातो तो १८ मैल लांब आहे. नीरेच्या कालव्याचेहि फांटे काढले आहेत. भाटघर गांवीं बांधलेल्या तलावांतून कालवा काढला आहे. त्याची लांबी १०३ मैल आहे. या कालव्यामुळें हवेली पुरंदर, भिमथडी व इंदापूर या तालुक्यांत बागाईत वाढलें;गूळ मोठ्या प्रमाणांत होऊं लागला. या जिल्ह्यांत ३७ ठिकाणीं लुगडीं व जाडेंभरडें कापड निघतें. जुन्नरास सुडाचे कागद होतात. पुण्यास तांब्यापितळेचीं भांडीं, रेशमी व सुती लुगडीं विणणें, जरीचें कापड, कलावतू, बांगडया, हस्तिदंती फण्या, मातीचीं चित्रें, फीत विणणें, धुरणूस, येरवडा तुरुंगांतील कापड वगैरे जिन्नस तयार होतात. मुंढवें येथें कागदाची गिरणी आहे (हल्लीं [सन१९२५] बंद). मुख्य भाषा मराठी. शेतकी हा मुख्य धंदा. जमीन मोजणींत प्रथम हेमाडपंती,नंतर मलिकंबरी, मग दादाजी कोंडदेवाची, पुढें नाना फडणविसाची व शेवटीं इंग्रजांची इतके प्रकार झाले.

राज्यव्यवस्थाः—जिल्ह्यांत जुन्नर, खेड, मावळ, हवेली, शिरूर, पुरंदर, भिमथडी व इंदापूर हे ८ तालुके व आंबेगांव, मुळशी, दौंड, हे ३ पेटे आहेत. पुणें येथें कलेक्टर, डिस्ट्रिक्ट जज्ज वगैरे जिल्ह्याचे अधिकारी आहेत. पुणें, वडगांव, तळेगांव ढमढेरे, जुन्नर, खेड, सासवड येथें मुन्सफ कोर्टें आहेत. खडकी, घोरपडी व वानवडी येथें लष्करी छावण्या आहेत. जिल्ह्यांत म्युनिसिपालिटया ११.जिल्हाबोर्ड, व ८ तालुकालोकलबोर्डें आहेत. एकंदर गांवें ११८९ आहेत.

इतिहासः—पुण्याचा इतिहास महाराष्ट्राच्या इतिहासांत मोडतो. येथें अगदीं त्रोटक सारांश देतों. या जिल्ह्यांत जुन्नर हें ठिकाण फार प्राचीन आहे. येथें ज्या ज्या राजांचा अम्मल झाला त्यांचीं नांवें पुढील प्रमाणेंः आंध्रभृत्य (खि. पू. १ ल्या शतकापर्यंत); प्राचीन व पश्चिम चालुक्य (इ. स. ७६० पर्यंत); राष्ट्रकूट (९७३ पर्यंत); देवगिरीकर यादव (१२९५ पर्यंत); मुसुलमान (१६०० पर्यंत); मराठे (१८१८ पर्यंत), व सांप्रत इंग्रज.

मांजरी व वोपुडी येथें सरकारी शेतें व खडकीस दूध दुभतें कारखाना (डेअरी) आहे व्यापाऱ्यांत ब्राह्मण, गुजराथी मारवाडी, वोहरी, पारशी यांचा भरणा आहे. लोकसंख्येत मराठे हे शेंकडा ३४, ब्राह्मण ६, मुसुलमान .०४, व खिस्ती .००७, व बाकीचे इतर जातीचे म्हणजे हिंदु वगैरे आहेत. शेंकडा ७.५ लोक साक्षर आहेत. पुणें येथें बरींच कॉलेजें व दुय्यम व प्राथमिक शिक्षणाच्या शाळा आहेत. बोरघाट व नाणेंघाट हे व्यापारी दळणवळणाचे मुख्य मार्ग आहेत.

सारा आकारणीः—इंग्रजी अंमलाच्या पूर्वी शेत जमीन जथा व थल या नांवाखालीं विभागली होती व तिचा सारा जथेकरी व थलकरी यांनीं सरकारांत भरावयाचा असे. प्रत्येक गांवांत असे १० । १२ जथेकरी व थलकरी असत आणि त्यांच्यांतच त्या त्या खेडेगांवची सर्व शेतजमीन विभागली जाई. एखाद्या जाधवानें अथवा पवारानें बरीचशीं शेतें आपल्याकडे लावून घेतल्यास त्यास जाधवथळ अथवा पवारथळ म्हणत, म्हणजे त्या शेतांचा सारा त्या जाधवानें अथवा पवारानें भरावयाचा. अशा तीनचार कुटुंबांनीं जीं शेतें घेतलीं असत त्यांस जाधव-पवारजथा म्हणत. मलिकअंबर सारापद्धति ही सर्वसाधारण दर बिघ्यास $\frac{13}{16}$ मण धान्य अथवा १ रुपया ५॥ आणे असे. दादाजी कोंडदेवी पद्धतींत $\frac{1}{3}$ अथवा $\frac{1}{2}$ सरकारसारा असे. मोंगल अमलांत वढाई म्हणजे निम्में उत्पन्न सरकारी असे व बागाइतींत पाटस्थळास ११८४ दर बिघ्यास व मोटस्थळास ७४८ सार

असे शिवाजीनें बागाइतींत हे दोन्ही दर कायम ठेवले व कोरडवाहूचा सारा ⅓ ठरविला ( ⅓ शेतकऱ्याचा वाटा ). पेशवाईत नानाफडणिसाच्या वेळीं, मळयास ( मोटस्थळास ) दर बिघ्यात ३ रु. व बागेस (पाटस्थळास) दर बिघ्यास ६ रु. कोरडवाहूस उत्तम जमीनीस बिघ्यामागें२ रु.; मध्यमप्रकारास १८४ रु : कनिष्ठ प्रतीस १ रु. आणि निकृष्ट जमिनीस ८१२ असे साऱ्याचे दर होते. इंग्रजी अम्मल झाल्यावर पहिली पाहणी १८१८ त झाली. परंतु त्यावेळी व पुढें १८२०,३१, ३५ व १८५६ सालची पाहणीहि अपुरी झाली. प्रथम दर एकरास उत्तम, मध्यम व कनिष्ठ जिराइती जमीनीस १८६ ते १ रु. व ८१३ व बागाइतीस ४ रु. ठरविले होते. पुढें १८७४ व १९०१ मध्यें पुन्हां पाहणी होऊन पुढील दर ठरले–कोरडवाहू दर एकरीं ८९; भातजमीन २८७ व बागाईत २ रुपये.

श ह र.—पुणें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. मुंबईच्या आग्नेयीस ११९ मैल. हें समुद्रसपाटीपासून १८५० फूट उंच आहे. दहाव्या शतकांतील राष्ट्रकूटांच्या एका ताम्रपटांत याचें पूनकवाडी असें नांव येतें. मालोजीला जहागीर मिळालेल्या प्रांतांत हें गांव होतें ( १६०४ ), नंतर शहाजीनें याची दादोजी कोंडदेवाकडून वसाहत करविली ( १६३७ ). दादोजीनें येथें आपलें मुख्य ठाणें करून शिवाजीसाठीं (राजमहाल नांवाचा) वाडा बांधला. राजगड घेईपर्यंत शिवाजीचें ठाणें पुण्यास होतें. तदनंतर थोरल्या बाजीरावानीं पुणें हें आपलें राहण्याचें मुख्य ठिकाण करीपर्यंत त्यास विशेष महत्त्व नव्हतें. नानासाहेब पेशव्यांच्यापासून त्याच्या भरभराटीस प्रारंभ होऊन सवाईमाधवरावांच्या वेळीं ती शिखरास पोंचली होती. रावबाजीपासून तें मोडकळीस आलें; आणि सांप्रत तें जरी मुंबई इलाख्याची दुय्यम राजधानी आहे तरी त्याचें गेलेलें वैभव पूर्णपणें दृष्टिगोचर होत नाहीं. पेशवाईत मोठ्या अशा सात पेठा होत्या.येथील म्युनिसिपालिटी स. १८५७त स्थापन झाली.मुळामुठेचा संगम शहराजवळच आहे दक्षिणहिंदुस्थानचें मुख्य लष्करी ठाणें येथें आहे. जून ते आक्टोबरअखेर मुंबई सरकारचे ठाणें येथें असतें. लो. सं. (१९२१) २१४७९६. पावसाचें मान ३२ इंच असतें. शिक्षणाची सोय येथें चांगली आहे. डेक्कन, फर्ग्यूसन, न्यूपूना, शेतकी, इंजिनियरिंग हीं कॉलेजें असून हायस्कुलें व देशी भाषांच्या शाळा ( मुलांच्या व मुलींच्या) बऱ्याच आहेत. प्राथमिक शिक्षक व शिक्षकिणी तयार करणाऱ्या दोन शाळा आहेत. निरनिराळ्या प्रकारच्या संस्था व कारखाने आहेत महाराष्ट्रांतील प्रमुख वर्तमानपत्रें व मासिकें ( मुंबई शहर सोडल्यास ) येथें निघतात सुखवस्तु कुटुंबांस सर्व दृष्टीनें राहण्यास हें शहर सोयीचें आहे. महाराष्ट्रांतील बहुतेक निरनिराळ्या प्रकारच्या चळवळींचा प्रारंभ पुण्यास होतो; हें विद्वानांचें माहेरघर आहे. येथें पाहण्यालायक जुनीं व नवीं अनेक स्थळें आहेत. पेशवाईतील संपत्ति नष्ट झाल्यानें सांप्रत त्यावेळच्या मानानें हें निर्धन झालें आहे. त्यावेळचीं सर्व सावकारघराणीं बसून गेलीं. मुंबई, अहमदाबाद, सोलापूर वगैरे शहरें पुण्याच्या मानानें धनवान आहेत. व्यापारी शहर म्हणून जरी याची ख्याति संपली तरी अद्यापि कांहीं धंदे जीव धरून आहेत. सांप्रतच्या सारावसुलीच्या पद्धतीनें सावकार व कुळें दोघेहि जास्त निर्धन बनले आहेत. येथें स. १८५८त आगगाडी सुरू झाली.

**पुत्तलिकाम्ल अथवा पिपीलिकाम्ल** ( फॉर्मिक ॲसिड)—**हें** एक तैलस वर्गांतील अम्ल असून त्याच्या रासायनिक क्रिया त्याच्या वर्गांतील इतर अम्लांपेक्षां निराळ्या असल्याकारणानें तें ओळखण्यास सुलभ जातें. तें रजतक्षाराचें रजत धातूमध्यें प्रायोज्जिदाप्रमाणें रूपांतर करतें. त्याचें अम्ल हरिद किंवा अम्लानुज्जिद मिळत नाहीं. त्यापासून पाणी उत्पन्न करणारीं मूळद्रव्यें काढून घेतल्यास आपणांस कर्ब-एकप्राणिद मिळतें. शिवाय हें त्या वर्गांतील कोणत्याहि अम्लापेक्षां बलवान आहे. हें तांबड्या मुंग्यांमध्यें सांपडतें. मिथिल अल्कल व पुत्तलिक प्रायोज्जिद यांचें प्राणिदीकरण केलें असतां मिळतें. काष्ठाम्ल व ग्लिसरीन हे एके ठिकाणीं सुमारें १००° ते ११०° अंशांपर्यंत तापविले असतां आपणांस हें अम्ल लवकर मिळतें. या अम्लाचा जशद किंवा ताम्रक्षार घेऊन त्यावर गंधकोज्जाची क्रिया केली असतां बलवान अम्ल मिळतें.

पुत्तलिकाम्ल हें रंगहीन व तीक्ष्ण दर्पयुक्त असून त्याचें स्फटिकीभवन०° अंशावर होतें व तें८.६ अंशावर वितळतें व व १००.८° वर उकळतें. जशदचूर्णाशीं तापविलें असतां या अम्लापासून कर्ब-एक-प्राणिद व उज्ज मिळतें. या अम्लाच्या क्षारांस पुत्तलितें म्हणतात. इथिल पुत्तलिअम्लाशीं तापविलें असतां पुत्तलिकामिद मिळतें.

**पुत्तुर**—मद्रासमध्यें उत्तर अर्काट जिल्ह्यांतील जमीनदारी तहशील. यांत कारवेतनगरच्या उत्तरेकडील अर्ध्या भागाचा समावेश होतो. याचें क्षेत्रफळ ५४२ चौरस मैल असून यांत एकंदर ३४० खेडीं आहेत. तालुक्याचें ठाणें पुत्तुर.

**पुदीना**—ही एक तुळशीच्या वर्गांतील वनस्पति आहे. तुळशीच्या पानांस जसा वास येतो त्याप्रमाणें पुदिन्याचे पानांस तिखट ओव्यासारखा वास येतो. पुदिन्याच्या पानांची चटणी करतात. पुदिन्याचे शेंडे लाविले असतां त्यांस मुळें फुटतात. पुदीना उन्हांत मोकळया ओलसर जागेंत चांगला वाढतो. मोठ्या शहराजवळील मळयांत दहावीस वाफे पुदीना लाविल्यास त्याचें उत्पन्न चांगलें होतें.पुदिन्याचा पाला औषधी आहे.

**पुदुकोट्टई**, सं स्था न —मद्रास इलाख्यांत जीं ५ मोठीं संस्थानें म्हणून प्रसिद्ध आहेत त्यांत पुदुकोट्टई हें तिसऱ्या नंबरचें आहे.याच्या उत्तरेस व पश्चिमेस त्रिचनापल्ली जिल्हा; दक्षिणेस रामनाद व पूर्वेस तंजावर आहे. त्रिचनापल्लीचा

डेप्युटी कमिशनर हा पुदुकोट्टई संस्थानचा पोलिटिकल एजंट असतो. संस्थानचा कारभार रीजंट ( दिवाण ) नेमून इंग्रजी धर्तीवर चालतो. क्षेत्रफळ ११०० चौरस मैल आहे. येथील हवा निरोगी आहे. उन्हाळ्यांत त्रिचनापल्लीपेक्षां पुदुकोट्टई जास्त थंड आहे. पावसाचें मान दरसाल ३५ इंच असतें. पुदुकोट्टईच्या उत्तर भागावर पूर्वी चोल राजे आणि दक्षिण भागावर पांड्य राजे राज्य करीत होते. सतराव्या शतकांत रामनाडच्या सेतुपतीच्या अधिकाराखालीं तो सर्व प्रदेश आला. १६८० सालीं सेतुपती रघुनाथ कलंव्हन (कीलवन) यानें रघुनाथ तोंडैमान याला पुदुकोट्टई संस्थानचा मुख्य नेमलें. रघुनाथ कलंव्हन याचें एका कल्लर जातीच्या मुलीवर प्रेम बसून त्यानें तिच्याशीं लग्न लाविलें. तिचा भाऊ हा रघुनाथ तोंडैमान होय. याच्या पूर्वी तेथील अधिकारी पल्लवरायन तोंडैमान होता. त्यानें हा प्रांत रामनाडच्या राजाकडून काढून तंजावरच्या राजास देण्याचा विचार चालविला होता. पल्लवरायनच्या पूर्वी तेथें सेरवई हा कारभारी होता. सांप्रतच्या घराण्याचा मूळपुरुष तिरुमल तोंडैमान होता. त्याच्यापासून रघुनाथ तोंडैमान हा सोळावा पुरुष होय. आतां विद्यमान जे संस्थानिक आहेत ते आपल्याला रघुनाथ तोंडैमान याचे वंशज व पल्लववंशीय म्हणवितात. व स्वतःस पल्लवराज पदवी लावितात. इंग्लिशांचा व संस्थानचा संबंध १८ व्या शतकापासून आला. त्रिचनापल्लीस वेढा पडला होता त्यावेळेस ( सन १७५२ ) रघुनाथ तोंडैमाननें इंग्रजांनां रसद वगैरेंची पुष्कळ कुमक दिली. यावेळीं तर शत्रूनें त्याचा सर्व प्रांत उध्वस्त केला होता १७५५ सालीं रघुनाथ तोंडैमाननें महंमद युसुफला (कंपनीच्या पायदळाचा अधिकारी ) घोडेस्वार पाठवून मदुरा व तिनेवेल्ली घेण्यांत मदत केली. हैदरअल्लीशीं ज्यावेळेस लढाई सुरू झाली त्यावेळींहि रघुनाथाची फारच मदत झाली. पुढें ( १८०३ ) रघुनाथानें आपण लढाईच्या प्रसंगीं जी कामगिरी केली तिजबद्दल बक्षीस मिळावें म्हणून ईस्ट इंडिया कंपनीजवळ मागणी केली. मद्रास सरकारनें त्याचा निकाल करून रघुनाथ याजकडेस जहागिरीची व्यवस्था कायमची लावून दिली ( १८०६ ) व सन १८६२ त दत्तकाची परवानगी दिली. याशिवाय इंग्रज व राजा यांच्यांत दुसरा तह नाहीं. प्रस्तुतच्या ( १९२५ ) संस्थानिकाचें नांव हिज हायनेस श्री राजा वृहदम्बदास सर मार्तंड भैरव तोंडैमान बहादूर जी. सी. आय. असें आहे. यांचे आजे रामचंद्र ( रघुनाथ तोंडैमानपासून पांचवा पुरुष ) यानें मार्तंड भैरव यानां १८७७ सालीं दत्तक घेतलें. मार्तंड १८७७ च्या अज्ञानावस्थेंत सर शेषय्या अय्यर दिवाण होते. मार्तंड भैरव हे स. १८९४ त गादीवर आले. या संस्थानिकास ११ तोफांची सलामी आहे. पुदुकोट्टईच्या आसपास कांहीं लेणीं व कांहीं शिलालेखहि आढळतात. परंतु ते अस्पष्ट असल्यानें वाचणें अशक्य झालें आहे. तांब्याचीं नाणीं पुष्कळ आढळतात. परंतु त्यांवर खूण अगर चिन्ह वगैरे कांहीं एक नाहीं. याची राजधानी पुदुकोट्टई आहे.

लोकसंख्या ( १९२१ ) ४२६८१३ असून खेडगांवांची संख्या ३७७ होती. इंग्रजांस कांहीं खंडणी द्यावी लागत नाहीं. शेतकीची स्थिति, वहिवाटीची पद्धत आणि जमीन बहुत करून शेजारचे त्रिचनापल्ली व मदुरा जिल्हे यांच्यासारखीच आहे. मुख्य पीक तांदुळाचें असून दुसरें महत्त्वाचें पीक हरभरा आहे. संस्थानचें एकंदर उत्पन्न २१.३९ लाख आहे. संस्थानांत नद्या असल्यामुळें कालवे, पाट वगैरे आहेत. संस्थानांत फसली सन चालतो. पुदुकोट्टई संस्थानांत जंगल एकंदर क्षेत्रफळाच्या $\frac{1}{9}$ आहे व त्यांत इमारती लांकूड होतें. जंगलाचें उत्पन्न ३५हजार आहे. संस्थानांत उद्योगधंदे मोठेसे नाहींत. करमकुडी येथें २०० कोष्टी लोकांचीं घरें आहेत. त्या ठिकाणीं सुती कापड निघतें. वसेलुकुडी येथें घोंगड्या तयार करतात. वैतूर येथें बांगड्या तयार करतात व पुदुकोट्टई येथें गंधी सामान चांगलें होतें. व्यापारी बहुधां चेट्टी लोक आहेत. संस्थानांतून सडका बऱ्याच आहेत. पैकीं एक त्रिचनापल्लीस जाते, व दुसरी तंजावर, सुधलुर, गंधर्वकोटा, पुदुकोट्टई व अरणतांगी या शहरांवरून गेलेली आहे. संस्थानांत रेल्वे नाहीं. तंजावर किंवा दिंदिगल हें जवळचें रेल्वे स्टेशन आहे. टपालहपीसें २८ आहेत. फक्त राजधानीच्याच गांवीं म्युनिसिपालिटी आहे येथील राज्यव्यवस्था कौन्सिलच्या स्वाधीन आहे. कौन्सिलमध्यें राजा ( रीजंट ), दिवाण व एक कौन्सिलर असे असतात. विशेषप्रसंगीं त्रिचनापल्लीचे डेप्युटि कमिशनर ( संस्थानचे पोलिटिकल एजंट ) यांची सल्ला घेणें जरूर पडतें. १९०२ सालापासून म्हैसूरसारखी एक ३० प्रतिनिधींची सभा स्थापन झाली. तींत २५ लोकनियुक्त सभासद आहेत. ती वर्षांतून दोनदां भरते. त्यावेळेस मागील वर्षाचें काम, जमाखर्चाचा आढावा व प्रश्नोत्तरें वगैरे कामें चालतात. याशिवाय सल्लामसलतगारमंडळ आहे. त्यांत ४ सरकारी व ६ बिनसरकारी सभासद आहेत. या ६ पैकीं ४ प्रतिनिधिसभेनें निवडलेले व २ राजानें नियुक्त केलेले असतात. सर्व कायदे व संस्थानचें बजेट या मंडळापुढें येतें. परंतु त्याला फक्त सल्ला देण्याचेंच काम आहे; सहकारी पेढ्या ( १९२२ मध्यें ) ४५ आहेत. त्यांत ३४ शेतकींच्या आहेत. चोरांनां, आपल्या चोरीस गेलेल्या मालाच्या किंमतीची रक्कम देऊन माल परत घेण्याची पद्धत ( हिला तुप्पुकुळी असें नांव आहे ) इकडे अजून प्रचारांत आहे. त्यामुळें पोलीस शिपायी थोडे लागतात. संस्थानांत एकंदर ४४४ शाळा ( १९२२) होत्या. अस्पृश्य मुलांनां मोफत व जेवणास घालूनहि शिकवीत असतात.

गांव.—पुदुकोट्टई संस्थानांतील मुख्य शहर. त्रिचनापल्लीपासून ३३ मैल. लोकसंख्या सुमारें २० हजार. हें शहर फार स्वच्छ, हवाशीर असून सार्वजनिक इमारती उत्तम आहेत. १८२५ सालीं राजा विजय रघुनाथ यानें जुनें शहर

दुरुस्त करून व नवे प्रशस्त रस्ते काढून ओळीनें घरें आंखून देऊन एकंदर शहराची बांधणी केली. नंतर सर शेषय्या दिवाण यांनीं पुष्कळ सुधारणा केली शहराबाहेर ज्या नवीन सार्वजनिक इमारती बांधल्या गेल्या आहेत त्या या दिवाणांच्या अमदानींत झाल्या. त्यांत मुख्य इमारती नवा राजवाडा,सरकारी कचेऱ्या, उन्हाळयांतली राजेसाहेबांकरितां हवा खाण्याची जागा ह्या होत. जुन्या राजवाड्यांत दरबार भरत असतो. ही जागा गांवाच्या अगदीं मध्यभागीं आहे. पल्लवकुलम् व पुदुकुलम् नांवाचे उत्तम प्रकारचे दोन तलाव आहेत. [ स्मिथ-अ. हि. इंडिया; नेल्सन-मदुरा कंट्री; इंपे. ग्याझे. पु २०; इंडियन इयर बुक, १९२५; मद्रास ॲड-मिनिस्ट्रेशन्स रिपोर्ट ( १९२१-२२ )]

**पुनर्जन्म**—आत्म्याचें एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत जाणें याला पुनर्जन्म म्हणतात ही 'देहान्तरप्राप्ति' त्याच जातींत किंवा उच्च किंवा नीच जातींत पूर्वजन्मांतील पापपुण्यात्मक कर्मानुसार होते पुनर्जन्माची कल्पना जीव हा, शरीर व आत्मा अशा दोन पृथक् भागांचा बनलेला असतो या समजुतीवर उभारलेली आहे. ही कल्पना हिंदु-धर्माप्रमाणें बौद्ध व जैन या धर्मांतहि आहे. पुण्यवान लोक मृत्यूनंतर स्वर्गांत जाऊन तेथें देवांबरोबरीनें सुखोपभोग भोगतात आणि पापी लोक नरकांत जातात, या कल्पना वैदिक कालांत होत्या. पुढें शतपथब्राह्मणांत पुनर्जन्माची कल्पना अशी स्पष्ट मांडलेली आहे कीं,मेल्याबरोबर जीव पुन्हां जन्म घेऊन मागील जन्मांतल्या कर्मांचें बरें वाईट फळ भोगतो. या पुनर्जन्माच्या सिद्धांताला खात्रीलायक पुरावा पुढें मांडलेला नाहीं; तरी हा सिद्धांत एकदम सर्वमान्य झालेला दिसतो आणि भारतीय समाजांतील आद्य वैदिक-कालीन आनंदमय वृत्ति नाहींशी होऊन तिच्या जागीं निराशावाद ( पहा ) पसरलेला आढळतो. पुनर्जन्माच्या सिद्धांताला मुख्य पुरावा असा मांडला गेला आहे कीं, चालू आयुष्यांत भोगावें लागणारें सुख किंवा दुःख यांचें कारण चालू जन्मांतील नैतिक आचरणांत पुष्कळ वेळां सांपडूं शकत नाहीं. उदाहरणार्थ, एक इसम जन्मतःच श्रीमंत व सुखी आणि दुसरा जन्मतः दरिद्री व दुःखी असतो; किंवा एखादा अ[illegible] दृष्ट्या सदाचरणी मनुष्य सर्वदा संकटांत व [illegible]लेला आढळतो. अर्थात चालू जन्मांतील [illegible] पूर्वजन्मांतील पापपुण्य हें [illegible] जन्मांतील [illegible] आणि मागी[illegible] याप्रमाणें [illegible] सरणीमुळें [illegible] चक्रांतून सु[illegible] ज्ञानप्राप्तीनें [illegible] प्राप्तीचें तर[illegible]

ग्रीक-रोमन लोकांत पुनर्जन्माची कल्पना होती; पण ती त्यांनीं ती ईजिप्शियन, हिंदु, कीं प्राचीन अप्रगत यूरोपीय थ्रेसियन, सिथियन, गॉल वगैरे लोकांपासून घेतली याबद्दल मतभेद आहे. साधारणतः असें दिसतें कीं, एका विशिष्ट देशांतून ही कल्पना जगभर पसरली असें नसून अनेक ठिकाणच्या अप्रगत लोकसमाजांत ती पृथक् पृथक्पणें उद्भूत झाली.

**पुन्नाट**—म्हैसूरच्या नैर्ऋत्येस कावेरी नदीस मिळणाऱ्या कब्बनी नदीवरील कित्तूरजवळील एक गांव. आज यास हदिवारु म्हणतात. येथें भुगोलवेत्ता टॉलेमी याच्या वेळीं गोमेद व वैदूर्य यांच्या खाणी होत्या. टॉलेमी या गांवास पन्नत म्हणतो. सांप्रत या खाणी बंद झाल्या आहेत. प्राचीन काळीं रोमन लोक येथील रत्नांचा व्यापार करीत.त्यांचीं नाणीं येथें सांपडतात. पुन्नाट हें एक छोटेसें संस्थान होतें. त्यास पांचव्या शतकांतील एका शिलालेखांत पुन्नाड असें म्हटलें आहे.तसेंच हरिषेणाच्या ( ९३[illegible] ) बृहत्कोशामध्यें त्याचा उल्लेख आला आहे. कित्तूर उर्फ कीर्तिपुर हें या पुन्नाट देशाच्या राजधानीचें शहर होतें. [ राईस-म्हैसूर, कूर्ग फ्रॉम दि इन्स्क्रिप्शन्स; इंडि. ॲंटि. पु. १२, १३; पु. १८, ३६६; म्हैसूर ग्याझेटियर, पु १. पा. २३९.]

**पुरणपूर**—संयुक्तप्रांत. पिलिभित जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ ५१३ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ९२९८०. तहशिलींत एकंदर खेडीं २५५ असून मोठें शहर एकहि नाहीं. येथील भाग बहुतेक रेताड आहे.

**पुरणिया**, जि ल्हा.—बिहार-ओरिसा. भागलपूर प्रांतांतील एक जिल्हा. याचें क्षेत्रफळ ४९९४ चौरस मैल आहे. पुरणिया जिल्ह्यांतील नद्या बहुधा गंगेला मिळतात. त्यांत कोसी, महानंदा व पानार या नद्या सर्वांत मोठ्या आहेत. पुरणिया जिल्ह्यांत जंगल फारसें नाहीं. चित्ते, वाघ आणि रानरेडे हीं जंगली जनावरें कधीं कधीं आढळतात दरसाल पाऊस ७१ इंच पडतो.

पुरणिया जिल्ह्याचा इतिहास फार प्राचीन आहे. महाभारतांत,महानंदा नदी अंग व पुंड्र या राष्ट्रांची मध्यसीमा असल्याचा उल्लेख आहे. नवव्या शतकामध्यें पाल या नांवाचें राजकुल उदयाला आलेलें होतें. तेराव्या शतकाच्या आरंभीं पुरणिया जिल्ह्याच्या दक्षिण भागावर लक्ष्मणसेन या नांवाचे राजे सत्ताधीश होते; त्यांची राजधानी नडिया ही होती. महंमद बखत्यार खिलजी यानें नडियावर हल्ला करून तें शहर जिंकलें होतें. सन १७२२ मध्यें सैफखान या नांवाचा फौजदार पुरणिया जिल्ह्यावर अम्मल चालवीत [illegible] त्यानें नेपाळी लोकांना हाकलून लावून पुरणिया [illegible] सरहद्द ३० मैलपर्यंत जास्त वाढविली. सैफ-[illegible] शौकतजंग फौजदार नेमला गेला. त्यानें बंगा-[illegible] सुराजउद्दौला यावर स्वारी केली होती.

१७६५ सालच्या सुमारास पुरणिया जिल्हा सर्व बंगालबरोबर इंग्रजांच्या सत्तेखालीं आला. १८५७ च्या बंडाच्या धामधुमींत बंडवाले पुरणिया जिल्ह्यांत शिरले परंतु त्यावेळच्या कमिशनरनें त्यांनां नेपाळांत हाकलून लाविलें. वेनुगड, असुरगड, सिक्लीगड,जलालगड या व इतर ठिकाणीं जुने किल्ले असल्याबद्दलचे अवशेष अजून दृष्टीस पडतात.

जिल्ह्याची लोकसंख्या (१९२१) २०२४६०८असून त्यांत पुरणिया, कृष्णराज आणि कटिहार ( रेल्वे जंक्शन ) हीं ३ मुख्य शहरें आहेत. शेंकडा ७१ लोक शेतकी धंद्यावर उपजीविका करणारे व १२ उद्योगधंदे करणारे आहेत. कुरण विपुल आहे.मुख्य पीक तांदूळ, कडधान्यें व गळिताचीं धान्यें हें आहे. फेटे, गाडीचीं चाकें, चटया आणि पोतीं हीं किशनगंज परगण्यांत तयार होतात. पोतीं तयार करण्याचे कारखाने मोठ्या प्रमाणांत आहेत. कटिहार येथील घोंगड्या सुबक नसल्या तरी टिकाऊ असतात. निळीचे कारखाने पुरणिया जिल्ह्यांत बरेच आहेत. त्याचप्रमाणें ताग दाबण्याचे प्रेस ५ आहेत. निर्गत माल तांदूळ, ताग, गळिताचीं धान्यें ( राई ), तंबाखू वगैरे असून आयात माल दिनाजपूरहून साळ, कलकत्त्याहून गोणपाट, तांदूळ, साखर, मीठ, राकेल तेल वगैरे आणि मिरझापूर, अझयगड आणि गाझीपूर येथून साखर व देशी जाड कपडा येतो. येथील शिक्षण फार मागसलेलें आहे.

गां व —पुरणिया जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ( १९११ ) १४७८४. येथें १८६४ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें सतरंज्या, चटया, राईचें तेल व नवार वगैरे तयार होतात.

**पुरंदर**—मुंबई, पुणें जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ४७० चौरस मैल. तालुक्याचें मुख्य ठिकाण सासवड आहे. तालुक्यांत एकंदर खेडीं ९२ आहेत. तालुक्यांत लोकसंख्या सुमारें ७२०१६. समुद्रसपाटीपासून पुरंदर १७०० फूट उंच आहे. तालुक्याचा प्रदेश बहुतेक पहाडी आहे; पश्चिमेकडील घाटावर मल्हारगड नांवाचा किल्ला असून त्यावर भुलेश्वर आणि ढवळेश्वर या नांवाचीं २ देवळें आहेत. पुरंदर व वज्रीरगड हे दोन किल्ले तालुक्याच्या दक्षिण भागीं आहेत. निरा, कन्हा व मंजीरी या नद्या तालुक्यांतून वहातात. निरा नदीच्या कालव्यानें तालुक्यांतील जमिनीचा बराच भाग भिजविला जातो. उंसाचें पीक विशेष आहे. वार्षिक पावसाचें मान २३ इंच असतें.

**पुरंदर किल्ला**–पुणें जिल्हा. हा सासवडजवळ आहे. उंची ४४७२फूट.बालेकिल्ला व बाहेरील किल्ला असे याचे२भाग असून एकंदर घेर चार मैल आहे. येथें एक गोऱ्या लोकांची लष्करी तुकडी असते. मुख्य दरवाजास दिल्लीदरवाजा म्हणतात. जवळ एक चोरदरवाजा आहे गणेशदरवाजा, दगडी अंबारखाने, जुना राजवाडा, म्हसोबाचें टाकें ( याचेंच पाणी उन्हाळ्यांत पुरतें ), पुरंदऱ्यांनीं बांधलेलें महादेवाचें देऊळ, सदर दरवाजा, फत्तेबुरूज, कोंकणी बुरूज व तेथील कडेलोटाची जागा, तिहेरी बांधलेला हत्तीबुरूज, साखरी तलाव, बहिरवदरवाजा व खिंड, लम्रमुख टेंकडीजवळचें १६० फूट खोलीचें भुयार, थोरल्या माधवरावानीं बांधलेला मुकारशी तलाव, सवाईमाधवरावसाहेबांच्या जन्मानिमित्त बांधलेलें देऊळ, इत्यादि ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. पहिला बहामनी पातशहा हसन यानें हा किल्ला घेतला होता ( १३५० ). हा कोणी बांधला तें समजत नाहीं. हा पुढें निजामशाहीकडे आला व निजामशहानें तो पुणें—सुपें जहागिरीबरोबरच मालोजीस दिला. नंतर तो आदिलशहाकडे गेला व त्याच्याच अंमलांतून शिवाजीनें युक्तीनें तो मिळविला. पण जयसिंगाच्या स्वारींतील तहानें तो मोंगलांस मिळाला; पुढें स. १६७० त तो सूर्याजीनें परत घेतला. नारायणरावांच्या वधानंतर बारभाईचें केन्द्रस्थान हेंच असून येथेंच सवाईमाधवरावांचा जन्म झाला व पहिल्या इंग्रज-मराठे युद्धांत येथें झालेला तह पुरंदरचा तह ( १७७६ ) म्हणून प्रसिद्ध आहे.

**पुरंदरे घराणें**—हें घराणें पुणें जिल्ह्यांतील सासवड गांवचें मूळचें राहणारें होय. येथील हे कुलकर्णी होते. अंबाजी पुरंदरे व बाळाजी विश्वनाथ भट यांची मैत्री होती. हे दोघे धनाजीच्या पदरीं नोकरीस राहिले. व बाळाजीस पेशवाई मिळाल्यावर अंबाजीस त्याची दिवाणगिरी मिळाली व ६० हजारांचा सरंजाम मिळाला. पुरंदरे हे याप्रमाणें १७६५ पर्यंत पेशव्यांचे दिवाण होते. यांचें काम साताऱ्यास (अथवा पुण्यास) राहून पेशव्यांचें कामकाज पहाणें व त्यांच्या बरोबर स्वाऱ्यावर जाणें. या दोन्ही घराण्यांचें औरस्य इतकें होतें कीं पेशवे हे यांस चिरंजीव लिहीत, यांच्या लहानमोठ्या कार्यांनां मदत करीत व त्यांचा परामर्ष घेत (अंबाजी पुरंदरे पहा ). अंबाजीचा नातू धोंडोपंत हा दिल्लीस पातशहाकडे मराठ्यांचा वकील होता. अंबाजीचा पुत्र महादोबा हा या घराण्यांत प्रख्यात झाला. यानें नानासाहेबांनां बारामतीकर नाईकांचें कर्ज फेडण्यास मदत केली व त्यांनां पेशवाई मिळवून देण्यांतहि खटपट केली. हा शूर होता; कर्नाटक, कुकडी, बेदनूर वगैरे लढायांत त्यानें शौर्य गाजविलें. मध्यंतरीं २–३ वर्षें याचें पेशव्यांशीं वितुष्ट आलें होतें, परंतु तें पुढें नाहींसें झालें. याचा पुत्र आबा हा राघोबादादांचा पक्षपाती होता हा वारल्यावर यांचें दिवाणगिरीचें काम नानाफडणवीस यांच्याकडे गेलें व तेव्हांपासून हें घराणें मागें पडलें. याचा नातू नीळकंठआबा हा रावबाजीच्या वेळीं होता. सांप्रत याचा दत्तकवंश पुण्यास व सासवडास नांदत आहे. [डफ; वाड—कैफियती; पेशव्यांची बखर; राजवाडे खंड १ व ६. ]

**पुराणें**—यासंबंधीं बरेंचसें तात्त्विक विवेचन सूतसंस्कृति ( ज्ञानकोश विभाग ३ ) या प्रकरणांत केलें आहे. कालनिर्णयाच्या व माहितीच्या दृष्टीनें भारतीय वाङ्मयांत पुराणांची योग्यता काय आहे हें ठरविणें कठिण आहे. खरोखर पुराणांची धार्मिक वाङ्मयांतच गणना

दुरुस्त करून व नवे प्रशस्त रस्ते काढून ओळीनें घरें आंखून देऊन एकंदर शहराची बांधणी केली. नंतर सर शेषय्या दिवाण यांनीं पुष्कळ सुधारणा केली. शहराबाहेर ज्या नवीन सार्वजनिक इमारती बांधल्या गेल्या आहेत त्या या दिवाणांच्या अमदानींत झाल्या. त्यांत मुख्य इमारती नवा राजवाडा,सरकारी कचेऱ्या, उन्हाळ्यांतली राजेसाहेबांकरितां हवा खाण्याची जागा ह्या होत. जुन्या राजवाड्यांत दरबार भरत असतो. ही जागा गांवाच्या अगदीं मध्यभागीं आहे. पल्लवकुलम् व पुदुकुलुम् नांवाचे उत्तम प्रकारचे दोन तलाव आहेत. [ स्मिथ–अ. हि. इंडिया; नेल्सन–मदुरा कंट्री; इंपे. ग्याझे. पु २०; इंडियन इयर बुक, १९२५; मद्रास अॅड-मिनिस्ट्रेशन्स रिपोर्ट ( १९२१–२२ )]

**पुनर्जन्म**—आत्म्याचें एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत जाणें याला पुनर्जन्म म्हणतात. ही 'देहान्तरप्राप्ति' त्याच जातींत किंवा उच्च किंवा नीच जातींत पूर्वजन्मांतील पापपुण्यात्मक कर्मानुसार होते. पुनर्जन्माची कल्पना जीव हा, शरीर व आत्मा अशा दोन पृथक् भागांचा बनलेला असतो या समजुतीवर उभारलेली आहे. ही कल्पना हिंदु-धर्माप्रमाणें बौद्ध व जैन या धर्मांतहि आहे. पुण्यवान लोक मृत्यूनंतर स्वर्गांत जाऊन तेथें देवांबरोबरीनें सुखोपभोग भोगतात आणि पापी लोक नरकांत जातात. या कल्पना वैदिक कालांत होत्या. पुढें शतपथब्राह्मणांत पुनर्जन्माची कल्पना अशी स्पष्ट मांडलेली आहे कीं,मेल्याबरोबर जीव पुन्हां जन्म घेऊन मागील जन्मांतल्या कर्मांचें बरें वाईट फळ भोगतो. या पुनर्जन्माच्या सिद्धांताला खात्रीलायक पुरावा पुढें मांडलेला नाहीं; तरी हा सिद्धांत एकदम सर्वमान्य झालेला दिसतो आणि भारतीय समाजांतील आद्य वैदिक-कालीन आनंदमय वृत्ति नाहींशी होऊन तिच्या जागीं निराशावाद ( पद्दा ) पसरलेला आढळतो. पुनर्जन्माच्या सिद्धांताला मुख्य पुरावा असा मांडला गेला आहे कीं, चालू आयुष्यांत भोगावें लागणारें सुख किंवा दुःख यांचें कारण चालू जन्मांतील नैतिक आचरणांत पुष्कळ वेळां सांपडूं शकत नाहीं. उदाहरणार्थ, एक इसम जन्मतःच श्रीमंत व सुखी आणि दुसरा जन्मतः दरिद्री व दुःखी असतो; किंवा एखादा अगदीं नैतिक दृष्ट्या सदाचरणी मनुष्य सर्वदा संकटांत व दुःखांत सांपडलेला आढळतो. अर्थात चालू जन्मांतील श्रीमंतीचें किंवा आपत्तीचें कारण पूर्वजन्मांतील पापपुण्य हें असलें पाहिजे. त्याप्रमाणें चालू जन्मांतील स्थितीला कारण मागील जन्मांतील पापपुण्य, आणि मागील जन्मांतील स्थितीस त्याच्या मागील जन्मांतील; याप्रमाणें ही जन्मांतरांची सांखळी अनंत आहे. या विचार-सरणीमुळें दुसरा असा प्रश्न उद्भवतो कीं, या जन्ममरणाच्या चक्रांतून सुटण्यास कांहीं मार्ग आहे कीं नाहीं. याचें उत्तर ज्ञानप्राप्तीनें मोक्ष मिळविणें हें असून, हें पुनर्जन्माचें व मोक्ष-प्राप्तीचें तत्त्वज्ञान प्राचीन उपनिषद्ग्रंथांतून विवेचिलें आहे.

ग्रीक–रोमन लोकांत पुनर्जन्माची कल्पना होती; पण ती त्यांनीं ती ईजिप्शियन, हिंदु, कीं प्राचीन अप्रगत यूरोपीय थ्रेसियन, सिथियन, गॉल वगैरे लोकांपासून घेतली याबद्दल मतभेद आहे. साधारणतः असें दिसतें कीं, एका विशिष्ट देशांतून ही कल्पना जगभर पसरली असें नसून अनेक ठिकाणच्या अप्रगत लोकसमाजांत ती पृथक् पृथक्पणें उद्भूत झाली.

**पुन्नाट**—म्हैसूरच्या नैर्ऋत्येस कावेरी नदीस मिळणाऱ्या कव्वनी नदीवरील कित्तूरजवळील एक गांव. आज यास हदिनारु म्हणतात. येथें भुगोलवेत्ता टॉलेमी याच्या वेळीं गोमेद व वैदूर्य यांच्या खाणी होत्या. टॉलेमी या गांवास पन्नुन म्हणतो. सांप्रत या खाणी बंद झाल्या आहेत. प्राचीन काळीं रोमन लोक येथील रत्नांचा व्यापार करीत. त्यांचीं नाणीं येथें सांपडतात. पुन्नाट हें एक छोटेसें संस्थान होतें. त्यास पांचव्या शतकांतील एका शिलालेखांत पुन्नाड असें म्हटलें आहे.तसेंच हरिषेणाच्या ( ९३१ ) बृहत्कोशामध्यें त्याचा उल्लेख आला आहे. कित्तूर उर्फ कीर्तिपुर हें या पुन्नाट देशाच्या राज-धानीचें शहर होतें. [ राईस–म्हैसूर, कुर्ग फ्रॉम दि इन्स्क्रिप्शन्स; इंडि. ॲंटि. पु. १२, १३; पु. १८, ३६६; म्हैसूर ग्याझेटियर, पु १. पा. २३९.]

**पुरणपूर**—संयुक्तप्रांत. पिलिभित जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ ५१३ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ९२९८०. तहशिलींत एकंदर खेडीं २५५ असून मोठें शहर एकहि नाहीं. येथील भाग बहुतेक रेताड आहे.

**पुरणिया**, जि ल्हा.—बिहार–ओरिसा. भागलपूर प्रांतांतील एक जिल्हा. याचें क्षेत्रफळ ४९९४ चौरस मैल आहे. पुरणिया जिल्ह्यातील नद्या बहुधा गंगेला मिळतात. त्यांत कोसी, महानंदा व पानार या नद्या सर्वांत मोठ्या आहेत. पुरणिया जिल्ह्यांत जंगल फारसें नाहीं. चित्ते, वाघ आणि रानरेडे हीं जंगली जनावरें कधीं कधीं आढळतात. दरसाल पाऊस ७१ इंच पडतो.

पुरणिया जिल्ह्याचा इतिहास फार प्राचीन आहे. महाभारतांत,महानंदा नदी अंग व पुंड्र या राष्ट्रांची मध्यसीमा असल्याचा उल्लेख आहे. नवव्या शतकामध्यें पाल या नांवाचें राजकुल उदयाला आलेलें होतें. तेराव्या शतकाच्या आरंभीं पुरणिया जिल्ह्याच्या दक्षिण भागावर लक्ष्मणसेन या नांवाचे राजे सत्ताधीश होते; त्यांची राजधानी नदिया ही होती. महंमद बख्त्यार खिलजी यानें नदियावर हल्ला करून तें शहर जिंकलें होतें. सन १७२२ मध्यें खैफखान या नांवाचा फौजदार पुरणिया जिल्ह्यावर अम्मल चालवीत होता. त्यानें नेपाळी लोकांना हाकलून लावून पुरणिया जिल्ह्याची सरहद्द ३० मैलपर्यंत जास्त वाढविली. खैफ-खानानंतर शौकतजंग फौजदार नेमला गेला. त्यानें बंगालचा नवाब सुराजउद्दौला याजवर स्वारी केली होती.

१७६५ सालच्या सुमारास पुरणिया जिल्हा सर्व बंगालबरोबर इंग्रजांच्या सत्तेखालीं आला. १८५७ च्या बंडाच्या धामधुमींत बंडवाले पुरणिया जिल्ह्यांत शिरले परंतु त्यावेळच्या कमिशनरनें त्यांना नेपाळांत हाकलून लाविलें. वेणुगड, असुरगड, सिक्लीगड, जलालगड या व इतर ठिकाणीं जुने किल्ले असल्याबद्दलचे अवशेष अजून दृष्टीस पडतात.

जिल्ह्याची लोकसंख्या (१९२१) २०२४६०८असून त्यांत पुरणिया, कृष्णराज आणि काटेहार ( रेल्वे जंक्शन ) हीं ३ मुख्य शहरें आहेत. शेंकडा ७१ लोक शेतकी धंद्यावर उपजीविका करणारे व १२ उद्योगधंदे करणारे आहेत. कुरण विपुल आहे.मुख्य पीक तांदूळ, कडधान्यें व गळिताचीं धान्यें हें आहे. फेटे, गाडीचीं चाकें, चटया आणि पोतीं हीं किशनगंज परगण्यांत तयार होतात. पोतीं तयार करण्याचे कारखाने मोठ्या प्रमाणांत आहेत. कटिहार येथील घोंगड्या सुबक नसल्या तरी टिकाऊ असतात. निळीचे कारखाने पुरणिया जिल्ह्यांत बरेच आहेत. त्याचप्रमाणें ताग दाबण्याचे प्रेस ५ आहेत. निर्गत माल तांदूळ, ताग, गळिताचीं धान्यें ( राई ), तंबाखू वगैरे असून आयात माल दिनाजपूरहून साळ, कलकत्त्याहून गोणपाट, तांदूळ, साखर, मीठ, राकेल तेल वगैरे आणि मिरझापूर, अक्षयगड आणि गाझीपूर येथून साखर व देशी जाड कपडा येतो. येथील शिक्षण फार मागसलेलें आहे.

गांव —पुरणिया जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ( १९११ ) १४७८४. येथें १८६४ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें सतरंज्या, चटया, राईचें तेल व नवार वगैरे तयार होतात.

**पुरंदर**—मुंबई, पुणें जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ४५० चौरस मैल. तालुक्याचें मुख्य ठिकाण सासवड आहे. तालुक्यांत एकंदर खेडीं ९२ आहेत तालुक्यांत लोकसंख्या सुमारें ७२०१६. समुद्रसपाटीपासून पुरंदर १७०० फूट उंच आहे. तालुक्याचा प्रदेश बहुतेक पहाडी आहे; पश्चिमेकडील घाटावर मल्हारगड नांवाचा किल्ला असून त्यावर मुळेश्वर आणि ढवळेश्वर या नांवाचीं २ देवळें आहेत. पुरंदर व वज्रगड हे दोन किल्ले तालुक्याच्या दक्षिण भागीं आहेत. निरा, कऱ्हा व मंजैरी या नद्या तालुक्यांतून वहातात. निरा नदीच्या कालव्यानें तालुक्यांतील जमिनीचा बराच भाग भिजविला जातो. उंसाचें पीक विशेष आहे. वार्षिक पावसाचें मान २३ इंच असतें.

**पुरंदर किल्ला**—पुणें जिल्हा. हा सासवडजवळ आहे. उंची ४४७२फूट.बालेकिल्ला व बाहेरील किल्ला असे याचे२भाग असून एकंदर घेर चार मैल आहे. येथें एक गोऱ्या लोकांची लष्करी तुकडी असते. मुख्य दरवाजास दिल्लीदरवाजा म्हणतात. जवळ एक चोरदरवाजा आहे गणेशदरवाजा, दगडी अंबारखाने, जुना राजवाडा, म्हसोबाचें टाकें ( याचेंच पाणी उन्हाळ्यांत पुरतें ), पुरंदऱ्यांनीं बांधलेलें महादेवाचें देऊळ, खंडा दरवाजा, फत्तेबुरूज, कोंकणी बुरूज व तेथील कडेलोटाची जागा, तिहेरी बांधलेला हत्तीबुरूज, साखरी तलाव, बहिरवदरवाजा व खिंड, लक्ष्मुख टेंकडीजवळचें १६० फूट खोलीचें भुयार, थोरल्या माधवरावांनीं बांधलेला मुकारशी तलाव, सवाईमाधवसाहेबांच्या जन्मानिमित्त बांधलेलें देऊळ, इत्यादि ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. पहिला बहामनी पातशहा हसन यानें हा किल्ला घेतला होता ( १३५० ). हा कोणी बांधला तें समजत नाहीं. हा पुढें निजामशाहीकडे आला व निजामशहानें तो पुणें—सुपें जहागिरीबरोबरच मालोजीस दिला. नंतर तो आदिलशहाकडे गेला व त्याच्याच अंमलांतून शिवाजीनें युक्तीनें तो मिळविला. पण जयसिंगाच्या स्वारींतील तहानें तो मोंगलांस मिळाला; पुढें स. १६७० त तो सूर्याजीनें परत घेतला. नारायणरावांच्या वधानंतर बारभाईचें केन्द्रस्थान हेंच असून येथेंच सवाईमाधवरावांचा जन्म झाला व पहिल्या इंग्रज-मराठे युद्धांत येथें झालेला तह पुरंदरचा तह ( १७७६ ) म्हणून प्रसिद्ध आहे.

**पुरंदरे घराणें**—हें घराणें पुणें जिल्ह्यांतील सासवड गांवचें मूळचें राहणारें होय. येथील हे कुलकर्णी होते. अंबाजी पुरंदरे व बाळाजी विश्वनाथ भट यांची मैत्री होती. हे दोघे धनाजीच्या पदरीं नोकरीस राहिले. व बाळाजीस पेशवाई मिळाल्यावर अंबाजीस त्याची दिवाणगिरी मिळाली व ६० हजारांचा सरंजाम मिळाला. पुरंदरे हे याप्रमाणें १७६५ पर्यंत पेशव्यांचे दिवाण होते. यांचें काम सातान्यास (अथवा पुण्यास) राहून पेशव्यांचें कामकाज पहाणें व त्यांच्या बरोबर स्वाऱ्यावर जाणें या दोन्ही घराण्यांचें सौरस्य इतकें होतें कीं पेशवे हे यांस चिरंजीव लिहीत, यांच्या लहानमोठ्या कार्यांना मदत करीत व त्यांचा परामर्ष घेत (अंबाजी पुरंदरे पहा ). अंबाजीचा नातू चोंडोपंत हा दिल्लीस पातशहाकडे मराठ्यांचा वकील होता. अंबाजीचा पुत्र महादोबा हा या घराण्यांत प्रख्यात झाला. यानें नानासाहेबानां बारामतीकर नाईकांचें कर्ज फेडण्यास मदत केली व त्यांना पेशवाई मिळवून देण्यांतहि खटपट केली. हा शूर होता; कर्नाटक, कुकडी, बेदनूर वगैरे लढायांत त्यानें शौर्य गाजविलें. मध्यंतरीं २–३ वर्षें याचें पेशव्यांशीं वितुष्ट आलें होतें, परंतु तें पुढें नाहींसें झालें. याचा पुत्र आबा हा राघोबादादांचा पक्षपाती होता हा वारल्यावर याचें दिवाणगिरीचें काम नानाफडणवीस यांच्याकडे गेलें व तेव्हांपासून हें घराणें मागें पडलें. याचा नातू नीळकंठआबा हा रावबाजीच्या वेळीं होता. सांप्रत याचा दत्तकवंश पुण्यास व सासवडास नांदत आहे. [डफ; वाड—कैफियती; पेशव्यांची बखर; राजवाडे खंड १ व ६. ]

**पुराणें**—यासंबंधीं बरेंचसें तात्विक विवेचन सूतसंस्कृति ( ज्ञानकोश विभाग ३ ) या प्रकरणांत केलें आहे. कालनिर्णयाच्या व माहितीच्या दृष्टीनें भारतीय वाङ्मयांत पुराणांची योग्यता काय आहे हें ठरविणें कठिण आहे खरोखर पुराणांचो धार्मिक वाङ्मयांतच गणना

केली पाहिजे. अत्यंत पुरातन जो ब्राह्मणी धर्म त्यांत, जसे 'वेद' तसा बहुतेक शिव आणि विष्णु यांच्या पूजनांत विराम पावणारा अलीकडील जो हिंदुधर्म त्याला पुराणें हींच आधार होत. वस्तुतः महाभारताचा बराच भाग व बहुतेक सबंध हरिवंश म्हणजे पुराणच होय, दुसरें कांहीं नाहीं. तसेंच रामायणांतील अध्याय व कांडें पुराणांसारखींच दिसतात. तसेंच पुराणें निःसंशय फार प्राचीन असून त्यांचें मूळ वैदिक वाङ्मयांतच आहे. तथापि 'पुराण' म्हणून आजचे उपलब्ध ग्रंथ हे अलीकडील आहेत हेंहि निर्विवाद आहे; इतकेंच नव्हे तर, अगदीं चालू काळापर्यंत 'पुराण' असें मोठें नांव देऊन कांहीं बनावट ग्रंथहि झालेले आहेत; किंवा जुन्या पुराणांचेच भाग म्हणून कांहीं म्हणवीत आहेत. अशा वाङ्मयांतील अगदीं अलीकडील ग्रंथांतहि जुन्या पुराणांतील परिचित भाषा व त्यांचें बाह्यस्वरूप दृष्टीस पडतें.

'पुराण' या शब्दाचा मूळ अर्थ "जुनी कथा" हाच असावा. ब्राह्मणें, उपनिषदें व जुने बौद्धसंप्रदायी ग्रंथ अशा जुन्या वाङ्मयांत पुराण हा शब्द इतिहाससंबंधानें बहुतकरून आलेला आढळतो. ('इतिहासशास्त्र' पहा). प्राचीन काळीं अनेक वेळां उल्लेख केलेल्या 'इतिहास व पुराण' किंवा 'इतिहासपुराण' या शब्दावरून, तसे प्रत्यक्ष ग्रंथ होते किंवा आज आपणांस उपलब्ध असलेलीं पुराणें व महाकाव्यें हेच ते ग्रंथ असें मानतां येत नाहीं. उलट, अथर्ववेदांत चार वेदांखेरीज पुराणांचाहि उल्लेख आला आहे त्यावरून मात्र तसले ग्रंथ असावे असें वाटतें. 'सूत्र' ग्रंथावरून मात्र खऱ्या पुराणांचें आस्तित्व निःसंशय सिद्ध होतें; कारण त्या ग्रंथांतील विषय व आपणांस उपलब्ध असलेल्या पुराणग्रंथांतील विषयांमध्यें बरेंच साम्य आहे. आज आस्तित्वांत असलेल्या कायदेग्रंथांपैकीं सर्वांत जुना ग्रंथ जो 'गौतम धर्मसूत्र' त्यांत असें सांगितलें आहे कीं, वेद, धर्मशास्त्र, वेदांग व 'पुराणें' यांच्या आधारानें राजानें न्याय द्यावा. या वाक्यांत 'पुराण' शब्दानें, 'वेद' शब्दाप्रमाणें वाङ्मयाचा एक प्रकार दर्शविला जात असला पाहिजे. आणखी अधिक महत्त्वाची गोष्ट अशी कीं, इसवी सनापूर्वी ४ थ्या किंवा ५ व्या शतकांतील 'आपस्तंब धर्मसूत्र' या धर्मग्रंथांत पुराणांतील दोन उतारे दिले आहेत, इतकेंच नव्हे तर त्यांत प्रत्यक्ष 'भविष्यत्' पुराणांतील एक उतारा दिलेला आहे. आतां हें खरें कीं हा तिसरा उतारा आजच्या उपलब्ध भविष्यपुराण नांवाच्या ग्रंथांत सांपडत नाहीं. व दुसरेहि दोन्ही उतारे आजच्या कोणत्याहि उपलब्ध पुराणांत शब्दशः सांपडत नाहींत. तथापि तत्सदृश वाक्यें पुराणांत आहेत. ज्यांत जगदुत्पत्तीबद्दलच्या जुन्या दंतकथा, देव, योद्धे, संत आणि मानवजातीचे प्राचीन पूर्वज यांचीं कृत्यें, प्रसिद्ध राजवंशाचे आरंभ इत्यादि माहिती भरलेली आहे असे जे जुने धर्मोपदेशपर ग्रंथ त्यांचेंच संशोधन व दुरुस्ती करून केलेली अशीं हल्लींचीं पुराणें होत.

तसेंच महाभारत आणि पुराणें यांच्या परस्पर संबंधावरूनहि असें दिसतें कीं, पुराणें फार पूर्वकालीन असावीं आणि महाभारताच्या समाप्तीपूर्वीं बराच काल तीं अस्तित्वांत खास होतीं. महाभारताला पुराण असेंच म्हटलें आहे इतकेंच नव्हे तर त्याचा आरंभहि अगदीं पुराणाप्रमाणें म्हणजे सूत लोमहर्षणाचा पुत्र उग्रश्रवस् हाच तें सांगणारा असा केला आहे. या उग्रश्रवसला पुराणांचा पूर्ण माहितगार असें म्हटलें असून शौनकानें त्याला कथा सांगण्याकरितां बोलावतेवेळेस असें म्हटलें आहे कीं, "तुझ्या पित्यानें एकदां सर्व पुराणांचें अध्ययन केलें. त्या पुराणांत देवांच्या गोष्टी व ऋषींच्या वंशावळी सांगितल्या आहेत, त्या तुझ्या पित्याच्या तोंडून फार पूर्वीं एकदां आम्ही ऐकल्या होत्या".

अनेक वेळां महाभारतांतील दंतकथांना आरंभ पुढील शब्दांनीं केलेला आहे; "असें पुराणांत ऐकलेलें आहे" गाथा, श्लोक आणि विशेषतः पुराणज्ञात्याच्या तोंडच्या वंशावळीविषयींचे श्लोक दिले आहेत; गद्यात केलेल्या उत्पत्तीच्या वर्णनाला पुराण म्हटलें आहे; जनमेजयाचा सर्पयज्ञ पुराणांत सांगितला आहे. आणि पुराणज्ञात्यांनीं त्याची शिफारस केली आहे; वायूनें सांगितलेल्या पुराणाच्या स्मरणार्थ जगाच्या भूतभविष्य युगांचें वर्णन दिलें आहे आणि हरिवंशांत वायुपुराणाचा उल्लेख आहे, इतकेंच नव्हे तर आजच्या उपलब्ध वायुपुराणाशीं पुष्कळ ठिकाणीं शब्दशः साम्य आहे. पुराणें आणि महाकाव्यें यांतील पुष्कळ दंतकथा आणि बोधपर मजकूर सारखा आहे.

महाभारतांत असलेल्या जुन्या तऱ्हेवर ऋष्यशृंगाची दंतकथा पद्मपुराणांत आहे. महाभारतांत अगदीं अलीकडे घातलेल्या अशा एका श्लोकांत अठरा पुराणांचीं नावें दिलीं आहेत. या सर्व गोष्टींवरून असें दिसतें कीं, पुराणांच्या जातीचें वाङ्मय हें महाभारत पुरें होण्याच्या बरेंच पूर्वीं आस्तित्वांत होतें, व आजच्या उपलब्ध पुराणांतील पुष्कळसा भाग महाभारताहून जुना आहे.

आतां पुराणांपेक्षां महाभारत जुनें आणि महाभारतापेक्षां पुराणें जुनीं, असें जें आपण म्हणतों त्यांत दिसावयास विरोध दिसतो, पण तो खरा नाहीं. कारण महाभारताप्रमाणेंच पुराणांचेंहि एकीकरण थोडेंच झालेलें आहे; आणि पुराणांमध्येंहि जुना आणि नवा भाग शेजारीं शेजारीं आढळतो, आणि ज्या पुष्कळ ठिकाणीं पुराणाचे एकमेकांशीं व महाभारताशीं साम्य आहे, त्या बाबतींत एक ग्रंथ दुसऱ्याच्या आधारानें लिहिला गेला असें म्हणण्यापेक्षां, सर्वच ग्रंथांना निराळाच असा अत्यंत जुना एक मूळ आधार होतो असें मानणें जास्त सयुक्तिक होईल. परंतु आजचीं उपलब्ध पुराणें आणि याच नांवाचे प्राचीन ग्रंथ, हीं दोन्हीं एक नव्हत असेंहि निश्चित ठरवितां येतें; याचें कारण असें कीं, पुराणांतील विषयांवरून पाहतां, 'पुराण' शब्दाची व्याख्या म्हणून पुराणांतच जी दिली आहे त्या व्याख्येबरहुकूम लिहिलेलें एकहि

पुराण नाहीं. अत्यंत जुन्या अशा या व्याख्येप्रमाणें प्रत्येक पुराणांत पांच लक्षणें म्हणजे पांच मुख्य विषय असावयास पाहिजेत, ते असेः-(१) सर्ग, (२) प्रतिसर्ग, (३) वंश, (४) मन्वन्तरें, व (५) वंशानुचरित [ज्या वंशांचा आरंभ सूर्यापासून (सूर्यवंश) आणि चंद्रापासून (सोमवंश) होतो तें]. आजच्या उपलब्ध पुराणांत अंशतः या पांच गोष्टींचें वर्णन सांपडतें; कांहीं पुराणांत या पांच विषयांशिवाय इतर पुष्कळच हकीकत आहे; आणि इतर पुराणांत या पांच गोष्टींचा उल्लेख क्वचितच असून दुसरे निराळेच विषय दिलेले आहेत, परंतु बहुतेक सर्व पुराणांचें विशेष लक्षण असें आहे कीं, तीं विशिष्ट पंथनिदर्शक आहेत. शिव किंवा विष्णु, यांपैकीं कोणत्या तरी देवाच्या पूजेला तीं वाहिलेलीं आहेत. या बहुतेक ग्रंथांत आश्रम आणि जाती यांचे नियमधर्म सांगणारा बराच भाग आहे. शिवाय ब्राह्मणांचे सामान्य संस्कार, विशेषतः श्राद्धकर्में, शिव किंवा विष्णूचीं व्रतें, समारंभ, आणि सांख्य व योगशास्त्रविषयीं वगैरे माहिती दिलेली आढळते.

आजच्या स्थितींतील पुराणांचा काल ठरविण्यास त्यांच्यामध्यें दिलेल्या राजांच्या नामावली फार उपयोगी आहेत. बहुतकरून, जगाच्या आगामि युगांतील होणाऱ्या गोष्टींची भविष्यरूपानें माहिती दिलेली असून सर्वांच्या शेवटीं अनर्थकाल जें कलियुग त्याचें वर्णन करून त्या युगांत क्रूर रानटी लोक राज्य करतील, आणि सर्व धर्म व नीति लयास जाईल असें वर्णन असतें. तसेंच त्यांत इतिहासप्रसिद्ध नंद, मौर्य, आंध्र आणि गुप्त हीं घराणीं आपणांस आढळतात; आणि अगदीं अलीकडील संशोधनावरून असें ठरतें कीं, दिलेल्या राजांच्या कारकीर्दीबद्दलची माहिती पूर्वी मानीत असत तितकी अविश्वसनीय खास नाहीं. व्ही. ए. स्मिथच्या मतें, मौर्यघराण्यासंबंधानें विष्णुपुराण, (इसवी सनापूर्वी ३२६–१८४) व आंध्रघराण्याला (शेवट इ. स २३६) मत्स्यपुराण हा उत्तम आधार आहे. आणि गुप्तघराण्यांतील चंद्रगुप्ताच्या कारकीर्दीचें (इ. स. ३२०–३२६) वर्णन वायुपुराणांत आहे. कांहीं असलें तरी, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे कीं, गुप्तघराण्यानंतर कोणत्याहि घराण्याचा उल्लेख नसून निरनिराळ्या राजांचीं नांवेंच यादीवार दिलीं आहेत. इ. स. ४८० च्या सुमारास स्कंदगुप्त मरण पावला; आणि जरी त्याच्याबरोबरच गुप्तघराणें लयास गेलें नाहीं, तरी श्वेत हूण लोकांच्या स्वाऱ्यांमुळें गुप्तांचें राज्य नष्ट झालें. इ. स. ५०० च्या सुमारास हूणांचा पुढारी तोरमाण हा मध्यहिंदुस्थानांत राज्य करीत होता. स. ५१५ मध्यें त्याच्या मागून त्याचा मुलगा मिहिरकुल राजा झाला. कल्हण या इतिहासकारानें लिहिल्याप्रमाणें, या मिहिरकुलानें आपल्या रानटी लोकांनीं पूर्णपणें व्यापिलेल्या राज्यावर यमाप्रमाणें राज्य केलें; हजारों खुनी लोकांचा गराडा रात्रंदिवस त्याच्या भोंवतीं असे; आणि प्रत्यक्ष बायकामुलांबद्दलहि त्याला दया येत नसे. आणि यावरून अशी कल्पना होते कीं, पुराणांतील कलियुगाचीं वर्णनें हूण लोकांच्या या क्रूर अम्मलावरूनच दिलेलीं असावीं. यावरून हेंहि सिद्ध होतें कीं, आपलीं मुख्य पुराणें आजच्या स्वरूपाचीं इ. सनाच्या ६ व्या शतकांत बनलीं असावीं. पण यामुळें ६ व्या शतकापूर्वीच कांहीं शतकें, पुराणें प्रथम रचिलीं असावीं, आणि त्यांतील चालीरीती आणखी कित्येक शतकांच्या जुन्या असाव्या या म्हणण्यास बाध येत नाहीं. उलट, कांहीं पुराणें अगदींच अलीकडील आहेत, व जुन्या पुराणांतहि पुढील शतकांत कमजास्त फेरबदल केले आहेत हें नाकबूल करतां कामा नये.

परंतु कांहीं असलें तरी, आपलीं पुराणें हीं संस्कृत वाङ्मयाचीं सर्वांत धाकटीं अपत्यें होत, व तीं गेल्या हजार वर्षांत जन्मास आलीं, असें पूर्वी सार्वत्रिक असलेलें व आतांहि बरेंच प्रचलित असलेलें मत मात्र मुळींच टिकण्यासारखें नाहीं. कारण बाण कवीस (इ. स. ६२५ च्या सुमारास) हीं पुराणें चांगलीं अवगत होतीं, आणि त्यानें आपल्या 'हर्षचरित' नांवाच्या ऐतिहासिक अद्भुत गोष्टींत लिहिलें आहे कीं, मी आपल्या मूळच्या गांवांत वायुपुराण ऐकण्यास जात असे. कुमारिलभट्टानें (इ. स. ७५० च्या सुमारास) पुराणांनांच धर्मशास्त्राचा–कायद्याचा–आधार म्हणून मानलें आहे. शंकराचार्य (९ व्या शतकांत) व रामानुज (१२ व्या शतकांत) यांनीं आपल्या तात्त्विक मतांनां पूज्य आधार म्हणून पुराणांचाच उल्लेख केला आहे. तसेंच अरबी प्रवासी अल्बेरूणी (इ. स. १०३० च्या सुमारास) यास पुराणांची बरीच माहिती होतीसें दिसतें. त्यानें अठरा पुराणांची यादी व आदित्य, वायु, मत्स्य आणि विष्णुपुराणांतील उतारे दिले असून, अगदीं अलीकडील विष्णु–धर्मोत्तर (विष्णुपुराणाचा उत्तरार्ध) पुराणाचा तर त्यानें अगदीं बारकाईनें अभ्यास केला आहे असें दिसतें. पुराणें अगदीं अलीकडचीं आहेत असें चुकीचें मत होण्यास आणखी असें कारण दिसतें कीं, शिव आणि विष्णु यांच्या उपासनांचे पुराणांतील धर्मपंथ हे अलीकडील नवे आहेत, असें पूर्वी एक मत होतें. परंतु नव्या संशोधनावरून असें सिद्ध झालें आहे कीं, वैष्णव आणि शैव पंथ हे ख्रि. पूर्वी–कदाचित् बुद्धाच्याहि पूर्वी–पासून निघालेले आहेत.

पुराणें अत्यंत जुनीं आहेत असें धर्मनिष्ठ हिंदू मानतात. ज्या व्यासांनीं वेद व महाभारत लिहिलें त्यांनींच चालू कलियुगाच्या आरंभीं अठरा पुराणें लिहिलीं. हे व्यास म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वर विष्णूचाच अवतार होत; 'कारण महाभारत ग्रंथ दुसरा कोण करूं शकणार?' असें विष्णुपुराणांत म्हटलें आहे. त्याचा शिष्य सूत लोमहर्षण; त्याला त्यांनीं पुराणें सांगितलीं. याप्रमाणें पुराणांचा उगम दैवी आहे. आणि वेदान्तज्ञानी शंकराचार्य यांनींहि देवांचें व्यक्तिशः अस्तित्व सिद्ध करण्याकरितां जेव्हां इतिहास व पुराणें यांचा निर्देश केला, तेव्हां असें म्हटलें आहे कीं, पुराणांनां वेदांचा आधार आहे इतकेंच नव्हे तर समक्ष ईश्वराजवळ बोलणाऱ्या

व्यासांसारख्या लोकांनीं आपल्या इंद्रियजन्यज्ञानाच्या आधारानें पुराणें लिहिलीं आहेत.

वेदांइतकीं पुराणें प्रमाण मानीत नाहींत खास.तरी इतिहास आणि पुराणें हीं वेदांनां कांहीं अंशीं पुरवणीप्रमाणें आहेत. प्रत्यक्ष वेदांचा अभ्यास करण्याचा ज्यांनां अधिकार नाहीं असे शूद्र व स्त्रिया यांच्या उपयोगाकरतां विशेषतः तीं आहेत. एका जुन्या श्लोकांत म्हटलें आहे कीं, " इतिहास व पुराणांनीं वेदांनां बळकटी आणतां येते; कारण अज्ञानी माणसांची वेदांनां भीति असते कीं, ते अज्ञ लोक वेदांनां उपद्रव करतील. " रामानुजांनीं म्हटलें आहे कीं, ' सर्वांत उच्च जें ब्राह्मणांचें ज्ञान तें फक्त वेदाभ्यासानें होतें; आणि इतिहास व पुराणें यांच्यामुळें फक्त पापशुद्धि होते.' याप्रमाणें पुराणांचा पूज्य-ग्रंथांमध्यें दुसरा नंबर आहे, व याचा उलगडा सोपा आहे. कारण आरंभीं पुराणें हें हिंदु धर्माचार्यांचें वाङ्मय नव्हतें. महाकाव्याप्रमाणेंच,जुनें पुराण-काव्य हें सूतांनीं दंतकथांच्या आधारें तयार केलें व संभाळलें आहे. असें म्हणण्याचें कारण असें कीं, बहुतेक सर्व पुराणांत, सूत-लोमहर्षण किंवा त्याचा मुलगा उग्रश्रवस् सौति हा पुराण सांगणारा, असें वर्णन आहे. असें इतक्या वेळां आढळतें कीं, सूत व सौति हीं विशेषनामांप्रमाणें पुराणांत उपयोगांत आणलीं आहेत. पण सूत हा निःसंशय ब्राह्मण नव्हता आणि वेदांशीं त्याचा कांहीं संबंध नव्हता, पण जेव्हां ही पौराणिकांची जुनी परंपरा नष्ट झाली तेव्हां ( त्याचा कालनिर्णय झाला नाहीं ) हे पुराण-ग्रंथ वेदसंपन्न ब्राह्मणांच्या हातीं गेले नाहींत, तर कमी दर्ज्याच्या क्षेत्रांतील जो उपाध्यायवर्ग त्यानें पुराणें कवज्यांत घेतलीं; आणि हे अल्पशिक्षित देवळांतले पूजारी आपापल्या देवळांतल्या देवांची महति गाण्याकडे त्यांचा उपयोग करूं लागले,आणि पुढें पुढें ज्या ठिकाणीं त्यांचा यावर उदरनिर्वाह चाले आणि पुष्कळ वेळां त्यावर ते श्रीमंत बनत अशा त्यांच्या क्षेत्रांची व देवालयांचीच विशेष शिफारस करण्याला या पुराणांचा उपयोग झाला. तरी सुद्धां अगदीं आजपर्यंत पुराणांबद्दल हिंदु लोकांची किती पूज्यबुद्धि आहे, याचें उत्तम उदाहरण म्हणजे मणिलाल एन् द्विवेदी यांनीं सन १८८९ मध्यें स्टॉकहोम येथें भरलेल्या पौरस्त्य विद्वानांच्या काँग्रेसमध्यें दिलेलें व्याख्यान होय. यूरोपीय ज्ञानसंपन्न या मात्यानें त्यांनीं डार्विन, हेकेल, स्पेन्सर आणि क्वाटरफेगीज यांच्या भूस्तरशास्त्र आणि मानुषशास्त्र या विषयांवर भाषण केलें, पण तें असें सिद्ध करण्याकरितां कीं, पुराणांतील जीवाविषयींच्या कल्पना व सृष्टयुत्पत्तीविषयींचें विवेचन हीं शास्त्रीय तत्त्वें आहेत; त्यांत पूर्ण खरेपणा आणि अगाध बुद्धिमत्ता दिसून येते; फक्त मनुष्याला त्याचा बरोबर अर्थ समजला पाहिजे, म्हणजे त्याचा लाक्षणिक अर्थ घेतला पाहिजे.

इतिहासाचीं, विशेषतः धर्माच्या इतिहासाचीं साधनें या दृष्टीनें आपणांस पुराणांचा अत्यंत उपयोग आहे; आणि तो आजपर्यंत झाला आहे त्यापेक्षां अधिक पूर्णपणें अभ्यास झाला पाहिजे. वाङ्मयाच्या दृष्टीनें, पुराणें हे मोठे आल्हाददायक ग्रंथ झालेले नाहींत. ते प्रत्येक बाबतींत बेडौल व बेशिस्त असे झाले आहेत.भाषेविषयीं अत्यंत निष्काळजीपणा आणि काव्य-कला -हीनता, तसेंच पद्यरचना साधण्याकरितां केलेले व्याकरण-दोष, हे पुराण-ग्रंथांतील ठळक ठळक दोष आहेत; त्याप्रमाणें असंख्य अतिशयोक्तीचीं वर्णनें व अव्यवस्थित सरमिसळ माहिती त्यांत आहे. अतिशयोक्तीचीं कांहीं उदाहरणें अशीं:—( १ ) पुरूरवस्बरोबर उर्वशी चार वर्षें सुखविलासांत होती असें खरोखर असतां, विष्णुपुराणांत वर्णन आहे कीं, या प्रणयी जोडप्यानें सुखविलासांत ६१००० वर्षें घालविलीं. ( २ ) जुन्या पुराणांतून फक्त ( सातच ) सप्तपाताळच दिलेले असतां, भागवत-पुराणांत शेकडों-हजारों पाताळ लोक आहेत असें दिलें आहेत; आणि गरुडपुराणांत चौऱ्यांशी लक्ष पाताळांची संख्या आहे.जितकें पुराण मोठें,-बहुतेक पुराण म्हटलें कीं तें मोठें असणारच--तितक्या त्यांत अतिशयोक्तिपूर्ण गोष्टी अधिक असावयाच्या. यावरून असेंच ठरतें कीं अशिक्षित भटभिक्षुक लोकांसारख्या हलक्या दर्ज्याच्या लेखकवर्गाच्या हातून तीं लिहिलीं गेलीं असलीं पाहिजेत. तथापि राजांच्या जुन्या पुष्कळ दंतकथा आणि कांहीं फार जुने वंशावळींचे श्लोक आणि गाथा मूळच्या पुराण-काव्यांत न सांपडतां अलीकडच्या ग्रंथांतून आपणांस उपलब्ध झाल्या आहेत. आणि सुदैवानें पुराण-कारांनीं, मुळींच निवडानिवड करीत न बसतां कोठेंहि चांगलें दिसेल त्याचा अनादर केला नाहीं आणि उपनिषदांतील पुष्कळ वाक्यें जशींच्या तशींच त्यांनीं पुराणांत घेतलीं आहेत; तसेंच जुन्या ऋषींच्या काव्यांतून महत्त्वाच्या कांहीं दंतकथा घेतल्या आहेत.पुराणवाङ्मयाच्या या ओसाड मैदानांत सुद्धा जलमय विश्रांतिस्थानें नाहींत असें नाहीं. आज असलेल्या पुराणांत व्यासकृत पुराणांची एकंदर संख्या अठरा, असे एकमतानें सर्व पुराणांत उल्लेखिलें आहे; तसें त्यांच्या नांवांबद्दलहि बहुतेक पूर्ण एकमत आहे. विशेष गोष्ट अशी कीं, प्रत्येक पुराणांत अठरा पुराणांची तीच तीच यादी दिलेली आहे; जणूं काय पहिलें व शेवटलें असें कोणतेंच नव्हे व प्रत्येक पुराण लिहिलें गेलें तेव्हां बाकीचीं सर्व अगोदर तयारच होतीं; तेव्हां यावरूनहि असेंच सिद्ध होतें कीं, त्यांच्या मूळच्या स्वरूपांत आज आपणांस एकहि पुराण उपलब्ध नाहीं, ( ' अठरा पुराणें ' पहा ) याशिवाय कांहीं पुराणांत ज्यांस उपपुराणें म्हणतात तींहि उल्लेखिलीं असून त्यांची संख्या अठरा म्हणून कांहीं ठिकाणीं दिली आहे. पण पुराणांच्या नांवांच्या बाबतींत जशी बहुतेक पूर्ण एकवाक्यता आहे, तशी उपपुराणांच्या नांवांबद्दल मात्र नाहीं. अठरा मुख्य पुराणें असल्याबद्दल स्पष्ट परंपरा राहिली;परंतु अलीकडील एखाद्या धार्मिक ग्रंथाच्या लेखकास, त्याचा तो ग्रंथ जुन्या अठरा पुराणांपैकीं एखाद्या पुराणाचा भाग आहे असें म्हणणें पसंत वाटलें नाहीं, म्हणजे अशा त्याच्या ग्रंथाची उपपुराणांत

गणना होण्यासारखी आहे. पवित्र तीर्थक्षेत्रांचीं माहात्म्यें म्हणून जे विशेषतः पुष्कळ ग्रंथ झालेले आहेत त्यांची अशीच गोष्ट आहे. याशिवाय शिव, विष्णु वगैरे देवतांचीं पुष्कळ स्तोत्रें, कल्प (धार्मिक विधी), आख्यान, उपाख्यान (दन्तकथा), हीं सर्व एखाद्या मुख्य किंवा उपपुराणांतीलच आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. अठरा पुराणांतील विषयाचा थोडक्यांत सारांश त्या त्या पुराणांच्या नांवाखालीं दिला आहे; उदा० अग्निपुराण, गरुडपुराण इत्यादि. या ठिकाणीं विंटरनिट्झच्या ' हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर ' या ग्रंथाच्या आधारें पुराणांचें बाह्य विवेचन थोडक्यांत केलेलें आहे.

**पुराव्याचा कायदा**—वादाचा निर्णय करतां यावा म्हणून जीं जीं प्रमाणें देतां येतील त्या सर्वांचा " पुरावा " या शब्दांत समावेश होतो. परंतु त्या शब्दांचा कायद्याच्या संकुचित मर्यादेत अर्थ करावयाचा झाल्यास न्यायकोर्टापुढें चाललेल्या खटल्यांत जीं प्रमाणें दाखल करतां येतात त्यास पुरावा असें म्हणावें लागेल. पुराव्याचा कायदा म्हणजे न्यायकोर्टांत पुरावा कसा दाखल करावा या पद्धतीचा कायदा होय. न्यायकोर्टांत कोणत्या प्रकारचा पुरावा जमेस धरावा, कोणत्या वस्तुस्थितींत व कशा तऱ्हेनें तो पुरावा कोर्टापुढें मांडावा व त्याची किंमत कशी करावी इत्यादि गोष्टी या कायद्यांत ठरविल्या असतात.

पा श्चा त्य का य द्या चा इ ति हा स.—या विषयावरील इंग्रजी कायदा फार अलीकडील आहे. इतर अनेक कायद्यांप्रमाणें याचें मूळहि रोमन कायद्यांत आहे. असें जरी आहे तरी इंग्रजी न्यायाधीशांनीं त्यांत बरीच भर घातली. पूर्वकालीन टयूटन लोकांस हल्लींची पुराव्याची कल्पना व न्यायकोर्टांत खटले चालविण्याची रीत माहीत नव्हती. त्यांना जें काय माहीत होतें तें " प्रमाणें " होय. " प्रमाणें " दोन प्रकारचीं होतीं; एक " दिव्य करून दाखविणें " व दुसरें " शपथ घेणें ". पहिला प्रकार म्हणजे " अग्निदिव्य " " तप्तदिव्य " इत्यादिकांनीं आपल्या म्हणण्याची शाबिती करणें व दुसरा प्रकार म्हणजे आपलें म्हणणें सिद्ध करण्याकरितां शपथ घेणें.

बाराव्या-तेराव्या शतकांमध्यें ही न्याय करण्याची पद्धत बंद पडली. व पंचसभेमार्फत चौकशी करण्याचा प्रचार सुरू झाला. स्थानिक पंचांनीं शपथेवर दिलेल्या अभिप्रायावरून निकाल देण्याचा प्रघात प्रथम नॉर्मन लोकांनीं इंग्लंडमध्यें सुरू केला. दुसऱ्या हेनरीनें फिरत्या न्यायसभांची स्थापना करून पक्षकारांस आपल्या ग्रामस्थांकडून न्याय मिळविण्याचा मार्ग खुला करून दिला. फौजदारी खटल्यांत जर अशा तऱ्हेनें मिळविलेला न्याय अखेरचा मानण्यांत आला असता तर ज्याप्रमाणें यूरोपखंडांत इतरत्र चालू असलेल्या धर्मगुरूंमार्फत चौकशी करण्याच्या सभा म्हणजे प्रत्यक्ष यमपुरींतील न्यायसभाच झाल्या त्याप्रमाणें इंग्लंडांतील फौजदारी कचेऱ्या झाल्या असत्या. सुदैवानें तसा प्रकार झाला नाहीं, ज्यांचा वादाशीं कांहीं संबंध असे त्या पंचांची साक्ष जमेस न धरतां तिऱ्हाईत पंचांकडून फिरून निकाल लावून घ्यावा लागत होता. याप्रमाणें पुढें पुढें पंचांनीं स्वतःच्या माहितीचा उपयोग न करतां त्यांच्या पुढें मांडण्यांत आलेल्या पुराव्यावरूनच आपला अभिप्राय द्यावा अशा तऱ्हेचा प्रघात पडला. त्याचप्रमाणें यूरोपखंडांत इतरत्रहि फौजदारी खटल्यांत पुरावा देण्याच्या पद्धतीचा कायदा प्रचारांत आला. इंग्लंडमध्यें या विषयावरील व्यवस्थित रीतीनें लिहिलेला ग्रंथ म्हटला म्हणजे चीफ बॅरन गिलबर्ट याचा होय व तो इ. स. १७६१ मध्यें प्रसिद्ध झाला. त्यानंतर बेन्थॅमचा ग्रन्थ झाला. व तो जे. एस्. मिल्ल यानें इ. स. १८२७ मध्यें प्रसिद्ध केला. त्यावेळीं प्रचलित असलेल्या या विषयावरील कायद्यावर त्यांत बरीच कडक टीका आहे. त्यानंतर इ. स. १८३३, १८४०, १८४३, १८५१, १८५३, १८५७, १८५९, १८६५, १८६९, १८७४, १८७७, व शेवटीं १८९८ या वर्षी या विषयावरील कायद्यांत दुरुस्ती होत होत त्यास हल्लींचें स्वरूप प्राप्त झालें आहे.

पु रा व्या च्या का य द्या व री ल वा ङ्म य.—या विषयावर अनेक ग्रंथकारांनीं सामान्य ग्रंथ लिहिले आहेत. वर सांगितल्याप्रमाणें पहिला ग्रंथ चीफ बॅरन गिलबर्ट याचा होय. त्यानंतर इ. स. १८१४ त फिलिप्स; स. १८२४ मध्यें स्टार्की, १८२७–३५ मध्यें रॅास्को; १८४२ मध्यें ग्रीनलीफ व १८४९ मध्यें बेस्ट, इतक्या ग्रंथकारांनीं या विषयाचें विवेचन केलें आहे. इ. स. १८७६ मध्यें हिंदुस्थान सरकारच्या स. १८७२ च्या पुराव्याच्या ॲक्टवर सर जेम्स फिट्झ. जेम्स स्टीफन यानें पुराव्याच्या कायद्यांत वर्गीकृत संग्रह प्रसिद्ध केला. हा स्टीफननें लिहिलेला ग्रंथ फार सुंदर आहे परंतु त्यांत एक दोष असा आहे कीं, " ग्राह्य " (ॲड्मिसीबल) या शब्दाच्या जागीं व त्या शब्दाच्या अर्थी त्यानें " सुसंबद्ध " (रिलेवंट) हा शब्द वापरल्यामुळें वाचकांचा जेथें तेथें घोंटाळा होतो.

पु रा व्या च्या का य द्यां ती ल नि य म.—कायद्याचे प्रश्न कोणते व वस्तुस्थितीचे प्रश्न कोणते याचा निर्णय करणें हें न्यायकोर्टाचें मुख्य काम असतें. कायद्याच्या प्रश्नाचा विचार करणें हें न्यायाधिशाचें काम व वस्तुस्थितीच्या प्रश्नांचा विचार पंचांनीं करावयाचा असतो. पंचमार्फत निकाल करण्याच्या खटल्यांतच प्रथम पुराव्याचा कायदा उदयास आला. पंचांमार्फत खटल्याचा निकाल व्हावयाचा असला तर पंचांनीं कांहीं गोष्टी विचारांत घेऊं नयेत अशाबद्दल कांहीं निर्बंधकारक नियम आहेत पुरावा म्हणून दाखल करण्यास ग्राह्य अशा गोष्टी कोणत्या हें ठरविणें असलें म्हणजे कोर्टापुढें असलेल्या कज्जाशीं त्यांचा किती संबंध आहे हें लक्ष्यांत घेतलें पाहिजे. त्याज्य पुरावा

कोणता यासंबंधींचे नियम पंचांस खटला समजून देतांना न्यायाधीश त्यांस सांगत असत. त्याज्य पुरावा कोणता हें नीट लक्ष्यांत आलें म्हणजे ग्राह्य पुराव्याचा नीट विचार करणें सुकर असतें म्हणून या पुराव्याच्या कायद्यांतील निर्णयकारक नियमांचें महत्त्व आहे. दिवाणी व फौजदारी खटल्यांत पुराव्याच्या कायद्यांतील तत्त्वाच्या बाबतींत फरक नाहीं. फौजदारी कायद्यांत गुन्हेगारांचे कबुलीजबाब व आसन्नमरणस्थितींत दिलेल्या जबान्या याविषयीं मात्र कांहीं विशिष्ट नियम आहेत.

प्रास्ताविकः—पुराव्याच्या सदरांत पडणाऱ्या किंवा त्याच्याशीं निकट संबंध असणाऱ्या कांहीं प्रश्नांचा विचार या प्रकरणांत करावयाचा आहेः—

(अ) कायद्याचा व वस्तुस्थितीचा प्रश्नः—पुरावा हा फक्त वस्तुस्थितीबद्दल द्यावयाचा असतो. म्हणून वरील दोन प्रश्नांची नीट फोड करणें जरूर आहे. पंचांनीं निर्णय करावयाचे प्रश्न ते वस्तुस्थितीचे प्रश्न व न्यायाधिशानें निर्णय करावयाचे ते कायद्याचे प्रश्न अशा तऱ्हेनें या दोन प्रश्नांतील फरक एक वेळ दाखविण्यांत येत होता. परंतु ही फरक दाखविण्याची तऱ्हा निर्दोष नाहीं. पुष्कळ वेळां न्यायाधीश हे वस्तुस्थितीच्या प्रश्नांचा निर्णय करतात व पंचहि जेव्हां सामान्य तऱ्हेनें आपला निर्णय सांगतात तेव्हां कायद्याच्या प्रश्नांचे निर्णय करण्याचें काम आपल्या हातीं घेतात असें दिसून येतें. या दोन प्रश्नांच्या सीमेवर असलेले प्रश्न म्हणजे 'कायदा' व वस्तुस्थिति यांच्यामधील संमिश्र प्रश्न होत; असले प्रश्न "आवश्यक गोष्टी," "योग्य काळजी," "निष्काळजीपणा," "युक्तायुक्तपणा," व "युक्त व संभवनीय कारण" इत्यादि विषयांचे निर्णय करण्याच्या वेळेस उत्पन्न होतात. हे प्रश्न निरनिराळ्या वेळीं भिन्न भिन्न तऱ्हेनें सोडविण्यांत आले आहेत. असे भानगडीचे प्रश्न उपस्थित झाले म्हणजे विशेष खोल पाण्यांत न शिरतां शहाण्या व समंजस माणसानें कसें वागावें हें लक्ष्यांत घेऊन न्यायाधिशाच्या नेतृत्वाखालीं पंचांनीं अशा गोष्टींचा विचार करावा असें ठरविण्याकडे अलीकडील कायद्याचा कल होत चालला आहे. साधारणपणें असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं पंच हे न्यायाधिशांच्या नियंत्रणाखालीं त्यांच्याशीं सहकारिता करतात परंतु न्यायाधिशांनीं पंचांस किती कह्यांत ठवावें हें न्यायाधिशांच्या स्वभाववैचित्र्यावर अवलंबून असतें.

न्यायाधिशांनीं गृहीत धरून चालावयाच्या गोष्टीः—वरील विषय हा पुराव्याच्या कायद्याच्या सदरांत पडतो किंवा 'कायद्याची किंवा न्यायाची अनुमानपद्धति' या सामान्य सदरांत पडतो हा वादग्रस्त प्रश्न आहे. प्रत्येक गोष्ट पुराव्यानें शावीत झाली पाहिजे असें म्हणणें असमंजसपणाचें होईल. कित्येक गोष्टी गृहीत धरूनच चालावें लागतें.सारासार विचार, मनुष्याच्या स्वभावांचें व त्यांच्यांतील व्यवहारांचें सामान्य ज्ञान, आणि प्रत्येकास माहीत असलेल्या गोष्टींचे ज्ञान इत्यादि सामुग्री बरोबर घेऊनच प्रत्येक न्यायाधीश न्यायासनावर बसत असतो. परंतु सामान्य ज्ञानाचें क्षेत्र अमर्यादित असल्यामुळें गृहीत धरून चालावयाच्या गोष्टींचें क्षेत्र न्यायाधीश व कायदे करणाऱ्या संस्था आपल्या सोयीप्रमाणें संकुचित किंवा विस्तृत करतात. अशा गोष्टी कोणत्या हें सविस्तर देणें शक्य नाहीं. त्या, त्या विषयावरील ग्रंथांत सहज सांपडतील.

अनुमानेंः—अमुक एका गोष्टींत अमुक परिणाम झाला म्हणून तसल्या प्रकारच्या अन्य गोष्टींत तसलाच परिणाम बहुधा घडून येईल असा स्वतःच्या अवलोकनानें तर्क करणें यास अनुमान म्हणतात. हाहि "सामान्य अनुमानपद्धति" या विषयाचाच एक भाग आहे.वस्तुस्थितीच्या अनुमानापेक्षां कायद्याच्या किंवा कायद्यांतील अनुमानांमध्यें विशेष अर्थ आहे. अनुमानित गोष्ट साफ खोटी आहे असें ठरेपर्यंत अमुक एका गोष्टीपासून किंवा अमुक एका पुराव्यांतून अमुक एक अनुमान न्यायाधीशांनीं काढलेंच पाहिजे अशा तऱ्हेचा कायद्यांतील नियम यास कायद्याचें अनुमान असें म्हणतात. सार्वजनिक हितसंबंधाच्या बाबी लक्ष्यांत घेऊन न्यायाधिशांनीं व कायदे करणाऱ्या संस्थांनीं वरील प्रकारचे निश्चित स्वरूपाचे निर्बंध केले आहेत. अशा जातीचे कांहीं नियम तर प्रच्छन्न पण निश्चित स्वरूपाच्या कायद्याप्रमाणें (बंधनकारक) असतात. ते नियम म्हणजे "कायद्यांतील निर्विवादक अनुमानाचे नियम" होत. जसें सात वर्षांच्या आंतील मुलाकडून गुन्हाच होत नाहीं असें कायद्याचें अनुमान आहे. प्रत्येकास कायदा माहीत असतो म्हणजे कायद्याचें अज्ञान हें तो मोडण्याला पुरेसें कारण नाहीं असें कायद्याचें अनुमान; इत्यादि. अशा तऱ्हेचें कायद्याचें अनुमान म्हणजे कांहीं गोष्टींनां इतकें महत्त्व द्यावयाचें कीं ज्यांस अहितकारक अशा तऱ्हेचें हें कायद्याचें अनुमान काढण्यांत येतें त्याजवर तें अनुमान चुकीचें आहे हें सिद्ध करून देण्याचा बोजा टाकणें. याप्रमाणें 'अनुमानें', व "पुराव्याचा बोजा" या सदरांचा अगदीं निकटचा संबंध आहे आणि कायद्यानें एका पक्षाला अनुकूल असें अनुमान काढणें म्हणजेच पुराव्याचा बोजा विपक्षावर टाकणें हें होय.- अशा तऱ्हेचीं सर्वसामान्य कायद्याचीं अनुमानें पुढें दिल्याप्रमाणें असतात. जसें कोणत्याहि होऊन गेलेल्या खटल्याचें काम व्यवस्थित चाललें होतें; कोणत्याहि हुद्द्यावर असलेल्या कामगाराची नेमणूक योग्य रीतीनें केली होती; मातेच्या वैवाहिक स्थितींत किंवा पति मृत झाला तेव्हां गरोदर असलेल्या मातेपासून झालेली संतति औरस समजणें, आणि "जिवन्त" किंवा "मृत" याविषयीं अनुमानें न्यायाधिशांनीं ठराविक नियमाप्रमाणेंच काढावीं लागतात; वगैरे वगैरे.

पुराव्याचा बोजाः—याचा दोन तऱ्हेनें अर्थ होतो. एक वादांतील मुख्य मुद्दा शाबीत करण्याची जबाबदारी व दुसरा

वादांतील कोणत्याहि मुद्दयाचा पुरावा देण्याची जबाबदारी. पहिल्या प्रकारची जबाबदारी सामान्यतः वादी किंवा फिर्यादी यांजवर असते. दुसऱ्या प्रकारची जबाबदारी खटला चालू असतांना एका पक्षावरून दुसऱ्या पक्षाकडे वेळोवेळीं बदलत असते. याचा सामान्य नियम म्हटला म्हणजे जो कोणी कांहीं विधान करतो त्यानें तें पुराव्यानें शाबीत केलें पाहिजे. कांहीं विशिष्ट प्रकारच्या खटल्यांतील अनुमानांचे नियम, किंवा अमक्यावरच अमुक मुद्दा शाबीत करण्याचा बोजा पडावा अशा तऱ्हेचे कायद्यांतील निर्बंध हे वरील सामान्य नियमास अपवाद होत.

पुराव्याचे प्रकारः—पुराव्याचे तोंडी व लेखी असे साधारणपणें दोन वर्ग करतात. याशिवाय ज्या वस्तू किंवा जीं ठिकाणें न्यायाधीश किंवा पंच स्वतः जाऊन पहातात व आपली खात्री करून घेतात तो पुराव्याचा तिसरा प्रकार आहे. त्यास बेन्थॅम हा न्यायाध्यक्ष 'प्रत्यक्ष पुरावा' म्हणतो. तोंडी पुरावा म्हणजे साक्षीदारांनीं कोर्टांत दिलेल्या जबान्या व लेखी पुरावा म्हणजे पुराव्यांत दाखल केलेले कागदपत्र. अव्वल किंवा दुय्यम असे लेखी पुराव्याचे दोन पोटविभाग आहेत. दुसऱ्या एका दृष्टीनें पुराव्याचे विभाग म्हणजे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष किंवा परिस्थितीचा पुरावा. येथें प्रत्यक्ष म्हणजे साक्षी–प्रत्यक्ष असा आहे. अप्रत्यक्ष किंवा परिस्थितीचा पुरावा म्हणजे ज्याच्यावरून मुख्य मुद्दयाविषयीं तर्क करतां येतो अशा आनुषंगिक गोष्टींचा पुरावा होय. पंच प्रत्यक्ष पुराव्याला अधिक मान देतात. कांहीं कांहीं बाबतींत प्रत्यक्ष पुराव्यापेक्षां अप्रत्यक्ष पुरावा अधिक विश्वसनीय असतो. पॅलेच्या मताप्रमाणें याचें कारण असें आहे कीं, साक्षीदार जसें खोटें बोलूं शकतात व बोलतात तशी वस्तुस्थिति खोटें बोलत नाहीं. परंतु वस्तुस्थितीवरून पुष्कळ वेळां फसगत होते, म्हणजे वस्तुस्थितीवरून काढलेलीं अनुमानें बऱ्याच वेळां चुकीचीं ठरतात.

पुराव्याच्या अग्राह्यतेबद्दलचे हे नियम पुष्कळसे संदिग्ध, गुंतागुंतीचे, क्लिष्ट व अपवादमय आहेत- (अ) वादाशीं ज्यांचा संबंध नाहीं अशा गोष्टींचा पुरावा ग्राह्य नाहीं. (आ) त्या त्या स्थितींत मिळण्यासारखा अत्युत्कृष्ट असा जो पुरावा असेल तोच दिला पाहिजे. (इ) ऐकीव पुरावा हा पुरावाच नव्हे. (ई) खाजगी मत हाहि पुरावा नव्हे.

( अ ) वादाशीं ज्या ज्या गोष्टींचा संबंध असतो त्यांचा पुरावा देण्यास हरकत नाहीं हा नियम फारच व्यापक आहे. वादाशीं ज्याचा संबंध आहे अशा गोष्टी कांहीं पुराव्यांत ग्राह्य असतात व कांहीं अग्राह्य असतात. या ग्राह्य व अग्राह्य गोष्टींची विभागणी करणारी रेषा फार अंधुक आहे. ज्यांचा वादाशीं संबंध आहे व ज्या पुराव्यांत अग्राह्य आहेत अशा गोष्टी म्हणजे ज्या, पंचांचा गैरसमज करूं शकतील, वादाचें स्वरूप भानगडीचें करतील व ज्या केवळ थोड्या, लांबून लांबून आणि काल्पनिक महत्वाच्या असतात. उदाहरणार्थ, शील व वर्तणूक यांविषयींच्या पुराव्याचे नियम या सदरांत येतात. अमुक एका मनुष्यानें एक गोष्ट केली किंवा न केली असा वाद उपस्थित झाला तर ती गोष्ट करण्यासारखें किंवा न करण्यासारखें त्याचें शील किंवा त्याची वर्तणूक आहे असला पुरावा ग्राह्य नाहीं. या नियमाला तीन अपवाद आहेत–( १ ) सर्व फौजदारी खटल्यांत गुन्हेगारास अनुकूल असा त्याच्या शीलाचा किंवा सद्वर्तनाचा पुरावा ग्राह्य असतो, (२) जबरीसंभोगाच्या खटल्यांत गुन्हेगारास विरुद्ध पक्षाच्या बाईच्या अनीतिमत्तेचा पुरावा देण्याचा हक्क असतो, व (३) पूर्वीचा शपथेवर सांगणारा साक्षीदार विश्वसनीय नाहीं अशाबद्दल दुसरा साक्षीदार कोर्टापुढें आणण्यास हरकत नाहीं. बदनामीसारख्या खटल्यांत म्हणजे ज्यांत अमुक एका मनुष्याची वर्तणूक कशी आहे हाच मुख्य वादाचा प्रश्न असतो तेव्हां वर दिलेला पुराव्याच्या अग्राह्यतेचा नियम लागू पडत नाहीं, किंवा जेव्हां अनुकसानीच्या किंवा व्यभिचाराच्या प्रश्नाबद्दल वाद असतो म्हणजे आरोपीच्या वर्तणुकीवरून अनुकसानीची रक्कम ठरवावयाची असते तेव्हां आरोपीच्या वाईट वर्तणुकीचा पुरावा देण्यास हरकत नसते. त्याचप्रमाणें अमुक एक मनुष्य एका विशिष्ट प्रसंगीं अमुक एका तऱ्हेनें वागला असला पाहिजे हें सिद्ध करण्याकरितां तो तसल्याच प्रसंगीं तसाच वागला होता असा पुरावा देतां येत नाहीं, परंतु या सामान्य नियमाचा फार काळजीपूर्वक अर्थ केला पाहिजे. जेव्हां अनेक गुन्ह्यांचा एकमेकांत असा कांहीं गुंतागुंतीचा संबंध असतो कीं, ते सर्व मिळून एका स्वतंत्र व्यवहाराचे पोटविभाग होतात तेव्हां एका गुन्ह्याचा पुरावा दुसऱ्या गुन्ह्याचें प्रमाण म्हणून देतां येतो. त्याचप्रमाणें जेव्हां एखाद्या मनुष्यानें अमुक एक कृत्य केलें हें सिद्ध झालेलें असतें, आणि प्रश्न म्हणून इतकाच उरतो कीं तें कृत्य करतांना त्याची मानसिक स्थिति कशी होती, म्हणजे त्यानें जें कृत्य केलें तें जाणूनबुजून केलें, कांहीं हेतूनें केलें, किंवा लबाडीनें केलें किंवा अशाच कांहीं अन्य कारणांनीं केलें; तेव्हां अन्य प्रसंगीं त्याची मानसिक स्थिति कशी होती हें सिद्ध करण्याकरितां त्यानें अन्य प्रसंगीं तसलीं कृत्यें केलीं अशाबद्दलचा पुरावा द्यावा. चोरीचा माल घेण्याबद्दलच्या किंवा ताब्यांत असल्याबद्दलच्या खटल्यांत आरोपीच्या ताब्यांत अन्य चोरीचा माल असल्याबद्दल किंवा लबाडी अथवा अप्रामाणिकपणा ज्यांत आहे अशा गुन्ह्याबद्दल त्यास एक वेळ सजा झाली होती अशा तऱ्हेचा पुरावा देण्यास कायद्याची परवानगी आहे. याप्रमाणेंच जेव्हां अमुक एका मनुष्यानें एखादा गुन्हा केला किंवा नाहीं असा प्रश्न उपस्थित होतो तेव्हां गुन्हा करण्याचा हेतु, किंवा गुन्ह्याची पूर्वतयारी किंवा गुन्हेगाराची गुन्हा केल्यानंतरची वर्तणूक यांविषयीं पुरावा देण्यास हरकत नाहीं.

त्या त्या वस्तुस्थितीमध्यें जो उत्तमांत उत्तम असा पुरावा मिळण्यासारखा असेल तोच द्यावा. हा नियम लेखी पुराव्याच्या

सदरास चांगला उपयोगी पडतो. जसें अव्वल दस्तैवज जेव्हां उपलब्ध असतो तेव्हां त्यांतील मजकुरासंबंधानें त्या दस्तैवजाखेरीज इतर गौण असा पुरावा देता येत नाहीं.

ऐकीव पुरावाः—वादाच्या प्रश्नासंबंधीं जेव्हां एखादा साक्षीदार दुसऱ्यानें सांगितलेली गोष्ट सांगूं लागतो तेव्हां त्या पुराव्यास ऐकीव पुरावा म्हणतात. असला पुरावा जमेस धरूं नये असा नियम आहे. परंतु या नियमास अनेक अपवाद आहेत; ते असेः—

(१) कांहीं शपथेवर केलेलीं विधानेंः—पुष्कळ वेळां ज्यांचा पुरावा महत्त्वाचा आहे परंतु ज्यांस कोर्टापुढें येतां येत नाहीं किंवा भयंकर अडचण, विलंब व खर्च यांवाचून ज्यांस आणतां येत नाहीं अशांनीं केलेलीं विधानें पुराव्यांत दाखल करून घ्यावीत, परंतु त्यांचा उपयोग करतांना विशेष दक्षता व खबरदारी घेतली पाहिजे.

(२) मृत्यु नजीक असतां केलेलीं विधानेंः—मृत्यूच्या कारणाविषयीं किंवा ज्या योगानीं मृत्यु घडला त्या व्यवहाराच्या वस्तुस्थितीविषयीं मृतानें केलेलें विधान त्या मृताच्या खुनाच्या खटल्यांत पुरावा म्हणून दाखल करतां येतें. परंतु मरणोन्मुख मनुष्य मरणार ही गोष्ट निश्चित पाहिजे व फिरून जगण्याची त्यानें सर्वस्वी आशा सोडलेली असली पाहिजे.

(३) वंशावळीच्या खटल्यांतील विधानेंः—वादाचा प्रश्न उपस्थित होण्यापूर्वी विधान केलें असल्यास किंवा ज्याच्याविषयीं तें विधान केलें असेल त्याचा विधान करणारा हा नातेवाईक असेल-मग विधान करणारानें तें विधान स्वतःच्या ज्ञानानें केलेलें असो किंवा वंशपरंपरेतील आख्यायिकेवर विश्वासून केलेलें असो-तर वंशावळीच्या प्रश्नासंबंधीं मृत माणसानें केलेलें तसलें विधान पुराव्यांत ग्राह्य धरलें जातें.

(४) सार्वजनिक हितसंबंधांच्या बाबींत केलेलीं विधानेंः-नांवलौकिकाच्या बाबतींत एखादा सार्वजनिक हक्क किंवा रूढी यांच्या अस्तित्वाबद्दल सामान्य जनसमूहाच्या मताच्या बाबतींत मृत माणसांनीं केलेलीं विधानें पुराव्यांत ग्राह्य धरतात.

(५) कामावर असतां केलेलीं विधानेंः—कामावर रुजूं असता तें काम करण्याच्या प्रसंगानें एखाद्यानें जर एखाद्या गोष्टीसंबंधानें एकादें विधान केलें असेल व तें करणारानें आपल्या स्वतःच्या माहितीवरून केलेलें किंवा गोष्ट घडण्याच्या सुमारास केलेसें दिसत असेल तर तो मनुष्य मृत झाल्यावरहि त्याचें विधान पुराव्यांत ग्राह्य होतें.

(६) स्वहिताविरुद्ध केलेलीं विधानेंः—स्वतःच्या आर्थिक किंवा मालकी हिताविरुद्ध मृतानें केलेलें विधान पुराव्यांत ग्राह्य असतें. जेव्हां असलें विधान ग्राह्य होतें तेव्हां तें सर्वच्या सर्व ग्राह्य होतें-मग त्याचा कांहीं भाग विधान करणाऱ्याच्या तर्फेचा असल्यामुळें त्याचा एकंदर परिणामहि त्यास अनुकूल झाला तरी हरकत नाहीं.

(७) सार्वजनिक दस्तैवजः—हे दस्तैवज लिहिणारे अस्तित्वांत असोत अगर नसोत, कामावर असोत अगर नसोत, त्यांनीं आपल्या स्वतःच्या माहितीनें ते लिहिले होते याविषयीं पुरावा असो अगर नसो ते पुराव्यांत ग्राह्य आहेत.

(८) कबुलीः—खटल्यांतील पक्षकारांनीं किंवा ज्यांचीं विधानें पक्षकारांस बंधनकारक होतील अशा इसमांनीं पक्षकारांच्या हिताविरुद्ध केलेलीं विधानें. असलें विधान पुराव्यांत दाखल करावयाचें असल्यास तें सर्वच्या सर्व दाखल झालें पाहिजे असा ज्याच्या विरुद्ध तें दाखल करणें असेल त्यास हक्क असतो पुराव्यांत दाखल केलें नाहीं अशा शर्तीवर जर एखादें विधान केलें असेल तर मात्र तें पुराव्यांत देतां येत नाहीं. असल्या विधानांस "बंधनकारक नसलेलीं विधानें" असें म्हणतात.

(९) आरोपीचे कबुलीजबाबः—गुन्ह्याची कबुली देणाऱ्या व्यतिरिक्त दुसऱ्या कोणाच्याहि विरुद्ध असा कबुली जबाब उपयोगांत आणतां येत नाहीं असा सामान्य नियम आहे. परंतु कबुलीजबाब साथीदारासमक्ष दिला असेल तर त्याच्या त्यावेळच्या वर्तणुकीचा तो कबुली जबाब पुरावा होऊं शकतो. कबुली जबाब पुराव्यांत दाखल होण्यास ते आपखुषीनें केले असले पाहिजेत.

(१०) जेव्हां एखादी गोष्ट सिद्ध करावयाची असेल तेव्हां ती गोष्ट करणारांनीं, किंवा करणाऱ्याला जर त्या गोष्टीचा खुलासा होईल अशीं विधानें केलीं असतील तर तीं पुराव्यांत द्यावीत.

(११) जबरीसंभोगाच्या किंवा तसल्या इतर गुन्ह्यांतील तक्रारीः—असल्या तक्रारी पुराव्यांत ग्राह्य धरण्याचें कारण फक्त फिर्यादीची कोर्टापुढें दिलेली जबानी किंवा तिची त्या कृत्याला संमति नव्हती या गोष्टीशीं त्या तक्रारी सुसंबद्ध आहेत कीं नाहींत हें दाखविण्याकरितांच होय.

खासगी मतः—साक्षीदारानें किंवा पक्षकारानें किंवा कोणीहि सामान्य मनुष्यानें आपलें खाजगी म्हणजे वैय्यक्तिक मत देऊं नये हा नियम खरा परंतु यास अपवाद आहे. कोणत्याहि विषयाचें विशिष्ट ज्ञान संपादन केलेल्या निष्णातानें आपलें खाजगी मत द्यावें.

लेखी पुरावाः—कांहीं अडचणीच्या वेळा अपवाद म्हणून सोडून दिल्या तर लेखी पुराव्याच्या बाबतींत सर्वसामान्य नियम म्हटला म्हणजे अव्वल दस्तैवज पुराव्यांत दाखल केला पाहिजे. वर सांगितलेल्या अपवादक वेळीं अव्वल दस्तैवजांतील मजकूर त्यांच्या नकलेनें किंवा तोंडी साक्षीनें शाबीत केला तरी चालतो. खाजगी दस्तैवजांच्या बाबतींत असल्या अपवादक वेळा पुढील प्रसंगीं धरण्यांत येतातः—

(अ) जेव्हां अव्वल दस्तऐवज विरुद्ध पक्षाच्या कबज्यांत आहे असें दिसतें किंवा सिद्ध करून दाखविलें असतें आणि

योग्य नोटीस दिली असतांहि विरुद्ध बाजू तो कोर्टांत हजर करीत नाहीं.

( आ ) जेव्हां एखादा अव्वल दस्तऐवज तिऱ्हाइताच्या ताब्यांत असतो व तो त्यानें कोर्टांत हजर करावा अशाबद्दल त्याच्यावर कोणतेंहि कायदेशीर बंधन नसतें किंवा त्याच्यावर साक्षीसमन्स बजावलें असतां तो कोर्टांत हजर राहून दस्तऐवज जवळ असल्याबद्दल शपथेवर सांगतो परंतु तो कोर्टांत हजर करण्याचें नाकारतो.

(इ) पूर्ण तपास करूनहि जेव्हां अव्वल दस्तऐवज मिळत नाहीं किंवा तो नाहींसा झाला किंवा नाहींसा केला असें मानण्यास सबळ जागा असते.

( ई ) जेव्हां अव्वल दस्तऐवज एका जागेवरून दुसऱ्या जागेवर उचलून नेतां येण्यासारखा नसेल किंवा तो ज्या प्रदेशांत असेल तेथून हलविण्याची परवानगी नसेल.

( उ ) जेव्हां एखाद्या दस्तऐवजाच्या शाबितीकरितां कायद्यानें निराळा मार्ग ठरवून ठेवलेला असतो.

( ऊ ) जेव्हां अव्वल दस्तऐवज म्हणजे बँकेच्या बुकांतील एखादी नोंद असते व ती सिद्ध करण्याचा मार्ग कायद्यानें ठरविलेला असतो.

खाजगी दस्तऐवजाच्या बाबतींत वर निर्दिष्ट केलेल्या प्रसंगीं अव्वल दस्तऐवजाचें कार्य दोन तऱ्हांनीं भागवितां येतें:—

( १ ) अव्वल दस्तऐवजाची नक्कल दाखल करणें व ती मूळाबरोबर असल्याबद्दल साक्षीदाराच्या जबानीवरून सिद्ध करणें.

( २ ) जेव्हां अशी नक्कल देणेंहि शक्य नसेल तेव्हां ज्यानें अस्सल दस्तऐवज पाहिला आहे अशा साक्षीदारास बोलावून त्याच्याकडून त्यांतील मजकूर वदविणें.

सार्वजनिक दस्तऐवज पुराव्यांत दाखल करण्याचा प्रकार असा आहे कीं योग्य कबजांतून एखाद्या साक्षीदारानें तो हजर करावा व पाहिजे असलेला दस्तऐवज तोच आहे असें त्या साक्षीदारानें सांगावें. सार्वजनिक दस्तऐवज नेहमींच वर सांगितलेल्या दोन प्रकारांनीं ( म्हणजे त्याची नक्कल दाखल करून किंवा तोंडी पुराव्यानें ) सिद्ध करितां येतात. परंतु कोणते सार्वजनिक दस्तऐवज कोणत्या रीतीनें दाखल करावेत हें कायद्यानें ठरविलेलें असतें. हें ठरविणारा कायदा नसेल तर ज्या कामदाराच्या किंवा अंमलदाराच्या कबजांत तो दस्तऐवज असेल त्यानें दिलेली सहीशिक्क्याची नक्कल दाखल केली म्हणजे दुसऱ्या कोणत्याहि प्रकारच्या पुराव्याची जरूर न लागतां ती नक्कल पुराव्यांत ग्राह्य होते.

एखाद्या दस्तऐवजावर साक्षीदारांनीं साक्षी घातल्या पाहिजेत असा कायद्याचा निर्बंध असला तर तो दस्तऐवज झाल्याबद्दलची बाब सिद्ध करण्याकरितां साक्ष घालणाऱ्या साक्षीदारास बोलावणें आवश्यक असतें. परंतु या नियमास दोन अपवाद आहेत ते:—

( १ ) साक्ष घालणारा कोणीच साक्षीदार हयात नसेल, किंवा साक्ष देण्याच्या स्थितींत नसेल तर निदान एका साक्षीदाराची सही तरी त्याच्या हातची आहे असें सिद्ध करावें व दस्तऐवज करून देणाऱ्याची सही, तो करून देणाऱ्याच्या हातची आहे हें सिद्ध करावें.

( २ ) एखादा दस्तऐवज तीस वर्षांचा जुना असला व कोर्टाच्या मताप्रमाणें तो योग्य ठिकाणाहून प्रगट झाला असला तर साक्ष घालणाऱ्या साक्षीदारास साक्षीला बोलावण्याची जरूरी नसते, आणि पुराव्यावांचून तो दस्तऐवज योग्य रीतीनें झाला होता व त्यावर योग्य साक्षी घातल्या होत्या असें गृहीत धरण्यांत येतें.

एखाद्या दस्तऐवजाचा अर्थ त्यांतून समाधानकारक रीतीनें व्यक्त होत नसेल तर त्याच्या अर्थाच्या स्पष्टीकरणार्थ कोणत्याहि अन्य पुराव्याची मदत घ्यावी. मात्र दस्तऐवज करणारानें आपल्या हेतूचे उल्लेख प्रस्तुत दस्तऐवजाखेरीज इतर ठिकाणीं जे केले असतील त्यांचा पुराव्यादाखल उपयोग करणें तो फक्त जेव्हां दस्तऐवजांत व्यक्ति किंवा वस्तु यास उद्देशून केलेलें वर्णन एकापेक्षां अधिक व्यक्तींस किंवा वस्तूंस लागू पडत असेल तेव्हांच करावा.

सा क्षी दा र, कोर्टांत हजर होणें:—एखादा साक्षीदार जर आपखुषीनें कोर्टांत साक्ष देण्याला हजर होत नसेल तर साक्षीसमन्स काढून त्याला तसें करण्यास भाग पाडतां येतें.

साक्षीदार होण्याची पात्रता.—सामान्य नियम म्हटला म्हणजे प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणीं साक्ष देण्याची पात्रता असते. साक्ष देण्यास नालायक करणाऱ्या अशा ज्या गोष्टी पूर्वी मानण्यांत येत होत्या त्यांना आतां कोणी विचारीत नाहींत. एका गुन्हेगाराविरुद्ध दुसऱ्या गुन्हेगाराची देखील साक्ष देतां येते मात्र त्या साक्षीला दुसऱ्या स्वतंत्र पुराव्याची जोड द्यावी लागते. एखादा मनुष्य वयानें फारच लहान असल्यामुळें किंवा कांहीं मानसिक विकारामुळें अथवा अशाच कांहीं अन्य कारणांमुळें त्याला ज्याविषयीं साक्ष द्यावयाची त्याची नीट आठवण करतां येत नाहीं किंवा विचारलेल्या प्रश्नांचा त्याला नीट बोध होत नाहीं किंवा त्या प्रश्नांस नीट उत्तरें देतां येत नाहींत, किंवा खरें बोललें पाहिजे अशी जाणीवहि ज्याच्या मनास होऊं शकत नाहीं असें कोर्टानें ठरविलें तर तो मनुष्य साक्ष देण्यास अपात्र आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

कांहीं प्रश्नांस उत्तरें न देण्याचा साक्षीदाराचा हक्क:—कोर्टाच्या मतानें साक्षीदारानें ज्या प्रश्नाचें उत्तर दिलें असतां त्याच्यावर एखाद्या फौजदारी गुन्ह्याचा आरोप, दंड किंवा जप्ती येण्याचा संभव आहे अशा प्रश्नाचें उत्तर न देण्याचा साक्षीदारास हक्क आहे. हा उत्तर न देण्याचा हक्क जरी साक्षीदारास प्राप्त होतो तरी त्याचा उपयोग करणें किंवा न करणें हें त्याच्या मर्जीवर असतें, परंतु कांहीं प्रसंगीं मात्र तें मर्जीवर नसतें. असें—सरकारी प्रकरणासंबंधीं किंवा सरकारी

प्रकरणांत सरकारी कामदारांच्या आपसांत झालेल्या पत्रव्यवहारासंबंधीं किंवा ज्या बाबतींत सरकारी हितसंबंधांस बाध येईल अशा प्रकरणासंबंधीं कोणाहि साक्षीदारास प्रश्नांचें उत्तर देतां येत नाहीं.

शिवाय ज्या प्रकरणांशीं सरकारचा निकटचा संबंध आहे त्यांत गुन्हा घडल्याबद्दल कोणी किंवा कोणाला खबर देण्यांत आली अशांचीं नांवें उघडकीस आणण्याचें कार्य ज्यांच्या उत्तरांनीं होईल असे प्रश्न विचारल्यास उत्तर न देण्याचा हक्क साक्षीदारानें बजावलाच पाहिजे. आपल्या पतीच्या कानगोष्टी ( साक्षीदार स्त्री असेल तर ) किंवा आपल्या पत्नीच्या कानगोष्टी ( साक्षीदार पुरुष असेल तर ) उघडकीस आणणारे प्रश्न विचारले असतां त्यांस उत्तर न देण्याचा साक्षीदाराचा हक्क आहे.

पक्षकारांनीं आपल्या वकिलास काय सांगितलें किंवा जो कागदपत्रांचा पुरावा दाखविला असेल त्यासंबंधीं त्या वकिलास प्रश्न केला असतां किंवा त्या वकिलानें आपल्या पक्षकारास जो कांहीं सल्ला दिला असेल त्यासंबंधीं प्रश्न केला असतां उत्तर न देण्याचा त्या वकिलाचा हक्क आहे. त्या हक्कास खालील प्रसंग अपवाद आहेत—

( अ ) गुन्हा पुढें चालू ठेवण्याच्या उद्देशानें जी माहिती पक्षकारानें आपल्या वकिलास दिली असेल त्याविषयीं उत्तर न देण्याचा हक्क वकिलास प्राप्त होत नाहीं.

( आ ) वकील या नात्यानें काम करूं लागल्यापासून पक्षकारानें कांहीं गुन्हा किंवा लबाडी केल्याबद्दलची गोष्ट वकिलाच्या नजरेस आली तर त्याबद्दल उत्तर न देण्याचा हक्क वकिलास प्राप्त होत नाहीं.

( इ ) जी गोष्ट वकील या नात्यानें नव्हे तर खाजगी रीतीनें वकिलास माहीत झाली तिच्याबद्दलहि वकिलास उत्तर न देण्याचा हक्क प्राप्त होत नाहीं.

शपथ-ग्रहण-विधिः—प्रत्येक साक्षीदारानें शपथ घेऊन किंवा तितक्याच पवित्र भावनेच्या प्रतिज्ञेवर आपली साक्ष दिली पाहिजे. अर्थात ही शपथ किंवा ही प्रतिज्ञा ज्याच्या त्याच्या धर्मसमजुतीवर अवलंबून राहील हें उघड आहे.

खुल्या चौकशीचें तत्त्वः—खटला चालू असतां भर कोर्टांत साक्षीदारानें आपली जबानी द्यावी हा सर्वसाधारण नियम आहे. जेव्हां हा चौकशीचा खुलेपणा सभ्याचाराच्या आड येत असेल तेव्हां थोडासा बदल करण्यांत येतो, परंतु होतां होईल तों चौकशीची पद्धत खुलेपणास बाधक होणार नाहीं अशी खबरदारी घेण्यांत येते

जबानी व तपासणीः—हें काम चालण्याची साधारण पद्धत पुढीलप्रमाणें असते—ज्या पक्षाकडून खटल्याच्या कामाची सुरवात होते-उदा०वादी किंवा फिर्यादी हा आपले साक्षीदार अनुक्रमें साक्षीकरितां बोलावतो-ज्या पक्षाचा तो साक्षीदार असतो त्याच्याकडून प्रथम त्याची साक्ष घेण्यांत येते. या तपासणीस सरतपासणी असें म्हणतात.नंतर विरुद्ध पक्षाकडून त्याची उलटतपासणी होते. आणि शेवटीं स्वपक्षाकडून त्याची फेरतपासणी होते.याचप्रमाणें जेव्हां विपक्षाकडून आपली बाजू मांडण्यांत येते तेव्हांहि त्या पक्षाच्या साक्षीदारांच्या साक्षी याच क्रमानें घेण्यांत येतात. कांहीं वेळां ज्या पक्षाकडून खटल्याची सुरवात होते त्यास विरुद्ध पक्षाच्या पुराव्यास उत्तरादाखल म्हणून अधिक पुरावा देण्याची सवलत देण्यांत येते. हें साक्ष घेण्याचें काम कोर्टाकडून न होतां दोन्ही पक्षांकडून होत असतें. हें साक्षीदाराचें तपासणी करण्याचें काम म्हणजे साधारणपणें द्वंद्वयुद्धाप्रमाणें आहे. प्रत्येक पक्ष आपापली बाजू सजविण्याच्या व विरुद्ध बाजू हाणून पाडण्याच्या खटपटींत असतो. ही तपासणी करण्याची पद्धत धर्मविचारणीसभेच्या पद्धतीहून भिन्न आहे. धर्मविचारणीसभेंत तपासण्याच्या कामीं सभा हीच प्रामुख्यानें भाग घेत होती. शिवाय सभेच्या कामांत दोन पक्ष इतक्या स्पष्टपणें वेगळे मानण्यांत येत नव्हते. इंग्लंडेतर यूरोपखंडांतील देशांतील लढयामध्यें फिर्यादीतर्फे कीं आरोपीतर्फे काम चालू आहे हें ठरविणें बऱ्याच वेळां कठिण असतें. सरतपासणीच्या वेळीं साक्षीदारास वादांतील मुख्य मुद्यांसंबंधीं प्रश्न विचारले पाहिजेत व ते सूचक असतां उपयोगाचे नाहींत. सूचक प्रश्न म्हणजे ज्यावरून साक्षीदारास प्रश्न करणाराला संमत असें उत्तर सुचेल असा प्रश्न, किंवा साक्षीदारास वादग्रस्त प्रश्नांच्या उत्तराची माहिती करून देणारा प्रश्न. सूचक प्रश्नासंबंधीं जो नियम वर सांगितला आहे तो जेव्हां वादाचा उपन्यास करावयाचा असेल, जेव्हां प्रश्नाचा मुख्य वादाशीं तितका संबंध नसेल किंवा जेव्हां प्रश्नांतील बाब वादग्रस्त नसेल तेव्हां लागू पडत नाहीं. त्याचप्रमाणें जेव्हां ज्या पक्षानें जो साक्षीदार बोलावला तो त्याच्याच विरुद्ध साक्ष देत असेल किंवा विरुद्ध बाजूला फितला असेल किंवा त्याची प्रत्युत्तर देण्याची इच्छा नसेल तर त्यावेळेस वर सांगितलेले सरतपासणीचे नियम लागू पडत नाहींत व अशा वेळीं आपल्याच साक्षीदाराला सूचक प्रश्न विचारावेत किंवा त्याची उलटतपासणी करावी; सारांश तो साक्षीदार विरुद्ध पक्षानेंच बोलावला असें समजून चालण्यास हरकत नाहीं. फक्त त्याचें शील वाईट आहे असा सामान्य पुरावा देऊन त्याची नापत करण्याचें काम त्यास साक्षीदार म्हणून बोलावणाऱ्या पक्षानें करतां कामा नये. उलटतपासणींत वादांतील मुख्य मुद्द्याशीं संबंध नसणारे व सूचक असे प्रश्न विचारावेत व साक्षीदारांनींहि ( उत्तरें न देण्याच्या हक्काच्या बाबी खेरीजकरून ) त्यांचीं उत्तरें दिलीं पाहिजेत; कारण युक्तिप्रयुक्तीनें सरतपासणी कसास लावण्याचा उलट तपासणी करणारास हक्क असतो. साक्षीदार बनावट आहे हें दाखविण्याच्या हेतूनें त्याचें लक्ष मूळ वादावरून उडविण्याकरितांच केवळ उलटतपासणींत वादांतील मुख्य मुद्द्यांशीं ज्यांचा संबंध नाहीं असे प्रश्न पुष्कळ वेळां विचारण्यांत येतात. साक्षीदाराचा बिनचुकपणा किंवा त्याची विश्वसनीयता

कसास लावण्याकरितां किंवा त्याचे हेतू अयोग्य होते आणि त्याचें शीलहि वाईट आहे असें दाखवून त्याची नापत करण्याकरितां उलटतपासणींत प्रश्न विचारले तरी चालतात. ज्या गोष्टी कबूल केल्या तरी मुख्य वादाचा निकाल लावण्यास किंवा साक्षीदाराची विश्वसनीयता ठरविण्यास त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं अशा गोष्टीविषयीं उत्तर देण्यास उलटतपासणींत साक्षीदारास भाग पाडूं नये. साक्षीदारानें दिलेल्या साक्षीविरुद्ध जर उलटतपासणी करणारास पुरावा द्यावयाचा असेल तर त्या पुराव्याच्या मजकुराचे प्रश्न त्यानें साक्षीदारास उलटतपासणींत विचारून ठेवावेत, म्हणजे त्यायोगानें साक्षीदारास आपलें कांहीं म्हणणें मागें घेण्यास किंवा आपल्या म्हणण्याचा खुलासा करण्यास ठीक पडतें. साक्षीदाराचें शील वाईट आहे अशा मुद्द्यावर, तो गैरविश्वसनीय आहे असें दर्शविणाऱ्या प्रश्नाचें जर त्यानें (साक्षीदारानें) उत्तर दिलें तर दिलेलें उत्तर खोटें आहे असा पुरावा कांहीं विशिष्ट प्रसंगींच तेवढा देतां येतो. गुन्हेगार म्हणून पूर्वी कधीं शिक्षा झाली होती कीं? असा प्रश्न केला असतां जर साक्षीदारानें नकारार्थी उत्तर दिलें किंवा उत्तर देत नाहीं असें तो म्हणूं लागला तर ती गोष्ट पुराव्यानें शाबीद करावी. तो यथान्याय साक्ष देत नाहीं असें दाखविणारा प्रश्न विचारला असतांहि तोच नियम लागू पडतो. प्रस्तुत दिलेल्या साक्षीशीं विसंगत अशी जर साक्षीदारानें पूर्वी साक्ष दिली असेल तर तसा पुरावा द्यावा. परंतु असें करण्यापूर्वी साक्षीदारास पूर्वी दिलेल्या साक्षीच्या प्रसंगाची आठवण द्यावी व त्यानें तसें विधान केलें होतें किंवा नाहीं हें त्यास विचारावें. आणि जर तसलें विधान लेखी असेल किंवा लिहून ठेविलें असेल तर तें पुराव्यांत देण्यापूर्वी साक्षीदाराच्या म्हणण्यांतील असंबद्धता दाखविणारे, त्याच्या पूर्वीच्या जबानींतील किंवा विधानांतील भाग त्याच्या नजरेस आणावेत. 'शपथेवर देखील साक्षीदार खोटें सांगेल अशी त्याच्याबद्दल आम्हांस माहिती आहे' असें शपथेवर सांगणाऱ्या साक्षीदारांच्या पुराव्यानें मूळ साक्षीदाराची विश्वसनीयता नाशाबीत करावी. मूळ साक्षीदार खोटें सांगेल असें म्हणणाऱ्या साक्षीदारांस त्यांच्या विधानांचीं कारणें सरतपासणींत विचारूं नयेत. उलटतपासणींत मात्र तसे प्रश्न विचारतां येतात, परंतु त्या प्रश्नांस जीं उत्तरें देण्यांत येतील त्यांस खोडून टाकतां येत नाहीं. अशा रीतीनें जेव्हां एखाद्याच्या साक्षीवर गैरविश्वासाचे शिंतोडे उडविण्यांत येतात तेव्हां ज्या पक्षानें त्यास साक्षीदार म्हणून बोलाविलें असेल त्यानें तो सर्वतोपरी लायख मनुष्य असून विश्वसनीय आहे अशाबद्दलचा पुरावा सादर करावा. उलटतपासणींत ज्या गोष्टींचा उल्लेख आला असेल त्यांनां धरूनच फेरतपासणी केली पाहिजे आणि कोर्टाची परवानगी घेऊन जर फेरतपासणींत नवीन गोष्टींचा उपक्रम केला तर त्यासंबंधानें फिरून उलटतपासणी करण्याचा विरुद्ध बाजूस हक्क प्राप्त होतो. घडलेल्या प्रसंगाच्या वेळीं स्वतः लिहिलेला लेख किंवा दुसऱ्यानें लिहिलेला परंतु जो बरोबर आहे अशाबद्दल स्वतः तपासून खात्री करून घेतली आहे असा लेख, साक्षीदारानें साक्ष देतांना स्मरणाकरितां वापरावा. त्याचप्रमाणें तज्ज्ञांनीं साक्ष देतांनां आपल्या स्मरणाकरितां आपल्या विषयावरील ग्रंथांचें अवलोकन करावें.

भा र तीं य.—प्राचीन संस्कृत वाङ्मयापैकीं स्मृतिग्रंथांतील व्यवहाराध्यायांत पुराव्याच्या तोंडी व लेखी या दोन्ही प्रकारांसंबंधीं विवेचन आढळतें तोंडी पुराव्यासंबंधाच्या प्रकरणांत ( साक्षीप्रकरण ) साक्षीदार हा तपस्वी, दानशील, कुलीन, सत्यवादी, पुत्रवान्, धनान्वित, श्रौतस्मार्तक्रियापर वगैरे गुणांनीं युक्त असावा आणि पक्षकाराच्याच जातीचा व वर्णाचा असावा, तसेंच स्त्रियांसंबंधींच्या खटल्यांत स्त्री साक्षीदारच असावे. आणि स्त्री, बाल, वृद्ध, उन्मत्त, पाखंडी असले साक्षीदार घेऊं नयेत असें सांगितलें आहे.वादी प्रतिवादीच्या समक्ष साक्षीदार तपासावे;खोटी साक्ष देणारा व साक्ष देण्याचें नाकारणारा नरकादि वाईट लोकीं जातो व त्याला राजानें दण्ड करावा, वगैरे नियम सांगितले आहेत. हल्लींच्या पाश्चात्य कायद्यांशीं ताडून पाहतां वरीलपैकीं कांहीं नियम चमत्कारिक व अव्यवहार्य आहेत. हल्लींच्या कायद्याप्रमाणें ज्याला खटल्यासंबंधीं प्रत्यक्ष ( ऐकीव नव्हे ) माहिती आहे असा कोणीहि ( स्त्री, बाल, वृद्ध, कोणत्याहि जातीचा, वर्णाचा, धर्माचा, ) इसम साक्षीदार होऊं शकतो. लेखी पुराव्यासंबंधीं ( लेख्य प्रकरण ) प्रकरणांत लेखांचे स्वहस्तकृत व अन्यकृत आणि साक्षीयुक्त व साक्षीविहीन असे प्रकार सांगितले असून कर्जरोखादि दस्त कसे लिहावे तें सांगितलें आहे. प्रथम,शक,मास, दिवस व तिथि वगैरे लिहून नंतर धनकोचें नांव, जात, गोत्र वगैरे माहिती लिहावी. नंतर कर्ज किती रुपये, किती मुदतीनें, किती व्याजानें घेतलें वगैरे माहिती लिहून सर्व मजकुराच्या शेवटी ऋणकोनें व साक्षीदारांनीं स्वहस्तें सही करावी. साक्षी नसलेला लेखहि बळजबरीनें घेतलेला नसेल तर पुराव्यास ग्राह्य समजावा. याप्रमाणें दस्त लिहून दिलेलें कर्ज फेडण्याची जबाबदारी ऋणको, त्याचा मुलगा व नातू अशा तीन पिढ्यांवर असते. मूळ लेख दूरदेशीं असला किंवा जळून, हरवून किंवा अन्यप्रकारें नष्ट झाला असला तर दुसरा लेख तयार करावा. लेखांत कांहीं संदिग्धता असल्यास स्वहस्तानें शुद्धि करावी. कर्जफेड हप्त्याहप्त्यानें होईल त्याप्रमाणें त्याच दस्तावर लिहून ठेवावें आणि सर्व फेड झाल्यावर दस्त फाडून टाकावा. सांप्रतच्या कायद्यांशीं ताडून पाहतां स्टँप कागद व रॅजिस्ट्रेशन हे प्रकार पूर्वी नव्हते. तसेंच साक्षीदार कोणत्या दस्तावर व किती असावे किंवा नसावे हें हल्लीप्रमाणें पूर्वी नक्की ठरलेलें नव्हतें.

**पुरी, जिल्हा.**—बिहार-ओरिसा. ओरिसा विभागांतील दक्षिणेकडील जिल्हा.उत्तरेस कटक जिल्हा; दक्षिणेस बंगालचा

उपसागर; पश्चिमेस मद्रास इलाख्यांतील गंजम जिल्हा; आणि उत्तरेस नवागड संस्थान. कुशभद्रा नांवाची नदी बंगालच्या उपसागरास मिळते. भार्गवी, दया आणि बूब या तीन नद्या चिल्का सरोवराला मिळतात. यांत चिल्का व सर या नांवाचीं मुख्य दोन सरोवरें आहेत. जंगलांत कोल्हे, लांडगे विपुल आहेत. वाघ,सिंह इत्यादि पशु बहुतेक नाहींत. दरवर्षी पाऊस ५८ इंच पडतो कोयाखी नदीला पावसाळयांत पूर आला म्हणजे इतकी नुकसानी होते कीं लाखों लोक घरादारांवाचून उघडे पडतात, जमीन वाहून गेल्यामुळें दुष्काळ पडतो व सरकारला कांहीं लाख सारा सूट द्यावा लागतो. पुरी येथील जगन्नाथाचें देऊळ फार मोठें आहे. जवळच एक भुवनेश्वराचें मंदिर आहे. लोकसंख्या( १९२१ ) ९५१६५१. हवा रोगट आहे. दरसाल यात्रेच्या दिवसांत कालऱ्याचा उपद्रव होतो. हिवाळ्यांत तापाची व देवीची सांथ असतेच. पुरी जिल्ह्यांत उडिया भाषा बोलतात. ओरिसामध्यें १० शतकेंपर्यंत बौद्ध धर्म प्रचलित होता. साल, कुसुंब, बाबू वगैरे विपुल आहेत. चहाची लागवड करतात. कापूस,पितळ, तांबें, रेशीम वगैरे जिन्नस बाहेर गावीं रवाना होतात आणि कच्चा कापूस, साखर, मसाला, लोखंड, तंबाखू, राकेल तेल, मीठ आणि कापिल बाहेरून पुरी जिल्ह्यात येतात. पुरी, सत्यवादी पिप्ली, खुर्दा, बानपुर हीं व्यापाराचीं शहरें होत. बंगाल-नागपूर रेल्वेचा पूर्वभाग खुर्दा पोटविभागमधून जातो.खुर्दापासून पुरीला एक फांटा जातो.पुरी जिल्ह्यांत दर एकरी सान्याचा दर रु. १-११-७ आहे. पहिली जमाबंदी १८३० सालीं केली.

गां व.—पुरी जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. उ. अ. १९°४८' व पू. रे. ८५°४९'. प्रसिद्ध जगन्नाथाचें मोठें देऊळ याच ठिकाणीं आहे; यालाच जगन्नाथपुरी असें म्हणतात. लोकसंख्या सुमारें चाळीस हजार आहे. १८८१ सालीं पुरी म्युनसिपल कमिटी स्थापन झाली. पुरी शहर केवळ यात्रेकरूकरितांच आहे. व्यापारधंदे वगैरे त्या ठिकाणीं कांहीं नाहींत. रस्ते अरुंद व लहान आहेत. देवाचा रथ ज्या रस्त्यावरून जातो तोच काय तो मोठा रस्ता आहे. सध्याचें देऊळ गंग घराण्यांतील अनंत छोड गंग यानें इ. स. ११०० त बांधिलें. जगन्नाथ, बळराम व सुभद्रा या तीन मूर्ती बौद्धसंप्रदायांतील बुद्ध, धर्म आणि संघ या त्रिरत्नांच्या दर्शक आहेत असें कांहीं पंडित समजतात ( कनिंगहॅम-दि स्तूप ऑफ भरहुत. पृ. ११२ ); तर कोणी त्रिशूळाशीं त्याचा संबंध जोडतात. या मूर्तींच्या अस्तित्वाबद्दल अनेक कथा आहेत. पुरीला यात्रा बाराहि महिने असते. विशेषेंकरून देव रथांत बसून निघतात ( रथजत्रा ) त्यावेळेस रथ ओढणारांची गर्दी असंख्य जमते. या रथाच्या चाकाखालीं आपणाला चिरडून घेण्यांत पुष्कळ भाविकांस पुण्यप्रद वाटतें; व या कारणानेंच जगन्नाथाची प्रसिद्धि पाश्चात्य लोकांत झाली आहे. पण या धार्मिक आत्महत्येच्या गोष्टी फार जुन्या व अतिशयोक्तीच्या असल्यानें फारशा विश्वसनीय नाहींत. [ हंटर-ओरिसा; स्टर्लिंग-ओरिसा; शेरिंग-दि सेक्रेड सिटी ऑफ दि हिंदूज; ब्रिज किशोरी घोस-दि हिस्टरी ऑफ पुरी; क्षेत्रमाहात्म्य इत्यादि. ]

**पुरु**—(१) एक वैदिक राष्ट्र. ज्ञा. को. विभाग ३ ( पृ. ६७, व प्रकरण ४ थें ) पहा.

(२) सोमवंशांतील ६ वा राजा व ययाति आणि शर्मिष्ठा यांचा सर्वांत धाकटा पुत्र. हा पुरु व याचा धाकटा भाऊ यदु हे सोमवंशाच्या दोन शाखांचे उत्पादक होत.

**पुरुकुत्स**—वैदिक इतिहास [ ज्ञानकोश विभाग ३ पृ. ६७, ७७, १४३ ] पहा. इक्ष्वाकुकुलोत्पन्न मांधाता राजास बिंदुमतीपासून झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ पुत्र हा. पाताळांतील गंधर्वांच्या ( मौनेयांच्या ) नाशाकरिता विष्णूनें हा अवतार घेतला अशी कथा आहे. याला त्रसदस्यु नांवाचा पुत्र होता.

**पुरुषोत्तमपूर**—मद्रास. गंजम जिल्ह्याची उत्तरेकडील जमीनदारी तहशील. अंतगड इस्टेटीचा समावेश याच तहशिलींत होतो. पूर्वेस कालिकोट असून पश्चिमेस तुमसर तालुका आहे. लो. सं. सुमारें एक लाख आहे. डेपुटी तहशिलदार शेजारच्या बहरामपूर तहशिलींत राहतो.

**पुरूरवा**—वैदिक आख्यानसूक्तात पुरूरवा-उर्वशीची प्रेमकथा आहे; ती सविस्तर रीतीनें वेदविद्या विभागात ( पृ. ४२-४४, ) दिली आहे. शिवाय ज्ञानकोश वि. ३, पृ. १५३ पहा. पुरूरवा हा सोमवंशांतील मूळपुरुष होय. हा इलेचा पुत्र म्हणून यास ऐल असें म्हटलेलें आहे. यास उर्वशी अप्सरेनें वरिलें होतें ( 'उर्वशी' पहा. ). कालिदासानें या कथानकावर विक्रमोर्वशीय नाटक रचिलें आहे.

**पुर्वा**, त ह शी ल.—संयुक्तप्रांत. उन्नाव जिल्ह्यातील एक तहशील. क्षेत्रफळ ५५१चौ. मैल असून लोकसंख्या(१९११) २७१८२५ आहे. तहशिलीचा दक्षिणभाग उत्तम लागवडीचा आहे. कालव्याच्या पाण्यानें जमिनीत बागाईत पीक येतें.

गा व.—उन्नावपासून रायबरेलीस जो रस्ता जातो त्यावर पुर्वा शहर आहे.लोकसंख्या सुमारें दहा हजार. संस्थानिकाच्या अमलाखालीं पुर्वा गाव कांहींसें महत्त्वाचें होतें. बूट जोडे याच्याबद्दल याची प्रसिद्धि आहे.

**पुलगांव**—मध्यप्रांत, वर्धा जिल्हा, वर्धा तहशील. वर्ध्याच्या पश्चिमेस १९ मैलावर वर्धा नदीतीरीं हें गांव वसलेलें आहे. हें रेल्वेचें स्टेशन आहे. येथील लोकसंख्या सुमारें पांच सहा हजार आहे. आसपासच्या प्रदेशांत कापूस,पिकत असल्यामुळें व रेल्वे झाल्यामुळें या गांवास फार महत्त्व आलें आहे. बहुतेक आर्वी तहशिलींत पिकणारा कापूस येथें येतो. इ. सन १८९२ मध्यें पुलगांव येथें गिरणी सुरु झाली. येथें सोमवारीं बाजार भरतो. येथें जिन व प्रेसहि बरेच आहेत.

**पुलयन**—हिंदु समाजाच्या औद्योगिक जातींपैकीं ही एक मद्रासकडील खालावलेली जात असून शेतकी हा त्यांचा धंदा आहे. यांची एकंदर लोकसंख्या (१९११) २६२४१६ आहे; पैकीं १८५३१४ निव्वळ त्रावणकोर संस्थानांतच आहेत. कोचीन संस्थानांत ७२७८७ आहेत. यांच्यांत बरेच पोटवर्ग आहेत. मलबारांतील चेरुमक्कळ व पुलयन हे एकच म्हणतां येतील. यांच्यांत प्रेतें पुरण्याची चाल असून अशौच ७ दिवसपर्यंत धरतात.

**पुलस्त्य**—स्वायंभुव मन्वंतरांतील ब्रह्मदेवाचा मानस पुत्र. याची स्त्री, कर्दम प्रजापतीची कन्या हविर्भुजा होती. ही तिजपासून यास अगस्त्य पुत्र झाला हा पुत्र झाला दुसरा एक पुलस्त्य विश्रवसूचा पिता व वराणाचा पितामह होता.

**पुलिकन**—मद्रास, चिंगलपट जिल्हा, पोनेरी तालुक्यांतील एक शहर. हें मद्रासच्या उत्तरेस २५ मैलावर आहे. लोकसंख्या सुमारें ५ हजार आहे डच लोकांची पहिली वसाहत याच गांवीं होती.१६०९ सालीं त्यांनीं येथें एक किल्ला बांधला.सन १८२४ मध्यें ग्रेटब्रिटनकडे पुलिकन शहर कायमचें आलें. पूर्वी पिनांग व स्ट्रेट सामुद्रधुनीशीं या शहराचा बराच व्यापार चालत असे. एका वेळेस हें एक चांगलें हवा खाण्याचें ठिकाण होतें. परंतु पुढें हिंवताप वारंवार होऊन हवा बिघडली आहे. आतां वस्ती फारशी नसून फक्त थोडे मुसुलमान लोक आहेत सध्यां कापड, वाळलेले मासे हाच काय तो येथील व्यापार आहे.

**पुलिकन सरोवर**—मद्रास, बेल्लोर जिल्हा. बंगालच्या सागरापासून३७ मैल लांब व३१ मैल रुंद असून समुद्रापासून हें सरोवर श्रीहरीकोट व पुलिकत शहरानें निराळें झालें आहे. पुलिकत सरोवरावर पुष्कळ बेटें आहेत. व येथें शिंपांचा चुना पुष्कळ तयार होतो. बकिंगहॅम कालवा पुलिकतच्या दक्षिणेस पुलिकत सरोवराला येऊन मिळतो.

**पुलिंद**—एक जनपद या वहिष्कृत राष्ट्रजातीचा वैदिक वाङ्मयांत उल्लेख येतो ( ज्ञानकोश विभाग ३ पृष्ठ ३६९ पहा ). 'पुलिंद. लोकांचा उल्लेख अशोकाच्या एका लेखांत (खिस्ती शकापूर्वी तिसऱ्या शतकांत) आढळतो. (बृहत्सं.४.२२; ५. ७७व७८;इत्यादि; इं. अॅ.२२. ) पुलिंद हे रानटी जातीचे लोक असून ते जंगल-पर्वतांतून (विशेषतः मध्यहिंदुस्थानांतील)वास करीत. कांहीं उत्तरेकडे व सिंधुतीरी होते. कधीं कधीं हिमालयांतील जातींनांहि पुलिंद हें नांव देण्यांत येतें ( जे. आर. ए. एस्. १९०८,पृ. ३१५ ). तेव्हा या जातीची निश्चित माहिती मिळालेली नाहीं. इंद्रप्रस्थाच्या दक्षिण दिशेस पुलिंद देश, असल्याचें महाभारतांत (सभापर्व अ. ३१) लिहिलें आहे.

**पुलिवेंडला**—मद्रास, कडाप्पा जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ५६६ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ८८३२६. या तालुक्यांतील मुख्य शहर व्हयाली आहे. सान्याचें उत्पन्न सुमारें दोन लाख आहे. मुख्य धंदा शेतकीचा आहे.

**पुली**—हें एक चक्र असून तें फिरत्या किंवा स्थिर अक्षावर बसविलेलें असतें. ह्या पुलीचा उपयोग मुख्यतः शक्तिवहन व वजनें उचलण्याकडे करतात. फिरत्या दांड्यावरील पुली पट्ट्याच्या साहाय्यानें दुसऱ्या एखाद्या पुलीस जोडल्यास त्यांच्या योगानें शक्तिवहन होतें व त्या दुसऱ्या पुलीस मिळालेल्या शक्तीचा उपयोग काम करवून घेण्याकडे करतां येतो. ह्यांपैकीं पहिल्या पुलीस वाहक पुली म्हणतात. वजन उचलण्याकरितां पुलीचा उपयोग करण्याकरितां त्या एका कप्प्यांत बसवतात व असे दोन कप्पे दोराच्या साहाय्यानें जोडून त्यांपैकीं एक स्थिर व दुसरा चल असल्यास उचलण्यास सोपें जातें. वाहक पुली बिडाच्या केलेल्या असून त्यांच्या मध्यभागीं एक तुंबा असतो ह्या तुंब्याच्या योगानें त्या स्थिर किंवा चल अक्षास स्क्रू वगैरे साहाय्यानें जोडता येतात. तुंब्याचा आकार पुली दांड्यावर ज्या रीतीनें बसवावयाची असते त्यावर अवलंबून असतो. हीं चक्रें अखंड तुकड्याचीं केलेलीं असून त्यांच्या पुठ्ठयांची रुंदी त्यावरुन पट्टा सहज जाऊं शकेल इतपत असते व जाडी पट्ट्याचा ताण व पुलीवर असणारा मध्यंतर्गत जोर सहन करण्याइतकी असते. तुंबा व पुठ्ठा अऱ्यांच्या योगानें जोडलेला असून अऱ्यांची संख्या व आकार ठरीव नसतात, पण साधारणतः त्यांचा तिर्यक् छेद दीर्घवर्तुळाकार असून हे दीर्घवर्तुळ तुंब्याशीं मोठें असून पुठ्ठ्याकडे लहान लहान होत जातें. कांहीं पुली शुद्ध लोखंडाच्या व पोलादाच्याहि केलेल्या असतात. ह्या पुलींतील तुंबा बिडाचा असून अरे शुद्ध लोखंडाचे असतात. अऱ्यांना पेंच असून ते तुंब्यांत च पोलादी पुठ्यांत फिरवून बसवतात. पुठ्ठ्याच्या आंतील बाजूस अऱ्याच्या तोंडाशीं एक पट्टी असून त्या पट्टींतहि दोन स्क्रू बसवून अरा जोरांत बसवितात. ह्या पुलीचे दोन भाग असून ते एकत्र करून त्यांच्या सांध्यावर एक पट्टी ठेवतात व ती स्क्रूच्या साहाय्यानें घट्ट बसवितात. ह्या चक्रांतील पुठ्ठा वक्र असतो व ह्या वक्रतेचा उपयोग पट्ट्यास मार्ग दर्शविण्याकडे होतो. समांतर असलेल्या अक्षावरील दोन पुली एकमेकास सरळ किंवा तिर्यक् रीतीनें जोडल्यास त्या एकाच किंवा विरुद्ध दिशेनें फिरतात. दोरांनीं जोडावयाच्या पुलींच्या पुठ्ठ्यावर एक खोबण ठेवतात म्हणजे दोर त्यावरून निघण्याची भिति नसते. पुली करण्याच्या कामीं लांकडाचा देखील उपयोग करतात. आतां आपण पुलीच्या समतोलाचा विचार करूं. पुलीचा गुरुत्वमध्य फिरत्या अक्षावर असेल व जडत्वमक्षहि त्या अक्षाशीं एकरूप असेल तर पुली समतोल रहाते, पण ह्यामध्यें जर फरक असेल त पुली समतोल असूं शकत नाहीं. व एक निराळीच शक्ति उत्पन्न होऊन त्यायोगानें पुलीस हानिकारक असे हेलकावे मिळतात. हे हेलकावे टाळण्याकरितां पुलीस ती समतोल होईपर्यंत वजनें जोडून मग तिचा उपयोग करतात.

पुलीचे कप्पे.—एकापेक्षां अधिक पुली एका चौकटींत बसविल्या असतां कप्पा तयार होतो. असे दोन कप्पे घेऊन त्यांपैकीं एक स्थिर व दुसरा चल ठेवल्यास वजन उचलण्यास सोपें जातें. स्थिर असणाऱ्या कप्प्यास दोरीचें एक टोंक घट्ट बांधून तें दुसऱ्या कप्प्यांतील पुलीवर नेतात व अशा रीतीनें दोर सर्व पुलींवरून नेऊन बाहेर राहिलेलें टोंक ओढल्यास स्थिर कप्प्याच्या खालील बाजूस असलेल्या आंकड्यास लावलेलें वजन वर वर सहज चढत जातें व थोडी शक्ति लावूनहि मोठें वजन उचललें जातें.

**पुष्कर**—राजपुताना. अजमीराहून तीन कोसांवर हें तीर्थ आहे. पद्मपुराणांत या तीर्थाचा माहिमा फार वर्णिला आहे. या तीर्थीं ब्रह्मदेवानें बहुत यज्ञ केले असें वर्णन आहे. पुष्करतीर्थें तीन आहेत; ब्रह्मपुष्कर, विष्णुपुष्कर, आणि रुद्रपुष्कर. यांच्या आसमंतात्भागीं दुसरीं अनेक तीर्थें व देवस्थानें आहेत. ब्रह्मदेव, सावित्री, वराह, बदरीनारायण, व शिवआत्मतेश्वर अशीं पांच मुख्य देवालयें या ठिकाणीं आहेत. या तीर्थाची यात्रा प्रतिवर्षी कार्तिकी पौर्णिमेस असते. त्यावेळीं सरासरी एक लाख यात्रा जमते.

**पुष्कलावती**—गांधार ( कंदाहार ) देशाची प्राचीन राजधानी. पुष्कलावती ही भरतपुत्र पुष्कर यानें वसाविली असें ( विष्णुपुराण ) म्हणतात. वाल्मिकी रामायणांतहि पुष्कराची राजधानी गांधार देशांत पुष्कलावत किंवा पुष्कलावती सांगितली आहे. वराहमिहिरानें उत्तरेकडील देश उल्लेखिले आहेत, त्यांत पुष्करावत आणि तक्षशिल हीं नांवें एकत्र आलीं आहेत. अलेक्झांडराच्या वेळीं गांधार देशाची हीच राजधानी होती. तिचें ग्रीक नांव प्युकोलाइती किंवा पुकेलाओति हें पाली भाषेंतील पुक्कलाओतीपासून निघालें आहे. एरियननें तें पुकेलेई केलें. डायोनिशीयसनें लोकांचें नांव पुकेलू असें लिहिलें आहे. हीं पाली भाषेंतील पुक्कलूचीं रूपें आहेत. एरियन म्हणतो कीं, तें मोठें शहर अस्टी किंवा हस्ती राजाची राजधानी होतें. त्याच्या पश्चात अलेक्झांडरची स्वारी झाली. स्ट्रेबो आणि एरियन हे, तें सिंधूच्या पश्चिमेस होतें इतकेंच सांगतात. परंतु टॉलेमीनें तें सुआस्तु ( स्वात ) हिच्या पूर्वतीरीं सांगितलें आहे. हें ह्युएनत्संगच्या लेखांशीं मिळतें. पुष्कलावती सांप्रतचीं दोन गांवें पराग आणि चरसद्दा यांच्या स्थलीं असावी असें निश्चित होतें. सांप्रत स्वातच्या पूर्व किनाऱ्यावर जीं आठ मोठीं गांवें आहेत त्यांतीलच हीं दोन आहेत. दोन्हीमिळून पूर्वी एकच शहर असावें पुष्कलावतींत एक मोठा स्तूप होता. बुद्धानें आपला डोळा दिला, त्या जागीं तो बांधलेला होता. [ कनिंगहॅम—एन्शन्ट जिऑ. इंडिया; दीक्षित—भारतवर्षीय भूवर्णन. ]

**पुसद**, तालुका.—वऱ्हाड प्रांत, यवतमाळ जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ १२८५ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १५२१७४. तालुक्यांतील खेड्यांची संख्या ३१० असून पुसद हें तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. सन १९०५ आगस्टपर्यंत पुसद तहशील वाशिम जिल्ह्यांत मोडत होती. परंतु नंतर वाशिम जिल्हा मोडल्यामुळें पुसद हें यवतमाळ जिल्ह्यांत आलें.

गांव.—पुसद तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें पुस नदीच्या कांठीं असल्यामुळें त्याचें नांव पुसद पडलें.लोकसंख्या(१९११) ६८६२. ऐने-ई-अकबरींत पुसद परगणा म्हणून उल्लेख सांपडतो. येथें दोन हेमाडपंती देवळें असून पडकीं देवळें बरींच आहेत. शिवाय एक कोरडा तलाव आहे.

**पुंसवन**—स्त्रीच्या ठिकाणीं गर्भधारणा झाल्यापासून तीन महिन्यांनीं त्या गर्भाला पुंस्त्व प्राप्त होण्यासाठीं अथवा त्या गर्भाची उत्तम प्रकारें वाढ होण्यासाठीं पुंसवन नामक संस्कार करावयाचा असतो. ज्या गाईचें वासरूं तिच्याच रंगाचें आहे अशा गाईच्या दुधानें केलेलें दहीं पत्नीच्या उजव्या हातावर पतीनें घालून त्यांत दोन उडीद व एक यव टाकावा. नंतर ते दहीं पत्नीकडून प्राशन करवावें व तें प्राशन करीत असतां पतीनें ' किं पिबसि ' असा पत्नीस प्रश्न केला असतां पत्नीनें ' पुंसवनं ' असें उत्तर द्यावें. याप्रमाणें तीन वेळ करावें ( कांहीं सूत्रांत उडिदांच्या जागीं मोहऱ्यांची योजना केली आहे ). नंतर उत्तम प्रकारचें छत दिलेल्या जागीं पत्नीस बसवून पतीनें तिच्या नाकांत दूर्वांचा रस पिळावा. हा दूर्वारससेचनविधि गर्भस्राव होत असल्यास तो दोष नाहींसा होण्यासाठीं कांहीं सूत्रकारांनीं दिला आहे. प्रयोगकार मात्र पुंसवनांतच याचा विनियोग दाखवितात. दूर्वारससेचनविधि कांहीं प्रयोगकार ' अनवलोभन ' नामक संस्कारात्मक मानतात.

**पुसा**—बंगाल, दरभंगा जिल्ह्यांतील समस्तिपूर पोटविभागांतील एक खेडेंगांव. लोकसंख्या ( १९०१ ) ४५७०. सरकारनें १७९६ सालीं पुसा व बखत्यारपुर हीं गांवें खरेदी केलीं. १९०४ सालीं शेतकीचें कॉलेज स्थापन केलें आहे. त्या ठिकाणीं प्रयोगशाळा, नमुनेदार शेती, व उत्तम गुरांची पैदास करणारी संस्था आहे.

**पूतना**—कंसाची अनुचर राक्षसी. स्तनांत विष भरून तें कृष्णास कपटानें पाजीत असतां कृष्णानें तिच्या प्राणांचें आकर्षण केलें [ भागवत, स्कं. १०, अ. ६. ]

**पूनचचें राज्य**—ह्युएनत्संगनें हा प्रांत काश्मीरचे पश्चिमेस ११७मैलांवर असल्याचें लिहिलें आहे.काश्मीरचे लोक यास पूनत म्हणतात. विलफोर्डचा सरव्हेअर मिर्झा मोगल बेग आणि व्हिग्ने हे तेथें स्वतः गेले होते. ते याचा पुंज आणि पुंच असा उच्चार लिहितात. हें काश्मीरपासून ७५ मैलांवर आहे. ह्याच्या सीमा-पश्चिमेस झेलम, उत्तरेस पीरपंचाळ नांवाची डोंगराची रांग, पूर्वेस व आग्नेयीस राजोरी संस्थान हा होत्या. इतक्या प्रदेशाचा घेर १७० मैल आहे. पूनच नदीच्या उगमाजवळचा प्रदेश धरला तर २०० मैल होतात.

ह्युएनत्संगच्या वेळीं हें काश्मीरच्या ताब्यांत होतें. पण पुढें स्वतंत्र झालें. गुलाबसिंगानें तें पुन्हां काश्मीरच्या राज्यास जोडिलें. [ कनिंगहॅम—एन्शन्ट जिऑ. इंडिया; दीक्षित—भारतीय भूवर्णन. ]

**पूनामल्ली**—मद्रास, चिंगलपट्टम् जिल्हा. सैदापेट तालुक्यांतील एक शहर. ही लष्करी छावणीची जागा होती. हें मद्रासच्या पश्चिमेस १३ मैलांवर आहे. १९११ सालीं लोकसंख्या १६३४२ होती. येथील हवा उत्तम आहे.

**पूर्णय्या**—म्हैसूरचा एक दिवाण. इ. स. १७९९ मध्यें इंग्रजांनीं टिप्पूचें राज्य जिंकून घेतलें त्यावेळीं जनरल वेलस्ली ह्यानें म्हैसूरच्या गादीवर कृष्णराज वोडेयार यास बसविलें व त्याचा राज्यकारभार पूर्णय्याच्या हातीं दिला. हा टिप्पूच्या पदरीं मोठ्या हुद्द्यावर असलेला तैलंग वैष्णव ब्राह्मण होता. ह्यानें दिवाणगिरीचें काम ११ वर्षे केलें. या काळांत ह्यानें आपल्या बुद्धिचातुर्यानें व दूरदर्शित्वानें जमीनमहसुलाची सुधारणा केली, ग्रामपंचायती नेमून शास्त्री व काजी यांच्या हातीं न्यायाचें काम दिलें,जुन्या लष्करी लोकांस राज्य रक्षणाचें काम दिलें व अशा अनेक सुधारणा करून संस्थानाची उन्नति केली. यानें ७७ लक्ष रुपयांचीं सार्वजनिक कामें करून खजिन्यांत २॥ कोटी रुपये जमा केले. हा इ. स. १८१५ मध्यें मरण पावला. दिवाण सरकृष्णमूर्ति हे याचे नातू होत. [ इं सं. जुन्या ऐ. गोष्टी. पृ. ३४ व ३५. ]

**पूर्णा** ( पुरातन नांव पयोष्णी )—वऱ्हाड प्रांतांतील एक नदी. ही गाविलगड ( सातपुडा ) पहाडांत उगम पावून गाविलगड व बालाघाट यांमधून नैर्ऋत्य बाजूनें सरासरी ५ मैल वाहत जाऊन वऱ्हाडांत उतरते. उत्तरेकडून पूर्णा नदीला चिचन, शहानूर, सपन, चंद्रभागा, ह्मसली आणि मान या नद्या मिळत असून दक्षिणेकडून काटेपूर्णा, मोर्ना, मन, बोर्डी, विश्वगंगा व वनगंगा या नद्या मिळतात. ही तापी नदीला मिळते.

**पूर्वआफ्रिका**, जर्मन पूर्व आफ्रिका ( महायुद्धापूर्वीचें )—हल्लीं याला टांगानिका म्हणतात. या वसाहतीची दक्षिणोत्तर लांबी १° आणि ११° दक्षिण अक्षांशाच्या दरम्यान आहे व पूर्वपश्चिम लांबी ३०° आणि ४०° रेखांश यांच्या दरम्यान आहे. पूर्वेस हिंदी महासागर, उत्तरेस व ईशान्येस ब्रिटिश ईस्ट आफ्रिका व युगांडा, पश्चिमेस बेल्जम कांगो, नैर्ऋत्येस ब्रिटिश सेंट्रल आफ्रिका, व दक्षिणेस पोर्तुगीज ईस्ट आफ्रिका आहे. या वसाहतीचें क्षेत्रफळ सुमारें ३८४१८० चौरस मैल आहे. लोकसंख्या अजमासें ८० लक्ष आहे. हिंदी महासागरावरून वाहणारे उष्ण वारे ओलावा व उष्णता ह्यांनीं पूर्ण असल्यामुळें किनाऱ्यावर उष्णता व पर्जन्यवृष्टि जरा जास्तीच असते. पश्चिम व पूर्व किनाऱ्यावरील साधारण उष्णमान अनुक्रमें ७२° व ८०° अंश असतें. किनाऱ्यावर देवीच्या सांथीचा उपद्रव फार असतो.

लोकः—किनाऱ्यावर व आंत मुख्य मुख्य ठिकाणीं अरब लोकांची वस्ती आहे. हे लोक व्यापार किंवा शेती करतात. समुद्रकांठीं स्वाहिली लोक राहतात. अन्तर्भागांत राहणारे लोक बांटु व हॅमिटिक वंशांचे आहेत. मसाई ही जात युद्धविशारद आहे. वासांबरा, वारुंडो व वाहिमा ह्या जातीहि येथें राहतात. यांपैकीं शेवटची जात राज्यकर्ती आहे. सरकारी व मिशनरी शाळांच्या द्वारें एतद्देशीयांत जर्मन भाषेचें शिक्षण देण्यांत येतें. न्याय-इनसाफाच्या कामांत सल्ला देण्याची अन्तर्भागांतील एतद्देशीय मुख्यांस परवानगी आहे. देशाच्या संपत्तीचा मुख्य उगम शेती व जंगल यांत आहे.

उत्पन्नः—देशाची सांपत्तिक स्थिति सुधारण्याकरितां अनेक कंपन्या गुंतल्या आहेत. शिवाय याच कार्याकरितां खाजगी व्यक्तींचेहि प्रयत्न चालू आहेत. रबर, कॉफी, भुइमूग, कापूस ह्या निर्गत व्यापाराच्या मुख्य वस्तु होत. खाद्यवस्तू, कापड, धातू, लोखंडी सामान, हा आयात माल आहे. बंदरापासून व्यापारी पेठांपर्यंत उत्तम पायरस्ते तयार केलेले आहेत. टांगापासून उझांबराच्या डोंगरापर्यंत एक रेल्वेफांटा गेलेला आहे. शिवाय आगबोटी, संदेशवाहक यंत्रें वगैरे दळणवळणाचीं साधनें आहेतच.

राज्यव्यवस्थाः—राज्यकारभाराच्या सोयीकरितां देशाचे डिस्ट्रिक्ट व स्टेशन असे विभाग केले आहेत. प्रत्येक स्टेशनवर एक मुख्य असून तो डिस्ट्रिक्टच्या अधिकाऱ्यास जबाबदार असतो. हे डिस्ट्रिक्टचे अधिकारी गव्हर्नरास जबाबदार असतात. गव्हर्नर हा वसाहत सैन्यावरील मुख्य असतो.

इतिहासः—१६ व्या शतकाच्या सुरवातीस पोर्तुगीजांनीं ईस्ट आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील शहरें काबीज केलीं. १८ व्या शतकाच्या सुरवातीस पोर्तुगीज लोक येथून निघून गेले आणि किनाऱ्यावरचीं केप डेलगॅडोच्या उत्तरेकडचीं शहरें मस्कत अरबांनीं घेतलीं. त्यांच्यापासून तीं झांझीबारच्या सुलतानाकडे गेलीं. स. १८५०च्या सुमारास झांझीबार येथील अरबांनीं टांगानिका सरोवराच्या पूर्व तीरावर असलेल्या युजीजी येथें आपलें वस्तान बसविलें. १८७७ सालीं झांझीबारच्या सुलतानानें आपला सबंध मुलूख ब्रिटिशांस पट्ट्यानें लिहून देण्याचा विचार केला पण ब्रिटिशांनीं तो घेण्याचें नाकारलें. स.१८८४ त 'जर्मन कालनायझेशन सोसायटीनें' पूर्वआफ्रिकन किनाऱ्यावरील मुलूख जर्मनांकरितां मिळण्याची खटपट सुरू केली. हा हेतु तडीस जावा म्हणून कांहीं जर्मन तरुण अन्तर्भागांत पाठविण्यांत आले व त्यांनीं उसांबरा येथील सरदारांबरोबर तह केला. त्याचप्रमाणें दुसऱ्या इतर सरदारांबरोबर त्यांनीं तह केले. झांझीबारचा सुलतान ते तह प्रथम मान्य करीना पण शेवटीं निरुपाय होऊन त्याला ते मान्य करणें भाग पडलें. इतकेंच नव्हे तर एका जर्मन कंपनीला रुवुमा नदीच्या दक्षिण मुखाकडील प्रदेश पट्ट्यानें द्यावा लागला. स. १८८४, १८८६, १८९० व ९४

या वर्षी ग्रेटब्रिटन, जर्मनी, पोर्तुगाल, व कांगोफ्रीस्टेट येथील सरकारांमध्यें परस्परांत झालेल्या तहांनीं जर्मनीला सध्यांचा जर्मन ईस्टआफ्रिका देश मिळाला. स. १८८८ च्या आगष्ट महिन्यांत जर्मन ईस्ट आफ्रिका कंपनीनें झांझीबारच्या सुलतानानें दिलेल्या मुलुखांतील अरबांवर राज्य करण्यास सुरवात केली. तेव्हां कांहीं बंडें झालीं पण तीं लवकरच मोडण्यांत आलीं. राजघराणीं जशीं होतीं तशींच कायम ठेविलीं. महायुद्धाच्या अमदानींत १९१८ सालीं ही सारी वसाहत जर्मनीपासून दोस्तराष्ट्रांनीं जिंकून घेतली व ती ब्रिटिशांनां दिली. तेव्हां यापुढील इतिहासाकरितां 'टांगानिका' पहा.

पो र्तु गी ज पू र्व आ फ्रि का.—हिचेंच दुसरें नांव मोझांबिक असें आहे. या पोर्तुगीज मुलुखाच्या पूर्वेस हिंदीमहासागर; उत्तरेस (पूर्वीची) जर्मन ईस्ट आफ्रिका; पश्चिमेस न्यासालँड प्रोटेक्टोरेट, ऱ्होडेशिया व ट्रान्सव्हाल, व दक्षिणेस टोंगो लँड (नाताल) आहे. याचें क्षेत्रफळ; २९,३५,००० चौरस मैल आहे. झांबेझी नदीमुळें या मुलुखाचे दोन भाग झाले आहेत. या एकंदर प्रांताच्या समुद्रकिनाऱ्याची लांबी १४३० मैल आहे. झांबेझी शिवाय दुसरी महत्त्वाची नदी म्हणजे लिंपोपो ही होय. ही डेलागोआबेच्या उत्तरेस सुमारें १०० मैलांवरून येऊन हिंदीमहासागरास मिळते. किनाऱ्यावरील हवा फार रोगट आहे झांबेझीच्या कांठची हवाहि दूषित असून हिंवतापाचा उपद्रव त्या ठिकाणीं फार असतो. डोंगर पठारावर व उंच भागावर हवा बरी असते. नोव्हेंबर महिन्यांत अतिशय उन्हाळा असतो. एप्रिलपासून आगष्ट पावेतों थंडीचा मोसम असतो. दिसेंबर ते मार्च पावेतों पावसाळा असतो.

पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेची लोकवस्ती फार पातळ आहे. लोकसंख्या सुमारें ३० लाख आहे. शेंकडा ९० लोक बांटु राष्ट्रजातीचे आहेत. प्रांताच्या उत्तरार्धांतील महत्वाची राष्ट्रजात म्हणजे माक्वा ही होय. या जातींत अद्यापपावेतों भेसळ झालेली नाहीं. या जातीचे चार पोटविभाग आहेत. झांबेझी व माझो नद्यांमधील महत्त्वाची जात टाव्हाला ही होय. पुंग्वे नदीच्या दक्षिणेस झुलुवंशोद्भव राज्यकर्त्या जाती आहेत. गौरकाय लोकांची संख्या सुमारें दहा हजार होती. या लोकांत मुख्यतः पोर्तुगीज व ब्रिटिशांचा समावेश होतो. लोरेंको मार्क्वीस, मोझांबिक, क्विलिमेन, इनहँबेक बैरा, चिंदे, व सोफाला हीं पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेंतील मुख्य शहरें होत. नद्या, रेल्वे, व तारायंत्रें हीं दळणवळणाचीं साधनें आहेत.

शेतीः—रोव्हमा ते झांबेझी-पर्यंतचा प्रदेश फार सुपीक आहे. झांबेझीच्या कांठची जमीन तर पहिल्या प्रतीची आहे. देशाचा बराच मोठा भाग ऊंस, गहूं, भुईमुग, कॉफी व तंबाखू यांच्या लागवडीस योग्य आहे. झांबेझीच्या खोऱ्यांत गहूं पुष्कळ होतो. क्विलिमेनलगतच्या भागांत नारळाचें पीक चांगलें येतें.

व्यापारः—कोळसा, लोखंड, तांबें, आणि सोनें व रॉकेल तेल हीं खनिज द्रव्यें सांपडतात रबर, साखर, कोळसा, नारळ, भुईमुग, हस्तिदंत इत्यादि निर्गत व्यापाराच्या मुख्य वस्तू असून कापसाचें कपड, खाद्यवस्तू, व लोखंडी सामान ह्या आयात व्यापाराच्या वस्तू होत. काफीर लोक घोंगड्या, टोप्या, जोडे, पितळी सामान इत्यादि वस्तूंचा व्यापार करतात. पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेचा बहुतेक व्यापार ग्रेटब्रिटन, हिंदुस्थान, जर्मनी व पोर्तुगालशीं आहे.

शासनव्यवस्थाः—पूर्वी पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेस मोझांबिक म्हणत असत पण १८९१ पासून त्याला ' स्टेट ऑफ ईस्ट आफ्रिका ' हें नाव प्राप्त झालें. या प्रांताचा कारभार गव्हर्नर जनरल पहात असून त्याची मुदत तीन वर्षांपर्यंत असते. राज्यकारभाराच्या सोयीकरितां पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेचे जिल्हे पाडले आहेत. सरकारी सभासदांचे व ज्यांत, व्यापारी, औद्योगिक व शेतकी मंडळांचे प्रतिनिधी आहेत अशांचें एक सल्लागार मंडळ आहे व एक प्रांतिक सल्लागार मंडळहि आहे. कांहीं भागांची शासनव्यवस्था झांबेझीकंपनीकडे सोंपविली आहे. शिक्षण हें मुख्यतः रोमनकॅथॉलिक मिशनऱ्यांच्या हातीं आहे.

इतिहासः—इ.स. च्या १० व्या शतकांत अरबांनीं सोफाला पर्यंतचा दक्षिणसमुद्रकिनारा काबीज केला. परंतु ते अन्तर्भागांत मात्र फारसे गेलेले नाहींत; किनाऱ्यावरच वखारी घालून ते बांटु लोकांबरोबर व्यापार करीत. १५व्या शतकच्या अखेर पर्यंत त्यांची समुद्रकिनाऱ्यावरील सत्ता अबाधित होती. १४९८ त वास्को ड गामा क्विलिमेन नदीच्या मुखांत शिरला व तेथून तो मोझांबिक व मोंबासा येथें उतरला. १५०२ मध्यें तो सोफाला येथें गेला व त्यानें केलेल्या तेथील सांपत्तिक स्थितीच्या रसभरित वर्णनानें पोर्तुगीजांच्या तोंडांस पाणी सुटून पीड्रो डान्टाया याला १५०५ मध्यें सोफाला येथें पाठविण्यांत आलें. डान्टाया यानें अरब शहरानजीकच एक किल्ला बांधिला व अरबांनां पोर्तुगीज सत्ता मान्य करण्यास भाग पाडलें. १५०७ मध्यें मोझांबिक बळकावण्यांत येऊन त्या ठिकाणीं तटबंदी करण्यांत आली. १५१० च्या सुमारास पूर्व आफ्रिकेचा सर्व किनारा पोर्तुगीजांच्या ताब्यांत आला. १५०४ त ' रिव्हर ऑफ गुड टोकन्स् ' या नदीवर एक वखार घालण्यांत आली. याच सुमारास पोर्तुगीज झांबेझीच्या कांठाकांठानें जाऊन आंत घुसले व सेना व टेटी या ठिकाणीं त्यांनीं बंदरें स्थापन केलीं. शिवाय याच वेळीं लॉरेन्सो मार्क्विन डेलागोआबेमध्यें शिरला व त्यानें तेथून एतद्देशीयांशीं व्यापार सुरु केला. १५६९ त ईस्ट आफ्रिकन मुलुख हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयच्या शासनसत्तेखालीं न ठेवतां निराळ्या स्वतंत्र शासनसत्तेखालीं देण्यांत आला. १५६९-७० या वर्षी पोर्तुगीजांनीं सोन्याच्या खाणींच्या शोधार्थ अन्तर्भागांत शिरण्याची शिकस्त केली पण त्यांत त्यांनां यश आलें नाहीं.

१६ व्या शतकाच्या अखेरी अखेरीस झांवेझी नदीवरील पोर्तुगीज ठाण्यांवर मुंझिया नांवाच्या रानटी टोळीनें हल्ला केला, व टेटी व सेना हीं दोन ठाणीं जमीनदोस्त केलीं. हिंदुस्थान व त्याच्या पूर्वेकडील मुलुखांतील संपत्तीच्या मार्गे लागल्यामुळे व पूर्वआफ्रिकेंतील एतद्देशीयांनां बाटविण्याच्या बेसुमार लालसेमुळें, पोर्तुगीजांचा ईस्ट आफ्रिकन मुलुखांत केव्हांच नीट जम बसला नाहीं. दोन जातींत भांडणें लावून आपला फायदा करून घेण्याची युक्ति पोर्तुगीजांनां साधलीच नाहीं.केप डेल्गॅडोच्या उत्तरेकडील मुलुख त्यांच्या जवळून अरबांनीं हिरावून घेतला. लासेरडा नांवाच्या पोर्तुगीज मुत्सद्दयानें राज्यव्यवस्थेंत सुधारणा करण्याचा बराच प्रयत्न केला. व तो कांहीं अंशीं फलद्रूपहि झाला. पण त्याच्या मरणानंतर पुन्हा पूर्वीचीच स्थिति आली. १८७५ सालीं डेलागोआबेचें पूर्ण स्वामित्व पोर्तुगालला मिळालें.

अर्वाचीन इतिहासः—१९१९ सालच्या शांततापरिषदेनें व्हर्सेलिसच्या तहान्वयें, महायुद्धाच्या पूर्वी जर्मनांच्या ताब्यांत असलेला रोव्हमाच्या दक्षिणेकडचा 'किर्योंगा ट्रँगल' नांवाचा मुलुख पोर्तुगालला दिला. त्यामुळें पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेच्या मर्यादा आतां बदलल्या आहेत. पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेचे हल्लीं तीन स्वतंत्र भाग पाडण्यात आलेले आहेत. ते म्हणजे-(१) मोझांबिकचा प्रांत, (२) कंपानिया डे मोझांबिक व (३) कंपानिया डो न्यास.१९१८ सालीं पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेची लोकसंख्या अंदाजें तीस लाख होती व क्षेत्रफळ ४२८१३२ चौरस मैल होतें.

१९११-२१ सालच्या दरम्यान या वसाहतींमधील उत्पन्नाच्या बाबींत वाढ करण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न करण्यांत आले. साखरेचें उत्पन्न पूर्वीपेक्षां तिपटीनें वाढलें. सिसलची वाढ करण्यांत आली. ताडाच्या वाढीकडे विशेष लक्ष पुरविण्यांत आलें. १९२३ सालीं २३०४१४१५४ एसक्यूडो किंमतीच्या मालाची आयात व११ ७०८२२३४ एसक्यूडो किंमतीच्या मालाची निर्गत या वसाहतींत झाली. १९२३-२४ सालीं या वसाहतीचें उत्पन्न ३३०३६२९६ एसक्यूडो होतें. १९१०-२० सालांच्या अमदानींत छोटया अशा पुष्कळ रेल्वे उघडण्यांत आल्या. सर्वांत मोठी रेल्वे म्हणजे डेलॅगोआवे आणि इनहॅबेनें यांच्यामधील होय. १९२२ सालापासून एसक्यूडो हें मुख्य चलन स्वीकारण्यात आलें, १९२० सालपर्यंत पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेमधील वित्तोत्पादक अशा साधनांकडे अधिकाऱ्यांचें लक्षच गेलें नाहीं. आपल्या वसाहतींची बाह्य वाढ करण्याकरतांच सारखी धडपड चाललेली असे. शिवाय पोर्तुगालजवळ भांडवलाची उणीव असल्यानेंहि या वित्तोत्पादक साधनांकडे त्यांचें लक्ष जाणें शक्य नव्हतें. १९२० सालीं या वसाहतीचा गव्हर्नर जनरल सेनार डे मागेल्हास यानें मोझांबिक प्रांताला स्वायत्ततेचे हक्क संपादन करून घेतले व त्या ठिकाणीं पोर्तुगीज वर्चस्व प्रस्थापित केलें. त्याचप्रमाणें पोर्तुगीज न्यासालंडमध्यें पोर्तुगीज अंमल पूर्णपणें स्थापन करण्याची चळवळ १९०९ सालापासून सुरू होऊन अनेक अडथळयांनां तोंड दिल्यानंतर ती पूर्ण यशस्वी झाली १९१५ सालीं झांबेझी खोऱ्यांत बंडाचा वणवा पेटला, पण तो तीन चार वर्षांच्या प्रयत्नानें शांत करण्यांत आला. १९१७ सालीं जर्मन सशस्त्र टोळयांनीं पोर्तुगीज प्रदेशांत शिरून बराच धुमाकूळ माजविला.

ब्रि टि श पू र्व आ फ्रि का.—'केनिया' पहा.

**पूर्वघाट**—दक्षिण हिंदुस्थानच्या दोन्ही बाजूंनीं जाणाऱ्या पर्वतांनां सामान्यतः घाट म्हणतात. पूर्वघाट ओरिसापासून सुरू होऊन गंजममधून खालीं निलगिरीला मिळतो. आरंभीं हा अगदीं किनाऱ्यापासूनच जातो म्हटलें तरी चालेल, पण पुढें पुढें मात्र किनाऱ्यापासून आंत आंत जातो व १०० ते १५० मैलांची रुंद पट्टी समुद्रापर्यंत रहाते. हा सर्व घाट एकाच जातीच्या भूस्तराचा बनला नसून त्यांतील खडकांची रचनाहि भिन्न भिन्न आहे. इतर दृष्टीनेंहि पर्वताच्या निरनिराळ्या भागांत फरक दिसतो. मधल भागांत पाऊस कमी असून हिंवताप फार आहे. डोंगरांतील लोक रानटी आहेत. सर्वांत उंच शिखर महेंद्रगिरी (५००० फूट) हें होय. या घाटांतून उत्तरेला ऋषिकुल्या वगैरे १-२ नद्या निघतात. पुढें नद्या वगैरे कांहीं नाहीं. पश्चिम घाटाकडून येणाऱ्या नद्या मात्र याच्यामधील दऱ्या वगैरे तुटक भागांतून पलीकडे समुद्राला मिळतात.

**पृथु**—हा चक्षुर्मनूचा वंशज व वेनराजाचा पुत्र होता. यानें पृथ्वी सपाट केली; व तिचें दोहन करून अनेक रत्नें व औषधी काढल्या. यानें भूमीला कन्या मानिल्यामुळें तिला पृथ्वी हें नांव मिळालें.

**पृथ्वी**—सूर्यमालेमधील पृथ्वी हा सूर्यापासूनचा तिसरा ग्रह आहे. वातावरण, जमीन व पाणी हे तीन विषय पृथ्वीशीं संबद्ध आहेत. पृथ्वी सपाट असून पर्वत, नद्या व समुद्र यांनीं व्यापलेली आहे अशी प्राथमिक अवस्थेंतील मानवांची कल्पना होती जगाच्या पृष्ठभागावर पसरलेल्या पाण्यामधून पृथ्वी हें वर आलेलें बेट आहे अशा कल्पना बाबिलोनी, हिब्रू व प्राचीन ग्रीक लोकांच्या विश्वोत्पत्तिपर वर्णनांत सांपडतात. पृथ्वीचा आकार व लांबीरुंदी ठरविण्याचा खरा शास्त्रीय प्रयत्न एरॅटॉस्थिनीस (ख्रि. पू. २५० चा सुमार) यानें करून ती वाटोळी आहे व तिचा परीघ २५०००० स्टेडिया (२९००० मैल) आहे असें ठरविलें (विभाग ५ वा. पृ. ३३१). पोसिडोनियसनें २४०००० आणि टॉलेमीनें आपल्या 'भूगोल' ग्रंथांत ३ लक्ष स्टेडिया असल्याचें सांगितलें आहे. इ. स. ८१४ मध्यें अरबांचा खलिफ अबदल्ला अल महून यानें ज्योतिषशास्त्रज्ञांच्या साहाय्यानें पृथ्वीचा परीघ मापण्याचा प्रयत्न केला पण तो बरोबर साधला नाहीं. नंतर बऱ्याच शतकांनीं जीन फेर्नेल या फ्रेंच इसमानें

(१४९७-१५५८)जो प्रयत्न केला त्याचें उत्तर बहुतेक बरोबर आहे. नंतर विलेब्रॉर्ड स्नेल (१६१७), रिचर्ड नॉरवुड (१६३७), पी. व्हॉन मुश्चेन ब्रोएक (१७२९) यांनीं प्रयोग केले ते बहुतेक यशस्वी झाले आहेत. स.१६६९पासून दुर्बिणीच्या साहाय्यानें जीन पिकार्ड वगैरेंनीं प्रयत्न केले. १६९६ सालीं जीन रिचरनें पृथ्वी बरोबर गोल नसून मध्ये फुगीर आहे हें निदर्शनास आणलें.

स्थूलमानानें पृथ्वीचें क्षेत्रफळ १९६५५०००० चौ. मैल भरतें; पैकीं ५५५००००० चौरस मैल जमीन असून बाकी सर्व पाणी आहे. पृथ्वीवरील एकंदर लोकसंख्या एक अब्ज ६५६ कोटी भरते. पृथ्वीचें दार्ढ्य (डेन्सिटी) ५ व ६ असावें असें न्यूटननें केवळ ज्योतिःशास्त्रीय प्रमाणांवरून अंदाजानें ठरविलें आणि तोच अंदाज बरोबर ठरला; कारण नंतरच्या प्रयोगांवरून हें दार्ढ्य पांचपूर्णांक एकद्वितीयांश आणि द्रव्य-राशि (मास) ६×१०²¹ टन आहे असें ठरलें आहे. पृथ्वीला कोणकोणत्या गती आहेत तें ठरविणें हा ज्योतिषशास्त्रांतील एक अत्यंत महत्त्वाचा शोध होय. पृथ्वी स्थिर आहे ही फार जुनी समजूत असून तीच टॉलेमी या प्रसिद्ध प्राचीन तत्त्ववेत्त्यानें मान्य केल्यामुळें, मध्ययुगांत स.१५४३त कोपर्निकसनें विरुद्ध मत देईपर्यंत ती प्रचलित होती (वि. ५ वा, पृ. ३३९) पुढें केप्लर, न्यूटन वगैरे ज्योतिषज्ञांनीं सूर्यमाला, पृथ्वीच्या वार्षिक व दैनंदिन या दोन गती वगैरेंबद्दलचे शोध लावले.

प्र द क्षि णा (रेव्होल्यूशन).—पृथ्वी सूर्याभोंवतीं दीर्घवर्तुळाकार कक्षेत फिरत असून सूर्य हा त्या कक्षेचा एक केंद्र आहे. ज्या पातळींत ही कक्षा असते तीस क्रांतिवृत्त (एलिप्टिक) म्हणतात. क्रांतिवृत्त व पृथ्वीचें विषुववृत्त हीं एकमेकांशीं तिरकस असून तीं ज्या बिंदूमध्यें एकमेकांस छेदितात त्यांस संपातबिंदु (इक्विनॉक्शल पॉइंट) म्हणतात. ह्या दोहोंमधील कोनावरून क्रांतिवृत्ताचें तिर्यक्त्व समजतें. पृथ्वीच्या कक्षेच्या मुख्य अक्षास उच्च नीच रेषा म्हणतात. पृथ्वी सूर्याजवळ असल्यास ती नीच (पेरिहिलिअन) स्थानांत व दूर असतांना ती उच्चस्थानांत (अपहीलिअल) आहे असें समजतात. पृथ्वी व सूर्य यांच्यामधील साधारण अंतर ज्योतिशास्त्रांत बरेंच महत्त्वाचें असून त्यावर लांबी मोजण्याचें मूलमान अवलंबून असतें. सूर्यास एका संपातबिंदूपासून त्याच संपातबिंदूंत परत येण्यास लागणाऱ्या भासमान गतीच्या काळास अयन–वर्ष (ट्रॉपिकल इयर) म्हणतात. हा काळ ३६५ दिवस, ५ तास, ४८ मिनिटें, व ४६ सेकंद आहे. हें वर्ष नाक्षत्र वर्षाहून २० मिनिटांनीं लहान आहे. नाक्षत्र–वर्ष म्हणजे सूर्यास एका ताऱ्यापासून त्याच ताऱ्यापर्यंत येण्यास लागणारा वेळ होय. तिसऱ्या एका प्रकारचें एक वर्ष म्हणजे सूर्यास नीच बिंदूपासून निघून त्याच बिंदूपर्यंत परत येण्यास लागणारा काळ होय. ह्यास नीचोत्पन्न वर्ष (ॲनोमालिस्टिक इयर) म्हणतात आणि हें नाक्षत्र वर्षापेक्षां थोडें मोठें असतें.

प रि भ्र म ण (रोटेशन).—पृथ्वी ही आपल्या उत्तर व दक्षिण ध्रुव सांधणाऱ्या आंसाभोंवतीं फिरते ही प्राचीन कल्पना फोकल्ट यानें इ. स. १८५१ मध्यें आंदोलकाच्या हेलकाव्यांच्या वळणावरून प्रायोगिकरीत्या सिद्ध केली. हें वळण जमीन हलत असल्यामुळें मिळत असल्याकारणानें पृथ्वीहि हलते म्हणजे परिभ्रमण पावते असें सिद्ध होतें. पृथ्वीच्या ह्या परिभ्रमणास लागणाऱ्या वेळास दिवस म्हणतात हें परिभ्रमण पश्चिमेकडून पूर्वेकडे होत असतें. ह्या परिभ्रमणामुळेंच आकाशगोलांची दैनंदिन गति दृष्टोत्पत्तीस येते व यांच्यामुळेंच सूर्य आणि तारे पूर्वेकडे उगवून पश्चिमेकडे मावळतांना दिसतात. आणि दिवस व रात्र दिसून येते.

आतां आपण पृथ्वीच्या वाटचालींत कालान्तरानें दिसून येणाऱ्या फरकांचा (सेक्यूलर व्हेरिएशन) विचार करूं. पृथ्वीचा आंस हा सारखा एकाच दिशेंत फिरत नसून कालान्तरानें तो वळल्या कारणानें शंक्वाकृति (कोन) बनतो. आतां ह्या फिरत्या आंसाच्या योगानें विषुव–वृत्त व क्रांतिवृत्त ह्यांमध्यें असणारा कोन बदलतो. पण तोच कायम ठेवण्याकरतां विषुववृत्तांत चलन होतें त्यास विषुवचलन (प्रिसिशन) म्हणतात. शिवाय हें चलन सूर्य व चंद्र यांचें पृथ्वीवर असणारें आकर्षण सारखे, नियमित व एकाच दिशेमध्यें नसल्यामुळेंहि दृष्टोत्पत्तीस येतें. वरील कारणामुळेंच अक्षांदोलनहि (नुटेशन) होतें. क्रांतिवृत्तहि स्थिर नसून कालान्तरानें पृथ्वीवर असणाऱ्या इतर ग्रहांच्या आकर्षणाच्या योगानें चलन पावतें. ह्या चलनास ग्रहविषयक चलन (प्लॅनेटरी प्रिसिशन) म्हणतात. पृथ्वीचा आंस हा तीमध्यें दृढरीत्या बसविलेला नसल्यामुळें ध्रुवबिंदू हे ५० फूट व्यासाच्या वर्तुळामध्यें फिरते असतात, व त्यामुळेंच अक्षांशामध्येंहि फरक दिसून येतो. पृथ्वीच्या वयोमानासंबंधीं ज्ञानकोश विभाग ५ वा (पृ. ५८७) पहा. भौगोलिक ज्ञानविकासासंबंधीं माहिती 'बुद्धोत्तर जग' प्र. १४ यांत दिली आहे. याशिवाय उत्तर–दक्षिणध्रुवप्रदेशांवरचे लेख पहा.

**पृथ्वीराज चव्हाण**—याचें दुसरें नांव राय पिठोरा चौहान (चाहमान) असें आहे. अजमेर व सांबर येथील या सूर्यवंशीय चौहान रजपूतवंशानें हिंदुस्थानच्या इतिहासांत बरीच कामगिरी केली आहे. त्यांपैकीं चवथा विग्रहराज हा फार विद्वान असून त्यानें एक संस्कृत नाटक केलें होतें. याचा सोमेश्वर नांवाचा एक भाऊ होता, त्याचा पृथ्वीराज हा पुत्र होय. पृथ्वीराज हा फार शूर, विलासी व मुसुलमानांनां सतावून सोडणारा म्हणून प्रख्यात आहे. हिंदुस्थानांत याचें नांव शेवटचा सम्राट म्हणून गाजलें आहे. याची कथा अद्भुतरम्य असल्यानें पुष्कळ कवींनीं तीवर काव्यें केलीं आहेत. कनोजचा गहरवाल राजा जयचंद यानें राजसूय यज्ञ केला, त्यांत त्यानें पृथ्वीराजाकडे द्वारपालाचें काम दिलें होतें. जयचंदाची मुलगी संयोगिता हिचें प्रेम पृथ्वीराजावर बसलें होतें; परंतु जयचंदास ही गोष्ट पसंत नव्हती. हें वर्तमान

पृथ्वीराजास समजल्यावर राजसूय यज्ञाच्या गडबडींत संयोगितेच्या पत्राप्रमाणें त्यानें कनोजेस जाऊन तिचें हरण केलें ( ११७५ ). त्यामुळें जयचंद व पृथ्वीराज यांच्यांत वैर माजलें. अबू येथें जैत परमार या नांवाचा एक राजा होता. त्याच्या इच्छिनीकुमारी नांवाच्या मुलीला गुजराथच्या भीमदेवानें मागणी घातली परंतु त्यानें ती नाकारून पृथ्वीराजास मदतीस बोलाविलें. सोमेश्वरास भीमदेवानें ठार मारिलें होतें, त्याचा सूड घेण्यास पृथ्वीराज टपला होता. त्यानें परमारास मदत करून भीमाचा साबरमतीवर सपशेल पराभव केला व मग इच्छिनीशीं लग्न लाविलें. पृथ्वीराजानें मुसुलमानांनां पुष्कळदां पिटाळून लाविलें;दंतकथेवरून समजतें कीं, त्यानें १४ वेळ त्यांचा पराभव केला होता. या कथेचा उगम मेरुतुंगाच्या कल्पनेपासून झाला असावा. पृथ्वीराज पुढें दिल्लीस राहूं लागला. त्यानें स. ११८३ त बुंदेलखंड घेतलें व इतर पुष्कळ प्रांत घेऊन आपलें राज्य वाढविलें. त्याला दिल्लीचें राज्य त्याच्या मातामहाकडून मिळालें. दिल्लीचा राजा तुवरवंशीय अनंगपाळ हा निपुत्रिक होता. त्याच्या दोन मुलींपासून पृथ्वीराज व जयचंद यांचा जन्म झाला होता; पृथ्वीराजाचा जन्म स.११५९तील आहे. अनंगपाळानें एकट्या पृथ्वीराजास आपलें राज्य दिलें त्यामुळें जयचंद यास मत्सर वाटला. तशांत त्यानें संयोगितेचें हरण केल्यानें तो जास्त चिडला. त्यानें व पटणच्या राजानें शहाबुद्दीन ( महंमूद ) घोरीस मदतीस बोलाविलें. परंतु पृथ्वीराजानें आपला मेहुणा चितोडकर समरसिंह व इतर क्षत्रिय राजे यांच्या साहाय्यानें स्थानेश्वराजवळ तलावरी येथें घोरीचा सपशेल पराभव केला ( ११९१ ). व त्याच्यापासून ८ हजार घोडे खंडणी घेऊन त्यास सोडून दिलें.पुढें पृथ्वीराज संयोगितेच्या नादीं फार लागला, त्यामुळें राज्यांत बेबंदशाही माजली. विनापराध त्यानें आपल्या मंत्र्यांनां शिक्षा केल्या. ही संधि साधून घोरीनें पुन्हां स्वारी केली. यावेळीं पृथ्वीराजाचे सरदारच फितूर झाले होते. शिवाय वरचेवर रजपूत राजेहि त्याच्या मदतीस आले नाहींत. आपल्या थोडक्या सैन्यानिशीं गंगोदकाची शपथ घेऊन पृथ्वीराज स्थानेश्वरीं आला. पृथ्वीराजानें गाफीलपणें राहून घोरीच्या सैन्याची बातमी वगैरे न काढतां त्याच्यावर हल्ला केला. प्रथम त्याचा जय झाला होता. हिंदु लोक बेसावधपणें व विस्कळित होऊन आपल्यामागें येत आहेत असें पाहून घोरीनें एकदम आपलें सैन्य एकत्र करून त्यांच्यावर हल्ले केले. त्यांत पृथ्वीराजाचा सेनापति चामुंडराय, हमीर हाडा वगैरे पुष्कळ सरदार ठार झाले. स्वतः पृथ्वीराज हा घोरीच्या हातीं लागला, तेव्हां त्यानें पूर्वीचा उपकार न स्मरून पृथ्वीराजाचा वध केला. इतके दिवस मुसुलमानांचा हिंदुस्थानांत कायमचा प्रवेश होईल कीं नाहीं याची शंका होती, तिचें निराकरण या प्रसंगानें झालें व हिंदूंचें साम्राज्य नाहींसें झालें. पृथ्वीराज रासा या ग्रंथांत पुढील गोष्ट आहे— पृथ्वीराजास घोरीनें पकडून गझनीस नेल्यावर व त्याला अंध केल्यावर पृथ्वीराजाचा दरबारी भाट चंदवरदायी यानें घोरीस त्याचा शब्दवेधचमत्कार पहाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें घोरीनें सांगितलेले ७ । ८ लोखंडी तवे पृथ्वीराजानें बाणानें फोडले. पुढें शाबासकीचे शब्द घोरीनें काढले. त्या शब्दांवरून पृथ्वीराजानें घोरीला बाण मारून ठार केलें व मग चंद आणि पृथ्वीराज यांनीं परस्परांस ठार मारिलें. पण ही गोष्ट खरी नसावी, पृथ्वीराजाबद्दल इतका आदर उत्तर हिंदुस्थानांत पसरलेला आहे कीं, सांप्रतचे बहुतेक राजे, आपला कोणीना कोणी तरी पूर्वज पृथ्वीराजाबरोबर मुसुलमानांशीं लढला असें मोठ्या अभिमानानें सांगत असतात. [ स्मिथ–अर्ली हि. इंडिया; वैद्य–मध्ययुगीन भारत; राव्हर्टी–पंजाब ]



**पृथ्वीराज रासा**—याची माहिती ज्ञा. को.च्या १३व्या विभागांत चंदभाट या शब्दाखालीं आली आहे. रजपुतांतील अग्निकुलकल्पना चंदानेंच प्रथम या रासामध्यें निर्माण केली व ती रासेबरोबरच लोकप्रिय झाली. पृथ्वीराजाचा मूळ पुरुष चाहमान हा अग्निकुलांतील होता असें रासा म्हणतो. अकबरापर्यंत या ग्रंथांत नवीन मजकूर दाखल होत होता, पुढें तो बंद झाला. रजपुतांचा इतिहास समजण्यास हें महाकाव्य फार उपयोगी आहे.

**पेकिंग**—चीनच्या साम्राज्याची राजधानी. हें शहर उत्तर अक्षांश ३९° ५७′ व पूर्व रेखांश ११६° २९′ यांवर वसलें आहे. निरनिराळ्या नांवांखालीं व निरनिराळ्या घराण्यांच्या अमलांत पेकिंग शहर चीनच्या साम्राज्याची राजधानी होतें. इ. स. ९८६ त खितान तार्तर लोकांनीं हें शहर काबीज केलें व यास नानकिंग नांव दिलें.१२ व्या शतकाच्या आरंभीं चिनी लोकांनीं हें शहर घेतलें व त्यास येनशानफु नांव देऊन याचा राजधानीचा दर्जा कमी केला व नुसतें पहिल्या प्रतीचें प्रांताचें ठिकाण केलें. स. ११५१ त किनतार्तरांनीं पेकिंगला चुंगटु नांव देऊन राजधानी केलें. सुमारें एक शतकानंतर चेंगीझखानाच्या ताब्यांत पेकिंग आलें. त्याच्यानंतर गादीवर बसलेल्या कुबलाईखानानें ( १२८०-९४ ) पेकिंग पुन्हां नवीन वसवून त्याला येनकिंग नांव दिलें. चेंगीझखानाच्या घराण्यानंतर आलेल्या घराण्यांतील पहिल्या पुरुषानें आधुनिक नानकिंग शहर राजधानी केलें. परंतु युंगलोबादशाहानें ( १४०३–२५ ) पेकिंग पुन्हां राजधानीचें शहर केलें. सध्यांच्या पेकिंग शहराचे मुख्य दोन भाग आहेत. पहिला नैचेंग अथवा ' आंतील शहर ' या नांवानें प्रसिद्ध असून परकीयांनीं याला तार्तर शहर असें नांव दिलें आहे. दुसऱ्या भागाचें नांव वैचेंग अथवा ' बाहेरील शहर ' आहे. यास चिनी शहर असें नांव आहे. पहिला भाग दुसऱ्या भागाच्या आंत नसून, त्याच्या उत्तरेकडील भिंतीच्या पलीकडे आहे. बाक्सर बंडाच्या वेळेस पेकिंगचा बराच नाश झाला. त्याप्रमाणें परराष्ट्रीय वकिलातीस दिलेल्या वेढ्याच्या

वेळेस ( १५०० ) परकीयांच्या इमारती, प्राचीन हॅनलिन युएनसारख्या चिनी इमारती व व्यापारपेठ इत्यादि जळून बेचिराख झाल्या. पेकिंगची लोकसंख्या सुमारें १० लक्ष आहे व क्षेत्रफळाच्या मानानें ही संख्या फारच कमी आहे. शहरहि फारच घाणेरडें आहे.

तार्तर शहरांत ह्वांगचेंग अथवा 'साम्राज्य शहर' असून यांत आणखी त्स्झेकिन्--चेंग अथवा 'मना केलेलें शहर' आहे. यांत बादशहाचा राजवाडा आहे. खंदकाच्या अलीकडे एक कृत्रिम डोंगर असून याला किंगशान अथवा 'आशेचा डोंगर' असे म्हणतात. या डोंगरापलीकडे टिटू ( शहर सुभेदार )चा वाडा आहे. याच्याजवळच 'घंटा व पडघम' बुरुज आहेत. पहिल्यांत १२० हजार पौंड वजनाची घंटा आहे. पेकिंगच्या वायव्य कोपऱ्यांत एक बौद्ध देऊळ आहे. यांत एक मोठी घंटा असून देवळाच्या भिंतीवर चिनी भाषेंत 'लंकावतार सूत्र' आणि 'सद्धर्मपुंडरीकसूत्र' हीं कोरलेलीं आहेत.

'मना केलेल्या' शहरांत भव्य राजवाडा असून बादशहाचा दरबार भरतो. पूर्व व पश्चिम भागांत साम्राज्यांतील मोठमोठ्या मानकऱ्यांच्या हवेल्या आहेत. याच्या पलीकडे सहा खात्यांच्या कचेऱ्या आहेत व हीं सहा खातीं १८ प्रांतांचा राज्यकारभार पहातात.

'मना केलेल्या शहरा' बाहेर स्वर्गदेवालय आहे. पृथ्वी, सूर्य, चंद्र इत्यादिकांचीं देवळें शहराच्या वेगवेगळ्या भागांत आहेत. कोझेकिएन नांवाचें कन्फ्यूशियन देऊळ महत्त्वाचें आहे. तार्तार शहराच्या आग्नेय भागांत कुबलाईखानाच्या हुकूमानें स. १२९६ त बांधलेली वेधशाळा होती. कंगहीच्या वेळेस ( सन १६६१--१७२१ ) जेसुईट लोकांचें वर्चस्व वाढून वेधशाळेची व्यवस्था रोमनकॅथॉलिक मिशनऱ्यांच्या ताब्यांत गेली. शहराचा व्यापार फार थोडा आहे. स. १८९७ त टाएंतसिन व पेकिंग यामध्यें रेल्वे सुरू झाली. पेकिंग विश्वविद्यालय स. १८९८ त स्थापन झाले व १९१७ सालीं त्यांत सर्व सुधारणा करण्यांत आल्या. ब्रिटिश मिशनऱ्यांच्या प्रयत्नानें स. १९०६ त एक वैद्यकशाळा निघाली. पेकिंग शहरीं ६० वर वर्तमानपत्रें निघतात.

**पेगू**, जिल्हा.—खालच्या ब्रह्मदेशांतील, पेगु विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ४२७६ चौरस मैल. याच्या वायव्य भागांतील कांहीं डोंगराळ प्रदेश सुंदर आहे; परंतु जिल्ह्याच्या बहुतेक भागांत पहाण्यालायक कांहींच नाहीं. पेगू, नगमोयेक किंवा पझुंदौंग व सित्तंग या मुख्य नद्या होत. या जिल्ह्यांतील जंगलांत खालच्या ब्रह्मदेशांत सांपडणारीं सर्व श्वापदें आहेत. पेगूची हवा पुष्कळ अंशीं रंगूनसारखींच आहे.

इतिहासः—थॅटोन येथील तलैंग राज्याच्या अधिपतीचे मुलगे थामल व विमल यांनीं पेगू हें शहर इ. स. ५७३ त वसविलें अशी दंतकथा आहे. ऐतिहासिक काळाच्या प्रारंभापासून, पेगू हें तलैंग राज्यांतील महत्त्वाचें ठिकाण असून ह्या राज्याच्या स्वतंत्रतेच्या अखेरच्या दिवसांत तलैंग लोकांना पेगू लोक असें म्हणूं लागले होते. पंधराव्या शतकाच्या आरंभापर्यंत पेगूचा इतिहास फारसा उपलब्ध नाहीं. तलैंग लोकांचें ब्रह्मी लोकांशीं सतत युद्ध चालू असून अठीच शतकेंपर्यंत तलैंग लोक ब्रह्मी लोकांच्या अधिपत्याखालीं होते. इ. स. १३८५ त राझादिरित हा तलैंग राजा गादीवर बसला. यानें स. १४२२त आपला मृत्यु होण्यापूर्वी कांहीं काल धर्माकडे व सत्कृत्याकडे आणि राज्याची व्यवस्था नीट लावण्यांत घालविला. स. १५३४ त टोंगूचा तबिन श्वेति याने पेगू शहराला वेढा देऊन तें सर केलें. त्यानें तेथें १० वर्षें राज्य करून पुष्कळ देवळें बांधलीं. त्याच्या मरणानंतर त्याच्या सेनापतींपैकीं बयिन नौंग यानें सिंव्यूम्यशिन हें नांव धारण करून सर्व सित्तंग खोरें आपल्या ताब्यांत घेतलें. त्यानें आपल्या हयातींत पुष्कळ प्रदेश काबीज करून आपलें राज्य बरेंच वाढविलें; परंतु त्याच्या मरणानंतर त्याच्या राज्याचे लहान लहान विभाग झाले. सतराव्या शतकाच्या आरंभीं पेगू आव्हाच्या ब्रह्मी लोकांच्या हातीं आलें. तें स. १७०४त तलैंग घराण्याकडे आलें. परंतु पुढें १७ वर्षांनीं अलोंप्रा या प्रसिद्ध पुरुषानें तें तलैंग घराण्यापासून कायमचें घेतलें. अलोंप्रा यानें रंगून शहर वसवून पेगूचें महत्त्व बरेंच कमी करून टाकिलें होतें; तें तलैंगाचा शेवटचा पराभव झाल्यानंतर तें सर्वच नाहींसें झालें. ब्रिटिशांशीं झालेल्या युद्धांत पेगू येथें पुष्कळ चकमकी झाल्या.स.१८२४ त ब्रिटिशांनीं रंगून घेतल्यावर ब्रह्मी सेनापति या गांवांत आला होता; परंतु येथील लोकानीं त्याला पकडून ब्रिटिशांच्या हवालीं केलें. दुसऱ्या ब्रह्मी युद्धांत गांवच्या लोकांनीं पुष्कळ काळपर्यंत बचाव केला. पण अखेर ते ब्रिटिशानीं सर केलें. या युद्धानंतर सर्व पेगू प्रांत ब्रिटिशाच्या ताब्यात गेला. या जिल्ह्यांत पेगूच्या जवळपास पुष्कळ जुनीं देवालयें आहेत. लोकसंख्या ( १९०१ ) ३३९५७२. शें. ६८ लोकांचा उदरनिर्वाह शेतीवर होतो. पूर्वी पेगूचीं मातीचीं भांडीं प्रसिद्ध होतीं.अद्यापहि, सित्तंग नदीच्या कांठीं पझुन मिऔग व खुद्द पेगू येथें मातीचीं भांडीं करण्याचा धंदा चालतो, परंतु हल्लींच्या कामांत पूर्वीचें कौशल्य दिसून येत नाहीं. पेगू येथें चांदीचें काम सुंदर होतें. पेगू व न्यौंगलेबिन येथें तांदूळ कांडण्याच्या गिरण्या आहेत. या जिल्ह्यांत मुख्य व्यापार तांदुळाचा चालतो.

पेगू व न्यौंगलेबिन असे या जिल्ह्याचे दोन पोटविभाग आहेत. त्यांपैकीं पेगूंत न्हेगू, कावा व पयागले हे तीन तालुके व न्यौंगलेबिनमध्यें न्यौंगलेबिन आणि प्युंटझा हे दोन तालुके आहेत

या जिल्ह्यांत फक्त पेगू येथें म्युनिसिपालिटी आहे. न्यौंगलेबिनचा कारभार एका गांवकमेटीकडे असतो. साक्षर

लोकांचें प्रमाण बरेंच मोठें आहे. शें० ४५ पुरुषांना व शें० ९.२ स्त्रियांनां लिहितां वाचतां येतें.

गांव.—पेगू जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें गांव रंगूनच्या ईशान्येस आगगाडीनें ४७ मैलांवर पेगू नदीवर आहे. लोकसंख्या (१९०१) १४१३२. बहुतेक रहिवाशी बौद्ध आहेत. हें गांव नदीकांठीं असून नदीनें रंगूनशीं जोडलें असल्यामुळें यास व्यापारी महत्व आहे. पेगू शहराशीं कित्येक शतकेंपर्यंत तलैंग किंवा पेगू लोकांचा संबंध असून ज्याला सध्यां ब्रह्मदेश असें म्हणतात. त्यच्या दक्षिण भागांत अगदीं अर्वाचीन काळापर्यंत हेच लोक प्रामुख्यानें रहात होते. तलैंगांची मूळची राजधानी थटोन ही होती. इ. स. ५७३ मध्यें पेगू लोक या शहरांत रहाण्यास आले असें म्हणतात. परंतु बाहेरच्या लोकांनां ह्या गांवाची माहिती टौंगू नांवाच्या ब्रह्मी राजांच्या अमदानींत झाली. अठराव्या शतकाच्या मध्यांत अलौंगपया यानें पेगूवर स्वारी करून तें जिंकल्यानंतर तलैंग लोकांचें या शहरांतील मागमूस नाहींसें करण्याकरितां शक्य ते प्रयत्न केले. त्याचा पांचवा मुलगा बोदवपया यानें स. १७८१ त गादीवर आल्यानंतर निराळें धोरण स्वीकारिलें व त्याच्या कारकीर्दींत राजधानी कांहीं काळपर्यंत रंगूनहून पेगू येथें आणण्यांत आली होती.

**पेगू सित्तंग कालवा**—खालचा ब्रह्मदेश पेगू जिल्ह्यांतील सामान्यतः ईशान्येकडून नैर्ऋत्येकडे जाणारा एक कालवा. याच्या योगानें पेगू व सित्तंग या नद्या जोडल्या गेल्या असून यांतून गलबतें चालू शकतात.

**पेटकें व लेखनादि स्नायुस्तंभत्वरोग**(क्रँप्स),पेटकें.—पेटके अथवा गोळे येणें हें चमत्कारिक लक्षण अनेक ठिकाणीं पहाण्यांत येतें; पण तें पोटऱ्यांच्या ठिकाणीं बहुधा पुष्कळांनीं अनुभविलेलें असेल तें उत्पन्न होणें म्हणजे पूर्वी कांहींहि सूचक लक्षण न होतां त्या माणसाच्या इच्छेविरुद्ध सावकाश पण पण अतिवेदनायुक्तपणें स्नायूंचें संकोचन होऊन त्यांत गोळा उत्पन्न होणें व तो बराच वेळ टिकणें हें होय. ती वेदना व गोळा नाहींसा झाल्यावर लागलीच किंवा कांहीं वेळानें दुसऱ्यांदा पेटका येतो, व असें कांहीं वेळ चालतें; अगर एकदां पेटके येऊन गेल्यावर फार दिवसांनीं पुन्हां तसे पेटके येतात. फार श्रम केल्यानें अगर फार वेळ चालून आल्यावर, अगर सतत श्रम होऊन झोपीं गेल्यावर झोपेंत पेटके येऊन रोगी जागा होतो. पेटके आपोआप येतात खरे, पण रोग्यास तशा रुग्णस्थितींत इच्छेनुरूपहि एखादा पेटका त्याच स्नायूंत उत्पन्न करतां येतो. या संकोचनाचें नक्की कारण सांगणें अवघड आहे. फार श्रमानें स्नायू झिजून त्यांत त्या झिजेचें विष सांठतें, हें कारण संभवनीय आहे व महामारी, वाखा, जडान्नविषबाधा व असेच शक्तिपात एकदम करणाऱ्या रोगांमध्यें विषोत्पत्ति होत असून त्या रोगांतहि पेटके येतात, या अनुभवावरून या मतास दुजोरा मिळतो. पेटके हें प्रमुख लक्षण असून विषोत्पत्ति ज्यांत असते असे धनुर्वात, कुचल्याच्या सत्त्वा(स्ट्रीकनीन)चा विषार, कंपरोग व अल्कोहोल (दारूबाजीचें विष) व अन्य कारणामुळें होणारा हस्तपादादिकांतील मज्जाशूल व दाह हेहि रोग आहेत. निदान धनुर्वातामध्यें पृष्ठवंशरज्जूंत भयंकर विष असतें हें स्पष्टच आहे; पण दारूच्या विषारांत स्नायूंत विष पसरलेलें नसून तें मज्जातंतूंत असतें. पादांगुष्ठवात व मूत्रपिंडादि रोगांतहि पेटके येण्याची प्रवृत्ति वरील कारणामुळेंच असावी. उन्माद वायु व लेखनादिस्नायुस्तंभ रोगांत अशी विषबाधा हें कारण नसून मेंदूंतून चलनसंदेश विकृत तऱ्हेनें येतो व म्हणून पेटके येतात.

उपचारः—ज्या प्रकारचें कारण व विषबाधा आहे असें वाटत असेल तें कारण प्रथम दूर करून शक्य तेवढें विषोत्सर्जन करून त्याबरोबर तात्कालिक वेदनाशमनासाठीं शामक तेलें, मलमें चोळावीं. अगर त्या स्नायूंच्या कार्याच्या विरुद्ध कार्य करणारी हालचाल, अन्य व उलट प्रकारच्या स्नायूंनीं एकदम करावी म्हणजे आलेला पेटका बहुधा नरम पडतो. वरच्यावर पेटके येऊं लागल्यास टरपेण तेल व त्यासारख्या उष्ण तेलांनीं चोळावें; अगर नुसतें शेकावें.

लेखनादिस्नायुस्तंभरोग.—वकील व इतर कारकून वगैरे लेखक लोक, वाजाची पेटी वाजवणारे, सारंगी वाजवणारे, तारेच्या यंत्रावर नेहमीं कामें करणारे, विड्या, सिगारेट करणारे या लोकांच्या बोटांनां एकसारखी फार वेळ भानगडीची हालचाल करावी लागते व म्हणून त्या बोटांवर कांहीं कालानें विशेष ताण पडल्यामुळें त्याची हालचाल होतांना म्हणजे त्यांचीं तीं तीं कामें करतांना त्या स्नायूंत एक प्रकारचे वेदनारहित पेटके येऊन बोटें नीट चालत नाहींशीं होऊन तीं कामें नेहमींप्रमाणें सफाईनें होईनाशीं होतात व बरेंच काम केल्यास पुढें तीं कामें त्या बोटांनीं मुळींच होऊं शकत नाहींत. यापैकीं बऱ्याच लोकांनां हा रोग होण्यापूर्वी कांहीं तरी मज्जारोग झाल्याचा बहुधां पूर्वेतिहास मिळतो. निदान आनुवंशिकतेमुळें अगर त्याच्या पूर्वीच्या मज्जारोगामुळें त्यांची असे वातरोग होण्याची प्रवृत्ति असते. प्रत्यक्ष रोगाचें निमित्त कांहीं मानसिक चिंता, व्यग्रता, कामधंदा, संसाराची विशेष दगदग, काळजी अथवा हात अगर बोटांनां कांहीं धक्का, मार वगैरे इजा होऊन अगर नेहमींच्या कामाचा विशेष बोजा पडून तो ताण अधिक झाल्यानें रोगास आरंभ होतो. वीसपासून चाळीस वर्षे वयाच्या दरम्यान हा रोग होणारा असून स्त्रियांपेक्षां पुरुषांनां फार करून होतो. हा एक मज्जारोग आहे. गॉवर्स या विख्यात मज्जाशास्त्रज्ञाच्या मतें, लिहितांना कागदावर लेखणी फिरतेवेळीं नाना प्रकारच्या लोकांच्या लिहिण्याच्या सूक्ष्म निरीक्षणावरून माणसाच्या लिहिण्याचे चार प्रकार आढळतात:– (१) कोणी कागदावर करांगुलि स्थिरपणें टेकून इतर बोटांनीं लेखणी धरून लिहितात. (२) कोणी कागदावर मनगट स्थिरपणें टेकून सर्व बोटांनीं लेखणी धरून लिहितात. (३) कोणी अर्धा बाहु स्थिर

ठेवून मनगट व हात खुला व मोकळा ठेवून लिहितात व (४) कोणीतर लिहितांना सर्व हात व बाहु मोकळा ठेवून दंड व खांद्यापासून हालचाल करतात. हा शेवटला प्रकार फळयावर लिहितांना व मोठें अक्षर काढतांना आढळतो. व त्यांत बोटांच्या स्नायूंनां पहिल्या प्रकारांत जी मनस्वी भानगडीची हालचाल करावी लागते तशी करावी लागत नाहीं.

लक्षणें:—प्रथम बोटांमध्यें लिहिण्याच्या वगैरे कामानंतर दुखूं अगर ठणकूं लागतें व तसलें काम केलें नाहीं म्हणजे तें रहातें. याप्रमाणें हळू व सावकाशपणें रोगास प्रारंभ होतो. नंतर एकदम बोटांत लेखणी धरतेवेळीं आंखडल्यासारखें होऊं लागतें व म्हणून रोगी लेखणी गच्च धरण्याचा प्रयत्न करतो अगर बोट जास्त गच्च मिटून लेखणी चालविण्याचा प्रयत्न करतो अगर लेखणी वरचेवर निसटूं लागल्यामुळें दीर्घांगुली व मधील बोट यांच्यामध्यें लेखणी धरून लिहितो. नंतर आंगठ्यासहि तसेंच होऊं लागतें व म्हणून रोगी लिहितांना मिटलेलीं बोटें वरचेवर उघडतो अगर लेखणी थांबवितो व वरच्यावर टांक उचलून लिहितो अगर असें वळें लिहितां लिहितां लेखणीचें टोंक कागदांत शिरतें किंवा एखाद्या वेळीं मनगट व हाताचा दाब लेखणीवर जास्त पडून अक्षर कागदावर लिहिलेंच जात नाहीं. कारण लेखणी थांबते. तसेंच वळें लिहिलें तर वेडेंवाकडें, कांपत कांपत व ज्यास खोचा फार आहेत अशीं अक्षरें येतात. काने व उभ्या रेघा फाजील जाड येतात व पुढें पुढें तर बोटांत येणाऱ्या ताठरपणामुळें अगदींच लिहवेनासें होतें. याच प्रकारचे रोगी फार असतात. दुसऱ्या प्रकारांत अक्षरांस कंप व नागमोडीच फार येतात व तिसऱ्या प्रकारांत बोटांनां लुळेपणामुळें कधींच लिहितां येत नाहीं. पण हा प्रकार क्वचित आढळतो. पहिल्या प्रकारांत वेदना, मनगट पुढें पंजांत पसरते व जसा शूळ आपोआप उत्पन्न होतो तसा शूळहि तेथें होऊं लागतो व पंजांत झिणझिण्या व बधिरपणा येतो. कांहींनां लिहितांनाच तेवढें असें होतें पण भानगडीच्या हालचालीच्या इतर क्रियाते करतात. कोणी रोग्याच्यानें लिहिणें व पेटी अगर सारंगी वाजविणें, अशा दोन प्रकारच्या क्रिया तेवढ्या करतांना बोटांनां ताठरपणा येतो, एरव्हीं इतर क्रिया करतांना येत नाहीं व याहूनहि अधिक क्रिया ज्यांनां करवत नाहीं असे रोगी असतात. तसें म्हटलें तर त्या बोटांच्या स्नायूंची एखादा पदार्थ दाबून धरणें, उचलणें ही एरव्हींची स्थूल शक्ति पूर्ण अगर बहुतेक शाबूत असते. कांहीं रोगी कांहीं काळ विश्रांति घेतल्यानें चांगले बरे होतात. परंतु वेळेवर विश्रांति न घेऊन बळेंच लिहिणें, कृत्रिम अगर इतर उपायांनीं लिहिणें चालू ठेवणें व उपचार कांहींच न करणें यामुळें हा रोग दृढ होऊन बसतो आणि कदाचित बरा होत नाहीं. रोगनिदान करणें सोपेंच आहे. कांहीं भित्र्या माणसांनां भीतीमुळें आपणांस हा रोग आहे असा संशय येतो. अर्धांग वातामुळें व कंपरोगामुळें नीट लिहितां न येणें ओळखण्यास अवघड नाहीं. लिहिण्याच्या स्नायूंच्या समूहापैकीं कांहीं स्नायू थकल्यामुळें अगर मेंदूपासून चलनसंदेश नीट न पोंचल्यामुळें हा रोग होतो अशी समजूत आहे.

उपचारः—बोटांनां पूर्ण विश्रांति देणें हें मुख्य असून नवीन व सौम्य रोग असल्यास एक दोन महिन्यांत बरा होतो. व पुन्हां लिहितेवेळीं खांद्यापासून हात हलवित जावा अशी तज्ज्ञांची आग्रहाची सूचना आहे. याहून रोगाचा जोर अधिक असेल तर विश्रांतीहि जास्त हवी व लिहिण्यावांचून फारच अडत असेल तर डाव्या हातानें लिहिण्याची संवय करावी किंवा टाईपरायटरनें लिहावें. फार क्वचित पण डाव्या हातासहि लिहिण्याची संवय झाल्यानंतर हा रोग जडतो. बुचाच्या अगर कडयाच्या मधोमध लेखणी घालून तें कडें बोटांत धरून कांहीं रोगी न कांपता अमळ बरें लिहितात. पण एकंदरीनें पाहिलें तर पूर्ण विश्रांति घेण्याचें टाळण्यासाठीं केलेल्या या युक्त्या असून त्या फार तर आज जरूर असलेली विश्रांति घेणें कांहीं दिवसांवर ढकलतात येवढेंच त्यांविषयीं अनुकूल म्हणता येईल. पुढेंमागें पूर्ण विश्रांति(त्या लेखनादि क्रिया थांबवून) बोटांनां दिलीच पाहिजे. लोहयुक्त औषधें, कोयनेल, सोमलयुक्त व कुचलासत्व (स्ट्रिकनीनयुक्त) औषधें, एकंदर प्रकृति व मज्जास्थानें आणि मज्जातंतूंची कार्यक्षमता सुधारणारीं औषधें असल्यानें तीं पोटांत घ्यावींत. बाह्योपचारहि उपयोगी आहेत; ते पोटांत घेण्याच्या औषधांबरोबरच सुरू ठेवावेत. ते म्हणजे बोटांस व शरीरास मेहनत पडेल अशा उपयुक्त व्यायामाच्या हालचाली, दुसऱ्या माणसाकडून रोग्याचीं बोटें हलवून त्यास व्यायाम करवणें व बोटें चांगलीं चोळणें, रगडणें व ब्याटरी (विजेची) लावणें, ब्याटरीच्या तारेचें एक टोंक मानेच्या कण्यावर ठेवून दुसरें टोंक गळयावर (जेथून मज्जातंतू हातांत जातात) अगर बिघडलेल्या विवक्षित स्नायूवर अगर मज्जातंतूंवर लावावें.

**पेटंट**—म्हणजे विशिष्ट हक्काची सनद. अशा सनदेनें नवा शोध लावणाराला त्या शोधाविषयींचा चवदा वर्षें किंवा त्याहूनहि अधिक काळ विक्रीचा हक्क ( मोनॉपॉली ) देण्यांत येतो. ह्या हक्काच्या मुळाशीं ग्रंथकारांच्या हक्कांतलेंच ( कॉपीराईट ) तत्त्व आहे. ' ग्रंथप्रकाशनाचा मालकी हक्क ' पहा.

नुसतें नवें शास्त्रीय तत्त्व पुढें मांडणाराला जर त्या तत्त्वापासून त्यांनीं प्रत्यक्ष व्यावहारिक उपयोगाचा कोणताहि जिन्नस तयार केला नसेलतर पेटंट मिळत नाहीं. पेटंट पुढील चार प्रकारांपैकीं कोणत्याहि शोधाला मिळतें:—( १ ) नव्या साध्य गोष्टी करण्याचीं नवीं साधनें (इन्व्हेन्शन्स); ( २ ) ज्ञात असलेल्या गोष्टी करण्याचीं नवीं साधनें; ( ३ ) जुन्या भागांचें केलेलें नवें एकत्रीकरण; व ( ४ ) पूर्वी माहीत असलेल्या वस्तू उपयोगांत आणण्याची नवी पद्धति: पेटंट मिळण्याला मुख्यतः उपयुक्तता व नाविन्य या दोन गोष्टी लागतात. संशोधकानें स्वतःची बुद्धि चालवून कांहीं तरी

नवीन शोध लावणें जरूर असतें. पेटंट मिळविण्याकरितां प्रथम पेटंट-ऑफिसांत फीसह अर्ज करावा लागतो. व त्याप्रमाणें शोधाबद्दलचें माहितीपत्रक, नकाशे वगैरे पाठवावे लागतात. नंतर पेटंट-आफिसकडून त्या शोधाची परीक्षा किंवा चौकशी होऊन योग्य वाटल्यास प्रथम १४ वर्षांच्या मुदतीचें पेटंट देण्यांत येतें. ही मुदत अपुरी वाटल्यास आणखी ७ वर्षें किंवा क्वचित प्रसंगीं आणखी १४ वर्षें वाढविली जाते. या पेटंटच्या हक्कास कोणी व्यापाऱ्यानें बाध आणल्यास दिवाणी कोर्टामार्फत नुकसानभरपाई मिळवितां येते; पण फौजदारींत खटला होऊं शकत नाहीं. ज्या शोधाबद्दल पेटंट मागण्याचा अर्ज आला असेल तोच शोध एखाद्यानें पूर्वीच लावून गुप्त ठेवला असेल तर ज्यानें प्रथम अर्ज करून पेटंट मागितलें तोच त्या शोधाचा मूळ संशोधक मानला जातो. इतर हक्काप्रमाणें पेटंटचा हक्कहि विकतां किंवा अंशतः तबदील करून देतां येतो. हिंदुस्थानांत १८८८ सालीं पेटंटसंबंधाचा कायदा पास झाला आहे. येथें पेटंटची मुदत १४ वर्षें पर्यंत असते आणि चवथ्या वर्षापासून आठव्या वर्षापर्यंत सालीना ५० रु. कर आणि नवव्यापासून तेराव्या वर्षापर्यंत सालीना १०० रु. कर भरावा लागतो.

**आंतरराष्ट्रीय पेटंट.**—उद्योगधंद्यांतील मालकी हक्काचें संरक्षण करण्याचा आंतरराष्ट्रीय करार ( इंटरनॅशनल कन्व्हेन्शन ) पॅरिस येथें १८८३सालीं मान्य करण्यांत आला, त्यावर वीसबावीस राष्ट्रांनीं सह्या केल्या. तदनुसार इंग्लंडांत स. १८९० मध्यें फॉरिन ज्युरिस्डिक्शन ॲक्ट पास होऊन पेटंटच्या हक्काचें उल्लंघन करणाऱ्या ब्रिटिश नागरिकांस शासन होतें.

**पेटलाद**, तालुका व गांव.—बडोदें संस्थानांतील व प्रांतांतील एक तालुका. क्षेत्रफळ १८२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १२८००८. यांत ४ शहरें व ७३ खेडीं आहेत. पेटलादची जमीन काळी असून सपाट आहे. जंगल किंवा नदी मुळींच नाहीं. येथें तंबाखू उत्तम प्रकारची पिकते. मुख्य ठिकाण पेटलाद आहे.

**पेठ**—मुंबई, नाशीक जिल्हा. ही जुन्या पेठ संस्थानची राजधानी होती. हें संस्थान १८७८सालीं तेथील बेगम मेल्यामुळें खालसा झालें. हल्लीं हें पेठ तालुक्याचें ठाणें आहे. हें नाशिकच्या वायव्येस ३० मैलांवर एका उंचवट्यावर वसलेलें असून भोंवतीं जंगल आहे, लोकसंख्या सुमारें तीन हजार. येथील हवा रोगट आहे. येथें तालुका कचेरी, पोलीस कचेरी, पोष्ट-ऑफिस व दवाखाना आहे. येथें एक प्रवाशांकरितां बंगला आहे.

**पेठ**—मुंबई, सातारा जिल्हा. हें पूर्वी वाळवें तालुक्याचें ठाणें होतें. साताऱ्यापासून ४५ मैलांवर हें आहे. लोकसंख्या (१९०१) ६८०० होती. पेठचा व्यापार पूर्वी बराच असे. धान्य व कापूस हे येथील मुख्य जिन्नस होते.

**पेठापूर**, संस्थान.—मुंबई, महीकांठामधील एक लहानसें संस्थान.

**गांव.**—पेठापूर या संस्थानचें मुख्य गांव. हें साबरमतीच्या पश्चिम किनाऱ्यावर वसलेलें आहे. सन १९०१ मध्यें लोकसंख्या ५६१६ होती. या गांवीं रंग चांगले होतात अशी प्रसिद्धि आहे. पूर्वी दूर दूर देशावरचा कपडा या ठिकाणीं रंगवून (सयामपर्यंत) जात असे.

**पेठे**—' त्रिंबकराव मामा पेठे ' पहा.

**पेंड**—गळिताच्या बियांतून सर्व तेल काढून घेतल्यानंतर मागें जो एक प्रकारचा कच्चा माल राहतो त्यास पेंड म्हणतात. पेंड हें एकच विशिष्ट द्रव्य नसून तिच्यांत कित्येक इतर द्रव्यें मिश्र झालेलीं आहेत.. त्यांत मुख्यत्वेंकरून पाणी ( शेंकडा-६ ते १३ पर्यंत ); कच्चें प्रोटीन ( ७ ते ४६ पर्यंत ); कच्चें तेल ( ५ ते २२ ); नायट्रोजन-विरहित द्रव्यें ( ११ ते ४४); कच्चा तंतु ( फायबर-६ ते २५ ); आणि राख ( अथवा निरिंद्रिय द्रव्यांची जाळून झालेली प्राणिदें ४ ते १४ ) इ. होत. याशिवाय शिल्लक राहिलेलें तेल असतें तें निराळेंच. घाण्याच्या पेंडेंत तर तें शेंकडा १५ ते १९ पर्यंत असतें. आधुनिक ' हायड्रोलिक ' सांच्यांतून निघालेल्या पेंडेंत ७ ते १२ पर्यंत आढळतें. तथापि रासायनिक द्रव्याच्या साहाय्यानें हें प्रमाण १ पर्यंत अथवा त्याहूनहि कमी करतां येतें. घाण्यांतून व सांच्यांतून निघालेली पेंड, तींत मोठ्या प्रमाणांत शिल्लक असलेल्या तेलामुळें व तेल पिळण्याच्या कृतींतील दाबामुळें, तिच्यांतील कण एकमेकांस चिकटून तिच्या लहान मोठ्या लाद्या होतात. रासायनिक द्रव्यांच्या साहाय्यानें आंतील सर्व तेल निघून गेल्यानंतर, मागें राहिलेली पेंड, कोरडी व भुसभुशीत अशी दिसते. दाबाच्या भिन्नत्वामुळें घाण्याच्या पेंडीपेक्षां सांचाची पेंड ( आंत तेल कमी असून देखील ) जास्त कठिण असते. पेंडींत असलेल्या ' नायट्रोजन ' संयुक्त व ' फास्फरस ' संयुक्त द्रव्यांमुळें व ' पोटॅशियम ' द्रव्यामुळें तिचा शेतकीच्या कामांत खताकडे फार उपयोग होतो. हें खताचें महत्त्व हिंदुस्थानसारख्या देशाला ( जेथें शेंकडा ८५ लोक शेती करतात त्यांस ) फार आहे. सर्व खतांत शेणखत उत्तम समजलें जातें. त्या खताशीं पेंडेची तुलना केल्यास खालील प्रमाण आढळतें—

खतांतील द्रव्यांचें शेंकडा प्रमाण.

| बियांचें नांव | नायट्रोजन | फास्फरस | पोटॅशियम |
|---|---|---|---|
| तीळ | १४.५२ | १०.३५ | १.५ ते ३ |
| भुईमूग | १३.४२ | .२९५ | ,, |
| एरंडी | १८.५५ | ११.३० | ,, |
| राई ( मोहरी ) | ११.५७ | १ | ,, |
| सरसू | ११.५७ | .८२५ | ,, |
| शेण | ३.० | २.५ | १.० |

वरील आंकड्यांवरून पेंडेचें महत्व खताच्या बाबतींत किती आहे हें समजून येतें. याशिवाय शेणखतांत नसणारे

कार्बोहायड्रेट्स पेंडेंत पुष्कळ प्रमाणांत सांपडतात. कार्बोहायडेट्सचा मुख्य उपयोग म्हणजे ते कुजून गेल्यानंतर त्यांच्यापासून कॅर्बालिक अॅसिड तयार होतें, हा होय. या अॅसिडचा जमिनींत असलेल्या, अविद्राव्य इनऑर्गॅनिक द्रव्यांवर परिणाम होऊन, त्याच्यापासून त्यांची सहज विरघळणारीं कार्बन द्रव्यें होतात, व अशा स्थितींत त्यांचा खताच्या कामीं फार उपयोग होतो.

बाजारांत मिळणाऱ्या पेंडेंत दोन दोष असतात. ते दोन्ही तिच्यांत असलेल्या तेलामुळेंच उद्भवतात. ते असे–(१) आंतील तेलामुळें जमीनीवर होणारा परिणाम; पेंडींत असलेले तेलाचे कण जमिनीवर पसरल्यास, ते त्या जमिनीस पाणी शोषूं देत नाहींत. त्यायोगानें तेवढा भाग कोरडा राहून शेतकीच्या कामीं तो निरुपयोगी होतो. (२) ह्या कणांमुळें जमिनींत असलेले खाण्याच्या पदार्थांच्या अभावीं एरव्हीं मरून जाणारे कोट्यावधी जीवजंतू पेंडेंतील तेलावर व इतर द्रव्यांवर पोसले जाऊन पुढें ते पिकांस बराच उपद्रव करतात. यामुळें खताच्या कामीं, तेलाचा अगदींच अभाव असलेली व भुसभुसीत पेंड जास्त मोलाची असते. शिवाय ही पेंड फोडून तिचा भुगा वाटण्या करण्यास विशेष त्रास न फोडून ती वाटेल तशा बारीक-जाड थरांत पसरविता येते. अशा स्थितींत ती लवकर कुजून शेताच्या उपयोगीं पडते.

पेंडेचा दुसरा मोठा उपयोग म्हटला म्हणजे ती गुराढोरांनां खाऊं घालतात. आपल्याकडे ही रीत जरी आज कित्येक शतकें प्रचारांत आहे तरी पण तिच्यांतील गुणावगुणाकडे आपण विशेषसें लक्ष्य दिलेलें नाहीं. ती गुरांस पौष्टिक आहे. मात्र तिच्यांतील द्रव्यांच्या प्रमाणाकडे लक्ष्य द्यावयास पाहिजे. घाण्यांतील पेंडेत सुमारें शें. १८ प्रमाणांत तेल असतें. हें सर्व तेल गुरांस पचवितां येत नाहीं. त्यांतील बराच भाग फुकट जाऊन, शिवाय तसल्या जडान्नामुळें गुरें आळशी होतात. जास्तींतजास्त शेंकडा ५।६ प्रमाणांत तेल गुरें पचवूं शकतात. बाकीचें तेल शेणांत व्यर्थ जातें. तेलाशिवाय पेंडेत असलेलीं इतर शेंकडा ७५–८५ पर्यंतचीं द्रव्यें गुरांनां पचण्यासारखीं आहेत. एकंदरींत पेंड ही गुरांना अत्यंत उपयोगी व पौष्टिक असून, तिचा उपयोग गुरांची वाढ, जोपासना, दुभतेपणा, मस्तपणा, व लोंकर देण्याची शक्ति इ. अनेक गोष्टींकडे होतो. तथापि गुरांनां पुढील जातींची म्हणजे एरंडीची, रतनज्योतची, राईची इ. पेंड–तींत असलेल्या विषारी द्रव्यामुळें–वर्ज्य आहे. असली पेंड फक्त खताच्या कामीं उपयोगी पडते.

कांहीं गळितांची पेंड मनुष्याच्या खाण्याच्या कामींहि उपयोगी पडते. ही पेंड म्हणजे बदाम, भुईमूग, खसखस यांची होय. (१) स्पेन देशांत भुईमुगाच्या पेंडेंत साखर आणि कांहीं सुवासिक द्रव्यें घालून त्यांच्या मिश्रणापासून एक प्रकारचें स्वस्त 'चॉकोलेट' करतात. (२) ईजिप्त देशांत तिळाच्या पेंडेंत मध आणि लिंबांचा रस मिश्र करून 'टाहिने' नांवाचा पदार्थ करतात. (३) जॉर्जिया व दक्षिण कॅरोलिनामध्यें तिळाची पेंड, ज्वारी किंवा बाजरीबरोबर एकत्र करून त्यापासून अनेक प्रकारच्या भाकरी तयार करतात. अलीकडे तर पाश्चात्त्य राष्ट्रें भुईमुगाच्या पेंडेंतील तेल वेगळें काढून व आंत असलेलीं प्रोटीन द्रव्यें निराळीं काढून तीं बिस्कुटाच्या कामीं उपयोगांत आणतात. त्यामुळें असल्या पेंडेस फार मागणी होऊं लागली आहे आणि आपल्याकडील बहुतेक पेंड ह्याच कामासाठीं यूरोपला रवाना होत असते. पेंडेचा उपयोग औषधाच्या व सुवासिक द्रव्यें करण्याच्या बाबतींतहि होतो. आळशीचें पोटीस व राईचें (मोहरीचें) पोटीस प्रसिद्ध आहे.

हिंदुस्थानांतून पेंडेची होणारी निर्गत

| पेंडीचें नांव. | टन |
|---|---|
| भुईमुगाची | ६२००० |
| अळशीची } सरसूची } | ८९,५०० |
| सरकीची | १०,४०० |
| एरंडीची | ४९०० |
| खोबऱ्याची | ४२०० |
| इतर पेंड | ४२०० |

वरील आंकड्यांवरून भुईमुगाच्या पेंडेचें प्रमाण लक्षांत ठेवण्यासारखें आहे. वर दिलेले आंकडे १९१३–१४ चे आहेत. त्यानंतर व विशेषतः लढाई संपल्यानंतर ते किती तरी जास्त फुगले आहेत. [युवेलोहडे–हांडेवुख डर डयुले ऊंड फेटे; हेफ्टर टेक्नॉलॉजी डर फेटे ऊंड डयुले व्हा. १; ल्युकोविच–टेक्नॉलॉजी ऑफ ऑईल्स, फॅट्स अँड वॅक्सीस.] (ले. वामन द्वारकानाथ कोर्डे)

**पेड्डापुरम्**—मद्रास इलाखा. गोदावरी जिल्ह्याचा एक तालुका. क्षे फ. ६०४ चौरस मैल लो. सं (१९२१) १८२३००. मुख्य गांव पेड्डापुरम् (लो. सं. १४६२०) इतर २०० खेड्यांपैकीं जग्गम पेठ येथील स्थानिक बाजार मोठा असतो. तालुक्याचा बहुतेक भाग डोंगराळ व जंगली आहे. तांदूळ, गळिताचीं धान्यें, रागी, कडधान्यें, व ऊंस हीं मुख्य पिकें आहेत.

**पेंढारी**—हे लोक मोंगलशाहीच्या पडत्या काळांत (औरंगझेबाच्या शेवटच्या २० वर्षांत) प्रथम पुढें आले. हे वाटेल त्या राजाच्या सैन्याबरोबर असत. बाजारबुणगे ज्याला म्हणत ते व हे साधारण एकच यांनां सरकारकडून पगार नसे, मात्र शत्रूच्या प्रदेशांत खंडणी वसूल करतांना तिच्यापैकीं कांहीं ठराविक भाग यांनां मिळे. शत्रूची धान्यसामुग्री लुटणें व त्यांच्या देशाची खराबी करणें हें काम यांच्याकडे असे. यांचें मुख्य हत्यार १२' फुटी भाला असे. हे घोडेस्वार असून यांचे घोडे फार चपळ असत. कधीं कधीं हे रोजीं ३० कोसांची मजल मारीत.

यांनां तंबू, डेरे वगैरे लागत नसत. एकोणिसाव्या शतकांत हिंदुस्थानांतील देशी राज्यें खालसा होऊन इंग्रजांना अंमल जसजसा जास्त दृढावत गेला, तसतसें यांचें आश्रयस्थान (देशी राज्यांचीं सैन्यें) नाहींसें होत चालल्यानें यांनीं आपलीं स्वतंत्र पथकें बनविलीं. त्यांनां थोडाफार आश्रय शिंदे व होळकर यांचा असे. या वेळीं इंग्रजांची घडी महाराष्ट्रांत नुकतीच बसत असल्यानें त्यांनीं यांच्या वाटेस जाण्याचें टाळलें. अमीरखान, करीमखान, वासील महंमद, छट्टू वगैरे धाडसी लोक या पेंढाऱ्यांचे नाईक होते त्यांनीं मध्यप्रांत, माळवा, गुजराथ, महाराष्ट्र, मद्रास, वहार वगैरे प्रांतांत धुमाकूळ घातला. स्वतःचें स्वातंत्र्य नष्ट झाल्यामुळें रुष्ट झालेले बरेचसे संस्थानिक त्यांनां आंतून मदत करीत. इंग्रजांच्या किरकोळ बंदोबस्तानें कांहीं काम भागेना, तेव्हां लॉर्ड हेस्टींग्जनें बहुतेक (पेशवे, शिंदे, होळकर, भोंसले) राजेरजवाड्यांचें साहाय्य घेऊन व सव्वा लाख स्वतःची फौज घेऊन बंगाल, महाराष्ट्र, गुजराथ अशा तीन बाजूंनीं चालून येऊन माळव्यांत असलेल्या पेंढाऱ्यांच्या आसऱ्याच्या जागांनां वेढा दिला. अमीरखान (पहा) व करीम यांनां जहागिरी देऊन फोडलें; छट्टूचा पाठलाग केला (त्यांत तो वाघाकडून खाल्ला गेला) व प्रमुख पुढाऱ्यांस कैद अथवा ठार केलें. याप्रमाणें यांची बंडाळी मोडण्यांत आली (१८१७). गांवकऱ्यांस आगाऊ सूचना देऊन हे आपला दंड वसूल करीत. त्यांनीं तो तसा दिला नाहीं तर मग त्यांचा छळ करीत व गांवांस आगहि लावून देत. त्यांच्या छळाचें वर्णन जें इंग्रज इतिहासकारांनीं केलें आहे, तें अतिशयोक्तीचें आहे, एवढें नव्हे तर त्यांची संख्याहि ते जास्त फुगवून सांगतात असें सर चार्लस मनरो म्हणतो. सैन्यांतील हरयारबंद लोक कमी झाले असतां, ते देशांत बंडाळी माजवितात हा अनुभव सर्वच राष्ट्रांत येतो. या पेंढाऱ्यांचे वंशज आज कांहीं उद्योगधंदे करून शांततेनें राहातात. त्यांची स्वतंत्र जातच बनली आहे. म्हैसूर संस्थानांत यांची संख्या सुमारें २ हजार आहे. [ मालकम–मेमॉयर ऑफ सेंट्रल इंडिया; प्रिन्सेप–हिस्टरी ऑफ इंडिया; सेन्सस रिपोर्ट. ]

**पेढ्या आणि पत**—पेढीवाला म्हणजे पैशाचा किंवा मांडवलाचा व्यापारी. पैशाची देवघेव करणारा सराफ म्हणजेच पेढीवाला. सावकार व पेढीवाला यांमध्यें मोठा फरक आहे. सावकार स्वतःचा पैसा लोकांस व्याजानें देण्याचा फक्त एकतर्फीच व्यवहार करतो. परंतु पेढीवाला लोकांपासून ठेवी हलक्या व्याजानें घेतो, उलट भारी व्याजानें लोकांनां कर्जाऊ रकमा देतो; व शिवाय हुंड्या पोहोंचविण्याचें काम करतो, तात्पर्य, हुंडीवाल्याची सचोटी व पत फारच असावी लागते. पेढीवाल्यांचा धंदा सावकारापेक्षां फार व्यापक स्वरूपाचा असल्यामुळें पेढीवाले सावकारापेक्षां फार मोठाल्या रकमा कर्जाऊ देऊं शकतात. प्रत्यक्ष सरकारला लागणारें अवाढव्य कर्ज पेढीवाले देऊं शकतात म्हणून या वर्गाला समाजामध्यें वजन व प्रतिष्ठा चांगली असते. खुद्द पेशवे सरकारला अशा पेढीवाल्यांचें अतोनात कर्ज झालेलें होतें, ही गोष्ट सर्वश्रुत आहे.

अलीकडे पेढ्यांचे तीन प्रकार अस्तित्वांत आले आहेतः- (१) खाजगी, (२) संयुक्त भांडवलाच्या, व (३) सरकारी. खाजगी असलेच तर फार थोडे भागीदार असतात व या भागीदारांच्या हातांत सर्व व्यवस्था असते. संयुक्त भांडवलाच्या पेढीचे पुष्कळ भागीदार असतात ते सर्व स्वतः पेढीची व्यवस्था पाहात नाहींत; तर आपल्यांतील थोड्या जणांस पेढीचे डायरेक्टर नेमतात व डायरेक्टरांच्या हातीं सर्व व्यवस्था असते. तिसरा प्रकार सरकारी पेढ्यांचा, अशा पेढ्या शेतकऱ्यांच्या फायद्याकरितां सरकार स्वतः काढतें, किंवा सामान्य जनतेच्या उपयोगाकरितां सरकारी पोष्टखात्यामार्फत पेढीचें काम करतें.

अर्वाचीन काळीं पेढी ही मुख्यतः चार प्रकारचीं कामें करतेः– (१) लोकांच्या ठेवी ठेवणें, (२) गिऱ्हाईकांस व्याजानें पैसे देणें, (३) चलनी नोटा काढणें, आणि (४) लोकांचे पैसे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं पोहोंचते करणें, यासच हुंडीचा व्यापार म्हणतात. आपल्याकडे वरच्यापैकीं चवथें हेंच पेढीचें मुख्य कर्तव्य समजलें जातें, व 'पेढी' शब्द उच्चारल्याबरोबर हुंडीचा व्यापार करणारी संस्था हा अर्थ प्रथमतः मनांत येतो. पेढीच्या या कर्तव्याचें स्वरूप अगदीं उघड आहे. पुष्कळ माणसांस केव्हांना केव्हां तरी दुसऱ्या दूरच्या ठिकाणीं किंवा परदेशांसहि पैसा पाठविण्याची गरज पडते. खाजगी रीत्या पैसा पाठविण्यास तितका विश्वासू माणूस मिळणें कठिण आणि मिळाला तरी प्रवासखर्चहि फार येतो. तसेंच आपण काशी, बनारस या दूर गांवीं किंवा जपान, अमेरिका, इंग्लंड वगैरे परदेशीं प्रवासास निघालों असतां खर्चाकरितां लागणारी मोठी रक्कम प्रवासांत बरोबर नेणें त्रासाचें व धोक्याचेंहि असतें. अशा वेळीं पेढीमार्फत पैसे पाठवितां येतात. येथें पेढीवाल्याकडे पैसे भरले म्हणजे तो दर्शनी हुंडी देतो व ती हुंडी परगांवच्या किंवा परदेशांतील त्या पेढीच्या शाखेकडे किंवा दुसऱ्या ज्या पेढीवर हुंडी दिली असेल त्या पेढीवर नेऊन दिली कीं, हुंडींत लिहिलेले पैसे रोख मिळतात. पेढीवाला या कामगिरीबद्दल थोडीशी हुंडणावळ घेतो. हा हुंडणावळीचा दर पोस्टानें किंवा माणसाबरोबर पैसे पाठविण्याच्या खर्चापेक्षां कमी असला पाहिजे व असतोहि. अशा रीतीनें पेढीवाल्यांनीं एकमेकांच्या हुंड्या स्वीकारल्या म्हणजे पैसे रोख न पाठवितां पैशाची देवघेव नुसत्या कागदपत्रानें होते. पेढीवाल्यांनीं फक्त वर्षअखेर एकदां एकमेकांकडे कमजास्त बाकी निघेल तेवढी रक्कम रोख पाठविली म्हणजे झालें.

पेढीचें दुसरें कर्तव्य म्हणजे सोनेंरुपें किंवा स्थावर मिळकत गहाण घेऊन, किंवा नुसत्या पतीवर कर्जाऊ पैसे देणें. शिवाय मुदतीची हुंडी किंवा प्रॉमिसरी नोटीबद्दल कसर

कापून घेऊन रोख पैसे देणें व नंतर मुदत भरल्यावर पैसे वसूल करणें. यालाहि गहाण घेऊन पैसे देण्याचाच एक प्रकार म्हणतां येईल. तिसरें पेढीचें कर्तव्य ठेवी ठेवण्याचें. अशा ठेवी चालू खात्यावर ( करंट डिपॉझिट ) किंवा ठराविक मुदतीच्या ( फिक्स्ड डिपॉझिट )असतात, व त्यांवरील व्याजाचे दर निरनिराळे असतात. हे ठेवींचे पैसे पेढीवाले दुसऱ्यांना व्याजानें कर्जाऊ देतात. ठेवींवर व्याज कमी देऊन कर्जावर व्याज अधिक घेतात. व्यापाराच्या दृष्टीनें हें पेढीचें काम फार महत्त्वाचें होय.

पेढीचें चवथें काम चलनी नोटा काढणें. यूरोपांतलि सर्व सुधारलेल्या राष्ट्रांतील पेढयांस हा नोटा काढण्याचा अधिकार दिलेला असतो. हा अधिकार फार महत्त्वाचा असल्यामुळें त्यावर सरकारची देखरेख असते; व पेढयांनीं कोणत्या अटींवर कितीपर्यंत नोटा काढाव्या याबद्दल सक्त नियम असतात. हिंदुस्थानांतलि पेढयांस हा अधिकार नसून चलनी नोटा काढण्याचा सर्व अधिकार सरकारनें आपल्या हातांत ठेवला आहे. येथें सरकारचें चलनी नोटांचें एक स्वतंत्र खातें आहे. परंतु दुसऱ्या देशांत चलनी नोटा काढणें हें पेढीचें एक महत्त्वाच्या कर्तव्यांपैकीं असतें. त्यामुळें पेढयांस देशांतील व्यापारधंद्यांस वाटेल तितकें भांडवल पुरविण्याचें सामर्थ्य येतें. येथें सरकारी चलनी नोटा व बँक-नोटा यांच्यामधील फरक लक्षांत ठेवणें जरूर आहे, तो येणेंप्रमाणें — ( १ ) तत्त्वतः व व्यवहारतः बँक-नोटीचे रोख पैसे केव्हांहि मिळण्यासारखे असतात. सरकारी नोटांचें तसें नसतें. सरकार धातूच्या नाण्यापेक्षां कागदी नोटा अधिक काढतें, त्यामुळें सर्व नोटांचे एकदम पैसे मिळणें शक्य नसतें, पण तसा प्रसंगहि सहसा येत नाहीं. ( २ ) बँक-नोटा फक्त व्यापारी देवघेवीपुरत्याच काढतात. परंतु सरकारी नोटा खर्च चालण्याकरितां व पैशाच्या टंचाईच्या मानानें वाटेल तितक्या सरकार काढतें. ( ३ ) बँक-नोटा या, नांवाप्रमाणें, विशिष्ट बँकेच्या नांवाच्या असतात, पण चलनी नोटा सरकारच्या नांवाच्या असून त्या सर्व प्रकारच्या खाजगी व सार्वजनिक व्यवहारांत चालतात, तथापि बँक-नोटांवर सरकारी कायद्याचें नियंत्रण असल्यामुळें त्यांची किंमत कमी होण्याचा कधींच संभव नसतो. असा बऱ्याच वर्षांचा अनुभव आल्यामुळें यूरोपांतील पुष्कळ सरकारें स्वतःचलनी नोटा न पाडतां बँकांच्या मार्फत नोटा पाडवितात.लोकहि बँकांनीं नोटा पाडण्याला संमति देतात; कारण बँकेची पत जाऊन दिवाळें निघेल या भीतीनें पेढीवाले प्रमाणाबाहेर नोटा सरकारनें आग्रह केला तरी पाडणार नाहींत अशी खात्री असते.

पाश्चात्य पेढयांचा इतिहासः—पेढीवाला हा शब्द आपल्याकडे फार जुना आहे; परंतु सर्व पेढीवाले खाजगी लोक असत; त्यांत भागीदार केव्हां केव्हां असत; पण ते फार थोडे असत. पहिल्या प्रथम यूरोपमध्येंहि असाच प्रकार झाला. परंतु खाजगी कामांत कर्ता मनुष्य मेला म्हणजे त्याचा मुलगा कर्ता निघेलच असा नेम नसतो, म्हणून धंदा बुडण्याचा फार संभव असतो. संयुक्त भांडवलाच्या उद्योगाचें तसें नसतें. एक मॅनेजर मेला तर दुसरा चांगला नेमतां येतो; व अशा तऱ्हेने उद्योगाच्या कायमपणास धक्का येत नाहीं. तसेंच संयुक्त भांडवलाच्या तत्त्वामुळें भांडवल पुष्कळ जमा होऊं शकतें व त्यावर देखरेख अनेक जणांची राहिल्यामुळें लबाडीस फारशी जागा राहात नाहीं. असे अनेक फायदे असल्यामुळें पेढीचा धंदा संयुक्त भांडवलाच्या तत्त्वावर चालविणें जास्त सोईस्कर असतें.

१६ व्या शतकामध्यें अमेरिका व हिंदुस्थान यांचा शोध लागल्यापासून यूरोपांतील स्पेन, पोर्तुगाल, हॉलंड व इंग्लंड या देशांस फार महत्त्व आलें. अमेरिका, आफ्रिका, ऑस्ट्रेलिया वगैरे खंडांत वसाहती स्थापन होऊं लागल्यामुळें मालाची ने-आण व पैशाची देवघेव मोठ्या प्रमाणावर सुरू झाली व पेढ्या काढण्यास फार अनुकूल काल आला. आमस्टरडाम येथें १६०९ सालीं एक मोठी पेढी सरकारच्या आश्रयाखालीं निघाली. इंग्लंडमध्यें पेढ्यांची उत्पत्ति निराळ्या कारणांनीं झाली. पूर्वीच्या काळीं लोक आपला पैसाअडका व सोन्यारुप्याची शिल्लक सुरक्षितपणाकरितां लंडन येथील सरकारी तिजोरींत ठेवीत असत; परंतु १६४० सालीं पहिल्या चार्लस राजानें लोकांचे पैसे बळजबरीनें तिजोरींतून काढून आपल्या कामास लावले. त्यामुळें प्रजेचा राजावरील विश्वास उडाला; व लोक खाजगी रीतीनें सराफाजवळ आपली शिल्लक ठेवूं लागले. तेव्हां ठेवीवाल्यांस व्याज देऊन ठेवींची रकम सराफ व्यापाऱ्यास कर्जाऊ देऊं लागले. व अशा रीतीनें पेढ्यांचा धंदा सुरू झाला. पुढें कांहीं वर्षांनंतरचा इंग्लंडचा राजा तिसरा विल्यम हा मूळ हॉलंडचा रहिवाशी असल्यामुळें त्याला पेढीच्या धंद्याची चांगली माहिती होती. त्याला यूरोपांतील लढायांकरितां कर्जाची जरूरी लागली तेव्हां लोकांस सवलती देऊन व पार्लमेंटची मंजूरी मिळवून त्यानें बँक ऑफ लंडन नावाची पेढी १६९४ सालीं स्थापन करविली. या बँकेचें मूळ भांडवल बारा लक्षांचें होतें. पुढें तें कोटीपर्यंत गेलें. नंतर सरकारनें या बँकेस चलनी नोटा काढण्याचाहि अधिकार दिला. या बँकेच्या मदतीमुळें व पतीमुळेंच सरकारला मोठमोठ्या खर्चाच्या लढाया चालवितां आल्या. संयुक्त भांडवलाच्या तत्त्वावर निघालेली ही पहिलीच पेढी असल्यामुळे तिजबद्दल लोकांमध्यें पुष्कळ गैरसमज होता. ॲडाम स्मिथसारखा अर्थशास्त्रवेत्तासुद्धां या संयुक्त भांडवलाच्या तत्त्वास अनुकूल नव्हता. खाजगी पेढीवाले या निमसरकारी पेढीचा हेवा करीत असत. या बँकेच्या पुष्कळशा चलनी नोटा जमवून त्या बँकेकडे एकदम नेऊन बँकेची फजीती करण्याचेहि त्यांनीं प्रयत्न केले. परंतु बँकेच्या चोख व्यवहारामुळें सर्व गैरसमज दूर होत गेले. बँकेचे सर्व हिशेब आठवड्याच्या आठवड्यास प्रसिद्ध होत असत. बँकेचें येणें किती, देणें किती व शिल्लक किती याचा आढावा दर

आठवड्यास निघत असल्यामुळें लवाडी होण्याचा मुळींच संभव नव्हता. बँक ऑफ इंग्लंडचें हें उत्तम उदाहरण डोळ्यापुढें असल्यामुळें संयुक्त भांडवलाच्या पेढ्या पुढें पुष्कळ निघाल्या व त्या पिढ्यानुपिढ्या टिकल्या.

हिंदी पेढ्यांचा इतिहास.—हिंदुस्थानांत, ब्रिटिश सत्ता स्थापन होण्यापूर्वी, व्यापाराला व शेतकीला भांडवल पुरविण्याचा धंदा आणि सामान्य सावकारीचा धंदा वनिया, मारवाडी,मद्रासेकडील चेट्टी,मुंबईमधील पारशी व भाटे लोक यांच्या हातीं होता; हुंडीचा व्यापारहि यांच्यापैकीं पेढीवाले लोक करीत असत. हे आपल्या हुंड्या महाजनी नांवाच्या लिपींत लिहीत असत. ही लिपी इतरांनां वाचतां येत नसे. हुंडी नाकारल्याचीं उदाहरणें फार क्वचित घडत. अलीकडे संयुक्त भांडवलाच्या पेढ्या निघाल्या आहेत तरी या खाजगी पेढीवाल्यांचा धंदा कमी झालेला नाहीं.

वरील खाजगी पेढ्यांखेरीज अलीकडे हिंदुस्थानांत ( १ ) इंपीरियल बँक, ( २ ) हिंदुस्थानांत व परदेशांत धंदा करणाऱ्या एक्सचेंज बँका व ( ३ ) इंडियन जॉईंट स्टॉक बँका, अशा तीन प्रकारच्या पेढ्या निघाल्या आहेत. हिंदुस्थानांत ईस्ट इंडिया कंपनीनें व इतर यूरोपीय कंपन्यांनीं व्यापार सुरू केल्यापासून त्यांनां या देशांत पेढ्या काढण्याची जरूरी भासूं लागली. कंपनी सरकारचा राज्यकारभार येथें सुरू झाल्यापासून तिला अशा पेढ्यांची जरूरी फारच लागूं लागली. त्यामुळें लवकरच १८०९ सालीं बँक ऑफ बंगाल स्थापन झाली. या बँकेच्या मूळ पांच लाख पौंडांपैकीं एक लाख पौंड भांडवल सरकारचें होतें, व बँकेच्या व्यवस्थेंत सरकारचा प्रत्यक्ष हात असे. बँक ऑफ बाँबे १८४० सालीं व बँक ऑफ मद्रास १८४३ सालीं निघाल्या.

प्रेसिडेन्सी बँका:—स. १८७६ मध्यें प्रेसिडेन्सी बँक्स ॲक्ट नांवाचा कायदा पास होऊन या बँकांच्या कामकाजावर अधिक नियंत्रण घालण्यांत आलें व त्याबरोबर त्यांनां फायदेशीर सवलती देण्यांत आल्या. स. १८७६ पर्यंत सरकारची शिल्लक याच बँकांत ठेवीत असत. पण ती व्यापारांत गुंतविल्यामुळें वाटेल त्यावेळीं सरकारला पैसा मिळण्यास पंचाईत पडे. त्याबद्दल हिंदुस्थान सरकारनें स्टेट सेक्रेटरीकडे तक्रारी करून प्रत्येक प्रांतांत स्वतंत्र सरकारी खजिने काढण्याची परवानगी मिळविली. परंतु प्रेसिडेन्सी बँकांनां सवलत म्हणून बिनव्याजी सरकारी शिल्लक कमींत कमी किती ठेवलीच पाहिजे तें ठरविलें. शिवाय स.१८७६ च्या कायद्यानें बँकेच्या डायरेक्टरांची संख्या व त्यांची लायकी काय असावी, बँकेनें कोणत्या प्रकारचे व्यवहार करावे व कोणते करूं नये, कोणत्या हद्दींत व्यवहार करावा वगैरे गोष्टीहि ठरविल्या. वरील नियंत्रणें पडल्यावर सवलत म्हणून प्रेसिडेन्सी बँकांनीं इंग्लंडमध्यें शाखा काढून ठेवी घेण्याचा धंदा सुरू करून आपलें भांडवल वाढविण्याची परवानगी सरकारकडे मागितली. परंतु त्याविरुद्ध स्टेट सेक्रेटरीकडे एक्सचेंज बँकांनीं तक्रारी केल्यामुळें सदरहू सवलत प्रेसिडेन्सी बँकांनां मिळाली नाहीं. तथापि सरकारचा प्रत्यक्ष आश्रय व देखरेख त्यांच्यावर असल्यामुळें त्यांचा धंदा उत्कृष्ट चालला आहे व देशांतील बहुतेक व्यापारांत त्यांचेंच भांडवल गुंतलेलें असतें. शिवाय सरकारी शिल्लक ठरलेल्या मर्यादेपेक्षां पुष्कळ अधिक त्यांच्या जवळ असते. बँक ऑफ इंग्लंडप्रमाणें प्रत्यक्ष सरकारी बँक हिंदुस्थानांत नसल्यामुळें या प्रेसिडेन्सी बँकांनांच सरकारच्या आश्रयाचा सर्व फायदा मिळत असतो.

इंपीरियल बँक:—या तिन्ही प्रेसिडेन्सी बँका एकत्र करून ( जानेवारी १९२१ पासून ) इंपीरियल बँक ऑफ इंडिया नांवाच्या कायद्यान्वयें एक इंपीरियल बँक बनविण्यांत आली असून तिच्या शाखा मुंबई, कलकत्ता, मद्रास, अहमदाबाद, अहमदनगर, वसई, भडोच, धुळें, हुबळी, हैद्राबाद, इंदूर, जळगांव, कराची, नाशीक,पुणें, सोलापूर, सुरत, अलाहाबाद, बंगलोर, बनारस, भोपाल, कोलंबो, दिल्ली, ग्वालेर, लाहोर, नागपूर, पाटणा, पेशावर, क्वेटा, रंगून, सिमला, वगैरे १५० ठिकाणीं काढण्यांत आल्या आहेत. पूर्वी तीन प्रेसिडेन्सी बँका मिळून ३$\frac{3}{4}$ कोटी रु. भांडवल ( ५०० रु. एकेक मिळून ) होतें. आतां नव्या कायद्यानें इंपीरियल बँकेला आणखी ७$\frac{1}{2}$ कोटींचें भांडवल वाढविण्याची परवानगी मिळाली आहे. या बँकेचे नवे शेअरहि प्रत्येकी ५०० रुपयांचा असून त्यांपैकीं १२५ रुपये भागीदाराकडून वसूल केलेले आहेत. बँकेचा रिझर्व्ह फंड ४,५७,५०,५०० असून १९२४ जूनच्या बॅलन्स शीटमध्यें सरकारी शिल्लक २,०८,२२,०९६ रु. असून इतर ठेवी ७६,६२,४४,८०७ रुपयांच्या आहेत. इंपीरियल बँकेच्या कायद्याचीं कलमें बहुतेक प्रेसिडेन्सी बँकेच्या कायद्याप्रमाणेंच आहेत. मात्र इंपीरियल बँकेचें ऑफिस लंडनला ठेवून इंग्लंडांत कर्ज काढण्याची परवानगी देण्यांत आली आहे. शिवाय या बँकेशीं इंडियाच्या स्टेट सेक्रेटरीनें पुढीलप्रमाणें व्यवहार करण्याचें ठरविलें आहे. ( १ ) सरकारचे सर्व बँकविषयक व्यवहार इंपीरियल बँकेशीं करावे. ( २ ) सरकारच्या मुख्य मुख्य ठाण्यामध्यें रिझर्व्ह ट्रेझरींची पद्धत बंद करून सरकारी खजिन्याची शिल्लक इंपीरियल बँकेंत ठेवावी. (३) सरकारी कर्जा( पब्लिक डेट )संबंधीं व्यवस्था या बँकेनें करावी; वगैरे.

एक्सचेंज बँका(सराफी पेढ्या):—या मोठाल्या यूरोपीयन पेढ्या असून त्यांचा धंदा हिंदुस्थानांत व इतर पौर्वात्य देशांत फार मोठ्या प्रमाणावर चालू आहे. या संस्था सुमारें साठ वर्षांपूर्वी स्थापन झालेल्या असून हिंदुस्थानचा परदेशाबरोबर चालणारा व्यापार यांनीं पुरविलेल्या भांडवलावर चालतो. पण येथील एक्सचेंज बँका या केवळ शाखा असून या बँकांच्या मूळ मुख्य कचेऱ्या लंडन येथें आहेत. आरंभीं या बँकांचें भांडवल परदेशांतल्या विशेषतः लंडनमधील लोकांच्या ठेवींवर उभारलेलें असे. परंतु अलीकडे खुद्द हिंदुस्थानांतहि ठेवींच्या द्वारें त्यांनां पुष्कळ भांडवल मिळूं लागलें

असून ही रक्कम स.१८९५ = १०३० लाख,१९०५ = १७०४ लाख, १९१५ = ३३५४ लाख, १९२२ = ७३३८ लाख अशी झपाट्यानें वाढली आहे. तथापि या बँकांचें मुख्य काम हिंदुस्थान व इंग्लंड यांच्यामधील आयातनिर्गत व्यापारी मालाच्या किंमतीची देवघेव करण्याचें असतें.

एक्सचेंज बँका किंवा त्यांच्या शाखा पुढील आहेत:—चार्टर्ड बँक ऑफ इंडिया, आस्ट्रेलिया व चायना; नॅशनल बँक ऑफ इंडिया, मर्कंटाईल बँक ऑफ इंडिया, ईस्टर्न बँक, हाँगकाँग अँड शांघाय बँकिंग कार्पोरेशन, इंटर नॅशनल बँकिंग कार्पोरेशन, याकोहामा स्पीशी बँक, रूसो एशियाटिक बँक वगैरे. या पेढ्या आयातनिर्गत मालाच्या व्यापाऱ्यांना आर्थिक मदत करतात. निर्गत मालाच्या हुंड्या या बँका विकत घेऊन त्या इंग्लंडांत व इतर देशांत वटावतात. तसेंच आयात मालासंबंधीं हुंड्या विलायतेंतील व्यापाऱ्यांजवळून विकत घेतात. पण हिंदुस्थानचा निर्गत माल आयात मालापेक्षां नेहमीं जास्त असल्यामुळें विलायती व्यापाऱ्यांच्या हुंड्या कमी पडतात व ती तूट स्टेट सेक्रेटरीनें हिंदुस्थान सरकारवर काढलेल्या हुंड्या विकत घेऊन भरून काढतात. पण सरकारी हुंड्यांवर केवळ अवलंबून राहिल्यास स्टेट सेक्रेटरी हुंड्यांचा दर वाढवील म्हणून या पेढ्या साव्हरिन नाणें किंवा सोन्यारुप्याच्या लगडी हिंदुस्थानांत पाठवितात.

जॉ ई ट स्टॉ क बँ का.—स. १९०६ पूर्वी या प्रकारच्या देशी भांडवलाच्या बँका फार थोड्या होत्या. पुढें या बँकांची संख्या ३७६ झाली. त्यानंतर स्वदेशीच्या तत्त्वास उत्तेजन मिळाल्यापासून १९१० सालपर्यंत चार वर्षांतच या बँकांपैकीं बऱ्याच बँका फक्त बँकेचे व्यवहार करीत असत. पण कित्येक बँका इतर अनेक प्रकारच्या व्यवहारांतहि शिरत. त्यामुळें कांहीं बँकांच्या व्यवहारांबद्दल तज्ज्ञ लोकांच्या मनांत शंका उत्पन्न झाली होती पुढें स.१९१३त पीपल्स बँक ऑफ इंडिया हिचें प्रथम दिवाळें वाजलें आणि त्यामुळें जनतेचा विश्वास उडून लवकरच ४७६ पेढ्यांपैकीं लहानमोठ्या मिळून २४ बँकांचीं दिवाळीं निघालीं, पण त्यानंतर लवकर पुन्हां विश्वास उत्पन्न होऊन असल्या बँकांचे व्यवहार सुरळीत चालूं लागले.पण पुन्हां स.१९२३च्या एप्रिलमध्यें अलायन्स बँक ऑफ सिमला हिनें दिवाळें काढलें. या फार जुन्या बँकेच्या दिवाळ्याचा इतर बँकांवर अनिष्ट परिणाम झाला असता; पण सरकारनें इंपीरियल बँकेमार्फत अलायन्स बँकेच्या ठेवीवाल्यांनां शें. ५० इतकी रक्कम परत देवविण्याची व्यवस्था केली, त्यामुळें दिवाळ्याचें अरिष्ट अधिक फैलावलें नाहीं. हल्लीं या प्रकारच्या बँका आहेत; त्या:—अलाहाबाद बँक हिंच ( पी. अँड ओ. बँकिंग कार्पोरेशन ); भांडवल ३५ लाख ), बरोडा बँक (२९लाख), इंडिया बँक (१०० लाख), मोर्वी बँक (५५), म्हैसूर बँक (२०), सेंट्रल बँक ऑफ इंडिया (१६८), कराची बँक (२), औंध अँड कमर्शियल बँक (५), पंजाब नॅशनल बँक (३०), यूनियन बँक ऑफ इंडिया (५९) इत्यादि. १९१८ सालीं टाटा इंडस्ट्रियल बँक स्थापन झाली होती ती १९२३ सालीं सेंट्रल बँक ऑफ इंडियामध्यें अंतर्भूत करण्यांत आली.

पो स्ट ल से व्हिं ग बँ का.—१८३३ सालीं कांहीं व्यापारी पेढ्या बुडाल्या, तेव्हां मध्यम व गरीब स्थितींतल्या लोकांनां बिनधोकपणें पैसे ठेवतां यावे म्हणून सरकारनें या बँका काढल्या. त्यांची व्यवस्था प्रेसिडेन्सी बँकांकडे बराच काल होती, ती पुढें पोस्टऑफिसांकडे देण्यांत आली. याप्रमाणें सरकार वडें सावकार बनलें असून युद्धाच्या वेळच्या वारबाँटसारखे रोखे काढून विशेष सवलतींनें लोकांना ठेवी ठेवण्यास उत्तेजन देतें. सरकारावर विश्वास पूर्ण असून मध्यंतरीं देशी बँकांनीं दिवाळीं काढल्यामुळें तर पोस्टल सेव्हिंग बँकांत हलकें व्याज मिळतें तरी पैसे ठेवण्याची लोकांची प्रवृत्ति फार आहे.

को ऑ प रे टि व्ह सो सा य ट्या ( सहकारी पतपेढ्या ).—हिंदुस्थानांत शेंकडा ६० लोक शेतकीवर उपजीविका करणारे असून साधारणतः कंगाल स्थितींत आहेत. शिक्षण व दूरदृष्टि नसल्यामुळें हा वर्ग बहुतेक कर्जबाजारी आहे व दुष्काळाच्या सालींच नव्हे तर सामान्य पिकाच्या सालींहि शेतकीला बैल, पेरणीला बीं वगैरे विकत घेण्याकरितां या वर्गाला सावकार पहावा लागतो. सावकार जबर व्याज आकारून व्याजमुद्दल मिळून देण्याच्या पायीं शेतकऱ्यांचें घरदार, गुरेंढोरें, यांची वाट लावतो. हा सामान्य प्रकार टळावा म्हणून शेतकऱ्यांचा कायदा ( डेक्कन ॲग्रिकल्चरिस्ट रिलिफ ॲक्ट ) सरकारनें केला. तसेंच शेतकी बँका काढून हलक्या व्याजानें कर्ज देण्याची योजना सर डब्ल्यू. वेडरबर्न व कै. रानडे यांनीं उपस्थित करून त्याला व्हाइसराय लॉर्डरिपन यांनें सम्मति दर्शविली; पण तत्कालीन स्टेटसेक्रेटरीनें ती नापसंत ठरविली. पुढें स.१९०० च्या सुमारास लागोपाठ दोन दुष्काळ पडून शेतकऱ्यांची स्थिति फार खालावल्यामुळें व्हॉइसराय लार्ड कर्झननें एकदोन कमिशनें नेमून त्यांच्या रिपोर्टानुसार १९०४ सालीं कोऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायट्यांचा कायदा पास केला. त्यांचीं कलमें: (१) लहान किंवा मोठ्या गांवांतील एकाच वर्गांतील किंवा जातींतील कोणाहि दहा इसमांची कोऑपरेटिव्ह सोसायटी म्हणून रजिस्टर करून घेतां येईल. (२) सोसायटीनें सभासदांच्या ठेवी सभासदेतरांचें, सरकारचें व इतर कोआपरेटिव्ह सोसायट्यांचें कर्ज घेऊन फंड जमवावा व त्यांतून सभासदांनां किंवा राजिस्ट्रारच्या परवानगीनें इतर कोऑपरेटिव्ह सोसायट्यांनां कर्ज द्यावें. (३) अशा सोसायट्या स्थापून त्यांवर नियंत्रण ठेवण्याकरितां सरकारनें प्रत्येक इलाख्यांत एक रजिस्ट्रार नेमावा. (४) खेड्यांतील सोसायट्यांनीं सभासदांनां डिव्हिडंड न देतां दरसाल फायदा होईल त्याचा रिझर्व्ह फंड जमवावा, व हा फंड विशिष्ट रकमेवर गेल्यावर दरसालच्या फायद्यांतून बोनस वाटावा. (५) शहरांतील सोसायट्यांनीं फायद्यापैकीं एकचतुर्थांश रिझर्व्ह फंडांत टाकून मग डिव्हिडंड द्यावा.

वगैरे. याप्रमाणें रजिस्ट्रार् नेमले जाऊन सोसायटयो चालविण्यांत आलेला अनुभव लक्ष्यांत घेऊन १९१२ सालीं या कायद्यांत कांहीं दुरुस्त्या झाल्या. अशा सोसायटयांचें काम करणारी एक ५ ते ९ इसमांची मॅनेजिंग कमिटी व सेक्रेटरी असते. शेतकऱ्यांशिवाय इतर धंद्यांच्या लोकांच्याहि सहकारी पतपेढ्या निघालेल्या आहेत. उदाहरणार्थ, पुण्याची कॉसमॉस कोऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायटी;ही बहुतेक सरकारी नोकरांची आहे. स.१९१९ च्या सुधारणाकायद्यानें हा विषय प्रांतिक व दिवाणांच्या अधिकारांतला बनल्यानंतर आतांपर्यंतचा अनुभव लक्ष्यांत घेऊन मुंबई कायदेकौन्सिलमध्यें स. १९२५त कोऑपरेटिव्ह सोसायटयांच्या नवीन कायद्यावर वादविवाद चालू आहे [ गो. चि भाटे—अर्थशास्त्र; शं. रा. खांडेकर–पेढीचे व्यवहार व इतिहास. ]

**पेण, ता लु का.**—मुंबई इलाख्यांत कुलाबा जिल्ह्याचा ईशान्येकडील तालुका.नागोठणें पेटयासुद्धा याचें क्षेत्रफळ२९३ चौरस मैल. मुख्य ठिकाण पेण. खेड्यांची संख्या २२६. लोकसंख्या सुमारें सत्तर हजार. हवा निरोगी आहे. वार्षिक पाऊस १२१ इंच पडतो. भात, नागली, वरी, व मीठ पिकाविणें हे येथील मुख्य धंदे आहेत.

**गां व.**—मुख्य ठिकाण. पेण हें अलीबागपासून १९ मैलांवर आहे. लोकसंख्या (१९०१) ९२२९. कोंकणरस्ता व बोरघांट यांच्यायोगानें हें गांव दक्षिणेशीं जोडलें गेलें आहे. येथून पांच मैलांवर भवा नदीच्या कांठीं धरमतर येथें मुंबईहून येणारीं जहाजें रोज लागतात. येथें एक हायस्कूल आहे.

**पेनांग**—हें बेट व शहर स्ट्रेटसेटलमेंटच्या वसाहतीचा महत्त्वाचा भाग आहे. याचें क्षेत्रफळ सुमारें १०८ चौरस मैल आहे. पेनांग शहरांत विशेषतः चिनी व तामिळ लोक रहातात. पेनांग हें चांगलें बंदर आहे, परंतु सिंगापूरजवळ असल्यामुळें याचें बरेंच नुकसान झालें आहे.

१८६७पासून पेनांग हें रेसिडेन्ट सभासदाच्या आधिपत्याखालीं आहे. व तो स्ट्रेट्सच्या गव्हर्नराला जबाबदार आहे. या वसाहतीच्या कायदे करणाऱ्या सभेंत दोन बिनसरकारी सभासद नेमण्याचा अधिकार गव्हर्नरला आहे. त्याला स्टेट सेक्रेटरीची अनुमति घ्यावी लागते. ही कायदे करणारी सभा सिंगापूरला भरते. या बेटाचें सरकारी नांव "प्रिन्स ऑफ वेल्स आयलंड" असें आहे व पेनांग शहराचें नांव जॉर्ज टाउन आहे. येथील लोकसंख्या १९०१ सालीं १२८८३० होती.

**इ ति हा स.**—१७८५ सालीं वार्षिक १०हजार डॉलरचा मोबदला ठरवून केदाहच्या सुलतानानें पेनांग "ईस्टइंडिया" कंपनीला दिलें. हें वार्षिक वेतन फक्त ८ वर्षेच द्यावयाचें होतें. अशा रीतीनें पेनांगची स्थापना स. १७९६ मध्यें झाली. १७९१ मध्यें वार्षिक वेतनाची रक्कम ६००० डॉलर केली व ती कायमची करण्यांत आली. परंतु कांहीं वर्षांनंतर ती १०हजार डॉलर करण्यांत आली व ती अद्याप दरवर्षी दिली जाते.स.१७९५त हें अपराध्यांच्या वसाहतीकरितां उपयोगांत आणीत.१८०५सालीं पेनांग हा निराळा प्रांत करण्यांत आला. १८१६ मध्यें सिंगापूर व मलाका याला जोडण्यांत आलें, तेव्हां पेनांग सरकारी कामाची जागा होती. स. १८१९ मध्यें पेनांगचा दर्जा कमी करण्यांत आला. व ८ वर्षांनंतर सिंगापूर ही सेटलमेंटची राजधानी करण्यांत आली. स. १८६७ मध्यें स्ट्रेट सेटलमेंट सरकारी वसाहत झाली व तीस पेनांग जोडलें गेलें.

**पेनुकोंडा**—मद्रास इलाख्यांतील, अनंतपूर जिल्ह्याचा दक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ ६७८ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ९२९१८. यांत ९६ खेडीं आहेत. अनंतपूर जिल्ह्यांत हा तालुका सर्वांत जास्त डोंगराळ असल्यामुळें याचा बराच भाग लागवडीच्या उपयोगी नाहीं. या तालुक्याच्या पश्चिम सरहद्दीपासून पेन्नार व पूर्वसरहद्दीवर चित्रावती ह्या नद्या वहातात. बुक्कपट्टम् येथें चित्रावतीला धरण बांधून मोठा तलाव तयार केलेला आहे. मुख्य ठिकाण पेनुकोंडा; हें सुमारें सात हजार लोकवस्तीचें तटबंदीचें ठिकाण आहे. विजयानगरच्या अमदानींत व नंतर यास बरेंच महत्त्व होतें. त्यावेळचे कांहीं अवशेषहि येथें आहेत.

**पेन्नार**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक नदी. म्हैसूरच्या कोलार जिल्ह्यामध्यें, नंदीदुर्गच्या वायव्येस चन्नरायन बेट्टावर उगम पावल्यानंतर वायव्य दिशेनें गोरीबिदनूरवरून गेल्यावर, ही नदी मद्रास इलाख्यांतील अनंतपूर जिल्ह्यांत शिरते; व अनंतपूरच्या उत्तरेस कांहीं मैलांवर पूर्वेकडे वळून कडाप्पा आणि नेल्लोर या जिल्ह्यांतून वहात गेल्यावर नेल्लोर शहराच्या खालच्या बाजूस समुद्रास मिळते. जयमंगली, चित्रावती व पापघ्नी या म्हैसूर संस्थानांतील नद्या तिला मिळतात.

**पेन्शन**—खाजगी किंवा सरकारी नोकरांनां नोकरीची ठराविक मुदत संपल्यानंतर किंवा नोकरीची जागाच नष्ट झाल्यामुळें मागील नोकरीबद्दल जें नियमित किंवा नियतकालिक वेतन मिळतें त्याला पेन्शन म्हणतात. ठराविक मुदतीनंतर पेन्शन देण्याचा मुख्य हेतु नोकर कायम टिकावेत व वृद्धापकाळीं किंवा अकालीं शारीरिक व्यंगामुळें नालायकी आल्यास नोकरींतून कमी झालेल्या इसमाची उपासमार होऊं नये हा असतो. तथापि जे नोकर नोकरींतच किंवा नोकरी सुटल्यावर लवकरच मरण पावतात त्यांनां या पेन्शनपद्धतीचा फायदा मुळींच नाहीं, उलटपक्षीं नोकरी पुरी झाल्यानंतर जे दीर्घकाळ जगतील त्यांनां मात्र पुष्कळ फायदा मिळतो, हा या पद्धतींत मोठा दोष आहे. त्यामुळें प्राव्हिडंट फंडाची म्हणजे नोकरी चालू असतांना कांहीं पगारापैकीं अंश व कांहीं सरकारी अंश मिळून फंड जमवून तो सर्व एकदम नोकरी सुटतांच नोकरास किंवा त्याच्या कायदेशीर वारसास देण्याची पद्धति पुष्कळ ठिकाणीं अवलंबिली जाते. इंग्लंडमध्यें पेन्शनचे प्रकारः ( १ ) सिव्हिल सर्व्हिस, ( २ ) पर्पेच्यूअल किंवा हेरिडिटरी ( वंशपरंपरा ) पेन्शन, ( ३ ) पोलिटिकल पेन्शन, ( ४ ) सिव्हिल लिस्ट पेन्शन;

( ५ ) ज्युडिशियल, म्युनिसिपल, इत्यादि, ( ६ ) इक्लिझिॲस्टिकल पेन्शन, ( ७ ) आर्मी, ( ८ ) नेव्ही पेन्शन, इत्यादि निरनिराळे आहेत. पैकीं वंशपरंपरा पेन्शन १८८७ सालीं नेमलेल्या कमिटीच्या सूचनानुसार त्यापुढें देण्याचें सरकारनें बंद केलें इतकेंच नव्हे तर मागील चालू असलेलीं मार्लबरो, नेल्सन, रॉडने, ग्रॅफ्टन, रिचमंड, हॅमिल्टन वगैरे अनेकांचीं पेन्शनेंहि एकदम कांहीं रक्कम देऊन बंद केलीं; आणि मोठ्या राष्ट्रीय कामगिरीबद्दल एकदम द्रव्यद्वारा देणगी देण्याची पद्धति सुरू करून लॉर्ड किचनेरला ५०००० पौंड (१९०२सालीं), लॉर्ड क्रोमरला ५०००० पौंड (१९०७सालीं) अशा प्रकारें देणग्या दिल्या. १९०८ सालीं ओल्ड एज पेन्शन ॲक्ट पास झाला व १९१९ त तो दुरुस्त करण्यांत आला. या कायद्यान्वयें ७० वर्षें वयाच्या माणसांनां त्यांच्या स्वतःच्या व नवराबायकोच्या उत्पन्नाच्या मानानें प्रमाणशीर साप्ताहिक पेन्शन देण्यांत येतें. या पेन्शनची १९२१–२२ सालची रक्कम २६०००००० पौंड भरली. गेल्या महायुद्धांत ज्यांनां कायमचें व्यंग आलें असून जे पोट भरण्याला असमर्थ आहेत अशांनांहि पेन्शन देण्यांत येत असतें.

**पेन्सिली** ( लकडी )—यांनां शिसपेन्सिली असेंहि म्हणण्यांत येतें. पण आज आपण जीस काळी शिसपेन म्हणतो तिचा शिसें या धातूशीं मुळींच कांहीं संबंध नसून ती ग्रॅफाइट व माती यांची बनविलेली असते. प्राचीन ग्रीक व रोमन लोक कठिण लांकडाचा अथवा धातूचा तुकडा ( स्टायलस ) घेऊन मेणाच्या पाटीवर लिहीत असत. जेव्हां शिसें ही धातु सांपडली तेव्हां ते तिच्या पट्या करून वापरूं लागले. परंतु नेहमीच्या उपयोगासाठीं तें अति त्रासदायी होई. एलिझाबेथ राणीच्या कालापूर्वी चितान्याच्या कुंचल्यासहि पेन्सिल म्हणत. ते कसेंहि असलें तरी इतकें मात्र खास कीं ग्रॅफाइट किंवा प्लंबेगो एलिझाबेथ राणीच्या वेळींच पहिल्यानें उपयोगांत आलें. ग्रॅफाइटची पहिली खाण तिच्या राज्यांत इंग्लंडांत कंबरलंड येथें सांपडली आणि तें ग्रॅफाइट इतकें शुद्ध होतें कीं, त्यास शुद्ध केल्याशिवायच त्याच्या पाहिजे तशा कांड्या कापतां येऊन लिहिण्याच्या कामीं उपयोगांत आणतां येत असत. नंतर एका मनुष्यास, त्याच्या बारीक चिपा करून लांकडाच्या घरांत बसविण्याची युक्ति सुचली. परंतु त्यामुळें शुद्ध ग्रॅफाइट लवकरच संपलें व खालीं त्याचा निव्वळ भुगा शिल्लक राहिला. आणि त्या भुग्याचा उपयोग केल्यापासूनच आजच्या पेन्सिली बनविण्याच्या कृतीस सुरवात झाली. जेव्हां इ. स. १६६३ त बरो डेलच्या खाणी सांपडल्या तेव्हांपासूनच स्वाभाविकपणें इंग्लंडनें बराच काळ पर्यंत ह्या धंद्याचा मक्ता भोगला. नंतर इ. स. १७६१ त जर्मनींतील प्रसिद्ध फेबर कुटुंबानें हा धंदा नूर्नबर्ग येथें आणिला. मि कासपर फेबर नांवाच्या मनुष्यानें प्रथम हा धंदा सुरू केला. ग्रॅफाइटचे कण गोळा होण्यासाठीं तो एक चिक्कण पदार्थ वापरीत असे असें म्हणतात. जेव्हां त्यानें प्रथम आपला कारखाना सुरू केला तेव्हां फक्त पंधराच मजूर कामास लावले होते. आज मात्र फेबर कुटुंबानें सर्व जगांतील या धंद्याच्या बऱ्याचशा मोठ्या भागाचा मक्ता घेतला आहे. जर्मनींत पेन्सिलींचा पहिला कारखाना सुरू झाल्यानंतर वीस वर्षांनीं प्रसिद्ध फ्रेंच रासायनिक शास्त्रज्ञ निकोलस जे कोन्ट ( १७५५--१८०५ ) यानें ह्या धंद्यांत एक क्रान्ति घडवून आणिली. इंग्लंडशीं युद्ध झाल्यामुळें फ्रान्सला प्लंबेगो मिळेना. त्यानें ग्रॅफाइट व माती यांचें मिश्रण करून प्लंबेगोच्या जागीं उपयोगांत आणून १७९५ सालीं आपलें पेटंट काढलें. बव्हेरियन सरकारनेंहि आपला स्वतःचा एक कारखाना काढला. आणि या धंद्याचा पाया बव्हेरियांत चांगला खोल घातला. तें संस्थान आजहि पेन्सिलींच्या कारखान्याचें जगांतील केंद्र आहे. नूर्नबर्ग हें आजहि त्या धंद्याचें माहेरघर आहे तें तसेंच गेल्या शंभर वर्षांपासून चालत आलें आहे. हल्लीं जर्मनींत सव्वीसपेक्षां जास्त कारखाने असून जवळ जवळ पांच हजार लोक या कामीं लागतात. व निरनिराळ्या जातींच्या साठ लक्ष रुपयांच्या पेन्सिली बनवितात त्यापैकीं एकट्या हिंदुस्थानांत एकपष्ठांश खपतात. जपान नुकतेंच या क्षेत्रांत येत आहे. परंतु स्वस्त पेन्सिली बनविण्यांत निःसंशय त्यानें आपलें कौशल्य दाखविलें आहे.

क्रु ति.—सदरहू धंद्यास लागणारा माल म्हणजे ( १ ) ग्रॅफाइट, ( २ ) लांकूड व ( ३ ) माती. वर दर्शविल्याप्रमाणें शिसें ह्या धातूचा पेन्सिलींतील शिशयाशीं कांहीं संबंध नाहीं. ग्रॅफाइटला प्लंबेगो म्हणतात. त्यांत शिसें ( धातू ) आहे अशी पुष्कळ दिवस समजूत होती व त्यामुळें हा घोटाळा नेहमीं होत असतो. ग्रॅफाइट नैसर्गिकपणेंच उत्पन्न होतें. कंबरलंड येथें बरोडेलच्या खाणींत उत्तम ग्रॅफाइट हिरव्या रंगाच्या स्लेटसमधून सांपडलें होतें. जर्मनींत पासान येथें बोहेमिया त व स्टीरियांत तें सांपडतें त्याचप्रमाणें तें युनायटेडस्टेट्समध्यें सांपडतें.

कोरियांतील ग्रॅफाइट बऱ्याच अंशीं हलक्या प्रकारचें आहे. हिंदुस्थानांत ग्रॅफाइट त्रावणकोर, तिनेवेल्ली, कृष्णा, गोदावरी व विजगापट्टमच्या भागांत, तसेंच सिलोनमध्येंहि सांपडतें. सिलोनमधील ग्रॅफाइट जगांतील उत्तमांत मोडतें अशी ख्याति आहे. हिंदुस्थानांतून निर्गत होणारें ग्रॅफाइट शुद्ध करतात, कारण कीं ज्या धंद्यांत ग्रॅफाइटचा उपयोग होतो त्या धंद्याविषयीं हिंदुस्थानांत अज्ञान आहे म्हणूनच जर हिंदुस्थानांतीलच ग्रॅफाइट पेन्सिलींसाठीं उपयोगांत घ्यावयाचें असेल तर तें परदेशांतूनच साध्या रीतीनें शुद्ध करून आणलें पाहिजे. याचा निर्गत व्यापार बराच मंदावला आहे. व पुढें तर तो विशेषच मंदावेल, कारण कीं जगांतील भिन्न भिन्न भागीं

ग्रॅफाइटच्या नवीन खाणी खोदण्याचें काम चालू आहे आणि कृत्रिम ग्रॅफाइट त्याच्याशीं स्पर्धा करूं पहात आहे.

आतां मातीच्या प्रश्नासंबंधीं विचार करतांना हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, मातीची अमुक जात शोधून काढणें, ही कित्येक प्रयोजकांस व कारखानदारांस मोठी अडचण येऊन पडली आहे. खरोखरीच असें म्हणतां येईल कीं मातीची जात व तिच्या मिश्रणाचें प्रमाण हें सदरहू धंद्याचें गुह्यांग समजलें जाईल. त्याशिवाय इतर सर्व कांहीं कृति केवळ यांत्रिक तऱ्हेची आहे. पूर्वी वर दर्शविल्याप्रमाणें मि. एम्. कोन्ट यानें १७९५ सालीं पेटंट काढीपर्यंत पेन्सिलींतील शिसें करण्यास मातीचा मुळींच उपयोग करीत नसत. या कृतींत सर्वांत मोठा फायदा हा आहे कीं, ग्रॅफाइट खडे किंवा भुगा कसेंहि असो उपयोगांत घेतां येतें आणि त्यांत योग्य प्रमाणांत माती मिसळल्यानंतर दाबाच्या साहाय्यानें पाहिजे त्या आकाराच्या गोल, चौकोनी किंवा त्रिकोनी कांड्या काढतां येतात. मुख्यतः जास्त किंवा कमी माती घालून पाहिजे तितकें कठिण किंवा मऊ शिसें करतां येतें. बाजारांत निरनिराळ्या प्रमाणांत कठिण किंवा नरम अशा चाळीस प्रकारच्या पेन्सिली, निरनिराळ्या प्रमाणांत माती मिसळून बनविलेल्या मिळूं शकतात. मऊ माती म्हणजे उत्तम प्रकारची माती होय. भडोच व कलकत्ता येथील कारखानदारांनीं निरनिराळ्या जातीच्या प्रयोगांत पुष्कळ पैसे खर्च करून उत्तम जात शोधून काढली आहे. उत्तम जातीची पाहिजे तसली माती हिंदुस्थानांत विपुल आहे. कोन्ट याच्या पेन्सिली बनविण्याच्या कृतीचें पुढीलप्रमाणें साग्र वर्णन करितां येईल.

चुना किंवा रेती अगदींच नसलेली किंवा अगदींच थोड्या प्रमाणांत असलेली अशी काळी किंवा पांढरी चिकट माती प्लंबेगो किंवा रंगदार पदार्थांना चिकटी व मजबुती आणण्याकरितां वापरली जाते. ही माती शुद्ध करण्याकरितां पाण्याचा चांगला सांठा असावा लागतो. लांकडी पिपांतून पाणी भरून त्यांत माती चांगल्या रीतीनें कालविली असतां थोड्या वेळानंतर जड असलेले कण खालीं बसतात व शुद्ध व हलकी माती पाण्यावर कांहीं वेळ तरंगत रहाते. ही माती पहिल्यांतून दुसऱ्या पिपांत व दुसऱ्यांतून तिसऱ्यांत अशा रीतीनें सैफन नळींतून काढून घेतात, व ती त्यांत रात्रभर राहूं देतात. त्यानंतर पाणी व माती वेगळी झाल्यावर पाणी काढून टाकतात, व माती वेगळी करतात. ही माती पुढें मिश्रण करण्याकडे वापरतात. प्लंबेगो एका लोखंडी खलांत घालून तें चांगलें बारीक केलें पाहिजे. नंतर मुशींत ओतून तें चांगलें पांढरें होईपर्यंत त्यास उष्णता दिली पाहिजे म्हणजे तें चांगलें चकाकीत व मऊ होतें. प्लंबेगोंत माती कमी प्रमाणांत मिश्र करून मिश्रणास जर भट्टींत थोडी उष्णता दिली तर पेन्सिली नरम होतात व माती अधिक घातली तर त्या कठिण होतात. कोन्टनें बनविलेल्या कित्येक उत्तम पेन्सिलींत दोन भाग प्लंबेगो व तीन भाग माती असे. आणि इतर पेन्सिलींत दोन्ही भाग सारखेच असत. या मिश्रणामुळें पेन्सिलीच्या काळेपणांत व काठिण्यात पाहिजे तसा बदल करतां येतो. याप्रमाणें प्लंबेगो व माती यांचें मिश्रण तयार झाल्यावर त्याचा एक गोळा करून त्यास स्क्रुप्रेसमधील एका छिद्रांतून दाबून काढलें असतां त्याच्या पेन्सिलीच्या आंतील कांड्या तयार होतात. ह्या कांड्या वाळवून नंतर त्यांस भट्टींत घालून निरनिराळ्या प्रमाणांत पाहिजे तितकी उष्णता देतात. ह्या शिशाच्या कांड्या निरनिराळ्या आकाराच्या व लांबीच्या लांकडी खांड्यांत बसवून विकण्याकरितां पाहिजे तशी पेन्सिल तयार होते.

रंगीत पेन्सिली.—रंगीत पेन्सिली बनविण्याची कृति बहुतांशीं वरील सारखीच आहे. फक्त ग्रॅफाइटच्या जागीं एखादा चांगला एनीलीन रंग पाहिजे तितका भडक घ्यावा, आणि त्यांत मेण व सरस किंवा लईसारखा एखादा चिकट पदार्थ वापरावा. काळ्या पेन्सिलीस भट्टींत उष्णता द्यावी लागते. परंतु हीस तसें कांहींच करावें लागत नाहीं. जर हें मिश्रण बरेंच तापवून काढलें तर एनीलीन रंग, मेण व लई किंवा सरस यांसारखी यांतील रासायनिक द्रव्यें एकदम जळून जातील, हाच या रंगाच्या पेन्सिलींत कमीपणा आहे. कारण त्या काळ्या पेन्सिलींतील शिशाप्रमाणें कणखर व मजबूत राहूं शकत नाहींत. साधारणपणें ७ रत्तल मेण व धुतलेली माती, एक रत्तल रंग आणि एकचतुर्थांश रत्तल सरस या प्रमाणांत घ्यावें. सर्व जिन्नस एका लोखंडी कढईत वितळवावे आणि ते वितळतांना त्यांस बारीक लांकडाच्या कांडीनें सारखें हलवीत राहिलें पाहिजे. हें मिश्रण चांगलें वितळून त्या रसाचा चांगला एकजीव होऊन गोळा झाला म्हणजे त्या मिश्रणास साधारण गारव्यांत ठेवून वाळवावें आणि त्याच्या बारीक कांड्या करून लांकडाच्या घरांत बसवाव्या. इतर सर्व कृति पूर्वीप्रमाणेंच आहे. हिंदुस्थानांत आतांपर्यंत रंगाच्या पेन्सिली करण्याचा कोणीहि प्रयत्न केल्याचें दिसत नाहीं. मात्र ग्रॅफाइटच्या पेन्सिली बनविण्याचे कारखाने बरेच निघाले असून अजूनहि निघत आहेत.

या धंद्यास लागणारा तिसरा व अतिशय अवश्यक पदार्थ म्हणजे लांकूड होय. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत लांकडाच्या बऱ्याच जाती पेन्सिलीस उपयुक्त अशा आहेत. परदेशांत विशेषतः जपान व जर्मनींत कनिष्ठ प्रकारच्या लांकडास मऊ करण्याची व रंग देण्याची स्वतंत्र कृति अशी आहे कीं जीमुळें तें रेड्-सिडरसारखें दिसतें.

पेन्सिली करण्यास लागणारी यंत्रसामुग्री दोन प्रकारची असते; एक शिसकांड्या बनविण्याची व दुसरी पेन्सिली बनविण्याची. ग्रॅफाइट व माती हीं दोन्ही चांगली शुद्ध झाल्यावर दोहोंचें योग्य प्रमाणांत मिश्रण करावयाचें असतें. त्यास शुद्ध व चकचकीत करणें या दोन्हीं गोष्टी पाण्याच्या साहाय्यानें कराव्या लागतात. ग्रॅफाइट व माती यांचें

मिश्रण भट्टींत घालून तापाविलें असतां बोरॅक्स वितळून निघतो व त्या मिश्रणांत एकसारखा पसरतो आणि त्याचा पारदर्शक कांचेसारखा पदार्थ बनतो आणि शिशयास एक प्रकारें काठिण्य व बळ देतो. मिश्रण पूर्णपणें करून नंतर तें एका मळण्यांच्या यंत्रांत घालून मळतात आणि नंतर सर्व मिश्रण प्रवाही स्थितींतच फिल्टर प्रेसमध्यें घालवितात, त्यायोगें त्यांतील पाणी निघून जाऊन बिनपाण्याचा ओला गोळा तयार होतो. नंतर या गोळ्याचे लहान लहान भाग करून शिसें बनविण्याच्या ( लेडप्रेस ) यंत्रामध्यें ठेवितात. हें एक पोलादी वर्तुळाकार भांडें असून त्याच्या खालीं किंवा बाजूस ज्या आकाराचें शिसे पाहिजे असेल त्या आकाराचें छिद्र असतें; वरून बऱ्याच जोरानें शिशास दाब दिला असतां खालील छिद्रांतून सापासारखें वांकडें बारीक शिसें निघूं लागतें. तें काळजीपूर्वक संभाळून, सरळ करून, पाहिजे त्या लांबीचे तुकडे तयार करितात. चांगले वाळल्यावर त्यांस भट्टींत घालून ज्यामानाने काठिण्य पाहिजे असेल तितकी उष्णता देतात. त्यास लागणारीं यंत्रें:—(१) दळणारें अथवा पीठ करणारें यंत्र, ( २ ) गाळणारें यंत्र ( फिल्टर प्रेस ), ( ३ ) शिसें दाबण्याचें यंत्र अथवा ग्रॅफाइटचा दोरा काढणारें यंत्र ( हैड्रॉलिक प्रेस ) व ( ४ ) झाकणांची भट्टी व मुशी, इत्यादि.

लांकूडखात्यांत पाहिलें काम म्हणजे लांकडें कापून त्याच्या फळ्या करून नंतर त्यांच्या चिपा करणें हें होय. जपानी पद्धत अशी आहे कीं, पेन्सिलीच्या लांबीइतके व तिच्या परिघापेक्षां किंचित अधिक जाड असे दोन चौकोनी लांकडाचे तुकडे घेऊन एका बाजूस मधोमध शिसें राहण्यास छिद्रें पाडतात. छिद्रें पाडण्याचें काम हातानें किंवा यंत्रानें होतें. शिसें घातल्यानंतर सरस लावून दोन्हीं भाग जोडतात. आणि सरस वाळेपर्यंत कांहीं तास त्यास प्रेसमध्यें दाबून ठेवितात. नंतर पेन्सिली अर्धवर्तुळाकार चाकूनें गोल करतात. नंतर त्यांस कांचकागदांच्या यंत्रांत घातल्यामुळें गुळगुळीतपणा येतो. येथेंच त्यांचीं दोन्हीं टोकें कापून जरूर असल्यास पॉलिश करतात. आणि शेवटीं शिक्का मारतात. जर्मन कृतींत एका चिपेऐवजीं सहा पेन्सिलींइतकी रुंद चीप घेऊन तिची लांबी व जाडी जपानी पद्धतीप्रमाणेंच घेतात. एका ऐवजीं सहा सारखीं छिद्रें छिद्र पाडण्याच्या यंत्रांत पडतात. सहा शिशाचे तुकडे ठेवून दोन चिपा उत्तम प्रकारें बनविलेल्या सरसानें चिकटवून बांधतात व त्या बांधलेल्या चिपा मजबूत प्रेसमध्यें दाबून काढतात. नंतर त्यांस मोल्डींग किंवा आकार (शेपिंग) देणाऱ्या यंत्रांत घालतात. तेथें प्रथम त्यांची एक बाजू जलद फिरणाऱ्या चाकूनें अर्धवर्तुळाकार होते. नंतर ती बाजू उलट फिरवून १ हा पेन्सिली यंत्रांतून बाहेर येतात. स्वस्त पेन्सिली वॉर्निशवांचूनच विकतात कारण एक तर त्यांना सहा पुटें दिलीं तरी सुद्धां उत्तम वार्निश होत नाहीं व दुसरें उत्तम वॉर्निश करणें ही मोठ्या खर्चाची बाब होय. येथें याविषयीं हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं रेडसिडारला फक्त दोन किंवा तीन पुटें दिलीं असतां उत्तम पॉलिश होतें. शिक्के मारण्याचें काम उष्ण पोलादी ठशानें होतें आणि स्वस्त रुपेरी व सोनेरी भुकटया (ज्या स्वस्त धातूपैकीं शिल्लक राहिलेल्या असतात) यांचा उपयोग करतात. ह्या कृतीस लागणारीं यंत्रसाधनें येणेंप्रमाणें:—( १ ) लांकूड कापणारें यंत्र ( लहान किंवा मोठ्या लागतील तशा करवती ), ( २ ) छिद्रें पाडणारें यंत्र, ( ३ ) गोलाकार देणारें यंत्र, ( ४ ) कांचकागदाचें यंत्र, ( ५ ) टोकें गुळगुळीत करणारें यंत्र, ( ६ ) रंग किंवा वॉर्निश करणारें यंत्र व ( ७ ) शिक्के मारणारा दाब.

आतांपर्यंत पेन्सिली बनविण्यासाठीं मिरज, सातारा, पुणें, अनकपल्ली, विम्लीपट्टम् ( मद्रास ), मुंबई, धारवाड, वगैरे ठिकाणीं कारखाने सुरू करण्यांत आले. हिंदुस्थानांत दरसाल अजमासें तीस लक्ष ग्रोस पेन्सिली खपतात. त्याकरितां अजमासें १० लक्ष रुपये परदेशीं जातात. पुढील पंचवीस वर्षांत सरकारच्या प्राथमिक सक्तीच्या शिक्षणाच्या धोरणामुळें तर हा खप अतिशयच वाढेल. तेव्हां रोज १०० ग्रोस पेन्सिली बनविणारे असे चाळीस कारखाने चालण्यास तरी मुळीच कांहीं हरकत नाहीं. [ ले. एन्. एन्. गोडबोले. ]

**पेपरमिंट**—दोन वर्षें जगणारें नैसर्गिक झुडुप. हें इंग्लडांत व यूरोपखंडांत प्रवाहाच्या कांठीं व ओलाव्याच्या जागीं आढळतें आणि इंग्लड, यूरोप, व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें यांत त्याची मुद्दाम लागवड केली जाते. पांढरें व काळें अशा याच्या दोन जाती आहेत. काळ्या झाडापासून तेल बरेंच मिळतें. परंतु पांढऱ्याच्या तेलाला एक प्रकारचा चांगला वास असल्यामुळें किंमत जास्त येते. निरनिराळ्या जमिनींत लावलेल्या झाडांच्या तेलाची रुचि किंचित भिन्न असूं शकते. शुद्ध असतां हें तेल बहुतेक रंगहीन असतें.त्याला एक प्रकारचा सुखावह वास व सुगंधयुक्त चव असते; व तोंडांत हवा ओढल्यानंतर थंडपणा वाटतो. ह्या तेलाचें विशिष्ट गुरुत्व ०.८४ ते ०.९२ आहे. पेपरमिंटचें तेल ४० पर्यंत थंड केल्यास केव्हां केव्हां स्फटिक बनतात. स्फटिक मद्यसार आणि ईथर ह्यांमध्यें द्रवतात, परंतु पाण्यांत बहुतेक मुळींच द्रवत नाहींत. ह्या तेलांत कधीं शुद्ध केलेलें स्पिरिट मिसळलेलें असतें. तेलांत पाणी घालून हलविल्यानंतर त्याला दुधासारखा गढूळपणा आल्यास त्यांत स्पिरिट आहे असें समजावें.

पेपरमिंटचें तेल अंगाला लावल्यास अंग बधिर होतें; व शिवाय तें कोथप्रति( ॲंटीसेप्टिक ) आहे. या कारणास्तव दांतदुखीवर आराम पडण्याकरितां आणि दांतांतील सडलेल्या भागांवर उपचार करण्याच्या वेळीं याचा फार उपयोग होतो. कांहीं प्रकारच्या अग्निमांद्यावरहि याचा उपयोग होतो.

पेपरमिंटचें दर एकरीं उत्पन्न सरासरी१६५हंड्रेडवेट होतें. एकाच झाडापासून तीन पिकें निघतात. चवथें पीक क्वचित होतें. हंगाम साधारणपणें आगष्टच्या आरंभाला किंवा

मध्याला सुरू होऊन ६ आठवडे असतो; व त्या अवधींत रात्रंदिवस ऊर्ध्वपातन यंत्रें चालू ठेवतात. हंगामांत हवा उष्ण व कोरडी असेल तर फुललेल्या ताज्या पांच पौंड वनस्पतीपासून १ औंस तेल निघतें; पण हवा वाईट असेल तर याच्या निम्में तेल निघणेंहि जड जातें. हें तेल नुसतें १० किंवा १४ वर्षे ठेविल्यास त्याचें माधुर्य वाढतें. केव्हां केव्हां तेलाला हिरवा रंग दिसतो, याचें कारण ऊर्ध्वपातन क्रियेच्या वेळीं वाजवीपेक्षां जास्त पाणी घातलेलें असतें हें होय. उलटपक्षीं उर्ध्वपातनयंत्रांत वनस्पति शनवारपासून सोमवारपर्यंत राहूं दिल्यास तेलाला पिंगट रंग येतो.

**पेपिन, डेनिस** (१६४७–१७१२)—एक फ्रेंच शास्त्रज्ञ. यानें हायगेंझ यास वाताकर्षक यंत्र तयार करण्याच्या कामीं मदत केली व त्यांत पडदे वापरण्याची युक्ति सुचविली. याचें पात्रकयंत्र (डायजेस्टर) प्रसिद्ध आहे. हा कांहीं दिवस व्हेनिस येथें अध्यापक असून नंतर रॉयल सोसायटीचा क्युरेटर झाला. यानेंच वक्रनलिकेसंबंधीं शोध लावले. हा दारिद्र्यांत मरण पावला.

**पेप्सीन**—निरोगी डुकर, शेळी, किंवा गायीचें वासरूं यांच्या पोटांतील श्लेष्मयुक्त अस्तर वाळवून केलेला निपाकप्रवर्तक पदार्थ. औषधाकरितां उपयोगांत येणारें द्रव्य पिवळसर किंवा पांढऱ्या रंगाचें असून त्याची पूड, वड्या, किंवा गोळ्या केलेल्या असतात. तें अल्प प्रमाणांत पाणी व मद्यसार यांमध्यें द्रवतें. पचनक्रियेला मदत व्हावी म्हणून म्हाताऱ्या लोकांनां पेप्सीन देतात.

**पेंबा**—हिंदीमहासागरांत पूर्वआफ्रिकेच्या किनाऱ्याजवळ पेंबा नांवाचें बेट झांझीबारच्या सुलतानच्या ताब्यांत आहे. हें बेट ४० मैल लांब व १० मैल रुंद असून तेथील क्षेत्रफळ ३८० चौरस मैल आहे. येथील रानामुळें या बेटास आलहुथेरा हें अरबी नांव देण्यांत आलें. येथील अरब लोक नीग्रो आणि स्वाहिली मजुरांच्या मदतीनें शेती करतात. १८९७ सालापूर्वी सर्व गुलाम मजूर असत. येथील लोकसंख्या (१९१०) ८३१०९ आहे. बहुतेक लोक बान्टु असून ते वापेंबा नांवानें प्रसिद्ध आहेत. नारळाचे व लवंगाचे मळे येथें पुष्कळ आहेत. कातडीं, चामडीं, रबर, कवड्या आणि कांसवाच्या पाठी व नखें हा येथील निर्गत माल असून तांदुळ आणि सुती कापड हा आयात माल होय.

या बेटांत ३ बंदरें आहेत. शाकीशाकी हें राजधानीचें ठिकाण असून व्यापाराचें केंद्र नैर्ऋत्येच्या किनाऱ्यावर आहे फिर्शीफाशी आग्नेय किनाऱ्यावर आहे. दर आठवड्याला येथून झांझीबारला आगबोट जाते. १९०७ सालीं हें बेट झांझीबारशीं बिनतारी तारायंत्रानें जोडलें गेलें.

**पेरंबलूर**—मद्रास इलाख्यांतील त्रिचनापल्ली जिल्ह्याचा उत्तरेकडील तालुका. क्षेत्रफळ ६७४ चौरस मैल लोकसंख्या (१९२१) २३६६८०. खेड्यांची संख्या १२८. मुख्य ठिकाण पेरंबलूर. वायव्य भागांतील पचैमलै डोंगराखेरीज तालुक्याचा इतर भाग सामान्यतः सपाट आहे. वार्षिक पाऊस ३९ इंच म्हणजे जिल्ह्यांतील इतर तालुक्यापेक्षां जास्त पडतो.

**पेरामारिबो**—डच ग्वायना अथवा सुरिनाम याची राजधानी. हें सुरिनाम नदीच्या उजव्या तीरावर समुद्रापासून वीस मैलांवर आहे. लोकसंख्या ३३८२१ आहे. हें शहर स्वच्छ आणि निरोगी आहे. पेरामारिबो हें इंडियन लोकांचें खेडें फ्रेंच लोकांच्या वसाहतीचें ठाणें १६४० सालीं झालें व स. १६५० मध्यें येथें पार्न्हमच्या लॉर्ड विलोबीनें राजधानी केली. १६८३ सालीं येथें फक्त सत्तावीस घरें होतीं व यापैकीं निम्म्यांहून जास्त दारूचीं दुकानें होतीं, परंतु स. १७९० मध्यें येथील घरांची संख्या एक हजार झाली. स. १८२१ व १८३२ या वर्षीं या शहराला आग लागली होती.

**पेरॉन** (१७५५–१८३४)—हा फ्रेंच मनुष्य शिंद्यांच्या लष्करांत डीबाईनचा दुय्यम अधिकारी होता. याचें मूळ गांव पीअरे कुईलीअर. हा एक फ्रेंच व्यापारी गलबतावर खलाशी होता. त्याचें गलबत मलबार किनाऱ्यावर फुटलें. तेथून हा उत्तरेस गेला व ग्वालेरच्या राण्याच्या पदरीं स्कॉच म्हणून संग्स्टर नांवानें शिपायी राहिला. पुढें (१७९०) डीबाईनच्या हाताखालीं गेला नजीबखानाची विधवा स्त्री कानूंदचा किल्ला महादजीच्या स्वाधीन करीना, तेव्हां याला कानूंदवर पाठविलें. तेथें बाईच्या कुमकेस आलेल्या इस्मायल बेगचा त्यानें पराभव केला. लढाईत तोफेचा गोळा लागून नजीबची स्त्री ठार झाली तेव्हां इस्मायलनें अभय घेऊन किल्ला पेरॉनला दिला (१७९२). पुढील सालीं पेरॉन हा पुण्यास आला होता. खर्ड्याच्या लढाईत याच्या पायदळानें चांगली कामगिरी केल्यानें दौलतरावानें त्याची बढती केली व त्याला आपल्या सर्व सैन्याचा सेनापति केलें (१७९६). यानंतर तो स्वदेशीं गेला. पुढें परत आल्यावर लखवादादाच्या साथीदारांनीं आग्र्याचा किल्ला बळकाविला तो यानें सोडविण्याची खटपट केली (१७९९). शिंद्याच्या मनांत १८०२ सालीं याच्याबद्दल संशय आला. तो दौलतरावाच्या विरुद्ध इंग्रजांशीं अलीगडच्या लढाईपासूनच फितुरी करूं लागला (१८०३) व लढण्याऐवजीं मागें मागें हटूं लागला. त्यामुळें शिंद्यानें त्याची सेनापतीची जागा व जहागीर जप्त केली व अंबाजी इंगळ्यास दिली. त्याचा व पेरॉनचा द्वेष होता. अखेर पेरॉन आपणच इंग्रजांनां मिळाला व आपली सर्व मालमत्ता घेऊन तो इंग्रजी मुलुखांतून लखनौस गेला. शिंद्याच्या इंग्रजांबरोबरील या वेळच्या सर्व लढायांत पेरॉननेंच फितुरी करून शिंद्यांचा नाश केला. त्यानें एकदां (१०८१) उज्जैनच्या लढाईत दौलतरावानें बोलाविलें असतां सैन्यच धाडलें नाहीं. तो पुष्कळ पैसा घेऊन फ्रान्समध्यें परत गेला व १८३४ सालीं मेला. [डफ; काम्प्टन—यूरोपीयन मिलटरी ॲडव्हेंचरर्स ऑफ हिंदुस्थान.]

**पेरिक्लीस** ( ख्रिस्त पूर्व ४९०-४२९ )—एक अथेनियन मुत्सद्दी. पूर्ववयांत त्यानें उत्तमोत्तम शिक्षकांपाशीं संगीतशास्त्र, तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान यांचें शिक्षण घेतलें होतें. ४६० च्या सुमारास पेरिक्लीसकडे अथेन्स संस्थानांतील मुख्य अधिकार आला; आणि तेव्हांपासूनच अथिनियन लोकसत्तेची अभूतपूर्व वाढ सुरू झाली. या काळांत अथिनियन लोकांची सत्ता अगदीं शिखरास पोहोंचली. परंतु युद्धखर्चाखालीं लोक अगदीं पिळून निघाले; फोसिस, लोक्रीस, युबोई मेगारियन व स्पार्टन, या सर्वांनीं अथेन्सविरुद्ध बंडें उभारलीं. तेव्हां कठिण प्रसंग गुदरला. तथापिहि पेरिक्लीसनें न डगमगतां स्पार्टन लोकांनां लांच देऊन मार्गें परतविलें, व युबोई जिंकण्यास स्वतः गेला. इतर संस्थानें मात्र परत जिंकतां आलीं नाहींत; तेव्हां तीस वर्षांचा तह करून पेरिक्लीसनें ग्रीक संस्थानांचें स्वातंत्र्य कबूल केलें. नंतर त्यानें आपल्या परराष्ट्रीय धोरणांत पूर्ण फरक करून पुढें फक्त आरमारी सामर्थ्य वाढविण्याचा उद्योग चालविला. डेलियन संघांतील अथेन्सचीं दोस्त संस्थानें आपल्या सत्तेखालीं आणण्याचा त्यानें प्रयत्न चालविला होता. या कार्याकरितां त्यानें निरनिराळ्या प्रदेशांत अथिनियन लोकांच्या वसाहती किंवा लष्करी ठाणीं बसविलीं. हे लोक तेथें जमीनदार बनले व लष्करी दृष्ट्या महत्त्वाचीं अशीं तितकीं ठाणीं अथेन्सच्या कबज्यांत आलीं. याप्रमाणें थ्रेस, इरेट्रिया, काळा समुद्र व एजिना वगैरे ठिकाणीं वसाहती स्थापल्या

खुद्द अथेन्स संस्थानांत अथिनियन लोकांनां पूर्ण स्वराज्य चालविण्याचें म्हणजे लोकशाहीचे हक्क देण्याचें धोरण त्यानें स्वीकारलें होतें. पेलॉपोनेशियन युद्धांत अपयश आल्यामुळें पेरिक्लीस मॅजिस्ट्रेटच्या पदावरून ४३० मध्यें च्युत झाला, व पैशाच्या अफरातफरीच्या आरोपावरून त्याला ५० टॅलेंट्स दंड झाला परंतु लवकरच लोकमतांत फरक होऊन त्यालाच अधिक अधिकार देऊन मॅजिस्ट्रेट नेमलें. पण तो लवकरच मरण पावला.

**पेरिंथस**—थ्रेसमधील एक प्राचीन शहर. हें सेलिंब्रियाच्या पूर्वेस २२ मैलांवर आहे. इ.स. पूर्वी सुमारें ५९९मध्यें येथें सामीयन लोकांची वसाहत होती. इ. स. पूर्वी ३४० त या ठिकाणीं मॅसिडोनच्या दुसऱ्या फिलिपला जोराचा प्रतिकार करण्यांत आला.

**पेरिपॅटेटिक्स**—ॲरिस्टॉटलच्या शिकवितांना फिरण्याच्या पद्धतीमुळें अगर लिसियमधील 'पेरिपटॉस' (आच्छादित मार्ग) या शब्दावरून हें नांव मिळालेला प्राचीन काळचा, ॲरिस्टॉटलचा शिष्यसंप्रदाय; यांतील लोक स्वतंत्र विचारांचे नसले तरी बुद्धिमान व विद्वान होते.त्यांनीं आपल्या गुरूच्या—ॲरिस्टॉटलच्या-मुख्य मतांत फारशी नवी भर घातली नाहीं.

**पेरिम**—बाबेल मांडेब सामुद्रधुनींतील एक बेट. हें अरबस्तानच्या किनाऱ्यापासून सुमारें १½ मैल व आफ्रिकेच्या किनाऱ्यापासून २१ मैलांवर आहे. याची सर्वांत जास्त लांबी ३॥ मैल, व सरासरी रुंदी सुमारें १॥ मैल आहे. क्षेत्रफळ ५ चौरस मैल. या बेटाचा कारभार एडनबरोबर चालविला जातो. इंग्रजांच्या पूर्वी या बेटावर कोणत्याहि राष्ट्राचे लोक कायमचे राहिलेले नव्हते. तांबड्या समुद्रांतून परत येतांना, इ. स. १५१३ त अल्बुकर्क हा येथें उतरला होता. त्यानें या बेटाला व्हेराक्रूझ असें नांव दिलें. तांबड्या समुद्राच्या मुखाजवळ फिरणाऱ्या चांचे लोकांच्या ताब्यांत हें बेट कांहीं काळपर्यंत होतें. परंतु पुष्कळ कष्टानें ९० हातांपर्यंत खडक खोदूनसुद्धां येथें पाणी न लागल्यामुळें त्यांनीं हें बेट सोडून दिलें. इ. स. १७९९ त, ईस्ट इंडिया कंपनीनें हें बेट घेऊन, त्या वेळीं ईजिप्तमध्यें असलेलें फ्रेंच सैन्य हिंदुस्थानांत टिप्पू सुलतानाला मदत करण्याकरितां येऊं लागल्यास त्याला अडवून धरण्याकरितां, येथें शिबंदी ठेवली. १८६१ त येथें एक दीपगृह बांधण्यांत आलें. बेटाची लो. सं. (१९०१) १२३६. या बेटावर एक दगडी कोळशाचा डेपो, वर्षास १७०००० ग्यालन पाणी तयार करणारा कंडेन्सर व दोन दीपगृहें आहेत. पहिल्या वर्गाच्या म्याजिस्ट्रेटचे अधिकार असलेला असिस्टंट रेसिडेंट येथें रहातो.

**पेरिम**—मुंबई, अहमदाबाद जिल्ह्यांतील बेट.हें खंबायतच्या आखातांत गोघ्याच्या दक्षिणेस ४॥ मैलांवर आहे. पावसाळ्यांत पेरिम बेटांत मुळींच वस्ती नसते. एरव्हीं कांहीं कोळी, कामासाठीं लोकवस्ती करून असतात.

१४ व्या शतकापर्यंत वारिया कोल्टसच्या ताब्यांत पेरिम बेट होतें नंतर गोहेल रजपूत वंशापैकीं एक त्यांचा पुढारी मोखरजी नांवाचा होता, त्यानें राजपुतान्याहून गुजराथेंत येऊन धंधुकाजवळ रणपुराहून दक्षिणेस जाऊन गोप आणि पेरिम काबीज केलीं. मोखरजी अशा रीतीनें चांचे लोकांचा पुढारी झाला. परंतु ही सत्ता फार दिवस टिकली नाहीं. १३०० सालीं महंमद तुघ्लखाकडे मोखरजीच्या चांचेपणाचीं पुष्कळशीं गाऱ्हाणीं गेलीं. महमदबिन तुघ्लखनें पेरिमवर स्वारी करून मोखरजीला ठार मारून किल्ला सर केला. १८ व्या शतकापर्यंत मोंगल सत्ता होती ती संपल्यावर सुरतेचा व्यापारी मुल्ला महंमद अलीनें तेथें एक किल्ला बांधला आणि तो आपणाला स्वतंत्र संस्थानिक म्हणवूं लागला. तेथील हवा चांगली नसल्यामुळें त्याच्या लोकांनीं त्याला सोडलें. जुने अवशेष पेरिम बेटांत पुष्कळ सांपडतात.

**पेरियाकुलम्**—मद्रास इलाखा. मदुरा जिल्हा, डिंडिगल पोटविभागांतील एक तालुका. क्षेत्रफळ ११०७ चौरस मैल लोकसंख्या ( १९२१ ) ३८३०७४. मोठीं गांवें पेरियाकुलम् ( तालुक्याचें मुख्य ठिकाण ), बोदिनायकनूर ( वस्ती २२२०९ ), व उत्तमपालैयम् ( वस्ती १०००९ ); खेड्यांची संख्या ८३. जिल्ह्याच्या इतर भागाच्या मानानें या तालुक्यांतील वस्ती विरळ आहे. यांतून वैगै व सुरुली या नद्या वहातात.

तालुक्याचें मुख्य ठिकाण पेरियाकुलम; हें मदुरेच्या पश्चिमेस सुमारें ४५ मैलांवर वराहंडी नदीच्या कांठीं आहे लो. सं. सुमारें १८०००. येथील म्युनिसिपालिटी स.१८८६ त स्थापन झाली. येथें धान्य व फळें यांचा बराच व्यापार चालतो. कंबमची खिंड व कोडैकानल यांशीं होणाऱ्या व्यापाराचें हें मुख्य ठिकाण आहे.

**पेरू**—दक्षिण अमेरिकेच्या पॅसिफिक महासागराच्या किनाऱ्यावरील एक प्रजासत्ताक राज्य. हें साधारणपणें वायव्येकडून आग्नेयीकडे द. अक्षांश ३°२१′ व १८°६′ यांत (तिरपें) पसरलेलें असून त्याचें क्षेत्रफळ ६७६६३८ चौरस मैल आहे. पेरूचे समुद्रकांठ, सीरा व मौन्टाना हे तीन विभाग आहेत.

**समुद्रकांठ.**—हा भाग ॲन्डीज पर्वताच्या पश्चिम बाजूस उत्तरेकडून दक्षिणेकडे (आपल्याकडील कोंकणपट्टीप्रमाणें) समुद्रकांठीं पसरलेला असून यांत पुष्कळ जमीन ओसाड (वाळवंट) आहे व मधून मधून कांहीं नद्या गेल्या आहेत.

या बाजूकडील ॲन्डीजच्या भागांत कार्डिलेरा सुप्त ज्वालामुखीपर्वतांची ओळ आहे. व कित्येक ठिकाणीं उष्ण झरे आहेत. या बाजूस इ. स. १५७० पासून मोठमोठे व भयंकर असे ७५च्या वर भूकंपाचे धक्के बसलेल्याची सरकारी दप्तरांत नोंद आहे.

समुद्रकिनाऱ्याजवळच इकडेतिकडे मोठाल्या खडकांचीं पुष्कळ बेटें आहेत. त्यांवर खनिज द्रव्यें सांपडतात व समुद्रांतील अनेक जातींचे पक्षी व जलचर सिंह असंख्य आढळतात.

**सीरा.**—हा विभाग स्वाभाविकपणें ॲन्डीजपर्वताच्या पश्चिम, मध्य व पूर्व रांगांचा झाला आहे. समुद्राकडील रांग किंवा पश्चिम रांग ज्वालामुखी पर्वतांची बनलेली असून त्यांपैकीं बरेच ज्वालामुखी पर्वत सुप्त आहेत. त्यांतील पुष्कळशीं शिखरें १९,००० फुटांच्या वर आहेत.

या प्रदेशाच्या निरनिराळ्या उंचीमुळें यांत पृथ्वीवरील सर्व कटिबंधांच्या प्रदेशांतील झाडें व वनस्पती पिकतात. निरनिराळ्या तऱ्हेचीं अनेक फुलझाडें, बटाटे, कोको, कॉफी वगैरे उपयुक्त झाडांचें तर यांतील दऱ्या हें आगरच आहे. तसेंच येथें कित्येक ठिकाणीं सोनें, चांदी, व पारा वगैरे खनिज द्रव्यें मोठ्या प्रमाणावर सांपडतात.

**मौंटाना.**—यांत पूर्व ॲन्डीजच्या पायथ्याशीं असलेलें उष्णकटिबंधीय अरण्य व अमेझान नदीचा पाणवठ्याचा सर्व प्रदेश अंतर्भूत झालेला आहे यांतून मेरानान, हौलागा, व यांच्या संयोगास मिळालेली युकायली वगैरे अनेक मोठ्या नद्या वाहात जातात. कोयनेलचीं सिंकोना व इतर जातींचीं झाडें, कोको, कॉफी, ऊंस, उष्ण कटिबंधांतील सर्व प्रकारचीं फळझाडें व फुलझाडें असंख्य आहेत. इमारती लांकडाचीं झाडें व धूपासारखा सुगंध उत्पन्न करणारीं झाडें अपरिमित असून रबर, सार्सापरिला, व्हानिला, ताडमाड, इपेकाक्युन्हा वगैरे मौल्यवान झाडांचीं दाट अरण्यें आहेत. यांत सोनें तर विपुल सांपडतें.

**लोकसंख्या व लोक.**—मागें १८७६ सालीं जी जातींची खानेसुमारी झाली तिप्रमाणें पहातां शें. १३.८ गोरे, १.९ नीग्रो, ५७.६ इंडियन, २४.८ मेस्टिझो व १.९ आशियाटिक (विशेषतः चिनी) लोक होते. १९०६ सालीं पेरूची लोकसंख्या ३५,४७,८२९ भरली. हेच आंकडे इ.स. १५७२ च्या ८०००००० या आंकड्यांशीं तोलून पाहतां मोठा फरक दिसतो. स्पॅनिश लोकांच्या जुलमी राज्यव्यवस्थेमुळें त्या वेळीं असंख्य लोक जुलमानें मारले गेले. येथील एकंदर लोकांत पुष्कळसे स्पॅनिश व इंडियनच्या मिश्रणाचे व पुष्कळ आफ्रिकेंतील निग्रो, चीनमधील मजूर वगैरेंच्या मिश्रणाचे आहेत. मूळचे रहिवाशी रानटी असून ते भटकणाऱ्या टोळ्या करून राहतात.

मेस्टिझो व मुलेटो हे वरीलप्रमाणें निरनिराळ्या जातींच्या मिश्र जातींचे असून सीरा प्रदेशांत सर्व उद्योगधंदे व शेतकी व इतर सरकारी-गिमसरकारी कामें करीत असतात. निग्रो लोक अलीकडे गुलामगिरींतून मोकळे झाले असून उंसाच्या लागवडीवरील मजुराचे व इतर जातीप्रमाणें दुसरेंहि सुधारलेले उद्योगधंदे करतात. जपानांतूनहि कांहीं लोक येथें वस्ती करून राहिले आहेत.

**शिक्षण.**—या प्रजासत्ताक राज्यांत चार विश्वविद्यालयें आहेत. कायदा, तत्त्वज्ञान, गणित, धर्मशास्त्र, वैद्यक, अर्थशास्त्र व अलीकडील सर्व भौतिक शास्त्रांचें शिक्षण येथें दिलें जातें. प्राथमिक शिक्षण मोफत असून नांवास कायर्ते सक्तीचें आहे. शिवाय शेतकी, उद्योगधंदे, व्यापार व शिक्षणकला यांच्याकरितांहि सरकारी, तशाच खाजगी शाळा आहेत. शास्त्राच्या प्रत्येक शाखेसंबंधीं मोठमोठे ग्रंथ व पुढें पुढें (१९ व्या शतकांत) काव्य, नाटकें, कादंबऱ्यादिकांची रचना चांगली होऊं लागली. येथील मुख्य शहर लिमा तेथील राष्ट्रीय ग्रंथसंग्रहालय फार जुनें असून भूगोलविषयक, ऐतिहासिक व नाविक ज्ञानविषयक व इतर उपयुक्त संस्था सरकारच्या मदतीनें भरभराटीस येत आहेत. येथें इ. स. १८६० च्या शासनपद्धतीस अनुसरून राज्यांत रोमनकॅथोलिक धर्माचा सर्वत्र प्रसार आहे.

**दळणवळण.**—हा देश स्वभावतः पहाडी व डोंगराळ असल्यामुळें देशांतल्या देशांत व बाहेरील देशाशीं सोपें दळणवळण ठेवण्याजोगा नाहीं. समुद्रकांठच्या पट्टींत ओसाड वाळवंटी मैदानें असल्यामुळें लोकवस्तीस तो भाग अयोग्य आहे; म्हणून तिकडे अगदीं थोडीं व्यापारी बंदरें आहेत. कांहीं भागांतून रेल्वे नेली आहे; व तारहि मोठमोठया शहरांसच जोडली आहे. इ. स. १९०६ पासून पोस्टाची योजना परदेशांशीं परस्परसाहाय्यक आहे.

या देशांतील नद्या नौकानयनास फार उपयुक्त असल्यामुळें देशांतील दळणवळणास बराच उपयोग होतो. नद्यांतून मोठीं व लहान जहाजें बरींच वरपर्यंत जाऊं शकतात. टिटिकाका सरोवर १२,३७० मैल उंचीवर असूनहि १६५ मैल लांब व ७० ते ८० मैल रुंद असल्यामुळें त्यांतून मोटमोठीं व्यापारी जहाजें जाऊं शकतात.

व्या पा र.—देशांतील दळणवळणाची अडचण, राजकीय बाबतींतील अव्यवस्था व स्पॅनिश कारभारापासून परंपरागत आलेल्या अशा वाईट जकातपद्धतीमुळें येथील व्यापाराची प्रगति बरोबर होत नाहीं. किनाऱ्यानें असलेल्या बंदरांपैकीं कॅलो हें फार सोईचें असून परदेशाशीं होणारा व्यापार याच बंदरांतून होतो. मोठ्या नद्यांच्या कांठावरहि बंदरें आहेत त्यांतूनहि व्यापार चालत असतो. परदेशाच्या जहाजास परवानगीशिवाय व्यापार करतां येत नाहीं. येथून चीलेव्हिया, उत्तर अमेरिकेंतील संस्थानें व जपान देशाशीं व्यापार चालतो. आयातीपेक्षां निर्गत मालच जास्त असतो. निर्गत मालांत साखर मोठ्या प्रमाणावर असून तिच्या खालोखाल, खनिज द्रव्यें व वन्यपदार्थ, हाडें, कापूस, कोकेन वगैरे माल आहे.

नदीथडींतील जमिनीस कालव्यानें पाणी देण्याची पद्धत स्वभावतःच उत्तम साधली आहे म्हणून शेतकीस जास्त महत्त्व आलें आहे. स्पॅनिश लोक इकडे येण्यापूर्वी येथें शेतकीच चालू होती. उंसापासून केलेल्या साखरेचें व कांकवीचें उत्पन्न मोठ्या प्रमाणावर आहे. उंसाची लागवड इंग्रज लोकांच्या हातीं असून समुद्रकिनाऱ्याकडील नद्यांच्या थडींत मोठमोठे उंसाचे मळे आहेत. याच्या खालोखाल येथें कापूस उत्पन्न होतो, व साखरेप्रमाणेंच दरसाल हजारों खंड्या कापूस विलायत वगैरे देशांत जातो. शिवाय तांदूळ, मका, बार्ली वगैरे खाण्याची धान्यें हा माल, तसेंच तंबाखू, बटाटे, कोको, सिंकोना, कॉफी वगैरेहि पदार्थ चांगले पिकतात. येथें सर्व जातींची फळें येतात. विशेषतः द्राक्षें व ऑलिव्ह यांची फार लागवड होते. द्राक्षांपासून दारू व ऑलिव्हचें तेल काढतात. हेहि पदार्थ परदेशांत मोठ्या प्रमाणावर जातात. येथील जंगलात उत्तम इमारती लांकडाचीं असंख्य झाडें आहेत. त्यांत महागनी हें एक फार नांवाजलेलें लांकूड आहे, यापासून तसेंच रबरापासून मोठें उत्पन्न होतें. येथील पहाडावर अनेक तऱ्हेचें गवत व वनस्पतींचीं जंगलें आहेत. त्यांत येथील मूळचे रहिवाशी व वसाहतवाले गुराढोरांचे व मेंढ्यांचे कळप चारीत असतात. तसेंच लामा, अल्पाका, व्हायक्यूना, जनावरेंहि मोठ्या प्रमाणावर पाळण्यांत येतात. लामा हें जनावर पहाडांतून मालाची ने-आण करण्यास फार उपयोगी आहे. अल्पाका व व्हायक्यूना जनावरांची लोंकर काढली जाते. या लोंकरीसहि परदेशांतून दांडगी मागणी असते. येथील गवताच्या 'पनामी' टोप्या करून परदेशीं पाठवितात.

ग्वानो या पदार्थाचे व नायट्रेटचे थर समुद्रकिनाऱ्याजवळील खडकांच्या बेटावर मोठ्या प्रमाणावर असून त्यापासून गेल्या शतकांत सरकारला मोठें उत्पन्न झालें. अद्याप 'टारापका' येथें हें द्रव्य गोळा करण्याचा उद्योग चालू आहे. या द्रव्याचा खताच्या कामीं चांगला उपयोग होतो.

खा णी.—स्पॅनिश लोक येथें येण्यापूर्वीपासून या देशांत सोनें, चांदी, लोखंड इत्यादि धातू व गंधक, पारा, अभ्रक, पेट्रोलियम वगैरे द्रव्यें खाणींतून काढिलीं जातात. मात्र अलीकडे हे धंदे परदेशी भांडवलावर एतद्देशीय मजूर व कारागिरांच्या साहाय्यानें चालविले जात असून परदेशांत याचें वरचेवर उत्पन्न जातें. समुद्रकिनाऱ्याजवळ असलेल्या विहिरींतून पेट्रोलियम काढतात.

का रा गि रां चे का र खा ने व धं दे.—येथें उत्पन्न होणाऱ्या कच्च्या मालाचा पक्का उपयुक्त माल करण्याचे कारखाने येथील मोठ्या शहरीं आहेत. उंसापासून साखर व रम नामक दारू तसेंच कापसाचीं व लोंकरीचीं वस्त्रें, अशुद्ध धातू शुद्ध करून त्याच्या लगडी किंवा दागिने वगैरे माल बनविणें, अशुद्ध पेट्रोलियमपासून केरोसीन बनविणें, तंबाखूच्या विड्या, सिगारेट्स्, कांकवी व द्राक्षापासून अनेक प्रकारच्या दारू, आणि कोकेन, कोको, चोकोलेट वगैरे असंख्य पदार्थ येथील कारखान्यांतून बनविले जातात.

रा ज्य व्य व स्था.—१८६० सालच्या शासनपद्धतीनुसार हें राज्य पूर्णपणें प्रजासत्ताक आहे. प्रतिनिधी स्वतंत्रपणें प्रजेकडून निवडले जातात. २१ वर्षांच्या वरील किंवा लग्न झालेल्या अशा प्रत्येक इसमास मत देण्याचा अधिकार आहे पण येथील बहुजनसमाजाचा अज्ञानपणा व राजकीय बाबतींतील औदासिन्य इत्यादि कारणामुळें अनियंत्रितसत्ताक ( डिक्टेटोरियल ) पद्धतीचा उपयोग केला जातो.

कार्यकारी मंडळः—राज्यांत अंमलबजावणीची प्रमुख सत्ता लोकांनीं निवडलेल्या प्रेसिडेन्टच्या हातीं असून त्यास मदतगार दोन व्हाईस प्रेसिडेन्ट व एक निवडलेल्या ६ मंत्र्यांचें प्रधान मंडळ असतें; राज्यांतील निरनिराळ्या खात्यांचे कामगार प्रधानमंडळास जबाबदार असतात. सेनेट व चेंबर ऑफ डेप्युटीज या दोन सभांकडून कायदे करण्याचें काम होतें.

ना णें.—येथें इंग्रजी सॉव्हरिन( पौंड )च्या किंमतीचें वजनाचें आणि आकाराचें 'लिब्रा' म्हणून सोन्याचें एक नाणें आहे व त्याहून हलक्या प्रतीचें म्हणजे ½ पौंड ¼ पौंड, व सोल ( म्हणजे १०० सेंट ) हीं चांदीचीं नाणीं आहेत; व ½ सेंट हें तांब्याचें नाणें आहे. फ्रेंच मेट्रिक पद्धतीप्रमाणें वजनें व मापें सरकारी व्यवहारांत असून खाजगी व्यवहारांत लोक त्यांचीं जुनीं वजनें व मापें उपयोगांत आणितात.

इ ति हा स.—येथील टिटिकाका सरोवराच्या दक्षिण किनाऱ्याजवळील कांहीं गांवांत अद्याप दिसत असलेल्या जुन्या

इमारतींच्या अवशेषांवरून व इतर ठिकाणीं सांपडलेल्या जुन्या वस्तूंवरून समजतें कीं, या देशांत स्पॅनिश लोक येण्यापूर्वी बरेच सुधारलेले इन्का राजे राज्य करीत होते. ( विभाग ४ था, प्र. २३ पहा ). इ. स १५२६ त म्हणजे पहिला स्पॅनिश 'फ्रान्सिस्को पिझारो' हा येण्याच्या पूर्वीच्या वर्षी येथील शेवटचा व मोठा इन्का राजा 'हॉयना कपाक' मरण पावला व गादीसंबंधानें त्याच्या मुलांत तंटे लागले. व राज्यांत अव्यवस्था माजली. तिचा पिझारो व त्याच्या अनुयायांनीं त्या गोष्टीचा फायदा घेऊन प्रसंगविशेषीं तद्देशीय तंटयांत हात घातला व एका पक्षाचा पूर्ण निःपात केला, आणि बाह्यपणें तेथील जुन्या राजघराण्यांतील पुरुषाला गादीवर बसविलें. अशा रीतीनें जसजसा काल जात चालला तसतसा पिझारो व त्याच्या अनुयायांनीं तेथील लोकांवर पगडा बसवून पुष्कळशी जमीन ताब्यांत घेतली व आपला अंमल सर्व देशभर बसविला. पिझारोला वेळोवेळीं मातृदेशांतून मदत मिळत गेली व तो स्पॅनिश राज्य व वसाहत वाढवूं लागला.

मध्यन्तरीं स्पॅनिश सेनापतींचीं आपसांत स्वकीय प्रांताबद्दल भांडणें सुरू झालीं व प्रत्यक्ष लढाया होऊन कित्येक सरदार ठार झाले. तसेंच याच सुमारास तद्देशीय लोकांनींहि उचल घेऊन बंडें उभारिलीं व देशांत सर्वत्र अव्यवस्था व गोंधळ माजला. त्यांत कित्येक स्पॅनिश लोकांनीं तद्देशीयांचाहि कड घेऊन कांहीं काळ कांहीं भागांत राज्य चालविलें. स्पेनमधून निकडीच्या प्रसंगीं हुशार व बलवान सरदार येथें नेमले जाऊन राजसत्ता कायम राखली गेली. पण स. १५६९ पर्यंत देशांत मुळींच शांतता नव्हती. त्यावर्षी डॉन-फ्रान्सिस्को-डी-टोलीडो हा व्हाइसराय म्हणून आला व यानें अगदीं कडकपणें तेथील जुन्या घराण्याचा नायनाट करून व देशांत स्वतः चोहोंकडे फिरून अनुभवी व विद्वान न्यायाधिशाच्या सल्लयानें राज्यव्यवस्थेंत सुधारणा केल्या; व त्या पद्धतीनें २ शतकेंपर्यंत येथील लोकांवर स्पॅनिश राज्य चाललें. त्यानें बरेच तद्देशीय लोक सरकारी हुद्द्यांवर नेमून त्यांची मैत्री संपादिली; तसेंच बऱ्याच प्रमाणावर जुनी पद्धत चालू ठेवून व दुसऱ्याहि लोकोपयोगी सुधारणा करून प्रजेची दृढ राजनिष्ठा संपादन केली व अशा रीतीनें राज्यास बळकटी आणिली.

अशा रीतीनें एका दिशेनें प्रजेंत संतोष वाढत गेला; पण त्याच वेळीं दुसऱ्या दिशेनें बऱ्याच स्पॅनिश लोकांच्या खाणींतील एतद्देशीय मजुरांवर व दूरच्या भागांत जुलूम, अत्याचार वाढून प्रजेच्या असंतोषाचीं बीजें रुजलीं गेलीं, व त्यास धार्मिक बाबतींतील वसाहतवाल्यांवरील जबरदस्ती व जुलुमाची भर मिळून सामान्यपणें देशभर असंतोष वाढत गेला. या बाबतींतील कित्येक एतद्देशीय कामगारांच्या तक्रारीस दाद सुद्धां मिळाली नाहीं. अशी स्थिति स्पॅनिश सत्तेंतील देशांत झाली आणि लिमा ( पेरूची राजधानी ) येथें सैन्याचें मुख्य ठाणें असल्यामुळें बरेचसें बेटें सैन्य येथें होतें म्हणून चिली वगैरे दूरदूरच्या देशांत राज्यक्रांतीचा स्फोट होऊन स्वातंत्र्याचें निशाण प्रथम फडकाविलें गेलें, व नंतर इ. स. १८२१ त अर्जेन्टाइन सेनापतीनें हाताखालीं अर्जेन्टाइन व चिली लोकांचें मोठें सैन्य व बरेचसे इंग्रज कामगार आरमारांत घेऊन लिमा येथें स्वातंत्र्याचें निशाण रोवून दिलें. तेथें त्यास बरेच लोक मिळाले व मग स्पॅनिश सरकारशीं तोंड देण्याची तयारी उघडपणें सुरू झाली. मध्यंतरीं स. १८२२ त लिमा येथें पेरूची पहिली राष्ट्रीय सभा भरली व लोकांनीं स्वराज्यकारभार पहाण्यासाठीं प्रेसिडेन्ट नेमून प्रजासत्तात्मक राज्याचा पाया रचिला. पुढें लोकपक्षानें एक दोन लढायांत राजपक्षावर पूर्णपणें जय मिळवून राजपक्षाचा नायनाट केला. व त्याबरोबरच स्पॅनिश सत्ता लयास गेली ( १८२४ ).

स्वातंत्र्याची स्थापना झाल्यावर पहिलीं २० वर्षे पेरुला बरींच कठिण गेलीं, व स्वातंत्र्याचा उपयोग कसा करून घ्यावा याची अडचण पडली प्रथमतः लढाईत विजयी झालेल्या शूर सेनापतींनाच लोकांनीं कारभार पहाण्यास निवडले. पण त्यांच्या लष्करी बाण्याचा त्यांच्या कारभारांत क्षणोक्षणीं विपर्यास होऊन लोकांस त्यांचा वीट आला. याच सुमारास पेरूंतील विद्वानामणी पुढें येऊन राज्यकारभारांत बराच हात घालूं लागले. व स. १८४५ पासून पेरूस शांतीचे व भरभराटीचे दिवस दिसूं लागले. पुढें स. १८६० मध्यें सर्व राष्ट्रांतर्फे राज्यकारभाराची एक निश्चित योजना ठरली व तिला अनुसरूनच आजपर्यंत राज्यकारभार चालत आला आहे.

मध्यंतरीं प्रेसिडेन्ट 'बाल्टा' याच्या कारकीर्दींत ग्वानोच्या उत्पन्नापासून सरकारी खजिन्यांत बेसुमार भर पडत गेली, व तिचा उपयोग देशांत दूरच्या व डोंगरी भागांत रेल्वे वाढविण्यांत व लिमा येथें टोलेजंग आंतरराष्ट्रीय प्रदर्शन वगैरे अति खर्चाच्या कामांत होऊन बेसुमार खर्च झाला.पैसा व ग्वानोचें उत्पन्न बंद होतांच देशास आर्थिक विपत्ति आली. कांहीं सरहद्दीवरील प्रदेशासंबंधीं चिलीशीं लढाई होऊन राष्ट्रीय विपत्तींत भर पडून देश कर्जबाजारी झाला. पण कांहीं धूर्त व्यापाऱ्यांच्या व्यापारी धोरणानें योग्य योजना अमलांत येऊन सर्व कर्जाची फेड झाली व देशास पुन्हां सुखशांतीचे दिवस लाभले.

जमिनीवरील सरहद्द व तीच्या जवळील प्रदेश याबद्दल शेजारच्या राष्ट्रांशीं पेरूस अनेक वेळ तंटे करावे लागले, पण विशेष निकरास गोष्टी न जातां एकमेकांच्या तडजोडीनें व तटस्थ राष्ट्रांच्या मध्यस्थीनें योग्य तो निकाल लागला; व सरहद्दीवरील कांहीं नैसर्गिक भूभागास धरून एक सरहद्द-रेषा निश्चित करण्यांत आली.

१९१० नंतर:—अलीकडे पेरूची लोकसंख्या सुमारें ३५ ते ४० लाखांच्या दरम्यान असावी. यांत रानटी स्वतंत्र अशा

जातींच्या लोकसंख्येचा अंतर्भाव झालेला नाहीं. स. १८९० पासूनच पेरूव्हियन कार्पोरेशनच्या ताब्यांत पेरूमधील रेल्वे होत्या. १९२० सालीं या कार्पोरेशनच्या मार्फत सेंट्रल रेल्वे, पिस्को-इसा रेल्वे, सदर्न रेल्वे, पैटा-पैयुरा रेल्वे, नॉर्थ वेस्टर्न रेल्वे, चिम्बोटे रेल्वे, पॅकास्मायो रेल्वे, ट्रूजिल्लो रेल्वे, लिमा-लूरिन रेल्वे, इत्यादि रेल्वे होत्या. नौकाव्यापार ब्रिटिश व अमेरिकन कंपनीमार्फत चालतो. पेरूंतील मुख्यतः साखर, कापूस, व तांबें हे जिन्नस मोठ्या प्रमाणावर निर्गत होतात. याशिवाय पेट्रोलियम तेल, एरंडेल तेल,लोंकर,कातडीं, मांस इत्यादि वस्तू पेरूमध्यें पुष्कळ प्रमाणांत उत्पन्न होतात.१९१८ सालीं पेरूमधून १९९७२५९५ पौंड किंमतीच्या मालाची निर्गत व९७०५११३पौंड किंमतीच्या मालाची आयात झाली. १९२० सालीं पेरूसरकारच्या शासनघटनेमध्यें फेरफार करण्यांत आला. या नवीन घटनेप्रमाणें पेरूचे उत्तर, मध्य व दक्षिण असे तीन भाग पाडण्यांत येऊन त्या प्रत्येकाची स्वतंत्र कॉंग्रेस असावी असें ठरविण्यांत आलें.

१९०८-१९१२ च्या सुमारास ऑगस्टो लेगुवा हा पेरूचा अध्यक्ष होता. याच्या कारकीर्दीत येलचा प्रोफेसर बिंधाम प्रभृति संशोधकांनीं पेरूचें भूस्तरशास्त्रदृष्ट्या संशोधन करून महत्त्वाचे शोध लावले. १९१४ सालीं महायुद्ध सुरू झालें त्यावेळीं पेरूची आर्थिक स्थिति फारच खालावली होती, पण लढाई सुरू झाल्यानंतर पेरूमधील कापूस, साखर, तांबें व इतर जिनसांना भाव येऊं लागल्यामुळें ही निकृष्ट स्थिति हळू हळू कमी होऊं लागली. १९१५ सालीं जोसे पेर्डो बरेडा हा पेरूचा अध्यक्ष झाला. यावेळीं पेरूनें कोणाच्या बतीनें महायुद्धांत पडावें असा प्रश्न पुढें उभा राहिला. तथापि अमेरिका ही दोस्तांच्या बतीनें महायुद्धांत पडली, त्यावेळीं पेरूला जर्मनीशीं असलेला आपला संबंध सोडावा लागला. १९१९ सालीं लेगुवा हा पुन्हां पेरूचा अध्यक्ष झाला. त्यानें आपल्या कारकीर्दीत पेरूची पुष्कळ सुधारणा केली. पेरूमधील निरनिराळ्या शहरांची आरोग्यदृष्ट्या तपासणी करण्यांत येऊन आरोग्यसंवर्धनार्थ निरनिराळे उपाय अमलांत आणले गेले. इ. स. १९२० सालीं पेरूच्या आरमारी पद्धतींत इष्ट फेरबदल करण्यासाठीं, अमेरिकेकडून एक स्वतंत्र आरमारी कमिशन पेरू सरकारच्या आमंत्रणावरून आलें. त्याचप्रमाणें शिक्षणपद्धतींत सुधारणा घडवून आणण्यासाठीं अमेरिकन शिक्षणविषयक तज्ज्ञ मुद्दाम आणवण्यांत आले. पेरूमधील 'नॅशनल म्यूझियम ऑफ आर्केऑलाजी' ही संस्थाहि एका अमेरिकन तज्ज्ञाच्या देखरेखीखालीं देण्यांत आली. [ ग्वायनेस-पेरु, लंडन, (१९०९); मार्टिन-पेरु ऑफ दि ट्वेंटिएथ सेंचरी. (१९११); व्हिव्हियन-पेरु, १९१४. ]

**पेरू**—पेरूचें झाड मूळचें अमेरिकेंतील उष्ण कटिबंधांतील होय. हल्लीं याची लागवड सर्व उष्ण कटिबंधांत होते. हिंदुस्थानांत या झाडाची लागवड सार्वत्रिक आहे. उत्तर हिंदुस्थानांतील अलाहाबाद, बनारस, मिर्झापूर वगैरे ठिकाणचे पेरू फारच नामांकित आहेत. मुंबई इलाख्यांत सिंध-हैद्राबाद, अहमदाबाद, धोलका, वडोदें, खानदेश, नाशीक, पुणें, सातारा, सोलापूर, धारवाड वगैरे ठिकाणीं पेरूची लागवड बरीच होते. कोंकणांत पेरूची लागवड फारशी कोणी करीत नाहीं. जीं कांहीं झाडें दृष्टीस पडतात त्यांना पेरू फार थोडे व लहान येतात; याचें कारण त्यांची कोणी काळजी घेत नाहीं. झाडें सावलींत असतील किंवा त्यांस नेहमींच पाणी मिळत असेल तर त्यांस फळ येत नाहीं. यावरून पेरूला हवामान उष्ण व कोरडें मानवतें असें दिसतें. या झाडाला बहुतेक कोणतीहि जमीन चालते. या झाडाला बारमाही पाणी लागत नाहीं. बहार धरल्यापासून तों तो निघेपर्यंत पाण्याची सोय असली म्हणजे झालें; बाकीच्या वेळीं झाडांना पाण्याची जरूर नसते.

पेरूचे आकार निरनिराळे असले तरी सामान्यतः त्याच्या दोनच जाती समजल्या जातात, त्या पांढरी व तांबडी. या जाती सहसा झाडांवरून ओळखतां येत नाहींत; ओळखण्याची खूण म्हणजे त्यांचें फळ होय. तांबडा (गुलाबी) पेरू नाजुक असून तो फार दिवस टिकत नाहीं; व त्यांत बीहि फार असतें; ही जात फारशी कोणी लावीत नाहीं. बागेमध्यें एखादेंच झाड कोणी चुकून अगर हौसेनें लावतात. पांढरे पेरू खाण्यास चांगले असतात.

याशिवाय पेरूच्या जाती गांवावरूनहि पडलेल्या आहेत. उदाहरणार्थ, मिर्झापुरी, अलाहाबादी, नाशीक, पुणें, हैद्राबाद (सिंध) वगैरे. यांपैकीं सिंध-हैद्राबाद येथील पेरू चांगले असतात; त्यांतील बरेच फसी मऊ व बारीक असल्यामुळें ह्या खाण्यास त्रासदायक वाटत नाहीं. या पेरूला एक प्रकारचा स्वाद, व माधुर्य असल्यामुळें ही जात लावण्याला सर्वतोपरी योग्य आहे. फळहि इतर ठिकाणच्या फळांपेक्षां मुळींच लहान नसतें. तसेंच या फळाचे गुण पिढ्यानुपिढ्या सारखे असतात. पेरूची लागवड बहुधां बीं लावून करतात. पण ओंब्यासारखीं कलमेंहि कोणी बांधतात. याशिवाय जडवे बांधूनहि झाडें तयार करतां येतात.

पेरूला बहार दोन येतात. एक मृगबहार व दुसरा आंबेबहार; याशिवाय कधीं कधीं हस्तबहारहि येतो. पेरूची छाटणी करण्याची फारशी कोठें वहिवाट नाहीं. परंतु छाटणी केल्यास फळ चांगलें, मोठें व जास्त येतें, असा अनुभव आहे,

पेरू पिकल्यावर त्यांचा जेली म्हणून मोरंब्यासारखा पदार्थ करतात. पेरू चांगले पिकले म्हणजे त्यांच्या बारीक फोडी करून त्यांत थोडें पाणी घालून अगर नुसतें पाण्याचें झांकण ठेवून त्या मंदाग्नीवर थोडा वेळ शिजवितात. म्हणजे त्या फोडी अगदीं मऊ होतात. नंतर त्या एका फडक्यावर दह्याच्या चक्क्यासारख्या गाळून घेऊन त्यांतील बिया काढून

टाकतात. खालीं बलक पडेल त्यांत त्याच्या दुप्पट साखर घालतात. अशा रीतीनें केलेली जेली पातळ होते, पण तींत लिंबाचा रस घातला म्हणजे ती घट्ट होते. कोणी कोणी रंग येण्यासाठीं तींत केशरहि घालतात. जेली चांगल्या रीतीनें ठेवल्यास ती पुष्कळ दिवस टिकते.

पेरूचे मुख्य रोग दोन आहेत; त्यांपैकीं एक कीटक असून दुसरा शिलींध्र अगर अलिंब वर्गांतील आहे. पहिल्यास मावा असें म्हणतात. माव्यावर उपाय म्हणजे फिश आईल रोझिन सोपचें मिश्रण दोनदां झाडांवर शिंपडावें ( प्रमाणः ८ ग्यालन पाणी व १ पौंड सोप ). मिश्रण मारण्यापूर्वी फांद्या सर्व गोणपाटाच्या फडक्यानें पुसून काढाव्या; आणि मग तें मिश्रण झाडाच्या सर्व भागावर मारावें. मावा हिरवा असतांना मारल्यास रोग लवकर हटतो ( सोप मिळण्याचें ठिकाण गव्हर्नमेंट फॅक्टरी, कालिकत ).

पेरें—हाताच्या बोटाच्या अग्रभागीं दाह, सूज, व ठुस ठुसणें सुरू होऊन बोट पिकतें त्यास हें नांव आहे. यांतील सूज त्वचेच्या अनेक पापुद्र्याखालीं जितकी कमी अगर आधिक प्रवेश करते त्यामानानें या रोगाचे कांहीं भेद आहेत. त्यांपैकीं अगदीं साध्या प्रकारचें पेरें झालें असतां बोटाच्या अग्राच्या पातळ त्वचेच्या अगदीं वरील पापुद्र्याखालीं फक्त लस अगर रक्तसंचय होऊन तें बनतें व तें बहुधा रोडक्या व अशक्त अशा मुलांनां होतें व बोटावर पांढऱ्या रंगाचा मोठा फोड असावा अशा प्रकारचें त्याचें स्वरूप असतें. पण जेव्हां सूज पापुद्र्यांत अधिक प्रवेश करून बोटाच्या अग्रभागांत खोलपर्यंत शिरते तेव्हां असह्य ठणका व दाह उत्पन्न होतो. त्याचा क्रम येणेंप्रमाणें.—प्रथमतः कांहीं खरचटल्याचें किंवा बोचल्याचें निमित्त होऊन त्या छिद्रावाटे दुष्ट जंतू प्रवेश करून अति तीव्र दाह उत्पन्न करतात व ठुसठुस व बोटांत भयंकर वेदना होऊं लागतात. तेथून हे जंतु वरपर्यंत पसरले नाहींत तर तेथल्या तेथेंच धांवऱ्याप्रमाणें ती जागा अति लाल व सुजेनें युक्त अशी होते व नंतर फोडण्यासारखें त्याचें गळूं तयार होतें. यापेक्षां भयंकर प्रकारचें पेरें झालें तर शेवटचें म्हणजे अग्राचें अस्थि या व्रणांत प्रवेश करून अति दाह उत्पन्न होतो, तो इतका कीं तें हाड कुजून मृत होतें. एखाद्या वेळीं ते जंतू बोटाच्या अग्रांतुन स्नायुरज्ज्वावरणाच्या मार्गें तळहातांत प्रवेश करतात व तेथें त्यामुळें खोल असलेलें गळूं बनतें. या प्रकारांत जर वरील स्नायुरज्जू दाहक्रियेनें कुजले तर गळूं बरें झाल्यावरहि तीं तीं बोटें कायमचीं आखडतात. वरील व विशेषतः शेवटच्या प्रकारच्या पेऱ्यामध्यें तें बोटच, अधिक अनर्थ टाळण्यासाठीं कापून टाकण्यापर्यंत पाळी येते. हा रोग, ज्याची प्रकृति ढांसळून फार अशक्त झालेली असते त्यांनां होतो. कारण त्यांच्या शरीरांत वरील दुष्ट जंतू नष्ट करण्याची प्रतिबंधक स्वाभाविक शक्ति कमी झालेली असते. म्हणून हा रोग जरी बरा झाला तरी लोह, क्विनाईन इत्यादि शक्तिवर्धक औषधांनीं रोग्याचें रक्त सुधारावें. पहिल्या सौम्य प्रकारांत बोट न चिरतां साध्या उपायांनीं दाह शमतो. पण इतर तीव्र प्रकारांत गळूं अगदीं पिकेपर्यंत वाट न पहातां बोटास लवकर चांगली मोठी चीर पाडून त्यांतून रक्त, लस वाहण्यास मार्ग करून द्यावा. असें केल्यानें पुढें गळूं होण्याचें टळतें व त्या भागांतील ठणका व सूज नाहींशी होऊन हात हलका वाटतो. कदाचित पेरें लवकर कापलें असतांना पू मुळीं येतच नाहीं अगर दोन तीन थेंबच येतो, किंवा पुष्कळ येतो. पण या थोड्या अगर फार पुवाकडे विशेष लक्ष न देतां जखमेमध्यें तीव्र कॅर्बोलिक ॲसिड किंवा रसकापूर (१–१०००) अगर लायकर, झिंकाय क्लोरिडाय यासारख्या अव्वल दर्जाच्या जंतुघ्न औषधांत कापसाचा बोळा बुडवून त्यानें ती जखम खोलपर्यंत मारवून घ्यावी. असें केल्यानें दुष्ट जंतू मृत होतात. नंतर हात बांधून ठेवावा. व बोटाभोंवतीं जंतुघ्न कढत जंतुधावनांत बुडविलेल्या बोळ्यानें शेकावें. मग हात छातीपेक्षां उंच राहील असा लोड अगर तक्क्यावर ठेवावा. अगर गळ्यांत झोळी अडकवून त्यांत हात घालून ठेवावा.

पेशवे—हा शब्द फारशी असून त्याचा अर्थ मुख्य प्रधान असा आहे. मुसुलमानी रियासतींत पेशवा शब्द फारसा रूढ नव्हता; त्या अर्थी वजीर हा शब्द वापरीत. या शब्दास विशेष महत्त्व भटघराणें हें पेशवे झाल्यावेळीं आलें. मुसुलमान व इंग्रज इतिहासकार यांनीं हाच शब्द जास्त उचलून घरला. बेदरच्या ब्राह्मणी पातशाहींत पेशवा हें पद मधून मधून उपयोगिलें जाई. शिवाजीला शहाजीनें पुण्यास स्वतंत्र ठेविल्यानंतर त्याची जी कारभाराची व्यवस्था करून दिली, तींत शामराजपंत रांजेकर यास पेशवेपद दिलें होतें. त्यानें साधारण स.१६५८ पर्यंत काम केलें.पुढें महादेव व आनंदराव या नांवाचे दोन पेशवे कांहीं दिवस होते. त्यांच्या मागून शिद्दीचा पराभव केल्यामुळें मोरो त्रिंबक पिंगळे यांस पेशवाई मिळाली. राज्याभिषेकसमयीं त्यास मुख्य प्रधान हें नांव देण्यांत आलें. संभाजीनें कांहीं दिवस त्यास कैदेंत ठेविलें परंतु पुढें सोडलें. त्याच्या मागून त्याचा पुत्र भैरव हा पेशवा झाला. हा शाहूच्या वेळपर्यंत होता. त्यास शाहूनें आंग्र्यावर पाठविलें असतां उलट तोच कैदेंत पडला, म्हणून बाळाजी विश्वनाथ भट यास तिकडे पाठविलें. त्यानें पिंगळ्यास सोडवून आणलें व आंग्र्यास मिळवून घेतलें. त्यामुळें व स्वतःला गादीवर बसविण्यांत खटपट केल्यामुळें शाहूनें बाळाजीस पेशवाई दिली. तेव्हांपासून मराठी राज्य नाहींसें होईपर्यंत पेशवाई याच घराण्यांत राहिली. बाळाजी विश्वनाथानंतर अनुक्रमें बाजीराव बल्लाळ, बाळाजी बाजीराव, माधवराव बल्लाळ, नारायणराव बल्लाळ, रघुनाथ बाजीराव, माधवराव ( सवाई ) नारायण, चिमणाजी माधवराव, बाजीराव रघुनाथ याप्रमाणें पुरुष पेशव्यांच्या गादीवर आले; म्हणजे या घराण्याकडे(१६ नोव्हेंबर १७१३

ते ३ जून १८१८)१०४ वर्षे पेशवाईचा अधिकार होता. पेशव्यांकडे सर्व फौजेचा व मुलुखाचा बंदोबस्त करून, दुसरे दरकदार व प्रधान यांनां घेऊन राज्यकारभार चालविण्याचें मुख्य काम होतें. राजपत्रावर पाहिला शिक्का पेशव्यांचा होई. छत्रपति, पेशव्यानां पत्र लिहितांना शेवटीं 'बहुत काय लिहिणें सुज्ञ असा ' हें वाक्य स्वहस्तें लिहीत. पेशवेपदाचीं वस्त्रें व अलंकार पुढीलप्रमाणें असत. मंदील,जामेवार, पटका, चादर वारली, किनखाप, एकूण पांच वस्त्रें; शिक्के-कट्यार, तलवार, ढाल, जरीपटका, चौघडा, तीन° हत्ती, एक घोडा, शिरपेच, मोत्याची कंठी व तुरा आणि चौघडा, झगा, व सोन्याच्या दांडीची चवरी. कोल्हापुरासहि निराळे पेशवे होते; परंतु त्यांची कर्तबगारी कांहींच झाली नाहीं. वरील पेशव्यांची माहिती त्यांच्या नांवाखालीं दिली आहे.

**पेशावर**, जिल्हा.—वायव्य सरहद्दीवरील प्रांतांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ २६११ चौरस मैल. याच्या पूर्वेस सिंधू नदी व तिच्या पलीकडे पंजाबांतील अटक जिल्हा आणि हजारा; आणि बाकीच्या सर्व बाजूंला डोंगर आहेत. १९११ सालीं पेशावर जिल्ह्याची लोकसंख्या ८६५००९ होती; पैकीं ८०७७८८ मुसुलमान, ३५३६७ हिंदु, १६१२६ शीख व५६०४ ख्रिस्ती होते. एकंदर लोकसंख्येपैकीं १२२३५ साक्षर असून७१७लोकांनां इंग्रजी येत होतें.मुख्य भाषा पंजाबी व पुश्तु या आहेत. कांहीं लोक हिंदीहि बोलतात.अवन, भाति-आरा, वघवन, गुजर, जोलाहा, खत्री, पठाण, तर्खान इत्यादि जाती आहेत. मुख्य धंदा शेतकीचा आहे ( इतिहासाकरितां पेशावर शहर पहा.) यांत पांच तहशिली असून त्यांची लोकसंख्या ( १९२१ )१०३४०१५.

तहशील.—हिचें क्षेत्रफळ ४५० चौरस मैल असून लो. सं. (१९११) २६१६४१.या तहशिलीच्या बरोबर मधून काबूल नदीचा कालवा गेलेला आहे. तहशिलींतील एकंदर खेड्यांची संख्या २५८ असून काळींचें व इतर बाबी मिळून उत्पन्न ५ लक्षांवर आहे.

शहर.—पेशावर जिल्हा व तहशिलीचें मुख्य ठिकाण.पेशावर छावणी बारा नाल्याच्या डाव्या तीरावर वसली आहे. ती उंचवट्यावर असल्याकारणानें शहर व आसपासचा सपाट प्रदेश उत्तम प्रकारें दिसतो. कलकत्त्यापासून पेशावर रेल्वे मार्गानें १५५२ मैल आणि मुंबईपासून १५७९ मैल लांब आहे. काबूल, बैल-गाडी रस्त्यानें १६० मैल आहे. पेशावर शहराची लोकसंख्या ( सन १९११ ) ११४४५२. फाहिआन या नांवाचा चिनी प्रवासी हिंदुस्थानांत आला त्या वेळीं ही पेशावर गांधार;देशाची राजधानी होती.पेशावर शहराला ऐतिहासिक महत्त्व प्रत्येक वेळेला होतें त्याप्रमाणें हल्लींहि आहे. बुद्धाचा कमंडलु व आसन ज्या पिंपळाच्या झाडाखालीं होतें तो पवित्र वृक्ष आणि कनिष्कानें बांधलेला एक मोठा स्तूप वगैरे स्थलें पेशावरास असल्याची प्रसिद्धि ख्रिस्ती शकाच्या आरंभापासून होती. पेशावर शहराचें मूळचें नांव पुरुषपुर (पुरुष नांवाच्या राजाची राजधानी) होतें. रा. राजवाडे हे पिशाचपूर या नांवापासून पेशावर नांव बनल्याचें प्रतिपादितात. १५५२ सालीं हुमायून बादशहाला तेथील किल्ला पडक्या स्थितींत आढळल्यामुळें त्यानें त्याची पुष्कळ डागडुजी केली आणि तेथें एक सुभेदार नेमला. १८४९ सालीं पेशावर ही इंग्रजांची जिल्ह्याची जागा झाली. १९०१ सालीं वायव्येकडील सरहद्दप्रांताचें तें मुख्य शहर बनलें. पेशावर शहरास १६ वेशी आहेत. सर्वांत मोठा रस्ता 'किस्ता कहानी' नांवाचा असून तो 'काबूल वेशींतून' गेलेला आहे. त्याची रुंदी ५० फूट आहे. या रस्त्यावर दोन्हीं बाजूंनें सारखी दुमजली दुकानाची रांग गेलेली आहे. सबंध रस्त्यावर फरशी केलेली असून बाजाराची धडामोड चालू असते त्यावेळेचा देखावा उत्कृष्ट दिसतो. शहरांत दुसऱ्या भागांतील रस्ते अरुंद व वेड्या वाकड्या गल्या आढळून येतात.पाण्याचा पुरवठा उत्तम प्रकारचा आहे. गटारें पक्कया दगडांचीं बांधलेलीं असून रोज तीं धुवून साफ केलीं जातात. शहरसफाई व आरोग्य चांगल्या स्थितींत आहे. शहरांत पाहण्यासारख्या बऱ्याच मशिदी आहेत. गोरखत्री या नांवाची इमारत फार मोठी असून प्रेक्षणीय आहे. वेशीच्या बाहेर जवळच बाला-हिसार नांवाचा चतुष्कोनी किल्ला आहे.त्यावरून पेशावर शहर उत्कृष्ट दिसतें.

शहराच्या नैर्ऋत्येस बगीचे आहेत.वझीरबाग नांवाचा एक सार्वजनिक बगीचा आहे. या ठिकाणीं लोकांचे थवेच्या थवे संध्याकाळीं हवा खावयास येतात. पश्चिमकडे २ मैलांवर छावणीची वस्ती आहे. पूर्वी गोऱ्या पलटणी, काळें पायदळ, तोफखाना, वगैरे उत्तरेकडील लष्करचा बराच मोठा भाग पेशावरास रहात असे

**पेस्टालोझी, जोहान हीनरिच**( १७४६-१८२७ )- हा स्विस शैक्षणिक सुधारणावादी झूरिच येथें जन्मला. त्याचा बाप लहानपणीं वारल्यामुळें याच्या आईनें याला वाढविलें. झूरिच युनिव्हर्सिटींत लाव्हाटेर व सुधारणावादी पक्ष यांच्याशीं याचा संबंध आला. याचीं आरंभींचीं वर्षे लोकांची स्थिति सुधारण्याच्या कार्यांत म्हणजे राजकारणांत गेलीं; पण लवकरच तो शिक्षणाच्या कार्याकडे वळला. त्यानें तेविसाव्या वर्षी विवाह केला व एक पडीक जमीन विकत घेऊन शेतकी करण्यास सुरवात केली व तेथेंच एक शाळा काढली. पण या दोन्ही धंद्यांची नीटशी माहिती नसल्यामुळें त्याला ते बंद करावे लागले. या सुमारासच त्यानें 'दि ईव्हिनिंग अवर्स ऑफ ए हर्मिट '( एकांतवासी इसमाचे सायंकाळचे तास ) हें पुस्तक स.१७८० मध्यें प्रसिद्ध केलें. पहिल्या पुस्तकांत कांहीं म्हणी व स्फुट विचार दिलेले असून, दुसऱ्यांत एका चांगल्या निश्चयी बाईच्या प्रयत्नानें प्रथम कुटुंबाची व नंतर सर्व गांवाची सुधारणा हळू हळू कशी झाली याची हकीकत दिली आहे. हें दुसरें पुस्तक जर्मनींत आस्थापूर्वक वाचलें जाऊन पेस्टालोझी प्रसिद्धीस आला. १७९८ मध्यें फ्रेंचांनीं स्वित्झर्लंडवर

केलेल्या स्वारीमुळें पेस्टालोझीचा खरा थोर स्वभाव व्यक्त होण्यास चांगली संधि मिळाली. या स्वारीच्या अनर्थामुळें कित्येक मुलें अनाथपोरकीं बनलीं होतीं, त्यांपैकीं कांहीं मुलें पेस्टालोझीनें आपल्या आश्रयास घेतलीं व त्यांनां शिक्षण दिलें. १८०२ सालीं त्यानें नेपोलियनला भेटून स्वतःची राष्ट्रीय शिक्षणाची योजना सांगितली, पण प्राथमिक शिक्षणाच्या त्या योजनेकडे नेपोलियननें लक्ष दिलें नाहीं. १८०५ सालीं नॉचॅटेल सरोवराजवळ व्हर्डून येथें शाळा स्थापली व ती वीस वर्षें सतत चालविली. फ्रोबेल हा शिक्षणशास्त्रज्ञ त्याच्या विद्यार्थ्यांपैकींच एक होता. १८१५सालीं पेस्टालोझीचें त्याच्या सहकारी शिक्षकांशीं भांडण झालें व त्याचीं पुढील दहा वर्षें त्रासांत गेलीं. अखेर त्यानें "आपलीं साहसें" व "हंसाचें गाणें" हीं दोन पुस्तकें लिहिलीं. तो १७ फेब्रुवारी १८२७ रोजीं मरण पावला.

**पैगाह इस्टेटी**—हैद्राबाद संस्थानांतील एक इस्टेटींचा समूह. ह्यांत २३ तालुके आहेत. हे तालुके बेदर, नन्दर, उस्मानाबाद, गुलबर्गा, मेदक, अत्राफ-ई-बल्दा, व निझामाबाद जिल्ह्यांत असून, कांहीं गांवें औरंगाबाद, वरंगळ,महबूब नगर व नलगोंडामध्यें आहेत. एकंदर क्षेत्रफळ ४१२४ चौरस मैल व उत्पन्न ४० लाख.खेडीं व गांवें मिळून १२७३आहेत. ह्या इस्टेटी सर असमानशहा,सर खुरसेदजाह,सर विकारउल्-उमरा ह्यांच्या वंशजाकडे आहेत.

**पैठण,** ता लु का.—हैद्राबाद संस्थानांतील औरंगाबाद जिल्ह्याचा एक दक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ ६०८ चौ. मै. लोकसंख्या जहागिरी धरून (१९११) ७७७३० मोठें गांव पैठण व खेडीं १६७,पैकीं१२ जहागिरी आहेत. गोदावरी नदी दक्षिणेकडील सरहद्दीवरून वहाते.तालुक्याची जमीन काळी व कापसास योग्य आहे.

गां व.—पैठण तालुक्याचें ठाणें. हें गोदावरीच्या उत्तर तीरावर आहे. लोकसंख्या सुमारें सात हजार. पैठण ह्या गांवास पुरातन काळीं 'प्रतिष्ठान' म्हणत असत. प्रतिष्ठान हें दक्षिणेंतील अत्यंत जुनें शहर होय. चाळिसगांवाजवळील पितळखरा येथील लेण्यांत प्रतिष्ठानच्या राजांचा व व्यापाऱ्यांचा उल्लेख केलेला आहे. पुलुमायी दुसरा, ह्या आंध्र राजाची (खि. पू. १३८–१७०) ही राजधानी होती. पैठण ही 'शालिवाहनाची' जन्मभूमि होय. कदाचित् आंध्र राजा 'सातवाहन' ह्याचा 'शालिवाहन' हा अपभ्रंश असेल. पूर्ववैभवाची आठवण देणारें असें सध्यां येथें कांहींच उरलें नाहीं. उत्तमपैकीं सुतारकाम केलेलीं देवालयें येथें आहेत. १४ व्या शतकाच्या मध्यकालीं 'मानभावी' धर्माची स्थापना येथेंच झाली. येथें एकनाथ महाराजांची समाधि व संस्थान आहे. पैठण येथें रेशमी व सुती लुगडीं तयार होतात. हें एक महत्त्वाचें व्यापारी ठिकाण आहे.

**पै-मुरदा**—मध्यप्रांत, जिल्हा चांदा. क्षेत्रफळ ८८ चौरस मैल. उत्तरेस पोटेगांव आणि गिलगांव जमीनदाऱ्या व पूर्वेस अहिरी जमीनदारी. पै हें पूर्वीचें मुख्य ठिकाण होतें व मुरदा हल्लींचें आहे व त्यामुळें या जमीनदारीस वरील नांव पडलें आहे. याचा इतिहास सांपडत नाहीं. एकंदर खेडीं३३, पैकीं २४ मध्यें वस्ती असून बाकीचीं ओसाड आहेत. लागवडीखालील जमीन सुमारें १८०० एकर. मुख्य पीक भात. लोकसंख्या (सन १९११) १५५५. ह्यांत दोन तळीं आहेत. एकंदर उत्पन्न २३२१. टाकोळी १२० रु. इतर कर ६९ रु. जमीनदार-घराणें राजगोंड आहे.

**पैल**—पंजाब इलाख्यांतील, पतिआळा संस्थानच्या अमरगड निझामतमधील एक तहशील.

**पैलगांव**—पंजाब, पितियाळा संस्थान. साहिनगड तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें पतियाळा शहराच्या वायव्येस असून याची लोकसंख्या सुमारें पांच हजार आहे. सन १२३६ मध्यें बंडखोर मलिक अल्लाउद्दीन जानी ह्याचा,अल्तमशची कन्या सुलताना रेझिया हिच्या एका सांथीदारानें पैल जिल्ह्यांत 'नकावान' येथें खून केला. अकबराच्या कारकीर्दींत हा सरहिंदचा एक परगणा होता. ह्या गांवास धार्मिक दृष्ट्या बरेंच महत्त्व आहे. येथें गंगासागर नांवाचा तलाव व महादेवाचें देवालय आहे. त्यास 'दसनामका अखाडा' म्हणतात. येथें चागल्या चांगल्या इमारती आहेत.

**पैलाणी**—संयुक्त प्रांतांतील बान्दा जिल्ह्याची एक उत्तरेकडील तहशील.ही यमुना नदीच्या दक्षिण भागीं आहे. क्षेत्रफळ ३६३ चौरस मैल. लोकसंख्या (१९११)८०३११. खेडीं १२३. मोठीं गांवें नाहींत. ह्या तहशीलींतून केन नदी वहात जाऊन शेवटीं ती यमुनेस मिळते. जमीन सुपीक. ह्या तहशीलींत केन कालवा आहे.

**पो नदी**—ही उत्तर इटलींतील नदी, त्या देशांत सर्वांत मोठी आहे. हिची लांबी ४१७ मैल. कॅसल मॅन फेरॅटोपासून ३१७मैल जहाजें चालण्याजोगें हिचें पात्र आहे. हिला दोन्ही बाजूंनीं ६०० मैल बांध घातले असून हिचें पाणी कालव्यांनीं शेतीकरतां नेण्यांत येतें. उत्तर इटलींत या नदीचें भूगोल दृष्ट्या महत्त्व फार आहे. मुखाजवळ हिचें पात्र फार उथळ झाल्यामुळें हिचें वेचकें (डेल्टा) सारखें वाढत आहे. हिचे बांध रोमन लोकांच्याहि पूर्वी बांधलेले आहेत.

**पोकरन**—राजपुताना, जोधपूर संस्थान, संक जिल्ह्यातील एक जहागीर इस्टेट. जोधपूर शहरापासून ८५ मैल. लोकसंख्या सात हजार. येथील किल्ला लहान पण मजबूत आहे. पोकरन जहागिरींत १०० गांवें असून उत्पन्न एक लक्ष रुपये आहे जहागिरीचे मालक राठोड ठाकूर आहेत. जोधपूरचे महाराज हत्तीच्या अंबारींत बसले असतां अंबारीमागें बसण्याचा मान पोकरनचे ठाकूर यांच्याकडे आहे.

**पोखरलेली विहीर**-विहीर खणण्याची पुरातन काळापासून चालत आलेली रीत म्हणजे ज्या आकाराची विहीर

खोदावयाची असेल त्या आकाराचा खळगा जमिनींत खणावयाचा. याप्रमाणें जशी जमीन असेल त्याप्रमाणें जवळ किंवा खोल पाणी लागतें परंतु अशी विहीर खणणें फार खर्चाचें काम आहे. विहीर जसजशी खोल होत जाईल तसतसा खर्च फार येत जातो.

प हा र मा र णें.—विहीर खणतांना खडक लागला तर तो फोडावयास फार खर्च येतो. व कित्येक वेळां फोडणेंहि अशक्य होतें. अशा स्थितींत सबंध विहीर न फोडतां फक्त १ किंवा १॥ इंच आकाराचें भोंक खडकांत पाडतात. असें भोंक १० ते १९ फूट खोल गेल्यावर पाणी लागतें व तें त्या भोंकांतून वर येतें. पालघरच्या आसपास पहार मारलेल्या विहिरी पुष्कळ ठिकाणीं आहेत.

पहार मारण्याची पद्धतः—पहार म्हणजे लोखंडी दांडा. याचा व्यास १ ते १॥ इंच व लांबी ३० ते ४० फूट असते. पहारेच्या खालच्या टोंकाला पोलाद बसवितात. विहिरीमध्यें एकावार एक परांच्या बांधतात; यांनां पाळणे म्हणतात. प्रत्येक पाळण्यावर दोन तीन माणसें उभीं राहतात. एकंदर २० ते ३० माणसें असतात. सर्वजण ही पहार एकदम उचलतात व एकदम खालीं सोडतात. ही रीत फार जुनी व अतिशय खर्चाची आहे. धार लावण्यासाठीं ही सबंध पहार बाहेर काढावयाची व लोहाराच्या दुकानावर न्यावयाची. यांतच फार वेळ जातो.

पहार मारण्याची सुधारलेली पद्धतः—यूरोपीयन व अमेरिकन लोकांनीं पहार मारण्याच्या रीती सुधारल्या आहेत. यासाठीं निरनिराळ्या प्रकारचीं यंत्रें तयार केलीं आहे. या यंत्रांनीं १०० ते २००० फूट खोलपर्यंत जमिनीस भोंक पाडतां येतें. या भोंकांचा व्यास ३ ते २० इंच असतो. परंतु ३५ ते ४० इंच व्यासाचीं भोंकें फ्रान्समध्यें पाडलीं आहेत. या भोंकांनां पोखरलेल्या विहिरी असें म्हणतात.

विहिरी पोखरण्याच्या दोन रीती आहेत. एका रीतींत जमिनीवर हत्यार आपटून आपटून जमीन पोकळ करावयाची व अशा पोकळ जमिनींत नळी दाबून बसवावयाची. ही नळी जसजशी खालीं उतरत जाईल तसतसा आंतील चिखल गिरमिटासारख्या यंत्रानें काढून घ्यावयाचा. सर्व चिखल काढल्यावर पहारीनें पुन्हां चिखल काढून घ्यावयाचा. अशा रीतीनें जितकी खोल विहीर खणावयाची असेल तितकी खणावयाची.

दुसरी रीत अशी आहे कीं वर सांगितल्याप्रमाणें पहार किंवा इतर हत्यारें जमिनीवर न आपटतां ज्या आकाराचें भोंक पाडावयाचें असेल त्या आकाराच्या मानानें पोलादी हत्यार वापरावयाचें. याचा आकार वाटोळा असतो व एका तोंडास करवतीच्या दात्यासारखे दांते पाडलेले असतात. करवतीचें पान पातळ असतें तसे हे दाते पातळ नसून भक्कम व जाड असतात. या हत्याराच्या दुसऱ्या टोंकास पोलादी नळी लावतात. व यंत्रानें यास फिरवितात, गति मिळताच हे दांते जमीनींत घुसतात व मधील माती बाहेर येऊं लागते. खडक लागला तरीहि हे त्याला भोंक पाडून त्याचा मधूनच वरवंट्यासारखा गोल भाग कापून भोंक पाडतात.

ज्या ठिकाणीं जमीन टणक नसते व खडक लागण्याचा संभव नसतो त्या ठिकाणीं अगदीं कमी खर्चात विहीर पाडतां येते. याची रीत अशी आहे कीं एक भोंकें पाडलेला नळ घेऊन त्याच्या एका टोंकास अणकुचीदार पोलादी टोंक बसवावयाचें व दुसऱ्या टोंकास नळ बसवावयाचा या नळाच्या दुसऱ्या टोंकास ठोकल्यानें हा नळ जमीनींत घुसतो. एक नळ संपला तर त्याला दुसरा जोडावयाचा. अशा रीतीनें पाण्याच्या थरापर्यंत गेल्यानें नळाच्या आंत पाणी येतें. नंतर पंप बसवून हें पाणी वर काढून घेतात. [ ले. वा. ह. मनोहर ].

**पोंग**—या नांवाचें एक राज्य ब्रह्मदेशांत पूर्वीं होतें. शान लोकांच्या भाषेंतून मणिपुर भाषेंत अवतरलेल्या ग्रंथावरून पेंबरटन ( रिपोर्ट ऑन ईस्टर्न फ्राँटियर ब्रि इंडिया ) येणेंप्रमाणें माहिती देतो—

इ. स. ७७७ च्या सुमारास सुकफ राजा राज्य करीत असतां पोंग राज्याची सरहद्द पूर्वेकडे चीनला जाऊन भिडली व पश्चिमेस काचार-टिपरा-मणिपूर पर्यंत जाऊन त्याचा शह पोंचला. सुकफाचा भाऊ संलोंगफ हा दयाळु होता आणि त्यानें मणिपुरी लोकांस सुख व्हावें म्हणून खटाटोप केला. आसामांत यानें आपल्या बंधूचें स्वामित्व स्थापिलें. तथापि याच्या विरुद्ध पोंग येथें कट झाल्यामुळें हा स्वदेशीं परत गेला नाहीं. याचा मुलगा "चौनमुख" हा आसाम येथील राजघराण्याचा मूळ पुरुष होय. या शतकांत पोंग येथील राज्य पूर्वेकडे काम्बोज पर्यंत भिडलें होतें. इ.स.१३३३च्या सुमारास हें राज्य चीन व ब्रह्मदेश यांच्या बरोबर लढाया करण्यांत गुंतलें. चीननें या राज्याची राजधानी काबीज केली व तत्कालीन राजा सूगनफ हा आव्हा राजधानींत आश्रयार्थ गेला. मांगलोंग ही राजधानी चीननें काबीज केली नसून ब्रह्मी लोकांनीं केली असें ब्रह्मी इतिहासकार लिहितात. या वेळेस या राजकुलाच्या ताब्यांतून को शान् ।प्यि गेलें. त्सागैन ही ब्रह्मी राजधानी पोंग राजानें सन १३६४ त घेतली. १४७५ सालीं मणिपूर व पोंग राज्य यांनीं खुंवतचें राज्य जिंकून आपली सरहद्द ठरविली.

१५१३-१४ सालीं ब्रह्मदेशानें पोंग राज्यावर स्वारी केली हें शान इतिहासकार कबूल करतात व १५२६ मध्यें शान लोकांनीं ब्रह्मी लोकांवर स्वारी करून आव्हा येथें १९ वर्षें राज्य केलें हें ब्रह्मी इतिहास कबूल करतो. १५६८ सालीं पोंगनें सयामवर स्वारी केली. १५८७ सालीं पोंगच्या राजानें आव्हावर स्वारी केली, तथापि त्याच सुमारास चीननें ब्रह्मदेशावर स्वारी केली होती.त्या स्वारींत पोंगचा राजा चौकलमुख

याचा पराभव होऊन तो मरण पावला. चौकलखुमच्या मृत्यूनंतर पॉंग राज्य हें ब्रह्मदेशाचें मांडलिक झालें होतें. पॉंगचे राजे आम्हाचे मांडलिक होते. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत पॉंगनें स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला, तथापि ब्रह्मदेशाचा बलाढ्य राजा अलॉम्प्रा यानें त्याचें पारिपत्य करून पॉंगचें राज्य नष्ट केलें. [ अंडरसन–रिपोर्ट ऑन दि एक्सपिडिशन टु वेस्टर्न युनन, कलकत्ता १८७१ ].

**पोटंगी**—मद्रास, विझगापट्टम् जिल्ह्यांतील जमीनदारी तहशील. पूर्वघाटाच्या उतरणीवर पोटंगी वसलेलें आहे. बहुतेक भाग पहाडी असून आसपास जंगल आहे. क्षेत्रफळ ६२५ चौ. मै. लो. सं. ( १९०१ ) ७३०१३ खेड्यांची संख्या ९२० असून जमीनदारांचें मुख्य ठाणें पोटंगी येथें आहे.

**पोटय्या**—एक संस्कृत कवि. हा जातीचा ब्राह्मण होता. गोदावरीच्या तीरीं राजमहेंद्री प्रांतांत कादंबरी म्हणून गांव आहे, तेथें हा रहात असे. शालिवाहन १३८८ मध्यें यानें एक मोठा ग्रंथ लिहिला. त्याचें नांव प्रसंगरत्नावली असें आहे व त्यांत ८३ प्रकरणें आहेत. कविचरित्रांत या सर्व प्रकरणांचीं नांवें लिहिलीं आहेत. पैकीं कांहीं अशीं:–( १ ) उपयुक्त प्राणिप्रशंसा, ( २ ) इतिहास व दुसरे विषय, ( ३ ) भरताच्या अष्टादश पर्वांविषयीं, ( ४ ) छपन्न देशप्रशंसा, ( ५ ) शिल्पकर्मप्रशंसा इ०

**पोटशूळ** ( सिलिक ).–पोटांत शूळ म्हणजे दुखणें हें लक्षण त्याच्या नांवावरून उघडच आहे खरें, परंतु वैद्यशास्त्रांत हें फक्त कांहीं रोगांचें एक लक्षण आहे असें समजतात. म्हणजे त्यास स्वतंत्र रोग मानीत नाहींत. व्यवहारांत लोक असा अर्थ करतात कीं, अजीर्णामुळें किंवा थंडीमुळें जें पोट दुखतें तो पोटशूळ. पण पोटशूळ नेहमीं याच कारणामुळें होतो असें नाहीं. मूत्रपिंडाचे रोग, मूत्रवाहक नलिकेचे रोग, पित्ताशय, किंवा आंतड्यांचे रोग व आणखी दुसऱ्या कारणांपासूनहि उदरांत शूळ उत्पन्न होतो. साधारणपणें असा हल्लीं प्रघात पडला आहे कीं, उदरांत जीं नानाप्रकारचीं इंद्रियें असतात त्यांत ज्यास पोकळी असून नलिकेवाटे त्यांतील द्रव्यांचें उत्सर्जन एरवीं होतें त्या नलिकांचें छिद्र बंद होऊन अडकलेल्या पदार्थांची पीडा दूर होण्यासाठीं त्या नळिकांचा मांसल भाग आकुंचित होऊन एकसारखा प्रयत्न करतो व तो सफळ न झाल्यामुळें ज्या वेदना होतात त्यांस पोटशूळ असें सर्वसाधारण नांव आहे. मूत्रपिंडाच्या व पित्ताशयाच्या रोगवर्णनांत असल्या पोटशूळाचें वर्णन दिलेलें असतें. खालील वर्णन विशेषतः आंतड्यांत होणाऱ्या शूळास लागू आहे व त्याचें सादृश्य इतर कारणांमुळें होणाऱ्या शूळाशीं पुष्कळ असतें.

ज्या बालकांस वरचें दूध बाटलीनें पाजून वाढवितात तीं दूध न पचल्यामुळें व पोटांत शूळ उत्पन्न झाल्यामुळें एकसारखीं रडत सुटतात व त्यांस चैन पडत नाहीं असें तीं, लोळण्यानें अगर पाय अगदीं पोटाशीं घेऊन निजण्यानें दर्शवितात.

मोठ्या माणसामध्यें अजीर्णोद्भव पोटशूळाखेरीज बरेच दिवस पोटशूळ सुरू रहाण्यास एक चमत्कारिक कारण पुष्कळ वेळां पहाण्यांत येतें. हुन्नर धंदा करणाऱ्या ज्या लोकांचा शिशाशीं अथवा शिसें मिश्रित पदार्थांशीं नेहमीं संबंध येतो त्यांस हें दुखणें जडतें. उदाहरणार्थ पाण्याचे नळ जोडण्याचें काम करणारे लोक, कासार, तांबट, तैलमिश्रित शिशापासून तयार झालेले पांढरा, तांबडा, इ० रंग देणारे लोक हे होत. ज्या दुसऱ्या अनेक धंद्यांत शिसें उपयोगांत येतें ते विविध प्रकारचे असल्यामुळें विशेष दुसरीं उदाहरणें दिलीं नाहींत. परंतु नेहमींचा प्रचारांतला पोटशूळ म्हणजे बद्धकोष्ट असलेल्या माणसामध्यें मळ घट्ट होऊन आंतड्यांचे स्नायू त्यास पुढें ढकलण्याचा व्यर्थ प्रयत्न करतात व त्यामुळें ज्या वेदना होतात त्यांचीं उदाहरणें नेहमीं नजरेस येतात. या मळाच्या घट्ट झालेल्या गांठी नळांतील मार्ग अडवून टाकून मागील मळ पुढें सरण्यास प्रतिबंधक होतात. तसेंच दुसरें सर्वसाधारण कारण म्हणजे पेरू, हिरवीं फळें, जडान्न व तत्कट पदार्थ वगैरे गरजेपेक्षां अधिक खाण्यांत आल्यानें व ते दाहोत्पादक असल्यामुळें शूळ उत्पन्न करतात, व त्यामुळें जुलाब तरी सुरू होतात अगर शौचास तरी अवरोध होतो, यासच बद्धकोष्ठ म्हणतात व तो पुष्कळ माणसांना होतो. अतिसार अथवा बद्धकोष्ठाबरोबरच आम उत्पन्न होतो किंवा आतड्यांत व्रणोद्भव होतो किंवा अगोदरच पोटामध्यें क्यान्सर किंवा तशाच प्रकारची दुष्टग्रंथि असते व त्यामुळें हा शूळ होत असतो. मोठाले व वाटोळे जंत पोटांत असल्यानें ते पोटांत अति वेदना उत्पन्न करतात. कारण त्यांच्या योगानें आंतडीं संकोचित होऊन त्यांस बाहेर लोटण्याचा प्रयत्न करीत असतात. इन्फ्लुएंझा तापास सुरवात होण्याच्या अगोदर जीं नाना लक्षणें होतात त्यापैकीं कोणामध्यें प्रथम हेंच लक्षण होऊन ज्वर येतो. ज्यास सर्दी तेव्हांच बाधते अशा लोकांनां गारठ्यामुळें पोटशूळहि होतो. स्त्रियांनां गर्भाशय व तदनुषंगिक इंद्रियांच्या व्याधींमुळें असा पोटशूळ होतो. ज्यांचें कांहीं कारण उमगत नाहीं तो पोटशूळ "वातापासून" आहे असें म्हणतात पण तें बरोबर नव्हे. हीं इतकीं कारणें थोडक्यांत येथें दिलीं आहेत त्यावरून ध्यानांत येईल कीं, कोणांस पोटशूळ झाला असतां तो फक्त आंतड्यासंबंधींच असला पाहिजे असें गृहीत धरून चालणें बरोबर होणार नाहीं. तर अन्य कारणांपासून तो नाहीं अशी खात्री, प्रकृति तपासून करून घेतली पाहिजे.

या शूळाचा क्रम असा आहे कीं जशी त्याची सुरवात एकाएकीं होते त्याचप्रमाणें तो बंदहि एकदमच होतो. पोट कोठें दुखत आहे असें रोग्यास विचारिलें असतां बेंबीजवळ आणि तेथून दुसरीकडे आसपास वेदना होत आहेत असें रोगी सांगतो. कधीं पोटशूळ सौम्य असल्यानें फारशी पीडा त्यापासून होत नाहीं तर कधीं तो

इतका असह्य होतो की रोगी रडत ओरडत सुटून त्यास त्यामुळें थंडगार व चिकट असा सर्वांगास घाम सुटतो. पोट दाबून धरिलें असता बरें वाटतें आणि हें लक्षण महत्त्वाचें आहे कारण आंत्रावरणदाह रोगांत असेंच पोट दुखतें पण तें दाबून धरल्यानें अधिकच दुखतें. वायु कोंडून पोट फुगलें असल्यास किंवा आंतड्यांत दुष्ट ग्रंथीचा उद्भव झाला असल्यासहि पोट दाबणें सहन होत नाहीं. ताप बहुधां नसतो व नाडीच्या ठोक्यांचें प्रमाणहि विशेष वाढलेलें नसतें हें एक मुख्य लक्षण आहे.

उ प चा र.—अजीर्ण, बद्धकोष्ठ व अतिसार इत्यादि साध्या कारणांनीं आंतड्यांतील शूळ उत्पन्न झाला असतां रोग्यास अंथरुणावर निजवून ठेवावा व त्याचें पोट चांगलें बरेंच वेळां शेकावें. एखादें रेचक औषध देणें चांगलें, व तें अगोदरच द्यावें. पोटांत फारच कळा येत असल्यास रेचक औषधांतच अफूच्या अर्काचे थोडे थेंब घालण्याचा प्रचार आहे, व जेव्हां वेदना रोग्यास सहन होत नाहीं असें दिसतें तेव्हां रोग्यास ह्या अर्क घालण्यास कचरूं नये. आतां या पोटशूळाच्या कारणाचें निदान करणें म्हणजे कोणतें इंद्रिय बिघडून शूळ होत आहे हें सांगणें नेहमींच सोपें असतें असें नाहीं. आंत्रव्याघात या भयंकर रोगाचा आरंभ असाच पोटशूळानेच होतो. पण रोगी जास्तच बिघडत जाऊन, रोग्यास वरच्यावर वांति होऊं लागते. चेहऱ्यावरून रोग्यास अत्यंत वेदना व क्लेश होत आहेत असें चटकन दिसून येतें परंतु ज्या वैद्यानें असे रोगी अनेक पाहिले आहेत त्याच्या ध्यानांत खरी स्थिति तावडतोब येते व त्यास आणखी पुरावा पाहिजे असल्यास रोग्याच्या नाडीचा वेग पहाणें हें होय. तो वाढलेला असतो. अंत्रपुच्छ-दाह, किंवा आंत्रावरणदाह ह्या रोगांच्या आरंभींहि पोट-शूळ होतो. 'पृष्ठरज्जुजन्य' कंप रोगांत भयंकर वेदना होऊन पोटशूळ होतो तेव्हां चौकस बुद्धीनें ह्या सर्व कारणाचें अस्तित्व असल्यास शोधून काढावें.

**पोटेगांव जमीनदारी**—मध्यप्रांत, जिल्हा चांदा. क्षेत्र-फळ ३४ चौरस मैल. एकंदर खेडीं २०; पैकीं ओसाड ८० आहेत. या जमीनदारीच्या उत्तरेस गिलगांव व खुटगांव जमीनदाऱ्या; पूर्वेस खुटगांव व अहिरी जमीनदाऱ्या; दक्षिणेस अहिरी आणि मुरंदा जमीनदाऱ्या व पश्चिमेस मुरंदा आणि गिलगांव जमीन-दाऱ्या. लागवडीखालीं क्षेत्र ५४०एकर असून मुख्य पीक भात. यांतून इमारती लांकूड व बांबू बाहेर जातात. घराणें राज-गोंड असून जमीनदार तेलंगराव आहे. कमाल जमा ४०० रु., टाकोळी ४० रु. व कर २२ रु. आहे.

**पोटोसी**—बोलिव्हियांतील एक शहर. लोकसंख्या (१९०६) २३४५० आहे. हें समुद्रसपाटीपासून १२९९२ फूट उंचीवर असून जगांत सर्वांत उंच शहर आहे. या शहराचे रस्ते व्यवस्थित व एकमेकास काटकोनांत छेदून जाणारे आहेत. स्पॅनिश सरकारनें बराच खर्च करून येथें पाण्याची सोय केली आहे. रस्ते डोंगराळ असून खेचरांवरून माल नेत. परंतु १९०८ सालीं ओरुरोहून पोटोसी मार्गानें टुपिझाला रेल्वे झाली आहे. सरोवर ग्वाल्सी नांवाच्या इंडियन गुराख्यानें रुप्याचा शोध लावल्यानंतर दोन वर्षांनीं म्हणजे स. १५४७मध्यें हें शहर वसविलें गेलें. पांचव्या चार्ल-सनें याला बादशाही वनगृह हें नांव दिलें. स्वातंत्र्याची चळवळ पोटोसीमध्यें नोव्हेंबर ९ स. १८१० रोजीं सुरू झाली, परंतु स्पॅनिश सैन्यानें स. १८२२ पर्यंत ताबा ठेविला.

**पोत्ती मल्याळ**—जे नंबुद्रि या जातिनांवाखालीं येत नाहींत अशा सर्व केरळ ब्राह्मणांना ही संज्ञा देण्यांत येते. यांचे मुख्यतः दोन भाग पडतातः—(१) केरळच्या किंवा प्राचीन विभागापैकीं अगदीं दक्षिणेकडे पूर्वी रहात असलेले व (२) कर्नाटकांतून त्रावणकोरमध्यें येऊन नंबुद्री यांच्यांत मिसळले. स्थानत्तिल पोत्ती व पत्तिलत्तु पोत्ती हे पहिल्या वर्गांत मोडतात; व दुसऱ्यांत तिरुवल देशी यांचा समावेश होतो. पश्चिम किनाऱ्यावरील राजांच्या आश्रयामुळें हे पोत्ती ब्राह्मण अद्यापहि आपला ठरलेला धार्मिक धंदा ( देवळांतील उपाध्येपणा) करतात. परंतु धंद्यांत दिवसेंदिवस किफायत होत नसल्यामुळें हा धंदा ते राजीखुषीनें न पतकरितां सवयीमुळें व गरजेमुळें पतकरतात. यांचा वारसाहक्काचा कायदा, समाजरचना, नांवें, व पदें हीं नंबुद्रीप्रमाणेंच आहेत. दक्षिण कर्नाटकांतील उप्पिनंगाति व कासरकोट या तालुक्यांतील तुळु ब्राह्मणांसहि पोत्ती असेंच म्हणतात.

**पोदनूर**—मद्रास, कोइमतूर जिल्हा व तहशिलीमधील एक खेडें. हें कोइमतूरपासून ४ मैलांवर आहे. लो. सं. सुमारें ६ हजार. मद्रास रेल्वेच्या निलगिरी फांट्यावर पोदनूर हें बरेंच महत्त्वाचें-रेल्वे स्टेशन आहे. या ठिकाणीं रेल्वेचे बरेच कारखाने आहेत. येथील हवा थंड असून निरोगी आहे. येथें साखरेचा एक कारखाना आहे.

**पोदिली**—मद्रास, नेलोरजिल्ह्याच्या वायव्येकडील जमीन-दारी तहशील क्षेत्रफळ ५.६४ चौ. मैल. लोकसंख्या(१९२१) ७२७६१. तहशिलींत एकंदर १११ गांवें आहेत. तहशिलीचें मुख्य ठिकाण पोदिली हेंच होय. व्यंकटगिरी इस्टेट म्हणून जी एक प्रसिद्ध जमीनदारी आहे तिचा एक भाग पोदिली तहशील आहे. मुसी व गुंडलकम्मा या नांवाच्या दोन नद्या पोदिली तहशिलींतून वाहत जाऊन बंगालच्या उपसागराला मिळतात.

**पोनेरी**—मद्रास, चिंगलपट जिल्ह्यांतील उत्तरेकडील तालुका. क्षेत्रफळ ७२२ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) २४३७३७. पलिकत बंदर याच तालुक्यांत आहे. काळीचें व इतर बाबींचें मिळून उत्पन्न सुमारें ४ लाख आहे. पाऊस ४७ इंच पडतो.

**पोन्नगयून**—खालचा ब्रह्मदेश, अकियाब जिल्ह्यां-तील एक टौनशिप. क्षेत्रफळ ७८३ चौरस मैल. कलदन व

मयू या दोन नद्यांमधील वरचला भाग यांत येतो. लोकसंख्या (१९११) ५१८०५. यांत १७७ खेडीं आहेत.

**पोन्नानी,** तालुका.—मद्रास, मलबार जिल्ह्यांतील अगदीं दक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ ४२६ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ५३३२५२. मलबार जिल्ह्यांत अतिशय दाट वस्ती याच तालुक्यांत आहे. वसूल सुमारें ६ लाख. तालुक्याचें मुख्य ठिकाण पोन्नानी आहे.

गां व.—पोन्नानी तालुक्यांतील मुख्य शहर. हें पोन्नानी नदीच्या कांठीं वसलेलें आहे. लोकसंख्या दहा हजार. या ठिकाणीं मुसुलमान लोकांची वस्ती फार आहे. एकंदर मशीदी २७ असून त्यांत सर्वांत मोठी 'जुम्मा मशिद' नांवाची आहे. ती सन १५१० सालीं बांधली असें म्हणतात. पोन्नानी नदी मलबारांत अतिशय मोठी असून हिची लांबी १५० मैल आहे. नदीचें पात्र उथळ आहे.

**पोप अलेक्झांडर** (१६८८–१७४४)—इंग्लंडमधील सुप्रसिद्ध कवि. लहानपणापासूनच तो चांगल्या कविता करीत असे या त्याच्या बालपणांतील कवितांमुळें विचर ले नांवाच्या एका मोठ्या गृहस्थाशीं त्याची ओळख झाली. विचर ले याच्यामुळें पोपचा तत्कालीन कवी व ग्रंथकारांशीं परिचय झाला. १७०९ सालीं त्याचें 'पॅस्टोरल्स' हें काव्य प्रसिद्ध झालें. १७११ सालीं 'एसे ऑन क्रिटिसिझम' हा त्याचा सुप्रसिद्ध ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्यानंतर 'रेप ऑफ दि लॉक' (१७१४), ईलियडचें पद्यात्मक भाषांतर (१७१५–२०), ऑडिसीचें भाषांतर (१७२५–२६), पत्रसंग्रह (१७३३), 'डन्सियड' (१७३१–३५), 'एसे ऑन मॅन' (१७३३), 'इमिटेशन्स ऑफ होरेस' (१७३३–३९), इत्यादि काव्यग्रंथ प्रसिद्ध झाले. याच्या काव्यामध्यें प्रगल्भ व तात्त्विक विचार, उच्च कल्पना, अगर प्रतिभा हे गुण आढळत नाहींत. तथापि उत्कृष्ट व सुरस भाषा, थोडक्या शब्दांत पुष्कळ अर्थ व्यक्त करण्याची कला, इत्यादि बाबतींत त्याचा हातखंडा होता. त्याच्या ग्रंथांत व्यावहारिक म्हणी तर जागोजाग विखुरलेल्या आहेत. 'हिरॉइक कप्लेट' नांवाचें इंग्लिश वृत्त त्यानें पूर्णावस्थेला नेलें.

**पोपट**—हा हिरव्या रंगाचा पक्षी हिंदुस्थानांत सर्वत्र आढळत असून त्याचें निवासस्थान रानावनांत झाडावरील घरट्यांत असतें. त्याचीं पिसें हरित वर्णाचीं असल्यामुळें झाडांत असतांना तो ओळखला जात नाहीं. त्याचा संचार तीरासारखा शीघ्रगामी असतो व हवेंतून उडतांना पोपट कर्कश शब्द उच्चारतो. त्याची चोंच वांकदार व तीक्ष्ण असते. फळें व बीं यावर पोपटाची उपजीविका असते. एखादा पदार्थ धरण्याच्या कामीं तो पायाचाहि उपयोग करतो. रानांत व बागेमध्यें पोपट हे फार नासाडी करतात. धान्य व फळें खाण्यापेक्षां नासधूस करण्याची त्यांची जास्त प्रवृत्ति असते. त्यांचा सुंदर रंग, त्यांचीं पिसें आणि शब्द व वाक्येंच्या वाक्यें उच्चारून नक्कल करण्याची त्यांची उपजत शक्ति या गुणांमुळें हा पक्षी सर्वत्रांस आवडतो; म्हणूनच त्यांस पकडून पिंजऱ्यांत ठेवतात. पश्चिम आफ्रिकेंतील राघू फार बोलके असतात.

**पोपसत्ता**—पोप हा धार्मिक दृष्ट्या ख्रिस्ती धर्मामध्यें प्रीस्ट, बिशप वगैरे जे धर्माधिकारी आहेत त्यापैकीं सर्वांत वरिष्ठ अधिकारी असून राजकीय दृष्ट्या ख्रिस्ती धर्मांत जागतिक राजसत्तेच्या कल्पनेचा अवशिष्ट राजसत्ताधारी प्रतिनिधि आहे. प्राचीन रोमन साम्राज्य भरभराटींत असतांना ख्रिस्ती धर्मसंस्थापक झीजस ख्राइस्ट जन्मास आला तें जेरुसलेम शहर ख्रिस्ती धर्मांचें आद्य पवित्र स्थान होय. पण पुढें रोमन साम्राज्य व ज्यू लोक यांत झालेल्या युद्धामध्यें जेरुसलेम शहराचें महत्त्व कमी झालें व रोम येथील बिशपला अधिकाधिक महत्व येऊन तोच पुढें सर्वांत वरिष्ठ अधिकारी उर्फ पोप मानला जाऊं लागला. रोमच्या पोपांची परंपरा सुमारें इ. स. ४१ पासून सुरू होऊन दोन हजार वर्षे सतत चालू आहे. इतक्या दीर्घ काळांत या पोपच्या धार्मिक व राजकीय सत्तेंत अनेक स्थित्यंतरें झालीं असून ख्रिस्ती समाजांतील धार्मिक व राजकीय या दोन सत्तांमधील पोपकृत लढा इतर धर्मांयांस मनोरंजक व बोधप्रद होण्यासारखा आहे. पोपचा अधिकार वंशपरंपरागत नसून निवडणुकीनें प्राप्त होत असतो तरी या गादीवर कांहीं अत्यंत नालायक इतकेंच नव्हे तर नैतिक दृष्ट्या अत्यंत दुर्गुणी इसम बसलेले आढळतात. व्हिक्टर या नांवाचे ३, कॅलिक्स्टस २, अर्बानस ८, स्टीफेनस १०, सिक्स्टस् ५, आनास्टासियस ४, इनोसेंटियस ८, बॉनिफेसियस ९, लिओ १३, क्लेमन्स १४, ग्रेगोरियस १६, जोनेस २३, हाड्रिआनस ६, पॉलस ५, ज्यूलियस ३, मार्सेलस २, पायस १०, व इतर अनेक नांवांचे मिळून सुमारें २७० पोप होऊन गेले आहेत.

रो म न च र्च.—ज्यूबरोबरच्या युद्धामुळें रोमन चर्च हें सर्व चर्चेमधील प्रमुख बनून इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांत सर्व ख्रिस्ती लोक रोम शहरीं गेले; निरनिराळ्या देशांतून बिशप वगैरे लोकहि तेथें नेहमीं येत असत. रोममध्यें ज्या ज्या गोष्टी घडत त्या त्या गोष्टींचें अनुकरण इतर सर्व चर्चमध्यें करण्यांत येई सर्व यूरोपखंडांत रोमन चर्चच्या तोडीचें दुसरें चर्च नव्हतें, परंतु आशियांत कित्येक चर्चे फार भरभराटींत होतीं. पुष्कळ दिवसपर्यंत आशियांतील चर्चे व रोमन चर्च यांमध्यें सख्य होतें; परंतु इ. स. १९० त ईस्टरच्या सणाबद्दल त्यांमध्यें लढा उत्पन्न झाला. रोमचा बिशप व्हिक्टर, यानें आशियांतील चर्चेना कॅथोलिक संघांतून काढून टाकिलें. तेव्हांपासून रोमन चर्च हें विश्वव्यापी आहे असें ठरविण्यांत आलें. पौरस्त्य देश, आफ्रिका, गॉल व स्पेन या ठिकाणच्या धर्मविषयक गोष्टींत रोमचे बिशप अनेक प्रसंगीं पडल्याचीं उदाहरणें आहेत. परंतु कालांतरानें इतर कित्येक चर्चे प्रबळ झाल्यामुळें, रोमन चर्चचें महत्त्व कमी होत गेलें,

कार्थेज, अलेक्झांड्रिया अँटिआक व कान्स्टांटिनोपल या शहरांनींहि आपल्याकडे धर्माधिकार घेतला. पुढें कांहीं कालानें पूर्वरोमन साम्राज्याच्या बादशहांच्या अंमलाखालीं तिकडील चर्चें गेलीं व अशा प्रकारें रोमन चर्चचें त्या चर्चवरील वर्चस्व नाहींसें झालें, कारण रोमन चर्चमध्यें ग्रीक भाषा बंद पडल्यामुळें ग्रीक ख्रिस्ती मंडळयापासून रोमन चर्च अगदीं भिन्न झालें.

इ. सनाच्या चवथ्या शतकांत पाश्चात्त्य देशांत रोमन चर्चचें फारसें वजन नव्हतें. दमॅशस व सिरीशस या पोपांच्या वेळेपासून, आफ्रिका, स्पेन व गॉल या देशांतील कित्येक तंटे निकालासाठीं रोमकडे येत असत. मिलन ही पश्चिमरोमन साम्राज्याची राजधानी असल्यामुळें, रोमप्रमाणेंच तेथेंहि एक पोप होता. यामुळें रोमचें महत्त्व कमी होण्याचा रंग दिसत होता, परंतु इटलीचा उत्तर भाग एरियन लोकांनीं बळकाविल्यामुळें व होनोरियस बादशहानें रॅव्हेना ही आपली राजधानी केल्यामुळें ही भीति नाहींशी झाली. परंतु रोमच्या बिशपचें सर्व पाश्चात्त्य बिशपांवरील वर्चस्व बरेंच कमी झालें; हे सर्व बिशप स्वतंत्रपणें वागूं लागले; परंतु 'होली सी' शीं मात्र त्यांचा विरोध नव्हता. पूर्व रोमन साम्राज्यांतील चर्चच्या भांडणांत सर्व पश्चिमरोमन साम्राज्यांतील चर्चचा प्रतिनिधी म्हणून पोपनें काम करावें हें सर्व बिशपांना संमत होतें.

सें ट ग्रे ग री ( पहिला ).—इ. स ५९० त सेंट ग्रेगरी ( पहिला ) याला पोप निवडण्यांत आलें. या वेळीं न्यू रोम ही राजधानी असल्यामुळें, त्या शहराचें रोमवर वर्चस्व असे. स. ७५४ त फ्रँकस लोकांच्या ताब्यांत रोम शहर गेल्यामुळें रोमन चर्च व ग्रीक चर्च यांचा संबंध तुटून गेला. पोपांना बादशहा विचारीनासे झाले. परंतु ग्रीक बिशपांच्या इच्छेविरुद्ध जेव्हां जेव्हां कांहीं गोष्टी करण्याची वेळ येई, तेव्हां तेव्हां कान्स्टांटिनोपलचे बादशहा पोपची मदत घेत असत. पहिल्या ग्रेगरीनें स्वतंत्र चर्चांची सत्ता बरीच नियंत्रित केली. त्यानें व नंतरच्या पोपांनीं इंग्लंडमध्यें धर्मप्रचारक मंडळ पाठविल्यामुळें, रोमन चर्चच्या धर्तीवर, इंग्लंडमध्यें एक चर्च बांधण्यांत आलें. थिऑडोर, वुइल्फ्रेड, बेनिडिक्ट वगैरे मंडळींनीं धार्मिक शिक्षणाची चळवळ सुरू केली; व त्या चळवळीचा प्रसार यूरोपखंडातहि झाला. इंग्लंड व जर्मनी येथें पोपच्या प्रतिनिधींनीं स्थापिलेलीं चर्चें रोमच्या सत्तेखालीं होतीं. फ्रँक लोकांच्या साम्राज्यांत जरी रोम शहराचा समावेश केलेला होता, तरी तेथील पोपांनीं प्रीस्ट लोकांवरील आपला अधिकार वाढविण्याची खटपट केली नाहीं ही आश्चर्याची गोष्ट आहे. फ्रँक चर्चाचें नेतृत्व चार्लमन व लुई दि पायस यांच्याकडेच होतें परंतु लुईनंतर फार अव्यवस्था माजल्यामुळें चर्चला कोणीहि नियंता राहिला नाहीं.

नि को ल स ( पहिला ).—८५८ सालीं निकोलस ( पहिला ) याची पोपच्या जागीं निवडणूक झाली. त्यानें पूर्व व पश्चिम रोमन साम्राज्यांतील चर्चमध्यें बरीच चळवळ केली. यावेळीं सर्व यूरोपखंडामध्यें लष्करी जहागिरीची पद्धत चालू झाली होती. रानटी लोक, नार्समेन, सॅरेसिन व हूण लोकांनीं ख्रिस्ती लोकांवर हल्ले केले व पोपची सत्ता अमीरउमरावांकडे जाऊन, पहिल्या ओटोनंतर ह्या सत्तेबद्दल अमीरउमराव व जर्मन राजे यांचा वाद सुरू झाला. अकराव्या शतकांत हिल्डेब्रॅंडनें ( ७ वा ग्रेगरी ) ती सत्ता बळकावून अधिकारदानाविषयीं युद्ध सुरू केलें. नंतर पोप लोकांची सत्ता विलक्षण वाढली.

पाश्चात्य देशांत रोम शहराबद्दल पूज्यबुद्धि असल्यामुळें तेथील यात्रेस फार महत्त्व होतें. धर्मप्रकरणविषयक सर्व सत्ता त्याच्याकडे सोंपविलेली होती; मोठमोठे राजेहि त्याच्या अंकित असून, बादशहास अभिषेक करण्याचा अधिकार पोपकडेच असे. पहिला ख्रिस्ती बादशहा कान्स्टांटिनोपल येथें राहूं लागल्यामुळें त्यानें पश्चिम रोमन साम्राज्यापैकीं सर्व प्रदेश पोपला देऊन टाकिले होते; यामुळें पश्चिमेंतील सर्व राजसत्ता पोपपासून मिळाली आहे अशी कल्पना होती. अशा प्रकारें धार्मिक व राजकीय बाबतींत पोप हा सर्वांत वरिष्ठ अधिकारी होता. रोमचे बिशप हे सेंटपीटरचे वंशज आहेत ही कल्पना इ. सनाच्या दुसऱ्या शतकापासून प्रचलित होती. बिशपांच्या सभेंत पोप नेहमीं अध्यक्ष असून त्याच्या संमतीशिवाय कोणत्याहि प्रश्नाचा निकाल होत नसे.

फार प्राचीन काळापासून रोमन चर्च फार धनाढ्य होतें; डायओक्लिशनच्या वेळीं रोमन चर्चच्या जिंदगीची जप्ती करण्यांत आली, परंतु कान्स्टन्टाइन बादशहानें ती सर्व परत दिली व तेव्हांपासून देणग्यांच्या रूपानें रोमन चर्चच्या मालमत्तेंत एकसारखी भर पडत गेली. चवथ्या व पांचव्या शतकांत रोमन चर्चच्या अंमलाखालीं बराच मुलूख होता; परंतु पुढें फक्त इटलींतील भागावरच पोपचा अंमल राहिला. लोंबार्ड लोकांनीं चर्चचा प्रदेश जप्त केल्यामुळें, सेंट ग्रेगरीच्या वेळीं बायझन्टाइन इटलीवरच पोपचा ताबा होता. परंतु पोप व बायझंटाइन बादशहा यांमध्यें भांडण झाल्यामुळें, फक्त रोमच्या आसपास थोडयाशा प्रदेशावर रोमन चर्चचा अंमल होता.

ग्रीक बादशहांपासून पोपचें संरक्षण न झाल्यामुळें आठव्या शतकांत पोपनें फ्रँक राजाचा आश्रय मागितला. रोम व त्याच्या आसपासचा थोडा मुलूख पीटर नामक गुमास्त्याला अर्पण केलेला असल्यामुळें त्याचा वारस पोप यानें त्या सर्व प्रदेशाचा राज्यकारभार पहावा असें त्या वेळेपासून ठरविण्यांत आलें. अशा प्रकारें पोपच्या राज्यकारभारास प्रारंभ झाला. वरिष्ठ जागा क्लर्जी लोकांना दिलेल्या होत्या; परंतु उपाध्यायेतर लोकांची मदत घेणें त्या लोकांना भाग पडलें; परंतु हलक्या जागांमुळे उपाध्यायेतर लोक भांडूं लागल्यामुळें फ्रँक राजांना मध्यस्थी करावी लागली. इ. स.

८२४ त एक संरक्षित संस्थान बनविण्यांत येऊन उपाध्यायेतर लोकांनां बऱ्याच सवलती देण्यांत आल्या.

इतर बिशपांप्रमाणेंच, पोपची निवडणुकहि क्लर्जी लोकांकडून व उपाध्यायेतर लोकांकडून होत असे. बादशहानें पोपच्या निवडणुकीस आपली संमति दिल्याशिवाय पोपला धर्मासनावर बसूं नये, असें बायझन्टाइन राजांच्या वेळीं ठरविण्यांत आलें; परंतु ही चाल मध्यंतरीं बंद पडली. दहाव्या शतकांतील रोमन राजे व नंतर सॅक्सन बादशहा हे स्वतः पोपची नेमणूक करूं लागले.

हि ल्डे ब्रँ ड कि ंवा सा त वा ग्रे ग री.—पोपांच्या मसलतगारांत हिल्डेब्रँडचा प्रवेश झाल्याबरोबर बरीच सुधारणा झाली. पोपच्या निवडणुकीचा अधिकार लॉर्ड लोकांकडून काढून तो पुन्हां क्लर्जी लोकांनां देण्यांत आला. इ. स. १०७३ त रोमन लोकांच्या संमतीनें हिल्डेब्रँड याची पोपच्या जागीं निवडणूक झाली. त्यानें 'सातवा ग्रेगरी' हें नांव धारण केलें. गृहस्थाश्रमी लोकांच्या इच्छेवर पोपांची निवडणूक आतां अवलंबून राहिली नाहीं. बिशपांची निवडणूकहि उपाध्यायेतर लोकांवर अवलंबून असूं नये असें ग्रेगरीचें म्हणणें होतें. याच त्याच्या मतामुळें अधिकारदानाविषयीं भांडण सुरू झालें. राजे लोकांवरच चर्चचा ताबा असावा व त्यानां गादीवर बसविण्याचा किंवा पदच्युत करण्याचा अधिकार पोपकडे असावा असेंहि ग्रेगरीचें मत होतें. यामुळें पोप व बादशहा यांमध्यें भयंकर युद्ध सुरू झालें.

प्रत्येक गोष्टींत चर्चमध्यें सुधारणा घडवून आणणें, रोमन चर्चचें वर्चस्व सर्व चर्चवर प्रस्थापित करणें, यूरोपमधील सर्व राजानां पोपच्या अंमलाखालीं आणणें, सर्व ख्रिस्ती लोकांत एकोपा करवून, इतर लोकांपासून ख्रिस्ती लोकांचें संरक्षण करणें हे ग्रेगरीचे मुख्य उद्देश होते. परंतु हें काम इतकें अवघड होतें कीं, सुमारें दीडशें वर्षांच्या प्रयत्नांनीं, त्या कामांत अगदीं थोडें यश प्राप्त झालें.

अर्बन (दुसरा).—ग्रेगरीनंतर जे पोप झाले त्यांत दुसरा अर्बन हा फार महत्त्वाचा पोप होऊन गेला. त्यानें कित्येक राजांनां बहिष्कृत करून, त्याच्या सुधारणांच्या विरुद्ध असणाऱ्या कित्येक बिशपांनां त्यानें देहान्त शिक्षा दिल्या. प्रीस्ट व बिशप यांनीं राजांनां वंदन करूं नये असेंहि त्यानें ठरविलें. जेरुसलेममधील ख्रिस्ती लोकांच्या तक्रारी नाहींशा करण्याकरितां, यात्रेकरूंचे हाल कमी करण्याकरितां व मुसुलमानांपासून होणारा त्रास चुकविण्यासाठीं त्यानें धर्मयुद्धाची (क्रूसेड) तयारी केली. परंतु जेरुसलेम, अँटिऑक अलेक्झँड्रिया व कान्स्टांटिनोपल येथील चर्चे रोमन चर्चला जोडणें हें धर्मयुद्धाचें खरें कारण होतें.

ज र्म न बा द श हा पां च वा हे न री व पो प पॅ श ल (दुसरा).—जर्मन बादशहा, पांचवा हेनरी यानें पोप पॅश्चल (दुसरा) पासून बऱ्याच सवलती मिळवून घेतल्या. तथापि चर्चनें राजकीय बाबतींत पडूं नये व गृहस्थ लोकांनीं पोपच्या निवडणुकींत व अधिकारदानाच्या भानगडींत पडूं नये असें पोपनें बादशहाला सुचविलें. राजकीय व धार्मिक प्रकरणें अगदीं भिन्न भिन्न ठेवावीं असें पोपचें मत होतें. दुसऱ्या ख्रिस्ती राजांचा पाठिंबा असल्याशिवाय पोपांनां जर्मनीशीं भांडतां येणार नाहीं हें पॅश्चल यास पूर्णपणें कळून आलें. फ्रान्सच्या पहिल्या फिलिपशीं व लुई दि फॅटशीं पोपनें इ. स. ११०७ मध्यें तह केल्यामुळें रोमचा बचाव झाला. पॅश्चलनें प्रत्येक बाबतींत शांततेचें व प्रतिक्रियेचें धोरण स्वीकारिलें; व त्यानें पोप व बादशहा यांमधील तंट्यास पुन्हां धार्मिक स्वरूप दिलें. पोप व बादशहा या दोघांमध्यें अधिकारदानाचा हक्क विभागला जावा असें इ. स. ११२२ त ठरविण्यांत आलें. परंतु या दोन पक्षांचीं मनें एकमेकांविषयीं शुद्ध झालीं नाहींत. अकराव्या व बाराव्या शतकांत सुधारणा व धर्मयुद्ध अशा ज्या दोन चळवळी उत्पन्न झाल्या त्यांच्या योगानें पोपांच्या राज्याचा पाया बसविला गेला.

ध र्म यु द्धा चे प रि णा म.—ख्रिस्ती लोकांचा जेरुसलेम येथें प्रवेश झाल्याबरोबर, पोपच्या अंगीं दैविक शक्ति आहे असें पाश्चात्य भाविक लोकांनां वाटूं लागलें. जेरुसलेम व जाफा हीं रोमन चर्चच्या स्वाधीन करण्यांत आलीं; धर्मयुद्धामुळें रोमची सत्ता वाढली, इतकेंच नव्हे तर मध्य युगामध्यें पोपचें राजकीय व सांपत्तिक दृष्ट्या फार हित झालें. धर्मयुद्धांतील वीरांनां विशिष्ट प्रकारचे हक्क देण्यांत येऊन पोप व चर्च यांपासून त्यांनां मदत मिळूं लागली.

पो प च्या स त्ते चा वि स्ता र.—बाराव्या शतकांतील दुसऱ्या इनोसंटनें व तिसऱ्या अलेक्झांडरनें आपली (पोपची) सत्ता बरीच वाढविली. दुसऱ्या होनोरियस पोपच्या वेळीं, तिसरा लोथेर बादशहा पोपच्या पूर्णपणें ताब्यांत होता; आपली निवडणूक कायम करावी अशी लोथेर बादशहानें पोपला विनंति केली होती. बिशप लोकांनां निवडून देण्याचा आपला हक्क त्यानें सोडून दिला. अशा प्रकारें या वेळचे बादशहा पोपांनां अगदीं नमून होते; परंतु इ. स. ११५२ त ही स्थिति बदलून गेली. त्या सालीं फ्रेडरिक बारबरोसा हा जर्मनीचा राजा झाला. त्यानें आपल्या निवडणुकीस पोपची मंजुरी मिळविण्याची बिलकुल पर्वा केली नाहीं. परंतु पोपला फ्रेडरिकच्या मदतीची अपेक्षा असल्यामुळें त्याला फ्रेडरिकच्या या कृत्याचा राग न येतां उलट त्यानें आनंद प्रदर्शित करून त्याच्याशीं सख्य केलें. परंतु पोपवर बादशहाचें वर्चस्व स्थापण्याचा त्याचा प्रयत्न असल्यामुळें, यांमध्यें वितुष्ट पडणें अपरिहार्य झालें. चवथा अॅड्रियन व तिसरा अलेक्झांडर या पोपनीं आपल्या पक्षाचें समर्थन करण्याकरितां आटोकाट प्रयत्न केले. अलेक्झांडरच्या अंगीं मनोधैर्य व चिकाटी हे गुण विशेष प्रमाणांत असल्यामुळें, पोपला जय मिळून फ्रेडरिक बारबरोसा याला शरण जाणें भाग पडलें.

त्यानें रोमन चर्चचें धार्मिक बाबतींतील वर्चस्व कबूल केलें व आपण एकनिष्ठ राहूं अशी शपथ घेतली. इंग्लंडमध्यें थॉमस बेकेटचा खून झाल्यामुळें, तिसऱ्या अलेक्झांडर पोपनें इंग्लंडचा राजा दुसरा हेनरी यास शरण येण्यास भाग पाडून, इंग्लंडच्या चर्चवर पोपचें वर्चस्व शाबीत केलें व कँटरबरीच्या आर्चबिशपचे हक्क व उत्पन्न वाढविलें. परंतु अलेक्झांडरच्या पश्चात झालेले पोप अगदीं दुर्बल असल्यामुळें, सहाव्या हेनरी बादशहाच्या वेळीं त्यांची स्थिति फार शोचनीय झाली, परंतु हा हेनरी लवकरच मरण पावला.

ब्रे शि या चा आ र्नो ल्ड.—क्लर्जी लोकांनीं जहागिरी वगैरे घेऊं नयेत, फक्त धर्मविषयक अधिकार त्यांच्याकडे असावा अशी बाराव्या शतकांत चळवळ सुरू झाली; ब्रेशियाचा आर्नोल्ड हा या चळवळीचा प्रचारक होता. तिसऱ्या युजिनियस पोपच्या वेळीं रोमन लोकांनीं क्लार्क व कार्डिनल यांवर हल्ले करून यात्रेकरूंची कत्तल केली. पोप तर पळून गेला. परंतु चवथ्या ॲड्रियन पोपनें या बंडखोर लोकांची खोड मोडण्यासाठीं फ्रेडरिक बारबरोसाची मदत मागितली(११५५). ब्रेशियाच्या आर्नोल्डनें रोमचें प्रजासत्तात्मक राज्य पुन्हां स्थापन करण्याचा प्रयत्न केल्यामुळें, पोप व बादशहा यांच्या संमतीनें त्याला फांशी देण्यांत आलें. रोमच्या लोकांनीं जरी अडथळा केला तरी पोपची ऐहिक सत्ता वाढतच गेली.

पोपची सत्ता वाढत असतां असंतोषाचीं चिन्हें दिसूं लागलीं. सत्तेच्या केंद्रीकरणास प्रत्यक्ष बिशपांनीं विरोध केला. पोपच्या प्रतिनिधींच्या जुलमाबद्दलहि कित्येकांनीं तक्रारी केल्या. सेंट बर्नार्ड यानें पोपच्या फाजील महत्वाकांक्षेवर व ऐषारामावर आपल्या एका ग्रंथांत कडक टीका केली.

ति स रा इ नो सं ट.—तिसऱ्या इनोसंट पोपच्या कर्तृत्वामुळें रोमच्या राजसत्तेची परमावधि झाली. तो मोठा कायदेपंडित व धर्मशास्त्रज्ञ होता. त्यानें आपली राजसत्ता वाढविली; यूरोपमधील राजांना आपले मांडलिक करण्याचा त्यानें प्रयत्न केला. आपण पोप व बादशहा व्हावें अशी त्याची फार इच्छा होती; त्याचा अनेक प्रांतांवर ताबा होता; इंग्लंडचा राजा जॉन व तिसरा हेनरी यांच्या वेळीं इंग्लंडवर पोपचा बराच अंमल होता. परंतु प्रत्यक्ष रोममध्यें, स्थानिक स्वराज्याबरोबर दहा वर्षेपर्यंत पोपला झगडावें लागलें. तथापि रोमन चर्चशिवाय रोमन लोकांचें कांहीं चालण्यासारखें नसल्यामुळें, अखेरीस पोपचाच जय झाला; इटलीच्या म्युनिसिपालिट्यांनीं मात्र पोपचा अधिकार जुमानला नाहीं.एकंदरींत तिसऱ्या इनोसंटच्या वेळीं पोपच्या ताब्यांत बराच मुलूख होता, त्याच्यानंतर झालेल्या चार पांच पोपांनीं आपलें वर्चस्व कायम राखिलें. विश्वविद्यालयांची स्थापना झाल्यामुळें रोमन सत्ता फार वाढली;या विश्वविद्यालयांनीं स्थानिक बिशपांची सत्ता झुगारून देऊन रोमन चर्चचा अंमल कबूल केला. आंतरराष्ट्रीय शिक्षण रोमच्या ताब्यांत येऊन, भिक्षुकवृत्तीच्या मंक लोकांनां अध्यापकांच्या जागा मिळाल्या.

न व वा ग्रे ग री व च व था इ नो सं ट.—नववा ग्रेगरी (१२२७–१२४१) व चवथा इनोसंट (१२४३–१२५४) या पोपांच्या वेळीं बादशहा व पोप यांचें भांडण पुन्हां सुरू होऊन त्यांत होहेनस्टाफेन बादशहांची आहुति पडली इतकेंच नव्हे तर पोप साम्राज्यहि मोडकळीस आलें.

तेराव्या शतकाच्या अखेरीस व चवदाव्या शतकाच्या आरंभीं फ्रेंच राजाची सत्ता अबाधित्व झाल्यामुळें,इतर देशांप्रमाणेंच रोमहि फ्रेंच राजाचें अंकित झालें होतें. दहाव्या ग्रेगरीनें (१२७१–१२७६) फ्रेंच वर्चस्व झुगारून आपली पूर्वीची सत्ता मिळविण्याची खटपट केली. चवथा होनोरियस (१२८५–१२८७) व चवथा निकोलस (१२८८–१२९२) हे पोप स्वतंत्र वृत्तीचे असून उत्तर इटलीचा कांहीं भाग व टस्कनी ही पोपच्या साम्राज्याला जोडण्याची त्यांनीं खटपट केली. आठव्या बॉनिफेस पोपच्या वेळीं(१२९४-१३०३) फ्रेंच राजा व पोप यांमध्यें झालेल्या युद्धांत पोपचा पराभव होऊन पांचवा क्लीमेंट पोप कॅपेशियन राजाच्या पूर्णपणें ताब्यांत आला.

पो प च्या स त्ते चा ऱ्हा स.—या वेळीं लोकांची धर्मश्रद्धा कमी होऊन उपाध्याय लोकांचें वजन कमी कमी होत गेल्यामुळें, पोपसंस्थेचा ऱ्हास होऊं लागला; व गृहस्थ लोकांची सत्ता वाढूं लागली. अक्षम्य धनतृष्णा हें देखील पोपसत्तेच्या ऱ्हासाचें एक कारण असून, याच कारणामुळें आठवा बॉनिफेस पोप व लुई दि फेअर यांमध्यें तंटा उपस्थित झाला. स. १३०५ त पांचवा क्लीमेंट हा पोप झाला; तेव्हांपासून इतिहासास नवीनच वळण लागलें. हा पोप फ्रान्समध्येंच राहिला. इटलीमध्यें निरनिराळे पक्ष असल्यामुळें आपल्या धार्मिक स्वातंत्र्यास धक्का बसेल या भीतीनें तो रोममध्यें गेलाहि नाहीं. फ्रेंच राजा लुई दि फेअर याच्याशीं त्याचें वर्तन अगदीं नम्रपणाचें होतें. इ. स. १३०९ त तो ॲव्हिग्नान येथें राहूं लागला. तेव्हांपासून पोपांच्या बाबिलोनमधील हद्दपारीच्या काळाला सुरवात झाली.त्यामुळें चर्चचें फार नुकसान झालें.त्याच्या मरणानंतर दोन वर्षेपर्यंत पोपची जागा रिकामी पडली होती; नंतर स.१३१६ त २२ व्या जॉनची पोपच्या जागीं निवड झाली. तोहि ॲव्हिग्नान येथेंच रहात असे. या वेळेपासून रोम व इटली यांपासून पोपांची ताटातूट झाली व ते फ्रेंच राजांचे ताबेदार बनले. यामुळें इतर राष्ट्रांच्या मनांतून तो अगदीं उतरला. चर्च व साम्राज्य यांमधील भांडण पुन्हा सुरू झालें. जर्मन राजा, लुई ऑफ बव्हेरिया हा पोपचा मुख्य प्रतिपक्षी असून त्याला मोटमोठ्या बलाढ्य राजांचें साहाय्य होतें. अखेरीस पोपला पदच्युत करून, दुसऱ्या पोपची निवड झाली. या भांडणामुळें पोपला फ्रेंच राजावर अधिकच अवलंबून रहावें लागलें. हें भांडण चाललें असतांच पोप, २२ वा जॉन इ. स. १३३४ त मरण पावला.

स हा वा इ नो सं ट.—इ स. १३५२ त सहावा इनोसंट हा पोपच्या गादीवर बसला. तो प्रामाणिक व सरळमार्गी

होता. धार्मिक सुधारणा करून साम्राज्याला स्थायिक स्वरूप देण्याचा त्यानें प्रयत्न केला; व इटलीमध्यें पोपचें वर्चस्व पुन्हां स्थापिलें. आपली राजधानी पुन्हां रोम येथें न्यावी असेंहि त्याच्या मनांत होतें, परंतु ती गोष्ट तडीस गेली नाहीं.

पांचवा अर्बन.—पांचव्या अर्बन पोपनें चवथ्या इनोसंटची इच्छा पूर्ण केली. इसवी सन १३६७मध्यें तो रोममध्यें परत गेला. इ. स. १३६८ त चवथा चार्लस बादशहा रोम शहरीं गेला व पोप आणि बादशहा यांचा समेट झाला. या दोन गोष्टींमुळें अर्बनचें नांव संस्मरणीय झालें आहे; परंतु इटलीमधील परिस्थिति चमत्कारिक असल्यामुळें, इटलीशीं पोपचें न पटून तो इ. स. १३७० त ॲव्हिग्नान येथें परत गेला. तो फार सुस्वभावी होता; चर्चमधील अनीतिप्रवर्तक आचरणास आळा घालण्याचा त्यानें प्रयत्न केला, परंतु त्यांत त्याला यश आलें नाहीं.

अकरावा ग्रेगरी.—अकरावा ग्रेगरी(१३७०–१३७८) हाहि, विद्वान, नीतिमान, धार्मिक, विनयशील व सुज्ञ होता, परंतु अर्बननें रोम शहराचा त्याग केल्यामुळें ग्रेगरीला फराच त्रास झाला. पोपला फ्रेंच वळण लागलेलें पाहून इटलीचें मन पोपविषयीं कलुषित होऊन इटली व फ्रान्स यांमध्यें लढा उत्पन्न झाला. सेंट कॅथेराइनच्या विनंतीवरून ग्रेगरीनें रोममध्यें प्रवेश केला ( १३७७ ), व अशा प्रकारें फ्रान्समध्यें झालेली पोपांची हद्दपारी संपली.

इ. स. १३७८ त सहाव्या अर्बनला पोप करण्यांत आलें; परंतु या निवडणुकीला कार्डिनल लोकांनीं विरोध केला. कारण त्याच्या सुधारणांच्या कल्पना त्यांनां संमत नव्हत्या. रोमन लोकांनीं केलेली पोपची निवडणूक बेकायदेशीर आहे असें कार्डिनलांनीं प्रसिद्ध केलें; फ्रेंच राजा पांचवा चार्लस याची त्या लोकांनां मदत असल्यामुळें, त्यांनीं एका प्रतिस्पर्धी पोपाची (सातवा क्लेमेंट) निवड केली व अशा प्रकारें ख्रिश्चन लोकांमध्यें दुफळी झाली ( १३७८–१४१७).

पोप ॲव्हिग्नान येथें रहात असतां प्रपंचरत कार्डिनलांचें एक कॉलेज स्थापन झालें; या दुफळीचा सर्व दोष या कॉलेजकडे व फ्रान्सच्या पांचव्या चार्लसकडे आहे. बादशहा चवथा चार्लस, इंग्लंड, हंगेरी, पोलंड वगैरे देश व इटलीमधील बहुतेक संस्थानें( मूळ )पोपच्या बाजूचीं असून, फ्रेंच राजा पांचवा चार्लस, स्कॉटलंड, स्पेन व पोर्तुगाल यांनीं प्रतिस्पर्धी पोपला पाठिंबा दिला. पहिल्या पोपनें कार्डिनलांचें एक नवें कॉलेज काढिलें; परंतु आपल्या स्वतःच्या हिताकडे त्यानें अधिक लक्ष्य दिलें ही त्याची मोठी चूक झाली; त्यानें नेपल्सशीं भांडण केलें. कार्डिनलांच्या नव्या कॉलेजशींहि त्याचें वैमनस्य पडलें. अशा स्थितींत तो इ. स. १३८९ त मरण पावला.

नववा बॉनिफेस.—नवीन कार्डिनलांनीं पिट्रो तोमेसेली यास पोप केलें; नववा बॉनिफेस या नांवानें तो प्रसिद्ध आहे. तो नीतिवान, दयाळु व चतुर होता. त्यानें नेपल्सशीं सख्य केलें. रोममधील लोकसत्तात्मक राज्य मोडून त्यानें तेथें पोपचें वर्चस्व स्थापिलें. राज्यकर्ता या दृष्टीनें नवव्या बॉनिफेसचें फार महत्त्व आहे; परंतु पोप या नात्यानें नांव ठेवण्यास त्याला बरीच जागा आहे. त्याचीं धनप्राप्तीचीं साधनें निंद्य असून तो पक्षपातीहि होता. त्यानें पोपांची दुफळी मोडण्याच्या कामीं दुर्लक्ष केलें. त्यानें त्याचा प्रतिस्पर्धी पोप सातवा क्लेमेंट मरण पावल्यावर ॲव्हिग्नानच्या कार्डिनलांनीं तेराव्या बेनिडिक्टची पोपच्या जागीं निवडणूक केली. दोन निरनिराळे पोप निवडले गेल्यामुळें जिकडे तिकडे बंडाळी माजून राहिली होती. व अशा प्रकारें कॅथॉलिक चर्चवर फारच आणीबाणीचा प्रसंग आला होता: कर्जी लोक ऐहिक सुखांत निमग्न झाले होते व नास्तिक लोकांचें इंग्लंड, फ्रान्स, इटली, जर्मनी व बोहेमिया या देशांत प्राबल्य झाल्यामुळें चर्चवर मोठें संकट आलें होतें.

बारावा ग्रेगरी.—बाराव्या ग्रेगरीनें ( १४०६–१५ ) चर्चमध्यें ऐक्य असावें याबद्दल प्रथम बरीच खटपट केली; परंतु पुढें त्यानें आपलें धोरण बदललें, यामुळें कार्डिनल लोकांचीं मनें क्षुब्ध झालीं. हें पाहातांच त्यानें नवीन कार्डिनलांची नेमणूक केली.

प्रतिस्पर्धी पोप तेरावा बेनिडिक्ट हा पोपांची दुफळी मोडण्याचा प्रयत्न करीत नाहीं असें पाहून फ्रान्सनें त्याची बाजू सोडून देऊन त्याचें कार्डिनल आणि बाराव्या ग्रेगरीशीं भांडून गेलेले कार्डिनल यांच्यामध्यें ऐक्य केलें. पोपची जागा रिकामी पडली आहे अशी कल्पना करून कार्डिनलांनीं चर्चचा कारभार आपल्या हातीं घेतला व पीसा येथें एक सभा भरविण्याचा त्यांनीं घाट घातला. दोन्ही पोपांनीं याविरुद्ध बरीच खटपट केली, परंतु त्यांचें कांहींएक चाललें नाहीं.

विश्वविद्यालयें व अनेक विद्वान लोक कार्डिनल लोकांच्या पक्षाचे असल्यामुळें दोन्ही पोपांवर आमचा ताबा आहे असें कार्डिनल म्हणूं लागले; व दोन्ही पोप नास्तिक असून दुफळी माजविणारे असल्यामुळें ते पदच्युत झाले आहेत असें त्यांनीं जाहीर केलें. व इ. स. १४०९ त मिलनच्या कार्डिनल आर्चबिशपला पोप निवडलें. त्यानें पाचवा अलेक्झांडर असें नांव धारण केलें. परंतु दोन्ही पोपांना निरनिराळ्या देशांची मदत असल्यामुळें त्यांनीं आपला अधिकार सोडला नाहीं: अशा प्रकारें आतां तीन निरनिराळे पोप झाले. या नवीन पोपच्या मृत्यूनंतर २३ वा जॉन हा पोप झाला, परंतु हा नीतिभ्रष्ट असल्यामुळें पोप होण्यास अगदीं नालायक होता. जर्मनीचा बलाढ्य राजा सिजिस्मंड यानें हा पोपांसंबंधाचा तंटा मिटवावा असें लोक म्हणूं लागले. सिजिस्मंडनें एक मोठी सभा भरविली ( कौन्सिल ऑफ कान्स्टन्स ). तेविसाव्या जॉननें त्या सभेला हजर राहण्याचें कबूल केलें; परंतु तेथें आपलें कांहींच वजन नाहीं असें पाहून तो तेथून पळून गेला. पोपची सत्ता मर्यादित करावी

व सर्वसाधारण सभेचे नियम पोपसह सर्वांनीं पाळावे असें ठरविण्यांत आलें. त्या सभेनें २३ व्या जॉनला पदच्युत केलें. आपण कायदेशीर पोप आहोंत असें सामान्य सभेनें कबूल केल्यास आपण राजीनामा देण्यास तयार आहोंत असें बाराव्या ग्रेगरीनें त्या सभेला कळविलें. ही अट मान्य करून त्याचा राजीनामा मंजूर करण्यांत आला.

ग्रेगरीनंतर पोपची जागा रिकामी पडल्यामुळें चर्चचा कारभार मंत्रिमंडळाकडे गेला; परंतु पोपची निवडणूक करण्याची कार्डिनलांनीं खटपट केल्यामुळें पांचव्या मार्टिनची पोपच्या जागीं नेमणूक झाली.

पांचवा मार्टिन.—मार्टिन पोप झाल्याबरोबर चर्चमध्यें ऐक्य झालें विश्वव्यापी चर्चचा कारभार हांकण्याची योग्यता मार्टिनच्या अंगीं होती. फ्रान्स किंवा जर्मनींत पोपचें वसतिस्थान न करतां रोममध्यें राहण्याचें त्यानें ठरविलें. त्यानें कलाकौशल्यास उत्तेजन देऊन रोम शहराची सुधारणा करण्याकरितां बराच पैसा खर्च केला. त्यानें आपली राजकीय सत्ताहि वाढविण्याचा प्रयत्न केला; व आपल्या कुटुंबांतील लोकांनां मोठमोठ्या जागा दिल्या. त्यानें पोपची दुफळी मोडून टाकिली. कार्डिनलांच्या कॉलेजांत त्यानें प्रसिद्ध प्रसिद्ध लोकांचा समावेश केला. तो इ. सन १४३१ त मरण पावला. त्याच्या वेळच्या लोकांनां त्या पोपपासून परमानंद झाला असें त्याच्या थडग्यावर लिहिलें आहे.

चवथ्या युजिनियसची कारकीर्द सुखावह झाली नाहीं. जिकडे तिकडे भांडणें सुरू झालीं. सिजिस्मंड बादशहानें पोप व मंत्रिमंडळ यांचा समेट केला. परंतु इ. सन १४३४ त फारच मोठी बंडाळी झाल्यामुळे पोप फ्लारेन्समध्यें पळून गेला.

पोप फ्लारेन्स येथें गेल्यावर उदात्त-वाङ्मयाचा अभ्यास करणाऱ्या लोकांशीं त्याचा निकट सहवास झाला व याच गोष्टीमुळें त्या लोकांचा रोमच्या व्यवस्थापक मंडळांत हळू हळू प्रवेश झाला.

युजिनियस हा नास्तिक आहे असें ठरवून त्यास पदच्युत करण्यांत आलें, व पांचवा फेलिक्स हा पोप झाला. परंतु ही दुफळी लोकांनां न आवडून त्यांनीं चवथ्या युजिनियसला परत बोलाविलें.

पांचवा निकोलस.—युजिनियसनंतर पांचवा निकोलस (१४४७–१४५५) हा पोप झाला. तो पोपच्या गादीवर बसतांच विद्या व ललितकला यांचें पुनरुज्जीवन झालें. चर्चच्या हिताकडे त्याचें फार लक्ष असे. त्यानें शास्त्र व कला भरभराटीस आणिल्या. त्यानें बॅसेलचें मंत्रिमंडळ मोडून पांचवा फेलिक्स (प्रतिस्पर्धी पोप) यास राजीनामा देण्यास लावलें. पुढें तुर्क लोकांनीं इ. स. १४५३ त कान्स्टांटिनोपल काबीज केल्यामुळें त्या लोकांवरोबर झगडण्यासाठीं सर्व ख्रिस्ती लोकांची एकी करण्याचा निकोलसनें प्रयत्न केला; पण तो निष्फळ झाला. तो इ. स. १५५५ त मरण पावला. या वेळेस रोम हें वाङ्मय व कला यांचें केन्द्रस्थान झालें.

दुसरा पायस.—पोप दुसरा पायस (१४५८–६४) हा पोपच्या जागेला अगदीं योग्य मनुष्य होता; तो कवि, इतिहासकार व मुत्सद्दी होता. त्यानें रोमन चर्चचा दरारा बराच वाढविला. अविश्रांत परिश्रम करून प्रचंड धर्मयुद्धाची त्यानें तयारी केली. परंतु तो मध्यंतरींच मरण पावला.

चवथ्या सिक्सटस (१४७१–८४) पासून राजकारणी पोपांच्या मालिकेस सुरवात झाली. या पोपनें प्रापंचिक गोष्टींत अधिक लक्ष घातलें, इटलीच्या राजाच्या तंत्रानें तो वागूं लागला व आपल्या आप्तेष्टांनां मोठमोठ्या हुद्द्यांच्या जागा त्यानें दिल्या; आणि कला व शास्त्रें यांस त्यानें उत्तेजन दिलें.

पंधराव्या शतकाच्या अखेरीस कार्डिनल लोक प्रापंचिक बनल्यामुळें नीतिभ्रष्ट अशा मनुष्याची (सहावा अलेक्झांडर १४९२–१५०३) पोपच्या जागीं निवडणूक झाली. लवकरच कार्डिनल लोकांनीं पोपच्या विरुद्ध तक्रारी करून फ्रान्सच्या राजाची मदत मागितली, परंतु फ्रान्स राजानें पोपशीं समेट केला. पोपनें तुर्क लोकांबरोबर लढण्याचा प्रयत्न करून ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला.

दुसरा ज्यूलियस.—दुसऱ्या ज्यूलियसनें (१५०३–१३) पोपची सत्ता वाढवून फ्रान्सच्या वर्चस्वापासून रोमन चर्चची मुक्तता केली. परंतु तेथें स्पेनचें वर्चस्व झालें. धर्मविषयक बाबतींत लांच घेण्याची चाल त्यानें बंद केली, व कलाकौशल्यास उत्तेजन दिलें. त्यानें सेंटपिटरचें कॅथिड्रल बांधण्यास सुरवात केली.

दहावा लिओ.—इ. स. १५१३ त दहावा लिओ हा पोप झाला. राजकीय व धार्मिक बाबतींत रोमन चर्चचें स्वातंत्र्य वाढविण्याची त्यानें खटपट केली. त्यानें धर्मयुद्धाची तयारी देखील केली. तो चैनी व विलासी होता, तरी दानधर्म करण्यांत त्यानें मोठें औदार्य दाखविलें.

सहावा ॲड्रियन.—सहाव्या ॲड्रियननें चर्चमध्यें महत्त्वाच्या सुधारणा केल्या. परंतु लूथर व त्याचे अनुयायी यांनीं ॲड्रियनची फार निंदा केली. हा पोप फार सन्माननीय होता यांत संशय नाहीं. स्वार्थाकडे यत्किंचितहि लक्ष न देतां चर्चमध्यें सुधारणा करण्यांत त्यानें आपला काळ घालविला.

तिसरा पॉल.—तिसऱ्या पॉलनं रोमन कॅथोलिक पंथांत बरीच सुधारणा केली. त्यानें लायक माणसांची निवड करून कार्डिनलांच्या कॉलेजांत पुन्हां उत्साह उत्पन्न केला व प्रॉटेस्टंट पंथाचा प्रसार बंद करण्याकरितां इन्क्विझिशन सभा स्थापिली.

पांचवा पायस.—पांचवा पायस (१५६६–७२) हा डॉमिनिकन ऑर्डरचा मेंबर होता; तो स्वतः त्या पंथाचे नियम कडकपणें पाळीत असे; त्याला साधु असें म्हणत

असत. मठवासी लोकांनां त्यानें उत्तम शिस्त लाविली व बिशपांनीं आपल्या वसतिस्थानांत राहिलें पाहिजे असा त्यानें नियम केला. पोपनें मेरी स्टुअर्ट, फ्रान्सचा राजा नववा चार्लस व स्पेनचा राजा दुसरा फिलिप यांनां साहाय्य केलें. तुर्क लोकांच्या बरोबर भांडणांतहि त्याला यश प्राप्त झालें. त्याच्या कारकीर्दीत कॅथोलिक पंथाची पूर्ण सुधारणा झाली. पांचव्या पायसनंतर जे पोप होऊन गेले त्यांनीं कॅथोलिक पंथाचा प्रसार करण्याकरितां अमेरिका, हिंदुस्थान, चीन व जपान येथें धर्मोपदेशक पाठविले, व प्रॉटेस्टंट धर्माची प्रगति होऊं न देण्याविषयीं बरेच प्रयत्न केले.

तेराव्या ग्रेगरीनें (१५७२–८५) कॅथोलिक पंथाचा प्रसार सर्वत्र करण्याकरितां अत्यंत परिश्रम घेतले. त्यानें शिक्षणसंस्थांनां उत्तेजन दिलें. रोममध्यें त्यानें कॉलेज ऑफ जेसुइट्स स्थापन केलें. त्यानें पंचांगांत केलेली सुधारणा प्रसिद्ध आहे. ह्युगीनॉटपासून कॅथॉलिक पंथाचें व राजकुटुंबाचें संरक्षण करण्यासाठीं त्यानें सेंट बार्थोलोम्यूचा सण साजरा केला.

पांचवा सिक्स्टस.—पांचव्या सिक्सटसनें (१५८५–९०) लुटारू लोकांचा बंदोबस्त करून पोपसाम्राज्यांत नीट व्यवस्था केली. त्यानें शास्त्रांनां उत्तेजन देऊन व्हॅटिकन लायब्ररीची वाढ केली. शेतकी व व्यापार यांचा त्याच्या वेळीं उत्कर्ष झाला. इंग्लंडला रोमच्या अंमलाखालीं आणण्याची त्याची इच्छा होती. परंतु स्पॅनिश आर्मेडाचा नाश झाल्यामुळें त्याची इच्छा सफल झाली नाहीं.

आठवा क्लीमेंट.—आठव्या क्लीमेंटनें (१५९२–१६०५) फ्रान्सशीं सख्य केलें. पंधराव्या ग्रेगरीच्या वेळीं (१६२१–२३) रोमन चर्चमध्यें ज्याप्रमाणें सुधारणा झाली, तशी केव्हांच झाली नाहीं. फ्रान्समध्यें ह्युगीनॉट्स लोकांचे सर्व लष्करी अधिकार काढून घेण्यांत आले. इंग्लंडमध्यें पहिल्या जेम्सनेंहि कॅथॉलिक पंथाला विरोध केला नाहीं.

पोपची राजसत्ता.—यावेळीं पोपच्या राजकीय सत्तेचा बराच विस्तार झाला; परंतु सांपत्तिक स्थिति समाधानकारक नव्हती. केवळ आपल्यावर अवलंबून राहतील अशीं कांहीं माणसें आपणांपाशीं पाहिजेत असें पोपनां वाटूं लागल्यामुळें त्यांनीं आपल्या नातलगांनां मोठमोठ्या हुद्द्याच्या जागा देऊन टाकिल्या. परंतु एखाद्या घराण्याला जें हितकारक होतें तें राज्याला विनाशकारक झालें. एका पोपाचे जे मित्र असत ते दुसऱ्या पोपचे शत्रू होत, कारण प्रत्येक वेळीं पोप निवडला जात असल्यामुळें एका पोपचा दुसऱ्याशीं संबंध नसे. पैशाच्या अडचणींमुळें कर वाढवावे लागले. ह्या करांचा बोजा सामान्य जनसमूहावर पडला. शेतकरी लोकांचे हाल होऊं लागले; चोऱ्या होऊं लागल्यामुळें व्यापारहि नीट चालेनासा झाला. परंतु कॅथोलिक धर्मप्रचारकांनीं आपलें काम उत्तम प्रकारें केलें.

१६४८ पासून १७८९ पर्यंतच्या मुदतींत पोपच्या राजकीय सत्तेचा ऱ्हास होऊन सांपत्तिक स्थितीहि निकृष्ट झाली व लोकांची धर्मजागृतीहि अगदीं शिथिल झाली. परंतु सातवा अलेक्झांडर (१६५५–६७) व बारावा इनोसंट (१६९१–१७००) या पोपांनीं आजपर्यंत चालत आलेला नातलगांविषयींचा पक्षपात सोडून दिला व त्याच्यानंतर झालेल्या पोपांनीं आपली सांपत्तिक स्थिति सुधारण्याचा प्रयत्न केला. बाराव्या क्लीमेंटनें (१७३०–४०) कागदी नोटा काढून एक सोडत (लॉटरी) काढिली परंतु त्याचा परिणाम चांगला झाला नाहीं. सहाव्या पायसच्या वेळीं (१७७५–१७९९) कागदी नोटांनां कोणी विचारीनासें झालें व चर्चचें दिवाळें वाजण्याची वेळ आली. परंतु मोठ्या फ्रेंच राज्यक्रांतीमुळें चर्चचा बचाव झाला.

पोप व फ्रान्सचा राजा या दोघांचीहि सांपत्तिक स्थिति फार भयंकर झालेली होती; परंतु धर्मसंस्थेच्या मालमत्तेची जप्ति व विक्री करून फ्रान्सनें आपला बचाव केला; परंतु पोपला ही गोष्ट करतां येण्यासारखी नव्हती; पोपनें फ्रान्सच्या या कृत्याचा निषेध केल्यामुळें फ्रान्सचें पोपशीं वैमनस्य पडलें. स. १७९१ त फ्रान्सनें ॲव्हिग्नान व व्हेनेसिन आपल्या ताब्यांत घेतलीं. स. १७९३ त रोम शहरांत फ्रेंच वकिलाचा खून झाला. स. १७९७त पोपनें ॲव्हिग्नान वगैरे शहरांवरचा आपला हक्क सोडून, आपलें सैन्य कमी करण्याचें व मोठा दंड भरण्याचें कबूल केलें. परंतु रोममध्यें फ्रेंच जनरल डयूफो याचा खून झाल्यामुळें फ्रेंच सैन्यानें पोपला कैद करून नेलें. तो कैदेंतच इ. स. १७९९ त मरण पावला. त्याच्यानंतर सातवा पायस पोप झाला (१८००–२३). फ्रान्सनें चर्चच्या मालमत्तेच्या केलेल्या विक्रीस पोपनें आपली संमति देऊन धर्माधिकाऱ्यांच्या जागाहि कमी केल्या; सरकारनें बिशप नेमावेत परंतु त्या नेमणुका पोपनें कायम कराव्या असें ठरविण्यांत आलें व फ्रान्सनें पोपची ऐहिक सत्ता कबूल केली. नेपोलियन यास राज्याभिषेक करण्याचें पोपनें कबूल केलें (१८०४). परंतु लवकरच फ्रान्स व पोप यांचें वितुष्ट पडून नेपोलियननें पोपचा मुलूख आपल्या ताब्यांत घेतला व त्याला फ्रान्समध्यें नेलें. पुढें नेपोलियनच्या सत्तेला उतरती कळा लागल्यामुळें त्यानें पोपला बंधमुक्त करून त्याचा मुलूख त्याच्या स्वाधीन केला. इ. स. १८१४ त पोपनें रोममध्यें प्रवेश केला. त्यानें जीझसच्या सोसायटीची पुनर्घटना केली (१८१४). साम्राज्याच्या घटकावयवांमध्यें जो करार झाला त्याच्या योगानें जर्मनींतील सर्व धर्मसंस्था प्रांपचिक झाल्या. अशा प्रकारें होली रोमन साम्राज्यांतील धर्माधिकाऱ्यांची राजकीय सत्ता नष्ट झाली व प्रॉटेस्टंटपंथी प्रशियाच्या ताब्यांत हा सर्व मुलूख गेला.

१८१४ पासून १८३० पर्यंतच्या कालामध्यें यूरोपमध्यें सर्व ठिकाणीं राज्यसत्तेची पुन्हां स्थापना झाली; या राजांनीं कॅथॉलिक चर्चची पुन्हां स्थापना केल्यावर राजे व पोप यांनीं राज्यक्रांतीविरुद्ध आपलें मत प्रदर्शित केलें. मोठ्या युक्तीनें

पोपनें ग्रेटब्रिटनशीं सख्य केलें. आठव्या पायस पोपच्या वेळीं (१८२९-३०) इंग्लंडमध्यें कॅथॉलिक बंधविमोचन (राजकीय, सामाजिक वगैरे हक्कांची प्राप्ति) झालें. फ्रान्समध्यें जेसुइटस लोकांच्या विरुद्ध चळवळ चालू होती. फ्रान्समधील जेसुइटस लोकांचीं घरें बंद करण्याची पोपनें परवानगी दिली (१८४५).

स. १८३० च्या राज्यक्रांतीमुळें पोपला परकी लोकांवर अवलंबून रहावें लागलें. फ्रान्स व ऑस्ट्रिया यांच्या तंत्रानें त्याला वागावें लागलें. यामुळें इटलीच्या एकीकरणाला अडथळा झाला. इटालियन लोकानां पोपचा राग आला. चर्चचा वरिष्ठ अधिकारी व इटालींतील एका भागाचा राजा असा पोप हा दुहेरी अधिकारी होता; हा त्याचा परस्परविरोधी अधिकार नाहींसा होण्याच्या बेतांत होता, परंतु पोप नववा पायस (१८४६-७८) याच्या कर्तृत्वशक्तीमुळें हें संकट लांबणीवर गेलें.

स. १८४९ पासून १८७० पर्यंत पोपचें फ्रान्सशीं विशेष सख्य होतें. पोपला मदत केल्यानें कॅथॉलिक लोकानां बरें वाटेल व आपल्यालाहि अनेक सवलती मिळतील असें लुई नेपोलियनला वाटलें. चर्चला खूप ठेवण्यासाठीं प्रजासत्तात्मक फ्रान्सनें रोमन प्रजासत्तात्मक राज्य नाहींसें केलें. परंतु त्यापासून कांहीं एक फायदा झाला नाहीं, परंतु त्याला पोपचें रक्षण करावें लागलें. १८५९ सालांतील इटलीच्या युद्धांत पोपचा बहुतेक मुलूख त्याच्या ताब्यातून गेला. पोपला मदत करणें, ऑस्ट्रेलियन लोकांनां इटलींतून हांकून देणें व प्रशियावर हल्ला करणें ह्या तीन मुख्य गोष्टी नेपोलियन (तिसरा) नें आपल्यापुढें ठेविल्या.

फ्रेंच सैन्य रोममधून निघून गेल्यावर व्हिक्टर इमॅन्युल (इटलीचा) राजाच्या सैन्यानें त्या शहरीं प्रवेश केला. या राजाचें पोपशीं वैमनस्य होतें. इटलीच्या राज्याची घटना करतेवेळीं यानें पोपचा बहुतेक सर्व मुलुख हरण केल्यामुळें, पोपकडे फक्त पांचच प्रांत शिल्लक राहिले (१८६१). स. १८६७ त चर्चमालमत्तेची जप्ती करून रोम शहरहि त्यानें आपल्या हस्तगत केलें.

इटलीचा पोपशीं विरोध होता, परंतु स्पेननें पोपचें वर्चस्व कबूल केलें. स्पेनच्या दुसऱ्या इसाबेलानें १८५१ सालीं रोमन धर्मांचे सर्व हक्क कबूल करून, शिक्षणखातें चर्चच्या हवालीं केलें. परंतु स. १८६८ च्या राज्यक्रांतीनंतर स्पेननें आपल्या लोकांनां धर्मस्वातंत्र्य दिलें. ऑस्ट्रियानेंहि चर्चचे हक्क कबूल केले; परंतु पुढें ऑस्ट्रियानें आपल्या लोकांस धर्मस्वातंत्र्य दिलें.

बेल्जम हा देश कॅथॉलिक पंथाचा बडा अभिमानी आहे. हॉलंडमध्यें रोमनकॅथॉलिक लोकांची संख्या फारशी नाहीं. एकोणिसाव्या शतकांत रोमन कॅथॉलिक पंथाला यूरोपांत फारसे नवीन अनुयायी मिळाले नाहींत.

जर्मन व आयरिश लोकांनीं युनायटेडस्टेट्स ऑफ अमेरिकेंत स्थलांतर केल्यामुळें, तेथें मात्र कॅथॉलिक पंथाचा प्रसार फार झपाट्यानें झाला.

एकोणिसाव्या शतकांत चर्चच्या ताब्यांतील प्रदेशावरील पोपची सत्ता ढिली होत होती, परंतु परकीय देशांतील प्रांपचिक गोष्टींत त्याचा अधिकार वाढत गेला. पोपच्या सत्तेचा फाजील कैवार घेतला गेल्यामुळें, रोम शहर हें सत्तेचें केन्द्रस्थान झालें. अशा प्रकारें पोपची राजकीय सत्ता ज्या वेळीं कमी झाली, त्याच वेळीं त्याच्या पारमार्थिक सत्तेची वाढ झाली.

इ. स. १८७० मध्यें चार महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या: (१) पोप हा दोषातीत आहे, असें प्रसिद्ध करण्यांत आलें. (२) तिसऱ्या फ्रेंच प्रजासत्तात्मक राज्याची स्थापना झाली. (३) इटलीनें रोम शहर आपल्या ताब्यांत घेतल्यामुळें, चर्चच्या शिल्लक राहिलेल्या संस्थानांचा इटलीच्या राज्यांत समावेश झाला व (४) प्रशियाचा राजा जर्मन बादशहा झाला. या गोष्टींचा परिणाम सर्व यूरोपवर झाला, इतकेंच नाहीं, तर पोपच्या धोरणावरहि त्याचा परिणाम झाला. जर्मन व प्रशियन मुत्सद्द्यांनीं रोमन चर्चची राजसत्ता नाहींशी करण्याचा प्रयत्न चालविला होता. प्रशियन मंत्रिमंडळांतून कॅथॉलिक लोकांची लवकरच हकालपट्टी झाली.

पोप हा दोषातीत आहे अशी सर्व लोकांची खात्री करून देण्याचा नवव्या पायसचा उद्देश होता. परंतु जर्मनी व फ्रान्स या देशांत वरील मताविरुद्ध चळवळ चालू होती. परंतु शाळा व चर्चनेमणुका ताब्यांत घेण्याविषयीं जर्मन बादशहा व पोप यांचा जो तंटा झाला (१८७२-८७) त्या तंट्यामुळें पोपचा बचाव झाला. इ. स. १८७८ त नववा पायस मरण पावला. त्याच्या मरणसमयीं रोमन चर्च अगदीं मोडकळीस आलें होतें व बहुतेक सर्व देशांशीं त्याचें वैमनस्य होतें.

लिओ, तेरावा (१८७८-१९०३).—त्याच्यानंतर तेरावा लिओ हा पोप झाला. तो स्वभावानें शांत व विचारी असून विद्वान होता. त्याला अर्वाचीन राजकारणाचीहि बरीच माहिती होती. तो आजपर्यंत रोममध्यें रहात नसल्यामुळें तो निःपक्षपाती असेल असें लोकांना वाटत होतें. रशिया, जर्मनी व फ्रान्स यांनां बऱ्याच सवलती देऊन पोपनें त्याच्याशीं सख्य केलें.

राजसत्ता मिळविण्याची त्याची फार इच्छा होती; परंतु आस्ट्रिया, जर्मनी व इटली यानीं सलोख्याचा तह केल्यामुळें पोपची बरीच निराशा झाली. इटलीच्या राजाचें पोपशीं वैमनस्य होतें. इटलींत प्रजासत्तात्मक राज्य असावें असें पोपला वाटत होतें. परंतु तसें घडून येण्यास फ्रेंच प्रजासत्तात्मक राज्य कायम राहणें अवश्य होतें. सबब, प्रजासत्तात्मक राज्यपद्धत हीच सर्व राज्यपद्धतींत उत्तम आहे असें प्रतिपादन करीत जा, असें फ्रेंच कॅथॉलिक लोकांनां सांगण्यांत आलें.

निरनिराळ्या राष्ट्रांच्या सामर्थ्यांत समतोलपणा राखण्याचा तेराव्या लिओचा प्रथमतः उद्देश होता; परंतु फ्रान्सशीं सख्य केल्याबरोबर त्यानें आपला तो उद्देश सोडून दिला. त्याच्या वेळीं कॅथॉलिक विद्वानांचा फार छळ झाला. सर्व धर्माधिकाऱ्यांनां त्यानें राजकारणांत गुंतवून दिलें. लिओच्या कारकीर्दीत झालेल्या सर्व अनर्थांबद्दल त्याला जबाबदार धरणें योग्य नाहीं हें खरें आहे. परंतु सामाजिक बाबतींत त्यानें ढवळाढवळ केली इतकेंच नव्हे, तर राजकीय गोष्टींतहि चर्चेचें वर्चस्व असलें पाहिजे असें त्यानें जाहीर केलें.

लिओच्या कारकीर्दीत चर्चमधील धार्मिक विधींसंबंधीं औदासिन्य दिसूं लागलें. धर्माधिकाऱ्यांचें ऐहिक गोष्टींकडे लक्ष गेलें. विद्वान व उदारमतवादी लोकांचा छळ झाला. जर्मन व अँग्लो-सॅक्सन लोकांचीं मनें अधिकाधिक कलुषित होऊं लागलीं. परंतु सामाजिक प्रश्न आपल्या हातीं घेऊन गरीब व दुबळ्या लोकांविषयीं आपलें काय कर्तव्य आहे तें चर्चनें श्रीमंत लोकांनां नीट समजावून सांगितलें. लिओनें आपली ज्युबिली केली त्यावेळीं जगांतील सर्व धर्मांच्या व पंथांच्या लोकांकडून त्याचें अभिनंदन करण्यांत आलें. पुढें लवकरच तो मरण पावला (१९०३).

दहावा पायस.—लिओनंतरचा दहावा पायस हा पोप राजकारणी नसून साधुवृत्तीचा होता. इटलीशीं आजपर्यंत असलेलें पोपचें धोरण आतां बदलेल अशी कल्पना होती. परंतु पहिल्या धोरणांत बदल होणें शक्य नाहीं असें दिसून आलें. पोप हा ख्रिस्ताचा पृथ्वीवरील प्रतिनिधि असल्यामुळें ख्रिस्ताच्या तत्त्वाप्रमाणें सर्व गोष्टी करावयाच्या असा त्याचा बाणा होता. नीतिबाह्य आचरण न करतां पोपचा अधिकार वाढविण्याची त्याची इच्छा होती. चर्चेला वळकटी आणण्यासाठीं पायसनें चर्चमधील तंटे मिटवून टाकून त्यांत सुधारणा केल्या.

एकंदरींत विसाव्या शतकाच्या आरंभीं पोपमध्यें बराच उत्साह दिसत होता यांत शंका नाहीं. सहावा व सातवा पायस यांची स्थिति इतकी निकृष्ट झाली होती कीं, पोपची जागा नाहींशी होते किंवा काय अशी त्यावेळीं लोकांनां भीति वाटत होती. चर्चमधील फाटाफूट हें याचें कारण होतें, परंतु पोपपासूनच आपला बचाव होईल असें राज्यक्रांतीच्या युगानंतर लोकांनां वाटूं लागलें.

पोपची राजसत्ता नाहींशी झाल्याबरोबर त्याची धार्मिक सत्ता वाढली यांत संशय नाहीं. धार्मिक बाबतींत सर्व जगावर त्याचा ताव असल्यामुळें जेव्हां जेव्हां एखाद्या राजाशीं पोपचा तंटा लागतो त्यावेळीं कॅथॉलिक लोक कितीहि राजनिष्ठ असले तरी ते पोपलाच मदत करीत. कारण पोप हा ईश्वराचा प्रतिनिधि असल्यामुळें राजाला मदत करण्यापेक्षां पोपला मदत करणें अधिक श्रेयस्कर आहे असें त्यांनां वाटे. परंतु अर्वाचीन जीवितक्रमविरोधक अशा कांहीं गोष्टींमुळें कॅथॉलिक पंथाच्या देशांमध्येंहि पोपविरुद्ध चळवळ चालू आहे. फ्रान्स, इटली व स्पेन या देशांत रोमन चर्चबद्दल विशेष आस्था आढळत नाहीं. परंतु इंग्रजी भाषा बोलणाऱ्या देशांत इ. स. १८६० पासून पोपबद्दल अत्यंत पूज्यबुद्धि आहे.

**पोरबंदर, संस्थान.**—मुंबई, कांठेवाड पोलिटिकल एजन्सींतील एक संस्थान. क्षेत्रफळ ६४२ चौरस मैल. हें कांठेवाड द्वीपकल्पाच्या पश्चिमेस आहे. येथील हवापाणी निरोगी आहे. पावसाचें मान दरसाल २५ पासून ३० इंचांपर्यंत जातें. येथील संस्थानिक रजपूत घराण्यांतले आहेत. हें घराणें सुमारें सन ९०० पासून अस्तित्वांत आहे. मोंगल बादशहापासून रजपुतांनीं पोरबंदर संस्थान आणि नवीं संस्थान संपादन केलें आणि १७०५ सालीं आपली राजधानी पोरबंदरला आणिली. येथील संस्थानिकाला अकरा तोफांची सलामी आहे. संस्थानिकाला ‘पोरबंदरचा राणा’ ही पदवी आहे. येथील लोकसंख्या १९२१ सालीं १०१८८१ होती. संस्थानांतील खेड्यांची संख्या ९६ आहे. जमीन उत्तम प्रकारची काळी आहे. मुख्य पीक ज्वारी, बाजरी, गहूं व कापूस. व्यापार बहुतेक मुंबईशीं चालतो. कांठेवाड एजन्सींत पोरबंदर पहिल्या नंबरचें संस्थान आहे एकंदर उत्पन्न २२ लाख रुपयांचे आहे. संस्थानिकाला एकंदर खंडणी ४८५०४ रु. द्यावी लागते. त्यांत ३ सरकार, (इंग्रज सरकार, बडोद्याचे गायकवाड आणि जुनागडचे नवाब) समाविष्ट होतात.

शहर.—पोरबंदर संस्थानचें मुख्य शहर आणि अरबी समुद्र किनाऱ्यावरील बंदर. लोकसंख्या (१९२१) २४८२१. याचा कोंकण व मलबारशीं व्यापार फार चालतो. त्याप्रमाणेंच आफ्रिकेचा पूर्व किनारा, अरबस्तान, इराणी आखात, सिंध, बलुचिस्तान यांत असलेल्या बंदरांशीं व्यापार चाललेलाच असतो. एकंदर शहरांतील इमारती दगडी आहेत. एक किल्ला होता परंतु इंग्रज सरकारनें तो जमीनदोस्त केला. पूर्वी पोरबंदरला सुदामपुरी म्हणत. शहरांत प्रेक्षणीय स्थळें बरींच आहेत.

**पोराहाट**—बिहार-ओरिसा. सिंगभूम जिल्ह्याच्या वायव्येकडील एक लहानशी इस्टेट. क्षेत्रफळ ८१३ चौरस मैल. बहुधा सर्व भाग पहाडी असून जंगलमय आहे. पूर्वी सबंध सिंगभूम जिल्ह्यावर राठोड रजपुतांचें वर्चस्व होतें. हे राजे मानसिंगाचे वंशज म्हणून आपणांस म्हणवीत असत. मराठ्यांनीं पोराहाट जमीनदारीवर हल्ला केला होता परंतु जमीन पहाडी असल्याकारणानें तो सर करण्याचा हेतु सोडून दिला. सन १८१८ पर्यंत बहुधा पोराहाट जमीनदारी स्वतंत्र राहिली. सन १८१८ मध्यें घनःश्यामसिंग देव यानें ब्रिटिश सत्तेखालीं राहण्याचें कबूल केलें. १११ रुपये खंडणी मान्य करून ब्रिटिशांनीं जमीनदारीच्या कोणत्याहि प्रकरणांत हात घालावयाचा नाहीं असें ठरलें. परंतु जमीनदारी राजांनीं खंडणी कधींच दिली नाहीं. सन १८२७ सालीं राजाला ५०० रु. पेन्शन मिळत असे. सन १८५७ मध्यें अर्जुनसिंग

नामक राजा होता त्यानें बंड केलें. पुढें तो पकडला गेला व त्याची जमीनदारी जप्त झाली. हिचा कांहीं भाग सरइकेल व करसावान येथील राजांकडे ठेवला आहे. पोराहाट जमीनदारीचे १० भाग केले आहेत.

**पोर्ट ऑफ प्रिन्स**—वेस्ट इंडिजपैकीं हैती बेटांतील प्रजासत्ताक राज्याची राजधानी. लोकसंख्या सुमारें ६१००० आहे. हींत बहुतेक निग्रो व म्युलॅटो यांचाच भरणा आहे. दोन वेळ या शहराचा भूकंपांनीं नाश झाला होता.

**पोर्ट ऑर्थर** ( चिनी नांव लुशुंकाऊ)-हा किल्ला मांचुरियांतील लायओतुंग द्वीपकल्पाच्या दक्षिण टोंकास आहे. हा किल्ला हें पूर्वी चिनी नाविकांचें शस्त्रागार होतें, परंतु १८९४ त हा किल्ला जपानी लोकांनीं सर केला. १८९८ सालीं हा किल्ला व जवळचें तालिएनवान बंदर राशियास कांहीं करारानें दिलें होतें. राशियन लोकांनीं हळूहळू येथें चांगली तटबंदी केली. १९०५ सालीं जपानला कांहीं करारानें हीं दोन्ही ठिकाणें दिलीं. हें बंदर मुकडेन व पेकिंग यांच्याशीं रेल्वेनें जोडलें आहे. रूसो-जपानी युद्धांत पोर्ट ऑर्थर किल्ल्यावर जपानी लोकांनीं जमीनीवरून व दर्यावरून मारा केला. बरेच हल्ले केल्यावर १ जानेवारी स. १९०५ रोजीं जनरल स्टोसेल यानें हा किल्ला जपानी लोकांच्या हवालीं केला.

**पोर्ट ब्लेअर**— बंगालचा उपसागर, अंदमान बेटें, यांतील कैदी लोकांची वसाहत. दक्षिण अंदमान व दुसरीं लहान लहान बेटें या वसाहतींत येतात. क्षेत्रफळ ४७३ चौ. मैल आहे. यांपैकीं ३२७ चौरस मैलांतच लोकवस्ती आहे व बाकी सर्व जंगल आहे. दक्षिण अंदमान बेटांत पूर्वेकडील किनाऱ्यावर मेडोज व बोअर हीं बंदरें आहेत. दक्षिण किनाऱ्यावर म्याकफर्सन सामुद्रधुनी आहे. पूर्वेस मौंटकॅबेल आणि अन्सन नांवाचीं बंदरें आहेत. वसाहतीचा बहुतेक भाग डोंगराळ असल्यामुळें पक्क्या सडका करणें कठिण आहे. मुख्य पहाड हारिएट नांवाचा आहे. त्याची उंची १५०० फूट आहे. नदीसारखा एकहि नाला अथवा झरा वहात नाहीं, तरी प्यावयाचें गोडें पाणी विहिरींतून मिळतें. अंदमान वसाहतीच्या इतिहासाकरितां 'अंदमान' बेटें लेख पहा. येथील जंगलासंबंधानें सर्व कामें हिंदुस्थानच्या जंगलखात्यांत जशीं चालतात तशींच वसाहतीतहि चालतात. राखून ठेवलेल्या जंगलाचें क्षेत्रफळ १५६ चौरस मैल आहे. जंगलखातें उत्पन्नाच्या बाबतींत मुख्य आहे. पोर्टब्लेअर वसाहतीचें उत्पन्न १९०५ सालीं ९१०००० झालें. काळीचा वसूल, जंगलउत्पन्न, या उत्पन्नाच्या मुख्य बाबी असून या मानानें खर्च फार आहे.

स्वतः पोट भरणाऱ्यांच्या मुलांनां जरूर शिक्षण घ्यावें लागतें. मुलींच्या संबंधानें निर्बंध नाहीं. सरासरी व्यवहारापुरतें इंग्रजी शिक्षण झालें म्हणजे कारकुनीच्या कामाला लायक समजला जातो. ज्यांची खुपी असेल त्यांनीं यांत्रिक कलेचें शिक्षण घ्यावें. अंदमान वसाहतींत ४ मोठे दवाखाने असून औषधें फुकट दिलीं जातात. वसाहतींत मूल जन्माला आलें कीं लवकरच त्याला देवी काढतात. अंदमान बेटें बर्माकडे असल्यामुळें पोर्ट ब्लेअर रंगून पोटभागांत येतें. शिवाय 'अंदमान बेटें' व 'निकोबार बेटें' पहा.

**पोर्ट मेहॉन**—पोर्ट मेहॉन हें मीनोर्काचें बंदर असून राजधानी आहे. येथील लोकसंख्या १९०० सालीं १७१४४ होती. मेहॉन हें पूर्व किनाऱ्यावर असून तें महत्त्वाचें बंदर आहे. हें शहर टेंकडीवर वसलेलें असून येथील घरें पक्की बांधलेलीं आहेत. कांहीं ब्रिटिश सत्तेच्या वेळचीं घरें अद्याप आहेत. मेहॉन हें स्पेनच्या क्वारंटाईनच्या ठिकाणांपैकीं एक असून अल्जेरियापासून दक्षिण फ्रान्सपर्यंत जाणाऱ्या बोटींच्या रस्त्यावर असल्यामुळें फ्रेंच मालानें भरलेलीं जहाजें येथें येत असतात. हें शहर स्पॅनिश आरमाराचें ठिकाण आहे. येथून धान्य, फळें, बाहेर देशांत जातात. जोडे, कापसाचा व लोकरीचा माल येथें तयार होतो.

मेहॉन याला रोमन सत्तेच्या वेळीं "पोर्ट मॅगॉनिस" असें म्हणत. पूर्वी हें कार्थेजिनियन वसाहतीचें ठिकाण होतें. ८ व्या शतकांत हें मूर लोकांच्या ताब्यांत होतें व त्यांनां ॲरागॉनच्या पहिल्या जेम्सनें स. १२३२ मध्यें हांकून लावलें. १५३५मध्यें खेर-एद्-दिन् बारबारोसा यानें हें काबीज केलें. ब्रिटिशांनीं हें बेट स. १७०८ मध्यें घेतलें आणि मेहॉन शहर भरभराटीस आणलें. स. १७५६मध्यें तें फ्रेंचांच्या ताब्यांत गेलें पण स. १७६२ मध्यें तें त्यांनीं ब्रिटिशांनां परत दिलें. आमीन्सच्या तहानें तें १८०२ सालीं कायमचें स्पेनच्या ताब्यांत गेलें.

**पोर्ट सय्यद**—ईजिप्त. हें सुएझ कालव्याच्या उत्तरेकडील मार्गावर उत्तर अक्षांश ३१° १५' ३५" व पूर्व रेखांश ३२° १९' २०" यांवर केरोच्या ईशान्येस रेल्वेनें १४५ मैलांवरील ईजिप्तचें एक बंदर आहे. लोकसंख्या ( १९०७) ४९८८४. येथें मोठमोठ्या गोद्या आहेत व शहरांतील इमारतींपैकीं सुएझ कालव्याच्या कम्पनीची कचेरी व इंग्लिश लष्करी शिपायांची चाळ या मुख्य आहेत. जलपर्यटनास जाणाऱ्या सर्व जहाजांवर येथूनच कोळसा घेतला जातो व हें जगामध्यें सर्वांत मोठें कोळसा घेण्याचें ठिकाण आहे. स. १९०२ पासून मटेरिआमधून मेन्झला सरोवराच्या मार्गानें कापूस आणून बाहेरगांवीं पाठवितात. स १९०४मध्यें येथून केरोला जाणारी रेल्वे बनविल्यामुळें या शहराची अलेक्झांड्रिया शहराशीं बाहेरील व्यापाराच्या बाबतींत चढाओढ सुरू होऊन बरेच व्यापारी लोक येथें येऊन राहूं लागले आहेत.

**पोर्टोनोव्हो**—मद्रास, दक्षिण अर्काट जिल्हा, चिदंबरम् तालुक्यांतील एक शहर व बंदर. हें वेलोर नदीच्या कांठीं आहे. लोकसंख्या सुमारें १३ हजार. सोळाव्या शतकाच्या शेवटीं येथें पोर्तुगीज लोकांचें ठाणें होतें. यूरोपीय लोकांची पहिली वसाहत कारोमांडेल किनाऱ्यावर होती. १६८३ सालीं इंग्रजांनीं पहिली वसाहत पोर्टोनोव्हो येथें स्थापन केली. १७८० सालीं हैदरअल्लीनें ती वसाहत लुटली. हें शहर

दोनदां फ्रेंचांनीं घेतलें. अखेरीस १७८५ सालीं हें इंग्रजांकडे आलें. एका वेळीं पोर्टोनोव्होचा सिलोनशीं बराच व्यापार होता. चटया तयार करण्याचे कारखाने पुष्कळ होते. १९ व्या शतकांत पोर्टोनोव्हो येथील लोखंडी काम फार प्रसिद्धीला आलें होतें.

**पोर्टो रिको**—अमेरिका. हें संयुक्त संस्थानांच्या ताब्यांतील मोठया अँटिलेज बेटांपैकीं चवथ्या प्रतीचें आहे. हें बेट उत्तर अक्षांश १७°५०' ते १८°३०' व पश्चिम रेखांश ६५°३०' ते ६७°१५' यांमध्यें वसलेलें आहे. पोर्टो रिको हैतीच्या पूर्वेस ७० मैलांवर आहे. हें १०० मैल लांब व ४० मैल रुंद असून याचें क्षेत्रफळ ३४५५ चौरस मैल आहे. रिओलोईझा, रिओ द लाप्लाता, रिओमनाती व रिओनिवो ह्या मुख्य नद्या उत्तरेकडे आहेत. व्हिकेस नांवानें एक सुपीक बेट पोर्टो रिकोच्या सत्तेखालीं आहे. विशेष तऱ्हेचा प्राणी म्हटला म्हणजे मोठें जमिनीवरील कांसव होय. निरनिराळया तऱ्हेच्या सुंदर वनस्पती ह्या बेटांवर विपुल होत असून एबनी, स्पॅनिश देवदार, चंदन, महोगनी व निराळया तऱ्हेचे वृक्ष वरेच आढळतात.

इतर बेटांपेक्षां ह्या बेटाची हवा निरोगी आहे. पोर्टो रिको बेटावर वादळें वारंवार होतात. जमीन सुपीक आहे. एक चतुर्थांशापेक्षां जास्त जमीन लागवडीखालीं असून तीनपंचमांश लोक शेतकीवर आपलें पोट भरतात. साखर, कॉफी, व तंबाखूहि तयार करण्याचे कारखाने आहेत दळण वळणाच्या बाबतींत मात्र अव्यवस्था आढळते. पोर्टो रिकोचा बहुतेक व्यापार संयुक्त संस्थानांशीं चालतो. १९१० सालीं आयात व्यापार ६४०७९६३ पौंडांचा व निर्गत व्यापार ७९०१०७३ पौंडांचा झाला. त्यावेळीं लोकसंख्या १११८०१२ होती. ह्या बेटांतील मुख्य शहरें व त्यांची लोकसंख्या येणेंप्रमाणें आहे—सॅन जॉन (४८७१६), पान्स (३५०२७), मयागवेझ (१६५९१) आणि ॲरेसिबो (९६१२). येथें रोमन कॅथॉलिक पंथाचें विशेष प्राबल्य आहे.

संयुक्त संस्थानांचा अध्यक्ष हा सीनेटच्या अनुमतीनें ह्या बेटाच्या गव्हर्नराची नेमणुक चार वर्षांसाठीं मुक्रर करतो. गव्हर्नराच्या मदतीसाठीं ११ सभासदांचें एक कार्यकारी कौन्सिल असतें. हें कौन्सिल कायदेमंडळाची एक शाखा असून प्रतिनिधिगृह ही दुसरी शाखा आहे. हिच्यांत ३५ सभासद असतात. कोणत्याहि तऱ्हेच्या कायद्यास संयुक्त संस्थानांच्या कांग्रेसची संमति लागते. न्याय व अंमलबजावणी संयुक्त संस्थानांतील डिस्ट्रिक्ट कोर्ट, मुख्य कोर्ट व इतर कोर्टें यांच्या ताब्यांत असते.

विद्याखातें एका कमिशनराच्या ताब्यांत असतें. पोर्टो रिकोंत प्राथमिक, शेतकी व दुय्यम शाळा असून शिवाय पोर्टो रिकोचें विश्वविद्यालयसुद्धां आहे. ह्या बेटांत पोर्टो रिको व संयुक्त संस्थानें यांमध्यें खुला व्यापार चालतो. परदेशाहून येणाऱ्या मालावर संयुक्त सरकार जकात बसवितें तें उत्पन्न पोर्टो रिकोला मिळतें.

इतिहास.—दुसऱ्या सफरीमध्यें कोलंबसाला हें बेट आढळलें व याला सॅनजान बॉ-तिस्ता हें नांव त्यानें दिलें. या बेटाच्या मालकीबद्दल पुढें लढा पडला परंतु शेवटीं कोलंबसाच्या घराण्यांतील पुरुषास या बेटावर हक्क मिळाला. बोरिंक्विना नांवाच्या येथील मूळच्या रहिवाशांची क्रमाक्रमानें संख्या कमी होत गेली. सोळावें शतक संपण्यापूर्वीच येथील मूळच्या लोकांचा पूर्ण नायनाट झाला होता. मजुरांची आवश्यकता भासल्यामुळें आफ्रिकेतील गुलामांचा व्यापार करण्याची परवानगी मिळाली. इ. स. १५२० च्या सुमारास सॅन जॉन दि प्युएर्टोरिको शहर राजधानी झालें व बेटाला पोर्टोरिको नांव मिळालें. इंग्लिशांनीं हें बेट जिंकण्याचा पुष्कळदां यत्न केला परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. यापुढील इतिहास म्हणजे स्पेनच्या स्थितीप्रमाणें पोर्टोरिकोची स्थिती बदलत गेली. १८७७ सालापासून येथें कांहीं सुधारणा करण्यांत आल्या. १८९८ च्या एप्रिल महिन्यांत स्पेन व संयुक्तसंस्थानें यांच्यामध्यें युद्ध जुंपलें. थोडक्याच अवकाशांत हें बेट अमेरिकन लोकांच्या ताब्यांत आलें. सध्यांच्या राज्यव्यवस्थेचा पुरस्कार फॉरेकरच्या कायद्यान्वयें करण्यांत आला. १८९९ च्या आगष्ट महिन्यांत ह्या बेटावर एक फार मोठें तुफान होऊन भयंकर प्राणहानि झाली व मालमत्तेचा विध्वंसहि झाला. त्यावेळीं अमेरिकन लोकांनीं आपलें दातृत्व चांगल्या रीतीनें सिद्ध केलें. अमेरिकन अंमलाखालीं पोर्टो रिकोची चांगलीच प्रगति झाली.

**पोर्ट्‌स्‌माऊथ**—पोर्ट्‌स्‌माऊथ हें इंग्लंडमधील हॅम्पशायर परगण्यांतील बंदर व म्युनिसिपल-कांउंटी व पार्लमेंटरी-बरो आहे. लोकसंख्या (सन १९०१) १८८१३३. हें आरमारी स्टेशन पोर्ट्‌समाऊथ, पोर्टसी, लँड पोर्ट व साऊथसी या चार गांवांचें बनलें आहे. हें शहर पोर्ट्‌स्‌माऊथ हार्बर व लँगस्टोन हार्बर यांच्यामध्यें पोर्टसी बेटावर आहे. पोर्टस्‌माऊथमध्यें लष्करी ठाणीं आहेत. पोर्टसीवर आरमारी ठाणें व गोद्या आहेत. लँडपोर्टमध्यें कारागीर वर्ग रहातो, आणि साऊथमध्यें राहण्याचीं घरें व बंगले आहेत. येथें सेंट टॉमस आ बेकेटचें एक १२व्या शतकांतील प्रार्थनामंदिर आहे. ह्या शहरांत नगरभवन असून त्यांत एक घंटाघर आहे. शहराच्या मध्यभागीं व्हिक्टोरिया पार्क आहे. शहराच्या जवळ दर्यावर्दी व लष्करी लोकांसाठीं खेळण्याच्या जागा आहेत. या बंदरांतून दगडी कोळसा, इमारतीचें लांकूड फळफळावळ, व धान्य यांचा व्यापार चालतो. पार्लमेंटरी बरोला दोन प्रतिनिधी निवडण्याचा हक्क आहे.

येथील गोद्यांची स्थापना १५४० त झाली. १२ व्या शतकापर्यंत येथें वसती नव्हती, परंतु लष्करी दृष्टया या जागेचें महत्त्व पाहून पहिल्या रिचर्डनें ११९४ त येथें वस्ती

करणाऱ्या लोकांस सनद दिली. त्याच्यानंतरच्या दुसऱ्या राजांनींहि येथील लोकांस वरेच हक्क दिले.

**पोर्तुगाल**—पश्चिम यूरोपांतील एक लोकसत्ताक राज्य. उत्तरेस व पूर्वेस स्पेनदेश आणि दक्षिणेस व पश्चिमेस अटलांटिक महासागर. क्षेत्रफळ ३५४९० चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ५९५७९८५. याची लांबी साधारण ३६२ मैल व रुंदी १४० मैल. मिन्हो, डौरो, तेगस, गादी आजा या चार मोठ्या नद्यांनीं या देशाचे चार मोठमोठे प्रांत पडले आहेत. एकंदर सहा प्रांत आहेत. मिन्हो ही उत्तरेकडील पोर्तुगाल व स्पेन यांच्यामधील व गादीआना ही पूर्वेकडील मर्यादा आहे. उत्तरेकडे डोंगराच्या ओळी वऱ्याच आहेत. स्पेन व पोर्तुगाल यांच्या सरहद्दीवरील पोर्तुगालचे परगणे कमी उत्पन्नाचे व जंगलमय असल्यानें त्यांच्याबद्दल तंटे वगैरे होत नाहींत. या देशाचा किनारा वेडावांकडा असून जवळ जवळ ५०० मैलांचा व पुष्कळ बंदरांचा आहे. त्यांत मान्डेगो, कॉरव्होएरो, रोका, एस्पीचेल, सेंट व्हिन्सेन्ट, सेंट मराया वगैरे बंदरें आहेत.

पोर्तुगालमध्यें नैसर्गिक सौंदर्य जसें आहे तसें इतर त्याच्या सारख्या छोट्या देशांत फारच थोडें आढळेल. सेरा द एस्ट्रेला या पर्वताचीं शिखरें व पायथ्याचीं दरीखोरीं पाहण्यालायक आहेत. शिखराची जास्तीत जास्त उंची ७ हजार फूट आहे. मैदानें फारशीं नाहींत. येथील नानाप्रकारचीं फुलें साऱ्या यूरोपमध्यें प्रख्यात आहेत. या देशांत उन्हाळी व औषधीपाण्याचे झरे फार आहेत. येथील कांहीं खडक आद्यप्राणिविशिष्टकालीन आहेत. ते बहुतेक सर्व डोंगरांच्या माथ्यावर आढळतात. टेगसच्या कांठीं ह्यापुढील काळचे दगड आढळतात. उत्तरेकडे ज्वालामुखी खडक आहेत, त्याच्या आसपास चुनखडीचेहि आहेत. ग्रेनाईटहि थोडा फार आढळतो. या देशाची हवा समशीतोष्ण व उत्तम आहे. लिजबोय (लिस्बन) येथें ६०° ते ६१.५° अंश पर्यंत उष्णमान असतें. अटलांटिक महासागरास खेटून असल्यानें येथें पाऊस अतिशय पडतो. सालीना २०० इंचांपर्यंत त्याची मजल जाते, १९१० मध्यें पूर येऊन फार नुकसान झालें. किनाऱ्यावर अतिशय दाट धुकें असतें. त्यामुळें जहाजांना प्रवासास अडचण पडते. पर्वतशिखरांवरील बर्फ अनेक महिने तसेंच असतें. देशांतील जास्त उन्हाळ्याचें गांव लागॉस (६३°) व जास्त थंडाईचें ठिकाण सेरा द एस्ट्रेला (४४.७°) आहे. पावसाळ्यांत दरीखोऱ्यांतून दलदल सांचते. वादळें अगदीं क्वचित होतात, पण भूकंप नेहमीं होतात. लिजबोयचा प्रख्यात धरणीकंप १७५५ मध्यें झाला. लांडगे व रानटी अस्वलें वरींच आहेत. उत्तर यूरोपमधील भाजीपाला व फळफळावळ येथेंहि होते. जमीन सुपीक आहे. जंगलाचें उत्पन्नहि चांगलें येतें. बुचाच्या झाडांची व ओक झाडांची लागवड करतात.

पोर्तुगालमधून दर वर्षी पुष्कळसे गरीब लोक अमेरिकेंत व ब्राझिल देशांत कामधंद्यासाठीं जातात. बालमृत्यूची संख्या यांच्यांत जास्त आढळते. सर्वांत जास्त लोकवस्ती (दर चौरस मैलीं ४७९.५) मदैरा येथें आहे व सर्वांत कमी (४५.१) अलेमतेजो येथें आहे. पोर्तुगीज लोकांत पुष्कळ लोकांच्या रक्ताची भेसळ झाली आहे. यांचे मूळ पूर्वज इबेरियन जातीचे होते. सांप्रत उत्तरेकडील शेतकऱ्यांत गॅलिशियन, आस्ट्रियन व स्पॅनिअर्ड बीजाचे लोक आहेत. कार्थेजियन हे मध्य देशांत रहात होते. त्यांची व यांची प्रथम सोयरीक झाली. रोमन लोकांपासून या लोकांनीं भाषा व सुधारणा उचलली. इ.स.७११ नंतर मूर (अरब, बर्बर) लोकांची धाड आली. त्यांची छाप तेगसच्या दक्षिणेकडे जास्त बसली व ती अद्यापीहि बांधकाम, नक्षीकाम, लहान सहान धंदे व शेतकऱ्यांची भाषा यांत थोडीफार दिसून येते. एकदां अरबांचें प्रस्थ इतकें माजलें होतें कीं मोझारेबिक ही एक स्वतंत्र जात उत्पन्न झाली. ती रक्तानें पोर्तुगीज व धर्मानें ख्रिस्ती असे पण भाषा व चालीरीती मात्र अरबी वापरी. अद्यापि सुद्धां कांहीं मोझारब लोक सुंता करतात. मुसुलमानी अंमलांत फिरंगी ज्यू साऱ्या यूरोपांत श्रीमान म्हणून नांवाजले होते. इ. स. १४५० नंतर देशांत नीग्रो लोकांची गुलाम म्हणून आयात होत चालल्यानें त्यांच्या रक्ताची भेसळ फिरंग्यांत झाली. सांप्रत मध्य व दक्षिण पोर्तुगालमध्यें या निग्रोइड पोर्तुगीजांची वसति फार आहे. साऱ्या यूरोपमध्यें पोर्तुगीज लोकांसारखी अनेक जातींच्या रक्ताच्या भेसळीची दुसरी जात नाहीं. मात्र ही प्रजा, दुसऱ्या इतर भेसळ जातींपेक्षां जास्त हुषार आहे.

श्रीमंत लोकांपेक्षां शेतकरी हे जास्त धिप्पाड व सुरेख दिसतात. देशांतील मुख्य खाद्य वाळलेले कॉडमासे, भात, वाटाणा, मक्याची भाकर, आलिव्ह तेल, अंजिरें, द्राक्षें वगैरे फळें व कांदे, भोपळा, कोबी वगैरे भाज्या हें आहे. मेजवानी खेरीज सागुती खात नाहींत. दारू अगदीं क्वचित पितात. राष्ट्रीय असा एक ठराविक पोषाख नसून त्यांत विविधता आहे. सोन्याचे दागिने बायका वापरतात. बैलांच्या टकरा लावण्याची चाल इकडे फार आहे. हे लोक जनावरांचे फार शोकी आहेत. येथील शेतकरी हे पश्चिम यूरोपमधील सर्व शेतकऱ्यांपेक्षां जास्त अक्षरशत्रू आहेत. यांचे पोषाख व भांडीकुंडीं कांहीं ठिकाणीं अद्यापि रोमन व मूरकालीन आहेत. यांचीं गाणीं व पोवाडेहि त्या वेळचे जुने आहेत. नाच सुद्धां मूरीश धर्तीचे असून, चेटकया, पऱ्या, मंत्र, जादूटोणे यांवर यांचा पुष्कळ भरंवसा आहे.

देशांत १८५१ पर्यंत लिजबोय ते सिंट्रा याशिवाय एकहि खडीचा रस्ता नव्हता. सांप्रत सरकारी, जिल्हालोकलबोर्ड व म्युनिसिपालिटी यांच्या ताब्यांत, त्यांनीं केलेले रस्ते आहेत. आगगाडी प्रथम १८५३ त सुरू झाली. मुख्य मुख्य शहरीं विजेच्या ट्रामगाड्या आहेत, या देशाच्या मालकीची

व्यापारी जहाजें थोडीं असून बाकीचीं बहुतेक इंग्रजांचींच आहेत.

शेतसाऱ्याचे जमीनदारी,रयतवारी वगैरे चार प्रकार आहेत. जमीनदारास थकलेल्या बाकीसाठीं कुळाकडून जमीन कायमची जप्त करतां येत नाहीं. रोमन व मूरीश जुन्या पद्धतीच्या बैलांच्या नांगरानेंच अद्यापि नांगरट होते. या बैलांचीं शिंगें अतिशय लांब असतात. पाटबंधाऱ्याचें काम मूरीश पद्धतीनेंच अद्यापीहि आहे. शेकडा अद्यापीहि ४५ जमीन नापीक पडलेली आहे.

मच्छिमारीच्या धंद्यांत ५० हजार लोक असून ते १० हजार नावांनून हा धंदा करतात. सालीना ८ लक्ष पौंड किंमतीचे मासे परदेशीं रवाना होतात. या देशांत तांब्याच्या खाणी फार आहेत. परंतु मजुरी,वाहतूक व भांडवल यांच्या अभावीं खाणी तशाच पडल्या आहेत. मीठ, संगमरवरी दगड, ग्रेनाईट दगड, लोखंड, जस्त, शिसें, शिरगोळा, लिग्नाईट,गंधक, पेट्रोलियम वगैरे खनिज बरेंच सांपडतें.सोनें दुर्मिळ आहे. इ. स. १७०३ च्या तहान्वयें या देशांत इंग्रजांशिवाय खुद्द फिरंग्यांनांहि कांहीं धंदे काढण्याची बंदी होती. पुढें ( १८९२ ) कापडाच्या गिरण्या झाल्या. दारू, बुचें, मासे, आलिव्हतेल, कमावलेलीं कातडीं, तंबाखू, औषधी झऱ्यांचें पाणी, भरतकाम, लोंकर, मातीचीं भांडीं, ( हें काम ते हिंदी लोकांपासून शिकले), चिनीमातीचीं नकशीदार भांडीं, मूरीश पद्धतीचीं धातूंचीं भांडीं वगैरे वस्तूंचा परदेशाशीं व्यापार चालतो.हा सालीना अजमासें १९०००००० पौंडांचा असतो. यापैकीं ९००००० पौंडांची दारू एकटें इंग्लंडच खरेदी करतें.

इ. स. १९१९ च्या सुमारास सरकारी बँक ऑफ पोर्तुगालचें भांडवल व शिल्लक १६९८८००० एसक्यूडो ( हें सोन्याचें चालू नाणें असून त्याची किंमत ४ शिलींग ५½ पेन्स असते ) होती. सोन्याचें नाणें मुख्य असून, चांदी, निकल, कांसें यांचीं नाणीं आहेत. इ. स. १९१८ सालीं देशाचें एकंदर उत्पन्न १,०२,४७,४४१ पौंड होतें. राष्ट्रीय कर्ज १९१८ सालीं १९,६७,४३,३०४ पौंड होतें.

सन १९१० च्या ऑक्टोबरपर्यंत येथें राजसत्ता होती. तिला मुख्य आधार चौथ्या पेड्रो राजानें १८२६ त केलेली नियमावली व त्यानंतर १८५२, १८८५ व १८९५ मध्यें झालेले फेरफार यांचा होता. हाउस ऑफ कॉमन्स व हाउस ऑफ पीअर्स अशा दोन सभा असत. त्यांनीं दोनदां पसार केलेल्या कायद्याला व्हेटोनें हाणून पाडण्याचा अधिकार राजास नव्हता. चार वर्षांनीं निवडणूक होई. पीअर होण्यास ४० च्यावर वय असावें लागे.

सहा प्रांतांवर सहा सुभेदार व त्यांनां एक सल्लामसलतगार मंडळ असे, जिल्ह्यावर व तालुक्यावर मेयर व मोठमोठ्या गांवीं ग्राममंडळ असे. त्याच्या मुख्यास रेजिदोर म्हणत.

एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं इंग्लंड व स्पेन यांच्या शिवाय कोणत्याहि यूरोपियन राष्ट्रापेक्षां पोर्तुगाल वसाहती जास्त होत्या.पुढें ब्राझिल त्याच्या हातून गेला तरी आफ्रिकेंत केप व्हर्डे सेंट थॉमस व प्रिन्सेस हीं बेटें, पो. गिनी, अंगोला, पो.पूर्व आफ्रिका व मोझांबिक हे प्रांत; हिंदुस्तानांत दीव दमण, गोंवें; चीनमध्यें मकाउ; मलाया द्वीपकल्पांत तिमोर इतक्या वसाहती अद्यापि त्यांच्या आहेत. या वसाहतींपासून व्यापारी फायदा पोर्तुगालला फारसा मिळत नाहीं उलट कारभार चालविण्यास त्यांनां पैका पुरवावा लागतो.

इ. स. १९१०पर्यंत राजाचा धर्म रोमन कॅथोलिक होता. परंतु इतर धर्मभेदांस मोकळीक असे. चर्चची सत्ता १८३४ त काढून टाकली. ब्रागा, लिजबोअ व इव्होरा असे देशाचे तीन धार्मिक प्रांत केले होते. त्यांचें उत्पन्न ६५००० पौंड येई. प्राथमिक शिक्षण सक्तीचें १८४४ त केलें, पण १९०० त शें. ७८६ लोक निरक्षर होते. औद्योगिक, वैव्यापारिक शाळा नुकत्याच उघडल्या आहेत. कोइंब्रा येथें राष्ट्रीय विद्यापीठ आहे. इ. स. १९१० पूर्वी सक्तीची व खुषीची लष्करभरती असे. प्रत्येक २१ वर्षांवरील माणसास १५ वर्षे लष्करी नोकरी करावी लागे. लिसबोंयचा किल्ला फार बळकट आहे. महायुद्धाच्या काळीं खडें सैन्य १ लाख ८० हजार असून निरनिराळ्या प्रकारचीं ७० लढाऊ जहाजें होतीं.

इतिहास.—ख्रिस्तापूर्वीच्या ३ऱ्या शतकापासून १७२ सालापर्यंत पोर्तुगाल देशावर व विशेषेंकरून पोर्तुगाल देशाच्या समुद्रकिनाऱ्यावरील प्रदेशावर कार्थेज येथील लोकांची सत्ता होती. पुढें १३८–७२ सालांच्या दरम्यान हा देश रोमन लोकांनीं काबीज केला. ख्रिस्तानंतरच्या ५ व्या शतकांत या देशावर आलन स्यूव्ही व व्हीसीगॉथ या लोकांच्या स्वाऱ्या झाल्या व ७११ सालीं अरब लोकांनीं हा देश काबीज केला. यानंतर कॅस्टाईलच्या फर्डिनांडनें ( १०३३–१०६५ ) अरब लोकांपासून या देशाचा बराच भाग परत घेतला व पुढें याचा नातु ऑलफोन्झो याला आपल्या बापापासून पोर्तुगाल परगणा मिळाला. याच परगण्याची मर्यादा जास्त विस्तृत करून यानें त्याच्यावर राज्य स्थापिलें. ११४७ सालीं इंग्रजी धर्मयोध्यांच्या मदतीनें मूर लोकांपासून यानें लिसबन शहर काबीज केलें व तेव्हांपासून तें शहर पोर्तुगाल देशाची राजधानी आहे. पहिल्या ऑलफान्सोनंतर पहिला सँक ( ११८५–१२११ ) याची 'नगरें रचणारा' अशी ख्याति होती. हा तिसऱ्या इनोसंट पोपचा विरोध करी, परंतु शेवटीं याला पोपचें वर्चस्व कबूल करावें लागलें. पुढील राजा दुसरा ऑलफोंझो ( १२११–१२२३ ) याच्याच कारकीर्दींत पोर्तुगाल देशाच्या प्रतिनिधिसभागृहाची स्थापना झाली. याच्यानंतर दुसरा सँको ( १२२३–१२४८ ), पुढें तिसरा ऑलफोंझो ( १२४८–१२७९ ) याच्या कारकीर्दींत पोर्तुगाल देशाची फार

झपाट्यानें प्रगति झाली. यानें मूर लोकांचा अल्प्रेव्ह नांवाचा किल्ला घेतला. यामुळें कस्टाईलचा १० वा आलफोंझो व पोर्तुगालचा राजा यांच्यामध्यें वितुष्ट येऊन लढाई सुरू झाली. पोर्तुगाल व कॅस्टाईल यांच्यामधील लढाई, पोर्तुगालच्या ऑलफोंझोचा कॅस्टाईलच्या १० व्या ऑलफोंझोच्या मुलीबरोबर झालेल्या विवाहानें बंद झाली. याच्या मरणानंतर पोर्तुगाल देशाच्या इतिहासास नवीन वळण लागलें. याच सुमारास या देशांत कोईंब्रा येथें एका विद्यापीठाची स्थापना झाली व या देशाचें इंग्लंड देशाशीं व्यापारदृष्ट्या दळणवळण सुरू झालें.

१४ व्या शतकांत पोर्तुगाल व कॅस्टाईल यांच्यांत वारंवार लढाया होत. १३८५ सालीं पोर्तुगीज लोकांनीं अल्जुबरोटाची लढाई जिंकली व यानंतर लवकरच पोर्तुगालच्या जॉनचें गॉंटचा जॉन याची मुलगी फिलिप्पा हिच्याशीं लग्न झालें. याच्या कारकीर्दींत ( १३८५--१४३३ ) याचा मुलगा प्रसिद्ध खलाशी हेनरी यानें १४१५ सालीं आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावरील स्यूटा काबीज केलें व भूगोलविषयक पुष्कळ शोध लावून आपल्या देशाचें नाव वाढविलें. याच्या शोधामुळें पोर्तुगीज सत्तेचा बराच विस्तार झाला. १४४२ सालीं मदीरा व अझोर बेटांचा शोध लागला. आफ्रिकेंतील अंतर्गत प्रदेशाशीं पोर्तुगीज लोकांचें दळणवळण वाढत जाऊन तेथील गुलामांच्या व्यापारांत त्यांना फार फायदा होऊं लागला. दुसऱ्या जॉनच्या कारकीर्दींत ( १४८१--९५ ) बार्थोलोम्यू डाएझ यानें १४८६ सालीं केप ऑफ गुडहोपला वळसा घालून हिंदुस्थानास येण्यास एक नवीन मार्ग शोधून काढला. पुढें एमॅनुअल गादीवर आल्यावर ( १४९५--१५२१ ) वास्को ड गामा १४९८ सालीं लिस्बनहून कालीकत येथें जलमार्गानें येऊन पोहोंचला, व इ. स. १५०० मध्यें पोर्तुगीज खलाशी ब्राझील देशास जाऊन पोहोंचले. १५१० सालीं अल्बुकर्कनें गोवा शहर घेऊन सर्व पौरस्त्य व्यापाराचीं सूत्रें हातीं घेतलीं. यानंतर यानें सीलोन, सुंडा, मलाका व इराणी आखातांतील ओरमज हीं बेटें घेतलीं. तिसऱ्या जॉनच्या कारकीर्दींत ( १५२१--२७ ) पोर्तुगाल देशाच्या उत्कर्षाचा कळस झाला. त्या देशांत जेसुईट लोकांचा प्रवेश होऊन इन्क्विझीशनसारख्या न्यायसभा स्थापन झाल्या. ज्यू लोकांच्या छळास प्रारंभ झाल्यावर त्या देशाच्या प्रगतीची वाढ खुंटून ऱ्हास होण्यास सुरवात झाली. अगोदरच पोर्तुगाल देशाचे लोक परदेशांत वसाहतीस गेल्यामुळें त्या देशाचें बरेंच नुकसान झालें होतें. १५७८ त तिसऱ्या जॉनचा नातू सेबॅशियन हा अलके--कॅबिर येथें मोरोक्कोच्या सुलतानाविरुद्ध लढत असतां मरण पावला. पुढें कार्डिनल हेनरी यानें थोडे दिवस राज्य केल्यावर स्पेनचा दुसरा फिलिप हा पोर्तुगालच्या गादीवर बसला. स्पेनचा व पोर्तुगालचा संयोग झाल्यामुळें स्पेनच्या इंग्लंड व हॉलंड देशांशीं झालेल्या लढायांनीं पोर्तुगाल देशाचें फार नुकसान झालें. स्पेन देशाचा जुलमी व कडक अम्मल पोर्तुगीज लोकांस सहन न होऊन त्यांनीं १६४० त बंड केलें व १६४१ त पोर्तुगालनें स्पेनची सत्ता झुगारून दिली. याच वर्षी ब्रॅगँझाचा ड्यूक चवथा जॉन हा पोर्तुगालच्या गादीवर बसला. यानंतर पोर्तुगालनें स. १६६८ पर्यंत मोठें युद्ध करून स्पेन देशास आपलें स्वातंत्र्य कबूल करावयास लाविलें. या युद्धांत पोर्तुगाल देशास इंग्रजांची मदत होती.

स्पेनच्या गादीच्या वारसासंबंधीं झालेल्या युद्धांत पोर्तुगाल देशास बरेंच महत्त्व प्राप्त झालें होतें. कारण या देशांतून स्पेनवर स्वारी करतां येत होती. १७०१ सालीं फ्रान्सच्या १४ व्या लुइनें पोर्तुगालशीं तह केला होता, परंतु १७०२ मध्यें इंग्रजांनीं व्हीगो आखातांत स्पेन व फ्रान्सच्या जहाजांचा पराभव केल्यावर पोर्तुगालच्या राजानें, फ्रान्सनें केलेला तह रद्द केला व तो १४ व्या लुईच्या विरुद्ध उत्पन्न झालेल्या संघास जाऊन मिळाला. याच वेळेस त्यानें इंग्रजांशीं मेथुएन येथें तह करून इंग्रजी माल पोर्तुगाल देशांत विन जकातीनें येऊं देण्याचें कबूल केलें. याप्रमाणें इंग्लंड व पोर्तुगाल यांचा सलोखा होऊन तो उत्तरोत्तर दृढ होत चालला. १८ व्या शतकांत जोसेफ याच्या कारकीर्दींत ( १७५०–७७ ) याचा मुख्य प्रधान पोम्बल यानें पोर्तुगाल देशांत पुष्कळ सुधारणा घडवून आणल्या. यानें जेसूइट लोकांस हाकलून दिलें. शिक्षणखात्यांत सुधारणा केल्या. शेती व व्यापार यांस उत्तेजन दिलें व सरकारांत नवा जोम उत्पन्न केला. परंतु जोसेफ मेल्यावर पोम्बल याची सत्ता नाहींशी झाली व पोर्तुगाल देशास पुन्हा उदासीनता प्राप्त झाली.

१८०७ च्या टिलसिटच्या तहानंतर नेपोलियननें पोर्तुगाल देशास कान्टिनेंटल पद्धतींत ( इंग्लंडच्या व्यापारावर बहिष्कार घालण्याच्या कटांत ) सामील होण्यास भाग पडण्याकरितां जुनोट याला लिस्बन शहर काबीज करण्याचा हुकूम केला. पुढें जुनोट यानें सर्व पोर्तुगाल देश काबीज केल्यावर रीजंट जॉन हा राजघराण्यासह ब्राझिल देशास पळून गेला. यानंतर पोर्तुगाल देश फ्रान्सच्या राज्यास जोडला जाऊन १८०८ सालीं जोसेफ बोनापार्ट याची स्पेनचा राजा म्हणून द्वाही फिरली. पुढें फ्रेंच सत्तेविरुद्ध स्पेनच्या लोकांनीं बंड केलें व आर्थर वेलस्ली हा त्यांच्या मदतीकरितां पोर्तुगालमध्यें दाखल झाला. याप्रमाणें पेनिन्शुलर युद्धास सुरवात होऊन तें युद्ध १८१४ पर्यंत चाललें. स. १८१६ त रीजंट जॉन हा पोर्तुगाल व ब्राझील या देशांचा राजा होऊन, याची सहावा जॉन या नांवानें द्वाही फिरली. यानें मार्शल बेरेसफोर्ड या इंग्रज कामगारावर पोर्तुगाल देशाचा राज्यकारभार सोंपविला. ही व्यवस्था पोर्तुगीज लोकांस न आवडून त्यांनीं स. १८२० त ओपोर्टो येथें बंड केलें. यानंतर पोर्तुगाल देशांत लोकनियंत्रित अशी जंटो नांवाची राज्यपद्धति स्थापन करण्यांत आली. तारीख ३ जुलै १८२१ रोजीं जॉन पोर्तुगाल देशांत येऊन दाखल झाला. या वेळेस या देशांत

लोकसत्ताक राज्यपद्धति अमलांत असून तीच पुढें चालू ठेवण्याचें जॉन यानें वचन दिलें. स. १८२२ त जॉन याचा मुलगा पेड्रो यानें ब्राझिल येथें एक स्वतंत्र राज्य स्थापिलें. खुद्द पोर्तुगाल देशांत जॉन याचा भाऊ मिग्युएल यानें लष्कर आपलेसें करून स्पेन व फ्रान्स यांच्या मदतीनें पोर्तुगाल देशांतील लोकसत्ताक राज्यपद्धति मोडून टाकली,पण याच्या विरुद्ध चळवळ सुरू होऊन सहाव्या जॉनला एका नवीन नियमितसत्ताक राज्यपद्धतीचा स्वीकार करावा लागला. राशिया, व ऑस्ट्रिया यांनां ही पद्धत न आवडून ते तिच्या विरुद्ध उठले. यावर पोर्तुगालांतील नियमितसत्तावाद्यांनीं इंग्लंड देशास आपल्याकडे वळविलें. कॅनिंग या ब्रिटिश मंत्र्यानें १८२६ सालीं लिस्बन येथें एक फौज पाठवून पोर्तुगालांतील अंतस्थ राजनीतींत जर परराष्ट्रें ढवळाढवळ करतील तर आम्ही त्यांस अडथळा करूं असें जाहीर केलें.

१८२६ सालीं सहावा जॉन मरण पावला. याच्या नंतर. पेड्रो यानें पोर्तुगाल देशांत इंग्रजी पद्धतीच्या नमुन्यावर नियमितसत्ताक राज्यपद्धति स्थापून त्या देशाच्या राज्या. वरील हक्क सोडला. पुढें याची मुलगी मराया ला ग्लोरिया ही पोर्तुगाल देशाची राणी झाली व ही लहान असल्यामुळें तिच्या वतीनें तिचा चुलता मिग्युएल हा राज्यकारभार पाहूं लागला.यानंतर १८२८ सालीं मिग्युएल यानेंच राज्य बळकाविलें. मिग्युएल याचा समाचार घेण्यासाठीं पेड्रो यानें आपलें ब्राझीलचें राज्य आपला मुलगा दुसरा पेड्रो याच्यावर सोंपवून स्वतः सैन्यासह पोर्तुगाल देशास प्रयाण केलें. पुढें १८३३ सालीं इंग्रजी आरमारानें मिग्युएलच्या आरमाराचा पराजय केल्यावर मिग्युएलनें पोर्तुगाल देशाच्या राज्यावरील आपले सर्व हक्क सोडून दिले. १८३४ सालापर्यंत पेड्रोनें, नंतर १८५३ पर्यंत मरायानें व नंतर हिचा मुलगा पांचवा पेड्रो यानें १८६१ पर्यंत राज्य केलें व याच्या मागून याचा भाऊ पहिला लुइझ हा गादीवर बसला. स.१८८०–१८९० च्या दरम्यान आफ्रिकेविषयीं चढाओढ सुरू होऊन तेथील पोर्तुगाल देशाच्या ताब्यांत असलेल्या प्रदेशाचें महत्त्व वाढूं लागलें. १८८४ सालीं ग्रेटब्रिटननें पोर्तुगालचें कांगो नदीवरील वर्चस्व कबूल केलें. परंतु बर्लिन कॉंग्रेसनें कॉंगोफ्रीस्टेटची सत्ता आंतरराष्ट्रीय कमिशनच्या हातांत दिली. १८८९ सालीं पहिला कार्लोस हा पोर्तुगालचा राजा झाला. ता. १ फेब्रुवारी १९०८ रोजीं याचा, याच्या गादीचा वारस होणाऱ्या मुलासह खून झाला. यानंतर याचा दुसरा मुलगा एमॅनुअल याची दुसरा एमॅनुअल या नांवानें द्वाही फिरली. ता. ४ आक्टोबर १९१० रोजीं लिस्बन शहरीं बंड होऊन राजा व इतर राजघराण्यांतील मंडळींनीं पळ काढिला. ता. ५आक्टोबर रोजीं बंडवाल्यांनीं प्रजासत्ताक राज्य स्थापण्याचें जाहीर केलें. या बंडाचा पुढारी ॲड्मिरल कँडीडोराईस हा होता. राजा-राणी जिब्राल्टर येथें इंग्रजांच्या आश्रयास जाऊन राहिले. हें बंड लिस्बन शहराच्या मर्यादेच्या बाहेर पसरलें नाहीं व त्यांत फारशी प्राणहानीहि झाली नाहीं. १८९१ सालीं इंग्लंड व पोर्तुगाल यांच्यामध्यें तह होऊन एकमेकांनीं पूर्व-पश्चिम आफ्रिकेंतील आपापल्या वर्चस्वाखालील प्रदेशांची मर्यादा निश्चित केली. मॅबिका लँड व त्यावरील बेइरा बंदर व डेलागोआ आखात यांची पोर्तुगालच्या ताब्यांतील उत्तम वसाहतींत गणना होते.

१९१० ते १९२०:—१९१० च्या क्रांतीनंतर तात्पुरतें सरकार स्थापन झालें. या क्रांतीनंतर धर्मसंस्थांच्या साह्यानें जगणाऱ्या गरीब लोकांचे फार हाल झाल्यामुळें त्यांपैकीं पुष्कळांनां परदेशगमन करावें लागलें. मजूरवर्गामध्यें असंतोष पसरून वारंवार संप होऊं लागले. स. १९११ च्या जून महिन्याच्या १९ व्या तारखेस नवें सरकार निवडण्यांत येऊन पोर्तुगालमधील राजसत्तेचा कायमचा शेवट झाला. या नवीन राज्यघटनेनें डेप्यूटीसभा व सिनेटसभा अस्तित्वांत येऊन त्यांमार्फत निवडून आलेल्या अध्यक्षानें या सभांच्या साहाय्यानें राज्यकारभार चालवावा असें ठरविण्यांत आलें. या घटनेप्रमाणें निवडून आलेला पोर्तुगालचा पहिला अध्यक्ष डॉ. मॅन्युएल डे ॲरीगा हा होय.

तात्पुरतें सरकार प्रस्थापित झाल्यापासून रोमन कॅथॉलिक धर्मावर अनेक संकटें येत होतीं. चर्च व संस्थान यांच्यामधील संबंध नष्ट करण्यांत आला होता. धर्मस्वातंत्र्य प्रत्येक नागरिकाला देण्यांत आलें होतें. यामुळें पोर्तुगालमध्यें रोमन कॅथॉलिक धर्माची सत्ता कांहीं काळपर्यंत अजिबात नाहींशी झाली होती. पण स. १९१७ मध्यें पीआस हा पोर्तुगालचा अध्यक्ष झाल्यानंतर पुन्हां रोमनकॅथॉलिक धर्माचें डोकें वर निघूं लागलें.

पोर्तुगालमध्यें १९११ सालापासून राजशाही नष्ट झाली. तथापि राजशाहीच्या पुरस्कर्त्यांनीं पुन्हां राजशाही प्रस्थापित करण्याचे अटोकाट प्रयत्न चालविले होते. स. १९१२ मध्यें खुद्द मॅनुअल राजा व डॉम मिग्युएल यांनीं मिळून रिपब्लिकविरुद्ध लढण्यासाठीं मोठ्या सैन्यासह कूच केलें होतें. तथापि त्यांत यश आलें नाहीं. पुढें १९१९ सालींहि राजपक्षीयांनीं उचल खाऊन पुन्हां कांहीं ठिकाणीं राजसत्ता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला पण तोहि थोडक्याच दिवसांनंतर अयशस्वी ठरला.

महायुद्धामध्यें, पोर्तुगालनें दोस्तराष्ट्रांच्या वतीनें युद्धांत भाग घेण्याचें जाहीर केलें. त्यामुळें जर्मनी व ऑस्ट्रिया यांनीं पोर्तुगालवर एक दोनदां सैन्यहि पाठविलें. तथापि त्यांत त्यांनां यश आलें नाहीं. शांततापरिषदेला डॉ. एगास मोनीझ हा प्रतिनिधि म्हणून हजर होता. या परिषदेंत, पोर्तुगालला जर्मनीपासून नुकसानभरपाई व कियॉंगो हें शहर मिळालें.

१९२१ ते १९२५—या काळांत तीनदां राजक्रांति झाली व सांपत्तिक स्थिति फारच खालावली.१९२१च्या आक्टोबरमधील क्रांतींत क्रांतिकारकांनीं लिस्बन काबीज करून ग्रँजो

( मुख्य प्रधान ) मॅकेडो, मेश्या व सिल्व्हा या प्रधानांचे खून केले. गेलीं दहा वर्षें देशाच्या बजेटांत दरसाल तूट येत असून धान्य व इतर जिन्नस परदेशाहून येत, त्यांच्या किंमती वाढल्या व लोकांत असंतोष माजला. ब्रेड ( भाकर ) स्वस्त दरानें विकून सरकारनें १५,००,००० पौंड तूट एक वर्षांत सोसली. कार्लो राजा, त्याचा मुलगा व प्रेसिडेंट पैस यांच्या खून करणारांस शिक्षा झाल्या नाहींत. या क्रांतीचा पुढारी कर्नल कोएल्हो यांचें प्रधानमंडळ डिसेंबरांत मोडलें;नंतरचें कर्नल पिंटोचें प्रधानमंडळ त्याच महिन्यांत मोडून सेनॉर लीलचें स्थापन झालें.१९२२च्या फेब्रुवारींत नव्या निवडणूकी होऊन डेमोक्रॅट पक्षाच्या सेनॉर डा सिल्व्हा यांचें प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें. स.१९२३ च्या आगष्टमध्यें सेनॉर टेक्सीरा गोमेस हा डेमोक्रॅटिक पक्षाचा इसम पोर्तुगीज रिपब्लिक प्रेसिडेंट निवडून आला.१९२३ च्या डिसेंबर मध्यें, १९२४ च्या आगष्टमध्यें व १९२५ एप्रिलमध्यें राज्यक्रांतीचे प्रयत्न झाले, पण ते हाणून पाडून तावडतोब शांतता प्रस्थापिण्यांत आली.

**पोर्तुगीज वाङ्मय**,प्रा स्ता वि क.—प्राचीन काळापासून पोर्तुगालमध्यें चांगल्या प्रकारचें वाङ्मय निर्माण होत होतें. त्याजवळच्या स्पेनमधील वाङ्मयापेक्षां ग्रंथसंख्येच्या दृष्टीनें तें जरी कदाचित कमी भरत असलें तरी गुणदृष्ट्या स्पेनमधील वाङ्मयाच्या तोडीचें पोर्तुगीज वाङ्मय होतें असें बिनधोक म्हणतां येतें. प्राचीन काळचीं पोर्तुगीज भाषेमधील जीं ' कॅन्सिओनीरॉस ' या नावानें प्रसिद्ध असलेलीं प्रणयगीतें आहेत, तीं पाहिलीं असतां वरील म्हणण्याची सत्यता पटेल. कादंबऱ्यांच्या बाबतींत, अगर प्रवासवर्णनात्मक ग्रंथांच्याहि बाबतींत पोर्तुगालनें ,आघाडी मारलेली दिसून येते. नाटयवाङ्मय मात्र पोर्तुगालमध्यें व्हावें तितक्या उच्च दर्जाचें निर्माण झालें नाहीं.

पोर्तुगीज वाङ्मयाचें विहंगमदृष्टीनें अवलोकन केल्यास एक गोष्ट प्रामुख्यानें नजरेस आल्याशिवाय रहात नाहीं व ती म्हणजे पोर्तुगालमधील वाङ्मयविषयक चळवळी; या परकीय राष्ट्रांतील वाङ्मयविषयात्मक चळवळींचें अनुकरण होय. पोर्तुगीज भाषेंत स्वतंत्र वाङ्मय निर्माण झालें नाहीं तथापि पोर्तुगीज भाषेंतील वाङ्मयावर परराष्ट्रीय वाङ्मयाची बरीच छाप पडलेली दिसते. पोर्तुगालमधील पहिली वाङ्मयविषयक चळवळ, प्रॉव्हेन्समधील वाङ्मयविषयक चळवळीपासून निघाली व त्या काळच्या वाङ्मयावर प्राव्हेन्समधील वाङ्मयाच्या वळणाची छाप पडलेली नजरेस येते. १५ व्या शतकांतील पोर्तुगीज वाङ्मयावर कॅस्टीलन वाङ्मयाचा ठसा उमटलेला दिसतो. १६ व्या शतकातील वाङ्मयाला इटालियन वाङ्मयाची दिशा लागलेली आढळते. १७ व १८ व्या शतकात अनुक्रमें स्पेन, फ्रान्स व इंग्लंड, यांमधील वाङ्मयाची छाप पोर्तुगीज. वाङ्मयावर पडलेली दिसते तर १९ व्या शतकांतील पोर्तुगीज वाङ्मयाला इंग्लंड, जर्मनी व फ्रान्स यांमधील वाङ्मयाचें वळण लागलेलें आढळून येतें.

प्राचीन काळ.—ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकापासूनच पोर्तुगालमध्यें बरेंच वाङ्मय निर्माण होत होतें. पण त्यापैकीं आज कांहींच उपलब्ध नाहीं. १२ व्या शतकापूर्वीपासून पोर्तुगालमध्यें भावगीतांची अकल्पित वाढ झालेली होती. हीं भावगीतें रचणाऱ्या कवींमध्यें डॉ. गिलसांचेस्र हा पहिला होय. याचा 'कॅटर डे अमांगो' या नांवाखालीं बराच काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला आहे. यांतील भावगीतें पहिल्या सांचेनें आपल्या वेश्येला उद्देशून लिहिलीं आहेत असें दाखविलें आहे. कांहींच्या मतें सांचो हाच या काव्यसंग्रहाचा कर्ता होय. स. १२४८ पासून म्हणजे तिसरा आलफान्सो हा राज्यावर बसल्यानंतर पोर्तुगालमध्यें बरेंच वाङ्मय निर्माण झालें. त्या वेळच्या कवितांचा कॅन्सीओनीरो डि अयूड या ग्रंथांत संग्रह करण्यांत आला आहे. आलफान्सोचा मुलगा दिनिझ यानें आपल्या भोंवतीं तत्कालीन उत्कृष्ट कवींचा घोळका जमविला होता. दिनिझ हा स्वतःहि विद्वान असल्यानें व त्याला कविता करण्याचा नाद असल्यानें त्यानें पुष्कळच कविता लिहिल्या. याशिवाय त्याच्या पदरच्या कवींपैकीं डी. आलफान्सो, सांचेस्र व डी. पेद्रो यांच्याहि कविता बऱ्यापैकीं आहेत. सांचेस्र याची कविता प्रेमविषयक आहे व ती उदात्तहि आहे. पण पेद्रो याची प्रेमविषयक कविता, हीन दर्जाची असून त्यांतील प्रणयकल्पनाहि उदात्त नाहीं. स्वतः दिनिझ यानें प्रेमविषयक बरींच गीतें रचिलीं आहेत.पण तीं ठरीव वळणाचीं आहेत. त्यांत विचारांचें नाविन्य दिसून येत नाहीं. प्रणयगीतांशिवाय त्यानें इतर विषयांवर जी कविता केली आहे, ती चांगली आहे. या काळच्या कवींनीं वीर-काव्यें लिहिण्याचा प्रयत्न केलेला आढळत नाहीं. दिनिझच्या मरणानंतर चवथा आल्फान्सो हा गादीवर बसला. त्याच्या कारकीर्दींत पोर्तुगीज वाङ्मय फारसें निर्माण झालें नाहीं.

पोर्तुगालमध्यें महाकाव्यें लिहिण्याला उशीरानें आरंभ झाला. ख्रिस्ती लोकांनीं एकत्र जमून मूर लोकांचा १३४० सालीं सॅलाडो येथें जो पराभव केला त्या प्रसंगावर गिरालेस यानें जें महाकाव्य रचिलें तें पोर्तुगीज भाषेंतील पहिलें महाकाव्य होय असें म्हणावयास हरकत नाहीं.

महाकाव्याप्रमाणेंच गद्य वाङ्मय लिहिण्याची प्रवृत्ति पोर्तुगीज लोकांत १४व्या शतकात निर्माण झाली.या कालच्या गद्य वाङ्मयात साधूंचीं चरित्रें, बखरी इत्यादिकांचा अंतर्भाव होतो. गद्यग्रंथापैकीं महत्त्वाचे ग्रंथ म्हणजे क्रॉनिका ब्रेव्हे डो आर्चिव्हो नाशिनल, क्रॉनिकाज डो आलगार्व्हे, लिव्ह्रास डॉस लिनहागेन्स हे होत. रोमानिया नांवाखालीं तत्कालीन गद्यवाङ्मयसंग्रह प्रसिद्ध आहे; त्यामध्यें 'विदा डे यूफ्रोसिना, विदा डे मारिया इजिप्शिया, विदा डे सॅंक्टो अमारो, विदा डे

सांटो इलॅाय इत्यादि ग्रंथांचा अंतर्भाव करण्यांत आलेला आहे. याशिवाय इतर गद्यग्रंथहि वरेच आढळून येतात.

१५वें शतकः—पहिल्या जॉन राजाच्या कारकीर्दीत राजदरबारीं अनेक ग्रंथकार एकत्र झाले होते. स्वतः जॉन हाहि ग्रंथकार असून त्याचा ‘ लिव्हो डि मॉटेरिया’ हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. एडवर्ड राजानें अनेक जुन्या पुस्तकांचा संग्रह केला व त्यानें स्वतः ‘ लियल कोमसिल्हेरो ’ हा नीतिपर ग्रंथ लिहिला. याशिवाय त्याचा ‘ लिव्हो डा एन्सिनान्सा डि बेम कॅव्हलगार टोदा सेला ’ हा अश्वविद्येवरील ग्रंथहि प्रसिद्ध आहे. एडवर्डचा भाऊ डी पेद्रो यानें ‘डा व्हर्च्युओसा वेंफीटोरिया ’ हा नीतिपर ग्रंथ लिहिला व वेगेटियस याचा ‘ डि रे मिलिटारी ’ व सिसरोचा ‘डि ऑफिसिस’ या ग्रंथाचें पोर्तुगीजमध्यें भाषांतर करविलें. १५व्या शतकांत पोर्तुगालमध्यें जे राजे होऊन गेले ते सर्वच विद्यासंपन्न व गुणिजनांचे भोक्ते होते. या शतकांत पुष्कळ बखरी लिहिल्या गेल्या, त्यांपैकीं फेर्नाओ लोपेस हा अतिशय प्रसिद्ध बखरकार होय. यानें पोर्तुगालचा इतिहास लिहिला व पेद्रो, फर्डिनांड व पहिला जॉन यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. याची सौदे या इंग्लिश कवीनें फार स्तुति केली आहे. गोमेस अझूरारा यानेंहि डि पेद्रो डि मेन्झेस, डि डुआर्टे डि मेन्झेस यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. राय डि पिना यानें एडवर्ड व पांचवा आल्फान्सो यांचीं चरित्रें लिहिलीं असून त्यांतील भाषा साधी व सुंदर आहे. ऐतिहासिक दृष्ट्याहि या चरित्रांची योग्यता मोठी आहे. बखरी व चरित्रें याप्रमाणें अद्भुतवाङ्मयहि १५ व्या शतकांत वरेंच निर्माण झालें. त्यांपैकीं ‘ एस्टोरिया डो इम्परेडोर वेस्पारी यानो ’ हा ग्रंथच तेवढा उपलब्ध आहे.

१५ व्या शतकांत काव्यवाङ्मयहि पुष्कळ निर्माण झालें. डि पेद्रो याचा मुलगा कॉन्स्टेबल हा उत्तम कवि होता. याच्या ‘ सॅटीरा डि फेलिसे ए इनफेलिसे विदा ’, ‘ ट्रॅजेडिया डि ला रीना इसावेल ’, ‘ कोप्लास डेल कँटेम्प्टो डेल मंडो ’ इत्यादि कविता फार प्रसिद्ध आहेत. या सर्व कविता कॅस्टीलीयन भाषेत आहेत. या काव्यावर स्पॅनिश काव्याची छाप पडलेली दिसते. पांचव्या आल्फान्सो राजाच्या व दुसऱ्या जॉन राजाच्या कारकीर्दींत जें काव्य निर्माण झालें त्याचा संग्रह ‘ कॅन्शी ओनीरो गेरल ’ या काव्यसंग्रहांत केला आहे. यांत जवळ जवळ तीनशें कवींच्या कविता आहेत. या कवींमध्यें डि जोआ मॅन्युअल, डि जोआ डि मेनेझेस, डायागो ब्रँडाओ, डू आर्टे डि ब्रिटो, फर्नाओ डा सिल्व्हीरा इत्यादि कवींच्या कविता आहेत. पण या शतकांतील काव्यांत एकप्रकारचा कृत्रिमपणा आढळून येतो. महाकाव्यें या शतकांत निर्माण झालींच नाहींत असें म्हटलें तरी चालेल.

ना ट्य वा ङ्म य.—पोर्तुगालमधील नाट्याचा जनक गिल विसेंटे हा होय. त्यानें प्रथमतः ‘वार्का डो इनफर्नो’ यासारखीं केवळ धार्मिक नाटकें लिहिण्यास सुरवात केली पण पुढें या धार्मिक नाटकांतहि विनोदी पात्रें घालण्याचा त्यानें प्रघात पाडला. या नाट्याच्या बाबतींत त्याचें अनुकरण बऱ्याच लेखकांनीं केलें; त्यांपैकीं ऑफान्सो अल्वारेझ, अँटोनियो रीबीरो, जेरोनिमो रीबीरो, अँटोनियो प्रियोस्टास, बाल्थाझार डियॉस सिभाओ मकाडो व कॅमोडान्स हे होत. डियॉस याचीं औटो ऑफ सेंट ॲलेक्सिस व औटो ऑफ सेंट कॅथेराइन हीं नाटकें प्रसिद्ध आहेत. या नाटकांतील भाषा साधी, पण प्रासादिक अशी आहे. मर्केडोचीं ‘कॉमेडी ऑफ डियू’ व ‘एनचॅन्टमेंट्स ऑफ आल्फिया’ हीं नाटकें प्रसिद्ध आहेत. हीं स्पॅनिश भाषेंत आहेत. पण या सर्व नाटककारांत विसेंटेशीं बरोबरी करणारा नाटककार केमोडान्स हाच होय. यानें ॲफीक्ट्रियॉन्स हें नाटक लोकप्रिय आहे. याशिवाय ‘किंग सेल्युकस’ व ‘फिलोडेमो’ हींहि नाटकें चांगलीं आहेत. गिल विसेंटी याच्या मरणानंतर नाट्यवाङ्मयाला दरबारकडून उत्तेजन मिळेनासें झालें व त्यांतच धार्मिक जुलमी निर्बंध नाट्यवाङ्मयावर घालण्यांत येऊं लागल्यामुळें नाट्यवाङ्मयाला ओहोटी लागली.

रेनाइसन्स उर्फ पुनरुज्जीवन कालः—इटलीमध्यें निर्माण झालेल्या पुनरुज्जीवनाच्या चळवळीची लाट पोर्तुगालवर येऊन आदळली व त्यामुळें पोर्तुगीज वाङ्मयावरहि त्या चळवळीचे परिणाम झाल्याशिवाय राहिले नाहींत. पांचव्या आल्फान्सो राजानें युस्टस वाल्डिनस यास पोर्तुगालचा इतिहास लॅटिनमध्यें लिहिण्यासाठीं मुद्दाम पाचारण केलें होतें. १६ व्या शतकांत इटलींतील पुष्कळ विद्वान गृहस्थ पोर्तुगालमध्यें येऊन राहिले होते व त्यांनीं इटलींतील वाङ्मयाला लागलेल्या नव्या वळणावरहुकूम पोर्तुगीज वाङ्मय निर्माण करण्यास सुरवात केली. या कामीं पोर्तुगीज स्त्रियांनीं महत्त्वाचा भाग घेतला होता. लुइसा, अॅजेला, पौलाविसेंट, जोआनावझ इत्यादिकांनीं मॅनुअल राजाच्या मुलीच्या उदाराश्रयाखालीं स्त्रियांचें विद्यापीठ स्थापन केलें. लुइसा ही स्वतः उत्तम कवयित्री होती, शिवाय तिला प्राच्य भाषांचें उत्तम ज्ञान होतें.

इटलींतील पुनरुज्जीवनाच्या चळवळीच्या आधारें पोर्तुगीज वाङ्मयांत क्रांति घडवून आणणाऱ्यांमध्यें सा डि मिरांडा हा होय. हा सहा वर्षें इटलींत राहिला होता व त्यामुळें त्याला इटलींतील वाङ्मयविषयक चळवळीचें पूर्ण ज्ञान झालें होतें. त्यामुळें पोर्तुगालमध्यें आल्यावरोबर अनेक विद्वानांच्या साहाय्यानें त्यानें इटालियन वाङ्मयशाखेची स्थापना केली. काव्यवाङ्मयामध्यें सुनीतें, स्तोत्रें, पत्रिका, इत्यादि काव्याचे प्रकार आणून त्यानें पोर्तुगीज काव्याला नवीनच वळण दिलें. रिकॉंडिल्हा नामक पोर्तुगीज वृत्तांत त्यानें सुधारणा केली. त्याचीं ‘सटीरा’ व ‘एक्लोग्स’ हीं फार प्रसिद्ध आहेत. त्याला पुष्कळ अनुयायीवर्ग मिळाला. त्यांत अँटोनियो फेरीआरा, डि मॅनुअल, डायगो बर्नार्डीस, आंद्रे फाल्काओ डि रेसेंडे, फ्रे आगस्टिनो, लुइस डि कॅमोडान्स हे प्रमुख होत. फेरीआराचीं सुनीतें फार सुंदर आहेत. बर्नार्डीसचें लिमा हें काव्य

त्यांतील भावगीतांमुळें फार लोकप्रिय झालें आहे. फ्रे आगस्टिनोचीं स्तोत्रें हीं गूढ व सुंदर आहेत. पण सर्वांवर ताण करणारा व इटालियन शाखा यशस्वी करून दाखविणारा कवि कॅमोडान्स हा होय. त्याचें लूसिडास हें काव्य व्हर्जिलच्या काव्याच्या धर्तीवर असून, त्यांत ईश्वरविषयक श्रद्धा व देशाभिमान यांची शिकवण आहे. वास्को डि गामाच्या धाडसी प्रवासाच्या प्रसंगांवरून हें काव्य लिहिलें गेलें आहे. हें काव्य प्रसिद्ध होतांच त्याची लोकप्रियता तत्काळ प्रस्थापित झाली व त्याची पोर्तुगालच्या प्रमुख राष्ट्रीय काव्यांत गणना होऊं लागली. महाकाव्याप्रमाणेंच भावगीतें लिहिण्यांतहि केमोडान्सचा हातखंडा होता. भावगीतांच्या द्वारांहि गंभीर विचार त्यानें प्रकट केलेले आहेत. केमोडान्सचें अनुकरण करणाऱ्यांमध्यें जेरोनिमो कोर्टे रीयल याची प्रामुख्यानें गणना होते.

सा डि मिरांडानें पोर्तुगीज काव्याला ज्याप्रमाणें इटालियन वळण लावलें त्याचप्रमाणें नाट्यकलेंत व नाट्यवाङ्मयांतहि त्यानें सुधारणा घडवून आणिली. त्याच्यापूर्वी धार्मिक नाटकें निर्माण करण्याची जी प्रबळ प्रवृत्ति दिसून येत होती ती नाहींशी करून सामाजिक, राष्ट्रीय, या प्रकारचीं नाटकें लिहिण्याची पद्धत त्यानें सुरू केली. शिवाय पूर्वींचीं नाटकें केवळ पद्यमय असत. त्याबदलीं रोमन व ग्रीक धर्तीवर नाटकांत गद्यभाषा घालण्यांत येऊं लागली. तथापि मिरांडानें ही जी नाट्यविषयक सुधारणा घडवून आणली ती इटालियन नाट्याची केवळ प्रतिकृति असल्यानें ती विशेषशी लोकप्रिय झाली नाहीं. मिरांडालाहि नाटककार या नात्यानें मागें टाकणारा लेखक अँटोनियो फेरॉय हा होय.याचीं ब्रिस्टो, ओ सीयोसो व इनेस डी कॅस्ट्रो हीं नाटकें प्रसिद्ध आहेत.

१६ व्या शतकांतील गद्य बहुतेक ऐतिहासिक स्वरूपाचें होतें. या शतकांत पोर्तुगालमध्यें पुष्कळ संशोधक निर्माण झाल्यामुळें त्यांच्या संशोधनाच्या वर्णनपर ग्रंथ लिहिले जावेत यांत आश्चर्य नाहीं. पोर्तुगीज संशोधकांनीं पौरस्त्य देशांसंबंधीं जे शोध लावले त्यांसंबंधीं जोआडे बॅरॉस यानें 'आशिया' हा प्रचंड ग्रंथ लिहिला. याला पोर्तुगालचा लिव्ही अशी संज्ञा देण्यांत येते. 'आशिया' या अपूर्ण ग्रंथाची समाप्ति डायोगो डि कौटो यानें केली असून हाहि ग्रंथ फारच उत्कृष्ट आहे.

डामिया ओडे गोएरू हा मोठा पंडित होऊन गेला. त्यानें मॅनुअल राजाचें चरित्र व इतर ऐतिहासिक ग्रंथ लिहिले आहेत. गोवा येथें वीस वर्षें संशोधन करून फर्नोओ लोपेज यानें 'हिस्टेरिया डो डीस्न्कोब्रिमेंटो ए कॉक्यूइस्टा इंडिया पेलोस पोर्तुगीएझे, हा अमूल्य ऐतिहासिक ग्रंथ लिहिला. गास्पर कोरिया याचा 'लेंडस डा इंडिया'' हा ग्रंथहि हिंदुस्थानविषयक माहितीनें भरलेला आहे. याशिवाय पौरस्त्य देशांसंबंधीं पुष्कळ ऐतिहासिक ग्रंथ प्रसिद्ध झाले. खास पोर्तुगालच्या इतिहासावरहि फान्सिको डि अंड्राडे, बर्नोडो डाक्रुझ, विशप-ओसोरियो इत्यादिकांनीं ग्रंथ लिहिले. यूरोपविषयक माहिती देणाऱ्या ग्रंथांपैकीं डेस्कोब्रिमेंटो डि फ्लॉलिडा, इटिनरॅरियो, वर्दादेरा इन्फरमॅशियो, दसटेरास डो प्रेस्टो जोआओ, एथियोपिया ओरिएंटल, इटिनरेरियो ड तेरा संटा, हिस्टोरिया द विदा डो पाद्रे फ्रान्सिको झेव्हियर, हिस्टोरिया ट्रेजीको मरीटिमा, इत्यादि प्रमुख होत.

अद्भुतकथावाङ्मयामध्यें रीबीरोचे मेनीना ए मोका, मोरेसचा अत्यंत महत्त्वाचा पाल्मीरिम डा इंग्लाटेरा हा ग्रंथ, फर्नोडिसचा डि ड्रूआर्डोस, लोबॅटोचा 'डि क्वारिसेल डि ब्रेटन', फेरीराचा झाग्रमोर इत्यादि ग्रंथ प्रमुख होत. सॅम्युएल यूस्कुडो याचा कान्सोलोसम आस ट्रिब्यूलाकोएस डि इस्रायल हा संवादपर ग्रंथ असून त्यांत प्रत्येक शतकांत पोर्तुगीज लोकांचा कसा छळ झाला याचें वर्णन आहे. पोर्तुगीज धर्मगुरूंनीं जी महत्त्वाची कामगिरी बजावली तिची माहिती बार्थोलोम्यू डॉस मार्टिरेसच्या 'कॅथेलिस्को डा डौट्रिना' या ग्रंथांत व लुइझ-डि ग्रानडाच्या 'कॉंपेडियो डि डौट्रिना ख्रिस्ता' व 'सर्मोज' या ग्रंथांत आढळते.

नीतिपर ग्रंथांत पिंटो याचा इमाजेन्स द विदा ख्रिस्ता, बिशप ॲराएझचा डायलोगस, थोमे डि जोरुचा ट्रबल्हास डि जोसस हे ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत.

१७ वें शतकः—१६ व्या शतकांत पोर्तुगालमध्यें उत्कृष्ट वाङ्मय निर्माण झालें पण १७ व्या शतकांत वाङ्मयाच्या उत्पत्तीला उतरती कळा लागली. १७व्या शतकांत जें वाङ्मय निर्माण झालें तें कमी दर्जाचें होतें. १६ व्या शतकांतील वाङ्मयांत जें नावीन्य, जी कल्पकता, जें विचारगांभीर्य दिसून येतें तें १७ व्या शतकांतील वाङ्मयांत दिसून येत नाहीं; याला अनेक कारणें होतीं. त्यांपैकीं प्रमुख म्हटलें म्हणजे धर्मगुरूंची सत्ता प्रबळ झाल्यामुळें त्यांनीं वाङ्मयावर कडक निर्बंध घातले. या शतकांतील राजेलोकांनींहि धर्मगुरूंचीच री ओढली. त्यामुळें उदात्त व खऱ्या वाङ्मयाला थारा मिळेनासा झाला.

अशा परिस्थितींतहि थोडेफार मोठे कवी निर्माण झालेच; त्यांपैकीं, सोरार व्हायोलॅंट डोसीओ, बर्नाडो फीरीरा, डि थॉमस डि नोरोन्हा, ॲंटोनियो सेरा डि कॅस्टो हे होत. महाकाव्यें लिहिणाऱ्यांमध्यें गॉब्रियल पीराडे केस्टो, फ्रॉन्सिस्को डि सा डि मॅझेस यांचीं नांवें घेण्यासारखीं आहेत. ऐतिहासिक ग्रंथांत बर्नाडो डि ब्रिटोचे मॉनर्कियो लुस्टिगाना व क्रॉनिका डि सिस्टर हे ग्रंथ बऱ्यापैकीं आहेत. मॅनोएल डि फारिया यानेंहि पोर्तुगीज इतिहासावर पुष्कळ पुस्तकें लिहिलीं आहेत. नाटककारांमध्यें मेलो हा प्रमुख असून त्याचें औटो डि फिदाल्गो हें नाटक फार लोकप्रिय आहे. मेरियाचा अल्को, फेरोडोचा लेटर्स ऑफ डा पोर्तुगीज नन हा ग्रंथ सुंदर असून त्यातील भाषा व विचार उदात्त आहेत.

१८ वें शतकः—१८ व्या शतकांतील पहिलीं कांहीं वर्षें वाङ्मयांत सुधारणा झाली नाहीं. पण पुढें तो मनु पालटत

चालला. पोर्तुगीज ग्रंथकार व लेखक यूरोपमधील स्वतंत्र वातावरणांत जाऊन राहूं लागल्यामुळें यूरोपमधील वाङ्मय-विषयक परिस्थितीचा त्यांच्या मनावर परिणाम झाल्याविना राहिला नाहीं; व त्यामुळें पोर्तुगीज वाङ्मयाला पुन्हां नवीन व व्यापक स्वरूप प्राप्त होऊं लागलें. वाङ्मयाचें पुनरुज्जीवन होण्यास सुरवात झाली. या चळवळींत पोर्तुगालमधील विद्यामंदिरांनींहि भाग घेण्यास सुरवात केली; व अशा रीतीनें पुन्हां १६ व्या शतकांतील वाङ्मयाप्रमाणें १८ व्या शतकांतील वाङ्मयाला तेजस्वी स्वरूप येऊं लागलें.

१७२० सालीं पांचव्या जॉनच्या आश्रयाखालीं इतिहास विद्यामंदिर स्थापन झालें व त्या विद्यामंदिरातर्फे मेमोरियास हा ऐतिहासिक ग्रंथ १५ भागांत प्रसिद्ध झाला. १७८० सालीं रॉयल ॲकॅडमी ऑफ सायन्सेस ही संस्था स्थापन झाली व या संस्थेमार्फत डिक्शनरीयो डा लिंग्वा हा अपूर्ण ग्रंथ व मेमोरियास हे ग्रंथ प्रसिद्ध झाले. १७५६ त क्रुएझ डे सिल्हा यानें अर्केडिया यूलिसीपोनेन्से ही काव्यसंस्था स्थापन केली. या संस्थेचा एक सभासद गासी यानें कॅटाटा डे हा दिदो पद्यसंग्रह लिहिला; व त्याशिवाय पुष्कळ सुनीतें लिहिलीं. क्रिटा नांवाच्या एका न्हाव्याची कविता शृंगारिक पण मधुर आहे. १७९० सालीं अर्केडिया म्हणून नवीन संस्था पुन्हां स्थापन झाली. त्या संस्थेपैकीं बोकेज, आगस्टिनो डे मॅसेडो व कन्हों सेमेडो हे तीन प्रमुख कवी होत. पण या काळांतील उत्तम कवि म्हणजे टोर्लेटनो हा होय. यानें आपल्या काव्यांत तत्कालीन आचरट आचारविचारांचें सुंदर भाषेत यथार्थ चित्र रेखाटलें आहे. फ्रॅन्सिस्को मॅनोएल यानेंहि पुष्कळ पद्य व गद्यग्रंथ लिहिले आहेत. याची भाषा साधी पण सुंदर आहे. पोर्तुगीज भाषेला यानें वैभव प्राप्त करून दिलें.

पोर्तुगालमधील एकतंत्री जुलमी राजशाहीविरुद्ध या काळांत चळवळ सुरू झाल्यामुळें या चळवळीला रंगभूमीवर तोंड फुटलें. तत्कालीन परिस्थितीसंबंधींचीं पुष्कळ नाटकें भराभर बाहेर पडूं लागलीं. पण या नाटकांतील भाषा खालच्या वर्गासाठीं लिहिली असल्याकारणानें व त्यांत उदात्त विचारांचा अभाव असल्यानें हीं नाटकें फारशी यशस्वी ठरलीं नाहींत. अशीं नाटकें म्हणजे ॲटोनियो सिल्व्हाचें ऑपेराज पोर्तुगेझास, लुइझचें ओस मेरीडोस, पेराल्टस इत्यादि होत. अर्केडिया संस्थेतील कांहीं विद्वानांनीं नाटकें लिहिलीं पण तीं फ्रेंच नाटकांची प्रतिकृति असल्यानें तींहि फारशीं लोकप्रिय झालीं नाहींत. गार्सांचीं थिएट्रो नोव्हो व असेंब्लिया औपोर्लेडा हीं नाटकें मात्र नांव घेण्यासारखीं आहेत.

१९ वें शतकः—१९ व्या शतकांत 'अद्भुत' उर्फ रोमॅंटिक वाङ्मयाची प्राणप्रतिष्ठा झाली. या वाङ्मयाचा जनक गॅरेट हा होय. यानें कॅमोएस या कवितेंत जुन्या कवितांच्या बाबतींतील नियमांना पार झुगारून दिलें आहे. त्याच्या कवितेंत साधेपणाबरोबरच मधुरता आणि प्रसाद यांचा मिलाफ झालेला आढळतो. अद्भुताची ही कल्पना कॅस्टिल्हो याच्या ग्रंथांत पराकोटीला गेलेली आढळते. कॅस्टिल्होला पुष्कळच अनुयायी मिळाले; त्यांपैकीं लेमॉस, पॅसॉस, रीबारो, लीअल इत्यादि प्रमुख होत.

१८६५ मध्यें एक नवीनच प्रकरण उपस्थित झालें. कॅस्टिल्हो यानें चगास याच्या 'मोर्डीडाडे' याच्या कवितेला प्रस्तावना लिहून तींत काव्याचा व तत्त्वज्ञानाचा निकट संबंध आहे असें प्रतिपादन केलें. या प्रश्नावर भयंकर रण माजलें व शेवटीं कॅस्टिल्होच्या मताचा पराजय झाला या वादानें पुष्कळच वाङ्मय निर्माण झालें. कॅस्टिल्होच्या अनुयायी वर्गांत जोआओडयूक्स हा प्रमुख होय. याची कविता नितांत सुंदर अशी आहे. ॲथेरो डे कॅटल याचें 'ओडस मॉडर्नास' हें काव्यहि प्रतिभाशाली आहे. तसेंच त्याचें गद्यहि साधें पण तात्त्विक विचारपरिप्लुत आहे. या शतकांत बरीच सुंदर कविता निर्माण झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. यूनक्वीरोचीं 'ए मोर्टे डे डी जोआओ पॅट्रिया, ओस सिंप्लिस हीं काव्यें मनोरम आहेत. लीअलच्या 'क्लॅरिएडेस डे सुल' या काव्यांत प्रतिभा वारंवार चमकतांना दिसते. नोब्रे याची कविता तेजस्वी, मधुर, व भावनाप्रधान आहे. याशिवाय या काळांत वर्दे कार्व्हलो, फीनो, मॉंटीर, आलेन्व्हिरा, वीइरा इत्यादि कवी होऊन गेले.

गॅरेटनें रंगभूमींतहि बरीच सुधारणा घडवून आणिली. पोर्तुगालमधील राष्ट्रीय प्रसंगावर त्यानें नाटकें रचून रंगभूमि दणाणून सोडली. त्याचीं औटो डे गिल विसेंटे, अलफागेम डे संतारेम, फ्री लुइझ दे सौसा हीं नाटकें सर्वोत्कृष्ट आहेत. गॅरेटची परंपरा लीयल, अमोरिम पें चगास यांनीं सुरू ठेवली. सामाजिक नाटकें लिहिणाऱ्यांत बोस्टर, व हास्योत्पादक नाटकांत काल्डीरा हे प्रमुख होत. लोवॅटोचीं नाटकेंहि चांगल्यापैकीं आहेत.

अद्भुत कादंबरीवाङ्मयांत हर्क्यूलोनो याच्या कादंबऱ्यांना पहिलें स्थान दिलें पाहिजे. त्याच्या लेंडस व नॅरेटिव्हास ओ मोनेस्टीकॉन इत्यादि कादंबऱ्या चित्ताकर्षक आहेत. सिल्व्हा, ॲंड्राडे ब्रॅंको, कोएल्हो यांच्या कादंबऱ्याहि श्रेष्ठ दर्जाच्या आहेत.

हर्क्यूलोनो हा इतिहासकार म्हणूनहि अत्यंत प्रसिद्ध आहे. त्याचा हिस्टोरिया डे पोर्तुगाल हा ग्रंथ लोकमान्य आहे. संतारेम व बायकर यांचीं भूगोलविषयक पुस्तकें प्रमाण मानण्यांत येतात. याशिवाय बॅरॉस, लोबो, मार्टिन्स, इत्यादि अनेक उत्कृष्ट इतिहासकार या शतकांत निर्माण झाले.

टीकाशास्त्राच्या बाबतींतहि या शतकानें बरीच आघाडी मारली. यासंबंधांत ओर्टिगाओ, मर्केटो, फियाल्हो, सिल्व्हा, पिंटो इत्यादिकांचीं नांवें घेण्यासारखीं आहेत. शास्त्रीय वाङ्मयांतहि पोर्तुगालनें पुष्कळ ग्रंथकार निर्माण केले. ॲंटोनियो संपेओ, ॲंटोनियो आगस्टो व नवरो हे उत्कृष्ट वर्तमानपत्रकार म्हणून प्रसिद्ध आहेत.

**पोलंड**—या देशाचें पोलीश नांव पोलस्क असून पोलेन हें जर्मन नांव आहे. अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत हें एक स्वतंत्र राज्य होतें. सांप्रत याचे राशियन व जर्मन पोलंड असे दोन भाग आहेत. राशियन पोलंडच्या उत्तरेस व पश्चिमेस जर्मनी, दक्षिणेस आस्ट्रिया व पूर्वेस राशिया असून या प्रदेशाचे दहा प्रांत आहेत हा देश साधारण३००-४०० फूट उंचीच्या मैदानाचा आहे. परंतु त्यांत लहान लहान टेंकड्या, ओढे, जंगलें, तलाव, दरीखोरीं दलदलीच्या जागा वगैरे प्रकार इतके आहेत कीं, जणूं काय त्यांचें हें जाळेंच वनलें आहे. जमीनींत सुपीकपणा जास्त आहे. दक्षिणेकडे प्रदेश उंच उंच होत गेला आहे. जंगलांत ओक, बीच, पाईन वगैरे झाडें फार आहेत. विश्चुला नदीनें देशाचे साधारण दोन भाग पडले आहेत.टेंकड्यांच्या रांगा या नदीच्या पूर्व पश्चिम भागीं असून त्यांची सर्वांत जास्त उंची २०१० फूट आहे. पैकीं वेस्काईड टेंकड्यांत पोलंडची मुख्य खानिज संपत्ति आहे. पाणी पुष्कळ असल्यानें भाजीपाला व फळफळावळ चांगली पिकते. नद्या उथळ असून त्यांच्या पाटांपासूनहि बागाईत पिकवितात. प्राचीन काळीं या नद्यांच्या जाळ्याच्या प्रदेशांत मोठमोठीं सरोवरें होतीं असें दिसतें. सांप्रत या भागांत त्यावेळच्या गाळाच्या जमीनीमुळें शेती उत्तम पिकते. नद्या उथळ( कांहीं तर २ ते ५ फूट खोलीच्या) असल्यानें पावसाळ्यांत पुरामुळें या प्रदेशाची फार खराबी होते. विश्चुलेचें पात्र १००० यार्ड रुंद असून तिच्या पुरानें दोंडशें मैल आसपासचा प्रांत जलमय होतो. म्हणून तिच्या कांठावर २४ फूट उंचीचे व ६० मैल लांबीचे बंधारे बांधले आहेत. तरी पण एखाद्या वेळीं त्यावरूनहि पलीकडे पूर पसरतो व क्रॅको-ओपोलो या सारख्या शहरांनाहि धक्का बसतो. मात्र यामुळें या नद्यांच्या जलमार्गानें व्यापार चांगला चालतो. व्यापारांत धान्य, लोकर, इमारती लांकूड, लांकडी खेळणीं, ताग वगैरे जिन्नस असतात. पूर्वी यात्रांच्या ठिकाणीं हा व्यापार चाले. सांप्रत तो आगगाडीनें राशीया व जर्मनी यांच्याशीं साधारण सालीना ३०,००,००० पौंडांचा चालतो. बीपर, बग, नाऱ्यू, वार्ता, मेमल वगैरे इतर नद्या आहेत. सुवालकी प्रांतांत सर्वांत जास्ती तलाव आहेत. सर्वांत मोठा तलाव गोप्लो नांवाचा १८ मैल लांबीचा आहे. देशाची हवा समशीतोष्ण असून पावसाची सरसरी २३ इंच असते. मात्र दक्षिणेकडे कार्पेथियन पर्वत असल्यानें तिकडे ही ३० पर्यंत जाते. बर्फ थोडें पडतें. धुकें मात्र बरेंच असतें. उत्तर यूरोपमधील फळफळावळ व फुलें (विशेषतः जर्मनींतील) येथें उत्पन्न होतात. प्राचीन काळीं येथें आद्ययुगीन पशू होते. हल्लीं काळवीट, घोडा, पिंगट अस्वल, रानडुकर, ससे वगैरे पशू आणि सर्व तऱ्हेचे पक्षी (विशेषतः गाणारे पक्षी) येथें आढळतात. सर्व राशियांत हा देश जास्त वस्तीचा आहे. दर चौ. मैली १९० असें वस्तीचें प्रमाण आहे. एकंदर पोलंडची लोकसंख्या व क्षेत्रफळ नक्की समजणें कठिण आहे. कारण महायुद्धामुळें पोलंडचे तीन तुकडे पडले आहेत. इ. सन १७७२ पूर्वी जेव्हां तें एकत्र होतें तेव्हां त्याचें क्षेत्रफळ २७४०१८ चौ. मै. होतें. सांप्रत (१९२५) लोकसत्ताक पोलंडचा जो भाग आहे त्याचें क्षेत्रफळ ३६७०२२ चौ. किलो. असून लोकसंख्या ३६२३४७२७ आहे. त्यांत वार्सा शहर ७॥ लक्ष लोकवस्तीचें आहे. शुद्ध पोल लोक व्हिश्चुला व पोसेन नद्यांच्या मधील प्रदेशांत आहेत. बाकीच्या पोल लोकांत स्लाव, राशियन, ज्यू, लिथूनियन वगैरे रक्तांचें मिश्रण झालेलें आहे.प्रदेशभिन्नत्वानें पोल लोकांना निरनिराळीं नांवें मिळालेलीं आहेत. त्याचप्रमाणें त्यांच्या भाषा व पोशाख वगैरेहि भिन्नभिन्न आहेत. त्यांच्यावर इतरांपेक्षां सर्वांत जास्त जर्मन संस्कृतीची छाप हळु हळु बसत चालली आहे. त्यांच्या व्यापारांतहि जर्मनांचा हात जास्त शिरकला आहे. लोडझ (व्यापराची अतिशय मोठी पेठ) शहरीं सारा त्यांचाच भरणा आहे. तसेंच ज्यू लोकांच्या हातीं बहुतेक व्यापार व शेती आहे. पूर्वी जमीनदारी पद्धत असल्यानें शेतकरी हा नुसता भाडोत्री असे. पुढें निरनिराळ्या वेळीं कायदे होऊन व पुष्कळ जमीनदारांच्या जमीनी सरकारनें शेतकऱ्यांत वाटून दिल्यामुळें सांप्रत शेतकरी जमीनीचा मालक झाला आहे. पोलंड हा देश अति प्राचीन काळापासून शेतकीप्रधान (यूरोपचें धान्याचें कोठार) म्हणून प्रख्यात आहे. शेतीच्या सुधारणेच्या बाबतींत राशियापेक्षांहि पोलंड पुढें गेलें आहे. या देशाची अर्धी जमिन शेतीखालीं असून हल्लीं तींत बीटरूट (साखरेसाठीं), बटाटे, गहूं, ओट, तंबाखू यांची लागवड जोरानें होत आहे. तसेंच मधमाशा पाळून मधाची निपज व उत्तम अवलादीचीं जनावरें तयार करणें हाहि धंदा चालू आहे

सन १८७५ पासून उद्योगधंद्याच्या भरभराटीस प्रारंभ झाला. सूत व कापडाच्या गिरण्या बऱ्याच चालू करण्यांत आल्या. सन १८६४ त १५ लाख पौंडांचें, तर १९०५ त ५ कोटी ३० लाखांचें उत्पन्न उद्योगधंद्यांपासून झालें. साखर, कमावलेलीं कातडीं, कागद, सीमेंट, साबू, मेणबत्त्या, वगैरे धंदे सुरू आहेत. सरकारी कारखान्यांतून दरसाल १० लाख टन साखर निघते. पोलिश बूट फार प्रसिद्ध आहेत. सन १९११ त ७३ कोटी फ्रँक किंमतीचा माल निर्गत झाला व १ अब्ज २२ कोटींची आयात झाली.

दक्षिण भागांत खाणी पुष्कळ आसून त्यांतून खालील पदार्थ व धातू सालीना पुढील प्रमाणांत बाहेर जातात-दगडी कोळसा ६० लाख टन, जस्त १२ हजार टन, लोखंड व पोलाद ५ लक्ष टन, शिवाय तांबें, कथील, गंधक, वगैरे. खाणींच्या जवळून आगगाड्यांचे रस्ते नेले आहेत.

इ ति हा स, प्राचीनः—१० व्या शतकापर्यंत पोलंडबद्दल विश्वसनीय माहिती सांपडत नाहीं. परंतु पोल लोक पूर्वी डान्यूब नदीतीरीं रहात असावेत व त्यांस रोमन लोकांनीं हांकून दिल्यावर ते ओडर आणि विश्चुला नद्यांच्या कांठीं

रहावयास गेले असावेत. या ठिकाणीं लिचिसी लोक रहात असत. त्यांचा उद्योग म्हणजे शिकार करून उदरपोषण करणें हा होता. ग्रीक लोकांनीं येथें प्रथम ख्रिस्ती धर्म सुरू केला. बोलेस्लास पहिला (१०२५) हा पोलंडचा पहिला राजा झाला.

पोलंड देशावर ख्रिस्तेतर लोकांनीं स्वाऱ्या केल्यामुळें तेथील ख्रिस्ती संस्कृति सर्व लयास गेली. तिसऱ्या बोलेस्लास राजाच्या कारकीर्दीत जर्मन लोकांच्या विरुद्ध आपलें स्वातंत्र्य राखण्याचें सामर्थ्य पोल लोकांच्या अंगीं आलें.व याच राजानें ख्रिस्तेतर धर्माच्या लोकांस ख्रिस्ती बनविण्याचा धडाका लावला.

११३८ ते १३०५:—या काळांत पोलंड देशाचे लहान लहान तुकडे झाले होते. १२४१ सालीं बतूच्या नायकत्वाखालीं तार्तर लोकांनीं पोलंडवर स्वारी केली व सर्व प्रदेश निर्जन वन करून सोडला.

बतूच्या या स्वारीचा पोलंडच्या राजकीय आणि सामाजिक परिस्थितीवर फार चांगला परिणाम झाला. यामुळें दुसरीकडचे लोक पोलंडच्या ओसाड प्रदेशांत वस्ती करण्यास येऊं लागले. व्यापारी, उदमी, व चांगले सुसंस्कृत लोक येथें आल्यामुळें येथें मोठमोठीं शहरें वसूं लागलीं. हे व्यापारी बहुधां जर्मन असत. नाइट्स् ऑफ दि सोर्ड व कोनूरॅड ड्यूकनें बोलाविलेले जर्मन यांच्यामुळें पोलंडला पुढें फार त्रास झाला.स.१२५९ मध्यें तार्तार लोकांची पुन्हां एकदां वावटळ पोलंडमध्यें आली. व याच सुमारास लिथुआनियन नांवाचे आणखी एक शत्रू उपस्थित झाले, आणि तार्तार, जर्मन व लिथुआनियन यांमध्यें पोलंड देश विभागला गेला.

१३०५ ते १३८६:—परंतु पहिला व्लाडिस्लास यानें लहान आणि मोठें पोलंड याचें ऐक्य घडवून आणलें. तसेंच पोलंडचा मोठा मुत्सद्दी तिसरा कॅसिमियर यानें मोठ्या खुबीनें लग्नसंबंध जुळवून आणून पुनश्च पोलंड देश एक केला. यानें राज्यव्यवस्थेंत पुष्कळ सुधारणा केल्या. त्याच्या पश्चात त्याचा भाचा हंगेरीचा लुई दि ग्रेट (१३७०–१३८२) आणि नंतर २ रा व्लाडिस्लास यांनीं पोलंड व लिथुआनिया यांचा एकजीव करून ट्युटॅनिक नाइट्सचा चांगला समाचार घेण्याचा विचार केला. मध्यंतरीं भिक्षुकवर्गानें आपले हक्क हळू हळू मिळविले होते. व १३७४ मध्यें श्लाच्टा म्हणजे कुलीन लोकांनीं बरेच हक्क मिळविले व त्यांच्या मोबदल्याप्रीत्यर्थ त्यांनीं राजास लष्करी मदत करावी लागे. यावेळच्या धार्मिक चळवळीमुळें बरेंच राष्ट्रीय ऐक्य घडून आलें व भिक्षुक मंडळीनें खालच्या गरीब लोकांवरील बराच जुलूम कमी केला. लहान पोलंडमधील क्रॅको हें राजधानीचें शहर होऊन यूरोपमधील अत्यंत सधन असें शहर झालें. १४ व्या शतकांत पोल नगरास राजकीय हक्कहि प्राप्त झाले. तसेंच इतर दुसऱ्या खालच्या लोकांनाहि कांहीं कांहीं हक्क प्राप्त झाले होते. मात्र ज्यू लोकांना एखादा देखील हक्क मिळाला नव्हता. तरी पण त्यांना पोलंडमध्यें इतर देशापेक्षां फार चांगलें वागविण्यांत येई.

जॅगिएलोनिक काल (१३८६–१५७२):—व्लाडिस्लासला जर्मन नाइट्सनां चोपायचें होतें. यासाठीं लिथुनिया आणि पोलंड यांचा संघ स्थापण्यांत आला (१४०१), व १४१० या वर्षी या दोन्ही देशांच्या फौजा एकवटून त्यांनीं सॅमोगिटिआची सुटका करण्यासाठीं कंबर कसली.टॅनेनबर्गच्या लढाईंत नाइट लोकांची हाडें खिळखिळीं झाल्यामुळें त्यांचें राजकीय ऐक्य विस्खलित झालें.

दुसरा व्लाडिस्लास हा फार राजकारणकुशल असल्यामुळें याच्या कारकीर्दीत पोलंड हें यूरोपच्या इतिहासांत प्रमुख राष्ट्र म्हणून गणलें जाऊं लागलें. त्यानंतर व्लाडिस्लास तिसरा यानें पोलंड देशाच्या राज्यास आणखी बळकटी आणली. १४४७ मध्यें चवथा कॅसिमीर हा पोलंड आणि लिथुआनियाचा राजा झाला. लिथुआनिया हा पोलंडप्रमाणें नीट सुसंघटीत देश नव्हता. निरनिराळे धर्मपंथ व निरनिराळ्या भाषा या देशांत चालू होत्या. कॅसिमीर हा स्वतः लिथुआनियन होता.यामुळें पोलिश लोकांस तो अप्रिय झाला व त्यांना कॅसिमीरची अत्यंत दूरदृष्टीची देशाभिमानपूर्ण राजकीय संघटना संशयास्पद वाटली.

इकडे ट्युटॉनिक आर्डर या संघाची राजकीय वावर्तीतहि पिछेहाट होत होती. अखेरीस १४१४ मध्यें नाइट्स् लोकांनीं डायट (राजसभा) निर्माण केली. व स. १४३० मध्यें ती उमरावशाहीच्या हातांत देण्यांत आली. या सभेमुळें जुन्या तक्रारी मिटण्याऐवजीं वाढतच चालल्यामुळें प्रशियन संघ स्थापन झाला व त्यानें राजकारणांत आपणास समान हक्क मिळावेत अशी मागणी केली. या संघावर पोपनें बहिष्कार घातला. तेव्हां संघानें पोलिश राजाचा आश्रय घेतला. पोलिश राजानें सर्व प्रशियन प्रांत आपल्या राज्यास जोडले व त्यांनां स्थानिक स्वायत्तता (लोकल ऑटॉनमी) देऊन त्यांचा व्यापार खुला केला. यामुळें कॅसिमीर याची आणि नाइट लोकांची लढाई जुंपली. १४६२ मध्यें पक येथें नाइट लोकांचा पराजय झाला व स. १४६६ मध्यें त्यांनां थॉर्नचा तह करणें भाग पडलें. नाइट्सचा देश खास प्रशियाखालीं मोडूं लागला. व प्रशियन राज पोलराजास करभार देऊं लागले. याप्रमाणें प्रशिया आणि पोलंड ह्यांचा एक संघ निर्माण झाला व नाइट लोकांस विश्चुलापार हांकून लावण्यांत आलें.

१४८४ मध्यें पोलंडला तुर्कांपासून खराखुरा त्रास पोंहचूं लागला. यावर्षी टर्कानें किलिया आणि अक्करमन हे डान्यूब आणि नीस्टर नदीवरील मोठे किल्ले सर केले.यामुळें पोलांच्या व्यापारावर जबरदस्त धाड आली. स. १४९२ आणि १५०६ पर्यंत चवथ्या कासिमीर आणि सिगिस्मंड (पहिला) यांचीं राज्यें विभक्त झालीं. पण लिथुआनियन यांनीं मस्कोवी झारकडून मार

खाल्ल्यामुळें १४९५ सालीं ते पुन्हां पोलांनां येऊन मिळाले. पहिला जॉन अल्बर्ट याच्या वेळीं पोलराजवंशाच्या सत्तेची परमावधी झाली होती. यामुळें जॉन अलबर्टनें तुर्कीविरुद्ध असलेल्या संघाचा पुढाकार घेतला, परंतु त्यांत त्याला अपयश आलें. याच्यामागून अलेक्झांडर हा दुर्बल राजा आल्यामुळें लिथुआनियामध्यें तार्तार आणि मस्कोव्ही लोकांनीं धुमाकूळ घातला. सर्व सत्ता श्रीमंत लोकांच्या हातांत गेल्यामुळें गरीब लोक पिळले जात होते. त्याच्या पश्चात पहिला सिगिस्मंड (१५०५–१५४८) यानें एक चांगलें सैन्य उभारलें. या वेळीं तार्तारांच्या स्वाऱ्या पोलंड साम्राज्याच्या थेट मध्यापर्यंत होऊं लागल्या.

कील आणि काळासमुद्र यांमधील मैदानाची चांगली मोर्चेबंदी करणें हें या प्रजासत्ताक राज्याचें कर्तव्य होतें पण तें तसेंच राहिलें होतें. १५२६ त झालेल्या हंगेरीच्या राज्याच्या पिछेहाटीमुळें पोलंडच्या परिस्थितीवर फार परिणाम झाला. लवकरच ऑस्ट्रिया व पोलंडचा स्नेहसंबंध सिगिस्मंडच्या मुलाच्या लग्नानें जास्त दृढतर झाला व याच्याच राज्यांत मॅसोव्हियाची डची पोलंडला जोडण्यांत आली. दुसऱ्या सिगिस्मंडचें २४ वर्षांचें राज्य पोलंडच्या इतिहासांत परकीयांच्या स्वाऱ्या आणि अंतस्थ असंतोष ह्या दोन्ही गोष्टींमुळें अत्यंत बिकट परिस्थितीच्या पेचांत सांपडलेलें होतें. पोलंड देशांत नवीन लूथर पंथास मज्जाव होता. तरी पण हा नवीन पंथ आपलें पाऊल पुढें टाकीत होताच.

इकडे लूथरचा पंथ याप्रमाणें प्रगति करीत असतां कॅल्व्हिनिझमनें (कॅल्व्हिनच्या पंथानें) आपलें बोट पोलंडमध्यें शिरकविलेंच होतें. कॅल्व्हिनपंथ जर्मन नसल्यामुळें तो वाढूं लागला परंतु या सर्वांवर बोहेमियन भावंडांच्या पंथानें ताण केली. या पंथाचा प्रसार प्रशियांत फार झाला पोल लोकांनां हे धर्मपंथी लोक आवडत असत. कारण त्यांना मोठमोठ्या जमिनी मिळून पुष्कळ सवलती सहज प्राप्त होत असत. कॅथॉलिक धर्माची स्थिति ह्यावेळीं पोलंडमध्यें अगदीं वाईट होती. कारण धर्मगुरू हे अगदीं भोंदू असत. त्यांचीं धर्मतत्त्वें अशीं कांहींच नसत; त्यांच्यापैकीं कांहींची वर्तणूक अत्यंत निंद्य असे.

दुसऱ्या सिगिस्मंडच्या कारकीर्दींत (१५४८–१५७२) सर्व पंथांस पूर्ण मोकळीक मिळाली. यामुळें सर्व प्रकारचे धर्मसुधारक या देशांत वावरूं लागले. १५५८–१५५९ या वर्षी प्रॉटेस्टंट पंथाची सत्ता परमावधीस पोंचली. पण पुढें तीस ऱ्हास लागला. याचें कारण यापुढें कॅल्व्हिनपंथी व लुथेरिन पंथी हे शत्रूप्रमाणें वागूं लागले. शिवाय कॅथॉलिक पंथांताहि याच सुमारास चेतना उत्पन्न झाली. १५६५ सालीं देवत्रयीवर विश्वास न ठेवणाऱ्या अधर्मी लोकांस हांकून देण्याचें फर्मान दुसऱ्या सिगिस्मंडनें काढलें व त्यानें पोलंडमध्यें धर्मसुधारणेच्या कट्टया शत्रूंस (जेसुइटपंथी लोकांस) आपल्या राज्यांत घेतलें व याप्रमाणें पुनश्च कॅथॉलिक पंथाची घडी बसविण्यांत आली.

१६ व्या शतकामध्यें नाइट लोकांचें राज्य डळमळूं लागलें. इव्हॅन दि टेरिबलनें लिव्होनियावर स्वारी केली. तेव्हां दुसऱ्या सिगिस्मंडला या प्रकरणांत हात घालावा लागला. व त्यानें १५६१ सालीं लिव्होनिया घेतला व तो लिथुआनियाला जोडण्यांत आला. सिगिस्मंड हा धोरणी राजा असल्यामुळें त्यानें हळू हळू पोलंड आणि लिथुआनियम या दोन देशांचा एकजीव करण्याचा प्रयत्न केला. हे देश १५६९ सालीं अगदीं पुरतेपणीं एक जीव झाले. १५७२ सालीं दुसरा सिगिस्मंड वारला.

याप्रमाणें या जॅगिएलोनिक वंशाचा इतिहास (१३८२–१५७२) म्हणजे पोलंडचें एकराष्ट्र निर्माण करण्याचा इतिहास होय. हे बहुतेक सारे जॅगिएलोनिक राजे मुत्सद्दी आणि धोरणी होते. एवढेंच नव्हे तर ते सर्व सारखेच तरतरीत, हुषार आणि राजकारणपटु असून त्यांनीं मोठ्या आणीबाणीच्या वेळीं या घराण्यानें पोलंडदेशाचें तारूं मोठ्या शिताफीनें हांकून या देशास नांवालौकिकास चढविलें.

१५७२–१७७२:—दुसऱ्या सिगिस्मंडनंतर वारसाबद्दल प्रश्न उपस्थित झाला. शेवटीं हेनरी; अँजूचा ड्यूक यानें बऱ्या लोकांनां पैसा देऊन आपली निवडणूक करून घेतली. सर्व धर्मीयांस आपापल्या मतानुसार वागण्यास मुभा देण्यांत आली. शेवटीं १५७३ मध्यें व्हॅलाइसचा हेनरी हा पोलंडचा राजा निवडला गेला.

नंतर लवकरच राज्यव्यवस्थेंत सुधारणा करण्यांत येऊन नियंत्रित राजसत्तेऐवजीं निवडलेल्या अधिकाऱ्यांनीं राज्य करावें असें ठरलें. आतां राजाला पुढील वारसाबद्दल बोलण्याचा अधिकार नव्हता. कारण हें राज्य वंशपरंपरागत नव्हतें. सीनेट सांगेल त्या स्त्रीसमवेत राजानें लग्न केलें पाहिजे. इतकी राजाची परावलंबी स्थिति झाली, व प्रजासत्ताक राज्यास उतरती कळा लागली.

व्हॅलाइसचा हेनरी व नंतर ट्रान्सिल्व्हानियाचा राजा स्टिफन यांनीं कांहीं काळ राज्य केलें. पुढें स्वीडनच्या राजाचा मुलगा सिगिस्मंड (तिसरा) यास पोलंडचा राजा करण्यांत आलें (१५८७–१६३२). मस्कोव्हीच्या झार घराण्याचा ऱ्हास आणि जर्मनीमधील ३० वर्षांचें युद्ध यामुळें पोलंडला पुन्हां आपलें स्थिरस्थावर करण्यास सांपडलें, व या देशाच्या सुदैवानें झल्कीवस्की, चोडकीवस्की आणि कोनिकपोलस्की हे अत्यंत शूर असे आरमाराधिपती या देशास लाभले. पुढें ५० वर्षांनीं पोलंडच्या प्रचंड सत्तेचा ऱ्हास झाला. त्याचें मूळ कारण पोल लोकांचा शिस्तीविषयींचा तिटकारा हेंच होय. यावेळीं स्झलाच्टा आणि डायट (सभा) यांतील सभासदांमध्यें राष्ट्रीयत्वाचा अणुरेणुसुद्धां वास करीत नव्हता. होतां होईल तो पैसा खर्च करावयाचा नाहीं असा त्यांचा हेतु होता. मध्यंतरीं बरीच बंडें झालीं. स. १६०७ मध्यें मुख्य

येथें बंडखोरांचा पराभव करण्यांत आला व १६०९ मध्यें लोकांची मनें पुन्हां शांत करण्यांत आलीं.

चवथा व्लाडिस्लास ( १६३२-१६४८ ) यानें लोकांनां बरेच हक्क दिले. स. १६३४ मध्यें यानें मस्कोव्ही लोकांकडून स्मोलेन्स्क आणि पूर्वेकडील प्रदेश परत मिळविले. पोर्ट म्हणजे टर्कीला यानें धाक घातला; आणि स्वीडनपासून बाल्टिक प्रांत आणि समुद्रालगतचा प्रदेश परत मिळविला.

पोलिश आणि मस्कोव्ही राजकारणात कोसॅक लोकांनीं सतराव्या शतकांत फार मोठा भाग घेतला. यूरोपच्या नैर्ऋत्येस नीपर नदीपासून उरल पर्वतापर्यंतच्या प्रदेशांत राहणाऱ्या लोकांनां तार्तार लोक कझाकी किंवा कोसॅक असें म्हणत असत व त्यावरूनच या लोकांस कोसॅक हें नांव पडलें. हळू हळू या कोसॅकांचा उपद्रव टर्की आणि पोलंड या दोहोंस होऊं लागला. व त्यामुळेंच टर्की आणि पोलंड यांमध्यें लढे उद्भवूं लागले. स.१६२० मधील सेकोडाची चाल आणि स. १६२१ मधील खोतिन युद्ध यास मूळ कारण कोसॅक लोकांचा टर्कीवरील हल्लाच होय.

मध्यंतरीं कोसॅक लोकांनीं अर्धवट स्वतंत्र राज्य स्थापिलें. पुढें त्यांनीं नीपर नदींमधील बेटांतून आपल्या वसाहती करण्यास सुरवात केली. कोसॅक पोलंडच्या सरहद्दीवर राहून तातार लोकांचा बंदोबस्त करीत. परंतु १७ व्या शतकाच्या सुरवातीस धार्मिक कारणावाचून कोसॅक लोक पोल लोकांचा द्वेष करूं लागले. १६१९ मध्यें काळ्या समुद्रावरील कोसॅकांच्या चांचेगिरीस आळा घालण्यांत आला. यामुळें कोसॅक जास्तच खवताळले व त्यांनीं १६३५ व १६३६ मध्यें बंडें केलीं. यामुळें स.१६३८ मध्यें डॉमर्टनें ( राजसभेनें ) कोसॅक लोकांचे सर्व हक्क काढून घेतले.

१६४८ मध्यें बोह्डन चिलूनिकी या कोसॅक गृहस्थानें बंड पुकारून पोलंड राज्य हादरून सोडलें व पोलंडच्या खाशा सैन्याची या कोसॅक वीरानें चांदी उडविली, व १,००,००,००० गुल्डन किंमतीची लूट लुटली. तेव्हां व्लाडिस्लासचा भाऊ जॉन कॅसिमीर यानें चिलूनिकी याला कोसॅक लोकाच्या मुख्य अधिकाऱ्याचीं वस्त्रें देऊन लोकांस परत सर्व पूर्वीचे हक्क देण्याचें अभिवचन दिलें. परंतु चिलूनिकीच्या अटी फारच बेताल असल्यामुळें पोलंडला त्या कबूल होईनात. तेव्हां पुन्हां युद्ध सुरू झालें. परंतु झ्बोरोच्या तहानें पुनः दोन्ही देशांत शांतता स्थापन झाली. पण पुन्हां स. १६५१ मध्यें पोलंड आणि बोह्डन यांमध्यें युद्ध जुंपलें आणि यावेळीं कोसॅक लोकांची स्वतंत्र राज्य स्थापण्याची प्रबल इच्छा झारनीकी यानें मिळविलेल्या कोसॅकविरुद्ध जयांत गाडली गेली. परंतु या झारनीकीच्या जयाचा लाभ पोलंडच्या ऐवजीं मस्कोव्हीनेंच करून घेतला. मस्कोव्हीला पोलंडच्या झांकल्या मूठींतील गौप्य पूर्णपणें कळल्यामुळें, १६६२ मध्यें चलूनिकी यानें मस्कोच्या झारशीं सूत बांधलें व पोलंडवर रशियाची स्वारी झाली. हें युद्ध १३ वर्षांचें युद्ध म्हणून रशियाच्या इतिहासांत प्रसिद्ध आहे. रशियन सैन्यानें पोलंड देश उजाड करून टाकला. स. १६५५ मध्यें कांहीं क्षुल्लक सबबीवर स्वीडन देशानें पोलंडविरुद्ध युद्ध पुकारलें व एक वर्षांत स्वीडनच्या सैन्यानें राजधानी सर करून अर्धा मुलूख पादाक्रांत केला. इकडे जॉन कॅसिमीर हा राज्य सोडून पळून गेला, व मस्कोव्ही लोकांनीं स्वीडननें न घेतलेला मुलूख बळकावण्यास सुरवात केली.

परंतु इकडे दुसऱ्या कांहीं गोष्टी पोलंडला अनुकूल अशा घडून येऊं लागल्या. एक, जॉन कॅसिमीर आणि आस्ट्रियाचा बादशहा यांमधील नवीन सख्य. दुसरी, लोकांमध्यें धार्मिक जागृति, व तिसरी, स्वीडनच्या सेनेचा पराजय. १६६० मध्यें ऑलिव्हाचा तह होऊन त्या तहान्वयें लिव्होनिया प्रांतावरील हक्क आणि त्याचप्रमाणें स्वीडनवरील हक्क जॉन कॅसिमीरनें सोडले. स. १६६१ मध्यें रशियन सेनेचा झेरोमुस्क येथें पराजय करून पुनरपि स्वकीय प्रांत परत मिळविण्यांत आले. १६६७ मध्यें मस्कोव्हीबरोबर पोलंडचा तह होऊन कांहीं प्रांत मस्कोव्हीस देणें पोलंडला भाग पडलें. व या तहान्वयें नीपर नदीलगतचे कोसॅक आणि रशिया हे पोलंडच्या हुकुमाखालीं आले व कीव शहर रशियाला मिळालें. उत्तरोत्तर रशियाचें वजन पोलंड देशावर सारखें वाढतच चाललें.

१६४८-१६६७ च्या भयंकर धक्क्यापासून पोलंड कसेंबसें वांचलें. व अजूनहि यूरोपच्या दृष्टीनें पोलंड हें एक मोठें राष्ट्र म्हणूनच गणलें जाऊं लागलें. हळू, हळू पोलंडमध्यें अनीति पसरूं लागली.स.१५७३ मध्यें प्रथम पोलिश राज्याचा लिलांव होऊन व्हॅलाइचा हेनरी हा राजा निवडण्यांत आला. १५८७ मध्यें पुन्हां त्याचा लिलांव झाला. स. १६६९ मध्यें मायकेल विष्णीओविकी हा, पोलिश लोकांकडून सर्वानुमतें राजा निवडला गेला. पण पोलिश सेनापतीनें १४ व्या लुईबरोबर सूत बांधलें, व राजास हांकून देण्याचा घाट घातला. आणि स. १६७४ मध्यें तिसरा जॉन म्हणून गादीवर बसला. त्यानंतर स. १६९१ मध्यें दुसऱ्या आगस्टसला गादी देण्यांत आली. १६९९ मध्यें तुर्कांबरोबर सुरू असलेलें युद्ध थांबलें व पोलंडनें आपला बराच मुलूख पुन्हां परत मिळविला. स. १७००-१७२० पर्यंत उत्तरेकडील ( दि ग्रेट नार्दर्न वॉर ) युद्ध स्वीडनच्या राजाबरोबर सुरू झालें. या युद्धांत स्वीडिश, सॅक्सन आणि रशियन लोकांनीं पोलंड लुटण्याचा तडाखा लावला होता. लिथुआनियन लोकांनीं १२ व्या चार्लसला उचलून धरलें व पोलंडमध्यें दोन तट होऊन एकानें आगस्टसची बाजू घेतली, तर दुसऱ्यानें स्टॅनिस्लासची बाजू घेतली. शेवटीं ह्या स्टॅनिस्लासला १७०४ मध्यें गादीवर बसविण्यांत आलें. इकडे आगस्टसनें एक अगदीं नीचपणाचा घाट घातला. तो असा कीं चारहि गरुडचिन्हांकित राजांनीं ( उ. जर्मनी, पोलंड ) पोलंडच्या साम्राज्यावर चैन मारावी. परंतु १७३३ मध्यें आगस्टस मेल्यामुळें हा घाट सिद्धीस

गेला नाहीं. स्टॅनिस्लास हा पुन्हां १७३३ मध्यें राजा निवडला गेला परंतु लिथुआनियन लोकांस ही निवड पसंत न पडून त्यांनीं रशियाची मदत घेऊन आगस्टस (तिसरा) यास गादीवर बसाविलें.

याच्या कारकीर्दीत कौंट हेनरिच ब्रुहल याच्या साहाय्यानें झारटोरिस्की घराणें फार नांवालौकिकास चढलें. याच्या मनांत "लिबरम व्हेटो" (म्हणजे प्रत्येक सभासदास कोणत्याहि मसुद्यास—जर तो त्याला नापसंत असेल तर—हाणून पाडण्याचा अधिकार असे. त्यानें 'मला हा मसुदा नको' म्हटलें म्हणजे बिल नापास होई!) ची घातकी आणि वाईट चाल दंद करावयाची होती. पण पोलंडमधील लोक त्याच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यास तयार नव्हते.

यावेळीं पोलंडमध्यें सर्वत्र अव्यवस्था माजली होती. कोणी रशियाला पोलंडमध्यें बोलावीत होते. दुसरी कॅथेराइन आणि दुसरा फ्रेडरिक यांनीं असें ठरविलें कीं, पोलंडमधील सांप्रतची स्थिति ही अशीच चालू ठेवली पाहिजे. व म्हणून त्यांनीं स्टॅनिस्लास पॉनिॲटोस्की यास १७६४ सालीं राजा केलें. हा दुसरा स्टॅनिस्लास झार्टोरिस्कींचा भाचा असल्यामुळें त्याच्या हातीं सर्व सत्ता आली. त्यानें बऱ्याच चांगल्या सुधारणा घडवून आणल्या. पुढें रेप्निननें डिसेंटर्स म्हणजे रोमन कॅथॉलिक पंथापासून फटकून राहणारे लोक यांच्याकरितां एक मसुदा आणला हा मसुदा अर्थात सर्वांस अप्रिय असाच होता. परंतु मूळ आणण्याचा हेतू एवढाच कीं यायोगें तरी झारटोरिस्कच्या सुधारणा हाणून पाडल्या जाव्यात. आणि हा रेप्नीनचा उद्देश सफलहि झाला. जिकडे तिकडे असंतोष माजला व शेवटीं रशियाच्या कॅथेराइनकडे पोलंडांत पुन्हां नवीन राज्यपद्धति निर्माण करण्याकरिता विनंति करण्यांत आली. हा विनंतीअर्ज खिशांत टाकून पोलंडची राज्यपद्धति आपल्या मताप्रमाणें सुरू करण्याकरितां रेप्निन हा वार्सा येथें आला. परंतु सभासदमंडळींनीं रेपनिन यास मज्जाव केल्यामुळें रेप्निननें आपला शिरकाव सैन्याच्या मदतीनें करून "लिबरम व्हेटो" व इतर दुसऱ्या जुन्या अनिष्ट चाली जबरदस्तीनें पास करवून घेतल्या. व "डिसेंटर्स" विरुद्ध काढलेलें फर्मान रद्द करण्यांत आलें.

पोलंडच्या वांटण्या (१७७२–१८१३):—या जबरदस्तीमुळें कॅथॉलिकपंथीय देशभक्तांनीं 'कॉन्फिडरेशन ऑफ बार' नांवाचा एक संघ निर्माण केला (१७६८) या कान्फिडरेटचा पक्ष घेऊन टर्कांनें रशियाविरुद्ध युद्ध पुकारलें. याच वेळीं ऑस्ट्रिया व प्रशिया यांनींहि पोलंड राष्ट्राचे लचके तोडून आपला देह पुष्ट करण्यास ही संधि चांगली आहे असें ठरविलें. आणि पोलंडच्या वांटणीबद्दल स. १७७२ मध्यें एक तह करून त्यांनीं आपापसांत पोलंडचा जवळ जवळ $\frac{1}{4}$ मुलुख वांटून घेतला. आणि या सर्व मुलखाबद्दल त्यांनीं पोलंडला उत्तम राज्यव्यवस्था दिली. परंतु 'लिबरम व्हेटो' सारख्या राष्ट्रविघातक चाली मुद्दाम ठेवण्याची त्यांनीं काळजी घेतलीच. सर्व राज्यसूत्रें ३६ सभासद, १८ सीनेटर्स व १८ डेप्युटींच्या एका कायमच्या सभामंडळाच्या हातीं देण्यांत आलीं. राजाची सत्ता बरीच कमी करण्यांत आली याप्रमाणें या पहिल्या वांटणीनें पोलंडमधील ताज्या दमाच्या लोकांत एक देशाभिमानाची लाट उसळली. १७८७ सालीं रशिया आणि ऑस्ट्रिया यांनीं टर्कांशीं लढाई केली. हें पाहून प्रशियानें रशियाचा संबंध तोडून टाकण्यास पोलंडला भर दिली.

स. १७८८ मध्यें "चार वर्षांची डायट" भरविण्यांत आली. तिचे पुढारी फार कर्तृत्ववान आणि नीतिमान होते. त्यांनीं कायमचें सभामंडळ काढून टाकलें व राजसत्ता वाढविली. सैन्याची संख्या ६५००० केली, पश्चिम यूरोपशीं प्रत्यक्ष व्यवहार सुरू केला, रशियाची मैत्री झिडकारून दिली व पोलंडचें व प्रशियाचें सख्य जमवून आणलें. परंतु ही बाह्य मदत अंतर्गत अराजकतेला कांहीं आळा घालूं शकेना. शेवटीं मोठ्या शिताफीनें एकदांची राजव्यवस्था ठरविण्यांत आली

स. १७९१ च्या क्रांतीनें पोलंडमध्यें वंशपरंपरेनें चालणारी राजसत्ता स्थापण्यांत आली. "लिबरम व्हेटो" व इतर दुसरे व्यत्यय आणणारे कायदे काढून टाकण्यांत आले, शहरांनां बरेच हक्क देण्यांत आले. लोकांतील वर्गभेद मोडण्याचा प्रयत्न करण्यांत आला, खालच्या हलक्या लोकांची स्थिति सुधारण्यांत आली. धार्मिक मोकळीक सर्वांस देण्यांत आली. आणि प्रत्येक नागरिकास कायद्याच्या कोर्टांत समान हक्क मिळाला याबद्दल दुसऱ्या फ्रेडरिक विल्यमनें स्टॅनिस्लासचें अभिनंदन केलें. परंतु ही सुव्यवस्था कांहीं बऱ्या पोलिश गृहस्थांस मानवली नाहीं. त्यांनीं रशियाकडे धाव घेतली व १७९२ मध्यें कांहीं थोड्या लोकांनीं स. १७९१ ची राज्यघटना जुलमाची आहे असा पुकारा केला व हें निमित्त पुरेसें होऊन रशियानें पोलंडशी लढाई पुकारली. अखेर पोलंडास मागें घेणें भाग पडलें व स. १७९१ ची नूतन राज्यघटना झुगारून देण्यांत आली व १७९३ मध्यें पोलंड देशाची दुसऱ्यांदां वाटणी झाली. या वांटणींत रशियाला लिव्होनियापासून माल्डेव्हियापर्यंतचा पूर्वेकडील मुलूख मिळाला. प्रशियानें थॉर्न आणि डॅन्झिग व डोब्रझिन, कुजाविया व ग्रेटपोलंडचा बराच भाग गिळंकृत केला. याप्रमाणें आतां पोलंड देश मूळच्या $\frac{1}{3}$ हि शिल्लक राहिला नाहीं.

आतां पोलिश राष्ट्राचें केंद्र लिथुआनिक हें करण्यांत आलें. या ठिकाणीं पोलिश राष्ट्रभक्त इग्नेटी पोटोकी, कोलोन्टांज, कोश्चुस्को व इतर राष्ट्रहितचिंतक जमले लौकरच पोलंडमध्यें बंड झालें. रशियाचा पुष्कळ ठिकाणीं पराभव झाला. पूर्वीच्या $\frac{3}{4}$ प्रांत मिळविण्यांत आले. व वार्सा व व्हिल्ना यांचें पारतंत्र्य विमोचन करण्यात आलें. कोशिउस्को याला पोलंड देशाचा शास्ता नेमण्यांत आलें. परंतु पुढें पोल लोकांतच आपापसांत भांडणें लागलीं व शेवटीं ऑस्ट्रिया, रशिया व प्रशिया या त्रिकूटानें सर्व पोलंडचें राज्य गिळंकृत केलें.

या पोलंडच्या तिसऱ्या वांटणीमुळें निघून गेलेले पोल राष्ट्रभक्त नेपोलियनच्या सैन्यांत भरती होऊन प्रशिया, रशिया आणि ऑस्ट्रिया यांच्याबरोबर १० वर्षे लढत होते.

१८१५-१८६३:—स.१८१५ च्या व्हिएन्नाच्या कॉंग्रेसनें क्रॅको शहरास स्वातंत्र्य दिलें व बाकीचे प्रांत पूर्वीप्रमाणें रशिया, ऑस्ट्रिया व जर्मनी यांच्याकडे राहूं दिले.

रशियाचा बादशहा अलेक्झांडर यास स्वातंत्र्याची चाड असल्यामुळें त्यानें स. १८१५ मध्यें पोलंडला नवीन राज्यव्यवस्था दिली. तो स्वतः पोलंडचा राजा झाला व पोलंडला पोल राजवंशीय लेफ्टनंट नेमण्यांत येऊं लागला रोमन कॅथोलिक पंथ हा या देशाचा धर्म समजण्यांत आला व दुसऱ्या धर्मास स्वातंत्र्य देण्यांत आलें. वर्तमानपत्रांचें स्वातंत्र्य राखण्यांत येऊन व्यक्तिस्वातंत्र्य, व पोल भाषा ही राखण्यांत आली येथें एक राष्ट्रमंडळ स्थापण्यांत आलें. डायटचे सीनेट व प्रतिनिधिसभा असे दोन भाग केले व पोलंडचें निशाण कायम ठेवण्यांत आलें.

स. १८२६ मध्यें कान्स्टंटाईन (अलेक्झांडरचा भाऊ) हा लेफ्टनंट झाला. पोलंडमधील देशभक्तमंडळाचे दोन भाग होते. एक पांढरा किंवा मवाळ व दुसरा लाल किंवा जहाल.

स. १८३०मधील फ्रेंच राज्यक्रांतीनंतर पोलांनीं बंड केलें. परंतु शिस्तीचा अभाव, अंदाधुंदी, अव्यवस्था इत्यादि दुर्गुणामुळें त्यांनां हार खावी लागली. यामुळें हा पोलंडचा भाग आतां रशियाचा एक देश बनला. १८४८ मध्यें क्रॅको शहर ऑस्ट्रियानें आपल्या राज्यास जोडलें.वार्सा व व्हिल्नाचीं पोलिश विश्वविद्यालयें बंद पाडून पोलिश मुलांनां सेंटपीटर्सबर्ग व कीव्ह येथें विद्याभ्यासाप्रीत्यर्थ जाणें भाग झालें.रशियन भाषा ही पोलंडांत दरबारी भाषा करण्यांत आली. यामुळें पोल लोक अगदीं गाय बनले. पण यामुळें राष्ट्रीय अभिमान नष्ट न होतां प्रदीप्त मात्र झाला. स. १८६३ मध्यें पोलंडच्या लोकांनीं स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं शेवटचा प्रयत्न केला.

याप्रसंगीं पोल लोकांनीं निःशस्त्रप्रतिकाराचें हत्यार उपसलें. याचा प्रतिकार रशिया जेव्हां जुलमानें करूं लागला तेव्हां साहजिकच यूरोपला या जुलमाची चीड येई. स.१८६१ मध्यें वार्सा येथें लोकांनीं जागा सोडून निघून जाण्याचें नाकारल्यामुळें त्यांच्यावर गोळ्या झाडण्यांत आल्या. गुप्त कट, निषावण्या, राजकीय खून यांच्यायोगानें स. १८६३ त बंड झालें. परंतु त्यांत कांहीं दम नव्हता.

यामुळें निकोलसनें पोल राष्ट्रभक्तांचा नायनाट करण्याचा प्रयत्न केला. परंतु पोलंडमधील आणि लिथुआनियामधील जनतेस पूर्ण स्वातंत्र्य दिलें. याप्रमाणें पोलंडच्या राष्ट्रीय इतिहासाचा शेवट १८६३ सालच्या बंडानें झाला.

रशियन पोलंड (१८६३ ते १९२०):—१८६३ सालचें पोलिश बंड चिरडून टाकल्यावर रशियन सरकारनें पोलिश लोकांवर आपली अनियंत्रिक सत्ता प्रस्थापित केली. पोलंडवर लष्करी गव्हर्नर नेमून रशियाविरुद्ध चाललेल्या सर्व चळवळींचीं पाळेंमुळें खणून काढण्याची पूर्ण सत्ता या गव्हर्नरला देण्यांत आली. रशियन ही दरबार-भाषा करण्यांत आली व पोलंडमधील प्राथमिक शाळांमध्यें रशियन भाषा सक्तीनें शिकवण्यांत येऊं लागली. सर्व खात्यांतील अधिकाराच्या जागा रशियन लोकांनां देण्यांत आल्या. पोलंडमधील लोकांचा धर्म रोमन कॅथॉलिक होता. त्यावरहि रशियन अधिकाऱ्यांनीं आपली नजर ठेवण्यास सुरवात केली. धार्मिक बाबींसाठीं देण्यांत आलेल्या स्थावर मिळकती जप्त करण्यांत आल्या व मठांची विल्हेवाट लावण्यांत आली. हा धार्मिक छळ स.१९०५ पर्यंत चालू होता. पण त्यानंतर धर्मस्वातंत्र्याचें तत्त्व रशियन सरकारनें मान्य केलें.

पोलंडच्या रूसीकरणार्थ रशियानें जे प्रयत्न केले त्यांत मुख्यतः पोलंडमधील इतिहासप्रसिद्ध घराण्यांचें वर्चस्व कमी करणें व शेतकरीवर्गाला चढेल करून ठेवणें हे होत. या प्रयत्नांच्या मुळाशीं जमीनदार व रयत यांच्यामध्यें स्पर्धा सुरू करणें हें तत्त्व होतें. पण सुदैवानें हा प्रयत्न सिद्धीस गेला नाहीं. तथापि शेतकरीवर्गाला चढेल करून ठेवण्याचा पोलंडच्या दृष्टीनें जो फायदा झाला तो हा कीं त्यायोगानें पोलंडमध्यें मध्यम वर्गाची जी उणीव भासत असे ती नाहींशीं होऊन या शेतकरीवर्गामधून उत्तम मध्यम वर्ग उदयास आला व या वर्गानें औद्योगिक चळवळ हातीं घेऊन ती यशस्वी केली. त्याचप्रमाणें रशियन सैन्यांतून पोलांचें उच्चाटण करण्यांत आल्यामुळें सैन्यांतून निघालेल्या पोलांपैकीं महत्त्वाकांक्षी व कर्तृत्ववान अशा पोलांनींहि या औद्योगिक चळवळीला हातभार लावल्यामुळें या चळवळीला चांगला रंग चढला. या चळवळीला प्रथम प्रथम राजकीय स्वरूप नव्हतें तरी पुढें तिला राजकीय स्वरूप प्राप्त होऊन त्यांतून सोशियालिस्ट व डेमोक्रॅटिक संस्था निर्माण झाल्या. या संस्थांपैकीं नॅशनल डेमोक्रॅटिक पार्टी ही प्रमुख संस्था होय. या संस्थेनें पोलंडच्या रूसीकरणार्थ चाललेल्या प्रयत्नांच्या विरुद्ध चळवळ केली. रूसो-जपानी युद्धानंतर खुद्द रशियन ड्यूमामध्येंहि या पक्षाचें अतिशय वर्चस्व होतें. त्याचप्रमाणें रशियाच्या बाहेर नूतन स्लाव्ह पक्षानें जी चळवळ सुरू केली होती तींतील एक हेतु रशिया व पोलंड यांच्यामध्यें सख्य घडवून आणण्याचा होता. पण ऑस्ट्रियन पार्लमेंटमधील पोलिश पक्षानें ऑस्ट्रियाला बोस्निया व हर्झेगोव्हिना हे प्रांत जोडण्यांत याबेऊशी चळवळ सुरू केल्यानें वरील दोन्ही पक्षांचे बेत फिसकटले व त्यामुळें पोलंडला स्वातंत्र्य मिळण्याचे दिवस लांबणीवर पडले.

जर्मन पोलंडः—रशियन पोलंडप्रमाणेंच बिस्मार्कच्या कारकीर्दींत पोलंडच्या जर्मनीकरणासाठीं प्रयत्न करण्यांत आले. स्वतः बिस्मार्कनें या कामीं बराच पुढाकार घेतला. पोलंडमधील कॅथॉलिक लोकांचीं धार्मिक वतनें जप्त करून शिक्षणसंस्थांतून पोल लोकांच्या मातृभाषेचें उच्चाटण

करून, व इतर अनेक युक्त्याप्रयुक्त्यांनीं पोलंडमधील राष्ट्रीय चळवळ हाणून पाडण्याचा बिस्मार्कनें प्रयत्न केला. पोलंडमधील बरेचसे मजूर जर्मनींत धंद्यासाठीं येत असत. त्यांनां जर्मनींत काम मिळूं नये अशीहि खटपट बिस्मार्कनें करून पाहिली पण तींत यश येण्याचीं चिन्हें दिसेनात, तेव्हां त्यानें पोलंडमध्यें मोठमोठ्या जागा खरेदी करून जर्मन वसाहत स्थापण्याचा उद्योग आरंभिला. १९०८ सालीं तर पोलिश भाषेंतून जाहीर सभेंत व्याख्यानें देण्याची देखील बंदी करण्यांत आली. पण या जर्मन लोकांच्याच तालमींत शिकून तयार झालेल्या पोलांनीं बिस्मार्कचे हे सर्व प्रयत्न निष्फळ करून टाकले पोल लोकांनीं आपल्यामध्यें एकी करून निरनिराळ्या शैक्षणिक, औद्योगिक संस्थांकडून जर्मनीच्या या राष्ट्रविषयक प्रयत्नाला मोठ्या नेटानें तोंड दिलें. जर्मन मालावर त्यांनीं बहिष्कार टाकला व पोलिश व्यापाराला उत्तेजन दिलें. त्यामुळें जर्मन लोकांची डाळ पोलंडमध्यें फारशी शिजली नाहीं.

ऑस्ट्रियनपोलंडः—पण जर्मन अगर रशियन पोलंडमधील पोल लोकांच्या स्थितीपेक्षां ऑस्ट्रियन पोलंडमधील पोलांची स्थिति थोडी फार बरी होती. ऑस्ट्रियामध्यें पोल लोकांचा फारसा छळ होत नव्हता. पोलिश क्लबाचें ऑस्ट्रियाच्या राजकारणांत बरेंच वर्चस्व होतें. या वर्चस्वाचा फायदा घेऊन पोलिश क्लबांनीं गॅलिशियाला बरेच हक्क संपादन करून घेतले. गॅलिशियासाठीं स्वतंत्र प्रधान नेमण्यांत आला. गॅलिशियांतील पोल लोकांच्या शिक्षणासाठीं स्वतंत्र शिक्षणमंडळ निर्माण करण्यांत आलें. पोलिश भाषेचा गॅलिशियांतील कचेर्‍यांमध्यें सरसहा उपयोग करण्यांत येऊं लागला. क्रॅकोच्या युनिव्हर्सिटीमध्यें पोलांशिवाय दुसरे कोणतेहि शिक्षक न ठेवण्याचें ठरविण्यांत आलें. अशा रीतीनें ऑस्ट्रियामधील पोलिश क्लबानें गॅलिशियांतील पोल लोकांस पुष्कळच स्वातंत्र्य मिळवून दिलें. तथापि गॅलिशियांत रूथेनियन व ज्यू लोकांचेंहि प्राबल्य होतें व तें नाहींसें झाल्याशिवाय पोल लोकांचें वर्चस्व अबाधित राहणें शक्य नव्हतें. त्यामुळें पोल लोकांनीं या ज्यू व रूथेनियन लोकांनां त्रास देण्यास सुरवात केली. रूथेनियन लोकांनींहि आपली संघटना करून आपलें स्वातंत्र्य प्रस्थापित करण्याची चळवळ सुरू केली. या चळवळीला ऑस्ट्रियन सरकार विरुद्ध नव्हतें. त्यामुळें रूथेनियनांनां बरेंच उत्तेजन मिळाल्यासारखें झालें अशी स्थिति पहातांच गॅलिशियांतील पोल लोकांनीं रशियाशीं संधान बांधून रुथेनियन लोकांनां रशियाच्या ताब्यांत ठेवण्याचा प्रयत्न केला. ऑस्ट्रियाचें व रशियाचें स. १९१० च्या सुमारास बिनसलें असल्यामुळें ऑस्ट्रियनांनीं या रूथेनियनांनां मदत करण्यास सुरवात केली. त्यामुळें गॅलिशियांतील पोल लोक ऑस्ट्रियन सरकारकडे साशंक दृष्टीनें पाहूं लागले. पुढें थोडक्याच दिवसांत ऑस्ट्रियाच्या आर्चड्यूकचा खून झाला. या गोष्टीबद्दल पोलांनीं दुःख व्यक्त न करतां उलट समाधानच व्यक्त केलें कारण हा आर्चड्यूक रूथेनियन लोकांनां अनुकूल होता. त्यामुळें ऑस्ट्रियन सरकारमध्यें व गॅलिशियांतील पोल लोकांमध्यें वेबनाव उत्पन्न झाला.

महायुद्ध सुरू झालें त्यावेळीं पोलंडनें कोणाच्या बाजूनें युद्धांत भाग घ्यावा याबद्दल सर्व पोलंडपुढें प्रश्न उभा राहिला. खुद्द पोलंडमधील लोकांमध्यें कांहींजण रशियाच्या बाजूनें तर कांहींजण जर्मनी व ऑस्ट्रियाच्या बाजूनें पोलंडनें युद्धांत पडावें या मताचे होते. एकीकड ऑस्ट्रिया व जर्मनी व दुसरीकडे रशिया, पोलंडला स्वातंत्र्य देण्याचें आमिष दाखवीत होते. ऑस्ट्रिया व जर्मनीनें पोलंडला मर्यादित स्वातंत्र्य देखील स. १९१६ मध्यें देऊन टाकलें, पण तें मर्यादित असल्यामुळें पोलंडला त्यापासून फारसा फायदा झाला नाहीं. तथापि पोल लोकांचा एक प्रसिद्ध पुढारी पिल्सुडस्की यानें या संधीचा फायदा घेऊन पोलंडमध्यें एक मोठें लष्कर उभारण्याचा प्रयत्न केला; व त्यांत त्याला यशहि आलें. या लष्कराच्या जोरावर पिल्सुडस्कीनें पोलंडचीं सर्व सूत्रें आपल्या ताब्यांत घेतलीं. लगेच त्यानें पॅडेरवस्कीच्या आधिपत्याखालीं एक मंत्रिमंडळ बनविलें. पण पुढें थोडक्याच दिवसांत पॅडेरवस्कीला आपल्या जागेचा राजीनामा देणें भाग पडलें. स. १९१९ मध्यें पिल्सुडस्कीला चेकोस्लाव्हाकियाशीं व युक्रेनियाशीं युद्ध करणें भाग पडलें. तथापि त्यामुळें फारसें नुकसान झालें नाहीं. याहिपेक्षां महत्त्वाची गोष्ट म्हणजे पिल्सुडस्कीचें बोल्शेविक लोकांशीं झालेलें युद्ध होय. या युद्धांत बोल्शेव्हिकांनां हार खावी लागून पोलंडशीं पोलंडनें घातलेल्या अटींवर तह करण्यास बोल्शेव्हिक तयार झाले. तथापि त्यांनीं आपलीं मतें प्रसार करण्याचें काम चालू ठेवलेंच होतें. त्यामुळे पोलंडनें पुन्हां बोल्शेव्हिकांचा मोड करण्यासाठीं कंबर बांधली. पुष्कळ ठिकाणीं पोल सैन्य व बोल्शेव्हिक सैन्य यांमध्यें चकमकी झडल्या व शेवटीं बर्‍याच काळानंतर पोलंड व बोल्शेव्हिक यांच्यामध्यें तह घडून आला. नंतर पुन्हां पोलंड व लिथुआनियन यांमध्यें कलह उपस्थित होऊन लढाईचीं चिन्हें दिसूं लागलीं तथापि तीं लवकरच मावळलीं.

अशा रीतीनें अनेक राजकारणें करून व अलोट स्वार्थत्यागानंतर पोलंडनें आपलें स्वातंत्र्य प्राप्त करून घेतलें. पोलंडच्या सरहद्दी निश्चित करण्यासाठीं राष्ट्रसंघानें कांबनच्या अध्यक्षत्वाखालीं एक कमिशन नेमलें. या कमिशननें जो निकाल दिला त्यांत बरेच फेरफार होऊन शेवटीं पोलंडच्या सरहद्दी कशाबशा निश्चित झाल्या. हल्लीं पोलंडच्या सरहद्दी पुढीलप्रमाणें आहेत—पोलंडच्या दक्षिणेस गॅलिशिया, पूर्वेस लेटव्हीयाच्या सरहद्दीपासून डिस्ना, डोक्शिझिस, मिन्स, पिन्स्क; ऑस्ट्राग या गांवांच्या सरहद्दीवरून झ्ब्रुझ नदीच्या किनार्‍यानें नीस्टरपर्यंत, ईशान्येस लिथुआनियाची राजधानी

जी व्हिल्ना तेथपर्यंत; या इशान्येकडील सरहद्दीबद्दल मात्र अद्यापि वाद चालू आहे.

पोलंडमध्यें ज्यू लोकांची बरीच वस्ती आहे. स्थूलमानानें पोलंडच्या लोकसंख्येचा ⅑ लोकसंख्या ज्यू लोकांची आहे. सुमारें स. १९०० सालानंतर या ज्यू लोकांनीं पोलंडच्या स्वातंत्र्याच्या चळवळीविरुद्ध आपली चळवळ सुरू केली. व महायुद्धानंतरहि ती अद्यापि चालू होती. अर्थात पोलंडला स्वातंत्र्य मिळाल्यामुळें ज्यू लोकांबद्दल पोलंडचें धोरण कसें राहील व तें पोलंडनें कसें ठेवावें यासंबंधीं बरेच तर्कवितर्क चालू आहेत. खुद्द पोलिश सरकारनें आपलें धोरण अद्यापिहि जाहीर केलेलें नाहीं.

१९२१ ते १९२५:–स. १९२२ डिसेंबरच्या निवडणुकींत नरुटोविझ नांवाचा लिथुनियन इसम ज्यू लोकांच्या मदतीनें प्रेसिडेंट निवडून आला. पण तो पोलंडांतील कोणत्याहि राजकीय पक्षाला प्रिय नसल्यामुळें प्रधानमंडळानें राजीनामा दिला व तो स्वतः वार्सा येथें ठार मारला गेला. १९२४ सालच्या आरंभापासून एम्. विटॉस (मुख्य प्रधान), एम्. डमोवस्की ( परराष्ट्र मंत्री ) व एम्. कॉर्फंटी ( व्हाइस प्रेसिडेंट ) या तीन इसमांच्या हातीं सर्व सत्ता गेली. १९२५ च्या आरंभीं पोलिश मॉनर्किस्ट पक्षानें उचल केली पण तिला यश येणें शक्य नाहीं. महायुद्धकाळांत जर्मनी व ऑस्ट्रिया यांनींहि पोलंडांत मॉनर्किस्ट पक्षास पाठिंबा दिला होता. १९२३ आगस्टमध्यें सरकारनें प्रॉपर्टी टॅक्स(संपत्तीवरील कर) बसवून त्याचें उत्पन्न आरोग्य व पोलंड सरकारची सांपत्तिक स्थिति सुधारण्याकडे खर्च करण्याचें ठरविलें. १९२४ च्या मार्चमध्यें एम्. ग्रॅवस्की या मुख्य प्रधानानें सोन्याचें नाणें सुरू करून चलनपद्धतीला स्थैर्य आणलें, सरकारचा खर्च कमी केला, मजूरवर्गाची स्थिति सुधारली, ८ तासांचा दिवस असें कामाचें प्रमाण ठरविलें. १९२५ च्या मेमध्यें ३ कोटी लोकसंख्येपैकीं फक्त १,५०,००० इसम बेकार होते. १९२४ सालीं रेल्वेचे दोन मुख्य रस्ते बांधण्याचें ठरून त्याकरितां ९ कोटी रुबल ( सोन्याचें नाणें ) खर्चण्याचें ठरलें. हें काम सरकारी देखरेखीखालीं सहा वर्षांनीं पुरें व्हावयाचें आहे. पोलंडांत सर्वत्र शिक्षण मोफत आहे, व प्राथमिक शिक्षण सक्तीचें असून प्राथमिक शाळांत विद्यार्थी १९१४ सालीं ४,३०,००० होते ते १९२५ सालीं १२,००,००० झाले आणि दुय्यम शिक्षणाच्या शाळेंत ८० हजारांचे ११७ हजार झाले आहेत. सध्यां पांच युनिव्हर्सिटया असून त्यांत २०,००० विद्यार्थी शिकत आहेत, व त्यांपैकीं, बरेच बाहेर काम करून पोट भरणारे आहेत. त्यांत एकपंचमांश विद्यार्थिनी आहेत. शिक्षकांकरितां १७५ ट्रेनिंग कॉलेजें असून ४७६ टेक्निकल स्कुलें आहेत. सैन्याची संख्या २,५०,००० आहे. ताप, देवी वगैरे सांथीच्या रोगांचा उपद्रव कमी करण्याकरितां ३५ लक्ष पौंड पोलंड सरकारनें खर्च केले. पोलिश सरहद्द व आयातनिर्गताच्या जकाती याबद्दल तंटे रशिया, जर्मनी व चेकोस्लोव्हाकिया या देशांबरोबर चालू आहेत.

**पोल लोकांचें वाङ्मय**—पोलिश भाषा ही स्लेव्हानिक भाषांपैकीं एक असून तिचें बोहेमियन व लुमेशियन वेंडिश भाषांशीं बरेंच सादृश्य आहे. लोकांनां आवडणारें दंतकथात्मक काव्य जरी पूर्वी पोलंडमध्यें होतें तरी अशा प्रकारचें काव्य हल्लीं पोलिश भाषेंत क्वचितच आढळतें. पोलंडचें जुनें वाङ्मय लॅटिन भाषेंत लिहिलेलें आहे. मार्गारेट राणीचा स्तोत्रसंग्रह हा पोलिश भाषेंतील पहिला ग्रंथ (१४ वें शतक) होय. जॉन लॉझिआ यानें याच शतकांत कित्येक पारमार्थिक गाणीं लॅटिनमध्यें केलीं. सोफाया राणीचें किंवा क्षारोझपाटकचें बायबल हें पोलिश वाङ्मयाचें दुसरें स्मारक ( इ. स. १४५५ ) होय. अँड्र्यू स्लेपुचौस्की यानें आणखी पांच पारमार्थिक गाणीं केलीं आहेत. वुझ्क्रिफची ज्यांत स्तुति केली आहे असें एक गीत, विवाहाच्या वेळीं करण्यांत येणारा उपदेश व कांहीं टीका एवढेंच कायतें सोळाव्या शतकापर्यंत पोलिश भाषेंतील ग्रंथ होते. मार्टिन गॅलस हा १११० ते ११३५ पर्यंत पोलंडमध्यें राहिला होता. मार्टिन गॅलस यानें लॅटिन भाषेंत ग्रंथ लिहिलेले आहेत. मॅथ्यू चोलेवा व व्हिन्सेंट काडलुबेक या बिशपांनींहि लॅटिन भाषेंत ग्रंथ लिहिले. यावेळीं देशांतील शिक्षण धर्माधिकाऱ्यांच्या हातीं असे व हे परकीय असल्यामुळें लॅटिन भाषेचा प्रसार झाला. पोलिश भाषेंत फार ग्रंथ प्रसिद्ध झाले नाहींत. इतर देशांप्रमाणें पोलंडमध्यें पुराणकथात्मक गीतें नाहींत. कॅसिमीर दि ग्रेट यानें क्रॅको येथें एक विश्वविद्यालय काढिलें. येथें रोमन कायदा, वैद्यशास्त्र व तत्त्वज्ञान शिकवीत असत; या विश्वविद्यालयांत पोलंडमधील कांहीं लोकांस शिक्षण मिळालें. परंतु बऱ्या बऱ्या लोकांनां हें विश्वविद्यालय न आवडून ते प्रेग, पडुआ व पॅरिस अशा ठिकाणीं शिक्षणासाठीं जात असत; व यामुळें हें विद्यालय मोडकळीस आलें. नंतर त्या ठिकाणीं धर्मशास्त्र शिकविण्यांत येऊं लागलें व पॅरिसच्या विश्वविद्यालयाप्रमाणें या विश्वविद्यालयाची घटना करण्यांत आली. नंतर व्हिल्ना व झॅमोस्क येथेंहि विश्वविद्यालयें काढण्यांत आलीं. इ. स. १४७४ त क्रॅको येथें एक छापखाना काढण्यांत आला; व त्यांत गुंथर झायनर यानें पहिलें पुस्तक छापून काढिलें; इ.स. १५१५ त हायरोनीमस वाइटर याच्या छापखान्यांत पोलिश भाषेमध्यें प्रथमतः पुस्तकें छापलीं गेलीं. लवकरच अनेक छापखाने निघाले; सिवेनीचेर व पिओट्र कोवेझिक हे सोळाव्या व सतराव्या शतकांत प्रसिद्ध मुद्रक होऊन गेले.

तथापि पोलिश भाषेंत फार ग्रंथ झाले नाहींत; कारण इतिहासकार वगैरे लॅटिन भाषेचाच उपयोग करीत असत. जॉन लुगोझ या बिशपानें एक इतिहास लिहिला. यांत स. १३८६ पासून १४८० पर्यंतची माहिती फारच उत्तम दिलेली आहे. " एका पोल सैनिकाच्या आठवणी " हा ग्रंथ

स.१५०० च्या सुमारास पोलिश भाषेंत लिहिलेला आहे. याच सुमारास निकोलस कोपर्निकस हा पोलंडमधील रहिवाशी प्रसिद्धीस आला.

इ. स.१५४८ पासून१६०६ पर्यंतच्या काळाला पोल लोक सुवर्णयुग म्हणतात. पोलंडमध्यें धर्मस्वातंत्र्य असल्यामुळें प्रॉटेस्टंट धर्माचा तेथें बराच प्रसार झाला. परंतु जेसुईट लोक इ. स.१५६४ त पोलंडमध्यें आले व त्यांनीं तेथील पाठशाळा आपल्या ताब्यांत घेतल्या व प्रॉटेस्टंट पंथ नाहींसा करून ग्रीक चर्चचाहि त्यांनीं नाश केला. क्लेमंट जानिकि यानें लॅटिन काव्याकडे बरेंच लक्ष दिलें ( १५१६-४३ ); परंतु नारटोवीसचारेज (१५०५-६९) यानें पोलिश भाषेंत काव्य केलें. तो प्रॉटेस्टंट असून, त्यानें कांहीं पारमार्थिक ग्रंथ लिहिले आहेत. "दर्पण अथवा एका सन्मान्य गृहस्थाचें चरित्र"हा त्याचा उत्कृष्ट ग्रंथ आहे. "ईजिप्तमधील जोसेफचें चरित्र" यानेंच लिहिलें आहे. ल्यूकस या नांवाचें नाटकहि यानेंच लिहिलें आहे गोझनिकि (१५२७-१६०३)यानें बरेंच ऐतिहासिक ग्रंथ लिहिले आहेत.

जॉन कोचानोस्की ( १५३०-८४ )यास पोलिश कविराज असें म्हणत. याचें सर्व कुटुंब वाङ्मयभक्त होतें. यानें स्तोत्रांचें ( प्रार्थनागीतांचें ) भाषांतर केलें आहे. "ग्रीक वकिलांची पत्रें " या नांवाचें एक नाटक यानें लिहिलें आहे. ट्रेनी किंवा " विलाप " हें काव्य आपल्या मुलीच्या मृत्यूनंतर त्यानें लिहिलें आहे; हें त्याच्या आवडीचें काव्य होतें. यानें पोलिश व लॅटिन या दोन्ही भाषांत काव्य केलें आहे. याचे ग्रंथ उत्तम व राष्ट्रीयभावनायुक्त असून ते पोलंडमधील सर्व विषयांसंबंधीं आहेत. स्टानिस्लास ग्रोकोव्स्की ( १५५४-१६१२ ) हा उपाध्याय स्तुतिस्तोत्रें लिहिणारा म्हणून प्रसिद्ध आहे. झारिन्स्कि यानें पोल लोकांस सुनीत अथवा चतुर्दशचरणात्मक काव्याची ओळख करून दिली. पुढें मिकिएविझ व गाझिन्स्कि यांनीं त्या काव्यास पूर्णदशेस आणिलें.

झीमानोविक्स ( १५५४-१६२४ ) यानें उत्तम गोपगीतें लिहिलीं आहेत; त्यापैकीं " प्रणयी ", " कापणी करणारे " व " पोळी " या त्याच्या उत्तम कविता आहेत. झिमोरोविझ व जॉन गाविन्स्कि यांनींहि खेडवळ आयुष्यक्रमावर कविता केल्या आहेत कॅसिमीर सार्बिएव्स्कि उर्फ सार्बिएव्हिअस यानें लॅटिनमध्यें कांहीं उत्तम कविता केल्या आहेत. हा होरेसच्या तोडीचा कवि होता असें म्हणतात. आठव्या अरबन पोपनें याला सुवर्णपदक दिलें होतें. मार्टिन क्रोमर ( १५१२-८९ ) यानें पोलंडचा इतिहास व त्या देशाचें वर्णन अशीं पुस्तकें लॅटिनमध्यें लिहिलीं. हा इतिहास फार महत्त्वाचा आहे. सेबेशियन फेब्रिअन क्लोनोविझ ( १५४५-१६०२ ) यानें लॅटिन व पोलिश या दोन्ही भाषांमध्यें ग्रंथ लिहिले आहेत. अँड्रयू मोडझेव्स्कि हा प्रॉटेस्टंट होता; यानें रिपब्लिक एमेन्डेड ( १५५१ ) या ग्रंथांत रोमच्या चर्चशीं कांहीं एक संबंध न ठेवितां आपलें एक स्वतंत्र चर्च असावें असें सुचविलें आहे.

सिगिस्मंड ( तिसरा ) याच्या वेळीं, अलंकारिक व जेसुइटांसारखी वक्तृत्वाची पद्धत लोकप्रिय झाली; ह्या पद्धतींत भाषासौंदर्य होतें, परंतु कित्येक वेळां ती दिखाऊ होत असे. पिओट्र स्कार्गा ( १५३६-१६१२ ) हा या पद्धतीचा पुरस्कर्ता होता. संतचरित्रें व सात संस्कारांवरील चर्चा हे त्याचे मुख्य ग्रंथ असून, स्वदेशाभिमानाच्या अभावामुळें यानें पोल लोकांची फार निर्भत्सना केली व पोलंडचा पाडाव होईल असेंहि त्यानें सांगितलें. मार्टिन बिएल्स्कि या प्रॉटेस्टंट पंथाच्या मनुष्यानें पोलिश भाषेंत एक सुंदर इतिहास लिहिला आहे. इ. स. १५८२ त स्टिजकोव्स्कि यानें एक बखर लिहिली, ती इतिहास शिकणाऱ्यांस फारच उपयुक्त आहे.

हुस्चीं मतें पोलंडमध्यें फार प्राचीन काळापासून प्रचलित होतीं; व बोहेमियन स्तोत्रें पोल लोकांनीं तपासून शुद्ध केलीं होतीं; परंतु ज्यांना रोमन चर्चचीं मतें मान्य नव्हतीं अशा लोकांविरुद्ध बिशप लोकांनीं लवकरच चळवळ सुरू केली. ब्युइन येथील बिशप अँड्र्यू यानें पांच हुस सांप्रदायिक पुरोहितांना पकडून इ. स. १४३९ त जाळिलें होतें. व कांहीं वर्षांनीं कॅथरिना मालचेर नांवाच्या एका बाईलाहि जाळून टाकण्यांत आलें. इ. स १५३० त लूथरचीं गाणीं थानें येथें पोलिश भाषेंत म्हटलीं जात असत.

जॉन सेक्लुशियननें कॉनिग्सबर्गमध्यें कांहीं ख्रिस्ती गाणीं प्रसिद्ध केलीं. त्यानें नवीन कराराचें स.१५०१त भाषांतर केलें नंतर चार वर्षांनीं क्रॅको येथें संयुक्त पोलिश बायबल प्रसिद्ध झालें. १५५३ त सर्व बायबलाचें प्रॉटेस्टंटपंथाच्या विद्वान लोकांनीं भाषांतर केलें. इ. स. १६३२ सालीं डॅन्झिग बायबल निघालें; हेंच बायबल हल्लीं पोलंडमधील प्रॉटेस्टंट लोकांमध्यें प्रचलित आहे.

सतराव्या शतकापर्यंत पोलिश वाङ्मयांत बरीच बुद्धिमत्ता दिसून येत होती.परंतु जेसुइट लोकांनीं क्षुद्र प्रकारचा अभ्यासक्रम सुरू केल्यामुळें, मिश्रभाषेच्या काळास सुरवात झाली. १६०६ पासून१७६४पर्यंतच्या काळामध्यें भाषेची व वाङ्मयाची फार अवनति झाली. लॅटिन व इतर भाषांतील शब्द पोलिश भाषेंत येऊन मिसळले; स्तुतिस्तोत्रें, विवाहाच्या वेळचीं व अंत्यविधीच्या वेळचीं चमत्कारिक गाणीं वाङ्मयांत येऊन घुसलीं; तीं सर्व नीरस होतीं. या वेळचे बहुतेक कवी यमक जुळविणारे होते; परंतु वॅक्ला पोटोक्की हा उत्तम कवि असून यानें खोतिनयुद्ध हें काव्य लिहिलें. यांत पोलिश आयुष्यक्रमाचें उत्तम प्रकारें वर्णन केलें आहे. यानें मिश्र भाषेचा उपयोग मुळींच केला नाहीं. त्याची भाषा शुद्ध व जोरदार असून न्यू मर्क्युरी या नांवाची आणखी एक कविता यानें केली आहे; तुर्क लोकांनां पोडोलिया दिल्याबद्दल, या कवितेंत त्यानें मिकेल राजाला

दोष दिला आहे. सॅम्युअल खारडोस्कि यानें बरेच ग्रंथ लिहिले आहेत. 'पोलंडचा राजा व्लॅडिस्लॅन्स चवथा' हें याचें महत्त्वाचें काव्य आहे. ह्यरोनिमस वेस्पॉशिअन कोह्नोव्स्कि (१६३३–९९) हा शिपाई व कवि होता. अँड्र्यू नार्झेटिन हा फडणीस असून कवि होता; हा फ्रेंच लोकांच्या बाजूचा असल्यामुळें याला पोलंड सोडून जावें लागलें. यानें फ्रेंच लेखकांची लेखनपद्धति पोलंडमध्यें चालू केली. जॉन क्रिसोस्टोम पासेक यानें पोलंडमधील समाजाचें व एकंदर रहाणीचें सुंदर वर्णन केलें आहे. स्टॅनिस्लास लेझक्रिंकि यानें पोलंडच्या स्थितीचें वर्णन लिहिलें आहे.

जोसेफ अँड्र्यू झाफुस्की यानें आपला ग्रंथसंग्रह पोलंडदेशाला दिला; परंतु तो संग्रह सेंटपीटर्सबर्ग येथें नेण्यांत आला व सरकारी सार्वजनिक वाचनालयास ते सर्व ग्रंथ देण्यांत आले. या ग्रंथांत पोलंडबद्दल बरीच माहिती आहे. कोनार्स्कि यानें विसूलिकच्या वेळेपासून अस्तित्वांत असलेल्या सर्व कायद्यांचें एकीकरण केलें. उच्च वर्गाच्या लोकांच्या मुलांसाठीं यानें शाळा काढल्या. हार्टक्नोच लेंगनिच व यांनीं पोलंडचा इतिहास लिहिला.

विद्या व ललितकला यांच्या पुनरुज्जीवनाच्या कालामध्यें (पंधराव्या शतकांत) पोलंडमध्यें कांहीं उत्तम कवी होऊन गेले. त्यांनां राष्ट्रीयत्वाची भावना होती. त्यापैकीं बहुतेकांनीं लॅटिन भाषेचा उपयोग केला आहे.

पोलिश वाङ्मयाच्या दुसऱ्या कालविभागांत त्याची प्रगति झाली; या वेळीं फ्रेंच वाङ्मयाचें वळण पोलिश वाङ्मयास लागलें. त्या वेळच्या कवींनां आपल्या देशाच्या रानटीपणाबद्दल वाईट वाटे. या वेळेपासून हे लोक मनापासून इतिहास शिकूं लागले.

तिसऱ्या कालविभागांत राष्ट्रीयत्वाची खरी भावना उत्पन्न झाली; परंतु या वेळचें वाङ्मय निराशाजनक होतें. या वेळीं इलिझाबेथ ड्रुझबाका (१६९५-१७६०) नांवाची एक पोलंडमध्यें कवयित्री होऊन गेली; परंतु हिच्या कवितेंत लॅटिन शब्द आढळतात यामुळें हिची भाषा शुद्ध पोलिश नाहीं. वार्सा येथें इ. स. १७६५ त एक नाटकगृह बांधण्यांत आलें. थॉमस कजेटन वेगिएर्स्कि (१७५५–८७) याचे औपरोधिक लेख प्रसिद्ध आहेत. फ्रेंच काव्याचा सर्व यूरोपवर किती परिणाम झाला होता हें याच्या काव्यावरून कळतें. तो पक्का स्वदेशाभिमानी होता; परंतु त्याची कविता फारशी चांगली नाहीं. ट्रेंबेकी हा स्टानिस्लासच्या दरबारीं राजकवि होता. हा फारसा प्रसिद्ध नाहीं.

क्रासिकी (१७३५–१८०१) हा फार प्रसिद्ध कवि होऊन गेला; हा फ्रेडरिक दि ग्रेटचा मित्र होता. खोतिनच्या युद्धावर यानें एक काव्य केलें आहे. यानें भिक्षु लोकांवर मोनकोमशीआ या नांवाचें, एक औपरोधिक काव्य केलें आहे. यानें कांहीं आनंदपर्यवसायी नाटकेंहि लिहिलीं आहेत. इतर कवींबद्दल याचीं मतें बरोबर नाहींत; शेक्सपीअर यासहि हा दोष देतो. धर्माधिकारी सुशिक्षित असल्यामुळें त्यापैकीं पुष्कळ चांगले लेखक निघाले यांत आश्चर्य नाहीं. अॅडम नारुस्झेवीझ (१७३३–९६) हा बिशप व कवि होता. त्यानें प्रत्येक प्रकारचें काव्य केलें आहे; परंतु इतिहासकार म्हणून त्याची प्रसिद्धि आहे. बोगिझ्लाव किआझ्निन हा अॅडाम झारतोरिस्कि याच्या दरबारीं कवि होता. जुलिअन उर्सिन निएम्सेविक्झ (१७५८-१८४१) हा फार लोकप्रिय कवि होऊन गेला. ऐतिहासिक काव्यसंग्रह हा त्याचा ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. यानें एकदोन नाटकें व एक कादंबरी लिहिली आहे. लिंडे हा भाषाशास्त्रज्ञ असून यानें एक पोलिश कोश तयार केला आहे. सतराव्या शतकांत लॅटिन व अठराव्या शतकांत फ्रेंच या भाषांचें वर्चस्व झाल्यामुळें पोलिश भाषेची स्थिति समाधानकारक नव्हती. अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत पोलिश भाषेंत एकहि चांगलें व्याकरण नव्हतें, परंतु अर्वाचीन काळीं माफेकी मॅलिनोस्कि यांनीं ही उणीव भरून काढली.

मॅकिएॲव्स्कि यानें स्लेव्होनिक कायद्यावर एक उत्तम ग्रंथ लिहिला. हेलसेल यानें १८५६ सालीं प्राचीन पोल कायद्यावर एक पुस्तक लिहिलें. काउंट अलेक्झांडर फ्रीडो (१७९३-१८७६) यानें कांहीं उत्तम आनंदपर्यवसायी नाटकें लिहिलीं आहेत. याचीं नाटकें फार मनोरंजक आहेत. आपल्या देशबांधवांनां खऱ्या आनंदपर्यवसायी नाटकांची ओळख फ्रीडोनें करून दिली. यूरोपमधील इतर राष्ट्रांप्रमाणेंच पोलंडमध्येंहि प्रथमतः धार्मिक विषयावर नाटकें लिहिलेलीं असून तीं चर्चमध्यें करण्यांत येत असत. परंतु कांहीं कालानें तीं चर्चच्या पुढच्या पटांगणांत करण्यांत येऊं लागलीं. जॉन कासिमीरची पत्नी मेरी लुई हिनें प्रथमतः पोल लोकांनां अर्वाचीन रंगभूमीची माहिती करून दिली. स्टॅनिस्लास ऑगस्टसच्या कारकीर्दींत राष्ट्रीय नाटकगृहाची स्थापना झाली, व चांगलीं चांगलीं नाटकें प्रसिद्ध झालीं. कोलफातेज हा मोठा मुत्सद्दी व लेखक असून उदारमतवादी होता. पोलंडचे लोक याच्या म्हणण्याप्रमाणें वागले असते तर पोलंडचा बचाव झाला असता. गुलामगिरीची पद्धत बंद करून सरकारी नोकऱ्या सर्वांनां खुल्या ठेवाव्या असें त्याचें मत होतें. परंतु सरदार लोकांनीं त्याचें म्हणणें मान्य केलें नाहीं.

मिकिएविक्झ (सन १७९८ ते १८५५) यानें स्वतः पोलंडमध्यें कल्पनाप्रधान वाङ्मय प्रचारांत आणिलें. राष्ट्रीय गीतें व दंतकथात्मक कविता यांचा भरणा पोलंडमध्यें नव्हता; परंतु वेडगळपणाच्या समजुती व आख्यायिका यांची संख्या मोठी होती. जुलियस (१८०९-४९) याचेंहि काव्य कल्पनाप्रधान होतें. याचे लेख जोमदार असून त्यांत भाषासौष्ठव आहे. हल्लींच्या मोठ्या कवींत याची गणना आहे. मिकिएविझ व स्लोवोकी हेहि गूढवादी होते; परंतु सिजिस्मंड क्रासिन्स्कि (१८१२-५९) हा मोठा गूढवादी

होऊन गेला. अंदेवी नाटक, इरिडिअन वगैरे त्याचीं काव्यें फार विलक्षण आहेत. तीं जोरदार भाषेंत लिहिलीं आहेत; परंतु त्यांत गूढवाद जास्त आढळतो. याच्या बापाचा कल रशियन लोकांकडे असल्यामुळें लोक त्याचा द्वेष करीत असत, त्यामुळें सिजिस्मंड यानें आपलें नांव प्रसिद्ध न करतां आपल्या कविता प्रसिद्ध केल्या; म्हणून ‘अप्रसिद्ध कवि’ असें यास म्हणत असत. याच्या देशाची दुःखप्रद स्थिति व याच्या स्वतःच्या हालअपेष्टा यामुळें, याच्या लेखांनांहि खिन्नतेचें स्वरूप प्राप्त झालें आहे. मोठ्या कवींमध्यें याची गणना केली जाते. गोरेकी, विट्विकि, ओडिनाइस, व गॅस्झिन्स्कि यांचें काव्यहि कल्पनाप्रधान आहे. याच सुमारास यूक्रेन कीवसंप्रदाय निघून कल्पनाप्रधान काव्याची प्रगति झाली. आंतोन मालझेव्स्कि(१७९३–१८२६)हा नेपोलियनचा एक कामगार होता; याची मारिआ, ही कविता लोकप्रिय आहे. बायरन् कवीची व याची चांगली ओळख होती. सेव्हेरिन गोस्झेझिन्स्कि ( सन १८०३–७६ ) यानें झामेक कनिओरिक नामक काव्य लिहिलें आहे. ‘डोंगरावरील वारें’ ही कविता बॉग्डेन झालेस्कि यानें लिहिली. थॉमस ऑर टिम्को पाडुरा, अलेक्झांडर ग्रोझा आणि थॉमस ओलिझारोव्स्कि हेहि युक्रेन संप्रदायाचे अनुयायी होते. मायकेल ग्राबोव्स्कि ( १८०५–६३ ) यानें मेलडीज ऑफ दि यूक्रेन हा ग्रंथ लिहिला. मॉरिस गॉस्लॉव्स्कीचें “एका पोलिश बंडखोराच्या कविता” हें काव्य प्रसिद्ध आहे. स्टीफन गर्झिन्स्कि ( १८०६–३३ ) हा प्रसिद्ध कवि आहे; याची भाषा फार जोमदार आहे; यानें युद्धसनीतें लिहिलेलीं असून ‘वॅक्टॉर्चीं कृत्यें’ हें त्याचें काव्य प्रसिद्ध आहे.

विन्सेन्टी पोल ( १८०७–७२ ) हा जरी विदेशी होता तरी पोलंडबद्दल त्यास अभिमान होता. ‘जीवित व प्रवासचित्रें’ व ‘देशाचे गाणें’ हे ग्रंथ त्यानें लिहिले. क्रॅकोच्या विश्वविद्यालयांत तो भूगोलशास्त्राचा अध्यापक होता. लुडविक फाडिस्फा कोड्राटोवीझ ( १८२३–६२ ) याची जॉन डेबोरोग ही कविता फार प्रसिद्ध आहे. तो गरीब लोकाचा कैवारी होता. काझकोविस्कि हा मोठा कादंबरीकार होऊन गेला. कार्ल झाजनोची ( १८१८–६८ ) हा मोठा इतिहासकार होता. याची लिहिण्याची पद्धत मेकॉलेसारखी आहे. वारांगिअन्सपासून पोलंडची उत्पत्ति आहे व म्हणून रशियन लोकांचें व पोल लोकांचें उत्पत्तिस्थान एकच आहे असें त्यानें आपल्या एका ग्रंथांत दाखविलें आहे. जोसेफ कोर्झेनिओव्स्कि (१७९७--१८६३)यानें अद्भुत गोष्टी लिहिल्या आहेत; व कांहीं नाटकें व कादंबऱ्याहि यानें लिहिलेल्या आहेत. जे. आय. क्रास्झेव्स्कि यानें लिहिलेल्या ग्रंथांचें एक मोठें ग्रंथसंग्रहालय होईल. यानें ऐतिहासिक व राजकीय विषयांवर कादंबऱ्या लिहिल्या आहेत. जाकोविझ, जास्कोविस्की, एडमंड बॅसिलोव्स्कि व होलोविन्स्कि यांनीं वर्णाकाव्यें, अथवा भावगीतें लिहिलेलीं आहेत. हल्लीं भावगीतें लिहिण्याकडेच पोल लोकांचा विशेष कल आहे.

पोलंडच्या पाडावाची मीमांसाः—स्झुजिस्झ यानें कांहीं कविता व नाटकें लिहिलीं आहेत. पोलंडच्या इतिहासाचें निरीक्षण व पोलंडचा इतिहास हीं दोन्हीं पुस्तकें फार महत्त्वाचीं आहेत. श्रिट यानें, पोलंडचा प्राचीन कालापासून स. १७६३ पर्यंत, १८ व १९ व्या शतकांतील आणि राज्यविभागणीनंतरचा असा तीन ग्रंथांत इतिहास लिहिला आहे. त्यावेळेच्या इतिहासकारांचें मत असें होतें कीं सरदार लोक व मंत्रिमंडळ यांच्यामुळें पोलंडचा पाडाव झाला; परंतु श्रिटचें मत असें होतें कीं जेसुइट लोकांच्या फाजील वर्चस्वामुळें व राजांच्या स्वार्थबुद्धीमुळें पोलंडचा नाश झाला. अडालवर्ट केट्रझिन्स्कि यानेंहि पोलंडचा इतिहास लिहिला आहे. झारानिएविझ हा लेंबर्गच्या विश्वविद्यालयांत प्रोफेसर होता. यानें गॅलिशिआचा पूर्वीचा इतिहास लिहिला आहे. झविआलिस्कि यानें लिहिलेले ऐतिहासिक निबंध फार महत्त्वाचे आहेत. जर्मन, पोलिश, स्वीडिश, डॅनिश व स्पॅनिश भाषांतून यानें निरनिराळे ग्रंथ लिहिले आहेत. मायकेल बॉब्रझिन्स्कि हा जर्मन व पोलिश कायदेशास्त्राचा प्रोफेसर होता; यानें पोलंडच्या इतिहासाचा सारांश काढला आहे. व्हिन्सेंट झाकझेव्स्कि हा क्रॅको येथे इतिहासाचा प्रोफेसर होता. यानें “पोलंडमधील सुधारणेचा उगम व वाढ” व “हेनरी राजाच्या पलायनानंतर” हे ग्रंथ लिहिले आहेत. डॉक्टर जोसेफ कॅसिमीर क्लेवान्स्कि यानें विब्लिओतेका वार्स झाव्स्का या नांवाचें मासिक पुस्तक काढिलें होतें. तें फारच अप्रतिम असून, त्याच्या तोडीचें दुसरें मासिक पोलंडमध्यें नव्हतें. आंतोन मॅटेकी यानें पोलिश वाङ्मयाचा इतिहास व पोलिश व्याकरण लिहिलें आहे. कार्ल एस्टेशर यानें लिहिलेली पोलिश वाङ्मयसूची फार महत्त्वाची आहे. व्लाडिस्टाव्ह नेहरिंग यानें भाषाशास्त्र व वाङ्मय यांवर ग्रंथ लिहिले आहेत. प्रोफेसर सियुल्स्कि याचीं पोलिश वाङ्मयावरील एकोणिसाव्या शतकाच्या प्रथमार्धांतील व्याख्यानें फार उत्तम आहेत. त्या वेळच्या मोठमोठ्या काव्यांचें यानें काळजीपूर्वक पृथक्करण केलें आहे. हल्लीं भूस्तरशास्त्रासंबंधाचे व मानुषशास्त्रासंबंधाचे अनेक शोध पोलंडमध्यें लागले आहेत.

तत्त्वज्ञानामध्यें कांहीं पोल लोकांनीं नांव मिळविलें आहे. गलुचोव्स्कि, जॉन स्निआडेकी, ब्रॉनिस्फाव, ट्रेन्टोव्स्कि, करोल लिबेट व जोसेफ क्रेमर हे तत्त्वज्ञानी होऊन गेले. ऑगस्ट सिस्झकोव्स्कि यानें तत्त्वज्ञान व अर्थशास्त्र यांवर ग्रंथ लिहिले आहेत. मॉरिटझ स्ट्रास्झेव्स्कि हा क्रॅको येथील विश्वविद्यालयांत प्रोफेसर असून याचे कांहीं लेख प्रसिद्ध आहेत.

स्लेव्हॉनिक राष्ट्रांमध्यें स्त्रीलेखक फारसे झाले नाहींत. क्लेमेंटिना हॉफमन ही पोलिश स्त्री लेखिका प्रसिद्ध आहे. या बाईच्या कादंबऱ्या पोलंडमध्यें फार लोकप्रिय आहेत. गॅब्रिएल

नार्झिसा झिमकोव्स्कि (१८२५–१८७८), मराया इलिनका व जाडविग लुस्झेझेव्स्का या कवयित्री होऊन गेल्या. अडाम अस्निक (१८३८–९७) हा मोठा कवि होता. यानें कांहीं उत्तम नाटकेंहि लिहिलीं आहेत. बाफुर्की (१८३७–१९०१) यानें कांहीं कादंबऱ्या व आनंदपर्यवसायी नाटकें लिहिलीं आहेत. नार्झिम्स्कि (१८३९–१८७२) यानें लिहिलेल्या गोष्टी लोकप्रिय आहेत. क्रॅको, पोझन, लेंबर्ग व वार्सा या ठिकाणीं पोलिश वाङ्मयाचा बराच प्रसार झाला. क्रॅको येथील विश्वविद्यालयांत, पोलंडमधील प्रमुख लोक प्रोफेसर आहेत. क्रॅको येथें पोलंडमधील वाङ्मयभक्त रहातात. पोझन येथें कांहीं पोलिश ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. लेंबर्ग येथें पोल लोकांचा एक छापखाना आहे. परंतु येथें पोलिश भाषेला रेड–रशियन भाषेशीं झगडावें लागलें. वार्सा येथील विश्वविद्यालयास पूर्णपणें रशियन स्वरूप प्राप्त झालें आहे. येथील सर्व व्यवहार रशियन भाषेंत चालतो; तथापि चांगले चांगले पोलिश ग्रंथ व पोलिश मासिक या छापखान्यांत निघतें.

एलिझा ओझेस्को ही पोलंडमधील अर्वाचीन लेखिका फार लोकप्रिय आहे. तिनें लिहिलेली आगोनान्सी नांवाची गोष्ट लोकप्रिय आहे. पोलंडमधील ज्यू व ख्रिस्ती लोकांमध्यें असलेला विरोध काढून टाकण्यासाठीं मेइर राझोफेविझ ही गोष्ट तिनें लिहिली. वॅक्लॉ सीएरोस्झेव्स्कि यानें 'जाकुतांच्या देशांतील बारा वर्षे' हा ग्रंथ लिहिला. विस्पिएन्स्कि, किसिटिएव्स्कि, रेमॉट, मॅह, झापोल्स्का वगैरे अलीकडचे कवी आहेत. मारिआ कानोप्निका हाहि एक प्रमुख कवि होता. हिंशबर्ग, पाप्पी, सोबिएस्कि वगैरे लोकांनीं ऐतिहासिक ग्रंथ लिहिले असून स्टॅनिस्लास टार्नोव्स्कि पिओत्र श्मिएलोव्स्कि यांनीं पोलिश वाङ्मयाचा इतिहास लिहिला आहे. गतकालचें पुनरुज्जीवन करण्यांत पोल लोक हल्लीं गुंतले आहेत. म्हणून इतिहासाचा अभ्यास करण्याचा त्यांना विशेष उत्साह वाटतो. बिब्लिओटेका पिसझोंव पोल्स्किश या वाङ्मयसूचीवरून सोळाव्या व सतराव्या शतकांत किती वाङ्मय तयार झालें याची कल्पना येते. पोलंडमधील हेनरिक सिएनकिएविझ या ऐतिहासिक कादंबरीकाराची कीर्ति सर्व यूरोपभर झाली आहे.

**पोलवरम्**—मद्रास, गोदावरी जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ५६४ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें ५८ हजार. पोलवरम् तालुक्यांत २९२ गांवें आहेत. पोलवरम् हीच तालुक्याची मुख्य जागा आहे.

**पोलाची**, ता लु का.—मद्रास, कोइमतूर जिल्ह्याच्या नैर्ऋत्य दिशेस असलेला एक तालुका. क्षेत्रफळ ७१० चौरस मैल. लोकसंख्या सुमारें १९४ हजार. तालुक्यांतील खेड्यांची संख्या १५८ आहे.

श ह र.—मद्रास, कोइमतूर जिल्हा. पोलाची तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या सुमारें ८ हजार. पश्चिम किनाऱ्यावर हें शहर वसलेलें असल्यामुळें व्यापारहि मोठा चालतो. येथें १८०० सालीं आगस्टस बादशहाच्या वेळचीं चांदीचीं नाणीं सांपडलीं आहेत.

**पोलुर**, त ह शी ल.—मद्रास, नेलोर जिल्ह्याच्या दक्षिणेंकडील एक तहशील. क्षेत्रफळ ३५५ चौ. मै. लोकसंख्या सुमारें ७४ हजार. तहशिलींत १३९ खेडीं असून सुलुरपेठ येथें तहशिलीचें ठाणें असतें. पोलुर तहशिलींत स्वर्णमुखी नांवाची नदी आहे. जमीन रेताड असून मुख्य पीक तांदुळ आहे.

(२) ता लु का.—मद्रास, उत्तरअर्काट जिल्ह्यांतील दक्षिणेकडचा तालुका. क्षेत्रफळ ५९६ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें १८० हजार. खेड्यांची संख्या १७० आहे. उत्पन्न ३६०००० रुपये आहे. या तालुक्यांत जंगल अतिशय आहे.

श ह र.—तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या सुमारें ९ हजार आहे. चेय्यार नदीच्या उत्तरेस २ मैलांवर पोलुर गांव आहे. एक लहानसा पडका किल्ला शहराच्या जवळच आहे. त्याजवर लेख वगैरे नाहींत.

**पोलोनारुवा**—पोलोनारुवा हें एक मोडकळीस आलेलें शहर असून तें सिलोनची प्राचीन राजधानी होती. ३६८ सालीं हें राजाच्या रहाण्याचें ठिकाण झालें. ८ व्या शतकाच्या मध्यंतरीं अनुराधपूर राजधानी झाली. पराक्रम बाहूच्या कारकीर्दींत हें खालावलें. येथें जेतवनराम नांवाचें एक मंदिर आहे हें १७० फूट लांब व ८० फूट उंच आहे.

**पोवाडे**—पवाडा म्हणजे कीर्ति. हा प्राकृत शब्द आहे. जुन्या मराठी पद्यवाङ्मयांत हा शब्द येतो. सांप्रत, रूढार्थी हा शब्द ऐतिहासिक व्यक्तींच्या एखाद्या चरित्रप्रसंगावरील शाहिरी पद्यवाङ्मयास लावतात. पोवाडा उत्तान स्वरूपाचा असतो. त्यांतील भाव फारसे गूढ नसतात. ते स्पष्ट मांडतांना निरनिराळ्या रसांची जोड त्यांना देण्यांत येते. हें वाङ्मय सर्वसामान्य जनतेला समजेल अशा सोप्या व नित्याच्या बोलण्याच्या लौकिक भाषेंत रचलें जातें. त्यांतील उपमा, उत्प्रेक्षा वगैरे सर्व लोकांच्या परिचयाच्या असतात. त्यांत ओढून ताणून शिष्टपणा आणलेला नसतो. या पोवाड्यांत मराठ्यांचें व महाराष्ट्राचें एकप्रकारचें वैशिष्ट्य प्रतिबिंबित झालेलें आढळेल. पोवाडे रचण्याचा काल बहुशः राष्ट्राच्या वैभवाचा असतो. पडत्या काळांत ते फारसे रचले जात नाहींत. कारण त्यावेळीं रोमहर्षण व मनांत खळबळ उडविणारे असे पोवाडे रचण्यालायक प्रसंग सहसा घडत नाहींत. राष्ट्राच्या भरभराटीच्या व स्वातंत्र्याच्या काळांत जें पोवाड्यांच्या रचनेंतील चातुर्य व एकंदर जिवंतपणा दृष्टीस पडतो तो परतंत्र स्थितींत पडत नाहीं. मराठी भाषेंतील असे पोवाडे कांहीं प्रसिद्ध झाले असून अद्यापि बरेच अप्रकाशित आहेत. प्रकाशित पोवाड्यांपैकीं पुष्कळ पोवाड्यांत तत्कालीन मराठेशाहीचें ऐश्वर्य दिसून येतें. नाना फडणवीस, नारायणराव, सवाई माधवराव, अफजलखानाचा वध, तानाजी व सिंहगड, पानपतचें युद्ध

वगैरेसंबंधीं पोवाडे रचले आहेत. वीररसाशिवाय पोवाड्यांनां बहार येत नसते. हल्लीं प्रसिद्ध असलेल्या पोवाड्यांत सर्वांत जुना पोवाडा अज्ञानदास(पद्या,शाहिराचा अफजलवधावरचा आहे. त्यांत पोवाड्याचें प्रारंभीचें व अत्यंत सार्थ स्वरूप दृष्टीस पडतें. त्यानंतर तुळशीदासानें सिंहगडचा पोवाडा केला आहे. यांत काव्याचा खरा प्रादुर्भाव झालेला आढळतो. त्यानंतर यमाजी, जंगबहादूर, शिवराम पिंपळगांवकर, रामा सटवा, रंगराय, गोपिनाथ, माधवसुत, लहरी मुकुंदा, खंडुसंतु, होनाजी, अनंतफंदी, रामजोशी, प्रभाकर, सगनभाऊ वगैरे अनेक शाहिरांनीं महाराष्ट्रांत घडलेल्या अनेक ऐतिहासिक व पौराणिक प्रसंगांवर पोवाडे केले आहेत. यांपैकीं कांहीं जणांनीं बऱ्याचशा लावण्याहि केल्या आहेत, लावण्या या पोवाड्यांहून निराळ्या व हलक्या समजल्या जातात.

**पोसेन**—जर्मनींतील पोसेन प्रांताचें राजधानीचें शहर. हें बर्लिनच्या पूर्वेस १४० मैलावर आहे. लोकसंख्या (१९०५) १,३६,८०८. यांपैकीं सुमारें अर्धे जर्मन व एकदशांश ज्यू आहेत. १५ व्या शतकांतील गॉथिक पद्धतीवर बांधलेलें एक देऊळ पहाण्यासारखें आहे. येथें दुसऱ्या विल्यम बादशहानें २,५०,००० पौंड खर्च करून, रोमन पद्धतीवर एक मोठा किल्ला बांधला. यांत एम्परर विल्यम नांवाचें २ लक्ष पुस्तकें असलेलें ग्रंथसंग्रहालय आहे याशिवाय पोलिश अजबखाना, विल्यम फ्रेडरिक पदार्थसंग्रहालय, नगरभवन, इत्यादि इमारती आहेत. येथें शेतकी आउतें, साखर, खोली सुशोभित करण्याचें सामान, दारू गाळणें इत्यादिकांचे कारखाने आहेत. पोसेन हें पोलंडांतील जुन्या शहरांपैकीं एक असून, येथें प्राचीन काळीं पोलिश राजे रहात असत.

**पोष्ट, हिंदुस्थान**.—आजच्यासारखी ज्यांत लोकांची सोय होईल अशी टपालाची व्यवस्था जुन्या काळीं ( अथवा १९ व्या शतकापूर्वी ) सरकारमार्फत होत नसे. लोकांच्या टपालाची जबाबदारी सरकारवर नसून लोकांनां आपल्या खर्चानें ती पार पाडावी लागत असे. सरकारचें मात्र तसें स्वतःपुरतें टपालखातें असे. त्यांत काशीद, लवे अथवा जासूद व त्याचे नाईक असत. काशीद, लवे अथवा जासूद यांच्याकडे पत्रें ( टपाल ) पोंहचविण्याचें काम असे. लोकांनीं जर आपलीं पत्रें त्यांच्याबरोबर दिलीं तरी चाले. मात्र त्याबद्दल त्यानां गांठचा पैका द्यावा लागे. हा स्थळाच्या अंतरावर व वेळेच्या महत्त्वावर अवलंबून असे. सरकारकडून मात्र नोकरांनां दरमहा १५।२० रुपये पगार असे. युद्धाच्या काळीं यांनां पगार रोजीं १ पासून ३ रुपये असे. युद्धकाळीं सतत डाक ठेवावी लागे व त्यामुळें जासुदांची संख्या ६०।७५ पर्यंत वाढे. रोज दोन तीन वेळ डाक जाई. जासूद एकटा नसे, तर दोघे दोघे असत. कारण वाटेंत शत्रूकडून एक मारला किंवा पकडला गेला तर दुसरा तें काम करी. अशा वेळीं वेळेचें महत्त्व असल्यानें जासुदाला सरकारी उंट अथवा सांडणी देत. सांडणी ही उंटापेक्षां जलद चालते. पायीं जाणाऱ्या जासुदाजवळ हल्लींच्यासारखी घुंगरू लावलेली काठी व स्वसंरक्षणार्थ हत्यार ( भाला, तरवार वगैरे ) असे.

पुण्याहून दिल्लीस साधारणतः एक महिन्यांत, खानदेशांतून ( थाळनेर ) १८ दिवसांत, महेश्वरहून १३ दिवसांत दिल्लीस डाक जाई.डाक जितक्या लवकर जाईल तितकी रक्कम जास्त मिळे. कलकत्त्यास जाणारी डाक पुण्याहून बऱ्हाणपूरमार्गें बनारस येथें जाई. तेथून ती इंग्रज कंपनी आपल्या डाकेबरोबर कलकत्त्यास रवाना करी. त्यावेळीं बहुतेक हिंदुस्थानांत हीच जासूदपद्धति अंमलांत होती. परराज्यांत डाक बसविण्यास त्या सरकारची परवानगी घ्यावी लागे. टिप्पूशीं अथवा फ्रेंचांशीं इंग्रजांचें युद्ध चालू झालें म्हणजे इंग्रज कंपनी आपली डाक मराठ्यांच्या राज्यांतून जाण्यासाठीं पेशवे सरकारची परवानगी मिळवी व ती न मिळविल्यास त्यांची डाक अडकाविण्याचा मराठी दरबारास हक्क असे.

सावकारांची डाक मात्र हिंदुस्थानांत सर्वत्र असे व ते ती आपल्या खर्चानें ठेवीत. सरकारी बातमीपेक्षांहि यांची बातमी कधीं कधीं आधीं येई. मराठी कागदपत्रांत सावकारी बातमी, सावकारी वर्तमान म्हणून जो शब्दप्रयोग येतो. तो या डाकेबद्दल होय. अशा डाकेंत लोकांनां आपली डाक देतां येई, मात्र त्याबद्दल त्यांनां वरीलप्रमाणेंच रक्कम द्यावी लागे.

ब्रिटिश अंमलः—हल्लीं हिंदुस्थानांत पोष्ट व तारखातें यांवर मुख्य अधिकारी डिरेक्टरजनरल हा असून हें खातें सरकारच्या औद्योगिक खात्यांत अन्तर्भूत होतें. शिवाय डेप्युटी डिरेक्टर जनरल व सहा असिस्टंट डिरेक्टर जनरल ( याचा दर्जा डेप्युटी पोष्ट-मास्तर जनरल यांच्यासारखा असतो ) हे प्रमुख अधिकारी असतात. या खात्याच्या व्यवस्थेकरितां सर्व हिंदुस्थानचे आठ भाग केले आहेत तेः—बंगाल व आसाम, बहार व ओरिसा, मुंबई, ब्रह्मदेश, सेंट्रल ( मध्यप्रांत, मध्यहिंदुस्थान व राजपुताना एजन्सी ), मद्रास, पंजाब व वायव्य सरहद्दप्रांत, व संयुक्तप्रांत प्रत्येक भागाचा मुख्य अधिकारी पोष्टमास्तर-जनरल असतो. शिवाय रेल्वेनें किंवा अन्तर्भागांत जलमार्गानें जाणाऱ्या पोष्टाची व्यवस्था पाहणारे तीन डेप्युटी पोष्टमास्तर जनरल आहेत. सर्व पोष्टमास्तर जनरल यांच्या हाताखालीं पर्सनल ॲसिस्टंट व मोठ्या भागामध्यें त्याशिवाय डेप्युटी पोष्ट-मास्तर जनरल असतात. या आठ भागाचे आणखी पोटविभाग पाडून प्रत्येक विभागावर सुपरिंटेंडेंट व त्याच्या हाताखालीं इन्स्पेक्टर असे अधिकारी असतात. प्रत्येक जिल्ह्याला एक हेड पोष्ट ऑफिस असून त्याच्याखालीं इतर पोष्ट ऑफिसें असतात. कलकत्ता, मुंबई व मद्रास येथें जनरल पोष्ट ऑफिसें असून त्यांचा वरिष्ठ पोष्टमास्तर जनरल असतो. प्रेसिडेन्सी पोष्ट मास्तरांच्या मदतीला एक किंवा अधिक सुपरिंटेंडेंट असतात.

जिल्ह्यांतील मोठाल्या गांवीं सब--ऑफिसें असतात व तेथें पोष्टसंबंधीं सर्व कामें चालतात. लहान गांवीं ब्रँच ऑफिसें असतात व तेथें फक्त कांहीं कामें चालतात व तीं गांवांतीलच शाळामास्तर, दुकानदार, जमीनदार वगैरेपैकीं कोणाकडे तरी दिलेलीं असतात. या खात्याचा हिशोब अकौंटंट जनरल ( पोष्ट व टेलिग्राफ ) ठेवतो. त्याच्या हाताखालीं डेप्युटी अकौंटंट जनरल व इतर नोकर असतात. सब-ऑफिसें व कांहीं हेड--ऑफिसें तारखात्याचेंहि काम करतात.

प र दे श.—यूरोपांत पूर्वीं सरकारी कागदपत्र नेण्याकरतां ठेवलेले सरकारी जासूद असत. यामध्येंच सांप्रतच्या पोष्टखात्याचा मूळ उगम सांपडतो. स. १५४४ मध्यें स्पेन व जर्मनीमध्यें सरकारी जासुदांनां खाजगी इसमांचीं पत्रें नेण्याची परवानगी दिल्याचा दाखला सांपडतो. ग्रेटब्रिटनमध्यें १५ व्या व क्वचित १४ व्या शतकांतहि सरकारी पोष्टाच्या तारयांतून खाजगीं पत्रें नेण्याला परवानगी असे, ही गोष्ट त्या काळांतील सांप्रत उपलब्ध असलेल्या खाजगी पत्रांवरील सरकारी शिक्यावरून सिद्ध होते. सुमारें १६०० पासून इंग्लंडचा पोष्ट-मास्तर नांवाचा व १६६० पासून पोष्ट-मास्तर जनरल नांवाचा अधिकारी नेमला जात असे. स. १८३६ पर्यंत एका पत्राला पोष्टाचा आकार ४ पेन्स ते १ शि. ८ पेन्सपर्यंत असे. १८३६–१८४२च्या दरम्यान सर रोलंड हिलच्या सूचनांनुसार पोष्टखात्यांत अनेक सुधारणा झाल्या, त्यांपैकीं पेनी पोष्ट म्हणजे पत्राला किमान आकार सरसकट १ पेनी ठेवण्यांत आला. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत सर्व प्रकारच्या सुधारणा होऊन या खात्याला हल्लींचें विस्तृत स्वरूप प्राप्त झालें आहे. फ्रान्समध्यें फ्रेंच पोष्टाची व्यवस्था प्रथम ११ व्या लुईच्या कारकीर्दीत ( १४६४ ) झाली. त्यानंतर १८०२ सालीं नेपोलियननें महत्त्वाच्या सुधारणा केल्या व त्याच साधारणतः जरूर ते फरक होऊन आजहि अंमलांत आहेत सरकारी पोष्टखातें ऑस्ट्रिया-हंगेरींत स. १७७२, जर्मनी–प्रशियामध्यें १६४६ व युनायटेड स्टेट्समध्यें स. १७७५ पासून चालू आहे.

पौक—वरच्या ब्रह्मदेशांतील पकोक्कू जिल्ह्यांतील मध्य तालुका. क्षेत्रफळ १४९० चौरस मैल. या प्रदेशांतून क्या व या या नद्या वहातात. लोकसंख्या अजमासें ४१ हजार. पकोकूच्या पश्चिमेस ४० मैलांवर असलेलें पौक हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे.

पौकटाऊ–खालच्या ब्रह्मदेशांतील अकियाब जिल्ह्यांतील तालुका. क्षेत्रफळ ४९६ चौरस मैल. लोकसंख्या ( १९०१ ) ४३३९५. खेड्यांची संख्या १९० असून मुख्य गांव पौकटाक हें आहे.

पौंग—खालच्या ब्रह्मदेशांतील, थटोन जिल्ह्यांतील तालुका. क्षेत्रफळ ३५३ चौरस मैल. खेड्यांची संख्या १४२ असून लोकसंख्या अजमासें ५५ हजार. मुख्य गांव पौंग. हा मुलुख सुपीक आहे.

पौंगडे—खालच्या ब्रह्मदेशांतील प्रोम जिल्ह्यामध्यें याच नांवाचा पोटविभाग. क्षेत्रफळ ३७९ चोरस मैल लोकसंख्या ६०६०४. पौंगडे हें मुख्य ठिकाण रंगूनपासून १३० मैल आहे. रंगून–प्रोम रेल्वेवरील हें स्टेशन आहे.

पौंगविन—वरच्या ब्रह्मदेशांत वरच्या चिंदविन जिल्ह्यांतील मध्यतालुका. क्षेत्रफळ २७१९ चौरस मैल. लोकसंख्या अजमासें २६ हजार. खेड्यांची संख्या २६८ असून मुख्य गांव पौंगविन. याची लोकसंख्या सु. १००० आहे.

पौचा—मुंबई, रेवाकांठामधील एक लहान संस्थान.

पौड—पुण्याच्या पश्चिमेस २० मैलांवर मुळा नदीच्या तीरीं हें गांव आहे. हवेली तालुक्यांतील मुळशी पेटयाचें हें मुख्य ठिकाण आहे. येथें भाताचा व्यापार चालतो.

पौंड्रवर्धन—हें प्राचीन गांव बंगाल प्रांतांत आहे. कांकजोल येथून गंगा उतरून पूर्वेस पुंड्रवर्धन ह्या राज्यांत ह्युएनत्संग गेला होता.या दोहोंत अंतर१०० मैल होतें. जुलियन यानें मूळच्या चिनी लिपींतील पुन्नपट्टन या शब्दाचें रूप पौंड्रवर्धन असें लिहिलें आहे,व तें सांप्रतचें वरद्धान होय असें मार्टिन म्हणतो. पुबन म्हणून एक खेडें १०० मैलांवर गंगेपलीकडे आहे, तेंच पुंड्रवर्धन असें कनिंगहॅमनें सिद्ध केलें आहे. राजतरंगिणींत पौंड्रवर्धन ही गौडच्या जयंत राजाची राजधानी सांगितली आहे( इ. स.७८२–८११ ). ह्युएनत्संग यानें या राज्याचा विस्तार ६६७मैल लिहिला.पश्चिमेस महानदी, पूर्वेस तिस्ता आणि ब्रह्मपुत्रा व दक्षिणेस गंगा यांमधील प्रदेशाचा विस्तार इतकाच आहे.

भारतांत अंग आणि मोदागिरी यांच्यामागून पुंड्रदेश पांडवांनीं घेतला असें वर्णन आहे. [ कनिंगहॅम–एन्शंट जिऑ. ऑफ इंडिया; दीक्षित–भा.र. भूवर्णन. ]

पौत्तलिन—(फार्मेलीन )हें तैलस वर्गांतील प्रायोज्जिदांतील प्रथम प्रायोज्जिद आहे याचें दुसरें नांव पुत्तल-प्रायोज्जिद असें आहे. मिथिल अल्कहल व हवा यांचें मिश्रण तप्त,किंवा ताम्र फ्लातिनवरून जाऊं दिल्यास पुत्तल-प्रायोज्जिदाची वाफ मिळते. वाफेचें द्रवरूप करून पाण्यांत किंवा अल्कहलमध्यें जमवितात हें जंतुविनाशक असून दुर्गंध घालविण्याकरितां व जंतूपासून पदार्थांचें रक्षण करण्याकरतां वापरतात, हें एक सोज्जित करणारें द्रव्य आहे. हें शुद्ध स्वरूपांत फारसें मिळत नाहीं कारण त्याचा कल जास्त अणू एके ठिकाणीं जमवून निराळाच पदार्थ बनविण्याकडे असतो. अशा प्रकारचे पदार्थ बरेच माहीत आहेत; त्यांपैकीं पर- पौत्तलिन ( त्रि- प्राण-- मिथिलीन ) हें मुख्य असून तें पौत्तलिनाचें घनीकरण केलें असतां मिळतें. बाजारांत मिळणारें पौत्तलिन हें पाण्यांतील किंवा अल्कहलमधील पौत्तलिनाचें शें. ४० या प्रमाणाचें मिश्रण असतें.

पौरोहित्य—आज ज्या संकुचित अर्थानें ' पुरोहित ' अगर ' पौरोहित्य ' हे शब्द वापरण्यांत येतात. तितक्या संकुचित अर्थानें पूर्वी हे शब्द वापरण्यांत येत नसत.पुरोहित

शब्दानें प्राचीन काळीं केवळ उपाध्यायांचाच वर्ग नव्हे तर मांत्रिक, चेटकें इत्यादिकांचाहि बोध होत असे. समाजाच्या प्राथमिक अवस्थेपासूनच पुरोहितांचें अस्तित्व दिसून येतें. मनुष्यमात्राला व्यवहारांत अनेक अडचणी येत असतात व त्यांचें निवारण होण्यासाठीं मनुष्य जे अनेकविध प्रयत्न करीत असतो त्यांतच दैवी शक्तींचें साहाय्य संपादन करणें हा एक प्रयत्न होय. पण या दैवी शक्तींचें साहाय्य संपादन करणें हें प्रत्येकाला शक्य नसतें. त्यामुळें ज्यांच्यामध्यें ही दैवी शक्तीची मदत मिळवून देण्याची शक्ति असते अशा लोकांनां त्यामुळें आपोआपच महत्त्व प्राप्त होतें. पुरोहित या शब्दानें संबोधल्या जाणाऱ्या व्यक्तींच्या अंगीं दैवी शक्तींचें साहाय्य कांहीं विशिष्ट विधींच्या साहाय्यानें मिळवून देण्याची शक्ति असते असें प्राचीन लोक मानीत असत व त्यामुळें अशा व्यक्तींचा एक स्वतंत्र संघ निर्माण होणें स्वाभाविकच होतें. अशा रीतीनें या वर्गाला महत्त्व प्राप्त होऊन हा वर्ग इतरांपेक्षां सर्वश्रेष्ठ गणला जाऊं लागला. या वर्गाचा धंदा मुख्यतः साधारण मनुष्याला दिव्य शक्तींचें साहाय्य मिळवून देण्याचा होता. कोणत्या देवाला कसें भजलें असतां व केव्हां भजलें असतां मनुष्याची इच्छा परिपूर्ण होईल हें सांगावयाचें काम या वर्गाकडे असे. प्रथम या वर्गांत अमुक एका वर्णाचेच लोक असावेत असें नसे. ज्यानां ज्यानां दैवी शक्ति मिळवून देण्याची कला साध्य असेल त्यांची या वर्गांत गणना होत असे. पण कांहीं काळानंतर या पुरोहितांची स्वतंत्र जात बनून, त्या जातीची इतर सर्व जातींमध्यें श्रेष्ठता प्रस्थापित झाली.

भारतीय पौरोहित्याचा इतिहास पाहिल्यास हीच गोष्ट स्पष्टपणें निदर्शनास येते. वैदिक काळीं, पुरोहितांची स्वतंत्र जात अशी अस्तित्वांत नव्हती. पण यज्ञयागादि धार्मिक कृत्यें करून आपल्या यजमानावर देवाची कृपा संपादन करूं इच्छिणारा असा पुरोहितांचा वर्ग मात्र होता. या पुरोहित वर्गाकडे यज्ञयाग, धार्मिक विधी इत्यादि गोष्टी करणें एवढेंच काम होतें. पुढें आचारांचें स्तोम वाढल्यामुळें व ते सर्व आचार शिकणें इतर लोकांनां सुलभ होईनासें झाल्यानें या पुरोहित वर्गानें आपल्या मुलांनांच या यज्ञयागांचें व धार्मिक विधींचें शिक्षण देण्यास सुरवात केली व त्यामुळें उत्तरोत्तर या पुरोहितवर्गाची स्वतंत्र जात बनत चालली,व त्याचप्रमाणें त्यांचें श्रेष्ठत्वहि अधिकाधिक प्रस्थापित होऊं लागलें. ब्राह्मणकाळीं तर ही जात अग्रस्थानीं जाऊन बसली.याचें प्रत्यंतर ऐतरेय व तैत्तिरीय आरण्यकांतील पुरोहितासंबंधींचीं वर्णनें पाहिलीं असतां दिसून येतें. ऐतरेय ब्राह्मणाच्या ८ व्या पंचिकेंत असें म्हटलें आहे कीं, पुरोहिताशिवाय राजानें जर यज्ञ केला तर त्याचें अन्न देव खात नाहींत, पुरोहित हा आह्वनीय अग्नीच्या जागीं असतो, पुरोहित हा साक्षात् वैश्वानर अग्नीच होय. पुरोहितांचें साहाय्य असेल तर राजा हा आत्म प्रजापरिपालन व राष्ट्रसंरक्षण उत्तम रीतीनें करूं शकतो. त्याचे शत्रू विनाश पावतात. त्याच्या राज्याला बळकटी प्राप्त होते. तेव्हां राजानें योग्य पुरोहित नेमून त्याचें प्रत्येक बाबतींत साहाय्य घेतलें पाहिजे. यावरून ऐतरेय ब्राह्मणकाळीं पुरोहितांचें महत्त्व किती होतें हें सहज दिसून येतें. प्रत्येक क्षत्रियाला पुरोहित असलाच पाहिजे अशी त्या काळीं स्थिति झाली होती.

पण वैदिककाळीं काय अगर ब्राह्मणकाळीं काय पुरोहितांचें मुख्य काम म्हणजे यज्ञयाग करणें, व इतर धार्मिक कृत्यें करणें हें असे. पण उपनिषद् काळापासून, ही स्थिति पालटली. ब्राह्मणांचें मुख्य काम यज्ञयागादि धार्मिक विधी करणें एवढेंच नसून त्याच्याहि पलीकडे, जाऊन या सृष्टीचें मूलतत्त्व काय आहे यासंबंधीं विचार करणें हें होय अशी विचारसरणी उपस्थित झाली. त्यामुळें ब्राह्मण वर्गांतच पुरोहित म्हणजे धार्मिक आचार करणारा व दुसरा त्याच्या पलीकडे जाऊन तात्त्विक दृष्टीनें परमात्मा, जीव, प्रकृति इत्यादिकांसंबंधीं विचार करणारा असे दोन वर्ग पडले.

महाभारतकाळीं व रामायणकाळीं, पुरोहितांचें वर्चस्व पुन्हां प्रस्थापित होऊं लागलें, तथापि वैदिककाळीं अगर ब्राह्मणकाळीं पुरोहितांचें यज्ञयागादि करण्याचें जे मुख्य काम होतें तें पुराणकाळीं गौण मानण्यांत येऊं लागलें व धार्मिक विधीशिवाय इतरहि गोष्टींचें ज्ञान पुरोहितांनां असणें आवश्यक झालें. पुरोहितांनां या काळीं देवाइतकाच किंबहुना देवाच्या खालोखाल मान मिळूं लागल्यामुळें राजे लोक प्रत्येक गोष्टींत पुरोहितांचा सल्ला घेत असत. त्यामुळें कायद्यांचें व राजकारणांतील इतर गोष्टींचें ज्ञान असणें, तसेंच धनुर्विद्येचेंहि ज्ञान असणें पुरोहितांच्या बाबतींत आवश्यक होऊन बसलें. त्याचप्रमाणें पुरोहिताला ज्योतिषाचें, व मांत्रिक विद्येचेंहि ज्ञान प्राप्त करून घेणें भाग पडूं लागलें. राजकीय सत्ता जरी ब्राह्मण राजाच्या हातीं असलेली दिसे तरी त्याला सल्ला देणाऱ्या पुरोहिताच्या हातींच राजकीय सत्ता होती अशी स्थिति होती. अशा रीतीनें वैदिक काळांतील पुरोहितांपेक्षां पुराणकाळांतील पुरोहितांचा दर्जा व जबाबदारी अनेकपटीनीं वाढली.

मध्ययुगीन व अर्वाचीन काळांतील पुरोहितांची स्थिति व पुराणकाळांतील पुरोहितांची स्थिति यांत फारसें अंतर पडलेलें दिसत नाहीं. तथापि समाजाच्या बदलत्या परिस्थितीबरोबरच पुरोहितवर्गाचीहि स्थिति थोडी फार पालटणें साहजिकच होतें. मध्ययुगीन काळांत दक्षिण व मध्यहिंदुस्थानांत हिंदु धर्माची भयंकर वाढ झाली व तींत अनेक पंथ उत्पन्न झाले व त्यामुळें पुरोहितवर्गामध्यें पुष्कळ उपवर्ग निर्माण झाले. या उपवर्गांमध्यें कांहीं कालानंतर परस्परांमध्यें विवाह सुद्धां होईनासे झाले. त्याचप्रमाणें हिंदु धर्मांत अनेक देवतांचा समावेश करण्यांत आल्यामुळें निरनिराळ्या देवतांची पूजा करणाऱ्या पुरोहितांमध्येंहि पुन्हां उपवर्ग निर्माण होऊं लागले. या उपवर्गांच्या आचारांमध्येंहि फरक पडत चालले व अशा

रीतीनें पुरोहितवर्गातच फाटाफूट होऊं लागली. तथापि पुरोहितांच्या सर्वसाधारण कर्तव्यांमध्यें मात्र फेर पडला नाहीं. पूर्वीप्रमाणेंच पुरोहिताचें काम लोकांचीं धार्मिक कृत्यें करणें हेंच होतें. त्याचप्रमाणें पुरोहिताला मुहूर्त पाहणें, तात्पुरतें ज्योतिष सांगणें इत्यादि कामेंहि करावीं लागत, उदाहरणार्थ ग्राम पुरोहिताला पत्रिका तयार करून देणें, शुभाशुभ फलें सांगणें, कोणाच्या अंगांत भूतसंचार झाला असेल तर तो नाहींसा करणें, आजार बरे करणें इत्यादि गोष्टी कराव्या लागत. ग्रामपुरोहिताप्रमाणेंच प्रत्येक सार्वजनिक देवळांचा एक स्वतंत्र पुरोहित असे. त्याचें काम देवासंबंधींचीं सर्व कार्यें यथासांग करणें हें असे. ग्रामपुरोहित व देवपुरोहित यांच्याहून श्रेष्ठ असा आणखी एक पुरोहितांचा वर्ग मध्ययुगीन कालीं व हल्लींहि आढळतो. या वर्गाकडे धर्माचीं अंगें लोकांनां समजून देणें, आपल्या पंथाचा प्रसार करणें, त्या पंथाची लोकांनां दीक्षा देणें हें काम असे. या वर्गाला धर्मगुरु अशी संज्ञा देण्यांत येते. हल्लींच्या कालींहि हिंदुस्थानांत पुष्कळ धर्मगुरू आढळून येतात ( यासंबंधींचें विवेचन 'हिंदुधर्म' या लेखांत पहा ).

हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच इराणांतहि प्राचीन कालीं पुरोहितांची संस्था अस्तित्वांत असलेली आढळते. यांनां आथ्रवन हें नांव असे. इराणमध्यें अग्नीला अत्यंत पवित्र मानण्यांत येत असल्यानें या अग्नीचें रक्षण करण्याचें काम ज्यांच्याकडे असे त्यांनां मोठा मान मिळावा यांत आश्चर्य नाहीं. तथापि प्राचीन कालीं हिंदुस्थानांत पुरोहितांचें जितकें वर्चस्व प्रस्थापित झालें तितकें मात्र प्राचीन इराणमध्यें आढळून येत नाहीं. पश्चिम इराणमध्येंहि 'मगी' या नांवानें संबोधला जाणारा पुरोहितांचा वर्ग होता. पण त्याचीं कर्तव्यें कोणतीं होतीं यासंबंधीं खात्रीलायक माहिती मिळत नाहीं. सस्सानियन घराण्याच्या अंमलखालीं, पुरोहितांचें वर्चस्व फार वाढलें होतें. अवेस्तामध्यें पुरोहितांचे आठ वर्ग पाडण्यांत आले आहेत. पुरोहितांच्या कर्तव्यांपैकीं प्रमुख कर्तव्यें म्हणजे यज्ञ करणें, अग्नीला हविं देणें, आचारांची शुद्धता राखणें, राजाला न्यायाच्या बाबतींत सल्ला देणें इत्यादि असत हल्लीं देखील पारशांमध्यें पुरोहितांचा स्वतंत्र वर्ग आढळतो. पुरोहितांची पारशांमध्यें पिढीजात संस्था असून त्यांच्याकडेच पारशांचीं धार्मिक कृत्यें करण्याचें काम आहे.

मुसुलमानांमध्यें, पुरोहितांचा स्वतंत्र वर्ग असा कधींच अस्तित्वांत नव्हता. जाहीर रीतीनें नमाज पढतांना त्या त्या गांवच्या मुख्याकडे पुढाकार देण्यांत येत असे. यांनां इमाम असें नांव असे. ' इमाम ' पहा.

पाश्चात्य देशांतील पौराहित्याच्या इतिहासाकडे पाहिलें असतां, प्राचीन ग्रीसमध्यें, पुरोहितांचा स्वतंत्र व पिढीजात असा वर्ग कधींच अस्तित्वांत नव्हता असें आढळून येतें. ग्रीसमध्यें कोणत्याहि नागरिकाला हा धंदा पत्करतां येत असे. फक्त तो शुद्ध आचारविचारांचा व शीलवान मात्र असला पाहिजे प्रत्येक देवालयाचा स्वतंत्र पुरोहित असे व या पुरोहिताचें काम संस्थानच्या मुख्यानें अगर व्यक्तींनें यज्ञ करण्यास सांगितलें असतां तो करणें, योग्य वेळीं प्रार्थना चालविणें, देवालयाचें सुसंरक्षण करणें इत्यादि कामें असत रोमन लोकांत अगदीं प्राचीनकाळीं धर्म व सत्ता हीं दोन्ही राजामध्येंच एकवटलीं होतीं. पुढें लोकसत्ता स्थापन झाल्यानंतर धर्मखातें पुरोहितसंघाच्या ताब्यांत देण्यांत आलें. पण पुरोहितांनां फारसें स्वातंत्र्य नसे. रोममध्यें पुरोहितांचे अनेक संघ असत. त्यांपैकीं पॉंटीफीस, औगर, सोदालिटाटेस इत्यादि प्रमुख होते. वाटेल त्या रोमन मनुष्याला-तो नागरिक शीलसंपन्न व स्वतंत्र असेल तर-पुरोहिताचा धंदा करतां येत असे. कांहीं पुरोहितवर्गाला, नोकरांचा पेशा पत्करतां येत असे. कांहीं पुरोहितांनां, संस्थानांकडून वेतन मिळत असे. हिब्रू लोकांत अगदीं प्राचीन काळापासून पुरोहितांचा वर्ग होता. पण त्यांच्याकडे यज्ञ करण्याचें मात्र काम नसे. प्रत्येक देवालयावर एकेक पुरोहित असे; व देवालयाचें संरक्षण करण्याचें काम यांच्याकडे असे. पुरोहितांनां कोहेन हें नांव असे. पुरोहितांचा धंदा पिढीजात असे.पुरोहित हा भविष्यवेत्ता असे अशींहि समजूत असे. ज्यू लोकांमध्यें पुरोहिताविषयीं फार कडक निर्बंध असत. पुरोहित हा ज्यू बाईपासून उत्पन्न झालेला असला पाहिजे, तो शुद्धाचरणी असला पाहिजे. त्यानें लग्न करतां कामा नये, अशा प्रकारचे निर्बंध असत. या पुरोहितांचे वीस–बावीस वर्ग पाडण्यांत आले होते. त्यांपैकीं धर्मगुरु, सेगन हे वर्ग प्रमुख होत. रोमन लोकांनीं देवालयसंस्थेचा उच्छेद केल्यामुळें ज्यू लोकांतील पुरोहित वर्गाला उतरती कळा लागली.

चीनमध्यें अगदीं प्राचीन काळापासून वू नांवाचा एक वर्ग असे. त्याला मंत्रतंत्राचें ज्ञान आहे असें मानण्यांत येई. या वर्गाकडे मुख्यतः भुतें घालविणें, मंत्रतंत्रादिकांच्या साहाय्यानें अरिष्टें नाहींशीं करणें व मृतांनां पिंडभक्षणार्थ आवाहन करणें, हीं तीन कामें असत. पण वू वर्ग हा एवढाच पुरोहितांचा वर्ग चीनमध्यें होता असें नव्हे तर त्या व्यतिरिक्त बौद्धधर्मी पुरोहितवर्ग, ताओपंथी पुरोहितवर्ग इत्यादि इतर वर्गहि होते. ताओपंथी पुरोहितवर्गांत दोन उपवर्ग असत. एक उपवर्ग हा ब्रह्मचारी पुरोहितांचा व दुसरा विवाहित पुरोहितांचा. बौद्ध पुरोहिताप्रमाणें ताओपंथी पुरोहित मुंडण करीत नसत. बुद्धधर्मी पुरोहित काय, अगर ताओपंथी पुरोहित काय दोघांनांहि खऱ्या धर्माचें ज्ञान थोडेंच असतें. ताओपंथी पुरोहिताला, किमया व ज्योतिष यांचा अभ्यास करावा लागत असे. चीन सरकारचें एक सार्वजनिक धर्मखातें असून त्यावरील अधिकारी बादशहातर्फे निवडले जातात. मिंग घराण्याचा मूळ पुरुष जो हुंग वू त्यानें संस्थानच्या धर्मखात्यांत शिरूं इच्छिणाऱ्या उमेदवाराकरतां एक परीक्षाहि ठेविली होती.

ईजिप्तमध्यें फार पूर्वीपासूनच पुरोहितांचा स्वतंत्रच वर्ग असे. ऐतिहासिक काळांत राजा हाच धर्मगुरु मानला जात असे; व तो आपल्या हाताखालीं धर्मपारंगत लोक नेमीत असे. पुरोहितांनां देवासारखा मान देण्यांत येई. मृतांच्या देवतेची पूजा करण्याच्या वेळीं,त्या देवतेचा प्रतिनिधि म्हणून मुख्य पुरोहितालाच बसविण्यांत येत असे. पुरोहित हा शुद्धाचरणी असला पाहिजे असा कडक निर्बंध असे. पुरोहितामध्यें हंवतर म्हणजे उच्च दर्जाचा पुरोहित व वेब म्हणणे कमी दर्जाचा पुरोहित असे दोन भेद होते. प्रत्येक देवालयाकडे पुरोहिताची नेमणुक होत असे. स्त्रियाहि पुरोहित म्हणून नेमल्या जात असत. पुरोहितांनां देवालयाच्या उत्पन्नामधून तनखा मिळत असे. त्याशिवाय उपासकांकडून व इतर लोकांकडून मिळालेल्या देणग्यांचाहि त्यांनां स्वीकार करतां येत असे. तसेंच पुरोहितांनां निरनिराळे करहि माफ असत.

**पौर्णिमा**— याचें मूळचें रूप पौर्णमास, पौर्णमासी असें वैदिक वाङ्मयांत ( तै. संहिता, अथर्ववेद, ब्राह्मणग्रंथ इत्यादि)आढळतें.व महिन्याचा शेवटचा दिवस असा त्याचा अर्थ आहे.चांद्रमासपद्धतींत पौर्णिमा हा महिन्याचा शेवटचा दिवस मानतात. कांहीं धार्मिक व्रत वैवल्यास वद्यप्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत महिना मानण्यांत येतो. दक्षिणेकडे जरी अमांत महिना मानतात तरी उत्तर हिंदुस्थानात अद्याप पौर्णिमांत महिना मानतात. वर्षाच्या बारा पौर्णिमांपैकीं ज्येष्ठी ( वटपौर्णिमा ), आषाढी ( गुरुपौर्णिमा--या पौर्णिमेस यतींची पूजा करतात. ), श्रावणी ( राखी ), भाद्रपदी ( प्रोष्ठपदी ), आश्विनी ( कोजागिरी ), कार्तिकी ( त्रिपुरी ), माघी ( नवान्नाची ) व फाल्गुनी ( होळी ) या पौर्णिमा त्या दिवशींच्या नैमित्तिक विधींमुळें प्रसिद्ध आहेत. याच दिवशीं अग्निहोत्र्यानें करावयाच्या पौर्णिमास्ययागाचें अन्वाधन करावयाचें असतें. या दिवशीं चंद्र पूर्ण दिसत असल्यामुळें वर्षाचे जे शुक्लपक्ष व कृष्णपक्ष असे २४ भाग पाडले जातात त्यांपैकीं हा दिवस असल्यामुळें याला पर्वदिन असें म्हणतात व त्यामुळेंच धार्मिकदृष्ट्या याला महत्त्व आहे. पौर्णिमांत मासासंबंधीं माहिती विभाग ३, पृ. २०७ मध्यें आली आहे.

**पौला**—ब्रह्मदेश दक्षिणेकडील शान संस्थानें.मेलट डिव्हिजनमधील एक संस्थान. क्षेत्रफळ १०२ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें आठ हजार. उत्पन्न सुमारें ८०१०० रुपये असून संस्थान इंग्रज सरकारला ४,५०० रुपये खंडणी देतें.

**प्यापल्लि**—मद्रासमधील कर्नूळ जिल्ह्याच्या पात्तिकोंडा तालुक्यांत गुत्तीपासून हैद्राबादेस जाणाऱ्या मुख्य रस्त्यावर एका टेंकडीच्या पायथ्याशीं वसलेलें एक गांव हें समुद्रसपाटीपासून सरासरी १७५० फूट उंचीवर असून डेप्युटी तहशीलदारांचें मुख्य ठिकाण आहे. ह्या ठिकाणीं प्राचीन काळचे पाळेगार लोक अजून राहतात व कांहीं लोकांनां सरकारांतून अजून पेन्शन मिळतें.

**प्रकाश**, प्र का शा चें स्व रू प.—एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत शास्त्रज्ञ लोकांत प्रकाशाविषयीं सिद्धान्तस्वरूपाच्या अशा मूळ दोन कल्पना प्रचलित होत्या. लहरींच्या योगानें एका स्थलाहून दुसऱ्या स्थळीं प्रकाश गमन करतो असें एका पक्षानें मानलें होतें व दुसऱ्या पक्षानें असें मानलें होतें कीं, प्रकाशकणांच्या स्थित्यन्तरामुळें प्रकाशाचें एका स्थलाहून दुसऱ्या स्थळीं गमन होतें या दुसऱ्या प्रकारच्या मताच्या पुरस्कर्त्यांत प्रसिद्ध न्यूटन हा अग्रगण्य होता; व याच्याच परिश्रमामुळें ही सिद्धान्तस्वरूपाची कल्पना एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत शास्त्रज्ञ मंडळांत बहुमतानें मान्य ठरली.

प्रकाशलहरींची कल्पनाः—न्यूटनच्या ह्या सिद्धान्तास बरींच वर्षेंपर्यंत शास्त्रज्ञ लोकांकडून मान मिळत होता; परंतु फ्रेसनेल आणि यंग यांनीं विघातक टीका केली व तत्पुष्ट्यर्थ अनेक प्रयोगहि केले या प्रयोगाच्या योगानें शास्त्रज्ञांचा " प्रकाशकण " सिद्धान्तावरील विश्वास नाहींसा झाला. सध्यां " प्रकाशलहरी " सिद्धान्त शास्त्रज्ञ-मंडळांत बहुमतानें मान्य झाला आहे.

विद्युच्चुंबकमय कल्पनाः—फ्रेसनेल आणि यंग यांच्या नंतर म्याक्सवेल यानें आपली विद्युच्चुंबकमय कल्पना सिद्धान्त स्वरूपानें पुढें मांडली आहे. हेन्रिश हर्ट्झ यानें जे विद्युल्लहरींविषयीं प्रयोग केले आहेत त्यांच्या योगानें म्याक्सवेलच्या सिद्धान्तास चांगलीच बळकटी आली आहे. हर्ट्झ यानें लघु प्रकंपन असलेल्या विद्युल्लहरी उत्पन्न केल्या; अर्थात ह्या विद्युल्लहरींत व प्रकाशलहरींत एक साम्य आहे. प्रकाशलहरींचीं प्रकंपनें अत्यंत लघु असतात तेव्हां जर विद्युल्लहरींचीं अत्यंत लघु अशीं प्रकंपनें करतां आलीं तर त्या विद्युल्लहरींच्या ठिकाणीं प्रकाशलहरींचे गुणधर्म दिसून आले पाहिजेत व हर्ट्झ याच्या प्रयोगावरून असें दिसून आलें कीं, या लहरींचीं प्रकाशाप्रमाणेंच परावर्तनें, वक्रीभवनें, व्यतिकरणें आणि ध्रुवीभवनें होतात. यामुळें लहरींच्या योगानें प्रकाशाचें स्थलान्तर होतें या मतास पुष्टि मिळते.

रोमरची पद्धत (प्रकाशाचा वेग):—प्रकाशाला एक ठराविक गति असते असा शोध प्रथमतः ओले रोमर यानें पॅरिस येथें इ. स. १६७८ मध्यें लावला. याकरतां त्यानें गुरूच्या चंद्राचीं ग्रहणें अवलोकन केलीं.

गुरूच्या चंद्राचीं ग्रहणें अगदीं ठराविक वेळानें होतात. एका विशिष्ट ठिकाणीं पृथ्वी असतांना सुरू झालेलें ग्रहण दिसूं लागतें; त्यापेक्षां दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं पृथ्वी असतांना हें ग्रहण दिसण्यास कांहीं मिनिटें जास्त वेळ लागतो. याप्रमाणें सूर्यप्रकाशास पृथ्वीच्या कक्षेच्या व्यासाच्या अंतराइतकें अंतर आक्रमण्यास सरासरी १६.६ मिनिटें लागतात. पृथ्वीच्या कक्षेचा व्यास १९५६०००० मैल इतका

आहे; अर्थात् प्रत्येक सेकंदास प्रकाशाच्या वेगाचें $\frac{१९५६०००००}{१६.६×६०}$ = १८६३०० मैल सरासरी प्रमाण पडतें.

फिझो यानें एका गतिमान दंतुरचक्राचा उपयोग करून त्या चाकाच्या दांत्यांतून पाठविलेला प्रकाशकिरण एका आरशावरून परावृत्त होऊन पुन्हां दंतुरचक्राशीं येण्यास त्यास किती वेळ लागतो हें पाहून त्यावरून प्रकाशाचा वेग ठरविला. तो तासास ३१ कोटी मीटर म्हणजे एक लक्ष ८६ हजार मैल इतका आला.

प्र का श च्यु ति ( ॲबरेशन ).—आकाशगामी तारे वगैरे गोलांच्या दृश्य गतीस प्रकाशच्युति म्हणतात. तारे हे त्यांच्या अक्षांशाप्रमाणें ( किंवा विषुववृत्तापासून त्यांच्या असणाऱ्या अंतराप्रमाणें ) कमी अगर अधिक दीर्घवर्तुलाकार कक्षेत फिरत असतात व त्यामुळें ते प्रतिक्षणीं आपणांस त्यांच्या खऱ्या स्थितीहून निराळ्याच स्थितींत गेलेसे वाटतात. ही दृश्य गति, प्रकाशाची तारा पाहाणाऱ्याकडे येण्याची गति व पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरत असल्याकारणानें त्या ताऱ्याकडे पाहाणाऱ्यास मिळणारी गति ह्या दोन्हींच्या परिणामाची निदर्शक आहे.

ब्रॅडले यानें जहाजाच्या डोलकाठीवरील वातकुक्कुटास जहाजाची गति बदलल्यास एक कलती मिळते हें पाहिलें व वाऱ्याची गति तीच असतांना वातकुक्कुटावरील परिणाम हा जहाजाच्या बदललेल्या स्थितीमुळें दिसून येतो अशी कल्पना करून हा परिणाम म्हणजे वायूची गति व जहाजाच्या नवीन स्थितींतील गति ह्या दोहोंच्या गतींचा परिणाम आहे असें त्यानें ठरविलें व त्याप्रमाणें त्यानें स. १७२७ मध्यें प्रकाशच्युतीची उपपत्ति प्रस्थापित केली. मनुष्य स्थिर असून तारा जर त्याच्या डोक्यावर असेल तर त्यास तो तारा, त्याचें डोकें व तारा यांनां सांधणाऱ्या रेषेंत दिसेल पण जर ताऱ्यापासून निघणारा प्रकाश त्यास पोंचावयास लागणाऱ्या वेळामध्यें कांहीं अंतर आक्रमील तर तो तारा त्यास त्या अंतराच्या टोंकापासून निघून ताऱ्यास मिळणाऱ्या रेषेमध्यें दिसेल. आतां पृथ्वी ही आपल्या कक्षेत सूर्याभोंवतीं फिरत असल्याकारणानें पाहाणाऱ्याची स्थिति बदलत असते व त्यामुळेंच ताऱ्याची च्युति पहाणाऱ्याच्या गतीशीं समांतर अशी रेषेंतच दृष्टोत्पत्तीस येते. ही प्रत्येक वेळीं दृष्टोत्पत्तीस येणारी गति सूर्य व तारा यांनां सांधणारी रेषा पृथ्वीच्या कक्षेच्या पातळीस लंब असेल तर पृथ्वीच्या कक्षेस समांतर अशा दीर्घवर्तुळानें दर्शवितां येते. ह्या च्युत-स्थिति-निदर्शक-दीर्घ-वर्तुळाचा महत्तमाक्ष पृथ्वीच्या क्रांतिवृत्तास समांतर असून याची किंमत तो प्रकाशगति व पृथ्वीची गति यांच्या गुणोत्तराचें निदर्शक असल्यामुळें स्थिर असतें. ह्या अक्षाची लांबी पृथ्वीशीं ४०° कोन अंतरित करीत असल्याकारणानें च्युति-सातत्य याच्या निम्में म्हणजे २०" असतें. ह्या दीर्घवर्तुळांतील लघुत्तमाक्ष ताऱ्याच्या अक्षांशावर अवलंबून असल्याकारणानें स्थिर नसतो. च्युतिसातत्य प्रायोगिक रीत्या शोधून काढल्यास हें प्रकाश व पृथ्वी यांच्या गतींचें गुणोत्तर असल्यामुळें, पृथ्वीची गति माहीत असेल तर प्रकाशगति तावडतोब काढतां येईल. दृक्शास्त्रामध्यें पदार्थांमधून बाहेर पडलेले किरण एकत्र न होतां वेगवेगळे आल्यास प्रकाशच्युति झाली असें म्हणतात.

प्र का श प रि व र्त न.—एखाद्या समजातीय पदार्थांतून प्रकाश जात असतांना तो जर एखाद्या पदार्थाच्या पृष्ठभागावर पडला तर बहुधा त्यापैकीं कांहीं किरण परावृत्त होतात, कांहीं इतस्ततः विखुरतात व कांहीं त्या पदार्थांत शिरतात. जर पृष्ठभाग खडबडीत असेल तर विखुरणाऱ्या किरणांचें प्रमाण फारच असतें; व पदार्थ अत्यंत गुळगुळीत असेल तर विखुरणाऱ्या किरणांचें प्रमाण फारच कमी असतें. या विखुरणाऱ्या किरणांचा व्यवहारांत अत्यंत उपयोग होतो. अशाप्रकारें किरण विखरल्यामुळेंच प्रकाशाचें पूर्णपणें परावर्तन करणाऱ्या पदार्थाखेरीज बाकीचे सर्व पदार्थ दिसूं शकतात.

प्रकाशाचें परावर्तन खालीं दिलेल्या दोन नियमांनीं घडतें.

( १ ) परावर्तन-कोन नेहमीं पतन कोनाबरोबर असतो.

( २ ) पतित आणि परावृत्त किरण हे दोन्ही परावर्तक पृष्ठभागाशीं लंब असणाऱ्या अशा एकाच पातळींत असतात.

पहिला नियम पुढें दिल्याप्रमाणें प्रयोग करून सिद्ध करतां येतो. एखाद्या भांड्यांत स्वच्छ पारा ओतावा आणि त्या भांड्यांत एखाद्या ताऱ्याचें प्रतिबिंब दुर्बिणीनें पहावें, व त्याचा भूपृष्ठाशीं म्हणजेच पारदपृष्ठाशीं किती अंशाचा कोन होतो तें पाहून ठेवावें, व त्याच ताऱ्याचा भूपृष्ठाशीं किती अंशाचा कोन होतो हेंहि त्याच क्षणीं अवलोकन करावें. हे दोन्ही कोन सारखेच असतात. कितीहि सूक्ष्मता दर्शविणारें यंत्र घेतल्यास त्याच्या योगानें या दोन कोनांत यत्किंचितहि फरक सांपडत नाहीं.

आतां एखाद्या पदार्थापासून निघणारे किरण दुसऱ्या एखाद्या पदार्थावर पडल्यामुळें परावृत्त होऊन आपणांकडे येतील तर आपणांस ते किरण त्या पदार्थापासूनच निघत आहेत असा भास होतो व मूळचा पदार्थ आपणांस त्या किरणमार्गाच्या सरळ रेषेंतच कांहीं अंतरावर दिसतो. वास्तविक त्या ठिकाणीं तो मूळ पदार्थ नसून त्याचें प्रतिबिंब असतें. आरशाच्या साहाय्यानें हें आपण नेहमीं पाहतोंच. धातूच्या आरशांस एकच परावर्तक पृष्ठभाग असल्यामुळें त्यापासून एकच प्रतिबिंब उत्पन्न होतें. परंतु कांचेच्या आरशापासून दोन प्रतिबिंबें उत्पन्न होतात. एक प्रतिबिंब कांचेच्या पृष्ठभागास लावलेल्या धातूच्या थरापासून परावर्तन होऊन उत्पन्न होतें व हें प्रतिबिंब स्पष्ट असतें; दुसरें प्रतिबिंब आरशाच्या वरील कांचेच्या पृष्ठभागापासून परावर्तन होऊन उत्पन्न होतें, हें प्रतिबिंब वरील प्रतिबिंबाइतकें स्पष्ट असत नाहीं. कांचेच्या आरशापासून जें हें द्विगुणित परावर्तन होतें, त्यामुळें प्रतिबिंबांची स्पष्टता कमी होते; म्हणून

प्रतिबिंबें पाहाण्याचे शास्त्रीय प्रयोग करण्यास कांचेच्या आरशाच्या ऐवजीं धातूच्या आरशांचाच नेहमीं उपयोग करितात.

वर्तुलाकृति आरसे:—पुष्कळ जातीचे वक्र आरसे असतात; त्या सर्वांत गोलाच्या आकाराचे व परवलय ( पॅराबोला ) च्या आकाराचे आरसे फार उपयोगांत आहेत. ते कांचेचे किंवा धातूचे करतात व त्यांच्या आंतील बाजूनें किंवा बाहेरील बाजूनें जसें परावर्तन घडेल तसें त्यास अंतर्गोल किंवा बाह्यगोल आरसे म्हणतात.

अत्यंत लहान लहान असे सपाट आरसे एकमेकांशीं सारखे कलते ठेवून एकाजवळ एक जोडून गोल आरसा बनविलेला आहे असें कल्पिलें म्हणजे सपाट आरशापासून परावर्तन पावण्याचे जे नियम बसविले आहेत त्यांचाच उपयोग करून गोल आरशाविषयीं नियम बसवितां येतात. म्हणून गोल आरशाच्या कोणत्याहि एका बिंदूवर जेव्हां प्रकाशाचे किरण पडतात तेव्हां ते वास्तविक एका लहान सपाट आरशावर पडतात व त्यापासून परावर्तन पावतात. अर्थात त्याविषयींचे नियम बसविण्यास वर्तुलाच्या किंवा गोलाच्या गुणधर्मांचा उपयोग करतात. जर वर्तुळाच्या एखाद्या बिंदूवर एखादा किरण पडला तर त्या ठिकाणीं स्पर्शरेषा काढून त्या स्पर्शरेषेस परावर्तक पृष्ठभाग समजून त्याप्रमाणें परावर्तन होतें असें समजण्याची रीत आहे व प्रत्यक्ष व्यवहारांत त्याप्रमाणें अनुभव येतो. वर्तुलाकृति आरशांत प्रतिबिंब अथवा भ्रामक प्रतिमा व खरी प्रतिमा अशीं मूळ पदार्थाचीं दोन रूपे दिसतात. वर्तुलाकृति आरशासंबंधीं पदार्थ, प्रतिमा व केंद्र यांच्या अंतरास नियम—

$$\frac{१}{प}+\frac{१}{प्र}=\frac{१}{कें}$$ असा आहे.

येथें प = पदार्थाचें आरशापासून अंतर.

प्र = प्रतिमेचें आरशापासून अंतर.

कें = आरशाचें केंद्रांतर.

जर पदार्थाचें अंतर अनंत असेल तर प्रतिमा $\frac{र}{२}$ अंतरावर पडेल; म्हणजे आरशाच्या त्रिज्येच्या निम्म्या अंतरावर प्रतिमा असेल. या अंतरास "मुख्य केंद्र" असा पारिभाषिक शब्द आहे. जर पदार्थ त्याहून अलीकडे असेल, पण त्रिज्येपेक्षां जास्त जवळ नसेल तर प्रतिमा मुख्यकेंद्र आणि आरशाच्या गोलाचा मध्यबिंदु यांच्या दरम्यान असेल; जर गोलाच्या मध्यबिंदूपाशीं पदार्थ असेल तर प्रतिमा ही मध्यबिंदूंत येईल. पदार्थ जर मध्यबिंदु आणि मुख्य केंद्र यांच्या दरम्यान असेल तर प्रतिमा त्यामानानें दूर दूर अंतरावर पडेल. पदार्थ मुख्य केंद्रांत असतांना आरशापासून समांतर किरण निघतात आणि त्याहिपेक्षां जवळ पदार्थ असल्यास प्रतिमा केंद्राच्या पलीकडे दिसते व भ्रामक प्रतिमा अथवा प्रतिबिंब आरशांत दिसूं शकतें.

वरील सर्व विवेचनांत असें गृहीत धरलें आहे कीं, परावर्तक आरसा हा गोलाचा बराचसा लहान भाग आहे. परंतु जर परावर्तन करणारा भाग बराच मोठा असेल तर प्रकाश एका बिंदूंत न मिळाल्याकारणानें प्रतिबिंब नीट उठत नाहीं.

दीर्घवर्तुलाकृति आरसे:—या प्रकारच्या आरशास दोन केंद्रें असतात. त्यापैकीं एका केंद्रांत पदार्थ अगर प्रकाशमान बिंदु असल्यास त्याचा प्रकाश दुसऱ्या केंद्रांत एकवटेल.

परवलयात्मक आरसे:—वरील दीर्घवर्तुलाकृति आरशापेक्षां जास्त उपयुक्त असे आरसे म्हटले म्हणजे परवलया ( पॅराबोला )च्या आकाराचे आरसे होत. अशा प्रकारच्या आरशाच्या अंगीं एक महत्त्वाचा असा धर्म आहे कीं, समान्तर किरणशलाका जर अशा प्रकारच्या आरशावर पडली तर ती एकवटून एका बिंदूंत आणतां येते. हा गुण वर्तुलाकृति किंवा दीर्घवर्तुलाकृति आरशांच्या अंगीं असत नाहीं. उलट प्रकारें असेंहि दिसून येतें कीं, जर प्रकाशमान बिन्दु परवलयाच्या आरशांत ठेविला तर त्यायोगानें आरशापासून समांतर प्रकाशकिरणांची शलाका निघते. या महत्त्वाच्या गुणामुळें सर्चलाईटसारख्या ठिकाणीं परवलयाच्या आरशांचा नेहमीं उपयोग करतात.

प्र का शा चें पृ थ क्क र ण.—सूर्याचा पांढरा स्वच्छ प्रकाश जर त्रिपार्श्व भिंगातून पाठविला तर तो प्रकाश भिंगांतून बाहेर येतांना पांढरा स्वच्छ असा न येतां पृथग्भूत होऊन बाहेर येतो; म्हणजे पांढरा स्वच्छ प्रकाश हा निसर्गसिद्ध अमिश्र असा नसून तो निरनिराळ्या सात रंगांपासून झालेला आहे हें यावरून सिद्ध होतें.

याप्रमाणें त्रिपार्श्व भिंगातून पांढऱ्या किरणाची एक शलाका पाठविली तर त्याचें पृथक्करण होऊन जांभळा, पारवा, निळा, हिरवा, पिंवळा, नारंगी, आणि तांबडा असे रंग दृष्टोप्तत्तीस येतात. त्यांत जांभळा हा अत्यंत वक्रीभवनीय असतो म्हणून तो त्रिकोणाच्या पायाच्या बाजूस वळतो; व तांबडा हा अत्यंत कमी प्रमाणावर वक्रीभग्न पावतो म्हणून तो दुसऱ्या टोकाकडे दिसतो; मध्यंतरीचे रंग त्याच्या दरम्यानच्या अनुक्रमानें वक्रीभवन पावतात. एकवार पृथग्भूत झालेल्या किरणांचा पुन्हां विच्छेद होत नाहीं. यास्तव पृथग्भूत झालेले ७ रंग एकदम किंवा स्वतःसिद्ध असतात; म्हणजे त्यांचें त्रिपार्श्व भिंगानें पुन्हां पृथक्करण होत नाहीं. दीप-सूर्यआदिकरून स्वयंप्रकाशित पदार्थापासून जो प्रकाश पडतो तो कधीं एकदम शुद्ध असा असत नाहीं. त्याची त्रिपार्श्व भिंगानें परीक्षा केली तर त्यांत एकाहून जास्त रंग असतात असें नेहमीं अनुभवास येतें.

पृथग्भूत किरणांच्या निरनिराळ्या भागांचें निरनिराळ्या रंगाच्या रूपानें आपणांस ज्ञान होतें. याचें कारण या निरनिराळ्या रंगाच्या प्रकाशलहरींचीं निरनिराळीं आंदोलनें होतात. उदाहरणार्थः–अगदीं कडेचा लाल रंग दिसण्यास $४५८\times१०^{१२}$

आंदोलनें दर सेकंदास व्हावीं लागतात, आणि जांभळा रंग दिसण्यास ७२५×१०^१२ आंदोलनें व्हावीं लागतात. वरील सर्व रंगांच्या प्रकाशाचा वेग सारखाच असतो; परंतु आंदोलन संख्या भिन्न असतात. यामुळें निरनिराळ्या रंगांप्रमाणें या आंदोलनांची दीर्घता भिन्न भिन्न असली पाहिजे. कांहीं शास्त्रज्ञांनीं असा अंदाज केला आहे कीं, लाल रंगाच्या आंदोलनाची लांबी.०००६२ मि. मीटर इतकी असावी आणि जांभळ्या रंगाच्या आंदोलनाची लांबी.०००४२५ मिलिमीटर इतकी असावी.

प्रकाशजनक, उष्णताजनक व रासायनिक परिणामः—कांचेच्या त्रिपार्श्वाच्या योगानें शुभ्र प्रकाशाचें पृथक्करण होतें. या पृथग्भूत प्रकाश किरणांच्या अंगीं निरनिराळ्या प्रमाणांत उष्णता, प्रकाश, आणि रासायनिक क्रिया हीं असतात व हीं निरनिराळ्या रंगांच्या अंगीं भिन्न भिन्न प्रमाणांत वास करतात.

उष्णताजनक शक्ति लाल रंगाच्या किरणांच्या अंगीं जास्त प्रमाणांत वास करते; लाल रंगाच्या शेजारीच पलीकडे अदृश्य किरण असतात; त्यांच्या अंगीं उष्णता उत्पन्न करण्याची शक्ति असल्याचें दिसून येतें. हे अदृश्य किरण इतर किरणांपेक्षां कमी प्रमाणांत वक्रीभवन पावतात; हे हर्शेल या ज्योतिर्विदानें शोधून काढले, म्हणून या किरणास हर्शेलचे किरण असें म्हणतात.

कित्येक किरणांच्या अंगीं रासायनिक क्रिया घडवून आणण्याचा धर्म प्रामुख्यानें असतो. या प्रकारचे किरण म्हटले म्हणजे जांभळ्या रंगाचे होत. या जांभळ्या रंगाच्या अंगीं उद्भिज्ज रंग नाहींसे करण्याची शक्ति सर्वांत जास्त प्रमाणांत असते. यामुळें जिनीस चिकटविण्याचें रंगीत कापड आणि रंगविलेलें कपडे हे तीव्र प्रकाशांत ठेविल्यास जलद-रीतीनें फिके पडत जातात. कित्येक रासायनिक पदार्थ स्वभावतः पांढरे असतात ते प्रकाशानें काळे पडतात; याच धर्माचा उपयोग करून प्रकाशलेखनपद्धति उर्फ फोटोग्राफी निघाली आहे. कित्येक वायूंचीं मिश्रणें अशीं असतात कीं, त्यावर सूर्यप्रकाश पडल्याबरोबर त्यांचा संयोग होऊन आवाज होतो. उदाहरणार्थ, हायड्रोजन आणि क्लोरिन यांचें मिश्रण करून तें एका कांचेच्या पंचपात्रांत भरून ठेवावें व नंतर आरशाच्या कवडाशानें त्यावर सूर्यप्रकाश पाडावा अगर सूर्य-प्रकाश नसल्यास त्या कांचपात्राच्या जवळपास म्याग्नेशियमची तार जाळावी म्हणजे हायड्रोजन व क्लोरिन या दोन वायूंचा संयोग होतो. हे रासायनिक परिणाम पृथग्भूत किरणाच्या सर्व भागीं सारखेच घडत नाहींत; जांभळ्या भागीं किंवा किंचित त्याच्या पलीकडे सर्वांत जास्त प्रमाणांत रासायनिक कार्य घडतें.

पृथग्भूत किरणांतील काळ्या रेषाः—पृथग्भूत सौर-किरणांचे रंग एकमेकांस लागलेले नसतात; कारण पृथग्भूत किरणांच्या पट्यांत अगदीं अरुंद अशा काळ्या रेषा दिसतात. एखाद्या अंधार असलेल्या खोलींत अत्यंत बारीक फटींतून सूर्यप्रकाश घेऊन तो त्रिपार्श्व भिंगावर पडूं द्यावा; नंतर या भिंगांतून जो प्रकाश बाहेर निघतो त्या प्रकाशाकडे तीन चार यार्डांच्या अंतरावरून पाहिलें तर पुष्कळशा फार नाजुक काळ्या रेषा दिसतात. या काळ्या रेषांचें अस्तित्व १८०२ सालीं उल्यास्टन यानें प्रथमतः शोधून काढलें; परंतु जर्मनांतील म्युनिच नांवाच्या शहरांतील प्रसिद्ध शास्त्रवेत्ता फ्रान हाफर यानें या रेषांविषयीं चांगली माहिती करून घेऊन त्यांचें उत्तम वर्णन प्रसिद्ध केलें; त्यानें या रेषांनां निरनिराळीं नांवें दिलीं, म्हणून या रेषांनां फ्रान हाफरच्या रेषा असें पारिभाषिक नांव पडलें आहे.

विच्छिन्न किरणाच्या साहाय्यानें पृथक्करणः—हर्शेल या शास्त्रज्ञानें असें दाखवून दिलें कीं, भिन्न पदार्थ प्रकाशहीन व अत्यंत उष्ण अशा ज्योतींत धरले तर त्यांपासून जो प्रकाश निघेल तो त्रिपार्श्वभिंगांतून पाहिल्यास निरनिराळ्या अंतरावर निरनिराळ्या रंगाच्या तेजस्वी रेषा दिसतात; पदार्थांचे अति सूक्ष्म भाग शोधून काढण्यास या रीतीचें पृथक्करण उपयोगी पडेल असें फॉक्स टॅलबट यानें १८३४ सालीं सुचविलें. यानंतर किर्चॉफ आणि बनसेन या शास्त्रज्ञद्वयांनीं प्रयोग करून प्रकाशाच्या साहाय्यानें पृथक्करण करण्याची युक्ति बसविली. त्यांनीं असें दाखवून दिलें कीं एकाच धातूचा क्षार ज्योतींत धरल्यास पृथग्भूत-किरणांत ज्या रेषा दिसतात त्या सर्वदा रंगानें व स्थानानें सारख्याच असतात, परंतु निरनिराळे धातू घेतल्यास या रेषांचीं स्थानें व संख्या भिन्न भिन्न असतात; व धातूच्या अत्यंत सूक्ष्म अंशांवरून ह्या रेषा स्पष्टपणें ओळखता येतात.

विच्छिन्न किरणदर्शक ( स्पेक्ट्रास्कोप ):—व्यवहारांत या यंत्राच्या पुष्कळशा तऱ्हा प्रचारांत आहेत; त्यांपैकीं एका साध्या प्रकारच्या यंत्राचें पुढें वर्णन दिलें आहे—दोन पत्रे ( धातूचे ) अगदीं जवळ जवळ ठेवून त्याच्या योगानें एक अत्यंत सूक्ष्म अशी फट तयार करतात; या पत्र्यांनां एक मलसूत्र जोडलेलें असतें; त्यायोगानें ही फट लहान मोठी करता येते. हे पत्रे एका नळीच्या तोंडावर बसविलेले असतात व त्या नळींत एक बाह्यगोलभिंग बसविलेलें असतें, त्या योगानें या फटींतून येणाऱ्या किरणास समान्तर करतां येतें. याप्रमाणें किरण समान्तर करून नंतर ते एका त्रिपार्श्व भिंगांतून पाठवितात; यायोगानें त्या समान्तर किरणांचें पृथक्करण होतें. याप्रमाणें किरणांचें पृथक्करण केल्यानंतर ते किरण एका दुर्बिणींतून पहातात. दुर्बिणींतून या किरणांचें निरीक्षण करण्याचें कारण असें आहे कीं दुर्बिणीच्या साहाय्यानें फ्रान हाफरच्या ( काळ्या किंवा तेजस्वी ) रेषा अत्यंत सुलभतेनें पाहतां येतात.

या प्रकारच्या यंत्रासमोर बुन्सेनचा प्रकाशरहित दिवा ठेवून त्याच्या ज्वालेंत मिठाच्या पाण्यांत बुडविलेली अशी एक प्लाटिनमची तार धरावी; या तारेचा प्रकाश जर विच्छिन्न-

प्रतिबिंबें पाहाण्याचे शास्त्रीय प्रयोग करण्यास कांचेच्या आरशांच्या ऐवजीं धातूच्या आरशांचाच नेहमीं उपयोग करितात.

वर्तुलाकृति आरसेः—पुष्कळ जातीचे वक्र आरसे असतात; त्या सर्वांत गोलाच्या आकाराचे व परवलय ( पॅराबोला ) च्या आकाराचे आरसे फार उपयोगांत आहेत. ते कांचेचे किंवा धातूचे करतात व त्यांच्या आंतील बाजूनें किंवा बाहेरील बाजूनें जसें परावर्तन घडेल तसें त्यास अंतर्गोल किंवा बाह्यगोल आरसे म्हणतात.

अत्यंत लहान लहान असे सपाट आरसे एकमेकांशीं सारखे कलते ठेवून एकाजवळ एक जोडून गोल आरसा बनविलेला आहे असें कल्पिलें म्हणजे सपाट आरशापासून परावर्तन पावण्याचे जे नियम बसविले आहेत त्यांचाच उपयोग करून गोल आरशाविषयीं नियम बसवितां येतात. म्हणून गोल आरशाच्या कोणत्याहि एका बिंदूवर जेव्हां प्रकाशाचे किरण पडतात तेव्हां ते वास्तविक एका लहान सपाट आरशावर पडतात व त्यापासून परावर्तन पावतात. अर्थात त्याविषयींचे नियम बसविण्यास वर्तुलाच्या किंवा गोलाच्या गुणधर्मांचा उपयोग करतात. जर वर्तुळाच्या एखाद्या बिंदूवर एखादा किरण पडला तर त्या ठिकाणीं स्पर्शरेषा काढून त्या स्पर्शरेषेस परावर्तक पृष्ठभाग समजून त्याप्रमाणें परावर्तन होतें असें समजण्याची रीत आहे व प्रत्यक्ष व्यवहारांत त्याप्रमाणें अनुभव येतो. वर्तुलाकृति आरशांत प्रतिबिंब अथवा भ्रामक प्रतिमा व खरी प्रतिमा अशीं मूळ पदार्थाचीं दोन रूपे दिसतात. वर्तुलाकृति आरशासंबंधीं पदार्थ, प्रतिमा व केंद्र यांच्या अंतरास नियम—

$$\frac{१}{प}+\frac{१}{प्र}=\frac{१}{कें}$$ असा आहे.

येथें प = पदार्थाचें आरशापासून अंतर.

प्र = प्रतिमेचें आरशापासून अंतर.

कें = आरशाचें केंद्रांतर.

जर पदार्थाचें अंतर अनंत असेल तर प्रतिमा $\frac{र}{२}$ अंतरावर पडेल; म्हणजे आरशाच्या त्रिज्येच्या निम्म्या अंतरावर प्रतिमा असेल. या अंतरास "मुख्य केंद्र" असा पारिभाषिक शब्द आहे. जर पदार्थ त्याहून अलीकडे असेल, पण त्रिज्येपेक्षां जास्त जवळ नसेल तर प्रतिमा मुख्यकेंद्र आणि आरशाच्या गोलाचा मध्यबिंदु यांच्या दरम्यान असेल; जर गोलाच्या मध्यबिंदूपाशीं पदार्थ असेल तर प्रतिमा ही मध्यबिंदूत येईल. पदार्थ जर मध्यबिंदु आणि मुख्य केंद्र यांच्या दरम्यान असेल तर प्रतिमा त्यामानानें दूर दूर अंतरावर पडेल. पदार्थ मुख्य केंद्रांत असतांना आरशापासून समांतर किरण निघतात आणि त्याहिपेक्षां जवळ पदार्थ असल्यास प्रतिमा केंद्राच्या पलीकडे दिसते व भ्रामक प्रतिमा अथवा प्रतिबिंब आरशांत दिसूं शकतें.

वरील सर्व विवेचनांत असें गृहीत धरलें आहे कीं, परावर्तक आरसा हा गोलाचा बराचसा लहान भाग आहे. परंतु जर परावर्तन करणारा भाग बराच मोठा असेल तर प्रकाश एका बिंदूंत न मिळाल्याकारणानें प्रतिबिंब नीट उठत नाहीं.

दीर्घवर्तुलाकृति आरसेः—या प्रकारच्या आरशास दोन केंद्रें असतात. त्यापैकीं एका केंद्रांत पदार्थ अगर प्रकाशमान बिंदु असल्यास त्याचा प्रकाश दुसऱ्या केंद्रांत एकवटेल.

परवलयात्मक आरसेः—वरील दीर्घवर्तुलाकृति आरशापेक्षां जास्त उपयुक्त असे आरसे म्हटले म्हणजे परवलया ( पॅराबोला )च्या आकाराचे आरसे होत. अशा प्रकारच्या आरशाच्या अंगीं एक महत्त्वाचा असा धर्म आहे कीं, समान्तर किरणशलाका जर अशा प्रकारच्या आरशावर पडली तर ती एकवटून एका बिंदूंत आणतां येते. हा गुण वर्तुलाकृति किंवा दीर्घवर्तुलाकृति आरशांच्या अंगीं असत नाहीं. उलट प्रकारें असेंहि दिसून येतें कीं, जर प्रकाशमान बिन्दु परवलयाच्या आरशांत ठेविला तर त्यायोगानें आरशापासून समांतर प्रकाशकिरणांची शलाका निघते. या महत्त्वाच्या गुणामुळें सर्चलाईटसारख्या ठिकाणीं परवलयाच्या आरशांचा नेहमीं उपयोग करतात.

प्र का शा चें पृ थ क्क र ण.–सूर्याचा पांढरा स्वच्छ प्रकाश जर त्रिपार्श्व भिंगातून पाठविला तर तो प्रकाश भिंगांतून बाहेर येतांना पांढरा स्वच्छ असा न येतां पृथग्भूत होऊन बाहेर येतो; म्हणजे पांढरा स्वच्छ प्रकाश हा निसर्गसिद्ध अमिश्र असा नसून तो निरनिराळ्या सात रंगांपासून झालेला आहे हें यावरून सिद्ध होतें.

याप्रमाणें त्रिपार्श्व भिंगांतून पांढऱ्या किरणाची एक शलाका पाठविली तर त्याचें पृथक्करण होऊन जांभळा, पारवा, निळा, हिरवा, पिंवळा, नारंगी, आणि तांबडा असे रंग दृष्टोत्पत्तीस येतात. त्यांत जांभळा हा अत्यंत वक्रीभवनीय असतो म्हणून तो त्रिकोणाच्या पायाच्या बाजूस वळतो; व तांबडा हा अत्यंत कमी प्रमाणावर वक्रीभवन पावतो म्हणून तो दुसऱ्या टोंकाकडे दिसतो; मध्यंतरींचे रंग त्याच्या दरम्यानच्या अनुक्रमानें वक्रीभवन पावतात. एकवार पृथग्भूत झालेल्या किरणांचा पुन्हां विच्छेद होत नाहीं. यास्तव पृथग्भूत झालेले ७ रंग एकदम किंवा स्वतःसिद्ध असतात; म्हणजे त्यांचें त्रिपार्श्व भिंगानें पुन्हां पृथक्करण होत नाहीं. दीप-सूर्यआदिकरून स्वयंप्रकाशित पदार्थांपासून जो प्रकाश पडतो तो कधीं एकदम शुद्ध असा असत नाहीं. त्याची त्रिपार्श्व भिंगानें परीक्षा केली तर त्यांत एकाहून जास्त रंग असतात असें नेहमीं अनुभवास येतें.

पृथग्भूत किरणांच्या निरनिराळ्या भागांचें निरनिराळ्या रंगाच्या रूपानें आपणांस ज्ञान होतें. याचें कारण या निरनिराळ्या रंगाच्या प्रकाशलहरींचीं निरनिराळीं आंदोलनें होतात. उदाहरणार्थः-अगदीं कडेचा लाल रंग दिसण्यास $४५८ \times १०^{१२}$

आंदोलनें दर सेकंदास व्हावीं लागतात, आणि जांभळा रंग दिसण्यास ७२०×१०[12] आंदोलनें व्हावीं लागतात. वरील सर्व रंगांच्या प्रकाशाचा वेग सारखाच असतो; परंतु आंदोलन संख्या भिन्न असतात. यामुळें निरनिराळ्या रंगांप्रमाणें या आंदोलनांची दीर्घता भिन्न भिन्न असली पाहिजे. कांहीं शास्त्रज्ञांनीं असा अंदाज केला आहे कीं, लाल रंगाच्या आंदोलनाची लांबी.०००६९ मि. मीटर इतकी असावी आणि जांभळ्या रंगाच्या आंदोलनाची लांबी.०००४२५ मिलिमीटर इतकी असावी.

प्रकाशजनक, उष्णताजनक व रासायनिक परिणामः— कांचेच्या त्रिपार्श्वाच्या योगानें शुभ्र प्रकाशाचें पृथक्करण होतें. या पृथग्भूत प्रकाश किरणांच्या अंगीं निरनिराळ्या प्रमाणांत उष्णता, प्रकाश, आणि रासायनिक क्रिया हीं असतात व हीं निरनिराळ्या रंगांच्या अंगीं भिन्न भिन्न प्रमाणांत वास करतात.

उष्णताजनक शक्ति लाल रंगाच्या किरणांच्या अंगीं जास्त प्रमाणांत वास करते; लाल रंगाच्या शेजारींच पलीकडे अदृश्य किरण असतात; त्यांच्या अंगीं उष्णता उत्पन्न करण्याची शक्ति असल्याचें दिसून येतें. हे अदृश्य किरण इतर किरणांपेक्षां कमी प्रमाणांत वक्रीभवन पावतात; हे हर्शेल या ज्योतिषवेत्त्यानें शोधून काढले, म्हणून या किरणास हर्शेलचे किरण असें म्हणतात.

कित्येक किरणांच्या अंगीं रासायनिक क्रिया घडवून आणण्याचा धर्म प्रामुख्यानें असतो. या प्रकारचे किरण म्हटले म्हणजे जांभळ्या रंगाचे होत. या जांभळ्या रंगाच्या अंगीं उद्भिज्ज रंग नाहींसे करण्याची शक्ति सर्वांत जास्त प्रमाणांत असते. यामुळें भिंतीस चिकटविण्याचें रंगीत कापड आणि रंगविलेलें कपडे हे तीव्र प्रकाशांत ठेविल्यास जलदरीतीनें फिक्के पडत जातात. कित्येक रासायनिक पदार्थ स्वभावतः पांढरे असतात ते प्रकाशानें काळे पडतात; याच धर्माचा उपयोग करून प्रकाशलेखनपद्धति उर्फ फोटोग्राफी निघाली आहे. कित्येक वायूंचीं मिश्रणें अशीं असतात कीं, त्यावर सूर्यप्रकाश पडल्याबरोबर त्यांचा संयोग होऊन आवाज होतो. उदाहरणार्थ, हायड्रोजन आणि क्लोरिन यांचें मिश्रण करून तें एका कांचेच्या पंचपात्रांत भरून ठेवावें व नंतर आरशाच्या कवडाशानें त्यावर सूर्यप्रकाश पाडावा अगर सूर्य-प्रकाश नसल्यास त्या कांचपात्राच्या जवळपास म्याग्नेशियमची तार जाळावी म्हणजे हायड्रोजन व क्लोरिन या दोन वायूंचा संयोग होतो. हे रासायनिक परिणाम पृथग्भूत किरणाच्या सर्व भागीं सारखेच घडत नाहींत; जांभळ्या भागीं किंवा किंचित त्याच्या पलीकडे सर्वांत जास्त प्रमाणांत रासायनिक कार्य घडतें.

पृथग्भूत किरणांतील काळ्या रेषाः—पृथग्भूत सौरकिरणांचे रंग एकमेकांस लागलेले नसतात; कारण पृथग्भूत किरणांच्या पट्टयांत अगदीं अरुंद अशा काळ्या रेषा दिसतात. एखाद्या अंधार असलेल्या खोलींत अत्यंत बारीक फटींतून सूर्यप्रकाश घेऊन तो त्रिपार्श्व भिंगावर पडूं द्यावा; नंतर या भिंगांतून जो प्रकाश बाहेर निघतो त्या प्रकाशाकडे तीन चार यार्डांच्या अंतरावरून पाहिलें तर पुष्कळशा फार नाजुक काळ्या रेषा दिसतात. या काळ्या रेषांचें अस्तित्व १८०२ सालीं उल्यास्टन यानें प्रथमतः शोधून काढलें; परंतु जर्मनींतील म्युनिच नांवाच्या शहरांतील प्रसिद्ध शास्त्रवेत्ता फ्रान हाफर यानें या रेषांविषयीं चांगली माहिती करून घेऊन त्यांचें उत्तम वर्णन प्रसिद्ध केलें; त्यानें या रेषांनां निरनिराळीं नांवें दिलीं, म्हणून या रेषांनां फ्रान हाफरच्या रेषा असें पारिभाषिक नांव पडलें आहे.

विच्छिन्न किरणाच्या साहाय्यानें पृथक्करणः—हर्शेल या शास्त्रज्ञानें असें दाखवून दिलें कीं, भिन्न पदार्थ प्रकाशहीन व अत्यंत उष्ण अशा ज्योतींत धरले तर त्यांपासून जो प्रकाश निघेल तो त्रिपार्श्व भिंगांतून पाहिल्यास निरनिराळ्या अंतरावर निरनिराळ्या रंगाच्या तेजस्वी रेषा दिसतात; पदार्थांचे अति सूक्ष्म भाग शोधून काढण्यास या रीतीचें पृथक्करण उपयोगीं पडेल असें फॉक्स टॅलबट यानें १८३४ सालीं सुचविलें. यानंतर किर्चॉफ आणि बनसेन या शास्त्रज्ञद्वयांनीं प्रयोग करून प्रकाशाच्या साहाय्यानें पृथक्करण करण्याची युक्ति बसविली. त्यांनीं असें दाखवून दिलें कीं एकाच धातूचा क्षार ज्योतींत धरल्यास पृथग्भूत-किरणांत ज्या रेषा दिसतात त्या सर्वदा रंगानें व स्थानानें सारख्याच असतात, परंतु निरनिराळे धातू घेतल्यास या रेषांचीं स्थानें व संख्या भिन्न भिन्न असतात; व धातूच्या अत्यंत सूक्ष्म अंशांवरून ह्या रेषा स्पष्टपणें ओळखतां येतात.

विच्छिन्न किरणदर्शक ( स्पेक्ट्रास्कोप ):—व्यवहारांत या यंत्राच्या पुष्कळशा तऱ्हा प्रचारांत आहेत; त्यांपैकीं एका साध्या प्रकारच्या यंत्राचें पुढें वर्णन दिलें आहे—दोन पत्रे ( धातूचे ) अगदीं जवळ जवळ ठेवून त्याच्या योगानें एक अत्यंत सूक्ष्म अशी फट तयार करतात; या पत्र्यांनां एक मलसूत्र जोडलेलें असतें; त्यायोगानें ही फट लहान मोठी करता येते. हे पत्रे एका नळीच्या तोंडावर बसविलेले असतात व त्या नळींत एक बाह्यगोलभिंग बसविलेलें असतें, त्या योगानें या फटींतून येणाऱ्या किरणांस समान्तर करतां येतें. याप्रमाणें किरण समान्तर करून नंतर ते एका त्रिपार्श्व भिंगांतून पाठवितात; यायोगानें त्या समान्तर किरणांचें पृथक्करण होतें. याप्रमाणें किरणांचें पृथक्करण केल्यानंतर ते किरण एका दुर्बिणींतून पहातात. दुर्बिणींतून या किरणांचें निरीक्षण करण्याचें कारण असें आहे कीं दुर्बिणीच्या साहाय्यानें फ्रान हाफरच्या ( काळ्या किंवा तेजस्वी ) रेषा अत्यंत सुलभतेनें पाहतां येतात.

या प्रकारच्या यंत्रासमोर बुन्सेनचा प्रकाशरहित दिवा ठेवून त्याच्या ज्वालेंत मिठाच्या पाण्यांत बुडविलेली अशी एक प्लाटिनमची तार धरावी; या तारेचा प्रकाश जर विच्छिन्न-

दर्शकांतून पाहिला तर त्यांत एक पिंवळ्या रंगाची तेजस्वी रेषा दिसते. या प्रकारची रेषा दुसऱ्या धातूंत दिसत नाहीं; अर्थात या पिंवळ्या रेषेच्या साहाय्यानें मिठाशीं रासायनिक दृष्ट्या संयुक्त असलेले सर्व पदार्थ ओळखतां येतात; म्हणजे याचा अर्थ असा कीं, सोडियम् नांवाचा धातु असलेल्या कोणत्याहि रासायनिक पदार्थापासून असल्याच प्रकारची रेषा दिसेल: अर्थात् सोडियम्संबंधानें ही एक कसोटीच ( टेस्ट ) झाली. याप्रमाणेंच प्रत्येक धातूसंबंधानें ठराविक रंगाच्या विशिष्ट रेषा आहेत व त्यावरून प्रत्येक धातूचेंहि अस्तित्व ( त्या त्या धातूच्या संयुक्त पदार्थांतून ) जाणतां येतें.

या प्रकारच्या यंत्रांत जे किरण त्रिपार्श्व भिंगांतून बाहेर पडतात, त्यांचें वक्रीभवन होतें.परंतु कित्येक वेळां वक्रीभवन न होतां त्यांचें फक्त पृथक्करण व्हावें अशी जरूरी असते. अर्थात अशा प्रकारची कार्यसिद्धि होण्याकरितां त्रिपार्श्व भिंगांची उलट-सुलट रचना करितात. यामुळें वक्रीभवन न होतां फक्त पृथग्भवन मात्र तेवढें होतें. अशा प्रकारचें यंत्र कित्येक वेळा फारच सोईचें असतें. पतन पावणाऱ्या ताऱ्यासारख्या स्थलान्तर पावणाऱ्या प्रकाशमान पदार्थांची पृथग्भूत किरणें पाहण्यास असलीं यंत्रें अवश्य लागतात.

वर सांगितलेंच आहे कीं,सोडियमची एक तेजस्वी पिंवळी रेषा दिसते. एका गुंजेच्या २०,००,००,००० अंशाइतक्या सूक्ष्म प्रमाणांत साध्या मिठाचें अस्तित्व एखाद्या पदार्थांत असेल तर तेवढ्या सूक्ष्म मिठानें सुद्धां ही पिंवळी रेषा दिसूं शकते. यावरून या प्रकारच्या यंत्रानें किती सूक्ष्मता आली आहे याची खात्री पटेल.

मूळ द्रव्यांचे शोधः—बुनसेन आणि किर्चॉफ या प्रसिद्ध शास्त्रवेत्त्यांनीं या यंत्राच्या साहाय्यानें सीझियम आणि रुबीडियम या दोन धातू शोधून काढल्या. थालियम, इंडियम आणि ग्यालियम या धातूंचा शोध याच यंत्राच्या साहाय्यानें लागला आहे. अगदीं अलीकडे म्याडम क्युरी आणि मि. क्युरी यांनीं देखील या यंत्राच्या साहाय्यानें रेडियम नांवाच्या जगविख्यात धातूचा शोध लावला. हा धातु साध्या मातींतच काय परंतु या धातूच्या मृत्तिकेंत सुद्धा इतक्या अल्प प्रमाणांत असतो कीं, या यंत्राशिवाय त्याच्या अस्तित्वाचें ज्ञान झालेंच नसतें. परंतु या प्रकारचें बलवत्तर यंत्र मनुष्यप्राण्याच्या हातीं लागल्यामुळेंच हा धातु याच्या मृत्तिकेपासून निराळा करतां आला आहे.

प्र का श ज न्य श क्ति मा प क.—या यंत्रास इंग्रजींत ॲक्टिनोमीटर हें नाव आहे. या यंत्राने प्रकाशकिरणांची शक्ति मोजतां येते. प्रकाशकिरणांमध्यें दोन प्रकारच्या शक्ती सामान्यतः वास्तव्य करीत असतात. एकीनें उष्णता उत्पन्न होते, आणि दुसरीनें रासायनिक क्रिया घडते. सर जॉन हर्शल यानें या प्रकारचें यंत्र प्रथमतः तयार केले परंतु अलीकडे असल्या प्रकारच्या यंत्रानें प्रकाशजन्य रासायनिक क्रियेची शक्तीच मापण्यांत येते. या कामीं फोटोग्राफीच्या रासायनिक क्रियेचा बहुधा उपयोग करण्यांत येतो. हें यंत्र विशेषसें प्रसिद्ध नसल्याकारणानें याचें फारसें वर्णन दिलें नाहीं.

प्र का श मा प क यं त्र.—असल्या यंत्राच्या योगानें दोन प्रकारच्या प्रकाशांची तुलना करून मापन करतां येतें. ज्या शास्त्रांत या विषयींचे नियम दिलेले असतात त्याला प्रकाशमापनशास्त्र अशी संज्ञा आहे. या कामीं एका ठराविक मेणवत्तीचा प्रकाश एक या परिमाणाचा गणला गेला आहे.

प्रकाशाचे दोन नियमः—( १ ) प्रकाश देणाऱ्या पदार्थापासून प्रकाशित पदार्थाच्या अंतराच्या वर्गाच्या व्युत्क्रम प्रमाणांत प्रकाशाची तीव्रता कमजास्त होते. हें एका प्रकाशबिंदूपुढे विशिष्ट अंतरावर एक विशिष्ट आकाराची तबकडी धरली असतां त्या अंतराच्या दुप्पट अंतरावर तिची छाया चौपट क्षेत्र व्यापिते या प्रयोगावरून सहज सिद्ध करतां येतें.

( २ ) प्रकाशकिरणांनीं, ज्या कोनांत एखादा प्रकाशित भाग असेल त्या कोनाच्या कोटिज्येच्या प्रमाणांत तो भाग प्रकाशित झालेला असतो. ही गोष्ट प्रकाशकिरणापुढें एक लंबाकृति व एक तिरपा असे दोन फलक उभे केले असता व्यापलेल्या क्षेत्रावरून दिसून येतें.

प्रकाशाचे परिमाणः—दोन प्रकारच्या प्रकाशांची तुलना करतां येण्यास एक ठराविक माप सर्वमान्य असें गणलें गेलें आहे. या प्रकारच्या मापास "मेणवत्ती" असें नांव दिलें आहे. व्हेल माशाची चरबी $\frac{1}{6}$ पौंड घेऊन तिची मेणवत्ती दर तासास १२० ग्रेनप्रमाणें जावली असतां जो प्रकाश पडेल तो प्रकाश एक परिमाणाचा गणला आहे. या प्रकारची मेणवत्ती सतत सारखा प्रकाश देत देत जळावयास लावणें जरा कठिणच आहे. परंतु असल्या प्रकारच्या मेणवत्तीचा साधारणपणें व्यवहारांत प्रकाश मापण्याकडे उपयोग करतां येतो. कित्येक ठिकाणीं विजेच्या दिव्याच्या प्रकाशाचें एक ठराविक परिमाण योजण्याचा उपक्रम झाला आहे. या कामीं फ्लेमिंग, हेफनर इत्यादि अनेक शास्त्रवेत्त्यांनीं अत्यंत परिश्रम केले आहेत.

प्रकाशाची तुलना करण्याकरितां पुढीलप्रमाणें युक्त्या योजतात. याकरितां पाहिल्यानें पी. बोगर आणि डब्ल्यू रिट्ची यांनीं पुढील युक्ति योजिली. अतिशय लघुकोन असलेली पाचर दोन दिव्यांमध्यें ठेवितात व त्या पाचरीच्या टोंकाकडून त्याच्या दोन बाजू अवलोकन करितात. जर त्या दोन्ही बाजू समप्रमाणांत प्रकाशमान न दिसल्या तर ती पाचर त्या दोन दिव्यांमध्यें हलवितात किंवा दिवे हलवितात. दिव्यांचें पाचरीच्या पृष्ठभागापासून जें अंतर असेल त्याच्या वर्गाच्या प्रमाणांत प्रकाशाची तीव्रता असते. कौंट रंमफोर्ड यानें पुढील प्रकारची योजना केली आहे—

एखाद्या ग्रौंडग्लासावर किंवा दुसऱ्या एखाद्या अर्ध-पारदर्शक पडद्यावर एखाद्या वस्तूची ( बहुधां एखाद्या लोहशलाकेची ) सावली दोन ठिकाणीं शेजारीं शेजारीं पाडून तींत किती साम्य आहे तें पाहतात. हें साम्य पूर्णपणें असल्यास त्या दिव्याच्या पडद्यापासून असणाऱ्या अंतराच्या वर्गाच्या प्रमाणावर प्रकाशमापन गणतात. बन्सेननें दोन बाजूस दोन दिवे ठेवून मध्यें तेलाचा डाग पडलेला एक कागद ठेवून त्याच्या दोन्ही बाजूंवर दोन्ही बाजूंच्या दिव्यांचा सारखा प्रकाश पडला असतां दिव्यांचें अंतर मोजून प्रकाशतीव्रता अंतराच्या वर्गाच्या व्युत्क्रमप्रमाणात असते हें दाखविलें आहे.

विद्युद्दीपाचें प्रकाशमापनः—विजेच्या दिव्याच्या प्रकाशाचें मापन करणें हें वरील पद्धतीइतकें सोपें नाहीं. विजेच्या दिव्यांतून निरनिराळ्या दिशेनें निरनिराळ्या तीव्रतेचा प्रकाश निघतो. तेव्हां एकाच दिशेनें प्रकाशाचें मापन केल्यास बरोबर मापन होणार नाहीं, याकरितां फिरत्या दिव्याचा उपयोग करतात. एका सेकंदास तीन फेरे या प्रमाणांत दिवा फिरता ठेवितात. परंतु दिव्यास या प्रमाणांत गति दिल्यास विद्युत्प्रवाह जाऊं देणारे दिव्यांतील तंतु कमी जास्त प्रमाणांत फाकतात; व त्या योगानें दिव्याचा प्रकाश-केंद्र बदलतें. अशा प्रकारें प्रकाशमापनांत अंतर पडूं नये म्हणून दुसरी युक्ति योजतात. दिव्याच्या सभोंवार सुमारें बारा आरसे लावून त्या दिव्याचा प्रकाश एका विशिष्ट स्थळीं पाडतात. या ठिकाणीं प्रकाशाची "ठराविक मेणवत्ती"च्या प्रकाशाशीं तुलना करतात. ही युक्ति म्याथ्यु यानें शोधून काढली म्हणून या युक्तीला म्याथ्यूची "एकत्रीभावकरण युक्ति" असें नांव आहे.

रंगीत प्रकाशाचें मापनः—वरील प्रकारच्या पद्धतींचा उपयोग जेव्हां एकच प्रकारचा प्रकाश असेल तेव्हां चांगला होतो; परंतु निरनिराळ्या प्रकारच्या रंगांचे प्रकाश असले तर वरील पद्धतींनें उत्तम काम करतां येत नाहीं. तरी पण वरील पद्धतींनीं जें उत्तर येईल तें फारसें चुकीचें ठरत नाहीं.

पृथग्भूत प्रकाशमापनः—असल्या प्रकारच्या यंत्रानें प्रकाशाचें पृथक्करण करून त्यांतील निरनिराळ्या रंगांची तुलना करतां येण्यासारखी आहे; यानें एकाच प्रकाशाच्या पृथग्भूत अंगांची तुलना करतात; किंवा दोन प्रकाशांच्या निरनिराळ्या अंगांची तुलना करतात.

खस्थ प्रकाशमापनः—या प्रकारच्या प्रकाशमापनास फार प्राचीन काळापासून सुरवात झाली आहे. सुमारें इ. स. १५० च्या सुमारास टॉलेमी यानें खस्थ तारकांची यादी प्रसिद्ध केली. तींत सुमारें १२०० तारकांचीं नांवें दिलीं आहेत. त्या यादींत तारकांचे ६ भेद सांगितले आहेत. हे भेद तारकांच्या प्रकाशानुरूप केले आहेत. विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, त्या यादींत गेल्या १५०० वर्षांत फरक करतां आला नाहीं. जेव्हां यांत्रिक मदत घेण्यास सुरवात झाली तेव्हांच या यादींत सुधारणा करतां आली. यावरून ग्रीक लोकांच्या तारतम्यज्ञानाची कल्पना करतां येईल. दुर्बिणीच्या शोधाच्या योगानें मनुष्याच्या नेत्रेंद्रियांच्या शक्तींत वाढ झाली. दुर्बिणीखेरीज अनेक साधनें यानंतर उपलब्ध झालीं व त्यायोगानें या विषयांत मनुष्याची अत्यंत प्रगति झाली. प्रथमतः कित्येकांनीं सूर्यप्रकाशाची "मेणबत्ती" शीं तुलना करण्याचा प्रयत्न केला. कित्येकांनीं चंद्राच्या प्रकाशाची "मेणबत्ती" शीं तुलना करण्याचा प्रयत्न केला, तर कित्येकांनीं चंद्र आणि सूर्य यांच्या प्रकाशाची तुलना करण्यास आरंभ केला. साधारणपणें असें आढळून आलें आहे कीं चंद्राच्या ३००००० ते ४७०००० पट सूर्याचा प्रकाश आहे. शुक्राच्या ६२ कोटी आणि गुरूच्या ३० कोटीपट प्रकाश सूर्य देतो. व्याध नांवाच्या ताऱ्याच्या ५९७ कोटीपट सूर्यप्रकाश आहे असें सिद्ध झालें आहे.

**प्रकाशलेखन** ( फोटोग्राफी )—प्रकाशाच्या साहाय्यानें चित्रें काढण्याच्या कृतीविषयीं या शास्त्रांत विवेचन केलेलें असतें. फोटोग्राफीच्या रासायनिक क्रियेस केव्हांपासून सुरवात झाली हें सांगणें बरेंच कठिण आहे. सूर्यप्रकाशाच्या योगानें कातडीं कमावलीं जाणें ही क्रिया फोटोग्राफीच्या क्रियेसारखीच आहे; कारण प्रकाशाच्या योगानें परमाणूंत बदल होऊन पदार्थाचा रंग बदलतो. ही क्रिया प्रकाशलेखनाच्या रासायनिक क्रियेंत आहे; व तीच क्रिया प्रकाशानें कातडें कमावण्यांत प्रामुख्यानें घडते. के. डब्ल्यू. शील यानें रजतहरिद ( सिल्व्हर क्लोराइड) वर सूर्यप्रकाशानें कसाकाय परिणाम घडतो हें प्रथमतः निदर्शनास आणलें. पाण्याच्या तळाशीं सिल्व्हर क्लोराइड ठेऊन त्यावर सूर्यप्रकाश पाडला तर कांहीं तरी रासायनिक क्रिया होऊन एक पदार्थ पाण्यांत विद्राव्य होतो;नंतर त्या पाण्यांत रजतनत्रित(सिल्व्हर नायट्रेट) घातलें असतां सिल्व्हर क्लोराइडचा नवीन सांका बसतो; या मिश्रणांत नंतर अम्र (अमोनिया) घातला असतां त्या कृष्णवर्णाच्या सिल्व्हर क्लोराइडपासून शुद्ध रुप्याचा सांका बसतो. वरील शास्त्रज्ञाच्या असेंहि निदर्शनास आलें कीं, सूर्याच्या सप्तरंगी किरणांपैकीं जांभळ्या रंगाच्या किरणाच्या पट्टयानें फारच लवकर सिल्व्हर क्लोराइड कृष्णवर्णाचें होतें. १७८२ सालीं जे. सेनेबिअर यानें शीलचे प्रयोग फिरून एकवार करून पाहिले; त्यावरून त्याला असें दिसून आलें कीं, जांभळ्या किरणानें १५ सेकंदांत जें कार्य होतें तेंच कार्य तांबड्या किरणांकडून होण्याला सुमारें २० मिनिटें लागतात.

कौंट रंमफोर्ड, रावर्ट हारप, जोहान विल्हेल्म रिटर, थामस जोहान सिबेक, जाक्स एटेएन् बेराडे, विल्यम् हाइड, वोलस्टन् इत्यादि शोधकांनीं या शास्त्रांतील कांहीं गोष्टींचा शोध लावला.

शील यानें जो शोध लावला त्याचा व्यावहारिक उपयोग प्रथमतः करण्याचें श्रेय इंग्लंडनें संपादिलें. सन १८०२ साच्या जूनमध्यें थामस वेजवुड ( १७७१-१८०५ ) यानें रॉयल इन्स्टिट्यूट संस्थेच्या नियतकालिकांत एक लेख प्रसिद्ध केला. त्यांत त्यानें असे दाखवून दिलें कीं, सिल्व्हर नायट्रेट-मध्यें कागद बुडवून त्यावर प्रकाश आणि छाया यांच्या साहाय्यानें चित्र काढतां येतें; परंतु तयार झालेलें चित्र कितीहि धुतलें तरी कायम राहील असें मात्र करतां येत नाहीं;कारण सिल्व्हर नायट्रेट नांवाचा वरील रौप्यक्षार कागदावर थोड्या प्रमाणानें तरी रहातोच;व त्यामुळें कागद काळा झाल्याकारणानें उमटलेलें मूळचें चित्र नाहींसें होतें. या पद्धतीनें फोटो तयार करण्याच्या कृतींत, सध्यां चालू असलेलें फोटोग्राफींतील " प्रिंटिंग " नावाच्या क्रियेचें बीज आहे. फ्रान्कॉइस चॉसिअर यानें १७९९ सालीं सोडियम थिओसल्फेट नांवाचा पदार्थ शोधून काढला. या पदार्थाचा फोटोग्राफींतील 'प्रिन्ट' कायम करण्याकरितां उपयोग केला आहे. यानंतर लुइ जेकस् मांडे डागेरे ( १७८९ ते १८५१ ) आणि निप्से यानीं फोटोग्राफींत कांहीं नवीन कल्पना काढून त्या अंमलांत आणल्या. यांच्या पद्धतीनें चित्र काढून घेण्यास सुमारें सहा सात तास लागत;परंतु आतां फोटोग्राफींत इतकी सुधारणा झाली आहे कीं, १/२०० सेकंद इतका वेळ फोटो घेण्यास पुरेसा होतो. यावरून फोटोग्राफीच्या कलेंत कितीं प्रगति झाली आहे याची सामान्य कल्पना वाचकास होईल.

आर्द्र कोलोडियनची पद्धतिः—ही पद्धत सुरू होण्यापूर्वी ज्या दुसऱ्या पद्धती चालू होत्या त्या सर्वांस हिनें मागें सारलें. या रीतीनें फोटो घेण्यास वेळ अगदीं थोडा लागूं लागला; परंतु या पद्धतींत कांचेवर बसविलेला कोलोडियनचा थर ओला ठेवावा लागतो. कारण हा थर वाळल्यानंतर प्रकाशाचें कार्य नीटपणें घडत नाहीं तेव्हां थर ओला असतांनाच फोटो घेण्याचें काम चित्रकारास करावें लागे. जेथें फोटो घ्यावयाचा असेल त्या ठिकाणीं कोलोडियनसह सर्व रासायनिक पदार्थ नेऊन एक लहानशी राहुटी उभारावी लागत असे. त्या राहुटींत अगदीं पूर्णपणें अंधेर करून तेथें तांबड्या उजेडांत कांचेवर विशिष्ट थर बसवावा लागत असे. नंतर थर बसविलेली कांच क्यामेऱ्यांत घालून तो थर वाळण्यापूर्वीच फोटो घ्यावा लागत असे. ही सारी दगदग वांचविण्याकरतां कोरड्या थराच्या कांचा तयार करण्याचा उपक्रम सुरू झाला.

कोरड्या थराच्या कांचाः—या प्रकारच्या कांचा तयार करण्याची रीत मार्क अन्टोनाइन आगस्टीन गौडीन यानें प्रथमतः काढली. २२ एप्रिल, १८५४ रोजीं त्यानें आपली पद्धत एका शास्त्रीय मासिकांत प्रसिद्ध केली. त्याच सालच्या आगष्टांत ४ थ्या तारखेस इंग्लंडांत जी. आर. मूरहेड यानें आपली माहिती प्रसिद्ध केली. परंतु या माहितीचा व्यवहारांत उपयोग करून दाखविण्याचें श्रेय जे. एम. टापनाट यानें संपादिलें. पुढें सन १८६४ सालीं कोलोडियनच्या कांचा तयार करण्याच्या पद्धतींत डब्ल्यू. बी. बोल्टन आणि बी. जे. साइस यांनीं कांहीं सुधारणा सुचविल्या व त्याप्रमाणें शोध करतां करतां पुढें असें दिसून आलें कीं, कोलोडियनमध्येंच रुप्याचे क्षार मिश्रित करून त्यायोगानें कांचा तयार करण्याची सुधारलेली पद्धत अमलांत आणणें फायदेशीर आहे. यानंतर कोलोडियनच्या ऐवजीं शुद्ध सरस वापरतां येईल काय, म्हणून कित्येक शास्त्रज्ञांनीं तपास सुरू केला. अगदीं सर्वांत जुना प्रयत्न सन १८७१ सालीं डॉ. आर. एल्. म्याडॉक्स यानें केला. त्यानंतर किंग, जे. बर्गेस, आर. केनेट, सी. बनेट, आब्ने, डी. बी. व्हान, मान्खोव्हन इत्यादि शास्त्रज्ञांनीं फार परिश्रम करून ही पद्धत पुढें आणण्यास मदत केली.

शुष्क कांचा करण्याची संक्षिप्त माहितीः—शुद्ध सरस किंवा जिलेटीनचा उपयोग करून कांचा तयार करण्याची पद्धत पुढें दिली आहे—या रीतीनें कांचा तयार करतांना ग्यासचा किंवा मेणबत्तीचा उजेड उपयोगांत आणावा. हा उजेड " चान्से"च्या तांबड्या कांचेंतून घ्यावा व तो उजेड नारिंगी रंगाच्या कागदांतून जाऊं देऊन नंतर उपयोगांत आणावा. अशा प्रकारें काळजी घेऊन तांबडा उजेड उपयोगांत आणल्यास रुप्याच्या क्षारावर यत्किंचितहि परिणाम होत नाहीं. जर सूर्यप्रकाश उपयोगांत आणावयाचा असेल तर तांबड्या कांचेवर दुहेरी नारिंगी कागद वापरावा.

खालीं दिलेले पदार्थ वजन करून घ्यावेत—

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | पोट्याशियम आयोडाइड | ५ ग्रेन; |
| ( २ ) | पोटयाशियम ब्रोमाइड | १३५ ,, |
| ( ३ ) | नेलसनचें नं. १ चें फोटोग्राफीचें जिलेटीन | ३० ,, |
| ( ४ ) | सिल्व्हर नायट्रेट | १७५,, |
| ( ५ ) | आटोटाईप किंवा दुसरें कठिण जिलेटीन. | १००,, |
| | नेलसनचें नं. १ चें जिलेटिन | १००,, |

नंतर तीन आणि पाच यांतील पदार्थ झटकन पाण्याखालीं धुवून घ्यावेत.म्हणजे त्यांच्या पृष्ठभागावर बसलेली धूळ किंवा केरकचरा निघून जातो. नं. दोनचा पदार्थ १॥ औंस पाण्यांत विरघळवितात. त्याला फिक्कट तांबूस पिवळट रंग येईपर्यंत त्यांत थोडें आयोडिनचें टिंक्चर घालतात. नं.१ चा पदार्थ ६० मिनिम पाण्यांत विरघळवितात.नंतर ४ था अर्धा औंस पाण्यांत विरघळवितात. नंतर ३ ला १ औंस पाण्यांत फुगूं देतात आणि नंतर उष्णतेनें ते सर्व विरघळवितात.वरील सर्व मिश्रणें काचेच्या चंबूंत ( फ्लास्कांत ) घालून ते १५०° उष्णमानापर्यंतच्या पाण्यात ठेवून नंतर अंधेऱ्या ( म्हणजेच तांबड्या प्रकाशाच्या ) खोलींत नेतात. नंतर नंबर ३आणि ४ हे एका चंबूंत एकत्र करतात. नंतर नंबर २ चे थेंब थेंब सोडून तें अर्धें संपवितात. नंतर राहिलेल्यांत नंबर एकचें मिश्र करून तें

सर्व एकत्र करतात. हे सर्व एकत्र झाल्यावर तें मिश्रण चिकट झालें पाहिजे. त्याचा रंग रशासच्या उजेडांत तांबडा भडक दिसला पाहिजे; किंवा सूर्यप्रकाशांत नारिंगी दिसला पाहिजे. हें मिश्रण चंबूंत ठेऊन तो चंबू आधणाच्या पाण्यांत सुमारें ४५ मिनिटें ठेवितात, व नंतर त्याला १००° फा० उष्णमानावर ठेवितात म्हणजे त्यांत नंबर ५ चें मिश्रण घालण्याची योग्यता येते. नंबर ५ ला मध्यंतरीच्या काळांत २ औंस पाण्यांत फुगूं देऊन नंतर विरघळवितात. हें तयार झालेलें जिलेटिनचें मिश्रण एकीकडे थंड होण्यासाठीं ठेवितात.

वरील सर्व एकत्र झालेलीं मिश्रणें जाड्या कॅनव्हासच्या पिशवींत घालून दाबतात म्हणजे शेवयाप्रमाणें त्यांचे तंतू निघतात. हे निघालेले तंतू थंड वहात्या पाण्यांत पडूं देतात; म्हणजे त्या मिश्रणांतील विद्राव्य क्षार निघून जातात. फिरून एकवार कॅनव्हासच्या पिशवींतून हें मिश्रण गाळून नंतर गरम करून नंतर त्यांत अर्धा औंस अल्कोहल विरघळवितात. शेवटीं ते शामॉइस कातड्यांतून किंवा उत्तम मलमलींतून गाळून घेतात. अशा प्रकारें शुद्ध केल्यामुळें हें मिश्रण कांचेवर बसविण्यालायक होतें.

कांचेवर मिश्रण बसविण्याची पद्धतः—कांचा प्रथमतः नायट्रिक ॲसिडानें स्वच्छ करून पाण्यानें धुनात.नंतर पोटॅशियम मिश्रणानें धूवून पाण्यानें स्वच्छ करतात. नंतर स्वच्छ कापडानें त्या कोरड्या करतात. नंतर त्यावर मिश्रण ओततात. मिश्रण ओतण्यापूर्वी दोहोंचेंहि उष्णमान १२०° फा. इतकें असलें पाहिजे. नंतर समपातळींत (लेव्हलमध्यें) असलेल्या टेबलावर कांचा ठेऊन वरील मिश्रण सर्व बाजूंनां सारखें लागेल असें करतात नंतर त्या कांचा उष्ण वारा वहाणाऱ्या कपाटांत ठेऊन वाळवितात.सुमारें बारा तासांत कांचा वाळून तयार होतात.

प्रकाशदर्शनाचा कालः—सूर्य-प्रकाश उत्तम पडला असून लेन्साच्या मुख्य केंद्राच्या एकपोडषांश प्रमाणाचें छिद्र असेल तर मैदान, कुरणें इत्यादि उघड्यावरील फोटो घेण्यास अर्ध्या सेकंदापासून ते एकपंचमांश सेकंद वेळ पुरा होतो. जर फोटो घेण्याच्या देखाव्यांत झाडेंझुडपें इत्यादि हिरवे भाग जास्त प्रमाणांत असतील तर थोडासा वेळ जास्त लागतो. ह्याप्रमाणेंच प्रकाश असून जर फोटोच्या खोलींत फोटो घ्यावयाचा असल्यास अर्ध्या सेकंदापासून चार पांच सेकंदांपर्यंत प्रकाशदर्शन करावें लागतें.

चित्राचें प्रकटीकरणः—डेव्हलपमेंट उर्फ प्रकटीकरणाकरितां फेरस आक्सलेटचें मिश्रण किंवा अल्कलीयुक्त पायरोगालीक ॲसिडचें मिश्रण यांपैकीं कोणत्याहि एकाचा उपयोग करतात. रिस्ट्रेनर उर्फ रासायनिक प्रतिरोधक द्रव वापरण्याची जरुरी भासत नाहीं. कारण जिलेटिन हाच स्वतः प्रतिरोधकाचें कार्य करतो; अल्कलाइन डेव्हलपर या नांवाखालीं मोडणारीं रासायनिक द्रव्यें उपयोगांत आणल्यामुळें शुष्क पद्धतींत जास्त सौकर्य उत्पन्न झालें. पुढें दिलेलीं मिश्रणें सन १८८० च्या सुमारास किंवा तत्पूर्वी वापरीत असत. या मिश्रणांत अद्याप (१९११) पर्यंत फारसा फेरफार झाला नाहीं हें ध्यानांत घेण्यासारखें आहे.

(१)ऐकनोजेन डेव्हलपर मिश्रणः—

| | | |
|---|---|---|
| ऐकनोजेन | २५ | भाग |
| सोडियम सल्फाइट | ५० | ,, |
| सोडियम कार्बोनेट | ५० | ,, |
| पोटॅशियम ब्रोमाइड | ½ | ,, |
| पाणी | १००० | ,, |

ह्या वरील एकाच मिश्रणानें कार्यभाग होतो.

(२)मिथाल डेव्हलपर मिश्रणः—अ मिश्रण

| | | |
|---|---|---|
| मिथाल | २ | भाग |
| सोडियम सल्फाइट | १८ | ,, |
| पाणी | १०० | ,, |

ब मिश्रण

| | | |
|---|---|---|
| सोडियम कार्बोनेट | ६ | भाग |
| पोटॅशियम ब्रोमाइड | १ | ,, |
| पाणी | १०० | ,, |

उपयोग करतांना "अ" मिश्रणांतील १ भाग घेऊन त्यांत 'ब' मिश्रणाचे ३ भाग मिसळावेत.

(३)आर्टोल डेव्हलपर मिश्रणः—

अ मिश्रण

| | | |
|---|---|---|
| आरटोल | १५ | भाग |
| सोडियम मेटाबायसल्फाइट | ७ | ,, |
| पाणी | १००० | ,, |

ब मिश्रण

| | | |
|---|---|---|
| सोडियम कार्बोनेट | १०० | भाग |
| सोडियम सल्फाइट | १२५ | ,, |
| पोटॅशियम ब्रोमाइड | ३ | ,, |
| पाणी | १००० | ,, |

अ आणि ब मिश्रणें सम प्रमाणांत मिसळून वापरणें.

(४)आमिडोल डेव्हलपर मिश्रणः—

| | | |
|---|---|---|
| अमिडोल | ३ | भाग |
| सोडियम सल्फाइट | १०० | ,, |
| पोटॅशियम ब्रोमाइड | १ते३ | , |
| पाणी | १००० | ,, |

या मिश्रणांत अल्कली घालावा लागत नाहीं. या वरील चार प्रकारच्या डेव्हलपर मिश्रणांशिवाय दुसरीं कांहीं मिश्रणें आहेत परंतु तीं फारशीं प्रचारांत नसल्याकारणानें दिलीं नाहींत. वर दिलेल्या मिश्रणांत गेल्या दोन पिढ्यांत विशेषसा फेरफार झाला नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

फोटोच्या कांचा डेव्हलप करण्याच्या कामांत रिस्ट्रेनर (रासायनिक क्रियेचा प्रतिरोधक) नांवाच्या द्रव्याचा

उपयोग करण्याची कोठें कोठें रीत आहे. या प्रकारचीं द्रव्यें अल्कली आणि ब्रोमिन किंवा क्लोरीन यांच्या रासायनिक संयोगापासून तयार केलेलीं असतात. या द्रव्यांच्या योगानें फोटोच्या कांचेवर जास्त व्यवस्थित रीतीनें कार्य होतें. व त्यामुळें फोटो बिघडण्याचा संभव फारच कमी होतो.

प्रकर्षीकरणः—कित्येक वेळां घेतलेल्या कांचेवरील चित्राचें प्रकर्षीकरण ( इन्टेन्सीफाईंग ) करणें अत्यंत जरूर असतें. प्रकर्षीकरण करण्याच्या पुष्कळच पद्धती आहेत. परंतु पुढें दिलेली कृति अत्यंत उत्तम आहे. ही पद्धत चापमन जोन्स यानें बसविली आहे. मरक्युरिक क्लोराइड नावाच्या द्रव्याचें संपृक्त द्रावण ( सोल्यूशन ) घेऊन त्यांत कांच टाकावी. नंतर ती त्यांतून काढून फेरस आक्सलेटमध्यें घालावी. चित्रास योग्य तितकी जाडी न आल्यास ह्या कृतीच्या अनेक आवृत्त्या कराव्यात. दुसऱ्या कृतीपेक्षां या कृतींत हें विशेष आहे कीं, दुसऱ्या कृतींत चित्र पिंवळें पडून नाहींसें होण्याची भीति असते; परंतु अशा प्रकारची भीति या कृतींत संभवत नाहीं.

वॉरनिस चढविणें:—याप्रमाणें तयार झालेल्या कांचेस 'ऋण' किंवा 'निगेटिव्ह' म्हणण्याची चाल आहे. या कांचेचें उत्तम प्रकारें रक्षण व्हावें म्हणून त्यावर कित्येक ठिकाणीं वॉरनिस चढविण्याची चाल आहे. याकरितां प्रथमतः कोलोडियनचा थर देऊन नंतर लाखेच्या रोगणाचा हात देतात. या प्रकारें रोगण चढविलें असतां कांचेवरून तसबीर छापून घेतांना कागदावरील रौप्यक्षार लागून कांच खराब होत नाहीं. दुसऱ्या प्रकारचे वॉरनिस पुढें दिल्याप्रमाणें तयार करतात. कोलोडियन घेऊन तें ॲमिल ॲसिटेट नांवाच्या पदार्थांत विद्राव्य करतात. हें एक प्रकारचें वॉरनिसच होय. या वॉरनिसाच्या योगानें सरदीपासून निगेटीव्ह कांचेचें उत्तम प्रकारें रक्षण होतें.

फोटो छापण्याचे कागद तयार करण्याची कृतिः—पुढील कृतीनें हे कागद तयार करतात. १५० भाग अमोनियम क्लोराइड, २४० भाग स्पिरिट आफ वाईन, आणि २००० भाग पाणी घेतात. हे एकत्र करून सर्वांचा एकजीव होऊं देतात. नंतर १५ अंड्यांतील पांढरा बलक त्यांत घालून सर्व मिश्रण घोळून एकजीव बनवितात. उष्ण हवामान असल्यास त्यांत क्यारबॉलिक ॲसिडाचा एखादा थेंब टाकतात. क्यारबॉलिक ॲसिडाच्या योगानें मिश्रण विटून बिघडत नाहीं. हें मिश्रण दोनतीन दिवस राहूं देऊन नंतर कांचेच्या नरसाळ्यांत स्पंज ठेऊन त्यांतून गाळून काढतात; किंवा दुहेरी-तिहेरी मलमलीच्या कापडांतून गाळून घेतात; व नंतर ते उथळ वशींत काढून घेतात. पुढें योग्य आकाराचे कागद घेऊन ते त्या वशींत टाकून ते कागद एक मिनीटपर्यंत तरंगूं देतात व नंतर काढून घेऊन उष्ण खोलींत ते वाळवितात.

फोटोवर रंग चढविण्याचा असल्यास कागदावर चकाकी असतां कामा नये. चकाकी असल्यास रंग कागदावर नीट रीतीनें बसत नाहीं. त्याकरितां निराळ्या कृतीनें कागद तयार करावे लागतात. ९० भाग अमोनियम क्लोराइड, १०० भाग सोडियम सायट्रेट, १० भाग जिलेटिन आणि ५००० भाग शुद्ध पाणी इतके जिन्नस घ्यावेत. प्रथम पाणी गरम करून त्यांत जिलेटिन घालावा; तो उत्तम प्रकारें विरघळल्यावर त्यांत दुसरे पदार्थ घालावेत. नंतर हें मिश्रण गाळून घ्यावें. ह्या मिश्रणावर तीन मिनिटेंपर्यंत कागद तरंगत ठेवावा; नंतर तो काढून घेऊन वाळवावा. ह्या कागद चेतनायुक्त करण्याकरितां पुढील कृति करावी लागते.

सचेतनीकरणः—सिल्व्हर नायट्रेट हें शेंकडा १० या प्रमाणांत पाण्यांत विद्राव्य करून त्यावर वरील कागद सुमारें ३ मिनिटेंपर्यंत तरंगत ठेवावा व नंतर तो काढून घेऊन वाळवावा. ह्या कागदावर निगेटिव्ह कांचेच्या साहाय्यानें चित्र छापून काढतात. हें चित्र आपणांस जितकें दाट पाहिजे असेल त्यापेक्षां जास्त दाट ( काळसर ) करून घेतात.

छापील कागदाचें स्थिरीकरणः—वरीलप्रमाणें छापून चित्र तयार केल्यानंतर त्यावर पुढें दिल्याप्रमाणें कृती कराव्या लागतात या कृती केल्याशिवाय चित्र स्थिर होत नाहीं. पुढें तीन मिश्रणें दिलीं आहेत त्यांपैकीं कोणतेंहि एक वापरलें असतां चालेल.

पद्धत पहिलीः—गोल्ड क्लोराइड १ भाग; सोडियम कार्बोनेट १० भाग; पाणी ५००० भाग; हीं द्रव्यें एकत्र करून मिश्रण करावें व त्याचा उपयोग करावा.

पद्धत दुसरीः—(अ) बोऱ्याक्स (टांकणखार) १०० भाग; पाणी ४००० भाग; (आ) गोल्ड कोराइड १ भाग; पाणी ४०० भाग. हीं अ आणि आ मिश्रणें अगदीं आयत्या वेळीं समप्रमाणांत एकत्र करून लागतील उपयोगांत आणावींत. (अ) आणि (आ) हीं एकत्र होऊन फार वेळ राहिल्यास निरुपयोगी होतात.

पद्धत तिसरीः—गोल्ड क्लोराइड २ भाग; क्लोराइड ऑफ लाइम २ भाग; खडू ( चॉक ) ४० भाग व पाणी ८०००० भाग; हीं एकत्र करितात परंतु पाणी गरम करून घेतात. थंड झाल्यावर मिश्रण उपयोगांत आणावें. पहिल्या दोन पद्धतींचा उपयोग करण्यापूर्वी छापलेलें चित्र पाण्यानें पूर्णपणें धुवून काढावें. तिसऱ्या पद्धतीचा उपयोग करावयाचा असल्यास चित्र पाण्यानें अर्धवट धुवून घ्यावें. या तिन्ही पद्धतींतील मिश्रणांत चित्र घातल्यानंतर त्याला चांगला जांभळा आबाशाई रंग येईपर्यंत राहूं द्यावें; तें नंतर काढून घेऊन पुढें दिलेल्या मिश्रणांत सुमारें १० मिनिटें घालून ठेवावें. शेंकडा २० भाग या प्रमाणांत हायपोसल्फाइट ऑफ सोडा घेऊन १०० भाग पाण्यांत घालून त्यांत ॲमोनियाचे कांहीं थेंब टाकावे म्हणजे मिश्रण तयार होतें. यांत सुमारें १० मिनिटेंपर्यंत चित्र राहूं द्यावें. नंतर वहात्या पाण्यांत कित्येक तास

पर्यंत चित्र धुवून नंतर तुरटीच्या द्रवांत कांहीं वेळ राहूं देऊन नंतर फिरून एकवार धुवून चित्र कांचेवर लावून वाळवावें.

रंगीत फोटोः—वरील रीतीनें फोटो घेतले असतां त्यांत रंग येत नाहींत. पुष्कळ वेळां हातानें फोटो रंगवितात, परंतु या रीतीनें चित्र जसें पाहिजे तसें वठत नाहीं, शिवाय रंगविण्यास बरेंच कौशल्य लागतें. हा सर्व त्रास चुकावा व नैसर्गिक रीतीनें सर्व रंग निघावेत म्हणून कित्येकांनीं बरेच प्रयत्न केले आहेत; त्यांपैकीं अगदीं अलीकडचा सुप्रसिद्ध प्रयत्न म्हटला म्हणजे १९०७ सालीं ए. लुमिअर एट सेस फिल्स याचा होय. याची पद्धत पुष्कळ सोपी असून या पद्धतीनें अगदीं नैसर्गिक रंगांप्रमाणें रंग येतात. ही पद्धत आपल्या देशांत प्रचारांत अद्याप आली नाहीं.

चित्रलेखक यंत्रः—कॅमेऱ्याविषयीं साद्यंत विवेचन येथें करतां येणें शक्य नाहीं. कॅमेऱ्याचे निरनिराळे भाग प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज त्या भागांविषयीं केलेलें विवेचन समजणें शक्य नाहीं.जरी अशी वस्तुस्थिति आहे तरी पण कॅमेऱ्याविषयीं थोडेसें विवेचन करून त्यांतील तत्त्व सांगतां येणें बरेंच सुलभ आहे तें असेः—

कॅमेऱ्यामध्यें एक पेटी असते. तिला तोंडाशीं लेन्ससमुच्चय बसविलेला असतो. या लेन्सांतून येणारा प्रकाश केंद्रीभूत होऊन पाठीमागें एका पडद्यावर पडतो. हा पडदा ग्राउंडग्लास नांवाच्या अर्धपारदर्शक कांचेचा असतो. या ग्राउन्डग्लासावर पडणारी प्रतिमा नीट यावी एतदर्थ हा पडदा पुढेंमागें हलविण्याची सोय एका मलसूत्रानें केलेली असते. या कॅमेऱ्यांत पडद्यावर ज्या प्रतिमा पडतात त्या उलट्या असतात; म्हणजे खालीं डोकें आणि वर पाय अशा असतात; अर्थात प्रकाशलेखनाची कला साध्य करून घेतांना नवशिक्यास असलीं उलटीं चित्रें (पडद्यावरील) पाहाण्याची संवय करून घ्यावी लागते. ग्राउंडग्लासवरील प्रतिमा केंद्रांत आणून नंतर त्याजागीं फोटो घेण्याची कोरडी कांच बसवितात. कांच बसविण्यापूर्वी लेन्साचें तोंड काळ्या मखमलीनें आंतून मढविलेल्या टोपीनें बंद करतात. यानंतर प्रकाशाच्या मानानें आणि कोरड्या कांचेच्या प्रकाशग्राहकशक्तीप्रमाणें लेन्सावरील टोपी काढून कांहीं वेळपर्यंत लेन्सांतून प्रकाश जाऊं देतात; त्यायोगानें कोरड्या कांचेवर इष्ट पदार्थाची प्रतिमा पडते; व त्यायोगानें कांचेवरील रुप्याच्या क्षारावर रासायनिक फेरफार होतात. पुढें या कांचेवर डेव्हलपर मिश्रण आणि दुसरीं मिश्रणें लावून ती प्रतिमा व्यक्त करून स्थिर करितात. नंतर या कांचेवरून कागदावर चित्र छापण्याची क्रिया करतात व पुढें त्या कागदावर रासायनिक क्रिया करून कागदावरील चित्र स्थिर करतात.

खस्थ प्रकाशलेखन अर्थात तारकादिकांचे फोटोग्राफ.—आकाशस्थ ज्योतींचे फोटो घेण्याला कोणकोणत्या गोष्टींची जरूरी आहे; व या कामांत कोणत्या अडचणी येतात याचा प्रथमतः विचार केला पाहिजे.

प्रकाशः—ताऱ्यांचा प्रकाश अत्यंत मंद असतो. जर व्यवहारांत आपणाला मनुष्यादिकांचा फोटो घेतांना प्रकाशाची उणीव भासली तर कृत्रिम प्रकाश उत्पन्न करून ही उणीव दूर करून फोटो घेतां येतो. परंतु ताऱ्यांच्या बाबतींत ही गोष्ट लागू पडत नाहीं. कारण कितीहि जोरदार सर्च लाइटच्या योगानें ताऱ्यावर प्रकाश पाडण्याचा यत्न केला तरी ताऱ्यांचें अंतर इतकें दूर आहे कीं त्या प्रकाशाचा यत्किंचितहि परिणाम घडत नाहीं. जिलेटीनच्या कोरड्या कांचा निघाल्यापासून मात्र ही अडचण बऱ्याच अंशानें दूर झाली आहे. ज्यावेळेस कोलोडिअनच्या ओल्या कांचा वापरण्याची पद्धत होती त्यावेळेस बराच वेळ प्रकाशदर्शन करून फोटो घेतां येत नसे. कारण कीं, कांचा वाळल्यानंतर त्यावर रासायनिक परिणाम घडत नसे. परंतु कोरड्या कांचा निघाल्यापासून ही अडचण बरीच दूर झाली आहे. आतां यांत्रिक रीतीनें फिरणाऱ्या दुर्बिणीसारख्या कॅमेऱ्यांत कांच ठेवून तिला तासाचे तास प्रकाशदर्शन करविणें शक्य आहे, इतकेंच काय परंतु कित्येक दिवस किंवा महिने, किंबहुना वर्षे देखील प्रकाशदर्शन करवितां येतें. दिवस सुरू होण्यापूर्वी कॅमेऱ्याच्या तोंडावर झांकण बसवून फिरून रात्र सुरू झाल्यावर योग्य क्षेत्र करून यंत्र सुरू करावें व नंतर झांकण उघडावें म्हणजे झालें.

महत्करण ( मॅग्निफिकेशन ):—साध्या कॅमेऱ्यांत आपणांस मोठा फोटो घ्यावयाचा असल्यास कॅमेरा बसलेल्या इसमाजवळ नेऊन लावल्यास मोठा फोटो घेतां येतो व दूर अंतरावरून कॅमेरा लावल्यास लहान फोटो निघतो. परंतु तारे कोट्यवधि मैल अंतरावर असल्याकारणानें दहा वीस फूट कॅमेरा हलविल्याच्या योगानें ताऱ्याचें मोठें चित्र काढतां येणें शक्य नाहीं. याकरितां मोठा फोटो घ्यावयाचा असल्यास लेन्सांत फरक करवून ही गोष्ट घडवून आणतां येते. परंतु या रीतीनें फोटो मोठा करण्याच्या मार्गांत कांहीं नैसर्गिक अडचणी आहेत. कॅमेरा आणि तारका यांच्या दरम्यान हवेचा एक मोठा हलता थर आहे. या थराच्या योगानें घेतलेल्या चित्रांत फारच चलबिचल होते; व ज्या ज्या प्रमाणांत महत्करण करावें त्या त्या प्रमाणांत ही चलबिचल चित्रामध्यें जास्त प्रमाणावर दिसून येते; यामुळें ठराविक मर्यादेबाहेर महत्करण करून चित्र घेतां येणें शक्य नाहीं.

स्तब्धताः—साध्या फोटोग्राफीमध्यें फोटोग्राफरला आपला कॅमेरा स्थिर करून फोटो काढून घेणाऱ्या इसमाला स्तब्ध बसवावयास लावलें म्हणजे काम भागतें. परंतु खस्थ-ज्योती सतत एका ठराविक गतीनें फिरत असतात. तेव्हां कॅमेरा त्या ज्योतीकडे तोंड करून सतत फिरत

राहील अशी यंत्रयोजना करावी लागते. या कामीं घड्याळाच्या धर्तीवर यांत्रिक योजना करून हे कॅमेरे ठराविक गतीनें विशिष्ट ताऱ्याकडे तोंड करून सतत फिरत राहतील अशी योजना करता येते.

प्रकाशलेख किंवा प्रकाशचित्रें.—आकाशांत अत्यंत दूर अंतरावर तारे आहेत; तेव्हां त्यांचे फोटो एखाद्या बिंदूप्रमाणें आले पाहिजेत; परंतु घेतलेले फोटो पाहिले असतां ते केवळ बिंदूप्रमाणेंच असत नाहींत; फोटोंत एक बारीकसा ठिपका आणि त्याच्या भोंवतीं बारीक बारीक वलयें असलेलीं दिसतात. हीं वलयें येण्याचें कारण असें आहे कीं, ताऱ्याचा प्रकाश हा निरनिराळ्या रंगाच्या प्रकाशापासून झालेला असतो; व हे रंग निरानिराळ्या प्रमाणात लेन्सातून वक्रीभवन पावतात. त्यामुळें विशिष्ट रंगाचें केंद्रीभवन होतें; परंतु बाकीच्या रंगाच्या किरणांचें त्याच अंतरावर केंद्रीभवन होत नाहीं; त्यामुळें हीं वलयें येतात. परंतु विशिष्ट रंगाची कांच कॅमेऱ्याच्या तोंडावर बसवून त्या योगानें विशिष्ट रंगाचेच तेवढे किरण घेऊन फोटो काढल्यास हीं वलयें फारच कमी प्रमाणांत येतात.

ताऱ्यांचे नकाशेः—वरील प्रकारानें फोटो घेऊन ताऱ्यांचे नकाशे प्रसिद्ध करतां येतात. १८८७ सालीं जगावरील निरनिराळ्या अठरा वेधशाळांनीं सहकार्य करून एक उत्तम नकाशा तयार केला आहे. फोटोग्राफीच्या योगानें पुष्कळदां दोन ताऱ्यांतील कोन मोजतां येतो

प्रकाशपृथक्करणयुक्त फोटोः—वर सांगितलेल्या कॅमेऱ्याच्या तोंडावर त्रिपार्श्व लोलकाचा तुकडा बसविला तर येणाऱ्या प्रकाशाचें पृथक्करण होतें. तेव्हां या पृथग्भूत प्रकाशापैकीं हव्या त्या रंगाचा फोटो घेणें शक्य आहे. या प्रकारच्या फोटोंपासून सूर्याच्या निरनिराळ्या भागाची होणारी हालचाल ( रासायनिक उलथापालथ ) पाहणें अगदीं सुलभ आहे.

आकाशगंगेतील तारकांचे फोटो घेणें:—आकाशांतील तारकादिकांचे फोटो घेण्याच्या कामांत प्रथमतः आकाशगंगेच्या फोटोंत चांगलें यश आलें. तीन फूट व्यासाच्या अंतरगोल आरशाच्या साहाय्यानें डॉक्टर ए. ए. कामन ( १८४१-१९०३ ) यानें मृगशीर्ष नांवाच्या तारकापुंजांतील आकाशगंगेचा फोटो घेतला. यानंतर प्रो. जे. इ. कीलर ( १८५७--१९०० ) यानें अशा प्रकारचे पुष्कळच फोटो घेतले. या फोटोंवरून आकाशगंगा नागमोडी आकाराची असल्याचें दिसून आलें आहे.

चंद्र व तारकादिकाचे फोटोः—चंद्राचे फोटो घेऊन त्यावरून त्याच्या ज्वालामुखींच्या तोंडांची लांबी-रुंदी मोजतां आली आहे. धूमकेतूच्या फोटोच्या योगानें त्याच्या शेपटीविषयीं बरीच माहिती उपलब्ध झाली. त्यावरून त्याच्या पुच्छांत कसे बदल होत असतील यांचें अनुमान काढतां येतें.

सूर्याचे फोटोः—सूर्याचा प्रकाश इतका तीव्र आहे कीं, त्याचें योग्य इतक्या कमी प्रमाणांत दर्शन ( कॅमेऱ्यातील पेटीस ) करवून फोटो काढवून घेणे अशक्य होतें; परंतु शास्त्रज्ञांनीं स्वस्थ फोटो घेण्याच्या युक्तींत पुष्कळशी प्रगती केल्यावर असे फोटो घेतां येऊं लागले; या फोटोंत सूर्यावरील डाग उत्तम प्रकारें दिसूं लागले आहेत; परंतु कडेच्या भागात वरीचशी अंधुकता येत असे. त्यामुळें असें वाटूं लागलें होतें कीं, सूर्यावरील वातावरणाच्या योगानें प्रकाशाचें अपशोषण होत असावें. परंतु अलीकडील १५।२० वर्षांत या विषयांत बरीच प्रगति झाली आहे. विशेषतः पृथक्करणयुक्त फोटोच्या योगानें निरनिराळ्या मूलद्रव्यांच्या प्रकाशकिरणाचे फोटो घेण्यापासून असें दिसून आलें आहे कीं, अशा प्रकारचे डाग नुसत्या कडेच्याच भागावर नसून सूर्यावर सर्वत्र पसरलेले आहेत.

**प्रकाशव्यतिकरण व प्रकाशविकृति**—प्रकाशलहरी एका दिशेनें जात असतां विरुद्ध दिशेनें जर तशाच प्रकाशलहरी येत असतील तर त्या दोहोंचा संयोग होऊन त्या ठिकाणीं प्रकाशाच्या ऐवजीं काळोख दिसतो. या चमत्कारास प्रकाशव्यतिकरण असें म्हणतात. पाइसन यानें गणिताच्या साहाय्यानें असें सिद्ध केलें कीं, प्रकाशकिरणांच्या मार्गांत एखादी लहानशी चकती ठेवली तर त्या चकतीच्या सावलीच्या मध्यभागीं एक प्रकाशबिंदु दिसेल व प्रयोगांतीं याप्रमाणें दिसूनहि आलें आहे. यानंतर फ्रेस्नेलनें प्रकाशलहरींचीं तिर्यक् आंदोलनें होतात हें दाखवून दिले.

फ्रेस्नेल यानें दोन आरसे जवळ जवळ १८०° कोन करतील असे ठेवले. त्या दोन्ही आरशांमध्यें एका प्रकाशबिंदूचीं दोन प्रतिबिंबें दिसतील. ह्या दोन्ही प्रतिबिंबांपासून निघणाऱ्या प्रकाशलहरी एकमेकांस वृद्धिंगत करीत असतील तर ह्या लहरी ज्या ठिकाणीं एकत्रित होत असतील त्या ठिकाणीं तेजस्वी बिंदु दिसेल व जर त्या लहरी एकमेकांचे परिणाम नष्ट करीत असतील तर काळा बिंदु दिसेल. हा काळा बिंदु व्यतिकरणाच्या योगानें दिसतो. फ्रेस्नेल यानें या बाबतींत दुसराहि एक प्रयोग केला. ह्या वेळीं त्यानें एकाच्या पायास दुसऱ्याचा पाया लावून बसविलेलीं दोन त्रिकोणी भिंगे घेऊन त्यावर एक तेजस्वी प्रकाशबिंदूपासून किरण पाडलें, व मागील प्रयोगाप्रमाणें याहि वेळीं,या भिंगापासून दूर ठेवलेल्या अशा पडद्यावर ज्या ठिकाणीं ह्या भिंगामधून बाहेर पडणाऱ्या प्रकाशलहरी वृद्धिंगत होतात त्या ठिकाणीं एक तेजस्वी पट्टा व ज्या ठिकाणीं त्यांचे परिणाम नष्ट होतात त्या ठिकाणीं काळा पट्टा दिसतो.

प्र का श वि कृ ति.—एका कागदावर एकांत एक याप्रमाणें वर्तुळें काढतात. या वर्तुळांचे व्यास आणि परिघांची जाडी यांचें प्रमाण गणितशास्त्राधारें ठरविलेलें असतें. या कागदाचा फोटो घेतात. नंतर फोटोच्या

कांचेच्या प्लेटीवर एका बाजूनें प्रकाश पाडल्यास कांचेपासून कांहीं अंतरावर दुसऱ्या बाजूस तो प्रकाश केन्द्रीभूत झालेला दिसेल. या प्रकारच्या कांचेस कटिबंधाची तवकडी असें नांव आहे. या तवकडीच्या योगानें लेन्सप्रमाणेंच प्रकाशाचें केन्द्रीभवन करतां येतें. या चमत्काराचें कारण प्रकाशाची विकृति हें आहे.

न्यूटनचीं वलयें:—मोठी त्रिज्या असलेलें लेन्स घेऊन त्याला एका सपाट कांचेच्या पृष्ठभावर दाबून धरलें तर त्यायोगानें प्रकाशाचीं वर्तुलाकृति वलयें दिसूं लागतात. हीं वलयें पारदर्शक प्रकाश किंवा परावृत प्रकाश यांपैकीं कोणत्याहि प्रकाशाच्या योगानें दिसूं शकतात. या प्रकारचीं वलयें पाहून त्याविषयीं न्यूटननें प्रथमतः पद्धतशीर विचार केला म्हणून यांस न्यूटनचीं वलयें असें नांव आहे. प्रकाशाचें व्यतिकरण हेंहि वलयें दिसण्यास कारणीभूत आहे.

साबणाचे फुगे:—साबणाचें पाणी घेऊन त्याचे फुगे तयार केल्यास त्यांवर नाना तऱ्हेचे रंग दिसतात. हे जे फुग्यावर रंग दिसतात, त्याचें कारण प्रकाशाच्या किरणांचें साबणाच्या थरावर व्यतिकरण होऊन निरनिराळे रंग दिसतात. एखाद्या विहिरींत थोडेसे तेलाचे थेंब टाकल्यास तें तेल पाण्याच्या पृष्ठभागावर पसरतें व त्याचा त्या पृष्ठभागावर अत्यंत पातळ असा थर होतो. या थरापासून प्रकाशाचें व्यतिकरण होतें व त्यामुळें आपणास चित्रविचित्र रंग दिसूं लागतात. जी. लिपमन यानें प्रकाशाच्या व्यतिकरणाच्या गुणधर्माचा उपयोग करून रंगीत फोटो तयार करण्याची युक्ति शोधून काढली.

मिचेलसनचें व्यतिकरणयंत्र:—ए. ए. मिचेलसनें प्रकाशाचें व्यतिकरण करून त्यायोगानें प्रकाशलहरींची लांबी मोजली. त्या यंत्राचें पुढीलप्रमाणें वर्णन आहे—या व्यतिकरणयंत्रात दोन सारख्या जाडीच्या कांचा असून त्या समांतर ठेवलेल्या असतात. ह्या दोन कांचांपैकीं पहिलींचा दुसऱ्या कांचेकडे असणारा पृष्ठभाग सूक्ष्म रौप्य थर बसवून अर्धपारदर्शक केलेला असतो. यांत आणखी दोन आरसे असून ते अशा रीतीनें बसवितात कीं पहिल्या कांचेतून निघणारे किरण एकावर व दुसऱ्यामधून निघणारे किरण दुसऱ्यावर पडतील. आतां पहिल्या जाड कांचेवर प्रकाशकिरण पाडला तर त्याचा कांहीं भाग परावृत्त होतो व कांहीं भाग कांचेमधून जातो कांचेमधून गेलेला भाग दुसऱ्या कांचेमधून जाऊन तिच्या जवळ असलेल्या आरशांतून परावृत्त होऊन गेलेल्या मार्गानेंच पुन्हां परत येऊन पहिल्या कांचेवर परावृत्त होतो व पहिल्यानें परावृत्त झालेला किरणांचा भाग पहिल्या कांचेजवळील आरशांत परावर्तन पावून याच ठिकाणीं येत असल्यामुळें त्यास मिळतो.

आतां हे किरण एकाच उगमापासून निघालेले आहेत; अर्थात जर हे प्रकाशकिरण उर्फ प्रकाशलहरी विरुद्ध कलेंत आल्या तर व्यतिकरण होईल व त्यामुळें त्यांच्या संयोगस्थलीं अंधेर दिसूं लागेल. आतां दुसऱ्या कांचेजवळील आरसा एका सूक्ष्म (अंतरमापक) मळसूत्रानें प्रकाशलहरींच्या अर्ध्या अंतराइतका दूर केला तर फिरून एकवार प्रकाशाचें व्यतिकरण होऊन पुन्हां संयोगस्थलीं अंधेर दिसूं लागेल; परंतु ह्या अंतराच्या दरम्यान आरसा असतांना त्याच ठिकाणीं केव्हांहि अंधेर दिसणार नाहीं. अर्थात एका ठराविक अंतरावर हा आरसा हलविला असतां किती वेळ अंधेर व प्रकाश दिसेल हें मोजून काढून त्यावरून एक मीटर इतक्या अंतरांत ठराविक प्रकाशकिरणाच्या किती लहरी होतील हें निश्चितपणें सांगतां येतें.

क्याडमियम धातूचा वायु तापविला असतां तीन प्रकारचे किरण दिसतात; त्यांचीं एका मीटरमध्यें किती प्रकंपनें होतात हें मिचेलसन यानें प्रयोगानें मोजून काढलें आहे.

एकमिटर = १५५३१६३.६ (आर) लहरी
" = १९६६२४९.७ (जी) "
" = २०८३३७२.१ (बी) "

वर दिल्याप्रमाणें क्याडमियमच्या तप्त वायूच्या आर, जी आणि बी प्रकाशलहरींचीं प्रकंपनें होत असतात. वर दिलेल्या प्रकाशलहरींच्या साह्यानें मीटरची इयत्ता आपणांस अत्यंत सूक्ष्म प्रमाणांत ठरवितां येते. म्हणजे कांहीं कारणानें जगांतील सर्व मीटरचीं मापें एकदम नष्ट झालीं तर या प्रकाशलहरींच्या साह्यानें अत्यंत सूक्ष्म प्रमाणांत फिरून एकवार मीटरच्या मापाची नक्कल तयार करतां येण्यासारखी आहे. कारण वरील आंकड्यांत फक्त दशमस्थानांत कायती चूक असण्याचा संभव आहे, इतके ते आंकडे विश्वसनीय आहेत. यामुळें कित्येक शास्त्रज्ञ लोक प्रकाशलहरींच्या ठराविक अंतरासच "मूलप्रमाणभूत अंतर" म्हणून धरण्यास तयार आहेत.

**प्रकाशशोषण** (अॅब्सॉर्प्शन ऑफ लाइट)—प्रकाश देणारा पदार्थ एकाद्या मोकळ्या जागेंत ठेवल्यास प्रकाशशक्तींत कांहींहि नुकसान होत नाहीं, आपणांस जो प्रकाश कमी दिसतो त्याचें कारण त्या पदार्थापासून मिळणारे किरण जास्त जास्त पृष्ठभागावर फांकले जातात. पण एखाद्या द्रव्यांतून जर प्रकाश जात असेल तर प्रकाशशक्ति त्या द्रव्यानें शोषली गेल्याकारणानें थोडी कमी होते, व शोषल्या गेलेल्या शक्तीचें रूपांतर उष्णतेंत किंवा दुसऱ्या एखाद्या शक्तींत होतें. वातावरणांत सूर्याचे किरण शोषले जातात व त्यांना जितकें जास्त अंतर जावयाचें असतें तितकें ते जास्त शोषले जातात व म्हणूनच मावळता सूर्य कमी कमी तेजस्वी दिसतो.

हें शोषण पदार्थाच्या पृष्ठभागावर अवलंबून असतें. काळें प्लातिन हें चूर्ण स्थितींत असतां तें, त्यावर पडणारे बहुतेक किरण शोषतें पण चकाकीत प्लातिनवर पडणारा प्रकाश बहुतेक परावर्तित केला जातो.

शोषणाचा विचार दोन प्रकारें करतां येईल. जेव्हां पदार्थ इतका अपार-दर्शक असतो कीं, त्यामधून किरण जाऊं शकत नाहींत किंवा जेव्हा पदार्थ कांहीं किरण जाऊं देतो व कांहीं-चें परावर्तन करतो, ह्यापैकीं आपणांस गेलेल्या प्रकाशाचा परावर्तित प्रकाशाशीं असणारा संबंध, शोषणाच्या योगानें प्रकाश-शक्तींत येणारी क्षीणता आणि त्यांची आंत जाण्याची मर्यादा यांचेहि संबंध पाहिले पाहिजेत. एखाद्या पदार्थावर पडणाऱ्या आपातकिरणांच्या शोषल्या गेलेल्या किरणांशीं असणाऱ्या प्रमाणास 'शोषणशक्ति' असें म्हणतात. सर्व आपातकिरण शोषणाऱ्या पदार्थास 'पूर्ण काळा पदार्थ' असें म्हणतात. पूर्ण काळ्या पदार्थाची शोषणशक्ति एक असते. पण इतके काळे पदार्थ दृष्टोत्पत्तीस येत नाहींत तरी दिव्यावरील काजळी व काळे प्लातिन यांची शोषणशक्ति जवळ जवळ एक आहे. बऱ्याच पदार्थांत विशिष्ट शोषण-शक्ति दिसून येते म्हणजे ते कांहीं एका प्रकारचे व विशिष्ट लहर लांबीचे किरण इतर प्रकाशापेक्षां जास्त शोषूं शकतात. सर्व पदार्थ तापविले असतां ते ज्या प्रकारचे किरण शोषतात तेच बाहेर टाकतात. काळा दगडी कोळसा खूप तापविला असतां लखलखीत प्रकाश देऊं शकतो. जे पदार्थ चांगले परावर्तित प्रकाश देणारे आहेत ते तापविले असतां इतका लखलखीत प्रकाश देऊं शकत नाहींत.

एखाद्या पदार्थामधून प्रकाश गेला असतां प्रकाशशक्ती-ची क्षीणता आपणास काढतां येईल. आपण अशी कल्पना करूं कीं 'क्ष०' ही प्रकाशकिरणाची त्याच्या पतनाच्या वेळची शक्ति आहे. तें एक सेंटिमीटर खोल गेल्यास त्याची शक्ति कमी होईल व ती क्ष १ आहे असें समजूं. आणखी १ सें. मि. खोल गेल्यास ती क्ष २ होईल. आपण असेंहि मानूं कीं प्रथम पतनाच्या वेळच्या शक्तीचा ज्या अंशानें कांहीं भाग शोषला जातो त्याच अंशानें एक सेंटि मीटर किरण खोल गेल्यावर असणाऱ्या शक्तीचा भाग शोषला जातो म्हणजे अ×क्ष० इतकी शक्ति प्रथमतः शोषली गेली तर अ × क्ष१ इतकी शक्ति दुसऱ्या वेळीं व अ × क्ष २ तिसऱ्या वेळीं अशी शोषली जाईल. म्हणून ते

$$क्ष\ १ = क्ष० - अक्ष० = क्ष० (१-अ)$$

$$क्ष\ २ = क्ष\ १\ (१-अ) = क्ष० (१-अ)^{२}$$

$$क्ष\ ३ = क्ष\ २\ (१-अ) = क्ष० (१-अ)^{३}$$

म्हणजे क्ष ही प्रकाशशक्ति प्रकाश 'ज' जाडींतून गेल्यावर असेल तर—

$$क्ष = क्ष० (१-अ)^{ज}$$

'अ' या संख्येस म्हणजे १ सेंटि मिटर खोल जाणाऱ्या आकाराचें कोणत्याहि पदार्थातून शोषलें जाण्याचें प्रमाण यास त्या पदार्थाच्या शोषणशक्तीचा गुणक असें म्हणतात. पण हा गुणक जर प्रकाश १ सेंटि मीटर खोल जाण्याच्या आंतच शोषला जात असेल तर उपयोगी पडत नाहीं म्हणून प्रकाशाच्या शोषण-गुणकाची व्याख्या खालीलप्रमाणें करतात— हा गुणक ही एक 'क' संख्या असून ती अशा प्रकारची आहे कीं, मूळ प्रकाशाच्या $\frac{क}{न}$ इतका प्रकाश एक सें. मी. च्या $\frac{१}{न}$ इतक्या भागांतून शोषला जातो. म्हणून $क्ष = क्ष० इ^{-कत}$. (इ = नेपीरिअम लॉगेरिदमचें मूळ) 'क' हा ज्या पदार्थाचा प्रकाश लौकर शोषण करीत नाहीं अशा पदार्थामध्यें 'अ' बरोबर असून स्थिर (कान्स्टंट) असतो.

**प्रतापगड, संस्थान.**—दक्षिण राजपुतान्यांतील संस्थान. क्षेत्रफळ ८८६ चौरस मैल. याच्या उत्तरेस व वायव्येस उदेपूर, पश्चिमेस व नैर्ऋत्येस बांसवाडा, दक्षिणेस रतलाम, व पूर्वेस जौरा, मांडवसर व निमच हे शिंद्याचे जिल्हे आणि इंदूरपैकीं रामपूर-भानपूर जिल्ह्याचा तुटक भाग हवा साधारणपणें बरी असून उष्णमान बेताचें असतें. मुख्य ठिकाणीं वार्षिक पाऊस सरासरी ३४ इंच होतो.

पुराणवस्तुसंशोधकांच्या दृष्टीनें महत्त्वाचे अवशेष पुढील आहेत—राजधानीच्या नैर्ऋत्येस १० मैलांवरील जानागड येथील जुना किल्ला व मशीद. सालिमगडच्या पूर्वेस २ मैलांवर शेवना, ही पूर्वी एका मोठ्या संस्थानची राजधानी असावी अशी दंतकथा आहे. येथें एक किल्ला व कित्येक जुनीं देवालयें आहेत व सोहागपूरजवळ वीरपूर येथें जैनांचें एक २००० वर्षांचें जुनें देवालय आहे. गहूं, ऊंस, मका, ज्वारी व हरभरा हीं मुख्य पिकें आहेत. अफूची लागवडहि बरीच होते. संस्थानांत जाडें-भरडें कापड, कांबळी, व कांचेवर सोनेरी मुलामा देण्याचें काम होतें; परंतु महत्त्वाचे कारखाने नाहींत.

इतिहासः—जावडा हें १६ व्या शतकांत मेवाडच्या मोकल घराण्याच्या एका वंशजानें वसविलें; प्रतापगड राजधानी प्रतापसिंह नांवाच्या राण्यानें १६९८ सालीं वसविली. येथील राजास महारावत म्हणतात. विद्यमान महारावताचे पूर्वज दिल्लीपतीच्या पदरीं नोकरीस राहिले होते त्यांच्यामध्यें सालीमसिंग म्हणून एक शूर पुरुष होऊन गेला. त्याच्यावर औरंगझेबाचा पणतू महंमदशहा याची फार मर्जी होती. तो महंमदशहास १५ हजार रुपये खंडणी देत असे.

मोगल बादशाही लयास गेली तेव्हां सालीमसिंगाचा पुत्र सावंतसिंग उर्फ जसवंतसिंग (१७७५-१८४४) हा होळकराचा मांडलिक झाला आणि ७२७०० रुपये खंडणी होळकरास देऊं लागला. हे रुपये सालीमशाही होते, व ते प्रतापगडासच पाडिले जात व आसपासच्या प्रांतांत चालत. स. १८०४ मध्यें इंग्रजांचा व संस्थानचा संबंध येऊन तह झाला. त्यांत इंग्रजांनीं संस्थानचें संरक्षण करावें व होळकरास जी खंडणी संस्थान देई ती आपण घ्यावी असें ठरलें. परंतु कार्नवालीसचे राजकीय विचार निराळे असल्यामुळे हा तह रद्द होऊन प्रतापगड होळकरांच्या ताब्यांत गेलें. सन १८१८ मध्यें इंग्रज सरकारची राज्यपद्धति पुन्हां पालटून संस्थान कायमचें त्यांच्या ताब्यांत आलें. नंतर राजपुतान्यांतील इतर राजांबरोबर या रावताचाहि तह झाला. हल्लीं संस्थानकडून खुद्द

इंग्रज सरकारास ७३७०० रुपये व होळकरास ३६३५० रुपये वार्षिक खंडणी पोहोंचते. होळकर व इंग्रज यांमधील मंदोसर येथील तहान्वयें ही होळकरांची खंडणी इंग्रजसरकारामार्फत त्यांनां मिळते.

सन १८२३ व १८२६ यांच्या दरम्यान सावंतसिंग व त्याचा पुत्र कुवर दीपसिंग यांमध्यें वैमनस्य उत्पन्न झाल्यामुळें प्रतापगडांत बराच गोंधळ माजला व लोक अगदीं त्रासून गेले. या पूर्वीच २० वर्षे सावंतसिंगानें राज्याचा सर्व कारभार मुलाकडे सोंपविला होता; तो चालवीत असतां त्यानें आपल्या विरुद्ध असलेल्या कांहीं लोकांस ठार मारविलें. तेव्हां इंग्रज सरकारनें त्याला कामावरून दूर करून हद्दपार करावें असा आग्रह धरला. त्याप्रमाणें त्याला पदभ्रष्ट करून देवराबळ येथें ठेविला. परंतु दीपसिंग थोडक्याच दिवसांत देवराबळाहून निसटून प्रतापगडी दाखल झाला. व पुन्हां खटपटी करूं लागला. शेवटीं त्याचा बंदोबस्त करण्याकरितां इंग्रजी फौज बोलवावी लागली. त्या फौजेनें त्याला करनोर किल्ल्यांत नेऊन कोंडलें. आपल्या वृद्धापकाळामुळें त्याला बंधमुक्त करावें असें सावंतसिंगाच्या मनात होतें व त्याप्रमाणें त्यानें इंग्रज सरकारास खलिताहि पाठविला होता, परंतु त्याचा विचार होऊन उत्तर मिळण्यापूर्वीच सावंतसिंग वारला ( मे १८२६ ). सावंतसिंग अगदीं वृद्ध झाल्यामुळें त्याच्या हातून राज्याचें काम रेटेनासें झालें. तशांत लुटारू लोकांनीं संस्थानास फार उपद्रव दिला. सावंतसिंगाचा एकुलता एक नातु दलपतसिंग हा डोंगरपूर येथें सन १८२५ मध्यें दत्तक दिलेला होता. परंतु त्याच्याच वंशजाकडे प्रतापगडचें राज्य चालविण्याचें ठरलें गेलें. ह्या संस्थानची बहुतेक प्रजा भिल्ल वगैरे रानटी जातीची आहे. सांप्रतचा राजा हिज हायनेस महारावत सर रघुनाथसिंग बहादुर, के. सी. आय. ई. हा असून त्याचा जन्म स. १८५९ त होऊन राज्यारोहण सन १८९० त झालें. त्याच्या हाताखालीं एक दिवाण असून न्यायमनसुब्यासाठीं एक ११ सभासदांचें मंडळ ( राजसभा नांवाचें) आहे. संस्थानचें उत्पन्न सहा लाख रुपये व खर्च ५ लाख रुपये. लोकसं. (१९२१) ६७११४. हें संस्थान दक्षिण राजपुताना एजन्सींत आहे. [ गोडबोले--एतद्देशीय संस्थानें; सेन्सस रिपोर्ट ( १९२१ ); टाईम्स ऑफ इंडिया-इंडियन इयर बुक १९२५. ]

गां व.—संस्थानची राजधानी व जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें राजपुताना-माळवा रेल्वेच्या मांडवसर स्टेशनपासून पश्चिमेस २० मैलांवर आहे. लो. सं. ( १९०१ ) ९८१९. हें गांव स. १६९८ त महारावत प्रतापसिंग यानें वसविलें. भोंवतीं तट असून त्याला ८ दरवाजे आहेत. नैर्ऋत्येस एक लहानसा किल्ला आहे, त्यांत संस्थानिक कधीं कधीं सहकुटुंब राहतो. येथें हिरव्या कांचेवर खोदून सोनेरी मुलाम्यानें रंगविलेले शिकारींचे व पौराणिक देखावे फार चांगले तयार होतात; व त्याकरितां प्रतापगड प्रसिद्ध होता. परंतु हें काम फक्त पांच घराण्यांत होत असून तें करण्याची रीत फार गुप्त राखली जात असे.

**प्रतापगड**, जि ल्हा.—संयुक्तप्रांतांत फैझाबाद विभागांतील दक्षिणेकडील जिल्हा. क्षेत्रफळ १४४२ चोरस मैल. हवा कोरडी व आरोग्यकारक आहे. डिसेंबर व जानेवारींत ६०°, आणि मे महिन्यांत ९२° असतें. वार्षिक पाऊस ३८ इंच होतो. यांत गंगा, गोमती, साई या नद्या असून थोडें जंगल आहे.

जिल्ह्यांतील प्राचीन गांवांपैकीं बहुतेक गांवें भाटांच्या वेळीं वसविलीं अशा दंतकथा आहेत; परंतु त्यांपैकीं कांहीं निःसंशय बुद्धाच्या काळांतील आहेत. गंगेच्या कांठचें माणिकपूर, कनोजच्या बलदेवाचा मुलगा मानदेव यानें वसविलें. अशी एक दंतकथा आहे. भाटांच्या मागून सोमवंशी व इतर रजपूत टोळ्या जिल्ह्यांभर पसरल्या. महंमद घोरीनें जयचंदाचा पराभव करून मुसुल्मानी राज्य स्थापन केलें. त्याच्या अंमलाच्या प्रारंभींच्या वर्षांत माणिकपूर व करा ( गंगेच्या पलीकडील कांठाला ) हीं महत्त्वाचीं ठिकाणें होतीं. १८५३ सालीं हा जिल्हा इंग्रजाच्या ताब्यांत गेला. मुसुलमानी अमदानींतीं मुख्य स्मारकें माणिकपूर येथें आहेत. तेथें प्राचीन किल्ल्याचे अवशेष, अकबर, जहांगीर, शहाआलम वगैरे बादशहांच्या कारकीर्दींत बांधलेले राजवाडे व मशिदी यांचेहि अवशेष आहेत. त्यावरून हल्लीं केवळ खेडें असलेलें हें ठिकाण पूर्वी किती महत्त्वाचें असलें पाहिजे हें कळून येतें. या जिल्ह्यांत ४ मोठीं गांवें व २१६७ खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९०१ ) ९१२८४८.

ता लु का.—यांत अतेहा व प्रतापगड हे दोन परगणे आहेत. क्षेत्रफळ ४३२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९०१ ) ३१६५८०. यांत ६७९ खेडीं व तीन मोठीं गांवें आहेत पैकीं बेला हें तालुक्याचें व जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. या तालुक्याच्या मध्यभागांतून साई नदी वहाते.

गां व.—हें बेलापासून ५ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ५१४८. हें गांव स. १६१७ च्या सुमारास राजा प्रतापसिंगानें वसविलें असें म्हणतात. १९ व्या शतकांत तें अयोध्येच्या सरकारनें कार्बीज केलें. प्रतापगडचा राजा येथील एका सुंदर इमारतींत रहात असतो. येथील व्यापार भरभराटींत आहे. गांवचा कारभार १८५६ सालच्या २० व्या कायद्यान्वयें चालतो.

**प्रतापगड**—मुंबई, सातारा जिल्हा. जावळी तहशिलींतील एक किल्ला. महाबळेश्वरच्या नैर्ऋत्येस ८ मैलांवर व समुद्र सपाटीपासून प्रतापगड किल्ला ३५४३ फूट उंचीवर आहे. पश्चिमेकडील आणि उत्तरेकडील बाजू म्हणजे राक्षसी कडेच आहेत. हा किल्ला अजिंक्य व अभेद्य समजत असत. अफझुलखानाचा वध याच किल्ल्यावर झाला. त्यानंतर लढाई झाली.

**प्रतापसिंह छत्रपति** ( १७९२-१८४७ )—हा साताऱ्याच्या छत्रपति घराण्यांतील धाकट्या शाहूचा वडील पुत्र; धाकटा शाहू हा १८०८ त वारल्यावर रावबाजीनें याला त्रिंबकजी डेंगळ्याच्या हस्तें गादीवर बसविलें. प्रतापसिंह गादीवर बसल्यानंतर रावबाजीनें वाईस जाऊन त्याची भेट घेऊन त्याची व्यवस्था लावून दिली व लग्न करून दिलें. पुढें चतरसिंग भोसले यानें पेशव्यांच्या ताब्यांतून प्रतापसिंहास सोडविण्याची इंग्रजांकडे खटपट केल्यानें चतरसिंगास त्रिंबकजीकडून रावबाजीनें पकडवून कांगोरीस कैदेंत ठेविलें ( १८११ ); तेथें तो १८१६ त वारला. पुढें कांहीं दिवसांनीं (१८१७) पुन्हा इंग्रजांची व प्रतापसिंहाची रावबाजीविरुद्ध कारस्थानें एलफिन्स्टनमार्फत सुरू झालीं; हीं प्रतापसिंहाच्या आईच्या उत्तेजनावरून चाललीं होतीं. पेशव्यांच्या कचाटींतून सोडविण्यासाठीं इंग्रजांची ससैन्य मदत प्रतापसिंहानें व त्याच्या आईनें गुप्तपणें मागितली. या कामीं त्याला विठ्ठल महाजनी, बळवंत चिटणीस, बाळाजीपंत नातू, दाजी उपाध्ये व तात्या नारळकर हे मदतगार होते. गुप्तपत्रव्यवहार पोंचविण्याचें काम नरसु काकडे करीत होता. एलफिन्स्टन यानें आनंदानें प्रतापसिंहास मदतीचें आश्वासन दिलें. या सुमारास रावबाजी व इंग्रज यांच्यांत उघड उघड वेबनाव झाला होता व खडकीच्या लढाईची पूर्वतयारी चालली होती. या राज्यक्रांतींत तुम्ही आमच्या लष्करांत येऊन मिळावें असें एलफिन्स्टननें प्रतापसिंहास कळविलें होतें. खडकीच्या लढाईपूर्वी दीडदोन वर्षें प्रतापसिंहाचें व इंग्रजांचें रहस्य जमलें होतें व रावबाजीशीं आमचें फाटलें कीं आम्हीं तुम्हांस मदत करूं असें इंग्रजांनीं प्रतापसिंहास आश्वासन दिलें होतें साताऱ्यास पेशव्यांच्या तर्फे बेंद्रे आणि काळुसकर हे कारभारी होते, आणि त्यांची देखरेख प्रतापसिंहावर असे. इकडे रावबाजीनेंहि प्रतापसिंहाचें व इंग्रजांचें चाललेलें कारस्थान ओळखून राज्यकारभार चालविण्यासाठीं आपल्या लष्करांत बोलाविलें. त्याप्रमाणें जनानखाना वासोट्यास ठेवून प्रतापसिंह हा गारदौडास रावबाजीस येऊन मिळाला. तो पेशव्याच्या लष्कराबरोबर सहा महिने होता. त्याचा गुप्त पत्रव्यवहार एलफिन्स्टनशीं चालत असे, व वेळ आली कीं इंग्रज बहादूराच्या लष्करांत निघून जावयाचा बेत ठरला होता; नातूंची यांत मध्यस्थी होती. त्याचा गुप्त पत्रव्यवहार एलफिन्स्टनशीं चालत असे. शेवटीं अष्टी येथें इंग्रजांची व पेशव्यांची लढाई होऊन, बापू गोखले पडले. व पेशवे पुढें निसटले. या प्रसंगीं अगाऊ सांकेतिक सूचना असल्यानें प्रतापसिंह हा मुद्दामच मराठ्यांच्या लष्कराच्या मागें होता. पेशवे गेल्यावर स्मिथ यानें त्याला आपल्या ताब्यांत घेतलें व बोलेसर येथें एलफिन्स्टनकडे त्याची रवानगी करून दिली ( फेब्रु ). त्यानें प्रतापसिंहास साताऱ्यास आणलें. तत्पूर्वीच ८ दिवस इंग्रजांनीं सातारा घेतला (सातारा किल्ल्याची माहिती एलफिन्स्टननें नरसू काकड्याकडून पूर्वीच काढून घेतली होती ). किल्ला घेतल्यावर प्रथम यूनियन जॅकचें निशाण लावून व त्याला सलामी देऊन मग भगवा झेंडा लावला. मग पुढील आशयाचा एक जाहीरनामा काढला: "बाजीराव राज्याचे उपयोगी नाहींत... थोडके दिवसांत त्यांचा ठिकाणा नाहीं असें होऊन छत्रपती सातारकर बाजीरावसाहेब याचे कैदेंत आहेत त्यांस सोडवून त्यांचें राज्य त्यांजकडे चालेल... ते दौलतीचे खावंद मुखत्यार आहेत. जो मुलूख महाराजाकडे होईल त्यांत न्याय, इनसाफ, हुकमत व अंमल करतील. गेले तें राज्य पेशव्यांचें, महाराजांचें राज्य अबाधितच आहे." याप्रमाणें वास्तविक राज्य छत्रपतींचें असतां त्याचा व इंग्रजांचा कांहीं तंटा नसतां आणि प्रतापसिंहास गादीवर बसविण्याची कामगिरी स्वीकारली असतां, इंग्रजांनीं सर्व मराठी राज्य स्वतःच्या ताब्यांत घेऊन राज्याच्या मालकास फक्त १२ लक्षांचा मुलूख दिला व १४ पेटयांचा एक जहागिरदार बनविलें. ग्रँडडफ याला साताऱ्यास रेसिडेंट म्हणून याच सुमारास नेमण्यांत आलें. त्यानें लिहिलेली मराठ्याची बखर प्रतापसिंहाच्या प्रोत्साहनानें व पुरविलेल्या कागदपत्रादि साधनानें तयार झाली आहे. विलायतेस गेल्यावर त्याचा व प्रतापसिंहाचा पत्रव्यवहार चालत होता. प्रतापसिंहानें साताऱ्यास स.१८२२त एक नवीन राजवाडा बांधला व यवतेश्वराहून नळ आणून शहरांत ठिकठिकाणीं पाणी खेळविलें ( १८२७ ) आणि जलमंदिर राजेवाडाहि बांधला ( १८२९ ).

पुढें इंग्रज आपल्याला निर्माल्यवत मानतात व आपल्यावर निरनिराळ्या अपमानकारक नवीन अटी लादतात हें प्रतापसिंहाच्या लक्षांत येऊन त्यानें यांच्याविरुद्ध खटपट सुरू केली. इंग्रजांचा पक्षपाती बाळाजीपंत नातू यानें घरांत भेद करून प्रतापसिंहाचा भाऊ शहाजी यास बाहेर काढलें. प्रतापसिंहाचा दिवाण गोविंदराव यास इंग्रजांनीं कैद केलें. पुढें इंग्रजांनीं मुंबईचा गव्हर्नर कारनॅक यास चौकशीस पाठविलें. त्यानें कांहीं अटी सांगून त्या कबूल करण्यास व माफी मागण्यास सांगितलें परंतु तें प्रतापसिंहानें ऐकलें नाहीं. त्यामुळें इंग्रजी पलटणें पुण्याहून निघून साताऱ्यास आलीं ( आगष्ट १८३९ ). त्यावेळीं बळवंतराव सेनापति यानें इंग्रजांशीं लढण्याची तयारी केली; परंतु प्रतापसिंहानें त्यास मनाई केली. अखेरीस प्रतापसिंहास पदच्युत करून ( सप्टेंबर ) तीन महिने निवास ठेविलें व मग तेथून काशीस कायमचें नेऊन ठेविलें. १८५७ च्या बंडांत त्याचा संशय घेऊन त्याला कराचीस नेऊन ठेवलें. प्रतापसिंहानें आपलें राज्य परत मिळविण्याची पुष्कळ खटपट केली. विलायतेस माणसें पाठविलीं परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेर हालअपेष्टेंत प्रतापसिंहाचा मृत्यु झाला. [ शेडगांवकर बखर; मराठे व इंग्रज; अष्टप्रधानांचा इतिहास; भा. इ. मं. अहवाल १८३८. ]

**प्रतापसिंह महाराणा**—हा प्रख्यात राणा उदेपूरच्या उदयसिंहाचा पुत्र होय. याला २४ भाऊ होते, त्यांपैकीं

उदयानें आपला आवडता मुलगा जगमल यास, तो प्रतापाहून लहान असतांहि आपला वारस नेमलें होतें. त्याप्रमाणें जगमल गादीवर बसला, परंतु प्रतापाच्या मामानें इतर सरदारांच्या मदतीनें जगमलास गादीवरून काढून प्रतापास मेवाडचा महाराणा केलें (१५७२). प्रतापानें तत्काळ आपलें चितोड अकबराच्या हातून परत मिळविण्याचा प्रयत्न आरंभला.

प्रतापानें आपली नवीन राज्यव्यवस्था सुरू केली. त्यानें प्रजेला अरवलीच्या डोंगराळ भागांत जेथें अकबराचा उपसर्ग होणार नाहीं, अशा ठिकाणीं वस्ती करण्यास व लागवड करण्यास सांगितलें. मेवाडचा मैदानाचा सर्व प्रदेश बेचिराख केला व आपली राजधानी कमळमीर येथें केली. या राजधानीच्या आसपासच्याहि चारी दिशांनां सर्वत्र अरवलीचे डोंगर आहेत. ठिकठिकाणचे किल्ले सुसज्जित ठेविले होते. सुरतेहून जो सरकारी वसूल दिल्लीस जाई त्याचा रस्ता मेवाडांतून असल्यानें तो नेहमीं प्रताप लुटीत असे. प्रतापानें व त्याच्या अनुयायांनीं, ज्या रजपूत राजांनीं मुसुलमानांशीं सोयरिकी केल्या त्यांच्याशीं सामाजिक संबंध तोडून टाकला होता. यामुळें त्यांचा प्रतापावर जास्त राग होता. अकबरानें सेलीमला, मानसिंह व प्रतापाचा चुलता पुतण्या (सागरजीचा पुत्र) महबतखान यांच्यासह प्रचंड फौजेनिशीं प्रतापावर पाठविलें. प्रतापाचें सैन्य सारें२२हजार होतें. त्यांच्यामधील हळदीघाट येथील लढाई प्रख्यात आहे (जुलै १५७६); त्या लढाईत १२ हजार रजपूत ठार झाले. मुसुलमानांसहि कांहीं फायदा झाला नाहीं व त्यांचें नुकसानीह पुष्कळ झालें. शिवाय प्रतापाचा पराक्रम पाहून मुसुलमानांनां मिळालेला त्याचा भाऊ सूक्तसिंह हा पश्चात्ताप पावून प्रतापास सामील झाला व पुढें अखेरपर्यंत त्यानें प्रतापाची बाजू सोडली नाहीं. पुढल्या वर्षी पुन्हां मोंगलांनीं स्वारी केली व कमलमीरास वेढा घातला; देवन्याच्या ठाकुरानें फितूर करून कमळमीर मोंगलांच्या हवालीं केली. तेव्हां प्रताप चावंड येथें गेला. मानसिंहानें उदेपूर, गोगुंद हीं शहरें घेतलीं व चावंडावर चाल केली. तेव्हां प्रताप तेथून निसटला. त्यानें यापुढें जंगलांत व दऱ्याखोऱ्यांत राहून दिवस काढले व गनिमी काव्यानें लढून मोंगलांचें सैन्य कापण्याचा उपक्रम केला. अखेरीस मानसिंह कंटाळून परत गेला. याप्रमाणें (पंचवीस वर्षेपर्यंत) दरवर्षी पावसाळा संपल्यानंतर अकबराचें सैन्य प्रतापावर चढाई करून येई व त्यास प्रताप निधड्या छातीनें तोंड देई. मात्र यामुळें त्याचें सैन्य कमी कमी होत गेलें. त्यास आपलें कुटुंब घेऊन सतत जागा बदलावी लागे. एकदां मुसुलमानांच्या हातांत त्याचें कुटुंब लागणार होतें, परंतु कवाहच्या भिल्लांनीं चपळाई करून त्या सर्वांनां पेटाऱ्यांत घालून जावरा येथील लोखंडांच्या खाणींत लपवून ठेविलें.

पुढें एकदां मात्र प्रतापाचें चित्त निश्चयापासून ढळमळलें. त्याच्या मागें मोंगल सारखे लागल्यानें तो दमून गेला होता. मुक्कामाच्या जागीं जाऊन प्रसंगाचा विचार करीत असतां पुढील गोष्ट घडली. त्याच्या राणीनें मोळ गवताच्या बियाच्या दोन तीन भाकरी स्वतः भाजून आपल्या लहान मुलांनां दिल्या. त्यांपैकीं एक लहान मुलगी भाकर खात असतां एका रानमांजरीनें झडप घालून तिची भाकर पळविली. त्यामुळें तिनें किंकाळी फोडली. ती ऐकून मात्र प्रतापाचें वज्रासारखें अंतःकरण डगमगलें व त्यानें अकबरास, आपण तुझ्याशीं संधि करावयास तयार आहों असा निरोप पाठविला. त्याबरोबर अकबरास अतिशय आनंद झाला व राजधानींत सर्वत्र आनंदोत्सव सुरू झाले ही गोष्ट समजतांच विकानेरच्या पृथ्वीराजानें एक काव्यमय व स्वदेशाभिमानानें ओथंबलेलें पत्र प्रतापास धाडलें. तें पत्र रजपुतान्यांत फार प्रख्यात आहे तें पत्र असेः— “अकबरानें नवरोझच्या बाजारांत साऱ्या रजपुतांची अब्रू घेतली आहे, फक्त बाप्पा रावळाच्या प्रतापानें अद्यापपर्यंत खऱ्या रजपुतांचें नांव राखलें आहे: तें नांवहि आज मलिन होणार काय? अकबर सम्राट मर्त्य आहे, प्रतापाचा निश्चय अमर आहे. सर्व जग त्याच्याकडे पहात आहे, त्याची निराशा होणार काय?” याप्रमाणें असलेलें तें पत्र वाचून प्रतापाची नाउमेद जाऊन तो पुन्हां अकबरास तोंड देण्यास तयार झाला. पृथ्वीराजाचें पत्र आल्याबरोबर प्रतापास अनपेक्षित पैसाहि मिळाला. त्याचा दिवाण भामशाह यानें आपल्या जवळची अगणित संपत्ति प्रतापाच्या हवालीं केली. ती २५ हजार सैन्यास १२ वर्षे पुरेल इतकी होती. त्यामुळें प्रतापाला उत्साह येऊन त्यानें तावडतोब मेवाडच्या असावध मोंगल सुभेदारावर हल्ला करून उदेपूर व कमळमीर घेतलें. त्यानंतर सपाट्यानें एकामागून एक आपलीं सर्व ठाणीं व ३२ किल्ले घेऊन त्यानें एका वर्षांत मुसुलमानास मेवाडांतून हांकून दिलें (१५८६). फक्त चितोड,अजमेर व मंगलगड हीं तीन ठिकाणें घ्यावयाचीं राहिलीं. बहुतेक रजपुतांची प्रतापाबद्दल पूज्यबुद्धि वाहून ते त्याला आंतून सामील झाल्यानें अकबरास त्याचा मोड करतां आला नाहीं.प्रतापानें आपल्या अमरसिंह नांवाच्या मुलाकडून मुसुलमानांशीं आजन्म वैर ठेवण्याबद्दल व मेवाड स्वतंत्र ठेवण्याबद्दल शपथ घेवविली व मग पेशोलो तलावाच्या कांठीं आपल्या नेहमींच्या झोपडींत त्यानें प्राण सोडला (१५९७). अखेरपर्यंत तो गवती झोपडींत राहत असे. आज त्याच झोपडीच्या ठिकाणीं (उदेपूर) संगमरवरी राजवाडे झाले आहेत. प्रताप मेल्यावर अकबरानेंहि त्याची मुक्तकंठानें स्तुति केली. टॉड म्हणतो कीं, “प्रतापाचें नांव अजूनहि सर्व रजपुतांत पूज्य मानलें जातें आणि पुढेंहि एखाद्या नवीन जुलमी राजसत्तेकडून रजपुतांत शिल्लक असलेली देशाभिमानाची ठिणगी विझेपर्यंत तें नांव पूज्यच मानलें जाईल. तसा दिवस येऊं नये! परंतु जर तशी नियतीच ठरली असेल

तर तो निदान ब्रिटिशांच्या शस्त्रानें तरी येऊं नये!" [ टॉड-राजस्थान. ॲनल्स ऑफ मेवाड प्र. ११; स्मिथ-ऑ. हि. इंडिया ]

**प्रतिज्वरिन** ( अन्टीपायरीन )—ह्या पदार्थाची सारणी $क_{११}$ $उ_{१२}$ व $_{२}$प्र अशी असून हें उदिल-उज्ज-अजिविन व दार्वो-दार्विक-संयुक्त ईथ्रावरोबर दृढीकरण करून आलेला पदार्थ मिथिलअदिद व मिथिलअल्कोहलशीं तप्त करून मिळवितात. हें मोठ्या प्रमाणावर मिळवावयाचें असल्यास उदिद-उज्ज-अजिविन हें गंधकाम्लांत विद्रुत करून मिळालेला द्राव ४०° पर्यंत तप्त करून नंतर दार्वो-दार्विक-संयुक्त इथ्र मिळवितात व क्रिया पूर्ण झाल्यावरोबर जास्त असलेलें अम्ल सोड्याच्या योगानें नाहींसें करून मिळालेल्या इथ्रशीं मिश्रणाचें विरल वातावरणामध्यें ऊर्ध्वपातन करून उदिल-मिथिल-निग्म अजीविन वेगळा काढितात. ऊर्ध्वपातन चालू असतां ज्याचें उष्णमान २००° आहे असा भाग मिथिलअदिद व मिथिल अल्कोहलच्या साहाय्यानें मिथिलयुक्त करतात. जास्त झालेलें मिथिल अल्कोहल काढून टाकून मिळालेल्या द्रावाचा रंग गंधकाम्लाच्या योगानें नाहींसा करतात, व नंतर त्यांत उदेन मिळवून तें बाष्परूपानें काढून टाकल्यावर घनीभूत प्रतिज्वरिन सांकारूपानें खालीं जमतें. तें ११३° ला वितळतें. तें अनाम्लिक गुणधर्मी असून लोहक-हरिद्दावरोबर तांबडा सांका देतें. याचा उपयोग ज्वर-नाशक म्हणून करतात. त्याचा डोस ५ पासून २० ग्रेनपर्यंत असतो. तें रक्ताशयाची तरतरी कमी करणारें व कधीं कधीं विषारी परिणाम दर्शविणारें आहे असें आढळून आल्यामुळें अलीकडे त्याचा उपयोग कमी करतात. त्याच्या ऐवजीं अलीकडे उद्-दार्वाइनचा उपयोग फार केला जातो.

**प्रतिनिधि**—हें राजमंडळांतील एक पद राजारामानें प्रथम उत्पन्न केलें. कांहींचें म्हणणें असें आहे कीं, शिवाजीनें तें निर्माण केलें. त्यानें व्यंकोजीस कैद करण्याची आज्ञा दिली असतां प्रल्हाद निराजीनें व्यंकोजीचा वेष घेऊन तो प्रसंग निभावला. त्यामुळें खूप होऊन शिवाजीनें प्रल्हादपंतास प्रतिनिधिपद दिलें. परंतु या गोष्टीस कागदपत्रीं पुरावा नाहीं. राजाराम जिंजीस गेला, तेव्हां व तत्पूर्वी प्रल्हादपंतानें स्वराज्यासाठीं श्रमसायास फार केले. शिवाय तो शिवाजीच्या तालमींत तयार झालेला होता, त्यामुळें त्याच्या वडीलकीखालीं राजारामानें जिंजीस राज्य चालू केलें. त्यावेळीं अष्टप्रधानांहून वरिष्ठ असें हें नवीन पद निर्माण करून तें प्रल्हादपंतास दिलें ( १६९२ ). प्रतिनिधि म्हणजे केवळ राजाची प्रतिमाच. त्याचा अधिकार सर्व प्रधानांवर असे. जिंजी पडण्यापूर्वीच पंत मरण पावला म्हणून राजाराम साताऱ्यास आल्यावर त्यानें तिमाजीपंत हणमंते यांस प्रतिनिधिपद दिलें ( १६९७ ); परंतु तो कर्तबगार नव्हता. त्यामुळें पुढें राजारामानें रामचंद्रपंताच्या हाताखालील परशुरामपंत किन्हईकरास हें पद दिलें ( १६९९ ). पुढें शाहूनें हें पद परशुरामपंतास वंशपरंपरेनें वतनी करून दिलें (१७१०). परशुरामपंतांची व त्यांच्या वंशजांची आजमितीपर्यंतची हकीकत औंध या शब्दाखालीं दिली आहे. मध्यंतरीं गदाधर प्रल्हाद व नारायण प्रल्हाद नाशिककर यांस ५ वर्षें या जागेवर नेमलें होतें, तसेंच नारो शंकर राजे बहाद्दर हे राघोबादादाच्या कारकीर्दीत कांहीं महिने प्रतिनिधि होते.

प्रतिनिधींचे मानपान व हक्क वगैरे पुढीलप्रमाणें असत—छत्रपतीकडून जीं पत्रें यांनां जात त्यांच्या शेवटीं "बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा" हीं अक्षरें छत्रपति स्वहस्तें लिहीत. प्रतिनिधीकडून जे हुकूम सुटत त्याच्या शेवटीं त्यांच्या हातचा 'निर्देश समक्ष' असा शेरा असे. खास छत्रपतीचे दरकदार घेऊन मुलुखाचा बंदोबस्त करण्याचें यांचें काम असे. यांनां वस्त्रें व वस्तू मिळत, त्याः-चादर बादली ( तिळी ), मंदील, जामेवार, किनखापाचें ठाण, पटका, शिक्केकट्यार, तरवार, ढाल, जरीपटका, चौघडा, तीन हत्ती, एक घोडा, शिरपेंच, मोत्यांचा तुरा, मोत्यांची कंठी, झगा, सोन्याच्या दांडीची चवरी इत्यादि. स्वराज्यांतील वसुलांत प्रतिनिधींच्या वांट्यास जी रक्कम येई तीस जिल्हेवाब म्हणत व बाकीच्या रकमेस हुजूरमामला म्हणत. प्रतिनिधींची नेमणूकहि अष्टप्रधानांत सर्वांत जास्त ( पंधरा हजार होन ) होती. राजपत्रावर मुख्य प्रधानाच्या उजव्या बाजूस प्रथम प्रतिनिधींची मुद्रा होत असे. [ अष्टप्रधानाचा इतिहास; डफ; इतिहाससंग्रह. जुन्या ऐ. गोष्टी पु. ३-१० ]

**प्रतीहार** ( कनोजचे सम्राट )—गुहिलोत व चाहमान यांच्याप्रमाणेंच अरबांचा प्रतिकार करण्यांत हें प्रतीहार घराणें आठव्या शतकांत उदयास येऊन गुहिलोत घराण्याप्रमाणें भरभराट पावलें. हिंदुस्थानचा अगदीं उत्तरेकडील प्रदेश प्रतीहारांनीं हळू हळू काबीज करून थेट कनोजच्या सम्राटपदावर आपला अधिकार बसविला. सध्यां हें घराणें नामशेष झालें आहे. अगदीं अलीकडील संशोधनावरून असें निश्चित दिसतें कीं, कनोजच्या वर्मे घराण्याचें सम्राटपद नवव्या व दहाव्या शतकांत प्रतीहार घराण्याकडे अव्याहत चालू होतें. स्मिथच्या मतें प्रतीहार घराण्याचा समावेश गुर्जर जातींत होतो पण गुर्जर हे एतद्देशीय लोक नव्हते. या घराण्याची थोडीशी माहिती कनोज या नांवाखालीं दिली आहे, तेथें या राजाचे काल दिले आहेत.

ह्या घराण्यांत प्रथम प्रसिद्धीस आलेला राजा म्हणजे नागभट हा होय ( 'नागभट' पहा ). प्रतीहार घराण्याचा मूळ पुरुष प्रभु रामचंद्राचा भाऊ लक्ष्मण होय असें मानतात. रामाच्या द्वारपालाचें ( प्रतीहाराचें ) काम लक्ष्मण करी म्हणून या घराण्यास हें नांव मिळालें. अर्थात हें घराणें सूर्यवंशी आहे, अग्निवंशी नव्हे. यांच्या एका शिलालेखावरून असें दिसतें कीं एका ब्राह्मणास ब्राह्मण स्त्रीपासून प्रतीहार ब्राह्मण व क्षत्रिय स्त्रीपासून प्रतीहार क्षत्रिय अशी संतति झाली.

पृथ्वीराज चव्हाणाच्या काळीं नाहरराय या प्रतीहार राजाचें ठिकाण ( जोधपुराजवळील ) मंडोर हें होतें. यावरून असें दिसतें कीं प्रतीहार घराण्याची गादी नागभटाच्या वेळीं देखील मंडोर येथेंच असावी. मंडोर शहर प्रतीहारांच्या राजधानीचें ठिकाण असण्याचें कारण तें मारवाडांतील मुख्य ठिकाण होतें. राटोड लोकांनीं प्रथम प्रतीहार घराण्याच्या आश्रय करून त्यास पादाक्रांत करून आपणच गादी बळकाविली. नागभटाच्या मागून त्याचा पुतण्या कक्कुस्थ हा गादीवर बसला ( ७४०–७५५).कक्कुस्थानंतर देवशक्ति उर्फ देवराज राज्य करूं लागला. या कुलांत स्वपराक्रमानें अतिशय प्रसिद्धीस आलेला व सम्राटपद पावलेला वत्सराज हा त्याचाच मुलगा होय. वत्सराजानेंच पश्चिमेकडून कनोजवर स्वारी केली व तेथील भंडिकुल राजाचा पाडाव करून तो साम्राज्यपदाचा मालक झाला. यावेळीं वर्म घराण्यास उतरती कळा लागली होती; त्यामुळें कनोज टिकाव धरूं शकलें नाहीं. वत्सराजानें बंगालच्या गोपालराजाचा पुरा मोड करून त्याचीं राजचिन्हें काबीज केलीं; पण राष्ट्रकूट ध्रुवराज यानें वत्सराजापासून तीं राजचिन्हें आपल्या स्वाधीन करून घेतलीं व वत्सराजास मारवाडांत हटाविलें.

अशा रीतीनें कनोज जिंकण्याचा वत्सराजाचा बेत विफल झाला. परंतु वत्सराजाच्या मुलानें ( नागभटानें ) तो अतुल पराक्रमानें सिद्धीस नेला. ह्या ( दुसऱ्या ) नागभटाला कनोजच्या साम्राज्यसंस्थापकाचा मान मिळतो. नागभटाच्या दिग्विजयाचें वर्णन देणारे चार श्लोक भोजलेखांत सांपडतात. व त्यांवरून त्याच्या पराक्रमाची कल्पना होते(नागभट पहा). या नागभटाच्या वेळीं कनोजचें साम्राज्य उत्तरेस हिमालयापासून दक्षिणेस काठेवाडपर्यंत व पूर्वेस अलाहाबाद ते पश्चिमेस पंजाबपर्यंत होतें.

नागभटाच्या पश्चात त्याचा मुलगा रामचंद्र व त्याच्या मागून मिहिर उर्फ भोजराजास राजपद प्राप्त झालें. प्रतीहार घराण्यांत भोजराजाइतका प्रतापी पुरुष झाला नाहीं; व त्याची कारकीर्दहि सर्वांत जास्त (५० वर्षांची) झाली. त्याचा राज्यविस्तारहि सर्वांत मोठा होता. सागरताल लेखांत त्याची अतिशय स्तुति केली आहे. त्याची सत्ता पश्चिम ते पूर्वसमुद्रापर्यंत व कनोज ते विंध्यपर्वतापर्यंत होती. भोजाच्या पाठीमागून महेंद्रपाल उर्फ निर्भयराज गादीवर बसला. भोजराजानें कमाविलेल्या मोठ्या राज्याचें त्यानें उत्तम संरक्षण केलें. महेंद्रपालानंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र ( दुसरा ) भोज व भोजानंतर त्याचा धाकटा महीपाल उर्फ क्षितिपाल उर्फ उर्फ हेरंबपाल उर्फ विनायकपाल हा गादीवर आला; ह्या राजाच्या कारकीर्दीतच कनोजला उतरती कळा लागली. महीपालानंतर त्याचा मुलगा देवपाल राज्यारूढ झाला. देवपाल हा जरी अधिराज असला तरी त्याची सत्ता उतरत चालली होती. त्यास इतरांचें साहाय्य घ्यावें लागे व त्याबद्दल मोबदलाहि देणें भाग पडे. त्याला देवपालानंतर त्याचा सावत्र भाऊ विजयपाल हा राज्य करूं लागला. याच्या कारकीर्दींत मांडलिक राजे व सरदार हे कनोजला मानीतनासे झाले होते. ह्या राजाच्या कारकीर्दीविषयीं इतर माहिती उपलब्ध नाहीं. विजयपालानंतर रायपाल गादीवर बसला व त्यानें इ. स. ९९० ते १०२० पावेतों राज्य केलें असावें असें स्मिथ म्हणतो. या राजाच्या अमदानींतच कनोजचें राज्य विलयास गेलें. [ टॉड–राजस्थान; स्मिथ–अर्लि हिस्टरी ऑफ इंडिया; वैद्य. म. भा. पु. २ ]

**प्रत्यक्षप्रमाणवाद**—( पॉझिटिव्हिझम ) अनुभवानें मिळणाऱ्या ज्ञानावर सर्वस्वीं अवलंबून असणाऱ्या तत्वज्ञानाच्या एका पंथाच्या मतास हें नांव दिलें आहे. या शब्दाचा उपयोग साधारणपणें आध्यात्मिक ज्ञान व अनुभवपूर्वज्ञान या मताला विरोध करणारें मत असा झाला आहे. या अर्थीं हा शब्द सर्वसाधारण अनुभववादास लावण्यास कांहीं हरकत नाहीं. ह्यूमनें तत्त्वज्ञान हें अनुभवांत व कार्याकारणसंबंधाचा नियम मनुष्याच्या संवयींत व अपेक्षिततेस सांठविलें व म्हणून तो साक्षातवादी होता. ह्याचप्रमाणें मिल, स्पेन्सर, व इतर भौतिकशास्त्रज्ञ या जगाकडे प्रत्यक्षप्रमाणवादाच्या दृष्टीनें पाहतात. पण या शब्दांनीं ऑगस्ट कोम्टच्या तत्त्वज्ञानाचा साधारणपणें प्रचारांत बोध होतो. या तत्त्वज्ञानाप्रमाणें सर्व ज्ञान भौतिक किंवा " साक्षात् शास्त्रांच्या शोधांवरून व त्यांच्याच मार्गानें–पद्धतीनें–होतें. कोम्टच्या मताप्रमाणें मानवी विचार तीन स्थितींतून जातो: (१) धर्मशास्त्रविषयक-श्रद्धामूल,(२)आध्यात्मिक,(३) साक्षात. शेवटची पायरी-साक्षातज्ञान म्हणजे विश्व हें निरनिराळ्या स्वेच्छ व्यक्तींचा जमाव नसून " एकजीवीसंघात " असून त्याचे आवश्यक कायदे आहेत ( कोम्ट पहा ). याचा परिणाम ईश्वरप्रणीत धर्माच्या जागीं मानव-धर्माची स्थापना हा होय. या मानवोपासक धर्मांत ईश्वराच्या जागीं मानवसमाज आरूढ झाला आहे. हक्सले म्हणतो कीं, कॅथोलिसिझममधून ख्रिस्तीधर्म काढून टकला तर मानवधर्म शिल्लक राहतो. या धर्माचे गुरु, आचार व संघटना निराळे राहावयाचे होते.

या पंथाचे दोन भाग आहेत. तत्त्वज्ञानविषयक व धार्मिक. तत्त्वज्ञानविषयक, साक्षातवादास फ्रान्स, जर्मनी, व इंग्लंड या देशांत बरेच चांगले लोक मिळाले होते व अर्वाचीन तत्त्वज्ञानावर परिणाम करणाऱ्या दोन,तीन कारणांपैकीं हें मत होय असें एक मत होतें. कोम्टचा तत्त्वज्ञानविस्तार जरी महत्वाचा नसला तरी सर्व अनैसर्गिक व आध्यात्मिक मतें नाकबूल करणाऱ्या तत्त्वज्ञानांत कोम्टचा साक्षातवाद दिसतो. अज्ञेयवाद, दृश्यज्ञानवाद, बुद्धिप्रामाण्यवाद व जडैक्यवाद हे सर्व साक्षातवादींच दिसतात व ते अनुभवपूर्वज्ञान नाकबूल करतात. फ्रान्समध्यें कोम्टचा पंथ विशेष फरक करून व त्यांतील धार्मिक भाग वगळून लिट्रे टेन, वगैरेंनीं पुढें चालविला. जर्मनींमध्यें कँटच्या पुष्कळ अनुयायांनीं प्रत्यक्ष दृश्यचमत्कारांनींच खरें ज्ञान होतें हें मत पसरिलें. या मताचा धार्मिक

भाग विशेष महत्त्वाचा नाहीं. फक्त अर्वाचीन समाजविकास-नीतिशास्त्र या धार्मिक स्वरूपाचें आहे. इंग्लंडमध्यें मात्र पुष्कळ प्रसिद्ध साक्षातवाद्यांनीं कोम्टचें मानवदेवस्थानाचें ध्येय व मानवोपासक धर्माची कल्पना प्रचारांत आणली.त्या-धर्मास आचार व संघटना देण्यांत आली. याची मुख्य इमारत च्यापल स्ट्रीटमध्यें ल्यामस कॉन्डियट स्ट्रीट-लंडन येथें आहे. व त्यांत मानवसमाजांतील सत्पुरुषांचे पुतळे असून तेथें धार्मिक विधी व्यवस्थित होतात.

**प्रथमिन** (प्रिमिलाइम )—हा एक प्रकारचा रंग असून ह्यामध्यें क्षय—अजीवलनाभि व उदिननाभि या दोन नाभींचें एकत्रीकरण झालेलें असतें. हा डी-हायड्रो-थायो-टयुलिडिनपासून मिळणारा पदार्थ आहे. आनां डी-हायड्रा थायो टयुलिडोन हें प्यारा टयुलिडित गंधकाशी १८०° ते १९०° पर्यंत बारा तास तप्त केल्यानंतर आणखी ६ तास २००° ते २२०° पर्यंत तापविलें असतां तयार होतें. पण मिळालेला पदार्थ ह्याच रंगद्रव्य नसतो, तर हा पदार्थ पुढें आणखी जास्त उष्णमान मिळेपर्यंत गंधकासहित तापवून मिळालेला पदार्थ गंधकित केल्यास प्रथमिनपीतरंग मिळतात. प्रथमिन--पीत-रंग हें सिंधु--क्षाराचें मिश्रण असून त्याच्या अणूमध्यें बहुतकरून क्षय--अजीवलच्या तीन तरी नाभी असाव्यात. हा कापूस रंगविण्याचा एक महत्त्वाचा रंग असून त्याची छटा थोडा वेळ टिकणारी असते.

**प्रदररोग**—प्रदररोगामध्यें स्त्रियांच्या जननेंद्रियावाटे स्राव वहाणें हें प्रमुख लक्षण असून रोगाच्या कारणांच्या मानानें इतर शारीरिक लक्षणें त्या रोगांत असतात. याचे दोन प्रकार आहेत; हा स्राव जेव्हा चिकट व पांढरा असतो तेव्हा त्यास श्वेतप्रदररोग ( पांढरी धुपणी, पांढरवाणी ) म्हणतात. त्याचीं कारणें:—गर्भाशयाची जी पिशवी असते तिच्या आंतील श्लेष्मलत्वचा असते तींत अनेक कारणांनीं दाहक्रिया सुरु झाली म्हणजे चिकट व पांढरा स्राव ( व कधीं रक्ताचा स्राव म्हणजे रक्तप्रदर ) सुरु होतो. कधीं कधीं हा दाह फक्त गर्भाशयाच्या मुखाशींच सुरु असतो. कारण तेथें प्रसूति वगैरे प्रसंगांमध्ये व्रण, क्षत, दुखापत वगैरे कारणांनीं दाह सुरु होणें साहजिक असतें व या प्रकारचा स्राव पांढऱ्या अंड्याच्या बलकाप्रमाणें चिकट नसून लाळेसारखा चिकट, दाट व विपुल असतो. तिसरें कारण योनिमार्गाचा दाह हें होय. इतर कारणें परमा, अति मैथुन हींहि होत. या प्रत्येक कारणानें होणाऱ्या रोगाच्या नवीन व जुनाटपणाच्या मानानें इतर शारीरिक लक्षणें होतात. हीं अत्यंत संक्षिप्तशीं आहेतः--नवीन रोगांत ओटी पोट व कमरेमागें माकड हाडाजवळ आणि मांड्या या ठिकाणीं दुखतें; चिरडखोरपणा, ताप, अंग निस्तेज होणें, ओटीपोटांत आग वाटणें, वरच्यावर गढूळ लघवी होणें व वारंवार शौचास लागणें व नंतर बद्धकोष्ठता, ओटीपोटांत जरा दाबल्यानें वेदना व चिकट अंड्याच्या बलकाप्रमाणें स्राव ( व नंतर कधीं कधीं तांबडा स्राव ), जुनाट रोगांत अन्नपचन बिघडून पोट फुगणें, मळमळणें, उन्मादवायु होऊन त्याचे आंचके, झटके येणें, वाढत जाणारी अशक्तता वगैरे होत.

तीव्र रोगावर उपचारः—रोग्यास अंथरुणावर निजवून पूर्ण विश्रांति द्यावी. खाण्यास पातळ, पौष्टिक, व स्निग्धान्न द्यावें. क्यालोमेल व जालपचूर्णाच्या जुलाबाचें औषध प्रथम द्यावें. कमरेपर्यंत सोसवेल एवढया कढत पाण्यांत एखाद्या भांड्यांत पाय बाहेर ठेवून बसावें. योनिमार्ग कोमट व जंतुघ्न धावनांनीं धुणें, ओटीपोट शेकणें, गर्भाशयाच्या मुखास जळवा लावणे अगर ग्लिसरीनयुक्त इतर दाहशामक औषध लावणें, वेदनाशामक मार्फिया अगर बेलाडोनायुक्त सोंगटी योनिमार्गांत ठेवणें, हे उपचार कारणांच्या मानानें तज्ञ डाक्टर, वैद्य, डाक्टरीण यांच्या सल्ल्यानें व त्यांच्या हातून करवावे. जुनाट रोगांत वरील धोरणांत इष्ट ते फेरफार करून उपाय करावेत व लोह, कॉडलिव्हर तेल, माल्ट वगैरे औषधांनीं प्रकृति सुधारावी. बोरिक ॲसिड, तुरटी, झिंकसल्फेट मायफळाचें सत्त्व व इतर अनेक औषधांचीं धावनें योनिमार्ग धुण्यास उपयुक्त आहेत. आयोडीन कॅर्बॉलिक ॲसिड, सज्जीखाराचा द्राव यासारखीं औषधें शस्त्राभोंवतीं कापूस गुंडाळून तें वरील औषधांत भिजवून गर्भाशयांत जपून लावणें. हे व इतर स्त्रियांच्या रोगासाठीं फक्त स्त्रियांचेंच स्त्री वैद्याच्या देखरेखीखालीं असणारें आतुरालय जरूर आहे. यांपैकीं पुष्कळ उपचार गरीब व मध्यम स्थितींतील स्त्रियांना घरच्याघरीं करतां येत नाहींत. आणि जनमनलज्जा आड येते. पोटात घेण्यासाठीं पोटॅशियम ब्रोमाइड व हायड्रास्टीसचा अर्क हीं औषधें फार गुणावह आहेत. तीव्र रोगांत मैथुन वर्ज्य करावें व इतर रोगांतहि तें नसलेलें चांगलें. अगोदर धुपणीचें वरीलपैकीं कोणतें कारण आहे व रोग नवीन आहे किंवा जुनाट आहे हें ठरवून मग उपाय करावेत.

प्रदर रोगाचा दुसरा प्रकार रक्तप्रदर हा होय.—म्हणजे स्त्रिया प्रतिमासी रजस्वला होतात व त्यांना तीन चार दिवस आर्तवस्राव बेताचा पडतो. या नेहमींच्या आर्तवस्रावापेक्षां फार अधिक स्राव त्या काळांत झाला अगर नेहमीं इतकाच स्राव परंतु तीन चार दिवसांपेक्षां अधिक दिवस पडूं लागला अगर दोन मासाच्या मध्यंतरींच पुनः जर स्त्री रजस्वला होऊं लागली तर तें रक्तप्रदर नामक रोगाचें लक्षण समजावें. याचीं कारणें:—पंडुरोग म्हणजे रक्ताची कमतरता; या रोगाचीं जीं कारणें तींच या रोगाचीं असतात; शिवाय जुनाट मूत्रपिंडरोग, हृदयरोग, पाणथरीचे रोग, अंगावर मुलें फार दिवस पाजणें, स्त्री ऋतुमती असतां मैथुन व एरवीं अतिमैथुन करणें, श्वेतप्रदराच्या कारणांपैकीं गर्भाशयदाह व योनिमार्गदाह हे रोग आपल्या स्थानापासून गर्भाशय भ्रष्ट होणें, स्त्रीअंडाशय व गर्भाशय यांच्या ठायीं ग्रंथिरोग व तोहि विशेषतः तंतुमय आरक्यान्सर जातींपैकीं होणें,

अगर सेंधे श्लेष्मल ग्रंथिरोग होणें हीं प्रमुख कारणें आहेत. प्रसूतीनंतर स्त्री रजस्वला होऊं लागून वरील लक्षण होऊं लागलें तर वारेपैकीं कांहीं तुकडा गर्भाशयांत राहिला असल्यानें असें होऊं लागतें. स्पंज जसा मोठा व भुसभुशीत असतो तसा रोग गर्भाशयांत वाढतो व गरोदरपणाचीं चिन्हें वाढून पुढें हें लक्षण सुरू होतें ( मोल प्रेग्नन्सी ). गर्भसंभव चुकवाच होऊन थोडे महिने लोटल्यावर असें लक्षण झाल्यास तें लवकर गर्भपात होणार याचें सूचक आहे व त्यास प्रतिबंधक इलाज केले पाहिजेत. स्त्री गरोदर होऊन प्रसूतिसमयाच्या फाजील अगोदर जर ती रजस्वला झाली तर वार गर्भाच्या पुढें आहे असें समजावें व प्रसूतिसमयांतील एक महा अरिष्ट आहे असें समजून त्याच्या निरसनार्थ उपायचिंतन व उपाय योजना करावी याचें तें सूचक चिन्ह होय इतर लक्षणेंहि जशीं कारणें असतील त्या मानानें अनेक होतात. इतकीं नानाविध कारणें संभवत असल्यामुळें उपचारहि नाना प्रकारचे–साध्या विश्रांति व पोटांत औषधापासून ( ग्रंथिरोग कारण असल्यास ) मोठ्या शस्त्रक्रियेपर्यंत–करावे लागतात. सर्वसामान्य उपचार म्हणजे रोगी स्त्रीस अंथरुणावर अगर बाज-पलंगावर निजवून पूर्ण विश्रांति द्यावी. पलंगाच्या पायाकडील दोन्ही खुराखालीं फळ्या ठेवून ते अंमळ उंच होतील अशी व्यवस्था ठेवावी. कढत व उत्तेजक पदार्थ खाऊपिऊं नयेत. योनिमार्गांत औषधी बोळा ठेवावा. प्रथम रोगकारण शोधावें. जरूर तर "क्ष" किरणसाहाय्यानें ग्रंथिरोगादि रोगनिदान निश्चित करावें.पोटांत देण्यास अर्गट हें औषध उत्तम आहे. तें अर्कादिरूपानें नुसतें अगर इतर औषधांशीं संयुक्त करून द्यावें. इतरहि चांगलीं औषधें आहेत तीं:–व्हायबर्नम प्रुनिफोलियमचा अर्क, हॅमेमेलिस अर्क, हायड्रास्टीस अर्क, क्याल्शियम ल्यक्टेट, ॲड्रीनालीन, पोटॅशियम ब्रोमाईड, डिजिटालिस अर्क वगैरे. पुढील औषधेंहि उपयुक्त आहेतः–लेडॲसिटेट, थॉयराइडसत्त्व, फेरिकक्लोराइड वगैरे. लागलीच परिणाम होण्यासाठीं टोंचून घालण्यासाठीं पुढीलपैकीं एखादें औषध योजावें:—अर्गोटीन, पिच्युइट्रीन, ॲड्रीनालीन वगैरे औषधें टोंचून घातल्यानें रक्तस्राव एकदम थांबतो. वेळींच उपाय न झाल्यानें एखाद्या वेळीं रक्तस्राव प्राणघातक व्हावयाचा,तो अशानें टळतें व मागाहून सावकाशपणें व शोधकबुद्धीनें कारण शोधून त्यावर कायम इलाज करण्यास अवसर सांपडतो. रोग्याची एकंदर शरीरप्रकृति सुधारणें हेंहि आद्यकर्तव्य आहे. हृदयरोग हें कारण असेल तेव्हां त्यावर योजना अगोदर केली पाहिजे. गर्भापुढें वार आली असल्यास हरउपायानें व प्रयत्नानें ( पाणमोटळी फोडणें, बालक फिरवणें, बालक चिमटयानें ओढून काढणें वगैरे ) प्रसूतिक्रिया पुरे दिवस भरले नसले तरी अगोदर करवावी. नाहीं तर उपायांच्या व डाक्तरवैद्यांच्या मदतीच्या अभावीं बाळंतीण रक्तस्रावामुळें मरण पावेल. वरील बिकट व गुंतागुतीचें रोगनिदान व चिकित्सा शक्य तेवढ्या अनेक स्त्रीआतुरालयांची व प्रसूतिगृहांची आवश्यकता सिद्ध करतात. व तीं शक्य तेवढीं स्त्रीवैद्यांच्या व्यवस्थेखालीं असल्यास त्यांचा प्रसार व प्रगति व जनतेचें आरोग्य वाढेल असा भरंवसा वाटतो.

*आ यु र्वे दी य नि दा न.*—ऋतुकाळीं प्रमाणापेक्षां अधिक व ऋतुकाल नसतां थोड्या किंवा जास्तप्रमाणांत जें गर्भाशय व योनिमार्ग यांतून रक्त स्रवतें त्यास असृग्दर किंवा प्रदर म्हणतात. यासच मराठींत धुपणी असें नांव आहे.

दूध व मासे, दूध व आंबट रस, इत्यादि संयोगविरुद्ध पदार्थ खाण्यानें,दारू पिण्यानें, अजीर्णानें, जेवल्यानंतर लगेच जेवल्यानें, गर्भपातानें, अति मैथुनानें, घोडयावरून, किंवा बैलगाडींतून जाण्यानें, पायानें फार चालण्यानें, शोकानें, लंघनादिकांनीं फार क्षीण झाल्यानें, अतिशय ओझें उचलण्यानें, आघातानें, दिवसा झोंप घेण्यानें, धुपणीचा विकार सुरु होतो. कफ, पित्त, वात व संनिपात या भेदांप्रमाणें धुपणीचा विकार चार प्रकारचा आहे. धुपणीचा विकार चालू असतां अंग दुखणें, अंग मोडणें, हे विकार असतात. बरेच दिवस विकार चालू असेल तर दुर्बलता, भोंवळ, घेरी येणें, तहान लागणें, अंगाची व पोटांत आग होणें, बडबड, फिक्कटपणा, झांपड व वातरोग हे विकार होतात.

कफाच्या धुपणींत आमयुक्त, बुळबुळीत, पांढुरक्या रंगाचें व मास धुतलेल्या पाण्यासारखें रक्त पडतें. पित्ताच्या धुपणींत लाल, निळें, काळें,किंवा पिवळ्या रंगाचें रक्त पडतें रक्त पडतांना आग होते व चुणचुण सुटते, रक्त वेगानें व पुष्कळ पडतें. वाताच्या धुपणींत फेसाळ, रुक्ष, तांबूस रंगाचें, थोडथोडें, मांसाच्या धुणासारखें रक्त पडतें व तें पडतांना योनिमार्गांत ठणका, फूट, वगैरे वाताच्या वेदना होतात. संनिपातानें होणाऱ्या धुपणींत मध, तूप, व हरताळ यांच्या रंगाचें रक्त पडतें. मज्जे( हाडांतील पातळ पदार्थ )प्रमाणें तो स्राव असतो, त्यास प्रेतासारखी घाण येते, हा त्रिदोषजन्य धुपणीविकार असाध्य आहे. ज्या धुपणींत सारखा पुष्कळ स्राव चालू आहे ती असाध्य होय. धुपणीनें आजारी असलेल्या स्त्रीस तहान, दाह, ताप, रक्तक्षीणता, व अशक्तपणा हीं लक्षणें झालीं असतां धुपणीचा रोग असाध्य होतो. एक महिन्यानें येणारा व ज्यांत बुळबुळीतपणा व दाह हीं लक्षणें नसून पांच दिवसच प्रमाणांत चालू रहाणारा विटाळ हा आरोग्यकारक समजावा.

**प्रद्युम्न**—(१) चक्षुर्मनूस नड्वलेपासून झालेल्या अकरा पुत्रांतील एक. यास सुद्युम्न असेंहि नामांतर होतें.

(२) यदुकुलोत्पन्न कृष्णास रुक्मिणीपासून झालेला प्रथम पुत्र. शंबरासुरानें यास समुद्रांत टाकलें व त्याला मत्स्यानें गिळलें. तोच मत्स्य एका धीवरानें शंबरासुरास अर्पण केला. शंबरासुराची पाळलेली कन्या मायावती हिनें त्यास वाढविलें. तो मोठा झाल्यावर त्यानें शंबराचा वध केला.

**प्रभास**—(१) एक वसु (अष्टवसु पहा). यास आंगिरसी नांवाची स्त्री व विश्वकर्मा पुत्र होता.

(२) या नांवाचें गुजराथेंतील एक तीर्थ व क्षेत्र.

**प्रभु** जाती, (१)कायस्थः—एक महाराष्ट्रीय जात(कायस्थ पहा. ). इसवी सन १९२१ च्या खानेसुमारींत या ज्ञातीची मुंबई इलाख्यांतील लोकसंख्या २६,५८६ भरली. याशिवाय इंदूर, धार, देवास वगैरे मध्यहिंदुस्थानांतील संस्थानांत व वऱ्हाड आणि नागपूर या सर्व ठिकाणची लोकसंख्या सुमारें २५०० भरेल; म्हणजे या ज्ञातीची एकंदर लोकसंख्या सर्व हिंदुस्थानांत सुमारें २९,००० आहे असें म्हणतां येईल. इसवी सन १९११ मध्यें मुंबई इलाख्यांत या ज्ञातीची लोकसंख्या २७,१२० होती व मध्यहिंदुस्थान व नागपूर इकडील २५०० लोकसंख्या धरून एकंदर लोकसंख्या ३०००० होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. या दहा वर्षांत लोकसंख्येची वाढ न होतां ती कमी झाली आहे असें दिसून येईल. ही लोकसंख्या कमी होण्यास प्लेग, इन्फ्लुएन्झा वगैरे सर्वसाधारण कारणें आहेतच, परंतु याशिवाय दुसरींहि कांहीं आर्थिक कारणें आहेत. खेडीं सोडून पोट भरण्याकरितां पुष्कळ कुटुंबांनां शहरांत यावें लागत आहे. व शहरांतील संकोचित जागेंत रहाण्याचा दुष्परिणाम कुटुंबांतील स्त्रिया तरुण मंडळी व मुलें यांच्यावर होऊन पुष्कळ मंडळी क्षयरोगासारख्या रोगांनां बळी पडत आहेत.

मुंबई इलाख्यांतील सर्व जातींमध्यें चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंचें साक्षरतेचें प्रमाण जास्त आहे हीं गोष्ट मागील दोन तीन खानेसुमारींचे रिपोर्ट पाहिले असतां दिसून येईल साक्षर स्त्रियांचेंहि प्रमाण इतर ज्ञातींतील स्त्रियांपेक्षां अधिक आहे हीहि गोष्ट याच रिपोर्टांवरून दिसून येईल. इंग्रजी शिक्षणाचा प्रसार याच ज्ञातीमध्यें युनिव्हर्सिटीच्या स्थापनेपासून झपाट्यानें झाला लेखनकला हेंच या ज्ञातीच्या उपजीविकेचें मुख्य साधन असल्यामुळें व सरकारी खात्यात नोकरी मिळविण्यास इंग्रजी शिक्षण मिळाल्याशिवाय गत्यंतर नसल्यामुळें त्या शिक्षणाचा प्रसार या ज्ञातींत होणें क्रमप्राप्तच होतें. युनिव्हर्सिटीची स्थापना झाल्यानंतर पुष्कळ वर्षेपर्यंत या ज्ञातीच्या मंडळीचा आर्ट्स कोर्स(वाङ्मयशाखे)कडे व कायद्याकडे ओढा जास्त होता. ही स्थिति इसवी सन १९०५ सालापर्यंत अबाधित रीतीनें चालली होती. पुढें ग्रॅज्युएटची संख्या जसजशी जास्त होत गेली व बी. ए. ची परीक्षा पास होऊन नोकरी मिळणें दुरापास्त झालें तेव्हां हळू हळू इंजिनियरिंग, वैद्यकी, इकडे या ज्ञातींतील तरुणांचें लक्ष वेधूं लागलें; व त्या शाखांतून हीं मंडळी जाऊं लागली. तथापि अद्यापि देखील आर्टस् कोर्सकडे व कायद्याकडे या ज्ञातींतील पुष्कळ विद्यार्थ्यांचीं मनें धांव घेत असतात. गेल्या दहा पंधरा वर्षांत परकीय देशांत जाऊन शिक्षण मिळविण्याचा क्रम या ज्ञातींतील बऱ्याच विद्यार्थ्यांनीं सुरू केला आहे. एकॉनमिक्स (अर्थशास्त्र), कायदा, इंडियन सिव्हिल सर्व्हिस, शेतकी, वैद्यकी, रसायनशास्त्र वगैरे विषयांचा अभ्यास अमेरिका, इंग्लंड, जर्मनी या देशांत जाऊन विद्यार्थी करीत आहेत. खेडेगांवांतून उपजीविकेचें साधन नाहींसें होत असल्यामुळें आपले गांव सोडून या ज्ञातींतील बरेच लोक शहराकडे धांव घेत आहेत. यामुळें त्यांच्या मुलांच्या शिक्षणाचें कार्य अनायासें घडून येतें. ठाणें येथील ज्ञातीच्या शिक्षणसंस्थेनें व बडोदें येथील शिक्षणसंस्थेनें उत्साही व हुषार तरुण मंडळींनां उच्च शिक्षण देण्याच्या कामीं पुष्कळ मदत केली आहे. अलीकडे युनिव्हर्सिटीचें उच्च शिक्षण घेण्याच्या ऐवजीं धंदेशिक्षण घेतलें असतां जास्त फायदेशीर होईल अशी पुष्कळ विद्यार्थी लोकांच्या मनाची प्रवृत्ति होत चालली आहे; पण अद्यापि या प्रवृत्तीला विशेषसें दृश्य स्वरूप आलें नाहीं.

मुलींनां लिहिण्यास व वाचण्यास शिकविण्याची व व्यावहारिक शिक्षण देण्याची पद्धति या ज्ञातींत पूर्वापार चालु आहे. मुलींच्या शाळा निघाल्यापासून या ज्ञातींतील मुली त्यांत शिकत आहेत. ज्या ज्या ठिकाणीं शाळा आहेत त्या त्या ठिकाणीं ज्ञातींत मुली बहुधां निरक्षर सांपडत नाहींत. ज्या ठिकाणीं शाळा नाहींत त्या ठिकाणीं घरांतील वडील माणसे आपल्या मुलींनां घरींच शिकवितात. शहरांपासून अत्यंत लांब दूरवर असलेल्या व मागसलेल्या खेड्यांत मात्र मुली निरक्षर असण्याचा पुष्कळ संभव असतो. पुणें, मुंबई, बडोदें वगैरे ठिकाणीं जेथें मुलींच्या इंग्रजी शाळा आहेत त्या ठिकाणीं मुली या शाळांतून अभ्यास करीत आहेत. सध्यां मुलींच्या लग्नाची वयोमर्यादा वाढल्यामुळें व हुंड्याच्या वाढीमुळें मुली लग्न होण्यापूर्वी इंग्रजी पांच सहा इयत्ता शिकेतोंपर्यंत शाळेंत जातात. म्याट्रिक्युलेशन पास होणाऱ्या मुलींची संख्या गेल्या पांच सहा वर्षांत वाढत आहे. थोड्या स्त्रिया बी. ए. हि झाल्या आहेत. एक दोन एम्. बी. बी. एस्. झालेल्या आहेत. नर्सिंग आणि एल्. सी. पी. एस्. करितां मेडिकल स्कूलमध्यें पुणें, मुंबई येथें कांहीं विद्यार्थिनी अभ्यास करीत आहेत; मराठी अभ्यास संपवून ट्रेनिंग कॉलेजमध्यें अभ्यास करणाऱ्या विद्यार्थिनींची संख्या फारशी नाहीं. तथापि ही संख्या आणखी वाढेल असा संभव दिसत आहे.

या ज्ञातींतील मराठ्यांच्या इतिहासांत प्रसिद्ध असलेल्या पंधरा पुरुषांचीं नांवें कालानुक्रमें पुढें दिलीं आहेत:—

(१) दादाजी नरस देशपांडे.
(२) बाळाजी आवजी चिटणीस.
(३) बाजी प्रभु देशपांडे.
(४) मुरार बाजी देशपांडे.
(५) दादाजी रघुनाथ प्रभु देशपांडे.
(६) कृष्णाजी दादाजी प्रभु देशपांडे.
(७) आवाजी विश्वनाथ देशपांडे.
(८) खंडो बल्लाळ चिटणवीस.

( ९ ) गोविंद खंडेराव चिटणीस.
( १० ) सखाराम हरी गुप्ते.
( ११ ) रावजी अप्पाजी फणसे } दिवाण बडोदे.
( १२ ) बाबाजी आप्पाजी फणसे } दिवाण बडोदे.
( १३ ) बापूजी रघुनाथ दिघे—दिवाण, धार व ग्वाल्हेर.
( १४ ) निळकंठ रामचंद्र पागे.
( १५ ) रंगो बापूजी—वकील सातारा राजातर्फे

या ज्ञातींतील ब्रिटिश अमदानींत पुढे आलेल्या पंधरा मंडळींची नांवें:—

( १ ) दिवाण बहादुर लक्ष्मण जगन्नाथ वैद्य.
( २ ) रघुनाथ शिवराम टिपणीस, जज्ज.
( ३ ) दिवाण बहादूर वासुदेव माधव समर्थ.
( ४ ) रावबहादुर बाळकृष्ण आत्माराम गुप्ते.
( ५ ) सर रघुनाथ त्र्यंबकाजी सबनीस.
( ६ ) सर गंगाधर माधवराव चिटणवीस.
( ७ ) शंकरराव माधवराव चिटणवीस
( ८ ) सर महादेव भास्कर चौबळ.
( ९ ) जनार्दन दामोदर दीक्षित, जज्ज.
( १० ) त्रिंबक रामचंद्र कोतवाल, मेंबर ऑफ दि कौन्सिल, बडोदें.
( ११ ) प्रोफेसर शंकर आबाजी भिसे.
( १२ ) राम गणेश गडकरी ( गोविंदाग्रज ).
( १३ ) चिंतामण द्वारकानाथ देशमुख, आय्. सी. एस्.
( १४ ) नारायण माधव समर्थ, इंडिया कौन्सिल.
( १५ ) विनायक आत्माराम ताम्हणे, एम्. एस्. एस्. सी. साईल फिमिसिस्ट.

या ज्ञातीची पौराणिक माहिती स्कंदपुराणांतील सह्याद्रि खंडाच्या आधारें घेतली आहे ती अशी:—

परशुरामानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली; त्या वेळेस कांहीं राहिलेली क्षत्रिय मंडळी गहन अरण्यामध्यें जाऊन लपली. या युद्धामध्यें चंद्रसेन नांवाच्या एका क्षत्रिय राजाचा सर्व आप्तमंडळींसह वध झाला; त्यावेळीं त्याची गर्भवती स्त्री तेथून निघाली ती आश्रयार्थ दाल्भ्य ऋषीच्या आश्रमास गेली. ही बातमी परशुरामास कळली व तो ऋषीच्या आश्रमास गेला. ऋषीनें त्याचा सत्कार करून परशुरामानें गर्भास अभयदान द्यावें या अटीवर त्यानें ती स्त्री परशुरामाच्या स्वाधीन करण्याचें कबूल केलें. परशुरामानें ऋषीचें म्हणणें एका अटीवर कबूल केलें; ती अट ही कीं, चंद्रसेनाच्या भावी पुत्रानें क्षत्रिय वृत्ति चालवूं नये. ही अट ऋषीनें मान्य केली. यानंतर चंद्रसेनाच्या पत्नीस झालेला मुलगा दाल्भ्य ऋषीच्या आश्रमांत वाढला. नंतर तो पुढें लेखनवृत्तीनें आपली उपजीविका करूं लागला. या राजपुत्राचे जे वंशज झाले त्यांना चांद्रसेनीय कायस्थ असें म्हणूं लागले.

या ज्ञातीचा संक्षिप्त पूर्वेतिहासः—महाराष्ट्रांतील कोणत्याहि ज्ञातीचा प्राचीन इतिहास सँगतवार मिळणें शक्य नाहीं. या यावर्तीत ऐतिहासिक लेख चवदा किंवा पंधराव्या शतकाच्या पूर्वीचे बहुतेक सांपडत नाहींत. चांद्रसेनीय कायस्थ प्रभु ज्ञातीचा पूर्वेतिहास शिलाहारांच्या कारकीर्दीपासून सुरू होतो. त्या पूर्वीचा इतिहास पूर्वापार चालत आलेल्या कथा, ज्ञातींतील दैवतें व उपनांवें, धर्मविधि यावरून अजमावला पाहिजे. शिलाहारांच्या वेळीं देखील या ज्ञातीची लोकसंख्या एक हजारापेक्षां पुष्कळच कमी असली पाहिजे. चांद्रसेनीय कायस्थप्रभुज्ञाति हा एक पूर्वापार चालत आलेला संघ आहे; याच्या निरनिराळ्या प्रयाणामध्यें हा इतर ज्ञातींशीं मिश्र झालेला नाहीं ही गोष्ट सर्व समाजामध्यें एकत्र असलेल्या रीतीभाती, धर्मसमजुती, धर्मविधी यांवरून उघड होत आहे. कोंकणामध्यें ही ज्ञाति उत्तर हिंदुस्थानांतून आली यांत संशय नाहीं. या ज्ञातींत फार जुने जे कागदपत्र आहेत व कांहीं कांहीं प्रसिद्ध घराण्यांच्या जुन्या वंशावळी आहेत त्यांमध्यें चांद्रसेनीय कायस्थ ज्ञातीचीं कांहीं घराणीं मांडवगड संस्थान सोडून इकडे आलीं असें लिहिलें आहे. इकडे येण्यापूर्वी या ज्ञातींतील कित्येक घराण्यांत मोठमोठ्या अधिकाराच्या जागा चालत आलेल्या असाव्या व या घराण्यांतील मंडळींनीं पराक्रमाचीं कृत्यें केलेलीं असावीं; हें राजे, प्रधान, चौबळ, समर्थ, रणदिवे या व इतर नांवांवरून उघडच दिसतें. मांडवगड संस्थान धारजवळ होतें व मांडवगडचा दुर्भेद्य किल्ला मुसुलमानांनीं इसवी सन १२०५ मध्यें काबीज केला व तेथील लोकांची कत्तल उडविली. यानंतर सुमारें चारशें मंडळी, मुसुलमानांच्या राज्यांत राहणें बरें नाहीं व तेथें राहिलें असतां आपल्या धर्मास त्रास होईल म्हणून गुजराथमार्गानें कोकणांत आली. यावेळीं कोंकणांत शिलाहारांचा अंमल होता. मांडवगडच्या राज्याचा व शिलाहारांचा सलोखा असल्यामुळें व या धामधुमीच्या काळांत धाडसी व उत्साही मंडळींचा उपयोग होईल असें समजून त्यांनीं आपल्या राज्यांत या मंडळीस आश्रय दिला. यांपैकीं कांहीं मंडळी शिलाहारांच्या नोकरीस राहिली व कांहींनीं नवीन वस्ती करून जमिनी लागवडीस आणिल्या. या राज्यांत या ज्ञातींतील कांहीं मंडळी आपल्या कर्तबगारीनें उच्च पदास चढली. इसवी सन १३४७ त बहामनी राज्य स्थापन होईपर्यंत कोंकणांतला काळ अत्यंत अस्वस्थतेचा व धामधुमीचा गेला. या काळांत खरी सत्ता देशपांडे व देशमुख या मंडळीच्या हातांत होती. या ज्ञातीपैकीं बरीच मंडळी या अधिकारावर होती. अर्थातच या धामधुमीच्या काळांत त्यांच्या हातांत थोडी फार राजकीय सत्ता होती. बहामनी राज्याची स्थापना झाल्यानंतर कांहीं वर्षांनीं कोंकणप्रांत त्यांच्या ताब्यांत आला. कोंकणप्रांतास पूर्वीचे जे अधिकारी होते त्यांचे अधिकार बहामनी बादशहांनीं कायम राखिले व देशपांडे व देशमुख यांच्या मार्फत त्या भागांतील कारभार व वसुली पूर्ववत चालविली. बहामनी बादशहांचीं देशमुख,

देशपांडे वगैरेसंबंधाचीं सनदापत्रें अद्यापि कांहीं कुटुंबांच्या जवळ आहेत. इसवी स. १३९६ त महाराष्ट्रांत दुर्गादेवीचा दुष्काळ पडला त्यावेळीं महाराष्ट्रांतील कांहीं भाग अगदीं बेचिराख झाला. दुष्काळ संपल्यानंतर या प्रांतात पुन्हां वस्ती करून येथील जमीन लागवडीस आणणें अवश्य होतें कोंकणांतील कांहीं देशमुख मंडळींनीं ही कामगिरी स्वखुषीनें किंवा राजाज्ञेनें अंगावर घेतली व आपल्या भागाच्या लगतच्या सह्याद्रीच्या मावळ प्रदेशांत वस्ती करून तो भाग लागवडीस आणण्याचा प्रयत्न केला अशा रीतीनें मावळामध्यें या देशमुख व देशपांडे मंडळींची वस्ती झाली. ब्राह्मणी राज्य मोडल्यानंतर विजापूरच्या आदिलशाहीच्या ताब्यांत मावळांतील प्रदेश व कोंकणांतील कांहीं भाग गेला. अर्थातच या प्रांतांतील देशमुख व देशपांडे विजापूरच्या आदिलशाहीचे नोकर बनले. पुढें राजे शिवाजीराजे यांनीं जेव्हां स्वराज्यस्थापनेच्या कार्याला सुरवात केली तेव्हां या प्रभु ज्ञातींतील देशपांड्यांपैकीं प्रमुख व होतकरू दादाजी नरसू देशपांडे हे धैर्यानें पुढें आले व त्यांनीं राजे यांच्या साहसांत भाग घेण्याची व त्यांना मदत करण्याची शपथ घेतली. या कुटुंबानें दोनशें वर्षेपर्यंत मराठी राज्याची सेवा इमानेइतबारें केली. संभाजीच्या वेळीं मावळ प्रांतांत नेटानें लढणाऱ्या कृष्णाजी दादाजीपासून सातारच्या राज्याकरितां पार्लमेंटमध्यें भांडणाऱ्या रंगो बापूजींपर्यंत या कुटुंबांतील मंडळी आपल्या राजनिष्ठेला जागृत राहिली. बाजीप्रभु देशपांडे, मुरारबाजी, विश्वासराव नानाजी वगैरे मावळांतील देशपांडे, मंडळींनीं शिवाजीच्या राज्यस्थापनेच्या कार्यास मनापासून मदत केली व बाळाजी आवजी, दादाजी रघुनाथ वगैरे कोंकणप्रांतांतील मंडळीहि लवकरच शिवाजीस मिळाली. संभाजीच्या काळीं खंडो बल्लाळ, कृष्णाजी दादाजी, आवाजी विश्वनाथ, दादाजी रघुनाथ वगैरे मंडळी राज्याच्या संरक्षणार्थ मनापासून लढली. राजारामाच्या व ताराबाईच्या कारकीर्दीत खंडो बल्लाळ व त्याच्या ज्ञातींतील इतर मंडळी यांची कामगिरी इतिहासांत प्रसिद्ध आहे. शाहूराजे दक्षिणेंत आल्यावर या ज्ञातींतील मंडळी त्याच्या पक्षाला गेली. शाहूच्या मृत्यूनंतर बाळाजी बाजीराव पेशवे यांना सर्वाधिकार मिळविण्याच्या कामीं गोविंद खंडेराव यांनीं मदत केली. नानासाहेबांच्या ताब्यांत राज्यसूत्र गेल्यापासून व पेशवाईचा कारभार पुणें येथें सुरू झाल्यापासून सातारा नामशेष झाला. अर्थातच या ज्ञातीचें राज्यकारभारांतील वजन कमी झालें. पेशव्यांच्या दरबारांत सखाराम हरि गुप्ते, निळकंठ रामचंद्र वगैरे थोडी मंडळी उदयास आली. पण शाहूच्या मृत्यूनंतर या ज्ञातींतील मंडळींनीं महाराष्ट्र सोडून बडोदें, धार, नागपूर या प्रांतांत प्रयाण केलें आणि त्या ठिकाणीं त्यांच्यांतील बरीच मंडळी उदयास आली. बडोदें, धार, नागपूर वगैरे ठिकाणीं या वेळेपासूनच या ज्ञातीची वस्ती झाली. असा या ज्ञातीचा ब्रिटिश अमदानीपूर्वीचा इतिहास आहे.

या ज्ञातीवर एकंदर नऊ ग्रामण्यें झालीं त्यांची यादी नानासाहेब पुरंदरे यांच्या दफ्तरांत इतिहाससंशोधक राजश्री राजवाडे यांनीं खंड ६ मध्यें दिलेली आहे तीः—

( १ ) पूर्वी ग्रामण्य जोगाईचे आंब्यास जालें, ( शके १३९१) तेसमई निळकंठ गुरू गोसावी यांनीं काशीस जाऊन शंकराचार्य आणून समाधान केलें ( यासंबंधाचे कागदपत्र अस्तित्वांत नाहींत ).

( २ ) दुसरें ग्रामण्य कोंकणांत जालें तेसमयीं काशीस जाऊन पत्रें आणून निराकर्णे जालें (यांहि ग्रामण्याचे कागदपत्र अस्तित्वांत नाहींत ).

( ३ ) तिसरें ग्रामण्य चिटणिसाचे आवजी बल्लाळ यांचे मुंजीसमयीं रघुनाथपंती केलें. तें निराकर्ण गणेश जोशी दीक्षित शास्त्री टकले यांनीं केलें शके १५९१: ( यासंबंधाचें पत्र चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंच्या इतिहासाचीं साधनें यांत प्रसिद्ध केलें आहे ).

( ४ ) चवथें ग्रामण्य कल्याणप्रांतीं जालें. त्याजलों रघुनाथ पंडित अमात्यांचीं पत्रें नेऊन निराकर्ण केलें; शके १५९७.

( ५ ) पांचवें ग्रामण्य यमाजी शिवदेव यांनीं केलें. ते समयीं काशीहून ब्राह्मण व चिंतामण गुरुजनीं निराकर्ण केलें. शके १६६९. ( याबद्दलचीं पत्रें प्रसिद्ध झालेलीं आहेत ).

( ६ ) सहावें ग्रामण्य सदोबा भाऊसाहेबी उल्लेख केला. ते नानासाहेब पेशवे यांनीं मना केलें. भाऊसाहेब पानपतांत गत झाले ( या ग्रामण्याला दृश्य स्वरूप प्राप्त न झाल्यामुळें त्याचा उल्लेख कागदपत्रांत कोठेंहि आढळत नाहीं ).

( ७ ) सातवें ग्रामण्य नारायणराव बल्लाळ यांनीं केलें आठवे महिन्यांत मारले गेले, दादासाहेबी याद घेतली ती देविली सखाराम हरीस ( या ग्रामण्याचे कागदपत्र इतिहासप्रसिद्धच आहेत ).

( ८ ) आठवें ग्रामण्य माधवराव नारायण शके १७१४ ता॥ १७१८ काशीहून पत्रें सरकार श्रीमंतांस आलीं. नंतर ( आपाशास्त्री ) पंचाईत झाली. सोडचिठ्ठीचीं पत्रें बाजीराव रघुनाथ यांचीं झालीं. एक वेळ याद झाली, राहिली. दुसऱ्यानें पत्रें जालीं ( या ग्रामण्याचें काशीचें पत्र व बाजीराव रघुनाथ यांचीं आज्ञापत्रें प्रसिद्ध झालेलीं आहेत ).

( ९ ) नववें ग्रामण्य बाळाजीपंत नातू शके १७४५, शंकराचार्य स्वामीचीं पत्रें आनंदराव तासकर घेतलीं. निराकर्णे श्रीमंत बुवासाहेब यांनीं केलें. बाळशास्त्री विन जनार्दन शास्त्री व आबा पारसनीस होते ( यासंबंधाचीं सर्व पत्रें व शंकराचार्यांचीं आज्ञापत्रें प्रसिद्ध झालीं आहेत ).

[ रा. केशव त्रिंबक गुप्ते, सेक्रेटरी, चांद्रसेनीय कायस्थ प्रभु ऐतिहासिक मंडळी—पुणें, यांजकडून आलेली माहिती. ]

[ कायस्थ प्रभूंच्या आगमनमार्गासंबंधानें जें मत वर दिलें आहे, तें आम्हांस ग्राह्य नाहीं. ते मांडवगडाकडून आले असते, तर रस्त्यांत त्या जातीच्या अनेक वसाहती अस्त्या. त्या तशा नाहींत. त्यांची वस्ती मुख्यत्वेंकरून समुद्रकांठानेंच असल्यामुळें ते समुद्रमार्गानेंच महाराष्ट्रांत आले असावेत, असें आम्हांस वाटतें. ( सं. ज्ञानकोश ). ]

(२)पाठारे प्रभुः—इ. स. १९१४ च्या डिसेंबर महिन्यांत पाठारे प्रभु ज्ञातीनें घेतलेल्या खानेसुमारीवरून दिसून येतें कीं, ज्ञातीची एकंदर लोकसंख्या ४७३९ आहे. पैकीं २३९५ पुरुष व २३४४ स्त्रिया. इ. स. १९२४ सालच्या डिसेंबर महिन्यांत ज्ञातीकडून खानेसुमारी पुन्हां घेण्यांत आली. तीवरून एकंदर लोकसंख्या ४७४२ असून, पैकीं २४२१ पुरुष व २३२१ स्त्रिया आहेत यावरून जात संख्याक्षय पावत नाहीं असें दिसून येईल.

ज्ञातीचें मुख्य वस्तीचें स्थान मुंबई हें शहर आहे. येथें ज्ञातीची वस्ती सुमारें २५०-३०० वर्षांपासून आहे. त्यापूर्वी बरीच वस्ती साष्टी व अष्टागर वगैरे उत्तर कोंकण प्रांतांत होती. कांहीं कुटुंबें सुरत, अहमदाबाद, खेड, पंचमहाल वगैरे ठिकाणीं होतीं. एकंदर कुटुंबें हल्लीं सुमारें ८२९ आहेत. त्यांपैकीं सुमारें ६५४ कुटुंबें मुंबई शहर येथें राहत आहेत. बाकीचीं १५० कुटुंबें परळ, दादर, नायगांव, माहीम, वांद्रें, सान्ताक्रुझ, गोरेगांव, मालाड, बोरिवली वगैरे मुंबईच्या आसपासच्या भागांतून राहून असतात. आणखी बाकी राहिलेलीं सुमारें २५ कुटुंबें इंदूर, कराची, अहमदनगर, सुरत, बडोदें, पुणें, दक्षिणहैदराबाद, औरंगाबाद, कलकत्ता, भडोच, दिल्ली, अहमदाबाद, पिशावर, खामगांव, कोल्हापूर सोलापूर, मिरज, बनारस, वर्धा, विलायत वगैरे ठिकाणीं आहेत.

ज्ञातीमध्यें पंचायत अशी संस्था नाहीं, आणि पूर्वी केव्हांहि नव्हती. तथापि ज्ञातीसंबंधीच्या सर्व सामाजिक, धार्मिक, औद्योगिक वगैरे प्रश्नांचा विचार ज्ञातीच्या सार्वजनिक सभांपुढें होऊन बहुमतानें जे ठराव मान्य होतील ते अंमलांत आणले जातात. ज्ञातिसंबंधाच्या निरनिराळ्या प्रश्नांचा विचारविनिमय गेल्या ४५ वर्षांत ज्ञातिबांधवांनीं स्थापन केलेल्या निरनिराळ्या संस्थांतून होत असतो. आणि त्यावरून ज्ञातींतील आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व औद्योगिक गरजा लक्षांत घेऊन गरजवंत आणि निराश्रित लोकांना तावडतोब मदत करण्यांत येते. उदाहरणार्थः—( १ ) पाठारे प्रभु रिलिफ फंड.—ह्या संस्थेची स्थापना इ. स. १८८७ सालीं झाली. तिचें भांडवल हल्लीं दोन लक्ष रुपयांवर आहे व या रकमेच्या व्याजांतून आजपर्यंत सुमारें ७५ हजार रुपये ज्ञातींतील गरीब, असहाय्य व निराश्रित मंडळींना मदत करण्यांत आणि गरीब विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या देण्यांत खर्च झाले आहेत. ह्या कामीं दरमहा सुमारें ५०० रुपये मदतीदाखल खर्च करण्यांत येतात. ( २ ) पाठारे प्रभु चॅरिटीझ.—ही धर्मादाय संस्था १९०१ सालीं स्थापन करण्यांत आली. या संस्थेकडून ज्ञातीच्या मालकीचीं कांहीं देवळें, धर्मशाळा व गरीबांकरतां बांधलेलीं वसतिगृहें त्यांची व्यवस्था पाहण्यांत येते, व गरजूंची अडचण दूर करण्यांत येते. ( ३ ) पाठारे प्रभु सोशल क्लब आणि पाठारे प्रभु सोशल समाज.—ह्या दोन्ही संस्था १८८८ सालीं अस्तित्वांत आल्या, व सामाजिक, शैक्षणिक वगैरे बाबींचा खल होऊन ज्ञातिसुधारणेच्या कामाची दिशा निश्चित करण्यांत येऊन त्या सुधारणा अंमलांत आणण्याचे प्रयत्न करण्यांत येतात. तसेंच ज्ञातींतील अनिष्ट व अहितपरिणामी चालीरीतींचा प्रतिकार करण्यासंबंधानें मतसुद्धां तयार करण्यांत येतें. सदरहू संस्थांमधून साधारण स्वरूपाच्या अनेक प्रश्नांना हात होतो. त्याखेरीज इतर सामाजिक सुधारणा व धार्मिक वादग्रस्त प्रश्नांचा विचारविनिमय विशिष्ट प्रसंगानुसार ज्ञातीच्या सर्वसाधारण सभांतून होत असतो. ह्या खेरीज ज्ञातीवर एखादें संकट किंवा एखादा प्लेगसारखा दुर्धर प्रसंग ओढवला तर त्याचा प्रतिकार करण्याकरितां ज्ञातिबंधुभगिनींकडून त्या त्या प्रसंगीं द्रव्यनिधि गोळा करून संकटाला तोंड देण्यांत येतें. उदाहरणार्थ, प्लेगच्या सांथीच्या आरंभीच्या कांहीं वर्षांमध्यें हेल्थ कॅम्प व हॉस्पिटल्स या संस्था स्थापन करण्यांत आल्या व त्याचप्रमाणें स. १९१८-१९ सालांतलि एन्फ्लुएन्झाच्या सांथीमध्यें पुन्हा एक हॉस्पिटल उघडण्यांत येऊन ज्ञातींतील रोगग्रस्तांस योग्य वेळीं कोणत्याहि प्रकारचा मोबदला घेतल्याशिवाय मदत करण्यात आली. या प्रसंगीं ज्ञातींतील लहानथोरांनीं व भिषग्वर्यांनीं एकजुटीनें, धैर्यानें आणि मृत्यूची भीति मनांत बिलकुल न बाळगतां स्वयंसेवक व स्वयंसेविका या नात्यांनीं जे अविश्रांत श्रम केले ते खरोखर प्रशंसनीय व भूषणाई असून त्याबद्दल त्यांचा सरकारकडून योग्य गौरव करण्यांत आला.

ज्ञातीचीं देवळें, चाळी वगैरे खालीलप्रमाणें आहेतः—

| | देवतानाम व संस्थेचें नांव | ठिकाण | बांधणाराचें नांव |
|---|---|---|---|
| १ | श्रीव्यंकटेश | ठाकुरद्वार | पाठारे प्रभुज्ञाति |
| २ | रामचंद्र | रामवाडी | विठोबा कान्होजी |
| ३ | रामचंद्र | २ री फणसवाडी | केशव बापूजी |
| ४ | मारुती | भायखळा | जनार्दन पुरुषोत्तम |
| ५ | प्रभादेवी | माहीम | पा. प्रभुज्ञाति |
| ६ | महालक्ष्मी | ग्रँट क्यांडी | ,, |
| ७ | विठोबा | परळ | विठोबा माणकेश्वर |
| ८ | ठाकुरद्वार | माहीम | पाठारे प्रभुज्ञाति |
| ९ | श्रीमहेश्वरी | नवी वाडी | नवीवाडींतील पा. प्रभु रहिवासी |
| १० | महादेव | परळ | रामचंद्र भास्कर |

| देवतानाम व संस्थेचें नांव | ठिकाण | बांधणाराचें नांव |
|---|---|---|
| ११चंद्रमहेश्वर | परळ | डॉ दामोदर केशव |
| १२धाकलेश्वर | महालक्ष्मी | धाकजी दादाजी |
| १३महादेव,गणपती | वाळकेश्वर | राघोबा जीवाजी |
| १४घंटाळी | ठाणें | ,, |
| १५मारुती | मालाड | भास्कर सुंदरजी |
| १६मारुती | ब्रीच क्यांडी | लक्ष्मण हरिश्चंद्र |
| १७विठोबा | मुगभाट | विठोबा कान्होजी |
| १८गणपति | भुलेश्वर | वासुदेव विश्वनाथ |
| १९गणपति | गणेशवाडी | जनार्दन पुरुषोत्तम |
| २०राम | अनंतऋषीची वाडी | सुन्दर बावाजी |
| २१राम | कान्देवाडी | ,, |
| २२श्रीरामचंद्र | पालवरोड ठाकुरद्वार | विठोबा वासुदेव झावबा |
| २३धर्मशाळा | चौपाटी | पाठारे प्रभुज्ञाति |
| २४ ,, | सोनापूर | ,, |
| २५राधाबाई बिल्डिंग | भटवाडी गिरगांव | ,, |
| २६सरस्वतीबाई विनायक पांडुरंग-बिल्डिंग. | चौपाटी | ,, |
| २७प्रभु सेमिनरी | भाई जिवनजीची ग ल्ली,ठाकुरद्वार | ,, |

सदरहू स्थावर मिळकतींपैकीं बहुतेक मिळकतींची व्यवस्था ज्ञातींतील चॅरिटीज ( धर्मादाय ) संस्था पहात असते. आणि इतर मिळकतींची व्यवस्था प्रभु मालकांच्या वंशजांकडे किंवा पा. प्रभु ट्रस्टकडे आहे.

विवाहादि संस्कार बहुतेक ठिकाणीं कोंकणस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांच्या हातून होत असतात. कांहीं थोड्या कुटुंबांत यजुर्वेदी, वाजसनेयि, माध्यंदिन ब्राह्मणांकडूनहि विवाहादि संस्कार होत असतात. ज्ञातिसंबंधाचे सर्व प्रश्न ज्ञातच सोडवीत असते. धर्माच्या कामीं शास्त्राधार घेण्यासारख्या बाबी ज्ञातींत आजपर्यंत उद्भवल्या नाहींत. मात्र पेशवाईंत ज्ञातीच्या क्षत्रियत्वाविषयीं विनाकारण वाद उपस्थित करण्यांत आला होता. त्यावेळीं ज्ञातीनें कांहीं मुंबईकर विद्वान ब्राह्मणांचा सल्ला घेऊन श्रृंगेरी आणि संकेश्वर मठांच्या श्रीजगद्गुरूंचीं आज्ञापत्रें मिळविलीं. आणि तीं पेशव्यांच्या दरबारांत हजर करून त्यांनीं आपलें क्षत्रियत्व प्रस्थापित केलें. आणि वेदोक्त कर्में करण्याचा अधिकार ज्ञातीला आहे यावद्दल श्रीश्रृंगेरी आणि संकेश्वर मठाधिपतींचीं आज्ञापत्रें मिळविलीं आहेत.

चातुर्वर्ण्यव्यवस्थेंत ज्ञातीचें स्थान क्षत्रिय हें आहे. ह्या संबंधींचा निवाडा शृंगेरी मठाधिपति श्रीमत् शंकराचार्य यांच्या आज्ञापत्रानुरोधें आणि मुंबईंतील वे. शा सं. शास्त्रीमंडळींच्या संमतिपत्रान्वयें आणि साष्टीचे सरसुभेदार रामाजी महादेव यांच्या अभिप्रायाप्रमाणें ज्ञातितर्फे देण्यांत आला. म्हणजे ते पाठारे प्रभु शूद्र नसून पूर्ण क्षत्रिय आहेत असें ठरविण्यांत आलें.

वसईकर ब्राह्मण व पाताणे प्रभु यांच्यामध्यें वैमनस्य होण्याचीं कारणें:—पोर्तुगीज लोकांनीं हिंदुस्थानच्या पश्चिम भागांत १५१२ सालीं आपलें राज्य स्थापिलें. त्यांनीं पाताणे प्रभूंना आपल्या अंमलाखालीं असलेल्या प्रांतांत मोठमोठया जागा दिल्या व त्यांनीं जीं कामें करावयाचीं होतीं त्यांपैकीं एक काम म्हणजे वेठीचें काम करून घेणें हें होय व हें काम जर त्यांनीं कबूल केलें नसतें तर त्यांस जबरीनें बाटवून खिस्ती धर्मांत ओढून घेतलें असतें. करितां हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें राजाज्ञा ही शिरसावंद्य मानून आपल्या स्वतःच्या मर्जीविरुद्धहि त्यांना प्रजाजनांकडून वेठीनें हलकें सलकें काम करून घेणें भाग पडे. प्रभु पाताण्यांस नाइलाजास्तव आपणांकडून हीं कामें करून घ्यावीं लागत आहेत, ही गोष्ट त्यावेळच्या ब्राम्हणांनीं लक्षांत न घेतां प्रभु आपला अशा रीतीनें मुद्दाम छळ करीत आहेत अशी त्यांनीं आपल्या मनाची समजूत करून घेऊन प्रभूंबद्दल त्यांच्या मनांत द्वेषभाव उत्पन्न झाला व तो दिवसेंदिवस वाढत जाऊन ह्या दोन जातींमध्यें कायमचें वैमनस्य सुरू झालें. ह्या वैमनस्याचा परिणाम त्यावेळच्या पाठारे प्रभूंस कसा भोगावा लागला हें खालीं दिलेल्या वृत्तांतावरून कळून येईल त्यावेळीं कांहीं प्रभु कुळें मुंबईंत राहत होतीं. दादाजी लक्ष्याजीराव ह्या श्रीमंत प्रभु गृहस्थास मुलबाळ नव्हतें. म्हणून त्यानें मुंबई मुक्कामीं भुलेश्वर येथें १७०४ सालीं एक गणपतीचें देवालय बांधलें व गणपतीच्या मूर्तीची प्रतिष्ठापना करण्याकरितां त्यांनीं वसईकर ब्राह्मणांस न बोलावतां चित्तपावन आणि इतर ब्राह्मणांस बोलाविलें. ' हा हक्क आमचा आहे ' असें वसईकर ब्राह्मण म्हणूं लागले. परंतु त्यांचें म्हणणें प्रभूंनीं कबूल केलें नाहीं. त्यांनीं आपले राजगुरु खेडकर यांच्या सल्ल्यानें चेऊलचे धर्माधिकारी वेदमूर्ति चिंतामणी दामोदर पिटकर व इतर ब्राह्मण यांनां बोलावून त्यांच्या हस्तें सिद्धिविनायकाच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करून घेतली.

१७३९ सालीं चिमणाजी आप्पा यांनीं वसईचा किल्ला सर करून पोर्तुगीज लोकांचा अंमल त्या प्रांतांतून नष्ट केला व मराठयांचें राज्य प्रस्थापित केलें. त्यावेळीं पाठारे प्रभूंस पोर्तुगीजांचा धर्मच्छल असह्य होऊन त्यांनीं पोर्तुगीज राजसत्ताखालीं असलेला मुलुख सोडला आणि मराठयांच्या अंमलाखालीं असलेल्या प्रांतांत आपली वस्ती केली.

१७३९ सालीं कै. वा. दादाजी लक्ष्याजी यांच्या पत्नीनें त्रिंबकभट पाणशे यानां सिद्धिविनायकाच्या मूर्तीची पूजा करण्याकरितां बोलावून त्यास त्यांच्या ह्या पुण्यकार्याबद्दल कांहीं शेतजमीन व मालोडी नांवाची वाडी बक्षीस दिली. त्यामुळें वसईकर ब्राह्मणांचा प्रभूंबद्दल असलेला द्वेष वाढून

त्यांनीं मत्सरबुद्धीनें प्रभुलोकांबद्दल कांहीं खोटीं विधानें, वसईचे सुभेदार राजश्री शंकराजी केशव यांजपाशीं केलीं. त्यांपैकीं एकदोन खालीं देत आहों:—

(१) चेऊलच्या केशव दामजी नांवाच्या प्रभूनें पुनर्विवाह केला होता त्यामुळें इतर प्रभूंनीं त्यास वाळींत टाकलें, ही पुनर्विवाहाची चाल प्रभुजातींत रूढ झाली आहे असें खोटें विधान ह्या ब्राह्मण मंडळींनीं केलें.

(२) त्याचप्रमाणें बिंवदेवाबरोबर आलेल्या रजपूत क्षत्रियांचे हे प्रभू वंशज नाहींत असेंहि त्यांनीं दुसरें विधान केलें.

(३)प्रभु ज्ञातींतील लोक आपल्या घरीं पूजाअर्चा करण्यास वाटेल त्या ब्राह्मणास बोलावीत असतात व त्यांचे राजगुरू खेडकर यांनां देणग्या देऊन व त्यांनां जीविताची भीति घालून ते त्यांजकडून उपनयन व लग्नकार्य हीं वैदिक धर्मास अनुसरून करून घेत असतात आणि मंत्र व ब्रह्मगायत्री शिकण्याचा जो फक्त द्विजांनाच अधिकार आहे, हे सर्व प्रकार हीं प्रभुमंडळी खेडकर ब्राह्मणांकडून शिकून घेत असतात आणि हीं सर्व वैदिक कर्में खेडकर ब्राह्मणांस, प्रभु हे शूर व लढवय्ये लोक असून त्यांजपाशीं शस्त्रें असल्यामुळें आपल्या जीवितसुरक्षिततेसाठीं करावीं लागत असत असेंहि विधान प्रभुलोकांविरुद्ध करण्यांत आलें होतें.

याप्रमाणें वसईकर ब्राह्मणांनीं वरींच खोटीं विधानें करून तीं त्यांनीं वसईचे सुभेदार शंकराजी केशव यांजपाशीं सादर केलीं. सदरहू सुभेदारानें एक पंचायत बोलाविली. या सभेस पाताणे प्रभूंस आमंत्रण दिलें नव्हतें. उलट पाचकळशी; सोनार, भंडारी, कांसार आणि प्रभूंनीं ज्यांस वाळींत टाकलें अशा लोकांस आणि ज्यांनां प्रभूंच्या घरीं धर्मवृत्ति चालविण्याचें बंद केलें होतें अशा ब्राह्मणांस पाचारण केलें होतें. अशा प्रकारें ज्या लोकांनां प्रभूंच्या उत्पत्तीविषयीं व त्यांच्या धार्मिक हक्कांसंबंधीं मत देण्याचा कोणत्याहि प्रकारें अधिकार पोंचत नव्हता अशा लोकांचीं उपरिनिर्दिष्ट सभेंत मतें घेऊन सदरहू सुभेदारानें प्रभु लोकांनां प्रतिकूल असा निर्णय दिला, व या सर्व प्रकरणाचा रिपोर्ट सुभेदार साहेबांनीं श्रीमंत पेशवे यांच्या पुण्याच्या दरबारीं सादर केला. त्यावरून श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं १७४३ सालीं आज्ञापत्र काढून चेऊलचे धर्माधिकारी व अंमलदार यांस फर्मान केलें कीं, ब्राह्मणांनीं प्रभूंस ब्रह्मकर्म शिकवूं नयेत किंवा त्यांजकडे ब्रह्मकर्म करूंहि नये. जे ब्राह्मण या आज्ञेचें उल्लंघन करतील त्यांनीं श्रीक्षेत्र काशी येथें पापकर्म केलें असें समजलें जाईल व ते सरकारच्या शिक्षेस पात्र होतील आणि त्याबद्दल त्यांनां प्रायश्चित्त भोगावें लागेल. सदरहू आज्ञापत्रांत आणखी फर्माविलें होतें कीं, प्रभु लोकांनीं ब्रह्मगायत्री शिकूं नये व ब्रह्मकर्म आपल्या घरीं करूं नये.

वरील आशयाचें आज्ञापत्र सरसुभेदार रामजी महादेव याजकडे रवाना झालें व त्याच्या नकला मुंबई, चेऊल, वसई येथील प्रभु लोकांकडे व रेवदंड्याचे मोरोजी शिंदे नामजाडे यांजकडे पाठविण्यांत आल्या. सदरहू आज्ञापत्र 'ज्ञानोदय पत्रांत' तारीख २ नोव्हेंबर स. १८४६ रोजीं व 'पुणें ऑब्झर्व्हर' मध्यें तारीख १४ जुलै स. १८६५ रोजीं छापून प्रसिद्ध करण्यांत आलें.

या आज्ञापत्राची अंमलबजावणी होऊन कांहीं प्रभूंनां देहान्त शिक्षाहि देण्यांत आल्या व कांहीं प्रभूंनीं मोठे दंड भरून आपली सुटका करून घेतली.

येणेंप्रमाणें पाच वर्षे धर्माच्या बाबतींत प्रभूंचा अनावर छल झाल्यानंतर त्यांनीं साष्टीचे सुभेदार राजेश्री रामजी महादेव यांजपाशीं अर्ज देऊन श्रीमंत पेशवे यांच्या दरबारीं आपलें गाऱ्हाणें मांडलें. मोरोजी शिंदे नामजाडे यांच्या नोकरांकडून आपला विनाकारण अत्यंत छल होत आहे त्याची चौकशी व्हावी म्हणून त्यास अर्ज केला. त्यावरून राजेश्री रामाजी महादेव, श्रीमंत पेशवे यांचे कोंकणचे सर सुभेदार, यांनीं पुण्याच्या दरबारीं पत्र पाठविलें तें येणेंप्रमाणें:—

श्री.

श्रीमंत राजश्रियाविराजित राजमान्य राजेश्री (श्रीमंत सरकार बाळाजी बाजीराव पेशवे उर्फ नाना) साहेब अखंडित लक्ष्मी अलंकृत पुण्यनगरप्रभृति विराजमान प्रमुख प्रधान पेशवे.

सेवेशी पोष्य रामजी महादेव सुभेदार प्रांत साष्टी शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना विशेष सेवकास आज्ञापत्र मिति रवाना चंद्र २२ रबिलाखर सुरु सन आरवा, रुधिरोद्गारी नाम संवत्सरे शके १६६५ चें लिहिलें कीं, "पाताणे परभूंनीं शूद्रवत् सर्व कर्में आचरण करावीं इत्यादि," अशा लिखितार्थाप्रमाणें, मोरोजी शिंदे, हा चौल आणि साष्टी या प्रांतीं ह्या आज्ञेवरहुकूम प्रभूंवर सख्त चालवूं लागला.त्यास आज पांच वर्षे होत आलीं. याजमुळें त्यांचा फारच बलात्कार; बोभाटा व न्याय करावा. असा वारंवार ते प्रभूपुढें येऊन मजपाशीं म्हणतात:—याजकरितां अगत्य झालें, आणि तो न्याय मनास आणावा लागला. तो असा कीं, राजश्री शंकाजी केशव सुभेदार प्रांत वसई यांणीं कितीएक ब्राह्मण वसईस मिळविले, परंतु या प्रभूंस बोलाविलें नाहीं, आणि त्यांचें कसें मूळ आहे हेंहि शोधिलें नाहीं. म्हणून मी उरणच्या मुक्कामीं तपास केला त्या प्रभूंस आणि वसईकर ब्राह्मण यांस बोलावून न्याय करून पाहतां सारा गैरवाका आहे. तो असा कीं, मागलें फिरंगी राजवटेमुळें ह्या ब्राह्मणांनीं या प्रभूंवर धोंडावहिमा घेतला होता तो एक व लोभामुळें एकमेका ब्राह्मणांस महाकार्यांत मानाअपमान अधिक उणा प्राप्त झाला म्हणून द्वेष उत्पन्न झाला,अशीं दोनें ऐत कारणांमुळें या प्रभूंवर कर्मकांडाची हे आतां वाटाघाट करूं लागले आहेत. आणि या प्रभूंची पाहातां, सनातन

वहिवाट कर्मकांडी आहे. हें एक, हे प्रभू सुक्षत्रिय असे, श्री व्यासोक्तिग्रंथीं प्रमाण आहे हे दोन, आणि त्यावर श्रीजगद्गुरु शंकराचार्य स्वामींची संमति आहे हे तीन, असा निर्णय पाहतांच त्या सर्व ब्राह्मणांस मी विनंति केली कीं, सुखरूप तुम्ही या प्रभूंचे घरीं जाऊन पूर्ववत कार्यप्रयोजनें संपादावी हीच सेवकाची करद्वय जोडून विनंति असे. शके १६७० विभव नाम संवत्सरे, माहे चैत्र शुद्ध २, रवाना चंद्र दुसरा राविलाखर सुरूसन तिसाआर्बेनमयाअलफ. " ( अस्सल पत्र मोडी अक्षरांत आहे ).

सरसुभेदार साहेबांकडून प्रभु लोकांना मोरोजी शिंदे यांजकडून वाईट प्रकारें वागविलें जातें अशी तक्रार पेशव्यांच्या दरबारांत केली आहे. असे जेव्हां मोरोजी शिंदे यानें ऐकलें तेव्हां तो प्रभु लोकांना थोड्याशा सौम्यपणानें वागवूं लागला. शेवटीं १७८७ सालीं जेव्हां शृंगेरीचे श्रीमच्छंकराचार्य विरूपाक्ष विद्याशंकरभारती हे मुंबईस आले तेव्हां प्रभु लोकांनीं ( १ ) श्रीसह्याद्रिखंड ग्रंथ, ( २ ) वंशावळी, ( ३ ) प्रभुलोकांची राजसत्ता, ( ४ ) पाताणेप्रभु या नांवाची दुसरी क्षत्रिय जात नाहीं यावद्दलचे लेख, ( ५ ) प्रभुलोकांचे धर्माधिकारी यांना राजगुरु ही संज्ञा आहे यावद्दलचा उल्लेख, ( ६ ) श्रीमच्छंकराचार्य कोल्हापूरचे स्वामी यांचें संमतिपत्र, ( ७ ) प्रभुलोकांच्या उत्पत्तिसंबंधानें कांहीं विद्वान ब्राह्मणांचीं मतें, ( ८ ) राजा बिंबदेवाकडून मिळालेले ताम्रपट ( दानपत्र ) ह्या आठ प्रकारच्या पुराव्याच्या नकला श्रींच्याकडे रवाना केल्या आणि श्रींचें अधिकारयुक्त मत प्रभु लोकांच्या उत्पत्तीसंबंधानें मागितलें व प्रभूंनीं आपल्या घरीं इतःपर कर्में कोणतीं व तीं कोणत्या रीतीनें करावीत यावद्दल श्रींनीं आज्ञा करावी अशी विनंति केली. त्याखेरीज प्रभु लोकांनीं पेशवे दरबारकडून धर्मबाबतींत आपला फार छळ झाला म्हणून हकीकत सांगून श्रींच्या आज्ञेप्रमाणें वागण्यास आपण तयार आहोंत असें श्रींना विदित केलें. तेव्हां श्रींनीं सर्व कागद पत्र वाचून पुण्याच्या दरबारांत आज्ञापत्र पाठविलें तें येणेंप्रमाणें:—

श्रीविद्याशंकर.

| ० ॥ श्री ॥ ० |
|---|
| शृंगेरीश्रीविरुपाक्ष |
| विद्याशंकरभारति |

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्यवर्य पदवाक्यप्रमाण पारावारपारीण यमनियमासनप्राणायामप्रत्याहार ध्यानधारणासमाध्यष्टांगयोगानुष्ठान निष्ठांगरिष्ठतपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्न गुरुपरंपराप्राप्त षट्दर्शन स्थापनाचार्य व्याख्यान सिंहासनाधीश्वर सकल वेदार्थ प्रकाशक सांख्यत्रयी प्रतिपालक सकल आगमनिगमागमसारहृदये वैदिकमार्गप्रवर्तक सर्वतंत्रस्वतंत्रादि राजधानि कर्नाटक सिंहासन प्रतिष्ठापनाचार्य श्रीमद्राजाधिराजगुरु भूमंडलाचार्य तुंगभद्रातीर निवास ऋष्यशृंगपुरवराधिश्वर शृंगेरी विरूपाक्ष श्रीविद्याशंकरदेव ।दिव्य श्रीपाद पद्माराधक शृंगेरी विरुपाक्ष श्रीपादभिनवोदंड नृसिंहभारती स्वामीनांकरकमलसंजात श्रीमदभिनवविद्यारण्यभारतीस्वामिभिः—

श्रीवेदशास्त्रसंपन्नपारावारांभिज्ञेषु, पुण्यनगरप्रभृति तद्देशनिवासिषु, तथा मुंबापुर वसईप्रांताष्टागरराजापुर कुडलाष्टांतप्रभृति, कोंकणवासेषु, निखिलविद्वद्वृंदादियांसि, आज्ञा केली ऐशी कीं, हे पत्तनप्रभू बहुत वर्षे या प्रांतांत राहतात, यांचे येथें पूर्वापर सुरलित कार्यप्रयोजनें चालत असतां, यांचे शत्रुवर्गाही यत्न करून, गैरवाका समजाऊन, यांचे विरुद्ध पुण्याहून, पत्र आणलें, परंतु, यांचा न्याय व शोध करितां, कोणीच मनास आणिला नाहीं, उपरात कित्येक ब्राह्मणांहीं, आपले ठिकाणीं शोध करितां; त्यांची निशा झाली कीं, येरव्ही पत्तन प्रभू खरे, " याजकडेस लटका आरोप ठेवितात. " यावरून पुनः पूर्ववत् कार्यप्रयोजनें मुंबईंत, श्रीमंत पेशवे यांचें राज्यांत चालू लागली, यानंतर पुन्हां शत्रूंनीं उभारणी केली. त्यावरून राजश्री शंकाजी केशव सुभेदार प्रांत वसई यांहीं कितीएक ब्राह्मण वसईस मेळविले, परंतु पत्तनप्रभु यांसी बोलाविलें नाहीं व यांचें मूळद्दि शोधिलें नाहीं, उगेच शत्रुवर्गांचे सांगितल्यावरून, मुंबई व माहिमकर ब्राह्मणांसी पत्र लिहिलें कीं, " याचे घरीं कार्यप्रयोजनें चालवावयासी न जावें, " नंतर राजेश्री रामाजी माहादेव सुभेदार प्रांत साष्टी यांहि उरणचे मुक्कामीं, तपासितां, त्यांची निशा झाली कीं, सारा गैरवाका आहे, त्यावरून ब्राह्मणांसी आज्ञा केली कीं, " सुखरूप पत्तन प्रभूंचे घरीं जावें व पूर्ववत् कार्यप्रयोजनादि संपादीत जावीं, " त्याप्रमाणें ब्राह्मण वसई प्रांतांत, व साष्टी प्रांतांत तथा मुंबईस वर्तणूक करीत गेले, यासी कितीएक वर्षे जाहालीं, यावर पुन्हां शत्रू शहरपुण्यास जाऊन, गैरवाका समजाऊन, श्रीवेदमूर्ति, सकलशास्त्रसंपन्न, राजमान्यराजेश्री रामशास्त्री यांचें खोटें पत्र समस्त महाराष्ट्र ब्राह्मण मुंबई व माहिमकर यांसि आणिलें कीं, 'पत्तन प्रभू यांचे घरीं ब्राह्मण जातात ते ज्ञातीविरहित ". एणेंकरून पत्तन प्रभू वहूत श्रमी झाले, निमित्य कीं निरर्थक शत्रु वर्गांचे सांगितल्यावरून, व शास्त्रसंमत् न पाहातां, भलतेंच लिहितात, कां जर हे दुर्बल लोक व नित्यसेवक, किती वाद सांगतील, असे ते श्रमी होऊन, मजकडेस विनंती केली कीं, आमचा पुर्ता, " शोध करून, जो निर्णय चित्तास येईल ती आज्ञा करावी " त्यावरून प्रभु पत्तन यांचीं साधनें पाहातां सह्याद्रिखंडीं यांची उत्पत्ति सविस्तारें आहे, ती अवलोकन केली, तथा वंशावळ्या पुरातन आहेत, त्याहि मनास आणिल्या, व यांची चाल, व नांव पुरातन सर्व प्रांतांत प्रसिद्ध असें आहे कीं, पत्तन प्रभु दुसरे कोणी एके ज्ञातीस हें नांव, आईकण्यांत आलें नाहीं, व यांचे गुरुस राजगुरु प्रसिद्ध म्हणतात, व वरकड ज्ञातीचे गुरु आहे, त्यांस तर गुरु अथवा गुरु गोसावी म्हणतात. यानंतर श्रीशंकराचार्य स्वामी कोल्हापूरनिवासियाचा निर्णय अवलोकन केला. तथा थोर थोर पंडितांचे निर्णय सिक्यांनिसी अवलोकन केले, तथा, राजा बिंबाचेवेळेचीं जुनीं ताम्रपत्रें

आहेत, तीं अवलोकन केलीं. हें सर्व मनास आणितां, आज्ञा ऐशी केली कीं " हे पत्तन प्रभू सूर्य व सोमवंशी क्षत्रिय खरे, बरकड यांजवर शत्रुत्वें व राज्यमर्द, लटकाच आरोप ठेवितात. तो खरा लटका आहे. यांचे घरीं सर्व ब्राह्मणांनीं जाऊन कार्यप्रयोजनें, संपादित जावीं. " संवत् १८४३, शके १७०९ प्लवनाम संवत्सरे, माहे आश्विन शुद्ध १०, रवौ. इति-नारायणस्मृति (कर्नाटकी अक्षरी मुद्रा).

यानंतर ह्याच दिवशीं म्हणजे वरील आज्ञापत्राच्या मितीच्या दिवशीं श्रीमुंबापूरकर समस्त शिष्ट महाराष्ट्र ब्राह्मण १६ मिळून एक स्वतंत्र संमतिपत्र मराठी भाषेंत केलें तें असें:—" श्रीमुंबईपूरकर महाराष्ट्र ब्राह्मणांचें हें सद्भावें संमतिपत्र असें कीं, सकल वरील मजकूर शंकरस्वामींचे मराठी आज्ञापत्राचा तसा सविस्तारें लिहून व पाहून पुढें आणखी ह्या पत्रीं त्याही अधिक असें लिहिलें कीं " हे पाताणे प्रभु खरे शुद्ध क्षत्रिय आहेत असें आम्हांस बरें ठाऊक आहे हें आमचे परंपरेनें म्हणून संमत करितों. " [ या संमतिपत्रावर १६ जणांच्या सह्या आहेत. ]

हें संमतिपत्र तारीख १६ माहे फेब्रुवारी सन १७८८ रोजीं मुंबईंतील ' टॉऊन हॉल ' मध्यें रजिष्टर केलेलें आहे.

प्रभूंच्या वादाचा शेवटः—आतां श्रीवेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री घनःश्याम शास्त्री उपनाम जडये हे मुद्दाम सर्व प्रभूंचीं साधनें जीं शंकरस्वामींचे आज्ञापत्रीं लिहिलीं आहेत तीं समागमें घेऊन पुण्यास गेले, आणि श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांस समक्ष दाखविलीं. त्यांनीं तीं पाहतांच श्रीशंकर स्वामी जगद्गुरूचे त्या आज्ञापत्रास अभिवादन करून प्रभूंचे शत्रुवर्गास स्पष्ट सांगितलें कीं, " तुमचा सकल वाद खोटा आहे. " असें म्हणून आणि या शास्त्रीदादास म्हणाले कीं, " श्रीशंकर-स्वामींचे आज्ञेप्रमाणें सुखरूप या प्रभूंचे पुरोहितांनीं सर्व कार्यप्रयोजनें पूर्ववत्प्रमाणें प्रभूंचे घरीं चालवावीं, इत्यादि"— " परंतु त्यावेळेचे राजमदांतले फडणवीस ( म्हणजे बाळाजी जनार्दन भानु उर्फ नाना फडणवीस ) आदिकरून होते त्यांस हें बरें झालें असें वाटलें नाहीं. कां कीं, यांच्या पोटीं आदीचा डंश होय म्हणून त्याचा उघड तर असा आहे कीं, हा वाद उत्पन्न होण्याचें मुख्य कारण कोणतें झालें म्हणाल तर तें पहा—मागें फिरंगी राजाज्ञेवरून हे प्रभु—सकल ब्राह्मण आदिकरून जे जन प्रजा त्यावेळेस सन्मुख सांपडत त्यांस सरकारी वेठीस धरीत " असा हा फिरंग्यांचा बलात्कार होतसाता हे मुद्दाम प्रभू आम्हांस वेठीस नेतात असा हा वाजा वहिमा या प्रभूंवर घेतला होता—असें पूर्व वैर पेशव्यांचें मनीं स्मरत होतें. यावर शके १६६५ चे वर्षापासून जे या प्रभूंचे शत्रू असत त्यांचे सांगीवर बाळाजी बाजीराव इत्यादिकांहीं त्या वैरामुळें न्याय. व राजनीतिशास्त्र न पाहतां वेळोवेळां. पुण्याहून पत्रें सिक्यानिशीं सकल ब्राह्मणांस लिहिलीं होतीं. तीं अशीं कीं " या प्रभूघरीं पूर्ववत्प्रमाणें कार्यप्रयोजनें करूं नये इत्यादि. " त्यांतील कांहीं पत्रें हल्लीं लोक-संग्रहीं उपलब्ध आहेत. आणखी त्या वैरामुळें राजमदानें पेशव्यांहीं कित्येक प्रभूंस तर देहान्त प्रायश्चित्त दिलें. कां कीं, हे आपले प्रजारूप आहेत. त्यांची दाद कोठून लागेल म्हणून असे स्वधर्मार्थी मार्गे हे प्रभू बहूत कष्टी झाले. आणि आतां तर त्या दुःखाचा विसर या प्रभूंस पडला आहे. अद्यापि त्या मतानुसारी कांहीं ब्राह्मण आहेत. परंतु तो वाद तर दोन वेळां आधींच तुटला. प्रथम तर ब्राह्मण-ब्राह्मणांहीं मिळून निर्णय केला. नंतर पुन्हां राजश्री रामाजी महादेव सुभेदार यांहीं उरणचे मुक्कामीं भरसभेंत निःपक्षपातानें न्याय केला आणि आतां श्रीशंकरस्वामींहीं तर त्या वादाचा उघड फडशा केला तो पहा. त्यांचे त्या आज्ञापत्रीं आणखी धर्मसंबंधीं तर श्रीजगद्गुरु संमतिपुढें इतर संमति रद्द होत. कां कीं त्यांचें संमत जगन्मान्य आहे म्हणून याजकरितां त्या शास्त्रीदादाहीं या प्रभूंचा अधिकार त्या पेशव्यास दाखवून व त्यांजकरवीं त्या भर सभेंत सन्मान आपला घेऊन असा तो वाद भंग करून ते मुंबईस परत येते झाले आणि ते म्हणाले " समस्त विपन्निर्विषम् " त्यावेळीं प्रभुज्ञातास फार फार आनंद झाला

पाठारे प्रभु यांच्या क्षत्रियत्वासंबंधाची एक दुसरी हकीकत अशी आहे कीं, शके १६४८ वर्षी श्रीविद्याशंकर भारती हे मुंबईस आले होते. तेव्हां जे प्रभु होते ते सर्व मिळून त्या स्वामीस प्रार्थना करिते झाले. ते असें कीं, " स्वामी, आम्ही श्रीसूर्यवंशी क्षत्रिय आहोंत, आणि त्या वर्णाश्रमधर्मेकरून अद्यापि चालतों व लिहिण्यास असें लिहितों कीं आपलें नांव, गोत्र आणि उपनांव अमुक आहे. परंतु हा अवघा निर्णय कोणते ग्रंथांत आहे तो स्वामींहीं कृपा करून आम्हांस सांगावा. " तेव्हां स्वामी म्हणाले कीं, " हें तुमचें सकल सविस्तर कथन श्रीसह्याद्रीखंडीं आहे, असे ते बोलून त्यांणी संमतपत्र करून दिलें तें हें.

श्रीशृंगेरीपुरमठकर शंकर स्वामींचें हें प्रथम संस्कृत संमत पष्ठश्लोकी पत्र ॥ १॥ शके १७०१.

श्रीशंकर.

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्यरिपड्वर्गदमनपूर्वक सद्-गुणगणभूषणभूषितपदवाक्यप्रमाणपारावारपारीण यमनियमासन प्राणायामप्रत्याहार-ध्यानधारणसमाधिपराष्टांग-योगचिरपक्षतिसंततसादरत-त्परलधश्वक्रवार्तत्वावधिन्नस--कलदुष्टाशिक्षापूर्वक शिष्टाचार श्रुतिस्मृत्यनुसरणसंद्रमवर्त्म संप्रदायप्रवर्तकाचार्याखिल दुर्वादिमतखंडनवत्वाछिन्नपण्मत-स्थापनाचार्यामाद्यविछिन्नगुरुपरंपरागतं निखिलवेदवेदांतशास्त्र-प्रणीत प्रसंगोत्तमव्याख्यानपांडित्यावछिन्नाव्याहतपड्गुणैश्वर्य-संपन्न श्री मच्छंकेश्वरादिमठसिंहासनाधीश्वर श्री. ६

| |
|---|
| ०॥श्री॥० |
| अनेकशक्तिसंघट्टप्रकाश लहरीघनः । ध्वांतध्वंसो विजयते विद्याशंकरभारती |

यतिवरकरकजजश्री ६ श्रीनरसिंहभारतितींद्राः सर्वगुरव; ॥ श्रीशंकरभारतीय ॥

—श्री—

सकलविद्वद्वृंदादि निखिलाधिकारीजनप्रति नारायणस्मरणपूर्वक नैरंतर्यावच्छिन्नमंगलचिंतनाशिषयंति । भोजनास्मत्समीपे पाठारीयप्रभुजातिविचारोयंभूत् ॥ स्कंदपुराणे आदिरहस्ये सह्याद्रिखंडे गणेशेश्वरसंवादे षड्विंशतिसकाशात्पंचात्रिंशतिपर्यंताध्यायमध्ययोवस्तुदनुसारेण । कोसोभावो येनविचार इत्याकांक्षायां तत्रायंश्लोकाभिप्रायः ॥ श्रीरामवंशःरश्वनाश्वपतिनाम भूरस्य पुतानासन् भृगुप्रसादेन भारद्वाजादि विश्वामित्रांतद्वादशऋषिभ्यःसकाशात् द्वादशमंत्राणामुपदेशोभूत् ॥ तत्प्रभावेन द्वादशगोत्रजाः द्वादशपुत्राः अभवन् ॥ ततो वंशवृद्धिरभूत् ॥ सतीर्थयात्राप्रसंगेन पैठीणसीपत्तने दानादिकर्तृत्वाभिनिविशेनागतस्यापि गुरोर्नसन्मानितं ॥ तेन कारणेन भृगुणा संशप्तस्ते वंशनाशःस्यादिति ॥ पश्चाद्विनयपूर्वकतत्प्रार्थनेन प्रसादितस्तद्गुरुः ॥ मम वाक्यं न वृथा स्यात् परंतु तव शरणप्राप्तत्वात्त्वद्वंशयाश्चैवराजानोनिर्वीर्याराज्यहीनगाः ॥ आर्यं प्रभुत्वंतेषांचैलीपीका जीवनं भवेत् ॥ पाठारीयाः प्रसिद्धास्ते पत्तनाख्याभवंतुवा । प्रभूत्तरपदेतेपापत्तनाःप्रभवश्चत इति ॥ एतेन तेषा सामान्यस्वरूपान्वयविकृतिपूर्वक पाठारीय प्रभूत्वाख्य सामान्यांतरप्राप्तत्वात् ॥ वेदोक्तानुसार श्रीमत्पाराशर्यभगवत्स्मोनुसरणं यागादियजनं षट्कर्मनिरतं निमित्तीकृत्य वेद समाख्याध्ययनं यथोक्तपथात्मीयादानप्रतिग्रहौच सर्वेप्येते संत्येवेत्यतः क्षत्रियास्तुतिकर्मिणि इत्येतत्युक्त्या तेषां वेदोक्तानुसरण व्यासभव मार्गोक्त कर्मचतुष्टयाधिकारोस्तीति सर्वमिदं विमृश्य विदुषोऽनुवदंतेत्यस्मदाज्ञानिश्चये नैवावगंतव्या ॥ श्रीरस्तु ॥ विकार्यब्दे शुचिसिते द्वादशांबुधवासरे ॥ एतत्प्रभुवचोभिश्च सद्वचोभिविलेखनं ॥ आज्ञोयमुल्लसति ॥इत्यलम्॥

शके १७१० मध्यें श्री करवीरमठकर शंकर स्वामी यांचें दुसरें संस्कृत संमत पत्र मिळालें तें.—

श्रीशिवशरणम्.

अस्तिदक्षिणस्यांदिशिप्रभुपदवाच्याः केचित्द्विविधाःकायस्थप्रभुवः पत्तनप्रभूवश्च × × × तत्र पत्तनप्रभूणांतु संस्काराचारजीवीकासंदेहप्राप्तः श्रीस्कंदपुराणांतर्गत सह्याद्रिखंडे पर्यालोचनया निर्णयाः ॥ तद्यथा पत्तनप्रभूणां पाठारीयतीनामंतरविषये श्रीगणपतिप्रश्ने माहादेवोत्तरोत्तम् यथा श्री अश्वपतिनामाभूपाः सूर्यवंशः पैठणे दानादिप्रसंगेनव्यक्तः ॥ समागतंभृगुमुनिमयिनसंश्वकाश ॥ ततो भृगुः राज्यहानिवंशनाशाभ्यां तंशशाप ॥ ततोराजामुनिंसोगतः कोपोमुनिस्तमनुजागृहं ॥ उवाच मुनिश्रेष्ठोराजानंदानतत्परं ॥ राजन्मेवृथावाक्यं भविष्यतिन संशयः ॥ त्वमेवशरणमांपन्नोदेशवृद्धिर्भविष्यति ॥ तद्वंशजाश्चराजानोनिःवीर्याराज्यहीनगाः आद्यप्रभुत्वं तेषांवैलीपिकाजीवनंभवेत् ॥ पैठीणे पत्तनेशप्ता मया कोपवशात्किल॥ पाटारीया प्रसिद्धास्ते पत्तनाख्याभवंतुच ॥ प्रभूत्तरपदंतेषांपत्तनप्रप्रवश्चये ॥ इत्यादिवचोनिश्चयविचारेण पाठारीयप्रभूणां परपूर्याणां पत्तनप्रभूणां शुद्धक्षत्रियत्वं जातिमतया क्षत्रियवर्णविहिताचारसंस्कारादिकं सर्वंभवत्येवेति प्रतिभाति यद्यपि क्षत्रियाणां मायुः प्रधानजीविकेतिक्षत्रियजीविताद्यैनि वाक्येन धर्मनिर्बंधेषु विहिता तथापि लीपिकाजीवनं भवेदिति भृगुवाक्येन तामपोह्य लीपिकाजीविकेतिदिक्॥ किंच क्षत्रियाणांगर्भाधानादि संस्कारादिकं ॥ ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्रामुख्यवर्णास्त्वाद्यास्त्रयोद्विजानिषेकाद्याःस्मशानांतास्तेषांवैमंत्रतः क्रियाः इत्यादियाज्ञवल्क्यादिवचोभिः समंत्रकार्यंभवति इतीज्याध्यायनंदानादि वैश्यस्यक्षत्रियस्यच इत्यादि याज्ञवल्क्यवचनप्रतिपादितं संगच्छेत् ॥ श्रीमत्सूर्यपुरेविहिताश्वप्रकाशानंदेनसंमती ॥ तत्समये श्रीमन्नृपविक्रमार्कसंवत १८४४ तथाच नृपभूप शालिवाहान कृत शाके १७१०कलिक नामसंवत्सरे शुभकारि जेष्ठमासे कृष्ण पक्षे तिथौ सप्तम्यांगुरोयांस्तुगुर्जर ब्राह्मणस्य संमतं॥

[ या संमतिपत्रावर ४० इसमांच्या सह्या आहेत. ]

पाठारे प्रभु ज्ञातीची खानेसुमारी सन १९१४ च्या डिसेंबर महिन्यांत घेण्यांत आली. त्या रिपोर्टांतील शिक्षणाबद्दल माहिती प्रसिद्ध केली आहे, ती येणेंप्रमाणेः—प्रभु लोकांची संख्या ४७३९ आहे; पैकीं २३९५ पुरुष व २३४४ स्त्रिया आहेत. २३९५ पुरुषांपैकीं २१३०, म्हणजे शेंकडा ८८.९ मराठी जाणणारे आहेत, आणि १८११ म्हणजे शेंकडा ७५.६ इंग्रजी जाणणारे आहेत व २३४४ स्त्रियांपैकीं १९५२ म्हणजे शेंकडा ८४.५ मराठी शिकलेल्या आहेत, व ६०० स्त्रिया म्हणजे शेंकडा २५.० इंग्रजी शिकलेल्या आहेत. म्हणजे लहान मुलांची संख्या वजा केली तर प्रत्येक स्त्रीपुरुष सुशिक्षित आहे असें दिसतें. या ज्ञातींत उच्च शिक्षण घेतलेले, बडे सरकारी नोकरवाले, डॉक्टर, बॅरिस्टर वगैरे लोक आहेत व कांहीं स्त्रियांहि शिक्षकिणी, नर्स, उद्योगधंदे वगैरेंत गुंतलेल्या आहेत.

प्रभु ज्ञातीच्या स्थावर मिळकतीमध्यें जमीदाऱ्या, जमिनी, घरें, वाड्या, चाळी, वगैरे मिळकती अनेक ठिकाणच्या एकंदर २१७ आहेत.

ज्ञातिसंबंधाचे कागदपत्र प. वा. शामराव मोरोजी नायक यांनीं पुस्तकरूपानें छापून प्रसिद्ध केले आहेत. अस्सल कागद एके ठिकाणीं मिळणें शक्य नाहीं.

पाठारे प्रभु हे सूर्यवंशी व सोमवंशी क्षत्रिय आहोंत असे म्हणतात. त्यांस ‘ पाताणे ’ प्रभु असेंहि म्हणतात. ‘पाताणे’ ह्या नांवासंबंधानें दंतकथा अशी आहे कीं,पाठारे प्रभु हे अश्वपति व कामपति ह्यांचे वंशज आहेत असें स्कंदपुराणांतील सह्याद्रिखंडांत लिहिलें आहे. अश्वपति राजानें भृगुऋषींचा अपमान केल्यामुळें ऋषींनीं राजास शाप दिला कीं तुझ्या वंशजाच्या हातची राजसत्ता जाऊन त्यांच्या हातांत लेखणी येईल आणि पाठारीयप्रभु हें नांव जाऊन त्यांस ‘ पत्तनप्रभु ’ असें नांव मिळेल. ह्या शापावरून मूळचे पाठारेप्रभु हे राज्यपदावरून ‘ पतन ’ पावले, आणि त्यामुळें त्यांस ‘ पत्तन ’, ‘ पतन ’ अथवा ‘पाताणे’ अशी संज्ञा प्राप्त झाली. वास्तविक ‘ पाठारे ’ आणि ‘ पाताणे ’ हीं दोन्हीं नांवें स्थलदर्शक आहेत हें खालीं नमूद केलेल्या ऐतिहासिक पुराव्यावरून

दिसून येतें. पाठारे प्रभु हे प्रथमतः इंद्रप्रस्थाजवळ असलेल्या पठारावर रहात होते. 'पठार' हा उत्तर हिंदुस्थानांतील एका पर्वताचा सपाट पृष्ठभाग. असून त्याच्या चतुःसीमा येणेंप्रमाणें आहेतः—उत्तरेस यमुनानदी, दक्षिणेस विंध्याद्रि पर्वत, पश्चिमेस अरवलीची रांग आणि पूर्वेस चंबळ नदीचें खोरें. पर्वताच्या सपाटीस कुश्वागर अथवा श्रीरामचंद्रपुत्र कुश ह्याचें नगर असें म्हणत असत. आणि ह्या पठारावर राहणाऱ्या प्रभूंना पाठरीय म्हणूं लागले. पाठारीय याचा अपभ्रंश पाठारे असा झाला. या पठारें प्रदेशांतून प्रभूंचीं कांहीं कुळें हळूहळू आजूबाजूंच्या प्रदेशांत म्हणजे हस्तिनापूर, नागावाज, राजपुताना, मारवाड, गुजराथ, काठेवाड, प्रभास उर्फ सोमनाथपाटण, अनहिलवाडापाटण, चांपानेर आणि मुंगीपैठण व पन्हाळा येथें येऊन राहिलीं. म्हणजे त्यांनें स्थलांतर उत्तरेकडून होऊन तें राजपुताना, गुजराथ आणि काठेवाड या प्रदेशांतून दक्षिणेकडील पैठण ह्या शहरापर्यंत झालें. सदरील शहरांपैकीं नागावाज अथवा नागोर ही रजपुतांची प्रसिद्ध राजधानी होती; अनहिलवाडपाटण ही सोळंकी व चालुक्य राजांची राजधानी होती. पाठारे प्रभु दक्षिण पैठणाकडील भागांत येऊन राहिल्यानंतरहि ते पुन्हां कालचक्राच्या फेऱ्यांत सांपडून तेथूनहि स्थानभ्रष्ट झाले. त्यावेळीं पाठारे प्रभूंचीं कांहीं कुळें गुजराथेंत कायमची वस्ती करून राहिलीं होतीं. १०२४ सालीं जेव्हां महंमद गिझनी यानें सोमनाथाच्या देवळावर स्वारी केली तेव्हां ह्या देवालयाचें रक्षण करण्यासाठीं गुजराथच्या विंघराजाबरोबर कांहीं प्रभु सोमनाथ पाटण येथें आले. तेथें विंघराजाच्या हातून त्यांचा पराभव होऊन ते अनहिलवाडापाटण ह्या राजधानींत आले आणि ह्या पाटण शहराच्या आजूबाजूच्या भागांतून मुक्काम करून राहिले. त्यावेळीं पराभूत झालेल्या लोकांपैकीं कांहीं प्रभु गुजराथ व सोमनाथपाटण सोडून जलमार्गानें उत्तर कोंकणांत आले आणि चौल शहरीं मुक्कामास राहिले. त्यावेळीं चौल हें हिंदुस्थानांतील व्यापार उदीमाचें प्रख्यात शहर गणलें जात असे. प्रभु उत्तर कोंकणांत येऊन राहिले होते यासंबंधाचें लहानसें वर्णन वेलजी नांवाच्या प्रभूनें लिहिलेल्या शिलालेखावरून स्पष्ट दिसून येतें. (मुंबई जिऑलॉजिकल सोसायटी, भाग १ ला. इ. स १८३६). शिलाहार राजांच्या कारकीर्दीत उत्तर कोंकणप्रांतांत लिहिलेल्या कांहीं शिलालेखांवरून असें दिसून येतें कीं शिलाहार राजांच्या कांहीं मंत्र्यांचीं आणि अंमलदारांचीं उपनांवें हीं प्रचलित पाठारे प्रभूंच्या उपनांवांसारखींच होतीं, किंबहुना तींच होतीं; आणि ह्या शिलाहार राजांच्या कारकीर्दींत कांहीं पाठारे प्रभु, कायस्थप्रभु आणि यजुर्वेदीय ब्राह्मण उत्तर कोंकणांत वसाहत करून राहिले असेंहि ह्या शिलालेखावरून कळून येतें. ( मुंबई सिटी गॅझेटियर, भाग २ रा, पृ. १३ व १४ ). पुढें इ. स. १२८८ मध्येंहि कांहीं प्रभुकुळांचें दक्षिण पैठणाहून स्थलांतर झालें त्यावेळीं रामराजा नांवाचा दक्षिण पैठणचा एक मांडलिक राजा होता. सदरहु सालीं अहंमदशाह नांवाच्या मुसुलमान राजानें रामराजाचा पराभव करून त्यास ठार मारलें; आणि ह्याच सुमारास त्याच्या पदरचीं प्रभुकुळें दक्षिण पैठण सोडून दक्षिण बाजूच्या भागांत म्हणजे देवगिरी, जुन्नर आणि गुजराथ येथें जाऊन राहिलीं आणि त्यांपैकीं थोड्या कुळांनीं उत्तर कोंकणांत जाऊन वस्ती केली. हा रामराजा पाठारे प्रभु ज्ञातीचा मूळ पुरुष होय. त्या विषयींची सविस्तर माहिती आणि वंशावळ कौस्तुभचिंतामणि नांवाच्या ग्रंथांत दिली आहे ( मराठी रिसायत, भाग १ ला, पान ३२ ). त्यापुढेंहि आणखी एकदां पाठारे प्रभूंचें गुजराथेंतून उत्तर कोंकणांत स्थलांतर झालें. तो वेळ म्हणजे इ. स. १२९४ साल हें होय. ह्या वर्षी अल्लाउद्दीन खिलजी यानें गुजराथच्या स्वातंत्र्याचा नाश केला. त्यावेळीं बिंबदेव अथवा बिंबराजा याजबरोबर ६६ प्रभुकुळें गुजराथेंतून निघून उत्तर कोंकणप्रांतीं आलीं आणि तेथेंच तीं कायमची वस्ती करून राहिलीं. एकंदरीनें, पाठारे प्रभु कुळें उत्तर हिंदुस्थानांतील इंद्रप्रस्थाहून निघून राजपुताना, काठेवाड, व गुजराथ या प्रांतांतून वस्ती करून खालीं उतरत दक्षिणपैठणशहरीं आलीं. आणि पुन्हां गुजराथेंत परत फिरून तीं कोंकणप्रांतांत आलीं.

ह्या सर्व हकीकतीवरून असें दिसून येतें कीं राजा बिंब याचा हस्तिनापूर, नागावाज, चांपानेर, मुंगीपैठण आणि पन्हाळे ह्या पांच पैठणांच्या राजवंशाशीं संबंध होता. त्याजबरोबर सगेंच प्रभुकुळें ह्या पाच गांवांहून आलीं; इतकेंच नव्हे, तर कांहीं कुळें नेरणें, दौलताबाद ( देवगिरी ), अनहिलवाडा, काठेवाड, राजपुताना वगैरे ठिकाणांहून येऊन त्यांनीं आपली शेवटची कायमची वस्ती उत्तरकोंकणप्रांतांत केली. त्यांच्याबरोबर चाकरमंडळी वगैरे सर्व परिवारहि होता. कोंकण प्रदेशांत हीं पाठारे प्रभूचीं कुळें कायमचीं नतनदारहि झालीं; उदाहरणार्थ, चेऊल, येकसर, कोंदिवटे, दईसार, शाहार, फोफिवरें, अंधेरी, भांडूप, मरोळ, वानरे, निळापुर, पवळे, मालाड, सालवण, कळवे, कणेर, माहीम, ठाणें वगैरे. ह्या प्रभु कुळांचीं ज्या ज्या ठिकाणाहून स्थलांतरें झालीं त्या त्या भागांतील भाषा व चालीरीतीहि त्यांनीं आपल्याबरोबर आणल्या होत्या. कोणत्याहि कुळाचें पूर्वकालीन वसतिस्थान नक्की करण्यास भाषेची आणि चालीरीतींची बरीच मदत मिळते. दोन तीन पिढ्यांपूर्वी पाठारे प्रभु-कुटुंबांतून जी भाषा बोलण्यांत येत असे त्या भाषेंत राजपुतानी, काठेवाडी, मारवाडी आणि गुजराथी शब्दांचा बराच भरणा असे. अद्यापिहि पाठारे प्रभूंच्या अगदीं घरगुती भाषेंतून काठेवाडी, मारवाडी आणि गुजराथी शब्द बरेच आढळून येतात. कोंकणांतील भाषेचे कांहीं अशुद्ध प्रकारहि पाहण्यांत येतात. सर्वांत गुजराथी शब्दांचा जास्त भरणा आहे हें सहज कळून येतें. तुलनेसाठीं कांहीं शब्द पुढें देत आहे—

'बुंदाळा' ( भांड्याला बाहेरून दिलेलें राखेचें लेपण ) हा शब्द शुद्ध गुजराथी आहे; " बुंदुं = तळ, 'आळो' =

मातीचें किंवा राखेचें लेपण. "मोळली " ( विळी ) हा शब्द सुद्धां शुद्ध गुजराथी आहे; मोळवुं = (भाजी) चिरणें. आमचे लोक अद्यापि गुजराथी लोकांप्रमाणें 'दूधवाळा','भाजी-वाळा' असें म्हणतात. 'दूधवाला' असें म्हणत नाहींत.

याप्रमाणें प्रभु लोकांच्या भाषेंत अद्यापि बरेच गुजराथी शब्द आहेत. भाई, नानाभाई, मोटाभाई, बेनाबाई हीं तर विशेषनामें होऊन राहिलीं आहेत. तरी स्थलसंकोचास्तव आणखी शब्द येथें देतां येत नाहींत. वर दिलेले शब्द जरी थोडे आहेत तरी पाठारे प्रभूंचें मूळस्थान शोधून काढ-ण्याच्या कामीं त्यांचा बराच उपयोग होतो.

पाठारे प्रभु " खाकरा " शब्द भाकरी शब्दाबद्दल वाप-रतात, तो गुजराथी भाषेंत कोठेंहि सांपडत नसून फक्त काठेवाडांत सांपडतो. आणि त्यावरून ते एकेकाळीं काठेवाडांत रहात होते असें व्यक्त होतें; कारण ज्ञातींतील सर्व माणसें एकाएकीं एखाद्या खाण्याच्या पदार्थाला दुसऱ्या लोकांच्या सहवासानें कधींहि एखाद्या नांवानें संबोधीत नस-तात. तेव्हां हा असला महत्त्वाचा शब्द अद्यापि प्रभुज्ञातींत रूढ आहे. ह्यावरून पाठारे प्रभु हे काठेवाडांत रहात होते हें सिद्ध होतें. याचें पुष्टीकरण आमच्या पागोट्यावरून होते. पुढें प्रभु काठेवाडांतून गुजराथेंत येऊन तेथें बराच काळ राहिले, आणि गुर्जरांच्या सहवासानें त्यांनीं हळूहळू त्यांचे बरेच शब्द उचलले. तसेच पुढें महाराष्ट्रीयांच्या दीर्घ सहवासानें त्यांच्या भाषेंतील गुजराथी शब्द बहुतेक साफ जाऊन त्यांच्या ऐवजीं मराठी शब्द आले व जे थोडे गुजराथी किंवा काठे-वाडी शब्द राहिले आहेत ते देखील कालांतरानें जातील.

त्याचप्रमाणें प्रभूंच्या भाषेंत कांहीं मारवाडीहि शब्द आहेत, ते गुजराथी किंवा काठेवाडी भाषेंत कोठेंहि सांपडत नाहींत. मग हे शब्द त्यांच्या भाषेंत कसे आले ? प्रभु गुज-राथेंत असतांना त्यांनीं आजूबाजूस राहणाऱ्या मारवाडी लोकांचे शब्द घेतले कीं काय ? पण असें असतें तर ते दुसऱ्या गुजराथी लोकांच्या भाषेंतहि सांपडले असते. ते फक्त प्रभूंच्या भाषेंतच तेवढे कां सांपडावे? ह्याला समाधान-कारक असें एकच उत्तर आहे व तें हें कीं, काठेवाडांत येण्यापूर्वीं प्रभू मारवाडांतून आले. मारवाडांतून काठेवाडांत आले असें म्हणण्याचें कारण हें कीं काठेवाडासारख्या सुपीक प्रदेशांतून कोणीहि मारवाडासारख्या निर्जल व रुक्ष देशांत जाईल असें संभवत नाहीं आणि यावेळीं वरचेवर लढाया होत असल्यामुळें काठेवाडांत लोकांची वस्ती मुळींच दाट नव्हती. रजपूत लोकांच्या इतिहासाकडे पाहिलें तर ते देखील असेच उत्तरेकडून दक्षिणेकडे म्हणजे सिंध, रजपुताना, गुजराथ, व काठेवाड येथें आले असें दिसते.

वर दिलेल्या गुजराथी शब्दांवरून आणखी एक गोष्ट सिद्ध होते, ती ही कीं, जेव्हां पाठारे प्रभु उत्तर कोकणांत आले. तेव्हां त्यांच्याबरोबर त्यांच्या बायका व मुलें हीं होतीं. कारण, बायका व मुलें ज्या शब्दांचा उपयोग करतात असे बरेच गुजराथी शब्द अद्यापि प्रचलित आहेत. कांहीं आक्षे-पकांच्या म्हणण्याप्रमाणें फक्त प्रभु पुरुष जर कोंकणांत येऊन तेथील स्त्रियांशीं त्यांनीं आपले शरीरसंबंध केले असते तर घरगुती शब्द मूळ कोंकणांत रहाणाऱ्या स्त्रियांचेच असते; गुजराथी व काठेवाडी नसते.

आतां कदाचित् कित्येक अशी शंका घेतील कीं, जर प्रभूंची मूळची भाषा गुजराथी किंवा काठेवाडी होती तर ती अद्यापि तशीच कायम का राहिली नाहीं ? ह्याला उत्तर इतकेंच कीं जेव्हां कांहीं लोक एखाद्या नवीन देशांत जाऊन राहतात तेव्हां ते हळूहळू त्या देशाच्या भाषेचा साहजिक अंगीकार करतात. नॉर्मन लोकांनीं इंग्लंड देश जिंकल्यावर ते तेथें जाऊन राहिले, त्यांची भाषा नॉर्मन न राहतां इंग्रजी झाली. पारशी लोक हिंदुस्थानांत पळून आले व सुरतेजवळ राहिले. पुढें त्यांची मूळची भाषा लुप्त होऊन तिच्या ऐवजीं गुजराथी भाषा प्रचारांत आली; इतकेंच नव्हे तर त्यांच्या आचारविचारांत पोषाखांत, व चालीरीतींत देखील त्यांच्या नवीन देशबंधूंच्या आचारविचारांची मिसळ झाली. तरी पण 'खुदा' वगैरे त्यांचे मूळचे शब्द अद्यापि कायम आहेत. पाठारे मूळचे कोठले हें ठरविण्याचीं खालील साधनें आहेत.

चालीरीतीः—इतिहासावरून असें दिसून येतें कीं पाठारे प्रभु हे इ. स. १४९५ मध्यें वसई तालुक्यांत होते. ह्याच्यापूर्वीं ते तेथें केव्हां आले हें निश्चयपूर्वक सांगतां येत नाहीं. तरी पण ते तेथें बराच काळ पूर्वीं आले असावे. इतक्या काळांत काठेवाडांत आणि गुजराथेंत किती तरी राज्यक्रांत्या झाल्या; त्यामुळें कांहीं रजपूत वगैरे लोक तेथील मूळचे रहिवासी दक्षिणेंत आले व दुसऱ्या प्रांतांतून लोक गुजराथेंत गेले हें इतिहासप्रसिद्धच आहे. ह्या नवीन लोकांच्या संसर्गानें तेथील मूळच्या लोकांच्या चालीरीतींत व आचारविचारांत हळूहळू फेरबदल झाला हें सहाजिकच आहे म्हणून चालीरीतींत साम्य मिळणें कठिण आहे. तथापि कांहीं चालीरीतींत जरी फेरबदल झाले तरी धर्मसंबंधीं किंवा धर्माच्या नांवाखालीं येणाऱ्या चालीरीतींत सहसा फेरबदल होत नसतो. म्हणून अशा कांहीं थोड्या चालीरीती पाठारे प्रभूंत आणि गुजराथी लोकांत सारख्या दिसून येतात त्या अशा—

पाठारे प्रभू लग्नांत ( मुंजींत सुद्धां ) देवदेवकाजवळ भिंतीवर, आंब्याच्या झाडावर सुवासिनी स्त्रिया. आंब्याच्या पानानें पाणी शिंपडतात, असा निरुपट काढतात. ही चाल रजपूत लोकांत आहे, ते देखील पाठारे प्रभूंप्रमाणें देवदेवका-जवळ तलवार टेवितात.

लग्नांत प्रभु कुलस्वामिनीला बकरा बळी ( भोग ) देतात. पशु बळी देण्याची चाल गुजराथच्या कुमारपाल सोळंकी राजानें बंद केली. तेव्हांपासून कित्येक गुजराथी लोक (लोहाणे) वगैरे पशुवधाच्याऐवजीं कोहळें कापतात. प्रभु लोक देखील देवकस्थापनेच्या वेळीं कोहळें कापतात. त्यास 'कोहळेंरासणें' असें म्हणतात व भोगाच्यावेळीं "बोकडरासणें"(बकरा मारणें) म्हणतात. रासणें हा "रेहसवुं" ह्या गुजराथी शब्दाचा अप-भ्रंश आहे.

लग्नाच्या दिवशीं वरराजास आपल्या घरीं लग्नास येण्याचें आमंत्रण देण्याकरितां नवरीचा बाप इष्टमित्रादि पुरुषमंडळीस घेऊन वराच्या घरीं जातो. त्यास प्रभु " पायपाखाणी " असें म्हणतात. ही चाल गुजराथी लोकांत आहे. फरक इतकाच कीं, त्यांच्यांत नवरीची आई देखील दुसऱ्या स्त्रियांस घेऊन जाते. नंतर वर " क्षौर " ( हजामत ) करवितो. ही चाल गुजराथी लोकांत आहे. त्यास ते चेहरा करविणें म्हणतात. मॉ, मो, क्षौ, चेहरा हे मुखवाचक गुजराथी शब्द आहेत. वर रेशमी पिवळें वस्त्र ( पाळनेत ) नेसतो, अंगांत कपडे घालतो ( पूर्वी जामा घालीत असे ) व डोक्यास लाल पागोटें घालतो. हातांत चाकू घेतो व घोड्यावर बसून नवरीच्या घरीं जातो. ही चाल देखील गुजराथेंत आहे. पण लोहाणे लोक हातांत कट्यार घेतात आणि रजपूत लोक तलवार घेतात.प्रभु देखील पूर्वी कट्यार किंवा तलवार घेत असत,असें दिसतें.वर नवरीच्या घरीं गेला म्हणजे प्रभु लोकांत नवरीचा बाप त्याच्या घोड्यास प्रदक्षिणा घालतो. रजपूत लोकांत नवरीचा बाप व आई वराच्या घोड्यास आरती ओवाळतात. प्रभु वर मुराळ्यास (नवरीच्या भावास) पोषाख देतो. रजपूत राजे त्यास गांव इनाम देतात. त्या विधीस ते 'साळा कटारी' म्हणतात.

प्रभु लोकांत नवरी पाळनेत (पिवळें रेशमी वस्त्र ) वेस्त्रांचें नेसते. म्हणजे पदर व कांसोटा घेत नाहीं. अंगांत चोळीच्या ऐवजीं कांचोळी घालते व अंगावर दुपेटा घेते.

लग्नांत प्रभु ज्याप्रमाणें विवाहित मुली व जांवई यांचे पाय धुतात, त्याप्रमाणें रजपूत लोकहि विवाहित मुली व जांवई यांचे पाय धुतात.लग्नाच्या वेळीं प्रभुलोक वधूवरांमध्यें अंतःपट धरतांना हातांत तरवार धरतात तसे रजपूतहि धरतात.

लग्न झाल्यानंतर नवरा व नवरी यास त्यांचे इष्टमित्र कांहीं द्रव्य देतात, त्यास चांदला करणें असें म्हणतात. ही चाल रजपूत व दुसरे गुजराथी लोक यांच्यांत आहे व ते त्यास चांदलाच म्हणतात. प्रभु असे नवऱ्याकडील स्त्रीमंडळीला वस्त्रें (पातळें)देऊन त्यांचा"गौरव"करतात,तसें रजपूत व दुसरे गुजराथी लोक मेजवानी देऊन तसाच गौरव करतात. त्यास ते गौरव असें म्हणतात.

प्रभूंत स्त्री पहिल्या वेळीं गरोदर असली म्हणजे पांचव्या महिन्यापासून सातव्या महिन्यापर्यंत तिला संध्याकाळीं उंची पोषाख घालून व तिचे केश तऱ्हेतऱ्हेचे बांधून किंवा मोकळे सोडून त्यांत फुलें किंवा फुलांचे हार भरतात. गालावर व कपाळावर रंगीत कटोऱ्यांनीं चित्रें किंवा नक्षी काढतात. त्यास ते वाडी भरणें असें म्हणतात. अशा प्रसंगीं केव्हां केव्हां ह्या स्त्रीला मोठ्या थाटानें मेजवानी देतात व तिच्या बरोबर भोजनास आप्त आणि इष्टमित्रादि मंडळी असते. त्यास " घरवारीचें जेवण " असें म्हणतात. ही चाल गुजराथी लोकांत आढळते. गुजराथी लोक प्रभूंसारखीच गरभार स्त्रीला " वाडी " भरतात व तिला आणि तिच्या इष्टमित्रादि मंडळीला भोजन देतात. अशा वेळीं ते फार पैसे खर्च करतात. केव्हां केव्हां तर सर्व ज्ञातीस भोजन देतात. ते देखील वाडी भरणें हाच शब्द वापरतात. प्रभुप्रमाणें ते देखील लहान मुलींस " वाडी " म्हणून तिला इष्टमित्रांच्या घरीं पाठवितात.

मुलाच्या जन्मानंतर पांचव्या किंवा सहाव्या दिवशीं भिंतीची पूजा करण्याचा परिपाठ सर्व हिंदु लोकांत आहे. प्रभु ही पूजा पांचव्या दिवशीं करतात, आणि तीस " सटीची पूजा " असें म्हणतात. गुजराथी लोकहि सहाव्या दिवशीं अशाच प्रकारची पूजा करतात आणि तीस " छट्ठीनी पूजा " म्हणतात. केव्हां केव्हां श्रीमंत लोक ही पूजा सहाव्या दिवशीं करतात, त्यावेळीं तीस " षष्ठी पूजन " म्हणतात. प्रभु लोक पहिल्या मुलाच्या वेळीं मोठ्या थाटानें षष्ठीपूजन करतात, पण तें पांचव्या दिवशींच करतात. सटी शब्दावरून इतकें सिद्ध होतें कीं पूर्वी प्रभु ही पूजा सहाव्या दिवशीं करीत होते व पुढें येथें म्हणजे मुंबईंत आल्यावर येथील रहिवाशांच्या सहवासानें पांचव्या दिवशीं पूजा करू लागले. सटीच्या पूजेजवळ ते तरवार, कागद, शाई आणि लेखणी ठेवितात, व दरवाजाजवळ धनुकल्या ठेवितात. ही चाल रजपूत लोकांतहि आहे.

जे दागिने प्रभुस्त्रिया घालतात. त्यांपैकीं वेळा, आयदोरा ( आहेवदोरा ), राखी, कमरपट्टा हे रजपुतांत आढळतात.

प्रभूंच्या पागोट्यास " परभी पागोटें " असें म्हणतात. तें काठेवाडांत आढळतें, दक्षिणेंत आढळत नाहीं व कांहीं काठेवाडी लोक असलें पागोटें अद्यापि घालीत आहेत व त्यास काठेवाडी पागोटें असें म्हणतात. प्रभासपाटण व त्याच्या बाजूचे, वेरावळ, पोरबंदर इत्यादि गांवचे कांहीं लोक तसेच सलाट लोक ( धोंडफोडे लोक ) व कतारी लोक देखील असलें पागोटें बांधतात. सलाट लोकांची अशी दंतकथा आहे कीं, ते पूर्वी सोमनाथाचे ब्राह्मण होते, पुढें त्यास वाळींत टाकल्यामुळें ते धोंडफोडे झाले. एकंदरींत हें पागोटें सोमनाथ ( प्रभास ) पाटण व त्याच्या बाजूच्या प्रदेशांतलें आहे असें सिद्ध होतें व आपण सोमनाथाहून आलों अशी प्रभूंची हकीकत आहेच. प्रभुमंडळीप्रमाणें काठेवाडांतील कित्येक भागांत दुःखप्रदर्शक पागोटें तपकिरी रंगाचें असतें व तें सासरा देत असतो. प्रभुपागोटें सद्यःकालीं म्हणजे नव्या पिढींत बहुतेक नाहींसें झालें आहे.

एकंदरीनें वर लिहिलेल्या भाषेच्या आणि चालीरीतींच्या प्रकारांवरून पाठारे प्रभु पूर्वकालीं राजपुताना, काठेवाड आणि गुजराथ येथें होते असें निश्चयात्मक ठरतें. सारांश, उपलब्ध ऐतिहासिक पुराव्यावरून सांगावयाचें म्हणजेः—

( १ ) पाठारे प्रभु हे क्षात्रकुलोत्पन्न आहेत. ( २ ) ते बराचकाळ राजपुताना, उत्तरहिंदुस्थान, गुजराथ, काठेवाड, दक्षिणमहाराष्ट्र व उत्तर कोंकण या ठिकाणीं रहात होते.

(३) गुजराथेंतील पट्टण शहरीं त्यांचे वास्तव्य बरींच वर्षें झाल्यामुळें त्यास 'पाटणना प्रभु' अथवा 'पाताणे प्रभु' हें नांव मिळालें. (४) मुसुलमान धर्मीयांनीं त्यांस गुजराथें-तून हांकून लावल्यामुळें त्यांनीं दक्षिणेंत कांहीं वेळ मुक्काम केला आणि त्यानंतर त्यांनीं आपला कायमचा मुक्काम उत्तरकोंकण पट्टींवरील अनेक बंदरें आणि शहरें यांतून केला. (५) महंमद गझनी आणि अल्लाउद्दीन खिलजी यांनीं गुजराथ प्रांतावर स्वाऱ्या केल्या त्या वेळच्या दरम्यान म्हणजे इ. स. ११ व्या आणि १३ व्या शतकाच्या आंत पाठारे प्रभु हे गुजराथेंतून उत्तर कोंकणांत आले (६) गुजराथेंतून उत्तर कोंकणांत येतांना त्यांनीं बायका मुलें वगैरे आपला सर्व परिवार आपल्या बरोबर आणला होता. (७) १३ व्या शतकाच्या अखेरीस प्रभु उत्तरकोंकणांत मोठमोठ्या हुद्द्यांच्या व वसुलाच्या कामावर होते आणि बराच काळ त्यांच्या हातांत राजानुशासन आणि तत्संबंधीं बरीच सत्ता होती. (८) सोळाव्या आणि सतराव्या शतकांत पोर्तुगीज राजांच्या अंमलाखालीं त्यांच्याकडे मोठ-मोठीं विश्वासाचीं आणि जबाबदारीचीं कामें होतीं. त्यांपैकीं कित्येकांस इनाम जमिनीहि मिळाल्या होत्या. (९) १८ व्या शतकांत आणि एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत त्यांचें राजदरबारीं मोठें वजन असून त्यांस शस्त्र बाळगण्या-चाहि अधिकार होता. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यार्धांत त्यांचें मुंबई शहरांत कायमचें ठाणें झालें आणि त्या शहरीं त्या वेळच्या इतर सर्व लोकांपेक्षां त्यांचें वजन फार असून सुशिक्षित वर्गामध्यें त्यांची प्रामुख्यानें गणना होत असे.

पाठारे प्रभु १३ व्या शतकाच्या अखेरीस म्हणजे सुमारें १२९४ सालीं उत्तर कोंकणांत येऊन राजा बिंबदेवाबरोबर राहिले आणि त्यांनीं त्यावेळीं तेथल्या राज्यकर्त्या नायक सर-दारांचा पराभव करून बिंबाच्या आधिपत्याखालीं साष्टी, अष्टागर, वसईबेट, मुंबई, माहीम वगैरे ठिकाणीं त्यांनीं आपली राजसत्ता चालू केली आणि मुंबईमाहीम ह्यास महिकावती असें नांव देऊन ती त्यांनीं आपली राजधानी केली आणि माहीम येथें आपली कुलदेवता प्रभावती हिचें देऊळ बांधलें. त्यानंतर मुसुलमान व पोर्तुगीज राजांच्या अमदानींत धार्मिक व राजकीय जुलमामुळें प्रभूंचीं बहुतेक कुळें साष्टी, अष्टागर, वसई येथून इंग्रजांच्या सत्तेखालीं मुंबई बेटांत उपजीविकेच्या साधनाकरितां येऊन राहिलीं आणि तेव्हांपासून प्रभुमंडळी ही मुंबई शहर आणि आसपासच्या भागांतून वस्ती करून राहिली. [ पाठारेप्रभुइतिहाससमंडळा-कडून आलेल्या माहितीवरून ].

(२) कंचोळे.—सुमारें दीडदोनशें वर्षांपूर्वी वसई मुक्कामीं एका पाठारे प्रभूच्या घरीं एक लग्नसमारंभ झाला. लग्न लाग-ल्यानंतर पाठारे प्रभुज्ञातीच्या रिवाजाप्रमाणें वरात निघण्यापूर्वी जमलेल्या मंडळीस गंध लावून त्यांचा सत्कार करण्यात येतो. त्या समारंभास 'सभापूजन' असें म्हणतात. त्यावेळीं ज्ञातीचे धर्मगुरु यांसहि पाचारण करून त्यांस दक्षिणा, वस्त्रप्रावरण वगैरे देऊन त्यांचेंहि पूजन करण्यांत येतें. हे धर्मगुरू अथवा राजगुरु सूर्तें वे. शा. सं. केशव बळवंत खेडकर हे होत. ह्या राजगुरूस बोलावून त्यांचा सत्कार करण्याची चाल आज २५-३० वर्षांत बहुतेक बंद पडली आहे, आणि राजगुरु संस्थाहि बहुतेक नामशेष झाली आहे. सदरील लग्नसमारं-भाच्या वेळीं सभापूजन करण्यांत आलें होतें.ज्ञातींतील लहान थोर मंडळी बरीच जमली होती. वधूच्या घरांतील एक तरुण गृहस्थ मंडळीस गंध लावूं लागला. प्रथमतः त्यावेळचे राज गुरु यांस गंध लावून नंतर इतर गृहस्थांस त्यांच्या वयाच्या मानानें गंध लावण्याची वहिवाट होती त्याप्रमाणें गंध लाव-णारा गृहस्थ गंध लावीत असतां 'अमुक गृहस्थ माझ्यापेक्षां वयानें मोठे आहेत, त्यांना आधीं गंध लावा' असें त्यांस दोन चार इसमांनीं सांगितल्यावरून तो गृहस्थ किंचित त्रासून वयाचें कमीजास्त मान लक्षांत न घेतां मंडळी ज्याप्रमाणें बसली होती, त्याप्रमाणें तो त्यांस सरसकट गंध लावूं लागला. ही गोष्ट कांहीं वयातीत गृहस्थांस न आवडून आणि त्यामुळें आपला अपमान होत आहे असें त्यांस वाटून त्यांनीं गंध लावणारास दूषण दिलें. हें ऐकतांच गंध लावणारा गृहस्थ चिडला आणि त्यानें आपल्या हातांतील गंधाचें कचोळें फेंकून दिलें. 'कचोळें' ह्या शब्दास ज्ञातींत 'कंचोळें' असें म्हणतात. गंध लावणारानें कंचोळें फेकल्यावरो-वर सभेंत आरडाओरड सुरू झाली. सभेचा अपमान झाला, व असा अपमान करणाऱ्या गृहस्थानें सभेची माफी मागावी असें सांगण्यांत आलें. परंतु त्या गृहस्थानें माफी मागितली नाहीं. पुढें हें प्रकरण वरेंच विकोपास गेलें. ज्ञातीचा अपमान करणाऱ्या गृहस्थास बहिष्कृत करावें असा वाद उपस्थित झाला. त्या गृहस्थालाहि कांहीं मंडळीचें पाठबळ मिळालें. कंचोळें फेकण्यानें ज्ञातीचा कांहीं एक अपमान होत नाहीं असें प्रतिपक्षाचें बोलणें सुरू झालें. पुढें ही गोष्ट बरीच विकोपास जाऊन ज्ञातीचा अपमान करणारा गृहस्थ, त्याचें कुटुंब आणि त्याचा पक्ष उचलणारे गृहस्थ ह्या सर्वांवर ज्ञातीनें बहिष्कार घातला, आणि त्यांजबरोबर रोटीबेटीव्यवहारहि बंद पाडले. ह्या बहिष्कृत मंडळींची संख्या दोनशें अडीचशें होती असें म्हणतात. कित्येक समंजस गृहस्थांनीं हें प्रकरण शांत करण्याची खटपट केली. पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. तंट्याचें कारण वास्तविक क्षुल्लक होतें. तरीहि पाठारे प्रभुज्ञातींत ह्या कारणामुळें दोन पक्ष उत्पन्न झाले. एक मूळचा बहुसंख्याक पाठारे प्रभुज्ञातीचा पक्ष, आणि दुसरा वीसपंचवीस कुटुंबांचा अल्पसंख्याक बहिष्कृत पाठारे प्रभूंचा पक्ष. ह्या बहिष्कृत पक्षास ज्या कारणानें बहिष्कार घालण्यांत आला तेंच नांव म्हणजे 'कंचोळे प्रभु' हें देण्यांत आलें. त्या-वेळीं ज्ञातिभोजन, प्रायश्चित अथवा इतर कांहीं धर्मविधी करून समेट करण्याची उभयपक्षांनीं व्यवस्था केली असती तर आजपर्यंत हे भेद राहिलेच नसते. परंतु दोन्ही पक्षांतील लोक फार मानी होते. ते तेमानें एकमेकांपासून बुद्ध्या दूर राहिले. ही बहिष्काराची मूळ कथा मूळ पक्षांत आणि

बहिष्कृत पक्षांत वर्षांनुवर्षे वाडवडिलांपासून रूढ आहे; आणि त्यासंबंधाचे अभिप्रायहि मूळ पक्षांतील कांहीं वयोवृद्ध व वजनदार गृहस्थांनीं लिहून ठेविले आहेत. त्याखेरीज ज्या तरुण गृहस्थांनीं ही गोष्ट आपल्या वाडवडिलांपासून ऐकली त्यांनींहि त्यावद्दलचे आपले अभिप्राय लिहून दिले आहेत. बहुतेक अभिप्राय इ. स. १८८१ मध्यें देण्यांत आले. ते पुस्तकरूपानें छापून प्रसिद्ध होऊन त्याच्या प्रती मूळपक्षांतील बऱ्याच गृहस्थांपाशीं आहेत. मूळ अभिप्रायहि उपलब्ध आहेत. अभिप्राय देणाऱ्यांपैकीं बहुतेक गृहस्थ सद्यःपिढींतल्या स्त्रीपुरुषांचे जनक अथवा आप्त होत. त्यांपैकीं श्री. सदाशिव विश्वनाथ धुरंधर, कॅप्टन माधवराव, श्री. जगन्नाथ रावजी धुरंधर, श्री. रामचंद्र आत्माराम मानकर, श्री. दिनकर खंडेराव विजयकर, श्री. रामराव नाना गोरक्षकर, श्री. नारायण गणपत कोठारे, श्री. कुंजविहारी सदाशिव धुरंधर आणि श्री. लक्ष्मण बाळकृष्ण नायक हे गृहस्थ हयात आहेत प्रभु ज्ञातीचे राजगुरु वे. शा. सं. केशव बळवंत खेडकर हेहि हयात आहेत. त्यांनीं व त्यांच्या राजगुरु वंशातील पूर्वजांनीं बहिष्कृत कुटुंबांतहि ते पूर्ववत् पाठारे प्रभूच आहेत असें मानून आपली वंशपरंपरागत वृत्ति कायम ठेविली आहे. ह्या राजगुरूंनींहि आपला अभिप्राय दिला आहे. अभिप्राय देणाऱ्या गृहस्थांपैकीं श्री. सदानंद विश्वनाथ अजिंक्य, श्री. द्वारकानाथ विश्वनाथ अजिंक्य, श्री. श्रीकृष्ण नारायणजी, श्री. हरिश्चंद्र पुरुषोत्तमजी कीर्तिकर, श्री. नारायण रघुनाथजी नवलकर, श्री. गोपीनाथ रघुनाथजी, श्री नारायण सदाशिव राव, श्री. नामदेव नारायणजी तळपदे, श्री. शामराव श्रीकृष्णजी, श्री. केशरीनाथ आनंदराव, श्री. विनायकराव रघुनाथजी नवलकर, श्री. बाळकृष्ण मोरोजी, श्री. गणपतराव पांडुरंगजी वेलकर, श्री. नारायण आत्मारामजी, श्री. श्रीकृष्ण सखारामजी आणि श्री. शामराव द्वारकानाथ अजिंक्य हे मयत आहेत. ह्या सर्व गृहस्थांच्या आणि तूर्त हयात असलेल्या गृहस्थांच्या अभिप्रायांचा गोषवारा खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

( १ ) कंचोळे प्रभु नांवाची बहिष्कृत मंडळी आणि त्यांचे वंशज हे पाठारे प्रभु आहेत. बहिष्काराचा वृत्तांत आम्हांला आमच्या वाडवडिलांपासून माहीत आहे. बहिष्काराचें कारण अत्यंत क्षुल्लक आहे. अशा क्षुल्लक कारणामुळें ह्या मंडळींना आज इतकीं वर्षे दूर ठेवण्यांत आलें हा खरोखरी अन्याय होय.

( २ ) ह्या बहिष्कृत कंचोळे मंडळीस कित्येक लोक धुरुप्रभु असेंहि म्हणतात. परंतु ते आमच्याचपैकीं म्हणजे पाठारे प्रभु होत. बहिष्कृत मंडळींपैकीं कांहीं गृहस्थ वसई येथें जमीनदार होते, व तेथील जमीनदारांस धुरु म्हणण्याची पूर्वी वहिवाट होती. राजगुरु केशव बळवंत यांजपाशीं बऱ्याच वर्षांपूर्वीच्या विदागीच्या याद्या आहेत. त्यापैकीं कांहीं ८०-९० वर्षांच्या जुन्या आहेत. त्यांपैकीं कांहीं याद्या अंताजीपंत, रामाजीपंत, रामचंद्रपंत बाळाजीपंत, लक्ष्मण अनंत वगैरे पूर्वकालीन राजगुरु आणि विद्यमान केशव बळवंत राजगुरु यांच्या स्वदस्तुरच्या आहेत. ह्या याद्या म्हणजे प्रतिवर्षी अथवा लग्नकारणादि विशिष्ट प्रसंगीं राजगुरूंचा सत्कार करण्यांत येऊन पाठारे प्रभुज्ञातिगृहस्थांकडून विदागी या नांवानें वस्त्रप्रावरणें, दक्षिणा वगैरे नजराणे मिळत असत, त्यांची नामवारी पत्रकें होत. ह्या पत्रकांतून विदागी देणाऱ्या शेंकडों पाठारे प्रभु गृहस्थांचीं नांवें दृष्टीस पडतात व त्याच पत्रकांतून बहिष्कृत मंडळींच्या पूर्वजांचींहि कांहीं नांवें दिसून येतात. मूळपक्षांतील कांहीं गृहस्थांच्या, तसेंच कांहीं बहिष्कृत पाठारे प्रभूंच्या नांवापुढें 'धुरु' ही संज्ञा जोडलेली आहे. त्यावरून मूळपक्षांतील कांहीं गृहस्थांसहि धुरु असें म्हणत असत. एकंदरीनें, 'कंचोळे' ही संज्ञा जातिवाचक नाहीं. त्याप्रमाणें धुरु हीहि संज्ञा जातिवाचक नाहीं. राजगुरु हे फक्त पाठारे प्रभूंचेच राजगुरु होत.

( ३ ) बहिष्कृत मंडळींचीं बहुतेक कुटुंबें नामशेष झाली आहेत त्यांपैकीं कोटकर (वेलकर), राणे, दळवी, मानकर, कोठारे आणि नवलकर हीं कुटुंबें विद्यमान आहेत. त्यांची हल्लींची लोकसंख्या ४८ आहे. कोटकर (पूर्वींचे वेलकर) हें नांव कोट या गांवावरून पडलें आहे.

( ४ ) ह्या कुटुंबांचीं आडनांवें, गोत्रें, कुलदेवता आणि प्रवर आणि मूळपक्षांतील कुटुंबांचीं आडनांवें, गोत्रें, कुलदेवता आणि प्रवर हीं एकच आहेत.

( ५ ) बहिष्कृत मंडळींच्या शंभर सवाशें वर्षांपर्यंतच्या वंशवेलांतील स्त्रीपुरुषांचीं नांवें श्रीक्षेत्र नाशिक क्षेत्रीं आणि इतर हिंदु क्षेत्रांच्या ठिकाणीं तेथील तीर्थोपाध्यायांनीं अनेक वर्षे लिहून ठेवलेल्या तीर्थांत जाणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या नांवाबरोबर ताडून पाहतां तीं नांवें तंतोतंत जुळून येतात. आणि हीं नांवें तीर्थोपाध्यायांनीं पाताणे प्रभूंसाठीं खास लिहून ठेवलेल्या वह्यांतून आढळून येतात. म्हणजे पूर्वकाळापासून बहिष्कृत मंडळी आणि त्यांचे वंशज हे पाताणे प्रभूच असल्यामुळें त्यांचीं नांवें क्षेत्रस्थानीं मूळपक्षाकरितां लिहिलेल्या वह्यांतूनच लिहिलीं गेलीं आहेत.

( ६ ) ह्या मंडळींच्या पूर्वजांच्या जन्मपत्रिका, जुने खानेसुमारीचे रिपोर्ट, जुने ग्रंथ, वंशवेल, जन्ममृत्युनोंद, स्थावर मिळकतीसंबंधींचीं कागदपत्रें वगैरे अनेक पुराव्यांवरून ही बहिष्कृत मंडळी 'कंचोळे' प्रभु म्हणून भिन्न जात नसून ते पाठारे प्रभूच आहेत असें सिद्ध होतें.

( ७ ) बहिष्कृतांचे लग्नसंबंध त्यांच्या कुटुंबांतूनच झाले आहेत. परजातीबरोबर त्यांनीं शरीरसंबंध केले नाहींत. त्यामुळें त्यांनीं आपल्या रक्ताची शुद्धता निष्कलंक ठेविली आहे. वर्णसंकर झालेला नाहीं. फक्त अलीकडे दहापंधरा वर्षांत एकदोन इसमांनीं परज्ञातीय स्त्रियांबरोबर शरीरसंबंध केल्याचें कळून आल्याबरोबर त्यांवर 'कंचोळे' प्रभूंनीं बहिष्कार घातला आहे. हे इसम हल्लीं कोठें आहेत तें माहीत नाहीं आणि त्यांची संततीहि कांहीं असल्याची बातमी नाहीं.

( ८ ) कंचोळे प्रभूंचे आचारविचार, आहारपेहराव, धर्मविधी, विवाहादि चालीरीती आणि इतर सामाजिक व धार्मिक व्यवहार हे सर्व मूळपक्षाच्या आचार विचार इत्यादि सर्व चालीरीतींस पूर्ण अनुसरून आहेत. त्यांनीं कोणत्याहि बाबतींत आपल्या पाठारे अथवा पाताणे पूर्वजांच्या आचारविचारपरंपरेचें बिलकूल उल्लंघन केलेलें नाहीं.

( ९ )बहिष्कृत कंचोळे प्रभूंची अनेक वर्षे मूळ पक्षांतील सजातीय लोकांबरोबर पुणें, ठाणें, वसई, साष्टी वगैरे प्रांतांत आणि मुंबईच्या आसपासच्या भागांत वस्ती असे.हल्लीं त्यांची वस्ती पुणें आणि सिंकंदराबाद येथें आहे. ह्या निरनिराळ्या ठिकाणीं मूळ पक्षांतील स्त्रीपुरुषांबरोबर त्यांचा अन्नोदकव्यवहार आज कित्येक वर्षे चालू आहे.

( १० )मूळपक्षांतील लोकांबरोबर बेटीव्यवहार बरींच वर्षें बंद होता. त्यामुळें ह्या अल्पसंख्याक बहिष्कृत मंडळींचे शरीरसंबंध आपापसांतच होत गेले. परंतु कुटुंबें थोडी असल्यामुळें पुढें आपापसांतहि शरीरसंबंध होणें बंद पडून हीं कुटुंबें हळू हळू क्षीण होत गेलीं त्यांपैकीं बरींच कुटुंबें आतां नामशेष झालीं आहेत. बाकी राहिलेल्या कुटुंबांतूनहि शरीरसंबंधाची अशक्यता तीव्र वाटूं लागल्यामुळें स. १८८१ पासून मूळपक्षांत सामील होण्याबद्दल ह्या मंडळींनीं तीन चारदां प्रयत्न केले परंतु त्यांस त्यांत कांहीं कारणांमुळें अद्यापि यश आलें नाहीं.

( ११ ) बहिष्कृतांशीं बेटीव्यवहार करणें ही गोष्ट जरी मूळपक्षांतील सर्व लोकांस आजतागाईत मान्य नाहीं, तरीहि गेल्या पंधरावीस वर्षांत मूळपक्षांतील कांहीं समंजस व वयोवृद्ध गृहस्थांच्या मध्यस्थीनें आणि मदतीनें मूळपक्ष आणि बहिष्कृत पक्ष यांच्यामध्यें सात आठ लग्नसंबंध घडून आले आहेत.

( १२ ) बहिष्कृत मंडळींचे बहुतेक पूर्वज कमिसेरिअट खातें, मिलटरी खातें, सिव्हिल खातें, रेल्वे कंपनी आणि इतर मोठमोठ्या सरकारी कचेऱ्यांतून नोकरी करीत होते. त्यांचे हल्लींचे वंशजहि अशाच प्रकारच्या कामांवर आहेत. सर्व स्त्रीपुरुष सुशिक्षित आहेत. त्यांच्या कांहीं पूर्वजांनीं न्यायाधिशाचींहि कामें केलीं आहेत. त्यांची आर्थिक स्थिति साधारण प्रकारची आहे.त्यांच्या पूर्वजांच्या ठाणें, कल्याण,मुंबई व वसई मुक्कामीं स्थावर मिळकती होत्या व हल्लीं देखील त्यांपैकीं कांहीं गृहस्थांच्या खडकी व पुणें येथें स्थावर मिळकती आहेत.

पाठारे प्रभूंची माहिती मागें दिली आहेच. बहिष्कृत कंचोळे प्रभूंचे पूर्वज व मूळपक्षांतील पाठारे प्रभूंचे पूर्वज हे मूळ एकच असल्यामुळें बहिष्कृतांच्या पूर्वजाविषयीं अधिक सविस्तर माहिती देण्याची आवश्यकता राहिली नाहीं कारण, कंचोळे नांवाचे बहिष्कृत पाठारे प्रभु आणि मूळपक्षाचे पाठारे प्रभु हे दोन्ही पक्ष मिळून एकच ज्ञाति होय हें मी आज ७।८ वर्षे अत्यंत श्रमपूर्वक केलेल्या संशोधनावरून आणि अनेक पुरावे, वंशवेल आणि साधनें पाहून स्वतःच्या खात्रीनें सांगत आहे. ( लेखक पाठारेप्रभु लक्ष्मण बाळकृष्ण नायक, मुंबई. )

**प्रभु-पदवी**— प्रभु हा एक अधिकार आहे. शिलाहारांच्या राजवटींत ( १०७० ) कोंकणांत या नांवाचे वतनदार अधिकारी असत. सांप्रतचे जसे देसाई, देशपांडे हे वतनदार अधिकारी आहेत, त्याच दर्जाचे शिलाहारकालीं जे अधिकारी कोंकणांत असत, त्यांनां प्रभु म्हणत. जमीनमहसुलाच्या संबंधाचा कोंकणांतील मोठ्यांतील मोठा हुद्दा म्हणजे प्रभुपणाचा होता. म्हणजे प्रभु हा शब्द जातिवाचक नसून अधिकारदर्शक आहे. हा हुद्दा ब्राह्मण व कायस्थ आणि पातेणे या सर्वांनां त्यावेळीं मिळत असे. कऱ्हाडे ब्राह्मणांत प्रभुदेसाई हें एक आडनांव असून, त्या घराण्यापैकीं मूळ शाखेला देसाई (देशपांडे) पणाचे हक्क अद्यापि कोंकणच्या कांहीं भागांत मिळत आहेत. शिलाहार हे मूळचे विद्याधरवंशीय असून उत्तरेकडील रहिवाशी होते. जेव्हां दक्षिणेंत आले, तेव्हां त्यांच्याबरोबर कांहीं कायस्थांचीं घराणीं दक्षिणेंत आलीं असावीं. त्यांच्यापैकीं कांहींनां शिलाहारांनीं ब्राह्मणांप्रमाणेंच प्रभुपण दिलें. हा हुद्दा कायस्थांनीं जेव्हां मिळविला तेव्हां त्यांच्या ऐश्वर्याची परमावधि झाली. हा हुद्दा कांहीं काल हातीं राहिल्यावर प्रभुपणाचा अधिकार असलेले सर्व चांद्रसेनीय आपणांस प्रभु या नांवानें कायमचे नांवाजूं लागले. यानंतर मुसुलमानी अमलांत प्रभुपणाचा हुद्दा कायस्थांपेक्षां ब्राह्मणांनां जास्त मिळूं लागला. प्रभुपणा राजदत्त असे, गांवड्यासारखा स्वयंभु नसे.गांवचा इजारदार, जमीनदार किंवा मोकासदार म्हणजे प्रभु होय. प्रभुपणा राजदत्त असल्यानें त्याची शाश्वति राजाच्या मर्जीवर राही. राजाची मर्जी फिरली, किंवा राज्यक्रांति झाली, तर हा प्रभु नवीन राजास आपल्या प्रभुपणाचा वंशपरंपरत्वाचा हक्क सांगे, नवा राजा तो वाटल्यास मानी अगर अमान्य करी. तथापि कित्येक इजारदार व त्यांचे वंशज आपलें वैशिष्ट्य दाखविण्यासाठीं प्रभुपणाचा अधिकार हातून गेला असतांहि आपल्या नांवापुढें प्रभु हें उपपद आडनांवादाखल जोडीत. मात्र कऱ्हाडे ब्राह्मणांत प्रभु हें उपपद देसाई या आडनांवाच्या मागें जोडलें जातें, स्वतंत्रपणें आडनांव म्हणून किंवा जातिनाम म्हणून योजिलें जात नाहीं. चांद्रसेनीय कायस्थ व पाठारे हे मात्र स्वतःचें जातिनाम म्हणून प्रभु शब्द योजतात. प्रभु हा शब्द महाराष्ट्रांत अनेक वर्षे लुप्त होऊन परभू हा शब्दच रूढ झाला याला प्रमाण असें देतां येईल कीं, इतर जातिनामांचीं जशीं स्त्रीलिंगी रूपें आढळतात, तशीं प्रभु ( हें जातिनाम धरल्यास ) शब्दाचीं आढळत नाहींत. ब्राह्मण, ब्राह्मणीण; कायस्थ, कायस्थीण; तसें परभू, परभीण असें रूप आढळतें पण प्रभु,प्रभ्वीण असें रूप आढळत नाहीं.परभू हें नांव जातिवाचक असें शिवाजीच्या वेळच्या कागदपत्रांत आढळतें ( राजवाडे खं.१६,पृ.२ ). [ राजवाडे-भा. इ. मं. चतुर्थ सं. वृत्त, पृ.४०;महिकावतीची बखर,पृ.५२]

**प्रभोत्सर्जक** ( फॉस्फरेसंट )—सृष्टीमध्यें असे कांहीं पदार्थ आहेत कीं, त्यांना कांहीं काळ प्रकाश दाखविला असतां ते अंधारांत परत प्रकाश देतात; असल्या प्रकारच्या पदार्थांना प्रभोत्सर्जक असें नांव आहे. पुष्कळ मौल्यवान रत्नांच्या अंगीं हा गुण असल्याचें लोकांना माहीत होतें. अलबर्टस म्याग्नस याला असें माहीत होतें कीं, माफक प्रमाणावर हिरा तापविला असतां त्याच्या अंगीं हा प्रभोत्सर्जनाचा गुण येतो. परंतु सृष्टिशास्त्रवेत्त्यांचें या गोष्टीकडे लक्ष वेधण्याला 'बोलोना स्टोन' म्हणजे बोलोनचा खडा या नांवाचा पदार्थ प्रथमतः कारणीभूत झाला. सन १६०२ मध्यें व्हिन्सेन्झो काहकारिओलो नांवाच्या बोलोना येथील चांभारानें हा प्रभोत्सर्जक पदार्थ शोधून काढला, म्हणून त्याला बोलोनाचा खडा असें नांव पडलें.

या शोधामुळें या गोष्टीकडे अनेकांचें लक्ष वेधलें; व त्यामुळें असल्या प्रकारचे पुष्कळ पदार्थ निदर्शनास आले; त्यांपैकीं कांहींना उजेडांत ठेविले असतां त्यांच्या अंगीं प्रभोत्सर्जनाचा धर्म येतो, तर कांहींना तापविल्यानें किंवा घांसल्यानें हा धर्म येतो. होमबर्ग यानें कॅल्शियम् क्लोराइडच्या अंगीं हा धर्म आहे असें दाखवून दिलें; जान कॅटननें कॅलशियम् सल्फाइड आणि बाल्डुइननें कॅल्शियम नायट्रेट प्रसिद्धीस आणलें. स्ट्रान्शियम्, बेरियम् आणि कॅल्शियम् या तीन धातूंच्या सल्फाइडच्या अंगीं हा गुण जास्त प्रमाणांत वास करतो. नैसर्गिक रीतीनें तयार झालेल्या वरील तीन पदार्थांपेक्षां कृत्रिम रीत्या तयार केलेल्या वरील पदार्थत्रयांच्या अंगीं प्रभोत्सर्जनाचा गुण जास्त प्रमाणांत असतो. प्रभोत्सर्जक पदार्थांत सामान्यतः असें दिसून आलें आहे कीं, पदार्थावर पडणाऱ्या किरणांपेक्षां कमी प्रमाणावर नम्रीभवन होण्याचा गुण त्यापासून निघणाऱ्या किरणांच्या अंगीं असतो. प्रभोत्सर्जक पदार्थांत विशिष्ट प्रमाणांत दुसरी कांहीं भेसळ असल्यास प्रभोत्सर्जनाचा गुण जास्त अंशानें दृष्टोत्पत्तीस येतो. हें प्रमाण कमीजास्त झाल्यास हा गुण कमी होतो असें आढळून आलें आहे. फ्लुअर स्पार नांवाच्या खनिज पदार्थांच्या जातींपैकीं क्लोरोफेन नांवाच्या पदार्थास हाताच्या उष्णतेनें गरम केल्यास त्याच्या अंगीं हा धर्म प्रगट होतो. दुसऱ्या कित्येक पदार्थांस जास्त प्रमाणावर उष्ण करावें लागतें परंतु पिवळ्या रंगाच्या कित्येक हिऱ्यांच्या अंगीं नुसत्या हाताच्या उष्णतेनें प्रभोत्सर्जनाची शक्ति येते.

प्रा णि ज प्र भो त्स र्ज न.—सजीव पदार्थांपासून प्रकाश निघतो, हे फार प्राचीन काळापासून लोकांस माहीत असलें पाहिजे. प्राण्यानें आपल्या शरीरांत घेतलेल्या अन्नापासून जशी उष्णता, विद्युत्, आणि गति उत्पन्न होते, त्याप्रमाणें त्या अन्नाचा परिणामरूपानेंच प्रकाश निघत असला पाहिजे. परंतु कित्येक प्राणी असे आहेत कीं, त्यांच्या ठिकाणीं ही जी प्रभोत्सर्जनाची क्रिया दिसून येते,ती त्या प्राण्यांच्या निसर्गसिद्ध विकाराच्या योगानेंच उत्पन्न झाली असली पाहिजे. कित्येक प्राण्यांच्या शरीरांतून हा जो प्रकाश बाहेर पडत असतो तो त्या प्राण्याला आपल्या इच्छेनुरूप कमीजास्त किंवा बंद करतां येत नाहीं; परंतु दुसऱ्या कांहीं प्राण्याला आपल्या इच्छेनुरूप हा प्रकाश कमीजास्त किंवा बंद करतां येतो अगर निसर्गांतील बाहेरच्या फेरफाराप्रमाणें हा बदलतां येतो. कित्येक प्राणिशास्त्रवेत्त्यांचें असें म्हणणें आहे कीं, आपल्या शत्रूंपासून बचाव करण्याकरितां प्रकाश उत्पन्न करण्याची शक्तीहि बचावाचें साधन म्हणून या प्राण्यांच्या अंगीं असली पाहिजे.

जुन्या काळच्या लोकांची अशी समजूत होती कीं, प्रभोत्सर्जक प्राण्याचा प्रकाश स्फुर ( फास्फोरस ) नांवाच्या ज्वालाग्राही पदार्थाच्या मंद-ज्वलनामुळें उत्पन्न होत असावा. फॉस्फोरस आणि त्यापासून झालेले प्रकाशोत्पादक रासायनिक संयुक्त पदार्थ विषारी आहेत; त्यांच्या संसर्गानें सेंद्रिय पदार्थांचा नाश होतो. तेव्हां फॉस्फोरसच्या योगानें सेन्द्रिय प्राण्यांत प्रकाश उत्पन्न होणें शक्य नाहीं असें सिद्ध झालें आहे. हा प्रकाश दुसऱ्या कांहीं रासायनिक क्रियेनें उत्पन्न होत असतो असें आतां समजून आलें आहे. आपल्या देशांत या प्रकारच्या प्राण्यांपैकीं काजवा हा बहुतेकांस माहीत असेलच. यांशिवाय दुसरेहि पुष्कळ प्राणी आहेत. समुद्रांतील कित्येक कीटकांच्या अंगीं अशाच प्रकारचा धर्म आहे. हे सारे कीटक खोल समुद्राच्या तळाच्या अंधेराच्या भागांत बहुधा वास करतात.

**प्रमीला**-स्त्रीराज्यदेशा(भूतान?)ची स्वामिनी. हिनें पांडवांचा श्यामकर्ण नावाचा अश्व धरून अर्जुनाशीं युद्ध केलें. परंतु अर्जुनानें तिला जिंकून तिच्याशीं विवाह केला(ॲमेझॉन पहा).

**प्रयाग**—'अलाहाबाद' पहा. येथें प्रजापतीनें याग केला म्हणून यास प्रयाग नांव पडलें असें म्हणतात. ह्युएनत्संगाच्या वेळीं येथील अक्षय्य वटवृक्ष उभा होता. त्यानें या प्रांताचा घेर ८२२ ( ८२ ? ) मैल लिहिला आहे. त्याच्या वेळीं शहर व संगम यांच्यांत एक कोसाचें अंतर होतें व तेथें मैदान होतें. अकबराच्या वेळच्या अबदुल कादीर या ग्रंथकारानेंहि अक्षय्यवटाचें वर्णन दिलें आहे. [ कनिंगहॅम—एन्शन्ट जिऑग्राफी ऑफ इंडिया ]

**प्रल्हाद**—हिरण्यकशिपूस कयाधूपासून झालेल्या चार पुत्रांतील ज्येष्ट.हा विष्णूचा उपासक असल्यामुळें हिरण्यकशिपूनें याचा छळ केला. शेवटीं नृसिंहानें हिरण्यकशिपूस मारून याचें संरक्षण केलें.

**प्रल्हाद शिवाजी वडवे**—हा महाराष्ट्रीय कवि पंढरपूर येथें सुमारें२०० वर्षांपूर्वी होऊन गेला. याच्या गुरूचें नांव राघव. प्रल्हादबोवांनीं शिवाजीची कांहीं कारकीर्द पाहिली असावी, असें वाटतें. औरंगझेबानें दक्षिणेंत स्वारी केली, तेव्हां पंढरपूरच्या विठ्ठलाच्या मूर्तीचा उच्छेद करण्याचा घाट घातला होता, परंतु प्रल्हादबोवांनीं त्यावेळीं पांडुरंगास आपल्या वळदांत लपवून ठेविलें व आलेला प्रसंग टाळला.प्रल्हादबोवा

प्रेमळ भगवद्भक्त व कवि होता. त्याचें ज्ञानेश्वराच्या अमृतानुभवाचें संस्कृत भाषांतर प्रसिद्ध आहे. तें सरस व रसाळ उतरलें आहे. याशिवाय त्याचें अहिल्योद्धार, सीतास्वयंवर वगैरे मराठी काव्य आहे मोरोपंतानें याचें काव्य वाचलें होतें. त्यानें सन्मणीमालेंत याची ओळख दिली आहे. [ महाराष्ट्रकविचरित्र, भा. १. ]

**प्रवर**—कुलाचे प्रवर ऋषी, म्हणजे ज्यांनीं ऋग्वेदांतील सूक्तें रचिलीं व त्या सूक्तांनीं अग्नीची स्तुति केली असे पूर्वज. गोत्राचा ऋषि हा मंत्रकृत् किंवा मंत्ररचना करणाराच असला पाहिजे असें नाहीं. तो प्रवरऋषीचा एखादा विख्यात वंशज असल्यामुळें त्याच्यापासून उत्पन्न झालेली शाखा किंवा नवीन घराणें त्याचें नांव लावूं लागतें. यावरून गोत्रें हीं अनेक आहेत परंतु प्रवर थोडेच आणि ठराविक आहेत ( कारण वैदिक सूक्तांचे कर्ते हे एकदां ठरलेले आहेत, ते वाढूं शकणार नाहींत ), या वचनाचें सत्य पटून येतें. या प्रकारची माहिती रा. चिंतामणराव वैद्यांनीं मध्ययुगीन भारतांत दिली आहे ती सर्व चुकीची आहे. प्रवरांसंबंधीं पद्धतशीर विवेचन ज्ञानकोश विभाग ३, 'ब्राह्मण्याचा इतिहास' यामध्यें पहा.

**प्रवर्तक वेष्टण** ( इंडक्शन कॉइल )—हें एक विद्युत्च्या योगानें चालणारें यंत्र आहे. त्यामध्यें तारेचीं दोन वेष्टनें असून तीं एका लोखंडी तारेच्या जुडग्यावर एकावर एक अशीं गुंडाळलेलीं असतात. त्यापैकीं एकास मूळ वेष्टण व दुसऱ्यास द्वितीय वेष्टण असें म्हणतात या प्रवर्तकवेष्टणाच्या मूळ वेष्टणांतून( नियतांतरानें ) सारखा विद्युत्प्रवाह जाऊं दिला असतां लोखंडी तारेच्या जुडग्यांत नियतांतरानें चुंबकत्व उत्पन्न होतें व त्यामुळें द्वितीय वेष्टनामध्यें विद्युत्प्रवाह उत्पन्न होतो त्यास प्रवर्तित प्रवाह असें म्हणतात. ह्या प्रवर्तकवेष्टणांतील प्रवर्तित प्रवाहाची विद्युच्चालक-शक्ति बरीच मोठी असण्याकरिता द्वितीय वेष्टनांतील तारेचे वेढे जितके जास्त असतील तितके बरे. ह्या प्रवर्तक वेष्टणाचा उपयोग वैद्यशास्त्रांत, विद्युत्ध्वनि--वाहक यंत्रांत पुष्कळ होतो. पण अलीकडे त्याचा उपयोग आवृत्तियुक्त प्रवाह, रॉन्टजेन किरण किंवा बिनतारी तारायंत्र चालविण्याकडे करतात.

इ. स. १८३१ मध्यें फॅरेडे यानें प्रवर्तित प्रवाहाचें तत्त्व शोधून काढल्यापासून या यंत्रावर बरेच प्रयोग होऊन इ. स. १८५१ मध्यें रुमकॉर्फ यानें तयार केलेलें प्रवर्तकवेष्टण प्रवर्तित प्रवाहाची जास्तींत जास्त विद्युच्चालकशक्ति देण्यास उपयुक्त असें झालें. रुमकॉर्फ यानें द्वितीय वेष्टणाची लांबी बरीच वाढविली व द्वितीय वेष्टणांतील तार ही रेशीम व लाखेच्या वार्निशच्या योगानें व प्रत्येक थर हा त्याच्या शेजारच्या थरापासून वार्निश लावलेल्या रेशमानें विद्युद्विन्यस्त करून मूळ वेष्टण द्वितीय वेष्टणापासून कांचेच्या नळीच्या योगानें विद्युद्विन्यस्त केलें. ह्याच वेष्टणास त्यानें एक स्वयंचालित वेगस्तंभक व एक विद्युत्संचायक जोडून अलीकडील प्रवर्तक वेष्टनाच्या धर्तीवर ह्यास स्वरूप दिलें.

अलीकडील प्रवर्तक वेष्टणांत लोखंडी तारांच्या जुडग्यांत बऱ्याच ओतीव लोखंडाच्या तारा असून त्या एका एबोनाइटच्या नळकंड्यांत घातलेल्या असतात. ह्या नळकंड्याच्या बाहेर मूळ वेष्टण असून त्यांत निरनिराळ्या बऱ्याच तारा असून त्या समांतर अथवा एकापुढें एक जोडतां येतात. मूळ वेष्टणावर पुन्हां एक एबोनाइटची नलिका असून त्या नलिकेची जाडी प्रवर्तित प्रवाह ज्यामानानें विद्युत--स्फुलिंग देतो त्यामानानें असते. मूळ-वेष्टण एबोनाइटच्या नळीमध्यें पूर्णपणें बसवितात.

**प्रसूतिविज्ञान**—हा विषय फार मोठा आहे. तथापि ह्यासंबंधी माहिती संक्षिप्तपणें ग्रथित करतांना ( १ ) प्रसूतीसाठीं लागणारी पूर्वतयारी,(२) प्रसूतिसमयाच्या तीन अवस्था, पैकीं दोन अवस्थांचें वर्णन, ( ३ ) तृतीयावस्थेंत प्रसूतीनंतर लागलीच व दहा दिवसांतील ठेवण्याची व्यवस्था, ( ४ ) मूल व माता यांच्याकडून येणाऱ्या अडचणींचा नामनिर्देश व ( ५ ) अडचणीच्या प्रसूतीसाठीं करण्यांत येणाऱ्या शस्त्रादि क्रियांचा नामनिर्देश आणि( ६ ) अवांतर मोठ्या संकटांचा नामनिर्देश, अशी मांडणी करून या विषयाचा परामर्ष घेतला आहे.

प्र सू ती सा ठीं ला ग णा री पू र्व त या री.—बाळंत होणारी स्त्री रोगट असल्यास ती निरोगी होण्यासाठीं गरोदरपणीं औषधोपचार करावे. बाळंत होण्याची खोली अगोदर निश्चित करून ठेवावी. ती निर्मळ व हवाशीर असून तींत गोंगाट नसावा. बाजेवर अगर लोखंडी पलंगावर कापसाची गादी न घालतां इतर प्रकारचा जाड बिछाना करून त्यावर घाण व रक्त सांडेल म्हणून मेणकापड अंथरावें व त्यावर एक पांढरी स्वच्छ चादर अगर धोतर दुहेरी अगर चौघडी करून मऊसें घालावें. प्रसूतीनंतर हें धोतर व मेणकापड काढलें म्हणजे खालील अंथरूण कोरडें व स्वच्छ रहातें. लुगड्याच्या आंतून एक मोठा परकर त्या वेळेपुरता ( नेसण्याचा प्रघात नाहीं तरी ) तो नेसल्यास प्रसूतीनंतर तेवढा खराब झालेला परकर सोडून घेतला म्हणजे वरचें लुगडें कोरडें रहातें. प्रसूतिसमयीं लुगडें वर खोंवून ठेवावें; व भिजलेला परकर सोडून घेतल्यावर तें खालीं करावें म्हणजे बाळंतीणीस हलविण्याचें कारण नाहीं. जरूरी पुरतें अंग पुसावें. प्रसूतीनंतर बाळंतिणीस पूर्ण विश्रांति हवी. हालचाल उपयोगी नाहीं म्हणून ही व्यवस्था ठेवणें चांगलें.

प्र सू ति स म य न जी क आ स ल्या चीं ल क्ष णें.—बालक आंत असलेलें गर्भाशय कटिराच्या पोंकळींत ओटीपोटांत उतरल्याप्रमाणें गर्भिणी स्त्रीस वाटतें व छातींत व पोटावर दाब पडून तिला जो दम व धांप लागत असते ती अंमळ कमी होते लघवीस वरच्यावर लागतें; चालण्यास अडचण पडते. कोणा स्त्रियांना वरच्यावर शौचास

लागतें व एका अर्थानें तें बरें असतें. त्यायोगें मळ निघून जाऊन तितकी ओटीपोटांतील जागा रिकामी झाल्यामुळें प्रसूति होण्यास सुलभ जातें. बद्धकोष्ठता असेल तर किंवा एरव्हीं देखील यासाठीं सौम्य रेचक देतात व यासाठीं प्रसूतीच्या आरंभीं एनिमा ( बस्ति ) देऊन कोठा साफ करतात. वारेचीं वेष्टनें बोटास योनिमार्गांत स्पष्ट लागतात व गर्भाशयाचें छिद्र बरेंच मोठें तेथें लागतें. गर्भाशयसंकोचनलहरी अधिकाधिक व मधून मधून ओटीपोटांत येतात त्या गर्भिणीसच स्वतःसमजतात व पोट तपासतांना हातास कळतात.मुलें झालेल्या कांहीं बायांनां क्वचित् अशीं पूर्व चिन्हें होत नाहींत. एखाद्या वेळीं खोटया कळा येतात, त्यांचीं लक्षणें हीं कीं, त्यामुळें गर्भाशयाचें छिद्र मोठें झालेलें नसतें व विपुल चिकट स्राव सुटलेला नसतो. एनिमा देऊन त्या कळा थांबतात. खऱ्या कळा येऊं लागल्या म्हणजे प्रसूतीस आरंभ होतो. सुईण अगोदर पाहून ठेवलेली असावी. बाळंतपण खरें सुरू झालें किंवा नाहीं; तसेंच सहजप्रसूति होणार किंवा अडचणीची होणार; व प्रसूतीनंतर बालकाची निगा कशी ठेवावी; हें तीस कळलें पाहिजे. ती धीराची, चतुर, मायाळू, निरोगी, स्वच्छ व प्रसंगवधानी असावी. अशी अनुभविक सुईण अगर पोक्त बाई नसल्यास आतुरालयांत शिकून तयार झालेली सुईण उत्तम. इतर कामासाठीं ( धुणें, पुसणें, न्हाऊं घालणें यांस) मोलकरीण असावी. नाळ कापण्यास चाकू अगर कातरी हवी व ती बांधण्यासाठीं बळकट दोरा तयार ठेवावा. कढत आणि थंड असें पाणी येरचेसें तयार ठेवावें. साबण, एक घव्याळ, बेडपॅन या जिनसा खोलींत असाव्या. पांढरे स्वच्छ अनेक रुमाल व फडकीं व मागाहून बाळंतिणीचें पोट बांधण्याकरितां कापडाचा अगर धोतराचा केलेला लांब पट्टा तयार ठेवावा. मलमूत्रावर व मोरींत टाकण्यासाठीं फिनाईल, लायसोल, यांपैकीं एखादें जंतुघ्न औषध असावें. खऱ्या कळा सुरू झाल्या म्हणजे मात्र बाळंतिणीस पलंगावर निजवावें. डाव्या कुशीवर तीस निजवल्यास मूल बाहेर येण्याच्या जोरानें पहिलटकरीण गर्भिणीचा योनीच्या मागील भाग जास्त फाटत नाहीं. बाळंतीण कोणी उताणीहि निजवतात व त्यामुळें कळा चांगल्या येतात. प्रथम सुईणीनें आपले हात व नखें जंतुघ्न साबणानें स्वच्छ धुवून जंतुघ्न द्रव्यमिश्रित तेलांत बोट बुडवून योनिमार्ग तपासावा. म्हणजे गर्भाशयछिद्र मोठें व सैल आढळणें, मुलाची कवटी, डोकें, मुख अगर पायाळू मूल येत असल्यास ढुंगण, गुदद्वार अगर तें आडवें आलें असल्यास खांदा बोटास लागतो व चिकट स्राव पुष्कळ असल्यास प्रसूति नीट चालेल असें तीस कळतें. पायाळू व आडवें मूल आहे असें कळल्यास अगर नाळ पुढें गेणे अगर वार पुढें असून रक्तस्राव फार सुरू होणें हीं लक्षणें व गर्भाशयछिद्र फार वेळ होऊनहि सैल न झाल्यास सुईणीनें धोक्याची सूचना देऊन वैद्य, डॉक्टर, डाक्टरीणीची मदत बोलवावी. अगर आपल्या अनुभवाप्रमाणें काम करावें. प्रसूतीच्या आरंभीं व मागाहून तिनें जंतुघ्न साबणानें योनिमार्ग धुवावा. म्हणजे दहा दिवसांतील तापाचा बहुधा प्रतिबंध होतो. अगोदर नुसतें ओटीपोट तपासूनहि मूल डोक्याकडून येणार किंवा नाहीं हें सुईणीस समजलें पाहिजे.

प्रसूतीच्या तीन अवस्था.—प्रसूतीची प्रथमावस्था म्हणजे कळा येऊन गर्भाशयछिद्र मोठें व सैल होऊन योनिमार्गहि सैल होण्यास आरंभ होणें ही होय. हिच्या आरंभीं थोडा विटाळ म्हणजे रक्त पडतें. यांत पहिलटकरणींनां वेदना फार होतात. परंतु या वेदनांमध्यें व मुलें झालेल्या बायांत व्यक्तिवैचित्र्याप्रमाणें कमी, अगर असह्य वेदना होतात. यावेळीं गर्भिणीनें एकसारखें निजूं नये, तर कांहीं वेळ बसावें व थोडें हिंडावें देखील. ही अवस्था अंमळ चेंगटच असते. गर्भिणी निजली तर उताणें निजल्यानें कळा येण्यास मदत होते. मात्र तिनें आतांपासून कुंथून दमूं नये तिनें या वेळीं दूध अगर हलका अल्पाहार करावा म्हणजे शक्ति टिकून रहाते. यावेळीं सुईणीनें बोट घालून उगाच वरच्यावर तपासूं नये. त्यामुळें योनिमार्ग कोरडा होतो. मात्र मध्येंच गर्भाभोंवतालची पाणमोटळी फुटल्यास तेव्हां जरूर तपासावें. कारण पाण्याच्या लोंढ्याबरोबर डोक्याकडून अगर दुसऱ्या भागाकडून मूल येत असल्यास प्रवाहाच्या जोरानें तें फिरण्याची व प्रसूतीस अडचण येण्याची भीति असते. यावेळीं सुईणीनें गर्भिणीस मधून मधून लघवी करण्यास सांगावें व तीस संकोच न व्हावा म्हणून वाटल्यास आपण अंमळ खोलीबाहेर जावें. गर्भाशयछिद्र पूर्ण मोठें झालें अशी खात्री वाटली व वेळ लागूं लागला तर सुईण अनुभविक असल्यास तिनें पाणमोटळी कळ येऊन ताठ झाली असतां तींत बोट खुपसून व नखानें कुरतडून अगर स्वच्छ दाभणानें टोंचून फोडावी व असें करण्याच्या अगोदर गर्भिणीच्या नितंबाखालीं बेडपॅनचें भांडें ठेवलें म्हणजे त्यांत घाण पाणी सांडेल, व बाळंतीण विनाकारण भिजणार नाहीं. त्या भांड्याबाहेर सांडणारें पाणी फडक्यांनीं टिपून घ्यावें.

द्वितीयावस्थाः—हा गर्भाशयछिद्र पूर्ण मोठें होऊन पाणमोटळी फुटून बालक बाहेर येण्यापर्यंतचा काळ असतो. यावेळीं येणाऱ्या कळांचें स्वरूप पालटतें. त्या वरच्यावर व फार जोराच्या येतात व पूर्वीच्या कळा ज्या सुमारें मिनिटभर टिकत त्या दीड दोन मिनिटेंहि टिकतात;व पुढें तर सारख्या कळाच येऊन शेवटीं मूल उपजतें. यावेळीं कळा जोराच्या असतातच पण कोणी न सांगतां शिकवतां पलंगाच्या पायाकडील कठड्यास पाय टेंकून त्या आधारानें बाळंतीण कुंथून या कळांनां आपणाकडून आपोआप मदत करते, अगर उशाशीं अगर पायथ्याशीं एक टॉवेल पलंगास बांधून तो हातांत धरून कुंथण्यास मदत होते. प्रथमावस्थेंत बाळंतिणीचें रडणें ऐकूं येनें पण आतां वेदना अधिक असून कुंथण्याच्या वेळीं आंत श्वास ओढून तो दाबून ठेवावा लागत असल्यामुळें रडणें फारच कमी असून जेव्हां कळ निघून जाते

तेव्हां ऐकूं येतें; म्हणून या मोठ्या कळा तिला पूर्वीच्या कळांच्यापेक्षां असह्य वाटतात. कारण मुलाच्या प्रसूतीची प्रगति होत आहे हें तिला कळत असतें व पूर्वीच्या कळांच्या वेळीं ही आशा तिला नसते. योनिमार्गाच्या बाहेरील कांठावर मुलाचें डोकें येतांना तिचा मागील भाग फाटूं नये म्हणून बाळंतीण वेदनेमुळें रडूं लागली की, कुंथण्याचा जोर आपोआप कमी पडून तें फाटणें टळतें. ती तेव्हां न रडेल तर सुईणीनें तिला थोडें रडण्यास अगर निदान थोडें हळू ओरडण्यास मुद्दाम सांगावें व त्यावेळीं त्या भागावर आपला पंजा आडवा ठेवल्यानें फाटण्याचें संकट टळतें. नंतर कळा येऊन डोकें पुढें सरतांना गुदावर त्याचा दाब पडून त्यांतील मळहि बाहेर येतो, यासाठीं प्रसूतीच्या आरंभीं एनिमा देणें चांगलें. त्या दाबामुळें गुदद्वार मोठें होतें व नंतर योनीमागील किंचित भाग पहिलटकरणी बाळंतिणीचा फाटून प्रथम डोकें व नंतर सर्व मूल उपजतें. या अवस्थेमध्यें सुईणीनें वरचेवर बोट घालून प्रगति होत आहे असा धीर बाळंतिणीस द्यावा. खरें म्हटलें तर निसर्गतःच यावेळींहि प्रसूति होत असते; पण धीर व उत्तेजन बाळंतिणीस पाहिजेच. या अवस्थेंत अशक्त गर्भिणी असह्य वेदनांनीं रडूं लागली तर वेदनेच्या वेळीं दम कोंडून कुंथण्यास तीस मुद्दाम सुईणीनें सांगावें म्हणजे प्रगति होते. डोकें योनीबाहेर आल्यावर त्याच्या गळ्याभोंवतीं नाळेचा विळखा आहे कीं काय हें पहावें व असल्यास तो काढावा अगर खांद्यावर सरकवावा; अगर तो इलाज न चालेल तर तसा पूर्ण मूल उपजण्याच्या अगोदरच्या स्थितींत नाळ कापावी. प्रसूतीस फार वेळ लागला तर मुलाचें तोंड व अंग काळेंनिळें होऊन तें रडत नाहीं. तसें झाल्यास त्याच्या अंगावर व तोंडावर थंड पाण्याचे हबके मारावे म्हणजे मूल रडतें. घसा घरघर वाजूं लागल्यास घशांतील चिकट स्राव पुसून काढावा. नंतर अनेक बारीक दोरे मिळून अमळ जाड केलेल्या दोऱ्यानें बेंबीपासून दोन इंचांवर नाळ बांधावी. बाळंतिणीच्या ओटीपोटावर टणक गर्भाशय लागतो तेथें पंजानें दाबून ठेवण्यास, सुइण कामांत असल्यास दुसऱ्या कोणास सांगावें. मूल उपजल्यामुळें ओटीपोट बरेंच लहान झालें पाहिजे. तसें तें नसल्यास जुळें मूल बहुधां गर्भाशयांत शिल्लक असतें व त्याची प्रसूतीहि लवकर होते.

*प्रसूतीची तृतीयावस्थाः*—मूल उपजल्यावर पूर्वीच्या वेदना व श्रमानंतर बाळंतिणीस फार आराम व सुख वाटतें. थोड्याच स्त्रियांनां मागाहून भोंवळ, थकवा वाटणे व थंडी वाजणें हीं लक्षणें होतात. या तृतीयावस्थेंत गर्भाचीं वेष्टणें व वार पडते. मूल उपजल्यावर बराच रक्तस्राव व कोंडलेलें पाणमोटळीचें पाणी पडतें त्यावरून वार सुटण्याला आरंभ झाला असें समजावें. गर्भाशयाच्या आकुंचनानें वारेची उमट व वाटोळी घडी पडून ती सुमारें १५।२० मिनिटांनीं बाहेर येते व तीवरचीं वेष्टणें उलटीं होतात. क्वचित मूल उपजतांच लागलीच पाठोपाठ वार पडते. पण ती सावकाशपणें पडली म्हणजे गर्भाशयांतील मोठ्या रक्तवाहिन्यांतील रक्त गोठण्यास वेळ मिळतो व मागाहून भीतिकारक रक्तस्राव होण्याचें टळतें. ती वार पडल्यावर गर्भाशय पोट तपासून पाहिला तर हातास क्रिकेटच्या चेंडूप्रमाणें टणक लागतो व मूत्राशयाच्या वर तो सुमारें ५ इंच असतो. प्रसूतीच्या तिन्ही अवस्था मिळून पहिलटकरणींनां सुमारें पंधरा तास लागतात. गर्भिणी ३५ वर्षें वयाच्या पुढील असल्यास २४ तासांपेक्षां अधिक वेळ लागतो. लेंकुरवाळ्या बायानां ७।८ तास लागतात. प्रसूतीच्या या तृतीयावस्थेंत सुद्धां सुइणीकडून व्यवस्था व जपणूक उत्तम झाली पाहिजे म्हणजे सूतिकाज्वरादि महा संकटें टळतात व याच वेळीं क्षयगय होण्याचा विशेष संभव असतो. वार लवकर पडण्यासाठीं ती कोणी अडाणी सुइणी नाळेनें ओढतात. पण तें करणें वाईट व धोक्याचें आहे. मूल उपजतांच बाळंतिणीस अर्गट औषधाचा अर्क (३० थेंब) थोड्या पाण्यांत घालून पाजावा. नंतर आकुंचनामुळें घट्ट व टणक झालेल्या गर्भाशयावर हाताच्या पंजानें जें दाबून धरलेलें असतें त्याऐवजीं तो टणक गोळा चांगला व हळू हळू वाटोळा हात फिरवून चोळावा म्हणजे वारहि सुटते व आकुंचनहि चांगलें होतें. यानंतर योनिमार्गांत वारेची खालची धड बोटास लागल्यास मग ती कडेनें धरून काढून घेण्यास हरकत नाहीं; पण पोट न चोळतां एकदम नाळेस धरून ती ओढली तर खोलींतील सर्व मंडळी निघून गेल्यावर प्राणघातक व महारक्तस्राव मागाहून होण्याचा फार संभव असतो; अगर गर्भाशयांत बाहेरील हवेचा प्रवेश होतो. यानंतर सुईणीनें उलटी झालेल्या गर्भाच्या वेष्टणाच्या पिशवीचे पापुद्रे व वार पाण्यानें धुवून तपासावी. ती सबंध आहे किंवा कोठें तिचा अगर वेष्टणांचा तुकडा राहिला आहे हें पहावें. दोहोंपैकीं एखाद्याचा तुकडा गर्भाशयांत राहिल्यानें तेथें तो कुजून सूतिकाज्वर येतो, म्हणून तसे तुकडे आंत राहिल्यास योनिमार्ग व गर्भाशयाच्या छिद्रांत बोट घालून बोटास लागतील ते तुकडे व गोठलेलें रक्त बाहेर काढून घ्यावें. सरतेशेवटीं जंतुघ्न औषधमिश्रित कढत पाण्याच्या प्रवाहानें योनिमार्ग धुवून काढावा, म्हणजे सूतिकाज्वरप्रतिबंध उत्तम होतो. या प्रसूतिसमयीं उत्तम जंतुघ्न औषध कीं ज्यायोगें सूतिकज्वरादि भयांचें निवारण व प्रतिबंध होतो; रसकापूर या महाविषारी औषधाचा १ भाग ४००० भाग पाण्यांत विरघळून धुण्याचें औषध तयार करणें होय. पण हें घरच्या माणसांनीं करू नये. तें महाविषारी असल्यामुळें माहितगार डॉक्टर-डॉक्टरणींनेंच तें वापरावें. त्यांत चूक झाल्यास अनर्थ होतील. तें नीट वापरल्यास फारच हितावह होईल. या धुण्याच्या अगोदर सुईणीनें गर्भाशयाच्या मुखाच्या काठावर कांहीं जखम पडली असल्यास तीवर औषध लावावें व योनि व गुदद्वारामधील भाग फाटला असल्यास तेथें टांके घालून शिवण्यासाठीं डॉक्टर

अगर डॉक्टरीण यांनां बोलवावें. नंतर लांब पट्ट्यानें पोट बांधावें. त्यानें आंतील ढिल्या झालेल्या इंद्रियांनां आधार मिळतो. यानंतर बाळंतणीस ज्वर आहे कीं काय, हें पहावें व नाडीचा वेग मोजावा. तो या वेळीं दर मिनिटास १०० पेक्षां अधिक असूं नये. असल्यास कांहीं तरी भय आहे असें समजून त्याचें कारण शोधून त्यावर वेळींच उपाय केले पाहिजेत. प्रसूतिमध्यें औषध देणें तें वैद्यडॉक्टरी सल्ल्यानें द्यावें. अडाणी सुइणी प्रसूतीच्या आरंभीं अर्गटचा अर्क कळा येण्यासाठीं देतात, त्यामुळें अपाय होण्याचा संभव असतो. आरंभीं क्विनाईन ५ ग्रेन दिल्यास कळा येण्यास उपयोग होतो. नंतर मुलास नाहूं घालून निजवावें. त्याच्या डोळ्यांत पुढें जुनाट खुपऱ्या होऊं नयेत म्हणून औषध (सिल्व्हर नैट्रेट ४ ग्रेन व बाष्पजल १ औंस) याचा १ थेंब दोन्ही डोळ्यांत एकदां घालावा. दहा दिवसांत बाळंतिणीचा ज्वर व नाडीचा वेग यांचें टिपण ठेवावें. १२ दिवस तिला भेटीस येणाऱ्याशीं फार बोलूं देऊं नये. बालक लागलीच एकदां पाजण्यास द्यावें. माता अशक्त असली तरी दीड दोन महिने तरी मूल अंगावर पाजावें. तें पाजणें दोघांसहि हितावह असतें. माता सशक्त असल्यास पुढेंहि पाजावें. दहा दिवसांत तिला हलकें पण पौष्टिक अन्न द्यावें. ज्वर असल्यास दूध व पातळ अन्न द्यावें. तिला अंगावर दूध आलें तर पाहिजे व ती बाजेवर पडून असल्यामुळें व्यायाम तिला नाहीं हें ध्यानांत ठेवून तीस पुरेसें अन्नपाणी दूध, चहा, कॉफी, तूप, लोणी, मांस, अंडीं वगैरे अन्न आवड व धर्मांप्रमाणें द्यावें. अपचन मात्र होऊं देऊं नये. खोलींत स्वच्छता ठेवावी. खिडक्या शक्य तेवढ्या हवेसाठीं उघड्या ठेवाव्या. थंडी असल्यास बिस्तवाची शेगडी ठेवावी. सकाळ संध्याकाळ जननेंद्रियें जंतुघ्न औषधांनीं धुवावींत. मलशुद्धि नीट होईल अशी व्यवस्था ठेवावी. पहिले एक दोन दिवस बाळंतिणीनें अगदीं पडून रहावें. नंतर जेवण्यासाठीं वगैरे उठून ती बसली तरी चालते. मात्र ज्वर असल्यास उठणें उपयोगी नाहीं.

वरील सर्व वर्णन निरोगी गर्भिणीसंबंधीं असून कटिर व नितंबप्रदेशांत व्यंग नाहीं अशा स्त्रीचें आहे. म्हणजे तें निर्विघ्न प्रसूतीचें झालें. अडचणीच्या प्रसूतीचे ढोबळ कारणांचा फक्त नामनिर्देश येथें करतों:—

गर्भिणीमातेकडून येणाऱ्या अडचणीः—ओकारी व डोहाळे अतिशय लागणें, पंडुरोग, कंपवातरोग, बेशुद्धि, झटके, अंगास सूज येणें, मूळव्याध, गर्भाशय स्थानभ्रष्ट होणें, हृदयरोग. कावीळ, यकृतरोग, कफक्षय, फुफ्फुसदाह; ओटीपोटांत ग्रंथिरोग, हिवताप, फिरंगोपदंश, देवी वगैरे सांथीचे ताप, महामारी, रक्तस्राव, अतिशीघ्रप्रसूति, अतिचेंगट प्रसूति, नाना तऱ्हेची वांकडी फेंगडी चिंचोळी कटिरें व नितंबप्रदेश.

रोगट गर्भामुळें व मुलाच्या विकृतीमुळें येणाऱ्या अडचणीः—गर्भाच्या वेष्टणांत होणारे नाना रोग, ग्रंथिरोग, नाळेस गांठी, पीळ व वेढे पडणें, मृतगर्भ, वाळलेला गर्भ, हातपाय फाफलेला गर्भ, किडलेला व कुजलेला गर्भ, फिरंगोपदंशग्रस्त गर्भ, मुलाचा एक हात, पाय, अगर खांदा पुढें येणें, मूल आडवें येणें, एकमेकांत अडकलेलीं व गुंतलेलीं जुळीं मुलें, दोन डोक्यांचीं वगैरे विद्रुप मुलें, अकालीं गर्भपात होणें, पायाळु मूल वगैरे.

वरील नाना प्रकारच्या अडचणींच्या निवारणार्थ करण्यांत येणारीं नानाप्रकारचीं मुख्य कर्मे व शस्त्रक्रियाः—मातेच्या परम दुर्बलतेसाठीं मुद्दाम गर्भपात करणें ( ही क्रिया निदान दोन डॉक्टरांच्या संमतीनें करावी); पायाळू मुलाची प्रसूतिक्रिया; चेंगट व अडलेली प्रसूति मोठ्या चिमट्याच्या साह्यानें पूर्ण करणें; म्हणजे मूल आडवें येणें वगैरे प्रसंगीं मूल फिरवणें म्हणजे डोकें अगोदर येणार असेल तें फिरवून पाय ओढून अगोदर आणणें; जिवंत मूल काढणें शक्य नसेल तेव्हां व मातेच्या जिवाच्या रक्षणासाठीं मूल कापून काढणें; चिंचोळ्या कटिरांच्या स्त्रियांच्या जननेंद्रियाच्या मार्गानें प्रसूति शक्य नसल्यास मूत्राशयाच्या अंमळ वर अगर ओटीपोट चिरून प्रसूति करणें. यासच सीझेरियन शस्त्रप्रसूति म्हणतात. कारण या क्रियेनेंच ज्यूलियस सीझर उपजला. आफ्रिकेंतील रानटी लोकांतहि ही शस्त्रक्रिया करतात ही गोष्ट सत्य व विश्वसनीय आहे. नाळेच्या वेढ्यामुळें मूल गुदमरतेवेळची प्रसूति; फाटलेला योनिमार्ग व इतर जखमा शिवणें; आंत राहिलेली वार अगर तिचे तुकडे काढणें.

अवांतर मोठीं संकटें:—सूतिकाज्वर चिकित्सा; बाळंतिणीस आरंभीं अगर मागाहून लागणारें वेड. तिचा हात अगर पाय एकदम फार सुजून पांढरा होणें; विपुल दुधामुळें वगैरे स्तनदाह व स्तनांत गळू; स्तनांच्या बोंडशीस पडणाऱ्या भेगा वगैरे होत.

**प्रसेन**—सत्राजिताचा भाऊ. स्यमंतक मण्याच्या कथेंत याचा उल्लेख येतो 'सत्राजित' पहा.

**प्रसेनजित** ( १ ) जमदग्नीचा श्वशुर जो रेणु राजा त्याचें नांव.

( २ ) हा कलियुगांतील सूर्यवंशी राजा. शुद्धोदन राजाचा मुलगा बुद्ध हा राज्य न करतां अरण्यांत निघून गेला त्यामुळें यास राज्य मिळालें.

**प्रस्थानत्रयी**—प्रस्थानत्रयीमध्यें, उपनिषदें, वेदान्त सूत्रें व श्रीमद्भगवद्गीता या तीन धर्मग्रंथांचा समावेश होतो. निवृत्तिमार्ग व प्रवृत्तिमार्ग या दोन्ही मार्गासंबंधीं तात्त्विक विवेचन करणारे वैदिक धर्माचे वरील तीन ग्रंथ हे आधारस्तंभ होत. या तिन्ही ग्रंथांचें प्राचीन काळापासूनच प्रामाण्य प्रस्थापित झालें होतें. त्यामुळें प्रत्येक धर्मसंप्रदायाच्या प्रवर्तक आचार्यांनीं या प्रमाणभूत अशा प्रस्थानत्रयीवर टीका लिहून, आपलीं मतें या प्रस्थानत्रयीशीं विसंगत नसून त्या प्रस्थानत्रयीवरून आपला संप्रदायच खरा ठरतो असें सिद्ध

करण्याचा प्रयत्न केला. या प्रस्थानत्रयीवर भाष्यें लिहिणाऱ्यांमध्यें श्रीमत् शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य इत्यादि प्रमुख होत.

उपनिषदांमध्यें जीव व शिव यांचा विचार करण्यांत आला आहे. हीं उपनिषदें पुष्कळ असल्याकारणानें व तीं निरनिराळ्या काळीं रचिलीं गेलीं असल्याकारणानें, त्यांच्यामध्यें, परस्परविरुद्ध असे विचार आढळून येतात; व तसें होणें स्वाभाविकहि आहे. उपनिषदांतील हा विचारविरोध काढून टाकून सर्व उपनिषदांचें जीवशिवासंबंधीं ऐकमत्य आहे हें दाखवून देण्यासाठीं बादरायणाचार्यांनीं वेदान्तसूत्रें रचिलीं. या वेदान्तसूत्रांसच शारीर सूत्रें, अगर ब्रह्मसूत्रें अशीं दुसरीं नांवें दिलीं आहेत. उपनिषदांची एकवाक्यता करण्यासाठीं रचलेल्या या वेदान्तसूत्रांना उपनिषदांइतकीच योग्यता थोडक्याच काळांत प्राप्त झाली. तथापि या दोन्ही ग्रंथांत विशेषतः निवृत्तिमार्गावरच भर दिला असल्याकारणानें वैदिक धर्मांतील प्रवृत्तिमार्गाचें विवेचन यांत आलेलें नव्हतें. ही उणीव भरून काढणारा ग्रंथ म्हणजे श्रीमद्भगवद्गीता हा होय. खुद्द भगवंताच्या तोंडातूनच ही गीता निघाली अशी समजूत असल्यामुळें उपनिषदें व वेदान्तसूत्रें यांच्या इतकीच भगवद्गीतेला मान्यता प्राप्त झाली व अशा रीतीनें या तिन्ही ग्रंथांनां प्रस्थानत्रयी असें नांव रूढ झालें. अर्थात ही त्रयी म्हणजे वैदिक परमार्थविचाराचें सांगोपांग विवेचन करणारे तीन मूलभूत ग्रंथ होत यांत शंका नाहीं.

**प्रज्ञापारमिता**–सर्व तत्त्वज्ञानविषयक महायानसूत्रांपैकीं अत्यंत महत्त्वाचीं आणि अत्यंत मोठा मान पावलेलीं म्हणजे प्रज्ञापारमिता–बुद्धीची परिपूर्णता हीं सूत्रें होत. ह्यांत बोधिसत्वाच्या सहा " परिपूर्णतांचें " ( पारमितांचें ) वर्णन आलें आहे.पण विशेषतः प्रज्ञेचें–सर्वश्रेष्ठ परिपुर्णतेचें वर्णन आहे. ही प्रज्ञा ( बुद्धि, बोध ) म्हणजे शून्यवादाचें ज्ञान, नास्तिकवाद; त्यांत सर्व गोष्टी मिथ्या, पोकळ आहेत असें सांगितलें आहे. अस्तित्व आणि नास्तित्व दोन्ही नाकबूल केलीं आहेत. आणि प्रत्येक प्रश्नाला फक्त " नाहीं " एवढेंच उत्तर दिलेलें आहे. खरोखर असें म्हणतात, कीं प्रथम एक १,२५,००० श्लोकांचें सूत्र होतें, आणि त्यांत मुख्य वक्ता बुद्ध आहे अशा संवादाच्या रूपांत ह्या प्रज्ञेविषयीं उपदेश केलेला होता. नंतर या सूत्राचीं १,००,००० श्लोकांचें, २५००० श्लोकांचें, १०००० श्लोकांचें आणि ८००० श्लोकांचें अशीं संक्षिप्त सूत्रें बनविण्यात आलीं. परंतु दुसरी एक अशी परंपरा आहे कीं, मूळ सूत्र ८००० श्लोकांचें होतें. नंतर त्यांचें अधिक मोठें सूत्र वाढविण्यांत आलें. १,००,०००, २५०००, ८०००, २५०० आणि ७०० श्लोकांच्या अशा पारमिता उपलब्ध आहेत. पुनरावृत्ति करण्याची वाईट संवय पाली सूत्रामध्यें आहे; तीच ह्या ठिकाणीं मोठमोठाल्या प्रज्ञापारमितांमध्यें कळसास पोंहोचविली आहे. बुद्धाच्या सर्व शरीरापासून प्रकाशाचे किरण बाहेर पडतात व सर्व जगाला अपरमित प्रकाश देत असतात असें प्रस्तावनेंतच म्हटलें आहे व तें बोटांविषयीं, घोट्यांविषयीं, शरीराच्या प्रत्येक भागाच्या प्रत्येक अवयवाविषयीं म्हटलें आहे. पुढें जगाच्या प्रत्येक भागाविषयीं पुन्हां पुन्हां तसेंच म्हटलें आहे. शब्दांनीं कांहींहि व्यक्त करतां येत नाहीं, आणि कोणत्याहि प्रश्नाला " नाहीं " याशिवाय दुसरें उत्तर देतां येत नाहीं, अशा तऱ्हेचें मत निघालेलें होतें. पुस्तकें आणि हजारों पानें हीं सर्व नास्तिक मताच्या संबंधानें लिहिलीं जावीं ही गोष्ट मात्र कोणालाहि अशक्यच वाटेल. प्रज्ञापारमितांमध्यें हीच अशक्य गोष्ट प्रत्यक्ष कृतींत उतरली आहे. बौद्ध भिक्षूंनीं हें येवढें पुष्कळ लिहून ठेवलें याचें कारण असें कीं, ह्या पवित्र ग्रंथांबद्दल शक्य तितकें पुष्कळ लिहिणें व वाचणें हें एक पुण्यकर्म आहे असें ते मानीत असत. त्यांतल्या तत्त्वार्थाला मुळींच महत्त्व नव्हतें.

**प्राउट** ( १७८५ ते १८५० )—एक आंग्ल रसायनशास्त्रज्ञ. हा लंडन येथें वैद्यकीचा धंदा करीत असतां वैद्यकीमध्यें येणाऱ्या रसायनशास्त्राचा त्यानें अभ्यास करून जिवंत प्राण्यांपासून मिळणाऱ्या पदार्थांचें पृथक्करण सुरू केलें. त्यानें जाठररस शोधून काढला व सन १८२३ मध्यें असें सिद्ध केलें कीं, पोटांतील अम्ल पदार्थांमध्यें हराम्ल असून तें उर्ध्वपातनाच्या योगानें वेगळें करतां येतें. इसवी सन १८१५ त त्यानें ॲनल्स ऑफ फिलॉसफीमध्यें 'वायुरूप पदार्थांच्या विशिष्टगुरुत्वाचा त्यांच्या अणूंच्या वजनाशीं असणारा संबंध ' या विषयावर एक निबंध लिहून असें सिद्ध केलें कीं,मूळद्रव्याचे परमाणुभारांक हे उज्जाच्या परमाणुभारांकांच्या पूर्ण पटी इतके असतात. याच नियतकालिकांत त्याचें दुसरा एक निबंध लिहून असें दाखविलें कीं इतर मूळद्रव्यें उज्जापासूनच दृढीकरण होऊन किंवा निराळ्या रीतीनें उज्जाचे कांहीं भाग एकत्र होऊन बनलेलीं आहेत. ह्यास प्राउटचा सिद्धांत म्हणतात. हा सिद्धांत खरा कीं खोटा हें पाहण्याकरितां ह्या वेळेपासून बरेच प्रयत्न करण्यांत येऊं लागले व बिनचूक परमाणुभारांक शोधून काढण्याकडेहि लोकांचें लक्ष वेधलें गेलें.

**प्राऊस्ट** ( १७५४–१८२६ )—एक फ्रेंच रसायनज्ञ. याच्या बापाचें औषधें विकण्याचें दुकान होतें तेथेंच हा रसायन शास्त्र शिकला व त्या शास्त्राचा स्पेन देशांत अध्यापकहि झाला. याचा बार्थोलेशीं पदार्थसंमीलनाच्या नियमांविषयीं विरोध होता.दोन पदार्थ संयोग पावतांना नेहमीं ( अव्वल संयोग ) एकाच प्रमाणांत संयोग पावतात असें बार्थोलें म्हणे. व एका पदार्थाशीं दुसरा पदार्थ एकगुणित, द्विगुणित, त्रिगुणित, अशा गुणित, (गुणितसंयोगनियम) प्रमाणांत संयोग पावतात असें प्राऊस्टचें मत होतें. याच्या सिध्यर्थ त्यानें ताम्रकार्बनित, लोहगंधकिद, इत्यादि पदार्थांचे दोनदोन प्रकार तयार करून दाखविले व आपल्या मताची सत्यता पटविली. वनस्पतींच्या

रसांतील साखर त्यानें तपासली व द्राक्षांतील व मधांतील साखर एकच आहे असें ठरविलें.

**प्राग**—( प्रेग ) चेकोस्लोव्हाकिया. हें शहर बोहेमियाची जुनी राजधानी होय. बोहेमियाची प्रतिनिधिसभा याच शहरीं भरते. याची लो. सं. (१९२१) ६७६६५७. या लोकसंख्येपैकीं जवळ जवळ एकपंचमांश जर्मन असून बाकीचे चेक आहेत हें शहर नदीच्या दोन्हो तीरांवर वसलें आहे. हें फार पुरातन असून दुसऱ्या रेडॉल्फच्या कारकीर्दींत यास महत्त्व प्राप्त झालें होतें. ३० वर्षांचें धार्मिक युद्ध याच शहरीं पहिल्यानें उपस्थित झालें. स. १७४० व १७५७ च्या युद्धांतहि येथें पुष्कळ चकमकी झाल्या. १९ व्या शतकाच्या प्रारंभीं बोहेमियन लोकांतील नष्ट झालेला स्वदेशाभिमान पुन्हां जागृत करण्याकरितां जी चळवळ सुरू झाली तिचें हें केंद्रस्थान होतें. या शहरीं पुष्कळ जुन्या इमारती आहेत. येथें स. १३८१ त बांधलेलें एक नगरभवन आहे. येथील ज्यू लोकांचें प्रार्थनामंदिर यूरोपमधील अति जुन्या देवालयांपैकीं एक होय. या शहरीं कारोलीनम व क्लेमेंटीनम या नांवाचीं दोन विद्यापिठें आहेत. यांपैकीं कारोलीनम विद्यापीठ इ. स. १३४३ त स्थापिलें. क्लेमेंटीनम हें पूर्वी जेसुइट लोकांचें विश्वविद्यालय असून तें त्यांनीं सन १५७८–१७१५ च्या दरम्यान बांधलें. यांत एका पुस्तकालयाचा व वेधशाळेचाहि समावेश होतो.

**प्राग्ज्योतिषपूर**—' कामरूप ' पहा.

**प्राचेतस**—' दक्ष ' पहा.

**प्रॉटेस्टंट पंथ**—ख्रिस्ती धर्मसुधारणेच्या ( रेफर्मेशन ) वेळीं जीं तत्त्वें प्रतिपादण्यांत आलीं त्यांना अनुसरणारे जे ख्रिस्ती धर्मपंथ ( चर्चे ) आहेत त्यांना हें सर्वसाधारण नांव आहे. स्पिरेसच्या सभेच्या ( १५२९ ) कार्याला पवित्र रोम साम्राज्यांतील संस्थानिकांनीं व १४ बादशाही शहरांनीं जो विरोध केला त्याला उद्देशून हें नांव प्रचारांत आलें. या सभेची आज्ञा अशी होती कीं, ख्रिस्ती धर्मांत चालू स्थिति कायम ( स्टेटस को ) ठेवावी, कोणत्याहि नव्या सुधारणा करूं नयेत. प्रॉटेस्टंट हें नांव पुढें सर्व ख्रिस्ती धर्मसुधारणावाद्यांनां लावण्यांत येऊं लागलें. या शब्दांत स्वातंत्र्य, वैयक्तिक मताचा हक्क व परमतसहिष्णुता या गोष्टींचा अन्तर्भाव होऊं लागला. प्रॉटेस्टंट चर्च हा शब्द बराच मागाहून प्रचारांत आला. प्रथम ' रिफॉर्म्ड चर्च ', ' लुथेरन चर्च ' वगैरे शब्द वापरीत असत. या पंथाची अधिक माहिती ' ख्रिस्त्य ' व ' लूथर ' या शब्दांखालीं पहा.

**प्राण** (ऑक्सिजन)–हा एक वायु असून प्रथमतः स्टीफन हेल्स यानें शेंदूर उष्ण करून तो तयार केला. तथापि त्याला आपण एक नवीन मूलद्रव्य शोधून काढलें आहे असें कळून आलें नाहीं. हाच वायु पुढें प्रीस्टले यानें पारद–प्राणिद ( हिंगूळ ) तापवून तयार केला व त्याचे गुणधर्म शोधून काढून त्यानें त्यास 'ज्वलन तत्त्वविरहित हवा' असें नांव दिलें. शील यानेंहि याच वेळेस हाच वायु शोधून काढला. लव्हॉझिए यानें प्रीस्टलेचाच प्रयोग पुन्हां करून मिळालेल्या वायूस ऑक्सिजन किंवा प्राण ही संज्ञा दिली. वातावरणांतील तो एक मुख्य घटक असून त्याचा उज्जशीं संयोग होऊन झालेलें पाणी पृथ्वीवर जिकडे तिकडे पसरलेलें दिसून येतें. वाढतीं झाडें प्राणवायु देतात. कारण तीं कर्ब आंत घेऊन प्राण बाहेर टाकतात. पारदप्राणिदापासून तें तापविलें असतां हा वायु वेगळा होतो. मंगल–द्वि–प्राणिदापासून व इतर द्वि–प्राणिदांपासूनहि तो वेगळा केला जातो. प्राणयुक्त अम्लें किंवा क्षार हीं तप्त केलीं असतां आपणांस प्राण मिळतो. अशा क्षारांपैकीं पालाश–हरित हें मंगलद्विप्राणिदाशीं मिश्रित करून जर तापविलें तर प्राणवायु मिळतो. कपडे शुभ्र करण्याच्या चूर्णावर ( शुभ्रक क्षार ) मंगल–द्वि–प्राणिदाची क्रिया केली असतां, हराची वाष्पावर रक्तोष्णतेच्या वेळीं क्रिया केली असतांना, शुभ्रक क्षाराच्या योगानें उज्जद्विप्राणिद विघटित केला असतांना, मंगलद्विप्राणिद हें अनाम्लिकरीत्या व पालाश–पर–मंगलित हें अम्लीकरीत्या विघटित केलें असतांना आपणांस प्राणवायु मिळतो. कारखान्यांत प्राणवायु निरनिराळ्या रीतींनें उत्पन्न करतात. गधंकाम्ल कोणत्या तरी एखाद्या पदार्थाच्या सान्निध्यांत तप्त करतात. जशद–प्राणिदाचा एक व सिंधुनत्रिताचे दोन भाग तप्त करून प्राणवायु मिळवितात. सिंधु–उज्ज–प्राणिदाचें विद्युद्विच्छेदन करून किंवा सिंधु–उज्ज–प्राणिद व मंगलद्विप्राणिदाच्या तप्त मिश्रणावर हवा सोडली असतां मिळणारें सिंधुमंगलित ४५०° पर्यंत तप्त करून प्राणवायु मिळतो. ब्रिनच्या कृतीनेंहि प्राणवायु मोठ्या प्रमाणावर मिळतो. ह्या कृतीमध्यें एकप्राणिदापासून त्यास हवेंत तप्त करून त्याचें द्विप्राणिद करतात, व हेंच द्वि–प्राणिद वातावरणाचा दाब कमी करून तापविलें असतां प्राणवायु वेगळा होऊं देतें व पुन्हां एकप्राणिद मिळतें. पण हीहि कृति लिंडेच्या द्रवीभूत हवेच्या आंशिक पातनापासून मिळणाऱ्या प्राणवायूच्या कृतीनें मागें टाकली आहे.

प्राण हा एक बेचव, रंगहीन व वासरहित वायु आहे. रजतासारखा तो हवेपेक्षां जड असून पाण्यांत थोड्या प्रमाणांत द्रवतो. कांहीं वितळलेल्या धातूमध्येंहि हा वायु संयोग पावतो स्वतः जळत नसून ज्वलनक्रियेला मदत करणारा एक मुख्य घटक आहे. योग्य परिस्थितिप्रमाणें बहुतेक मूलद्रव्यें याच्याशीं प्राणिदें नांवाचीं रसायनें देतात. अगदीं कोरडा प्राणवायु, उज्जाशीं १०००° पर्यंत उष्णता असली तरी सुद्धां संयोग पावत नाहीं. श्वासोच्छ्वास मदत करणारा हाच मुख्य वायु आहे.

ज्या सेंद्रिय पदार्थांशीं प्राणवायु मिश्रण पावतो त्यामध्यें जर ज्याच्याशीं तो मिश्रण पावत नाहीं असे पदार्थ मिसळले तर दोन्हीहि पदार्थ प्राणमिश्रित होतात किंवा जेव्हां एखादा पदार्थ चटकन त्याच्याशीं मिश्रित होतो त्यावेळीं

ओझोन किंवा उज्ज–द्वि–प्राणिद मिळतें. जशदाचें जर पाण्याच्या सान्निध्यांत प्राणिदीकरण केलें तर जशद–उज्ज–प्राणिद व उज्जद्विप्राणिद हीं सारख्या प्रमाणांत मिळतात. ज्या प्राणांच्या योगानें प्राणिद मिळतें त्यास 'बद्ध प्राण' व ज्याच्या योगानें उज्जद्विप्राणिद मिळतें त्यास 'जागृत प्राण' असें म्हणतात. इंग्लर यानें प्राणिद देणाऱ्या पदार्थांस 'स्वयं-प्राणिदीकारक' व जागृत प्राणाशीं रसायनें देणाऱ्या पदार्थांस 'प्रतिग्राहक' अशीं नांवें दिलीं. या क्रियेची उपपत्ति लावणारीं बरींच मतें पुढें आलीं. त्यांपैकीं एका मताप्रमाणें प्राणवायु हा दोन अणूंमध्यें विघटित होत असून ते विरुद्ध विद्युत्-संचार युक्त असतात. त्यांपैकीं घन-विद्युत्-युक्त असणाऱ्यास "स्वयं-ओझोन" व ऋण-विद्युत्युक्त असणाऱ्यास "ओझोन" अशा संज्ञा दिलेल्या आहेत. यांपैकीं कोणताहि एक प्राणिदीकृत होणारें मिश्रण घेतो व दुसरा दुसऱ्या क्रियेस उपयोगिला जातो. ट्रूबे याच्या मताप्रमाणे प्राणाचा संबंध अणु या क्रियेमध्यें भाग घेत असून त्या क्रियेमधील प्रथम पदार्थ धातूचें प्राणिद व उज्ज–द्वि–प्राणिद हे असतात. व्हॅट हॉफ याच्या म्हणण्याप्रमाणें प्राणवायूचे अणू वैद्युदणवीभूत असून त्यांतील एक प्रकारचे अयनच फक्त प्राणिदीकृत होणाऱ्या पदार्थांकडून घेतले जातात. प्राणाचा परमाणुभारांक १६ असून तो नियतांतरिक वर्गवारीप्रमाणें षण्मूल्यक आहे. शस्त्रक्रियेमध्यें व औषधामध्येंहि प्राणाचा बराच उपयोग करतात. हृदयविकार, फुफ्फुसदाह ( न्यूमोनिया, ) दमा वगैरे विकारांमध्यें प्राणवायु श्वासाबरोबर आंत घेणें उपयुक्त असतें. पूतिनाशक म्हणूनहि त्याचा उपयोग करतात. क्लोरोफार्म, अफू किंवा कर्बनम्रिदें यांचें विष प्राणवायूच्या योगानें उतरतें. बुडालेल्या मनुष्यास शुद्धीवर आणण्याकरितांहि प्राणवायूचा उपयोग केला जातो, पण प्राणवायूचा उपयोग जास्त प्रमाणांत केला गेल्यास श्वासोच्छ्वास थांबतो व सर्व रक्त प्राणवायुयुक्त होतें. प्राणवायु हा गर्भाशयामध्यें चरत जाणाऱ्या व ज्याच्यावर शस्त्रक्रिया करतां येत नाहीं अशा व्रणावर, नाकास होणाऱ्या रक्तरोगांवर, कान सडला असल्यास व परम्यावर त्याचें अन्तःक्षेपण केलें असतां हितावह असतें.

**प्राणिदीकरण किंवा ज्वलन** ( कंबश्शन )—ज्वलनासच शास्त्रीय भाषेंत प्राणिदीकरण म्हणतात. ही क्रिया बहुतेक ज्वालायुक्त व उष्णतायुक्त असते. प्रकाश किंवा उष्णता दिल्याशिवायच पदार्थांपासून ज्वाला निघतात त्यास स्वतःज्वलन ( स्पॉन्टेनियस कंबश्शन ) असें म्हणतात. ज्वलन–क्रियेस एखाद्या बाह्य वस्तूची गरज असते ही कल्पना बरीच जुनी दिसते. अलेक्झांड्रियाचा क्लेमंट याचें मत ( ३ रें शतक ) या क्रियेस हवेची जरूरी आहे असें होतें. मध्ययुगामध्येंहि जेव्हां, जळणाऱ्या पदार्थाच्या वजनापेक्षां जळलेल्या पदार्थाचें वजन जास्त असतें असें आढळून आलें तेव्हां जळालेल्या पदार्थांत कोणता तरी पदार्थ मिसळलेला असावा, हेंच मत ग्राह्य झालें. पुढें जॉन रे यानें असेंहि दाखविलें कीं कथिल व शिसें यांचें प्राणिदीकरण केलें असतां त्यांचें वजन विशिष्ट मर्यादेपर्यंतच वाढतें. रॉबर्ट बॉईल याच्या म्हणण्याप्रमाणें विस्तवाच्या कणाच्या चिकटण्याच्या योगानेंच हें वजन वाढत असावें. मेयो ह्याचीं मतें अर्वाचीन मतांशीं जुळतीं अशीं होतीं, पण त्याच्या मरणानंतर ( इ. स. १६७९ ) त्याकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. त्याच्या मताप्रमाणें श्वासोच्छ्वासक्रिया व ज्वलनक्रिया ह्या सारख्या असून वातावरणांतील एका भागाची ( त्यास तो स्पिरिट नायट्रिक एरियस म्हणत असे ) दोहोंसहि अत्यंत जरूर आहे, व त्याप्रमाणेंच वातावरणांतील दुसऱ्या भागाच्या योगानें (ह्यास तो स्पिरिट नायट्रिक ॲसिड म्हणे) ज्वलन व श्वासोच्छ्वास या दोहोंसहि प्रतिबंध होतो. १८ व्या शतकाच्या सुमारास जॉर्ज अर्न्स्ट यानें दुसरें एक मत प्रस्थापित केलें याच्या मताप्रमाणें ही प्राणिदीकरणक्रिया पदार्थामध्यें असणाऱ्या एक प्रकारच्या फ्लाजिस्टॉन नांवाच्या ज्वलनतत्त्वावर अवलंबून असते. हें द्रव्य व पदार्थाचें प्राणिदीकृत होण्याचें मान हीं समप्रमाणांत असतात. या मताप्रमाणें ज्वलनक्रियोपयोगी पदार्थ, हें द्रव्य व दुसरा एखादा पदार्थ मिळून झालेले असतात आणि ज्वलनक्रियेच्या योगानें हें द्रव्य वेगळें होतें. त्याच्या योगानें साधारण रासायनिक क्रियांचा उलगडा होत गेल्यानें हें मत बरेंच दिवस प्रचलित होतें. हें मत मान्य असणाऱ्या शास्त्रज्ञांकडून या मतांतील मुख्य उणेपणा म्हणजे या मतांप्रमाणें पदार्थाचें वजन तो जाळला असतां कमी होतें याकडे दुर्लक्ष केलें गेलें. वास्तविक पदार्थ जाळला असतां त्याचें वजन मूळ वजनापेक्षां वाढतें. १८ व्या शतकाच्या शेवटीं ही चूक लक्षांत आली व लॅव्हायझीए यानें ज्वलन हें प्राणिदीकरण असून जळणाऱ्या पदार्थांत वातावरणांतील प्राणवायु संयुक्त होतो असें दाखविलें, तेव्हां वरील मतांचें उच्चाटन झालें. [ विज्ञानेतिहास पृ. ४७७ पहा. ]

**प्राणिदें** ( ऑक्साइड )—कोणतेंहि मूलद्रव्य व प्राण यांचा संयोग होऊन मिळालेल्या रसायनास प्राणिद असें म्हणतात. बहुतेक सर्व मूलद्रव्यें प्राणाशीं संयुक्त होऊन प्राणिदें होतात. मूलद्रव्यें निरनिराळ्या प्रमाणांत संयुक्त असतात. ह्या प्राणिदांचे निरनिराळे पांच प्रकार आहेत, तेः–( १ ) अनाम्लिक प्राणिदें, ( २ ) अम्लिक प्राणिदें, ( ३ ) निर्गुण प्राणिदें ( ४ ) परिप्राणिदें ( ५ ) संयुक्त अनुज्जिदें व क्षार. यांपैकीं पहिल्या प्रकारचीं प्राणिदें धातूंपासून व दुसऱ्या प्रकारचीं अधातूपासून मिळतात. पहिल्या प्रकारचीं प्राणिदें दुसऱ्या प्रकारच्या प्राणिदांशीं किंवा एकमेकांशीं संयुक्त केलीं असतां क्षार मिळतात. स्फट, जशद अशा कांहीं धातूंचीं प्राणिदें अम्लिक आणि अनाम्लिक अशीं दोन्हींहि असतात निर्गुणप्राणिदांपासून आपणांस पाण्याच्या क्रियेनें अम्ल किंवा अनाम्ल कांहींच मिळत नाहीं किंवा ते अम्लाशीं किंवा अनाम्लाशीं संयुक्त होऊन क्षारहि देत नाहींत. कोणत्याहि मूलद्रव्याच्या मुख्य

प्राणिदांत असणाऱ्या प्राणापेक्षां जास्त प्राणवायु संयुक्त असला तर त्यास परिप्राणिद असें म्हणतात. शिशाच्या द्विप्राणिदाच्या बाबतींत मात्र ही व्याख्या लागू होत नाहीं, कारण तें परिप्राणिदाचे गुणधर्म दाखवीत असून मुख्य प्राणिदहि आहे. हीं प्राणिदें प्राणिदीकारक असून तीं आम्लिक किंवा अनाम्लिक असतात. त्यांतील कांहीं अनाम्लिक प्राणिदें अम्लांशीं उज्ज-द्वि-प्राणिद देतात व कांहींच्या पासून प्राणवायु मिळतो किंवा हराम्लाचा हर वेगळा होतो. अनाम्लिक परिप्राणिदांचे दोन वर्ग करतां येतातः (१) प्राणवायु सरळ साखळींत असतो व ज्यांच्याशीं अम्लांची क्रिया झाल्यानें उज्जद्विप्राणिदें मिळतात (२) आणि ज्यामध्यें प्राण हा द्विगंधकाच्या योगानें जोडला असून त्यांच्यावरील गंधकाम्लाच्या क्रियेनें प्राणवायु किंवा हराम्लाच्या क्रियेच्या योगानें हरवायु मिळतो. संयुक्त अनुज्जिदांच्या बाबतींत पाण्याच्या क्रियेनें दोन अम्लें मिळतात. एकाच धातूच्या अम्लिक आणि अनाम्लिक प्राणिदापासून तयार झालेल्या क्षारास संयुक्तक्षार असें म्हणतात.

प्रा णि दी क र ण व उ ज्जी क र णः—प्राणिदीकरण म्हणजे प्राणयुक्त करणें किंवा उज्ज काढणें व उज्जीकरण म्हणजे उज्जयुक्त करणें किंवा प्राण काढून टाकणें. निरिंद्रिय रसायनशास्त्रांत प्राणिदीकरण किंवा उज्जीकरण हें उष्णता किंवा इतर शक्तीच्या योगानें केलें जातें. निरिंद्रियप्राणिदीकारक द्रव्याचें घनविद्युद्युक्त पदार्थाकडे जास्त आकर्षण असतें. प्राणिदीकरणाच्या किंवा उज्जीकरणाच्या क्रियेमध्यें प्राणिदीकारक द्रव्याचें उज्जीकरण व उज्जीकारकाचें प्राणिदीकरण चाललेलें असतें. कांहीं पदार्थांवर विशिष्ट पद्धतीची क्रिया केली असतां त्यांचें प्राणिदीकरण व उज्जीकरण हीं दोन्हीहि सारखीं चालू होतात. या क्रियेस स्वयं-प्राणिदीकरण (ऑटो ऑक्सिडेशन) असें म्हणतात. उप- हरःयिताचा द्राव उकळला असतां कांहीं भागांचें प्राणिदीकरण व कांहींचें उज्जीकरण होऊन आपणास हरित व हरिद मिळतें. ह्याच क्रियेप्रमाणें सेंद्रिय रसायनशास्त्रांत कॅनिझेरोच्या कृतीप्रमाणें गंधयुक्त (ॲरोमॅटिक) प्रायोज्जिदांपासून अम्ल व अल्कोहल हीं मिळतात. प्राण, ओझोन, परिप्राणिदें, हर, स्तंभ, प्राणयुक्त अम्लें, क्रुमाम्ल (क्रॉमिक ॲसिड) परिमंगालिकाम्ल (परमेंगेनिक ॲसिड) हीं द्रव्यें प्राणिदीकारक आहेत. उज्जीकारक द्रव्यांमध्यें उज्ज असतो. गंधक, स्फुर, उज्ज, पालाश, सिंधु, स्फट, मग्न वगैरेंचीं उज्जिदें हीं उज्जीकारक द्रव्यें होत.

**प्राणोज्ज ज्योत** (ऑक्सि-हायड्रोजन फ्लेम)—ज्या ज्योतीमध्यें प्राण व उज्ज एकत्रित करून तें मिश्रण जाळतात तीस प्राणोज्जज्योत असें म्हणतात. या ज्योतीची एक ग्राम उज्ज जाळतांना ३४११६ कॅलरी उष्णता असते. ह्या ज्योतीची उष्णता ज्या प्रकारानें ज्योत चालविली असेल त्या प्रकाराच्या परिस्थितीवर अवलंबून असते. या ज्योतीचें उष्णमान प्राण व उज्ज वायु हे समान प्रमाणांत जळत असल्यास जास्तींत जास्त असतें आणि प्रमाण कमी जास्त झाल्यास किंवा या दोन वायूंमध्यें एखादा अचेतन वायु मिसळला असल्यास त्याचें उष्णमान कमी होतें, कारण उत्पन्न होणारी उष्णता ही जास्त द्रव्यास दिली जाते. प्राणोज्ज वायु जाळण्याकरतां बऱ्याच प्रकारचे नवीन नवीन दिवे तयार केले गेले ;पण ह्या वायूचा स्फोट होण्याची भीति असल्याकारणानें ते जरा भीतिदायकच आहेत. ह्या ज्योतीचा उपयोग प्लातिन धातूच्या कारखान्यांत बराच होतो, कारण प्लातिन फक्त प्राणोज्जज्योत व विद्युत् भट्टीमध्यें वितळला जातो. चुन्याचा उपयोग ह्या ज्वालेमध्यें केला असतां स्वच्छ प्रकाश मिळतो. पण विद्युत्भट्टया व विद्युत्प्रकाश आतां सुबलक मिळत असल्याकारणानें अलीकडे ह्या ज्योतीचा फारसा उपयोग करीत नाहींत.

**प्राणिपूजासंप्रदाय**—ईश्वरावतारपूजेपासून तों मारलेल्या प्राण्यांच्या हाडांला दिलेल्या मानापर्यंतच्या सर्व गोष्टींना प्राणिपूजा हें नांव देतां येईल. प्राणिपूजेचे दोन प्रकार आहेतः सर्व जात पवित्र मानणें व एका जातींतील कांहीं ठरविलेले एक किंवा अधिक प्राणी पवित्र मानणें. प्राणी पूज्य मानले जाण्याचीं कारणें अनेक आहेत व तदनुसार त्यांचें वर्गीकरण पुढीलप्रमाणें करतां येईल. (१) गाईम्हशी ह्यांसारखे उपयुक्त प्राणी; (२) शिकारी प्राणी (अस्वल वगैरे); (३) क्रूर व घातुक प्राणी (चित्ता); (४) मानवी आत्मे, (५) झाडपाल्यांचें अन्तर्याम धारण करणारे अशी समजूत असलेले प्राणी (बकरें वगैरे), (६) शकुन देणारे श्येन वगैरे प्राणी, (७) कांहीं देवतांशीं संलग्न असणारे प्राणी व (९) जादुविद्येच्या कामीं लागणारे प्राणी वगैरे.

आ रा ध्य दै व त प्रा णी.—हिंदुस्थानांत हिंदु लोक गायीला फार पूज्य मानतात. त्यांच्या गोभक्तीला आरंभ केव्हां झाला हें अनिश्चित आहे. पण पंचगव्य म्हणजे गायीपासून मिळणाऱ्या पांच पदार्थांचें मिश्रण फार पूर्वीपासून पवित्र मानलेलें आहे. गायीच्या शेपटीला स्पर्श करणें हें अशुद्धता घालविण्याचें साधन समजतात.

दक्षिण हिंदुस्थानांतील तोडा लोक म्हैस रेडा ह्या पाळीव जनावरांचें मांस खात नाहींत; पण वर्षांतून एकदां ते रेडकाला बळी देतात व प्रौढ माणसें रानांत जाऊन त्याचें मांस भक्षण करतात.

त्याचप्रमाणें हनुमान-मारुती ही वानर-देवता प्रसिद्ध आहे. तिची हिंदु लोकांत पूजाअर्चा होते. खेडेगांवातून वानरांना पीडा कोणी देत नाहींत.

हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं दगडांवर नागांचीं चित्रें कोरलेलीं आढळतात. त्यांचीं पूजाअर्चा करतात. विशेषतः द्राविड लोकांत जाणून बुजून नाग मारीत नाहींत; चुकून नाग मारला गेल्यास त्याला माणसाप्रमाणें जाळतात. दर वर्षी नागदेवाची मिरवणूक निघते. नागपंचमीचा सण प्रसिद्धच आहे.

हिंदु धर्मांत वाघ हें शिवदुर्गेचें वाहन आहे. तथापि रानटी जातींतल्या कांहीं लोकांखेरीज इतर कोणी त्याची उपासना करीत नाहींत. नेपाळामध्यें "वाघजत्रा" म्हणून वाघाचा सण करतात व त्यावेळीं भक्तमंडळी वाघ म्हणून नाचतात वरळी लोक वाघाची पूजा करतात.

बहुतेक सर्व रानटी जातींचे लोक अस्वलास फार पूज्य मानितात आणि त्याची भक्ति करतात. त्याच्या निमित्त सणवार असतात.त्याची जास्त उपासना करणारे लोक म्हणजे पूर्व आशियांतील सैबेरियन जातींतील सॅखालिन बेटांतील लोक हिवाळ्याच्या शेवटीं शेवटीं लहान अस्वलें धरतात, आणि नऊ महिनेपर्यंत त्यांस चांगलें खाऊं घालतात; नंतर त्यांची पूजा अर्चा करून त्यांनां मारण्यांत येतें. नंतर ते लोक त्यांच्या मांसावर यथेच्छ झोड मारतात. रशियांतील गिलिॲक लोकांमध्येंसुद्धां अशा तऱ्हेचा एक सण आहे. ग्रीक लोकांतील अर्टेमिस देवी ही भल्लूकरूपधारी होती असें म्हणतात. तिच्या सणाच्या दिवशीं मुली अस्वलाचें कातडें पांघरून, "अस्वली" म्हणून नाचतात व हा विधि होण्यापूर्वी मुलींचीं लग्नें करीत नसत.

पुष्कळ गुरें बाळगून त्यांवर निर्वाह करणारे लोक गुरांविषयीं आदरबुद्धि ठेवतात; ते दुधावर व शिकारीवर उपजीविका करतात; व बळी देण्याच्या वेळींच मात्र त्या गुरांनां मारतात. ईजिप्शियन लोकांच्या प्राणिपूजेंत ॲपिस नांवाच्या फार पवित्र देवतुल्य बैलाची उपासना सर्वांत प्रमुखत्वानें करण्यांत येते. त्याला कौल लावीत. तो मेल्यानंतर मसाला भरून त्याला दगडी थडग्यांत पुरीत असत. ईजिप्तमधील नाईल नदीच्या कांठच्या न्युवा व न्युएर जातींच्या लोकांत अशाच कांहीं चाली आहेत; मध्यआफ्रिकेंतील अनूगोनी लोक व मादागास्कर येथील सकलवा लोक बैल पाळतात व त्यांची उपासना करतात.

उत्तरपश्चिम-अमेरिकेंतल्या ग्लिंकीट इंडियन लोकांत कावळा हेंच मुख्य दैवत मानलें जातें. शिवाय त्या टापून सर्व ठिकाणीं सर्व कथापुराणांतरीं त्याचें फार प्रस्थ आहे. हा प्रकाश आणतो, मनुष्य प्राण्यांनां लागणारा अग्नि हाच पुरवितो इ. याचें माहात्म्य वर्णन केलें आहे. दक्षिणपूर्व ऑस्ट्रियांतील कथापुराणांत कावळा व महाश्येन यांच्या लीलेचें बरेचसें वर्णन दिलें आहे. कुत्र्याची पूजा अशी फारशी कोठें होत नाहीं. तथापि पश्चिम आशियांतील सिरिया प्रांताच्या उत्तरेस राहणारे नोसारी लोक व जावा बेटांतील कलंग लोक हे कुत्र्याची पूजा करतात. ईजिप्तमधील हरोनिया प्रांतांतील लोक कुत्र्यांनां पूज्य मानतात. सयाममध्यें असा एक समज आहे कीं मृत मनुष्याचा आत्मा-कदाचित एखाद्या बुद्धाचासुद्धां आत्मा-पांढऱ्या हत्तीच्या ठिकाणीं असावा; अशा हत्तीला नेहमीं राजाजवळ ठेवण्यांत येतें; तो कोणाला विकतां किंवा विकत घेतां येत नाहीं. तो मेल्यावर मनुष्य मेल्याबद्दल जसा शोक करतात, तसा ह्या वेळींहि करतात. इंडो-चिनांतील कांहीं भागांतून हत्ती मेल्यावर त्याचा आत्मा लोकांनां छळतो अशी समजूत रूढ असल्यामुळें तो जेथें मेला असेल तेथें सबंध गांव त्याप्रीत्यर्थ उत्सव करतो. कॅंबोडिया ( कामभुज ) देशामध्यें हत्ती हा राज्याला चांगला-राज्याची भरभराट करून देणारा-असा मानतात. सुमात्रा बेटांत त्याला संरक्षक देवता असें समजतात. पांढऱ्या हत्तीची उपासना दक्षिण ॲबिसिनियांत एन्यारिया येथें दिसून येते. याचप्रमाणें मासा सीरियन लोकांत, ग्रीक व इटालियन लोकांत; शेळीबकरा ग्रीकांत, उत्तरयुरोपमधील कांहीं लोकांत, आफ्रिकेमधील बिज्यागो लोकांत; ससा उत्तर अमेरिकेंतील ॲलगानक्विन् जातींच्या लोकांत; बहिरी ससाणा हा उत्तरबोर्निओ देशांत आणि केन्हियान कयन लोकांत; घोडा प्राचीन ग्रीकांत आणि गॉल लोकांत; रुडिओबस म्हणून अश्व देवी व अश्वदेव व सांप्रत सर्व यूरोपीय देशांत घोडा पूजितात. पश्चिम आफ्रिकेंत चित्त्याची पूजा करणारा संप्रदाय बहुतेक ठिकाणीं आढळतो. सिंह हा इजिप्शियन लोकांत व अरब लोकांत, हल्लीं आफ्रिकेंतील क्पालोंडा लोकांत; सरड प्यासिफिक महासागरांतील बेटांतून राहणाऱ्या लोकांत व मादागास्कर बेटांतील लोकांत; नागतोडा, टोळ, सुरवंट ह्यासारखे किडे; दक्षिण आफ्रिकेंतील बुशेमन जातीच्या लोकांत; माकड आफ्रिकेंतल्या टोगो वसाहतींत व फ्रेंच वेस्ट आफ्रिकेंत; आणि साप जुन्या युगांत बहुतेक ठिकाणीं व सांप्रत आफ्रिका खंडांत पूज्य मानतात. त्याचप्रमाणें वाघ हा म्यांचुरिया व हनोइ येथील लोकांत; मेंढी आफ्रिकेंत व लांडगा उत्तर अमेरिकेंतील लोकांत पूज्य मानतात. प्राचीन यूरोपीय प्राणिपूजेबद्दल माहिती ज्ञानकोश विभाग ३, उत्तरभाग पृ. ६६ मध्यें पहा.

**प्राणिशास्त्र** ( झोऑलोजी )—ह्या भूतलावरील सजीव सृष्टीमध्यें प्राणी व वनस्पती ह्या दोहोंचा समावेश होतो. प्राण्यांच्या संबंधाचें जें शास्त्र तें प्राणिशास्त्र. ह्या प्राणिशास्त्राप्रमाणें कांहीं प्राणी या भूतलावर नामशेष अथवा निर्वंश होऊन अश्मीभूत झालेले आहेत व इतर प्राणी हयात असून या भूतलावर आढळून येणारे आहेत. तेव्हां प्राणिशास्त्राचीं दोन अंगें होतात; एका अंगांत निर्वंश होऊन अश्मीभूत झालेल्या प्राण्यांचा समावेश होतो व त्यांत अशाच प्राण्यासंबंधीं वर्णन केलेलें असतें. या प्राणिशास्त्राच्या शाखेला निर्वंशजीवशास्त्र (पॅलीऑटॉलजी) असें म्हणतात व ती एक निराळीच शाखा बनून राहिलेली आहे. दुसरें अंग म्हटलें म्हणजे ज्याच्यामध्यें हयात किंवा आजमितीस आढळणारे प्राणी ह्यांच्यासंबंधीं वर्णन केलेलें असतें तें होय. प्राणिशास्त्र ही संज्ञा ह्या दुसऱ्या अंगाला संबोधून लावतात. तेव्हा प्राणिशास्त्र म्हणजे हयात असलेले प्राणी ह्याबद्दलचें शास्त्र होय.

प्राणी किंवा वनस्पती यांविषयीं बोलतांना पहिल्याप्रथम आपल्या मनांत सजीवपणाबद्दल आपण बोलत आहों असा विचार येतो. तेव्हां जिवंत व निर्जीव वस्तू या दोहोंमध्यें काय भेद आहे हें जाणण्याविषयीं जिज्ञासा उत्पन्न होणें साहजिक आहे. या दोहोंतील भेद येणेंप्रमाणें:—पहिला शरीराची वाढ होण्याची रीत—प्राण्याची वाढ होण्याची रीत अशी आहे कीं, ते कांहीं बाहेरचे पदार्थ आपल्या शारीरिक द्रव्याव्यतिरिक्त असे अन्नादाखल शरीरांत घेतात व त्यांना आपल्या शारीरिक द्रव्यांचें रूप देऊं शकतात. या क्रियेला पचनक्रिया म्हणतात व हिच्यामुळें नवे व जुने शारीरिक कण सर्व एकत्र मिसळून जाऊन शरीराची वाढ होते. येथें मुख्य गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती हीच कीं, या क्रियेंत नवे व जुने कण ओळखतां येत नाहींत अशा रीतीनें ते एकमेकांशीं मिसळून जातात. नवे कण म्हणजे कांहीं नुसते बाहेरून वरवर थरांच्या रूपानें लागून शरीराची वाढ घडवून आणीत नाहींत. एखादा क्षाराचा स्फटिक त्याच क्षाराच्या पाण्यामध्यें कांहीं वेळ लोंबकळत ठेविला असतां त्याला बाहेरून क्षाराच्या कणाच्या थरांचीं पुटें लागून वाढतो. या स्फटिकाच्या वाढींत व जिवंत सृष्टीच्या वाढींत मुख्य फरक आहे तो हा कीं, हे नवीन लागलेले कण जसेच्या तसेच त्यांच्यात कांहींहि रासायनिक फेरफार झाल्याशिवाय लागतात. आणि ते सर्व बाहेरच्या पृष्ठाला लागलेले असल्यामुळें नवे व जुने कण ओळखतां येतात. तसेच दुसऱ्या तऱ्हेच्या रासायनिक क्षाराच्या पाण्यांत ह्या स्फटिकाची वाढ होऊं शकत नाहीं, म्हणजे बाहेरील द्रव्यांना आपल्या शारीरिक द्रव्यांचें रूप देण्याची शक्ति ह्या स्फटिकाला नाहीं. पचनक्रिया निर्जीव वस्तूंमध्यें होत नाहीं. व पचनक्रियेच्या अभावीं खरी वाढ होत नाहीं, तेव्हां नुसती वाढ होणें ही गोष्ट मुख्य नसून वाढ होण्याची रीत हीच मुख्य गोष्ट होय.

दुसरा भेद जीवफेऱ्यांतील घडामोडी हा होय. निर्जीव वस्तूमध्यें घटनेसंबंधीं फेरफार होण्याची प्रवृत्ति नसून ते जसेच्या तसेच राहतात. जिवंत वस्तूमध्यें नेहमीं घटकद्रव्यांच्या संबंधीं घडामोडी होऊन फेरबदल होत असतात व त्यांची प्रवृत्तीच अशी असते कीं, कोणतीहि क्रिया जिवंतपणें घडत असल्यास त्या क्रियेचें घडून येणें हें चैतन्यद्रव्याचा उच्छेद थोडयाबहुत प्रमाणावर होण्यावरच अवलंबून असतें. चैतन्यद्रव्याचा मंद परंतु नित्य उच्छेद होऊन त्याचें निर्जीव पदार्थांत रूपांतर होणें ह्यावरच जीवफेऱ्यामधील घडामोडी अवलंबून असतात व सजीवतेची दर्शक हीच गोष्ट आहे. आणि ह्याचमुळें चैतन्यद्रव्याचा जो ऱ्हास होतो त्याची भरपाई करण्यासाठीं शरीरांत नित्य अन्न घेऊन तें पचन करून अचेतन रूपांतून चैतन्य रूपांत आणलें जातें. ही शरीराची भरती ओहोटी चालू असणें ह्यालाच जीवनक्रिया ( मेटॅबोलिझम) म्हणतात व या जीवनक्रियेमध्यें अन्नापासून चैतन्यद्रव्य उत्पन्न होण्याच्या क्रियेला निर्माणजीवनक्रिया (ॲनाबोलिझम) असें म्हणतात व चैतन्यद्रव्याचा उच्छेद होऊन निर्जीव द्रव्यें शरीरांत उत्पन्न होणें त्याला व्यवच्छेदजीवनक्रिया (कॅटाबोलिझम) असें म्हणतात व ह्या सर्व घडामोडी चैतन्याची साक्ष देतात; म्हणून यांना जीवफेऱ्यामधल्या घडामोडी म्हणतात. प्राण जाईपर्यंत या अशाच शरीरांत चालतात.

तिसरा भेद, बाह्यसृष्टीशीं मिलाफः—भौतिक व रासायनिक शक्ति आपला पगडा निर्जीव वस्तूंवर चालविण्यास नेहमीं तत्पर असतात व त्यांची क्रिया नेहमीं चालू असते. निर्जीव वस्तूंमध्यें या शक्तींना क्षणभर सुद्धां थांबविण्याची किंवा त्यांच्या कार्यांत फरक घडवून आणण्याची अथवा त्यांचा प्रतिकार करण्याची शक्ति नसते. यामुळें त्यांच्यावर झालेले परिणाम तात्काळ दिसून येतात. ह्याच्या उलट सजीव शरीर, त्याच्या चैतन्यशक्तीमुळें ह्या शक्तींचा पगडा आपल्यावर चालू देत नाहीं. किंवा त्यांच्या कार्यांचे वाईट परिणाम अटकावूं शकतें. उदाहरणार्थ, जिवंत शरीर व शव.

४ था भेद, प्रजाजनकत्वः—प्रत्येक जीवंत प्रकृतिरूपाला स्वतःसारखीं रूपें उत्पन्न करण्याची शक्ति असते. शरीराचे कांहीं भाग तावडतोब किंवा कांहीं वेळानें प्रत्येक प्रकृतिरूपाला काढून टाकण्याची शक्ति असते. हे शारीरिक भाग किंवा पेशीसम बीजांकुर योग्य व अनुरूप परिस्थितीमध्यें असतां आपल्या उत्पादकाप्रमाणें त्यांच्यासारख्या रूपांत विकास पावतात व त्यांच्यामध्यें सुद्धां पुढें ही प्रजाजनकत्वाची क्रिया घडून येते.

५ वा भेद, बाह्यसृष्टिज्ञानः—प्रत्येक प्रकृतिरूप हें चैतन्यद्रव्याचें झालेलें असल्यानें त्याला इंद्रिय असणें हें स्वाभाविक आहे. कारण हा एक चैतन्यद्रव्याचा गुण आहे. ह्या गुणामुळें बाह्यसृष्टीचें ज्ञान होतें.

आतां जिवंत प्रकृतिरूपांचें जीवित्व जीवात्म्यावर अवलंबून असतें असें नेहमीं सांगण्यांत येत असते. परंतु जीवात्मा काय वस्तू आहे हें निश्चित असें सांगतां येत नाहीं. त्याच्या संबंधींचें कोडें अजून उकललें गेलें नसल्याकारणानें त्याच्याबद्दल वाटाघाट न करतां कोणती विशिष्ट अनुकूल अशी स्थिति प्राप्त झाली असतां प्रकृतिरूपांच्या ठायीं चैतन्य अथवा जीवनशक्ति व्यक्त होऊं शकते ह्याबद्दल थोडा विचार करणें आवश्यक आहे. सजीव सृष्टीचें अवलोकन व शोधन केलें असतां असें आढळून येतें कीं, चैतन्यशक्ति ही कांहीं विवक्षित गोष्टी साध्य झाल्या असतां व्यक्त होते अथवा चैतन्यशक्ति व्यक्त होण्यास त्या सर्व गोष्टींची जरूरी आहे व त्या सर्वांचा मिलाफ झालाच पाहिजे. या गोष्टींपैकीं प्रथम एक अंतर्गत मुख्य गोष्ट ही आहे कीं, एक विशिष्ट द्रव्य—ज्याला चैतन्याचें भौतिक मूळ किंवा आधार असें म्हणतां येईल—व जें सजीवत्वास साक्षात कारणीभूत होतें तें—प्रत्येक प्रकृतिरूपांत प्रत्यक्ष अस्तित्वांत असलें पाहिजे. याला आद्य द्रव्य किंवा चैतन्यद्रव्य ( प्रोटोप्लाझम, बायोप्लाझम ) अशी संज्ञा देतात. जिवंत शरीराच्या कोणत्याहि भागांमध्यें एखादी

शारीरिक क्रिया प्रत्यक्ष घडत असल्यास असें आढळून येतें कीं, तेथें हें चैतन्यद्रव्य प्रत्यक्ष अस्तित्वांत असतें. शरीराच्या ज्या भागांत हें चैतन्यद्रव्य प्रत्यक्ष अस्तित्वांत नाहीं तेथें चेतनाक्रिया घडून येत नाहींत एकंदर अवलोकनावरून असें सिद्ध होतें कीं सर्व शरीर सबंध चैतन्यद्रव्याचेंच बनलेलें असलें पाहिजे असें नाहीं. चैतन्यद्रव्याबरोबर दुसरीं द्रव्यें मिळून शरीराची रचना झालेली असते, तथापि प्रत्येक जिवंत शरीरामध्यें प्राण्याच्या दर्जाप्रमाणें हीं निर्जीव द्रव्यें थोड्या अधिक प्रमाणानें युक्त झालेलीं असतात. अति सूक्ष्म क्षुद्रजंतूंचीं शरीरें सर्वस्वी ह्या चैतन्यद्रव्याचीं—त्यांत कांहीं फरक न होतां—झालेलीं असतात. उच्च दर्जाच्या संकीर्ण प्रकृतिरूपांमध्यें जीं निर्जीव द्रव्यें युक्त झालेलीं असतात तीं सर्व या चैतन्यद्रव्यापासूनच उत्पन्न झालेलीं असतात. जरी संकीर्णप्रकृतिरूपांच्या शरीरांत निर्जीव द्रव्यें असलीं तरी त्यांच्या शरीरांत ज्या भागांत चैतन्य किंवा सजीवता अंतस्थ आढळून येते ते भाग चैतन्यद्रव्याचेच बनलेले असतात. चैतन्य द्रव्य प्रत्यक्ष अस्तित्वांत असणें ही अंतर्गत गोष्ट जरी साध्य झाली तरी जीवित्व किंवा जीवाचे व्यापार व्यक्त होण्यास दुसऱ्या उपांग गोष्टींची सिद्धता व्हावी लागते व त्या गोष्टी साध्य झाल्या तरच जीवाचे व्यापार चालू शकतात व दृष्टिगोचर होतात. परंतु जर ह्या उपांग गोष्टी साध्य झाल्या नाहींत तर जीवित्व निद्रितावस्थेंत किंवा सुषुप्तावस्थेंत फार किंवा थोडा वेळपर्यंत राहतें. उदाहरणार्थ, पक्ष्यांचीं अंडीं किंवा झाडाचें बियाणें. कांहीं वेळां ही अवस्था विकास पावलेल्या प्राण्यात किंवा वनस्पतींत सुद्धां आढळून येते. या उपांग गोष्टींपैकीं पहिली गोष्ट म्हटली म्हणजे पाणी होय व तें चैतन्यद्रव्याशीं संलग्न होऊन राहिलेलें असतें. चैतन्य द्रव्यांत त्याच्याशीं संलग्न होऊन राहिलेलें पाणी थोडें किंवा जास्त प्रमाणावर नेहमीं असतेंच. हें पाणी चैतन्यद्रव्यांतून अगदीं समूळ काढून टाकलें असता त्याचें चैतन्य अथवा जिवंतपणा नष्ट होतो. परंतु तें पाणी थोडयाबहुत प्रमाणानें निघून गेलेलें असलें किंवा काढून टाकलें तर चैतन्यद्रव्याचा जिवंतपणा नष्ट न होतां त्याच्या जिवंतपणाचे व्यापार मात्र व्यक्त होत नाहींत. उदा:—बियाणें. दुसरी उपांग गोष्ट म्हटली म्हणजे चैतन्य द्रव्यामध्यें थोडीबहूत उष्णता असणें. उदाहरणार्थ, पक्ष्यांचीं अंडीं. या उष्णतेचें मान मात्र निरनिराळया प्राण्यांत निरनिराळया प्रमाणांत असतें व थोडयाबहुत प्रमाणावर ती उष्णता शरीरांत चैतन्याचे व्यापार बंद न पडतां कमी जास्त होऊं शकते. जसें मनुष्य, पक्षी, बेडुक इ. उच्च दर्जाच्या प्राण्यांत त्यांच्या शरीरांतील उष्णता जीवित्वें कायम राहून फारच थोडया प्रमाणानें कमी जास्त होऊं शकते;उदा.—मनुष्य. परंतु अगदीं खालच्या दर्जाच्या प्राण्यांत हें मान जास्त असूं शकतें. तिसरी उपांगी गोष्ट म्हटली म्हणजे प्राणवायु प्रत्यक्ष असून तो चैतन्यद्रव्यास उपलब्ध असणें.चैतन्याचे किंवा जिवंतपणाचे व्यापार व्यक्त होण्यास चैतन्यद्रव्याशीं प्राणवायु संलग्न झालाच पाहिजे. जिवंतपणामध्यें हा एक चैतन्यद्रव्याचा चालू व्यापारच आहे व तो होत असतांना चैतन्यद्रव्य हवेंतील प्राणवायु शोषून घेतें व कॅर्बालिक ॲसिडवायु व थोडी पाण्याची वाफ बाहेर टाकितें. जिवंतपणाची ही खूणच आहे व यालाच श्वासोच्छ्वासाची क्रिया असें म्हणतात. ही प्राणवायु शोषून घेण्याची क्रिया होत असतांना चैतन्यद्रव्यामध्यें थोडा फरक होऊन ते प्राणवायूच्या संलग्नक्रियेमुळें ( प्राणिदीकरणामुळे ) अस्थिर होतें व लगेच त्याच्यामध्यें उच्छेदजीवनक्रिया घडून येऊन त्याच्यापासून कांहीं निर्जीव अशीं द्रव्यें उत्पन्न होतात व त्या उच्छेदजीवनक्रियेचा परमावधि झाल्यानें तर एकतर्फी कॅर्बोलिक ॲसिडवायु व पाण्याची वाफ अशीं द्रव्यें बाहेर पडतात व दुसऱ्या परीनें एकसमयावच्छेदेंकरून लगेच पुन्हां निर्माणजीवनक्रिया सुरू होऊन चैतन्यद्रव्य बनूं लागतें. प्राणवायूच्या संलग्न क्रियेमध्यें लांकूड किंवा कोळसा जळतो व तो जळत असतांना म्हणजे ती क्रिया चालू असतांना उष्णता उत्पन्न होते व ती बाहेर पडते. तसेंच या प्राणवायूच्या संलग्नक्रियेमध्यें प्रकृतिरूपाच्या चैतन्यद्रव्यापासून उष्णता उत्पन्न होते. परंतु ही प्राणवायुसंलग्नक्रिया चैतन्यद्रव्यामध्यें फार मंद रीतीनें होत असते व ती क्रिया सतत चालू असते. ती तशी चालू राहाण्याकरितां मोकळा असा प्राणवायु प्रत्यक्ष अस्तित्वांत असणें आवश्यक होतें.या गोष्टीला अपवाद म्हणजे प्रकृतिरूपाला प्राणवायूची आवश्यकता नसते अशीं कांहीं अगदीं खालच्या दर्जाचीं प्रकृतिरूपें ज्यांना बॅक्टेरिया अथवा सूक्ष्मजंतु म्हणतात हीं आहेत. त्यांनी प्राणवायूची जरूरी त्याच्या जीवनक्रियेंमध्यें लागत नाहीं. सारांश,चैतन्यद्रव्य म्हणजे प्राण व चैतन्यद्रव्याखेरीज प्राणि—प्रकृतिरूप किंवा वनस्पतिप्रकृतिरूप असूं शकत नाहीं तेव्हां चैतन्यद्रव्य म्हणजे काय यांविषयीं थोडासा खुलासा करणें जरूर आहे.चैतन्यद्रव्य म्हणजे तो घन पदार्थहि नाहीं तसाच प्रवाही पदार्थहि नाहीं. तर थोडा घन व थोडा प्रवाही असा मध्यम रीतीचा चिकचिकीत निर्मळ किंवा अतिसूक्ष्म कणयुक्त असा हा पदार्थ असून त्याची रासायनिक घटना फारच दुर्धर अथवा गुंतागुंतीची अशी असते. चैतन्यद्रव्य म्हणजे एकाच तऱ्हेचें एखादें रासायनिक द्रव्य नसून बहुविध असें एक रासायनिक मिश्रण असतें व या मिश्रणांतील अगदीं महत्त्वाचीं रासायनिक द्रव्यें म्हटलीं म्हणजे मांसोत्पादक द्रव्यें अथवा औजस (प्रोटीड) द्रव्यें होत. हीं मांसोत्पादक द्रव्यें म्हणजे फार गुंतागुंतीचे रासायनिक पदार्थ होत व तीं सर्व कर्ब,प्राणवायु,उज्ज (हैड्रोजन), नत्र ( नैट्रोजन ),गंधक अशा रासायनिक मूल द्रव्यांचीं बनलेलीं असतात. कित्येक वेळां या घटकद्रव्यांमध्ये स्फुर ( फॉस्फरस ) हें मूलद्रव्यहि अंतर्भूत झालेलें असतें. मांसोत्पादक द्रव्याचें अगदीं चांगलें उदाहरण म्हणजे पक्ष्याच्या अंड्यांतील शुभ्र बलक हें होय. चैतन्यद्रव्याशीं वर सांगितल्याप्रमाणे जिवंतपणीं पाणी

पुष्कळ प्रमाणानें संलग्न झालेलें असतें व तें पाणी चैतन्यद्रव्यानें नुसतें शोषून घेतलेलें असतें. चैतन्य द्रव्याला फार उष्णता दिली असतां तें गोठून जाऊन गतप्राण होतें. तसेंच तें मद्यार्कामध्येंसुद्धां गोठून जातें. चैतन्यद्रव्याच्या जिवंतपणीं त्याच्यामध्यें विशेष एक गुणधर्म दिसून येतो तो हा कीं, तें संकोच व विकास पावतें व त्याच्या संकोच-विकास पावण्यानें प्रकृतिरूपाची हालचाल घडून येते. ही हालचाल चैतन्यद्रव्य आपोआप संकोचविकास पावून घडवून आणूं शकतें किंवा ती हालचाल एखाद्या बाह्यकारणामुळें चैतन्यद्रव्य संकोचविकास पावून घडून येते. एकंदरींत असें म्हणतां येईल कीं चैतन्यद्रव्य स्वयंगतिक (आटोमॅटिक) आहे व सचेतन व इंद्रियगोचरहि ( इरिटेबल ) आहे.

वर म्हटलें आहे कीं प्राण म्हणजे चैतन्यद्रव्य व चैतन्य द्रव्य हें विविध मांसोत्पादक द्रव्यांचें एक मिश्रण आहे. तरी रसायनशाळेंत नामांकित रसायनशास्त्रवेत्त्यांनीं मांसोत्पादक द्रव्यांचीं नानाविध मिश्रणें प्रयोगरीत्या तयार करण्यांत आपली शिकस्त केली तरी प्राण किंवा चैतन्यस्फूर्ति त्या मिश्रणांत उत्पन्न करतां आली नाहीं. आतां वर सांगितल्याप्रमाणें प्राण म्हणजे काय ह्यासंबंधीं वाटाघाट न करतां इतकें तरी सिद्ध होतें कीं, प्राणधारण करणाऱ्या व्यक्ती किंवा प्रकृतिरूपें हीं चैतन्यद्रव्याचीं झालेलीं असतात किंवा त्यांच्या शरीरांत चैतन्यद्रव्य असतें. चैतन्यद्रव्याशिवाय प्राणधारणा होत नाहीं. हीं प्रकृतिरूपें किंवा प्राणधारण करणाऱ्या व्यक्ती या जगांत कशा उत्पन्न झाल्या ह्याविषयीं थोडासा विचार करणें जरूर आहे. अगदीं प्रथमतः सृष्टि कशी उत्पन्न झाली व तींत प्रथमतः प्राणी व वनस्पती कसें अस्तित्वात आले या गहन विचारात न शिरतां व्यवहारज्ञान आपणांस आज सांगत आहे कीं, प्रत्येक प्राणी किंवा वनस्पति हीं प्रजारूपानें पूर्वज प्राणी किंवा वनस्पती ह्यापासून उत्पन्न झालेले आहेत व होत आहेत. एकंदरींत म्हणावयाचें म्हणजे ' जीवो जीवस्य कारणं ' हाच न्याय चालू आहे. ह्या जगावर किती तरी तऱ्हेचे प्राणी वास करीत आहेत ! त्यांचा एकंदर तपशील घेतला तर आपणांस असें आढळून येईल कीं, कांहीं प्राणी उच्च दर्जाचे आहेत. जसे सपृष्ठवंश ( व्हर्टेब्रेट) प्राणी म्हणजे ज्या प्राण्यांच्या शरीरांत हाडाचा कणा झालेला आहे असे प्राणी. ह्यांत ठळक असे किती तरी वर्ग आहेत. उदाहरणार्थ, सस्तनप्राणी—मनुष्य, वानर, वाघ, मांजर, कुत्रा, गाई, घोडा इत्यादि ह्या वर्गांत मोडतात. दुसरा वर्ग म्हणजे पक्ष्यांचा होय. तिसऱ्यांत सर्प, सुसर, सरडे वगैरे सरपटणारे प्राणी. चौथ्या वर्गांत बेडूक व त्यासारखे जलस्थलचर प्राणी व पांचव्या वर्गांत मासे मोडतात.व्यावहारिक ज्ञानानें आपणांस साधारणपणें कळतें कीं, ह्या सर्व उच्च दर्जाच्या प्राण्यांची उत्पत्ति त्यांच्या पूर्वजांपासून प्रजाजनकत्व व प्रजेचा विकास पावणें ह्या रीतीनेंच झालेली आहे व होत आहे. या गोष्टीला दुसरा अन्य मार्गच नाहीं. तेव्हां ही कल्पना म्हणजे,'जीवो जीवस्य कारणं,' आज मितीस बरोबर आहे व तदनुरूपच प्राण्यांची उत्पत्ति व वाढ होत आहे हें जरी खरें आहे तरी प्रश्न उद्भवतो तो हाच कीं, या सर्व वर्गांतील प्राण्यांचे एक एक प्रतिरूप पूर्वज जोडप्या-जोडप्यानें सृष्टीवर एकाकाळीं निर्माण झाले असावेत व ते कसे व केव्हां झाले असावेत ह्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर मिळालेलें नाहीं. यांच्या खालच्या दर्जाचे प्राणी म्हणजे ज्याच्या शरीरांत पाठीचा कणा नाहीं असे व ज्यांना अपृष्ठवंश प्राणी ही संज्ञा आहे ते, यांत सुद्धां पुष्कळ तऱ्हेचे प्राणी असून त्यांचेहि निराळेनिराळे वर्ग आहेत. उदाहरणार्थ मृदुकाय प्राणीः यांत गोगलगाई, शिंपले, वायव्हॉल्व; म्हांकूल (सेपिया) इत्यादि प्राणी मोडतात. दुसरा वर्ग संधिपाद( आर्थोपोड ) यांचा होय. जसें शेवडा, झुरळ, माशी, विंचू, कोळी, गोम इत्यादि. तिसऱ्या वर्गांत कंगणीदार प्राणी ( अन्यूलोटा ) मोडतात. जसें—गांडूळ, जळू इत्यादि. अपृष्ठवंशप्राण्यांतील अगदीं शेवटल्या दर्जाचा वर्ग म्हटला म्हणजे आद्यजंतूंचा ( प्रोटोझोआ ) होय. यांत अति सूक्ष्म प्राणी मोडतात. आतां साधारणरीत्या पाहतां नैसर्गिक नियम हाच दिसून येतो कीं जीवापासून जीवाची उत्पत्ति होते. तेव्हां साधारणतः असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, सर्व प्राणिमात्राची उत्पत्ति व वाढ जीवजीवोत्पत्ति ( किंवा जीवमूलक जीवोत्पत्ति ) ह्याच न्यायानें होते व झाली आहे. परंतु आद्यजंतूंसारखे प्राणी लक्षांत आणिले व त्यांची शारीरिक रचना ध्यानात घेतली म्हणजे ते केवळ चैतन्यद्रव्याचे सूक्ष्म निरवयव ठिपकेच होत. अशीं निरवयवें व साध्या चैतन्यद्रव्याचीं ठिपक्यासारखीं प्रतिरूपें निसर्गतः सहजगत्या होऊं शकण्यासारखीं असलीं व होतहि असलीं, व जर चैतन्यद्रव्य निसर्गतः बनत असेल, तर कांहीं प्राणिशास्त्रज्ञांची अशी समजूत होती कीं, सहजजीवोत्पत्ति किंवा निर्जीवमूलक जीवोत्पत्ति आजमितीसहि घडून येत आहे. सहजजीवोत्पत्ति अथवा निर्जीवमूलक जीवोत्पत्ति हें मत अनुभवसिद्ध नाहीं व प्रयोगसिद्धहि नाहीं. तूर्त बहुतेक प्राणिशास्त्रज्ञांचें मत कायम धरून चालावयाचें. यापलीकडे जाण्याची जरूरी नाहीं.

आतां प्रश्न असा आहे कीं, प्रकृतिरूप व्यक्ति किंवा प्राणी कोणाला म्हणावयाचें व त्याला कसें ओळखावयाचें ? सावयव प्राण्यांतील व्यक्ति ओळखणें कठिण पडत नाहीं, कारण तशा प्रत्येक व्यक्तिमात्रांत जीवंतपणीं कांहीं शारीरिक व्यापार साधारणतः सारखे घडत असतात. ते व्यापार ठोकळ मानानें पचनक्रिया, श्वासोच्छ्वासाची क्रिया, प्रजाजनकत्व व बाह्यसृष्टिज्ञान इत्यादि होत. ह्या कसोटीनें पाहिलें तर अगदीं खालच्या दर्जाचे निरवयव साधे प्राणी जे नुसते चैतन्यद्रव्याचे एक एक ठिपके असे असतात व ज्यांना आद्यजंतु ही संज्ञा आहे, ते सुद्धां व्यक्तिशः प्राणी होत.कारण

ह्या प्रत्येक चैतन्यद्रव्याच्या ठिपक्याचा आयुष्यक्रम ताडून पाहिला तर त्यांत हे वर ठोकळमानानें सांगितलेले सर्व शारीरिक व्यापार घडून येतात. तेव्हां प्रत्येक चैतन्यद्रव्याचा स्वतंत्र असणारा ठिपका, ज्याच्यांत वर सांगितलेले सर्व व्यापार घडत आहेत तो व्यक्तिशः एक प्राणी होय. ह्याच्या वरच्या दर्जाचे प्राणी यांच्या शरीराचें पृथक्करण करून पाहिलें असतां असें आढळून येईल कीं त्यांचीं शरीरें चैतन्यद्रव्याचे अनंत ठिपके—आद्यजंतूच्या शरीराच्या चैतन्यद्रव्याच्या ठिपक्यांप्रमाणें दिसणारे—एकत्र होऊन झालेलीं असतात व यांचा जीवनारंभ चैतन्यद्रव्याच्या मूळ एक ठिपक्यापासून झालेला असतो. त्यांच्याहि वरच्या दर्जाच्या सावयव प्राण्यांमध्यें सुद्धां असेंच दिसून येतें तेव्हां प्राण्यांचा उच्च किंवा खालचा दर्जा हा ठोकळमानानें सांगितलेल्या शारीरिक व्यापारावर अवलंबून नसून तो या चैतन्यद्रव्याच्या घटकावयवठिपक्याच्या संख्येवर अथवा त्यांचीं रूपांतरें होऊन झालेल्या त्यांच्या रचनेवर अवलंबून असतो. सारांश साधारणतः असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं प्राणधारणचैतन्यद्रव्य हें सूक्ष्म ठिपक्याच्या आकारांत मूलभूत अशा व्यक्तिशः प्रकृतिरूपानें अस्तित्वांत आलें. या चैतन्यद्रव्याच्या मूलभूत ठिपक्याला पेशी असें म्हणतात. प्राण्याचें शरीर एका पेशीचें बनलेलेंहि असूं शकेल. जसें—आद्यजंतु; किंवा अनंत पेशी एकत्र मिळूनहि झालेलें असेल. यांनां अनुक्रमें एकपेशीयप्राणी किंवा बहुपेशीयप्राणी अशीं नांवें आहेत. वर सांगण्यांत आलें आहे कीं ठोकळमानानें शारीरिक व्यापार एकपेशीय प्राण्यांत व बहुपेशीय प्राण्यात सारखेच होत असतात तरी शोधांतीं असें आढळून येईल कीं बहुपेशीय प्राण्यांत या व्यापारांची श्रमविभागणी झालेली असते. बहुपेशीय प्राण्याच्या शरीरांत सर्व पेशी सारख्या न राहून त्यांचीं रूपांतरें होऊं लागतात. व या रूपांतर पावलेल्या पेशी शरीराचे सर्व सरसकट व्यापार व्यक्तिशः चालवूं शकत नाहींत. कांहीं रूपांतर पावलेल्या पेशींत एखादा गुण जास्त विकास पावून त्या एक तऱ्हेचा व्यापार चालवूं लागतात व पुढें तोच त्यांचा व्यापार कायम राहतो. तसेंच दुसऱ्या तऱ्हेचा शरीराचा व्यापार दुसऱ्या तऱ्हेच्या रूपांतर पावलेल्या पेशी चालवूं शकतात. उदाहरणार्थ, संकोच—विकास पावणें ही क्रिया चैतन्यद्रव्याच्या गुणांपैकीं एक गुण असून पुढें संकीर्ण प्रकृतिरूपांमध्यें ती मांसपेशी अथवा स्नायूपेशीमध्यें सांठली जाऊन मांसपेशींचा अथवा स्नायूपेशींचा हा एक व्यापारच बनून राहतो. चेतनास्फूर्ति व इंद्रियगोचरता ज्ञानपेशीच चालवूं शकतात. म्हणजे पेशींचीं रूपांतरें होऊन शारीरिक धातू व इंद्रियें बनतात व त्यांनीं निरनिराळे व्यापार करण्याची योजना अमलांत येते. तेव्हां पेशींचीं रूपांतरें होणें म्हणजे त्यांचे गुणधर्म बदलणें होय व याच गोष्टीला शारीरिक श्रमविभागणी म्हणतात. ही श्रमविभागणी ज्या मानानें जास्त पूर्णत्वानें झालेली असेल त्यामानानें त्या प्राण्याचें शरीर उच्च दर्जाचें असें समजावयाचें. तेव्हां उच्च व खालच्या दर्जाच्या प्राण्यांत फरक जो आहे तो हाच कीं शारीरिक व्यापारांच्या संख्येंत ठोकळमानानें पाहिलें असतां वाढ न होतां ते व्यापार सुलभ रीतीनें व जास्त पूर्णत्वानें श्रमविभागणीच्या तत्त्वावर घडवून आणतां येतात.

वरील सर्व विवेचनावरून सहज लक्षांत आलें असेल कीं शरीराचा मूळ पाया हा एका पेशीनें घातला जातो व ही मूळ पेशी विभागून जाऊन तिचे विभाग एकपेशीय प्राण्यामध्यें अलग होऊन स्वतंत्र रीतीनें विकास पावतात व त्यापासून एकपेशीय नवीन प्राणी उद्भवतात. परंतु संकीर्ण बहुपेशीय प्राण्यांनां हे मूळ पेशीचे विभाग अलग न होतां एकत्र चिकटून राहतात व पुन्हा पुन्हां विभागून जाऊन व एकमेकाला लागलेले राहून विकास पावतात. व अशा रीतीनें त्याच्यापासून संकीर्ण बहुपेशीय प्राणी बनला जातो. तेव्हां सर्व प्रकारच्या शरीराचा मूळ पाया व घटकावयव म्हणजे पेशी होय. तिच्या रचनेसंबंधीं नीट अवलोकन केलें असतां तिच्यामध्यें मुख्य तीन भाग आढळून येतातः पहिला चैतन्य द्रव्याचा. हा भाग महत्त्वाचा असून प्रत्येक जिवंत पेशीमध्यें थोडाबहुत असलाच पाहिजे. ह्याच्याशीं पुष्कळ इतर द्रव्यें सूक्ष्मकणांच्या रूपानें संकलित झालेलीं असतात. दुसरा चैतन्य द्रव्याचाच परंतु त्याच्यामध्यें केंद्रीभूत होऊन त्याचे चैतन्याचे व्यापार चालविणारा एक बिंदुरूपी भाग ज्याला चैतन्यकेंद्र म्हणतात तो; बहुशः प्रत्येक पेशीमध्यें असा एक चैतन्यकेंद्राचा भाग असतोच. तिसरा चैतन्यद्रव्याचें वेष्टण; ज्याच्यामुळें पेशीची आकृति व तिची स्वतंत्रता दिसून येते. हें वेष्टण प्राण्यांच्या शरीरांतील पेशीमध्यें बहुशः चैतन्य द्रव्याखेरीज एखाद्या निराळ्या द्रव्याचें झालेलें नसून चैतन्य द्रव्याच्याच पृष्ठावरील भागांत थोडा फरक होऊन झालेलें असतें. वनस्पतींच्या शारीरिक पेशींमध्यें मात्र हें वेष्टण निराळ्या द्रव्याचें झालेलें असतें. या गोष्टीला एखादा अपवाद मिळण्यासारखा आहे परंतु येथें साधारण विवेचन केलेलें आहे. पेशींचे आकार निरनिराळे असूं शकतात व त्यांचीं रूपांतरें होऊं लागलीं म्हणजे त्यांच्यांत पुष्कळच फरक होतो.

प्राण्यांचीं शरीरें एकपेशीय किंवा बहुपेशीय असतात. बहुपेशीय प्राण्यांच्या शरीरांत पेशींचीं रूपांतरें होऊन त्यांचे निरनिराळे शारीरिक धातू झालेले असतात. व त्यांच्या तऱ्हेतऱ्हेच्या रचना होऊन इंद्रियें व अवयव झालेले असतातः अशा प्रकारानें शरीर उच्च दर्जा पावतें. तेव्हां प्राणिशास्त्रांत प्राण्यांच्या शारीरिक रचनेसंबंधीं माहिती देणें ही एक त्याची बाब होय. याला शारीरशास्त्र ( मॉर्फॉलॉजी ) असें म्हणतात. परंतु नुसत्या शरीररचनेनें प्राण्यांच्या संबंधीं पूर्ण बोध होऊं शकणार नाहीं तर त्यांचे शारीरिक व्यापार कोणते आहेत

व ते कसे चालतात याविषयींची माहिती म्हणजे प्राणिशास्त्राची दुसरी बाब होय. याला इंद्रियविज्ञानशास्त्र अथवा जीवनकार्यविचारशास्त्र (फिजिऑलॉजी) म्हणतात. बहुपेशीय प्राण्यांच्या शरीराचा पाया एकाच मूळ पेशीनें घातला जातो व तिची विभागणी होऊन व त्या विभागलेल्या पेशी एकत्र-पणानें विकास पावून व त्यांचीं रूपांतरें होऊन बहुपेशीय शरीर बनतें. ह्यासंबंधाची सविस्तर माहिती ही प्राणिशास्त्राची तिसरी बाब होय. या भागाला गर्भविकासशास्त्र ( एम्ब्रिऑलॉजी ) असें नांव देतात. तेव्हां शारीरशास्त्राच्या अनुरोधानें, जीवनक्रियाशास्त्राच्या अनुरोधानें व गर्भविकासशास्त्राच्या अनुरोधानें प्रत्येक प्राण्याची माहिती देणें आवश्यक आहे व अशी माहिती संक्षिप्त रीतीनें एखाद्या प्राण्याबद्दल दिली असता तिच्यावरून त्याचा आयुष्यक्रम समजला जातो. आतां प्रत्येक व्यक्तिमात्राची या तिन्ही बाबींप्रमाणें निरनिराळी माहिती देणें अशक्य असलें तरी थोड्या प्रयत्नांनीं व प्राण्यासंबंधीं चांगलें अवलोकन केलें असतां असें आढळून येईल कीं या भूतलावर सारख्या सारख्या व्यक्ती पुष्कळ असून त्यांचे सर्वसाधारण असे पुष्कळ समूह करतां येतात. उदाहरणार्थ मांजर, चित्ता, वाघ सिंह, या जनावरांचा एक लहानसा समूह होऊं शकतो व त्याला व्याघ्रजाति (जीनस) हें नांव देतां येईल तेव्हां हीं विविध जनावरें या समूहाचे जातिविशेष होत. प्रत्येक जातिविशेष हा थोडया किंवा पुष्कळ व्यक्तींचा झालेला असतो.या समूहापैकीं एखादें जनावर प्रतिरूप कल्पून त्याच्या शरीराचें वर निर्दिष्ट केलेल्या बाबींप्रमाणें सर्वसाधारण वर्णन दिलें असतां तें या समूहांतील सर्व व्यक्तींनां लागू होतें. व अशा रीतीनें सर्व प्राण्यांचे समूह करून वर्णन करणें शक्य होतें. पुन्हां व्याघ्रजाति ही मांसभक्षक आहे. तसेंच कुत्र्याची जात पण मांसभक्षक. तेव्हां या दोन्ही जातींमध्यें ताडून पाहून जें साम्य दिसेल तें लक्षांत आणून त्यावरून त्यांचा एक वरच्या दर्जाचा समूह बनवितां येतो. त्याला मांसभक्षक पशू (कार्निव्होरा) असें म्हणतात. या समूहाला गण (ऑर्डर) म्हणतात. त्याचप्रमाणें गाय, घोडा वगैरे सारखेपणा असणाऱ्या पशूंचा एक गण होतो त्याला खुरयुक्त पशु (अंग्युलाटा) म्हणतात. त्याचप्रमाणें मनुष्य व मनुष्यवत्त प्राण्यांचा एक गण होतो. आतां हे सर्व गण जर पाहिले तर त्यांच्यांत कांहीं प्रकारानें थोडेसें साम्य आहे असें लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां या साम्यामुळें ह्या सर्व गणांचा एक मोठा समूह बनतो त्याला वर्ग म्हणतात व या वर निर्दिष्ट केलेल्या गणांचा वर्ग म्हणजे सस्तनप्राणी (मॅमल) हा होय. याप्रमाणें शरीरगुणधर्म, शरीररचना व शरीरविकास पावणें अथवा गर्भविकास पावणें या सर्व गोष्टींचा विचार करून प्राण्यांचे समूह निरनिराळ्या दर्जाचे बनविणें याला वर्गीकरण (क्लासिफिकेशन) म्हणतात. ही एक प्राणिशास्त्राची चवथी बाब होय. हिला प्राणिवर्गीकरणशास्त्र ( सिस्टिमॅटिक झूलॉजी ) म्हणतात. वर्गीकरणाच्या रूपानें सर्व प्राण्यांच्या संबंधीं माहिती एकवटून देणें शक्य होतें. हें वर्गीकरण करतांना एक मुख्य गोष्ट प्रमुखत्वानें पुढें येते ती ही कीं अगोदर जातिविशेष ठरले पाहिजेत व दुसरी ही आहे कीं जातिविशेष म्हणजे काय व कसे ओळखावयाचे व ते निश्चित आहेत किंवा बदलूं शकतात ह्या गोष्टींचा निर्णय करावा लागतो. जातिविशेषांमध्यें कालमानानें फरक होतो किंवा होत नाहीं ही प्राणिशास्त्रांतील एक मोठी वादग्रस्त बाब आहे. जातिविशेष म्हणजे थोड्या किंवा बहुत व्यक्तींचा अशा तऱ्हेचा एक समूह कीं त्याच्यांतील व्यक्तिमात्रांत सर्व मुख्य गोष्टींमध्यें अगदीं साम्य असतें व या सर्व व्यक्ती प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष रीतीनें फलद्रूप सुप्रजा निर्माण करूं शकतात, व प्रजेत त्याच्या प्रतिरूपाहून थोड्याशा प्रमाणावर होणाऱ्या जन्मसिद्ध व्यक्तिभेदामुळें थोडासा फरक दिसला तरी तो फरक वजा केला असतांहि प्रजा पूर्वजाच्याप्रमाणेंच असणारी निपजलेली असते. पुन्हां प्रत्येक जातिविशेषाला मर्यादा घालणारें एक लक्षण दिसून येतें तें हें कीं, जातिविशेषांतील व्यक्तिमात्रांत फलद्रूपता किंवा सुप्रजाजनकत्व हें विपुलतेनें दृष्टीस पडतें परंतु तें क्वचितच निरनिराळ्या जातिविशेषांच्या व्यक्तींमध्यें दृष्टोत्पत्तीस येतें. बहुतकरून अशा व्यक्तींमध्यें संयोग झाल्यास घडून येत नाहीं. व जर कदाचित प्रजा निष्पन्न झाली तर ती वांझ निपजते. जरी वर सांगितलेलीं हीं लक्षणें जातिविशेषांचा निर्णय करण्यास उपयोगीं पडतात तरी जातिविशेष निश्चित करतांना मतभेद होण्याचा बराच संभव असतो. पुन्हां कांहीं प्राणिशास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें जातिविशेष हे ईश्वरप्रणीत असल्यामुळें निश्चित आहेत व त्यांत फेरफार होत नाहींत. तर इतर शास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें जातिविशेष हे निश्चित असे ईश्वरप्रणीत नसून विकासाच्या तत्त्वानुरूप झालेले आहेत व त्यामुळें त्यांत फेरफार होऊं शकतात व नवे नवे जातिविशेष कालांतरानें बनून येतात जातिविशेषाबद्दल आधुनिक शास्त्रज्ञांचा, साधारणतः हें दुसरें तत्व ग्राह्य मानण्याकडे कल झालेला आहे. जातिविशेष हा वर्गीकरणाचा पाया होय व या पायाचा निर्णय झाल्यावर वर्गीकरणाची इमारत बांधावयाची असते. हें वर्गीकरण करीत असतांना एक मोठी गोष्ट लक्षांत येते ती ही कीं, प्राण्यांचे मोठमोठाले संघ ( फायला ) जरी निरनिराळे आहेत असें दिसलें तरी ते पायरीपायरीनें उन्नतावस्थेत आलेले असावेत व ते सर्व प्रगतिपर विकासाच्या तत्त्वावरच झालेले असावेत. तेव्हां प्राण्यांचें वर्गीकरण करणें म्हणजे त्यांची एक प्रकारानें वंशावळच तयार करणें होय. या शास्त्राचा इतिहास ज्ञानकोश विभाग पांचवा (प्रकरण १५ ) यांमध्यें पहा.

आधुनिक एका पद्धतीनें प्राणिशास्त्रांतील सर्व तत्वांचा विचार करून प्राण्यांचें नैसर्गिक रीत्या होणारें वर्गीकरण पुढें कोष्टकरूपानें दिलें आहे.


प्राणिकोटी
अपृष्ठवंश.
( पाठीला कणा नाहीं असे )
सपृष्ठवंश.
( पाठीला कणा आहे असे )
संघ१
आद्यजंतु
वर्ग१--कामरूप क्षुद्रजंतु
वर्ग२--परान्नपुष्टक्षुद्रजंतु
वर्ग३-निर्यासज क्षुद्रजंतु
संघ२
अनेक छिद्रधारी
संघ३
शारीरांत्रैकगुहक
वर्ग१--जलस्थजीव
वर्ग२-मृदुजीव
वर्ग३-तारकित गात्रजीव
वर्ग४-कंकतसम गात्रजीव
संघ४
विशालकृमि
संघ५
वर्तुलाकारकृमि
संघ६
चक्रधर कृमि
संघ७
सकंटक तनु
वर्ग१तारकित-तनुविशिष्ट
वर्ग२--तारकित शाखाविशिष्ट
वर्ग३--सशल्य-कवच
वर्ग४--तारकित कर्कटिकाकृति
वर्ग५--तारकित पिच्छदल
संघ८
वलयांकितशरीर
वर्ग१--लोमपाद
उपवर्ग१ अनंत-लोम
उपवर्ग२ अल्प-लोम
वर्ग२--जलुकासमूह
संघ९
संधि-पाद
वर्ग१-कवच घर
वर्ग२--अनंत पद
वर्ग३--षट्-पद
वर्ग४--अष्ट-पद
संघ१०
मृदुकाय
वर्ग१--उदरतल मृदुकाय
वर्ग२--पत्रसम श्वासेंद्रियमृदुकाय, द्विपुटकवचमृदुकाय किंवा परसुसमपादमृदुकाय
वर्ग३-शीर्षपाद मृदुकाय.
संघ
सपृष्ठवंश
पोटसंघ१
निगूढवंश
पोटसंघ२
पुच्छवंश
पोटसंघ३
पूर्णवंश
भेद १
निःशीर्ष
भेद २
सशीर्ष
वर्ग १
वर्तुलमुखी
वर्ग २
मीन, मच्छ
वर्ग ३
स्थलजलचर
वर्ग ४
उरोगामी किंवा उरग
वर्ग ५
विहग
वर्ग ६
सस्तन

**प्राप्तीवरील कर.** हिंदुस्थान.—येथें प्राप्तीवरील कर प्रथम १८६० सालीं सत्तावन सालच्या बंडामुळें जमाखर्चावरील तूट भरून काढण्याकरितां बसविण्यांत आला. त्यावेळीं पांचशें रुपयांहून अधिक वार्षिक उत्पन्नावर शें. ४ प्रमाणें कर होता. नंतर कमजास्त फेरफार होत तो दरसाल चालू राहून १८८६ च्या कायद्यानें हल्लीं चालू असलेली पद्धति प्रथम आली. त्या कायद्यानें शेतकीच्या उत्पन्नाखेरीज इतर सर्व प्रकारच्या २००० रुपये किंवा अधिक वार्षिक प्राप्तीवर रुपयास पांच पैप्रमाणें, आणि ५०० ते २००० रुपये वार्षिक प्राप्तीवर रुपयास चार पैप्रमाणें, कायम करण्यांत आला. पुढें १९०३ सालच्या मार्चमध्यें प्राप्तीची किमान मर्यादा ५०० वरून १००० रुपयांवर नेण्यांत आली. नंतर महायुद्धाच्या वेळीं ( १९१६–१९१७ ) सालीं पुन्हां बराच फेरफार करण्यांत येऊन आतां हा प्राप्तीवरील कर म्हणजे सरकारला एक उत्पन्नाचें उत्तम साधन होऊन बसलें आहे. १९२१–२२ सालीं कांहीं फरक होऊन दोन हजार ते पांच हजारपर्यंत एक रुपयास ५ पै, पांच ते दहा हजारपर्यंत ६ पै, दहा ते वीस हजारपर्यंत ९ पै, वीस ते तीस हजारपर्यंत १२, पै तीस ते चाळीस हजारपर्यंत १४ पै व चाळीस हजाराहून अधिक उत्पन्नावर १६ पै असे दर ठरले. विम्याचा हप्ता व शैक्षणिक वगैरे लोकोपयोगी संस्थांनां दिलेल्या कर्जावरील व्याज यावर हा कर आकारीत नाहींत.

१९१७–१८ सालच्या बजेटांत आणखी बदल असा करण्यांत आला कीं, प्राप्तीवरील कराखेरीज मोठमोठ्या प्राप्तीवर सुपर–टॅक्स नांवाचा जादा कर बसविण्यांत आला. इंग्लंडमध्यें या सालापूर्वीच कांहीं वर्षे हा कर चालू झालेला होता. या योजनेप्रमाणें प्राप्तीवरील कर सर्वांवर कायम राहून शिवाय ५०००० रुपयांहून अधिक वार्षिक प्राप्तीच्या उत्पन्नावर सुपरटॅक्स घेण्याचें ठरलें. एकत्र कुटुंबाच्या प्राप्तीवर ७५ हजारपर्यंत कर माफ व पुढें एक लक्षापर्यंत रुपायास १ आणा असून इतर इसमांस ५० हजार ते १ लाखपर्यंत १ आणा ठरला. पुढें दर ५० हजारास अर्धा आणा याप्रमाणें वाढता दर आकारून साडेतीन लाखांहून अधिक उत्पन्नावर रुपयास ४ आणेप्रमाणें दर ठरले.

पाश्चात्य.—युनायटेड किंग्डममध्यें सर्व प्रकारच्या उत्पन्नांवर बसविलेला जो कर त्याला प्राप्तीवरील कर असें नांव आहे. प्राप्तीवरचा कर अर्वाचीन स्वरूपांत इंग्लंडमध्यें स. १७९८त प्रथम सुरू झाला.हा कर दुसऱ्या पिटनें "फ्रान्सबरोबरचें युद्ध चालविण्यास मदत " म्हणून बसविला व तो ६० किंवा त्याहून अधिक पौंड उत्पन्नावर होता. पुढें १७९९ सालीं मागील कर रद्द करून सर्व प्रकारच्या प्राप्तीवर शें. १० प्रमाणें कर बसविला. आतां हा कर म्हणजे ब्रिटिश सरकारच्या वार्षिक उत्पन्नाचें एक अत्यंत महत्त्वाचें साधन होऊन बसला आहे. १८४२ सालीं सर आर. पीलनें हा कर पुन्हां सुरू केला.

स. १९०९ च्या पूर्वीच्या काळांत प्राप्तीवरील कराचा दर जास्तींत जास्त दर पौंडास १६ पेन्स ( १८५५–५७ सालीं ) आणि कमींत कमी २ पेन्स ( १८७४–७६ ) होता. १९०६ सालच्या कमिटीनें केलेल्या सूचना दर क्रमाक्रमानें वाढण्यासंबंधानें व कायमची प्राप्ति व अनिश्चित प्राप्ति यांत फरक करण्यासंबंधानें होत्या. या क्रमवाढीच्या ( ग्रॅज्युएशन ) व वर्गीकरणाच्या तत्त्वांचा समावेश करून १९०९ सालचें फायनॅन्स बिल तयार करण्यांत आलें. त्यांत प्राप्तीपैकीं 'मिळविलेल्या' भागावर २००० पौंड उत्पन्नापर्यंत दर पौंडास ९ पेन्स, व २००० ते ३००० उत्पन्नापर्यंत दर पौंडास १ शिलिंग हा पूर्वीचा दरच कायम ठेवण्यांत आला. परंतु 'फुकट मिळालेल्या' प्राप्तीवर आणि मिळविलेल्या सर्व प्रकारच्या प्राप्तीच्या ३००० पौंडांवरील उत्पन्नावर कराचा दर वाढवून दर पौंडास १ शिलिंग २ पेन्स करण्यांत आला. शिवाय या प्राप्तीवरील कराच्या जोडीला सुपर-टॅक्स म्हणून दर पौंडास ६ पेन्सप्रमाणें ५००० पौंडांवरील सर्व प्रकारच्या वार्षिक उत्पन्नावर बसविण्यांत आला. सुपर- टॅक्सची आकारणी मात्र ३००० पौंड वजा करून बाकीच्या प्राप्तीवर करण्याचें ठरलें. शिवाय ५०० पौंडांहून कमी वार्षिक उत्पन्नावर आकारणी करतांना प्रत्येक सोळा वर्षांच्या आंतील मुलाबद्दल १० पौंड वजा करण्यांत येत असत. युनायटेड किंग्डममध्यें रहिवासी नसणाऱ्या इसमांनां मात्र या कराच्या आकारणीच्या बाबतींत कसलीहि माफी किंवा वजावट मिळत नसे. शेतीच्या किंवा घराच्या दुरुस्तीकडे रक्कम लावल्याबद्दल कांहीं रक्कम वजा होत असे. ऑस्ट्रियाः—येथें हा कर १८४९ सालापासून सुरू झाला आणि क्रमवाढीपद्धतीचा कर १८९८ च्या जानेवारीपासून बसविण्यांत आला. एकंदर प्राप्तींतून धंदा, घरें व जमीन सुस्थितींत राखण्याकरितां लागणारा खर्च, विम्याचे हप्ते भरण्यास लागणारी रक्कम, धंद्याकरितां व खाजगी काढलेल्या कर्जावरील व्याज व इतर करांबद्दल द्यावी लागणारी रक्कम इतक्या रकमा वजा करून उरलेल्या निव्वळ प्राप्तीवर कराची आकारणी करतात. ५० पौंड प्राप्तीपर्यंतच करमाफी असते. शिवाय राजकुटुंबांतील मंडळी, परराष्ट्रवकील,सरकारी अधिकारी वगैरे कित्येक इसमांनां हा कर माफ असतो. बेल्जमः—प्राप्तीवरचा कर म्हणून या देशांत नाहीं. मात्र जाइंट स्टॉक कंपन्यांच्या डिव्हिडंडवर शें.२ स्टेट टॅक्स नांवाचा कर आहे. डेन्मार्कः—येथें १९०३ त कायदा पास होऊन हा कर सुरू झाला. २००० क्रोनरखालच्या प्राप्तीवर कर नसतो. येथें करमाफी व विशेष सवलती यासंबंधाचे नियम ऑस्ट्रियांतल्यासारखेच आहेत. फ्रान्स—युनायटेड किंग्डममधल्यासारखा प्राप्तीवरील कर येथें नाहीं. पण कांहीं अंशीं त्याच्याशीं सादृश्य असलेले निरनिराळे प्रत्यक्ष

कर तेथें आहेत. उदाहरणार्थ, घरें, दारें व खिडक्यांवरील कर, शेती, व्यापार व उद्योगधंदे यांच्या उत्पन्नावरील कर वगैरे. जर्मनसाम्राज्य—प्रशियांत १८९१ सालीं कायदा पास होऊन प्राप्तीवरील कर चालू झाला आहे. १५० पौंडांहून अधिक वार्षिक प्राप्तीवाल्यांनां पुढील वर्गीकरणानुसार स्वतःच्या प्राप्तीसंबंधाचें माहितीपत्रक भरून सरकारांत पाठवावें लागतें. प्राप्तीच्या साधनांचे चार प्रकार केलेले आहेत ते असेः—( १ ) भांडवल, ( २ ) स्थावर मिळकत, ( ३ ) व्यापार व उद्योगधंदे, आणि ( ४ ) सरकारी व खाजगी नोकरी (लष्कर व इतर शिक्षणादि खात्यांतील नोकर, व्यापारी व उद्योगधंद्यांतील नोकर, ग्रंथकार, शास्त्रज्ञ वगैरे लोकांची प्राप्ति ). कराला आरंभ ४५ पौंड प्राप्तीपासून होतो. कराचे दर क्रमवाढपद्धतीनें आकारतात, व हे दर ६ शिलिंग पासून ५ पौंडपर्यंत आहेत. शिवाय जादा कर ( सप्लीमेंटरी टॅक्स ) सुपर टॅक्ससारखाहि येथें आहे. करमाफी बहुतेक ऑस्ट्रेलियातल्याप्रमाणे आहे. हंगेरींत हा कर नाहीं. युनायटेडस्टेट्सः—येथें आपसांतील युद्धाच्या वेळीं प्रथम प्राप्तीवरील कर बसविण्यांत आला.१८६२मधीलकायद्यानें सर्व प्रकारच्या १०००० डालरांखालील प्राप्तीवर शें. ३ बसला, व दहा हजारावरील प्राप्तीवर शें.५ कर बसला; त्यांत ६०० डॉलर माफी वजा करीत असत.बँका,रेल्वेकंपन्या, विमाकंपन्या यांच्या डिव्हिडंवरहि कर घेतात. दक्षिण आफ्रिका—१९१० पर्यंत दक्षिण आफ्रिकेपैकीं केपकालनींतच फक्त १९०४ पासून प्राप्तीवरील कर चालू होता. कराचा आरंभ १००० पौंड वार्षिक उत्पन्नापासून होऊन त्यांत हजार पौंडांनां माफी असते. कराचा दर पौंडास ६ पेन्स ते ९ पेन्सपर्यंत आहे. न्यू साऊथ वेल्स–येथें १८९६ सालीं हा कर सुरू झाला. कर २०० पौंड वार्षिक प्राप्तीपासून सुरू होता व दर पौंडास ६ पेन्स आहे. शिक्षणसंस्था, धार्मिकसंस्था, फायदा न मिळविणां चालविलेल्या सर्व सार्वजनिक संस्था यांनां कर माफ असतो. क्वीन्सलंड, न्यूझीलंड, साऊथ ऑस्ट्रेलिया, टास्मानिया, व्हिक्टोरिया या सर्व ब्रिटिश वसाहतींत व इटली, स्वित्झर्लंड, नॉर्वे, स्पेन, वगैरे देशांत हा कर आहे.

**प्रायश्चित्त**—याचा संबंध पापांशीं आहे. यज्ञ, उपवास, तप किंवा इतर अनेक प्रकारें प्रायश्चित्त घेतात.पाप केल्याबद्दल ईश्वर रागावून शिक्षा करतो त्याचें निराकरण करण्याकरितां प्रायश्चित्तांची योजना असते. ‘ पाप ’ या शब्दाचा केवळ नैतिक दुराचरण एवढाच अर्थ नसून कोणताहि धार्मिक कायदा मोडणें हें पाप होय असा आहे. पापाची कबुली देणें ( कन्फेशन ) हा प्रायश्चित्ताचाच प्रकार असून तो ख्रिस्ती धर्मांत विशेष प्रमुख असला तरी असुरी-बाबिलोनी, मिसरी, हिब्रू वगैरे धर्मांतहि आहे.

संस्कृत धर्मग्रंथांत आचार, व्यवहार व प्रायश्चित्त अशीं तीन मुख्य प्रकरणें असतात. प्रायश्चित्तपद्धति ही ब्राह्मणांनीं प्रथम उत्पन्न केली असें म्हणता येत नाहीं,कारण पर्शुभारतीय काळांत म्हणजे हिंदु आर्य, व इराणी लोक एकत्र राहत होते त्या वेळीं ही होती. अवेस्ता ग्रंथाच्या वेंदिदाद नामक भागांत प्रायश्चित्तांबद्दल विवरण आहे.

वैदिक वाङ्मयात प्रायश्चित्त हा शब्द, श्रौतकर्मांतील विधींत जर कांहीं वैगुण्य प्राप्त झालें तर त्याच्या निराकरणार्थ करावयाच्या विधींबद्दल योजिला जातो. व तैत्तिरीय संहितेपासून बहुतेक ब्राह्मणग्रंथांतून तो आढळतो. सूत्रवाङ्मयांत याच्याबद्दल विध्यपराध हा शब्द योजिला आहे व तें एक स्वतंत्र प्रकरणच श्रौतसूत्रग्रंथांतून आढळतें. स्मृतिप्रणीत व पुराणवाङ्मयांत मात्र त्रैवर्णिकांस नेमून दिलेले नित्याचार, व विशिष्ट आचार यांतील वैगुण्य व धर्मबाह्य आचरण केलें गेल्यास प्रायश्चित्त करावें असें सांगितलेलें आढळतें. हे धर्मबाह्य वर्तन म्हणजे अभक्ष्यभक्षण, अपेयपान, अगम्यागमन, नित्य व नैमित्तिक कर्मांचा लोप इत्यादि प्रकारचें आहे. या प्रायश्चित्तास कृच्छ्रप्रायश्चित असें म्हणत असून त्याचे पादकृच्छ्र, अर्धकृच्छ्र, पादोनकृच्छ्र, अतिकृच्छ्र, कृच्छ्रातिकृच्छ्र, सातपनकृच्छ्र, महासातपन, तप्तकृच्छ्र, पराककृच्छ्र, यवमध्यचांद्रायण, पिपीलिकामध्यचांद्रायण, कृच्छ्रचांद्रायण इत्यादि प्रकार आहेत. ते कोणत्या कारणासाठीं कोणते योजावे याचें विवेचन निरनिराळीं धर्मसूत्रें, मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिग्रंथ तसेच निर्णयसिंधु, धर्मसिंधु इत्यादि निबंधग्रंथात केलें आहे. याज्ञवल्क्य व पाराशरस्मृतींत प्रायश्चित्ताकरता एक स्वतंत्र प्रकरणच दिलें आहे.

वरील प्रायश्चित्ताचे प्रकार हे एखाद्याच्या हातून दोष घडला असेल त्याच्या दंडादाखल कांहीं तरी देहदंड व्हावा यासाठीं आहेत. परंतु अशा दोषाची निष्कृति द्रव्यद्वारां प्रायश्चित्त आचरून करावयाची प्रवृत्ति केव्हा सुरू झाली हें नक्की समजत नाहीं.

पारशी लोकाच्या धर्मांत प्रायश्चित्ताचे प्रकार अनेक आहेत. त्यापैकीं प्रायश्चित्तार्थ म्हणावयाच्या प्रार्थना पाझंद नामक ग्रंथात दिल्या आहेत. ही प्रार्थना शापूर राजाच्या वेळचा ( स. ३१०–३७९ ) मुख्य पुरोहित दस्तुर अदर्बद महस्पंद यानें रचलेली असून तींत अहुरमझ्द वगैरे देवता, आईबाप, भाऊबंद, मित्र वगैरेंच्याविरुद्ध होणाऱ्या कायिक, वाचिक व मानसिक अशा अनेक प्रकारच्या पापांचा उल्लेख आहे. रोज रात्रीं निजण्याच्यापूर्वी प्रत्येकानें असें प्रायश्चित्तपर मंत्र म्हणावे अशी पद्धत आहे. मंत्रपठणाखेरीज उपोषण किंवा द्रव्यदान हे प्रायश्चित्ताचे प्रकार पारशी धर्मांत नाहींत. अन्नग्रहण न करता उपवास करणें याची तर या धर्मांत सक्त मनाई केलेली आहे.

इस्लामी धर्मांत मनुष्याचीं कर्तव्यें व हक्क यांनां देणें ( कर्ज ) व येणें असें स्वरूप दिलें असून कुराणांत ज्या गोष्टी मुसुलमानांनीं कराव्या म्हणून सांगितलें आहे तें सर्व ईश्वराचें प्रत्येकाला देणें आहे असें मानतात. पांच दैनिक

प्रार्थना, रमजानचा उपवास, वार्षिक दानधर्म आणि मक्केची यात्रा हे कर्मांचे चार प्रकार आहेत. ह्या कर्तव्यांपैकी दैनिक प्रार्थना करण्याचें चुकल्यास तदनंतर जादा प्रार्थना करून तसेंच रजमानचें राहिलेलें उपोषण इतर वेळीं करून, एक सालीं राहिलेला दानधर्म पुढील वर्षी करून आणि मक्केची यात्रा स्वतःस न करतां आल्यास दुसऱ्या इसमास त्या यात्रेचा भाडेखर्च देऊन या चारहि प्रकारच्या कर्जफेडींबाबत घडलेल्या पापाचें प्रायश्चित्त वरील प्रकारें घेतां येतें.याशिवाय खून व इतर जे गुन्हे करूं नये म्हणून सांगितलें आहे त्या गुन्ह्यांबद्दल कुराणांत शिक्षा सांगितल्या आहेत. तींहि प्रायश्चित्तेंच होत. कांहीं हलक्या गुन्ह्यांबद्दल उंट,गाय, वगैरे बळी देण्याचें प्रायश्चित सांगितलें आहे. आणि या प्रायश्चित्तांचा खर्च करण्याची ज्यास ऐपत नसेल त्यानें प्रायश्चितार्थ उपवास करावे असें सांगितलें आहे.

ख्रिस्ती धर्मांत प्रायश्चित्ताच्या कल्पनेला मूळ जीझसख्राइस्टच्या फांशीपासूनच सुरवात होते. मानवजातीचा पिता जो अडाम त्यानें केलेल्या पापाची निष्कृति ख्राइस्टनें स्वतः फांशी जाऊन केली अशी उपपत्ति धर्मवेत्त्यांनीं पुढें मांडली आहे. धर्मगुरुजवळ स्वकृत पापाचा उच्चार करून (कंफेशन) क्षमा याचिणें हा ख्रिस्ती प्रायश्चित्ताचा मुख्य विधि होय. चर्च वगैरे धर्मसंस्थांनां द्रव्यप्रदान करणें हाहि प्रायश्चित्ताचा एक प्रकार सांगितलेला असून मध्ययुगीन धनलोभी पोपांनीं तर प्रायश्चित्तार्थ पापविमोचनपत्रें ( इन्डल्जन्स ) विक्रीस काढलीं. अद्यापहि पापोच्चार, उपोषण व द्रव्यदान हे प्रायश्चित्तांचे तीन प्रकार रुढ आहेत.

**प्रायोज्जिदें** (ॲल्डिहाइडस)—हा एक रासायनिक सेंद्रिय मिश्रणांचा वर्ग असून यांतील प्रथमघटक द्रवरूप असून त्याला एक प्रकारचा वास येतो, मात्र अगदीं प्रथमघटक हा वायूरूप असून त्यास पुत्तल--प्रायोज्जिद असें म्हणतात. हीं प्रायोज्जिदें पाण्याशीं विद्रुत होतात व लवकर वायुरूप होतात. पण जसजसें त्यांच्यांतील कर्बाचें प्रमाण वाढत जातें तसतसा त्यांचा पाण्याशीं विद्रुत होण्याचा गुणधर्म कमी कमी होत जातो व वितळण्याचें उष्णमान वाढत जातें. तीं खालील रीतीनें तयार करतां येतात. प्राथमिक अल्कहलांच्या सिंधुद्विधिलितास पालाशक्रमित व गंधकाम्लाच्या योगानें काळजीपूर्वक प्राणिदीकरण केलें असतां प्रायोज्जिदें मिळतात. जी. डार्झेन्स यानें एक -हर--दार्विक--संयुक्त इथ्राचे सिंधु इथिलितासह जें संयुक्त इथ्र पाहिजे असेल त्याचा किंतिनाशीं दृढीकरण करून ग्यादिष्ट--ग्लायसायडिक-- अम्लाचें संयुक्त इथ्र तयार केलें. ह्या इथ्रावर जलक्रिया करुन अम्लें वेगळीं करतां येतात आणि हीं अम्लें कर्ब-द्विप्राणिद उडून गेल्यामुळे लवकर विघटित होतात आणि आपणांस प्रायोज्जिद मिळतें. स्निग्ध अम्लांच्या खटक्षारांचें खटपुत्तलितासह ऊर्ध्वपातन केलें असतां प्रायोज्जिदें मिळतात. इ.स.१९०४त असें दाखविलें आहे कीं, स्निग्ध पुत्तलितांच्या दोन अण्वीय भागावर स्निग्ध किंवा गंधक--मग्नहरसंविद तितक्याच अण्वीय भागावर क्रिया केली असतां एक संयुक्त जोड संमिश्रण तयार होतें. याचें विघटन केलें असतां प्रायोज्जिदें मिळतात. हीं प्रायोज्जिदें बरींच क्रियावान आहेत. तीं उज्जिकारक असून द्रवेंत उघडीं ठेवलीं असतां प्राणयुक्त होऊन अम्लें देतात. गुकत्याच बाहेर पडणाऱ्या उज्ज वायूच्या योगानें त्यांचें प्राथमिक अल्कहलमध्यें रूपांतर होतें. त्यांच्यामध्यें असलेल्या कर्बयुक्त प्राणाच्या ऐवजीं स्फुर-पंचहरिदाच्या योगानें हर घालतां येतो. सिंधु--द्वि--गंधकायितांशीं द्वि-गंधकायित संमिश्रणें तीं देतात व हीं संमिश्रणें शुद्ध प्रायोज्जिदें करण्याकरतां उपयुक्त असतात. कर्ब-नत्रिदाबरोबर कब-नत्रोज्जिदें मिळतात हीं उद्--उज्ज अजीरिनवर क्रिया केली असतां उज्ज--अजीवीन मिळतात व त्यांचा उपयोग प्रायोज्जिदें ओळखण्याकडे चांगला होतो. त्यांच्यावर दाहक अनाम्लांच्या क्रियेच्या योगानें राळ मिळते. स्निग्ध जगद व प्रायोज्जिदें मिश्रित केलीं असतां एक जोड मिश्रण तयार होतें. ह्या मिश्रणाचें पाण्याच्या योगानें विघटन केलें असतां आपणांस द्वितीय-अल्कहलें मिळतात.स्निग्ध अदिदाबरोबरहि अशाच प्रकारचीं अल्कहलें मिळतात. हीं प्रायोज्जिदें गंधकाम्लाच्या योगानें रंग नाहींसा केलेल्या फ्युशाइनसह तांबडा निळसर रंग देतात.प्रायोज्जिद वर्गांतील प्रथमघटकामध्यें या बहुपदाचा गुणधर्म दिसून येतो. क्षयप्रायोज्जिदेंहि तयार करतां येतात. इथिल अल्कहलाचें गंधकाम्ल व पालाशक्रमिताच्या योगानें प्राणिदीकरण केलें असतां मिळणाऱ्या दारु-प्रायोज्जिदावर गंधक उज्जवायु जाऊं दिल्यास त्याचें क्षय-प्रायोज्जिद मिळतें. दारु-प्रायोज्जिदाबरोबर अल्कहल तापविल्यास दार्वम्ल मिळतें. ज्या प्रायोज्जिदामध्यें कर्बाचें प्रमाण जास्त आहे त्यामध्येंहि वरील बहुतेक सर्व गुणधर्म दिसून येतात. पण अतृप्त प्रायोज्जिदामध्यें वरील गुणधर्मांबरोबरच जोड संमिश्रणें देतात. गंधयुक्त प्रायोज्जिदांतहि वरील गुणधर्म दिसून येतात. पण कांहीं बाबतींत थोडा फरकहि आहे. त्याच्यामध्यें बहुपदत्वाचा गुणधर्म दिसून येत नाहीं व दाहक अनाम्लाच्या सान्निध्यांत तीं राळ न देतां अल्कहलें किंवा अम्लें देतात.गंधयुक्त प्रायोज्जिदें अम्नशीं प्रायोज्जिद--अम्न न देतां उज्ज उद्--अमिद देतात. गंधसप्राणयुक्त प्रायोज्जिदामध्यें सॅलिसिलिक प्रायोज्जिद मुख्य असून दालचिनीप्रायोज्जिद हे गंधयुक्त अतृप्त प्रायोज्जिद आहे.

**प्रॉव्हिडन्स**—अमेरिकेंतील न्यूइंग्लंडमधील मोठें शहर व प्रॉव्हिडन्स कांउटीचें ठाणें. हें प्रॉव्हिडन्स नदीच्या मुखाशीं वसलेलें असून बंदर आहे. लोकसंख्या ( १९०० ) १७५५९७. येथील बहुतेक सर्व लोक यूरोपीयन आहेत. शहराचें क्षे. सुमारें १८ चौ. मै. आहे. येथील मुख्य इमारती स्टेट हाऊस, सिटीहॉल, कांउटी कोर्ट, सार्वजनिक वाचनालय

(सुमारें दीड लक्ष पुस्तकांचें), सेंट पॉल व पीटरचीं चर्चें वगैरे आहेत.

इक्वेस्ट्रियन पुतळा, कोलंबसाचा पुतळा व दुसरेहि कित्येक पुतळे येथें आहेत येथें जर्मन संगीत विद्यालयें वरीच आहेत.

**प्रिटोरिया**-प्रिटोरिया हें दक्षिणआफ्रिकासंघाचें व ट्रान्सव्हाल प्रांताच्या राजधानीचें शहर असून जोहान्सवर्गच्या ईशान्येस रेल्वेनें ४६ मैल आहे. १९२१ सालीं येथील लोकसंख्या ७४६५२ होती. समुद्रसपाटीपासून हें ४४७० फूट उंच आहे. शहराच्या उत्तरेस राष्ट्रीय पदार्थसंग्रहालय असून जवळच प्राणिशास्त्राचे बगीचे आहेत. याशिवाय सरकारी वाचनालय, विद्यालय आणि नाटकगृह हीं येथें आहेत. वर्गरच्या रमणबागेंत वनस्पतिवगीचा आहे. त्याच्या उत्तरेस स्मशानभूमि व पश्चिमेस सिग्नलटेंकडी आहे. प्रेसिडेन्ट क्रूगरच्या पुतळ्याचें आसन एका रमणबागेंत आहे.

इतिहास.—बोअर सरकारनें मारथिनस प्रिटोरियसपासून विकत घेतलेल्या ठिकाणीं हें शहर वसलें म्हणून यास प्रिटोरिया हें नांव देण्यांत आलें. आफ्रिकन प्रजासत्ताक व लिंडेनवर्ग प्रजासत्ताकांचें एकीकरण झाल्यावर हें राजधानीचें शहर झालें. व्होल्कस्राडची पहिली बैठक येथेंच झाली. १८८१ सालीं ट्रान्सव्हालच्या स्वराज्याचा करारनामा येथेंच झाला. यावेळेपासून १९०० पर्यंत खरी सत्ता प्रेसिडेन्ट पॉलक्रूगरच्या हातांत होती रँडवरील सोन्याच्या खाणीच्या उत्पन्नामुळें शहरांत पुष्कळ सुंदर इमारती बांधण्यांत आल्या. १८९३ सालीं केपटाउनशीं व १८९५ सालीं लुरेंकोमारक्विस व दरबानशीं हें रेल्वेनें जोडलें गेलें. १९०० सालीं क्रूगर पळाल्यामुळें येथील लोक लॉर्ड रॉबर्टसला वश झाले. ज्या तहानें बोअर लोकांनीं ब्रिटिशांचें सार्वभौमत्व कबूल केलें तो तह १९०२ सालीं येथेंच झाला. १९०७ सालीं ब्रिटिश साम्राज्याच्या स्वयंशासित ट्रान्सव्हाल संस्थानचें पहिलें पार्लमेंट येथेंच भरलें. १९१० सालच्या दक्षिण आफ्रिकेच्या संघानंतर हें राजधानीचें शहर झालें.

**प्रिव्हीकौन्सिल व कॅबिनेट**—इंग्लंडमध्यें नॉर्मन राजांच्या अमदानींत प्रिव्हीकौन्सिलचें मूळ आढळून येतें. त्यावेळीं क्यूरिया रेजीस नांवाचें एक मंडळ राज्यकारभार चालविण्यासाठीं राजा नेमीत असे व या मंडळाच्या हातीं सल्ला, अंमलबजावणी व न्यायदान या तिन्ही प्रकारच्या सत्ता असत. पुढें थोड्याच काळानंतर वरील तिन्ही गोष्टी स्वतंत्र झाल्या. पहिल्या एडवर्डच्या कारकीर्दीत या मंडळाचें मुख्य काम राजाला सल्ला देणें व त्याचे हितसंबंध रक्षण करणें हें असे. कांहीं किरकोळ बाबतींत कायदे करण्याचाहि या मंडळाला अधिकार असे. चवथ्या हेनरीच्या वेळीं या मंडळांत ३ बिशप, ९ पीयर्स, व ७ कॉमन्स अशा १९ समासदांचा समावेश होत असे. राजाची सत्ता अंमलांत आणण्याचें काम जरी या मंडळाकडे असे तरी ज्यामानानें राजा कर्तृत्ववान अगर दुर्बल असेल त्यामानानें या मंडळाच्या ताब्यांत कमी अधिक सत्ता असे. ट्यूडर राजांच्या कारकीर्दीत या मंडळाला फार महत्व प्राप्त झालें. या मंडळाच्या मार्फत राजा आपले हक्क पार्लमेंटला न जुमानतां प्रस्थापित करीत असे. ट्यूडर राजांच्या कारकीर्दीत या मंडळाचे ४० समासद असल्यानें सगळ्यांचा सल्ला घेणें अशक्य व घोंटाळ्याचें होऊं लागल्यामुळें त्यांतील मुख्य सभासदांचाच सल्ला घेण्याची पद्धत पडली. या गोष्टीमध्येंच हल्लींच्या कॅबिनेटचें मूळ सांपडतें असें म्हणावयास हरकत नाहीं. पहिल्या जेम्स व चार्लस राजांच्या कारकीर्दीत हें मंडळ केवळ नामधारी झालें होतें. दुसऱ्या चार्लसच्या कारकीर्दीत या मंडळाची नवीन घटना करण्यांत आली व त्याच्या ताब्यांत थोडी फार सत्ता देण्यांत आली. पण पुढें चार्लसनेंहि या मंडळांतील मुख्य सभासदांचाच सल्ला घेण्याची पद्धत सुरू केली.

हल्लीं देखील प्रिव्हीकौन्सिलचें मुख्य काम कॅबिनेटच करतें. तथापि प्रिव्हीकौन्सिल हें अद्यापि कायम ठेवण्यांत आलें आहे. साम्राज्यांतील मोठमोठे नामांकित मुत्सद्दी व इतर मोठे पुरुष यांचीहि या मंडळांत राजा निवड करतो. उदा. ना. श्रीनिवासशास्त्री यांना प्रिव्हीकौन्सिलर करण्यांत आलें आहे. स्वयंसत्ताक वसाहतींचे प्रधान, इंग्लंडमधील प्रधानमंडळ, लॉर्ड्स ऑफ अपील, वगैरेंचा यांत आपोआप समावेश होतो. कांहीं वेळां दुय्यम प्रधानांना देखील प्रिव्हीकौन्सिलर म्हणून या मंडळांत घेण्यांत येतें. प्रत्येक प्रिव्हीकौन्सिलरला राईट ऑनरेबल हा किताब असतो. प्रिव्हीकौन्सिलर नेमण्याची पद्धत अगदीं साधी आहे. नवीन प्रिव्हीकौन्सिलरनें बैठकीच्या वेळीं शपथ घेतली कीं त्याचें नांव प्रिव्हीकौन्सिलर म्हणून दाखल करण्यांत येतें. हल्लीं या मंडळाचें कामकाज मुख्यतः निरनिराळ्या कमिटयांच्या मार्फत चालतें. नवीन राजाच्या राज्यरोहणप्रसंगीं अगर इतर महत्त्वाच्या प्रसंगीं मात्र मंडळाचे सर्व सभासद हजर असतात. हल्लीं प्रिव्हीकौन्सिलला न्यायदान व मुख्य कायद्यांच्या अंमलबजावणीचे पोटकायदे करणें असे दोन्ही अधिकार आहेत.

विल्यम दि थर्डच्या कारकीर्दीत कॅबिनेटपद्धति अस्तित्वांत आली. प्रिव्हीकौन्सिलपेक्षा कॅबिनेट हें सभासदांच्या संख्येच्या दृष्टीनें लहान पण अधिक सत्ताधारी असें मंडळ असतें. राजाचे सर्व अधिकार या मंडळाला असतात. ग्रेटब्रिटनचीं राजकीय सूत्रें या मंडळाच्या मार्फत हालविलीं जातात असें म्हणण्यास हरकत नाहीं. या मंडळाचें कामकाज गुप्तपणानें चालतें व तें कागदावर लिहून ठेवण्यांत येत नाहीं. कॅबिनेटमधील खलबताची सभासदाला स्वतंत्र रीतीनें वाच्यता करण्याची सक्त मनाई आहे. कॅबिनेटमध्यें जें ठरेल त्याबद्दल सर्व कॅबिनेटचे सभासद राजाला व पार्लमेंटला व्यक्तिशः व समुच्चयानें जबाबदार असतात. राजाच्या हुकूमानें मुख्य प्रधान हा जरूर पडेल तेव्हां कॅबिनेट भरवितो. कॅबिनेटच्या सभेला राजा कधींहि हजर नसतो. कॅबिनेटमध्यें जें ठरेल तें मुख्य प्रधान राजाच्या संमतीकरितां

राजापुढें मांडतो. प्रधानमंडळानें एखाद्या प्रसंगीं राजीनामा दिल्यास नवीन कॅबिनेट निर्माण करण्याला कोणत्याहि योग्य माणसाला हुकूम देण्याची पूर्ण सत्ता राजाला आहे. पण इतर वेळीं कॅबिनेट निवडण्याचें व त्यांच्या सभा भरविण्याचें काम मुख्य प्रधानाकडेच असतें. कॅबिनेट किती सभासदांचें असावें याला कांहींच नियम नाहीं. ग्लॅडस्टनच्या प्रधानकीच्या कारकीर्दींत हें कॅबिनेट १५ सभासदांचें होतें; तर बॅनरमनच्या प्रधानकीच्या अमदानींत हें १९ सभासदांचें होतें. महायुद्धाच्या अमदानींत लाईड जॉर्जनें या सभासदांची संख्या पांचावरच आणली होती.

**प्रीस्टले, जोसेफ** (१७३३–१८०४)—हा इंग्रज रसायनशास्त्रज्ञ फील्डहेड ( यॉर्कशायर, इंग्लंड ) येथें स. १७३३ मध्यें जन्मला. भिंगाच्या योगानें हिंगूळ उष्ण करून प्राणवायु यानें प्रथम तयार केला व त्यामुळेंच प्रीस्टलेचें नांव प्रसिद्ध आहे. हा वायु आणि हवेंतील ज्वलनक्रियेस मदत करणारा वायु हे एकच आहेत असें त्यानें ठरविलें.तसेंच श्वासोच्छ्वास क्रिया व ज्वलनक्रिया या एकच आहेत व उच्छ्वासानें खराब झालेली हवा वनस्पती शुद्ध करतात हा निर्णय त्यानें काढला. याशिवाय त्यानें अमोनिया, उज्जहराम्ल वायु व गंधकद्विप्राणिद इत्यादि वायूहि तयार केले होते. हा अनेक विद्याव्यासंगी होता व प्रयोग करण्याकरितां सोइस्कर उपकरणांचा तो उपयोग करीत असे. परंतु त्याची प्रयोग करण्याची पद्धत शिस्तवार नव्हती. तो पुराणमतवादी असल्यामुळें ज्वलनतत्त्वकल्पना त्याच्यानें सोडवली नाहीं.

**प्रूढाँ, पेरी जोसेफ** ( १८०९–१८६५ ) एक फ्रेंच समाजसत्तावादी व राजकीय लेखक. याला कॉलेजचें शिक्षण मिळालें होतें. १९ व्या वर्षी त्यानें कंपॉझिटरची नोकरी धरली. धार्मिक विषयावरील पुस्तकांचीं प्रुफें तपासण्याचें काम करून त्यानें ईश्वरविज्ञानशास्त्राचें ( थिऑलजी ) उत्तम ज्ञान मिळविलें. याच नोकरींत असतांना तो हिब्रू भाषा शिकला. लोकसत्ताक राज्यपद्धतीचा पुरस्कार करणाऱ्या बऱ्याचशा वृत्तपत्रांचा तो मुख्य चालक बनला.त्यांत अर्थ व समाजशास्त्रविषयक अत्यंत जहाल मतें अत्यंत कडक भाषेंत प्रसिद्ध होत असत. त्याच्याबद्दल त्याला पॅरिस येथें तीन वर्षे कैदेची शिक्षा झाली.

अर्थशास्त्रीय तत्त्वविवेचनांत नैतिक तत्त्वें गोवून देण्याचा त्याचा उद्देश स्पष्ट दिसून येतो. या मूलभूत नैतिक तत्त्वांपैकीं न्याय, स्वातंत्र्य व समता हीं प्रमुख होत. उदाहरणार्थ, समतेसंबंधानें ध्येयरूप म्हणून त्यानें सुचविलेल्या समाजव्यवस्थेंत सगळ्या माणसांना कामाचा मोबदला (पगार) सारखा मिळावा असें त्याचें म्हणणें होतें; कारण त्यानें तत्त्व हें होतें कीं, कामाचा मोबदला कामानेंच मिळत असतो ( सर्व्हिस पेज सर्व्हिस ), एकाचे एका दिवसाचे श्रम हे दुसऱ्याच्या एका दिवसाच्या श्रमाच्याबरोबर होत किंवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे श्रमाचा कालावधि हेंच किंमत ठरविण्याचें योग्य माप उर्फ साधन होय. या सिद्धांताचे परिणाम मान्य करण्यास तो कचरत नसे, म्हणजे अगदीं हलक्या कारागिराला व फिडियाससारख्या विद्वानाला दोघांनाहि पगार सारखाच मिळावा असें तो म्हणे; पण त्याबरोबर त्याला अशी आशा होती कीं, भविष्यकाळात मानवजातीची इतकी उन्नति होईल कीं, निरनिराळ्या माणसांच्या कर्तृत्वांत व बुद्धिमत्तेंत आजकाल आढळणारा विलक्षण फरक पुढें अगदीं इतक्या कमी प्रमाणांत येईल कीं, तो लक्षातहि येणार नाहीं. स्वातंत्र्य, समता व न्याय या तीन तत्त्वांवर उभारलेलें असें समाजाचें शास्त्र अस्तित्वांत आणण्याचा प्रूढाँचा हेतु होता. या मतांच्या जोडीला त्याचें अराजकते-( अनार्की )संबंधींचें एक विलक्षण मत होतें; तें असें कीं, मानवजातीची नैतिक उन्नति पूर्णपणें झाली म्हणजे सरकार ही संस्था अनवश्यक होईल. "एका माणसानें दुसऱ्या माणसावर राज्य करणें–मग त्या राज्यकारभाराची पद्धति एकसत्ताक, अल्पसत्ताक, बहुसत्ताक, कामगारसत्ताक वगैरे कोणतीहि असो—हा केवळ जुलूम होय. समाजाची अत्यंत उच्च उन्नतावस्था म्हणजे तींत सुव्यवस्था व अराजकता हीं एकत्र नांदलीं पाहिजेत." अराजकता हा शब्द प्रूढाँनें प्रथम वापरला खरा, पण आपण हल्लीं समजतों तसा वाईट अर्थ त्याच्या मनांत नव्हता; अराजक स्थिति म्हणजेच मनुष्य समाजाची सर्वांत उन्नतावस्था होय, असें त्याचें म्हणणें होतें.

प्रॉपर्टी हा ओबिनच्या हक्कासारखा हक्क आहे, हा प्रूढाँचा सिद्धान्त आणि मार्क्स व इतर नंतरचे समाजसत्तावादी यांचा भांडवलासंबंधींचा सिद्धांत हे अर्थतः एकच होत. तथापि मार्क्स हा प्रूढाँ व त्याचे अनुयायी यांचा तिरस्कार करीत असे व त्यांच्यावर टीकेचा भडिमार करीत असे. प्रॉपर्टी व भांडवल हीं गरीब कामगारवर्गाला अडविण्याची, व पूर्ण मोबदला न देतां त्यांच्या श्रमाच्या फायद्यावर हक्क प्रस्थापित करण्याचीं साधनें आहेत असेंच प्रूढाँचें म्हणणें होतें. हेंच तत्त्व प्रूढाँनें आपल्या "प्रॉपर्टी म्हणजे सर्व चोरीचा माल होय" या विपरीत दिसणाऱ्या वाक्यांत पुढें मांडलें आहे.ज्याप्रमाणें गुलामगिरी म्हणजे खून होय, कारण गुलामगिरी ही मनुष्यव्यक्तीला उपयुक्त व सुखावह अशी कोणतीहि गोष्ट त्याला मिळूं देत नाहीं; त्याप्रमाणें प्रॉपर्टी हीहि चोरी होय, कारण या प्रॉपर्टीमुळेंच मजुरांना श्रमाचा पूर्ण मोबदला दिल्याशिवाय त्यांच्या श्रमांचा फायदा मालकांना उपटण्यास सांपडतो. अशा या प्रॉपर्टीविषयक हक्काऐवजीं सर्व व्यक्तींना फक्त ताबा किंवा कबजा घेण्याचा हक्क असावा व हा हक्क सर्व व्यक्तींना सारखा असावा, अशी प्रूढाँची योजना होती.

**प्रेत व प्रेतसंस्कार**—मरणासंबंधींच्या कल्पना निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या प्रकारच्या आढळून येतात. परमेश्वराचा मनुष्यजातीला मरणाचा शाप असल्यानें

मनुष्याला मरण येतें अशी कांहीं राष्ट्रांतल्या लोकांची कल्पना आहे, तर कांहीं अभिचार अगर अतिमानुष अगर दैवी शक्तीच्या प्रभावानें मनुष्याला मरण येतें असें मानतात मरणासंबंधींच्या मतवैचित्र्याप्रमाणेंच, संस्कारामध्येंहि वैचित्र्य आढळून येतें. उदाहरणार्थ, मनुष्य मेला म्हणजे घराच्या खिडक्या व दारें सताड उघडीं टाकण्याची चाल ब्रिटन व साऱ्या यूरोपभर सामान्यतः आढळून येते. चीनमध्यें घराच्या वरच्या कवलारूमध्यें भोंक पाडण्याची चाल आहे याचें कारण मनुष्य मेल्यावर त्याच्या आत्म्याला बाहेर जाण्याला वाट मिळावी हें होय. तसेंच मनुष्य मेल्यावर घरांतील घड्याळें बंद ठेवण्याची,व आरसे व इतर चैनीच्या वस्तू कापडानें झांकून ठेवण्याची,पाण्याचीं भांडीं रिकामीं करण्याची चाल यूरोपमध्यें प्रायः सर्वत्र आढळून येते. हिंदु लोकांत मनुष्य मेला असेल त्या जागीं (दहा दिवस) एका भांड्यांत पाणी व दररोज भाताचा घांस ठेवण्यांत येतो; व त्या जागेच्या वरच्या बाजूला (कोठें कोठें) एक दोरी बांधून ती खालपर्यंत सोडलेली असते. हेतु हा कीं त्या दोरीवरून मृतात्म्याला खालीं येऊन अन्नपाणी घेतां यावें. यूरोपमध्यें, प्रेतक्रिया करून आल्यानंतर मरणाची वार्ता मधमाश्यांना कथन करण्याची चाल आढळते. दयक जातीमध्यें एखादा मनुष्य मेल्यास कुटुंबाचा मुख्य हा, प्रेत जाळण्यासाठीं अगर पुरण्यासाठीं उचलण्यांत आल्यावर, आपल्या कुटुंबांतील सर्व मंडळींना एकत्र जमवितो. याचें कारण, मृत मनुष्यानें आपल्या कुटुंबियांपैकीं एखाद्यावर मोहजाल पसरून त्यालाहि मरण आणूं नये हें होय. केरेमिस लोकांत तर मृत मनुष्य आपल्याबरोबर इतरांनाहि मृत्यूकडे नेईल या भीतीनें मृताची स्मशानयात्रा देखील न पाहण्याची चाल आहे. मनुष्य मेल्यानंतर अगर थोडक्यांत मरणार अशीं चिन्हें दिसूं लागतांच आक्रोश करण्याची चाल सर्वत्र आढळते. यांत मृताचे इतर आप्तेष्ट व शेजारीहि सामील होतात. गुजराथी लोकांत तर रडण्यासाठीं भाड्यानें बाया आणण्याची चाल आढळून येते. अशाच प्रकारची चाल आशियामायनरमध्येंहि आढळते. मोठमोठ्यानें आक्रोश करण्यामुळें मृताच्या आसपास दुष्ट भुतेंखेतें येऊं शकत नाहींत अशी अँगोला येथील लोकांची विचित्र समजूत आहे. मृताचें, दुष्ट भुताखेतांपासून रक्षण व्हावें एतदर्थ मृताच्या जवळ दिवा ठेवण्याची चालहि कांहीं जातींत आढळून येते.

मनुष्य वारल्यानंतर त्याची उत्तरक्रिया करण्यापूर्वी, कांहीं संस्कार करण्यांत येतात. त्यांपैकीं एक प्रमुख संस्कार म्हणजे, प्रेताला स्नान घालून त्याचें शरीर शुद्ध करणें हा होय. हिंदुलोकांत ही चाल दृष्टोत्पत्तीस पडते. याकुत लोकांत मरणाच्यापूर्वींच स्नान घालण्याची वहिवाट आहे. अगदीं खालच्या अडाणी जातींत मरणोत्तर प्रेताचें शरीर रंगविण्यांत येतें. आणि कांहीं लोकांमध्यें नवीन कपडे विकत आणून प्रेताला सजविण्याचीहि चाल आहे. चिनी व यूरोपीय लोकांत मरणोत्तर प्रेताला घालण्याचे कपडे अगोदरच तयार करून ठेवण्याची पद्धत आहे. जर्मनींतील कांहीं भागांत, लग्नसमयींच्या कपड्यांनींच प्रेताला सजविण्याची चाल आहे. क्वचित दागदागिनेहि प्रेतावर घालण्यांत येतात. इतका विधि झाल्यानंतर प्रेताला जाळण्याकरतां अगर पुरण्याकरतां नेण्यांत येतें; प्रेत जाळणें अगर पुरणें अशा दोन्हीहि पद्धती अस्तित्वात आहेत. हिंदूमध्यें प्रेत जाळण्याची वहिवाट आहे. अगदीं लहान मुलें, संन्याशी इत्यादिकांना मात्र जाळण्याच्या ऐवजीं पुरण्यांत येतें. कांहीं लोकांमध्यें प्रेताची कायमची व्यवस्था लावण्यापूर्वी, कांहीं दिवस तें तात्पुरतें पुरण्यांत येतें. प्रेत वाळवून त्यांत, तें कुजूं नये म्हणून मसाला घालून प्रेत राखून ठेवण्याची चाल ईजिप्त इत्यादि देशांत आढळून येते. अगदीं प्राचीन काळीं रानटी लोकांत माणसें प्रेताचें भक्षण करीत होतीं असें कांहींचें मत आहे.कांहीं जातींत प्रेत गांवाबाहेर तसेंच टाकून देण्याची चाल असे. उदाहरणार्थ प्राचीन चीनमध्यें व सिलोनमधील वेड्डा जातींत, जंगलामध्यें प्रेत पर्णपुष्पादिकांनीं आच्छादून ठेवण्याची चाल असे. ऑस्ट्रेलियामध्यें प्रेताची व्यवस्था लावण्याचे विविध प्रकार आढळतात. पारशांमध्यें प्रेताला गिधाडाकडून खावविण्याचा प्रघात आहे. प्राचीन ईजिप्तमध्यें तळघरें खणून तेथें प्रेत ठेवून त्यावर मोठमोठीं थडगीं बांधण्याची चाल होती. तसेंच प्रेताला जलसमाधि देण्याची पद्धतहि कांहीं जातींत आढळते. उदाहरणार्थ तिबेटमध्यें गरोदर बायांना अगर वांझ बायांना मरणोत्तर पाण्यामध्यें फेंकून देण्याची रूढि होती. पंजाबमधील भागरपंथी लोकांत हीच चाल आढळते. चीन, जपान, इत्यादि देशांत मृतांना पुरण्याची जागा ज्योतिष्याकडून निश्चित करून घेण्याची पद्धति असे. कांहीं कांहीं जातींत प्रत्येक घराण्याची त्यांतील मृत माणसांना पुरण्याची स्वतंत्र जागा असे. पॅलेस्टाईन वगैरे ठिकाणीं अद्यापिहि ती पद्धत प्रचारांत आहे. प्रेताचे दहन करून त्याचीं हाडें एका पात्रांत घालून तीं पुरून ठेवण्याची चालहि कांहीं जातींत आढळून येते. प्रेतांना एका लांकडी पेटींत घालून टेवून देण्याची चालहि कांहीं जुन्या जातींत दिसून येते.

प्रेतसंस्कार करण्याचा प्रधान उद्देश म्हणजे मृतांना पारलौकिक सुख प्राप्त करून देणें व मृताच्या पश्चात त्याच्या आप्तांना मृताच्या आशौचापासून मुक्त करणें हा होय. हे विधी केल्याशिवाय मृताला शांति मिळत नाहीं, अशी समजूत सर्व लोकांत आढळून येते. लहान मुलाच्या बाबतींत मात्र प्रेतसंस्कार न करण्याची वहिवाट आहे. तसेंच कांहीं राष्ट्रांत गुलामांच्या बाबतींत प्रेतविषयक संस्कार करण्याची चाल नाहीं. आफ्रिकेंत बाळंतपणांत वारलेल्या स्त्रीच्या बाबतींत प्रेतविषयक विधी करण्यांत येत नाहींत.

मृताच्या शवाबरोबर त्याला लागणारे खाद्यपेयादि पदार्थ व त्याला आवडणाऱ्या वस्तूहि पुरण्याची अगर जाळण्याची

वहिवाट पुष्कळ जातींत आढळून येते. तसेंच मृताच्या बायकोला आप्तेष्टांनां, व त्याच्यावर उपजीविका करणाऱ्या लोकांनां मृताबरोबर पुरण्याची अगर जाळण्याची चाल प्राचीन काळीं चीन, जपान इत्यादि राष्ट्रांत होती. हिंदुस्थानांत ब्रिटिश अमलापूर्वी, सतीची चाल अस्तित्वांत होती. अद्यापिहि नेपाळमध्यें ती आढळून येते. तसेंच प्राचीन काळीं मृताबरोबर मृताची मालमत्ताहि पुरण्यांत अगर जाळण्यांत येत असे. एवढेंच नव्हे तर मृताबरोबर त्याच्या मालकीच्या जनावरांचीहि विल्हेवाट लावण्यांत येई.

प्रेताची उत्तरक्रिया झाल्यावर प्रेताच्या आप्तेष्टांनां स्वतःच्या शुध्यर्थ संस्कार करावे लागतात. प्रेतयात्रेबरोबर जाणाऱ्या लोकांनां स्नान करावें लागतें. हिंदुधर्मीय लोकांमध्यें प्रेताच्या जवळच्या नातलगांना दहा दिवसपर्यंत व दूरच्यांनां तीन दिवसपर्यंत सुतक पाळावें लागतें. इतर लोकांत ही चाल प्रायः आढळून येत नाहीं. प्रेताच्या समोर मेजवानी करून त्यात सर्व आप्तेष्टांनीं भाग घेण्याची विचित्र चाल कांहीं जातींत आढळते. हिंदूमध्येंहि सुतकाचे दिवस संपल्यानंतर गोड तोंड करण्याची पद्धत आहे. यूरोपमध्येंहि प्रेतोत्तर भोजनाची चाल आहे. याच्या मुळाशीं मृतात्मा हा भोजनांत भाग घेतो ही कल्पना असावी असें वाटतें. या भोजनाच्या वेळीं ठराविक पदार्थच करण्यांत येतात. कांहीं जातींत प्रेताची व्यवस्था लावल्यानंतर खेळ खेळण्यात येतात, व ठराविक प्रकारचे नाच नाचण्यांत येतात असें आढळून येतें.

ज्या लोकांत प्रेत पुरण्याची चाल आहे. अशा लोकांपैकीं पुष्कळ लोकांत कांहीं काळानंतर प्रेताचीं हाडें काढून तीं धुवून पुन्हां पुरण्याची चाल आढळून येते. हिंदुधर्मीयांच्या प्रेतसंस्काराविषयीची संपूर्ण माहिती 'श्राद्ध' या लेखांत पहा.

**प्रेम**—प्रेमाचें उगमस्थान मुख्यतः शारीरिक आहे. स्त्रीपुरुषजननेंद्रियसंयोग हें त्याचें बाह्य व प्रत्यक्ष स्वरूप होय. स्त्रीच्या व पुरुषाच्या शरीरांतील वीर्यजंतूंमध्यें परस्पराकर्षण व संयोग घडून येण्याची ही जी क्रिया ती प्रेमाचें भौतिक स्वरूप असून ही क्रिया सर्व जीवांमध्यें आढळून येते. या मूलभूत कल्पनेपासून पुढें प्रेमासंबंधींच्या इतर कल्पना मागाहून उद्भूत झालेल्या आढळतात. या दृष्टीनें प्रेमाचे दोन भाग पडतात. ( १ ) संयोगजन्य प्रेम व ( २ ) दूरान्वित प्रेम. खालच्या जीवसृष्टींमध्यें व मनुष्यसृष्टीमध्यें संयोगजन्यप्रेमाचें स्वरूप सारखेंच असतें. पण खालच्या जीवसृष्टीमध्यें दुसऱ्या प्रकारचें प्रेम दिसत नसून तें केवळ मनुष्यसृष्टींतच दृग्गोचर होत असतें. ज्याप्रमाणें खालच्या सृष्टींत व मनुष्य सृष्टींत मेंदु हा मुख्यतः भेददर्शक आहे, त्याचप्रमाणें खालच्या जीवसृष्टींतील व मनुष्यसृष्टींतील प्रेमाच्या स्वरूपामध्यें जें भिन्नत्व दृष्टीस पडतें त्याचें कारणहि मनुष्याचा मेंदु हा होय. मनुष्याचा मेंदु हा हल्लीं ज्या आकाराचा दिसतो तो आकार एकदम झालेला नसून तो त्याच्या पूर्वीच्या लहान आकारापासून पुढें मोठा होत आला आहे व अद्यापिहि तो मोठा होत जाईल असें शास्त्रज्ञांचें मत आहे. या मेंदूच्या वाढीमुळें शरीराच्या इतर अवयवांमध्यें कमी अधिक असे फरक झालेले आहेत. स्त्रीपुरुषव्यवहाराच्या बाबतींतील कल्पनांमध्येंहि या मेंदूमुळें अनेक परिणाम घडून आलेले आहेत. अगदीं प्राथमिक अवस्थांमध्यें, मनुष्याची प्रेमाची कल्पना इतर जीवसृष्टींतील जीवांच्या प्रेमकल्पनेप्रमाणेंच शारीरिक होती. पण मनुष्याच्या मेंदूची ज्या मानानें अधिक वाढ होत गेली त्या मानानें त्याच्या प्रेमविषयक शुद्ध भौतिक कल्पनेमध्यें फरक पडत चालला या वाढीबरोबरच मनुष्यजातीची अधिक सुधारणा होत गेल्यानें प्रेमाच्या या भौतिक कल्पनेमध्येंहि फरक घडून आला आहे. शारीरिक दृष्ट्या पाहिलें असतां असें आढळून येतें कीं, खालच्या जीवसृष्टींतील व अगदीं प्राथमिक अवस्थेंतील मानवजातींतील स्त्रियांमध्यें संभोगेच्छा कांहीं विशिष्ट काळींच उत्पन्न होते. पण मनुष्याच्या मेंदूच्या वाढीबरोबर ही विशिष्ट काळीं होणारी संभोगेच्छा नित्य संभोगेच्छेंत परिणत झाली असें दिसून येतें. हा खालच्या जीवसृष्टीमध्यें, प्राथमिक अवस्थेंतील मनुष्यामध्यें आणि सुसंस्कृत मनुष्यांमध्यें प्रेमविषयक कल्पनेंत मोठा फरक होय असें शास्त्रज्ञांनीं म्हटलें आहे. याला कारण म्हणजे प्रेमाच्या भौतिक कल्पनेंत मानसिक तत्त्वाचा प्रथम प्रवेश हें होय. हें मानसिक अगर उच्च तत्त्व ज्यावेळीं या प्रेमाच्या भौतिक कल्पनेशीं संबद्ध झालें त्यावेळीं, कालिक संभोगेच्छेचें नित्यसंभोगेच्छेंत रूपांतर झालें असें कँटनें म्हटलें आहे. या उच्च कल्पनेच्या भौतिक कल्पनेशीं झालेल्या मिलाफामुळें इतर बाबतींतहि बरेच महत्त्वाचे परिणाम घडून आले. उदाहरणार्थ प्राथमिक मनुष्यामध्यें व खालच्या जीवसृष्टींत संभोगाच्या बाबतींत घ्राणेंद्रियाची फार मदत होत असे. या घ्राणेंद्रियानें जननेंद्रियाचा प्रदेश हुंगण्याची, आणि स्तन हुंगण्याची क्रिया खालच्या जीवसृष्टीमध्यें व प्राथमिक अवस्थेंतील माणसामध्यें दिसून येत होती पण मेंदूच्या वाढीमुळें व मानसिक अगर उच्च कल्पनेच्या संबंधामुळें, घ्राणेंद्रियाचें फारसें महत्त्व न राहतां, दृष्टि, स्पर्श, इत्यादिकांनां महत्व येत चाललें. उदाहरणार्थ, खालच्या जीवसृष्टींत व प्राथमिक मनुष्यामध्यें अधर अगर शरीराच्या इतर भागांच्या स्पर्शाची कल्पना आढळून येत नाहीं; हुंगण्याची कल्पनामात्र दिसून येते. पण पुढील मनुष्यजातीमध्यें ही स्पर्शाची कल्पना पूर्णपणें अस्तित्वांत असलेली आढळून येते. चुंबन अगर कपोलस्पर्श इत्यादि प्रेमोद्दीपक प्रकार बरेच अलीकडील होत असें शास्त्रज्ञांचें मत आहे. स्पर्शाप्रमाणेंच दृगिंद्रियाचेंहि महत्त्व बरेंच वाढलें. दृष्टिपात हा प्रेमाचा संदेशवाहक होय अशी कल्पना उद्भूत झाली. दृगिंद्रियानें प्रेमवस्तूचें सौंदर्य, आकार, रंग इत्यादि माहीत होतात. सहानुभूति व आकर्षण परस्परांमध्यें घडून येतें व प्रेमवस्तूची निवड करण्याच्या बाबतींत या दृष्टीचें फार महत्त्व

असतें. त्यामुळें नेत्रेंद्रियाचें महत्त्व हळू हळू अधिक होत चाललें. नेत्रेंद्रियाप्रमाणेंच कर्णेंद्रियासहि महत्त्व येत चाललें. मंजुळ आवाज हा प्रेमोत्पादक आहे अशी समजूत होत चालली. गायन हें प्रेमोद्दीपक आहे अशी जी कल्पना आज प्रचलित असलेली आढळून येतें तिचें मूळ या कल्पनेत आहे.

तात्पर्य मेंदूच्या वाढीबरोबर प्रेमाची भौतिक कल्पना मागें पडली. प्रेम म्हणजे स्त्रीपुरुषजननेंद्रियसंयोग या कल्पनेबद्दल प्रेम हा एक मनोविकार आहे ही उच्च कल्पना अस्तित्वात आली. सुख, दुःख, इच्छा, बुद्धि इत्यादि मानसिक गुणांचें प्राधान्य स्थापित झालें व प्रेमविषयक कल्पनेमध्यें क्रांति घडून आली.

पण प्रेमाची भौतिक कल्पना जरी कमी महत्वाची मानण्यांत येऊं लागली तरी या भौतिक कल्पनेचा मानसिक कल्पनेशीं अत्यंत निकट संबंध आहे असें आढळून येतें. कामविकार हा सर्व मनोविकाराचा उत्पादक होय अशी कल्पना कित्येक विचारी लोकांनीं प्रतिपादन केलेली आढळते. प्लेटोनें तर विचार म्हणजे उच्च प्रकारची शारीरिक चेतना असें म्हटलें आहे. प्रेम म्हणजे इच्छाशक्तीचें केंद्रस्थान अशी शोपेनहॉरनें व्याख्या केली आहे.

अशा रीतीनें प्रेमाच्या भौतिक व मानसिक स्वरूपांतील निकट संबंधामुळें, तसेंच प्रेमाच्या कक्षेंत सर्व प्रकारचे मनोविकार अंतर्भूत होऊं लागल्यामुळें प्रेम म्हणजे एक स्वतंत्र व प्रबल अशी शक्ति होय अशी प्रेमविषयक कल्पना रूढ होत चालली.

अशा रीतीनें प्रेम ही स्वतंत्र शक्ति मानण्यांत येऊं लागली व त्यासंबंधीं शास्त्रीय रीतीनें विचार करण्यास सुरवात झाली. प्रेमाचा व नीतीचा संबंध काय, प्रेमाचा व धर्माचा संबंध कितपत येऊं शकेल यासंबंधीं विद्वानांनीं आपलीं मतें प्रतिपादन करण्यास सुरवात केली. प्रेमाचा व सौंदर्याचा निकटवर्ती संबंध आहे ही कल्पना बऱ्याच प्राचीन काळापासून अस्तित्वांत असलेली आढळते. प्लेटोची प्रेमाची कल्पना शारीरिक सौंदर्यावरच अधिष्ठित झालेली आढळते. मध्ययुगामध्यें, शिलेदारीच्या काळांत प्रेम ही अतिशय उच्च व पवित्र भावना आहे असें मानण्यांत येऊं लागलें. अर्वाचीन काळातहि शारीरिक सौंदर्य हा प्रेमामधील महत्त्वाचा भाग मानण्यांत येतो.

अगदीं प्राचीन काळीं ज्यावेळीं प्रेम म्हणजे स्त्रीपुरुषसंभोग एवढीच कल्पना होती, त्यावेळीं स्त्रीपुरुष संबंध हा अनियमित असे. ज्या कोणा स्त्रीवर ज्या कोणा पुरुषाचें प्रेम जडे तो पुरुष त्या बाईशीं संभोग करून आपली वासना तृप्त करून घेई. पण अशा बेशिस्त प्रेमाला विवाहसंस्थेनें आळा घालण्याचा प्रयत्न केला. विवाहसंस्थेनें स्त्री व पुरुष यांच्या प्रेमाला शिस्तीचें स्वरूप दिलें. पण विवाहानें जरी अशा रीतीनें निर्बंध घातले तरी बेशिस्त प्रेमाचा मार्ग त्यामुळें अजीबात बंद झाला नाहीं; व आज सुधारलेल्या राष्ट्रांतहि अशा प्रकारचीं नियमबाह्य प्रेमाचीं उदाहरणें हवीं तितकीं दाखवून देतां येतील. याचें एक मुख्य कारण म्हणजे विवाहसंस्थेनें प्रेमावर कृत्रिम दडपणें घालण्याचा प्रयत्न केला हें होय. उदाहरणार्थ, एखाद्या पुरुषाचा विवाह एखाद्या स्त्रीशीं व्हावयाचा तर त्यावेळीं प्रेमाला लागणाऱ्या आवश्यक वस्तू दोघांच्यामध्यें कितपत आहेत हें पहाण्याऐवजीं, या विवाहापासून इतर दृष्टीनें कोणते फायदे होऊं शकतील याच्यावरच अधिक दृष्टि ठेवण्यांत येऊं लागली. प्रेमापेक्षां उपयुक्ततेवरच अशा रीतीनें अधिक भर देण्यांत येऊं लागल्यामुळें, प्रेमाची गति वक्र मार्गानें सुरू झाली. याचा परिणाम असा झाली कीं एकाच पुरुषानें प्रेमासाठीं म्हणजे आपली कामवासना सुखानें तृप्त करण्यासाठीं बिन लग्नाची अशी उपपत्नी ठेवण्यास सुरवात केली. अर्वाचीन काळांत या दोन्हीं अंगांचा एका ठिकाणीं मिलाफ करण्याचे प्रयत्न चालले आहेत विवाहित स्त्रीनें आपलें शारीरिक सौंदर्य वाढविण्याचा प्रयत्न केल्यास सौंदर्य व उपयुक्तता या दोन्हीं अंगांचा एका ठिकाणीं मिलाफ होईल व त्यामुळें स्त्रीपुरुषसंबंधाला शिस्त लागेल अशी कल्पना अर्वाचीन काळांत प्रसृत होत चालला आहे. प्रत्येक स्त्रीपुरुषाला प्रेमस्वातंत्र्य असलें पाहिजे हें तत्त्व १९ व्या शतकात उदयास येऊं लागलें. प्रेमस्वातंत्र्य याचा अर्थ बेशिस्त प्रेम असा मात्र नव्हे हें या ठिकाणीं ध्यानांत ठेवलें पाहिजे. प्रेमस्वातंत्र्यानें प्रेमाला दार्ढ्य येतें, प्रेमाला चिरकालित्व येतें, प्रेमावर कृत्रिम दडपणें अगर निर्बंध घातल्यानें समाजाची नीतिमत्ता बिघडते अशा प्रकारच्या कल्पना १९ व्या शतकांत निर्माण झाल्या व त्या अद्यापिहि अस्तित्वांत आहेत. तात्पर्य, प्रेम व विवाह यांचें परस्परैक्य घडवून आणण्याचा प्रयत्न अर्वाचीन काळांत चालला आहे असें म्हणता येईल.

प्रेमाची उत्पत्ति व स्त्रीपुरुषविषयक प्रेमसंबंध या दोन मुद्यांचें आतांपर्यंत विवेचन केलें पण स्त्रीपुरुषविषयक प्रेम एवढ्यावरच प्रेमाची मर्यादा थांबूं शकत नाहीं. प्रेम हा ज्याप्रमाणें, शारीरिक त्याप्रमाणेंच मनाचा व्यापार आहे. ती एक प्रकारची भावना आहे. प्रेम हें स्त्रीवरच जडेल आणि पुरुषावर जडावयाचें नाहीं असें म्हणतां यावयाचें नाहीं. दोन पुरुषांमध्यें परस्पराविषयीं प्रेम उत्पन्न होणें अगदीं स्वाभाविक आहे. उदाहरणार्थ, बापाचें आपल्या मुलावर प्रेम असूं शकेल, त्याचप्रमाणें एखाद्याचें आपल्या स्नेह्यावरहि असूं शकेल. पहिल्या बाबतींतील प्रेमाला वात्सल्य व दुसऱ्या प्रकारच्या प्रेमाला स्नेह हें नांव देण्यात येतें. पण दोन्हींहि प्रेमाचेच प्रकार आहेत. मातेच्या अपत्यावरील प्रेमाला वात्सल्य हें नांव देण्यांत येतें. एखाद्या व्यक्तीचें अखिल मानवजातीवर प्रेम असेल तर त्याला भूतदया म्हणण्यांत येईल पण हीं झालीं तरी प्रेमाचींच विशिष्ट स्वरूपें आहेत. तात्पर्य, प्रेम हें स्त्रीपुरुषांमध्येंच असतें असें नसून तें समान

जातीयांमध्येंहि असतें असें आढळतें. याहिपेक्षां पुढें जाऊन असें म्हणतां येतें कीं, दोन समानजातीयांमध्यें देखील शारीरिक संबंध जडूं शकतो. समानजातीय व्यक्तींमधील संभोगसंबंध प्राचीन समाजांतच नव्हे तर अर्वाचीन काळांतहि दिसून येतो, व तो सर्व देशांत कमी अधिक प्रमाणांत आढळून येतो.

प्रेमाचे वात्सल्य, स्नेह, भूतदया, इत्यादि ज्याप्रमाणें भेद पडतात त्याचप्रमाणें त्याचे सात्विक, राजस व तामस असे गुणभेदहि पाडण्यांत आले आहेत. सात्त्विक प्रेम शील, सत्त्व, व पावित्र्य यांच्या पायावर उभारलेलें असतें. राजस प्रेम सहेतुक पण विवेकशील असतें. तामस प्रेम हें अगदीं हलक्या प्रकारचें असतें. प्रेमाचा उदय कसा होतो यासंबंधीं थोडेंसें सांगणें जरूरीचें आहे. विशिष्ट कारणानेंच प्रेमाचा उदय होतो असें नक्की सांगतां यावयाचें नाहीं. कधीं कधीं प्रथमदर्शनानेंच प्रेमाचा उदय मनामध्यें उत्पन्न होतो. तथापि साधारणतः सौंदर्य, सहवास, स्वभावपरिचय यांमुळें प्रेमाचा प्रादुर्भाव होतो असें म्हणतां येईल. खरें प्रेम हें अनुभवगम्य असतें. त्याला रावरंक, कुरूप-सुरूप इत्यादि कृत्रिम भेद दिसत नाहींत.

प्रेमाचीं लक्षणें कोणतीं आहेत याचा विचार करूं लागल्यास असें आढळून येईल कीं प्रेमाच्या मुख्य लक्षणांमध्यें, प्रेमवस्तूंबद्दलचा निर्हेतुक आनंद हें प्रमुख लक्षण होय. प्रेमवस्तूंबद्दलचा निर्हेतुक आनंद म्हणजे त्या वस्तूच्या स्वत्वाबद्दल आदर दाखविणें हें होय. प्रेमवस्तूच्या सान्निध्यांत आनंद वाटणें हें ज्याप्रमाणें प्रेमाचें मुख्य लक्षण त्याचप्रमाणें प्रेमवस्तूच्या वियोगानें दुःख होणें हेंहि प्रेमाचें एक मुख्य लक्षण होय. वियोगदुःखामुळें प्रेमवस्तूंविषयीं अधिक उत्कंठा लागते व त्यामुळें प्रेम हें दृढतर बनत जातें. प्रेमवस्तूबद्दल आत्यंतिक श्रद्धा असणें हें प्रेमाचें तिसरें लक्षण होय.

स्वतःचा स्वतःवर जितका प्रबळ विश्वास असतो तितका प्रेमवस्तूविषयींहि जाज्वल्य विश्वास असला पाहिजे. इतका विश्वास असला म्हणजे प्रेमवस्तूविषयीं मनामध्यें ऐक्याची भावना निर्माण होते. प्रेमाचें ध्येय प्रेमवस्तूचें व आपलें ऐक्य होणें हें होय. तथापि हें ऐक्य होणें म्हणजे स्वतःचें स्वत्व अजीबात विसरून जाणें असें मात्र नव्हे; नीतिशास्त्राच्या दृष्टीनें विचार केला तर मनुष्याच्या मनामध्यें जोंपर्यंत अहंभावना जागृत आहे तोंपर्यंत दोन वस्तूंमध्यें तादात्म्य घडून येणें कधींहि शक्य नाहीं, तात्पर्य वरील विधानांचा संकुचित अर्थ केला पाहिजे. दोन हृदयांचें ऐक्य झालें म्हणजे दोन व्यक्तींमध्यें जरी भिन्नत्व राहिलें तरी तें भिन्नत्व प्रेमाला विघातक होत नाहीं असा त्याचा अर्थ होय. अशा प्रकारचें ऐक्य निर्माण झालें म्हणजे प्रत्येकाच्या मनांत एक प्रकारची क्रांति घडून येते. अखिल सृष्टीच्या बुडाशीं प्रेमाचीच कल्पना आढळून येते. प्रेमावरच मुळीं साऱ्या जगताचा डोलारा उभारला आहे. प्रेमाची भावना नष्ट झाल्यास सर्व जगाचा नाश होईल असें जें एका ग्रंथकारानें म्हटलें आहे तें अगदीं खरें आहे.

[ संदर्भग्रंथ— आय्. ब्लॉच.—दि सेक्शुअल लाईफ ऑफ अवर टाईम, हॅव्हलॉक एलिस—मॅन अँड वूमन, स्टडीज इन सायकॉलजी—ऑफ सेक्स; एडवर्ड कार्पेंटियर—लव्हज कमिंग—ऑफ—एज; मेरी स्टोपे—मॅरेज; एच्. टी. फिंक—रोमँटिक लव्ह अँड पर्सनल ब्यूटी; वेस्टमार्क—हिस्टरी ऑफ ह्यूमन मॅरेज; चार्लस अलबर्ट—फ्री लव्ह; इलेन की—लव्ह अँड मॅरेज; जॉर्ज हिर्थ—वेज टू लव्ह; डॉ. रॉडरिक हेलमन—सेक्शुअल फ्रीडम; राबर्ट मुलर—सेक्शुअल बायॉलजी. ]

**प्रेमपूर**—मुंबई, महिकांठामधील एक संस्थान.

**प्रेसबर्ग**—चेकोस्लोव्हाकिया. त्याच नांवाच्या प्रांताचें मुख्य शहर आहे. याची लोकसंख्या १९२१ सालीं ९३१८९ होती. यांपैकीं ⅓ जर्मन आहेत. हें शहर डॅन्यूब नदीच्या उजव्या तीरावर वसलेलें आहे. हें १५४१-१७८४ पर्यंत हंगेरी देशाची राजधानी होतें.व स. १८४८ पर्यंत हंगेरीच्या प्रतिनिधिसभेची जागा येथेंच असे. या शहरीं पुष्कळ शिक्षणसंस्था आहेत. हें स.१००० च्या सुमारास अस्तित्वांत आलें. स. १८०५ २६ डिसेंबर रोजीं येथें पहिल्या फ्रॅन्सीसचा नेपोलियनशीं तह झाला. आजचें नांव ब्रॅटिस्लाव्हा.

**प्रेस्टन**—हें इंग्लंड देशांतील लँकाशायर परगण्यांतील बंदर, आणि म्युनिसिपल काउंटी, व पार्लमेंटरी-बरो आहे. लोकसंख्या ( १९२१ ) ११७४२६. सार्वजनिक इमारतींपैकीं नगरभवन हें फार प्रेक्षणीय आहे. येथें एक मोफत ग्रंथालय व पदार्थसंग्रहालय आहे. ग्रंथालयांत डॉ. शेफर्डचा ग्रंथसंग्रह ठेविला आहे. याशिवाय शिक्षणसंस्था, रमणबागा, वगैरे आहेत. प्रेस्टन हें लँकाशायर परगण्यांतील कापडाच्या कारखान्यांचें मुख्य ठिकाण आहे. शिवाय येथें लोखंड व पितळ यांचें ओतीव कामाचे कारखाने, यंत्रशिल्पाचे कारखाने, कापडाचीं यंत्रें, व जहाजें बांधणें, वगैरे दुसरे उद्योगधंदे चालतात. येथील पार्लमेंटरी बरोतर्फे दोन प्रतिनिधींची निवड होते. प्रेस्टनच्या कार्पोरेशनमध्यें एक मेयर, १२ आल्डरमेन व ३६ सभासद असतात.

सिव्हिलवारच्या वेळीं प्रेस्टन राजपक्षास मिळालें.स.१६४८ त क्रॉमवेलनें राजपक्षीयांचा प्रेस्टन येथें मोड केला. १७१५ सालच्या बंडांत बंडवाल्यांनीं ह्या शहरांत आपलें ठाणें दिलें होतें. परंतु पुढें त्यांचा पराजय झाला. येथें रोमनकॅथॉलिक पंथाचे लोक बरेच आहेत.

**प्रोटॅगोरॅस**—हा तत्त्ववेत्ता ख्रि. पू. ४८० त जन्मला. यानें पुष्कळ काव्येंहि केलीं आहेत. हा सोफिस्ट नामक संप्रदायाचा पहिला पुरस्कर्ता होय. हा संप्रदाय ख्रि. पू. ५०० च्या सुमारास अस्तित्वांत आला. या पंथांतील लोक सर्वसाधारण नागरिकत्वाचें व उदार शिक्षण देणें हेंच आपलें अंगीकृत कार्य समजत असत, व तें करण्याकरितां ते अध्यापन करीत

असत. हे मुख्यतः संस्कृति, अलंकारशास्त्र, राजकारणशास्त्र व वादविवादपद्धति हे चार विषय शिकवीत असत. या शिक्षणानें सत्यशोधनाची पात्रता न येतां फक्त वादांतील यशप्राप्तीचा मार्ग समजे. याचीं मतें–" सत्य व ज्ञान " यांची प्राप्ति फार कठिण आहे म्हणून यानें " सद्गुण व नैपुण्य " हींच आपलीं ध्येयें ठरविलीं. विचारांचा उगम संवेदनांपासून होतो व नंतर ज्ञानप्राप्ति होते अतएव ज्ञान हें स्वतंत्र नसून परावलंबी आहे असें याचें मत आहे.

**प्रोद्दूर**—मद्रास. कडाप्पा जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ४७८ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें एक लक्ष. तालुक्यांतील खेड्यांची संख्या ८६ असून उत्पन्न २५,००० रु. आहे. जमीन उत्तम प्रकारची असल्यामुळें लोकवस्ती अतिशय दाट आहे. 'कडाप्पा दगड' इमारतीच्या कामाला पुष्कळ उपयोगांत आणतात. मुख्य पीक कापूस असून निळीवांचून दुसरे कारखाने नाहींत. मुख्य ठिकाण प्रोद्दूर असून त्याची लोकसंख्या चवदा हजार आहे.

**प्रोम,** जिल्हा.—खालचा ब्रह्मदेश. पेगु प्रांतांतील जिल्हा. क्षेत्रफळ २९१५ चौरस मैल. या जिल्ह्यामधून इरावती नदी वहाते. प्रोम जिल्ह्याच्या पूर्वेस थमीन या नांवाचे हरिण विपुल आहेत. हत्ती आणि गेंडे आराकान योमामध्यें आढळतात. पावसाचें मान ४८ इंचांपर्यंत असतें. प्रोमचें मूळचें नांव 'पे' आहे. दंतकथेवरून असें दिसतें कीं पै कुलांतला डुटबंग राजानें प्रोम शहर वसविलें. या जुन्या शहराच्या आसपास ५ मैलांपर्यंत दलदली जागेंत जुन्या पडक्या देवळांचे अवशेष नजरेस पडतात सन १५४२ त टंगु सैन्यानें प्रोम आव्हा आराकान यांच्या फौजेशीं लढून त्यांचा पराजय केला. प्रोम जिल्ह्यांत २ मोठीं भव्य बुद्धाचीं मंदिरें आहेत. श्वेसनडा येथील मंदीर ८० फूट उंच आहे. लोकसंख्या सुमारें ४ लाख. प्रोम जिल्ह्यांतील लोक बहुधां बुद्धानुयायी आहेत. शेंकडा ९४ ब्रह्मी भाषा बोलणारे आढळतात. प्रोम जिल्ह्यांत शेतीचीं कामें उन्हाळ्यांत चालतात. तांदुळाचें पीक जास्त असून पावसाचें मान जरी एकंदरींत कमी तरी दुष्काळ ब्रह्मदेशांत कधींच पडत नाहीं व शेतकरी कर्जबाजारी नसतात. जंगलखात्यांत राखलेलें जंगल ५३८ चौरस मैल असून १९०३–०४ सालीं उत्पन्न सरासरी ९॥ लक्ष झालें. कापसाचें आणि रेशीम विणण्याचें काम सबंध प्रोम जिल्ह्यांत चालतें. मंडाले खेरीजकरून एकंदर ब्रह्मदेशांत प्रोम जिल्ह्यापेक्षां कोठें लोकांची वस्ती कमी कोठेंच नाहीं. निर्गत माल तांदूळ आणि इमारतीचें लांकूड असून आयात जिन्नस मुख्यत्वेंकरून यूरोपीय देशांतील आहे.

श ह र.—खालचा ब्रह्मदेश. प्रोम जिल्ह्याचें मुख्य शहर. हें रंगूनपासून रेल्वेमार्गानें १६१ मैल आहे. लोकसंख्या सुमारें पंचवीस हजार. जुनें शहर मोडून त्या जागीं नवें शहर नांगलें नीटनेटकें वसविलेलें आहे. पूर्वीची राजधानी तरे खटेरा या नांवाच्या गांवीं होती. तो गांव प्रोमपासून ५।६ मैलांवर आहे. या गांवांत पूर्वीच्या राजाच्या वेळचे जुने अवशेष आहेत. प्रोम शहर त्या वेळीं लढाईची जागा होती. शहरांत मुख्यत्वेंकरून रेशमी कापड, ताडपत्री, ग्रंथ ठेवण्याकरितां मोठ्या पेट्या वगैरेंचे कारखाने आहेत. १८७४ सालीं प्रोम येथें एक म्युनिसिपल कमिटी स्थापन झाली.

**प्रोस्टेटपिंडाचे व्याधी,** प्रो स्टे ट ची वृ द्धि— वृद्धावस्थेंत ६० वर्षांच्या सुमारास ह्या पिंडाची वृद्धि विशेष होऊन त्यामुळें कित्येक वेळां मूत्रावरोध (मूत्रघात) होतो. लक्षणेंः– लघवी थोडथोडी व सावकाश होणें व वारंवार होऊन त्यामुळें रात्रीतून तीन चार वेळां उठावें लागणें, लघवी कुंथून कुंथून करावी लागते व तरी थोडी लघवी मूत्राशयांत शिल्लक राहून तेथें ती नासून तीस दुर्गंधि येऊं लागणें. येणेंप्रमाणें मूत्राशयाचा दीर्घकालीन दाह होऊन पांढरा चिकट श्लेष्मा लघवीवाटें पडतो. रोग्यास पीडा होऊन चैन पडेनासें होतें. कधीं लघवी अगदीं बंद होऊन जाते शेवटीं अशक्तता वाढत जाते. मूत्रपिंडाचाहि दाह होऊन रोग्याच्या जिवास धक्का पोंचतो. प्रोस्टेटचा मध्यभाग अथवा एका बाजूचाच भाग वृद्धिंगत होतो. त्यामुळें मूत्रमार्गाच्या त्या भागामध्यें लघवीस अडथळा येतो. गुदामध्यें तर्जनी प्रवेश करून परीक्षा केली असतां तो पिंड मोठा झालेला बोटास लागतो. उपायः—औषधानें हा पिंड लहान होत नाहीं. म्हणून अडचण पडेल तेव्हां मूत्रनलिकेनें नेहमीं दिवसांतून दोन तीन वेळां लघवी काढावी. जरूरीप्रमाणें जंतुघ्न कोमट औषधांनीं मूत्राशय पिचकारीनें धुवावा. येणेंप्रमाणें मूत्र काढीत गेलें म्हणजे त्याची नासण्याची क्रिया व सांचणें बंद होऊन दाह व वेदना थांबतील. एवढ्यासाठीं रोग्यासच नलिका घालण्यास शिकविणें बरें असतें. वृषण शस्त्रक्रियेनें काढून टाकिले असतां हा पिंड शुष्क व लहान होईल अशा कल्पनेनें व आशेनें एक किंवा दोन्ही वृषण काढून टाकिल्यानें कांहीं आराम वाटतो असा अनुभव आहे पण यांत जरा जोखीम असल्यामुळें फक्त वीर्यनळी थोडी कापून बांधून ठेवल्यानें वृषण शुष्क होतें व नंतर हा पिंडहि शुष्क होऊन लघवी सुलभतेनें होऊं लागते. शस्त्रक्रियेनें प्रोस्टेटचा वाढलेला भाग नानातऱ्हेनें कापून काढतां येतो.

प्रो स्टे ट चा दा ह अ थ वा ग ळूं.—यास कारणें पूयप्रमेह होऊन त्या पुवाचा किंवा साध्या पुवाचा संसर्ग मूत्रमार्गाच्या मागच्या बाजूस पसरत जाऊन हा पिंड सुजतो. किंवा क्षयजंतूहि तेथें विन्हाड करून पिंडदाह करतो. लक्षणेंः—लघवी करतांना अडचण पडून वेदनेनें ती बाहेर येणें अशक्य होतें. शौचासहि अडचण पडते. पाटावर किंवा खुर्चीवर रोग्यास बसवत नाहीं. तर तो गुदाची मुंवळ बाजूस राहील अशा तजविजीनें तिरका बसतो. उपायः—या दाहाचें गळूं बनलें असतां तें गुदद्वारांतून कापावें. आपोआप फुटूं

दिलें असतां मूत्राशय, गुद अथवा मूत्रमार्गांत फुटून विलक्षण घोटाला उत्पन्न करतें. नुसता दाह असतां, रोग्यास बिछान्यावर पडून राहण्यास सांगून दिवसांतून कांहीं वेळां शेकावें व कांहीं वेळां कमरेपर्यंत ऊन पाण्यांत बसण्यास सांगावें. लघवी अडल्यास रबरी मऊ नलिका घालून ती काढावी. सुरवातीस चुंबळीच्या जागीं सुमारें बारा जळवा लावल्यानें चांगला उपयोग होतो. शौचास साफ होण्याची खबरदारी ठेवावी. गुदद्वारांत वेदनेसाठीं मार्फियाची सोंगटी जरूरीप्रमाणें ठेवावी.

दीर्घकालीन प्रोस्टेट दाह.—ही स्थिति वरील रोगानंतर इलाजाच्या अभावीं किंवा जुनाट परम्यामुळें येते. लक्षणें:—बस्तिप्रांतांत जड व फुगीरपणा, वरच्यावर लघवी व पाण्यासारखा चिकट स्राव, गुदद्वारांतून बोटास प्रोस्टेटवृद्धि समजते. लघवींत पांढरा कापसाप्रमाणें गढूळपणा व सुतासारखे दोरे दिसतात. उपाय:—जाड व भरीव सळई मधून मधून मूत्रमार्गांतून घालणें. लोहयुक्त शक्तिवर्धक औषधें देणें. त्या जागीं स्फोटोत्पादक पट्टी लावणें. शृंगारिक विषय वर्ज्य करावे. सायकल किंवा घोड्यावर बसणें व मद्यप्राशन हीं सोडावीत.

क्यान्सर रोग दुष्ट ग्रंथि.—हा म्हाताऱ्या माणसांस होतो व तो असाध्य असल्यामुळें शस्त्रक्रिया निरुपयोगी आहे. लक्षणें—रोग एकाएकीं होऊन मूत्राशयांत जरा सळई घातली कीं बराच रक्तस्राव होतो. रोगी एकसारखा खंगत जाऊन मरण पावतो.

प्रोस्टेटाश्मरी —या पिंडांतून मूत्रमार्ग जातो तेथें खडा उत्पन्न होऊन अगर वरून मूत्राशयांत येऊन अडकून बसतो. लक्षणें—लघवी होण्याची अडचण पडते. सळई घालून तपासलें असतां तिच्या टोंकास खडा लागलेला समजतो. उपाय—बस्तिप्रदेशाच्या मध्यरेषेवर छेद करून या पिंडावरहि छेद करून खडा काढावा.

**प्लव**—(हलोजेन्स) प. भा. १९. हें एक हर-संघांतील रासायनिक मूलद्रव्य आहे. हें कधींहि स्वतंत्र सांपडत नाहीं. त्याचें अशोधित स्वरूप म्हणजे खट--प्लविद होय. इ. स. १८८६ मध्यें मोइसन यानें विद्युद्विश्लेषणाच्या योगानें हें मूलद्रव्य वेगळें केलें. या कामीं वापरावयाचें विद्युद्विश्लेषणाचें भांडें इंग्रजीतील यू या अक्षराच्या आकाराचें केलेलें असून तें व त्यांतील विद्युद्- ध्रुव हे प्लातिन--ऐंद मिश्र ह्या धातूंचे केलेले असतात. वरील भांड्याचीं दोन्हीं तोंडें खट--प्लविद ( फ्लोर--स्पार ) नांवाच्या पदार्थाच्या बुचानें बंद केलीं होतीं. विद्युद्विश्लेषणाच्या वेळचें उष्णमान-२३° ठेवलें होतें. विद्युत्प्रवाह सुरू केल्याबरोबर प्लव हें घनध्रुवाशीं वायुरूपानें मिळतें. हा वायु चांगल्या थंड केलेल्या व सिंधु--प्लविद असलेल्या अशा दोन प्लविद--नलिकांतून प्लवाम्ल असल्यास तें नाहींसें करण्याकरितां म्हणून जाऊं देतात व नंतर हे खट-प्लविदानें झांकलेल्या प्लातिन- नलिकेंत जमा करतात. पलाशप्लव -शिसित हें तप्त केलें असतां २००° उष्णमानाच्या वेळीं प्लवाम्ल व २३०° ते २५०° अंश उष्णमानाच्या वेळीं प्लव देतें.

प्लव हें वायुरूप असून तीक्ष्ण वासाचें आहे. याचा रंग हिरवट--पिंवळसर असा आहे. त्याचें विशिष्टगुरुत्व १.२६५ आहे. याचा द्रव पिंवळट असून तो १८७° उष्णमानावर उकळतो. उज्जवायूशीं हा अंधारांत देखील संयुक्त होतो व त्याचें त्यावेळचें उष्णमान २१०° असतें. चूर्ण केलेला कोळसा ह्या वायूमध्यें जळतो व कर्ब--चतुष्प्लवि देतो. प्राण, गंधक, स्फुर वगैरे धातू ह्या धातूच्या वातावरणांत आधीं वितळतात व नंतर पेट घेतात. सेंद्रिय द्रव्यावर ह्याची बरीच लवकर क्रिया घडते.

ह्याचा मुख्य रासायनिक संयुक्तपदार्थ म्हणजे प्लवाम्ल होय. हें इ. स. १७७१ मध्यें स्कीलनें खट -प्लविदावर जास्तींत जास्त विशिष्टगुरुत्व असलेल्या गंधकाम्लाच्या क्रियेच्या योगानें वेगळें केलें. अद्यापहि व्यापारी तत्त्वावर ह्याच रीतीचा उपयोग करतात. हें अम्ल गटापर्चाच्या भांड्यामध्यें ठेवतात. त्याची वाफ हवेशीं मिश्रित असली तरी सुद्धां श्वासोच्छ्वास करण्याच्या इंद्रियांवर वाईट परिणाम घडवून आणते व शुद्ध अम्लाची वाफ हुंगली गेली तर हुंगणारा तावडतोब मरतो. कांचेवर ह्याची क्रिया तावडतोब होत असल्याकारणानें ह्या अम्लांत बरेच धातू विद्रुत होतात; ह्याचा मुख्य उपयोग कांचेवर खोदकाम करण्याकडे करतात.

**प्लवप्रतिन** ( फ्लुओरॅन्थीन )—हा एक उत्कर्ष असून तो इ. स. १८७८ मध्यें ( $क_{१५}उ_{१०}$ ) फिटिग ह्यानें शोधला. तो इंद्रियामधील पारदाच्या कच्च्या धातू शुद्ध करतांना सांपडणाऱ्या 'स्टुप' नांवाच्या स्निग्ध पदार्थामध्यें इतर उत्कर्षांबरोबर असतो. अल्कहलाच्या साहाय्यानें हा इतर उत्कर्षांपासून वेगळा करतां येतो. अल्कहलाच्या विद्रुत भागाचें ऊर्ध्वपातन केलें असतां फेनॅथ्रीन व पायरिन आणि प्लवप्रतिन वेगळे होतात. डांबराचें ऊर्ध्वपातन केलें असतां मिळणाऱ्या पदार्थांमध्येंहि हा पदार्थ असतो. यांतून क्रायसीन सांकारूपानें काढून टाकतात व प्लवप्रतिन विरल वातावरणामध्यें आंशिक--स्फटिकीभवनाच्या योगानें वेगळा करतात. दोन्हीहि स्थितींत दोन्ही उत्कर्ष त्यांच्या पक्रपिताचें आंशिक स्फटिकीभवन करून वेगळे करतां येतात. प्लवप्रतिनचा व त्याच्या पक्रपिताचा वितळण्याचा बिंदु अनुक्रमें १०९° ते ११०° व १८२° ते १८३° आहे.

**प्लवरंजनी** ( फ्लुओरसीन $क_{२०}उ_{१२}प्र_{५}$ )—हें बेयरनें इस्वी सन १८७६ मध्यें प्थॅलिक अनुजिजदाच्या रेसॉर्सिनशीं घनीकरण करून तयार केलें. प्रथमतः हे दोन पदार्थ जशदहरिदाबरोबर किंवा नुसते तप्त करतात. तप्त करून मिळालेला पातळ पदार्थ पाण्यासह उकळून क्षीण अल्कहलानें

धुतात व नंतर ते सिंधुउज्जिनशीं मिसळून आलेल्या द्रवावर अम्लाची क्रिया केली असतांना खालीं सांका जमतो. हा सांका पुन्हां पाण्यानें धुतात व नंतर सुका करतात. पुन्हां पुन्हां याच रीतीचा अवलंब केला असतां प्लवरंजनी शुद्ध स्वरूपांत मिळतें. याचें पिंवळें चूर्ण मिळतें व तें पाण्यामध्यें विद्रुत होत नाहीं, पण अल्कहलमध्यें होतें. दाहक अनाम्लामध्यें याचा द्राव लवकर मिळतो व त्या द्रावास हिरवी चकाकी असते. ह्या प्लवरंजनीचें द्रवाम्लावर स्तंभिदीकरण केलें असतां इओसिन नांवाचा पदार्थ मिळतो. ह्याच्या योगानें लोंकरीस, रेशमास व कापसास गुलाबी रंग देतां येतो. नत्राम्लाच्या योगानें प्लवरंजनीचें नत्रिदीकरण करून द्वि-नत्र व चतुर्नत्र मिश्रणें तयार करतां येतात. या द्वि--नत्रमिश्रणावर अम्लाची क्रिया केली असतां पिंवळी रंगद्रव्यें मिळतात.

**प्लातिन** ( परमाणुभारांक १९.५ )—एक रासायनिक धातुरूप मूळद्रव्य. ह्या धातूचा शोध प्रथम दक्षिणअमेरिकेंत लागला. दर वर्षी सर्व जगांत तयार होणाऱ्या प्लातिन पैकीं शेंकडा ९५ चा पुरवठा रशियांतून होतो. प्लातिन ही करड्या रंगाची पांढरी धातु असून फार घनवर्धनीय व तन्य आहे. इरिडियमच्या मिश्रणानें प्लातिनाचा कठिणपणा बराच वाढतो व तन्यता देखील कमी होते. त्याचें विशिष्टगुरुत्व २०.८५ तें २१.७१ आहे. त्याची विशिष्ट उष्णता (०° सेंटिमीटर व १००° सेंटिमीटर यांच्या दरम्यान) •.०३२३ आहे. तें १७००° सें. मि. व १८००° सें. मि. या उष्णमानाच्या दरम्यान वितळतें. पॅलॅडियमप्रमाणें प्लातिनहि उज्ज व इतर वायू बऱ्याच प्रमाणांत शोषून घेतो. या गुणामुळें त्याचा सान्निध्यविकारी पदार्थ म्हणून फार उपयोग केला जातो. प्लाटिनचें प्राणिदीकरण बहुतेक मुळींच होत नाहीं. तो स्फुर, आर्सेनिक ( ताल ), ॲंटिमनी ( अंज ), सिक, टंक, व प्लव यांशीं आणि दुसऱ्या बहुतेक सर्व धातूंशीं संयोग पावतो. कोणत्याहि अम्लाचा त्यावर मुळींच परिणाम होत नाहीं असें म्हटलें तरी चालेल. फक्त जलराजांत किंवा ज्यापासून हरवायु निघतो अशा मिश्रणांत तो द्रवतो. द्रवीभूत नत्रितांचा, पालाशकर्बनत्रिदाचा व लोहकर्बनत्रिदाचा त्यावर ताबडतोब परिणाम होतो. प्लातिनाच्या कोणत्याहि संयुक्त पदार्थाचें, अतिशय तापविल्यानें विघटन होऊन धातु मागें रहातो. प्लातिनचे खरे क्षार असे मुळींच होत नाहींत. रासायनिक उपकरणें, उष्णज्वलित दीप व ताप--युगल करण्याकरितां प्लातिनचा उपयोग करतात. गंधकाम्लाच्या कारखान्यांत, फोटोग्राफीमध्यें, व जवाहिरांच्या धंद्यांतहि प्लातिनचा फार उपयोग होतो. स १९०८ मध्यें प्लातिनचा भाव एक ट्रॉय औंसाला ५ पौं. २ शि. ६ पे. होता.

**प्लासी**—बंगाल. नडिया जिल्ह्याच्या भागिरथी नदीच्या डाव्या किनाऱ्यावर असून या ठिकाणीं एक मोठी इंग्रजांची लढाई झाली होती व तींत बंगालचा नबाब सुराजउद्दौला याचा क्लाइव्हनें पराभव केला होता ( १७५७ ).

**प्लिनी, थोरला** (इ.स. २३–७९)—एक रोमन ग्रंथकार. सेनेकाच्या सहवासामुळें तत्त्वज्ञान व साहित्यशास्त्र यांचा त्यानें अभ्यास केला. त्यानें इ. स. ४६ मध्यें जर्मनींत लष्करी नोकरी, व्हेस्पेशियनच्या वेळीं स्पेनमध्यें प्रोक्युरेटरची नोकरी व नंतर आरमाराधिपतीची नोकरी केली. त्यानें 'हिस्टरी ऑफ हिज टाइम्स' नांवाच्या इतिहासाचीं एकतीस पुस्तकें लिहिलीं; व 'नॅचरॅलिस हिस्टरी' नांवाचें पुस्तक बहुतेक पूर्ण लिहिलें. अधिक माहिती ज्ञानकोश पांचव्या विभागांत ( पृ. २६९ ) पहा.

**प्लिनी, धाकटा**—हा रोमन ग्रंथकार थोरल्या प्लिनीचा भाचा. त्यानें ग्रीक व रोमन वाङ्मय आणि साहित्य शास्त्राचा अभ्यास केला. थोरल्या प्लिनीनें याला दत्तक घेतलें व पुढें तो लष्करी ट्रिब्यून, कॉन्सल व बिथिनियाचा गव्हर्नर होऊन ११३ सालीं मरण पावला. आपल्या मूळच्या गांवीं त्यानें एक पुस्तकालय काढलें व स्थानिक शिक्षणाची वाढ करून जन्मतः स्वतंत्र असलेल्या नागरिकांच्या मुलामुलींच्या शिक्षणाकरितां एक संस्था काढली. मरतेवेळीं त्यानें आपल्या मृत्युपत्रांत बरीच मोठी रक्कम सार्वजनिक उपयुक्ततेच्या कामाकरितां दिली. प्लिनीच्या भाषणांशिवाय त्यानें लिहिलेल्या पत्रांचीं नऊ पुस्तकें व 'ट्राजनशीं पत्रव्यवहार' या नांवाचें पुस्तक उपलब्ध आहे.

**प्लिमौथ**—इंग्लंड. ही काउंटी असून डेव्हनशायर मधील एक बंदर आहे. लो. सं. ( १९२१ ) २०९८५७ असून समुद्रकिनाऱ्यावर पूर्वेकडून पश्चिमेकडे अनुक्रमें कटवॉटर, सटनपूल, मिलबे, स्टोनहौस पूल, इत्यादि बारीक बारीक आखातें आहेत. कॅटवाटरच्या पश्चिम भागावर आठव्या हेनरीनें बांधलेला जंगी किल्ला आहे. कॅटवॉटर हॅमोझ यांच्या बाजूनें उंचवटयाचा प्रदेश आहे. त्यावर किल्ले बांधले आहेत. हे किल्ले बंदरांत येण्याच्या सर्व वाटा रोखून धरतात. येथें होवरड्रेकचा जंगी पुतळा आहे व त्याचप्रमाणें सोळाव्या शतकांत स्पेनच्या लोकांचा समुद्रावर पराभव केल्याबद्दल एक जयस्तंभ आहे. प्लिमौथसौंडमध्यें ड्रेक बेट आहे; त्याची तटबंदी चांगली मजबूत आहे. गिल्डहॉलच्या पूर्व दरवाज्याजवळ प्लिमौथचें चर्च आहे. प्लिमौथ येथें साबण, कृत्रिम खत, सल्फ्यूरिक् ॲसिड हीं तयार होतात व त्याचप्रमाणें तेथें कागदहि रंगवतात.

**प्लूटो** ( ग्रीकांचा यम )—सॅटर्नचा पुत्र व जोव्हचा भ्राता. याच्या वांटणीस पाताळांतील सर्व प्रदेश आला. याचेंच नांव हेडीस असें होतें. याच्या मुलुखांत सर्वत्र अंधार भरलेला होता म्हणून कोणीहि याची स्त्री होण्यास कबूल होईना म्हणून प्रासर्पैनी नामक सेरीसची ( धान्यदेवतेची ) कन्या उपवनांत मैत्रिणींसह रमत होती तीस बळेंच धरून भूमींत त्रिशूलानें विवर पाडून हा पाताळांत निघून गेला. त्याच्या जवळ सर्बेरस नांवाचा श्वान नेहमीं

वाजून ताप येतो. बरेच रोगी या स्थितीमध्यें भानावर नसतात; चालतांना रोग्याचे झोंक जातात व तो मनांतून फार घाबरून जातो. अंगाची फार उलघाल होते. कधीं कधीं जुलाब, वांती, मळमळ, यांचा जोर विशेष असतो. ताप फार भरतो ( १०२°–३° ते १०६°–७° पर्यंत ). नाडीचें प्रमाण दर मिनिटास १०० ते १३० ठोके इतकें आरंभीं असतें. प्रथम जीभेवर ओलावा व पांढरी बुरशी असते; नंतर तिला कोरड पडून तिच्यावर पिंगट रंगाची बुरशी येऊन दांत, जीभ यांवर दुर्गंधिमय कीट जमतें व रोगी अगदीं बेभान स्थितींत वायु होऊन बडबडत किंवा बेशुद्धींत पडलेला असतो. अशा वेळीं नाडी मंद चालते व रोग्याचे हात पायहि थंड पडतात. लघवींतील आम्लता व आरक्तपणा वाढतो; व ती फार थोडी होते. व तींत आल्ब्यूमिन सांपडतें. असाध्य ज्वरामध्यें लघवी बंद होते. आरंभापासून किंवा निदान ज्वरास दोन तीन दिवस झाल्यानंतर मांडी, कांख, गळा यांपैकीं कोणत्यातरी ठिकाणच्या गाठीं ठणकून सुजूं लागतात. मांडींतील गांठीचे रोगी अधिक असतात. ती गांठ चांगली कोंबडीच्या अंड्याएवढी मोठी दिसते. गुह्येंद्रियावर चट्टे पडून मांडींत वद होतें, या लक्षणामुळें यास वद्याताप असेंहि नांव आरंभीं लोकांनीं ठेविलें होतें. प्लेग हें इंग्रजी नांवच आतां खरें प्रचारांत रूढ झालें आहे; म्हणून या लेखांत सर्वत्र त्याचाच उपयोग केला आहे. गाठींतील ठणका मनस्वी असतो व रोगी जगण्याच्या पंथात असल्यास त्या गांठींत सातव्या दिवसापासून पू होण्यास आरंभ होतो. याच वेळेस कोणा रोग्यास पण क्वचित्‌च लहान मोठीं गळवें हातपाय, ढुंगण अथवा मान या ठिकाणीं उठतात. असाध्य ज्वरामध्यें ठिकठिकाणीं शिरा फुटल्यामुळें त्वचेखालीं व विशेषतः गाठीच्या आसपास लहान–मोठे रक्तनिर्गम होऊन लाल डाग दिसतात. हे बहुधा सर्वांगावर दिसतात व नंतर लवकरच मृत्यु घडतो. नाक, फुप्फुस, जठर, आंतडीं या वाटें कांहीं रोग्यांना रक्तस्राव होतो. मृत्यु बहुधा दहा दिवसांच्या आत येतो. सातपासून दहा दिवस रोगी जगला म्हणजे तो बरा होण्याच्या मार्गास लागला असें समजावें. तथापि गांठीं पिकून त्या फुटून अगर कापून बऱ्या होईपर्यंत रोगी बरा होण्यास बराच काळ लागतो. जंतुदूषित रक्तवाहिन्यात्मक नांवाच्या भेदामध्यें रोगाची तीव्रता इतकी असते कीं रोगी लागल्यापासून चोवीस तासांच्या आंत मरतो. व त्यास संसर्गहि असाच अगदीं झपाट्यानें होतो. गांठ बारीक पण सुजलेली व वरील भेदापेक्षा पुष्कळच लहान असते. ज्वराधिक्य बहुधा असतेंच. शेवटीं वात व बेशुद्धि येऊन रोग्यास मृत्यु येतो. फुप्फुसदाहात्मक प्लेगः—हा भेद मुंबईतील १८९६ सालच्या साथींत बऱ्याच अंशीं पहाण्यास सांपडला. ज्वराचा आरंभ पहिल्या प्रकाराप्रमाणेंच होतो; पण एकदोन दिवसानंतर श्वास झाल्याचीं लक्षणें दिसूं लागून खोकला, धांप, लाल रंगमिश्रित कफ, निद्रानाश, उलघाल, वात होऊन लवकरच तीन दिवसांच्या आंत मृत्यु येतो. फुप्फुसाचें घनीभवन झाल्याचीं लक्षणें डॉक्टरास तपासून सांपडत नाहींत. श्वासनलिका मात्र कफानें भरल्याचें छाती तपासून पाहिल्यास समजतें. फुप्फुसदाह झाल्याचें, प्रेत तपासणीच्या कालीं सिद्ध होतें व तो दाह तुरळक ठिकाणीं असतो. त्या दाहाच्या ठिकाणच्या फुप्फुसांत व कफांत पुष्कळ जंतू सापडतात. सौम्य प्रकारः—यामध्यें ज्वर बहुतेक नसतो. गांठ वगैरे इतर लक्षणें अगदीं निरुपद्रवी स्थितींत असतात व रोगी हिंडता फिरता असतो.

ज्वरनिदान.—एखाद्या ठिकाणीं पूर्वी प्लेग नसून प्रथमच हा ज्वर सुरू झाला असतां रोगनिदान करणें अंमळ अवघड आहे. कारण विषमज्वर, हिंवताप या प्रचलित ज्वराविषयीं अनुमान करण्याकडे साहजिक प्रवृत्ति होते. गालगुंड किंवा उपदंशजन्य वद आहे किंवा काय असाहि संशय येतो. परंतु रोग्याची जड जीभ व त्यामुळें येणारा बोबडा शब्द व रोग्याची विशिष्ट प्रकारची चर्या व मुद्रा, चालतांना जाणारे त्याचे झोंकांडे व नंतर येणाऱ्या गाठी यांवरून रोगनिदान होतें. पण ठाम निदान होण्यास रोग्याचें रक्त किंवा गाठींतील लस अथवा पू अथवा कफ तपासून पहावें लागतें. गांठींत सूक्ष्म कांचेची नळी खुपसून लस अगर पू घेऊन कांचेच्या पट्टीवर अगर चकतीवर ठेवून तो थोडा गरम करून सुकवितात. नंतर त्यास किरमिजी अगर निळा रंग चढवून अतिसूक्ष्मदर्शक यंत्रानें पहातात. साध्यासाध्यविचारः—या रोगांत मृत्युसंख्येचें प्रमाण मोठें असतें हें प्रसिद्धच आहे; म्हणजे तें शेकडा ४० पासून ८० पर्यंत असतें. वर सांगितलेल्या मँचुरियांतील साथीमध्ये चाळीस हजार रोग्यांपैकीं फक्त तीनच रोगी बरे झाले. पण निरनिराळ्या देशांत, प्रांतांत, आणि जातींत, लोकांच्या आरोग्यधर्मानुसार व हवाशीर अगर उलट प्रकारच्या म्हणजे गलिच्छ रहाणीप्रमाणें मृत्युसंख्या कमी अगर जास्ती असते युरोपियन लोकांत प्लेग बराच कमी असतो.

उपचार.—ज्वर वगैरे लक्षणे जशीं प्रगट होतील त्याप्रमाणें औषधोपचार करणें हाच इलाज बहुतेक रोग्यांस हितावह असून तो उत्तमहि आहे रोग्यास निरोगी मंडळींतून काढून वेगळा व दूरच्या इमारतींत ठेवावें. त्यास ठणका, शक्तिपात, ज्वराधिक्य वगैरे लक्षणें होत जातील त्याप्रमाणें अफूमिश्रित गांठ पिकविणारे लेप, उत्तेजक औषधें, शीतोपचार वगैरे करावे. अगदीं आरंभीं क्यालोमेल हें रेचक दिल्यानें उपयोग होतो असा एका विद्वान डॉक्टरचा अनुभव आहे. हा रोग बरा करण्यासाठीं प्रथम लशी निघाल्या त्या निरुपयोगी ठरल्या; पण यरसिन–रूक्स या डॉक्टरानें तयार केलेली लस ज्वराच्या आरंभावस्थेंत ( पहिल्या चोवीस तासांच्या आंत ) टोंचली तर खरोखरी बरीच गुणावह आहे असा अनुभव आहे. ती त्वचेंत अथवा शिरांत मोठ्या प्रमाणांत ( १५० क्यूबिक सेंटिमीटर ) टोंचून घातल्यानें रोगाच्या

तीव्र स्वरूपांत पालट होतो असें अनुभविक डॉक्टरांचें म्हणणें आहे. प्रेतपरीक्षणांत गांठीच्या शेजारील भागांत व गांठींत दूषितरक्ताधिक्य, गोठलेलें रक्त व लस सांचलेली आढळते. शरीरांतील बहुतेक रसग्रंथी सुजलेल्या आढळून येतात. प्लीहा नेहमीपेक्षां दुप्पट–तिप्पट व यकृत वगैरेंचे मोठें झालेलें असतें. तीच स्थिति मूत्रपिंडाची असते. फुप्फुसांत रक्त व लशीचा संचय होऊन ठिकठिकाणीं रक्तवाहिन्या फुटलेल्या दिसतात. हृदय मोठें होऊन ताणलें जातें व त्यांतील रक्त गोठतें. मज्जास्थानांवरील आवरणांतच फक्त रक्ताधिक्य दिसून येतें. याप्रमाणें शरीरांत बदल झालेले आढळून येतात. प्लेगसंसर्ग पसरण्याची तऱ्हाः-या ज्वराचा जंतु आहे असें जरी ठरलें तरी संसर्ग कसा पसरतो हें कोडें रहातेंच. ( १ ) आजारी मनुष्य हा संसर्गाचें मुख्य कारण होय हें तर अनेक माणसांस नंतर प्लेग झाल्यामुळें सिद्ध झालें आहे ( २ ) तथापि बाह्यतः निरोगी अशा माणसांचा संबंध रोग्याशीं येऊन तीं निरोगी माणसें इतर माणसांना संसर्ग घडवितात असें थोड्या ठिकाणीं पण स्पष्ट रीतीनें अनुभवास आलें आहे. ( ३ ) फुप्फुसदाहात्मक प्लेग झाला असतां रोगी खोकून, श्वासोच्छ्वासानें भोंवतालची हवा जंतुमय करतो पण असे रोगी थोडे असतात व एकंदरींत हवेंतून संसर्ग येऊन रोग पसरतो हें तत्त्वतः खरें असलें तरी त्याचा अनुभव फार थोडाच येतो. ( ४ ) बहुतेक प्लेगचे रोगी ग्रंथिकसंन्निपात भेदाचे म्हणजे गांठ आलेले असून त्यांमध्यें जंतु गांठींत किंवा रक्तवाहिन्यांत असल्यामुळें आतुरालयांतील नेहमीचा अनुभव असा आहे कीं साधारणपणें संसर्गास जपलें असता असले पुष्कळ रोगी जरी असले तरी शुश्रूषा करणारांमध्यें अथवा डॉक्टरवैद्यांत केवळ स्पर्शानें प्लेगचा प्रसार होत नाहीं. मात्र ज्या शहरांत अथवा खेडेगांवात लोक कोंदट हवेंत राहून रोग्याचें मलमूत्र, ओकणें, कफ या बाबतींत स्वच्छता बाळगीत नाहींत, व रोग्याचे भरलेले कपडे निष्काळजीपणानें शुद्ध करून पुन्हां वापरण्यात घेतात त्या ठिकाणीं प्लेगप्रसार जलद होतो. ( ५ ) सर्वांत मुख्य कारण अगोदर उंदरांच्या अंगावरील पिसव मुळें त्याच्यांत प्लेग सुरू होऊन पुढें तो संसर्ग त्या घरातील माणसांना होतो हें आरंभीं सांगितलें आहेच. ( ६ ) घाणीचा प्लेगप्रसाराशीं संबंध नसतो अशीं कांहीं अपवादात्मक उदाहरणें—घलिच्छ लोकांच्या वस्तींत बेताचा प्लेग व स्वच्छ वस्तींत फार प्लेग होणें—घडतात यावरून वाटतें. उन्हाळ्यात प्लेग कमी असण्याचें कारण तेव्हां लोक कोंदट हवेंत रहात नाहींत हें आहे. इतर ऋतूंत याच्या उलट प्रकार असतो.सांथींत दूषित भागांतील लोक बाहेर राहून प्लेग थांबल्यावर परत घरांत येतात आणि पुन्हां लागलीच किंवा उन्हाळा संपल्यावर त्याच दूषित भागांत पुन्हां प्लेगास सुरवात होते. याचें कारण जमिनीवर रोग्याचें मलमूत्रवमनकफादिकांतील रोगजंतुबीज दीर्घकालपर्यंत जीव धरून रहातें हें होय. तसें तें फरसबंदी व हवाशीर घरांत रहात नाहीं व अशा सुधारलेल्या घरामुळें प्लेगचें विन्हाड हल्लीं यूरोपांत फारसें टिकत नाहीं. पूर्वी त्या देशांत हिंदुस्थानप्रमाणें मातीच्याच जमिनी व कोंदट घरें असत म्हणून प्लेग होत असे.

प्लेगप्रतिबंधक उपायः—एका राष्ट्रांतून अगर प्रांतांतून दुसऱ्या देशांत जहाजमार्गें उतारू येतील तर कोणाहि देशास व्हेनिस येथील आंतरराष्ट्रीयपरिषदेच्या कायद्याप्रमाणें योग्य वाटतील ते उपाय योजण्याची मुभा ठेवली आहे; व म्हणून इंग्लंड व जर्मनी खेरीज इतर देश सं. थित उतारूंस दहा ते पंधरा दिवस अलग ठेवतात. पण ही पद्धति कुचकामाची असून नोकर लोकांस लांच खाण्याचें उत्तम साधन आहे असा अनुभव येतो. ज्या जहाजावर बारा दिवसांच्या आंत प्लेगचे रोगी आढळले असतील त्या जहाजावरील फक्त रोगी व संशयित माणसें उतरवून त्यावर डॉक्टराच्या नजरेखालीं देखरेख ठेवणें; जहाज धुवून स्वच्छ करणें; दूषित व संशयित कपडे जाळणें; व इतर उतारूंवर फक्त पत्ता विचारून नजर ठेवणें; येवढे उपाय पटकी व प्लेग यावर इंग्लंड देशाच्या मतें पुरेसे आहेत. तसेंच परदेशास उतारू, विशेषतः यात्रेकरू जातांना ते डॉक्टराकडून तपासणें हा उपायहि फार चांगला आहे. एखाद्या शहरांत अथवा गांवांत रोग सुरू झाल्यास रोगी व संशयित माणसांसाठीं स्वतंत्र डोल्यांतून रोग्यास नेऊन त्यासाठीं उभारलेल्या आतुरालयांत त्यास ठेवावें. तेथें त्याचीं चिरगुटें व वमनकफमलमूत्रांचें दहन करीत जावें. यासाठीं रसकापुराचा उपयोग करणें उत्तम. संशयित रोग्यास त्याचें ज्वरनिदान खास ठरेपर्यंत वेगळ्या खोलींत ठेवावें. त्या घरांत राहणाऱ्या माणसांवरहि नजर ठेवावी. शक्य असतील तितके उंदीर मारावे. आतुरालयांतील नोकरांची रहाण्याची जागा वेगळी असावी. हॉफकाइनची प्लेगप्रतिबंधक लस ज्याची खुषी असेल त्यास अगदीं जरूर टोंचावी. ज्यास स्वतः विचार करतां येत नसेल अशा अज्ञान व असहाय माणसांनाहि टोंचावी. ज्यांना ती टोंचणें नको असेल त्यांना टोंचण्याच्या भानगडींत पडूं नये.

प्लेगची लस टोंचणें हा निरुपद्रवी व खरोखरी उपयुक्त व सुलभ उपाय आहे. पण टोंचणारानें स्वच्छता व दक्षता फार बाळगली पाहिजे. टोंचण्याच्या सुया तीक्ष्ण पाहिजेत. वाईट टोंचण्यानें व टोंचणाराच्या हयगयीमुळें लोकांच्या दंडास अगर जेथें टोंचतील तेथें इजा होण्याचा संभव असतो. क्वचित् कोणास प्रकृतिमानाप्रमाणें टोंचून दंड अधिक दुखतो व सुजतो पण असे रोगी थोडे असतात व खरी इजा सहसा होत नाहीं.

**प्लेटो** (खि.पू.४२७-३४७)—एक महान ग्रीक तत्त्ववेत्ता. हा साक्रेटिसचा शिष्य व मित्र होता. त्याच्या चरित्रासंबंधीं खरी विश्वसनीय माहिती फार थोडी आहे पण दंतकथात्मक बरीच आहे. याचा जन्म अथेन्समध्यें झाला. द्रव्य, उत्तम शिक्षण व उत्तम शरीरप्रकृति या सर्व गोष्टींची अनुकूलता

त्याला असून त्यानें राजकारणांत मुळींच भाग घेतला नाहीं. सर्व आयुष्यात तो दोनदांच अथेन्स सोडून गेला व तें डायोनीशियसच्या आमंत्रणावरून सॅरॅक्यूज येथें आदर्शभूत अशी राज्यपद्धीत स्थापण्याकरितां. त्यानें शास्त्रीय ज्ञानांत भर मुळींच घातली नाहीं(ज्ञानकोश वि. पांचवा, पृ. २५० ). तो एका ग्रीक तत्त्वज्ञानपंथाचा संस्थापक असून त्याचे ग्रंथ तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, समाजशास्त्र यावद्दलचे आहेतच. प्लेटोचे संवाद ( प्लेटोज डायलाग्स ) हा अनेक प्रकरणात्मक मोठा ग्रंथ असून त्यांत त्याचीं अनेक विषयांवरील मतें ग्रथित झालेलीं आहेत. नीतिशास्त्रासंबंधींचे त्याचे सिद्धांत 'नीतिशास्त्र' ह्या लेखांत ( ज्ञानकोश वि. सोळावा ) पहा. 'रिपब्लिक' हा प्लेटोचा सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ होय. प्लेटोच्या संवादाचे तीन भाग पडतातः ( १ ) नीतिशास्त्र व राजकारण,(२ )शास्त्र आणि तत्त्वज्ञान व( ३ )गूढशास्त्र. या भागांचे पुन्हां पोटविभाग आहेत व त्या प्रत्येक विभागांत निरनिराळे संवाद आहेत. त्यांचीं नांवें व प्रतिपाद्यविषय येणेंप्रमाणें:- पोटविभाग १ ला-लॅचिस--धैर्य; चारमिडीस--विनय, लिसिस-मैत्री. पो वि.२रा-प्रोटॅगोरास-सद्गुण एक किंवा अनेक आणि ते नैसर्गिक असतात कीं अनुभवजन्य; इऑभाट--कवी व नट यांचें काव्यविषयाचें ज्ञान; मेनो- ज्ञान व सद्गुण एक किंवा भिन्न. पो. वि.३रा-युथिफ्रो-सद्वर्तन;अॅपॉलजी-सॉक्रेटिसावरील खटलाः क्रिटो-सत्यनिष्ठा व कर्तव्य; फीडो-आत्म्याचें अमरत्व.पो.वि.४था-सिपोझियम-आत्म्याचें अतींद्रिय अस्तित्व व सौंदर्य;फीड्रस-सौंदर्य व उच्चनीच प्रकारच्या प्रेरणा; क्रॅटीलस-भाषाशास्त्र, असत्य व कल्पनातत्त्व. पो.वि. ५ वा-गॉर्जिअस-न्याय; रिपब्लिक-न्याय-वर्णव्यवस्था, सिद्धावस्था-व्यवहार, कल्पनातत्त्व, सुराज्य-हा संवाद सर्वांत मोठा महत्त्वाचा असून यांत निरनिराळे विषय सुंदर रीतीनें प्रतिपादिले आहेत. पो. वि.६ वा-युथिडेमस-तत्त्वज्ञानाची आवश्यकता, असत्य; पारामिनायडीस्-कल्पनातत्त्व, क्षुल्लक गोष्टींच्या कल्पना; थिअॅटिटस-ज्ञानाचें सत्यत्व, अनुभवकल्पनाविचार; सॉफिस्ट-ज्ञान आणि अस्तित्व; स्टेट्समन-कायदा, राज्यपद्धति, राजकारण;फायलीबस-अंतिमध्येय सुख वा ज्ञान.पो. वि.७-टायमिअस-ईश्वर आणि मनुष्य,क्रिटिअस; पो. वि. ८ वा-कायदे-शिक्षण, विवाह, स्थावर मिळकत यांविषयीं कायदे, राज्यघटना आपोआप विकास पावतात, मुळापासून नव्या करता येत नाहींत.

**नूतन प्लेटो मत** ( निओप्लेटॉनिझम् ).—हें ख्रिस्तीमतापासून स्वतंत्र व अलेक्झांड्रीयन ग्रीकांत तिसऱ्या शतकापासून विशेष प्रचारांत असलेलें शेवटचें मत होय. पौरस्त्य व पाश्चात्त्य विचारसंप्रदाय आणि संस्कृति यांच्या तत्त्वांचा ज्यात समावेश झालेला आहे असा हा सर्वसाधारण तत्त्वज्ञान पंथ स्थापन होतांच प्राचीन तत्त्वज्ञानाचा इतिहास संपला. ज्याप्रमाणें रोमन साम्राज्य हें प्राचीन जगाचा जंगी प्रयत्न व त्यामुळे आलेला थकवा यांचें फळ होय त्याचप्रमाणें नूतनप्लेटोमत हीं प्राचीन विचारांची पूर्णावस्था व पाडाव होय असें म्हणावयास हरकत नाहीं.

नूतन प्लेटोमतानें सर्व मतांतील थोडथोडा भाग घेतला; ( १ ) वैयक्तिक दृष्टीनें अॅरिस्टॉटलच्या मतांची हें मत तार्किक पूर्णता आहे. ( २ ) अनुभवज्ञानावर विश्वास नसल्यानें हें मत संशयवादी आहे. ( ३ ) यांतील अध्यात्ममतें प्लेटोचींच आहेत. ( ४ ) या मताच्या अध्यात्मशास्त्रावर व पद्धतीवर अरिस्टॉटलच्या ग्रंथाचा बराच परिणाम झाला आहे ( ५ ) या मतांतील सदाचारविषयक मतें स्टोईकांसारखींच आहेत. तरी पण हें मत सारसंग्रहवादी नाहीं, कारण ( अ ) यांत एक सार्वत्रिक-पारमार्थिक-कल आहे व (आ) यानें तत्त्वज्ञानांत बुद्धिप्रामाण्य तत्त्वाची भर घातली आहे.

या पंथांत संप्रदायसंस्थापक कोणीहि न झाल्यामुळें व शांति आणि आनंद शाश्वत कसे होतील यांचा खुलासा न करतां आल्यामुळें व विचारशक्तिशून्य लोकसमाजास वळविण्याचें त्यांत साधन नसल्यामुळें त्याचा स्वतंत्र पारमार्थिक संप्रदाय झाला नाहीं. या मताचें महत्त्व तत्त्वज्ञानांतील एक मनःस्थिति म्हणून आहे व याचा यूरोपीय नैतिक संस्कृतीवर बराच परिणाम झाला आहे. यानें अंतःकरणास शांति देणारा आनंद बुद्धीच्या पलीकडे शोधिला पाहिजे व मनुष्याचा जीवनहेतु पोट भरणें हाच केवळ नव्हे व मनुष्य केवळ ज्ञानानेंच जगूं शकणार नाहीं. इत्यादि मतें प्रतिपादिलीं. जस्टिन, अथेनागोरस वगैरेंनीं नूतनप्लेटोमताची भूमिका तयार करून ठेविली. आमानियस साकसानें हा पंथ अलेक्झाड्रियांत स्थापला, पण या पंथांत प्लोटिनसचेच लेख विशेष महत्त्वाचे आहेत. यांतील एका भागांत मानवी आत्मा उच्च उगम स्थानापासून स्थानच्युत कसा झाला व दुसऱ्यांत शाश्वत, अनंत, सर्वोत्तमाची प्राप्ति कशी होईल याचा विचार आला आहे.

फ—या वर्णाच्या चार अवस्था आहेत. पहिली—अशोकाच्या गिरनार शिलालेखांत; दुसरी—मंदसोर लेखांत (इ. स. ५३२); तिसरी—पाली गांवच्या दानपत्रांत (इ. स. ४७७-७८) व चवथी—ग्वाल्हेरच्या हद्दींत ललितपूर गांवानजीक सांपडलेल्या सीयडोनी लेखांत (इ. स. ९०३). [भारतीय लिपिमाला].

**फकीर**—हे मुसुलमान भिक्षेकरी लोक आहेत. यांची संख्या हिंदुस्थानांत सुमारें ७ लक्ष ८७ हजार आहे. मुख्य वस्ती संयुक्तप्रांतांत आहे. यांनां शाह, सांई, अशींहि नांवें आहेत. हे लोक अबूबकर किंवा अलीपासून आपली परंपरा सुरु झाली असें समजतात. याचे दोन वर्ग आहेत; बशारा हे लग्न करतात व बेशारा हे कोणत्याच नियमांनीं बद्ध नाहींत. हे दारू पितात. रमजान उपास करीत नाहींत. नमाज पढत नाहींत व विकारसंयमनहि करीत नाहींत. यांचे मदारी, रफाई, जलाली, मेवाती, नक्षबंदिया, कलंदरिया व मौलविया हे मुख्य संप्रदाय आहेत. कांहीं फकीर हिंदु आहेत. त्यांची संख्या पावणेदोन लाख आहे.

**फगवार**—पंजाब, कपुरथळा संस्थानांतील एक तहशील. क्षेत्रफळ ११७ चौरस मैल लोकसंख्या (१९२१) ५९२८२. तहशिलींत फगवार हें एकच शहर असून ८७ खेडीं आहेत. मुख्य ठिकाण फगवार हें रेल्वे स्टेशन असून येथील व्यापार चांगला आहे.

**फडके, गंगाधरशास्त्री**—आद्य मराठी व्याकरणकर्ते. यांनीं १८२२ सालीं मराठी व्याकरण लिहिलें. तें पुढें १८३६ सालीं छापलें जाईतोंपर्यंत या हस्तलिखितावरूनच मुंबई सरकारनें प्रथम काढलेल्या मराठी शाळेंत व्याकरण शिकवीत. शास्त्रीबुवांनीं गुजराथेंत एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या जागीं असतांना मराठीप्रमाणेंच गुजराथी भाषेचींहि दोन—एक बाल व दुसरें प्रौढ-व्याकरणें लिहिलीं.

**फडके, हरिपंत**—'हरिपंत फडके' पहा.

**फडणवीस**—या अधिकाऱ्याकडे साधारणपणें, खर्ते, रजिस्टरें ठेवणें हें काम असतें.तसेंच त्या बाबतींतील देणग्या, हुकूम, नेमणुका वगैरे त्यानें करावयाच्या असतात. शिवाय राज्यांतील निरनिराळ्या सर्व खात्याचे हिशेब त्याने तपासावयाचे असतात. फड म्हणजे सरकारी कचेरी. मराठी राज्यात फडणवीस यास आपल्या दरखाच्या जाबत्याप्रमाणें लिहिण्याचें काम करून त्यावर मुजुमदाराचा शेरा घ्यावा लागे व मुजुमदाराच्या हाताखालीं काम करावें लागे. रोजकीर्द त्यानें लिहावी, वर्षाअखेरीस सरकारचा हिशेब दफ्तरदार व फडणवीस यांनीं तपासावा व एक बेरीज हिशेब करून पेशव्यांकडे दाखल करावेत हें काम असे. फडणवीस हा एक दरकदार असे व तो छत्रपति नेमीत असे. त्याच्या हाताखालीं सर्व राज्यांतील इतर फडणवीस व त्यांचें खातें असे. पेशवाईंत फडणविशी ही बहुतेक भानू घराण्यांत होती. हरि महादेव भानू यानें फडणवीशी मूळ मिळविली (नाना फडणवीस पहा). राज्यांतील सर्व सरंजामी सरदारांनां मुख्य फडणविसास आपले सरंजामाचे हिशेब दाखवावे लागत. कोणत्याहि जमाखर्ची कागदावर फडणविसांची तारीख व शेरा असे. [वाड-सनदापत्रें, पृ. १२६]

**फणस**—फणसाची लागवड जमेका, ब्राझिल, मारिशस, ब्रह्मदेश, सिलोन व हिंदुस्थानांतील समुद्रालगतच्या सर्व प्रदेशांत होते. लागवड बीं (ताज्या आठिळ्या) लावून तयार करतात. उष्ण व दमट हवा आणि तांबडी जमीन फणसाला फार उत्तम. आंब्याच्या झाडासारखेंच चांगले मोठाले खड्डे घेऊन त्यांत हाडांची भुकटी टाकल्यास तें झाडाला चांगली मानवेल व झाडहि लवकर लागास येईल. झाड सहा-सात वर्षांचें झालें म्हणजे त्याला फळ येऊं लागतें. एका झाडास ५० ते २०० पर्यंत फणस येतात. हिरव्या फणसाची भाजी करतात व पिकलेल्या फणसातील गरे खातात व आठिळ्या सुकवून ठेवतात, व त्यांची भाजी करतात. फणसाच्या कापा व बरका अशा दोन जाती आहेत. कापा फणस हत्यारानें फोडावा लागतो. त्यातील गरे सुटसुटीत असतात; ते वाळवून बरेच दिवस राहतात. बरका फणस हातानें फोडतां येतो. याचे गरे फारच मऊ व बिलबिलीत असतात. त्याचीं साठें अथवा फणसपोळ्या करतात.व बरक्याच्या गऱ्यांचें तांदुळाच्या कण्या घालून साधणें अथवा उंडे म्हणून एक पक्वान्न करतात, तें कोंकणांत फार प्रसिद्ध आहे. आठिळयांमध्यें स्टार्च (पिष्टपदार्थ) फार असतो. त्या भाजून अगर शिजवून खातात. गरीब लोक कोंकणांत फणसावर उन्हाळ्यांतील ३।४ महिने उदरनिर्वाह करतात.

भा जी चा फ ण स (भाकरीचें झाड)—भाजीचा फणस अगर भाकरीचें झाड हें फणसाच्या वर्गांतीलच आहे. हें मूळचें साउथ सी बेटांतलें असून त्याची लागवड ब्रह्मदेश, सिलोन, मद्रास या ठिकाणीं होत आहे. कोंकणांतहि बऱ्याच ठिकाणीं हल्लीं याचीं झाडें दृष्टीस पडतात. या झाडाचे जमीनीखालून जे कोंब येतात तेच काढून लावतात. किंवा ताजें बीं (आठिळी) लावून त्याचीं नवीन रोपें तयार करतात. या फणसाचा फक्त भाजीकरतांच उपयोग होतो; पिकल्यावर याचा कांहीं उपयोग नाहीं.

ल व.—लवाचें झाड फणसाच्या वर्गापैकींच एक आहे. याचीं झाडें कोंकणांत डोंगरांत व बागांच्या आसपास सांपडतात.

याचा लागवड कोणी मुद्दाम करीत नाहींत याचें फळ फणसासारखेंच पण लहान व आंवटसर असतें.

**फत्तेखर्डा**—वऱ्हाडमधील बुलढाणा जिल्ह्याच्या मेहकर तालुक्यांतील खेडें. हें भोगावती नदीवर आहे. लोकसंख्या सुमारें ४ हजार. पूर्वी ह्या गांवाचें नांव साखरखेर्डें असें होतें, पण असफजाह निजामानें येथें १७२४ सालीं माळव्याचा सुभेदार मुबारिजखान याचा पराभव केल्यामुळें यास फत्तेखर्डा म्हणूं लागले. स. १८०३ मध्यें शिंद्यांनीं हा गांव लुटला होता.

**फत्तेगड**—(१) सरहिंद. पंजाब इलाख्यांतील पतियाळा संस्थानच्या अमरगड निझामतमधील एक तहशील. क्षेत्रफळ ३६६ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) १२६२३६. बासी व सरहिंद किंवा फत्तेहगड(मुख्य ठिकाण) हीं दोन गांवें असून खेडीं ३५५ आहेत.

(२) संयुक्तप्रांतांतील फरुखाबाद जिल्ह्याचें मुख्य ठिकाण लोकसंख्या (१९०१) १६२७८ १७१४ सालीं येथील किल्ला नवाब अहंमदखानानें बांधिला. १७५१ मध्यें मराठ्यांनीं ह्या किल्ल्यांत नबाब अहमदखानास कोंडून ठेविलें होतें. स. १८०४ मध्यें होळकर फत्तेगडास आला होता.

**फत्तेजंग**—पंजाब इलाख्यांतील अटक जिल्ह्याची एक पूर्वेकडील तहशील. क्षेत्रफळ ८६३ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ११०१७९. खेडीं २०० पैकीं फत्तेजंग हें मुख्य ठिकाण आहे.

**फत्तेपूर,** *जिल्हा.*—संयुक्त प्रान्तांतील अलाहाबाद विभागामधील एक जिल्हा. क्षेत्रफळ १६१८ चौरस मैल फत्तेपूर जिल्ह्याचा दुआबच्या प्रदेशांत समावेश होतो. जंगल बरेंच आहे. अगदीं पश्चिमेस तीन लहान नद्या आहेत. पैकीं पान्डुगंगेस जाऊन मिळते. जिल्ह्याच्या मध्यभागीं झील (उथळ तलाव) आहेत. पश्चिम भागांत बाभळींचें रान आहे. सर्व जमीन गंगेच्या गाळाची बनलेली असून कंकर हें मुख्य खनिज द्रव्य आहे. आंबा, मोह, शिसू, लिंब, शिरस, पिंपळ व चिंच वगैरे वृक्षजाती व चित्ते, लांडगे, रानडुकरें, कोल्हे हीं श्वापदें सर्वत्र आहेत. हवामान दुआबच्या इतर प्रदेशाप्रमाणेंच आहे. मोठ्या मोठ्या नद्यांतून मगर, कांसवें, मासे वगैरे पुष्कळ आहेत. प्रदेश जरा दलदलीचाच आहे. वार्षिक पाऊस ३४ इंच पडतो.

मुसुलमानांची धाड येण्यापूर्वी ह्या जिल्ह्याचा बराचसा भाग कनोजच्या राज्याचा मांडलिक प्रदेश मानला जात असून त्यावर अर्गळचे राजे राज्य करीत असत व कनोजचा शेवटचा राजा जयचंद ह्यानें ११९४ सालीं झालेल्या पराभवाच्या पूर्वीच आपला खजीना येथें नेऊन ठेविला होता असें म्हणतात. मुसुलमानी अंमलानंतर १७३६ सालीं मराठे आले व स. १७५० पावेतों हा प्रदेश मराठ्यांकडेसच राहिला. पुढें तो फत्तेगडच्या पठाणांनीं बळकाविला. तीन वर्षांनीं अयोध्येचा (बहुतांशीं स्वतंत्र) नवाब सफदरजंग ह्यानें तो जिंकून घेतला. १७६५ सालच्या तहाप्रमाणें फत्तेपूरचा नामधारी सम्राट शहाअलमकडे गेला. पण १७७४ सालीं तो मराठ्यांस जाऊन मिळाल्यामुळें तो प्रदेश ब्रिटिशांनीं नवाब वजीरास ५० लाख रुपये घेऊन दिला. पण अयोध्येच्या नबाबाच्या राज्यांत अंदाधुंदी माजल्यामुळें तो रक्कम भरूं शकला नाहीं. तेव्हां त्याच्याजवळून अलाहाबाद व कोरा हे प्रांत घेण्यांत आले.

कोरा व खजूहा येथें कांहीं मुसुलमानकालीन इमारती आहेत. मोठीं गांवें ५ व खेडीं १४०३ आहेत. लोकसंख्या (१९२१) ६५२३९२. शेंकडा ८३ लोक पूर्वहिंदी भाषा व शेंकडा १७ लोक पश्चिमहिंदी भाषा बोलतात. अर्ध्याहून अधिक जिल्ह्याची जमीन सुपीक आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं तर कसदार काळी चिक्कण जमीन आहे.

त ह शी ल.—(१) हींत फत्तेपूर व हमवा परगण्यांचा समावेश होतो. क्षेत्रफळ ३५९ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) १६६५१४. खेडीं ३६२ असून मोठें गांव (फत्तेपूर) हें जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या सुमारें १७ हजार.

(२) संयुक्त प्रान्तांतील बाराबंकी जिल्ह्याची एक उत्तरेकडील तहशील. क्षेत्रफळ ५१८ चौरस मैल लोकसंख्या (१९११) ३१३४४७. खेडीं ६७७. मुख्य ठिकाण फत्तेपूर. लोकसंख्या सुमारें ८०००. येथील इमामगड पहाण्यासारखा आहे.

**फत्तेपूर शिक्री**—संयुक्तप्रान्तांतील आग्रा जिल्ह्याच्या किरवली तहशिलींतील एक गांव. लो. सं. सुमारें सहा हजार. ह्या गांवानजीकच बाबरनें रजपुताचा पराभव केला. १५६९ सालीं अकबरानें फत्तेपूर नांवाचें एक मोठें शहर वसविण्यास आरंभ केला व १५ वर्षांत हें काम पुरें केलें. पण तदनंतर येथें कोणीहि मोंगल राजे रहात नसत. १८ व्या शतकांत महंमदशहा कांहीं दिवस येथें राहिला होता. हुसेन अल्लीखान नामक सुप्रसिद्ध सय्यद सेनापतीचा येथेंच १७२० सालीं खून झाला.

बुलंददरवाजा येथें सेलीमचिस्ती साधूचें थडगें आहे. येथून जवळच अबुलफजल व फैजी ह्या बंधुद्वयांचीं घरें आहेत. ह्याच्या पश्चिमेस अकबराची रजपूत भार्या जोधबाई हिचा भव्य वाडा आहे. येथेंच बिरबल व मिरियमचीं घरें आहेत. दक्षिणेस ख्वाबगाह व तुर्की सुलतान. उत्तर भागांत पांच महाल व दिवाण-इ-खास या इमारती आहेत. येथें स. १८६५ पासून ते १९०४ पर्यंत म्युनिसिपालिटी होती. पण सध्यां हें गांव 'नोटीफाइड एरिया' आहे.

**फत्तेसिंह भोसले**—अक्कलकोटकर घराण्याचा मूळपुरुष. ('अक्कलकोट' पहा)

**फत्तेहाबाद**—(१) संयुक्तप्रान्तांतील आग्रा जिल्ह्याच्या मध्यभागीं असलेली एक तहशील. क्षेत्रफळ २४१ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ११५३७६. खेडीं १६५ असून फत्तेहाबाद हें तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे.

( २ ) पंजाब, हिस्सार जिल्ह्याची एक तहशील क्षेत्रफळ ११७७ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ )१९५८०१. गांव १ ( फत्तेहाबाद–मुख्य ठिकाण ) व खेडीं २५९; पैकीं तोहाण व अंग्रोह येथें पुराणवस्तुशास्त्रास उपयोगी पडेल असें साहित्य सांपडतें. उत्तर भागांतून घग्गर नदी वहाते. मुख्य ठिकाण फत्तेहाबाद लोकसंख्या ( १९०१ ) २७८६ हा फीरोजशहानें १३५२ सालीं वसविला असून येथें एका स्तंभावर फिरोजशहाची वंशावळ खोदलेली आहे.

फरीदकोट, संस्थान.—पंजाबांतील एक संस्थान. क्षेत्रफळ ६३८ चौरस मैल.लोकसंख्या ( १९२१ ) १५०६६१. संस्थानचें एकंदर उत्पन्न १८ लाख आहे.राजास ११ तोफांची सलामी मिळते. हें घराणें अकबराच्या वेळीं भल्लण ब्रार नांवाच्या शाखेंतील जाटानें स्थापिलें. ब्रारचा मुलगा दुल व त्याचा वंशज भल्लण होता. भल्लण हा अकबराच्या पुष्कळ उपयोगी पडल्यानें याचें त्याच्या जवळ वरेंच वजन होतें. ब्रारच्या पौर नांवाच्या धाकट्या भावानें पतियाळा, नाभा व झिंद येथील फुलकियान घराणीं स्थापिलीं. या सर्वांना सांप्रत वारजाट शिक्ख असें म्हणतात; वास्तविक ते मूळचे जैसलमीरचे रजपूत होत.

दुल्लपासून अकराव्या चौधरी कपूर नांवाच्या पुरुषानें कोटकपूर राजधानी वसविली. नंतर त्याच्या सरदार हमीरसिंग या नातवानें फरीदकोट वसविलें. गेल्या शतकाच्या आरंभीं लाहोरचा दिवाण मोकमचंद यानें कोटकपूर प्रांत जिंकून घेतला. सरदार पहाडसिंग हा १८२७ सालीं गादीवर आला. त्यानें राज्यांत सुधारणा केल्या. त्यानें पहिल्या शीख युद्धांत ( १८४६ ) इंग्रजांना रसद वगैरे पुरवून मदत केल्यानें मोकमचंदाकडील घेतलेला कोटकपूर प्रांत इंग्रजांनीं त्याला परत देऊन राजा ही पदवी दिली. तो १८४९ सालीं मेल्यावर त्याचा पुत्र वजीरसिंग हा गादीवर आला. त्यानें दुसऱ्या शीखयुद्धांत व १८५७ सालीं नानागर्दीत ( सतलजचे उतार ताब्यांत ठेवून व शामदास या बंडवाल्यांच्या एका सेनापतीचा पराभव करून ) इंग्रजांना मदत केल्यानें त्याला ब्रारवस राजासाहेब बहादुर ही पदवी व ११ तोफांच्या सलामीचा मान मिळाला. तो १८७४ सालीं मेल्यावर त्याचा मुलगा विक्रमसिंह हा गादीवर आला. याला बऱ्याच भाषा अवगत असून त्यानें राज्यांत बऱ्याच सुधारणा केल्या त्यानें दुसऱ्या अफगाण मोहिमेंत मदत केल्यानें त्याला वंशपरंपरा फरजंद- ई--स--आदत--ई-निशाण, हजरत- ई- कैसर--ई--हिंद, ब्रारवंस ही पदवी मिळाली. तो १८९८ सालीं मेल्यावर त्याचा वडील पुत्र राजा वलबीरसिंग हा गादीवर आला व १९०६ सालीं वारला. त्यानें सॅपर्समायनर्स ( छप्पर मैना ) यांच्यासाठीं इमारती व व्हिक्टोरिया टॉवर, राजमहाल वगैरे बांधलीं.त्याला पुत्र नसल्यानें त्यानें पुतण्यास दत्तक घेतलें, त्याचें नांव ब्रिजिंदरसिंग होय. त्याच्या लहानपणीं रीजन्सीमार्फत कारभार चालत होता. हा लाहोरच्या एचिसन कॉलेजांत होता. पंजाबी राजांत या कॉलेजचा डिप्लोमा ( प्रमाणपत्र ) मिळविणारा हाच पहिला होता. त्याला १९१६ सालीं राज्याचा पूर्ण अखत्यार मिळाला, पण तो लवकरच वारला ( १९१८ ). त्यानें संस्थानांत मोफत शिक्षण सुरु केलें होतें. त्यानें गेल्या यूरोपीय महायुद्धांत इंग्रज सरकारास आपल्या इंपीरियल सॅपर्समायनर्सच्या तुकड्यांची मदत देऊन उंटांचा रिसालाहि दिला होता. शिवाय संस्थानांतील साक्षर पुरुषांच्या शेंकडा दहा इतकीं माणसें लढण्यासाठीं इंग्रजांना पुरविलीं होतीं व जवळ जवळ ६॥ लक्षांची रक्कम दिली. हल्लीं ब्रिजिंदरचा वडील पुत्र हिज हायनेस राजा हर इंदरसिंग साहेब बहादूर गादीवर आहे. याचा जन्म जानेवारी सन १९१५ मधील आहे. सध्यां सरदार बहादूरसरदार इंदरसिंग बी. ए. यांच्या अध्यक्षत्वाखालीं कौन्सिलमार्फत राज्यकारभार चालत आहे ( १९२५ नवंबर ). [ गोडबोले-एतद्देशीय संस्थानें; टाईम्स--ईयरबुक, १९२५; फरीदकोट संस्थानाकडून लिहून आलेली माहिती. ]

गांव.—फरीदकोट संस्थानाची राजधानी. लोकसंख्या सुमारें दहा हजार. बाबाफरीदच्या वेळीं मांजरजपूत राजा मोकलसीनें ७०० वर्षांपूर्वी हा किल्ला बांधला. येथें फरीदकोटचा संस्थानिक रहातो.

फरीदपूर,(१) जिल्हा.—बंगाल. डाका विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ २३७१ चौरस मैल. जमीन पाणथळ आहे. पद्मा, मधुमती, गरई, अरियालखान, चंदना, भुवनेश्वर, मरापद्मा, नयाभांगणी वगैरे नद्या व चित्ते, वाघ, रानडुकरें वगैरे श्वापदें आहेत. हवामान एप्रिल ते सप्टेंबर ८३° व हिंवाळ्यांत ६६°.पाऊस६६ इंच असतो. पुरामुळें असा फायदा होतो कीं वाहून आलेल्या मातीच्या योगें पाणथळ जमिनी भरून येतात. पूर्वेकडील पोटविभाग भादरीपूर हा एके काळीं विक्रमपूरमध्यें मोडत असे व तदनंतर हा जिल्हा वंग देशाच्या राज्यांत मोडूं लागला. येथील लोकांचे पूर्वज चांडाल असून ते होड्यांत घरें करून रहात असत असें रघुवंश काव्यांत दिलें आहे. १४ व्या शतकाच्या आरंभीं इतर पूर्व बंगालबरोबर मुसुलमानांनीं फरीदपूरहि जिंकिलें व १५८२ सालीं तोडरमल्लच्या बंदोबस्ताच्या वेळीं त्याचा महमदाबाद व भूषणा सरकारांत समावेश करण्यांत आला.जहांगीरच्या कारकीर्दीत कांहीं हिंदु संस्थानिकांनीं (ह्यांना बारा भुईया म्हणत असत) पूर्व बंगालांत स्वतंत्र राज्यें स्थापिलीं.ह्यापैकीं चांद्रराय व केदारराय ह्या बंधुद्वयानें डाका जिल्ह्यांतील राजाबारीपासून तों फरीदपूरमधील पालंगठाण्यांतील केदारबारीपावेतों आपला राज्यविस्तार केला. भूषणा ठाण्यांत किलाबारी येथें राजा सीतारामराय नामक भुईयानें बांधलेल्या किल्ल्याचा अवशेष अजून दृष्टीस पडतो. पुढें मोंगलांनीं त्याचा फत्तेपूर येथें पराभव केला. मुसुलमानांनीं त्याचा प्रदेश जिंकल्यानंतर मग अथवा आर्कनी लोकांनीं ह्या

प्रदेशांत धुमाकूळ माजविला. सन १७९० पावेतों ह्या जिल्ह्याचा डाका-जलापूरच्या प्रदेशांत समावेश होत असे, पण सध्यांच्या भुषणा ठाण्याचा व मकसुदपूरचा जेसोरमध्यें समावेश होत असे. १८११ सालापासून हा जिल्हा वेगळा काढण्यांत आला. व जेसोरपासून चंदनाच्या पूर्वेकडील प्रदेश काढून घेण्यांत आला. पद्मा नदीच्या पूर्वेकडील प्रदेश जेव्हां डाक्यांत घेण्यांत आला तेव्हांपासून हा जिल्हा फरीदपूर या नांवानें ओळखला जाऊं लागला. पद्मेच्या पात्रस्थलचंचलतेमुळें ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ वाढूं लागलें आहे. लोकसंख्या ( १९२१ ) २२४९८५८. येथें नेहमीं मलेरिया तापाची साथ सुरू असते. यांत ४ मोठीं गांवें व ३३५९ खेडीं आहेत. भाषा मुसुलमानी व बंगाली. शेंकडा ६२ लोक मुसुलमान आहेत. बहुतेक मुसुलमान शेख व जोलाहा आहेत. शेंकडा ७७ लोक शेतकीवर अवलंबून असतात. जमीन सुपीक आहे. तांदूळ, ताग, गळिताचीं धान्यें, कडधान्यें, गहूं व जव. हे जमिनींत बहुतेक तांदूळ पेरतात. तांदुळाच्या खालोखाल तागाचें उत्पन्न होतें. कापड विणणें, पोतीं करणें, सोनें, चांदी व पितळेचें काम वगैरे धंदे आहेत. व्यापार कलकत्त्याशीं चालतो. निर्गत माल ताग, तांदूळ, कडधान्यें, गळिताचीं धान्यें; आयात माल—मासे, विलायती कापडचोपड, मीठ, राकेल, लोखंड, साखर, कोळसा वगैरे. चारीमाल मधून उत्तमपैकीं तांदूळ व इमारती लांकूड येतें. गोवलुन्डो हें मोठें व्यापाराचें ठिकाण आहे. शेंकडा ५१ लोकांस लिहितां वाचतां येतें.

गा व.—फरीदपूर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें मरा-पद्मा-नद्याच्या पश्चिम तीरावर आहे लोकसंख्या ( १९११ ) ११९३१. येथें मुसुलमान साधु फरीदशाह ह्याचा दरगा आहे व त्यावरूनच या गांवास फरीदपूर हें नांव पडलें. म्युनिसिपालिटीची स्थापना १८६९ सालीं झाली.

( २ ) त ह शी ल.—संयुक्तप्रांतांतील बरेली जिल्ह्याची एक आग्नेयीकडील तहशील. क्षेत्रफळ २४७ चौ. मैल. लोकसंख्या ( १९११ ) १३००९२. यात खेडीं ३२१ व गांवें २ आहेत. फरीदपूर हें तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. नद्यांच्या थडीप्रदेशाची जमीन सुपीक असून बाकीचा प्रदेश नापीक आहे.

**फरुकनगर**—पंजाबांतील गुरगांव जिल्हा व तहशिलींतील एक गाव. लोकसंख्या सुमारें ६ हजार. हा गांव एक बलूची नायक फौजदारखान यानें स्थापिला हाच पुरुष पुढें दलेलखान ह्या नांवानें प्रसिद्धीस आला व ह्यास बादशहा फरुखशियरनें सुभेदार नेमलें होतें. त्यानें १७३२ सालीं नबाब हा किताब धारण केला. १७५७ सालीं भरतपूरच्या जाट लोकांच्या हातीं फरुकनगर गांव गेलें. पण १७६४ सालीं तें परत घेण्यांत आलें. १८५८ सालीं नबाबाचें बंडांत अंग असल्याचें कळून आल्यावरून जहागिरी काढून घेण्यांत आल्या. मुख्य इमारती दिल्ली-दरवाजा-नवाबवाडा व एक सुंदर मशीद. म्युनिसिपालिटीची स्थापना १८६७ सालीं झाली.

**फरुखाबाद्**—संयुक्तप्रांत, आग्रा विभाग, पूर्वेकडील जिल्हा. क्षेत्रफळ १६५८चौ. मैल. लो.सं.(१९२१)८५६६३३. ह्या जिल्ह्याचा बहुतेक प्रदेश गंगेच्या उजव्या दुआबांत आहे. बगार, काली, इसन, अरिंद, पान्डु या जिल्ह्यांतील नद्या होत. श्वापदें—कोल्हे, गेंडे, लांडगे, काळवीट, नीलगाय, रानडुकरें वगैरे. येथील हवामान आरोग्यदायक आहे. रोगराई वगैरे कोणत्याहि तऱ्हेची नसते. उष्णमान ५८° ते ९५° च्या दरम्यान असतें. वार्षिक पाऊस ३३ इंच पडतो.

महाभारतांत वर्णन केल्याप्रमाणें ह्या जिल्ह्याच्या उत्तर भागाचा प्राचीन पांचाल राज्यांत समावेश होत असे. महाभारतांत नामनिर्देश होत असलेल्या जागा अजूनहि या भागांत अस्तित्वांत आहेत. बौद्धकालीन अवशेषांवरून इ. स. च्या प्रारंभकालीं बरींच महत्त्वाचीं शहरें होतीं असें दिसतें. प्राचीन काळीं प्रख्यात असलेलें कनोज याच भागांत होतें. गुप्त, मौखरी, मालव, हर्षवर्धन, पाल, राठोड, या घराण्यांचा या प्रांतावर अंमल होता. शेवटीं महंमद घोरीनें हा प्रांत जिंकला. पुढें हा प्रांत जोनपूरच्या राज्यांत गेल्यानें १५ व्या शतकांत दिल्ली व जोनपूर यांच्या झगड्यांत या प्रांताला बराच त्रास पोहोंचला. शेवटीं सन १४७९ मध्यें पुन्हां हा दिल्लीच्या ताब्यांत आला. हुमायूनचा कनोजजवळ १५४० त पराभव झाला. कैमगंजजवळच्या एका गांवचा रहिवासी महंमद बंगष यानें स्वतंत्र जहागीर स्थापिली. यानें फर्रुकशियर याला मदत केली होती. यानेंच फरुखाबाद वसविलें. याच्या मरणसमयीं फरुखाबाद, मैनपुरी, कानपुर, अलीगड, इटावा, वगैरे प्रांत याच्या जहागिरींत होता. याचा मुलगा कैमखान हा बदौनजवळ १७४९ त मारला गेला. त्याचा भाऊ अहंमद यानें १७५० त अयोध्येचा सुभेदार नवलराय यास मारून कांहीं प्रांत उपटला. सफदरजंगानें बोलाविल्या वरून मराठ्यांनीं येऊन अहंमदास फत्तेगडांत कोंडलें व त्याच्या मदतीस आलेल्या रोहिल्यांना पिटाळून लावलें. तेव्हां अर्धें राज्य मराठ्यांना देऊन अहमदानें वेढा उठविला (१७५२). पानपतच्या प्रसंगीं अहंमदानें अब्दालीस मदत करून आपला बराच प्रांत मिळविला. परंतु १७७१ त मराठ्यांनीं तो सर्व परत काबीज केला. पुढें लवकरच अहंमद मेला. तो आपल्यास नवाब म्हणवून घेई. मराठे त्याला अहदखान बंगष लंगडा म्हणत. त्याच्या पश्चात त्याचे वंशज अयोध्येच्या नवाबाचे मांडलीक बनले.

त ह शी ल.— फरुखाबाद जिल्ह्याची एक मुख्य तहशील. क्षेत्रफळ ३३० चौरस मैल. पूर्वेस गंगा असून दक्षिणेस काली नदी आहे. लोकसंख्या(१९११)२४३०७७. खेडीं ३६९ असून गांव एक (फरुखाबाद-कम फत्तेहगड). फत्तेगड भोंवतालची जमीन फार सुपीक आहे. येथें आंबे चांगल्यापैकीं होतात.

गांव.—छावणीचें व जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. फरुखाबाद व फत्तेगड हीं दोन्ही फक्त ३ मैलांच्या अंतरावर असून एकाच म्युनिसिपल हद्दींत आहेत. लोकसंख्या सुमारें ६० हजार. फरुखाबाद शहराची स्थापना १७१४ मध्यें महंमदखानानें केली व तत्कालीन फरुक्सियर बादशहावरून शहरानें नांव ठेविलें. शहराभोंवती जुनाट तट आहे. उत्तरेकडील उंचवटयावर पूर्वी नबाबाचा वाडा होता. येथील म्युनिसिपालिटीची स्थापना १८६४ सालीं झाली. बटाटे, तंबाखू, व आले हा निर्गत माल आहे.

**फर्कांडे**—मुंबई, खानदेश. एरंडोलच्या नैर्ऋत्येस ६ मैलांवर हें खेडें आहे. येथें चांदसोमान नांवाच्या मनुष्यानें १७३० च्या सुमारास बांधलेली एक मशीद असून तिला दोन मनोरे आहेत. त्यांपैकीं एकास धक्का दिला असतां दुसरा हलतो. आवाराच्या भिंतीसहि धक्का दिल्यास ती हालते. हें पूर्वी महत्त्वाचें गाव असावें. फरकंद म्हणजे आनंद या अर्थावरून गांवाचें नांव पडलें असावें.

**फर्ग्यूसन, जेम्स** ( १८०८–१८८६ )—शिल्पकलेवरील स्कॉटिश ग्रंथकार. फर्ग्यूसन स्कॉटलंडमध्यें जन्मला. प्राथमिक शिक्षण झाल्यावर कलकत्ता येथें प्रथम भावाच्या कंपनींत नोकरी करून नंतर ती मोडल्यामुळें भावाच्या साहाय्यानें त्यानें स्वतंत्रपणेंच निळीचा व्यापार सुरु केला.फर्ग्यूसन याची सौंदर्यकल्पना व सूक्ष्म तत्त्वज्ञानाची दृष्टि चांगलीच असल्यामुळें १८३५–१८४२ सालच्या दरम्यानच्या काळांत त्यानें प्राचीन शिल्पावशेषांबद्दल सुप्रसिद्ध अशा हिंदुस्थानांतील अनेक स्थळीं प्रवास करून, पुढें प्रसिद्ध होणाऱ्या आपल्या शिल्पविषयक ग्रंथाकरितां पुष्कळ साहित्य जमविलें. नंतर तो परत इंग्लंडास गेला.

लवकरच १८४० सालीं त्याची 'रॉयल एशियाटिक सोसायटी' या संस्थेचा सभासद म्हणून निवडणूक झाल्यावर या संस्थेच्या बैठकींमध्यें वाचलेल्या अनेक विद्वत्तापूर्ण निबंधानीं एकंदर सभासदांच्या मनांत भारतीय शिल्पकलेबद्दल पुष्कळ आवड उत्पन्न केली. १८४३ सालीं त्यानें " दक्षिण हिंदुस्थानांतील खडकांत खोदलेलीं देवालयें " हा निबंध वाचला; त्यामुळें प्राचीन हिंदू देवालयांतील जुन्या शिल्पकामाची खरी किंमत शिल्पसंशोधकांस कळूं लागली. याच सुमारास रॉयल एशियाटिक सोसायटीच्या कौन्सिलनें ईस्ट इंडिया कंपनीच्या कोर्ट ऑफ डायरक्टर्स यांना एक स्मारक बक्षीस देऊन हिंदुस्थानच्या प्राचीन शिल्पावशेषांची जास्त काळजी घेण्यास व त्याबद्दल जास्त आस्था बाळगण्यास सांगितलें. या विनंतीची अम्मलबजावणी व्हावी म्हणून ईस्ट इंडिया कंपनीनें निरनिराळया प्रांतांच्या मुख्याधिकाऱ्यांनां आपापल्या प्रांतांतील अवशेषांची पाहणी, मोजणी वगैरे करण्याकरितां लायक व हुषार माणसें नेमण्याबद्दल शिफारस केली. स. १८४५ च्या आरंभीं जेम्स फर्ग्यूसन हा दुसऱ्या खेपेस मुंबई शहरीं आला. या खेपेस त्यानें केलेलें संशोधन पूर्वीपेक्षां पुष्कळ विस्तृत व शास्त्रशुद्ध होतें, यावेळीं पांचव्या सहाव्या व सातव्या शतकांतील प्रचलित अशा विविध पद्धतींचें सूक्ष्म निरीक्षण करणें त्याला शक्य झालें. अशा प्रकारें जमविलेल्या साहित्याचा "भारतीय व पौरस्त्य शिल्पकलेचा इतिहास" हा सर्वमान्य ग्रंथ लिहितांना फर्ग्यूसन यानें पुष्कळ उपयोग केला. स. १८४८ त त्याचा हिंदुस्थानांतील प्राचीन बौद्धशिल्प, हा लेख रॉयल एशियाटिक सोसायटीच्या संस्थेच्या नियतकालिकांत प्रसिद्ध झाला व त्यानंतर लागलीच "हिंदु प्रिन्सिपल्स ऑफ ब्यूटी इन आर्ट"( कलाविषयक व विशेषतः शिल्पविषयक बाबतींतील सौंदर्याच्या खऱ्या तत्त्वाचें ऐतिहासिक विवेचन ) हा ग्रंथ त्यानें प्रसिद्ध केला. परंतु या विषयाचें मूळ स्वरूपच गहन असल्यामुळें या ग्रंथाच्या फक्त चारच प्रती खपलेल्या दिसतात. तथापि आपल्या ग्रंथांपैकीं हाच सर्वोत्कृष्ट ग्रंथ होय अशी फर्ग्यूसनची खात्री होती. स.१८५५ मध्यें जॉन मरे याच्या विनंतीवरून फर्ग्यूसननें आपला "दि हॅंडबुक ऑफ आर्किटेक्चर " ( शिल्पकलेचें सचित्र मार्गदर्शक ) हा सुप्रसिद्ध ग्रंथ हातांत घेतला. पुढें याच ग्रंथाची सुधारून वाढविलेली आवृत्ति चार विभागांची असून त्यांपैकीं दोन विभागांमध्यें प्राचीन व मध्ययुगीन शिल्पाची माहिती असून दुसऱ्या दोन विभागांमध्यें अर्वाचीन शिल्पपद्धति व पौरस्त्य आणि भारतीय शिल्प यांचा इतिहास संगतवार देण्यांत आला आहे.

या ग्रंथावरून केवळ शिल्पसौंदर्याची पहाणी करणारास उपयोग होतोच परंतु शिवाय शिल्पविकासाच्या दृष्टीनें एकंदर हिंदुस्थानचा इतिहास व संस्कृति कशी तयार होत गेली याची स्पष्ट कल्पना येते. फर्ग्यूसन यास केवळ भारतीय नव्हे तर पूर्व किंवा पश्चिम या दोन्ही दिशांकडील देशांमध्यें जो प्राचीन कलेचा स्मारकावशिष्ट भाग दृष्टोत्पत्तीस पडे त्याकडे त्याचें लक्ष आकर्षिलें जात असे. स १८६०–१८६८ च्या दरम्यानच्या काळांत फर्ग्यूसननें आपला बराचसा काल व उत्साह पॅलेस्टाइनमध्यें प्राचीन अवशेषांचें संशोधन करण्यांत घालविला. त्याचा "वनस्पती व सर्प यांची उपासना" हा सर्वमान्य ग्रंथ हिंदुस्थानच्या स्टेटसेक्रेटरीच्या अखत्यारींत तयार झाला असून तो इंडिया ऑफिसनें १८६८ सालीं प्रकाशित केला. १८६९ सालीं फर्ग्यूसन यानें "सेक्रेटरी ऑफ वर्क्स अँड बिल्डिंग्ज" ही जागा पत्करूनहि त्यानें आपलें लेखनकार्य शेवटपर्यंत चालू ठेविलें होतें.

**फर्डिनंड**—या ख्रिस्ती नांवाचे अनेक राजे यूरोपीय देशांत होऊन गेले. या नांवाचे अर्वाचीन तीन रोमन बादशहा, एक ऑस्ट्रियाचा बादशहा, चार नेपल्सचे राजे, एक पोर्तुगालचा, सात स्पेनचे, व कांहीं संस्थानिक होऊन गेले. त्यांपैकीं विशेष महत्त्वाचा कोणीहि नसून वाईट अर्थानें महत्त्वाचे नेपल्सचा चवथा फर्डिनंड ( १७५१–१८२५ ) आणि स्पेनचा सातवा फर्डिनंड ( १७८४–१८३३ ) हे आहेत.

**फलटण संस्थान**–मुंबई, सातारा जिल्ह्यांतील एक जहागीर. येथील जहागीरदाराचें आडनांव निंबाळकर. मुख्य गांव फलटण. जहागिरीच्या उत्तरेस नीरा; पूर्वेस सोलापूर जिल्हा; दक्षिणेस माण, व खटाव तालुके; पश्चिमेस वांई व कोरेगांव हे तालुके. एकंदर गांवें ७२ आहेत. क्षेत्रफळ ३९७ चौरस मैल व लोकसंख्या (१९२१) ५५९६६. उत्पन्न २ लाख रु. इंग्रज सरकारास ९६०० रु. खंडणी जाते. जहागिरींतील उत्तरेचा नीराथडीचा प्रांत सुपीक व दक्षिणेचा डोंगराळ आहे. पाऊस फार कमी पडतो. हवा उष्ण आहे. ज्वारी, बाजरी, तूर, हरभरा हीं मुख्य पिकें होत. नीरा व बाणगंगा या मोठ्या नद्या. फलटण गांवीं रामनवमीचा मोठा उत्सव होतो. येथें मानभावांचें एक जुनें देवस्थान आहे येथें एक हायस्कूल, दवाखाना व म्युनिसिपालिटीहि आहे.

इ ति हा स——महाराष्ट्रांतील राजघराण्यांत फलटणच्या निंबाळकरांचें घराणें फार जुनें असून सुमारें सहा सातशें वर्षें तें राज्योपभोग घेत आहे. धारच्या परमार राजांवर दिल्लीच्या सुलतानांनीं पुन्हां पुन्हां हल्ले केले, त्या धामधुमींत निंबराज परमार नांवाचा एक पुरुष दक्षिणेंत फलटणनजीक शंभुमहादेवाच्या रानांत सन १२४४ च्या सुमारास येऊन राहिला. निंबराज ज्या गांवीं राहिला त्यास निंबळक आणि त्यावरून त्याच्या वंशास निंबाळकर असें नांव पडलें. निंबराजाच्या वंशजांनीं पुढें फलटण हें गांव वसविलें आणि तेथें ते वतन संपादून राहूं लागले. महंमद तुघलखाच्या वेळेस त्यास 'नाईक' हा किताब व फलटणची देशमुखी मिळाली. पुढें आदिलशाहींत निंबाळकरांचें महत्त्व विशेष वाढलें. निंबराजापासून चवदावा पुरुष वणंगपाळ उर्फ जगपाळराव म्हणून झाला, त्याच्या पूर्वींची माहिती उपलब्ध नाहीं.

जगपाळराव हा शूर व फौजबंद होता. स. १५६९ च्या सुमारास तो फलटणचा कारभार पाहूं लागला हिंगणी बेरडीचे भोंसले दरसाल चैत्रांत शंभुमहादेवाच्या यात्रेस जात. रस्त्यांत त्यांचा मुक्काम फलटणास निंबाळकरांकडे होई. बाबाजी भोंसल्याचे दोघे मुलगे मालोजी व विठोजी हे जगपाळरावाचे समवयीच होते. भोंसले बंधूंची इभ्रत, ज्वानी व हिंमत पाहून त्या उभयतांचा ऋणानुबंध वाढला. जगपाळराव आजूबाजूस आपला प्रदेश वाढवीत होता, त्या कामीं त्यास मालोजी व विठोजीचा चांगला उपयोग झाला. असें सांगतात कीं, स. १५९०–९२ च्या सुमारास जगपाळरावाची फौज कोल्हापुरकडील कांहीं प्रांत जिंकीत असतां, त्याजवर आदिलशहाची फौज चालून आली. पुढें लढाई झाली, तींत भोंसलेबंधूंनीं शौर्य प्रगट करून जगपाळरावाची बाजू संभाळिली. ह्यामुळें त्या उभयतांचा स्नेह वृद्धिंगत झाला. पुढें भोंसल्यांचा भाग्योदय झालेला पाहून जगपाळरावानें आपली बहीण मालोजीस दिली. हीच शहाजीची आई दीपाबाई होय. पुढें जगपाळरावाच्या मदतीनें जिजाबाईचें लग्न शहाजीशीं झालें. शहाजीनें निजामशाहीच्या तर्फेनें शहाजहानशीं युद्ध केलें, त्यांत जगपाळरावानें शहाजीस मदत केली ह्या लढाईंतच जगपाळराव स. १६२९ त अहंमदनगरजवळ मरण पावला.

पश्चात त्याचा प्रौढ मुलगा मुधोजीराव (दुसरा) फलटणचा अधिकारी झाला. त्याला दोन बायका असून वडील बायकोला साबाजीराव व जगदेवराव, आणि धाकटीला बजाजीराव व सईबाई अशीं मुलें होतीं. ह्या सावत्र मुलांत तंटे लागून ते विकोपास गेले. साबाजी व जगदेव हे दोघे घर सोडून मातुश्रीसह विजापुरास गेले. तेथें दरबारांत खटपट केल्यावर त्यांस दहिगांव व भाळवणी हे दोन गांव स्वतंत्र तोडून मिळाले (१६३४). अशा रीतीनें निंबाळकरांच्या तीन स्वतंत्र शाखा झाल्या. ह्या गृहकलहामुळें जहागिरीचें नुकसान झालें. मुधोजीराव आजूबाजूस पुंडावे करूं लागला म्हणून त्यावर आदिलशहाची फौज चालून आली; त्याचा पराभव होऊन, आदिलशहानें त्यास बंडखोर ठरवून साताऱ्याच्या किल्ल्यावर कैदेंत ठेविलें (स. १६३१). येथें तो सात वर्षें होता. त्या मुदतींत फलटणची जहागीर जप्त होती. मुधोजीनें आपली धाकटी बायको व तिचीं मुलें बजाजी व सईबाई यांस, आपल्याजवळ बोलावून घेतलें. पुढें शहाजी विजापूरच्या नोकरींत राहिल्यावर त्यानें आपलें वजन खर्च करून मुधोजीची (१६३८) सुटका करविली. ह्या उपकारामुळें मुधोजीनें आपली मुलगी शिवाजीस दिली (१६३९).

शिवाजीनें पुढें जो स्वतंत्र होण्याचा उपक्रम चालविला त्यास मुधोजीचें साहाय्य होतें ही गोष्ट विजापूरदरबारास खपत नव्हती. शिवाय मुधोजीच्या मनांत असें होतें कीं, आपल्या पश्चात फलटणचा कारभार बजाजीस मिळावा. ह्या गोष्टीस त्याचे वडील मुलगे कबूल नव्हते. ते विजापूरची मदत घेऊन मुधोजीवर चालून आले. शिरवळनजीक भोळी येथें लढाई होऊन मुधोजी एका वडाच्या झाडाखालीं पुत्राच्या हातून मारला गेला, त्यास बापमारीचा वड असें म्हणतात (इ. स. १६४४). ह्या लढाईंत बजाजीस कैद करून विजापुरास नेलें. तेथें बापाच्या अपराधाबद्दल त्यास जिवें मारण्याची आज्ञा झाली. परंतु आदिलशहाच्या मुलीनें त्याला बाटवून त्याच्याशीं लग्न केल्यानें त्याची शिक्षा रद्द झाली. बजाजी कांहीं काळ विजापुरीं राहिल्यावर देशमुखीचें फर्मान घेऊन फलटणास आला (१६५१). फलटणास अद्यापि बजाजीची समाधि (घुमट) आहे. त्यास पुढें जिजाबाईनें शंभुमहादेवाच्या देवळांत प्रायश्चित्त देऊन परत जातींत घेतलें आणि त्याचा मुलगा महादजी ह्यास शिवाजीची मुलगी सखूबाई दिली.

इ. स. १६६१ च्या पावसाळ्यानंतर आदिलशहा कर्नाटकांतील बंडें मोडण्याकरितां त्या प्रांतीं गेला तेव्हां बजाजी त्याच्याबरोबर होता. इ. स १६६५ (नोव्हेंबर) त मोंगल व शिवाजी यांचें संयुक्त सैन्य विजापूरच्या मोहिमेवर निघालें. तेव्हां त्यांनीं प्रथम बजाजीपासून फलटण, व ताथवड्याचा

किल्ला घेतला. हीं ठाणीं पुढें १० वर्षांनीं वजाजीनें मोंगलांपासून परत घेतलीं. वजाजीचो मदत शिवाजीस गुप्तपणें असे. वजाजीच्या मुसुलमान बायकोस मूल झाल्याचें दिसत नाहीं. हिंदु स्त्री सावित्रीबाई हिला महादजी, मुधोजी व वणगोजी (तिसरा) अशीं मुलें होतीं. महादजी हा शिवाजीचा जांवई असून त्याचा एक सरदार होता. तो बहुशः कर्नाटकाकडे असे. संभाजीला त्याची चांगली मदत झाली. संभाजीचा वध झाल्यावर औरंगझेबानें या नवराबायकोस पकडून ग्वाल्हेरीच्या किल्ल्यावर हयातीपर्यंत कैदेंत ठेविलें. शिवाजीनें मौजे वाल्हे ( जिल्हा पुणें ) येथील पाटिलकी जांवयास आंदण दिली होती. महादजीचा पुत्र वजाजी (दुसरा) हा स. १७७४ पर्यंत हयात होता. महादजीचा धाकटा भाऊ मुधोजी, त्याचा मुलगा वजाजी ( तिसरा ) यास राजाराम छत्रपतींची मुलगी सावित्रीबाई दिली होती पहिला वजाजी स १६७६च्या सुमारास वारला. त्यावर त्याचा तिसरा पुत्र वणगोजी ( १६७६–९३ ) गादीवर आला; याची विशेप माहिती आढळत नाहीं. त्याच्यानंतर जानोजीस ( १६९३–१७४८ ) गादी मिळाली. हा पेशव्यांस मिळून मिसळून वागे. त्याचा मुलगा मुधोजी ( तिसरा–१७४८–६५ ) यानें (तिसऱ्या) मालोजीस दत्तक घेतलें. मुधोजीच्या पश्चात दत्तकाबद्दल भांडण होऊन, सखारामबापू यांच्या सल्ल्यानें पेशव्यानीं फलटणास जप्ती पाठविली. त्या वेळीं मुधोजीच्या सगुणाबाई नांवाच्या स्त्रीनें जप्तीवाल्यांशीं लढाई केली तेव्हां पेशव्यानीं जहागीर जप्त करून ती मुधोजी बिन वजाजी नांवाच्या एका भाऊबंदाकडे चालविली. बाई त्रासानें ६ वर्षे वालेघाटी जाऊन राहिली. पुढें जेजुरीस पुन्हां दत्तकाची चौकशी होऊन व पेशव्यांना लाख रुपये नजर देऊन मालोजीनें जहागिरीचा ताबा मिळविला ( १७७४ ). मालोजी हा पेशव्यांबरोबर चाकरीस असे व जहागिरीचा कारभार सगुणाबाई करीत असे. या घराण्यांत ही बाई फार प्रख्यात झाली. मालोजी हा कर्नाटकांत हरिपंततात्याच्यावरोवर असतां वाघ्यानें मेला(१७७७). त्यानें जानराव यास दत्तक घेतलें होतें. जानराव हा बापाप्रमाणेंच पेशव्यांच्या सैन्यांत असे व सगुणाबाईच जहागिरीचा कारभार पाही. ती स. १७९१ त वारल्यावर, जानराव स्वतः कारभार पाहूं लागला. तो स.१८२५त वारला. त्यावर त्याची बायको साहेबजीबाई हिनें स.१८५३ पर्यंत कारभार केला. तिनें मुधोजीराव बापूसाहेब यांना १८४० त दत्तक घेतलें. त्यांना स. १८६०त संस्थानचा अधिकार मिळाला. त्यांनीं पुष्कळ वर्षे राज्य केलें. त्यांनीं संस्थानांत बऱ्याच सुधारणा केल्या. फलटणास पाणीपुरवठयाची योजना केली, मोफत शिक्षण सुरू केलें. हल्लीं ( १९२५ नोव्हेंबर ) त्यांचे दत्तक चिरंजीव श्री. मालोजीराव नानासाहेब हे गादीवर आहेत. [ इ.सं.; फलटणची हकीकत; वाड—कैफियती; डफ; म. रि. म. वि. २]

**फलिया**—पंजाब, गुजराथ जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ १०३७ चौरस मैल. लो. सं. (१९२१ )२७८२९४. हींत खेडीं ४२० असून मुख्य शहर फलिया आहे.

**फलुस**—ही एक फळांतील शर्करा असून हें एक कर्बोज्जित आहे याची सारणी $क_६ उ_{१२} प्र_६$ आहे. ही दक्षिण ध्रुवी चिक्कुसबरोबर आढळते. उंसापासून मिळणाऱ्या शर्करेवर क्षीण गंधकाम्लाच्या योगानें जलक्रिया केली असतां मिळणाऱ्या शर्करांच्या मिश्रणांतील शर्करांचे ध्रुव बदलून फलुस तयार करतात. उंसापासून मिळणाऱ्या शर्करेवर जलक्रिया केली असतां चिक्कुस व फलुसचें मिश्रण मिळतें. हें मिश्रण अम्लविरहित करून आटवितात. नंतर त्यांतवर्फामध्यें थंड करून –पाणी मिसळून त्यांत खट–उज्जित मिळविलें असतां फलुसचें शर्करित मिळतें. हें गाळून घेतात. व पाण्यांत तरंगत ठेवून कर्ब–द्वि–प्राणिदाच्या योगानें विघटित करतात. विघटन होऊन राहिलेला द्रव गाळून घेऊन मिळालेला पाक अल्कहलनें धुवून काढतात. हेंच जास्त थंड केलें असतां फलुस वेगळें होऊन पाक–रूपानें सुयासारख्या घनरूपामध्यें किंवा चूर्णरूपानें मिळतें. ह्या शर्करेचा वितळण्याचा बिंदु ९५° आहे. ही शर्करा साध्या शर्करेपेक्षां गोड असून लवकर पचली जाते. हिच्या योगानें लघ्वीमधील शर्करा वाढत नसल्यानें मधुमेहविकारग्रस्तांस देण्यास हिचा उपयोग करतात. रासायनिक दृष्ट्या हें एक प्राणयुक्त कितिन आहे कारण हिचें रूपांतर मिथिल–ब्युटिल द्राविक अम्लामध्यें करतां येतें. शर्करा ज्या वर्गांत येते त्या वर्गांतील हीच तेवढी किण्वाच्या योगानें आंबविली जाते व हिच्या ठिकाणीं अनाम्लिक ताम्र किंवा–रजतद्रवाचें उज्जीकरण करण्याचा गुणधर्म आहे. उत्प्राणिलें व कितिन–पद जवळजवळ एक असून दोन्हींचेंहि प्राणिदीकरण होत असल्याचें दृष्टोपत्तीस येतें.

**फलोदी**—राजपुताना, जोधपूर संस्थानातील फलोदी जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें जोधपूर शहरापासून वायव्येस ७० मैलावर आहे. लो. सं. ( १९११ ) १३८२५. हें मोठें भरभराटीचें शहर असून येथें बरेच व्यापारी राहतात. त्यांचा व्यापार हिंदुस्थानच्या परदेशांशीं चालतो. इमारती कोरींव व चिरेबंदी असून सुंदर आहेत. धातूंचीं भांडीं व उंटाच्या केसाच्या चटया येथें तयार करतात. फलोदी १५ व्या शतकाच्या मध्य भागीं वसविलें होतें असें म्हणतात. मालदेवरावांनीं १६ व्या शतकात तें घेतलें होतें. नंतर अकबरानें जेसलमीर संस्थानाला तें देऊन टाकलें. परंतु लवकरच तें बिकानेरला जोडण्यांत आलें. या ठिकाणीं एक किल्ला असून त्यावर उत्तम पाणी व एक सुंदर महाल आहे.

**फॅशोडा**—आफ्रिका, सुदन. वरच्या नाईलच्या पश्चिम तीरावरील एक ठाणें. हें खार्टूमच्या दक्षिणेस नदीमार्गानें ४५९ मैलांवर आहे. या ठिकाणजवळच शिलुक राष्ट्र जातीच्या राजाचें निवासस्थान आहे. स. १८७५ त फॅशोडा

येथें एक लष्करी ठाणें बांधण्यांत आलें. पुढें तें व्यापारी ठाणें झालें.१८८३--८४ सालीं तें माह्वादींच्या लोकांच्या हातीं गेलें. तारीख १० जुलै १८९८ रोजीं कांगो स्टेट येथील फ्रेंच सैन्यानें तें काबीज केलें. पण डिसेंबरांत फॅशोडा सुदान सरकारला परत मिळालें.

**फाझिल्का**—पंजाब, फिरोझपूर जिल्ह्याची एक तहशील व पोटविभाग. क्षेत्रफळ १३३९ चौ. मैल लो. सं. (१९२१) २९०९३५ यांत एक गांव--फाझिल्का ( मुख्य ठिकाण ) व खेडीं ३१९ आहेत.

**फायलो**—हा ग्रीक तत्त्ववेत्ता ख्रि पू. ५० वर्षांच्या सुमारास जन्मला. मिथ्रेडेटिक लढायांच्या वेळीं यानें अथेन्स सोडलें व रोममध्यें जाऊन राहिला. हा क्लिटोमॅकसचा शिष्य होता व क्लिटोमॅकसच्या निधनानंतर त्याच्या जागेचा अधिकार (म्हणजे नव्या विद्यापीठाचा) याच्याकडे आला.रोम येथें हा साहित्यशास्त्र व तत्त्वज्ञान हे विषय शिकवीत असे. त्याच्या शिष्यांपैकीं सिसरो हा प्रसिद्ध आहे.याचें तत्त्वज्ञानासंबंधीं मत तत्कालिन अज्ञेयवादाच्या अगदीं विरुद्ध होतें. जुना करार व ग्रीक तत्त्वज्ञान यांमध्यें ऐक्य घडवून आणावें असा याचा हेतु होता. परमेश्वरासंबंधीं याचें असें मत होतें कीं, ( १ ) तो सर्वनिर्मित वस्तूंच्या वर आहे. ( २ ) जग, आकाश, तारका वगैरे तन्निर्मित गोष्टींपासून त्याच्या अस्तित्त्वाची खात्री पटते. ( ३ ) त्यास कोणतेंहि विशेषण लावतां येणें शक्य नाहीं. नीतिशास्त्र—शरीर आत्म्याला नेहमीं पापमार्गाकडे जाण्यास उद्युक्त करीत असतें,म्हणून शरीराच्या बंधनापासून आत्म्यास मुक्त करून घेणें हें प्रत्येक मनुष्याचें आद्यकर्तव्य होय असें याचें म्हणणें होतें

**फारशी वाङ्मय**—फारशी अथवा पर्शियन राष्ट्रीय काव्याला आरंभ केव्हांपासून झाला यावद्दल पर्शियन इतिहासकारांमध्ये मतभेद आहे.सस्सानियन राज्यकर्त्यांनीं आपल्या राष्ट्रांतील वाङ्मयाची आवड वाढविली हें निर्विवाद आहे. जुन्या पर्शियन भाषेमध्ये ९ व्या व १० व्या शतकांत अरबी शब्दांचें मिश्रण होऊन बनलेली जी पहूलवी भाषा गेल्या हजार वर्षें कायम राहिली आहे तिचा या लेखांत विचार कर्तव्य नाहीं.९व्या शतकाच्या आरंभीं राष्ट्रीय स्वातंत्र्य व राष्ट्रीय वाङ्मय यांवद्दलच्या चळवळीस खरा आरंभ झाला. स. ८०९ मध्ये अब्बास नांवाच्या कवीनें अर्वाचीन पर्शियन भाषेमध्यें पहिली कविता लिहिली. त्याच सुमारास खलीफांचा अम्मल नाहींसा होऊन खऱ्या तद्देशीय राजवंशाचा अम्मल सुरू झाला होता. तत्कालीन पर्शियन लेखकांच्या पुढें नव्या इस्लामी धर्मानें लादलेल्या कल्पनांचा आपल्या प्राचीन आर्यन कल्पनांशीं मेळ घालण्याचें मुख्य काम होतें; मुसुलमानी धर्मांतील द्वितत्त्ववादाचे ( डीइझमनें ) तत्त्व आपल्या जन्मसिद्ध उच्चतर सर्वेश्वरी मताशीं त्याला जमवून घ्यावयाचें होतें.

१० व्या शतकामध्यें २ रा अमीर नासर यांच्या आश्रयाखालीं अबुल-अबास, अबुलअबदल्ला,महंमद,खुसवानी, रुदगी, वगैरे भाट लोक होऊन गेले. त्यावेळच्या सामानिद राजांनीं ऐतिहासिक संशोधन, वैद्यकाचा अभ्यास वगैरे गोष्टींनांहि उत्तेजन दिलें. बलभीनें तावरी नामक ग्रंथकाराच्या अरबीमधील जगाचा इतिहास या ग्रंथाचें पर्शियनमध्ये भाषान्तर केलें. शिवाय तावरीच्या तफसीर नांवाच्या कुराणावरील टीकेचेंहि भाषान्तर करविण्यांत आलें..स. ९७६च्या सुमारास दकीकी नामक राजकवीनें खोदाईनामा(राजाचें पुस्तक) याचें पर्शियनमध्यें काव्यबद्ध भाषान्तर करण्यास सुरवात केली होती; पण तो लवकरच मारला गेला. पण तें काम फर्दोसी नामक अधिक बुद्धिमान व समर्थ कवीनें ( ९४०-१०२० ) पुरें केलें. या फर्दोसीपासून पर्शियांतील राष्ट्रीय महाकाव्याच्या सुवर्णयुगाला आरंभ होतो. फर्दोसीनें ३५ वर्षें अव्याहत परिश्रम करून १०११ सालीं आपला अवाढव्य व अजरामर ग्रंथ शाहनामा हा पुरा केला. होमरच्या ग्रंथाच्या तोडीचें शाहनामा हें पौरस्त्य बुद्धिमत्ता व विद्वत्ता यांचें अत्यंत उज्वल स्मारक आहे, असें सर डब्ल्यू. जोन्सनें म्हटलें आहे. शाहनामा प्रसिद्ध झाल्यापासून त्यानें लोकांच्या मनावर अशी कांहीं अनिवार्य मोहिनी घातली होती कीं, तावडतोब शाहनामाच्या नक्कलवजा ग्रंथ लिहिण्यास सुरवात झाली; व शाहनामाच्या धर्तीवर अनेक ऐतिहासिक काव्यें निर्माण झालीं. अलीअहमद अलअसदी यानें स.१०६६त युद्धविषयक अशा ९००० गोष्टींचा संग्रह तयार केला. सामानामामध्यें रुस्तुमच्या आजाचीं शौर्यकृत्यें वर्णन केलीं आहेत. याशिवाय जहांगीरनामा, फरामुर्झनामा, बाबु गुशास्पनामा, वर्झुनामा, शाहीयरनामा, व्रह्मन्नामा इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

याप्रमाणें प्राचीन इराणी ऐतिहासिक गोष्टी सर्व खलास झाल्यावर बारीकसारीक गोष्टींच्या आधारावरच कित्येक काव्यें झालीं व सर्व गोष्टी संपल्यावर मग निव्वळ काल्पनिक गोष्टी व काव्यें लिहिण्यास सुरवात झाली. व त्यावेळीं पद्यस्वरूप जाऊन गद्यामध्ये अनेक कादंबऱ्या व अद्भुत गोष्टी लिहिल्या गेल्या. त्यांत बुस्तान-इ-खयाल ( कल्पनेचें उद्यान ) या अद्भुतरम्य कादंबरीचे १५ मोठे भाग आहेत. अंबियानामा, इमला-इ-हैदरी, फरहनामा-इ-फतिमा, हातीमताईच्या गोष्टी वगैरे खऱ्या चरित्रात्मक व इतर निव्वळ काल्पनिक गोष्टी प्रसिद्ध आहेत.

ऐतिहासिक काव्यें लिहून सर्व प्राचीन ऐतिहासिक गोष्टी खलास झाल्यावर केवळ काल्पनिक कथाहि बऱ्याच निर्माण झाल्या. परंतु फर्दोसीच्या शहानामाची आवड इतकी अनावर होती कीं, पुन्हां पुन्हां तसलेच ऐतिहासिक चरित्रपर लेख लिहिण्याची परंपरा चालू राहिली. प्राचीन ऐतिहासिक विषय समाप्त झाल्यामुळें १६ व्या शतकापासून अलीकडीलहि राज्यकर्त्यांचीं चरित्रें व इतिहास लिहिले गेले. हातीफीचा तैमूरनामा,इन्नातीचा शाहनामा-इ-नादिरी, शाहिनशाहानामा,

जार्जनामा ( सन १६००–१८१७ पर्यंतचा हिंदुस्थानचा इतिहास),झाफरनामा–इ–शहाजहानी, अदिलनामा ( विजापूरच्या आदिलशहाचा इतिहास ), तवारिख-इ कुली कुतुबशहा ( गोवळकोंडयाच्या), फतनामा-इ-टिप्पुसुलतान इत्यादि अगदीं अलीकडील राजांबद्दलचेहि इतिहासग्रंथ झालेले आहेत.

कविश्रेष्ठ फर्दोसी याचे शाहनामा या महाकाव्याखेरीज दुसरेहि ग्रंथ आहेत.अद्भूतरम्य,उपदेशात्मक व गूढार्थक हीं तिन्ही प्रकारचीं काव्यें लिहिण्यास त्यानें प्रथम उत्तेजन दिलें. फर्दोसीचा यूसफ–उ–झलीखा हा दुसरा मोठा काव्यग्रंथ आहे. त्यांत बायबलमधील जुनी जोसेफ ही गोष्ट आली आहे. जोसेफच्या गोष्टीनें तर पर्शियांतील कवींनां फारच मोहून टाकिलें आहे. सुलतानाच्या केवळ स्तुतिपर कविता लिहिण्याचा-फर्दोसीनें व सुलतान महमूदच्या पदरच्या इतर कवींनीं जो प्रघात पाडला तो पुढें फार वाढत गेला. परंतु इराण, अफगाणिस्तान वगैरे मुसुलमानी देशांत राज्यक्रांत्या होऊन वरचेवर राजघराणीं बदलत असल्यामुळें या कवींपैकीं कित्येकांवर देहान्तशिक्षादि घोर प्रसंग गुदरले. या कवींपैकीं अन्सारी हा ज्योतिषादि विषयांतहि मोठा विद्वान व उच्च दर्जाचा कवि होता. खाकानी हा दुसरा कवि त्याच्या तोडीचा होता.

याप्रमाणें दुसरे अनेक स्तुतिकाव्यलेखक १२ व्या व १३ व्या शतकांत होऊन गेले. फर्दोसीच्या शाहनाम्यांत नित्युपदेशपर वचनेंहि पुष्कळ आलेलीं आहेत. परंतु केवळ नीत्युपदेशपर, धार्मिक व तत्त्वज्ञपर ग्रंथ लिहिण्याची एक निराळी पद्धत पडून सुफी पंथाचीं तत्त्वें वर्णन करून सांगणारें काव्य लिहिणारा खोरासान येथें अबू सय्यद म्हणून पहिला कवि ( ९६८–१०४९ ) होऊन गेला. नासीर खुश्रूचा रौपनाइनामा नांवाचा असलाच काव्यग्रंथ आहे. हिरात येथील अबदुल्ला असान्सीचा मुनाजात, गझनीच्या हकीम-सनाईचा हदिकत–उल्हकीत, पंदनामा, मंतिक–उत्तैर वगैरे धर्मोपदेशपर कविताग्रंथ आहेत.

वर सांगितलेल्या सुफीधर्मपर लेखकवर्गाहून अगदीं भिन्न म्हणजे केवळ नीतिपर ग्रंथ लिहिणारा असा शिराझ येथील शेख सादी हा होय. त्याचे बोस्तां आणि गुलीस्तां हे दोन अत्यंत प्रसिद्ध ग्रंथ आहेत. पुढें त्यांच्याच नमुन्यावर दस्तुरनामा,गुलझार, निगारीस्तां, बहारीस्तां वगैरे ग्रंथ झाले. तथापि या नमुन्याचे ग्रंथ एकंदरींत थोडेच आहेत. सुफीधर्मज्ञानपर दुसरें ग्रंथ लमयात, गुलशन-इ राझ, मिहर-उ मुश्तरी, हुसन--उ -दिल, शहा--उ-गदा, नानव--उ -हलवा, शीर-उ--शकर इत्यादि ग्रंथ पुष्कळ आहेत.

वरील काव्यप्रकारांबरोबर रसात्मक काव्यलेखनहि चालू होतेंच. प्रेम आणि सुरा यांच्या सौख्यवर्णनपर काव्यें पुष्कळ आहेत. त्यांत हाफीझ या अप्रतिम बुद्धीच्या कवीनें रसात्मक काव्याचे उत्कृष्ट नमुने जगांत करून ठेविले आहेत; व त्याच्या पद्धतीवर सर्व गझल–लेखकांनीं काव्यें लिहिलीं आहेत. नौई कवीनें अकबराच्या कारकीर्दींत पतीबरोबर सती गेलेल्या एका हिंदु राजपत्नीवर सूझ-उ-गुदाझ नांवाचें काव्य लिहिलें आहे. दिल्ली येथें अमीर हसन व अमीर खुश्रू हे दोन मोठे प्रसिद्ध कवी होऊन गेले. शिवाय अलाउद्दीन खिलजी ( १२९६-- १३१६ ), फेरोझशहा, कुतुबुद्दीन मुबारिक, हुमायून, अकबर वगैरे राजकर्त्यांचे पद्यमय इतिहास लिहून ठेविले आहेत.

**नाटकें**—इराणच्या या राष्ट्रीय वाङ्मयाच्या इतिहासांत नाटकग्रंथांचाहि उल्लेख केला पाहिजे, कारण ९ व्या शतकापासूनच नाटकें लिहिलीं गेलीं आहेत. इराणांत ग्रीसप्रमाणेंच नाट्यप्रयोग हें एक धार्मिक उत्सवाचें अंग मानीत असत व कित्येक शतकें मोहरमच्या महिन्यांतील पहिल्या दहा दिवसांत असले नाट्यप्रयोग केले जात असत. त्या नाटकांत बहुतकरून इराणांतील अली खलीफाच्या घराण्यावर गुदरलेल्या दुःखकारक प्रसंगांचें व अलीचा मुलगा हुसेन व त्याचें कुटुंब यांच्या करबला येथील लढाईंत झालेल्या कत्तलीचें वर्णन असे. परंतु अलीकडे हें आकुंचित क्षेत्र सोडून अनेक तद्देशीय व परकीय कथानकांवर नाटकें होऊं लागलीं आहेत. बायबलमधील व इतर खिस्ती गोष्टींबद्दलचीं नाटकें इराणांत होऊं लागलीं आहेत.

**ऐतिहासिक ग्रंथ.**—काव्य व कादंबरी याखेरीज इतरहि वाङ्मयांतील अनेक प्रकारांचे ग्रंथ निर्माण झालेले आहेत. या सर्वांमध्यें इतिहासपर ग्रंथाचा भाग अत्यंत महत्त्वाचा आहे. या इतिहासग्रंथांत मार्मिक टीकेचा अभाव व कित्येक ठिकाणीं अत्यंत कृत्रिम भाषा हे दोष असले तरी या ग्रंथांचा आधुनिक संशोधकांच्या कामाला अत्यंत उपयोग होण्यासारखा आहे. तसेंच हिंदुस्थानांतीलहि गझनीच्या सुलतान महमुदापासून तों अगदीं ब्रिटिश अमदानीपर्यंतचे अनेक इतिहासग्रंथ अगदीं अप्रतिम आहेत. सर एलियटचा हिंदुस्थानचा इतिहास ( १८६७–१८७८ ) या पुस्तकाच्या आठ भागांतहि त्याच ग्रंथांतील माहिती व प्रत्यक्ष भाषान्तरें दिलीं आहेत. त्याशिवाय पर्शियन लेखकांनीं जगाचे अनेक इतिहास, महंमूद व पहिले खलीफ याचे इतिहास, गझनवींपासून चालू कजर या इराणांतील घराण्यांची व चेंगीझखान व मोंगल आणि तैमूरलंग व त्याचे वंशज यांची सविस्तर हकीकत, इराणांतील अनेक पंथ व संप्रदायांचे इतिहास, आणि इराण व तुराण येथील पुष्कळ स्थानिक गोष्टी लिहून ठेविल्या आहेत.

इतिहासाच्या खालोखाल महत्त्वाचे ग्रंथ म्हटले म्हणजे भूगोलवर्णनपर, सृष्टिवर्णनपर व प्रवासवर्णनपर ग्रंथ होत. चरित्रपरग्रंथांत मुखझन–उल्घराईब हा ३००० कवींच्या चरित्रांचा ग्रंथ व इतर पुष्कळ आहेत. यांशिवाय तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, राजनीतिशास्त्र, धर्म, कायदा, गणित, ज्योतिष, वैद्यकशास्त्र, अरबी, फारशी, तुर्की भाषांचे व्याकरणग्रंथ व शब्दकोश इत्यादिकांचा केवळ नामनिर्देश करण्यापेक्षा

येथें जास्त लिहिण्यास सवड नाहीं. प्राचीन हिंदु काल्पनिक गोष्टी व दन्तकथा यांची पर्शियन भाषांतरें, सिंदबादनामा, संस्कृतांतील रामायण, महाभारत, भगवद्गीता, योगवाशिष्ठ, पुराणें, उपनिषदें इत्यादिकांचीं अकबराच्या कारर्दीत भाषान्तरें झालीं आहेत.

**फारीनहैट, गाब्रियल डानिअल** (१६८६-१७३६)- हा जर्मन असून याच्या आयुष्याचा बराचसा भाग इंग्लंड आणि हॉलंड देशांत गेला. यानें या सर्व काळांत पदार्थविज्ञानशास्त्राचा अभ्यास केला; व आपल्या निर्वाहाकरितां हवामानशास्त्राचीं उपकरणें तयार करण्याचा धंदा केला. यानें उष्णमानमापक यंत्रांत अनेक सुधारणा केल्या. यानें स्वतः एक उष्णमानमापक यंत्र बसविलें, व या यंत्रास त्याचें नांव दिलें गेलें आहे. आर्द्रतामापक (हायग्रोमीटर) यंत्राची त्यानें एक नवीन पद्धत बसविली आहे.

**फारुकी राजे**—हे राजे खानदेशावर स. १३७० पासून १६०० पर्यंत राज्य करीत होते. यांचा मूळ पुरुष, मलिक हा खलीफ उमर फारुकच्या वंशांतील तुर्क होता त्याचा बाप खानजेहान हा अल्लाउद्दीन खिलजीचा सरदार होता देवगिरीचें राज्य नाहींसें झाल्यावर हसन गंगूनें बंड उभारून खानदेश आपल्या ताब्यांत घेतला. फेरोझ तुघ्लखाचा प्राण शिकारींत वांचविल्यानें त्यानें मलिक यास खानदेशांतील तालनेर (हल्लींचें थाळनेर) व करवंद हे दोन परगणे जहागीर दिले. पुढें मलिकनें बागलाणच्या राजाला फेरोझचा मांडलिक बनवून त्याला पुष्कळ नजरनजराणे पाठविले. त्यामुळें फेरोझनें त्याला तीन हजारी दिली. नंतर मलिकने हळू हळू मुलूख काबीज केला. फेरोझ मेल्यावर (१३९०) मलिक हा जवळ जवळ स्वतंत्र झाला. त्यानें माळव्याच्या सुलतानाची सोयरीक करून नंदुरबार व सुलतानपूर या गुजराथी प्रांतांवर स्वारी केली. परंतु गुजराथच्या मुझाफरशहानें मलिकचा पराभव केला. यानंतर मरेपर्यंत मलिकनें आपल्या राज्यांत शेतीची सुधारणा करण्यांत काळ घालविला. याच्या कारकीर्दींत दुर्गादेवीचा दुष्काळ पडला होता. मरतांना त्यानें आपल्या मलिक नासीर या वडील मुलास गादीवर बसवून त्याला थाळनेरचा किल्ला व आपल्या इफ्तिखान नांवाच्या भावास लळींगचा किल्ला दिला (१३९९). त्याची सुंदर कबर अद्यापि थाळनेरास आहे.

म लि क ना सी र (१३९९-१४३७).—यानें प्रथम विश्वासघात व खून करून अशीरगड घेतला. तेथील मलिक आसा हा नासीरच्या बापाचा दोस्त असून त्याच्या मदतीनेंच त्यानें स्वतंत्र सत्ता स्थापिली होती. या वेळीं नासीरनें माझ्यावर बागलाण, खेर्डा, अंतूर येथील राजे चालून आले आहेत, म्हणून माझा कबिला गडांत घ्यावा अशी विनवणी करून, बुरख्याच्या पालख्यांतून सशस्त्र सैनिक पाठवून गडांत प्रवेश केला व आसाचा व त्याच्या सर्व मुलांचा खून करून गड घेतला; आणि तेथें आपलें राहण्याचें ठिकाण केलें. त्याचा गुरु झैनुद्दीन याच्या स्मरणार्थ त्यानें तापीच्या पूर्व थडीस झैनाबाद व बुऱ्हाणुद्दीन नांवाच्या एका अवलियाच्या स्मरणार्थ पश्चिमथडीस बुऱ्हाणपूर अशीं दोन गांवें वसविलीं. यानंतर बुऱ्हाणपूर ही या राजांची शेवटपर्यंत राजधानी झाली. नासीरनें आपल्या सासऱ्याच्या मदतीनें आपल्या धाकट्या भावास पकडून कैदेंत टाकून सुलतानपुरावर लढाई केली. परंतु गुजराथच्या पहिल्या अहमदशहानें त्यांना पिटाळून लाविलें. त्यावर नासीरनें अहमदशीं तह केला. अहमदानें त्याला श्वेत छत्र व शेंदरी तंबू (हीं स्वतंत्र राज्याचीं चिन्हें होत) पाठवून खान ही पदवी दिली. अबुल फजल म्हणतो कीं, एव्हांपासूनच खानदेशास तें नांव प्राप्त झालें. नासीरनें आपली मुलगी अहमद बहामनीच्या मुलास देऊन त्याच्या मदतीनें पुन्हां गुजराथेवर स्वारी केली, पण तींत शेवटीं त्याचा पराभव होऊन तो लळिंगच्या किल्ल्यांत कोंडला जाऊन मरण पावला. त्याचा मुलगा मिरान.

मि रा न अ दि ल खा न (१४३७ ते ४१)—यानें गुजराथच्या शहाची मदत घेऊन बहामनी सरदाराचा लळिंगचा वेढा उठविला. चार वर्षांनंतर त्याचा बुऱ्हाणपूर येथें खून झाला.

मि रा न मु बा रि क (१४४१ ते ५७).—हा आदिलचा मुलगा; यानें विशेष गडबड न करतां १७ वर्षें शांतपणें राज्य केलें.

अ दि ल दु स रा (१४५७ ते १५०३)—या नांवाच्या मुलानें ४६ वर्षांच्या राजवटींत आपलें राज्य भरभराटीस व मजबुतीस आणलें. त्यानें गोंडवन व गढामंडळ (गढा = म्हणजे हल्लींचें जबलपूर) येथील राजांना आपलें मांडलिक बनवून भिल्ल व कोळी या बाटमाऱ्यांचा बंदोबस्त केला. नंतर त्यानें ठराविक खंडणी न दिल्यानें गुजराथच्या महमूद बेगडयानें त्याच्यावर स्वारी करून सर्व खानदेश उध्वस्त केला व अशीरगडास वेढा घातला. शेवटीं अदिलनें सर्व खंडणी पावती केल्यावर तो परतला (१४९९). यानंतर चार वर्षांनीं अदिल मेला. त्यानें अशीरगडाची जास्त बळकटी केली, मलैगड बांधला, बुऱ्हाणपुरास बरेच राजवाडे बांधले व शाह-इ-झारकुंड (जंगलीशहा) ही पदवी घेतली. त्याचें थडगें बुऱ्हाणपुरास दौलतमैदानजवळील राजवाडयानजीक आहे.

दा ऊ द खा न (१५०३ ते १०).—हा अदिलचा धाकटा भाऊ; यानें नगरच्या निजामशहावर स्वारी करण्याचें ठरविलें असतां निजामशहानेंच त्याच्यावर हल्ला करून त्याला अशीरगडांत कोंडलें (१५०७). तेथून आपल्यास खंडणी देण्याच्या अटीवर माळव्याच्या शहानें त्याची सुटका केली.

अ दि ल ति स रा (१५११ ते २०).—दाऊदच्या नंतर त्याचा वडील मुलगा घाझी अथवा आझीम हा गादीवर

बसतो न बसतो तोंच थोड्या दिवसांत त्याचा खून झाला. नंतर त्याच्या अलम व अदिल या दोन भावांत भांडणें लागलीं. आलमला निजामशहाचें व अदिलला गुजराथच्या महंमद बेगड्याचें पाठबळ होतें. बेगड्यानें आपली नात अदिलला देऊन व पैशाची आणि सैन्याची मदत करून त्याला गादीवर बसविलें. राज्यांत स्वतःच्या विरुद्ध अनेक कट झाले असतां, व गुजराथच्या राजानेंहि त्रास दिला असतां अदिलनें आपली सत्ता बळकट करून दहा वर्षे राज्य केलें.

मि रा न मु ह म्म द (१५२०–२५).—या अदिलच्या मुलानें इमादशहाच्या मदतीनें बुऱ्हाण निजामवर स्वारी केली (१५२६). पण तींत याचा पराभव झाला. म्हणून पुन्हां गुजराथच्या बहादूरशहाच्या मदतीनें स्वारी करून अहमदनगर घेतलें. पुढें (१५३४) हुमायूननें बहादूरवर स्वारी केली असतां यानें बहादूरला मदत केली. बहादूर हा शत्रूच्या लोकांस हांकलून लावीत असतां दीव येथें मरण पावला (१५३५). तेव्हां मिरानला गुजराथचा शहा म्हणून कबूल करण्यांत आलें. त्याप्रमाणें तो अहमदाबादकडे जात असतां वाटेंतच मरण पावला.

मु बा रि क (१५३५–६६).—हा मिरानचा भाऊ; यानें गुजराथी सरदारांच्या विनंतीवरून बहादूरच्या पुतण्यास तेथलें राज्य देऊन त्या मोबदल्यांत सुलतानपूर व नंदुरबार हे परगणे मिळविले. पीर मुहम्मद नांवाच्या एका मोंगल सरदारानें १५६१ सालीं खानदेशांत स्वारी करून सर्व प्रांत बेचिराख केला व लोकांची कत्तल केली. परंतु तो लूट घेऊन जात असतां मुबारिकनें त्याला नर्मदेवर अडवून व लढाईंत ठार मारून लूट परत मिळविली; ३२ वर्षे राज्य करून मुबारिक मेला.

मि रा न मु ह म्म द दु स रा (१५६६–७६).—यानें गुजराथच्या गादीवर हक्क दाखविण्यासाठीं अहमदनगरावर स्वारी केली, परंतु तींत त्याचा पराभव झाला. पुढें अकबरबादशहाच्या मिर्झा नांवाच्या चुलतभावांनीं खानदेशांत शिरून खूप लुटालूट केली. इमादशहास मिराननें मदत केल्यामुळें मुर्तुझा निजामशहानें बुऱ्हाणपुरावर स्वारी करून व खानदेश लुटून अशीरगडास वेढा दिला. शेवटीं ४ लक्ष रुपये खंडणी घेऊन तो परत गेला (१५७४). यानंतर मिरान दोन वर्षांनीं मेला.

रा जा अ ली (१५७६–९६).—मिरानचा मुलगा लहान असल्यानें त्याचा भाऊ राजाअली हा गादीवर आला. हा शूर, धोरणी, बुद्धिमान असल्यानें, व अकबराचें महत्त्व वाढत चालल्याचें पाहून त्यानें त्याची अधिसत्ता कबूल केली. अकबराचा वऱ्हाडचा सुभेदार सलाबत यानें निजामशहाविरुद्ध आपल्यास राजाअलीनें मदत न केल्यामुळें बऱ्हाणपुर जाळून लुटलें.परंतु अलीनें त्याला नर्मदेवर गांठून त्याचा पराभव केला. पुढें अकबरानें निजामशहावर पुन्हां सैन्य पाठविलें. त्यांत पहिल्यानें अलीनें निजामशहास मदत केली, परंतु पुढें तो अकबरास मिळाला. त्यामुळें त्याला अकबरानें पंचहजारी बनवून खानदेश जहागीर दिला. मुरादच्या निजामशहावरील लढाईंत मोंगलांतर्फे लढत असतां सोनपतच्या लढाईंत हा ठार झाला. (१५९६).

बहादूरखान, (१५९६-.१५९९)—अलीचा हा मुलगा. यानें बुऱ्हाणपूरच्या पूर्वेस ३ कोसांवर बहादुरपूर वसविलें. दानियल (अकबराचा मुलगा) याचा मान ठेवला नाहीं व फौज जमवून तो स्वतंत्र बनला. तेव्हां स्वतः अकबरानें अशीरगडास वेढा दिला. गडांत युद्धसामुग्री भरपूर होती, परंतु बहादुरचें व त्याच्या नोकरांचें विशेष चांगलें नसल्यानें किल्ला पडला. अकबरानें बहादुरास ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत कैदेंत ठेवून खानदेश खालसा केलें. तत्कालीन यूरोपियन प्रवाशाच्या हकीकतीवरून त्यावेळीं खानदेश अत्यंत भरभराटलेला व श्रीमान होता. त्याची लांबी ७० व रुंदी ५० कोस होती. प्रांतांत मोठमोठ्या बाजारपेठा होत्या, खानदेशांत ३२ महाल होते व वसूल ३० लाख २१ हजारांचा होता. बुऱ्हाणपूर येथें निरनिराळ्या देशांतील लोक रहात होते तेथील जुम्मामशिदींत या राजांच्या वंशावळीचा एक संस्कृत शिलालेख आहे. [ऐने-ई-अकबरी; केंस ब्हॅलेज; इलियट, पु. ६; फेरिस्ता,पु. २, ६; बदौनी, पु. २; डफ; लॉक-डेक्कन हिस्टरी].

**फालकर्क**—स्कॉटलंड देशांतील स्टर्लिंगशायर परगण्यांतील म्युनिसिपल व पोलिसबरो. लोकसंख्या (१९२१) ३३३०८. फालकर्क व दुसरीं ४ गांवें मिळून पार्लमेंटसाठीं एक सभासद निवडतात. या जिल्ह्यांत कोळसा व लोखंड हीं विपूल सांपडतात.

फालकर्क हें शहर फार प्राचीन आहे. १२ व्या शतकांत याचें सध्यांचें नांव याला मिळालें. अँटोनियसची भिंत येथून जमिनींतून गेली आहे. या भागांत रोमन काळचे बरेच अवशेष सांपडतात.

**फालमथ**—इंग्लंडमधील कॉर्नवालचा म्युनिसिपालिटी व प्रतिनिधि भाग व बंदर. लंडनच्या पश्चिमनैर्ऋत्येस हें ३०६ मैलांवर आहे. लोकसंख्या (१९०१) ११७८९. फाल व पेनरिन नद्या येथें आहेत. शहराच्या पूर्वेस पेंडेनिस किल्ला आहे. शिल्पकामाचे, जहाज बांधण्याचे, दारूचे व खताचे कारखाने येथें आहेत.

**फॉसेट हेनरी** (१८३३–१८८४)—एक इंग्रज अर्थशास्त्रज्ञ व राजकारणी पुरुष. याचा बाप पार्लमेंटच्या निवडणुकीच्या चळवळींत भाग घेत असे व आईहि मोठी सामाजिक सुधारणावादी होती. हेनरी फॉसेटनें केंब्रिज येथें शिक्षण होऊन तो १८५६ मध्यें रँग्लरीच्या परीक्षेंत ७ वा आला. १८५६ च्या सप्टेंबरमध्यें बापाच्या शिकारीच्या

बंदुकीचे छरे त्याच्या आरशींचीं भिंगें फोडून डोळ्यांत शिरले व तो जन्माचा आंधळा बनला.

१८५९ पासून तो स्वतःचे लेख लिहून प्रसिद्ध करूं लागला व व्याख्यानें देऊं लागला. १८६३ मध्यें त्यानें आपला अर्थशास्त्रावरील ग्रंथ प्रसिद्ध केला; त्याच वर्षी त्याला केंब्रिज येथील अर्थशास्त्राच्या प्रोफेसराची जागा मिळाली. १८६५ सालीं तो पार्लमेंटांत निवडून आला. न्यूटन गॅरेट याच्या मुलीशीं १८६७ सालीं त्याचें लग्न झालें. मिसेस फॉसेट हीहि वाङ्मयव्यवसायांत व सामाजिक सुधारणांत भाग घेऊं लागून लेखन व व्याख्यानद्वारा विशेषतः स्त्रीमताधिकाराच्या चळवळीची, उच्च स्त्रीशिक्षणाची, व स्त्रीमजुरांकरितां स्वतंत्र कारखान्यांची पुरस्कर्ती बनली. फॉसेटला "सर्व कामन्ससभासदांपैकीं सर्वांत अधिक कट्टा आमूलसुधारणावादी" असें टाईम्स पत्रानें म्हटलें होतें.

१८५९ सालापासून १८८० पर्यंत फॉसेटनें आपलें सर्व लक्ष दोन गोष्टींकडे दिलें:- ( १ ) गांवानजीक, विशेषतः शहरानजीक सार्वजनिक मोकळीं मैदानें ठेवणें; व ( २ ) हिंदुस्थानचा जमाखर्च. हिंदुस्थानच्या बजेटांवर तर तो इतक्या बारकाईनें टीका करूं लागला कीं, हिंदुस्थानतर्फेचा सभासद असें टोपण नांवच त्याला मिळालें. हिंदुस्थानच्या बाबतींत प्रत्यक्ष सुधारणा जरी त्याला करतां आली नाहीं, तरी लोकांमध्यें त्यानें पुष्कळ जागृति उत्पन्न केली. १८७४ सालीं तो इंडियन फायनान्स कमेटीचा सभासद नेमला गेला.

१८८० सालीं पुन्हां ग्लॅडस्टनपक्ष अधिकारारूढ झाल्यावर त्याला पोस्टमास्टर–जनरलची जागा देण्यांत आली. या खात्यांत त्यानें पोस्टपार्सलें; तारांचे सहा पेन्स दर; अगदीं किरकोळ रकमा स्टांपांच्या रूपानें बँकेंत ठेवण्याची सोय, विमा व वर्षासनें वगैरे सुधारणा केल्या. शेवटच्या दोन बाबी सामान्य लोकांना समजावून सांगण्याकरितां 'काटकसरीस मदत' या नांवाचा निबंध लिहून त्याच्या लाख प्रती फुकट वांटविल्या. पोस्टऑफिसांत व इतर खात्यांतहि स्त्रियांना नोकरींत ठेवण्याच्या कामीं त्यानें पुरस्कार केला. प्रमाणशीर प्रतिनिधिपद्धति ( प्रपोर्शनल रिप्रेझेंटेशन ) आणि स्त्रीमताधिकार या दोन्ही गोष्टी त्याला प्रथमपासून शेवटपर्यंत मान्य होत्या. उत्तर वयांत डी. सी. एल् पदवी, रॉयल सोसायटीचा फेलो, व ग्लासगो युनिव्हर्सिटीचा लॉर्ड रेक्टर वगैरे मान त्याला मिळाले.

फॉसेट समाजसत्तावाद्यांना कट्टा विरोधी होता. मजुरांच्या कायद्यांना मात्र त्याची अनुकूलता असे, इतकेंच नव्हे तर शेतीच्या मजुरांनाहि ते लागू असावे, असें त्याचें मत होतें.

**फाहिआन**—फाहिआन उर्फ फाशीन हा चिनी प्रवाशी असून तो बौद्ध भिक्षु आणि ग्रंथकार होता. इ. स. ३९९–४१४ या अवधींत त्यानें प्रवास केला असावा. तो हिंदुस्थानास येण्यासाठीं सी गन फू येथून निघाला व चीनची मोठी भिंत ओलांडून, नंतर गोबीं वाळवंट ओलांडून शचौ, लोपनारमार्गे खोतान येथें आला. वाटेंतील भयाण व निर्मनुष्यक अशा रस्त्यांचें त्यानें फार बहारीचें वर्णन दिलें आहे. खोतानमध्यें त्याला बुद्धाचा उत्सव आढळून आला. येथें सर्व लोक बौद्ध असून त्यांच्यांत महायानपंथाचेंच प्राबल्य अधिक होतें. नंतर अतिशय संकटानें व धाडसानें तो पामीर ओलांडून उद्यान ( स्वात ) येथें आला व तेथून तक्षिला आणि पुरुषपूर ( पेशावर ) व शेवटीं पाटलीपुत्र येथें गेला. तो तीन वर्षें पाटलीपुत्र येथें व दोन वर्षें ताम्रलिप्ति ( तामलुक ) येथें राहिला. त्यावेळीं ताम्रलिप्ति हें महत्त्वाचें बंदर होतें. हिंदुस्थानांत येण्याचें कारण म्हणजे बुद्धचरित्रांमधील स्थळें पहावींत, बौद्धग्रंथांतील हकीकत जशीच्या तशी टिपून घ्यावी, विनयपिटकाची खरी प्रत मिळवावी व बौद्धभिक्षूंपासून शिकण्यासारखें असेल तें शिकावें हें होय. यामुळें तो बुद्धाच्या जन्मस्थानाला, पाटणाला व नजीकच असलेल्या गृध्रशिखराला गेला. तसेंच अयोध्या, मथुरा, कनोज इत्यादि ठिकाणीं तो हिंडला. त्यानें या ठिकाणांचीं दिलेलीं वर्णनें अस्पष्ट वाटतात.

ताम्रलिप्तीहून जलमार्गानें फाहिआन हा १४ दिवसांत सिलोन येथें आला. येथें त्यानें धर्मग्रंथ जमविले, बुद्धाच्या दांताचा उत्सव पाहिला. नंतर तो जावा येथें आला व तेथून वाटेमधील वादळांतून मोठ्या कष्टानें बाहेर पडून सुरक्षितपणानें यान्सेकियांग येथें सुरक्षित पोहोंचला. त्याचा हिंदुस्थानांतील मुक्काम चंद्रगुप्त ( दुसरा ) याच्या कारकीर्दींत झाला. जवळ जवळ सहा वर्षें (४०१-४१०) या राज्यांत तो होता.

फाहिआनचा ग्रंथ म्हणजे मध्य आशिया व हिंदुस्थानामध्यें बुद्धधर्माचें किती वर्चस्व होतें हें अजमावण्याचें उत्तम साधन आहे. तो आपल्या प्रवासाचें मोठ्या भक्तीनें व विद्वत्तापूर्ण असें वर्णन देतो. त्याची हकीकत काळजीपूर्वक व बिनचूक लिहिलेली असते. त्याचें बुद्धावरील प्रेम विलक्षण होतें. या प्रेमामुळें तो स्वतःच्या जन्मभूमीपेक्षां हिंदुस्थानलाच अधिक मानी. धर्माचा अभ्यास करण्यासाठींच मुख्यतः तो आला असल्यानें त्याच्या ग्रंथांत धर्मस्थितिव्यतिरिक्त हिंदुस्थानांतील इतर परिस्थितीचें वर्णन फारच थोडें आढळून येतें. तरी पण जी थोडी फार माहिती दिलेली आढळते ती विश्वसनीय व सुंदर आहे. दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या सत्तेखालील गंगा नदीकांठच्या प्रदेशांतील स्थिति त्यानें वर्णन केलेली आहे; व त्याच्यावरून गुप्त घराण्याच्या वेळची शासनपद्धति वगैरे उत्तम रीतीनें कळून येते. त्याच्या ग्रंथाचें फ्रेंच भाषेंत एक व इंग्लिश भाषेमध्यें चार अशीं भाषांतरें झालेलीं आहेत. [ स्मिथ–अर्ली. हि. इंडिया. ]

**फिजी**—फिजी बेटें दक्षिण पासिफिक महासागरामध्यें आहेत. त्यांच्या पश्चिमेस हेब्रिडीज बेटें आहेत. भूमध्यरेषेच्या दक्षिणेस १५ ते २२ या अंशांपर्यंत व १७७° पूर्व आणि १७८° पश्चिम रेखांश इतका त्यांचा विस्तार आहे. फिजीमध्यें एकंदर २५० बेटें असून त्यांपैकीं ८० बेटांत

लोकवस्ती आहे. १९२४ सालीं या बेटाचें क्षेत्रफळ ७०८३ चौरस मैल होतें व लोकसंख्या १५७२६६ होती. ज्या भागांत हा द्वीपसमूह आहे तो भाग अत्यंत सुपीक व दलदलीचा आहे. हा भाग पहाडी असून त्यांत हजारों फूट उंच सुळक्याचे असे कित्ती तरी पहाड आहेत. समुद्रकिनाऱ्यालगत नारळाचीं खूप झाडें असून रताळीं, बटाटे, नारिंगें इत्यादिकांचें उत्पन्न बरेंच होतें. गाय, बैल, घोडा, कुत्रीं, बकरीं, डुकरें, मांजरें इत्यादि प्राणी येथें बरेच आढळतात. ठिकठिकाणीं जंगलें असून वनस्पतींची समृद्धि आहे. रेवा ही प्रमुख नदी असून तींतून लहान जहाजें जाऊं शकतात. फिजीचें मुख्य उत्पन्न ऊंस, केळीं, व नारळ हें होय. त्यातल्यात्यांत उंसाची लागवड येथें मोठया प्रमाणावर होते. याशिवाय कापूस, कॉफी, मका, तंबाखू, अंडीं, तांदूळ वगैरेंचें उत्पन्नहि फिजीमध्यें होतें. दोरखंडें तयार करण्याकरतां केनफीचीहि लागवड करण्यांत आली आहे.

फिजीची राजधानी सुवा ही आहे. वीतिलेवु, वनुआलेवु, तवयनी, कन्दावू व रोटुमा हीं प्रमुख बेटें आहेत. फिजीमधील लोकांत मेलानेशियन व पॉलिनेशियन वंशांचें मिश्रण आढळतें. फिजीमधील रहिवाशी उंच व हाडानें बळकट आहेत. रहिवाशांच्या अंगावर थोडेच कपडे असतात. यांच्यांत सुंता करण्याची चाल आहे. स्त्रियांना बरेंच स्वातंत्र्य आहे. पूर्वी हे लोक नरमांसभक्षक होते. तथापि हे लोक मोठ्या दिलदार स्वभावाचे व दाक्षिण्यसंपन्न आहेत. शेती, सुतारकी वगैरे कामांत ते प्रवीण आहेत. नृत्य, वादन, इत्यादि ललितकलांचे ते फार शोकी आहेत. यांच्यांत पूर्वी पितृपूजा प्रचारांत होती. प्राचीन काळापासून त्यांच्यांत कुटुंबपद्धति अस्तित्वांत होती. हे आपल्या जातिनायकाला अत्यंत मान देतात. पूर्वी फिजीमधील विवाहपद्धति फार चमत्कारिक होती. एखाद्या गांवचा मनुष्य दुसऱ्या गांवच्या एखाद्या मुलीला पळवून आणी व मग वधूच्या गांवच्या लोकांमध्यें व वराच्या गांवच्या लोकांमध्यें लढाई होई व वरपक्षाचा गांव विजयी झाला तरच वराला ती वधू प्राप्त होई. तसेंच पतीच्या प्रेतावरोबर पत्नीला व त्याच्या मित्रमंडळींनाहि पुरण्यांत येत असे. पण हल्लीं तो प्रघात कमी झाला आहे. हल्लीं स्वतःच मुली आपला पती पसंत करतात. मृत मित्राबरोबर त्याच्या मित्रानें आपली करांगुलि कापून पुरण्याची चाल पूर्वी असे पण ती आतां बहुतेक बंद झाली आहे. यांच्यामध्यें पूर्वी लिपि नव्हती. ख्रिस्ती लोकांनीं येथें बऱ्याच शाळा उघडल्यापासून येथें रोमन लिपि प्रचारांत आली आहे. फिजीमधील पुष्कळांनीं ख्रिस्ती धर्माचाच स्वीकार केला आहे.

इतिहास.—फिजीसंबंधींची प्राचीन माहिती उपलब्ध नाहीं. १६४३ सालीं टस्मन नांवाच्या डच मनुष्यानें यांचा प्रथम शोध लावला. १७६९ सालीं कॅप्टन कुक या प्रवाशानें स्वतः फिजी बेटाला भेट दिली सुमारें १८१० सालापासून वेस्लियन मिशनऱ्यांनीं या भागांत वस्ती करण्यास सुरवात केली व त्यांनीं फिजीमधील जातिनायकांवर व लोकांवर आपलें वर्चस्व स्थापन केलें. १८४० सालीं अमेरिकन संशोधकांनीं या बेटांची काळजीपूर्वक पहाणी केली. फिजी बेटें वसाहतीला उत्कृष्ट आहेत असें डॉ. सीमननें जाहीर केल्यमुळें या ठिकाणीं लोकांची वस्ती भराभर होऊं लागली १८७४ सालीं हीं बेटें ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत आलीं. रटुमा नांवाच्या बेटाचा फिजींत १८७९ सालीं समावेश करण्यांत आला. ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत हीं बेटें आल्यापासून त्यांची भराभर सुधारणा होऊं लागली व तेथील व्यापाराला व उद्योगधंद्याला चालना मिळाली.

राज्यव्यवस्था.—ब्रिटिशसरकारकडून फिजीच्या राज्यकारभारासाठीं एक गव्हर्नर नेमण्यांत येतो. त्याच्या मदतीस एक कार्यकारी व एक कायदेमंडळ अशीं दोन मंडळें आहेत. या मंडळाचा अध्यक्ष गव्हर्नर असतो. कार्यकारी मंडळांत यूरोपियन सभासद ७ व फिजीमधील रहिवाशांतर्फे २ असे सभासद असतात. सरकारनियुक्त १२ सभासद असून त्यांपैकीं एक हिंदी असतो. फिजीच्या अंतर्गत व्यवस्थेसाठीं १७ प्रांत पाडण्यांत आले आहेत. त्यांपैकीं ६ प्रांतांवर एक फिजीमधील सरदार हा मुख्य असतो व बाकीच्या प्रांतांवर एक युरोपियन कमिशनर असतो. येथील मुख्य उत्पन्न म्हणजे बाहेरून येणाऱ्या मालावरील जकातीचें होय. स. १९२३ सालीं फिजी बेटांचें उत्पन्न ४७९८७२ पौंड व खर्च ४२९६६५ पौंड होता. १९२३ सालीं ७०९०८९ पौंडाच्या मालाची आयात व १४९२४९० पौंडांच्या मालाची निर्गत झाली. १९११ सालीं बिल्डिंग टॅक्स ऑर्डिनन्स नांवाचा एक कायदा पास होऊन त्या कायद्यान्वयें प्रत्येक घरावर कर बसविण्यांत आला.

हिंदुस्थानांतून फिजीमध्यें स. १९१७ पूर्वी मुदतबंदी करारानें दर वर्षी मजूर नेण्यांत येत असत; व त्यांना तेथें अत्यंत जुलमानें वागविण्यांत येई. यासंबंधींचा इतिहास ज्ञानकोश प्रस्तावना खंड, भाग पहिला, प्रकरण ९ वें यामध्यें पहा.

**फिनिशिया**—फिनिशिया हें नांव उत्तरेस एल्यूथेरसपासून दक्षिणेस माउंटकार्मेलपर्यंत पसरलेल्या सीरियाच्या समुद्रकिनाऱ्याला आहे. बैरुट एवढेंच कायतें बंदर सध्या मोठ्या जहाजांस लागण्यास योग्य आहे. प्राचीन बंदरें गाळानें बुजलीं आहेत. वंश, प्राचीन भाषा व इतिहास यांकरितां ज्ञानकोश प्रस्तावनाखंड भाग३, उत्तरार्ध पृ. ४८ ते ५२ पहा. इसवी सनापूर्वी ५३८ पर्यंतचा इतिहास वर उल्लेखिलेल्या ठिकाणीं दिला असल्यानें फक्त त्यापुढील इतिहास येथें आढळेल.

इराणी काळ (इ. पूर्वी ५३८–३६८).—फिनिशिया हें इराणी साम्राज्याच्या पांचव्या सत्रपींत सामील झालें. यांच्या आरमाराचा उपयोग इराणलाच चांगला होई. यावेळेस सिडन

प्रमुख शहर होतें. पहिल्या स्टॅटनच्या वेळेस टायर सॅलामिस येथील इव्हॅगोरास राजाच्या ताब्यांत गेलें. टेनेस राजाच्या अंमलाखालीं सिडननें इराणी लोकांच्याविरुद्ध बंड केलें व सीरिया आणि सिलीशिया या प्रांतांच्या सत्रपांस देशाबाहेर हांकून दिलें पण टेनेसनें विश्वासघातानें शहरचे दरवाजे दुसऱ्या अर्टाक्झर्सिझला उघडले. ५ व्या शतकाच्या शेवटापासून फिनिशियांत नाणीं पाडण्यास सुरवात झाली.

मॅसिडोनियन काळ (इ.स.पू. ३३३-६९).—इसूसच्या लढाईनंतर अलेक्झांडर फिनिशियांत शिरला. टायरखेरीज इतर सर्व शहरें त्याच्या स्वाधीन झालीं. तेव्हां ७ महिने वेढा देऊन त्यानें टायर घेतलें. तेव्हां कांहीं काळपर्यंत टायरचा राजकीय दर्जा कमी झाला. अलेक्झांड्रिया वसविल्यामुळें सर्व फिनिशियन शहरांचा व्यापार बुडाला. ख्रि. पू. ३१२त टायर अँटिगोनसपासून पहिल्या टॉलेमीनें घेतलें.ख्रि.पू. २८७ मध्ये तें सेल्यूकसच्या ताब्यांत आलें.ख्रि.पू.२१४त दुसऱ्या टॉलेमानें तें जिंकिलें. यावेळेपासून स्थानिक स्वराज्यामुळे याची भरभराट झाली. सिडनमध्यें राजसत्ता चालू होती. चवथ्या अँटिओकस एफिफेनसच्या मरणानंतर ख्रि. पू. १६४ त सेल्युसिद राज्याच्या नाशाचें पूर्वचिन्ह म्हणून सर्व सीरियांत बंडें उद्भवलीं.ख्रि. पू१२०—१११ त टायर व सिडन स्वतंत्र झालीं. नंतर ख्रि. पू. ८३—६९ पर्यंत हें सर्व राज्य आर्मीनियन टायग्रेनेसच्या ताब्यांत होतें.

ख्रि. पू. ६४त पांपेनें सर्व ठिकाणीं शांतता प्रस्थापित केली व फिनिशियाचा समावेश सीरियांत करण्यांत आला. ॲराडुस सिसन, टायर, व ट्रिपोलिस यांनां स्वतंत्रता देण्यांत आली. रोमच्या सत्तेखालीं सर्व शहरांची भरभराट होऊन त्यांचा व्यापार वाढला. ग्रीक संस्कृति व विचार यांचा अंमल वाढत चालला.

राज्यपद्धति.—'बुद्धपूर्व जग ' उत्तरार्ध, पृ. ५२ पहा.

नौनायन,व्यापार व वसाहती.—फिनिशिया हें दर्यावर्दी राष्ट्र होतें. हे लोक फार धाडसी असून व्यापारविषयक गोष्टी त्यांनीं दुसऱ्यास कळूं दिल्या नाहींत. ख्रिस्त पूर्व ७ व्या शतकारंभीं यांच्या आरमारानें आफ्रिकेस वळसा दिला होता. यांचीं जहाजें ग्रीकांच्या जहाजांहून चांगलीं असत. इराणानें यांच्या आरमाराची मदत ग्रीक युद्धांत घेतली.

टायरचा व्यापार दर्या व खुष्की या दोन्ही मार्गानें चालत असे. ईजिप्त, बाबिलोनिया या देशांशीं त्यांचा व्यापार होता. अरबकारवानांचा पश्चिमेशीं होणारा व्यापार फिनिशियनांच्या मार्फत होत असे. बहुतेक सर्व फिनिशियन वसाहती टायर येथील लोकांच्या होत्या. ग्रीक लोक फिनिशियन व्यापाऱ्यांचा द्वेष करीत, यामुळें त्यांनीं ग्रीसच्या बाजूस वसाहत केली नाहीं. भूमध्यसमुद्र, स्पेन, गॅडीरा ( केडीझ ) वगैरे ठिकाणीं त्यांच्या वसाहती होत्या. आफ्रिकेच्या वायव्य भागांत देखील कांहीं वसाहती होत्या. टायरचा मोठेपणा वसाहतींवर अवलंबून असे. टायरचा ऱ्हास झाल्यावर कार्थेजनें आपली सत्ता वसाहतींवर चालविली.

फिनिशियांतील शहरांत जांभळा रंग,कापड, सोन्याचांदीचें काम, कांचकाम वगैरे तयार होत. यांपैकीं बऱ्याच गोष्टी बाबिलोनियनापासून फिनिशियन लोकांनीं घेतल्या. त्याचप्रमाणें ह्या देशांतील चित्रकलेवर प्रथम ईजिप्त,बाबिलोनिया, व नंतर ग्रीक कलेची छाप दिसते. कबरा बांधण्याकडे या लोकांची विशेष प्रवृत्ति होती. ॲड्रोनीसचें मंदिर बर्लआलबेक्षाक छत्री ' एशमुना देवालय इत्यादि अवशेष सांपडले आहेत.

धर्म.—फिनिशियन लोक निसर्गपूजा करीत. यांचे सर्व देव भौतिक असत. यांपैकीं ॲशटार्टे, टॅनिथ, मेलक्कर्क, रेशेफ अथवा रेशुफ ह्या प्रसिद्ध देवता होत्या. संकटाच्या वेळीं अथवा राष्ट्रीय आपत्तीच्या प्रसंगीं नरमेध करण्याची यांच्यांत चाल होती.

फिनिशियन लोकांत मनुष्य व विश्व यांच्या उत्पत्तीविषयीं कांहीं पुराणकल्पना व दंतकथा प्रचलित होत्या; यांपैकीं कांहीं जेनेसेस ग्रंथांत आहेत. विश्वोत्पत्तीसंबंधीं दोन ग्रंथ उपलब्ध आहेत.

फिन्लंड—यूरोपमधील एक प्रजासत्ताक राज्य. फिन्लंड हे बोथ्निया व फिन्लंड या दोन आखातांच्या मध्यें वसलेलें आहे. उ. अक्षांश ५९° ४८' ते७०° ६' व पू. रेखांश १९°२'ते३२°५०'.क्षेत्रफळ १३२५५० चौरस मैल. स. १९२२ च्या खानेसुमारीवरून, फिन्लंडची लोकसंख्या त्या सालीं ३४३५२४९ होती असें दिसतें. नैर्ऋत्येकडील मूळचे रहिवासी जर्मॅनिक वंशाचे होते व पूर्वेकडील फिनिश-युग्रियन होत. याच लोकांनीं फिन्लंडमध्यें मोठी वसाहत केली. पूर्वी तेथील बहुतेक इमारती लांकडाच्या केलेल्या असत. स. ११५४ पासून सुरू झालेल्या स्वीडिश मुलुखगिरीमुळें फिन्लंडची परिस्थिति बदलूं लागली स्वीडनच्या सत्तेबरोबर ख्रिस्ती धर्मानेंहि फिन्लंडांत प्रवेश केला. आपली सत्ता अबाधित ठेवण्याकरितां व रशियापासून रक्षण करण्याकरितां स्वीडीशांनीं फिन्लंडांत अनेक दगडी किल्ले बांधले. सध्यां तेथें शेंकडा ११.६ इतकेच लोक स्वीडिश भाषा बोलतात. स्वीडिश भाषा बोलणाऱ्यांची विशेषतः ऑलॅंडमध्यें वस्ती असून त्यांची संख्या १९२० सालीं ३४१००० इतकी होती.

फिन्लंडमध्यें मुख्यतः शेती जास्त आहे, परंतु तेथें त्या बाबतींत सुधारणा फारशी झालेली नाहीं. एखादें जंगल शेतीकरितां तयार करावयाचें झाल्यास ते जंगल जाळून टाकण्याची तेथें पद्धत आहे. पण ही चाल घातुक असते. बटाटे, धान्यें, गहूं वगैरे पीक तेथें फार कमी होतें. धान्याचें गवतहि फार पिकतें. गुरांचें नीट संरक्षण झाल्यामुळें दुभत्याच्या धंद्याची तेथें चलती आहे. फिन्लंडहून लोणी परदेशीं पाठवितात. धान्य वगैरे परदेशाहून आणावें लागतें.स.१८८०

पासून जंगलवाढीकडे जास्त लक्ष देण्यांत आलें आहे व लांकूड, कागद इत्यादिकांच्या कारखान्यांचीहि वाढ झाली आहे.

उद्योगधंद्यांची वाढ.—निर्गत ज्या बंदरांतून होते अशीं कांहीं प्रसिद्ध बंदरें आहेत. विबोर्ग, कोटका, बॉरनेबोर्ग, वासा, व युलेआबोर्ग वगैरे बंदरें निर्गतीसाठीं प्रसिद्ध आहेत. हेलसिंगफोर्स व ॲबो हीं ठिकाणें आयात मालाचीं केंद्रें आहेत. टॅमरफोर्स हें शहर उद्योगधंद्याबद्दल प्रसिद्ध आहे. १९२४सालीं फिन्लंडमध्यें ४७१३३००फिनिश मार्कोच्या किंमतीच्या मालाची आयात व ४९६५६०० मार्कोच्या मालाची निर्गत झाली.

दळणवळण.—फिन्लंडांतील उद्योगधंद्यांची वाढ झाल्यामुळें दळणवळणाचीं साधनें अपुरीं पडूं लागलीं आहेत. राशियन लोकांनीं एका विशिष्ट हेतूनें रेल्वे सुरू केली होती. हेलसिंगफोर्स हें सध्यां फिनिश रेल्वेचें केन्द्रस्थान असून पेट्रोग्राड हेंच मुख्य ठिकाण बनलें आहे. हिंवाळयांत नेआण करण्याच्या बाबतींत बरेच अडथळे येतात व ॲबो आणि हँगो याच ठिकाणीं जातां येतें. हिंवाळयांत या ठिकाणाहून मालाची निर्गत होत असते. ज्या ठिकाणीं रेल्वेची सोय नाहीं अशा ठिकाणीं नौकांची सोय केली आहे. किनाऱ्यावरील नौकासंचार हिंवाळयांत बंदच असतो.

रस्ते.—फिन्लंडच्या उत्तरेकडील विभागांत बरेच रस्ते असून लॅन युलेबोर्ग येथें मोटारींच्या रस्त्यांचें जाळेंच पसरलें आहे. स. १९१० मधील डॉरपॅटच्या तहान्वयें, बोल्शेविकांनीं पेटसॅमोचा मुलुख फिन्लंडास देऊन टाकल्यामुळें फिन्लंडांत नवयुगाला आरंभ झाला असें म्हणतात. 'आर्टिक ओशन फिन्लंड' हा मुलूख सुधारणेच्या दृष्टीनें अगदीं प्राथमिक अवस्थेंतच आहे. आर्टिक समुद्रकिनाऱ्याच्या बाजूस फारसें बर्फ नसल्यामुळें तिकडे जाण्यास एक रस्ता तयार करण्यांत आला आहे.

राज्यकारभार व घटना.—१८०९ सालीं फिन्लंड राशियाला जोडण्यांत आल्यापासून स. १८९९ पर्यंत फिन्लंड हें जवळ जवळ स्वायत्त संस्थान होतें म्हटलें तरी चालेल फक्त परराष्ट्रीय व युद्धखातें हींच तेवढीं राशियाच्या ताब्यात होतीं. १८९९-१९०५ सालांत राजकीय हक्काबद्दल चळवळ होऊन फिन्लंडमध्यें कांहीं काळ वाटेल तसा राज्यकारभार चालला होता. १९०५ सालीं रूसो-जपानी युद्धांत राशियाचा पराभव झाल्यामुळें फिन्लंडला रशियाच्या अडचणीचा फायदा मिळाला. फिन्लंडशीं राशियानें सामाचें धोरण ठेवलें. त्यामुळें फिन्लंडला राज्यकारभारांत पुष्कळसे हक्क प्राप्त झाले, मुद्रणस्वातंत्र्य प्रस्थापित झालें, प्रातिनिधिक निवडणुकीचें तत्त्व अंमलांत आलें, २४ वर्षांवरील प्रत्येक स्त्रीपुरुषाला मतदानाचा अधिकार मिळाला. १९१७ सालीं फिन्लंडनें आपलें स्वातंत्र्य पुकारलें व १९१९ सालीं फिन्लंड हें स्वतंत्र संस्थान बनलें. हल्लीं फिन्लंडचे राज्यव्यवस्थेच्या सोईसाठीं९भाग पाडण्यांत आले आहेत. या प्रत्येक भागावर एक प्रीफेक्ट नेमण्यांत येतो. फिन्लंडचा अध्यक्ष दर सहा वर्षांनीं लोकमतानें निवडला जातो. न्यायखातें स्वतंत्र राखण्यांत आलें आहे.

धर्म.—फिन्लंडचें राष्ट्रीय चर्च इव्हँजेलिकल ल्यूथरन पंथाचें आहे तथापि प्रत्येकाला धर्माच्या बाबतींत स्वातंत्र्य आहे.

शिक्षण.—फिन्लंडमध्यें हेलसिंकी येथें एक व टुर्क येथें दोन अशीं तीन विश्वविद्यालयें आहेत. तसेंच हेलसिंकी येथें एक धंदेशिक्षणाची शाळा व दोन व्यापारी शिक्षणाच्या शाळा आहेत. दुय्यम शिक्षणाच्या बाबतींत १०७ लीशियम शाळा ५३ माध्यमिक शाळा, ४६ हायस्कूलें व ८ ट्रेनिंग कॉलेजें आहेत. प्राथमिक शिक्षणाच्या कामीं ४५१८ प्राथमिक शाळा, १०८ कलाकौशल्याच्या शिक्षणसंस्था, ३९ शेतकी शाळा, ४ दुधदुभत्याच्या( डेअरी ) शाळा, ६ उद्यानशिक्षणशाळा, ७ जंगलविषयक शिक्षणाच्या शाळा आहेत. फिन्लंडचें १९२५ सालीं ३११२०००००० मार्क्स उत्पन्न व ३२७८१००००० चा खर्च होता.

आरमारामध्यें ४पेट्रोल बोटी ३ टार्पेडो, १ पाणबुडी, २ माइनलेयर, २ माईनस्वीपर, व इतर किरकोळ जहाजें होतीं.

इतिहास.—७ व्या अगर ८ व्या शतकाच्या सुमारास फिनलोकांच्या ताब्यांत फिन्लंडचा देश आला. त्याच्यापूर्वी तो लॅप्स लोकांच्या ताब्यांत असावा असें दिसतें. ११५७ सालीं स्वीडनचा राजा एरिके यानें फिन्लंडवर स्वारी करून तो देश जिंकला व तेथील लोकाना त्याने ख्रिस्तीधर्माची दीक्षा दिली.त्यानें बिशप हेनरी नांवाच्या एका पाद्र्याची फिन्लंडवर नेमणूक केली. पुढें फिन्लंडनें स्वीडनपासून स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला. १२९३ सालीं टॉर्केल नूटसन या पाद्र्यानें कॅरेलिया प्रांत जिंकून विबोर्गचा किल्ला बांधला. स्वीडन व रशिया या राष्ट्रांमध्यें फिन्लंड जिंकण्याची अहमहमिका सुरू झाली व त्यामुळें त्यांच्यामध्यें वारंवार युद्धें होऊं लागलीं. त्यांत स्वीडनचा जय झाला. सन १५२८ त स्वीडनचा राजा गस्टेव्हस वासा यानें फिन्लंडमध्यें बरीच सुधारणा घडवून आणली. पुढें दोन शतकेंपर्यंत स्वीडनच्या ताब्यांत फिन्लंडचा देश होता; व रशिया हा स्वीडनपासून फिन्लंडमधील बराच मुलूख आपल्या ताब्यांत आणूं पहात होता. शेवटीं १८०८सालीं स्वीडन व रशिया यांमध्यें लढाई होऊन फिन्लंड देश रशियाच्या ताब्यांत आला. पण रशियाच्या ताब्यांत फिन्लंड आलें तरी अंतर्गत कारभारांत फिन्लंड स्वतंत्रच होतें म्हटलें तरी चालेल. पण पुढें रशियाचें धोरण बदलून फिन्लंड हें आपल्या ताब्यांत पूर्णपणें आणण्याचे रशियानें प्रयत्न सुरू केले. त्यामुळें फिन्लंडमध्यें भयंकर चळवळ उठली. शेवटीं १९०९ सालीं रशियानें फिन्लंड हें आपल्या ताब्यांत पूर्णपणें घेतलेंच, व तेथें राशियन संस्कृति

व रशियन सत्तेचें वर्चस्व प्रस्थापित करण्याचा उद्योग आरंभला. त्यामुळें फिन्लंडमध्यें जोराचा वणवा पसरला.

फिनिश लोकांनीं आपली राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ जोरानें करण्यास सुरवात केली. आपली स्वतःची भाषा व संस्कृति यांचें पुनरुज्जीवन करून त्यांच्या अनुरोधानें आपली राज्यघटनेचीं तत्वे प्रतिपादन करण्यास त्यांनीं प्रारंभ केला. त्याच्या उलट रशियन अधिकाऱ्यांनीं फिन्लंडच्या रूसीकरणार्थ चळवळ सुरू केली. १९१० सालीं रशियन सरकारने एक कायदा करून त्याअन्वयें, फिनिश राजकारणांतील महत्वाचे प्रश्न रशियन सरकारच्या हितसंबंधाच्या दृष्टीनें सोडविण्यांत यावेत असें ठरविलें त्यामुळें केवळ फिन्लंडमध्येच नव्हे तर इतर राष्ट्रांतहि या रशियन सरकारच्या बेकायदेशीर धोरणाविरुद्ध खळवळ उडून गेली. १९१४ मध्यें महायुद्धाला सुरवात झाली. तरी पण फिन्लंडला प्रत्यक्ष रीतीनें या युद्धांत भाग घेण्याचें कारण पडलें नाहीं. तथापि रशियाच्या बाजूनें सुमारें २००० फिनिश लोकांनीं आपलीं नावें युद्धांत नोंदविलीं होतीं. रशियन सरकारच्या जुलुमामुळें फिन लोक अतिशय असंतुष्ट झाले होते. त्यामुळें महायुद्धाच्या अमदानींत रशियन सरकारची फिन्लंडवरील करडी नजर थोडीफार ढिली पडली होती. १९१७ मध्यें रशियामध्ये राज्यक्रांति झाली. तीमुळें रशियामध्यें जें तात्पुरतें सरकार प्रस्थापित झालें त्या सरकारनें फिन्लंडला बरेंच स्वातंत्र्य देऊं केलें. फिन्लंडमध्यें लगेच जी निवडणूक झाली तींत सोशल डेमोक्रॅटिक पक्षाचें प्राबल्य झालें. तरी पण तात्पुरत्या सरकारची फिन्लंडमधील अंतिम सत्ता अबाधितच होती.

याच सुमारास फिन्लंड हे रशियापासून निराळें करण्याची चळवळ सुरू झाली. फिनिश डायटनेंहि रशियापासून फिन्लंड हें वेगळे करण्यास आपली संमति दर्शविली. तथापि रशियन सरकारने त्याला मान्यता दिली नाहीं. त्यामुळें, रशियन सरकार व फिनिश डायेट यामध्यें बेदिली उत्पन्न झाली. फिनिश डायेटनें राजीनामा दिला. अर्थात पुन्हां डायेटची निवडणूक झाली. तींत सोशल डेमोक्रॅटिक पक्षाला मताधिक्य मिळालें नाहीं; व फिन्लंडमधील मवाळ पक्ष अधिकारारूढ झाला.

१९१८ च्या मे महिन्यामध्यें फिन्लंडमध्यें अंतस्थ यादवी माजून अतिशय घोंटाळे माजले. सोशल डेमोक्रॅटिक पक्षानें बोल्शेव्हिक सैन्य फिन्लंडमध्यें आणविलें त्यामुळें तर अधिकच सावळागोंधळ माजला. शेवटीं डायेटनें जर्मनांची मदत मागून हीं अंतःस्थ यादवी शमविली.

१९१९ सालीं फिन्लंड हें स्वायत्त संस्थान व्हावें एतदर्थ चळवळ सुरू झाली. थोडक्याच दिवसांत ती फलद्रूप होऊन जुलैच्या २७ तारखेला फिनिश डायेटनें फिन्लंड हें स्वायत्त संस्थान आहे असें जाहीर केलें. या स्वायत्तसंस्थानचा पहिला अध्यक्ष प्रो. कार्लो जूहो स्टाहल्बर्ग हा झाला. ग्रेटब्रिटननें या फिन्लंडच्या रिपब्लिकला आपली मान्यता दिली.

१९२० सालीं फिन्लंड व सोव्हिएट रशिया यांच्यांत तह होऊन या तहान्वयें फिन्लंडला पेचेंगा हें महत्वाचें बंदर मिळालें. याच सालीं राष्ट्रसंघांत फिन्लंडचें नांव दाखल करण्यांत आलें. फिन्लंडच्या शेजारीं असलेल्या ऑलंड द्वीपसमूहासंबंधीं स्वीडन व फिन्लंड यांच्यांत भांडण उपस्थित झालें. त्यामुळें हा प्रश्न राष्ट्रसंघापुढें मांडण्यांत आला व १९२१ च्या जून महिन्यांत राष्ट्रसंघानें हीं बेटें फिन्लंडच्या ताब्यांत असावींत असा निकाल दिला. पूर्व कॅरेलियाचा प्रश्न अद्यापि सुटला नाहीं. रशियानें हा प्रदेश आपल्या ताब्यांत घेतला असून तेथें सर्व फिनिश लोकांचीच वस्ती आहे. पूर्व कॅरेलिया फिन्लंडास जोडल्याखेरीज खरें ऐक्य साधतां येणें शक्य दिसत नाहीं

फि नि श वा ङ्म य.—फिनिश भाषेंतील पहिला ग्रंथकार ॲग्रिकोला ( १५०६–१५५७ ) हा होय, यानें १५४४ सालीं 'ए. बी. सी.' नांवाचें एक पुस्तक लिहिलें. याशिवाय १५४८ सालीं त्यानें न्यू टेस्टामेंटचें फिनिश भाषेंत रूपांतर केलें. १५५६ सालीं ओल्ड टेस्टामेंटच्या कांहीं भागाचें यानें भाषांतर केलें. स्वीडनच्या अमलाखालीं फिनिश वाङ्मयाची फार हेळसांड झाली. फिनिश कवी हे आपल्या प्रसिद्धीसाठीं स्वीडिश भाषेंतच काव्यें लिहूं लागले. स. १८३५ मध्यें कालेवाला हें राष्ट्रीय महाकाव्य प्रसिद्ध झाल्यानंतर फिन भाषेला पुन्हां चढती कळा लागली. हें काव्य प्रसिद्ध करण्याचें श्रेय लॉन रॉटयास आहे. एवढ्यावरच लॉनरॉट थांबला नाहीं, तर त्यानें पी कॉरहोनेन (१७७५-१८४० ), पेंटी लीटिनेन व इतर बऱ्याच कवींचीं काव्यें प्रसिद्ध केलीं. १९ व्या शतकाच्या अखेरच्या पादांत फिनिश भाषेंत पुष्कळ ग्रंथ निर्माण होऊं लागले. १८६२ सालीं कॉस्नचा 'सुओमेंकिएलिनेन रूनोलिसून्स ऐकन' हा फिन लोकांच्या इतिहासासंबंधीचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. फिन्लंडमध्यें वर्तमानपत्रें, सर्व तऱ्हेच्या विषयाला वाहून घेतलेलीं मासिकें इत्यादिकांची समृद्धि आहे. सूओमलैसन किर्जेलिसूडेन या वाङ्मयसंस्थेनें बरेच ग्रंथ प्रकाशित केले आहेत. त्यापैकीं महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे, हेनरी गॅब्रियल पोर्थनचा फिन्लंडचा इतिहास हा होय. कॉस्कीनेत यानें १८६९–१८७३ या सालाच्या दरम्यान, फिन इतिहासावर ग्रंथ लिहिला. याशिवाय कित्येक फिन ग्रंथकारांनीं इतिहासविषयक व भूगोलविषयक ग्रंथ लिहिलेले आढळतात. वाङ्मयाच्या शाखेकडे पाहिलें असतां लॅानराटचा फिनिश स्वीडिश कोश हा प्रमुख ग्रंथ होय. डॉ. ओटो डॅानरनें जर्मन भाषेंत 'कंपॅरेटिव्ह डिक्शनरी ऑफ दि फिनोउग्रीक लॅंग्वेज' हा ग्रंथ लिहिला. काल्पनिक वाङ्मयाच्या शाखेंतहि फिन्लंडनें बरेच ग्रंथकार निर्माण केले आहेत. अलेक्सिस स्टेनवाल (१८३४–१८७२) हा शिंप्याचा मुलगा आपल्या काळीं प्रसिद्ध कवि म्हणून

तहशील.—क्षेत्रफळ ६७५ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) २२१७६७. ह्यांत मुडकीगांवचा समावेश होतो. व ३६१ खेडीं आहेत.

गांव.—फिरोझपूर तहशिलीचें मुख्य ठिकाण लोकसंख्या छावणी धरून (१९२१) ५०८३६. पैकीं निम्मे मुसुलमान आहेत. हा गांव तिसऱ्या फिरोजशहाच्या कारकीर्दीत वसविला गेला. सरदारीण लछमनकुंवरच्या मरणानंतर १८३५ मध्यें हा इंग्रजाकडे आला. गांव भरभराटीचा आहे. येथें मोठा धान्याचा बाजार भरतो. छावणीची लोकसंख्या २६१५८. म्युनिसिपालिटीची स्थापना १८६७ सालीं झाली. दोन मुलांचीं व दोन मुलींचीं हायस्कुलें आहेत.

(२) पंजाब इलाख्यांतील गुरगांव जिल्ह्याची एक तहशील. क्षेत्रफळ ३१४ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ९८२८५. यांत एक गांव (फिरोजपूर झिर्का) व खेडीं २६० आहेत.

गांव.—लोकसंख्या (१९२१) ५०१९ पूर्वी हें कापसाच्या व्यापाराचें मुख्य गांव होतें. मेवाती लोकांवर दाब बसविण्याकरितां तिसऱ्या फिरोजशहानें हें वसविलें म्हणतात. स. १८०३ ते १८३६ च्या दरम्यान फिरोझपूरच्या नबाबाचें हें मुख्य गांव होतें. म्युनिसिपालिटीची स्थापना १८६७सालीं झाली.

**फिरोझाबाद**—संयुक्त प्रांतांतील आग्रा जिल्ह्याची एक ईशान्येकडील तहशील. क्षेत्रफळ २०३ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ११५७८८. ही तहशील यमुनेच्या उत्तरतीरावर असून हींतून सिसी व सेनगर ह्या दोन लहान नद्या वहातात. हींत खेडीं १९१ आहेत.

गांव.—फिरोझाबाद तहसिलीचें मुख्य ठिकाण हें ईस्ट इंडियन रेल्वेवर आहे. लोकसंख्या (१९११) १३५७१. हा गांव फार प्राचीन आहे याचा नाश करण्यांत आला होता पण अकबराच्या हुकुमावरून मलिक फिरोज नामक खोजानें हा फिरून वसविला. येथें एक जुनी मशीद असून कांहीं देवालयें आहेत. म्युनिसिपालिटीची स्थापना १८६९ सालीं झाली.

**फिलाडेल्फिया**—अमेरिका, पेनसिल्व्हेनियामधील मुख्य शहर. क्षेत्रफळ १३२७चौ. मैल लोकसंख्या (१९२०) १८२३७७९. येथें जर्मन, इंग्लिश, आयरिश, स्कॉटिश, ऑस्ट्रेलियन वगैरे जातींची, त्याचप्रमाणें नीग्रो लोकांची वस्ती आहे. नीग्रो लोकांची संख्या (इ. स. १९००) ६२६१३ होती. येथें बऱ्याच सुबक, नमुनेदार व भव्य इमारती आहेत "सिटी हॉल" ही फारच प्रेक्षणीय, भव्य व जगांत सर्वांत मोठी इमारत असून तिच्या आसपास बरेच नांवाजलेल्या पुरुषांचे पुतळे उभारलेले आहेत. दुसरी भव्य व प्रसिद्ध इमारत म्हटली म्हणजे "इंडिपेन्डंन्स हॉल" ही होय. ता. ४ जुलै १७७६ सालचा सुप्रसिद्ध "स्वातंत्र्याचा जाहीरनामा" (डिक्लेरेशन ऑफ इंडिपेंडन्स) याच इमारतींत पास करण्यांत आला. येथें पदार्थसंग्रहालयें, शास्त्रीय संस्था, वाचनालयें व संग्रहालयांपैकीं, "फेयरमाउंटपार्क" मधील प्राणिसंग्रहालयें, वनस्पतिबाग, फिलाडेल्फिया व्यापारविषयक वस्तूंचें संग्रहालय" वगैरे सुप्रसिद्ध व प्रेक्षणीय आहेत. शास्त्रीय संस्थांपैकीं, अमेरिकन 'फिलासॉफिकल सोसायटी", "ॲकॅडमी ऑफ नॅचरल सायन्सेस" वगैरे संस्था नामांकित व उपयुक्त अशा आहेत. ललितकला, चित्रकला, संगीत, पाषाणशिल्प, गृहशिल्प, यंत्रकला, वगैरे अनेक उपयुक्त कलाविषयक, व त्याचप्रमाणें उपविद्या व धर्मविषयक शिक्षणसंस्था सुप्रसिद्ध व प्रेक्षणीय अशा आहेत. येथील "फिलाडेल्फिया" व "टेंपल" हीं दोन विश्वविद्यालयें नावाजलेलीं आहेत. येथें बरींच प्रसिद्ध अशीं, दैनिकें, साप्ताहिकें, मासिकें वगैरे आहेत. व्यापार व उद्योगधंद्यांत साखर, रासायनिक द्रव्यें, लॉकर, रेशीम, तंबाखू, कातडीं वगैरे मालाची आयात व लोखंड, पोलाद, पेट्रोलियम, गहूं वगैरे मालाची निर्गत होते. शहराच्या व्यवस्थेकरितां लोकनियुक्त सभासदांचें एक कौन्सिल आहे.

**फिलिप**—या नांवाचे प्राचीन मॅसिडोनियांत पांच, फ्रान्समध्यें सहा, जर्मनींत एक व स्पेनमध्यें पांच राजे झाले. त्यांत मॅसिडोनियाचा दुसरा फिलिप (ख्रि. पू. ३८२–३३६) फ्रान्सचा दुसरा फिलिप (११६५–१२२३) व स्पेनचा दुसरा फिलिप (१५२७-१५९८) हे विशेष महत्वाचे आहेत

दुसरा फिलिप.—हा मॅसिडोनियाचा कुशल सेनापति व राज्यकर्ता होता. कारकीर्दीच्या आरंभीं यांचें राज्य लहान व भोंवतालच्या रानटी लोकांच्या स्वाऱ्यांनीं त्रस्त झालेलें होतें. त्याचा बंदोबस्त करून स्वतःचें राज्य वाढविण्याकरितां त्यानें मॅसिडोनियाचें अजिंक्य राष्ट्रीय सैन्य तयार करण्यास सुरवात केली व लवकरच रानटी टोळ्यांचा एकाच लढाईनें पूर्ण मोड केला (३५८). नंतर सोन्याच्या खाणींनीं संपन्न असलेली अथेन्सची वसाहत ॲंफिपोलिस ही सर करून तेथें त्यानें फिलिप्पी नांवाचें नवें शहर वसविलें. चेटूकक्रियांत निष्णात असलेली एपिरोट राजाची मुलगी आलिंपिआस, हिच्याशीं त्यानें लग्न लाविलें व तिच्यापासून त्याला जगविख्यात अलेक्झांडर दि ग्रेट हा मुलगा झाला (३५६). ख्रि. पू. ३५३ते३४६पर्यंत उत्तर व पश्चिमेकडील लहान लहान ग्रीक संस्थानें जिंकलीं व नंतर ख्रि. पू ३३८पर्यंत दक्षिणेकडील ग्रीक संस्थानें जिंकलीं व तोंपर्यंत अथेन्सच्या राज्याशीं उघड विरोधाचा प्रसंग मोठ्या युक्तीनें टाळला. तथापि त्याच्या वाढत्या सत्तेला आळा घालण्याचा उपदेश प्रख्यात अथीनियन वक्ता डेमोस्थेनिस हा करीत होता; तत्संबंधींचीं त्याचीं 'फिलिपिक्स' नांवाचीं भाषणें वक्तृत्वाचे उत्कृष्ट नमुने म्हणून गणलीं जातात. अखेर ३३८ मध्यें फिलिपनें अथेन्सशीं सामना दिला व त्यांतहि तो विजयी झाला. तेव्हां सर्व ग्रीक संस्थानांची कॉंग्रेस भरून इराणबरोबरच्या युद्धांत फिलिपला

ग्रीकांचा कॅप्टन-जनरल नेमण्यांत आलें. पण त्या युद्धापूर्वीच तो स्वतःच्या मुलीच्या विवाहसमारंभप्रसंगीं मारेकऱ्यांकडून ठार मारला गेला.

फ्रा न्स चा दु स रा फि लि प.—याला ऑगस्टस (दि ग्रेट) म्हणतात. त्याच्या कारकीर्दीच्या सुरवातीस फ्रान्सचा बराचसा भाग इंग्लंडच्या सत्तेखालीं होता व कांहीं प्रांतांचे अधिकारी स्वतंत्र बनले होते. प्रथम ( ११८१ ते ८५ ) त्यानें संकेर, नार्मंडी, फ्लँडर्स, बर्गंडी वगैरे प्रांतांचे बलिष्ट सरदार अंकित करून घेतले. ११९० मध्यें त्यानें 'क्रूसेड' धर्मयुद्धांत भाग घेतला. तिकडून परतल्यावर त्यानें इंग्लंड व विरयेक फ्रेंच सरदारांबरोबर युद्ध सुरू केलें तें बरींच वर्षे चालून अखेर जॉन राजा फिलिपला शरण आला; आणि फ्रेंच सरदारांचा जर्मनी दोस्त बनला होता तरी त्यांचा पराभव फिलिपनें बूव्हिनेसच्या लढाईत ( १२१४ ) केला, व फ्रान्सचें एकछत्री राज्य बनविलें.

स्पे न चा दु स रा फि लि प.—हा बादशहा पांचवा चार्लस याचा मुलगा होता. इसवी सन १५५१ मध्यें स्पेनचा राज्यकारभार याच्या हातीं आला. स.१५४३ त याचें पोर्तुगालच्या मेरीशीं लग्न झालें. १५५४ त याचा बाप चार्लस यानें याचा इंग्लंडची मेरी हिच्याशीं विवाह लाविला. पुढें स. १५५६ त जेव्हां चार्लसनें बादशाही गादीवरील आपला हक्क सोडला तेव्हां याच्या ताब्यांत स्पेन, अमेरिकेंतील स्पेनच्या वसाहती, ॲरॅगॉनकडील इटली देशांतला भाग, बर्गंडीकडील नेदर्लंड व फ्रेंच कॉम्टे, मिलॅन हे देश आले. एवढ्या अवाढव्य राज्याबरोबर फिलिपला आपल्या शिरावर मोठी जबाबदारी व जोखीम घ्यावी लागली. याच्या राज्यविस्तारानें फ्रान्स देश बहुतेक सर्व बाजूंनी गुरफटून गेल्यामुळें तो याचा स्वाभाविक शत्रू बनला. यानें फ्रान्सचा दोन लढाईत पाडाव करून त्याला १५५९ सालीं कॅटथू कँब्रेसिस येथें तह करावयास लाविलें. स.१५५८ मध्यें मेरी मेल्यामुळें फिलिपला इंग्लंडचा असलेला पाठिंबा नाहींसा झाला, व पुढें इंग्लंडच्या तक्तावर एलिझाबेथ राणी आरूढ झाल्यावर तर इंग्लंड स्पेनचें शत्रू झालें. स.१५५९ त यानें व्हॅलॉइसच्या एलिझाबेथशीं लग्न लाविलें. याच सुमारास फ्रान्स देशामध्यें धर्म बाबतीसंबंधीं अस्वस्थता उत्पन्न होऊन तिचा संसर्ग नजीकच्या नेदर्लंड देशावरहि होऊं लागला. ही अस्वस्थता मोडण्याकरितां याला आपल्या आयुष्यभर झुंजावें लागलें. त्याला आपण चुकीस पात्र आहों असें कधींच वाटत नसे. राज्यांत शांतता व सत्ता नांदावयाची असल्यास धर्मांची एकी असणें आवश्यक आहे असें याचें ठाम मत होतें. याला आपल्या घराण्याचा अतिशय अभिमान वाटे. या सर्व गोष्टींमुळें याचें नेदर्लंड, फ्रान्स, व इंग्लंड या देशांशीं वांकडें आलें. पहिल्याशीं वाकडे येण्याचें कारण येथील राजकीय व धार्मिक अस्वस्थतेमुळें होणारें बंड हें असून दुसऱ्या व तिसऱ्याशीं वांकडें येण्याचें कारण त्या देशांनीं बंडवाल्यांना केलेली मदत होय. वरील देशांशीं यानें रोमन कॅथोलिक पंथाचा अग्रणी या नात्यानें युद्ध केलें. हा मोठा कर्मवादी होता. राजा या दृष्टीनें याला आपल्या कर्तव्याची मोठी उच्च कल्पना होती. १५७९–८१ त यानें पोर्तुगाल देश घेतल्यावर तेथील लोकांची मनोवृत्ति व हक्क यांकडे लक्ष दिलें. व मध्यम स्थितींतील लोकांची अनुकूलता मिळविण्याकरितां त्यांना घातुक सवलतीहि दिल्या.

फिलिपाईन बेटें—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानाकडे असलेला एक द्वीपसमूह, हा आशिया खंडाच्या आग्नेय दिशेकडे सुमारें ५०० मलांवर उत्तर अक्षांश ४° ४०′ ते २१° १०′ आणि पूर्व रेखांश ११६° ४०′ ते १२६°३४′ यांच्या दरम्यान आहे. या द्वीपसमूहाचें एकंदर क्षेत्रफळ सुमारें ११५०२६ चौरस मैल असून यांत लुझान, मिंडानाओ इत्यादि एकंदर ७०८३ बेटें आहेत.

या द्वीपसमूहांतील बहुतेक बेटें ज्वालामुखीजन्य असून, येथील प्रदेश पर्वत व ज्वालामुखींनीं आच्छादित असल्यामुळें मधून मधून ज्वालामुखींचे भयंकर स्फोट होतात.

या द्वीपसमूहांत १२ प्रज्वलित ज्वालामुखी आहेत. येथें गटापर्चा, रबर, केळीं व आंबे, कठिण कवचीच्या फळांचे वृक्ष, तेलें, मसाल्याचे, व औषधींचे वृक्ष फार आहेत. येथील एकंदर लोकसंख्या १९१८ सालीं १०३५०६४० होती. येथील काळे लोक आपणांस नीग्रो म्हणवून घेतात. तीन कुटुंबांचे लोक टोळी टोळीनें भटकत राहतात. यांचीं चिरस्थायी घरें नाहींत. हे लोक फळमूलावर उपजीविका करतात. स्त्रिया मध व मेण वगैरे गोळा करतात. ह्या लोकांत ५० वर्षांपेक्षां अधिक वयाचे लोक फारच क्वचित् आढळतात. येथील कांहीं जाती गुलामगिरींत दिवस कंठितात उष्ण हवा, अति आर्द्रता, विपुल वृष्टि आणि भयंकर वादळें हे येथील हवामानाचे विशेष आहेत. शेतकी हा येथील मुख्य धंदा असून येथें ताग, ऊंस, तम्बाखू, नारळ व तांदुळ यांची लागवड विशेषेंकरून करतात. येथें कोळसा बऱ्याच ठिकाणीं आहे. सोनें व तांबें थोडक्या प्रमाणांत सर्व जिल्ह्यांत सांपडतें. येथें चिरूट, सिगार व सिगारेट तयार करण्याचे कारखाने आहेत. तसेंच साखर तयार करण्याचे व तांदुळ सडण्याचे कारखानेहि आहेत. याशिवाय गाड्या तयार करणें, नीळ, खोबऱ्याचें तेल, साबू, मीठ आणि चुना वगैरे तयार करण्याचे लहान लहान धंदे बरेच आहेत. सोनें, रुपें, लोखंड, तांबें, कोळसा पेट्रोलियम, गंधक, अस्फाल्ट, चुना, वाळू, सैंधव इत्यादि खनिज संपत्ति फिलिपाईनमध्यें सांपडते. १९२० सालीं फिलिपाईनमध्यें १४,९४,००,००० डॉलर किंमतीच्या मालाची आयात व १५,११,००,००० डॉलर किंमतीच्या मालाची निर्गत झाली.

फिलिपाईनमध्यें हल्लीं मॅनिलारेल रोड कंपनी व फिलिपाईन रेल्वे-रोड कंपनी अशा दोन कंपन्यांच्या रेल्वे आहेत. यांपैकीं पहिली फिलिपाईन सरकारनें आपल्या ताब्यांत

घेतली असून दुसरींहि घेण्याचें घाटत आहे. मॅनिला, सेबू, इलॅाइलो हीं मोठीं बंदरें आहेत. ताग, खोबरें, साखर, तम्बाखू, व सिगारेट वगैरे निर्गत माल असून कापड, तांदूळ, कणीक, मांस, बूट, जोडे, लोखंड, पोलाद वगैरे आयात माल आहे. द्वीपसमूहाचा संयुक्त संस्थानें आणि ग्रेट ब्रिटन या देशांशीं विशेषेंकरून व्यापार चालतो. रोमन कॅथॉलिक हा प्रमुख धर्म आहे. १९०१ सालीं फिलिपीनोंचें स्वतःचें चर्च स्थापन झालें. प्रॉटेस्टंट लोकांच्याहि बऱ्याच संस्था आहेत. मिंडानौ व सुलु येथें मुसुलमानी धर्माचे पुष्कळ लोक आहेत.

फिलिपाईन सरकारी शाळांतून शिक्षण फुकट दिलें जातें. १९२३ सालीं अशा शाळांची संख्या ७६६८ होती. १९२३ सालीं शिक्षणासाठीं सरकारनें १,०८,५०,००० डॉलर खर्च केले. खाजगी व धंद्याच्या शाळाहि बऱ्याच आहेत. १९२३ सालीं २९३ शेतकी-शाळा होत्या. उच्च शिक्षण देणारी एक युनिव्हर्सिटी आहे. याशिवाय खाजगी विश्वविद्यालयें ३ आहेत. इंग्लिश भाषा प्रमुख आहे.

**राज्यव्यवस्था.**—फिलिपाईनचे राज्यव्यवस्थेसाठीं ४६ प्रांत पाडण्यांत आले असून. राज्यशासनाच्या सोयीसाठीं सीनेट व प्रतिनिधिमंडळ अशीं दोन मंडळें आहेत. सीनेट ही दर सहा वर्षांनीं निवडली जाते व प्रतिनिधिमंडळ दर तीन वर्षांनीं बदलतें. २१ वर्षांवरील सर्वांना मतदानाचा अधिकार आहे. गव्हर्नर जनरल, दुय्यम गव्हर्नर, ऑडिटर व डेप्युटी ऑडिटर यांची नेमणुक अमेरिकेच्या अध्यक्षाच्या मार्फत होते. त्याचप्रमाणें सरन्यायाधिशाची नेमणूक गव्हर्नर जनरल हा सीनेटच्या संमतीनें करतो. १९१८ सालीं गव्हर्नर जनरल याच्या हाताखालीं कौन्सिल ऑफ स्टेट नांवाचें एक सल्लागार मंडळ देण्यांत आलें.

**इतिहास.**—मागेलान यानें सन १५२१ च्या मार्चमध्यें फिलिपाईन बेटांचा शोध लावला. हा पोर्तुगीज असून स्पेनच्या पहिल्या चार्लस राजाच्या पदरीं होता. याचा उद्देश हीं बेटें पोप ६ वा अलेक्झांडर यानें टार्डेसिलासच्या तहांत (१४९४) पोर्तुगालला न देतां स्पेनला दिलीं आहेत, हें सिद्ध करावयाचें होतें. पुढें झारागोसाच्या तहांत (१५२९) स्पेननें पोर्तुगालच्या स्वाधीन मोलक्का बेटें केलीं. म्हणजे साधारणपणें सर्व बेटें पोर्तुगालच्या स्वाधीन करण्यांत आलीं. पण थोडक्याच काळांत स्पेनच्या मदतीनें व्हिलिवोस यानें हीं पोर्तुगीजांपासून जिंकून घेतलीं. स्पेनच्या दुसऱ्या फिलिपनें मिग्युएल लेगास्पी याला फिलिपाईनमध्यें बरीचशी फौज देऊन पाठविलें. मिग्यूएलनें १५६५ सालीं सेबू येथें स्पेनची वसाहत केली व स. १५७१ सालीं मॅनिला शहराची स्थापना केली. मिग्यूएलनें फिलिपाईनमधील व्यापाराची वृद्धि केली व मुसुलमानी धर्माच्या प्रगतीस आळा घातला. रोमन कॅथॉलिक धर्मोपदेशकांनीं स्वधर्मप्रेरित होऊन येथील रानटी लोकांस खिस्ती धर्माचा उपदेश करून, त्यांची सामाजिक व प्रापंचिक स्थिति सुधारली व त्यांच्यांत गायनाभिरुचि उत्पन्न केली, आणि शेतकीची सुधारणा केली.

१७६२ सालीं स्पेन व इंग्लंड यांच्या युद्धाच्या वेळीं फिलिपाईन येथें आरमार पाठविण्यांत येऊन सर्व द्वीपसमूह इंग्लिशांकडे आला. गव्हर्नर जनरलच्या अभावीं ब्रिटिश लोक अन्टोनिओ रोजा नांवाच्या गव्हर्नरशीं तहाची वाटाघाट करीत असतां सायमन आन्ड्रे सालाझेर यानें आपणांस गव्हर्नर जनरल म्हणवून ब्रिटिशांस मॅनिला येथें वेढा दिला. युद्ध संपल्यावर स्पेन लोकांस फिलिपाईन बेटें परत करण्यांत आलीं.

**आर्थिक उन्नति.**—स्पेननें हीं बेटें घेतल्यानंतर २५ वर्षें या बेटांत खुला व्यापार चालत होता. पुढें स. १५९१ मध्यें फिलिपाईन व दक्षिण अमेरिकेचा परस्परांतील व्यापार बंद करण्यांत आला, व स. १५९३ मध्यें फिलिपाईन मेक्सिको यामध्यें वर्षांतून फक्त ३०० टनांचीं दोन व्यापारी जहाजें पाठविण्यास परवानगी होती. मेक्सिकनच्या स्वातंत्र्ययुद्धानंतर स्पेन सरकारकडे फिलिपाईन व्यापाराचा मक्ता राहिला नाहीं. स्पेनच्या कारकीर्दींत या बेटाची कांहींच सुधारणा झाली नाहीं म्हटलें तरी चालेल. स. १८२५ च्या सुमारास स्पेनच्या अमेरिकेंतील वसाहती गमावल्यामुळे फिलिपाईनमध्यें स्पॅनिश लोकांची एकसारखी गर्दी उसळली. जिकडे तिकडे स्पॅनिश लोक, त्यांचीं वर्तमानपत्रें, व संस्कृति दिसूं लागली. त्यामुळें येथील मूळ रहिवाशांत असंतोष उत्पन्न झाला. स. १८६९ मध्यें सुवेजचा कालवा उघडल्यामुळें स्पॅनिश लोक जास्तच येऊं लागले.

यूरोपचा प्रवास सुवेझ कालवा खोदल्यामुळें सुलभ होऊन येथून फिलिपिनो लोक यूरोपांत जाऊं लागले. यापैकीं जॉसे-रिझाल यानें मॅनिलाच्या जेसुइट विश्वविद्यालयात शिक्षण संपादन करून मेड्रिड येथें डॉक्टर ऑफ मेडिसिन होऊन त्यानें जर्मनींत पीएच. डी. ची पदवी संपादन केली. यानें फिलिपाईनमध्यें 'यंग फिलिपिनो पार्टी' (तरुण फिलिपिनो मंडळ) स्थापन केली. या योगानें फ्रायर लोक खवळून गेले. त्यांनीं त्यास राजद्रोहाच्या आरोपावरून कैद करविलें. याच वेळीं 'लिगा फिलिपिना' नांवाचें सुधारणावादी लोकांचे मंडळ स्थापन झालें होतें. रिझाल यास मिन्डानाओ येथें ठेवण्यांत आलें. सामोपचारानें कांहीं साध्य होत नाहीं असें पाहून या मंडळानें 'काटिपुनान' नांवाचें गुप्त मंडळ स्थापलें. या मंडळाचा आन्ड्रेस बॉनिफेशिओ हा पुढारी होता. स. १८९५–९६ मध्यें फ्रायर लोकांनीं सरकारचे हेर बनून बऱ्याच देशी लोकांस हद्दपार करविलें. पुढें स. १८९६ मध्यें या लोकांनीं बंड उभारून मॅनिला शहराच्या बाहेर शिपायावर हल्ला केला व कांहीं लोकांनीं दारूगोळ्याच्या कोठीवर हल्ला केला परंतु यांत त्यांस हार खावी लागली. हे लोक केव्हिट प्रांतांत एमिलिओ आगुइनाल्डो याच्या नेतृत्वाखालीं एकत्र झाले. नंतर यांच्या स्पेनच्या लोकांशीं अनेक

गेल्यास चांगलें प्राणदीकरण करणारी निमुळती ज्योत फुकनळीच्या तोंडातून बाहेर पडते. ह्या ज्योतींतहि वर सांगितलेले पहिला व चवथा हे भाग दृष्टोत्पत्तीस येतात. त्यांपैकीं पहिल्यासारखा भाग आंत असून दुसरा त्याच्याच बाहेर असतो. पहिल्या भागाशीं ज्वलनक्रिया पूर्ण होत असल्याकारणानें त्या ठिकाणीं उष्णता जास्त असते. ज्या पदार्थांचें प्राणदीकरण करावयाचें असतें तो शक्य तितका लांब ठेवल्यास हवा मिळाल्याकारणानें तें जास्त चांगलें होतें. उज्जीकारक ज्योत मिळण्यास ही नालिका वातीपासून वरांच उंचावर धरून नंतर थोडीशी हवा जाऊं देतात. या ध्वनीच्या योगानें ज्योत अरुंद व निमुळती होऊन प्रकाशयुक्त दिसते ह्याच ज्योतीमध्यें उज्जीकृत करावयाचा पदार्थ धरतात कारण याच ठिकाणीं उज्जीकरण करण्याची शक्ति जास्तींत जास्त असते.

प्राणिदीकरण किंवा उज्जीकरण करावयाचे पदार्थ ठेवण्यास कोळसा, प्लातिन, कांच किंवा पोर्सेलिन यांचा उपयोग करतात. कोळसा हा अद्रवक्षम असून त्याची उष्णता-वाहक शक्तीहि कमी आहे. शिवाय त्यामध्यें उज्जिकारक गुणधर्महि चांगले दृष्टोत्पत्तीस येत असल्याकारणानें त्याचा उपयोग उज्जीकरण करावयाचे पदार्थ ठेवण्याकरितां केला जातो. प्राणिदीकरण करावयाचे पदार्थ धरण्याकरतां प्लातिन धातूचा उपयोग करतात.

साध्या फुकनळीच्या योगानें मोठी ज्योत मिळत नसल्याकारणानें फार वेळ चालणाऱ्या क्रियेमध्यें तिचा उपयोग करतां येत नाहीं. यांत्रिक पद्धतीनें वायूचा शिरकाव करतां येईल अशा नलिका उपयुक्त असतात. निरनिराळ्या प्रकारच्या फुकनळ्याहि प्रचारांत आहेत. उष्ण-वायु-फुकनळीमध्यें वायूची झोंत उष्ण केलेल्या ताम्र-वेष्टनांतून जाऊं देतात व त्यायोगानें उष्णमानहि बरेंच वाढतें. फ्लेचर, रसेल आणि कंपनी प्राणवायूचा झोंत देण्याच्या फुकनळ्याहि तयार करते.

**फुकोक**—हें शहर जपानमधील किऊशिउ बेटाच्या वायव्य किनाऱ्यावर आहे. याची लोकसंख्या ७२०००. येथें पुष्कळ उद्योगधंदे चालतात व येथून परदेशीं बराच माल रवाना होतो. याशिवाय फुकोक नांवाचीं जपानांत पुष्कळ शहरें आहेत. त्यापैकीं महत्त्वाचें मुत्सू प्रांतांतील फुकोक हें होय. हें टोकिओला जाणाऱ्या रेल्वेवर जंक्शन असून येथील लोकसंख्या ५००० आहे.

**फुचौ**—चीन, फुकीएन प्रांताची राजधानी व परराष्ट्रीय व्यापारास खुलीं केलेल्या बंदरांपैकीं एक बंदर. याचें हॉकचिऊ हें नांव रूढ आहे फुचौ हें मिन नदीवर असून समुद्रापासून ३५ मैलांवर आहे. फुचौ येथील महत्त्वाचें ठिकाण म्हणजे शस्त्रागार ( अर्सेनल ) होय. हें पॅगोडा बेटावर आहे. याची स्थापना १८६७ सालीं झाली व तें फ्रेंच इंजिनियरांनीं यूरोपीय पद्धतीनें चालविलें होतें. यूरोपीय व्यापारासाठीं हें बंदर स. १८४२ त खुलें झालें. येथील स्थानिक व्यापारी लोकांच्या हातांत बराच व्यापार आहे मुख्य जिन्नस इमारती लांकूड, कागद, कापड वगैरे. परदेशी व्यापाऱ्यांच्या हातांत अफू व चहाचा व्यापार आहे.

**फुप्फुसदाह**( न्यूमोनिया )—फुप्फुसाची रचना सुजणें यास हें नाव आहे. याचे ३ भेद आहेत ते असेः— ( १ ) समग्रभागव्यापी किंवा घनीभूत, (२) असमग्रभागव्यापी व ( ३ ) दीर्घकालीन फुप्फुसदाह.

स म ग्र भा ग व्या पी भे द —फुप्फुसाचे मोठाले भाग ज्यांत थोड्या वेळांत खालून वर किंवा वरून खालीं सुजतात तो. त्या भेदाचें वर्णन पुढें दिलें आहे. प्रथम सडकून ताप भरतो. हा दाह उत्पन्न करणाऱ्या जंतूंचा पूर्ण शोध लागल्यापासून या रोगास जंतुजन्य व सांसर्गिक रोग व समजूं लागले आहेत. व म्हणून या प्रकारच्या इतर रोगांप्रमाणें त्याचा टराविक मुख्य ( फ्राकेलचा ) जंतु, तापाची मुदत व चढण्याउतरण्याचा ठरींव क्रम व रोग्याच्या शरीरावर त्या तापाच्या विषाचा होणारा परिणाम ही लक्षणपरंपराहि पहाण्यास सांपडते. हा जंतु बहुतेक रोग्यांच्या कफामध्यें व रक्तामध्यें सांपडतो. या जंतूबरोबर इतर नाना प्रकारचे जंतू ( इन्फ्ल्युएंझा, घटसर्प, कोलाय जंतु, पूयोत्पादक जंतु व फ्रीडलाडरनें शोधून काढलेला जंतु ) पहाण्यात येतात. उलटपक्षीं हा जंतु हृदयावरणदाह, हृदयांतर्गतदाह, आंत्रावरणदाह, पूयप्रधान फुप्फुसावरणदाह यांसारख्यां जंतुजन्य इतर रोगांतहि आढळतो; व हे रोग फुप्फुसदाह रोगांमध्यें अगर शेवटीं आगंतुक रोग म्हणूनहि प्रगट होतात. समशीतोष्ण कटिबंधातील देशांत हा एक कायमच्या रोगांपैकींच रोग होऊन बसला आहे. तथापि कधीं कधीं तो सांथीचें रूपहि प्रगट करतो. हिंवाळा व वसंतऋतु या ऋतूंत त्याचा कडाका बराच असतो. हा सांसर्गिक रोग आहे असें जरी सिद्ध झालें आहे तरी प्रत्यक्ष स्पर्शानें (इन्फ्ल्युएंझा किंवा प्लेगमधील फुप्फुसदाह हे वगळून ) या रोगाचा फैलाव होत नाहीं असा अनुभव आहे. पुष्कळ निरोगी माणसांच्या घशांतील नेहमींचा स्वाभाविक कफ तपासून पाहून त्यांतहि हा जंतु असल्याचें आढळून आलें आहे; आणि फुप्फुसदाह उत्पन्न होण्यास अशक्तपणा, कोंदट हवा इत्यादि अनेक कारणांमुळें रोग्याची स्वाभाविक रोगप्रतिबंधक शक्ति कमी झालेली असते असेंहि निदर्शनास येतें.

रोग होण्यास आरंभ फुप्फुसात हवेनें भरलेले अतिसूक्ष्म कप्पे असतात त्यांत प्रथम होतो, व तेथून क्रमानें तो सर्व फुप्फुसभर पसरून त्यामुळें फुप्फुसाच्या स्वाभाविक रचनेमध्यें तीन प्रकारचा बदल झालेला आपणांस प्रेतपरीक्षेमध्यें आढळून येतोः—( १ ) रक्ताधिक्यावस्था—हींत फुप्फुसांतील रक्तवाहिन्या फुगल्यामुळें तो फुप्फुसाचा भाग मोठा व जड होऊन काळसर आरक्त रंगाचा होतो. तथापि त्यांतील सूक्ष्म

कण्यांत अद्याप हवा शिल्लक असते. ( २ ) रक्तयकृतीकरणावस्था-म्हणजे स्वाभाविक स्थितींत करड्या रंगाचें व आंत हवा असते म्हणून पाण्यांत टाकलें तर तरंगणारें फुफ्फुस यकृताप्रमाणें भरीव दिसतें; बोटानें दाबलें तर फुटतें; व कापून त्याचा तुकडा पाण्यांत टाकला तर आंत तो बुडतो. यावेळीं हवेच्या सूक्ष्म कप्प्यांत गोठलेली लस व रक्तपेशी आणि फुफ्फुसाचे सूक्ष्म खवले व पांढरे रक्तपेशी गच्च भरून जाऊन ते फुफ्फुस म्हणजे एक चिकट गोळाच होऊन जातो व यांत लहान मध्यम श्वासनलिकाहि दबून व गुरफटून जातात.व या फुफ्फुस दाहभेदांत लस व रक्त गोठून चिकट व घट्ट होतें म्हणून यास घनीभूतभेद असेंहि नांव आहे. ( ३ ) धूसरयकृतीकरणावस्था-या अवस्थेंतहि फुफ्फुस यकृताप्रमाणें भरीव असतें. पण त्याचा रंग करडा बनतो. कारण त्यांत जमलेल्या पदार्थाचें पूय, वसा व द्रवीभवन होतें. पुढें या दुष्ट पदार्थाचे ( ४ ) विलयनावस्था-विलयनहि होतें व हवेचे सूक्ष्म कप्पे पूर्ववत होण्याच्या पंथास लागतात.हें सर्व होण्यास काळहि थोडाच पुरतो व विकृत फुफ्फुस आपलें काम करण्यास पूर्ववत समर्थ होतें.कांहीं परिणामकांतिकारक जंतूच्या योगानें या विकृत पदार्थाचें पृथक्करण होऊन रसवाहिन्या व रक्तवाहिन्यांच्या मार्गे ते दुष्ट पदार्थ विलय पावतात व हवेचे कप्पे रिकामे होऊन कार्यक्षम होतात.याप्रमाणें हे दुष्ट पदार्थ पचविले जाऊन ती घाण मूत्रपिंडाच्या मार्गे शरीराबाहेर पडते; व यावेळीं मूत्रांत नायट्रोजनयुक्त द्रव्यें फार जातात. पण हें सर्व वर्णन जे रोगी बरे होतात त्यांच्यासंबंधीं झालें; व सुदैवानें बरेच रोगी नाहींतर वैद्याच्या हातून बरे होतात. ( ५ ) जे रोगी मृत्युवश होतात त्यांच्या फुफ्फुसाची अवस्थाः- वर वर्णिलेल्या दोन्हीं तिन्ही अवस्थांतून फुफ्फुसाचे अधिकाधिक भाग व्यापले जाऊन त्याचें विपोत्सर्जन रोग्यास सहन न होईल इतकें होऊन त्यामुळें हृदयक्रिया एकदम बंद पडणें, फुफ्फुसांत विद्रधि अगर क्वचित्प्रसंगीं कोथक्रिया ( कुजणें ) होणें अगर पुढें रोगलक्षणात दिलेले अनेक आगंतुक दोष किंवा रोग होणें यापैकीं एखाद्या दुसऱ्या कारणानें रोगी मरतो. दाहक्रियेस आरंभ बहुधा खालून होऊन रोग नंतर वर पसरतो; परंतु याच्या उलट प्रकारहि कधीं कधीं घडतो. उजव्या फुफ्फुसाचा दाह अधिक प्रमाणांत आढळतो दोन्ही फुफ्फुसासहि कधीं दाहरोग होतो. शेकडा १७ ते २० पर्यंत रोगी दगावतात व बाकीचे बरे होतात. रोगी दारूबाज, मधुमेह, अगर मूत्रपिंडदाहपीडित किंवा इतर रोगांनीं अशक्त झाला असेल तर त्यास झटकन फुफ्फुसदाह होण्याचा संभव फार असतो. स्त्रियांपेक्षां पुरुषांना हा रोग लवकर होतो; व एकदां झाला असला तर पुन्हां-- होण्याचा संभवहि बराच असतो. रोगलक्षणांस आरंभ येणेंप्रमाणें होतो- रोगी मोठें माणूस असल्यास थंडी वाजून किंवा लहान मूल असल्यास झटके येऊन ज्वर पुष्कळ येतो (१०१° ते १०४° किंवा अधिकहि ); नाडीच्या ठोक्यांचें प्रमाण वाढतें व श्वास घेण्यास त्रास होऊन श्वासोच्छ्वास जलद व धांपा टाकल्यासारखाच होतो. श्वासाचें प्रमाण नेहमींपेक्षां दुप्पट किंवा तिप्पट वाढून ओंठ काळसर होतात; चेहरा फाळवंडतो, छातींत किंवा बरगडींत श्वासाबरोबर दुखतें; कारण या रोगांत बहुधां थोडा फार फुफ्फुसावरणदाह असतोच. खोकल्यास आरंभ लवकरच होतो. प्रथम नुसती कोरडी ढास असते, नंतर अति चिकट कफ लाखेसारख्या रंगाचा व थोडा पडून नंतर तो अधिक पडूं लागून खाकेऱ्यांत लोखंडावर गंज चढतो तशा रंगाचें मिश्रण असतें; त्यांतच फेंसाळ, चिकट कफ आणखी असतो. हा कफ सूक्ष्मदर्शक यंत्रानें पाहिला तर त्यांत खवले, हवेचे तुटके कप्पे, तांबडे, पांढरे व पूयपेशी, फुफ्फुसदाहाचे व इन्फ्ल्युएंझाचे व इतर जंतूहि सांपडतात. प्रथमावस्थेंत छाती तपासून ( वैद्यानें ) पाहिली असतां तींत विकृत फुफ्फुस असेल त्या जागेवर बारीक " तड्तड् " असा आवाज नेहमींच्या सूक्ष्मश्वासध्वनींच्या ऐवजीं ऐकूं येतो. एखाद्या वेळीं हाहि विकृतध्वनि ऐकूं येत नाहीं. द्वितीयावस्थेंत विकृत बाजूचा छातीचा भाग निरोगी भागापेक्षा श्वसनक्रिया करतांना कमी हालतो. तो भाग बोटाच्या अग्रांनीं ठोकून पाहिला तर त्या फुफ्फुसांत हवा नसते म्हणून मंद आवाज ऐकूं येतो. व हातास त्या जागीं शब्दकंप झालेला कळून येतो. नलिकायंत्रानें तपासून पहातां नेहमींच्या श्वासध्वनीऐवजीं बारीक नळींतून फुंकल्याप्रमाणें पोकळ आवाज येतो. तृतीयावस्थेंतहि अशींच लक्षणें असतात; परंतु बारीक " तड्तड् " ध्वनीच्या ऐवजीं " बुडबुड " असे जरा मोठे ध्वनी ऐकूं येतात. रोगोपशम स्थितींमध्यें हीं सर्व लक्षणें कमी होऊन मग नाहींशीं होतात. हीं वरील श्वासध्वनींचीं लक्षणें वाढत असतां ताप व जलद श्वासाचें प्रमाण चढतें असतें. सर्व दुखण्यांत रोगी उताणा अगर जें फुफ्फुस बिघडलें आहे त्या कुशीवर निजलेला असतो. फुफ्फुसांतील रक्ताभिसरणांत व्यत्यय आल्यामुळें नाडी बारीक आणि अशक्त झालेली लागते. रोग्यास किंचित काबीळ झाल्याची छटा कधीं कधीं दिसते. लघवी थोडी, कधीं तींत आल्ब्युमिन असलेली, व क्लोराइट क्षारविहीन अशी असते. रोग्यास सहा ते आठव्या दिवसाच्या दरम्यान घाम दरदरून सुटून व क्षारयुक्त पुष्कळ लघवी होऊन ताप एकदम कमी होऊं लागतो व हें सुचिन्ह आहे असें समजावें. छाती तपासून त्यावरून रोग मोठासा कमी झाला आहे असें जरी आढळून आलें नाहीं तरी रोगी अमळ कमी कष्टानें श्वासोच्छ्वास करीत आहे व त्यास सुखाची व स्वाभाविक निद्रा येऊं लागत आहे असें दिसतें व नंतर बहुतेक रोगी झपाट्यानें बरे होऊं लागतात. रोग असाध्य असल्यास--विशेषतः दोन्ही बाजूंस रोग असल्यास-सर्व लक्षणें ( तापासुद्धा) वाढतात. नंतर वरच्याप्रमाणें उतार पडण्याच्या ऐवजीं ताप कमी होऊन हृदयक्रिया एकदम बसते किंवा असाध्य शक्तिपात होतो, किंवा रोगी जुनाट रोगामुळें अगोदरच

खंगला असल्यास त्यास वायु होऊन तो वडवडतो व कफ हिरवा, रसासारखा व थोडा होऊन रोगी शक्तिपात होऊन मरतो. रोग्याच्या फुफ्फुसाचें दुसऱ्या व तिसऱ्या अवस्थेंत घनीभवन झालें असतां क्ष किरणाच्या योगानें चित्रलेख काढला असतां घनीभूत भाग काळा दिसतो. जो खोल भागीं असल्यामुळें तपासण्यास एरव्हीं कठीण पडत असला तरी हा भागहि अशा तऱ्हेनें विकृत झालेला पहातां येतो हा एक नवीन शोध आहे.

या रोगांत होणारे दोष व आगंतुक रोगः-( १ ) फुफ्फुसावरणदाह हा बहुधां असतोच हें पूर्वी सांगितलें आहेच. ( २ ) पूयफुफ्फुसावरणदाह हा रोगहि कधीं होतो व त्या पुवांत या रोगाचे व पूर्वीचे जंतु सांपडतात. (३—४) हृदयावरणदाह व हृदयांतर्गतदाह हे दोन्ही रोग या ज्वराच्या विषोत्सर्जनबाधेमुळें होतात. ( ५ ) मास्तिष्कावरणदाह हा उपस्थित होणें हें असाध्यपणाचें सूचक आहे व दगावणाऱ्या बऱ्याच रोग्यांनां हा होतो. व तेथील विकृत लशीमध्यें या रोगाचा जंतु प्रेततपासणींत सांपडतो ( ६ ) विषमज्वर, गोंवर, इन्फ्लुएंझा, प्लेग वगैरे सांथीच्या तापानंतर आगंतुक रोग म्हणून मागाहून हा रोग होतो; व त्याचें कारण अगोदर मूळ रोगानें प्रकृति क्षीण होऊन नंतर त्या स्थितींत या जंतूचा ( जो एरवीं निरुपद्रवी स्थितींत पुष्कळांच्या कफांत सांपडतो ) जोर होतो. अशा वेळीं मूळच्या सांथीच्या ज्वरांच्या लक्षणांचा जोर असून त्यांत या फुफ्फुसदाहाची भर पडल्यामुळें त्याच्या लक्षणाकडे वेळेस दुर्लक्ष होण्याचा बराच संभव असतो.

रोगचिकित्साः—पूर्वीपेक्षां हल्लीं या रोगास उपचार करण्याच्या पद्धतींत पुष्कळ फरक पडला आहे.औषधींचा प्रत्यक्ष रोगावर परिणाम होऊन उतार पडत नाहीं, तर इतर रोगांत हृदय व श्वसनक्रियेची शक्ति टिकविण्यासाठीं, मेंदु, डोकें शांत ठेवण्यासाठीं, कोठा साफ ठेवण्यासाठीं जरूरीप्रमाणें औषधें योजावयाचीं असतात. उपचार पुढील तीन प्रकारांनीं करतातः—( १ ) सर्वसाधारण उपचार, ( २ ) लक्षणानुसार उपचार, ( ३ ) जंतुयुक्त जनावरांची अगर रोग्यापासून तयार केलेली लस टोंचणें. ( १ ) विषमज्वरादि इतर मोठ्या दुखण्यांत जसें रोग्यास अगदीं अंथरुणांत निश्चेष्ट निजवून ठेवावें लागतें तसेंच या रोगांतहि करणें अगदीं जरूर आहे. म्हणजे त्यामुळें ज्वराच्या विषाची शरीरास पीडा बरीच कमी होते. रोग्याच्या खोलींत पुष्कळ व ताजी हवा येऊं दिल्यानें रोगोपचारास मदत होते. ज्या जागीं छातींत दुखतें तेथें फडक्यांत बर्फ गुंडाळून ठेवल्यानें वेदना शमते. सर्वांग कोमट अगर थंड पाण्याच्या बोळ्यांनीं ज्वरदाहशांतीसाठीं पुसून वरचेवर जरूरीप्रमाणें काढावें. दूध, पेज, मांसक षाय इत्यादि, रोग्यास परिचित व पचनास हलके असून पातळ व पौष्टिक असे पथ्यकर पदार्थ खाण्यापिण्यास देऊन रोग्याची शक्ति दुखण्यांत कायम ठेविली पाहिजे. ( २ ) श्वसनक्रिया व हृदयक्रिया दुखण्यांत शाबूत रहाण्यासाठीं स्ट्रिकनियाचा अर्क ( पोटांत देऊन अगर टोंचून ) व डिजीटालीसचा अर्क, अमोनिया अशा औषधांची जरूरी फार असते. जंतुघ्न द्रव्यांनीं अगर जाळून कफविसर्जन करावें; म्हणजे रोगप्रसार बहुधा होत नाहीं. छातींत कळ आली असतां मार्फिया टोंचणें अगर पोटांत अफूचा अर्क किंवा डोव्हर चूर्ण देणें. वायु होऊन रोगी बडबडूं लागल्यास हायोनीस टोंचणें हे सर्व लक्षणानुसार उपाय झाले. ( ३ ) अनेकांनीं तयार केलेली जनावराची जंतुयुक्त लस, टोंचून बराच अनुभव घेऊन पहातां ती निरुपयोगी ठरली. त्यापेक्षां वरील पहिल्या दोन प्रकारांनीं उपचार करूनहि चांगला गुण येतो. मृत जंतुयुक्त लशीचा उपयोग अतितीव्र अशा पुष्कळ रोगांत करून पहातां तो पुष्कळ उपयुक्त असल्याचा अनुभव आला. रोग्याच्या रक्तापासून तयार केलेली लस अधिक सरस ठरली पण तींत दोष एवढाच कीं ती तयार करण्यास वेळ लागून कालक्षेप बराच होतो; पण ती निःसंशय अधिक गुणावह असते.

अ स म ग्र भा ग व्या पी भे दा चें व र्ण नः—यांत प्रथम श्वासनलिकादाहाचा रोग सुरू होऊन तो पुढें पसरण्यानें मागाहून या प्रकारचा दाह सबंध फुफ्फुसभागांत न होतां फुफ्फुसांत निरनिराळ्या ठिकाणीं बारीकशा भागांतील हवेच्या कप्प्यांत पसरतो.कोंदट हवेंत रहाणाऱ्या तीन वर्षांच्या आंतील अशक्त मुलांनां विशेषतः अगोदर डांग्या खोकला, गोंवर इत्यादि सार्थीचें मोठें दुखणें येऊन गेल्यावर हा रोग होण्याचा संभव फार असतो. मोठ्या माणसांनांहि हा रोग कधीं कधीं होतो व त्याचें कारण घशांत घटसर्प किंवा घशांतील कुजणाऱ्या इतर घाणीपासून श्वासनलिकामार्गे जंतुप्रवेश होऊन हा रोग होतो. मुलांनीं कधीं आरंभापासूनच हा रोग होतो. व सांथीच्या रोगानंतर त्यांनां हा रोग झाल्यास बहुधां मृत्यु येतो. मोठ्या माणसांनां इनफ्लुएंझा, मूत्रपिंडदाह, व इतर रोगानंतर किंवा मुख, कंठ ह्या ठिकाणीं शस्त्रक्रिया केल्यानंतर महाश्वासनलिकेंत आगंतुक पदार्थ जाऊन, किंवा क्षयामध्यें फुफ्फुसांत आगंतुक दोष म्हणून हा रोग उत्पन्न होतो.

फुप्फुसात खालील बदल होतातः—विकृत भागांत प्रथम घट्टपणा असून रंग निळसर तांबडा असतो व अशीं ठिकाणें फुफ्फुसभर निरनिराळ्या जागीं सांपडतात. बोटानें दाबल्यानें तीं फूटून त्यांतून लालसर पाणी निघतें. सूक्ष्मदर्शक यंत्रानें पाहिलें असतां वरील भेदाप्रमाणेंच फुप्फुसातील विकृतावस्था नजरेस पडते. श्वासनलिकादाहाचीं चिन्हें सुद्धां स्पष्ट असतात. फुप्फुसांतील बरेच विकृत भाग करड्या व पिवळ्या रंगाच्या स्थितींतहि असतात.

रोगलक्षणेंः—एकदम, किंवा अगोदर गोंवर, डांग्याखोकला इत्यादि रोगांतच एकच दिवशीं सडकून ताप भरून नाडीचें व श्वासाचें प्रमाण वाढणें व श्वासोच्छ्वासास अडचण

पडूं लागणें हीं प्रथम लक्षणें होत. खोकतांना घशांत दुखतें व कफ फारसा पडत नाहीं. श्वासनलिकादाह अगोदर असल्यानें फुफ्फुसदाहाचीं स्पष्ट चिन्हें छाती तपासून नेहमींच स्पष्टपणें सांपडतात असें नाहीं मात्र वद आवाज व नळींतून वारा फुंकण्यासारखे श्वासध्वनी ऐकूं येतात. श्वास कोंडल्याप्रमाणें होऊन रोग्याचा जीव बराच गुदमरतो व हृदयक्रिया बंद पडून मृत्यु येतो. पांच वर्षांच्या आंतील मुलांमध्यें शेंकडा ३० ते ५० पर्यंत मुलें दगावतात असा हिशेब निघतो. यावरून हा रोग किती घातक आहे ह्याची कल्पना होईल. मागील भेदाप्रमाणें यानें ठराविक मुदत नसते: म्हणून हा रोग अधिक कालपर्यंतहि चालू असतो व पूर्वस्थिति येण्यास बराच काळ लागतो. वायु होणें, झटके येणें हीं दुश्चिन्हेंच आहेत तथापि असाध्य वाटणाऱ्या स्थितींतूनहि कांहीं मुलें बरीं होतात; परंतु वृद्ध माणसांना हा रोग होणें म्हणजे असाध्य दुखणेंच आहे.

रोगचिकित्साः—ही वरील भेदांत सांगितल्याप्रमाणें सामान्य धोरणाप्रमाणें करण्यांत यावी. जसजशीं लक्षणें होतील त्याप्रमाणें औषधयोजना करावी. वमन होणारें औषध दिल्यानें सांचलेला कफ पडून जाऊन छाती मोकळी होते. खोकल्याची ढास कमी होण्यासाठीं कफशामक हुंगण्याचीं औषधें उपयुक्त असतात. स्ट्रिकनिया ( कुचल्याचें सत्व ) टोंचून घातल्यानें रोग्याची श्वसनशक्ति रोगांत टिकाव धरूं शकते. मुलांनां व वृद्ध माणसांनां या रोगात ब्रँडीसारख्या उत्तेजक औषधाची जरूरी विशेष आहे. व ती दर तासास मुलास १५--२० थेंब प्रमाणें व मोठ्या माणसास एक चमचाभर किंवा जरा कमी अगर जास्ती देत जावी. चेहरा काळसर पडल्यास बाहूची शीर तोडावी. लशीचा उपयोग या भेदांत करू नये. हा रोग बरा झाल्यानंतर क्षीणता येऊन कफक्षय होण्यास अनुकूल स्थिति असते; म्हणून उत्तम कोरडी हवा :आणि पौष्टिक आहार ठेवावा.

दीर्घकालीन फुफ्फुसदाह.—फुफ्फुसात मध्यम, लहान व मोठ्या श्वासनलिका व रक्तवाहिन्या असतात.त्यांच्या भोंवतालीं फुफ्फुसरचनेमध्यें स्वसावृद्धि म्हणजे तंतुमय जाल उत्पन्न होऊं लागून फुफ्फुसांतील हवेच्या कप्प्यावर दाव पडून फारा दिवसांनीं हे हवेचे फुगे व कप्पे नष्ट होतात. व या तंतुमय स्वसावृद्धीची वाढ फुग्याच्या समूहामधील अनेक प्रकारच्या भागात होऊन विकृत फुफ्फुसांतील हवेचे फुगे बहुतेक नष्ट होतात; व नंतर फुफ्फुस लहान संकुचित होतें. व जे भाग शाबूत रहातात ते हवेनें फाजील फुगलेले व बाकीचे भाग घट्ट परंतु लहान होतात श्वासनलिका विस्तरण पावतात, फुफ्फुसावरण जाड होतें, फुफ्फुसाचा रंग बदलतो,कोळशाच्या खाणींतील माणसांचें फुफ्फुस काळें होतें, दुसऱ्या बाजूचें फुफ्फुस विस्तरणरोग होऊन मोठें झालेलें असतें, हृदयांतील उजवी बाजू विशेषतःविकृतीनें मोठी होते, रक्तवाहिन्यांमध्यें काठिण्य येतें व शेवटीं तें फुफ्फुस म्हणजे विस्तारित श्वासनलिकांचे ठिकाठिकाणीं कोनाडे असलेला एक गोळाच बनतो. अशी स्थिति फुफ्फुसाच्या इतर दीर्घकालीन रोगांतहि कमी प्रमाणांत आढळते. शिवाय ज्या माणसांनां धुराळा, खकाणा, बारीक कण, यांत नेहमीं काम करावें लागतें म्हणजे पिंजारी, पाथरवट, पिठाच्या गिरणींतील मजूर, कोळशाचा धंदा करणारे यांच्यामध्यें हा रोग बराच आढळतो.



याचीं लक्षणें दीर्घकालीन कफक्षयाप्रमाणेंच असतात. म्हणजे जरा श्रम केल्यानें धाप लागणें, कोरडा किंवा ओला खोकला, कधीं पुष्कळ तर कोणास दुर्गंधियुक्त कफ ( कोळसेवाल्यांनां तर काळा कफ पडतो ) हीं लक्षणें असतात. विकृत बाजू श्वासोच्छ्वासाच्या वेळीं चांगलीशी हलत नाहीं. कारण बहुधा रोग एका फुफ्फुसालाच होतो. छाती ठोकून पाहिली असतां बद आवाज, नलिकेंत फुंकल्याप्रमाणें श्वासध्वनि व "बुडबुड" असा आवाज छाती तपासणींत वैद्यास ऐकू येतो. रोगाचा प्रसार अधिक होऊन विकृत बाजू खालीं दबल्यासारखी डोळयास स्पष्ट दिसते व त्यामुळें हृदय- व यकृत निराळया जागीं हालास लागतात. नंतर पुढील अवस्थेंत शक्तिपात होऊन कफक्षयाप्रमाणें लक्षणें होतात. व शेवटीं शरीर झिजत जाऊन मृत्यु येतो. कधीं कधीं हृदय विकृतीमुळें उदररोगहि होतो. हा रोग पुष्कळ वर्षे आहे त्याच स्थितींत राहिल्यानें पुष्कळ वर्षे चालू रहातो. कधीं तर थोडी सुधारणाहि झालीशी वाटते पण एकंदरीत प्रकृति खचत जाते. उपचारः—हवामानाप्रमाणें हवेंत बदल करावा. पौष्टिक आहार ठेवावा. गारठ्यास आणि ओलीस फार जपावें.

**फुफ्फुसविस्तृति** ( एम्फेसेमा )—या रोगामध्यें फुफ्फुसामधील नलिकांच्या अति सूक्ष्म नळयांशीं संबंध असलेल्या हवेनें भरलेले अतिसूक्ष्म फुगे असतात ते आंतील हवेचा दाब अधिक होऊन ताणले जातात व सर्व फुफ्फुस मोठें होतें. आणि त्यांतील स्थितिस्थापकधर्म कमी होतात. व आकुंचन-प्रसरण क्रियेचा जोर कमी होतो. ताणलेल्या फुग्यामधील पातळ त्वचा फुटून दोहोंतील हवा एक होते व त्यांतील केशवाहिन्या नष्ट होऊन विनाकारण फुगलेलें परंतु आंतील उपयोगी रचना नष्ट झालेलें फुफ्फुस होतें. अर्थात यामुळें प्राणवायूपासून रक्तशुद्धीकरणक्रियाहि नीटशी होत नाहीं. रोगोद्भवाचीं कारणें प्रथम श्वासनलिकादाह दीर्घकालीन तऱ्हेचा असल्यामुळें असें पुष्कळदां होतें व पुष्कळ रोग्यांनां हा फुफ्फुसांतील फरक पूर्वी डांग्या खोकला अगर दमा झाला असतांना एकदम अगर हळूहळू होण्यास प्रारंभ होतो. परंतु असेहि पुष्कळ रोगी असतात कीं त्यांनां पूर्वी यांपैकीं कोणताहि रोग झालेला नसतो. त्याचें कारण हें असावें कीं, वयपरत्वें शरीरांतील स्थितिस्थापकतंतुमय रचना झिजतात व त्या फुफ्फुसांतील झिजण्यामुळें हा रोग होतो. दम बराच वेळ कोंडून सर्व,

बँडमधील तुताऱ्या वगैरे वाद्यें वाजविणारांनां हा रोग होण्याचा पुष्कळ संभव असतो. कांचेच्या कारखान्यांत ज्यांस फुंकण्याचें काम पडतें त्यांनां व ज्यामध्यें कांहीं कारण दृष्टीस पडत नाहीं अशाहि लोकांत हा रोग आढळतो.

यापासून होणारे दुष्परिणाम असे कीं, श्वास आंत ओढला जातो व फुफ्फुसांतील लवचिक तंतू नष्ट झाल्यामुळें आपोआप श्वास बाहेर पडण्याची पंचाईत भासूं लागते. आपण पूर्ण श्वास आंत ओढून धरिला असतां जशी छाती रुंद व मोठी होते तशी ती एरवींहि व कायमचीच होते व तिची स्वाभाविक श्वासोच्छ्वासाची हालचाल कमी होते. कारण उच्छ्वासाची क्रिया अधिक मंद चालते. खोकल्यामुळें खोकून सहज खांकरून कफ बाहेर पडण्याची शक्तिहि नाहीशी होते प्राणवायूनें रक्ताचें शुद्धीकरण कमी होतें. हृदयाचे उजवे कप्पे व फुफ्फुसाची मोठी शीर हीं रक्ताधिक्यानें फुगतात. त्यामुळें यकृतांत रक्ताधिक्य, पायांस सूज व लघवींतून अल्ब्यूमिन जातें.

रोग लक्षणें.–प्रथम दम लागतो. खोकला असतो व कफ बराच पडतो. दम्यामुळें रोग्यास धांप लागते. प्रथम मधून मधून असें होतें, पण नंतर एकसारखी अहोरात्र धाप सुरू असते, त्यामुळें रात्री बसून जागून काढाव्या लागतात. जुनाट रोग असल्यास छाती फार ताणली जाऊन मानेच्या व स्नायूंच्या शिरा मोठ्या होतात. उच्छ्वास दीर्घ व कष्टानें करावा लागतो. छाती अति रुंद होते व तिचें पाठीपासूनचें अंतर जास्त वाढतें म्हणजे सर्व छातीचा आकार कांहींसा पिंपाप्रमाणें वाटोळा, रुंद व फुगीर दिसतो, खांदे उचलल्यासारखे दिसतात, उरोपंजराचा बरगड्यांच्या योगानें झालेला मध्योदरप्रदेशांतील कोन विशाल होतो (१०५° अथवा अधिक), स्तन पांचव्या बरगडीवर असतात, व हृदयनाडी ६ व्या पंजरास्थीअवकाशस्थानांत असते, छाती ठोकून ( बोटांच्या अग्रांनीं ) पाहिली असतां तींतील अनुनाद जास्त ऐकूं येतो, हृदय, नाडी व हृदयध्वनि हीं अनुक्रमें स्पष्ट लागत नाहींत व ऐकूं येत नाहींत, यकृत् व प्लीहा हीं उदरांत नेहमींपेक्षां खालीं ढकलली जातात व श्वासोच्छ्वासक्रिया होत असतांना बरगड्यांमधील जागेंत त्या आंत आकृष्ट झाल्यामुळें दर श्वासागणिक खळग्या पडतात.

आगंतुक दुष्परिणामः (१) हृदयाच्या उजव्या बाजूचें फाजील विस्तरण. (२) सर्वांगावर सूज व (३) लघवींतून अल्ब्यूमिन जाणें. याशिवाय वृद्ध रोग्यांनां मूत्रपिंडदाहरोग झालेला असतो अगर नवीन होतो.

साध्यासाध्यविचारः—हा रोग पूर्ण बरा होत नाहीं; फक्त त्रासदायक लक्षणें मात्र कमी करतां येतात. फुफ्फुसरचना ज्यामानानें बिघडली असेल व श्वासनलिकादाह जितका कमी जास्त असेल अगर हृदयविस्तरण जितकें थोडें अगर फार असेल त्यामानानें आयुष्य फार अगर थोडे दिवस असतें. बहुधा हे रोगी बरींच वर्षे जगतात.

चिकित्सा.—रोग्याची एकंदर शरीरप्रकृति जेणेंकरून सुधारेल ते सर्व उपाय करावेत. त्यास अगोदर जुनाट खोकला असल्यास तो बाहून त्याचे दुष्परिणाम होणार नाहींत अशी खबरदारी राखावी. म्हणजे पौष्टिक व पचण्यास सोपें असें अन्न, उबदार कपडे व राहण्याची जागा, वाऱ्याची झुळूक व रात्रींचा गारठा टाळून जेवढी मोकळी हवा घरांत खेळेल तेवढी खेळूं देणें.

हा रोग म्हणजे शरीरांतील स्थितिस्थापक तंतुरचनेची ( फुफ्फुसांतील ) झीजच होय व इतर रोगांमध्यें झीज बरी होण्यासाठीं कॉड माशाचें तेल, लोहाचीं नानाप्रकारचीं औषधें, क्विनाईन, कुचल्याचें सत्व ( स्ट्रिकनिया ) हीं जशीं औषधें उपयोगांत आणितात तशींच हीं औषधें या रोगांतहि प्रकृति सुधारण्यास उपयोगी पडतात. फुफ्फुसांतील हवा व्हावी तशी सर्व रिकामी होत नाहीं म्हणून छातीच्या मागील व खालील जागा हातांनीं रोज दहा मिनिटें दाबून धरणें हा व दुसरेहि कृत्रिम उपाय करितात.म्हणजे छातींतील कोंडलेली हवा निघून जाते.

याशिवाय छातीवर मोहरी वांटून लावणें अगर जवसाचें पोटीस करून बांधणें हा बाहेरील उपाय आराम पडण्यास उपयोगी आहे.कफ पातळ होऊन तो पडण्याचीं औषधें द्यावींत. हृदय अशक्त होऊन फाजील विस्तरण पावत असेल तर त्यावर डिजिटालीस इत्यादि औषधें व सूज येण्यास आरंभ झाला असेल तर रेचक, स्वेदक, मूत्रवर्धक व हृदयोत्तेजक औषधें द्यावींत.

**फुफ्फुसावरणदाह**—( प्लूरिसी) फुफ्फुसावर दुहेरी आवरण असतें व त्याच्या दोन्ही पडद्यांमध्यें पोकळी असते. जंतुप्रवेशामुळें किंवा शेजारी इंद्रियांतील रोग पसरून या इंद्रियाचा दाह होतो व त्यामुळें श्वास घेतेवेळीं बरगडींत बहुधा दुखतें व ज्वर येतो. रोग झाला असतां पुढील विकृती क्रमशः होतातः—(१) या इंद्रियांत व एका बाजूस फुफ्फुसांत व दुसऱ्या बाजूस बरगड्यांच्या मांसांतहि रक्ताधिक्य व लाल आणि पांढऱ्या रक्तपरमाणूंचा फाजील संचय होतो. (२) फुफ्फुसावरणावरील पोकळींत प्रथम कोरडी, नंतर दाट व चिकट व नंतर पातळ लस स्रवून जमते.कधीं कधीं तर तिचे पापुद्रे अथवा थरच्याथर जमतात. रंग काळसर पिंवळा असतो व त्यांत खवले आणि पांढरे तांबडे रक्तपेशी असल्याचें सूक्ष्मदर्शक यंत्रानें दिसतें. यामुळें मधील पोकळी जी नेहमीं गुळगुळीत असते ती खरखरीत होते व ठिकठिकाणीं लशीच्या योगानें दोन्ही पडदे चिकटतात. याच स्थितींत रोग बरा झाल्यास त्या चिकटण्यामुळें तें फुफ्फुस श्वासोच्छ्वासाच्या वेळीं पूर्ववत पूर्ण फुगण्यास अडचण पडते, ( ३ ) कधीं कधीं मधल्या पोकळींत यानंतर पातळ लस जमते, व ती ज्या प्रकारची असेल त्यावरून या रोगाच्या भेदांस पुढील नांवें पडलीं आहेतः ( १ ) पातळ लस येण्यापूर्वीं जो दाह बरा होतो त्यास शुष्कभेद असें म्हणतात.

(२) ज्यांत आवरणाच्या पोकळींत चिकट पदार्थाचे थर किंवा पापुदरे जमतात व जो फुफ्फुसदाह, क्यान्सर, फुफ्फुसविद्रधि अथवा कफक्षय या रोगांत होतो त्या प्रकारच्या फुफ्फुसावरणदाहप्रकारास स्निग्धभेद असें म्हणतात. (३ ) पापुदरे, थर, व पातळ लस हीं सर्व मिळून जो प्रकार होतो तोच फार करून आढळण्यांत येतो व त्याचें मिश्रभेद हें नांव सार्थच आहे. ही पातळ लस कधीं अगदीं थोडी जमते तर कधीं कधीं आठ-दहा शेरहि जमते. इतकी पुष्कळ लस जमल्यावर तिचा दाब फुफ्फुसावर पडून तें वायुरहित व अत्यंत संकुचित होतें; व याशिवाय हृदय, यकृत यांच्या सारख्या शेजारील इंद्रियावरहि तो दाब चांगलाच जाणवतो व त्यामुळें बरगड्या, छाती हीं अगदीं फुगून वर आलेलीं दिसतात. सौम्य रोग असल्यास ही लस आपोआप नाहींशी होऊन पोकळी रिकामी होते खरी, पण तिचे पडदे एकमेकास चिकटतातः किंवा ते कधीं कधीं तसे न चिकटतां पोकळी रिकामी राहून फुफ्फुसावरोबर श्वासोच्छ्वासक्रियेंत नेहमींप्रमाणें एकसारखी हलते. दुसरा प्रकारः—पुष्कळ पातळ लस असून ती नाहींशी होण्यास फार काळ लागतो व त्या काळांत अतिशय दाबामुळें फुफ्फुस कायमचेंच वायुरहित होऊन चिवलें जातें. असें झालें म्हणजे त्या बाजूचा छातीचा भाग खचून छाती सपट व आंत जाते, बरगड्या जवळ जवळ येतात, तो खांदाहि खालीं उतरलेला दिसतो, पाठीच्या कण्यास वक्रता येते, शेजारील इंद्रियें कायमचींच स्थानभ्रष्ट होतात व श्वासोच्छ्वासांत तो बाजू अगदींच हलेनाशी होते. (४) कधीं थोडी लस नाहींशी झाल्यावर बाकी शिल्लक राहून पुवाप्रमाणें होते त्या प्रकारास पूयभेद म्हणतात.

रोग लक्षणें.—( १ ) कधीं कधीं या रोगाचा आरंभ सूक्ष्मत्वामुळें नीटसा लक्षांत येत नाहीं. पण बहुधा आरंभीं चांगली थंडी वाजून, ज्वर व बरगडींत श्वास घेताना दुखणें हीं स्पष्ट लक्षणें होतात, दुःख कधीं स्तनांतहि असतें व क्वचित पोटांत किंवा पोटाच्या एका बाजूस असें दूरहि असतें व तें चांगलें शस्त्र भोसकल्याप्रमाणें तीव्र वेदनायुक्त असतें. छातींतील घर्षणध्वनि उरःपरीक्षानलिकायंत्रानें ऐकू येतो. दम कोंडून धरला तर मात्र तो ध्वनि ऐकूं येत नाहीं. या ध्वनीचें कारण आवरणांतील पोकळींचे दाट लस जमून खडबडीत होणें हें होय. पातळ लस उत्पन्न होऊं लागल्यावर छातींतील कळ कमी होते. पण त्रासदायक कोरडा खोकला मात्र चालू राहिल्यानें रोग्यास त्रास होतो. प्रथम ज्वरामुळें व पाठीमागून लसीच्या दाबामुळें रोग्यास दम लागतो. छातीची परीक्षा घेतल्यानें आणखी पुढील लक्षणें नजरेस येतातः विकृत बाजू फुगून वर आलेली नजरेस स्पष्ट दिसते. असें नजरेस आल्यास आंत पातळ लस जमली आहे असें समजावें. त्यामुळें बरगड्यांमधील स्वाभाविक खळ्याहि बुजलेल्या व खांदा जरा वर उचललेला दिसतो. ( २ ) हात लावून पाहिलें असतां दुसरी चांगली बाजू जशी दर श्वासाच्या वेळीं हलते तशी विकृत बाजू हलत नाहीं. रोग्यानें उच्चारलेल्या शब्दांचा ध्वनिकंप हातास भासत नाहीं. विकृत बाजू उजवी असून पुष्कळ लस असल्यास यकृत खालीं ढकललें जातें व हृदय डावीकडे लोटलें जातें. पण विकृत बाजू डावी असल्यास हृदय उजवीकडे लोटलें जातें. (३) छाती ठोकून पाहिली असतां जेथें रोग म्हणजे लस असेल तेथें बद आवाज ऐकूं येतो, व रोगावर जो फुफ्फुसाचा भाग असेल त्यावर ठोकल्यानें पोकळ ध्वनि येतो, (४) नेहमीचा श्वासोच्छ्वासध्वनि विकृत भागांत ऐकूं येत नाहीं, आणि फुफ्फुसावरण अंशतःच लसीनें भरलें असल्यास रोगी बसलेला असतां छातींतील निरोगी जागेवर तपासणारास अनुनासिक ध्वनि ऐकूं येतो हीं विविध लक्षणें अगदीं स्पष्टच असल्यामुळें छातींतील दुसऱ्या रोगांशीं—विशेषतः उरःशूलरोगाशीं—त्याच्या निदानाच्या बाबतींत घोंटाळा होण्याचें कारण नाहीं. फुफ्फुसावरणांतील लस औषधोपचारानें अगर कृत्रिम उपायानें नाहींशी झाल्यावरोबर वरील सर्व लक्षणें नाहींशीं होतात. फक्त बद आवाज छाती ठोकल्यावर ऐकूं येणें मात्र पुष्कळ दिवस टिकतें, व त्याचें कारण फुफ्फुसावरण फार जाड झालेलें असतें हें होय. लस नाहींशी झाल्यावर पुन. घर्षणध्वनि ऐकूं येऊं लागतो. आवरणाच्या दोन्ही पडद्यांतील पोकळी वाढलेली असते ती पूर्ववत् होते, दूर लोटलेलीं इंद्रियें पूर्वस्थितीवर येतात व विकृत फुफ्फुसांतील वायुहीनत्व कधीं अंशतः तर कधीं पूर्णपणें नष्ट होतें.

साध्यासाध्य विचार.—बहुतेक रोग्यांमध्यें ही पातळ लस आपोआप नाहींशी होते. कांहीं रोग्यांमध्यें मात्र ही लस पिचकारीनें काढून टाकल्यावर पुन्हां नवीन लस उत्पन्न होत नाहीं. पण कांहीं थोड्या रोग्यांमध्यें ती नाहींशी होतच नाहीं, व रोग कायम होतो. कांहीं रोगी तर फुफ्फुसावरणांत पातळ लस बरीचशी सांठली असूनहि विशेष नडण्यासारखी त्रासदायक लक्षणें न होतां खुशाल कामधंदा करतात. पण असल्या प्रकारचा रोग फार दिवस टिकून तो पूर्ण बराहि होत नाहीं.

उपचारः—बरगडींतील आरंभीं येणाऱ्या वेदना शमन होण्यासाठीं अगोदर जवसाचें पोटीस बांधावें व त्याचा उपयोग न झाल्यास मार्फिया टोंचावा. अगर तेथें जळवांचा उपयोग करावा. सुरवातीस चांगले रेचक देणें जरूर आहे. ग्लास्टरच्या चिकट पट्टयानें डॉक्टरकडून बरगड्या न हालतील अशा चिकटवून घ्याव्या. म्हणजे श्वासोच्छ्वासाच्या वेळीं तिकडील वेदना छाती हालणें बंद झाल्यामुळें थांबतील. क्षयी रोग्यांनां त्या रोगांत सांगितल्याप्रमाणें हवाशीर व उजेडाच्या जागीं ठेवावें. लस पातळ झाल्यावर पोटांत पोटॅशियम आयोडाइड औषध दिल्यानें ती जिरते. बाहेर आयोडाइन अगर मोहरी वांटून लावावी. खाण्यांत पातळ पदार्थ कमी करणें व रेचक घेत जाणें हाहि

एक इलाज आहे. छातींतील पाणी लवकरच तें थोडें असलें तरी काढून टाकणें बरें. रोगाची थोडी लस पिचकारीनें काढून लागलीच ती त्याच्या त्वचेंत टोंचणें हा इलाजहि उपयोगी आहे. (१) पाणी अतिशय असतां, (२) तें पंधरवड्यापेक्षां जास्त वेळ राहिल्यास किंवा (३) पू बनल्यास एकदम सर्व नाहींतर थोडेसें पाणी काढून टाकणें उत्तम. यासाठीं कुशीमध्यें किंवा पाठीमागें सुई टोंचून पाणी यंत्रानें शोषून घेतात. यानंतर ताप नाहींसा होऊन रोगी सुधारतो. पू असल्यास शस्त्रवैद्यानें मोठी जखम करून रोग वाहूं देऊन जखम भरूं द्यावी व अशा स्थितींत, रोग्यास पौष्टिक अन्न, उत्तम हवा, पाणी व शक्तीचीं लोह क्किनाइन, कॉडमाशाचीं तेलयुक्त औषधें द्यावींत. फुफ्फुसदाहानंतर पू झाला असल्यास एकदांच पू काढून टाकल्यानें रोग कायम बरा होतो.

**फुलकियन संस्थानें**—फुलकियन संस्थानांत पतियाळा, झिंद व नाभा या पंजाबांतील तीन संस्थानांचा समावेश होतो. या तीन संस्थानांची माहिती स्वतंत्र दिली आहे.

हल्लीं पतियाळा, झिंद व नाभा संस्थानांच्या गादीवर असलेल्या संस्थानिकांचा मूळ पुरुष फूल नांवाचा होता. भदौर व मलौदण आणखी दुसरीं लहान सहान घराणीं या फूलापासून निघालेलीं आहेत. फरीदकोट, कैठल, अरनौली, झंब, सिध्धुवाल व भतारी हीं संस्थानें फूलापासून निघालेलीं आहेत त्याला ६ मुलें होतीं त्यांत तिलक नांवाचा सर्वांत वडील होता. झिंद व नाभा संस्थानिकांचा वंश त्याच्यापासून निघालेला आहे. दुसऱ्या मुलाचें नांव राम होतें; पतियाळाचा वंश रामाचा आहे;त्यानें रामपूर वसविलें.सरहिंदच्या मोंगल सुभेदारापासून फुलकियन संस्थानाचा जंगली प्रदेश त्यानेंच काबीज केला. त्याला चैनसिंग नावाचा एक चुलतभाऊ होता. संस्थानच्या कामकाजांत तो स्पर्धा करी, हें सहन न होऊन रामानें चैनसिंगास ठार मारविलें. त्याचा सूड चैनसिंगाच्या मुलानें उगविला. रामाचा तिसरा मुलगा अलासिंग नांवाचा होता.त्यानें चैनसिंगाच्या एक खेरीजकरून सर्व मुलांना ठार केलें. अलासिंग बर्नाल येथें रहात असे;त्याला शार्दूलसिंग नांवाचा मुलगा होता. अलासिंगानें आपलें नांव चांगलें गाजविलें. अहमदशहा दुराणीनें शीख लोकांचा पाडाव करण्याचें मनांत आणिलें तेव्हां त्यांनां अलासिंगाचें पाठबळ होतें, परंतु दुराणीनें त्यांचा पराभव करून अलासिंगाला कैद केलें, आणि बर्नाल घेतलें (१७६२) पुढें ४ लक्ष रुपये खंडणी देऊन अलासिंगाची मुक्तता झाली. अहमदशहानें त्याला राजा ही पदवी देऊन त्याच्या नांवानें नाणें पाडण्याचा हुकूम दिला. पतियाळा संस्थानची सुरवात अलासिंगापासून झाली. नाभाचा उत्पादक हमीरसिंग हा अलासिंगाचा मुलगा होता. सरहिंदच्या लढाईंत ( १७६३ ) अलासिंगाला पूर्णपणें यश आलें;त्यामुळें सरहिंद व त्याच्या आसपासचा प्रदेश अलासिंगाकडे आला. नाभाकडे अमलो व वराचसा दुसरा प्रदेश झिंदच्या वांटणीस आला. दत्तक घेण्याचा हक्क सन १८६० सालीं पतियाळा, झिंद आणि नाभा यांनां मिळाला. शिवाय या तीन संस्थानांपैकीं एखादा संस्थानिक निपुत्रिक मेला व त्यानें दत्तकहि घेतला नाहीं तरी फुलकियन संस्थानापैकीं कोणी तरी वारस नेमून पोलिटिकल एजंटच्या सल्ल्यानें तें संस्थान चालवावें अशी योजना इंग्रज सरकारनें करून दिली. मात्र त्यावेळीं नजराणा म्हणून उत्पन्नाचा एकतृतीयांश इंग्रज सरकारास द्यावा लागतो. फुलकियन व भावलपूर संस्थानांच्या पोलिटिकल एजंटांचें ठाणें पतियाळा येथें आहे.

**फुल निझामत**—पंजाब. नाभा संस्थान. क्षेत्रफळ १३१ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) ३४३५८. या निझामतीमध्यें ३४ खेडीं आहेत. सरहिंद कालव्याचा या निझामतीला उपयोग होतो. मुख्य ठिकाण फुल आहे.

**फुलपुर**—संयुक्तप्रांत, अलाहाबाद जिल्ह्यांतील तहशील. सिकंद्रा व झांशी परगणा फुलपुर तहशिलींत येतो. क्षेत्रफळ २८९ चौरस मैल असून लोकसंख्या ( १९११ ) १६५४७७. तहशिलींत या एकंदर ४९९ खेडीं असून दोन मोठीं गांवें आहेत. फुलपुर ( लोकसंख्या सुमारें सात हजार ) हें तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे.

**फुला**—आफ्रिकेंतील एक जात. फुला लोक सेनिगॉलपासून डार्फरपर्यंतच्या मुलुखांत रहातात. फुला जात वर्बर व नीग्रो जातींची भेसळ आहे असें सर्वसामान्य मत आहे. त्यांचा रंग तांबूस व पिंगट, चेहरा लांबट, केंस कुरळे, नाक सरळ व लांब, ओंठ नाजूक व चेहरे रेखीव आहेत. मिश्र विवाहाच्या विरुद्ध त्यांच्यांत कडक बंधनें असल्यामुळें ते शुद्ध बीजाचे दिसतात. सुखोपभोगप्रीति, भपका व ऐषारामाची आवड हे त्यांचे विशेष गुण आहेत. बुद्धिमत्ता, मनाचा मोकळेपणा व करारी स्वभाव यांकरितां फुला जातीचे लोक प्रख्यात आहेत.

फुला लोक उत्तम घोडेस्वार असून ते लोखंडी भाले व तरवारी वापरतात. ते कट्टे मुसुलमान आहेत. पूर्वी त्यांच्यांत पुष्कळ शिक्षणप्रसार झाला होता परंतु अलीकडे शिक्षणाकडे लक्ष दिलें जात नाहीं. ते फुला भाषा बोलतात. त्या भाषेचा विशेष हा आहे कीं तींत मनुष्यवाचक व तदितर अशीं दोनच लिंगें आहेत.

**फेझ**—आफ्रिका. मोरोक्को देशाच्या राजधानीचें शहर. उत्तर अक्षांश ३४° ६' आणि पश्चिम रेखांश ४° ३८' यांवर, हें शहर वसलेलें आहे. 'वाडफाज' नदीच्या दोन्ही तीरांवर हें शहर वसलें असून यांतील बहुतेक सर्व रस्ते निरुंद आहेत. व त्यांच्या दोन्ही बाजूंस टोलेजंग इमारती असल्यामुळें तेथें नेहमीं निबिड अन्धःकार असतो. विख्यात मोरोक्को कातड्याच्या पिवळ्या वाहणा, सुंदर सफेत लोकरीचीं व रेशमी कामें, सुती व रेशमी रुमाल, तलवारी,

बंदुका इत्यादि जिन्नस येथील कारखान्यांत तयार होतात. अगदीं अलीकडच्या काळापर्यंत या शहराकडे फेझ टोप्यांच्या कारखान्याचा मक्ता असे. मोरोक्कोमधील मुसुलमानी अमदानीच्या प्रारंभीं फेझ हें विद्येचें माहेरघर व साम्राज्याचें भूषण होतें. सर्व आफ्रिकेंत नांव घेण्यासारखीं धर्म, तत्त्वज्ञान व ज्योतिष इत्यादि विषयांचीं पीठें या शहरांत होतीं. स्पेनमधून हद्दपार झालेले मूर लोक कला, शास्त्र व कारखाने यांचें ज्ञान आपल्याबरोबर घेऊन येथें आले परंतु सध्यां तो वैभवकाल राहिला नाहीं. फेझमधील 'कारुईन' मशीद ही आफ्रिकेंतील सर्वांत मोटी मशीद आहे असें सांगतात. फेझ शहराची स्थापना इ. स. ८०८ त दुसऱ्या इद्रिसनें वसविला असें सांगतात. तेव्हांपासून या शहराला निदान आठ वेळां तरी वेढे पडले होते, तथापि येथें फक्त एकवेळच कायतो परकीय अंमल होता इ.स. १५५४ त तुर्कांनीं हें शहर घेतलें व १६४९ सालीं फिलाली वंशानें या शहराचा ताबा घेतला.फेझची लोकसंख्या अजमासें १,००,००० आहे.

**फेनी**—पूर्व बंगाल व आसामांतील नौखाली जिल्ह्याचा एक पूर्वेकडील पोटविभाग. क्षेत्रफळ ३४३ चौरस मैल. जमीन एखल आहे. लोकसंख्या ( १९११ ) ३४०५६३. यांत खेडीं ६६९ पैकीं असून फेनी हें मुख्य ठिकाण आहे. फेनीची लोकसंख्या ( १९११ ) ५६६३.

**फेरिष्ता** (१५७०-१६११)—मुहंमुद कासीम फेरिष्ता हा इराणी इतिहासकार कास्पियन समुद्रकाठीं आस्त्राबाद येथें जन्मला. हा लहान असतांनाच त्याचा बाप गुलामअली हा याच्यासह हिंदुस्थानांत आला. व तेथें दक्षिणेंत अहमदनगरच्या निजामशाहींत, पहिला मुर्तझा निजामशहाच्या वेळीं त्याला शहाजादा मिरान हुसेन याच्या पंतोजीची जागा मिळाली त्याच्या वशिल्यानें मुहंमद शाहि दरबारीं मोठ्या योग्यतेस चढला. थोड्याच दिवसांत मुहंमदचा बाप मेला. मुर्तझाच्या मृत्यूनंतर ( १५८९ ) तो विजापूरला गेला व इब्राहिम आदिलशहा (दुसरा) याच्या.पदरीं राहिला. आदिलशाहाच्या आज्ञेवरून तरुणपणींच त्यानें हिंदुस्थानचा मुसुलमानी बादशहांचा विशेषतः दक्षिणेंतील राजांचा इतिहास लिहिला. निजामशाहीचा इतिहास त्यानें मलिकंबरापर्यंत आणून सोडला आहे ( १६११ ) आदिलशाहीचा इतिहास स.१५९६ पर्यंत लिहिला आहे. तो स. १६११ च्या सुमारास मेला. त्याचा मृत्युशक नक्की नाहीं. याचा इतिहास साधारण बरा आहे. तरीपण त्यावर सर्वस्वी अवलंबून राहण्यासारखें नाहीं. त्याच्या इतिहासाचें नांव तारीख–ई–फेरिष्ता असें आहे. तो स्वतः त्याला गुलशन इब्राहिमी व नौरसनामा असें म्हणतो. त्याच्या अकबरापर्यंत आलेल्या इतिहासाच्या पहिल्या व दुसऱ्या भागाचें इंग्रजी भाषांतर कर्नल डौ यानें १७६८ सालीं केलें व दख्खनच्या इतिहासाचें जोनाथन स्कॉटनें केलें. पुढें सर्वच भागांचें भाषांतर १८२९ सालीं कर्नल ब्रिग्ज यानें केलें [ बील; इलियट, ६. २०७ ].

**फेलिंग** (१८१२–१८८५)—या जर्मन रसायनशास्त्रज्ञानें मेटाल्डीहाइड व पराल्डीहाइड यांच्या घटनेंतील फरक दाखविला. हा स्टट्गार्ट येथें अध्यापक होता. कोणत्याहि पदार्थांत साखरेचें अस्तित्व व तिचें प्रमाण हें शोधून काढणारें "फेलिंगचें द्रावण" प्रसिद्धच आहे. हें ताम्रिकगंधकित, अल्कली, पालाश व सिंधुतार्तरित यांचें मिश्रण असतें. फेलिंग हा लिबिग, वोहलर व पोगेंड्रॉफ यांच्या हँड वरटरबग नांवाच्या पत्रांत व ग्राहामओटोच्या रसायनशास्त्राच्या पुस्तकांत लेख लिहीत असे. शिवाय जर्मनींतील आयुर्वेदाच्या निरीक्षक मंडळाचा सभासद होता.

**फैजपूर**—मुंबई इलाखा, पूर्व खानदेश, यावल तालुक्यांतील एक गांव. लोकसंख्या २० हजार. येथें चिटें वगैरे रंगवितात. येथें इमारती लांकूड व कापूस यांचे मोठे बाजार भरतात. अकबराच्या वेळीं व पेशवाईंत हा गांव फार भरभराटीचा होता.

**फैजाबाद**—अफगाणिस्तानांतील बदक्शानची राजधानी. ही कोकचा नदीच्या उजव्या तीरावर आहे स.१८२९ मध्यें मुरादबेगनें हें शहर अगदीं धुळीस मिळविलें. बदक्शानचा सुभेदार फैजमहंमदखान यानें हें शहर पुन्हां १८६५ सालीं वसविलें. अबदुल रहमान अमीरानें हें पुन्हां भरभराटीस आणलें. पूर्व अफगाण व पामीर प्रांत यांचें हें लष्करी ठाणें आहे.

**फैजाबाद**, जिल्हा.—संयुक्तप्रांत, अयोध्या प्रांतांतील फैजाबाद विभागांतील एक जिल्हा. हा गोग्रा नदीच्या दक्षिणेस पसरला आहे क्षेत्रफळ १७३२ चौरस मैल व लोकसंख्या ( १९११ ) ११७५१३०. यांत मोठीं गांवें ८व खेडीं २७४६ आहेत यांत अयोध्या हें हिंदूंच्या अत्यंत पवित्र स्थानांपैकीं एक आहे.

त ह शी ल.—ही गोग्रा नदीच्या तीरावर असून क्षेत्रफळ ३५९ चौरस मैल आहे. लोकसंख्या ( १९११ ) २०८७५९. खेडीं ४६७ व गांवें ४; पैकीं फैजाबाद शहर जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. जमीन एकंदरींत सुपीक आहे. ठिकठिकाणीं दाट जंगलें व दलदलीचे भाग आहेत.

गां व.—लोकसंख्या (१९११ ) छावणी धरून ५४६५५. या ठिकाणीं औध–रोहिलखंड–रेल्वेच्या तीन शाखा मिळतात. गांवांत दोन इस्पितळें व तीन हायस्कुलें आहेत. येथें साखर शुद्ध करण्याचा मोठा कारखाना आहे. अयोध्या व फैजाबाद मिळून एक म्युनिसिपालिटी आहे.हें गांव अयोध्येचा नबाब सादतखान यानें वसविलें. पुढें लखनौस महत्त्व येऊन हें मागें पडलें.

**फोरियर, फ्रँक्वॉ चार्लस मेरी** (१७७२–१८३७)—एक फ्रेंच समाजशास्त्रीय लेखक. फोरियरला कॉलेजमधील उच्च शिक्षण नीटपणें मिळालें १८०३ सालीं त्यानें यूरोपच्या राजकीय परिस्थितीवर एक लेख लिहून प्रसिद्ध केला.त्याच्याकडे खुद्द नेपोलियनचें लक्ष वेधलें होतें,कारण नेपोलियनच्या

स्वतःच्या कल्पना त्या लेखांत ध्वनित केल्या होत्या. निर्वाहापुरता दलालीचा धंदा करून बाकीचा वेळ तो समाजाची पुनर्रचना याविषयावरील ग्रंथ तयार करण्यांत घालवूं लागला. व्यक्तिस्वातंत्र्य व चढाओढतत्त्वांमुळें या समाजाची जी प्रस्तुतची रचना बनलेली आहे ती मूलतःच अपूर्ण व अनीतिकारक आहे. म्हणून वरील तत्त्वांऐवजीं सहकारिता किंवा संयुक्त प्रयत्न हें तत्त्व अमलांत आणून त्या योगानें मानवी स्वभावाची सर्वांगपरिपूर्ण उन्नति घडवून आणणे जरूर आहे असें तो प्रतिपादन करूं लागला. त्याचा मानसशास्त्रविषयक सिद्धांत असा आहे कीं, मानवी स्वभावाची पूर्ण व अनिरुद्ध वाढ होऊं देणें म्हणजे मानवी मनोविकारानां अनियंत्रितपणें भोग भोगूं देणें हाच सुखी व सद्‌गुणी बनण्याचा एक मार्ग होय; आणि मनुष्य दुःखी व दुर्गुणी बनण्याचें कारण, नैसर्गिक इच्छा तृप्त करण्याच्या मार्गांत समाजानें घातलेलीं कृत्रिम बंधनें हें होय. सुखविषयक मनोविकार व सद्गुणविषयक मनोविकार यांच्यांमध्यें एकवाक्यता ( हार्मेनी ) व मानवी समाज, प्राणिकोटि, सेंद्रियजीवकोटि, व जडसृष्टि या चारी क्षेत्रांमध्यें एकच मूलभूत तत्त्व सर्वत्र पसरलेलें आहे असें दाखविण्याचा त्यानें प्रयत्न आपल्या एकंदर ग्रंथांमध्यें केला आहे.

मानवी स्वभावाची परिपूर्ण उन्नति होण्याकरतां समाजाची नवी मांडणी त्यानें सुचविली, ती येणेंप्रमाणें- सर्व समाजाच्या १६०० माणसांची एकेक, अशा तुकड्या करून प्रत्येक तुकडींतलि माणसांनां राहण्याकरितां एक स्वतंत्र समाईक इमारत व धान्य पिकविण्याकरितां एक जमीनीचा ठराविक भाग असावा, सर्व तुकड्यांची इमारत एकाच नमुन्याची असावी, प्रत्येक तुकडीचा मुख्य धंदा शेतकी, पण त्याच्या जोडीला अनेक निरनिराळे उद्योगधंदे असावे व ते प्रत्येक तुकडींतील माणसांनीं आपापल्या आवडीप्रमाणें करावे; शिवाय एकच धंदा सतत न राहतां त्यांत प्रत्येकानें निरनिराळा बदल करावा, सामान्य समाजांत अगदीं हलकीं व घाणेरडीं मानलीं जाणारीं कामें अशा तुकड्यांनीं लहान मुलांकडून करून घ्यावीं, कारण मुलांनां धुळीमध्यें व घाणीमध्यें खेळण्याची नैसर्गिक आवड असते; या त्यांच्या स्वाभाविक आवडीचा फायदा घेऊन साफसफाई व स्वच्छता ठेवण्याचीं कामें त्यानां सांगावीं. अशा तुकड्या करून राहण्यांत खाजगी व कौटुंबिक राहणी, दोन्हीं चालू ठेवण्यास फोरियरच्या ह्या योजनेंत हरकत नव्हती. अशा तुकडीच्या संयुक्त प्रयत्नानें जें उत्पन्न होईल त्यांतून प्रत्येकाच्या निर्वाहाला अत्यंत अवश्य इतकें उत्पन्न सर्वांस सारखें प्रथम वांटून मग शिल्लक उरेल ती मजूर, भांडवलवाले व बुद्धिमान लोक यांत वांटून घ्यावी. त्यांपैकीं ५/१२ मजुरांनां ४/१२ भांडवलवाल्यांनां व ३/१२ बुद्धिमानांनां मिळावा.

स. १८३१ मध्यें त्याचे समाजसुधारणावादी प्रतिस्पर्धी ओवेन व सेंट सायमन यांच्यावर टीकात्मक लेख त्यानें प्रसिद्ध केला तेव्हांपासून त्याच्या ग्रंथाकडे लोकांचें लक्ष जाऊं लागून त्यास कांहीं अनुयायीहि मिळाले. १८३२ मध्यें त्यानें एक वर्तमानपत्र काढलें. पण स. १८५० मध्यें सरकारी हुकूमानें तें बंद करण्यांत आलें.

त्याच्या हयातींत तुकडी करून राहण्याची कल्पना मात्र प्रत्यक्ष अनुभवांत आणण्याची संधि त्याला मिळाली, पण तो प्रयोग यशस्वी झाला नाहीं. शिवाय त्याच्या पश्चात त्याच्या अनुयायांनीं केलेले सदरहू प्रकारच्या राहणीचे सर्व प्रयोग तसेच अपयशी ठरले.

**फोर्ट सन्डेमन**—बलुचिस्तानांतील झोब जिल्ह्याचें मुख्य ठिकाण . स्थानिक लोक ह्यास अपोझई म्हणतात. सर रावर्ट सन्डेमन यावरून हें नांव पडलें. हें ठिकाण झोब नदीच्या पूर्वेस ६॥ मैलांवर असून समुद्रसपाटीपासून ४७०० फूट उंच आहे लोकसंख्या सुमारें साडेतीन हजार आहे.

**फोर्ट सेन्ट डेव्हिड**—मद्रास इलाखा, दक्षिण अर्काट जिल्हा. कुद्दलूर तालुक्यांतलि एक जुनाट किल्ला हा गडिलम नदीच्या तीरावर आहे. एकेकाळीं डच व फ्रेंच लोकांच्या वसाहती येथें एकाच वेळीं होत्या. चुनियाचेट्टी नामक एक लहानसा किल्लाहि येथें होता. स १६७७ मध्यें शिवाजीनें जिंजीचा किल्ला घेतल्यानंतर हा किल्ला मराठ्यांच्या हातीं गेला. त्यांजवळून इंग्लिशांनीं तो स. १६९० मध्यें विकत घेतला. ह्या स्थानास पूर्वी तेग्नापट्टम् किंवा देवीपट्टम् म्हणत असत. अठराव्या शतकांतील कर्नाटक युद्धांत यास बरेंच महत्त्व प्राप्त झालें होतें.

**फौजदारी कायदा**—या कायद्यांत गुन्ह्यांच्या व्याख्या, चौकशी आणि शिक्षा सांगितलेल्या आहेत. लोकांच्या हक्कांनां बाधक होणारीं व कायद्यानें मना केलेलीं कृत्यें करणें हा गुन्हा होतो; तसेंच अमुक एका कृत्याची उपेक्षा करूं नये असें कायद्यांत सांगितलें असतां, तसें करणें, हाहि पण गुन्हा होऊं शकतो. सर्व जनसमाजाचा राजा हा प्रतिनिधि असल्याकारणानें, एखादा गुन्हा घडल्यास त्यापासून राजाला पीडा होते असें धरून त्या गुन्ह्यावद्दलच्या खटल्यांत राजा हा फिर्यादी असतो. गुन्ह्याचा विरोध ( प्रिव्हेन्शन ), त्याची चौकशी, त्याबद्दल खटला, व त्याकरितां शिक्षा, ह्यांविषयीं नियम या कायद्यांत असतात. त्याचप्रमाणें, कोणतें कृत्य केलें असतां फौजदारी गुन्हा होतो, गुन्ह्याचें अस्तित्व, व गुन्हेगाराचा गुन्हा सिद्ध करण्याला काय काय पुरावे लागतात, कर्म ( ॲक्ट ) किंवा अकर्म(उपेक्षा–ओमिशन) याच्या बद्दल काय समर्थन केलें असतां किंवा कोणती सबब सांगितली असतां ती कायद्यानें मान्य होते, फौजदारी कोर्टाची पद्धत कशी आहे, चौकशीकरितां आलेल्या निरनिराळ्या गुन्ह्यांबद्दल, कोणच्या दर्जाच्या व तऱ्हेच्या शिक्षा सांगाव्यात, ह्या गोष्टींचें विवेचन या कायद्यांत केलेलें असतें. तसेंच गुन्ह्यांच्या चौकशीकरितां, कायद्याचें उल्लंघन ज्या मानानें करण्यांत आलें असेल त्या मानानें न्यायसभांच्या घटना

करून, त्यांचें नियमन करणें, पोलीस लोकांनीं शांतता, राखण्यासंबंधीं नियम घालणें, व तुरुंगांत अन्तर्बाह्य व्यवस्था राखणें हींहि कामें फौजदारी कायद्यानें नियमित होतात.

कांहीं कृत्यें गुन्हे या सदरांत घालून त्यांबद्दल दंड किंवा कैद अशा शिक्षा सांगितलेल्या असतात. परंतु वास्तविक पाहातां, व लोकांच्या गुन्ह्यासंबंधीं असलेल्या कल्पनेवरूनहि, ह्यांनां गुन्हे हें नांव देणें बरोबर होणार नाहीं. आपला हक्क दाखवून रहदारीस हमरस्ता बंद ठेवणें, किंवा त्याची दुरुस्ती न करणें, धुराड्यांतून पुष्कळसा काळाकुट्ट धूर सारखा चालू राहूं देणें किंवा नीट व्यवस्था न ठेवतां घराला आग लागू देणें, हमरस्त्यावर मोटारीला कायद्यानें घालून दिलेल्या मर्यादेबाहेर वेग देणें, हीं वरील प्रकारचीं उदाहरणें आहेत. त्यांनां छोटेसे गैरवर्तनाचे अपराध किंवा ताबडतोब निकालाचे गुन्हे असें म्हणतां येईल.

फौजदारी व दिवाणी कायदा यांचें कार्यक्षेत्र कधीं कधीं परस्परव्यापी होतें. कांहीं कृत्यें किंवा अकृत्यें हीं अपकृत्यें होऊन ( रॉंग )गुन्ह्यांच्या सदरांत पडतात व याच अपकृत्यांबद्दल नुकसानभरपाईचाहि दावा आणतां येतो. इंग्लिश न्यायपद्धतीखेरीज इतर यूरोपीयन न्यायपद्धतींत, गुन्हेगारास शिक्षा दिल्याच्या योगानें, दिवाणी दाव्यांनां ( रेमिडीज ) बाध येऊं नये अशाविषयीं काळजी घेण्यांत येते व दिवाणी व फौजदारी भरपाई एकाच वेळीं करण्यांत येते; म्हणजे ज्यावेळीं, राजाविरुद्ध गुन्ह्याला शिक्षा सांगण्यांत येते, त्याच वेळीं त्याच निकालांत, वादीला नुकसानभरपाई देण्याचा हुकूम होतो. फौजदारी खटल्यांत, वादीला नुकसानभरपाई देणें, म्हणजे दिवाणी व फौजदारी प्रतिकार एकाच वेळीं किंवा एकाच चौकशींत पुढें आणणें हें, इल्लींच्या इंग्लिश कायदेशास्त्रांत अपवादात्मक आहे. येथें पुन्हां दावा आणून न्याय मिळविणें हें वादीवरच सोपविलें जातें.

**अर्वाचीन कायद्याची वाढ.**—जनसमाज किंवा राज्य ह्याविरुद्ध केलेला अपराध ( फौजदारी गुन्हा ), आणि व्यक्तीविरुद्ध केलेला अपराध ( अपकृत्य ), या दोहोंत फरक आहे अशाबद्दलची एकवाक्यता सर्व सुधारलेल्या कायदेपद्धतींत दृष्टीस पडते. हा फरक कसकसा होत गेला व शेवटीं पूर्णपणें तो कसा प्रस्थापित झाला, याविषयीं विद्वान लोकांनीं जुन्या कायद्यांवरून व संस्थांवरून जी बारकाईनें माहिती मिळविली आहे, तीवरून असें उघड होतें कीं, जुन्या काळच्या रानटी किंवा अर्धवट सुधारलेल्या जनसमाजाच्या चालीरीती व कल्पना यांपासून हल्लींच्या, शासनसत्तेकडून अम्मलबजावणी होणाऱ्या फौजदारी कायद्याच्या कल्पनेचा विकास ( इव्होल्यूशन )फार धिमेधिमे होत गेलेला आहे उपलब्ध असलेल्या अतिशय जुन्या कायदेसंग्रहांत ( कोड) किंवा चालीरीतींच्या संग्रहांत जितका संग्रह पुरातन असेल तितका तो फौजदारी शासनपद्धतींत ( पेनल लेजिस्लेशन ) संपूर्ण व सूक्ष्मदर्शी असतो, असा अनुभव आहे; पण ही फौजदारी शासनपद्धति म्हणजे खरा फौजदारी कायदा नव्हे. हा केवळ फौजदारी गुन्ह्यां(क्राईम)चा कायदा नसून, सर्वसाधारण अपराधांचा कायदा असे. पहिल्यानें जेव्हां समाज किंवा जात दोन व्यक्तींच्या भांडणांत पडे तेव्हां, ज्याचें नुकसान झालें असेल किंवा इजा झाली असेल, त्यानें नुकसानभरपाईदाखल कांहीं घेऊन, सूडाचा विचार सोडून देऊन रक्तपात टाळावा, असा समेट करून देण्याचा त्याचा हेतु असे. जुन्या कायद्यांतून असलेल्या मोबदल्याच्या दराच्या यादींत ( टॅरिफ ) ज्याला पीडा सोसावी लागली असेल त्याला कांहीं मोबदला किंवा सूड उगवून घेण्याचा हक्क प्राप्त होतो असें आहे; आणि यावरूनच मोबदल्यांचें व शिक्षेचें प्रमाण ठरविलें गेलें.

**बाबिलोन.**—सर्वांत जुना असा उपलब्ध असलेला कायदेसंग्रह म्हणजे खमुरब्बीचा होय, ( ज्ञानकोश विभाग, ३, उत्तरार्ध, पृ. २६ पहा ).

**ग्रीस.**—ग्रीसच्या जुन्या फौजदारी कायद्यापैकीं सध्यां उपलब्ध असे सोलन आणि ड्रॅको ह्यांनीं केलेले तेवढेच आहेत. अथेन्समध्यें, पुरातनकाळीं ॲरिओपेगस नांवाच्या न्यायसभेंत धर्माच्या दृष्टीनें गुन्ह्याचा निवाडा करीत; व अर्कन अधिकारी गुन्ह्याचा विचार मोबदल्याच्या दृष्टीनें करीत; आणि जेव्हां सरकारच्या हिताहिताचा प्रत्यक्ष संबंध येऊं लागे, त्यावेळीं राज्यद्रोहाच्या आरोपावरून चौकशी चाले. प्राचीन ( क्लासिकल ) काळीं समाजांतून निवडून दिलेले न्यायाधीश गुन्ह्यासंबंधीं चौकशी करून निकाल देत असत.

**रोम.**—रोमच्या फौजदारी कायद्यासंबंधीं माहिती, पुराणप्रसिद्ध बारा तक्त्यांपैकीं, आठव्या तक्त्यांत सांपडते. बादशाही रोमचा फौजदारी कायदा कायदेसंग्रहाच्या ४७ व ४८ व्या पुस्तकांत संकलित केला आहे. त्यांतील गुन्ह्यांचें वर्गीकरण अयथार्थ, व लहरीप्रमाणें केलेलें आहे. फौजदारी न्यायशासनपद्धति ही राज्यव्यवस्थेला धरून असे; व त्याकरितां लागतील तेवढेच गुन्हे या कायद्यांत असत. गुन्ह्यांचें वर्गीकरण खालीलप्रमाणें असेः—

( १ ) सार्वजनिक गोष्टीः—कायद्यानें स्पष्ट रीतीनें निषिद्ध मानलेले गुन्हे ह्याविषयीं यात सांगितलें आहे. रोमन कायद्याच्या पूर्वस्थितींत, सरकारविरुद्ध जेवढे गुन्हे ( राजद्रोहासारखे ) असतील, तेवढ्याबद्दलच शिक्षा देण्यांत फक्त सरकार भाग घेत असे.

( २ ) असाधारण गुन्हेः—ज्याबद्दल विशिष्ट अशा शिक्षा नमूद केल्या नाहींत असे गुन्हे. कांहीं मर्यादेपर्यंत ह्या शिक्षा न्यायाधिशाच्या तारतम्यभावावर सोपविण्यांत येत व ज्याला उपद्रव पोंचला असेल त्यानें फिर्याद आणावयाची असे.

( ३ ) खासगी गुन्हेः—याकरितां दावा आणण्याचा असा एक विशिष्ट प्रकारचा हक्क फिर्यादीला असे.

प्रजासत्ताक राज्यांतील न्यायसभांचें अनेकत्व मोडून बादशाहींत, त्या जागीं बादशहा व त्याचें प्रिव्हिकौन्सिल यांच्या देखरेखीखालीं सर्व प्रांतातून एक एक न्यायखातें स्थापण्यांत आलें. यांत सरकारी व खाजगी खटले चालत.

केल्टिक कायदा.—केल्टिक लोकांचे जुने कायदे, वेल्समध्यें हायवेल डा याच्या कायदेग्रंथांत व आयर्लंडमध्यें असिलच्या ग्रंथांत व इतर ब्रेहान ग्रंथांतून आढळतात. ह्या कायद्याची वाढ, सॅक्सन व आंग्लो-नार्मन लोकांच्या स्वाऱ्या ज्यावेळीं ब्रिटनवर झाल्या त्याच वेळीं थांबली. आयरिश फौजदारी कायद्यांतील विशिष्ट प्रकार खालीलप्रमाणें होतेः—

(१) हा कायदा रूढीला धरून असे व अस्तित्वांत असलेली कोणतीहि शासनपद्धति त्याला फिरवूं शकत नसे; तो जात्याच अचल असा असे.

(२) सर्व गुन्ह्यांची सर्वसाधारण अपराधांतच गणना होई. नुकसानभरपाईदाखल इयत्ता ठरवून कोर्ट मोबदला देववीत असे; कज्जांतले दोन पक्ष निवाडा करून घेण्यास आले असतां, व त्यांस लोकांची किंवा रूढीची संमति असतां निवाड्याचा अधिकार न्यायसभेस प्राप्त होई. हेतुपुरस्सर खुनापासून खालील सर्व गुन्ह्यांस मोबदल्याच्या दराची, नेहमीं वहिवाटींत असलेली याद असे ज्याबद्दल मोबदला देतां येणार नाहीं असा कोणचाहि गुन्हा नसे शरीराला इजा झाली असतां किंवा अब्रूची खराबी झाली असतां सुद्धां त्याबद्दल आयरिश कायद्यांत भरपाई ठेवलेली असे; व ह्या भरपाईबद्दल गुन्हेगाराचें कुटुंब किंवा जात, एकत्र मिळून जबाबदार असे.

जर्मन कायदा.—जुन्या जर्मन जातींचे कायदे जे सध्यां टॅसिटस, जर्मानिया व इतर चालीरीती कायदे, वगैरे-संबंधाच्या ग्रंथांतून आढळतात, त्यांवरून, त्यावेळीं दिवाणी व फौजदारी गुन्ह्यांचें नीट पृथक्करण केलेलें दिसत नाहीं व त्यांमधील भेद स्पष्ट केलेला आढळत नाहीं. बाबिलोनच्या कायद्यांत असलेल्या फौजदारी कायद्याची पद्धत, व अपराधांबद्दल मोबदल्याच्या दराची पद्धत यांतहि आहे. मोबदल्याची कल्पना जेव्हां अंमलांत आली तेव्हां प्रथम, रक्तपातापर्यंत हातघाईवर येणारे तंटे व खाजगी लढाया किंवा युद्धाची बुद्धि, अजीबात नाहींशी झाली.

या कायद्यावर, इंग्लंड, स्कॅंडिनेव्हिया व जर्मनी या देशांतील फौजदारी कायद्याची उभारणी आहे. पण प्रत्येक देशांतील या कायद्याची वाढ जर्मन कायदे वगैरेमुळें झाली नसून मुख्यत्त्वेंकरून रोमन कायद्यामुळें झालेली आहे.

ॲंग्लो सॅक्सन कायदा.—नार्मन लोकांनीं इंग्लंडवर स्वारी करण्याच्या प्रारंभाला तेथील फौजदारी (?) कायद्यांत (यांत अपकृत्य कायदाहि येत असे) मुख्यत्त्वेंकरून चार गोष्टी असत; हद्दपारी, द्वंद्वयुद्ध, शरीर व अब्रूनुकसानीबद्दल दंड व राजदंड, आणि जीवित व शारीरिक शिक्षा. समाजानें गुन्हेगाराशीं खालील चार तऱ्हांपैकीं कोणच्याहि एका तऱ्हेचें वर्तन ठेवावें. त्याच्या विरुद्ध लढाईस उठावें, त्यानें ज्यांचा अपराध केला असेल त्यांच्या ताब्यांत सूड घेण्यासाठीं अपराधी द्यावा, त्याला अपराधनिष्कृति करावयास लावावें; देहांतशिक्षा, अंगविच्छेद वगैरेसारखी शिक्षा त्याला द्यावी. खून, जबरीसंभोग, आगलावी, घरफोडी वगैरेसारख्या अतिघोर गुन्ह्यांनां कांहीं एक मोबदला नसून गुन्हेगाराचें जीवित, मालमत्ता वगैरे सर्व राजाकडे येत असे. इतर गुन्ह्यांनां दंडाच्या शिक्षा होत.

ॲंग्लो नॉर्मन काळ.—लहानसहान गुन्हे श्रेष्ठकनिष्ठ कोर्टांतून चालत व इतर मोठाले, शांतताभंग होण्याजोगे गुन्हे शेरीफपुढें निकालाकरितां येत. पुढें ही सत्ता राजाच्या हातांत जाऊन त्यानें, सर्व राज्यांतील गुन्ह्यांची चौकशी करण्याकरितां फिरते न्यायाधीश नेमले. हे न्यायाधीश सर्व लहानमोठ्या गुन्ह्यांची चौकशी करून (मग ते गुन्हे राजाविरुद्ध असोत वा नसोत), निकाल देत. अशा रीतीनें फौजदारी न्यायाचा अंमल, शेरीफच्या हातांतूनच नव्हे तर धर्माध्यक्ष व मोठमोठे अमीरउमराव ह्याच्यासुद्धां हातून जाऊन, सर्वस्वी राजाच्या हातांत पडला. बाराव्या शतकांत या फौजदारी कायद्यावर धर्माचा पगडा बसून त्यांत विधिनियम व मोझेसचा कायदा यांतील तत्त्वें गोंविलीं गेलीं व रोमन कायद्याच्या अभ्यासानें वकिलांची दृष्टि भेदक बनून, दिवाणी व फौजदारी गुन्ह्यांमधील स्पष्ट फरक त्यांनीं काढला.

चवदाव्या शतकांत, राजानें नेमलेल्या मोठ्या न्यायाधिशांनीं चौकशी करावी इतक्या महत्त्वाच्या नसलेल्या गुन्ह्यांची चौकशी करून निकाल देण्यासाठीं, त्रैमासिक न्यायसभेच्या बैठकी व शांततारक्षणासाठीं न्यायाधीश यांची योजना करण्यांत आली आणि त्या वेळेपासून इंग्लंडांत बहुतेक अशाच पद्धतींवर फौजदारी न्याय देण्याचें काम चालू आहे.

गुन्ह्यांचें वर्गीकरण.—निरनिराळ्या देशांतील फौजदारी कायदा हा गुन्ह्यांचें वर्गीकरण निरनिराळ्या प्रकारांनीं करतो. पण मुळांत वर्गीकरणाचीं तत्त्वें बहुधां सारखींच आहेत. खालीलप्रमाणें त्यांची विभागणी करण्यांत येते— (१) देशांतील अन्तर्बाह्य व्यवस्था व स्वास्थ्य यांचा भंग करणारे गुन्हे. (२) सरकारसत्ता, व पोलीसकारभार ह्यांविरुद्ध गुन्हे. (३) सामान्यतः लोकांनां उपद्रव देणारीं कृत्यें. (४) व्यक्तीविरुद्ध (त्याचें जीवित, स्वास्थ्य, स्वातंत्र्य आणि अब्रू यांनां धोका आणणारे), व वैवाहिक आणि पैतृक हक्क व कर्तव्यें यांसंबंधीं, गुन्हे. (५) मालमत्ता व करार यांसंबंधीं गुन्हे (यांत चोरी, दगलबाजी, खोटा लेख करणें व मत्सरबुद्धीनें केलेलें नुकसान असे इत्यादि येतात).

गुन्ह्यांच्या संबंधी जबाबदारीचीं तत्त्वें.—प्रत्येक फौजदारी कायद्याच्या पद्धतींत, गुन्ह्याच्या जबाबदारीसंबंधीं निर्णय गुन्ह्याच्या वेळची मनःस्थिति, गुन्ह्यांचे प्रकार आणि हेतु व प्रत्यक्ष कृति यांमधील विभाजक मर्यादा ह्या गोष्टी ठरविणें

नेहमी आवश्यक असतें. दरएक गुन्ह्याच्या व्याख्येंत स्थितीसंबंधानें उघड किंवा ध्वनित विवेचन केलेलें असतें. गुन्हा करण्यास योग्य वय, शुद्धि आणि सक्तीपासून कांहींसें स्वातंत्र्य ह्यांची प्रत्येक फौजदारी कायदेपद्धतींत आवश्यकता मानलेली आहे; आणि हेंहि कायद्याला बहुतेक मान्य आहे कीं, जर एखादें कृत्य केवळ यदृच्छेनें झालें असेल, किंवा वस्तुस्थितीवर प्रामाणिकपणानें व समंजसपणानें विश्वास ठेवून जर खरोखर तें कृत्य हातून घडलें असेल ( व तसें असल्यास तें कृत्य पूर्ण निर्दोषी होऊं शकेल ), तर अशा कृत्यावर गुन्ह्याचा आरोप करण्याला फौजदारी कायद्याची मंजुरी मिळत नाहीं; जसें: एखाद्या लग्न झालेल्या मनुष्यानें ( पुरुषानें किंवा स्त्रीनें ) आपली बायको किंवा नवरा मयत आहे ह्या गोष्टीवर चुकीचा पण प्रामाणिकपणें व समंजसरीतीनें विश्वास ठेवून पुन्हां लग्न करणें. वस्तुस्थितीबद्दल, प्रामाणिक व समंजसपणाची पण चुकीची समजूत, ही लहान मुलांच्याठायीं असणारा बुद्धीचा अभाव किंवा वेडीं माणसें करीत असलेला त्या बुद्धीचा विपर्यास, ह्यांप्रमाणेंच मानण्यांत येते.

गुन्हा घडण्यास आवश्यक लागणाऱ्या सामान्य गोष्टींखेरीज, परस्परभिन्न अशा मानसिक स्थितींचाहि विशिष्ट गुन्ह्याच्या व्याख्येमध्यें अन्तर्भाव झालेला असतो. आणि जेथें जेथें कायद्यानें गुन्ह्यांच्या व्याख्या ठरविलेल्या आहेत तेथें तेथें गुन्ह्यास लागणाऱ्या आवश्यक मानसिक स्थितीचा त्या व्याख्येमध्यें अशा तऱ्हेनें समावेश केलेला असतो कीं,वेडे व अल्पवयी अशांखेरीज सर्व माणसांस विशिष्ट कृत्य करण्यास प्रतिबंध केला जावा. इंग्रजी कायद्याचें सामान्य तत्त्व असें आहे कीं, गुन्ह्यास लागणारीं आवश्यक कृत्यें केल्याची शाबिती गुन्हेगारावर झाली म्हणजे पुरे; आपण केलेल्या कृत्यांचे स्वाभाविक होणारे परिणाम घडावे असा आपला हेतु नव्हता, किंवा गुन्ह्याचें कृत्य करण्यास योग्य कारण, किंवा झालेल्या गुन्ह्याबद्दल शिक्षा न होण्यास योग्य सबब, अशा गोष्टींची शाबिती करण्याचा पुराव्याचा बोजा आरोपीवर पडावा. वयाच्या सातव्या वर्षापर्यंतच्या मुलाचें कृत्य ( हेतूच्या अभावास्तव ) गुन्हा समजूं नये,आणि सातपासून चवदा वर्षांच्या वयापर्यंतहि गुन्ह्याचा हेतु नव्हता असेंच धरून चालावें, पण उलट पुरावा ( हेतूच्या शाबितीचा ) देण्यास कायद्यानें सवड असावी.

'वेडेपणां'तील कृत्यहि गुन्हा समजूं नये असें कायद्यानें ठरविलें आहे. सन १८८३ पासून असा कायदा झाला आहे कीं, गुन्ह्याचें कृत्य करतेवेळीं मनुष्य 'वेडा' होता असें शाबीत असल्यास, गुन्हा शाबीत होत असला तरी गुन्हेगार 'वेडा' आहे, सबब गुन्हेगारास वेड्यांच्या इस्पितळांत पाठवावें. नवऱ्याच्या समक्ष बायकोनें केलेलें अन्यायाचें कृत्य नवऱ्याच्या सक्तीमुळें घडलें सबब तो गुन्हा समजूं नये, असेंहि पूर्वी मत होतें, पण अलीकडे तें मत मागें पडत चाललें आहे.

आरोपीचा गुन्हा करण्याचा 'हेतु' किंवा 'निश्चय' असून तें कृत्य करीत असतां इतर अडथळ्यांमुळें गुन्ह्याचें कृत्य पूर्ण घडलें नाहीं असें असेल तर गुन्हा करण्याचा 'प्रयत्न' झाला असून त्याबद्दलहि शिक्षा व्हावी असें इंग्रजी कायद्यानें ठरविलें आहे. तसेंच गुन्ह्यास 'उत्तेजन' देणें किंवा 'साहाय्य' करणें हेंहि गुन्हे ठरवून त्यांस शिक्षा सांगितलेली आहे. इतकेंच नव्हे तर, प्रत्यक्ष कृत्य कोणतेंच जरी घडलें नसलें तरी केवळ गुन्हा करण्याचा निश्चित झालेला 'विचार' यासहि 'संगनमत' नांवाचा गुन्हा समजावा, असें इतर देशांच्या कायद्यानें ठरत नसलें तरी इंग्लंडच्या कायद्यानें ठरविलें आहे. अर्थात या गुन्ह्याच्या व्याप्तीबद्दल, किंवा नुसत्या 'विचारा' ला गुन्हा मानावें किंवा नाहीं ह्याबद्दल बराच मतभेद आहे, व 'व्यापारी संघ' यासंबंधानें या गुन्ह्यास महत्त्व फार आलें आहे. इंडियन पीनल कोडमध्यें राज्याविरुद्ध अपराधांमध्यें फक्त ( कलम १२१ अ ) संगनमतास गुन्हा ठरविलें आहे. [ पण इ. सन १९१२ पासून पीनलकोड मध्यें कलम '१२० 'अ' व 'ब' वाढवून 'अन्यायाचें संगनमत' हा स्वतंत्र गुन्हा ठरविण्यांत आला आहे. तसेंच डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्ट व रौलॅट ॲक्टमध्यें त्यास प्रामुख्यानेंच गुन्हा मानलें आहे. ]

तसेंच 'ज्यूरी' पुढें असलेल्या खटल्यामध्यें 'गुन्हाशाबित' असें कळवितांना, गुन्ह्याचें स्वरूप कमी करणाऱ्या गोष्टींचा उल्लेख करूं नये, असें इतर यूरोपीयन कायद्यांत नसलें तरी इंग्रजी कायद्यानें मात्र तसें ठरविलें आहे. दया दाखविण्याबद्दल फार तर ज्यूरीनें सामान्य सूचना करावी.

विशिष्ट गुन्ह्यांचो व्याख्या.—इंग्लंडमध्यें 'फौजदारी कायद्याचें कोड' असें स्वतंत्र नाहीं. कांहीं फौजदारी बाबतींत निरनिराळे कायदे झालेले आहेत. कायदे न झालेल्या गोष्टी:-( १ ) सामान्य अपवाद; ( २ ) खून, चोरी, खोटी साक्ष, खोटा दस्त, बेअब्रूचा लेख इत्यादि गुन्ह्यांच्या व्याख्या व ( ३ ) चौकशीची पद्धत. परंतु 'कॉमनलॉ' मध्यें मात्र या कायद्याचीं तत्त्वें व नियम भरपूर आढळतात. पार्लमेंटचे प्रत्यक्ष कायदे पास झालेले नाहींत, यामुळें गुन्ह्यांच्या व्याख्या ठरविणें फार कठिण पडतें. ज्या गोष्टी गुन्हे नाहींत असा जज्जांनीं निकाल दिला त्या गोष्टी गुन्हे आहेत असें पार्लमेंटला स्वतंत्र कायदे करून ठरवावें लागलें अशीं उदाहरणें आहेत.

कोर्ट अम्मल.—गुन्ह्यांची चौकशी करण्याच्या कोर्टांच्या अधिकाराची मर्यादा प्रदेशावरून ठरवितात. ठरविलेल्या स्थलसीमेंत जमिनीवर अगर पाण्यांत (बोटीवर) घडलेल्या गुन्ह्यांची चौकशी त्या त्या कोर्टास करतां येते. परदेशी

फौजदारी कायदा स्वदेशांत कोणतेंहि सरकार लागू करीत नाहीं; किंवा परदेशी अधिकाऱ्यास स्वदेशांत अम्मल चालवूं देत नाहीं. फक्त, परमुलुखीं गेलेल्या स्वकीय प्रजाजनांवर स्वदेशी कायदा चालावा, व स्वमुलुखाबाहेरहि परकीयांनीं केलेल्या 'डायनामिट' ने कट व खोटीं नाणीं या गुन्ह्यांस शिक्षा देतां यावी, हीं तत्त्वें सार्वराष्ट्रीय कायद्यानें मान्य केलीं आहेत.

इंग्रजी फौजदारी कायद्याच्या वाढीमध्यें एक विशेष गोष्ट दिसून येते कीं गुन्ह्याला स्थानिक स्वरूप देण्यांत येतें, म्हणजे ज्या गांवांत किंवा प्रांतांत गुन्हा घडला तेथेंच त्याची चौकशी व्हावी; इंग्रजी राज्याबाहेरील गुन्ह्यास तो कायदा लागू नये, आणि म्हणून परमुलुखांतील गुन्हेगारांच्या बाबतींत फरारी 'गुन्हेगाराच्या कायद्या'(१८८१)वरच अवलंबून रहावें लागतें.

फ्रान्स व इतर यूरोपीय देशांत मात्र इंग्लंडपेक्षां निराळाच प्रकार आहे. फ्रेंच कायद्याचें तत्त्व असें आहे कीं, प्रत्येक फ्रेंच प्रजाजन फ्रेंच सरकारशीं राजनिष्ठ असलाच पाहिजे. म्हणून फ्रेंच हद्दीबाहेर कोठेंहि त्यानें फ्रेंच कायदा मोडणें म्हणजे फ्रेंच राजनिष्ठाभंग करणें होय. या तत्त्वानुसार अलीकडे फ्रेंच व जर्मन कोर्टें आपल्या प्रजाजनांस परमुलुखीं केलेल्या गुन्ह्याबद्दलहि शिक्षा करतात; आणि म्हणून परमुलुखांत केलेल्या गुन्ह्यांची चौकशी होण्याकरितां स्वकीय प्रजाजनांस परकीयांच्या ताब्यांत देण्याचें हे देश नाकरितात.

**समुद्रावरील गुन्हे.**—वरील फ्रेंच कायदेतत्त्वानुसार इंग्रजी तत्त्वांत दोन ठिकाणीं फरक करण्यांत आला आहे.— (१) समुद्रावरील गुन्ह्यांच्या बाबतींत; व (२) संयुक्त ब्रिटिश राज्याबाहेर घडलेल्या गुन्ह्यांच्या बाबतींत.

१८६१सालच्या कायद्यान्वयें समुद्रावरील गुन्हे इंग्लंडमध्यें झाले असें मानून त्यांची चौकशी इंग्रजी कोर्टांनीं करावी असें ठरलें. त्याचप्रमाणें ८ व्या हेनरी (१५४४)च्या कारकीर्दीत कायदा होऊन परमुलुखांतील गुन्ह्यांची चौकशी इंग्लंडांत व्हावी असें ठरलें व त्याअन्वयें १९ व्या शतकारंभीं जनरल पिक्टन, १८६५ सालीं जमेकाचा गव्हर्नर आयर, १९०६ सालीं नाताळचा गव्हर्नर मेकूकॅलम यांच्या गुन्ह्यांची चौकशी इंग्लंडमध्यें करण्यांत आली.

**मोठी पंचायत.**—इंग्रजी फौजदारी न्यायपद्धतींत 'मोठी पंचायत' ही महत्त्वाची गोष्ट आहे. मोठ्या गुन्ह्याच्या बाबतींत मॅजिस्ट्रेटपुढें पूर्वचौकशी व्हावी असा नियम आहे. पण तशी पूर्वचौकशी झालेली असो वा नसो, देशद्रोह किंवा मोठाले देहान्तशिक्षेचे गुन्हे, असल्या गुन्ह्यांच्या बाबतींत मोठ्या पंचायतीनें चार्ज ठेवला नसेल तर आरोपीची चौकशी पुढें चालू नये, त्यास सोडून द्यावा असा इंग्लंडचा कायदा आहे. या मोठ्या पंचायतींत गुन्ह्याच्या ठिकाणचे किंवा त्या कौंटीमधील भले व कायदेपंडित असे बारा ते तेवीसपर्यंत इसके लोक असतात. मोठ्या पंचायतीनें स्वतःच्या माहितीवरून किंवा आसपासच्या खात्रीलायक इसमांस शपथेवर विचारून गुन्ह्याची चौकशी करावयाची; आणि चार्ज ठेवण्यास पुरेसा पुरावा असल्यास आरोपीस धाकट्या ज्यूरीपुढें इनसाफास पाठवावयाचा. योग्य पुरावा नसल्यास, 'फिर्याद खरी नाहीं' असा शेरा मारून फिर्यादअर्जी कोर्टाकडे परत पाठवावयाची; म्हणजे आरोपीस सोडून देण्यांत येतें.

पूर्वीच्या जुलमी राजांच्या कारकीर्दीत या पद्धतीचा इंग्लंडमधील लोकांस फार उपयोग होई आपल्या मर्जीप्रमाणें वाटेल त्या अप्रिय इसमांस शेजाऱ्यापाजाऱ्यांतून उचलून दूरच्या कोर्टापुढें चौकशीस पाठविण्याच्या मार्गांत त्या काळच्या राजांस 'मोठ्या पंचायती'ची मोठीच अडचण असे. हल्लींहि या पद्धतीचा फायदाच आहे. कारण ओळखीच्या इष्टमित्रांपासून आरोपीस दूर नेल्यानें त्यास आपल्या बचावाकरितां जरूर तो साक्षीपुरावा करणें कठिण होतें व त्यामुळें अन्याय होण्याचा संभव असतो. या कारणास्तव मोठ्या पंचायतीची पद्धति फार फायद्याची आहे.

**इंग्रजी व यूरोपीय पद्धतींतील फरक.**—(१) इंग्रजी पद्धतींत फौजदारी कामांत मुदतीचा कायदा लागत नाहीं, म्हणजे गुन्ह्याबद्दल फिर्याद लावण्यास ठराविक मुदत नाहीं. पुष्कळ वर्षें लोटल्यावरहि फिर्याद आणतां येते. यूरोपखंडांत इतरत्र मात्र मोठ्या गुन्ह्यांना वीस वर्षांची व धाकट्यांना पांच किंवा दोन वर्षांची मुदत आहे. त्या त्या मुदतीनंतर फिर्याद चालत नाहीं. (२) इतर यूरोपीय देशांत लहान मोठ्या प्रत्येक गुन्ह्यांत सरकारच फिर्यादीचें काम चालवितें. इंग्लंडमध्यें हलक्या गुन्ह्यात फिर्यादी पक्षाचें काम खाजगी व्यक्तीवर पडतें. (३) इंग्लंडमध्यें सर्व चौकशीचें काम प्रसिद्धपणें चालतें. इतर यूरोपमध्यें पूर्वचौकशीचें सर्व काम गुप्तपणें चालावें असा नियम आहे (४) इंग्लंडमध्यें एकजज्जपद्धति आहे म्हणजे फौजदारी न्यायकोर्टाचें काम एकएकटा जज्ज करीत असतो. पण इतरत्र यूरोपखंडांत अनेकजज्जपद्धति चालू आहेत.

**हिंदुस्थानी फौजदारी कायदा.**—हा ब्रिटिश अंमलापासून इंग्लंडच्याच कायद्याच्या अनुरोधानें बनविण्यांत आला आहे व गुन्ह्यांच्या व्याख्या पीनलकोडमध्यें व चौकशीची रीत प्रोसीजरकोडमध्यें दिली आहे व हे कायदे पास करून निश्चित करण्यांत आले आहेत. गुन्ह्या कायद्यासंबंधीं माहिती 'न्यायपद्धति' व 'अपकृत्य' (टॉर्ट) या लेखांत पहा.

**फ्यूसेल तेल**—धान्य, बटाटे, द्राक्षांचा चोथा यांपासून मद्यसार काढल्यानंतर उच्च बाष्पबिंदु असणारा जो द्रव शिल्लक राहतो त्याला फ्यूसेल तेल हें नांव आहे. याची वाफ लवकर होते. याला फार दुर्गंधि येते व हें चाखल्यास जिभेस चटका बसतो.

यांत एथिल व अमिल मद्यसारांखेरीज $क_{न}उ_{२न+१}$प्रउ. या सूत्रानें ओळखले जाणारे ईथर व $क_{न}उ_{२न+१}$ क $प्र_{२}$उ या सूत्राचे अम्ल असतात. दक्षिण फ्रान्समध्यें होणाऱ्या दारूच्या शिलकी फ्यूसेल तेलांत प्रोपिल मद्यसार असतें. व बीटच्या काकवींतील फ्यूसेल तेलांत आयसोप्रायमरी ब्यूटिल मद्यसार असतें. बटाटे व धान्य यांतून निघणाऱ्या दारूंतील शिलकी तेलांत आयसोप्रायमरी, अमिल मद्यसार व आयसोब्यूटिल कार्बिनोल हीं द्रव्यें असतात. बाजारी दारूमध्यें फ्यूसेल तेल नेहमीं कमी जास्त प्रमाणांत असतें.

हें तेल व त्याचा मुख्य घटक अमिल मद्यसार हीं मज्जातंतूंस अपकार करणारीं विषें असून तीं थोड्या प्रमाणांत पोटांत घेतल्यास तहान लागते, डोकें दुखतें व जिभेला बुरशी येते व जास्त प्रमाणांत घेतल्यास आंतड्यास पीळ पडल्यासारखें होतें. अशुद्ध दारूनें मज्जातंतूंवर व आंतड्यांवर नेहमीं अपकार होतो. राबुटो याच्या मतें ज्या मानानें मद्यसार वरच्या दर्जाचें असेल व त्याचा बाष्पबिंदु जास्त असेल त्या मानानें त्याचा अंमल जास्त चढतो. दारूमध्यें फ्यूसेल तेल असतें यामुळेंच ती अपायकारक होते असें रिचे याचें मत आहे. फ्यूसेल तेलाचें जास्त प्रमाण असलेल्या दारूच्या अमलाचें उग्र स्वरूप तज्ज्ञ लोक फार लवकर ओळखतात.

**फ्रँकफोर्ट-ऑन-ओडर**—प्रशिया, बर्लिनच्या आग्नेयीस ५० मैलांवर, ब्रँडेनबर्ग नांवाच्या प्रांताच्या राजधानीचें शहर. लोकसंख्या (१९१९) ६५०५५. या ठिकाणीं सर्व प्रकारच्या शस्त्रास्त्रांनीं युक्त असें बरेंच मोठें संरक्षक सैन्य असतें. यंत्रें, धातूंचीं भांडीं, कागद, रासायनिक द्रव्यें इत्यादि अनेक वस्तू तयार करण्याचे येथें कारखाने आहेत. याच्या आसमंतांत कोळशाच्या खाणी आहेत. १३ व्या शतकांत फ्रँकोनियन व्यापाऱ्यांनीं येथें वसाहत केल्यामुळें हें शहर उदयास आलें.

**फ्रँकफोर्ट-ऑन-मेन**—जर्मनींतील एक प्रमुख श्रीमान व्यापारी शहर. इ. स. १८६६ पर्यंत हें स्वतंत्र शहर होतें. मेन नदीच्या दोन्ही बाजूंनीं या शहराची वाढ झाली असून नदीवर अनेक पूल बांधून, शहराचे वेगवेगळे भाग एकमेकांस जोडले आहेत. प्राचीन काळीं या ठिकाणीं रोमन बादशहांची निवडणूक होत असे. स. १५६२ पासून येथें त्यांचा राज्याभिषेक होऊं लागला. रोमर नांवाच्या प्रसिद्ध जुन्या इमारतींत रोमन बादशहाच्या, एकंदर बावन तसबिरी आहेत. ज्या घरांत गोएटे कवि स. १७४९ ते १७७५ पर्यंत रहात होता, तें गोएटे-हाऊस, गोएटे पदार्थसंग्रहालयास जोडलें असून या ठिकाणीं जुने कागदपत्र व गोएटेच्या काळच्या वाङ्मयांतील २५०००निवडक पुस्तकें असलेलें ग्रंथसंग्रहालय आहे. 'स्टाडेल आर्ट इन्स्टिट्यूट' मध्यें असलेला जर्मन कोरीव कामांचा दिवाणखाना, ३ लक्ष पुस्तकें असलेलें म्युनिसिपल ग्रंथसंग्रहालय व त्याच ठिकाणीं असलेला नाण्यांचा संग्रह, 'बेथमन' अजबखाना, सर्वकलाविज्ञान मंडळाचें औद्योगिक कलेचें प्रदर्शन व दोन संगीतशाला इत्यादि महत्वाच्या संस्था आहेत. रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ एक्सपेरिमेंटल थेरॅप्युटिक्स संस्थेंत सूक्ष्मजंतुशास्त्राचा व लसींचा (बॅक्टेरिऑलजी व सीरम्स) अभ्यास करण्याकरितां परदेशांतून विद्यार्थी येतात. प्रशियन स्टेट रेल्वेचें मुख्य स्टेशन नदीच्या किनाऱ्यावर आहे. मोठेपणांत सर्व पृथ्वीवरील 'टरमिनस'मध्यें याचा तिसरा नंबर लागेल. ग्रंथप्रकाशन, मुद्रण, दारू गाळणें व क्विनाईन तयार करणें हे येथील मुख्य उद्योगधंदे आहेत. येथें १९१४ सालीं एक विश्वविद्यालय स्थापन करण्यांत आलें. लोकसंख्या (१९१९) ४३९००२. हें पुरातन शहर ख्रिस्ती शतकाच्या पहिल्या शतकांत वसविलें असावें. ९व्या शतकांत हें शहर पूर्व फ्रँकिश राज्याचें राजधानीचें शहर होतें. यूरोपांतील धार्मिक सुधारणेच्या वेळीं या शहरानें प्रॉटेस्टंट लोकांची बाजू घेतल्यामुळें त्याला बराच त्रास सोसावा लागला. १८०६ सालीं 'ऱ्हाइन-संघ' बनल्यामुळें या शहराचें स्वातंत्र्य नष्ट झालें, स. १८१० त तें फ्रँकफोर्टच्या ग्रँडडचीची राजधानी झालें. १८१५ सालीं तें पुन्हां शहर बनलें व पुढल्याच वर्षी जर्मन संघाचें वसतिस्थान झालें. स. १८७१ च्या फ्रँको-जर्मन महायुद्धाच्या तहावर याठिकाणीं सह्या झाल्यामुळें, त्यास फ्रँकफोर्टचा तह असें म्हणतात.

**फ्रँकलिन, बेंजामिन** (१७०६-१७९०)—एक अमेरिकन परराष्ट्रवकील, मुत्सद्दी व भौतिकशास्त्रज्ञ. हा १० व्या वर्षी शाळा सोडून घरीं मेणबत्त्या व साबणाच्या कारखान्यांत काम करूं लागला. १३ व्या वर्षी तो छापखान्यांत शिरला व स्पेक्टेटरच्या धर्तीवर तो स्वतः लेख लिहूं लागला. पुढें बेंजामिननें हा भावाचा छापखाना सोडून फिलाडेल्फिया येथें सॅम्युअल कीमरच्या छापखान्यांत नोकरी धरली. १७२४ त इंग्लंडला जाऊन तेथें छापखान्यांत कांहीं वर्षे नोकरी करून १७२६त फिलाडेल्फियाला त्यानें परत येऊन स्वतंत्र छापखाना काढला. १७२९ त त्यानें पेनसिल्व्हानिया गॅझेट हें साप्ताहिक पत्र विकत घेतलें व हीं दोन्ही उत्तम चालवून चांगली प्रसिद्धि मिळविली. १७३३ च्या सुमारास तो फ्रेंच, इटालियन, स्पॅनिश व लॅटिन इतक्या भाषा शिकला. १७३६ त जनरल असेंब्लीच्या क्लार्कची नोकरी, १७३७ त फिलाडेल्फिया येथें पोस्टमास्तरची नोकरी व १७५३त वसाहतींच्यापोस्टखात्यावर नोकरी केली. १७५१ सालापासून पुढें तेरा वर्षे तो पेनसिल्व्हानियाच्या जनरल असेंब्लीचा सभासद झाला. स. १७५४ पासून फ्रान्सबरोबर युद्ध सुरू झालें, त्यावेळीं ब्रिटिश जनरल ब्रॅडॉक याला घोडे, गाड्या वगैरे मदत मिळवून दिली. शिवाय याच सुमारास पेनसिल्व्हानियामधील बड्या जमीनदारांनीं असेंब्लीनें बसविलेले कर देण्याचें नाकारलें व लोकांच्या इतर कांहीं हक्कांवरहि गदा आणली. तेव्हां त्याबद्दल दाद मागण्याकरितां असेंब्लीनें फ्रँक्लिनला शिष्टाईस पाठविलें, पण यापासून कांहीं फायदा झाला नाहीं. त्यानें ह्यूम,

राबर्टसन, ॲडॅमस्मिथ वगैरे विद्वानांशीं स्नेह जोडला; त्याच्या वाङ्मयीन व शास्त्रीय विद्वत्तेमुळें त्याला सेंट ॲंड्र्यूज युनिव्हर्सिटीनें डॉक्टर ऑफ लॉज, हारवर्ड युनिव्हर्सिटीनें मास्तर ऑफ आर्ट्स, आक्सफोर्ड युनिव्हर्सिटीनें डी. सी. एल. या पदव्या दिल्या. इंग्लंडमध्यें लार्ड ग्रेनव्हिलनें फ्रान्सबरोबरच्या युद्धांतील कर्जफेडीकरितां वसाहतींस लागू केलेल्या स्टँप ॲक्टाविरुद्ध चळवळींतील पुढारी म्हणून फ्रँकलिनची इंग्लंडमध्यें पार्लमेंटच्या कमिटीनें जबानी घेतली व त्याचा उत्तम परिणाम होऊन स्टँप ॲक्ट रद्द करण्यांत आला. तथापि कागद, कांच वगैरे चार पाच जिनसांवर वसाहतींत कर बसविण्यांत आले. त्यावेळींहि फ्रँकलिननें इंग्लंडांत त्याविरुद्ध जोराची चळवळ व वसाहतवाल्यांची राजनिष्ठा व इंग्लंडशीं संबंध कायम राहील असा तडजोडीचा मार्ग सुचविण्याची पराकाष्ठा केली; त्यांत त्याला यश आलें नाहीं. त्यानंतर अमेरिकेंत सुरू झालेल्या स्वातंत्र्ययुद्धांत तो पुढारी बनला, व पेनसिल्व्हानियातर्फे कॉंग्रेसचा सभासद झाला. तेथें हॅरिसन, डिकिन्सन, जॉनसन वगैरेंच्या कमिटींतील मेंबर या नात्यानें त्यानें स्वातंत्र्ययुद्धांत ब्रिटनमधील मित्रांची, फ्रेंच राजाची व जगांतील इतर देशांची मदत व सहानुभूति मिळविण्याच्या कामांत बहुमोल मदत केली. १७७६ मधील स्वातंत्र्याचा जाहीरनामा तयार करणाऱ्या पांच इसमांच्या कमिटींतहि तो होताच. नंतर फ्रान्समध्यें जाऊन मदत मिळविण्याकरतां त्याला पाठविण्यांत आलें. तिकडे निघण्यापूर्वी त्यानें आपला सर्व पैसा—सुमारें ४००० पौंड—युद्धमदतीकरतां कॉंग्रेसच्या हवालीं केला. इंग्लंडविरुद्ध चालविलेल्या स्वातंत्र्ययुद्धांतील पुढारी या नात्यानें तर तो फ्रान्समध्यें अत्यंतच लोकप्रिय झाला, व पुढें स. १७८२ मधील तहकमिशनमधील सभासद या नात्यानें इंग्लंडमध्यें स्टेटसेक्रेटरी सेलबोर्न याच्याबरोबर कॉंग्रेसच्या सूचनांना काडीभरहि धक्का न पोचेल अशा तऱ्हेनें बोलणें करून फ्रेंच सरकारबरोबरच्या मैत्रीस किंचिन्मात्र न दुखावतां १७८३ त पक्का तह घडवून आणला व युनायटेड स्टेट्सच्या स्वातंत्र्यनाम्यावर इंग्लंडचें शिक्कामोर्तब करून घेतलें. नंतर जेफर्सनच्या मदतीनें स्वीडन, प्रशिया वगैरे देशांबरोबर व्यापारी तह केले. याप्रमाणें सर्व कामगिरी व्यवस्थित पार पाडून परत अमेरिकेंत आल्यावर फिलाडेल्फियाच्या म्युनिसिपालिटीचा अध्यक्ष, पेनसिल्व्हानियाच्या सुप्रीम एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचा प्रेसिडेंट ( १७८६–८७ ) व फेडेरल कॉंस्टिट्यूशन कन्व्हेन्शनचा (१७८७) वॉशिंग्टनच्या गैरहजेरीच्या वेळचा प्रेसिडेंट तो निवडला गेला शिवाय गुलामपद्धतिविध्वंसक सोसायटीचा प्रेसिडेंट या नात्यानें त्या पवित्र कार्यास त्यानें मदत केली. याप्रमाणें त्यानें आमरण देशकार्यास उत्कृष्ट मदत केली त्यानें स्वतः आपलें लिहिलेलें आत्मचरित्र नमुनेदार आहे राजकारणावर त्याचे अनेक लेख आहेत; शिवाय त्यानें अर्थशास्त्रांतील चलन, लोकसंख्या, संरक्षकपद्धति. वगैरे विषयांवर पुस्तकें लिहून, अमेरिकेंतील अर्थशास्त्रज्ञ, एवढी बहुमानाची पदवी मिळविली. सृष्टिशास्त्रांतील त्याचे प्रयोग व शोध तुटपुंजे व मोजकेच तर केलेले असे आहेत, पण सर्वस्वीं शास्त्रशोधांस वाहून घेण्याचा त्याचा हेतु राजकारणाच्या विलक्षण गडबडींतून अवसर मिळण्यापूर्वीच तो वारल्यामुळें साधला नाहीं. तरीहि धरणीकंपांची उपपत्ति, 'फ्रॅंकलिन स्टोव्ह', 'लायटनिंग रॉड', आकाशविद्युत्वरील पतंगाचा प्रयोग, जहाजांवरील वॉटरटाइट कंपार्टमेंट्स, तरंगते नांगर, इत्यादिकांच्या शास्त्रीय शोधामुळें त्याचें नांव अजरामर झालें आहे. शिवाय गणितशास्त्रांतील त्याचें प्राविण्य त्यानें बसविलेल्या चौकोनांतील व वर्तुळांतील अनेक कोड्यांवरून सिद्ध होतें. वैद्यकशास्त्रांतील त्याची कामगिरी म्हणजे शाकाहाराची तरफदारी व द्विकेंद्रयुक्त उपनेत्रांचा शोध ही होय. असा अष्टपैलू, बुद्धिमान, विद्वान बेंजामिन फ्रॅंकलिन होऊन गेला.

**फ्रान्स**—युरोपखंडाच्या पश्चिम भागांतील एक राष्ट्र. उत्तर अक्षांश ५१° ५' ते ४२°.२०' यांच्या आणि पश्चिम रेखांश ४° ४२' व पूर्व रेखांश ७° ३९' यांच्या दरम्यान हें आहे. क्षेत्रफळ ( १९२१ ) २१२६५९ चौरस मैल. या देशाच्या वायव्य व पश्चिम भागांत मैदानें, व लहान लहान डोंगरपठार, मध्यभागीं, पूर्वेकडील व आग्नेयीकडील भागांत पर्वत व उंच उंच डोंगरपठारें आहेत. पूर्व व दक्षिण भागांत आल्प्स जुरा, व्होसजेस आणि पिरिनीज हे पर्वत आहेत. या सर्वांत आल्प्स पर्वत फार उंच असून त्याच्या मॉंउंट ब्लॅंक या अत्युच्च शिखराची उंची १५८०० फूट आहे. हा देश षट्कोनाकृति असून याच्या तीन बाजूंस पाणी आहे. भूमध्यसमुद्राकडील किनारा सखल असून त्यावर मार्सेलिस नांवाचें फ्रान्स देशाचें मुख्य बंदर आहे. या देशाचा अटलांटिक महासागराकडील किनारा रुक्ष असून या किनाऱ्यावर 'रॉचफोर्ट' व ला रॉशेली हीं दोन बंदरें आहेत. वरील बंदरांशिवाय बेयोन, बोर्डो, नॅन्टीस आणि रोवेन हीं कांहीं महत्त्वाचीं बंदरें आहेत. या देशामधून ऱ्होन, गॅरोन, लॉयर व सीन ह्या नद्या वाहतात. फ्रान्स देशांत फक्त सीन नदी नौकानयनास योग्य आहे. हिच्या शाखाहि तशाच आहेत. ग्रॅंड ल्यू बोर्झेट, ॲनेसि, सेंटपाईंट, पॅलॅड्यू व नॅन्टुवा हीं सरोवरें आहेत. या देशाला समुद्राचें सान्निध्य असल्यामुळें हवा साधारणतः सर्द पण उबदार आहे आणि पावसाळा चांगला होतो. या देशांत दर वर्षी सरासरी ३२ इंच पाऊस पडतो.

लोक व वस्ती.—निरनिराळ्या देशांतून आलेले भिन्न भिन्न लोक मिळून फ्रान्स राष्ट्र बनलें आहे. फार प्राचीन काळीं याच्या नैर्ऋत्य भागांत आयरिश लोकांनीं, दक्षिणेंत भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यानें उत्तर आफ्रिकेंतील लिगुरियन लोकांनीं, व पूर्व भागांत जर्मनींतील लोकांनीं वस्ती केली. वायव्य दिशेकडील भागांत स्कॅंडिनेव्हियन लोक येऊन राहिले आणि केल्ट लोकांनीं सीन व गॅरोन या दोन नद्यांच्या दरम्यानचा प्रदेश व्यापिला. या सर्व राष्ट्राचे हे लोक मूलघटक असून,

बांध्यानें जरा ठेंगणे, लहान डोक्याचे व भुरकट केंसाचे असे आहेत. यांतील ब्रेटन लोकांची भाषा व त्यांच्या चालीरीती जशाच्या तशाच राहिल्या आहेत. फ्रेंच फ्लँडर्समधील फ्रेंमिंग्जमध्यें फ्लेमिश भाषा बोलण्यांत येत असून वर्णानें हे फ्लेमिश लोक इतरांहून भिन्न आहेत. १९२१ सालीं फ्रान्समध्यें ३,९२,०९,५१८ इतकी लोकसंख्या होती.

ध र्म.—या देशांत पूर्वी रोमन कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट व हिब्रू ह्या तीन पंथांना राजकीय मान्यता होती. १९०४ सालीं पोप व फ्रान्स यांच्यामध्यें वितुष्ट आल्यामुळें फ्रान्सनें पोपशीं व तद्द्वारां चर्चशीं आपला संबंध तोडून टाकला. वास्तविक रोमनकॅथॉलिक धर्माचें माहेरघर म्हणून फ्रान्सची प्रसिद्धि असे. त्यामुळें खुद्द फ्रान्समधील पुष्कळ लोकांनां ही गोष्ट पटली नाहीं. महायुद्धामध्यें धर्मगुरूंनीं व उपाध्यायांनीं फ्रान्सला विजय मिळावा एतदर्थ मनोभावें मदत केली. त्यामुळें महायुद्धानंतर फ्रान्समध्यें चर्चसंबंधीं अधिकाधिक अनुकूल मत होत चाललें. याचा परिणाम मिलेरॉडच्या कारकीर्दीत फ्रान्सचा पोपशीं पुन्हां संबंध प्रस्थापित होण्यामध्यें झाला व फ्रान्समध्यें सरकारसंमत धर्म कोणताच असा राहिला नाहीं.

शे त की.—इ. स. १९२१ मध्यें ९,७३,२१,४१६ एकर जमीन लागवडीखालीं होती. मुख्य उत्पन्न गव्हाचें व द्राक्षांचें आहे. द्राक्षांपासून लाखो पौंडांची दारू तयार होते व ती परदेशांत पाठविली जाते. याशिवाय या जमिनींत मेसलिन, राय, जव, ओट, राजगिरा व मका हीं धान्येंहि होतात. येथील उद्योगधंद्यांस उपयोगी पडणाऱ्या वनस्पती म्हणजे बीटरूट, सण, अंबाडी, कोलझा, तंबाखू, व द्राक्षाच्या वेली या होत. यांपैकीं बीटरूटपासून साखर तयार होते, कोलझापासून तेल काढतात, आणि द्राक्षांपासून दारू तयार करतात. या देशांत दर वर्षी १,०७,२६,२२,००० ग्यालन दारू, केळीं, अननस सायडर ॲपल, डेझर्ट ॲपल, पीयर्स, चेस्टनट, वालनट, अंजीर, ॲप्रिकट, ऑलिव्ह, नारिंगें, सिट्रन, ट्रूफल आणि तुती हीं मुख्य फळें होतात. तुतीवर रेशमाच्या किड्यांची वाढ होते. या देशांत रेशमी किड्यांची वाढ करण्याचा व त्यांपासून रेशीम काढण्याचा मोठा धंदा असून त्या धंद्याला येथील सरकारचा मोठा आश्रय आहे. गोगलगाईंचीहि वाढ करण्याचा धंदा या देशांत आहे. त्यांचा उपयोग फळांप्रमाणें खाण्याकडे होतो. शेतकीच्या व्यवस्थेकरितां येथें एक वेगळें प्रधानमंडळ आहे. १८१९ सालीं फ्रान्सच्या प्रत्येक भागांत एकेक चेंबर ऑफ ॲग्रिकल्चर स्थापन करण्याचें ठरविण्यांत आलें.

या देशांतील एकंदर ३६,७०० चौरस मैल जमीन अरण्यानें व्यापिली असून यांत पाइन, कॉर्क, ओक, चेस्टनट, हीं झाडें होतात. दाट अरण्य फक्त यांतील पर्वतावर आढळतें. या अरण्याचा ⅓ भाग येथील सरकाराकडे आहे व बाकीचा खाजगी मालकांकडे आहे.

उ द्यो ग धं दे—इतर देशांप्रमाणें फ्रान्स देशांतहि यंत्रांची वाढ झाल्यामुळें बहुतेक सर्व औद्योगिक कारखाने विशेषतः यंत्रांच्या साहाय्यानें चालविण्यांत येतात. यामुळें येथें उद्योगधंद्यांची भरभराट होत आहे. 'सीन डिपार्टमेंटमध्यें म्हणजे पॅरिस व त्याचीं उपान्त्यनगरें यांत उद्योगधंदे करणारी लोकसंख्या मोठी असून ती पोषाखाच्या व इतर अत्तरें वगैरे शोकाच्या वस्तू तयार करते. फ्रान्समध्यें शोकी लोक फार असल्यामुळें असल्या धंदेवाईक लोकसंख्येचें प्रमाण बरेंच आहे. १९२२–२३ सालीं फ्रान्समध्यें साखरेचे ९० कारखाने होते. मच्छीमारीचा धंदाहि मोठ्या प्रमाणांत चालतो.

ब्रिटन, युनायटेड स्टेट्स, आणि जर्मनी या देशांच्या मानानें यांत लोखंड व कोळसा कमी सांपडतो. १९२२ सालीं ३,११,६३,००० टन कोळसा व २,०८,३२,००० टन लोखंड खाणींतून निघालें. कोळशाच्या खाणी फ्रान्सच्या उत्तरेकडील भागांत, पॅस-डिकॅलेजमध्यें मध्यभागांत आणि पश्चिम प्रांतांत आहेत. लोखंड लोरेन, कॉट व बेरी यांमध्यें सांपडतें. यांत जे धातुकामाचे कारखाने आहेत त्यांत दरवर्षी ३ कोटी किंमतीचें पोलादी व लोखंडी सामान तयार होतें. व झिंक, शिसें, तांबें, निकेल वगैरे धातूंचें २० लक्ष किंमतीचें सामान बनविलें जातें.

याशिवाय यांत इतर धंदेंहि पुष्कळ आहेत. उदाहरणार्थ यांत सुती, लोंकरी, तागाचें, व रेशमी कापड तयार होतें. कोठें कोठें कातडें कमाविलें व रंगविलें जातें. शिवाय दारूचे व कांचेचे कारखानेहि कोठें कोठें आहेत. पूर्वीपासून या देशांत रेल्वे व इतर दळणवळणाच्या सोई उत्तम आहेत. इसवी सन १८६० मध्यें खुल्या व्यापाराची पद्धत सरसकट सुरू झाल्यापासून फ्रान्स देशानें उलट हळू हळू संरक्षक पद्धतीचा अवलंब केला तथापि फ्रान्स सरकारला निरनिराळ्या प्रसंगीं हींत बरेच फेरफार करावे लागले. उदाहरणार्थ इसवी सन १८९८ मध्यें धान्याचें पीक अपुरें झाल्यामुळें परदेशांतून येणाऱ्या धान्यावर जकात बसविणें फ्रान्स सरकारला तहकूब करावें लागलें. फ्रान्सचा बहुतेक व्यापार देशांतल्या देशांतच होतो. फ्रान्सचा परदेशांशीं व्यापार ग्रेटब्रिटन, जर्मनी व युनायटेड स्टेट्स् या राष्ट्रांच्या व्यापाराच्या मानानें कमी आहे.

रा ज्य प द्ध ति व रा ज्य व्य व स्था.—फ्रान्स देशाची राष्ट्रीय घटना ज्या तत्त्वांवर केली आहे तीं तत्त्वें म्हटलीं म्हणजे (१) प्रतिनिधिसत्ताक राज्यपद्धति, (२) वयांत आलेल्या प्रत्येक पुरुषाला राज्यकारभारांत आपलें मत देण्याचा हक्क असणें, (३) प्रधानमंडळानें लोकांना जबाबदार असणें आणि (४) प्रेसिडेंटवर कोणत्याहि प्रकारची जबाबदारी नसणें हीं होत.

फ्रेंच कायदेमंडळाच्या 'सिनेट' व 'चेम्बर ऑफ डेप्युटीज्' अशा दोन मुख्य सभा असून संबंध देशाच्या

राज्यकारभाराचीं मुख्य सूत्रें त्यांच्याच हातांत आहेत महत्त्वाच्या प्रसंगीं दोन्ही सभा एकत्र होतात व त्यांनां नॅशनल असेंब्ली असें नांव आहे. कायदेकानू करण्याचे अधिकार सिनेट आणि व ' चेम्बर ऑफ डेप्युटीज ' या सभांकडे आहेत, व त्यांच्या अंमलबजावणीचें काम या प्रजासत्ताक राज्याच्या अध्यक्षाकडे व त्याच्या प्रधान मंडळाकडे सोंपविलें आहे. " चेम्बर ऑफ डेप्युटीज " या सभेंत एकंदर ५८ सभासद असून ज्या ॲरॉंडिजमेंटमध्यें ( फ्रान्समधील डिपार्टमेंट अथवा प्रांताचा एक विभाग ) १० लक्ष लोकसंख्या आहे तींतून एक ' डेप्युटी ' अथवा सभासद पाठविण्यांत येतो सिनेटमध्यें एकंदर ३१४ सभासद असतात. उमेदवाराचें वय कमींत कमी ४० वर्षांचें तरी असावें लागतें. त्यांची निवडणूक ९ वर्षांकरितां असून त्यांच्यापैकीं ⅓ सभासद दर तिसऱ्या वर्षी बदलतात. सिनेट व चेम्बर ऑफ डेप्युटीजच्या सभासदांनां २७००० फ्रॅंक वार्षिक वेतन मिळतें. पूर्वी ज्या घराण्यांतील लोकांनीं फ्रान्स देशावर राज्य केलें त्या घराण्यांतील लोकांनां या दोन्ही संस्थांपैकीं एकाहि संस्थेचे सभासद होता येत नाहीं. राष्ट्राध्यक्षा(प्रेसिडेंट)ची नेमणूक ७ वर्षांपुरती असून त्याची निवडणूक 'नॅशनल असेंब्ली' कडून अथवा राष्ट्रीय सभेकडून होते. राष्ट्राध्यक्ष होण्यास उमेदवार असलेला पुरुष फ्रेंच नागरिक असून तो पूर्वी ज्या घराण्यानें फ्रान्सवर राज्य केलें त्या घराण्यांतला नसला पाहिजे. त्याला १२,००,००० फ्रॅंक अथवा ४८००० पौंड वार्षिक वेतन मिळतें. याला दोन्ही सभा. बोलावून त्यांपैकीं ' सिनेट'च्या अनुमतीनें ' चेम्बर ऑफ डेप्युटीज ' सभा मोडण्याचा अधिकार आहे. प्रधानमंडळांतील इसमांना-मग ते पार्लमेंटचे सभासद असोत अथवा नसोत-या दोन्ही सभांमध्यें बसून कांहीं बाबींवर बोलण्याचा हक्क असतो. या मंडळांत एकंदर १२ प्रधान असून त्यांच्या ताब्यांत एकेक खातें देण्यांत आलें आहे.

कौन्सिल ऑफ स्टेटः—प्रेसिडेंट व विशेषतः त्याच्या प्रधानमंडळास-विशेषतः राज्यव्यवस्थेसंबंधी-वेळोवेळीं सल्ला देणारी कौन्सिल ऑफ स्टेट या नांवाची एक सभा आहे. तिचे चार भाग केलेले आहेत; त्यांपैकीं प्रत्येक भागास दोन अथवा तीन प्रधानखात्यांनां सल्ला द्यावी लागते. या सभेचें अध्यक्षस्थान न्यायखात्याच्या प्रधानाकडे असतें. राजप्रतिनिधींवर राज्यव्यवस्थेच्या बाबींसंबंधीं सामान्य न्यायासनापुढें खटला चालवितां येत नाहीं, म्हणून त्यांचे वरील खटले या कौन्सिल ऑफ स्टेटच्या एका पोटसभेसमोर चालतात.

स्थानिक सरकारः—राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें फ्रान्स देशाचे ९० डिपार्टमेंट ( प्रांत ), पुन्हां ३८५ जिल्हे ( ॲरोंडाईजमेंट ), ३०१९ कॅंटन व ३७९६३ कॉम्यून पाडले आहेत. प्रत्येक डिपार्टमेंटवर एक ' प्रीफेक्ट ' ( अधिकारी ) आणि त्याच्या मदतीस एक सेक्रेटरी ( चिटणीस ) व एक सल्लागार मंडळ नेमलेलें असतें. प्रीफेक्टचा दाब कारभारावर असावा म्हणून एक कौन्सिलजनरल नांवाचें मंडळ असतें. याचे सभासद व्यापारी व धंदे करणाऱ्या वर्गांतून निवडले जातात व त्यांची निवडणूक ' सरासरा मतदान ' ( वयांत आलेल्या प्रत्येक व्यक्तीला आपलें मत देण्याचा हक्क ) या तत्त्वावर होते. स्थानिक राज्यव्यवस्थेच्या कांहीं बाबींवर या मंडळाचा निकाल शेवटला असतो.

कॅंटन हें जस्टिस ऑफ दि पीसचें ठाणें असून 'जनरल कौन्सिल' आणि डिस्ट्रिक्ट कौन्सिलच्या सभासदांची निवड करणारा एक घटक आहे. काम्यूनच्या मुख्य न्यायाधिशाला 'मेयर' म्हणतात. हा 'मेयर' मुख्य सरकारचा एक प्रतिनिधि असून याच्याकडे देशाचे कायदे व हुकूमनामे प्रसिद्ध करण्याचें काम असतें. शिवाय हा काम्यूनच्या स्थानिक स्वराज्यसंस्थेचा मुख्य 'कार्यकारी अधिकारी' असून त्या कार्यकारी अधिकाऱ्याच्या नात्यानें याला पोलीस, जमाबंदी व काम्यूनमधील लोकोपयोगी कामें यांवर देखरेख ठेवावी लागते. याशिवाय आणखी जन्ममृत्यूंची व लग्नांची नोंद ठेवणें व सुधारकपद्धतीचीं लग्नें लावणें इत्यादि कामें याला करावीं लागतात. या मेयरच्या मदतीस डेप्युटीज-ॲडजॉइंट्स नेमलेले असतात. काम्यूनमधील स्थानिक कामांचा निवाडा तेथील'म्युनिसिपल कौन्सिल'(स्थानिक स्वराज्यसंस्था ) करते. १९१०-१९२१ च्या अमदानींत मतदानाच्या बाबतींत महत्त्वाचा फरक घडून आला. तो म्हणजे १९१९ सालीं प्रातिनिधिक निवडणुकीचें तत्त्व अमलांत आलें. स्त्रियांनां मत देण्याचा अधिकार अद्यापीहि देण्यांत आला नाहीं.

न्या य प द्ध ति.—फ्रान्स देशांत जी न्यायपद्धति सध्यां अस्तित्वांत आहे तदनुसार हींत ( १ ) दिवाणी व फौजदारी न्यायकचेऱ्या आणि ( २ ) विशिष्ट न्यायकचेऱ्या अशा दोन प्रकारच्या न्यायकचेऱ्या आहेत. त्यांपैकीं दुसऱ्या प्रकारच्या न्यायकचेऱ्यांत (.कोर्टांत ) फक्त व्यापारी खटल्यांचा निवाडा करणाऱ्या कचेऱ्या व ज्यांत राष्ट्रांतील बड्या बड्या अधिकाऱ्यांवर त्यांच्याकडून अधिकारी या नात्यानें घडलेल्या गुन्ह्याबद्दल खटले चालतात, म्हणजे इंग्रजींत ज्याला ॲडमिनिस्ट्रेटिव्ह कोर्ट्स म्हणतात अशा न्यायकचेऱ्यांचा समावेश होतो. ज्या पहिल्या प्रकारच्या कोर्टांत दिवाणी व फौजदारी खटले चालतात त्यांच्यापैकीं अगदीं कनिष्ठ दर्जाचें कोर्ट म्हटलें म्हणजे जज-डी पेक्सचें होय. प्रत्येक कॅंटनमध्यें एक जज-डी पेक्स असतो. जज-डी पेक्सच्या निकालावर ज्या कोर्टांत अपील लागू शकतें त्या कोर्टाला 'ट्राइब्यूना डी प्रिमियर इन्स्टंट कोर्ट अथवा ट्राइब्युना डी प्रिमियर कोर्ट असें म्हणतात. प्रत्येक ॲरॉंडिझ्मेंटमध्यें असें एक कोर्ट असतें. ट्राइब्यून डी प्रिमियर इन्स्टंटसच्या निकालावर ज्या कोर्टांत अपील होतें त्या कोर्टांनां 'कोर्स डी अप्पेल' असें म्हणतात.

जज-डी पेक्सपुढें जे फौजदारी खटले येतात ते खेरीजकरून इतर सर्व फौजदारी खटल्यांची प्राथमिक पण गुप्तपणें तपासणी करण्याकरितां एक अधिकारी नेमलेला असतो; त्याला जज-डी-इंस्ट्रक्शन असें म्हणतात. 'कोर-डी-केसेशन' हें फ्रान्समधील अति वरिष्ठ दर्जाचें कोर्ट असून तें पॅरीसला असतें. याचे 'चेम्ब्रे डेस रिक्वेटेस' अथवा 'कोर्ट ऑफ पिटिशन्स', 'सिव्हिल कोर्ट (दिवाणी कोर्ट) व क्रिमिनल कोर्ट ( फौजदारी कोर्ट ) असे तीन विभाग केले आहेत. फ्रान्समध्यें ज्या ज्या गांवीं मोठा व्यापार चालतो त्या त्या गांवीं हें 'ट्राइब्यूनॉ डी कॉमर्स कोर्ट स्थापन केलेलें असतें. व्यापारी लोकांमध्यें व्यापारासंबंधानें जे तंटे उपस्थित होतात त्या तंट्याचा निकाल या कोर्टात होतो. यांतील न्यायाधीश प्रमुख व्यापाऱ्यांतून निवडले जातात. ज्या गांवीं मोठे उद्योगधंदे आहेत त्या गांवीं कारखानदार व लोकांमधील भांडणांचा निकाल करण्याकरितां कौन्सिल डी प्रुड्होम्स नामक कोर्टें स्थापन केलीं आहेत.

स र का री ज मा ख र्च खा तें.—फ्रान्स देशाचें सरकारी जमाखर्चखातें एका प्रधानाच्या हवालीं असून तो प्रधान वार्षिक जमाखर्चानें एक सर्वसामान्य अंदाजपत्रक तयार करतो. आणि त्या सर्वसाधारण अंदाजपत्रकांतच त्याच्या बरोबरीच्या प्रधानांनीं तयार केलेलीं आपापल्या खात्यांचीं अंदाजपत्रकें समाविष्ट करतो. नंतर निरनिराळ्या खात्यांच्या प्रधानांना त्यांच्या खात्यांच्या खर्चाकरितां जरूर ती रक्कम देतो. जेव्हां त्याला 'चेम्बर ऑफ डेप्युटीज' व 'सिनेट' या दोन्ही सभांची अनुमति मिळते, तेव्हां अंदाजपत्रक राष्ट्राधिकाऱ्यांकडून ' लोईडेस फायनासेन्स ' या नांवाखालीं प्रसिद्ध करण्यांत येतें.

कर गोळा करण्याकरितां प्रत्येक डिपार्टमेंटमध्यें एक कलेक्टर नेमलेला असतो. हा कलेक्टर कर गोळा करतो; एवढेंच नव्हे तर त्याच्या डिपार्टमेंटमधील ज्या सावकारांनीं फ्रान्स राष्ट्राला कर्जाऊ पैसे दिले असतील त्यांना गोळा केलेल्या करांतून हप्त्याहप्त्यानें वसूल देतो, आणि बँकेची कामेंहि चालवतो.

या देशाची उत्पन्नाची मुख्य बाब म्हटली म्हणजे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर होत. प्रत्यक्ष करांत जमीनमहसूल, डोईपट्टी, घरपट्टी, घरांचीं दारें व खिडक्यांवरील कर, व्यापारी परवान्यांवरील कर, इत्यादि करांचा समावेश होतो. १९१७ सालीं प्रत्यक्ष कराच्या यादींतून घरें, खिडक्या, खासगी मालमत्ता इत्यादि बाबी वगळण्यांत आल्या. अप्रत्यक्ष करांत नोंदणीजकात, कोर्टाचीं अथवा टपालाचीं टिकिटें, आयातमालावरील जकात आणि देशांतल्या देशांत उत्पन्न होणाऱ्या दारू व इतर अमली पदार्थांवरील कर इत्यादि करांचा समावेश होतो. यांशिवाय उत्पन्नाच्या इतर बाबी म्हटल्या म्हणजे सरकारी जंगल, सरकारी दारुगोळ्याचे व इतर तंबाखू वगैरे तयार करण्याचे कारखाने, टपाल, तारायंत्रें आणि सरकारी आगगाड्या या होत.

आयव्ययखात्यांतील ट्रेझरर, पेयर, रिसिव्हर वगैरे अधिकाऱ्यांकडून जे हिशेबाचे अथवा जमखर्चाचे कागद येतात त्यांची तपासणी करण्याकरितां एक अधिकारी नेमलेला असतो, त्याला 'कूर डेस, कॉमटेस' असें म्हणतात. या अधिकाऱ्याकडून त्या जमाखर्चाची तपासणी झाल्यावर ते पार्लमेंटकडे पाठविण्यांत येतात, आणि पार्लमेंटनें त्याला अनुमति दिली म्हणजे ते कायम होतात. महायुद्धामध्यें जमाखर्चाचे आंकडे भयंकरच फुगले. १९२१ सालीं फ्रान्सचें उत्पन्न २२८३७ दशलक्ष फ्रँक होतें, व खर्च २२७४८ दशलक्ष फ्रँक होता.

रा ष्ट्री य क र्ज.—जगांतील कोणत्याहि देशावरील कर्जापेक्षां फ्रान्सवरील कर्ज फार मोठें आहे. या कर्जाचा जन्म १५ व्या शतकांत झाला; आणि तेव्हांपासून यांतील राजांच्या अवाढव्य खर्चामुळें आणि राष्ट्रांतील आयव्ययाविषयीं त्यांच्या निष्काळजीपणामुळें तें फारच मोईजड होऊन बसलें. १९२३ सालीं फ्रान्सचें एकंदर कर्ज ३०९५०२ दशलक्ष फ्रँक होतें.

सै न्य.—इ. स. १८७०–७१ मधील फ्रँको-जर्मन लढाईच्या अपघातापासून लष्करी खात्यांत फ्रान्समधील प्रत्येक धडधाकट माणसानें नोकरी करणें सक्तीचें होऊन बसलें. स. १८७० पासून पुढें १८७२, १८८९ व १९०५ मध्यें सैन्यभरतीचे मोठे महत्त्वाचे कायदे पास झाले. त्यांपैकीं स. १९०५ मध्यें झालेल्या कायद्यान्वयें फ्रान्समधील सैन्याची वाढ जर्मनींतील सैन्याच्या वाढीबरोबर नेहमीं असावी असें ठरविण्यांत आलें. १९०७ सालीं लष्करी कायद्याच्या बजावणीमध्यें महत्त्वाचे फेरफार घडवून आणले. प्रत्येक सैनिकाला एकंदर २५ वर्षेपर्यंत नोकरी करावी लागते. २० व्या वर्षी त्याचें नांव लष्करांत नोंदलें जातें व २१ व्या वर्षी त्याची भरती होते. १९२१ सालीं ऱ्हाईन नदीच्या टापूंत फ्रान्सचें एक लक्ष सैन्य होतें व इतर ठिकाणचें सैन्य ८३०००० होतें. आरमारमंत्र्याची नेमणूक राष्ट्राध्यक्षाकडून होत असते.

फ्रान्स देशाच्या सबंध किनाऱ्याचे आरमाराच्या सोयीसाठीं पांच विभाग ( ॲरॉंडिझमेंट्स ) केले आहेत ' ब्रेस्ट ' येथें ' इकोल नेव्हेल ' नामक आरमारी शिक्षणाची शाळा आहे. पॅरिसमध्येंहि एक आरमारी शाळा आहे. याशिवाय टूलोन, ब्रेस्ट वगैरे ठिकाणींहि लहान लहान शाळा आहेत. १९२४ सालीं फ्रान्समध्यें सर्व प्रकारचीं जहाजें १९१ होतीं. त्यांपैकीं पहिल्या व दुसऱ्या वर्गाचीं जहाजें अनुक्रमें ६ व ३ असून क्रुझर ६, विनाशिका ५८, टॉर्पेडो १७ व पाणबुड्या ४६ होत्या. १९२३–२४ सालीं फ्रान्सचा आरमारी खर्च १०२८०७३७००८ फ्रँक होता. व्यापारी जहाजांची संख्या १६०२७ होती व विमानांची संख्या १३५१ होती.

शि क्ष ण.—फ्रान्समध्यें सार्वजनिक शिक्षणाचें बरेंच मोठें ओझें त्यांतील काम्युन, डिपार्टमेंट व सरकार यांनीं आपल्या शिरांवर घेतलें आहे. व त्यांनीं सार्वजनिक शिक्षणसंस्था ठिकठिकाणीं स्थापन केल्या आहेत. याशिवाय आणखी खाजगी शाळा आहेत व त्यांच्यावर देखरेख सरकारची असते. फ्रान्समधील शिक्षणखात्याचा जो मंत्रि असतो त्याला त्याच्या कामांत मदत करण्यास त्याला वेळोवेळीं सल्ला देण्यास एक मंडळ स्थापन केलेलें असतें त्या मंडळाचा हा मंत्रि अध्यक्ष असतो.

प्राथमिक शिक्षण सक्तीचें असून तें तेरा वर्षांच्या आंतील मुलांमुलींनां मोफत दिलें जातें. प्रत्येक काम्यूनमध्यें प्राथमिक शिक्षणाची एक शाळा असावी असा नियम आहे. १९२३–२४ सालीं प्राथमिक शाळांची संख्या ८१४४८ होती. दुय्यम प्रतीचें शिक्षण सक्तीचें नाहीं. विद्यार्थ्यांनां फी थोडी असते शिवाय सरकार पुष्कळशा शिष्यवृत्त्या देतें. त्यामुळें या शाळांतील शिक्षणक्रम एकंदर ७ वर्षांचा असतो. दुय्यम शिक्षणसंस्थांची संख्या १९२३–२४ सालीं ५७२ होती. उच्च शिक्षण विश्वविद्यालयांतून व विशिष्ट उच्च दर्जाच्या शाळांतून मिळतें. हें शिक्षण बहुतेक सरकारच्या हातीं आहे, तरी स. १८७५ च्या कायद्यान्वयें उच्च शिक्षण खाजगी मंडळांनां खाजगी विद्यालयांतून देण्याची मोकळीक मिळाली आहे. पण इ. स. १८८० च्या कायद्यानुसार विद्याविषयक शाखा व पदवीदानाचा हक्क ह्या दोन्ही गोष्टी फ्रान्स सरकारानें आपल्याच हातीं ठेवल्या आहेत. या देशांतील विश्वविद्यालयांत मुख्यतः वैद्यक, वाङ्मय, शास्त्रें, कायदा आणि प्रॉटेस्टंटपंथी ईश्वरवादाचें शास्त्र ह्या विद्याशाखांचें ( विषयांचें ) परिशीलन केलें जातें. १९२३–२४ सालीं उच्च शिक्षण देणारीं विश्वविद्यालयें १७ होतीं.

फ्रान्समध्यें 'इन्स्टिट्यूट–डि–फ्रान्स' नामक एक अत्युच्च दर्जाची शिक्षणसंस्था आहे. तींत पदार्थविज्ञानशास्त्र, भौतिकशास्त्र व वाङ्मय या तीन विषयाचें परिशीलन केलें जात असून त्या शिक्षणसंस्थेच्या एकंदर पांच ॲक्याडमीज (शाखा) आहेत. ही संस्था फ्रान्स सरकारच्या ताब्यांत आहे. महायुद्धानंतर शास्त्रीय शिक्षणाकडे लोकांची प्रवृत्ति अधिकाधिक होऊं लागली त्यामुळें शिक्षणाच्या या अंगाकडे विशेष लक्ष पुरविण्यांत येऊं लागलें. याशिवाय खास विषयामध्यें स्वतंत्र पदव्या देण्याची व परकीय लोकांनां फ्रेंच भाषेचा ठराविक शिक्षणक्रम पुरा झाल्यावर त्याबद्दलची पदवी देण्याची पद्धत अमलांत आली.

नि रा श्रि तां ची सो य.—फ्रान्समध्यें मुलांकरितां व निराश्रित वेड्यांकरितां उत्तम सोयी तेथील लोकांनीं केल्या आहेत. त्यांच्या पोटापाण्याची, औषधोपचारांची व अंशतः शिक्षणाची तरतूद करणें तेथील कायद्यान्वयें फ्रेंच लोकांचें कर्तव्य आहे. त्याचप्रमाणें निराश्रित, रोगी व अत्यंत म्हातारे यांच्याहि पोटापाण्याची व औषधोपचाराची सोय त्या लोकांनां करावी लागते.

व सा ह ती.—फ्रान्सच्या वसाहती इंग्लंड खेरीजकरून इतर देशांच्या मानानें पुष्कळ आहेत. त्या दृष्टीनें इंग्लंडचा नंबर पहिला लागतो व फ्रान्सचा नंबर दुसरा लागतो. त्या वसाहतींचीं नांवें, त्यांचें क्षेत्रफळ व त्यांची लोकसंख्या पुढील–प्रमाणें आहे. या वसाहतींचें क्षेत्रफळ ३९५८६२६ चौरस मैल असून लोकसंख्या ५५६३११८४ आहे. आ शि या, हिंदुस्थानांतील वसाहती:–अनाम, क्यांबोडिया, कोचीनचीन, टाँकिंग, लेऑस, सीरिया. आ फ्रि का.–अल्जेरिया, ट्यूनीस, सिनेगाल, फ्रेंच सूदन, अप्पर व्होल्टा, गिनी, आयव्हरी किनारा, डहोमे, मॉरिटानिया, नायगर, कांगो, कामेरून, टोगो, रेयुनियन, मादागास्कर, मेयोट्टे, व सोमाली किनारा अ मे रि का.–ग्वायना, ग्वाडेलोप, मार्टिनिक, सेंट पीयरी व मिक्केलन. ओ शि आ नि या.—न्यू कॅलिडेनिया आणि अवलंबित वसाहती, व ओशिआनियामधील लहान लहान वसाहती. मोरोक्कोचा बराचसा भाग फ्रान्सच्या संरक्षणाखालीं आहे.

इ ति हा स.—इ. स. पूर्वीच्या सहाव्या शतकांत मार्सेल्स येथें फिनिशियन लोकांची वसाहत होती. नंतर हळू हळू ग्रीक लोकहि येथें येऊन त्यांनीं मूळ रहिवाशांशीं दळणवळण ठेवून त्यांनां आपला व्यापार व कलाकौशल्य शिकविलें. इ. स. पूर्वीच्या २१८ व्या वर्षानंतर हॅनिबॉल यानें दक्षिण गॉल ( फ्रान्स ) जिंकला. नंतर गॉल लोकांचा रोमशीं वारंवार संबंध येऊं लागला. इ. स. पूर्वी ५८ व्या वर्षी दक्षिण प्रांतावर सीझरची नेमणूक झाली. त्यानें फ्रान्सवर स्वाऱ्या करणाऱ्या जर्मन व हेल्वेशियन लोकांचा पूर्ण मोड केला, व सर्व गॉल देश काबीज केला.

इ. स. १८० त रोमन साम्राज्याच्या इतर सर्व भागांवर गॉल देशाची उन्नति, भरभराट व शांतता या बाबतींत वरचढ होती. परंतु यानंतर व्हीसी गॉथ, ऑस्ट्रोगॉथ, व्हॅन्डाल बर्गंडियन, लाँबार्ड, अलेमान्नी वगैरे लोकांनीं या देशांत वसाहती केल्यामुळें फार अंदाधुंदी माजून त्याचें फार झपाट्यानें स्थित्यंतर होऊं लागलें.

४५० सालीं अटिला यानें हूण लोकांच्या फौजेनिशीं या देशावर स्वारी केली पण रोमन एटियस यानें त्याचा पाडाव केला. स. ४७६ त रोमन लोकांचें पश्चिम साम्राज्य नष्ट होऊन गॉल देशास स्वतःवरच अवलंबून राहावें लागलें. पाचव्या शतकाच्या आरंभीं जर्मन वंशांतील फ्रँक लोकांनीं या देशांतील र्‍हाईन नदीच्या मध्यावर आणि मुखाशीं वसाहती केल्या. ४८१ त क्लोडविग ( क्लोव्हिस लुई ) हा सेलियन फ्रँक लोकांचा राजा झाला. स. ४९६ त यानें ख्रिस्ती होऊन रीम्स येथें सेंट रेमिगिअस याच्याकडून बाप्तिस्मा घेतला. क्लोडविगच्या घराण्यांत हें घराणें बरेंच दिवस टिकेल अशा प्रकारची कोणतीच व्यवस्था नसल्यामुळें लौकरच गॉल देशांत छोटींग पातशाही माजली. याच सुमारास या देशांत बर्गंडी,

ऑस्ट्रेशिया व न्यूस्ट्रिया हीं तीन राज्यें उदयास आलीं. न्यूस्ट्रिया आणि ऑस्ट्रेशिया यांच्यांत नेहमीं चढाओढ लागलेली असे. मेरोव्हिंजियन राजे दुर्बल असल्यामुळें राजदरबारीं मेयरांनीं त्यांची सत्ता हळू हळू हिरावून घेऊन कार्लोव्हिंजियन घराण्याची स्थापना केली. त्याचा मूळ पुरुष हेरिस्टालचा पेपिन(६८४–७१४)होय. त्यानें न्यूस्ट्रियन राज्याचा पाडाव करून न्हाईनपलीकडील जर्मन लोकांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला. याच्यानंतर स. ७८७ त चार्लस मार्टेल (७१७–७४१) हा मेयर झाला. यानें स.७३२ त चाल करून येणाऱ्या मुसुलमानांचा पॉयटिअर्स येथें पराजय केला व फ्रँक राज्यास फिशिया, सॅक्सनी, स्वेबिया हे प्रांत जोडले, व जर्मनींत ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला. याच्यानंतर स. ७४१त पेपिन यानें नामधारी मेरोव्हिंजियन राजाची सत्ता झुगारून दिली व ७५१ त पोपच्या संमतीनें स्वतःच राजा ही पदवी धारण केली. यानें स. ७५५ त इटलींत प्रवेश करून लॉंबॉर्ड लोकांचा पराभव केला व कांहीं प्रदेश पोपच्या स्वाधीन केला.

याचा मुलगा चार्लस उर्फ शार्लमेन (७६८–८१२) यानें चांगली राज्यपद्धति अमलांत आणून ज्ञान व शिक्षण यांस उत्तेजन दिलें. यानें लॉंबार्डी, सॅक्सनी व बव्हेरिया काबीज करून बाल्टिक समुद्रावरील स्लाव्ह लोकांचा व स्पेनमधील मुसुलमानांचा पराजय केला. स. ८०० च्या वर्षी रोम येथील सेंटपीटरच्या देवालयांत ३ ऱ्या लिओनें याला राज्याभिषेक केला. यानंतर यानें पवित्र रोमन साम्राज्याचा बादशहा या नांवानें आपली द्वाही फिरविली. व्हर्डूनच्या तहानें शार्लमेनच्या साम्राज्याची विभागणी होऊन दुसऱ्या चार्लस राजाला पश्चिमभाग म्हणजे फ्रान्स व लुईच्या ताब्यात पूर्वभाग म्हणजे जर्मनी आला व या दोघांमध्यें लोथारिंगिया म्हणजे लॉरेनचें राज्य स्थापन झालें. पुढें ८४३–९८७ पर्यंतचा काल अंदाधुंदींत जाऊन ९८७ व्या वर्षी ह्यूगकॅपेट या सरदारानें एक तिसरें फ्रेंच राजघराणें स्थापन केलें. यानें ९८७–९९६ पर्यंत राज्य केलें व याच्यानंतर याच घराण्यांत दुसरा रूपर्ट (९९६–१०३१), पहिला हेनरी (१०३१–१०६०), पहिला फिलिप (१०६०–११०८) वगैरे राजे होऊन गेल्यावर स.११०८त सहावा लुई गादीवर आला.यानें आपल्या राज्यांत शांतता राखून पोपशीं सलोखा केला. त्याच्यामागून सातवा लुई (११३७–११८०) यानें आपलें बहुतेक बल धर्मयुद्धांत खर्च केलें. नंतरचा राजा फिलिप ऑगस्टस (११८०–१२२३) यानें ब्रिटनी, नार्मंडी, मेनआंजू किंवा आन्जू, टोरेन व पॉयटू वगैरे प्रदेशांतून इंग्रजास हांकून लाविलें. यानें पॅरिस येथें एक विद्यापीठ स्थापन करून राज्यव्यवस्थेंत कांहीं सुधारणा केल्या. याच्यानंतर आठवा लुई व पुढें नववा लुई (१२२६–१२७०) यानें राज्य केलें. हा ९ वर्षांचा होता याची आई कॅस्टाईलची ब्लँश ही राज्यकारभार पाहूं लागली. पुढें लुई स्वतः मोठा शूर व राजकार्यधुरंधर निघाला. यानें सरदार लोकांचें कांहीं चालू दिलें नाहीं. यानें अंतस्थ राज्यव्यवस्थेंतहि पुष्कळ सुधारणा केल्या.यांपैकीं विशेष महत्त्वाची पॅरिस येथील पार्लमेंट अथवा कायदेमंडळ ही होय. याच्यामागून तिसरा फिलिप (१२७०–८५) याच्या कारकीर्दीत फ्रेंच लोकांची सिसिली बेटांतील सत्ता नष्ट झाली. इ. स. १२८५ त चवथा फिलिप राज्यपदारूढ झाला. यानें फ्लँडर्स घेण्याचा प्रयत्न केला; तो पहिल्यानें यशस्वीहि ठरला पण शेवटीं यालाच हार खावी लागली. यानें पोपला आपल्या कह्यांत आणलें.

याच्यानंतर याचीं मुलें दहावा लुई, पांचवा फिलिप व चवथा चार्लस हीं एकामागून एक गादीवर बसलीं. या तिघांसहि मूल नसल्यामुळें गादीबद्दल तंटा उपस्थित होऊन इंग्लंडचा राजा ३ रा एडवर्ड हा फ्रान्सच्या गादीवर आपला हक्क सांगूं लागला. याच्यावरूनच फ्रान्स व इंग्लंड यांच्यामधील शतवार्षिक युद्धास प्रारंभ झाला.

यानंतरचा सहावा फिलिप (१३२८–१३५०) हा व्हॅलॉइस घराण्याचा मूळपुरुष होय. याच्यानंतर दुसरा जॉन (१३५०–१३६४)व पांचवा चार्लस (१३६४–१३८०) यांनीं राज्य केलें. चार्लसच्या कारकीर्दीत फ्रान्समधील इंग्रजांच्या ताब्यांतील असलेला बराच मुलुख काबीज करण्यांत आला. नंतर सहावा चार्लस यानें १३८० ते १४२२ पर्यंत राज्य केलें. हा गादीवर असतांनाच वेडा झाला तेव्हां राज्यसूत्रें कोणाच्या हातीं असावीं याबद्दल ओर्लियानिस्ट व बर्गंडियन यांच्यामध्यें खूप खडाजंगी वाद माजला व याच सुमारास स.१४१५ त इंग्रज लोकांनीं एजिनकोर येथें फ्रेंच सैन्याचा पाडाव करून सहाव्या चार्लसची मुलगी कॅथेराईन हिचें इंग्लंडच्या पांचव्या हेनरीशीं लग्न व्हावें व सहावा चार्लस मेल्यावर त्याच्यामागें पांचव्या हेनरीस फ्रेंच गादीचा वारस करावें अशी फ्रेंच लोकांपासून कबुली करून घेतली, परंतु पुढें स.१४२२त पांचवा हेनरी मेल्यावर ही कबुली जागच्याजागींच राहिली. सहावा चार्लस मेल्यावर १४२२ त फ्रेंच गादीवर सातवा चार्लस बसला.याच्या कारकीर्दीत जोन ऑफ आर्क (पहा) या फ्रेंच मुलीनें शौर्य गाजवून ऑर्लीनचा वेढा उठविला. स.१४५० त फ्रान्स देशांतील इंग्रजांच्या ताब्यांत असलेला नार्मंडी हा अखेरचा प्रांत फ्रेंच सैन्यानें काबीज केला व इंग्रजांस फ्रान्समधून हांकून लाविलें. याच्या कारकीर्दीपासून फ्रान्स देशांतील राजसत्ता अधिकाधिक वाढण्यास प्रारंभ झाला. पुढील राजा अकरावा लुई यानें स. १४६१ ते १४८३ पर्यंत राज्य केलें. यानें सरदार लोकांचा पराभव करून पॅरिस येथील पार्लमेंटास उत्तेजन दिलें व तशाच प्रकारच्या संस्था प्रत्येक प्रांतांत स्थापिल्या. याशिवाय यानें उद्योगधंदे व छापखान्यांची कला यांस उत्तेजन देऊन वाङ्मय व कलाकौशल्य यांना चांगलें प्रोत्साहन दिलें. पुढें याचा बर्गंडीचा 'धीट' चार्लस याच्याशीं तंटा उपस्थित झाला. परंतु

स.१४७७ त चार्लस मारला गेल्यावर हा तंटा मिटून चार्लसच्या ताब्यांतील ऑरटॉयीस व बर्गंडी हे दोन प्रांत फ्रेंच राज्यास कायमचे जोडले गेले. याच्यानंतर आठवा चार्लस राजा यानें १४८३ ते १४९८ पर्यंत राज्य केलें. यानें स. १४९१ त ब्रिटनी प्रांत आपल्या राज्यास जोडला. स. १४९४ त यानें इटली देशावर स्वारी करून नेपल्स देश जिंकला परंतु पुढें इटालियन लोकांनीं जुटीनें हल्ला करून फ्रेंच राजास इटलींतून हाकून लाविलें.

१४९८ सालीं बारावा लुई हा फ्रान्स देशाचा राजा झाला. यानेंहि आठव्या चार्लसप्रमाणें इटाली देशावर दोनदां स्वाऱ्या केल्या आणि दोन्हीहि वेळीं बाराव्या लुईला अपयश घेऊन परत यावें लागलें. याच्या नंतरचा पहिला फ्रॅन्सिस (१५१५–१५४७) हा मोठा महत्त्वाकांक्षी होता. यानें इटलीवर स्वारी करून स्विस व मिलनीज लोकांचा मॅरिग्नॅनो येथें पराजय केला. यायोगें फ्रेंच राजाचा पोपवर वचक बसून त्यानें फ्रान्समध्यें धार्मिक नेमणुका करण्याचा अधिकार फ्रॅन्सिसवर सोंपविला. पुढें हा व पांचवा चार्लस यांच्यामध्यें युद्ध जुंपलें. या युद्धांत १५२५ सालीं फ्रॅन्सिस यास कैदी व्हावें लागून चार्लसशीं तह करावा लागला. याचा मुलगा दुसरा हेनरी (१५४७–१५५९) याच्या कारकीर्दींत गिजच्या फ्रॅन्सिसनें पांचव्या चार्लसचा मेट्झवरील हल्ला परतवून लाविला व इंग्रजांपासून कॅले घेतलें. स १५५७ त फ्रेंच सैन्याचा सेंट क्वेंटिन येथें पाडाव झाला. पुढें कॅटू-कॅम्ब्रेसिस येथें तह झाला. फ्रान्सनें या तहांत आपला पराभव झाल्याचें कबूल करून इटलीवरील आपला सर्व हक्क सोडून दिला. याबद्दल मेज, टूल व व्हर्डून या पूर्वसरहद्दीवरील तीन धार्मिक संस्थानांवर फ्रेंच सत्ता कबूल करण्यांत आली. याच्यानंतर दुसरा फ्रॅन्सिस (१५५९–६०), नववा चार्लस (१५६०–७४), तिसरा हेनरी (१५७४–८९) या तीन राजांच्या कारकीर्दींत फ्रान्समधील प्रॉटेस्टंट व रोमनकॅथॉलिक या लोकांत युद्ध झालें. पुढें नॅव्हारचा हेनरी या प्रॉटेस्टंट पुढाऱ्यानें स्वतः रोमनकॅथॉलिक धर्म स्वीकारून तडजोड केली व आपण चवथा हेनरी हें नांव धारण करून फ्रान्स देशाचा राजा झाला (१५९४). हा बुरबोन घराण्याचा पहिला राजा होय. स. १५९८ त यानें एक 'एडिक्ट ऑफ नॅन्ट्स' या नांवाचें आज्ञापत्रक काढून त्यांत प्रॉटेस्टंट लोकांना कांहीं सवलती व हक्क दिले. हा स. १६१०त मारला गेला, व याच्यानंतर १३ वा लुई (१६१०-४३). याचा मुख्य प्रधान कार्डिनल रिचलू हा होता. यानें प्रॉटेस्टंट लोकांचा पाडाव करून त्यांपासून लॉ रोशेल किल्ला हिसकावून घेतला व त्यांस नमविलें. यानेंच स. १६३५ त फ्रान्स देशास ३० वर्षांच्या धर्मयुद्धांत अंग घ्यावयास लाविलें. प्रांतिक राज्यव्यवस्थेवर नजर ठेवण्याकरितां यानें इंटेंडंट अधिकाऱ्यांची योजना केली. पुढें चवदावा लुई (१६४३--१७१५) याच्या कारकीर्दींत मॅझेराईन यानें ३० वर्षांच्या युद्धाचा शेवट करून फ्रान्स देशास अल्सेसप्रांत मिळवून दिला, व स्पेन देशाशीं तशीच लढाई चालू ठेवून स.१६५९ त स्पॅनिश लोकांस पिरिनीजचा तह करावयास लाविलें. या तहान्वयें स्पेन देशानें फ्रान्स देशाचा सरहद्दीवरील भाग देण्याचे कबूल करून स्पॅनिश राजकन्येचें चवदाव्या लुईशीं लग्न करावयाचें कबूल केलें.

स. १६४८--१६५२ पर्यंत फ्रान्स देशांत फ्रॉंड नांवाची बंडाळी झाली. पुढें जेनिझम नांवाची धार्मिक चळवळ सुरू झाली. स. १६६१ त मॅझेराईन मरण पावल्यावर चवदाव्या लुईनें राज्यसूत्रें हातीं घेतल्याचें जाहीर केलें. स. १६८५ त यानें चवथ्या हेनरीनें प्रसिद्ध केलेलें नॅंटचें आज्ञापत्र रद्द केलें व जेनिझिस्ट लोकांचा छळ केला. याचा मुख्य प्रधान कॉलबर्ट यानें जमाबंदीचा चांगला बंदोबस्त ठेवून व फ्रान्स देशांतील उद्योगधंद्यास व व्यापारास उत्तेजन देऊन फ्रान्स देश बऱ्याच उर्जितावस्थेस आणला. चवदाव्या लुईनें एकंदर चार मोठीं युद्धें करून आर्थिक दृष्ट्या फ्रान्स देशास हीन दशेस आणलें. यापैकीं पहिलें युद्ध स. १६६७ त स्पेन देशाशीं झालें. यांत लुईनें नेदर्लंडचा कांहीं भाग जिंकला. दुसरें, इ. स. १६७२ त हॉलंडशीं झालें. यांत फ्रान्स देशास फ्रेंच-कॉम्टी वगैरे प्रांत मिळाले. तिसरें स. १६८८ त इंग्लंडच्या तिसऱ्या विल्यमशीं झालें. यात फ्रान्स देशास कांहीं प्रांत परराष्ट्रांस द्यावे लागले. चवथें स्पेन देशाच्या गादीच्या हक्काबद्दल झालें. चवदाव्या लुईनंतर त्याचा मुलगा पंधरावा लुई गादीवर आला, हा लहान असल्यामुळें याच्या तर्फे ऑर्लीन्सचा ड्यूक राज्यकारभार पाहूं लागला.

स. १७४० त ऑस्ट्रियाच्या गादीबद्दल यूरोपांत युद्ध सुरू झालें. या युद्धांत फ्रान्सनें मराया थेरिसच्या विरुद्ध प्रशियाचा फ्रेड्रिक यास मदत केली. स. १७४८ त एॅक्सलाशपेल येथें तह होऊन या युद्धाचा शेवट झाला. पुढें स. १७५६ त सप्तवार्षिक युद्ध सुरू झालें. या युद्धांत फ्रान्सनें फ्रेड्रिकची बाजू सोडून देऊन मराया थेरिसचा पक्ष उचलला. या युद्धांत फ्रान्स देशाचा पराभव होऊन त्यास उतरती कळा लागली. याच वेळेस फ्रान्स देशांत व्हॉल्टेयर, रूसो वगैरेसारखे तत्त्ववेत्ते होऊन गेले. या तत्त्ववेत्यांत मतभेद होता पण सद्यःकालीन राज्यपद्धतींत सुधारणा केली पाहिजे याविषयीं मात्र सर्वांचें एकमत होतें. स. १७७४ त सोळावा लुई गादीवर आला. यानें राज्यव्यवस्थेंत सुधारणा करण्याकरितां मुख्य प्रधानाच्या जागेवर टर्गो याची नेमणूक केली. यानें धान्याच्या अंतर्गत व्यापारावरील जकात काढून टाकून देशाच्या प्रत्येक भागास धान्याचा पुरवठा होईल अशी व्यवस्था केली. त्याचप्रमाणें औद्योगिक आणि व्यापारी संघांच्या सवलती काढून घेऊन उद्योगधंद्याचा मार्ग खुला केला आणि कराचा सर्वांवर सारखा बोजा पडावा म्हणून पुष्कळ खटपट केली, परंतु राणी मेरी ॲंटोनेट हिची याच्यावर इतराजी

झाल्यामुळें १७७६ सालीं याला आपली जागा सोडावी लागली. यानंतर नीकर, कॅलोनब्राईन वगैरे मुख्य प्रधान झाले. पण देशांत अस्वस्थता फार वाढत जाऊन १७८९ सालीं जगविख्यात फ्रेंच राज्यक्रांतीस सुरवात झाली व फ्रान्स देशांतील प्रतिनिधिसभा (स्टेट्स जनरल) बोलविण्यांत आली. मध्यम वर्गांतील सभासदांचें या प्रतिनिधिसभेंत वरेंच वर्चस्व होतें. या सभेनें राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. पुढें कांहीं दिवसांनीं या सभेनें आपणांस राष्ट्रीय मंडळ (नॅशनल असेंब्ली) हें नांव घेतलें. हें करणें लुईस न आवडून त्यानें मंडळ मोडण्याचा प्रयत्न केला. परंतु शेवटीं कांहीं न चालून त्याला मंडळाचें ऐकणें भाग पडलें. यानंतर लुईनें परदेशीय सैन्याच्या साहाय्यानें मंडळास आपल्या ताब्यांत आणण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा परिणाम असा झाला कीं, पॅरिस शहरचे रहिवाशी मंडळास जाऊन मिळाले, व त्यांनीं बॅस्टाईल किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. पुढें याच राष्ट्रीय मंडळानें राज्यघटनेचें काम हातीं घेऊन १७९१ सालीं फ्रान्स देशांत नवीन राज्यपद्धतीची योजना केली. या नव्या पद्धतीच्या योगानें राजास फक्त एका वरिष्ठ कार्यकारी अधिकाऱ्याचा दर्जा प्राप्त झाला होता. याच सुमारास लुईनें पॅरिसमधून पळून जाण्याचा प्रयत्न केला, पण तो सफळ झाला नाहीं. सरतेशेवटीं त्याला ही नवीन व्यवस्था मान्य करावी लागली. ता. १ आक्टोबर स. १७९१ रोजीं कायद्याची घटना करण्याकरितां कायदेकारी मंडळ बोलावण्यांत आलें. या मंडळाचें काम ता. २० सप्टेंबर, १७९२ पर्यंत चालू होतें. यावेळेस फ्रान्सनें ऑस्ट्रियाविरुद्ध युद्ध पुकारलें व या युद्धांत फ्रेंच सैन्यास जय न मिळाल्यामुळें लोकांस संशय येऊं लागला, व त्यांनीं राजास पदच्युत केलें. यानंतर जॅकोबिन पक्षाचें महत्त्व वाढून एक नवें मंडळ स्थापण्यांत आलें. या मंडळानें राजसत्ता लयास जाऊन प्रजासत्ताक राज्यपद्धतीची स्थापना झाल्याचें जाहीर केलें. १७९३ सालीं राजास देशद्रोहाच्या आरोपावरून फांशी देण्यांत आलें. पुढें कांहीं दिवसपर्यंत फ्रान्स देशांत भीतीचें साम्राज्य (रेन ऑफ टेरर). चालू होतें. १७९५ सालीं फ्रान्स देशांत डायरेक्टरी नांवाची राज्यव्यवस्था स्थापन झाली.या नवीन पद्धतीनुसार फ्रान्स देशाची राजसत्ता पांच कार्यकारी अधिकाऱ्यांकडे गेली व कायदेकानू करण्याकरितां अनुभविक लोकांचें महागारमंडळ (कौन्सिल ऑफ एन्शंट्स) व ५०० सभासदांचें मंडळ (कौन्सिल ऑफ फाईव्ह हंड्रेड) या दोन संस्थांची योजना केली होती. इ. स. १७९९ मध्यें नेपोलियननें फ्रान्स देशांत "कॉन्स्यूलेट राज्यपद्धति" अमलांत आणली व आपण स्वतः फर्स्टकॉन्सल झाला.

पुढें १८०४ सालीं नेपोलियननें बादशहा ही पदवी धारण केली. त्यानें फ्रान्स देशावर १८१४ सालपर्यंत राज्य केलें. यानें आपला पराक्रम गाजवून सर्व यूरोपावर आपली छाप बसविली. पण १८१२ सालीं त्याला रशियावरील स्वारींत अपयश आल्यामुळें इतर यूरोपीय राष्ट्रांस धीर येऊन त्यांनीं एकजुटीनें फ्रान्स देशावर हल्ला केला व नेपोलियन बादशहास राज्यपदावरील आपला हक्क सोडावयास लाविलें. व बुरबोन घराण्याचा अठरावा लुई राज्यारूढ झाला. याला राज्यकारभार चांगला चालवितां न आल्यामुळें फ्रेंच लोकांत असंतोष उत्पन्न झाला. याच सुमारास नेपोलियन एल्बा बेट सोडून पुन्हां फ्रान्स देशांत आला, व स. १८१५ च्या मार्च महिन्यापासून जूनपर्यंत १०० दिवस पुन्हां एकदां बादशहा झाला. हा बादशहा झाल्यावर यूरोपांतील राष्ट्रांनीं पुन्हां एकजुटीनें नेपोलियनचा वाटर्लू येथें पराभव करून त्याला सेंट हेलेना बेटांत रहावयास पाठविलें. इकडे फ्रान्स देशांत १८ वा लुई पुन्हां राज्य करूं लागला. याच्यानंतर १८२४ सालीं ९ वा चार्लस गादीवर आला. १८३० सालीं फ्रान्स देशांत पुन्हां राज्यक्रांति होऊन ऑर्लीन्सचा ड्यूक लुई फिलिप हा राजा झाला. यानें १८४८ सालापर्यंत राज्य केलें. याच्या कारकीर्दींत १८३०–४७ सालापर्यंत अल्जीर्सचें युद्ध होऊन अल्जीर्स देश फ्रेंच राज्यास जोडला गेला व १८३८–३९ त मेक्सिकोशीं, व१८४४सालीं मोरोक्कोशीं फ्रान्स देशाचें युद्ध झालें लुई राजा असतांना थायर, ग्युइझोट, साल्ट वगैरे नामांकित पुरुषांनीं प्रधानकीचें काम करून फ्रान्स देशास पुन्हां कांहीं अंशीं उर्जित दशेस आणलें. १८४८ सालीं या देशांत आणखी एकदां राज्यक्रांति होऊन लुई नेपोलियन हा बादशहा झाला. याला तिसरा नेपोलियन ही पदवी देण्यांत आली (१८५२). १८५४ सालीं फ्रान्स देश इंग्लंडबरोबर क्रिमियन युद्धांत सामील झाला. पुढें १८५९ सालीं या देशानें ऑस्ट्रियाविरुद्ध इटली देशास मदत केली व लॉंबर्डी प्रांत ऑस्ट्रियापासून इटलीस परत देवविला. युद्धास जाण्याच्या पूर्वी तिसऱ्या नेपोलियननें आपला इटली देश स्वतंत्र करण्याचा संकल्प जाहीर केला होता परंतु युद्ध सुरू झाल्यावर केलेला संकल्प अर्धवट टेवून त्यानें व्हीला फ्रँका येथें ऑस्ट्रियाशीं तह केला. इटलीचें युद्ध सुरू झाल्यापासून फ्रेंच रोमनकॅथॉलिक लोकांत बरीच खळबळ उडून ते नेपोलियनच्या या कृत्याचा उघड उघड निषेध करूं लागले व पुढें १८६० सालीं नेपोलियननें इंग्लंडशीं खुल्या व्यापाराचा तह केल्यावर लोकमताचा विरोध अधिक दुणावला.

१८६३ सालीं नेपोलियननें फ्रान्स देशांतील मजूरवर्गास सहकारी पतपेढ्या काढण्याची परवानगी दिली. १८६४ सालीं मजूरवर्गाची स्थिति सुधारण्याकरितां त्यांस संप वगैरे करून आपल्या अटी कारखानदारापासून कबूल करवून घेण्याची सवलत दिली.

१८७० सालीं फ्रान्स देशाचें, प्रशियाशीं स्पेन देशाच्या गादीच्या वारसाबद्दल युद्ध झालें. यांत फ्रेंच देशास अपयश येऊन, फ्रान्स देशावरील तिसऱ्या नेपोलियनचें साम्राज्य

नष्ट झालें, व या देशांत प्रजासत्ताक राज्याची स्थापना झाली. १८७१ सालीं झालेल्या तहान्वयें फ्रान्सनें प्रशियाला बेलफोर्टेशिवाय करून अलसेस प्रांत व मेट्स धरून लोरेन प्रांताचा कांहीं भाग देऊन १० कोटी पौंड युद्धखर्च म्हणून देण्याचें कबूल केलें. थायर यास फ्रान्स देशांतील तिसऱ्या प्रजासत्ताक राज्याचा प्रेसिडेंट नेमलें. यानें १८७३ सालापर्यंत फ्रान्स देशाचा राज्यकारभार चालविला. याच्यानंतर मार्शल मॅकमोहन हा प्रेसिडेंट झाला. यानें प्रधानमंडळ स्थापन करून त्यावर एक उपाध्यक्ष नेमला. १८७५ सालीं सेनेट व 'चेंबर ऑफ डेप्युटीज' या सभांतील सभासदांनीं एकमतानें प्रजासत्ताक राज्याचा प्रेसिडंट निवडावा, व या प्रेसिडेंटानें फ्रान्स देशाचा ७ वर्षेपर्यंत राज्यकारभार पहावा असें ठरलें.

१८७८ सालीं पॅरिस येथें एक अंतरराष्ट्रीय प्रदर्शन भरलें होतें. पुढें स. १८७९ त फ्रान्सचा ग्रेव्ही हा प्रेसिडेंट झाला. सन १८८५ त पुन्हां याचीच निवडणूक झाली. याच्या कारकीर्दींत प्रधानमंडळांत पुष्कळ फेरबदल झाले, पण सरकारचें प्रजासत्ताक धोरण मात्र कायम होतें. स. १८८७ त यानें राजीनामा दिल्यावर कॅनॉर्ट हा प्रेसिडेंट झाला. याच्या कारकीर्दींत स. १८८८ मध्यें जनरल बोलँगर याच्या चळवळीमुळें प्रजासत्ताक राज्य लयास जातें कीं काय अशी भीति उत्पन्न झाली होती पण जनरल बोलँगर फ्रान्स देशांतून पळून गेल्यावर ही भीति नाहींशी झाली. यानंतर लष्करात सक्तीची नोकरी करण्याची मुदत तीन वर्षेपर्यंत करण्यांत येऊन, प्रोफेसर आणि पाद्री या लोकांसहि एक वर्षपर्यंत लष्करी शिक्षण देण्याचें सन १८९२ मध्यें ठरलें. १८९२ सालीं पनामा कंपनीचें दिवाळें निघालें. त्यात ५० कोटींचें फ्रेंच भांडवल गुंतलें होतें. पुढें चौकशीअंतीं असें बाहेर आलें कीं या कंपनीकडून पुष्कळ मोठमोठ्या मुत्सद्द्यांनीं लांचलुचपत घेतली होती. पैसा खाल्लेल्या कांहीं इसमांस शिक्षा झाल्या.

१८९४ सालीं प्रेसिडेंट कॅनार्ट यांचा खून झाल्यावर कासिमीर पेरियर हा प्रेसिडेन्ट झाला. यानें सहा महिन्यांतच आपल्या जागेचा राजीनामा दिला. याच्यानंतर १८९५ सालीं फेलिक फॉर या व्यापाऱ्यानें प्रेसिडेंटची जागा पटकाविली. याच्या कारकीर्दींत १८९६ सालीं रशियाच्या झारनें पॅरिस येथें येऊन प्रेसिडेंटास भेट दिली. यानंतर १८९७ सालीं प्रेसिडेंट फेलिक फॉर यानें सेंटपीटर्सबर्ग येथें जाऊन रशियाच्या झारला उलट भेट दिली. १९०१ सालच्या सुमारास फ्रान्स देशांत मजूरवर्गानें संप सुरू केला व तो न होऊं देण्याकरितां त्या देशातील व्यापाऱ्यांनीं संघ स्थापन केले.

१९०६सालीं एम्.फॉलिरेस याला प्रेसिडेंट निवडलें.याच्या कारकीर्दींत समाजसुधारणेची बरीच प्रगति होऊन मजूरपक्ष बळावला. त्याच सालीं क्लेमेंसे हा मुख्य प्रधान झाला. यानें प्राप्तीवरील कर प्राप्तीच्या मानानें कमी अधिक होईल अशी तजवीज केली व त्यास प्रत्यक्ष कराच्या सदरांत घातलें. १९०९ सालीं ब्रायंड हा मुख्य प्रधान झाला.

१८७०–१९०९पर्यंत फ्रान्सदेशाचें परराष्ट्राशीं धोरणः— बिस्मार्कची नेहमीं अशी इच्छा असे कीं फ्रान्स देश सर्व यूरोपखंडापासून अलिप्त राहावा व त्यांत नेहमीं यादवी माजलेली असावी असें झाल्यानें फ्रान्स देशाचें यूरोपवरील वर्चस्व नाहींसें होऊन जर्मनीस पुढें सरसावून सर्व यूरोपखंडावर आपली जरब पाडण्यास सुलभ जाईल. १८७० सालीं फ्रान्स देशाची अगदीं वरीलप्रमाणें अवस्था झाली होती परंतु सुदैवानें पुढें लवकरच म्हणजे सन १८७५ त तिसरें प्रजासत्ताक राज्य स्थापन झाल्यावर ही स्थिति पालटण्याचा रंग दिसूं लागला.स.१८८२ त बर्लीन कांग्रेसमध्यें बिस्मार्कनें रशिया व फ्रान्स या दोहोंचा तह घडवून आणला. वरील सभेनें ईजिप्तवरील इंग्लंड व फ्रान्स या दोन्हीहि राष्ट्रांचा ताबा कबूल केला होता;परंतु पुढें स.१८८३ मध्यें ईजिप्तच्या खेदिवानें इंग्लंड व फ्रान्स या दोघांचा संयुक्त ताबा रद्द केल्याचें जाहीर केलें व तेव्हांपासून तों १९०४ सालच्या तहापर्यंत ईजिप्तवर एकट्या इंग्लंड देशाचेंच वर्चस्व कां असावें याबद्दल सारखी घाटाघाट सुरू होती.

भूमध्यसमुद्रावर आपला ताबा रहावा असा फ्रेंच मुत्सद्द्यांचा मानस असल्यानें त्यांनीं ईजिप्तचें स्वामित्व मिळण्यासाठीं एवढी खटपट केली होती व आफ्रिकेंतील अल्जीरिया प्रदेश आपल्या अंमलाखालीं घेतला होता. अशी त्यांची इच्छा असतांना अल्जिरियाच्या शेजारींच असलेला ट्यूनिस प्रदेश कोणी काबीज केल्यास तें त्यांना खपण्यासारखें नव्हतें. स. १८८१ त वरील धोरणास अनुसरून बॉर्थेलोमी सेंट हिलेर या फ्रेंच प्रधानानें ट्यूनिस प्रदेश स्वतंत्र असल्याचें जाहीर केलें व आपली कृति न्याय्य आहे असें दाखविण्याकरितां इंग्रज मुत्सद्दी लार्ड अबर्डीन यानें १८३० सालीं बारबरी संस्थानांच्या स्वातंत्र्याविषयीं केलेलें विधान आपल्या जाहीरनाम्यासोबत जोडलें. ट्यूनिस प्रदेश तुर्कस्तानाच्या ताब्यांत असून तुर्कांच्या वतीनें एक सुभेदार त्या प्रदेशावरील राज्यकारभार पहात असे. या सुभेदारानें क्रिमियन युद्धांत तुर्कांस मदत केली होती. १८६४ नंतर फ्रान्स देशानें याप्रदेशावरील तुर्की अंमल झुगारून दिला होता. परंतु स.१८७१ त फ्रान्स देश खालावल्यावर ट्यूनिसच्या सुभेदारानें तुर्कस्तानाचें वर्चस्व पुन्हां कबूल केलें होतें. वरील जाहीरनामा प्रसिद्ध केल्यावर लवकरच स. १८८२ मध्यें फ्रान्स देशानें ट्यूनिस प्रदेश आपल्या छत्राखालीं आणून त्याचा राज्यकारभार एका फ्रेंच गव्हर्नराकडे सोंपविला.या गव्हर्नरास मिनिस्टर–रेसिडेंट–जनरल ही पदवी असून त्याच्या हाताखालीं ७ फ्रेंच व २ तद्देशीय असे ९ प्रधान आहेत. फ्रान्स देशानें

वेधलें होतें. त्यामुळें फ्रेंच पार्लमेंटमधील राजकारण बरेंच मार्गे पडल्यासारखें झालें. व्हर्डूनमध्यें परिस्थिति फार भयंकर होत चालली होती. त्यामुळें तेथील सैन्याची जय्यत तयारी ठेवण्याकरितां, फ्रेंच सरकारनें नवीन कर लादून पैसा उकळण्याचें ठरविलें. १९१७ च्या अखेरीस क्रेमेंको हा मुख्य प्रधान झाला. त्यानें आपल्या ताब्यांत युद्धखातें घेऊन लढाई जोरानें चालू ठेवण्याचा निश्चय केला. या कामीं जितकें मनुष्यबळ जरूर पडेल तेवढें शक्य त्या तऱ्हेनें उभारण्याचें त्यानें ठरविलें. यामुळें फ्रान्सला जर्मनीविरुद्ध सारखे जय येत जाऊन शेवटीं १९१८ सालीं महायुद्धाचा शेवट झाला.

दोस्तराष्ट्रांचा व जर्मनीचा जो तह घडून आला त्यांत फ्रान्सला अलसेसलोरेन्स हे प्रांत मिळाले. याशिवाय व्हर्सेलिसच्या तहानें फ्रान्सच्या उत्तरेकडील कोळशाच्या खाणींचा जर्मनीनें विध्वंस केला होता त्याबद्दल जर्मनीकडून भरपाई मिळाली. १९२० सालीं डेशॅनेल हा फ्रान्सचा अध्यक्ष झाला पण थोडक्याच दिवसांत त्याला अपघात झाल्यामुळें त्याच्या जागीं मिलेरांड हा अध्यक्ष निवडून आला.

को ड ने पो लि य न.—ह्या कोडाचें पूर्वीचें नांव "कोड सिव्हिल डेज फ्रँकाइस" हें असून तें संपूर्णपणें ३१ मार्च १८०४ रोजीं प्रसिद्ध झालें. ३ सप्टेंबर १८०७ रोजीं ह्यास कोड-नेपोलियन हें नांव मिळालें वास्तविक, हें तयार करण्यांत नेपोलियनचा विशेषसा हात नव्हता. १८१८ मधील ठरावामुळें ह्यास पुन्हां पूर्वीचें नांव प्राप्त झालें, पण १८५२ सालीं कोडनेपोलियन हें नांव पुन्हां सुरू झालें. ४ सप्टेंबर १८७० सालापासून ह्यास कोड-सिव्हिल असें म्हणूं लागले.

फ्रान्समध्यें सर्व राष्ट्रांस लागू पडणारी कायदेपद्धति उर्फ कोड झालें नव्हतें. १७९१सालीं जी राज्यघटना अस्तित्वांत होती तिनें हे तयार करण्याचें आश्वासन दिलें. पुढें कनव्हेन्शननें मात्र हें संगतवार तयार करण्याचें काम अंगावर घेतलें. दोन प्रकारचा साहित्यसमूह अस्तित्वांत होता; एक कायद्याचें विस्तृत वाङ्मय व दुसरा फ्रान्समध्यें प्रचारांत असलेला रोमन कायदा. वरील साहित्यसमूहाची व राज्यक्रांतीच्या वेळीं झालेल्या कायद्यांची सांगड घालावी लागली. राज्यक्रांतीच्या वेळीं झालेल्या कायद्यामुळें वैयक्तिक स्थितींत, स्थावर इस्टेट धारण करण्याच्या बाबतींत, वारस होण्याच्या बाबतींत व गहाण पद्धतींत मूळापासून फेरफार घडून आले. ह्यासंबंधींच्या वादविवादाच्या १०२ प्रश्नांपैकीं ९७ प्रश्नांत नेपोलियन होता. त्याचे कोटिक्रमहि मनोहर होते. तरीपण त्याला मुख्य रचना करणाराचें स्थान देतां येत नाहीं.

कोडाची रचना करण्याची ज्या माणसांवर जबाबदारी होती त्यांना यश मिळालें. पण त्यांत एक उणीव शिल्लक राहिली; ती तारणगहाणपद्धतीसंबंधींची होय. ही उणीव भरून काढण्याकरितां २३ मार्च १८५५ सालीं कायदा करावा लागला. या कोडांत पुष्कळ ठिकाणीं सांपडणारा दुसरा दोष म्हटला म्हणजे ह्यांत केलेल्या साधारण विभागांत सुसंबद्धपणा नसणें हा होय. पण ह्यांतील विभाग फार उत्तम रीतीनें केलेले आहेत. ह्यांतील व ब्लॅकस्टोनच्या टीकांतील विभागांत कांहीं फेरफार खेरीजकरून अगदीं साम्य आहे.

हल्लींप्रमाणें अर्थशास्त्रासंबंधीं व समाजविषयक प्रश्न उपस्थित झाले नव्हते म्हणून कोडमध्यें अलीकडे सुधारणा करणें व तें पूर्णतेस आणणें जरूर झालें. त्याप्रमाणें पुष्कळसे कायदे करून ते पूर्ण केले. १९०४सालीं ह्यांत सुधारणा करण्याकरितां एक कमिशन स्थापन झालें व या कमिशननें तें काम तावडतोब केलें.

ह्या कोडाची मान्यता निव्वळ फ्रान्स देशांतच झाली असें नव्हे तर बहुतेक सर्व यूरोपखंडभर ह्याची कीर्ति पसरली. ह्याचें कारण असें कीं ह्यांत समानतेचें व इक्विटीचें ( धर्मशास्त्रांच्या नियमापासून स्वतंत्र न्यायबुद्धीचा कायदा ) तत्त्व सारखें खेळत आहे व ह्यांतील कलमांचा अर्थ फार स्पष्ट आहे. हॉलंड, इटली, पोर्तुगाल, स्पेन आणि मध्य व दक्षिण अमेरिकन लोकसत्ताक राज्यें ह्यांनीं ह्या कोडाचा कित्ता गिरविण्याचें काम सुरू केलें आहे. हल्लीं याशीं स्पर्धा करणारें दुसरें जर्मन सिव्हल कोड आहे. हें १९ व्या शतकाच्या शेवटीं तयार झाल्यामुळें ह्यांत पूर्वीच्या कोडनेपोलियनमधील चुका आढळत नाहींत. तरी पण जर्मन कोडाचें तत्त्व निराळेंच असल्यामुळें कोडसिव्हिलला मुळींच धक्का पोंहचूं शकत नाहीं.

फ्रें च वा ङ्म य.—फ्रेंच वाङ्मयाच्या इतिहासाचा प्रारंभ अगदीं पूर्वी म्हणजे अकराव्या शतकाच्या आरंभापासून करतां येईल. त्याच्यापूर्वी फ्रान्समध्यें वाङ्मयाचा अभाव होता असें नाहीं तर अकराव्या शतकापूर्वी जें वाङ्मय निर्माण झालें तें लॅटिन भाषेंत होतें; व जें थोडेसें फ्रेंच भाषेंत निर्माण झालें तें विशेष महत्त्वाचें नव्हतें प्राचीन फ्रेंच पद्यात्मक वाङ्मयाचें स्थूलमानानें तीन वर्ग पाडतां येतात. तेः—( १ ) फ्रेंच इतिहासविषयक पद्यवाङ्मय, ( २ ) प्राचीन इतिहासविषयक पद्यवाङ्मय, आणि ( ३ ) ऑर्थरमंडळविषयक वाङ्मय. पहिल्या प्रकारच्या वाङ्मयाला शॉसॉं द जेस्टे असें नांव आहे. शॉसॉं द जेस्ट यांचीं मुख्य लक्षणें म्हणजें त्यांतील कथाभाग फ्रेंच प्राचीन इतिहासांतील एखाद्या पराक्रमी पुरुषासंबंधींचा असला पाहिजे, तो पद्यात्मक भाषेंत लिहिलेला असला पाहिजे. चवदाव्या शतकांतील जेस्टांहि अतिशय प्रसिद्ध आहे. शॉसॉं द जेस्टपेक्षांहि अधिक प्रसिद्ध असा दुसरा प्रकार म्हणजे ऑर्थरमंडळविषयक काव्यें हा होय. जेस्टपेक्षा या प्रकारच्या काव्यांत गूढधर्मविषयक कल्पनांचे अस्तित्व दिसून येतें. जेस्टमध्यें कथाभागावर

अधिक भर दिलेला असतो तर या ऑर्थरमंडळविषयक काव्यांत कथाभागापेक्षां मनोहर वर्णनें, मनुष्यस्वभावचें विवेचन इत्यादिकांवर अधिक भर दिलेला असतो. अशा प्रकारच्या काव्यांत लॅसेलॉ डयू लाक, हेवालिये ओलियॉ, मातिएर दे ब्रेटान्या, एरिक ए एनीड वगैरे प्रमुख काव्यें होत.

याशिवाय पद्यात्मक वाङ्मयाचा तिसरा प्रकार म्हणजे प्राचीन इतिहासविषयक पद्य हा होय. यामध्यें केवळ फ्रान्समधील प्राचीन इतिहासाचाच नव्हे तर जगांतील इतर प्राचीन इतिहासाचाहि अंतर्भाव होतो. उदाहरणार्थ, अलिक्सांद्र या पद्यात्मक अद्भुत काव्यांत अलेक्झांडर दि ग्रेटविषयींचा इतिहास आला आहे. त्याशिवाय ट्रोजन युद्धविषयक कथाभागावर रोम द ट्राय हें काव्य आहे. या तीन पद्यवाङ्मयप्रकाराप्रमाणेच साहसविषयक वाङ्मयाचा एक चवथा प्रकार फ्रान्समध्यें आढळतो. या प्रकारचें वाङ्मय १३ व्या शतकांत निर्माण होऊं लागलें. या प्रकारचीं प्रमुख काव्यें रोम दा व्हांटयूर, ल रोमा द लेसकूफ, गुइयोम द पॅलेर्म, फ्लोआमेंडे, वर्ट ओ ग्रॉस प्ये, पार्टेनो पेक्स द ब्लवा फ्लुआर फ्लांवा, ए फ्लांशेफ्लूर, इत्यादि होत.

शिलेदारी काळच्या फ्रेंच वाङ्मयाचें निरीक्षण केल्यानंतर त्यानंतरच्या काळाकडे आपण दृष्टि फेंकूं. शिलेदारी काळानंतर फ्रान्समध्यें एक प्रकारची सामाजिक क्रांति घडून आली. सरंजामसंस्थेमध्यें शिलेदारी काळांत अनीति माजली होती व त्यामुळें लोकांचीं मनें असंतुष्ट झालीं होतीं, त्यामुळें खालच्या जनतेंत जागृति उत्पन्न होऊं लागली. नवीन विषयावर सुशिक्षित लोक वाङ्मय निर्माण करूं लागले. त्याचप्रमाणें, या काळांत विनोदी व गमतीदार वाङ्मयहि पुष्कळच निर्माण झालें. या वाङ्मयाला फॅब्लियो उर्फ कथावाङ्मय असें नाव आहे. ईसापच्या फेबल्सच्या धर्तीवर या कथा निर्माण झालेल्या आढळतात. या कथांमध्यें मूळ एखादी गोष्ट सांगून तिच्यापासून एखादें नीतितत्त्व काढलेलें असतें. पण फ्रेंच कथावाङ्मयामध्यें एवढ्याचाच समावेश होत नसे तर कथांबरोबरच, छोटे फार्स, गमतीदार नाटकें, इत्यादिकांचाहि अंतर्भाव होई, उदाहरणार्थ, बारबाझाँ, मेऑ लगॉडोसी, इत्यादिकांनीं कथाच्या संग्रहांत संवाद, छोटीं पण गमतीदार नाटकें इत्यादिकांचाहि समावेश केलेला आढळतो. अशा प्रकारच्या गमतीदार कथा लिहिणाऱ्यांचा फ्रान्समध्यें त्या काळीं मोठा वर्ग होता. त्याला इसोपे असें नांव होतें. या इसोपेमध्यें मारी द फ्रॉंस नांवाची उत्कृष्ट कवयित्री प्रमुख होती. या कथाचे विषय विविध स्वरूपाचे असत; या कथावाङ्मयाच्या आधारें चॉसरनें ' कँटरबरी टेल्स ' रचिल्या व इटलीमध्यें बोकेशियो प्रभृतींनीं या कथाचें अनुकरण केलें. खुद्द फ्रान्समध्यें तर या वाङ्मयाचा भावी फ्रेंच वाङ्मयावर महत्त्वाचा परिणाम घडून आला. फ्रान्समध्यें जें भावी कथावाङ्मय, हास्योत्पादक फार्स व गद्यवाङ्मय निर्माण झालें, त्याचें प्राथमिक स्वरूप म्हणजे १२ व्या व १३ व्या शतकांतील कथावाङ्मय होय असें म्हणावयास हरकत नाहीं. अशा मार्मिक कथांमध्यें अत्यंत मार्मिक व चटकदार कथा म्हणजे लवेरपाल फ्रॉ, ल व्हिलॉ,मीर,लाउसपोर्टे,ल सो शेव्हांलिये इत्यादि होत. औपरोधिक वाङ्मयांत(सटायर)रोमा रेनार हें मुख्य काव्य होय. यातील नायक रेनार्ड नामक कोल्हा आहे.या कोल्ह्याच्या अनेक गोष्टी यात ग्रथित केल्या असून तद्वारां तत्कालीन समाजावर ताशेरा झाडण्यांत आला आहे. १२ ते १४ व्या शतकाच्या मध्यकाळापर्यंत या काव्याचा विलक्षण बोलबाला व लोकप्रियता होती. व या काव्याचें अनुकरणहि पुष्कळांनीं केलें. या काव्याचा कर्ता एकच असावा कीं अनेक असावेत हें नक्की सांगता येत नाहीं. पण पुष्कळांनी या काव्याला हातभार लावला असें अनुमान काढण्याला जागा आहे.

१३ ते १४ व्या शतकांत फ्रान्समध्यें भावनागीतवाङ्मयहि पुष्कळ निर्माण झालें या मध्ययुगांतील फ्रेंचगीतवाङ्मय फारच सुंदर आहे. नवारचा राजा थीबो द शांपाय व शॉर्ले डॉर्लेआँ यांचीं भावनागीतें अत्यंत रमणीय व हृदयंगम आहेत. गर्चेनें या भावनागीतांचा संग्रह प्रसिद्ध केला. या संग्रहांत अनेक कवींचीं गीतें ग्रथित केलेलीं असून या गीतांचे अद्भुत गीतें व कृषिगीतें असे दोन भाग आहेत. अद्भुत गीतांतील पुष्कळशीं गीतें प्रणयविषयासंबंधीं आहेत, तर कृषिगीतें हीं वर्णनविषयक आहेत भावनागीतें लिहिणाऱ्यांत सर्वांत पूर्वींचा व प्रसिद्ध कवि ऑदेफ्रॉल बेस्टॉर्ड हा होय. याचें बेल इडोइन हें गीत फार लोकप्रिय व नितांत रमणीय आहे. त्यानंतर अतिशय प्रसिद्ध लेखक थीबो द शांपाय हा होय. थीबोची ब्लांचे ऑफ कॅस्टिल या राजकन्येवर प्रीति होती.व त्याचीं पुष्कळशीं गीतें ब्लांचेवर आहेत.थीबोच्या वेळीं आणखी कित्येक भावनागीतें लिहिणारे कवी झाले. त्यापैकीं रुटबफ हा प्रसिद्ध होय. याची कविता मुख्यतः स्वच्छंदपर आहे. पण त्याबरोबरच इतर सामाजिक व राजकीय विषयावरहि त्यानें पुष्कळ कवनें केलीं.अडाम डे ला अल याचीं गीतें क्वचित् भावनाप्रधान तर क्वचित निंदागर्भित आहेत. ज्य द ला फ्यइ, ज्य द रॉबँ ए मारिऑं हीं दोन गीतें उत्कृष्ट आहेत.

मध्ययुगांतील नाटयवाङ्मयाचा विचार करूं लागल्यास आपणाला असें आढळून येतें कीं फ्रान्समध्यें मध्ययुगाच्या आरंभीं ' मिस्टरीज ' व ' मिरॅकल्स ' हे नाटकाचे प्रकार अस्तित्वांत होते.फूलिश व्हर्जिन्स नांवाचें मिस्टरी नाटक १३व्या शतकाच्या आरंभीं फार लोकप्रिय होतें १२ व्या ते १४ व्या शतकांतील कथावाङ्मयानें नाटयाला स्फूर्ति दिली व पुष्कळ नाटकें या काळांत बाहेर पडलीं, तथापि पंधराव्या शतकाच्या सुरवातीपर्यंत ' मिस्टरीज ' व ' मिरॅकल्स ' या प्रकारच्या नाटकांचीच अधिक लोकप्रियता होती यांत शंका

नाहीं. वरील प्रकारच्या नाटकांप्रमाणेंच 'मोरॅलिटी' प्रकारचीं नाटकेंहि फ्रेंच रंगभूमीवर करून दाखविलीं जात असत. यांचा उद्देश विनोदी अगर अन्य तऱ्हेनें एखादें नैतिक तत्त्व प्रेक्षकांच्या मनावर बिंबविण्याचा असे. त्याचप्रमाणें केवळ हास्योत्पादक नाटकांनां या काळांत पुष्कळच वाव मिळाला.

यूरोपमधील इतर देशांच्या वाङ्मयाप्रमाणेंच फ्रेंच वाङ्मयाच्या इतिहासांतहि 'काव्यानंतर गद्य' असा देखावा दृष्टीस पडतो. याचा अर्थ काव्याच्या काळांत अगदींच गद्यवाङ्मय नव्हतें असें नाहीं, तर गद्यवाङ्मयाचें महत्त्व काव्यकाळांत फारसें नव्हतें असा होय. ७-८ व्या शतकांत कांहीं शब्दकोश अस्तित्वांत होते. तसेंच कांहीं बखरीहि अस्तित्वांत होत्या. तथापि हें गद्यवाङ्मय विशेष महत्त्वाचें नव्हतें. १२ व्या शतकापासून गद्य वाङ्मयनिर्मितीला खरी सुरवात झाली. विश्वसनीय अशा बखरी प्रसिद्ध होऊं लागल्या, इतर देशांतील इतिहासविषयक ग्रंथांचीं भाषांतरें करण्यांत येऊं लागलीं. या बखरकारांमध्यें व गद्य-लेखकांमध्यें विलाडुआँ हा प्रमुख होय. हा १२ व्या शतकांतला उत्कृष्ट लेखक होय. याचा इतिहासविषयक ग्रंथ 'कॉंकट द कॉन्स्टाटिनोव्हल' हा फार प्रसिद्ध व उत्कृष्ट प्रकारचा आहे. त्याच्या खालोखाल यौदुआँ दावेन व ज्वांवील हे दोन प्रसिद्ध गद्य-लेखक होत. ज्वांवीलचा 'लाईफ ऑफ सेंट लुइ' हा ग्रंथ वाचनीय आहे. जेज्यें फ्रुआँसार हा १४ व्या शतकांतील प्रसिद्ध गद्य-लेखक असून त्याचा 'क्रॉनिक' हा ग्रंथ माहितीनें भरलेला असून त्याची वर्णनशैलीहि फार वाखाणण्यासारखी आहे.

१५ वें शतकः—१५ व्या शतकामध्यें फ्रेंच वाङ्मय जरी पुष्कळ निर्माण झालें तरी त्यांतील पुष्कळसा भाग विशेष नांव घेण्याजोगा नाहीं. त्यांतल्या त्यात नाटकवाङ्मयच विशेष नांव घेण्याजोगें निर्माण झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. मुद्रणकलेचा उदय झाल्यामुळें जुने ग्रंथच प्रकाशित करण्याकडे या शतकांतील बऱ्याच विद्वानांचें लक्ष लागलें होतें.

या शतकांतील कवींमध्यें पहिला कवि म्हणजे ऑलीव्हिये बॅसेला हा होय. याचें वॉक द वोर हें काव्य बऱ्यापैकीं आहे. क्रिस्टीन पीझाँ हिचेंहि काव्य नांव घेण्याजोगें आहे. काव्याशिवाय तिनें ऐतिहासिक व धार्मिक विषयांवरहि ग्रंथ लिहिले. शार्टयें ऑलाँचें 'मार्गारेट ऑफ स्काटलंड्स किस' हें काव्य प्रसिद्ध आहे. वरील दोन्ही लेखकांनीं, नैतिक तत्त्वें आपल्या काव्यांच्याद्वारां शिकविण्याची प्रवृत्ति दिसते. या शतकांतील अत्युत्कृष्ट कवि म्हणजे वीलों हा होय. हा १४३१ सालीं जन्मला. याचे दोन उत्कृष्ट काव्यग्रंथ म्हणजे दि ग्रेट टेस्टॅमेंट व दि लिटल टेस्टॅमेंट हे होत. हे दोन्ही ग्रंथ अप्रतिम आहेत. 'बॅलाड डे डाम डे टाँ ज्वादी' व 'बॅलाड पोरला मेर', ला प्रॉस मॉर्गी इत्यादि वरील ग्रंथांतील पद्यें फार सुंदर आहेत. त्याच्या सर्वच काव्यांमध्यें जोरदारपणा, प्रसाद, वर्णनसौकर्य इत्यादि गुण दृष्टीस पडतात. वीलोंनंतर काव्यांमध्यें कृत्रिमपणा येत चालला. क्रेटिन याची कविता या मासल्याची आहे. यांत ओढून ताणून प्रास साधलेले आढळतात. त्याशिवाय अन्योक्तिपर कविताहि या शतकांत बरीच निर्माण झाली. अशी कविता लिहिणाऱ्यांमध्यें मेशीनो, रॉबर्टे, शास्तेलॅ, ऑक्टॉव्हिया इत्यादि प्रमुख होत. निंदागर्भित काव्यांनाहि या काळांत ऊत आला. अशा प्रकारचीं काव्यें लिहिणाऱ्यांमध्यें काकीया हा प्रमुख होय.

पण काव्यापेक्षां गद्याकडेच तत्कालीन विद्वानांचें अधिक लक्ष होतें. त्यामुळें या काळांत काव्यापेक्षां गद्यग्रंथ अधिक निर्माण झाले. १५ व्या शतकाच्या प्रारंभीं भाषांतरित ग्रंथ बरेच बाहेर पडले असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याशिवाय नीतिविषयक व धर्मविषयक वाङ्मयहि पुष्कळ प्रसिद्ध झालें. धर्मविषयक गद्यलेखकांमध्यें यार, रोन, हे लेखक प्रसिद्ध होते. ऐतिहासिक गद्यवाङ्मयांत ऑंगेरॉंचा ग्रंथ व शॉस्टेलॉचा क्रॉनि द ज्वाक द लाला हा ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. तथापि कोमीन हा त्या काळचा अतिशय प्रसिद्ध इतिहासकार होय. मॅकिव्हेलेच्या राजनीतीवरील ग्रंथाइतक्या योग्यतेचा कोमिनचा इतिहासग्रंथ समजला जातो. केवळ भाषेच्या दृष्टीनें पाहिले तरीहि या ग्रंथांतील भाषा स्पष्ट, सोपी व मार्मिक अशी आढळते. ऐतिहासिक ग्रंथांप्रमाणेंच कादंबरी वाङ्मयांतहि पुष्कळ कादंबरीकार चमकून गेले. त्यापैकीं ॲंट्वाँ द ल साल हा पहिल्या प्रतीचा कादंबरीकार होय. सॉ नूवेलनूवेल हा अत्यंत विनोदी पण तितकाच तात्विक आणि व्यावहारिक शहाणपणा शिकवणाऱ्या ग्रंथांपैकीं एक ग्रंथ होय याचा बराचसा भाग ॲंट्वानें लिहिला असें मानण्यात येतें. त्याचप्रमाणें पेटी जॲं द साट्रे या अद्भुत कादंबरीचें, लाव्होंवा पातेलाँ व लेकांझ ज्वा द मारियाज या ग्रंथाचेंहि जनकत्व ॲंट्वाँ याजकडेच आहे. या ग्रंथांतील भाषा विनोदी पण मनोहर आहे. शिवाय तींत तत्कालीन राजकीय आणि सामाजिक परिस्थितीवर मार्मिक विचार प्रकट केलेले आढळतात.

१६ वें शतकः—इटलीमधील 'पुनरुज्जीवना'चा इतर यूरोपीय देशांपेक्षां फ्रान्सवर अधिक परिणाम झाला. १६ व्या शतकामध्यें या 'पुनरुज्जीवन' चळवळीमुळें फ्रेंच वाङ्मय अतोनात निर्माण झालें, व तेंहि चांगल्या प्रकारचें निर्माण झालें. पुनरुज्जीवन चळवळीनें विचारांत व आचारांत क्रांति घडवून आणल्यामुळें त्यासंबंधींचें वाङ्मयहि पुष्कळच निर्माण व्हावें यांत आश्चर्य नाहीं. शिवाय हें वाङ्मय भारदस्त, कल्पनाशक्तीला चालना देणारें, विविध प्रकारचें व परिणामकारक असें होतें. १५ व्या शतकाच्या अगर त्याच्याहि मागच्या काळांतील वाङ्मयापेक्षां या काळच्या वाङ्मयाचा विशेष हा होता कीं या वाङ्मयानें फ्रेंच भाषा ही गंभीर विचार व्यक्त करण्याला पूर्ण समर्थ आहे असें सिद्ध केलें.

१६ व्या शतकाच्या प्रथमपादांत निर्माण झालेली कविता १५ व्या शतकांतील काव्याच्या धर्तीवरच होती. पण फ्रेंच

काव्याला नवीन वळण लावण्याचें कार्य, क्रेमा मॉरो ( सन १४९६–१५४४ ) यास दिलें पाहिजे. याची कविता, स्वाभाविक, सुंदर व सौष्ठवयुक्त आहे. याशिवाय त्यानें पत्रें, गीतें व इतर किरकोळ कविताहि लिहिली. मॉरोच्या या नवीन वळणाचें अनुकरण करणारे पुष्कळ कवी या शतकांत झाले. त्यांपैकीं व्हिक्टार ब्रोडो ( १४७०–१५४० ), मॉरीस सेव, सालेल पार्गरोन, मेलाँ ( १४९१–१५५८ ) हे होत. मेलाँ यानें सॉनेटपद्धति प्रथमच प्रचारांत आणली. या शतकामध्यें एकामागून एक अशा नवीन कल्पना भराभर येत असल्यामुळें मॉरोच्या नंतर थोड्याच दिवसांत राँसॉर यानें कवितेला पुन्हां नवीन प्रकारचें वळण लावलें. राँसॉर ( १५२४–१५८५ ) हा प्रथमतः खुशामती व राजकारणामध्यें भाग घेणारा मनुष्य होता. पण शारीरिक व्यंगामुळें त्याला हें काम झेपेनासें झाल्यामुळें त्यानें वाङ्मयाकडे आपलें लक्ष लावलें. त्यानें प्राचीन फ्रेंच, लॅटिन व ग्रीक वाङ्मयाचा काळजीपूर्वक अभ्यास करून कांहीं सहाध्यायांच्या मदतीनें 'प्लेआद' हें काव्य प्रसिद्ध केलें. या कामांत त्याला मदत करणाऱ्यांमध्यें डोरा ( १५०८–१५८८ ), जोडेल ( १५३२–१५७३ ), बेलो ( १५२८–१५७७ ), डुबेले ( १५२५–१५६० ), अँटूँ ( १५३२–८० ) व पाँटुस हे कवी होत. या सर्व कवींचा प्रधान उद्देश फ्रेंच भाषेला समृद्ध करून अभिजात वाङ्मयाच्या जोडीला फ्रेंच वाङ्मय बसविण्याचा होता. यासाठीं त्यांनीं ग्रीक भाषेंतून पिंडारिक ओड, लॅटिन भाषेंतून होरेशियन ओड, व्हर्जिलियन एपिक इत्यादि प्रकार फ्रेंच काव्यांत आणले. तथापि हे नवीन प्रकार अस्तित्वांत आणतांना फ्रेंच भाषेचे जे स्वयंसिद्ध गुण, त्यांना मात्र त्यांनीं पाठीमागें टाकण्याचा प्रयत्न केला नाहीं. अर्थात फ्रेंच भाषेला समृद्ध करण्याच्या भरांत त्यांनीं इतर भाषांतून अनवश्यक असे पुष्कळसे शब्दप्रयोग, फ्रेंच भाषेंत घुसडून दिले. त्याविरुद्ध लवकरच प्रतिक्रिया सुरू झाली. तथापि यांचें कार्य मात्र पुष्कळ अंशीं सफळ झालें असें म्हणावयास हरकत नाहीं. राँसाँरचें फ्रॉंसीयाडे, बेलेची ऑटीकीटेड रोम वानोर, बेलोचें आव्रिल इत्यादि काव्यें महत्त्वाचीं आहेत. राँसाँरचें अनुकरण करणारे पुष्कळ कवी झाले, त्यांपैकीं डुबार्टो हा एक प्रमुख कवि होय. याचीं 'जुडीत' व 'लाडिव्हीन सपेन' हीं काव्यें महत्त्वाचीं आहेत. डोबींबे हाहि राँसॉरच्या अनुयायांपैकींच होता. तथापि त्याच्या काव्यांत तत्कालीन कवींच्या काव्यांत न दिसून येणारे असें ओज, गांभीर्य, व माधुर्य हे गुण प्रामुख्यानें दिसून येतात. पण राँसाँरच्या काव्याचे सर्व गुण ज्याच्या काव्यांत उत्कृष्टपणें आढळतात असा कवि म्हणजे रन्ये हा होय. याची निंदागर्भित कविता फार परिणामकारक आहे. याच्या कवितेंत, भाषाप्रभुत्व, विद्वत्ता, मार्मिकता, विनोद, इत्यादि गुण प्रामुख्येंकरून आढळतात. रन्येच्या काव्याची तत्कालीन जनतेवर छाप पडली होती, व त्याला अनुयायी वर्गहि बराच मोठा मिळाला. या अनुयायीवर्गांत कोर्वाल झोन ( १५७७–१६३५ ) हा प्रमुख होय.

१६ व्या शतकांत 'मिस्टरी' व 'मिरॅकल' नाटयप्रकारांचा शेवट झाला. 'मोरॅलिटी' प्रकार हा या शतकांत बराच जीव धरून होता. तथापि तोहि शेवटाला जाण्याच्या पंथाला लागलेला होता. 'पुनरुज्जीवन' चळवळीमुळें, इटलीच्या वाङ्मयांतील नाटकांचीं भाषांतरें फ्रेंच वाङ्मयांत होऊं लागलीं व त्याकडे सर्वांचें लक्ष्य वेधलें. इटलींतील शोकपर्यवसायी नाटयवाङ्मय फार उच्च दर्जाचें होतें. त्या धर्तीवर फ्रेंच भाषेंत शोकपर्यवसायी नाटकें लिहिण्याचे प्रयत्न होऊं लागले. ज्योडेलचें 'क्लिओपाट्र' हें पहिलें शोकपर्यवसायी नाटक होय. या नाटकांतील संवाद सेनेकाच्या संवादाच्या धर्तीवर आढळतात. नाटकाची भाषा भारदस्त पण गोड आहे. त्यानंतर 'दिडाँ' हें शोकपर्यवसायी नाटक ज्योडेलनें लिहिलें. ज्योडेलच्या मागून ग्रेवॉ ( १५४०–१५७० ) यानें 'मॉर्ट द सीझर' हें शोकपर्यवसायी नाटक रचिलें. यांत नाटयकला या दृष्टीनें बरीच सुधारणा घडून आलेली दिसते. याशिवाय ग्रेवॉनें लेज एबाहि व लाट्रेझोरिए हीं दोन आनंदपर्यवसायी नाटकें लिहिलीं. पण या काळचा उत्कृष्ट नाटककार गार्निए ( १५४५–१६०१ ) हा होय. याचीं सेडेसी, व ब्राडामार हीं नाटकें फार लोकप्रिय आहेत. मॉंटिक्रेटियाचीं नाटकें तत्कालीन परिस्थितीवरील असून चांगल्यापैकीं आहेत. लारिव्हे ( १५५०–१६१२ ) हा त्या काळचा प्रसिद्ध, आनंदपर्यवसायी नाटकें लिहिणारा नाटककार होय. यानें इटलींतील आनंदपर्यवसायी नाटकांच्या आधारें आपलीं नाटकें रचिलीं. या नाटकांची भाषा गंभीर व ओजस्वी अशी आहे.

पण पुनरुज्जीवनाच्या चळवळीनें काव्य अगर नाटय याच्यापेक्षां गद्यांत अधिक क्रांति घडवून आणली. १६ व्या शतकांतील अत्यंत प्रतिभाशाली गद्यलेखक रॅबेले हा होय. जगांतील अत्युत्कृष्ट लेखकांमध्यें याचें नांव मोडतें. १६ व्या शतकांतील फ्रेंच समाजाच्या गुणावगुणांचें प्रतिबिंब यांत स्पष्टपणें पडलेलें आढळतें. रॅबेले हा त्रिखंडपंडित, तत्वज्ञ, जाडा कल्पक, अत्यंत व्यवहारी, विनोदी व खेदालेखक होता. त्याच्या गारगुंटुआ व पँटाग्रुएल या ग्रंथांमध्यें त्याचे सर्व गुण एकवटलेले आहेत. रॅबेलेचें अनुकरण करण्याचा पुष्कळांनीं प्रयत्न केला पण तो साध्य झाला नाहीं. तथापि १५व्या शतकांतील सँ नूवेल नूवेल या गद्यग्रंथाचें या शतकांत अनुकरण करण्याचा पुष्कळांनीं प्रयत्न केला व तो मात्र बऱ्याच अंशांनीं साध्य झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. या अनुकरण करणाऱ्यांमध्यें डे पेरीए हा प्रमुख होय. काँट ए जोये डवीं नामक याचा कथाग्रंथ फार सुंदर आहे. अद्भुतकादंबरीलेखकांत एर्बेरे, स्कुयडेरी व कल्प्रेनेद हे प्रमुख होत. 'एर्बेरेची अमाडीस द गॉल' ही भाषांतरवजा कादंबरी फारच चटकदार आहे.

१६ व्या शतकांत फ्रँसांसारखे प्रसिद्ध इतिहासकार जरी झाले नाहींत,तथापि १५व्या अगर तत्पूर्वीच्या काळांत इतिहासामध्यें काल्पनिक अगर अवास्तव गोष्टी घालण्याचा प्रघात असे. तो जाऊन शास्त्रशुद्ध इतिहास लिहिण्याची पद्धत अस्तित्वांत आली. या शतकांतील मुख्य इतिहासग्रंथ म्हणजे क्लोड सेसेलचा लुइ दि टेव्हल्थ, बर्नार्ड ड जीराइचा ईस्टव्हार ड फ्रँस हे होत.याशिवाय रॉबर्ट द ला मार्क डू वेले, मार्गारीट द वाल्वा, वीलार, ब्लेजड, मॉल्यूक,प्येर द बोर्डे इत्यादि प्रमुख बखरकार होत.

धार्मिक वाङ्मयांत कॅल्व्हिनचा 'इन्स्टिटयूशन ऑफ ख्रिश्चन रिलिजन' हा ग्रंथ फार महत्त्वाचा होय. फ्रेंच भाषा ही शास्त्रीय वाङ्मय उत्पन्न करण्याला समर्थ आहे हें या ग्रंथानें सिद्ध केलें. कॅल्व्हिनच्या खालोखाल डूपेरॉचेंहि धार्मिक विषयावरील ग्रंथ प्रसिद्ध आहेत. नैतिक वाङ्मयामध्यें वाँ ऑ वाँटयूरचा, मॉटेन व पीर चारॉं हे प्रसिद्ध ग्रंथकार आहेत.वाँ ऑ वाटयूर 'सिंबालुम मुंडी' हा ग्रंथ संवादपर असून त्यानें तत्कालीन फ्रेंच समाजांत मोठी खळबळ उडवून दिली. मॉटेनच्या निबंधांत, नास्तिकपणा व तर्काला प्राधान्य दिलेलें आढळतें. मॉटेनची भाषा फार साधी पण विचारपरिप्लुत अशी आहे. राजकीय वाङ्मयांत बोडॉंच्या रेपब्लिक या ग्रंथाला प्राधान्य दिलें पाहिजे.यानें आपल्या ग्रंथांत धर्माच्या बाबतींत होणाऱ्या छळांचा व गुलामगिरीचा निषेध केलेला आहे.राजनीतिशास्त्राचें विवेचन करणारा हा पहिलाच ग्रंथ होय. त्याच्यानंतर एटीएन ड ला बोएटी(१५३०-१५६३)यानें राजशाहीच्या तत्त्वाचा इनकार करणारा असा कॉंट्रॅऑर डिस्कूर द ला सर्व्हिटयूड वोलॉंटयर हा ग्रंथ लिहिला. १६ व्या शतकाच्या उत्तरपादात फ्रान्समध्यें राजकीय व धार्मिक सत्तेमध्यें विलक्षण झगडे चालले होते. त्यामुळें या शेवटच्या पादांत या झगड्यासंबंधीं अनेक सटरफटर पुस्तकें व ग्रंथ प्रसिद्ध झाले. हा झगडा मिटवण्यासाठीं मायकेल ड लोपिटाल ( १५०७–१५७३ ) यानें प्रयत्न केला, पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. या झगड्यावर सुंदर प्रकाश पाडणारा ग्रंथ म्हणजे सॅटीर मॅनिपे हा होय.हा ग्रंथ प्येर लर्वाच्या नेतृत्वाखालीं चार पांच विद्वानांनीं लिहिला आहे. यांत तत्कालीन झगड्यावर मार्मिक व निर्भिड शब्दांत टीका केलेली आढळते.

या शतकांतील शास्त्रीय वाङ्मय बहुतेक लॅटिन भाषेंतच लिहिलें गेलें. तथापि त्यांचीं फ्रेंच भाषांतरेंहि याच काळांत झालीं. शास्त्रीय ग्रंथांत लिसीस या प्लेटोच्या संवादाचें ड पेरीए यानें केलेलें भाषांतर, तसेच झेनोफोनच्या पुस्तकांचें भाषांतर इत्यादि मुख्य होत. ज्याक डफू ला व्हेनरी हे शिकारीच्या शास्त्रावरील पुस्तक प्रसिद्ध आहे. तसेंच सेरेसचा ते आट्र आग्रिकुल्टूर हा कृपिशास्त्रावरील ग्रंथहि लोकप्रिय आहे.

१७ वें शतकः—१७ व्या शतकांत फ्रेंच वाङ्मयाला संपन्न स्थिति प्राप्त झाली. या शतकांतील विशेष हा कीं या शतकांतील प्रमुख कवी हेच नाटककार होते. केवळ कविता लिहिणारे असे फारच थोडे कवी झाले व त्यांचीहि कविता पहिल्या प्रतीची नव्हती. थिओफिल द व्यो, रॉंका वॉइटयूर व सॉंटआमां, इत्यादि कवी हे तत्कालीन चांगल्यापैकीं कवी होते. तथापि कॉर्ने अगर विलों यांच्या इतक्या दर्जाची उत्कृष्ट कविता या कवींची नव्हती. मालेर्बचे वरील कवी अनुयायी होते. मालेर्बनें, रॉ सॉंर याला व त्याच्या अनुयायीवर्गाला परकीय शब्द फ्रेंच भाषेंत आणण्याची जी खोड लागलेली होती तिच्या विरुद्ध जरी बंड केलें तथापि इंग्लंडमधील पोप कवीप्रमाणें काव्याच्या अंतरंगापेक्षां बहिरंग नटविण्याकडेच याची प्रवृत्ति अधिक असल्यामुळें याची कविता अंतःकरणाला भिडणारी नव्हती, अशी स्थिति असूनहि मालेर्बचें वर्चस्व बराच काळ टिकून राहिलें. १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत मात्र फारच थोडे नांव घेण्याजोगे कवी झाले. उत्तरार्धांतील प्रसिद्ध कवि म्हणजे बॉलो ( १६३६–१७११ ) होय. त्याच्या खालोखाल मॅडाम डे उलिएरे (१६३८-९४) ही कवयित्री होय.

१७ व्या शतकांतील प्रथमपादांतील प्रसिद्ध नाटककार म्हणजे हार्डी हा होय. यानें स्पॅनिश नाटकांच्या धर्तीवर आपलीं नाटकें लिहिलीं. यानें सुमारें सातशें छोटीं व मोठीं नाटकें लिहिलीं असें म्हणतात. तरीपण नाट्यकलेच्या दृष्टीनें हीं नाटकें हलक्या दर्जाचीं आहेत. ज्येन द रोत्रू ( १६१०–१६५० ) हा हार्डीनंतरचा प्रसिद्ध नाटककार होय. याला फ्रेंच भाषेचा मार्लो असें म्हणतात. वॅसला व सेंटजने हीं त्याचीं दोन प्रसिद्ध नाटकें आहेत. याच्यांतील कांहीं संवाद तर पहिल्या प्रतीचे आहेत. त्याच्याबरोबर ज्यॉं द शेलांद्र, ओडिए इत्यादि नाटककार उदयाला आले. तथापि रोत्रूच्या इतकी लोकप्रियता यांनां मिळाली नाहीं. कॉर्ने हाहि या वेळचा प्रसिद्ध नाटककार होय. याचें ' सिड ' हें शोकपर्यवसायी व ' मॉंटर ' हें आनंदपर्यवसायी नाटक फार प्रसिद्ध आहे. पण कॉर्नेच्या मागाहून थोडक्याच दिवसांत ज्यानें शोकपर्यवसायी नाटकें लिहिण्याची कला कळसाला नेली व ज्यानें उत्कृष्ट शोकपर्यवसायी नाटकें लिहिणारा अशी अखंड कीर्ति संपादन केली तो म्हणजे मोलिएर हा होय. प्रथमतः यानें इटालियन नाटकाच्या धर्तीवर आपलीं नाटकें लिहिलीं पण त्याचें खरें नाट्यकौशल्य ले प्रेसीयूस रिडिक्यूल या नाटकांत दिसून येतें.शोकपर्यवसायी नाटकांप्रमाणेंच हास्योत्पादक नाटकें लिहिण्यांत तो वाकबगार होता.मोलीएरच्या खालोखाल रासीन हा त्याच्याच वेळचा शोकपर्यवसायी नाटकें लिहिणारा नाटककार होय. या दोघांहि नाटककारांत एक दोष म्हटला म्हणजे त्यांच्या नाटकांतील प्रत्येक पात्रांत एक स्वतंत्र गुण व दुर्गुण कळसाला नेऊन दाखविलेला असतो. त्यामुळें तीं पात्रें स्वाभाविक वाटत नाहींत व रसहानि होऊं पहाते. याच्या मुळाशीं बॉलो, मालेर्ब व १६२९ सालीं स्थापन झालेल्या ॲकॅडमीनें ॲरिस्टाटलच्या नाट्य-विचाराचें अनुकरण

करण्याचा जो यत्न केला तो होय. मोलीएरच्या अनुयायांमध्यें ब्रेव्हिड द द आगस्टिन व ज्य पालग्रा हे प्रसिद्ध असून यांचीं अनुक्रमें, लमॉटर ब्रॅव्होका पातेलॉं हीं नाटकें नांवाजलेलीं आहेत. १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत ज्य फॉर्सारॅन्यार हाहि प्रसिद्ध नाटककार होता. त्याची ज्यूअर व लेगाटै हीं आनंद-पर्यवसायीं नाटकें बरींच प्रसिद्ध आहेत.

कादंबरी-वाङ्मयाच्या बाबतींत या शतकामध्यें फारशी प्रगति झाली नाहीं. त्यांतल्यात्यांत अद्भुत कादंबऱ्या लिहिण्याकडे लेखकांचें अधिक लक्ष होतें. १७ व्या शतकाच्या पहिल्या पादांत स्पॅनिश वाङ्मयाचें फ्रेंच वाङ्मयावर वर्चस्व होतें त्यामुळें १६००--१६३०-३५च्या दरम्यान स्पॅनिश कादंबरी- वाङ्मयाच्या धर्तीवर अद्भुत कादंबऱ्यांचे वाङ्मय निर्माण झालें. अशा प्रकारच्या कादंबरीकारांमध्यें मादेलन दं स्कूडेरी ला काल्प्रेनद मारीन लर्वाइड गॉनेरविल, पीर कामूस इत्यादि मुख्य होते. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांतील कादंबरीकार मादाम द विलड्यू पेरो, मडाम दो ना, ऑमेल्टन हे होत. स्कॅराची इस्त्वारे कोमीक देप एरा ए ऑम्पोरे द लाल्युन ए ड्यु सोलो ही कथावजा कादंबरी हास्योत्पादक पण सुंदर आहे. माडाम द लाफायेट इच्या हैद, ला प्रिन्सेस दा क्लेव इत्यादि गोष्टीहि फार प्रसिद्ध आहेत.

गद्यलेखकांमध्यें वालझॅक (१५९४--१६५४) याला प्रमुख स्थान दिलें पाहिजे. यानें एकच मोठा ग्रंथ लिहिला असें नाहीं तर त्यानें कांहीं पत्रें, कांहीं संवाद व ल सॉक्रॉट क्रेत्यॉं नांवाचा राजकीय विषयावर एक छोटा ग्रंथ लिहिला तथापि या पत्रांमधून अगर संवादांमधून, जी सुंदर विचारपरिप्लुत अशी भाषा दृष्टीस पडते त्यामुळें वालझाकचें नांव विशेष प्रसिद्धीस आलें.ऐतिहासिक ग्रंथांत फ्रॉसॉर मेझरे याचा फ्रान्सच्या इतिहासावरील ग्रंथ बऱ्यापैकीं आहे. लुइ मेमवोय (१६१० -८६)यानें क्रूसेड व लीगसंबंधीं इतिहास लिहिला.पेर डालोऑ व पेरडानील यांनीं अनुक्रमें इंग्लंडच्या रेव्हल्यूशनवर व फ्रान्सच्या इतिहासावर पुस्तकें लिहिलीं. क्लोद फ्ल्यूरीनें चर्चचा इतिहास लिहिला. अग्रिपाचा ' ईस्ट्वार युनिव्हर्साल ' हाहि ग्रंथ लोकप्रिय आहे. बखरवाङ्मयासहि या काळांत ऊत आला म्हटलें तरी चालेल.सूली,पीर दे लेट्वोले, चवथा हेनरी, रिशल्यू, मडाम, द मोटविल इत्यादि नांवें या बाबतींत सर्वश्रुत आहेत. पत्रलेखकांमध्यें मडाम सेव्हिने हिचें नांव अत्यंत प्रख्यात आहे.

१७ व्या शतकापूर्वी फ्रेंच भाषेंत तत्त्वज्ञानावर फारच थोडीं पुस्तकें होतीं किंबहुना चांगलीं अशीं पुस्तकें नव्हतीं म्हटलें तरी चालेल. पण सतराव्या शतकानें ती उणीव भरून काढली. पीर गासेंदी (१५९२-१६५५ ) यानें तत्त्वज्ञानावर जरी मुख्यतः लॅटिनमध्यें ग्रंथ लिहिले तरी कांहीं फ्रेंच भाषेंतहि लिहिले. तथापि फ्रेंच भाषेंत उत्कृष्ट तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ लिहिणारा ग्रंथकार डेकार्ट (१५९६-१६५०) हा होय. हा फ्रेंच तत्त्ववेत्त्यांमध्यें प्रमुख गणला जातो. गंभीर विचाराप्रमाणें त्याच्या ग्रंथांतील भाषाहि गंभीर पण मनोहर आहे. 'डिस्कूर द ला मेटोड' हा त्याचा ग्रंथ तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनेंच नव्हे तर फ्रेंच भाषाशैलीच्या दृष्टीनेंहि अपूर्व आहे. डेकार्टच्या अनुयायांपैकीं मॅलेब्रांश ( १६३८-१७१५ ) याचा नंबर फार वर लागतो. ' रेखेर्श ' हा त्याचा ग्रंथ त्याच्या तत्त्वज्ञानाची व भाषासौंदर्याची साक्ष देतो. त्याच्या खालोखाल बाइल याचे तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ बऱ्याच महत्त्वाचे आहेत.त्यानें तयार केलेल्या डिक्शनरीला अठराव्या शतकाचें बायबल असें नांव देण्यांत आलें आहे. या डिक्शनरींत त्यानें धार्मिक व नैतिक विषयांची माहिती दिली आहे. पोर्ट रायल नांवाची एक संस्था या शतकांत निर्माण झाली.हिच्यांतील सभासद हे डेकार्टचें तत्त्वज्ञान मान्य करणारे होते. या संस्थेतर्फे न्यायशास्त्रावर एक छोटेसें पण सुंदर पुस्तक प्रसिद्ध झालें. पास्कल हाहि डेकार्टच्या पंथाचा होता. याचा लेट्र एक्रीट आ अँ प्रोवासियाल हा ग्रंथ फार नांवाजलेला आहे. गंभीर वादविवादामध्यें देखील विनोदी भाषा वापरण्याची पद्धत पास्कलनें पाडली असें म्हटलें असतां हरकत नाहीं. धार्मिक उपदेशकांमध्यें, व वक्त्यांमध्यें बॉसुए फेनेलॉं, फ्लेशिये, मास्कारॉ, बोर्डालूये, मॅसियॉं इ. नांवें या शतकामध्यें आढळून येतात. नीतिप्रधान वाङ्मयामध्यें पास्कल सॉ तेव्रे मोंद; ला रोश फोको ला ब्रुइयर यांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. १७ व्या शतकापर्यंत टीकाशास्त्र फ्रान्समध्यें नव्हतें म्हटलें तरी चालेल पण या शतकामध्यें मात्र टीकाशास्त्राकडे फ्रेंच विद्वानांचें लक्ष वेधलें. टीकात्मक असा सर्वांत पहिला ग्रंथ म्हणजे क्लॅद फॉव्र द वोजेला याचा ' रिमार्के ' हा होय. त्यानंतर रन रपॉ (१६२१-८७) ब्रुऊर (१६२८ -१७०२) बोहू, वाइए बॉलो, इत्यादि विद्वानांनीं टीकात्मक वाङ्मय निर्माण करण्यास सुरवात केली. गणिताशिवाय इतर कोणत्याहि शास्त्रीय विषयावर नाव घेण्यासारखे ग्रंथ निर्माण झाले नाहींत.

१८ वें शतकः--१८व्या शतकाच्या प्रथमारंभीं काव्यवाङ्मयाला उतरती कळा लागली असें म्हटलें तरी चालेल. १७ व्या शतकाच्या अखेरीस फ्रान्समध्यें राजकीय व सामाजिक परिस्थिति बिघडल्यामुळें वाङ्मयाला अनुकूल परिस्थिति नव्हती. शास्त्रीय विषयाकडे अगर तत्त्वज्ञानाकडेहि लोकांची प्रवृत्ति नव्हती. त्यामुळें १८ व्या शतकाच्या पहिल्या पादांत विशेष नांव घेण्याजोगे कवी झाले नाहींत. त्यांतल्या त्यांत अवद शोज्युड ( १६३९-१७२० ) व मार्की द ल फार ( १६४४-१७१२ ) हे दोघे कवी त्या काळीं बरेच प्रसिद्ध होते. त्यांचीं काव्यें पिंडारिक ओड्सच्या धर्तीवर आहेत. त्यांच्यामागून रूसो ( १६७१-१७४१ ) हा कवि त्या काळांत बराच प्रसिद्ध होता. त्याचीं ओडे व कॅंटाट हीं काव्यें बऱ्यापैकीं आहेत. पण वोल्टेर हा या काळचा सर्वांत प्रसिद्ध कवि होय. याचीं आन्रीयाड, ला प्यूसेल हीं काव्यें नैतिक दृष्ट्या नाहीं तरी वाङ्मयाच्या दृष्टीनें सुंदर आहेत.

यांशिवाय त्यानें पद्यांत गोष्टी व पत्रें लिहिलीं असून तींहि वाचनीय आहेत. १८ व्या शतकांत इंग्लिश वाङ्मयाचा फ्रेंच वाङ्मयावर फार परिणाम घडून आला. थॉम्सनच्या 'सीझन' काव्याच्या धर्तीवर फ्रान्समध्यें अनेक वर्णनात्मक पण कंटाळवाणीं काव्यें झालीं. ज्ये फ्रँकाँ द सॉ लँबेर यानें सेजॉ हें काव्य 'सीझन' वरूनच लिहिलें पण तें अगदींच गचाळ आहे. याशिवाय देलील, ऑट्रा, मारील, मीएर ज्ये ऑट्रॉ, सशे, एस्कुशर इत्यादि साधारण कवी या काळांत झाले. पण १८ व्या शतकाच्या उत्तरार्धांत शेनीये नामक जो कवि झाला त्याची मात्र कविता उच्च दर्जाची आहे. १८ व्या व १९ व्या शतकाच्या काव्यवाङ्मयाचा शेनीये हा दुवा आहे म्हटलें तरी चालेल. १८ व्या शतकांत कृत्रिम कविता लिहिण्याची प्रवृत्ति असतांना त्या प्रवृत्तीविरुद्ध शेनीयेनें बंड करून १९ व्या शतकांतील कवितेचा पाया तयार करून ठेवला असें म्हणावयास हरकत नाहीं.

नाट्यवाङ्मयांतहि १८ व्या शतकांत वोल्टेर व डिडरो यांच्याशिवाय विशेष नांव घेण्याजोगे नाटककार झाले नाहींत. वोल्टेरचे, मॅहोमेट धारेझ बजाझे, मिथ्रिडाट पोलीयूक्ट आणि रोडोग्युन हीं प्रसिद्ध नाटकें आहेत. त्यांतल्या त्यांत शेवटचीं दोन विशेष चांगलीं आहेत. योलियो केब्रियॉ ( १६७४–१७६२ ) हाहि बऱ्यापैकीं नाटककार होता. लामोर व लाआर्प हे शोकपर्यवसायी नाटकें लिहिणारे म्हणून त्यांची प्रसिद्धि आहे. गीमो द ला टूश ( १७२५–१७६० ) चें इफिजेनी आँ टॉरीडे हें नाटक विशेष प्रसिद्ध आहे. आनंदपर्यवसायी नाटकें लिहिणाऱ्यांत अलॉ रेने ल साग (१६६८–१७४७) हा नाटककार चांगल्यापैकीं होता. याचें तुरकरे हें नाटक फार नांवाजलेलें आहे. याशिवाय डेटूश ( १६८०–१७५४ ) यानींहि ल फीलासोफ मारीए व ल ग्लोरीयु हीं नाटकें बरीं आहेत. पण नाट्यवाङ्मयाला नवीन वळण लावण्याचें काम डिडरोनें घडवून आणलें. डिडरोचीं फिग नॅटयूरेल पेर द फामिल, एट इलबॉ ? एटइल मेशाँ ? लाप्येस ए ल प्रोलॉग हीं नाटकें प्रसिद्ध आहेत. डिडरोच्या पूर्वी वीरश्रीचीं अगर अद्भुत नाटकें लिहिण्याचा जो प्रघात असे तो डिडरोनें बदलण्याचा व त्या जागीं सामाजिक व सभ्य प्रकारचीं नाटकें लिहिण्याचा प्रयत्न केला. त्याचा अनुयायी मोशेल ज्या सेडेन याच्या ल फिलॉसोफ साँल सव्हाय या नाटकांत या प्रयत्नाला मूर्त स्वरूप प्राप्त झालेलें दिसतें. याशिवाय या शतकाच्या उत्तरार्धांतील विशेष महत्त्वाचीं नाटकें म्हटलीं म्हणजे निकोलस शांफोरचे ज्यूने ऑडिएन, जोसेफ फॉक्वाचें एडुआ डेमाई वीए पर्दु, बोमार्शेचीं मारिआज एफिगारो व बार्बिए द से विल, हीं होत.

१८ व्या शतकांत गद्यवाङ्मय मात्र चांगल्या प्रकारचे निर्माण झालें. अद्भुत कादंबरी-वाङ्मयाबरोबरच, सामाजिक कादंबऱ्याहि लिहिण्यांत येऊं लागल्या. अद्भुत--कादंबऱ्यांच्या बाबतींतहि अद्भुत प्रसंगाबरोबरच त्यांतील पात्रांच्या स्वाभाविकपणाकडेहि लक्ष्य देण्यांत येऊं लागलें. या शतकांतील पहिला प्रसिद्ध कादंबरीकार म्हणजे ले साज हा होय. याच्या 'दि आल्ल बोइट्यू' व 'शिल ब्ला' या कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. या कादंबऱ्यांत पात्रांच्या स्वभावपरिपोषाकडे विशेष लक्ष देण्यांत आलें आहे. पण या बाबतींतील सुप्रसिद्ध कादंबरीकार म्हणजे प्रेव्हो देक्सि (१६९७–१७६३) हा होय. याच्या क्लेवेलाँ व मेनन लेस्को या कादंबऱ्या फार प्रसिद्ध आहेत. वोल्टेरच्या कथाहि गद्यवाङ्मयाचे उत्कृष्ट नमुने आहेत. याशिवाय विनोदी गद्य लिहिणाऱ्यांमध्यें वोल्टेर, डिडरो, कॅझोट यांची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. वोल्टेरचे ओमकॉरॉ एक, हा विनोदी ग्रंथ प्रसिद्ध आहे. डिडरोचा 'जॉक फटालिस्ट' हा गद्यग्रंथ तर फारच विनोदी पण सुंदर आहे. याशिवाय या शतकामधील दोन प्रसिद्ध कादंबरीकार म्हणजे प्येर द मारिवो व रूसो हे होत. मारिवो यानें केवळ मनोरंजनात्मक कादंबऱ्या लिहिण्याचा प्रघात पाडला व तो त्यानें यशस्वी व लोकप्रिय करून दाखविला. रूसो हा मारीवोहून अगदीं निराळ्या तऱ्हेचा कादंबरीकार होता. त्याची जूली ही कादंबरी प्रसिद्ध आहे. कादंबरीच्या दृष्टीनें पहातां या कादंबरींत बऱ्याच उणीवा आहेत. तथापि इतक्या उणीवा असूनहि रूसोच्या कादंबऱ्या त्यांच्यांत असलेल्या विचित्र तत्त्वांमुळें अतोनात लोकप्रिय व परिणामकारी झाल्या.

१८ व्या शतकांत इतिहासविषयक क्षेत्रांत मात्र पुष्कळच वाङ्मय निर्माण झालें. इतिहास शास्त्रीय तऱ्हेनें लिहिण्यास सुरवात झाली. या काळांतील अत्यंत प्रसिद्ध इतिहासकारांपैकीं मॉटेक्स हा प्रमुख होय. याचा पहिला ग्रंथ 'लेत्र पेरीझॉ' होय. यांत त्यानें तत्कालीन राजकीय व नैतिक अधोगतीवर कोरडे ओढले आहेत. त्याचा दुसरा ग्रंथ ग्रॉंडर ए डेकाडँस द रोमॉस हा होय. याहून त्याचा तिसरा ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. तो म्हणजे एस्प्रीरिट ड लाय हा होय. या ग्रंथांमध्यें मॉटेस्क्यूची विशाल बुद्धि, कल्पनेची व्यापकता, भाषासौष्ठव हे सर्व गुण एकवटलेले आहेत. कायद्याच्या मूलभूत तत्त्वावर समाजाची उभारणी झाली पाहिजे असें त्यानें या पुस्तकांत ध्वनित केलें आहे. मॉटेस्क्यूच्या अनुयायीवर्गांत डूबो, माब्ली, हे प्रमुख होत. मॉटेस्क्यूनंतर ट्यूर्गोट हा प्रसिद्ध इतिहासकार होय. याच्यामध्यें नवीन कल्पनांचें प्राचुर्य दिसून येतें. अॅबे गुयोम रेनालचा 'ईस्ट्वार देझांदडे' हा ग्रंथ फार विख्यात आहे. त्याचप्रमाणें कार्लोम द रूल इयेरचा 'रेव्होल्यूशाँ ऑ रूसी ऑ १७६२' हा ग्रंथ विद्वत्तापूर्ण आहे. इतिहासाप्रमाणेंच या शतकांत बखरवाङ्मयहि पुष्कळ निर्माण झालें. त्यांत ड्स द सांक सीमॉ याचें १४ व्या लुईच्या काळचे व रीजन्सीच्या अमदानीचे वृत्तग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. रूसोचे 'कनफेसियॉ,' रेव्हेरी प्रोमेनादे द सॉलितेर हे ग्रंथहि उत्कृष्ट आहेत.

१८ व्या शतकांतील तत्त्वज्ञानवाङ्मयावर इंग्लिश तत्त्वज्ञानाची छाप पडली होती. मनुष्यासंबंधीं आधिभौतिकदृष्ट्या विचार करून मेट्री यानें लॉम मशीन, लॉम प्लांट हा महत्त्वाचा ग्रंथ लिहिला. शार्ले बोने यानें शास्त्रीय विषयावर पुष्कळ ग्रंथ लिहिले. पण या शतकांतील प्रसिद्ध मानसशास्त्रतत्त्ववेत्ता काँडीयाक हा होय. त्याचे ट्रेट डे सॉसॉस्यॉं, एसेसूर, लोरिजिन दे कॉनेसॉंस युमेन इत्यादि महत्त्वाचे ग्रंथ लिहिले.

ईश्वरविज्ञानशास्त्रासंबंधीं या शतकांत जे ग्रंथ बाहेर पडले त्यांत वोल्टेर व डिडरो हे प्रमुख होत. वोल्टेर हा नास्तिक नव्हता तथापि त्यानें 'डिक्स्योनेर फिलॉसोफिक' या ग्रंथांत तत्कालीन भिक्षुकवर्गावर त्यांच्या आचारविषयक तत्त्वावर खूप टीका केली आहे. डिडेरोनें याच्याहि पुढें जाऊन धर्मावरहि तडाखे ओढण्यास कमी केलें नाहीं. होलबखच्या सिस्टिम द ला नाटूर या ग्रंथांत परमेश्वराविषयींच्या अस्तित्वाच्या विरुद्ध बाजू जोरदार रीतीनें मांडलेली आहे. डिडरोनें या ग्रंथास हातभार लावला असें म्हणतात. हेल्वेटयूसचा डे ले स्प्री हा नीतिपर ग्रंथहि चांगल्या प्रकारचा आहे.

१८ व्या शतकांत टीकाशास्त्र स्वतंत्र असें निर्माण होऊं लागलें. सुआर्ड हा या शतकांतील एक नामांकित टीकाकार होऊन गेला. त्याचप्रमाणें फ्रेड्रिक मेलक्यिॉ ग्रिम हाहि मार्मिक टीकाकार म्हणून प्रसिद्ध आहे. १८ व्या शतकाच्या उत्तरार्धांत शार्लं बाटो यानें लेस बो झा रेडुइ ऑउअॅमेम प्रॅंसीप व प्रॅंसीप द ल लिटराट्यूर ले क्राट्र पोएटीक हे टीकाविषयक ग्रंथ लिहिले. वोल्टेरनें कोनेच्या काव्यांचा संग्रह प्रसिद्ध करून त्याच्या काव्यांसंबंधींचें प्रस्तावनेंत परीक्षण केलें आहे.

शास्त्रीय ग्रंथांत वोल्टेरनें न्यूटनचे शोध फ्रेंच भाषेंत प्रथम प्रसिद्ध केले. तसेंच द मॉम्र, क्लाल, ओयलर इत्यादि मोटमोठे गणितज्ञ या शतकांत निर्माण होऊन त्यांनीं गणितशास्त्रांत मोठे शोध लावले. ब्यूफॉंचा 'नॅचरल हिस्टरी' हा ग्रंथ फार प्रख्यात आहे. डिडरो, लॅंबेयर इत्यादिकांनीं 'ऑंसॉयक्लोपिडि' प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. अशा रीतीनें १८ व्या शतकांत शास्त्रीय वाङ्मयांतहि बरीच प्रगति झाली असें म्हणावयास हरकत नाहीं.

१७८९–१८३०:—फ्रेंच राज्यक्रांतीनंतर तें चार्लस राजाच्या राज्यारोहणापर्यंतच्या काळचें वाङ्मय फारच थोडें होतें असें पुष्कळांचें म्हणणें आहे. उच्च प्रकारचें वाङ्मय या काळांत फारच थोडें निर्माण झालें हें खरें. तथापि दुय्यम प्रकारचें वाङ्मय मात्र पुष्कळच निर्माण झालें.वृत्तपत्रकला, वक्तृत्व व शास्त्रीय वाङ्मय या शाखांमध्यें वाङ्मयाची प्रगति झाली तरी या काळांत काव्याच्या क्षेत्रांत मात्र फारच थोडे प्रतिभाशाली कवी निपजले. शाटो ब्रिऑं व मडाम द स्टेल हेच दोन या काळचे प्रसिद्ध कवी होत. लुइ मार्की द फॉंटॉं, कस्टेल एमेनार, रिकार, माटो, कूरनो शार्ल यूलियॉ दर्शेदोल इत्यादि कवींची कविता मुख्यतः वर्णनपर होती. ल्यूस द लान्सीवाल सेंवाल द ग्रॅंमेझा ह्या कवींनीं महाकाव्यें लिहिलीं पण तींहि विशेष नांव घेण्यासारखीं नव्हतीं. मालेर्वेनें जें काव्याला वळण दिलें होतें त्या धर्तीवर काव्य लिहिणारा शेवटचा कवि कासिमिर डेलावीन हा होय. याचें ले मेसेनीएन हें काव्य प्रसिद्ध आहे. नाटयवाङ्मयाच्या बाबतींत या काळांत म्हणण्यासारखी सुधारणा झाली नाहीं. १८ व्या शतकांतील शोकपर्यवसायी नाटकांच्या धर्तीवरच या काळांतील ला आर्प, शेन्ये रेनुआर, इत्यादि नाटककारांनीं नाटकें लिहिलीं. आनंदपर्यवसायी नाटकें मात्र या काळांत बरींच लिहिलीं गेलीं व या नाटकांमध्यें मोलेरची प्रतिभा दिसून येत नव्हती तरी हीं नाटकें उच्च दर्जाचीं होतीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. आनंदपर्यवसायी नाटककारांमध्यें, फाब्र ग्लॅटीन कोला डालविलि, पिकार, अलेक्झांड्र डयूवाल, लमेसीये हे प्रमुख होते. अद्भुत कादंबरीवाङ्मयामध्यें मडाम द स्टेल हिचें नांव प्रमुखपणानें झळकतें. तिच्या खालोखाल मडाम द ज्यॉली, मडाम कॉंटां,मडाम द क्रुडेनेर, झाविये, मेस्र हे कादंबरीकार होत. इतिहासाच्या क्षेत्रांत अगदींच कमी वाङ्मय निर्माण झालें पण बखरी लिहिणाऱ्यांची संख्या मात्र पुष्कळच होती. सिसमॉंडी ग्रुभिएर,इत्यादि बखरकारांचीं नांवें प्रसिद्ध आहेत.

तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत कॉंडियाकची परंपरा डस्टुट ड ट्रासी व लारो मीग्यर यांनीं प्रथम चालविली पण जर्मन मतांच्या फ्रान्समधील प्रसाराची त्यांच्यावर छाप बसल्यामुळें कॉंडियाकच्या तत्त्वज्ञानावर याच दोघांनीं पुन्हां टीका करण्यास सुरवात केली. नवीन तत्त्वज्ञानाच्या पुरस्कर्त्यांमध्यें, पीर, कोलार,मेन ड विरॉं हे प्रमुख होत.नेकरनें फ्रेंच राज्यक्रांतीच्या अत्याचारांवर खूप टीका केली आहे. मेस्त्र हा राजसत्ता धर्मसत्तेच्या ताब्यांत असावी या मताचा आहे. नीतिप्रधान ग्रंथांत ज्यूबेरचा पॉंसे हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा आहे. शास्त्रीय वाङ्मयांतहि या काळीं महत्त्वाचे ग्रंथकार निर्माण झाले. कॅबानीचा 'रॅपोर डु फीजीक ए डू मोराल ड लॉम' हा इंद्रियविज्ञानशास्त्रावरील महत्त्वाचा ग्रंथ आहे. बिशाचा ट्रेटे द लावी ए ड ल मॉर' हाहि ग्रंथ उत्कृष्ट आहे. राजकीय विषयावर तर या काळांत अतोनात वाङ्मय बाहेर पडलें. त्यात कूरेर हा प्रसिद्ध राजकीय वाङ्मयावरील लेखक होय. मडाम स्टेल हिनें फ्रेंच वाङ्मयामध्यें, परकीय देशांतील विषय आणून वाङ्मयाला व्यापकता आणली.तिच्या 'देलफीन,' 'कोरिन' व 'द लालेमान' या तीन अद्भुत कादंबऱ्या अत्यंत लोकप्रिय व महत्त्वाच्या आहेत. शाटुब्रियॉं याची रूसोच्या परंपरेंतील लेखक याबद्दल फार प्रसिद्धि आहे. पण शाटुब्रियॉंची खरी कामगिरी म्हणजे, ख्रिस्ती धर्मांतील विषय वाङ्मयाच्या द्वारें मांडण्याचा व ख्रिस्ती धर्म व फ्रेंच वाङ्मय याचा बेमालुम सांधा जोडून देण्याची होय. 'जेनी डु ख्रिस्तियानीझम व 'मार्टिर' या दोन ग्रंथांत त्यानें ख्रिस्ती धर्म हा काव्यमय आहे व त्यांतील प्रत्येक विषयावर मोठमोठे

वाङ्मयदृष्ट्या सुंदर ग्रंथ लिहितां येतील हें सिद्ध केलें आहे. या कल्पनेबरोबर त्याचें भाषाप्रभुत्व, त्याची विषय प्रतिपादन करण्याची कुशलता, मार्मिक टीका करण्याची हातोटी, जुन्या वाङ्मयांतून दृष्टांत देण्याची अपूर्व पद्धति या सर्वांमुळे शाटुब्रियाँचें नांव या काळांत नांवाजलें.

१८३० नंतरचें वाङ्मयः—१९ व्या शतकांतील उत्तरार्धांत व त्याच्या किंचित् पूर्वी फ्रेंच वाङ्मयामध्यें क्रांति घडून आली असें म्हणावयास हरकत नाहीं. 'रोमँटिक' चळवळीला या काळांत सुरवात झाली. वाङ्मयाची जी जुनी व निरुपयोगी अशीं वळणें होतीं तीं नाहींशीं करून नवीन वळणें प्रचारांत आणण्याचें काम या काळांत घडून आलें. त्याचप्रमाणें निरनिराळे विदेशीय शब्दप्रयोग, व कल्पनाजन्य शब्दप्रयोग वाङ्मयांत आणून, फ्रेंच भाषेला त्यांनीं संपन्न बनविण्याचा प्रयत्न केला.

'रोमँटिक' चळवळः—दहाव्या चार्लस राजाच्या कारकीर्दींत फ्रान्समध्यें बेरॉंजेर, (१७८०–१८५७) लामर्टीन (१७९०–१८६९) व रॉबर्ट लामेने (१७८२–१८५४) हे प्रमुख कवी व गद्यलेखक होते. बेरॉंजेरचें 'न्यूयास' हें काव्य सोडून दिल्यास त्याची सर्व कविता जुन्या फ्रेंच वळणाची दिसते. तींत भावनेला प्राधान्य असलें तरी कल्पनेची भरारी दिसून येत नाहीं. ही कविता स्फूर्तिजन्य नसून कृत्रिम दिसते. त्याच्या उलट लामार्टीन कवीची कविता जुन्या वळणाकडे झुकलेली दिसते. 'मेडीटेशन' 'हॉर्मनीज' यांच्यामध्यें हें स्थित्यंतर पूर्णपणें दृष्टीस पडतें. सृष्टीपासून काव्याचे विषय घेऊन त्याच्यावर सृष्टीमधील दृष्टांत देऊन, सुंदर कविता लिहिण्याचें श्रेय लॅमार्टीन यास आहे. तथापि त्याची भाषा मात्र कृत्रिम आहे. लामेने हा वरील त्रयींपैकीं तिसरा पण दोहोंपेक्षांहि फार श्रेष्ठ असा लेखक होय. याच्या 'पॅरोल ड क्रायों' या ग्रंथांत 'रोमँटिक' पंथाचें मूळ दृष्टीस पडतें. या सुमारास बऱ्याच लोकांचें तत्कालीन समाजांतील जुन्या व परंपरागत आचारविचारांच्या विरुद्ध मत बनत चाललें होतें. त्यामुळें, 'रोमँटिक' वाङ्मयाच्या चळवळीला अनुकूल वातावरण मिळाल्यासारखें झालें. या 'रोमँटिक' चळवळीमध्यें उत्साहानें भाग घेण्यांत यूगो, सॉत व्यूव, गौतीर, नर्वाल, एमीली व ॲटनी, बोरेल इत्यादि प्रमुख होते. अभिजात वाङ्मयानें जो कृत्रिमपणा निर्माण केला होता तो अजीबात नाहींसा करून, वाङ्मयांमध्यें प्रत्येकाला स्वातंत्र्य मिळालें पाहिजे असें या विद्वानांचें मत होतें. या मताला अनुसरून काव्यावर जे कृत्रिम निर्बंध लादले होते ते झुगारून देऊन, स्वच्छंदी कविता व स्वच्छंदी गद्य लिहिण्यास त्यांनीं प्रारंभ केला. व्हिक्टर यूगोच्या कृतीमध्यें या 'रोमँटिक' चळवळींतील सर्व तत्त्वें प्रतिबिंबित झालेलीं दिसतात. नाटकाला अमुकच विषय असावा, त्यांत अमुक प्रकारचीं पात्रें असावीं इत्यादि ज्या १८ व्या शतकांत कल्पना रूढ होत्या त्या यूगोनें अजीबात झुगारून दिल्या. अर्नानी, मारियाँ डे लोर्मे, ल्यूक्रेस बोर्जिया मारी ट्यूडर, इत्यादि त्याचीं प्रसिद्ध नाटकें आहेत. या प्रत्येक नाटकाच्या प्रारंभीं प्रस्तावना लिहून त्यानें अभिजात वाङ्मयावर निर्भिड टीका केली आहे. ड्यूमाचीं नाटकेंहि याच धर्तीचीं आहेत. पण तीं यूगोच्या नाटकांइतकीं उच्च दर्जाचीं नाहींत. नाटकाप्रमाणेंच काव्याच्या क्षेत्रांतहि त्यानें आपल्या तत्त्वांबरहुकूम कविता केली. बलाडूस, ओरीयेंटालेस इत्यादि त्याच्या काव्यांत हे सर्व गुण दृष्टीस पडतात. ले फ्यूल दौटोम्ने ल शांट्स डु क्रे पुस्क्यूल ले इंटेरीयूर, इत्यादि त्यानें परिपक्क वयांत लिहिलेल्या काव्यांत जरी प्रथमवयांतल्या काव्यांतील भरारी दिसत नसली तरी यांत सुद्धां 'रोमँटिक' तत्त्वें दृग्गोचर होतातच. आयुष्याच्या शेवटच्या काळांतील 'लेस शाटीमेंट्स, ला लेजेंड डेस सीक्लेस हीं काव्यें अत्युत्कृष्ट म्हणून नावाजलेलीं आहेत. यूगोच्या अनुयायांमध्यें म्यूसेट, एकरमन गौतीर बानविले, शार्ले मारीयेन, बोदेलेर सोलरी, वॉइल्लेट इत्यादि कवी फार प्रसिद्ध आहेत.

१८३० नंतरचें गद्यवाङ्मयः—'रोमँटिक' चळवळीचा गद्यवाङ्मयावर काव्यें व नाटकें यांच्यापेक्षांहि अधिक परिणाम घडून आला. काव्यांत अगर नाटकांत ज्याप्रमाणें यूगोनें क्रांति घडवून आणली त्याचप्रमाणें त्यानें कादंबरीवाङ्मयामध्येंहि घडवून आणली. गद्य वाङ्मयांत ही क्रांति घडवून आणणें अधिक सोपें होतें. त्यामुळें या क्षेत्रांत अनेक कादंबरीकार चमकले. त्यांत यूगो, डूमा, मेरीमे वाल्झॅक, सॅंड, वर्नार, म्यूजे अबू, फूये, फ्लोबेर, गाबोरयू इत्यादि प्रमुख होत. या नवीन कादंबरीवाङ्मयाला दोन प्रकारचीं वळणें लागलीं होतीं एका प्रकारच्या कादंबऱ्यांत प्रसंगावर भर दिलेला असे तर दुसऱ्या प्रकारांत, पात्रांच्या स्वभावपरिपाकाकडे अधिक लक्ष पुरविलें जात असे. कादंबरीवाङ्मयात ड्यूमा हा सर्वश्रेष्ठ कादंबरीकार होय. याच्या ले ट्रवा मूस्केटियर, वॅ. टॉंज, आप्रे लारेन मार्गो या त्याच्या सर्वोत्कृष्ट कादंबऱ्या आहेत. वाटेल तेवढा लांबलचक संवाद अजीबात कंटाळवाणा होऊं न देतां लिहिण्याची अजब कला ड्यूमासच्या अंगीं होती. गोटिए व मेरीमे यांची उत्कृष्ट कथालेखनाबद्दल प्रसिद्धि आहे. वाल्झॅक यानें आपल्या थोडक्या वयांत अनेक सुंदर कादंबऱ्या लिहिल्या. ले शू ऑ, कॉमेडी यूमेन इत्यादि त्याच्या कादंबऱ्या नांवाजलेल्या आहेत. रोमँटिक चळवळीच्या ऐन भरांत याशिवाय अनेक कादंबरीकार चमकून गेले त्याचप्रमाणें त्याच सुमारास 'नॅचरॅलिस्ट' नांवाचा जो पंथ उदयाला आला त्यांतहि अनेक कादंबरीकार पहिल्या दर्जाचे होते. या पंथांतील कादंबरीकारांच्या कादंबरींतील प्रसंग केवळ अद्भुत अगर काल्पनिक नसून समाजांत जे वारंवार प्रसंग घडून येतात त्या धर्तीवरच घातलेले असत. या पंथाचे चार प्रमुख कादंबरीकार आहेत. त्यापैकीं एमील झोला हा प्रमुख होय. याच्या

कॉट अनीनों, थेरेझ राक्वां, लेरूजां माका वगैरे कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. याशिवाय त्यानें पॅरी रोम लूर्द इत्यादि छोटया कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. डॉडे याच्या कादंबऱ्यांमध्यें झोलापेक्षां अधिक कल्पकता व विनोद दिसून येतो. त्याच्या तार्तारां, जॅक, ल नवाब इत्यादि कादंबऱ्या फार वाखाणल्या जातात. टीकात्मक वाङ्मयांत सँट बव्ह हा प्रमुख टीकाकार होय. याचा क्रिटिक ए पोर्ट्रे लिटरेया' हा टीकात्मक गद्यसंग्रह प्रसिद्ध असून त्यांत अनेक ग्रंथांचें व ग्रंथकारांचें मार्मिक परीक्षण आलें आहे. त्याचा सर्वांत उत्कृष्ट टीकात्मक ग्रंथ कोजेरी ड्यू लंडी, हा कॉंस्टीटयूशनेल, मॉनीटयूर इत्यादि साप्ताहिकांत क्रमशः प्रसिद्ध होत असे. गोत्ये हाहि बव्हा इतकाच मार्मिक टीकाकार म्हणून प्रसिद्ध आहे. ओरविई रनो, टेन, सारसी, हेहि टीकाकार म्हणून प्रख्यात होते. यांच्यानंतरचे पण त्यांच्या इतकेच उत्कृष्ट टीकाकार म्हणजे ॲनेटोल फ्रान्स, एमीले, फागे, व ब्रुनेटयेर हे होत. ॲनेटोल फ्रान्सचा 'ला वी लिटरे' हा चार भागांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. फागेनें फ्रेंचवाङ्मयाच्या चार शतकांवर चार टीकात्मक ग्रंथ लिहिले आहेत.

इतिहासाच्या क्षेत्रांत सिसमाँडी, टीएरी, मार्टेन, बॅरॉंटे मिन्ये लॅमार्टीन, फ्रीने, मिचैछ, हे प्रख्यात इतिहासकार होऊन गेले. सिसमाँडीचा ईस्त्वार फ्रॉंसे वईस्त्वारडे रेपुब्लिक इटालीयेन, डयुमॉयॉन हे दोन ग्रंथ आज फार प्रसिद्ध आहेत. आन्री मार्टीचा ईस्त्वार फ्रॉंसाँ, हा ग्रंथहि अतिशय लोकप्रिय आहे. लॅमार्टीचा 'ईस्त्वार डेस जीरार्डां' हा ग्रंथ राजनीतिशास्त्रसंबंधीं असून मिशेलेचा फ्रान्सच्या बंडावरील ग्रंथ प्रमाण समजला जातो. टेन हा शास्त्रीय दृष्टीनें इतिहास लिहिण्याकरतां प्रसिद्ध आहे. या बाबतींत आल्बर्ट सोरेलनें फ्रान्सच्या राज्यक्रांतीवरील आपल्या ग्रंथांत टेनचें अनुकरण केलें आहे.

१९१०–१९२४—महायुद्धाला सुरवात होण्यापूर्वी फ्रेंच भाषेंत सर्व प्रकारचें उच्च वाङ्मय निर्माण होत होतें व या निरनिराळ्या वाङ्मय शाखेंतहि अनेक पंथ व उपपंथ झालेले होते. अशा प्रकारचे वाङ्मयशाखांचे सुमारें ५५ पंथ महायुद्धाच्या अस्तित्वांत प्रारंभीं होते असें एका विद्वानानें म्हटलें आहे. नवीन कल्पनांचा सर्व क्षेत्रांत प्रादुर्भाव झाला होता. या वेळच्या वाङ्मयाचें मुख्य लक्षण म्हणजे 'जिवंत आशावादीपणा' होय. अनेक छोटे मोठे लेखक आपली लेखणी निरनिराळ्या क्षेत्रांत चालवीत होते प्रत्येक क्षेत्रांत त्या त्या विषयावरील अधिकारी लेखक निर्माण होत होते. राष्ट्रीयत्वाचें व धर्मविचारांचें पुनरुज्जीवन होऊं पहात होतें. देशाभिमान, आपल्या पूर्वजांविषयींचा अभिमान, उत्साह व पराक्रम यांच्या विषयींची आवड या गुणांनीं देश भारून गेला होता. या राष्ट्रीय भावनेचा पुरस्कर्ता मारिस बॉरो हा होय. याचें वजन तत्कालीन तरुणांवर अतिशय होतें.त्याच्या 'ऊने फ्रॉंसाइस पाँडा ल गुएर' व 'ल ज्येन दुन्हो' या दोन ग्रंथांत राष्ट्रीयत्वासंबंधींची त्याचीं सर्व मतें, प्रतिबिंबित झालीं होतीं. फ्रेंच अकॅडमीमध्यें प्रामुख्यानें भाग घेणारा जोसेफ बेडीए हा फ्रेंच वाङ्मयाचा टीकाकार व प्रसिद्ध इतिहासकार असून त्याच्या 'ल रोमाँ द ट्रेस्टां ए इझ्यल' व 'पर्सेवाल ओल साँ ग्राल' या अद्भुत कादंबऱ्या अतिशय प्रसिद्ध आहेत. तसेच त्याचा 'ले फॉर्र फ्रॉंसाँ' हा इतिहासावर अधिकारी ग्रंथ आहे. रेन बोलीवे हा मनोरंजक कथालेखक आहे. आन्री बोर्डो यानें महायुद्धाच्या इतिहासावर अनेक छोटीं पुस्तकें हृदयंगम भाषेंत लिहिलीं आहेत. त्यांतल्यात्यांत 'पेज नाटाल' व 'ले प्यूर द वीत्र' हे त्याचे प्रसिद्ध ग्रंथ होत. याशिवाय महायुद्धासंबंधीं लिहिणाऱ्या ग्रंथकारांत पॉल बोर्जे, पॉल आदाम, मॉरिस, जेने, क्लेमँसो, मार्शल फॉश, मार्शल, लिओटी हे होत. क्लेमंसोनें लर्झा पाँ, द वीनीर इत्यादि कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. आन्री, डयूबेरनोय, याचें जीसल, व आबेल अमाँ याच्या पुष्कळ कादंबऱ्या व 'क्रानिक' नावाच्या पॅरिसच्या राहणीच्या माहितीचें पुस्तक हीं जुन्या अभिजात वाङ्मयाच्या धर्तीवर लिहिलेलीं आहेत. क्लोद फारेर या आरमारी अधिकाऱ्याच्या पौरस्त्य देशांसंबंधीं व इतर विषयांवरहि बऱ्याच कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. पॉल ॲडाम या प्रसिद्ध लेखकाचे सामाजिक विषयावर व इतर निरनिराळ्या विषयांवर अनेक ग्रंथ आहेत. त्यांपैकीं 'रीम देवासो' व 'ले लियाँ दारास' हे ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. मॉसेल प्रूस्ट यानें रस्किनच्या ग्रंथांचें फ्रेंच भाषेंत भाषांतर केलें असून शिवाय 'डु कोटे ड शेज स्वाँ' 'आलॉम्ब्रे डेस ज्यूस, फिल आँ फ्लोर' हे ग्रंथ अतिशय लोकप्रिय असून ते फ्रान्स बाहेरहि पुष्कळ लोक हौसेनें वाचतात. मार्से बुलोने हा हल्लींच्या लेखकांमध्यें नांवाजलेला लेखक असून १८ व्या शतकांतील लेखकपद्धतीचा पुरस्कर्ता आहे. त्याच्या 'ला कु' व 'ल वेल, ए ला वेल मार्गारीट' या कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. एडमंड जलो, ज्य वजरो व थरो यांनीं निरनिराळ्या देशांतील रहाणीवरील कादंबऱ्या लिहिल्या आहेत. मॉरीस रोस्टाँच्या 'ल पेज द लावी' सरके द खिस्ताव्हाल' हा कवितासंग्रह प्रसिद्ध असून त्यांत मनुष्यस्वभावाचें यथार्थ ज्ञान व कल्पकता दृष्टीस पडते. रोनीची 'ऐने' ही अद्भुत कादंबरी अतिशय लोकप्रिय आहे. लुइ बर्ट्रां यानें भूमध्यसमुद्रावरील देशांतील कथानकांवर पुष्कळ कादंबऱ्या लिहिल्या आहेत व त्यांत प्रवासाचे व नवीन देश पाहण्यापासून काय फायदे होतात हें दाखविलें आहे. आफ्रिकन लोकांच्या जीवनक्रमावरील त्याची 'पेपेटे ल आमे' ही कादंबरी प्रख्यात आहे. साहसविषयक कादंबऱ्या लिहिणाऱ्यांमध्यें पीर बेन्वा, फारार, पीर मॅकओलन, लुइ शाडोर, बर्जेर एडमाँड कजल यांच्या कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. रेन बेंजामिन यानें न्यायपद्धति, व शिक्षणपद्धति, इत्यादिकांवर विनोदी व सुंदर पुस्तकें लिहिलीं असून त्यांत त्या पद्धतीवर

निंदागर्भित टीका केली आहे. त्याचा ' गास्पार ' हा महायुद्धावरील अतिशय विनोदी ग्रंथ होय. आन्री बारबूस यांची ' ल फ्यू ' ही युद्धविषयक अद्भुत कादंबरी फ्रान्समध्यें अत्यंत लोकप्रिय आहे. रोमेन रोलंड याचा ओ डुस ड लामेले हा ग्रंथ बराच प्रसिद्ध आहे. त्यांत लष्करशाहीच्या विरुद्ध सडकून टीका केली आहे. त्याचा ' कोलस ब्रुनो ' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. मडाम आल फ्रेड वालेट ही सुप्रसिद्ध कादंबरीलेखिका होय. तिच्या ' डॉ लपूइ ओलवी इंटेज्येर' ही कादंबरी लोकप्रिय आहे. या कादंबरींत मार्मिक निरीक्षण बुद्धि व तेजस्वी भाषा हे गुण प्रामुख्यानें दिसून येतात. फोर्नारचा ' ल ग्रॉ म्यूलनें ' हा साहसविषयक ग्रंथ अलीकडील काळांत फार नांवाजलेला आहे. चार्लस पेगुइ यानें ' जेन द ऑर्क ' हें प्रसिद्ध काव्य लिहिलें असून त्याचे ' लापेल ओ आर्मे ' व ल आयाज डु सेंटरॉ ' हे दोन प्रसिद्ध ग्रंथ होत. डोडेट हा सामाजिक, नैतिक,राजकीय इत्यादि सर्व विषयांवर लिहिणारा अति लोकप्रिय ग्रंथकार होय. ' त्याचा ' मेमायर ' ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. कॉटस ड नोइले, मारियम हॅरी एलिसा रेस इत्यादि स्त्रीलेखिका फ्रान्समध्यें फार प्रसिद्ध आहेत. फर्नंड डेवोयर हा अलीकडील महत्त्वाचा कवि होय. याचें 'आमेस' हें काव्य प्रसिद्ध आहे. पॉल फोर्ट याला अलीकडील कवींचा राजा म्हणून संबोधण्यांत येतें.याचें ' बलाडे फ्रॉं सॉइ ' हें काव्य फार प्रसिद्ध आहे. याशिवाय वटेल, रोमेन, माम्र हे अलीकडील प्रसिद्ध कवी होत. लेमाइतेर व फागे हे या शतकातील दोन अतिप्रसिद्ध टीकाकार होत हानोटा या इतिहासकाराचा ' हिस्टरी ऑफ फ्रान्स ' हा ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. नाटककारांमध्यें नटेल हा लोकप्रिय नाटककार असून त्याचीं ' तेंड्रेस, ले सोर डामोर ' लोमे आलरोस हीं मुख्य नाटकें होत. याशिवाय गुइट्रि, क्यूरेल मागे,डेकावे आन्द्रे डलोर्ड इत्यादि कनाटयार प्रसिद्ध आहेत.

आ ज चा फ्रा न्स ( १९२१-१९२५ ), अंतर्गत कारभारः—जानेवारी १९२२ त ब्रिऑंड मुख्य प्रधान जाऊन, पॉंक्वारे आला, तरी पण ऑंग्लो फ्रेंचांची कर्ज वगैरेंची भानगड मिटली नाहीं. पुढील सालच्या (१९२३) प्रारंभींच जमाखर्चाच्या तोंडमिळवणीचा प्रश्न येऊन जादा कर बसवून व लॉटरी लोन आणि ट्रेझरी बॉंड्स काढून येणारी तूट भरून काढली. जून १९२३ अखेर एकंदर राष्ट्रीय कर्ज ३२८३२८ दशलक्ष फ्रँक होतें. या सालीं देशांतील औद्योगिक परिस्थिति चांगली होती.मात्र गरीब लोकांनां चांगलीं घरें बांधून देण्याचा व लोकसंख्या वाढविण्याचा प्रश्न तसाच तटकळत राहिला. या सालच्या अखेरीस मतदारांचें रिफार्म सुधारणा बिल पसार झालें. सन १९२४ च्या फेब्रुवारींत उत्पन्नासाठीं सर्वच कर - शेंकडा २० टक्क्यांनीं जास्त वाढविले, तरीहि फ्रँकचा भाव उतरून तो १ पौंडास १०५ पर्यंत घसरला. पेन्शनें कमी करण्याच्या बाबतींत पॉंक्वारेचा पराभव झाला. पण तो पुन्हां निवडून आला ( मार्च ). मात्र पुन्हां जूनमध्यें त्याला राजीनामा द्यावा लागला. याच वेळीं मिलेरांड अध्यक्ष झाला. थोड्या दिवसांनीं त्याच्या मागून डूमर्ज हा अध्यक्ष झाला. सांपत्तिक परिस्थितीमुळें १९२५ च्या एप्रिलांत हेरिअटचा पराभव होऊन पेमलीव्ह मुख्य प्रधान झाला व त्याचाहि पराभव अंतर्गत व परराष्ट्रीय भानगडींमुळें नुकताच होऊन सांप्रत ( नोव्हेंबर १९२५) सोशालिस्टांच्या वर्चस्वामुळें प्रधानमंडळ बनविणें कोणत्याहि पक्षाला कठिण झालें आहे.

परराष्ट्रीय कारभारः—फ्रान्सनें १९२१ च्या आक्टोबरांत तुर्कस्तानशीं स्वतःला बगदाद रेल्वेवर कांहीं सवलती मिळण्याच्या अटीवर स्वतंत्र तह केला. त्यामुळें इंग्लंड नाराज झालें. या सालच्या नोव्हेंबरात वॉशिंग्टन कॉन्फरन्सचा सैन्य कमी करण्याचा करार फ्रान्सनें पाळला नाहीं, परंतु आरमार थोडें कमी करण्याचें कबूल मात्र केलें. सन १९२२त मुदानिया करार एकीकडे ठेवून फ्रान्स हें तुर्कस्तानच्या विरुद्ध उठण्यास तयार झालें होतें. यूरोपांत शांतता राखण्यासाठीं मार्च ( १९२४ ) त फ्रान्सनें चेकोस्लोव्हाकिया या लोकसत्ताक राज्याशीं मित्रत्वाचा तह केला.पुढें पुष्कळ दिवस खटपटी चालून व फ्रान्स आणि इंग्लंड यांचीं कारस्थानें होऊन १९२५ च्या प्रारंभीं फ्रान्सनें जर्मनीचा रूहर प्रांत खाली करण्याचें कबूल केलें व त्या मोबदल्यात जर्मनीशीं एक व्यापारी तह केला. इंग्लंडनें आपल्या कर्जफेडीचा तगादा अद्यापि फ्रान्सच्या मागें लावलाच आहे. फ्रान्सचें म्हणणें जर्मनीकडून आपल्याला मिळणाऱ्या हप्त्यापेक्षां इंग्लंड आपल्या जवळून जास्त रकमेचा हप्ता मागतें, चालू सालच्या ( १९२५ ) एप्रिलांत मोरोक्कोच्या अब्दुल करीमनें स्पेनशीं लढतां लढतां आपली कुरापत काढली असें सांगून फ्रान्सनें त्याच्यावर स्वारी केली. विमानांचा व चिलखती मोटारींचा उपयोग करूनहि फ्रान्सला रिफांचा पराभव करतां आला नाहीं व उत्तर आफ्रिकेंतील आपली इभ्रत राखतां आली नाहीं; अखेर एक दीड महिन्यापूर्वी ( आक्टोबर १९२५ ) फ्रान्सचें सैन्य परत फिरलें.

वसाहतींचा कारभारः—एप्रिल १९२२ त दमास्कस येथें कांहीं मुसुलमानांनां पकडल्यामुळें फ्रान्सच्या विरुद्ध चळवळ उत्पन्न झाली. दमास्कस हें सीरिया प्रांतांत असून तो फ्रान्सच्या मॅंडेटखालीं आहे; त्यामुळें तुर्की फ्रान्सनें सीरियावर लष्करी गव्हर्नर पाठविला ( एप्रिल १९२३ ). यावेळीं तुर्की लष्करहि सरहद्दीवर चमकूं लागलें होतें. चालू सालीं ( आगष्ट १९२५ ) डूच अरबाची एक धार्मिक जमात भरली असतां ती राजकीय असावी:या समजुतीनें फ्रेंच लष्करी गव्हर्नरानें ती उधळून लावल्यामुळें डूच लोकांनीं बंड उभारलें. फ्रेंचांनीं तें मोडण्यात फार अत्याचार केला. दमास्कसच्या निरपराधी लोकांवर एक दिवस तोफांची सरबत्ती केली, विमानांतून बाँब टाकले, शहरास आग लावली आणि पुष्कळ निरपराध्यांची कत्तल करून व पुढाऱ्यांनां ठार करून त्यांच्या प्रेतांची

धिंड काढली. त्यामुळें बंड जास्त चेतलें. यामुळें फ्रान्सची इज्जत नाहींशी झाली. अद्यापिहि हें बंड चालूच आहे.

इंडोचायना ही फ्रान्सची वसाहत मात्र दिवसेंदिवस भरभराटत आहे. हल्लीं तिची लोकसंख्या जवळजवळ दीड ते दोन कोटी आहे, पण देश इतका संपन्न आहे कीं दहा कोटी लोकांचेंहि पोषण होऊं शकेल. टानकिन हें उत्तम बंदर असून आज त्याची वस्ती ७५ हजार आहे. तें १८८० पूर्वी तर अस्तित्वांत नव्हतें. कोचीन चायना, कांबोडिया वगैरे प्रांतांत २५०० मैलांचा दर्यावरील व नदीकिनाऱ्यावरील व्यापार चालू आहे. हल्लीं मोटारींचा प्रवास बराच होऊं लागला आहे व एकंदरींत यंत्रांची मागणी वाढत आहे. कांबोडियांतील सुशिक्षितांचा भरणा सरकारी नोकऱ्यांत फार होत असून शेतकी व व्यापार इकडे त्यांचें दुर्लक्ष आहे; म्हणजे जवळजवळ हिंदुस्थानसारखीच परिस्थिति आहे. शिक्षणपद्धतींत १९०० पासून बरीच प्रगति झाली असून शेतकीचीं व औद्योगिक कॉलेजें काढण्यांत आलीं आहेत व विद्यार्थ्यांना अनेक प्रकारें उत्तेजन देण्यांत येत आहे.

**फ्रिजिआ**—फ्रिजिआ हा आशियामायनरमधील एक देश होता. यांत अनाटोलिया पठाराचा समावेश होत असे, व पूर्वेस हॅलिश नदीपर्यंत हा पसरला होता. उत्तरेच्या बाजूला सांगारियस ही प्रसिद्ध नदी आहे. या प्रदेशांत द्राक्षांची लागवड फार मोठ्या प्रमाणांत होते फ्रिजियन लोकांचें मॅसेडोनिया व थ्रेस या देशांतील लोकांशीं फार साम्य आहे. प्राचीन फ्रिजियन लोकांचा मुख्य धंदा शेतकी हा होता. ग्रीक लोकांतील ऱ्हीआ उर्फ सॉबेले ही फ्रिजियन लोकांची मुख्य देवता असून ते तिला अम्मा म्हणजे माता असें म्हणतात. पेसीनसजवळ माउंट ॲगडसच्या पायथ्याशीं या देवतेचें मोठें देऊळ असून तिच्या पूजनाला अनेक पुजारी असत. फ्रिजियन लोक या देशांत फार प्राचीन काळापासून रहात असून, प्रथम ते डोंगरांत पोखरुन केलेल्या घरांत रहात होते. पुढें त्यांच्यापैकीं गार्डियम, मिडास यांनीं वसविलेल्या शहरांत राहूं लागले, व रहाणीहि बरीच सुधारली. मेंढ्यांपासून लोकर काढून त्याचे कपडे बनविणें व त्यांवर चांगली वेलबुट्टी वगैरे काढणें या कला त्यांनीं शोधून काढल्या. फ्रिजियांतील कोटियम ही सुप्रसिद्ध कल्पित गोष्टी रचणारा इसॉप याचें जन्मभूमि होय. मूर्तिकलेंतहि फ्रिजियन लोकांनीं बरीच प्रगति केली होती असें हल्लीं उपलब्ध असलेल्या मूर्तिकर्मांवरुन दिसतें.

इतिहास.—फ्रिजियन लोकांनीं आपलें राज्य प्रथम केव्हां स्थापन केलें तें साल नक्की माहीत नाहीं. त्यांचा पहिला राजा गॉर्डियस हा असून तो कृषीवल वर्गांतलाच होता. त्याच्यानंतर त्याचा मुलगा मिडास हा सुप्रसिद्ध राजा झाला. त्याच्याबद्दल बऱ्याच दंतकथा आहेत. तो ज्याला ज्याला स्पर्श करी त्याचें सोनें बने, व त्यामुळें त्याच्याजवळ अतानांत सोनें होतें अशी एक दंतकथा आहे. गार्डियस व मिडास यांचींच नांवें पुढील फ्रिजियन राजघराण्यांतील पुरुषांनां आलटून पालटून देत असत. डोंगालु येथील दरींमध्यें अद्याप त्यांचीं थडगीं असून त्यांवर ग्रीक लिपींत पण फ्रिजियन भाषेत कोरलेले लेख आहेत. मिडास हा खि. पू. आठव्या शतकांत राज्य करीत होता त्यानें काइम येथील शेवटला राजा आगामेम्नान याची मुलगी डामोडाईस हिच्याबरोबर लग्न केलें होतें. मिडासनंतर फ्रिजियाच्या राज्याला उतरती कळा लागली. खि. पू. ६६०मध्यें सुमेरियन लोकांनीं फ्रिजियावर स्वारी केली, त्यावेळीं तत्कालीन राजानें आत्महत्या केली आणि सुमेरियन लोकांनीं पुढें सुमारें एक शतकानंतर फ्रिजियन घराणें नष्ट करुन हा देश लीडियाच्या राज्याला जोडला. लीडियाच्या साम्राज्यसत्तेखालीं फ्रिजियावर मांडलिक देश्य राजेच स.५४५पर्यंत राज्य करीत होते. पण या सालीं हा देश इराणच्या साम्राज्याला जोडण्यांत आला. पुढें अलेक्झँडर दि ग्रेटनें हा देश जिंकून ॲंटिगोनसच्या ताब्यांत दिला. पुढें रोमन सत्तेनें हा देश जिंकून तो आपल्या आशियांतील प्रांतास जोडला. याच देशांतील ' गॉर्डियन नॉट ' संबंधाची गोष्ट इतिहासांत प्रसिद्ध आहे. फ्रिजियन लोकांची संस्कृति पौरस्त्य नसून तिचें प्राचीन ग्रीक संस्कृतीशीं बरेंच साम्य आहे ( ज्ञानकोश, विभाग ३, उत्तरार्ध पृ ४५ पहा. ) फ्रिजियन लोक मूळ आर्मेनियन वंशांतले असावेत असें अलीकडील कित्येक लेखकांचें म्हणणें आहे. फ्रिजियन लोकांची सत्ता एके काळीं बऱ्याच विस्तृत प्रदेशावर असून एजियन समुद्रापलीकडेहि पसरली होती, असाहि कांहीं पुरावा सांपडला आहे तथापि यासंबंधानें अद्याप कायमचा निर्णय लागलेला नाहीं.

**फ्रीटाऊन**—हें पश्चिम आफ्रिकेंतील सीरालिओन नांवाच्या ब्रिटिश वसाहतीची राजधानी असून सीरालिओन नदीमुखाच्या दक्षिणेस, याच नांवाच्या भूशीरापासून सुमारें पांच मैलांवर उ अ. ८° २९' व पू. रे. १३° १०' यांच्यामध्यें आहे. लोकसंख्या (१९२१ ) ४४१४२ असून सुमारें ५०० यूरोपीयन आहेत. फ्रीटाऊन हें एका मैदानावर फार चित्तवेधकरीतीनें वसलेलें आहे. लोकसंख्येच्या मानानें या शहराचा विस्तार फारच मोठा आहे, गव्हर्नरचें वसतिगृह, सरकारी कचेऱ्या, लष्करी चाळी, कॅथेड्रल, मिशनरी संस्था, फळबाजार, विल्बरफोर्स मंडप, न्यायकोर्ट, रेल्वेस्टेशन, व व्याकरणशाळा या येथील मुख्य इमारती आहेत. येथील हवा रोगट व निःसत्त्वकारक आहे. सीरालिओनला विशेषतः 'गोऱ्या लोकांचें थडगें' म्हणत असत. येथील राज्यव्यवस्था म्युनिसिपालिटी (१८९३ सालीं स्थापलेली), मेयर व कौन्सिलर लोक चालवितात. फ्रीटाऊनलाच प्रथम ब्रिटिश पश्चिम आफ्रिकेंत स्थानिक स्वराज्य देण्यांत आलें होतें.

व्यापाराच्या दृष्टीनें व युद्धरचनेसंबंधीं हें शहर महत्त्वाचें आहे. येथील बंदरांत सर्वांत मोठीं आरमारें ठेवण्याजोगी

जागा आहे. शहरांतील आफ्रिकन लोकहि बरेच पुढारलेले दिसतात.

**फ्रेंच-इंडिया**—हिंदुस्थानांतील फ्रेंच वसाहत. मुख्य ठाणें पांडेचरी. हीं त्यांनीं १६७४ सालीं स्थापली, ती १६९३ सालीं डचांनीं घेऊन १६९९मध्यें परत केली. नंतर इंग्रजांनीं ती १७६१ सालीं घेऊन १७६५ सालीं परत केली. पुन्हां १७७८ सालीं घेऊन १७८५ सालीं दिली आणि पुन्हां तिसऱ्यानें १७९३ सालीं घेऊन १८१४ सालीं परत केली. फ्रेंचांच्या १८१५ मधील तहान्वयें हिंदुस्थानांतील त्यांच्या एकंदर प्रदेशाचे पांच निरनिराळे तालुके व सतरा पेटे असून त्यांचें क्षेत्रफळ १९६ चौरस मैल आहे व लोकसंख्या (१९२३) २७२४२७ आहे. पांडेचरी तालुक्यांत, पांडेचरी, औलगारेट, विल्लेनूर, तिरुभुवने, बहौर, नेट्टापकम, मोदलीयारपेठ व अरियाणकूपम हे पेटे आहेत. कारिकाल तालुक्यांत, कारिकाल, तिनौलर, आलदी, नेरवी, नेदौंकडी व कचेरी हे पेटे असून चंद्रनगर, माही व यानान हे एकेक पेटयाचेच तालुके आहेत. या १७ पेटयांना म्युनिसिपालिटया आहेत. पांडेचरीस गव्हर्नर राहतो. त्याच्या मदतीस एक लोकनियुक्त साधारण मंडळ असतें. प्रत्येक तालुक्यातर्फे एक सभासद (सिनेटर) व एक नायब सभासद (डेप्युटी) असे पॅरिस येथील पार्लमेंटांत निवडून पाठवितात. इ. स. १९२३ मध्यें एकंदर ६१ प्राथमिक शाळा व ३ कॉलेजें असून, तीं सर्व सरकार चालवितें. एकंदर जमावसूल (१९२४) २८७०४१० रु. आहे. मुख्य पीक, भात, साखर, कापूस, कोको, कॉफी, भुईमूग इ. पांडेचरीस ३ कापसाच्या गिरण्या असून, चंद्रनगरास एक तागाची व इतरत्र दोन तेलाच्या व एक बर्फ तयार करण्याची गिरणी आहे. पांडेचरीहून गळिताचीं धान्यें मुख्यतः निर्गत होतात. पांडेचरी, कारिकाल व माही या बंदरांत १९२३ सालीं ३१९१५९८४ फ्रँक्सची आयात व ४५११७३८३ फ्रँक्सची निर्गत झाली. आणि २७७ व्यापारी गलबतांचा वरवा झाला. पांडेचरी ते वेल्लापूर व कारिकाल ते पेरालम मिळून एकंदर ४३ मैलांची आगगाडी आहे.

**फ्रेंच इंडो-चीन**—'इंडो-चीन' पहा.

**फ्रेंच-कांगो**—आफ्रिकेच्या ज्या भागांतून भूमध्यरेषा जाते तेथील फ्रेंच मुलुखाचें सर्व साधारण नांव. या मुलुखाचें क्षेत्रफळ ९८२०४९ चौरस मैल व लोकसंख्या (१९२१) २८४५९३६ आहे. फ्रेंच कांगोमध्यें ज्या प्रदेशाचा समावेश होतो तेः—(१) गाबुन; (२) मिडल (मध्य) कांगो, (३) युबांगीशरी, व(४) चॅड. या ठिकाणीं ग्रॅनाइट नांवाच्या दगडांचे थर आहेत; कांगो नदीच्या पात्राच्या उत्तरेकडील डोंगराळ प्रांत, या ठिकाणीं वाळूचे दगड फार आहेत. डेव्होनीयन युगकालीन प्राचीन प्राण्यांचे अथवा वनस्पतींचे अवशेष कांगो नदीच्या खडकांत आढळतात. क्रिस्टल पर्वतांच्या वायव्येकडील विस्तृत प्रदेशांत ग्रॅनाइटचे दगडच फार आहेत. तवंध देश भूमध्यरेषास्थित भागांत असल्यामुळें येथील हवा फार उष्ण असते. यूरोपीयनांना तर मुळींच मानवत नाहीं.

येथें पुष्कळ प्रकारच्या नीग्रो जाती राहातात. चॅड सरोवराच्या लगतच्या भागांत फ्युला, हौसा, अरब व अर्धवट अरब जातीचे लोक राहतात. फँग, बकालाय, बटेकीज व झांडेह ह्या येथील प्रख्यात जाती होत. बऱ्याच जाती नरभक्षक आहेत. लायब्रेव्हिली, ब्रॅझाव्हिली, फ्रान्सेव्हिली व लोअँगो हीं मुख्य शहरें आहेत. मुख्यत्वेंकरून दळणवळणाला योग्य साधनें म्हणजे नद्या ह्याच आहेत. तारायंत्रांचाहि उपयोग होतो. येथील उत्पन्नाच्या मुख्य बाबी म्हटल्या म्हणजे जंगल व हस्तिदंत ह्या होत. येथील एतद्देशीयांचें मॅनीऑक हें मुख्य खाद्य आहे. हे लोक भुईमूग, तंबाखू वगैरेंचीहि लागवड करतात. यूरोपीयन लोक कॉफी, कोको वगैरेंची लागवड करतात. या ठिकाणीं सोनें, लोखंड, व तांबें सांपडतें. रबर, हस्तिदंत, कॉफी, कोको ह्या निर्गत वस्तू होत. कापूस, धातूंचीं कामें व दारू ह्या आयात वस्तू आहेत. ज्या ठिकाणीं मूळचे रहिवाशी प्रत्यक्ष राहातात तेवढी जमीन वगळून बाकी सर्व जमीन सरकार आपल्या मालकीची समजतें.

इतिहास.—पंधराव्या शतकांत पोर्तुगीज शोधकांनीं गाबून शोधून काढिलें. १९ व्या शतकांत तेथें यूरोपियनांनीं व्यापारी वखारी घातल्या. १८३९ त फ्रान्सला गाबूनच्या डाव्या तीरास वसाहत करण्याचा हक्क मिळाला, व १८४२ त उजव्या तीरावरील जागाहि फ्रान्सनें हस्तगत केली. इ. स. १८४९ त लायब्रेव्हिली ठाणें स्थापण्यांत आलें. स. १८६२ त फ्रान्सला केपलोपेझ मिळालें व वसाहतीचा किनारा २०० मैल लांबीचा झाला. स. १८७१ त जर्मनीवरोबरच्या युद्धांत फ्रान्सला वसाहत सोडणें भाग पडलें. स. १८७२-७३ त आलफ्रेड मार्चे या फ्रेंच शोधकानें ओगोवे नदीच्या पात्राचा कांहीं भाग शोधून काढला. डी ब्राझा यानें ओगोवेच्या वरील अंगास ४०० मैल चढून कांगो नदीची शाखा आलीमा शोधून काढली. डी ब्राझा यानें बटेकीज लोकांच्या राजाशीं व इतर सरदारांशीं तह करून बराच प्रदेश फ्रान्सकरितां मिळविला. १८८३ सालीं फ्रान्सनें लोअँगो बंदर काबीज केलें. स. १८८५ ते १८९४ त जर्मनीशीं व स. १८८६ त पोर्तुगालशीं झालेल्या तहनाम्यांनीं फ्रान्सची सत्ता वसाहतीच्या पश्चिम भागांत अबाधित झाली. हळू हळू फ्रान्सनें चॅड सरोवराकडे व नाईलच्या पात्राकडे हातपाय पसरण्यास सुरवात केली. स. १८९१ त युबांगी व संगा या प्रदेशांवरील आपली सत्ता फ्रान्सनें कायम केली. स. १८९५-९७ त फ्रान्सनें युबांगी नदीचा वरील भाग, आपल्या ताब्यांत घेतला. स. १८९९ त ब्रिटिश मुलूख व फ्रेंचकांगोमधील मर्यादा आंखण्यांत आली. स. १९०० त स्पेनचा मुलूख व फ्रेंच कांगोमधील मर्यादा ठरविण्यांत आली, व १९०८ च्या फ्रँको जर्मन करारानें कांगो-कामेरून सरहद्द ठरविण्यांत आली. स. १८८८ त सवंध फ्रेंच मुलुखांची मिळून एक वसाहत करण्यांत आली.

या वसाहतींचे पोटविभाग करण्यांत आले व प्रत्येक विभागावर एक कमिशनर नेमण्यांत आला. स. १९०३ च्या डिसेंबरांत ही व्यवस्था मोडून वाबुन, मिडलकांगो, युबांगीशरी व चॅड असे चार भाग करण्यांत आले. स. १९०६ मध्ये एतद्देशीयांच्या संरक्षणाच्या दृष्टीनें राज्यव्यवस्थेंत बरेच फरक करण्यांत आले. १९१० सालीं फ्रेंच-कांगो हें नांव बदलून फ्रेंच इक्विटोरियल आफ्रिका असें नवें नांव या प्रदेशास दिलें. मोरोक्कोवर आपलें अधिपत्य कबूल करावें म्हणून १९११ सालीं फ्रेंच सरकारनें कांगोचा कांहीं भाग जो जर्मनीकडे दिला होता तो स. १९१९ च्या व्हर्सेलिसच्या तहानें फ्रेंचांना परत मिळाला. १९२४ सालीं फ्रेंचइक्वेटोरियल आफ्रिका व अँग्लो-ईजिप्शियन सूदन यांच्या सरहद्दी ठरविण्यांत आल्या.

राज्यव्यवस्था.—फ्रेंच इक्वेटोरियल आफ्रिका हा प्रदेश गव्हर्नरजनरलच्या ताब्यांत देण्यांत आला आहे. निरनिराळ्या वसाहतींवर लेफ्टनंट-गव्हर्नर आहेत. सबंध फ्रेंचकांगोकरितां साधारण एकच अंदाजपत्रक आहे. प्रत्येक वसाहतीस राजकीय स्वातंत्र्य असतें. कायदेसत्ता फ्रेंच कायदेसभामंडळाकडेच असते. न्यायखातें व अंमलबजावणीखातें हीं वेगळीं आहेत. शिक्षण मिशनऱ्यांच्या हातीं असतें. जमिनीवरील कर, एतद्देशीयांच्या झोंपड्यावरील कर व जकातीचें उत्पन्न या महमुलाच्या बाबी होत.

**फ्रेंच वेस्ट आफ्रिका**—या वसाहतींत (१) सेनेगॉल, (२) फ्रेंच गिनी, (३) आयव्हरी कोस्ट, (४) डाहोमे, (५) फ्रेंच सूदन, (६) अप्पर व्होल्टा, (७) मॉरिटॅनिया आणि (८) नायगर असे आठ भाग येतात. एकंदर क्षेत्रफळ अदमासें १३८४८४५ चौरस मैल आहे.

हा प्रदेश घनदाट अरण्यानें आच्छादिलेला आहे येथील डोंगर साधारण उंच असून सुपीक आहेत. सेनेगाल व नायगरच्या दक्षिणेस साहाराचा वालुकामय प्रदेश लागतो येथील रहिवाशी बहुशः नीग्रो जातीचे आहेत. बरबर व अरब जातीहि दृष्टीस पडतात. अपर सेनेगाल व फुटाजालन येथें फुला लोकांची वस्ती फार आहे. फ्रेंच वेस्टआफ्रिकेची एकंदर लोकसंख्या (१९२४) १२५७९९३१ आहे. सुमारें ८००० लोक परकीय आहेत.

१८९५ सालीं हे सर्व प्रांत सेनेगालच्या गव्हर्नरच्या देखरेखीखालीं देण्यांत आले. स. १८९५ व १९०५ यांच्या दरम्यान क्षेत्रफळाच्या व राज्यव्यवस्थेच्या बाबतींत पुष्कळ फरक करण्यांत आले. सबंध फ्रेंच वेस्टआफ्रिकेवर सध्यां गव्हर्नर जनरल असून तो डाकार येथें राहतो. त्याच्या मदतीस एक मंत्रिमंडळ आहे. त्यांत वडेवडे सरकारी अधिकारी व वसाहतींचे लेफ्टनंट-गव्हर्नर सभासद आहेत. मध्यवर्ति सरकार साम्राज्य-सरकारास जबाबदार असतें. सार्वजनिक कर्जाची जबाबदारी, जमाबंदीवरील ताबा, शिक्षणखात्याचें सूत्रचालकत्व, व सर्वसाधारण लोककल्याणाचीं कामें करण्याची जबाबदारी ह्या सर्व गोष्टी मध्यवर्ति-सरकारच्या हातांतल्या आहेत. सबंध फ्रेंच वेस्टआफ्रिकेकरितां न्यायव्यवस्थेचें केंद्रीकरण व एकीकरण करण्यांत आलें आहे. डाकार येथें अपीलकोर्ट आहे. वर सांगितलेल्या अपवादात्मक बाबींखेरीजकरून पांचहि वसाहती आपापल्या परीनें स्वतंत्र आहेत.

**फ्रेडरिक दि ग्रेट** (१७१२ ते १७८६)— प्रशियाचा पहिला फ्रेडरिक विल्यम ह्याचा हा वडील मुलगा होय. त्याच्या बापानें ह्याला लहानपणापासून लष्करी शिक्षण दिलें. फ्रेडरिक ह्यानें फ्रेंच भाषेंत चांगलें प्राविण्य मिळविलें. स. १७३२ त ह्याला कर्नलची जागा मिळाली व एलिझाबेथ ख्रिश्चानिया हिच्याशीं ह्याचें लग्न झालें. ह्यानें ह्यावेळीं दोन प्रसिद्ध ग्रंथ लिहिले. त्यांपैकीं एका ग्रंथांत राजाचीं कर्तव्यें असून ह्याविषयीं त्यानें असें लिहून ठेविलें आहे कीं " राजा हा राष्ट्राचा पहिला नोकर होय."

इ. स. १७४० त हा राजा झाला. उत्तम फौज व पुष्कळसा पैसा ह्या दोन गोष्टी राज्याचे मुख्य आधार आहेत अशा तत्त्वावर ह्यानें पुष्कळ सुधारणा केल्या. सायलेशियाप्रांत परत मिळविण्यासाठीं ह्यानें खटपट करून इ. स. १७४५ मधील ड्रेस्डेनच्या तहावरून तो प्रांत परत मिळविला.

वयाच्या तेहतिसाव्या वर्षींच हा यूरोपखंडांत अतिशय प्रसिद्ध झाला व जरी राज्यसत्ता त्यानें सर्वतोपरी आपल्या हातांत ठेविली होती तरी " राजा हा राष्ट्राचा पहिला नोकर आहे " हें म्हणणें त्यानें खरें करून दाखविलें. शास्त्रीय अभ्यास, शेतकी व कारखाने ह्यांची ह्यानें पुष्कळ सुधारणा केली. सॅन्सूसी नांवाच्या आपल्या एका राजवाड्यांत हा नेहमीं राहून दिवसाचीं सर्व कामें मोठ्या टापटिपीनें करीत असे. सायलेशिया प्रांत आपल्या ताब्यांत असावा अशा इच्छेनें मेरिआथेरीसा हिनें इतर राष्ट्रांच्या मदतीनें पुन्हां युद्ध पुकारलें हें युद्ध सात वर्षें चाललें. इ. स. १७५९ त कुनर्सडार्फच्या युद्धांत ह्याला हार खावी लागली तरी पण शेवटीं ह्यूबर्टस्बर्ग येथें तह होऊन सायलेशिया प्रांत प्रशियाकडेच राहिला व प्रशिया हें यूरोपांतील बलिष्ठ राज्यापैकीं एक होऊन राहिलें. युद्धामुळें ओढवलेल्या आपत्तीपासून आपल्या प्रजेला मुक्त करण्याकरितां ह्यानें पुष्कळ प्रयत्न केला व लोककल्याणाकरितां कायदे केले. इ. स. १७६४ त रशियाशीं सलोख्याचा तह केला व इ. स. १७८५ त राज्यकर्त्या संस्थानिकांचा संघ तयार केला. अशा रीतीनें अर्वाचीन इतिहासांत फ्रेडरिक ह्यानें चांगलेंच नांव केलें. मरतेसमयीं संस्थानच्या तिजोरींत सात कोटी थेलर (नाणीं) असून २ लक्ष खडी फौज जय्यत तयार होती. प्रशिआच्या संयुक्त संस्थानिक राष्ट्राचा ह्यानें पाया घातला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**फ्रेडरिकस्टॅड**—नॉर्वेमधील बंदर हें पक्का माल तयार करण्याच्या कारखान्यांचें ठिकाण आहे. येथील लोकसंख्या १५००० असून हें ग्लोमेन नदीच्या दोन्ही तीरांवर वसलेलें

आहे. हें नार्वेचें निर्गत मालाचें मुख्य बंदर आहे. येथून इमारती लांकडाची बरीच निर्गत होते. लांकूड कांतण्याच्या व रंधण्याच्या गिरण्यांखेरीज येथें जहाजें बांधण्याच्या गोद्या, कापसाच्या व लोकरी कापड विणण्याच्या गिरण्या आहेत. या बंदरांत १४ फूट पाण्यांत बुडणाऱ्या बोटी येऊं शकतात. जुनें शहर स. १५६७ त दुसऱ्या फ्रेडरिकनें वसविलें. पुष्कळ दिवसपर्यंत हें मजबुत तटबंदीचें ठिकाण होतें.

**फ्रेसनेल, आगस्टिन् जीन** ( १७८८-१८२७ ).— या फ्रेंच रसायनशास्त्रज्ञानें प्रकाशाच्या विकृतीवर एक निबंध वाचून दाखविला (१८१८) तो फार नांवाजला गेला. १८१९ सालीं त्याला समुद्रदीपांचा कमिशनर नेमण्यांत आलें. या प्रकारच्या दीपांकरितां प्रथमतः त्यानेंच आरशांच्याऐवजीं संयुक्त लेन्साचा उपयोग करून दाखविला. थामस यंग यानें प्रकाशाच्या प्रकंपनाचा जो सिद्धान्त प्रयोगानें प्रथमतः बसविला त्याला यानें गणिताचे सिद्धान्त व त्या सिद्धान्तास प्रयोगाची जोड अशा दुहेरी युक्तीनें अत्युत्तम प्रकारची पुष्टि दिली; याकरितां धातूच्या दोन दर्पणांचा त्यानें उपयोग केला होता. वर्तुळाकृति ध्रुवीभूत प्रकाश निरनिराळा करण्याकरितां कांचेचा एक विशिष्ट आकाराचा चौकोनी घन तुकडा त्यानें तयार केला. यास " फ्रेसनेलचा चौकोनी तुकडा " असें नांव पडलें आहे.

**फ्रोइबेल, फ्रीड्रिच विइल्हेल्म आगष्ट** ( १७८२-१८५२ )—एक जर्मन तत्त्ववेत्ता व शिक्षणशास्त्रज्ञ. त्यानें लवकरच शिक्षण सोडून जंगलखात्यांतील उमेदवारी पत्करली व अनेक प्रकारचीं झाडेंझुडपें व दगड यांचें ज्ञान मिळविलें. येना युनिव्हर्सिटींत त्यानें अनेक प्रोफेसरांचीं व्याख्यानें ऐकलीं व अनेक शास्त्रांतील परस्पर संबंध समजून घेण्याचा प्रयत्न केला. अध्यापनाची आवड असल्यामुळें एका शाळेंत नोकरी धरून दोन वर्षे नांवाजण्यासारखी कामगिरी केली. पुढें १८०७ ते १८०९ या सालांत त्यानें खुद्द पेस्टालोझीनें चालविलेल्या शाळेंत तेथील नव्या शिक्षणपद्धतीचें ज्ञान मिळविलें.

पण तेवढ्यानें त्याचें समाधान न झाल्यामुळें शास्त्रांचें उच्च शिक्षण घेण्याकरितां पुन्हां प्रथम गॉटिंजेन व नंतर बर्लिन युनिव्हर्सिटींत अभ्यास केला. १८१३ सालीं त्याला जर्मनांतर्फे लढाईंत भाग घ्यावा लागला, व त्यामुळें शिस्त व सामुदायिक कार्य यांची उपयुक्तता त्याच्या मनावर चांगली ठसली. १८ ६ सालच्या सुमारास फ्रोइबेल यानें लँगथाल व मिडेनडॉर्फ यांच्या मदतीनें एकदोन वर्षे ग्रीशीम येथें व नंतर कीलहौ येथें नूतन शिक्षणपद्धतीनें चवदा वर्षे शाळा चालवून ती चांगली लोकप्रिय बनविली. त्यानें इतर गांवीं शाळा काढल्या स्विस सरकारनें फ्रोइबेलच्या संस्थेंत अनेक शिक्षक पाठवून त्यांना नूतन अध्यापन पद्धतींची माहिती घेण्यास लावलें. या शाळा चालवितांना फ्रोइबेलला असा अनुभव आला कीं, सहासात वर्षांचीं मुलें प्रथम शाळेंत येतात त्यावेळीं तीं अगदीं कच्चीं व अपक्व असतात, कारण या पहिल्या सहासात वर्षांत आईबापांकडून त्यांची अगदीं हेळसांड झालेली असते. पण झाडाप्रमाणें माणसांचीहि वाढ उपजल्यापासून योग्य प्रकारें व्हावयास पाहिजे असें त्याचें मत असल्यामुळें त्यानें एज्युकेशन ऑफ मॅन' ( मानवाचें शिक्षण ) ह्या पुस्तकांत मुख्यतः पहिल्या सात वर्षांत लहान मुलांचें शिक्षण कसें करून घ्यावें याचें विवेचन करून तें १८२६ सालीं प्रसिद्ध केलें. हा शिशुशिक्षणाचा प्रश्न डोक्यांत घोळत असतां त्यांतून त्याची सुप्रसिद्ध " किंडरगार्टेन सिस्टिम " ( बालोद्यानपद्धति ) निघाली. आणि शिक्षकांनां या पद्धतीचें ज्ञान देण्याचा वर्ग चालू केला. पुढें बालोद्यानपद्धतीनें शिक्षण देण्यास पुरुषशिक्षकांपेक्षां स्त्रीशिक्षक अधिक योग्य असें ठरवून त्यानें स्त्रीशिक्षक तयार करण्याकरितां ट्रेनिंगचा वर्ग चालू ठेवला. पण फ्रोइबेल समाजसत्तावादी व धर्मविरोधी आहे असा आरोप करून प्रशियन सरकारनें त्याला नवीन पद्धतीच्या शाळा काढण्याची १८५१ सालीं बंदी केली. त्यामुळें मनाला धक्का बसून लवकरच तो मरण पावला.

पेस्टालोझीनें लहान मुलांच्या ज्ञानग्राहक शक्तीची वाढ करणें हें शिक्षणाचें ध्येय पुढें ठेवलें होतें. त्याच्या पुढें पाऊल टाकून फ्रोइबेलनें, तें शिक्षण मुलांनां मनाला त्रास व जाच न वाटतां स्वेच्छेनें, स्वयंस्फूर्तीनें, व आनंदानें म्हणजे सहज खेळतां खेळतां मिळण्याची व्यवस्था झाली पाहिजे, हें तत्त्व प्रतिपादिलें. अनेक लहान मुलांनां एकत्र जमवून त्यांनां खेळांच्या द्वारें शिक्षण देण्याच्या ज्या शाळा त्यांनांच " बालोद्यानें " म्हणजे लहान मुलांनां वाढविण्याच्या बागा असें नांव त्यानें दिलें. अशा मुलांकरितां अनेक प्रकारचे खेळ किंवा व्यवसाय फ्रोइबेलनें सुचविलेले आहेत. सर्व आयुष्याचा पाया जो मुलाचीं पहिलीं सात वर्षे, त्यांतील शिक्षणासंबंधाचा उत्तम मार्ग दाखवून देऊन फ्रोइबेलनें अखिल मानवजातीवर उपकार करून ठेवले आहेत.

**फ्रौन्हाफर, जोसेफ व्हान** ( १७८७-१८२६ )— एक जर्मन शास्त्रज्ञ. यानें अल्पवयांतच वर्तुळाकृति लेन्सें तयार करण्याचे एक यंत्र तयार केलें होतें; याशिवाय त्यानें दुसरीं कांहीं यंत्रें तयार केलीं होतीं. सन १८१६ मध्यें त्यानें बिनरंगी लेन्सें घेऊन त्यांच्या साहाय्यानें एक सूक्ष्मदर्शक यंत्र तयार केलें होतें. त्यानें कित्येक नामांकित दुर्बिणींच्या कांचा तयार केल्या; अठरा इंच व्यासाचें लेन्स करून देण्याची त्याची तयारी होती. फ्रौन्हाफरच्या रेषा या नांवानें प्रसिद्ध असलेल्या रेषा यानेंच प्रथमतः शोधून काढल्या व त्यानें सूर्य व इतर तारे यांचें ( प्रकाशाच्या साहाय्यानें ) पृथक्करण करण्याच्या युक्तीचा पाया घातला. या रेषांपैकीं सुमारें ५७६ रेषा त्यानें मोजल्या. याशिवाय विकृतिजालाची युक्ति त्यानेंच बसविली.

**फ्लॉरिडा**—उत्तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक संस्थान. याचें क्षेत्रफळ ५८६६६ चौरस मैल असून,

यापैकीं ३८०५ चौरस मैलांचा प्रदेश पाण्यानें व्यापिला आहे. लोकसंख्या (१९१८) ९३८८७०. तल्लाहेस्सी हें राजधानीचें शहर असून याची लोकसंख्या ५०१८ आहे. शेंकडा ४१.६ लोक बॅप्टिस्ट आणि शें. ३७.२ लोक मेथॉडिस्ट संप्रदायाचे आहेत. रोमन कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट, एपिस्कोपेलियन आणि प्रेसबिटेरियन हे अनुक्रमे संख्येनें यांच्या खालोखाल आहेत. प्राथमिक शिक्षण सक्तीचें नाहीं. गोऱ्या आणि नीग्रो लोकांच्या मुलांकरितां वेगवेगळ्या शाळा आहेत. सार्वजनिक शाळांतून धर्मशिक्षण देण्याची व्यवस्था केलेली नाहीं. गरीबांनां मदत करण्याकरितां अनाथगृहें आहेत. १९१८ सालीं ६२४९१५८ डॉलर जमा आणि ५४५१२३८ डॉलर खर्च होता.

पि कें, ख नि ज सं प त्ति आ णि उ द्यो ग धं दे.—तंबाखू, तांदूळ, मका, ओट, वाटाणा हीं मुख्य पिकें आहेत. नारिंगें, पाईनॲपल्स, पीनट्स इत्यादि फळफळावळहि या संस्थानांत पिकते. ओक वृक्षाचें लांकूड इमारतीकामाकरितां बाहेरदेशीं रवाना होतें. संस्थानचा ⅔ भाग मौल्यवान लांकडाच्या वृक्षांनीं आच्छादिलेला असून, त्या वृक्षांच्या लांकडाचा, बोटी करण्याकडे व इमारती कामाकडे उपयोग केला होतो. घोडे, खेचरें, मेंढया, डुकरें, गाई इत्यादि जनावरें फ्लॉरिडांत आढळतात. फ्लॉरिडा संस्थानचा किनारा पुष्कळ लांब असल्यामुळें, जागजागीं मासे मारण्याचा धंदा चालतो. पेनसॅकोला हें शहर या धंद्याचें मध्यवर्ती ठिकाण असून येथून, टर्पेन्टाईन तेल, तंबाखू, कापूस, फॉस्फेट आणि डांबर हे जिन्नस परदेशीं रवाना होतात. खुष्कीच्या मार्गानें किंवा जलमार्गानेंहि व्यापार चालतो. जॅक्सनव्हिले हें मोठें बंदर आहे. ' दि ॲटलांटिक कोस्ट रेल्वे ' व ' दि लुईव्हिले ॲन्ड नॅशव्हिले रेल्वे ' हे आगगाडयांचे फांटे या संस्थानांतून गेले आहेत.

ता. ३ मार्च स. १८४५ रोजीं हें संस्थान संयुक्तसंस्थानांत सामील झालें. १८८६ सालीं ह्या संस्थानाची घटना झाली. ३२ सभासदांचें एक वरिष्ठमंडळ ( सीनेट ) आणि ७५ सभासदांचें एक प्रतिनिधिमंडळ ( हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हज ) असतें. पहिल्या मंडळांतील सभासदांची दर चार वर्षांनीं आणि दुसऱ्या मंडळांतील सभासदांची दर दोन दोन वर्षांनीं नवी निवडणूक होते.

**फ्लॉरेन्स**—हें पूर्वी टस्कनीच्या राजधानीचें शहर होतें. सांप्रत तें इटलींतील एका प्रांताच्या राजधानीचें शहर आहे. हें शहर आर्नो नदीच्या तीरावर असून समुद्रसपाटीपासून १६५ फूट उंच आहे. इमारतींकरितां किंवा फरशी करण्याकरितां लागणाऱ्या दगडाच्या मोठमोठ्या खाणी या शहरांत आहेत. जमीन फार सुपीक असून गहूं, मका आणि दुसरीं बरींच फळांचीं झाडें या शहरांत आहेत. शहरांत बागांचे बरेच असून अनेक तऱ्हेचीं फुलेंहि आढळतात. हिवाळ्यांत थंडी फार असते आणि उन्हाळ्यांत फार कडक ऊन असतें. मार्च महिन्यापासून जुलैच्या आरंभापर्यंत मात्र मनुष्याला मानवेल अशी हवा असते. साधारण उष्णमान ७° पर्यंत असतें. सर्वांत मोठा दिवस पंधरा तास, ३३ मिनिटांचा असतो तर सर्वांत लहान दिवस ८ तास ५० मिनिटांचा असतो. सर्वसाधारण पाऊस ३७॥ इंच असतो. डयूमो नांवाचें एक सुंदर आणि मोठें व दुसरें कँपेनाइल नांवाचें तितकेंच सुबक प्रार्थनामंदिर आहे. बाडिआ, सॅन्टो स्पिरीये आणि सॅन्टमेरिआ नॉव्हेला नांवाचीं तीन प्रार्थनामंदिरें आहेत.

या शहरांतील सडका फार विस्तृत असून त्यांनां मोठमोठाले राजवाडे आणि घराभोंवतालच्या सज्जांनीं जास्त शोभा आली आहे. आधुनिक शहरसुधारणेमुळें आज फ्लॉरेन्सचें ऐतिहासिक महत्त्व आणि कौशल्य मात्र लयास गेलें. फ्लॉरेन्स शहरांत बरींचशीं वाचनालयें आहेत; त्यांत बिब्लिओथिका नॅसिओनेल ( स्थापना १७४७ व ग्रंथांची संख्या ५ लाखांवर ), दुसरें बिब्लिओथिका मारुसेलिआना ( स्थापना पुस्तकें व ग्रंथ संख्या १७५२ १५० हजारांवर ), तिसरें बिब्लिओथिका मेडिसिओ–लॉरेंझिआना ( स्थापना १५७१ व पुस्तकें ११००० ) आणि चवथें बिब्लिओथिका रिकार्डिआना हें असून हें सोळाव्या शतकांत स्थापलें गेलें.

ऐतिहासिक गोष्टी आणि कारागिरी या दोन बाबतींत फ्लॉरेन्सइतकीं प्रसिद्धीस आलेलीं फार थोडीं शहरें सांपडतील. फ्लॉरेन्स येथें चित्रप्रदर्शनाकरितां सुबक आणि विस्तृत असे ३ दालनें आहेत. फ्लॉरेन्स शहरांत पुष्कळ पदार्थसंग्रहालयें आहेत. या संग्रहालयांत हस्तिदन्ताचें आणि अनेक धातूंचें कोरींव आणि नक्षीदार काम आहे. एक संग्रहालय तर असें आहे कीं, त्यांत गेल्यानें पाहणारास सृष्टीचा सर्व इतिहास कळतो. हें शहर सार्वजनिक बागबगीच्यासाठीं फार प्रसिद्ध आहे. एका सार्वजनीक बागेंतील कोपऱ्यांत कोल्हापूरचे श्रीमन्महाराज छत्रपती राजाराम महाराज यांची छत्री आहे. फ्लॉरेन्स शहराची लोकसंख्या इसवी सन १८६१ मध्यें ११४३६३ होती आणि १९०५ सालीं २२०८७९ होती. फ्लॉरेन्स येथें शिक्षण सक्तीचें असून मोफतहि आहे. प्राचीन भाषा शिकण्याकरितां कमी दर्जाच्या ३ आणि उच्च दर्जाच्या ३ शाळा आहेत शिक्षकांच्या शिक्षणाकरितां विद्यालयें आणि उच्च स्त्रीशिक्षणाकरितां एक विद्यालय ( कॉलेज ) आहे. फ्लॉरेन्स हें शेतकीच्या धंद्याचें मुख्य ठिकाण आहे. तेथें दारू, तेल आणि धान्य यांचा मोठा व्यापार आहे. आसपासच्या शेतकऱ्यांनां शेतकीचें सर्व सामान फ्लॉरेन्स येथून पुरविलें जातें येथें चार गिरण्या, कांहीं कांचेचे व लोखंडाचे कारखाने, मोटारगाड्या आणि गवताच्या टोप्या करण्याचे कारखाने व चिनी मातीच्या भांड्यांचा कारखाना आहे. फ्लॉरेन्स हें शहर रोमन लोकांच्या कारकीर्दीत वसवलें गेलें.

मॅरिस आणि सुला यांच्यामध्यें झालेल्या लढाईमुळें फ्लॉरेन्सचें फार नुकसान झालें. फ्लॉरेन्ससंबंधाची पहिली महत्वाची गोष्ट म्हटली म्हणजे इसवी सन ४०५ मध्यें गॉथ लोकांनी या शहराला दिलेला वेढा ही होय. रोमन लोकांचा सेनापति स्टिलोको यानें हा वेढा उठवला. इ. स. ५७० त लॅगोबार्ड लोक फ्लॉरेन्समध्यें आले आणि तेव्हांपासून फ्लॉरेन्सचा लॉंगोबार्ड राज्यांत समावेश झाला. शार्लेमेन हा फ्लॉरेन्स शहरांत स. ७८६ मध्यें आला आणि त्यानें शहरांत पुष्कळ महत्वाच्या सुधारणा केल्या. ११५२ सालीं फ्रेडरिक बारबेरोसा यानें आपली सत्ता टस्कनींत प्रस्थापित केली. ११७६ सालीं फ्लॉरेन्स पुन्हां स्वतंत्र झालें या पुढील इतिहास 'इटली' या लेखांत दिला आहे.

१५३२ त फ्लॉरेन्स परतंत्र बनलें व टस्कनीची राजधानी होऊन राहिलें व यापुढें टस्कनी प्रांताची जी वाट तीच याची झाली. १८६५ त फ्लॉरेन्सला इटली देशाची राजधानी होण्याचा मान मिळाला होता. पण फ्रँको-प्रशियन युद्धांत रोम घेतल्यानंतर तीच राजधानी बनविण्यांत आली.

**फ्लारेस**—हें डचईस्टइंडीजपैकीं जावाच्या पूर्वेकडील एक बेट आहे. या बेटाची लांबी २२४ मैल व जास्तींत जास्त रुंदी ३७ मैल असून क्षेत्रफळ ५८५० चौरस मैल आहे. उत्तर किनाऱ्यावर बारी, रेओ, मॉमेर व गेलिटिंग; पूर्वकिनाऱ्यावर लारेन्टुका व दक्षिणकिनाऱ्यावर सिक्का व एन्डेह हीं खेडीं आहेत. सर्वसाधारण उष्णमान ७७° पासून ८०° अंशापर्यंत असतें. वार्षिक पर्जन्यवृष्टि ४३ ते ४७ इंच असते. राज्यव्यवस्थेकरितां या बेटाचा पश्चिमफ्लारेस हा भाग सिलिबिसला आणि मध्य व पूर्व फ्लारेस हे भाग तिमोरच्या रेसिडेन्सीला जोडण्यांत आले आहेत. येथील लोकसंख्या अदमासें २५०००० असावी. येथील लोक व्यापार, मासेधरणें, मीठ तयार करणें, जहाजें बांधणें व तांदूळ, मका, व ताड यांची लागवड करून आपली उपजिविका करतात. येथें उद्योग व व्यापार फार थोडा आहे. कांहीं पक्ष्यांची घरटीं, तांदूळ, चंदनाचें लांकूड व दालचिनी हा माल सिलिबिस व इतर ठिकाणीं पाठविला जातो. किनाऱ्यावरील लोक मलाया रक्ताचे असून आंतल्या भागांतील लोकांची उत्पत्ति पापुअन वंशापासून आहे. हे लोक उंच, उत्तम बांध्याचे व काळ्याकातडीचे आहेत. हे निव्वळ रानटी लोक असून यांचा धर्म 'एक प्रकारची निसर्गपूजा' आहे.

**फ्लीट, जॉन फेथफुल** (१८४७ १९१७)--एक पौरस्त्यभाषाकोविद आंग्ल पंडित. इंडियन सिव्हिल सर्व्हिस परीक्षा पास झाल्यावर इ. सन १८६५ सालीं त्याची हिंदुस्थानांत नेमणूक करण्यांत आली. त्यावेळीं हिंदुस्थानांत जाणाऱ्या प्रत्येक सिव्हिलियन तरुणास संस्कृत भाषा व संस्कृत वाङ्मय यासंबंधीं पूर्ण ज्ञान प्राप्त करून घ्यावें लागत असे. म्हणून फ्लीटनें संस्कृत प्रोफेसर थिओडर गोल्डस्टकर या विद्वानाजवळ संस्कृत भाषेचें अध्ययन केलें.

इसवी सन १८७२ मध्यें मुंबई इलाख्यांतील दक्षिणभागाचा एज्युकेशनल इनस्पेक्टर ( शाळाधिकारी ) व १८७५ सालीं दक्षिण महाराष्ट्र व कोल्हापूर या भागाच्या असिस्टंट पोलिटिकल एजंटच्या जागेवर त्याची नेमणूक करण्यात आली. नवीन नवीन कामगिरीच्या दिशा निघत होत्या. दक्षिणमहाराष्ट्र प्रांतांत विपुल प्रमाणांत आढळून येणाऱ्या प्राचीन स्मारकावशेषांचें संरक्षण व प्राचीन शिल्पलेखांचें वाचन या गोष्टींची सरकारास अत्यंत आवश्यकता भासूं लागली, व अशारीतीनें प्राचीन शिलालेख संशोधनखातें नवीनच निर्माण करण्यांत आलें व १८८३ सालीं या नवीन जागेवर डॉ. फ्लीट याचीच नेमणूक करण्यांत आली, व अगदीं पहिल्या गुप्त राजांच्या कारकीर्दीतील प्राचीन शिलालेख ज्यामध्यें समाविष्ट करण्यांत येणार होते असा एक प्राचीन शिलालेखसंग्रह तयार करण्याचें काम त्याजकडे देण्यांत आलें. या हुद्द्यावर इसवी सन १८८६ पर्यंत डॉ. फ्लीट हा काम करीत होता, परंतु या वर्षीं ही जागा कमी करण्यांत आली. यानंतर डॉ. फ्लीट याची ज्युनिअर कलेक्टर, सीनिअर कलेक्टर, दक्षिण व मध्य विभागाचा "कमिशनर ऑफ कस्टम्स," वगैरे हुद्द्यावर नेमणूक झाली. १८९७ या वर्षीं त्यानें स्वदेशीं जाऊन ईलिंग या ठिकाणीं कायमचें वास्तव्य केलें व त्याला आपल्या आवडत्या प्राचीन लिपिविज्ञान या विषयाच्या अभ्यासाकडे वळण्यास मुबलक सवड झाली. कांहीं काळपर्यंत तो रॉयल एशियाटिक सोसायटीचा सेक्रेटरी होता व १९१२ सालीं या सोसायटीतर्फे त्यास सुवर्णपदक समर्पण करण्यांत आलें. तो १९१७ च्या फेब्रुवारी महिन्यांत वारला.

डॉ. फ्लीट ह्यानें हिंदुस्थानांत येतांच आपले लेख रॉयल-एशियाटिक सोसायटीच्या मुंबईशाखेच्या नियतकालिकांत प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. त्याची लौकरच भारतीय प्राचीन लिपिशास्त्राचा धुरीण या नात्यानें प्रसिद्धि झाली. जेम्स बर्जेस या धाडसी विद्वानानें १८७२ सालीं "इंडियन अँटिक्वेरी" हें नियतकालिक काढलें, त्यावेळीं डॉ. फ्लीटच्या कर्तबगारीस चांगलाच वाव मिळाला. या नियतकालिकाशी डॉ. फ्लीट याचा संबंध १८८५–१८९२ पर्यंत सुमारें ७ वर्षें होता व या कालांत सर रीचर्ड सी. टेंपल याजबरोबर तो सहकारी संपादकाचें काम करीत असे. डॉ. फ्लीटची पहिली वाङ्मयात्मक कामगिरी म्हटली म्हणजे इंडिया ऑफीसकरितां "पाली, संस्कृत व जुने शिलालेख" यांचा एक संग्रह प्रसिद्ध करणें हा होय.

डॉ. फ्लीट यानें इंडिया ऑफीसमधील शिलालेख नीट तपासून तेथें मूळच्या असलेल्या माहितींतच जास्त भर घातली व १८७८ सालीं पाली, संस्कृत व जुनी कानडी या भाषांतील

शिलालेखांचा संग्रह प्रसिद्ध केला. या ठिकाणीं ही गोष्ट विशेष आश्चर्याची आहे. ती ही कीं द्रव्याभावी या संग्रहाच्या फक्त ९ प्रती छापण्यांत आल्या. यानंतर "गुप्त व त्यांच्या मागाहूनचे राजे यांच्या कारकिर्दीतल शिलालेखांचा संग्रह" प्रसिद्ध झाला. यावरून गुप्त राजघराण्याचा काल इसवी सन ३१९-३२० चा सुमार हा निश्चित झाल्यामुळें प्राचीन इतिहासांतील कालगणनेस कायमची कांहीं तरी ठराविक मर्यादा झाली.

यानंतरचें डॉ. फ्लीटचें महत्त्वाचें पुस्तक "कानडा प्रांतांतील राजघराणीं" हें असून याचा बॉंबे गॅझीटियर, पु. १, भाग २ रा यामध्यें समावेश केला आहे. डॉ. फ्लीटचा मुख्य व्यासंग जरी प्राचीन भारतीय लिपिविज्ञान व कालगणना या विषयासंबंधीं असे तरी त्यानें हिंदुस्थानसंबंधीं महत्त्वाच्या बहुतेक सर्व विषयांवर नवीन माहिती इंडियन अँटिक्वेरी या मासिकाद्वारें वाचकांपुढें मांडली आहे. इसवी सन १८७५ ते १८९१ च्या दरम्यानच्या काळांत डॉ. फ्लीटनें सुमारें ११६ संस्कृत व प्राचीन कानडी भाषेंतील शिलालेख त्यांतील मजकूर व शकगणना यांच्या विवेचनासह पुढें मांडले. १८९९ आक्टोबरच्या १० तारखेला रोम शहरीं पौर्वात्य विद्या विशारदांची जी सार्वराष्ट्रीय परिषद भरविण्यांत आली, तीमध्यें डॉ. फ्लीट यानें भारतीय विषयाच्या विभागापुढें "बनावट भारत-इतिहाससाहित्य" या नांवाचा एक निबंध वाचला व त्याचाच गोषवारा १९०१ च्या इंडियन अँटिक्वरीच्या अंकांत देण्यांत आला. या लेखामध्यें खऱ्या ऐतिहासिक साधनांची छाननी कशी करावी याबद्दल सुंदर विवेचन आहे. १८८४ सालीं डॉ. फ्लीट यानें बरेच परिश्रम करून द्रव्याची पुष्कळ झीज सोसून दिल्ली आणि अलाहाबाद येथील अशोकाच्या विजयस्तंभावरील कोरलेल्या लेखांच्या विश्वसनीय प्रती तयार केल्या. १८८५-१८९१ पर्यंत त्याचें इंडियन अँटिक्वेरीच्या संपादकाचें काम सुरु असून त्यामध्यें डॉ. फ्लीटच्या टीपामागून टीपा व लेखामागून लेख येत असत. पुढें १८९२ ते १९१० पर्यंत तो प्राचीन सुप्रसिद्ध ठिकाणांचीं नांवें व त्या स्थानांच्या सांप्रतच्या जागा निश्चित करणें यासंबंधीं त्याचें लिहिणें चालू होतें. (इंडियन रिव्ह्यू, पु. २२)

**फ्लेमिश वाङ्मय**—(अर्वाचीन) प्राचीन वाङ्मयाचें विवेचन 'डच वाङ्मय' ('डेन्मार्क' पहा) या लेखांत केलें आहे. इ. स. १८३० या वर्षीं बेल्जम हा नेदरलंडपासून विभक्त झाल्यानंतर, फ्लेमिश वाङ्मयाचें पुनरुज्जीवन झालें. इ. स. १८३० या वर्षाच्या पूर्वीपासून जॉन फ्रान्स विल्यम हा फ्लेमिश भाषेचा पुरस्कार करीत होता. पुढें तो जुन्या उत्तम फ्लेमिश पुस्तकांचा संपादक झाला. त्यानें आपलें सर्व आयुष्य फ्लेमिश भाषेचा उद्धार करण्याकडे लाविलें. त्यानें आपल्यासभोंवतीं फ्लेमिश उत्साही तरुण जमविले. इ. स १८५१ या वर्षी फ्लेमिश भाषेची सुधारणा करण्याकरितां विल्यम्सफर्ड नांवाची एक सभा स्थापन झाली. या वरील चळवळीचा असा परिणाम झाला कीं फ्लेमिश भाषा, कायदा व शासनशास्त्र यांत वाढ फ्रेंच भाषेच्या बरोबरीची झाली. पुढें हेन्ड्रिक कॉन्शन्स् या नांवाच्या (१८५४) एका उत्तम लेखकानें, फ्लेमिश व स्पॅनिश योद्धे यांमधील युद्धांचें उत्तम वर्णन करून राष्ट्रांतील चैतन्य जागृत केलें. याशिवाय त्यानें फ्लान्डर्सचा इतिहास, वगैरे दुसरीं पुस्तकें लिहिलीं. नव्या पद्धतीचा पहिला कवि लेडेनेक हा होय, त्याची सर्वांत उत्तम कविता "तीन बहिणी" ही होय. ही कविता ब्रजेस्घेन्ट, अँन्टवर्प या शहरांवर असून त्यांत त्यानें फ्लेमिशपद्धति, भाषा व कल्पना यांचा चांगला पुरस्कार केला आहे. लेडेनेक् यानें फ्रेन्च कायद्यांचेंहि फ्लेमिश भाषेंत भाषांतर केलें आहे. लेडेनेकनंतर जॉन थिओडूर व्हान् टिजस्विक् हा फ्लेमिश भाषेचा मोठा अभिमानी होऊन गेला. त्यानें लोकप्रिय अशा राजकीय व औपरोधिक कविता लिहिल्या. भावनाप्रधान, व अद्भुतप्रिय जॉन, व्हॅन्बीरस्, प्रुडेन्स् व्हॅन् डयझ् व पीटर व्हॅन् वटर्के हॉव्हेन् यांनीं निरनिराळीं पुस्तकें लिहून फ्लेमिश वाङ्मयांत भर घातली. अँन्टवर्प येथील जॅन लॅमब्रेच डेमियर स्लीक नांवाच्या कादंबरीकारानें पुष्कळ कादंबऱ्या व नाटकें लिहिलीं. यानें फ्लेमिश भाषेंतील पहिलें दैनिक वर्तमानपत्र काढलें हा हेन्ड्रिक कॉनशन्सप्रमाणें ध्येयवादी नसून, याच्या पुस्तकांत, व्यवस्थितपणा, व बारीकसारीक गोष्टींकडे लक्ष हीं दिसून येतात. त्याच्या समग्र ग्रंथांचीं १७ पुस्तकें आहेत (१८७७-१८८४). जॅन रेनिअर स्नीडर (१८१२—८८) व अन्टन् बर्गमन्, रोझाली नांवाच्या दोन बहिणी, व्हरजिन लॉव्हेलिंग हे या वेळेचे उत्तम कादंबरीकार व कथालेखक होत. यांच्या पाठीमागून ज्युलिअस रेमंड स्टोनुस्, इसिडॉर टर्लनिक यांनीं कादंबऱ्या लिहिल्या. डिमेटन यानें एक सामाजिक महाकाव्य लिहिलें. त्यानें ५ वा चार्लस यावर असलेल्या काव्याचें भाषांतरहि केलें. ज्युलिअस व्हिल्सटोक यानें लिहिलेल्या गीतांत स्वाभिमान व उदारता हीं दिसून येतात. घेन्ट येथील विद्यार्थ्यांच्या संस्थेचा तो पुढारी असून विल्यम्सफर्ड या संस्थेची प्रगति त्याच्यामुळेंच झाली. व्हॅन अकर या कवीच्या कविता (१८०३-८४) डच पद्धतीवर लिहिल्या आहेत. कोर्टमनुस् (१८११-१८९०) हिची कीर्ति तिच्या काव्यामुळें झाली नसून, तिनें लिहिलेल्या गोष्टींमुळें झाली आहे. दुसरे कवी म्हटले म्हणजे एम्यान्युअल हील (आनंदपर्यवसायी नाटकांचा लेखक), अॅब् ग्वीडो गेझेल (१८३०-९९), धार्मिक कविता लिहिणारा लॅडोविनूक् व डॉटझेनूबर्ग हे होत. मर्कमन् एन गॅझलेन् व चार्लस पॉलिडॉर डी मॉन्ट हे नव्या कवींचे पुढारी होत. मान्ट यानें फ्लेमिश भाषेंत फ्रेन्च लेखकांची लिहिण्याची पद्धत आणिली. दुसरा नव्या कवींतील लेखक पॉल डी मोन्द हा होय.

**व**—या वर्णाच्या पांच अवस्था आढळतात. १ ली–अशोकाच्या गिरनार शिलालेखांत; २ री–कुंडेश्वरच्या लेखांत (इ. स. ६६१); ३ री– प्रतिहार बाउकच्या जोधपूर येथील लेखांत (इ. स. ८३७); ४ थी–जपानांतील होर्युजीच्या मठांत सांपडलेल्या 'उष्णीषविजयधारणी'च्या ताडपत्री ग्रंथांत; व ५ वी–चालुक्य भीमदेवाच्या दानपत्रांत. या शेवटच्या अवस्थेंतील 'व' आणि 'ब' यांत कांहींच भेद नसल्यानें 'व' पासून 'ब' निराळा काढण्यासाठीं त्यांत ('व' च्या गांठींत) एक टिंब देऊं लागले. पुढें याच टिंबाची तिरकी रेघ बनून आजचा ब तयार झाला. [प्राचीन लिपिमाला.]

**वकरगंज जिल्हा**—बंगाल प्रांतांत, डाका भागाचा अगदीं दक्षिणेकडील जिल्हा. क्षेत्रफळ ४५४२ चौरस मैल. उत्तरेस फरिदपूर; पूर्वेस मेघना व शहाबाजपूर या नद्या; दक्षिणेस बंगालचा उपसागर; व पश्चिमेस बलेश्वर नदी व हरिंघाट नांवाचें तिचें मुख.

स्वा भा वि क व र्ण न.—मुख्य जमिनीचा कांहीं भाग व मेघना नदीच्या मुखाजवळचीं बेटें हे प्रदेश मिळून झालेला हा जिल्हा अखंड सपाट पण पूर्वेकडून पश्चिमेकडे व वायव्येकडे किंचित उतरता असून त्यामध्यें भरतीचें पाणी आंत घेणाऱ्या नद्या व कालवे यांचें एक जाळेंच पसरलें आहे. उपसागराच्या किनाऱ्याला सुंदरवन नावाचीं बेटें आहेत. गाळाच्या योगानें तयार झालेली जमीन फार सुपीक असते. वाघ, चित्ते, हरणें, रानटी डुकरें वगैरे जनावरें सुंदरवनात फार आहेत; येथील नद्यांमध्यें सुसरी पुष्कळ असून त्यांच्यापासून लोकांनां फार उपद्रव होतो. एप्रिलपासून सप्टेंबरपर्यंत साधारण उष्णमान ८३° ते ८५° असतें. हिंवाळ्यातील उष्णमान ६७° असून सरासरी वार्षिक पाऊस ८३ इंच पडतो. वकरगंजमध्यें चक्रवात व वादळें फार होतात.

इ ति हा स.–ऐतिहासिक कालापूर्वी वकरगंज हा वंग किंवा समतट नावाच्या जुन्या राज्याचा भाग होता. तेथील लोक होड्यांत रहात असत असें त्यांचें रघुवंशांत वर्णन आलें आहे, व हेच हल्लींच्या नामशूद्र किंवा चांडालांचे पूर्वज होत. विश्वसनीय इतिहास मिळण्यास सुरवात पंधराव्या किंवा सोळाव्या शतकांत होते. बारभुया नावाचा हिंदु जमीनदारांचा संघ चंद्रद्वीप किंवा बाक्ल घराण्यांत होता. हे जमीनदार मागून माधवपास येथें रहात असत; तेथें दुर्गासागर नावाचें त्यांनीं बांधलेलें (?) एक मोठें तळें अद्याप आहे. यांच्या वंशजापैकीं एकाचा, जेसोरच्या प्रतापादित्य राजाच्या मुलीशीं विवाह झाला होता. मुसलमान लोक प्रथम येथें केव्हां आले तें समजत नाहीं. सतराव्या व अठराव्या शतकांत, मघ लोकांनीं या जिल्ह्यावर स्वाऱ्या केल्या. त्याच्यापासून आपलें रक्षण करण्याकरितां बंगालच्या मोंगल सुभेदारानें आपली राजधानी डाका येथें नेली, व औरंगझेबाचा भाऊ शहासुजा यानें सुजाबाद येथें किल्ला बांधिला. अठराव्या शतकाच्या प्रथम भागांत बझूर उमेदपूर हा परगणा अघावकरच्या हातीं आला; त्याच्या नांवावरून बकरगंज या गावाचें व जिल्ह्याचें नांव पडलें. अघावकरच्या मरणानंतर राजनगरचा राजा राजवल्लभ यानें त्याचा मुलुख आपल्या ताब्यांत घेतला व बांडेल आणि गोवें येथून पोर्तुगीज लोकांनां मदतीला बोलावून प्रजेंतील असंतुष्टता मोडली. कंपनीला १७६५ सालीं दिवाणी मिळाल्यापासून येथें ब्रिटिश अंमल चालू आहे.

या जिल्ह्याची १९२१ सालीं लोकसंख्या २६२३७५६ होती; शें. ६८ मुसुलमान असून, शें. ८० लोक शेतकीवर अवलंबून आहेत. पूर्वेकडील उंचवटयाच्या प्रदेशांत ऊंस, द्विदलधान्यें, विड्याचीं पानें व थोडा ताग होतो. इतर भागात मुख्यतः भाताचें पीक होतें.

या जिल्ह्यांत कारखाने फारसे नाहींत. तथापि तेल, जाडेभरडें कापड, पोतीं, सुऱ्या व दुसरीं हत्यारें, चटया वगैरे जिन्नस कामापुरते तयार होतात. तांदूळ, सुपारी, नारळ व इमारती लांकूड हे निर्गत जिन्नस होत. बहुतेक व्यापार कलकत्त्याशीं होतो. मीठ, रॉकेल, दगडी कोळसा, कापड, साखर, तेल व तंबाखू हे मुख्य आयात जिन्नस आहेत. झालकाटी, नलचिटी, दौलतखान व साहेबगंज हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें होत. या जिल्ह्यांत आगगाड्या मुळींच नाहींत व रस्त्यांचा उपयोग मालाची नेआण करण्याकडे फारच थोडा होतो. पण कालवे व नद्या यांचा फार उपयोग होतो. शिक्षणाचा प्रसार बराच झालेला आहे. शेंकडा ७.९ लोकांनां लिहितांवाचतां येतें. शिक्षणाच्या मुख्य संस्था बारिसाल गांवांत आहेत.

**वंकापूर**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्ह्याचा पश्चिम तालुका. क्षेत्रफळ ३४४ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ७७१११. मुख्य गांवें वंकापूर व शिगांव. या तालुक्यांतील हवा निरोगी असते. मुख्य ठिकाण वंकापूर याची लोकसंख्या (१९११) ४२७१. येथें एक मोडकळीस आलेला किल्ला व दोन देवालयें आहेत. राष्ट्रकूट अमोघवर्षाचा (८५१–६९) सरदार वंकेयारस यानें स्वतःच्या नांवावरून या गांवाचें नांव ठेविल्याचा उल्लेख एका जैन लेखांत आला आहे. स. १०७१ त या ठिकाणीं गंग घराण्यांतील उदयादित्य राज्य करीत होता. १७७६ सालीं हें गांव हैदर अल्लीच्या ताब्यांत गेलें.

वंकापूर हें सोळा परगण्यांच्या सरकारचें मुख्य ठाणें होतें असें मराठी दप्तरावरून कळतें. १८०२ सालीं वसईच्या तहान्वयें हें गांव इंग्रजांकडे गेलें. येथें रंगस्वामीचें एक सुंदर जैनमंदिर आहे.

**वकासुर**—एकचक्रानगरीसमीप रहाणारा एक राक्षस. हा जटायूचा पुत्र होता. या नगरीनें वकासुराचा त्रास वांचविण्याकरिता वीस खंडी अन्न व एक मनुष्य रोज देऊं असा त्याच्याशीं करार केला होता. एका ब्राह्मण कुटुंबावर ही पाळी आली असतां भीमानें त्याच्याकडे जाऊन वकासुराला मारिलें. याच नांवाचा दुसरा एक कंसपक्षीय असुर होता. त्याला कृष्णानें मारिलें.

**बकिंगहॅम**—इंग्लंड, एक बाजारपेठ व म्युनिसिपल बरो. हें लंडनच्या वायव्येस रेल्वेनें ६१ मैलांवर आहे. लोकसंख्या (१९२१) ३२३१. सेंटपीटर आणि सेंटपाल नांवाचीं प्रार्थनामंदिरें येथें आहेत. येथें गोठवलेलें दूध व कृत्रिम खत ह्यांचा व्यापार चालतो.

**बंकिमचंद्र चतर्जी** ( १८३८-१८९४ )—एक आद्य बंगाली कादंबरीकार. याचा कान्तलपारा येथें जन्म झाला. त्याचे वडील यादवचंद्र चतर्जी हे मिदनापूर येथें डेप्युटी कलेक्टरच्या हुद्द्यावर होते. हुगळी कॉलेजांत शिक्षण संपादून व १८६२ सालीं प्रेसिडेन्सी कॉलेजांत कायद्याचा अभ्यास करून जेसोर येथें डेप्युटी मॅजिस्ट्रेट या नात्यानें बंकिमचंद्र काम करूं लागले.

' राजमोहन्स वाइफ ' आणि ' ॲडव्हेंचर्स ऑफ ए यंग हिंदू ' अशा दोन गोष्टी त्यांनीं प्रथम इंग्रजी भाषेंत लिहिल्या परंतु पुढें त्यांचें मातृभाषेकडे लक्ष वळलें व आपल्या उत्कृष्ट कादंबऱ्यांनीं त्यांनीं बंगाली भाषेस भूषणास्पद केलें आहे. स. १८६५ ते १८८७ हा त्यांच्या आयुष्यांतील वाङ्मयनिर्मितीचा काळ होय. १८६५ ते १८७० च्या दरम्यान ' दुर्गेशनंदिनी, ' ' कपालकुंडला', व ' मृणालिनी ' या तीन नवलकथा; १८७३ ते १८८२ च्या दरम्यान ' रजनी, ' ' चंद्रशेखर ', ' विषवृक्ष' व ' कृष्णकांताचें मृत्युपत्र '; १८८२ ते १८८७ या काळांत ' आनंदमठ, ' ' देवी चौधराणी ' व ' सीताराम ' या साधारणतः तात्त्विक अशा कादंबऱ्या त्यांनीं लिहिल्या. कमलाकांत, लोकरहस्य, किरकोळ निबंध, ऐतिहासिक निबंध, धार्मिक व तात्त्विक चर्चात्मक निबंध आणि कृष्ण व गीता यांवरील निबंध, अशा तऱ्हेची भर त्यांनीं आपल्या ग्रंथसंपत्तींत टाकली आहे. त्या ग्रंथांपैकीं १४ कादंबऱ्या असून त्यांतील सहा सामाजिक, पांच ऐतिहासिक व तीन मिश्र कादंबऱ्या आहेत.

आनंदमठ, देवी चौधराणी व सीताराम या तीन कादंबऱ्या नीतिबोध व्हावा या दृष्टीनें व हेतूनें लिहिल्या गेल्या आहेत आणि म्हणूनच इतर कादंबऱ्यांत दिसून येणारी प्रतिभेची चमक व हृदयस्पर्शी वर्णनें या तीन कादंबऱ्यांत आढळत नाहींत, स्वतःची उन्नति व त्याचबरोबर राष्ट्रोन्नति करणें हें प्रत्येकाचें आद्यकर्तव्य होय हें तत्त्व वरील नवलकथात्रयींत ग्रथित केलें आहे.

ऐतिहासिक कादंबऱ्या लिहितांना, बंकिमचंद्रांनीं इतिहासकाराचा काटेकोरपणा सोडून दिला आहे. ' राजसिंह ' व ' दुर्गेशनंदिनी ' या त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांस, इतिहासाचें अधिष्ठान आहे; परंतु सौंदर्य व अद्भुतता साधण्याकरितां त्यांनीं इतिहासाच्या मर्यादांचें अतिक्रमण केलेलें आढळतें.

शेक्सपियरचें अनुकरण करून बंकिमबाबूंनींहि, कांहीं तरी असंभाव्य व काल्पनिक अशी सृष्टि निर्माण न करतां प्रत्यक्ष व्यवहारांत आढळणाऱ्या स्त्रीपुरुषांप्रमाणेंच आपलीं पात्रें सजविलीं आहेत. त्यांच्या नायक-नायिकांमध्यें सामान्य मनुष्यस्वभावच दिसून येतो; म्हणूनच त्यांच्या कादंबऱ्या लोकप्रिय झाल्या आहेत. त्यांच्या कादंबऱ्यांचा असा एक विशेष आहे कीं, वाचकास आत्मौपम्यानें त्यांतील व्यक्तीशीं समरस होतां येतें, व परिणामकारक नीतिबोधहि होऊं शकतो. नीतिबाह्य आचरण करणाऱ्यास योग्य शासन झालेलें त्यांच्या कादंबऱ्यांत आटळून येतें.

त्यांच्या सर्व कादंबऱ्या फार लोकप्रिय झाल्या याचें मुख्य कारण त्यांचें कल्पनाचातुर्य व उत्कृष्ट लेखनशैली हें होय. बंकिमबाबूंच्या गद्यांत काव्य आहे व त्यांची भाषा अकृत्रिम, सुबोध व हृदयस्पर्शी अशी आहे. त्यांची शब्दसंपत्ति विपुल असून त्यांच्या वाक्यांत वैचित्र्य आढळतें व एकच धाटणीच्या दोषापासून ते अलिप्त होते असें दिसतें. त्यांच्या लिहिण्यांत प्रेमळ विनोदहि आहे. पडद्याआड राहून चित्रें रंगविण्याची कला त्यांना चांगली अवगत होती. मराठींत संपूर्ण बंकिमचंद्र आणण्याचा प्रयत्न चालू आहे. त्यांच्या कांहीं कादंबऱ्यांचीं इंग्रजींत भाषांतरें झालीं आहेत.

**बॅक्ट्रिया**—हें हिंदुकुश आक्सस ( अमुदर्या ) यांच्यामधील देशाचें नांव असून याची राजधानी बॅक्ट्रा ( आधुनिक बल्ख ) होती. इराणी शिलालेखांत या देशाला बेक्ट्री असें म्हटलें आहे. हा प्रदेश डोंगराळ असून येथील हवा चांगली आहे; जमीन सुपीक आहे. बॅक्ट्रिया हें एक इराणी शाखेचें मूलस्थान होतें. आधुनिक लेखक व्यापक अर्थानें सर्व इराण देशाला बॅक्ट्रिया म्हणत. ह्याच भागांत झरथुष्ट्रानें धर्मस्थापना केली. ह्या धर्माचें पुस्तक अवेस्ता हें जुन्या बॅक्ट्रियन भाषेंत लिहिलें असा पूर्वी समज असे. अलीकडे ही कल्पना नाहींशी होत चालली आहे. त्याचप्रमाणें हें इंडो-यूरोपीय शाखेचें मूलस्थान असल्याची कल्पनादेखील नाहींशी झाली.

इराणी दंतकथांवरून इराणमध्यें पुरातनकाळीं एक मोठें साम्राज्य असावें असा एक तर्क करण्यांत येतो. तसेंच इराणी शेतकरी व तुराणी भटकणारे लोक यांमध्यें नेहमीं युद्धें होत असावीं. त्यावेळीं बॅक्ट्रियांत छोटेखानीं राज्यें असत. असुरियन लोक पूर्वे इराणांत कधींच गेले नाहींत. बॅक्ट्रिया

हा मीडियन साम्राज्याचा भाग होता किंवा नाहीं याविषयीं कांहींच पुरावा नाहीं. तरी पण सायरसनें हा भाग जिंकून याला इराणी साम्राज्यांतील एक प्रांत केलें होतें. अलेक्झांडरच्या हातून पराभूत झालेल्या तिसऱ्या दरायसचा खून करणारा बॅक्ट्रियाचा सत्रप बेसुस याच्या विरोधास न जुमानतां अलेक्झांडरनें बॅक्ट्रिया जिंकून मॅसिडोनियन साम्राज्यास जोडला.नंतर तो लवकरच आशियाचा राजा सेल्युकस याच्या अंमलाखालीं आला. यामुळें बॅक्ट्रियांत ग्रीक शहरें व भाषा यांनां स्थान मिळालें.

सेल्युसिद राजांनां दुसऱ्या टॉलेमीविरुद्ध झगडावें लागल्यामुळें व बॅक्ट्रियाचा सत्रप डिओडोटस हा स्वतंत्र राजा झाल्यानें त्यानें सोगडियांनां जिंकिलें व ग्रीको-बॅक्ट्रियन राज्य स्थापिलें. दुसऱ्या ॲंटिओकसचा रोमन लोकांनीं पराभव केल्यावर युथिडेमस व त्याचा मुलगा यांनीं हिंदुकूश ओलांडून पूर्व इराण व सिंधुतीरचा प्रदेश जिंकला. पुढें या पूर्व ग्रीक साम्राज्याचा नाश अंतःकलहानें व जुलमी पद्धतीनें झाला. डेमेट्रियस जेव्हां बराच दूरपर्यंत हिंदुस्थानांत घुसला तेव्हां यूक्रेटिडीस नांवाच्या त्याच्या सेनापतीनें बॅक्ट्रियाचें राज्य बळकाविलें. इतर प्रांतांतहि अशीच बेंडाळी माजली. अशा रीतीनें स्वतंत्र राजांचीं नांवें हिंदुस्थानांत व अफगाणिस्तानांत सांपडलेल्या नाण्यांवरून समजतात. या वेळेपासून ग्रीक सत्ता व भाषा यांनां उतरती कळा लागली. यावेळेच्या हिंदुस्थानात पाडलेल्या नाण्यांवर प्रसिद्ध हिंदी व ब्राह्मी (जुनी देवनागरी) लिपी आढळते. त्याचप्रमाणें पंजाब व अफगाणिस्तानांत पाडलेल्या नाण्यांवर अरेमाइकपासून निघालेल्या खरोष्ट्री लिपींत लेख आहेत. अशोकाचे लेख व तत्कालीन हस्तलिखित ग्रंथांवरून ही लिपी पश्चिम हिंदुस्थानांत चालू होती असें उघड होतें.

पश्चिमेकडे आर्सेसिद साम्राज्य उदयास आलें. पहिल्या मिथ्रिडेटीसनें कांहीं पश्चिमेकडील जिल्हे घेतले. व उत्तरेकडील सिथियन लोकांच्या उदयास सुरवात झाली. त्यांनीं खि. पू. १३९ मध्यें बॅक्ट्रिया देश जिंकला. हिंदुस्थानखेरीज करून बाकी सर्व ठिकाणची ग्रीक सत्ता नाहीशी झाली. खि. पू. पहिल्या शतकांत पूर्व इराण व पश्चिम हिंदुस्थान यांवर इंडो-सिथियन साम्राज्य पसरलें. यांतील मुख्य कुशान राजघराण्यांतील प्रसिद्ध राजा कनिष्क(१२३-१५३)हा बौद्ध धर्माचा संरक्षक होता.टोकरी व कुशान घराण्यांचें मुख्य ठिकाण बॅक्ट्रिया होतें. तिसऱ्या शतकांत कुशान घराण्याचा ऱ्हास झाला व ३२० सालीं हिंदुस्थानांत गुप्त साम्राज्याची स्थापना झाली. यामुळें कुशान घराण्याकडे फक्त पूर्व इराण राहिलें. पाचव्या शतकांत एफथालिट अथवा श्वेतहूण लोक पूर्वेकडून येऊन त्यांनीं बॅक्ट्रिया घेतलें. यांच्यानंतर तुर्क लोक आले. टोकरी अथवा कुशान येथील लहान राज्यें तुर्कांचीं मांडलिक झालीं. ससानियन साम्राज्याचा विध्वंस अरबांनीं केल्यावर कांहीं वर्षांनंतर बॅक्ट्रिया व सर्व इराण देश खलिफाच्या अमलाखालीं आला ( ज्ञानकोश वि. ३, इराणचें सत्तावर्धन, पृ. ५१ पहा. ).

**बक्सार**—बिहार-ओरिसा, शहाबाद जिल्हा. याच नांवाच्या विभागाचें मोठें गांव. हें गंगेच्या दक्षिण कांठावर असून येथें ई. आय. रेल्वेचें स्टेशन आहे. येथें व्यापाराची मोठी पेठ असून हें ऐतिहासिक स्थळ आहे. यान ठिकाणीं शीरशहानें हुमायूनचा इ. स. १५३९ मध्यें पराभव करून दिल्लीचें तख्त मिळविलें; व इ. स. १७६४ मध्यें हेक्टर मनरो यानें सुजाउद्दौवला व मीर कासीम याचा पराभव करून बंगाल्यांतील बराच प्रदेश काबीज केला. यास पूर्वी ' वेदगर्भ ' असें म्हणत असत.

**बख्तबुलंद**—एक गोंड राजा; हा १७०० सालांत राज्य करीत होता हा दिल्लीस गेला व तेथें यानें औरंगझेबाच्या पदरीं नोकरी धरून त्याची मर्जी संपादन केली. बादशहानें याला मुसुलमान करून बख्तबुलंद या नांवानें देवगडचा राजा केलें. मोंगल राज्यांतील सुधारणांच्या धर्तीवर आपल्या राज्यांत यानें कांहीं सुधारणा केल्या. याच वेळीं नागपूर प्रदेशांत पुष्कळ हिंदु शेतकरी व कुशल कामगार आले. त्यानें या सर्वांस इनामी जमिनी दिल्या. जेंकिन्स म्हणतो कीं ,यानें राज्यामध्यें शिस्त द'खविण्याकरितां हिंदुमुसुलमान हा भेद ठेवला नव्हता. यानें हजारों नवीन खेडीं वसविली आणि शेती, व्यापार वगैरेंची झपाट्यानें वाढ केली.पुढें मराठ्यांचा राज्यकारभार सुरळीतपणें चालण्याकरितां यानें ही पूर्वतयारीच केली होती. हल्लींचे छिंदवाडा आणि बैतुल जिल्हे आणि नागपुर, सिवणी, भंडारा आणि बालाघाट यापैकीं कांहीं भाग इतका त्याचा मुलुख होता. बख्तबुलंद हा देवगड येथेंच राही; यानेंच नागपूर शहर वसाविलें. तेथे पूर्वी कांहीं झोपड्या असून त्या ठिकाणास राजापूर बार्सा असें म्हणत. औरंगझेबाच्या कारकीर्दीच्या शेवटीं मोंगल बादशाही फार दुर्बल झाली होती, याचा फायदा घेऊन बख्तबुलंदनें वर्ध्याच्या दोन्ही बाजूंकडील मोंगल प्रदेश लुटला. या गोष्टीमुळें औरंगझेबानें याचें बख्तबुलंद हें नांव बदलून निगमबुलंद हें नांव ठेविलें. शिवाय शहाजादा बेदरबख्त यास याच्यावर पाठविलें. यापुढील हकीकत नागपूर जिल्हा या लेखांत पहावी. [ इलियट--हिस्टरी ऑफ इंडिया. पु ७. ]

**बगदाद**—इराक, बगदाद प्रांताची राजधानी. हें शहर तैग्रीस नदीच्या दोन्ही तीरावर वसलें आहे. जुनें बगदाद शहर तैग्रीस नदीच्या पश्चिम तीरावर वसले होतें. पूर्व भागांत उत्तरेला असलेल्या दरवाज्यावर एक १२२० सालचा अरबी भाषेंत लेख होता. त्यावरून त्यास ' जादूचा दरवाजा ' म्हणत असत. जुन्या बगदाद शहराच्या पश्चिम भागांत शिया पंथाचे लोक राहतात. या ठिकाणीं दुकानें, बाजार व मशिदी आहेत.पूर्व भाग अथवा नवीन शहर याची रचना पद्धतशीर नाहीं. जून, जुलै व आगस्ट महिन्यांत दक्षिणेकडील वारा सुरू असतो, त्यावेळेस उष्णमान सकाळीं

११२° अंशांवर असून दुपारीं दोन वाजतां १२२° अंश असतें. उन्हाळ्यांत साधारणतः उष्णमान ७५° अंशांपासून १०७° अंशांपर्यंत असतें.

शहरांतील मुख्य इमारती पूर्व भागांत असून नदीकिनाऱ्यावरहि आहेत. उत्तरेला एक बालेकिल्ला असून त्याभोंवतीं मोठ्या भिंती आहेत. खलीफ मोस्टन्सीरच्या वेळेचा फक्त एक मनोरा व त्याच्या भोंवतालच्या भिंतींचा अवशेष आहे. मर्जेनी मशीद मोस्टन्सीर मनोऱ्याजवळच आहे. तिचा कांहीं भाग जुना असून त्यावर चवदाव्या शतकांतील सुबक नक्षीचें काम दृष्टीस पडतें. आग्नेयीकडील भागांत असलेला सुक-अल गझलाचा मनोरा तेराव्या शतकांतील असावा असें वाटतें.

या ठिकाणीं मशिदींपेक्षां कबरी जास्त महत्त्वाच्या गणल्या जातात. बगदादच्या पश्चिमेला तीन मैलांवर नबीयुषा अथवा कोहेनयुषा याची कबर आहे. इराकमधील चार पवित्र क्षेत्रांपैकीं हें एक यहुदी लोकांचें पवित्र क्षेत्र आहे. सुमारें तीस खाने किंवा सराया बगदाद शहरांत आहेत. बगदाद शहरांतील बाजार मोठे व चांगल्या स्थितींत आहेत. परंतु त्यांची रचना सुंदर नाहीं.

हिंदुस्थान, इराण व पश्चिम यांच्या दळणवळणाच्या मार्गावर बगदाद असल्यामुळें पूर्वी त्याला महत्त्व होतें. परंतु सुवेझचा कालवा झाल्यापासून हिंदुस्थानचा व्यापार पश्चिमेशीं परस्पर होतो. यामुळें बगदादचें महत्त्व कमी झालें आहे. हें इराणांतून जाणाऱ्या येणाऱ्या यात्रेकरूंच्या मार्गावर असल्यामुळें बरेच यात्रेकरू येथें मुक्काम करतात. यूरोप, अमेरिका व बगदाद येथील बाजारांत अलीकडे दळणवळण सुरू झालें आहे. त्यामुळें बऱ्याच यूरोपीय वखारींची स्थापना झाली आहे. येथून कातडीं, लोंकर व खजूर इत्यादि पदार्थ परदेशांत जातात. त्याचप्रमाणें तेल, स्वस्त कापड, जोडे व दुसरे पदार्थ, यांची आयात आहे.

येथें ब्रिटिश वकील रहातो. तोच हिंदुस्थान सरकारचा राजकीय प्रतिनिधि असतो. शिवाय येथें एक हिंदी डाकघर आहे. इतर यूरोपीय राष्ट्रांचे वकीलहि येथें आहेत. बगदादची लोकसंख्या सुमारें अडीच लाख आहे.

इतिहास.—मुसुलमानी अंमलपूर्वीचे कांहीं अवशेष बगदाद शहराजवळ आहेत. बगदादच्या पश्चिमेला ९ मैलांवर अकरकुफ नांवाची पडकी इमारत आहे. हिला एक मोठा मनोरा असून जवळपास सांपडणाऱ्या विटांवरील लेखांवरून तिचा संबंध ख्रिस्ती शकापूर्वी १३०० या वर्षी राज्य करीत असलेल्या करीगाल्झु नांवाच्या बाबिलोनच्या राजाशीं असावा असें वाटतें. सध्यां ही इमारत अफुकाफा नांवानें प्रसिद्ध आहे.

जुनें बगदाद शहर अथवा अरब शहर अब्बासीद वंशांतील मनसूर यानें इ. स. ७६२ या वर्षी वसविलें. याबेळेपासून मामूनच्या मरणापर्यंत या शहराची फार झपाट्यानें वाढ झाली. सुंदर रंगीत कापड व रेशीम याबद्दल बगदादची प्रसिद्धि आहे. इ. स. १२५८ मध्यें चेंगीझखानाचा नातू हलगू किंवा हुलकू यानें हें शहर काबीज केलें. तेव्हां अब्बासिद वंशांतील खलिफाची गादी नाहींशी होऊन, मुसुलमानी धर्माचें केंद्र असल्याबद्दलचें त्याचें महत्त्व कायमचें गेलें. १६३८ सालापासून बगदाद हें शहर तुर्की साम्राज्याचा एक घटकावयव होऊन राहिलें. या पुढील इतिहासाकरितां 'इराक' व 'मेसापोटेमिया' पहा.

**बंगनपल्ले**—मद्रास सरकारच्या अमलाखालीं असलेलें कर्नूल जिल्ह्यांतील एक संस्थान. क्षेत्रफळ २५५ चौरस मैल. यांत कुंदेरू व जुरु या नद्या आहेत येथील हवा उष्ण, पण सभोंवतालच्या भागापेक्षां निरोगी आहे. सरासरी वार्षिक पाऊस ३० इंच पडतो.

इतिहास.—इ. स. १७६१ त निजामानें हुसेन अलीखानाला बंगनपलेचा किल्लेदार व फौजदार नेमिलें. त्याच्या पूर्वी महंमद बेगखान हा किल्लेदार होता असें येथील मालकी हक्काच्या कागदपत्रांवरून दिसतें. पुढें लवकरच हा प्रदेश म्हैसूरच्या राज्यांत गेला. ही जहागीर टिप्पूनें कायम केल्याचें व पुन्हां काढून घेतल्याचें त्याच्या पत्रावरून समजतें. स. १८०० त निजामानें मदत-फौजेच्या खर्चाकरितां कर्नूळ व दुसरे जिल्हे इंग्रजांना दिले. त्यावेळीं त्यानें या संस्थानावरील आपला ताबा काढून घेतला; इंग्रजांनीं निजामाच्या विनंतीवरून ही जहागीर असदअलीखान व गुलाम अलीखान यांच्याकडे चालू ठेविली. स. १८६८ त गुलाम महंमद-अली मरण पावला. त्याचा मुलगा फत्तेअलीखान याला वंशपरंपरागत "नबाब" असा किताब मिळाला. सध्यांचे संस्थानिक नवाब मिरफझल अलिखान बहादूर हे १९२२ सालीं गादीवर आले लोकसंख्या (१९२१) ३६६९६. येथें तेलगू भाषा बोलतात.

व्यापार.—निर्गत माल-चोलम्, तूप, कातडी, आंबे, संत्रीं व लाखेनें मढविलेलीं भांडीं व आयात माल-तांदूळ, साखर, कापड, मीठ व राकेल हा आहे. संस्थानचें वार्षिक उत्पन्न (१९२१-२२) तीन लाख ७० हजार रुपये आहे. येथील शिक्षण फार मागसलेलें आहे.

**बंगळूर,** जिल्हा.—म्हैसूर संस्थानचा आग्नेय दिशेकडील जिल्हा. यात कावेरी, पोनैयार व शिमोगा या नद्या आहेत. हवा फार आरोग्यकारक आहे. पाऊस सरासरी ३५ इंच पडतो. मे महिन्यांत येथील उष्णमान ८०° व जानेवारींत ६९° असतें. इ. स. १००४ पर्यंत हा जिल्हा गंग राज्याचा एक भाग होता. पुढें चोळ, होयसळ, विजयानगर, व विजापूर यांच्या अंमलाखालून गेला. हा जिल्हा शहाजीस जहागीर म्हणून दिलेला होता. १६८७ सालीं मोंगलांनीं हा प्रांत जिंकून घेतला व म्हैसूरच्या राजानें मोंगलापासून तो विकत घेतला.

यशवंतपूर येथें १८९१ साली आगस्टस व क्लाडियस या रोमन राजांच्या वेळची चांदीची 'दिनार' नांवाचीं नाणीं सांपडलीं आहेत. जीवर लढाईच्या देखाव्याचें सुंदर खोदकाम आहे अशी शिला बेगूरहून आणून अजबखान्यांत ठेविलेली आहे. हें खोदकाम नवव्या शतकाच्या अखेर केलेलें आहे. टिप्पू सुलतानाच्या राजवाड्याचे अवशेष बंगळूरच्या किल्ल्यांत ठेविलेले आहेत. १९११ साली या जिल्ह्याची लोकसंख्या ७५९५२२ होती. शेंकडा ५४ लोक शेतकी करतात. येथील जमीन तांबूस असून सुपीक आहे. रागी हें मुख्य पीक आहे. बंगळूर शहरांत, लोंकर, कापूस, व रेशमी कापडाच्या गिरण्या आहेत; कौलांचे व विटांचे कारखाने, लोखंडी ओतकाम व तांब्यापितळेचीं कामें करण्याचे कारखाने; आणि दारूगोळा व काडतुसें कमावण्याचे कारखाने असून तसेंच फ्रॉक व पायमोजे विणण्याचेहि कारखाने आहेत. या जिल्ह्यांतील आगगाडीचे सर्व फांटे बंगरूळपासून निघतात.

बंगळूर शहरांत शेंकडा २०.५ लोकांना व इतर भागांत शेंकडा ४.३ लोकांना लिहितांवाचतां येतें. जिल्ह्यांत २ कॉलेजें, उद्योगधंद्याच्या शाळा, व्यापारी व ट्रेनिंग शाळा आहेत. बंगळूरमधील मोठ्या 'व्हिक्टोरिया' रुग्णालयाशिवाय बंगळूर जिल्ह्यांत १६ वर दवाखाने आहेत.

**तालुका.**—या जिल्ह्याचा मध्य तालुका. क्षेत्रफळ ३७५ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) ११९८३६. बंगळूर शहर हें तालुक्याचें मुख्य ठाणें आहे.

**शहर.**—म्हैसूरची राजधानी व हिंदुस्थानी सैन्याच्या बंगळूर ब्रिगेडचें मुख्य ठिकाण. आगगाडीच्या रस्त्यानें बंगळूर हें मद्रासपासून २१९ मैल व मुंबईपासून ६९२ मैल आहे. लोकसंख्या छावणी धरून (१९२१) २३७४९६. बंगळूर शहर किंवा पेटा व सिव्हिल आणि मिलिटरी स्टेशन असे याचे दोन भाग आहेत. पैकीं पहिला भाग म्हैसूर संस्थानच्या व दुसरा ब्रिटिशांच्या ताब्यांत आहे. अलीकडील ५ ।हों वर्षांत विशेषतः १८९८ सालापासून बंगळूर शहरची पुष्कळ वाढ झालेली आहे. येथील म्युनिसिपालिटीची स्थापना १८९२ साली झाली. या शहराचें खरें नांव बेंगळूरु म्हणजे बेंगळू(पावटे)चें गांव (ऊरू) असें आहे.

येलहंकचा संस्थानिक केंपे गौडा यानें बंगळूर स. १५३७ त वसविलें. येथील किल्ला प्रथम मातीचा होता, तो स. १७६१ त हैदरअल्लीनें वाढवून दगडी बांधिला हल्लीं तट पाडून ठिकठिकाणीं रस्ते केलेले आहेत व बहुतेक भाग जमीनदोस्त केलेला दिसतो. राजवाडा, सार्वजनिक कचेऱ्या, लालबाग, सेंट्रल कॉलेज व टाटाची इन्स्टिट्यूट या बंगळूरच्या प्रेक्षणीय इमारती होत शहराच्या पश्चिमेस सुताच्या व कापडाच्या गिरण्या, तेल, साबण विटा वगैरे तयार करण्याचे कारखाने, दक्षिणेकडे रेशमी किड्यांची जोपासना करण्याचे शेत, नैर्ऋत्येकडे दारूचा कारखाना, रेल्वेस्टेशनजवळ लोखंडी ओतकामाचा व एंजिनचे कारखाने आहेत.

ह्या गांवाला पाण्याचा पुरवठा अर्कावतीनदीच्या हेसरघट्ट तळ्यापासून होतो. स. १९०५ पासून शहरांत विजेच्या दिव्यांची सोय केलेली आहे.

**बंगाल इलाखा**—बंगाल प्रदेशाचा स्वतंत्र बंगाल इलाखा ता. १ एप्रिल १९१२ रोजीं करण्यांत आला. तत्पूर्वी बंगाल प्रांतावर लेफ्टेनंट गव्हर्नर होता, सांप्रत गव्हर्नर आहे. इलाख्याचें क्षे. फ. ८२२७७ चौरस मैल व लो. सं. (१९२१) ४७५९१४५ आहे. या इलाख्यांत कुचबिहार व त्रिपूर (टिप्पेरा) हीं संस्थानें येतात; त्यांच्यावर येथील गव्हर्नराचाच अधिकार चालतो. संस्थानाविरहित खालसा मुलुकाचें क्षे. फ. ७६८४३ चौरस मैल आहे. गंगा व ब्रह्मपुत्रा यांच्या कांठच्या सखल प्रदेशाचा यांत समावेश होतो. या नद्यांच्या गाळाच्या मळईची जमीन बनलेली आहे; दाक्षिणेकडे पुष्कळ नद्या-नाले आहेत. उत्तरेस हिमालयपर्वत व त्याचे दार्जिलिंग, जलपैगुरी वगैरे फाटे, व सिकीम, नेपाळ, भूतान संस्थानें आहेत; आग्नेयीस त्रिपूर व चितागांगचे फाटे आहेत; पश्चिमेस छोटानागपूर, बहार व ओरिसा प्रांत, पूर्वेस आसाम व ब्रह्मदेश आणि दक्षिणेस बंगालचा उपसागर आहे. एकंदर प्रांत सखलच आहे, मात्र थेट जलपैगुरीपासून सुंदरवनापर्यंतचा सर्व प्रदेश सुपीक आहे; परंतु प्रदेश सखल व नदीनाल्यांनीं भरलेला असल्यानें आणि नद्यांच्या पुरामुळें पिकांची नेहमीं नासाडी होते.

इलाख्यांत २५४८६१२४ किंवा एकंदर लोकसंख्येच्या शेंकडा ५३.५५ मुसुलमान आणि २०८०९१४८ हिंदू आहेत, बाकीचे ख्रिस्ती, बौद्ध व वन्य लोक आहेत. शेंकडा ९२ लोक बंगाली व शेंकडा ३.८ लोक हिंदी व उर्दू भाषा बोलतात; उडिया भाषा २९८३७२ लोक व नेपाळी भाषा ९३०६० लोक (दार्जिलिंगकडील व जलपैगुरीकडील) बोलतात; पश्चिम आणि उत्तरेकडे संताळ लोक मुंड भाषा बोलतात.

सन १९२१ च्या खानेसुमारीच्या अहवालावरून दिसतें कीं, ३ कोटी ७० लक्ष (किंवा एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ७७) लोक शेतीभाती व शेतावरील मजुरी यांवर पोट भरतात. (शेतकरी ३। कोटी व बाकीचे मजूर). १९२२ सालीं १५५०००० एकरांत तागाची लागवड होती, ती १९२३ सालीं २४४४४०८ एकरांत झाली. उत्तरहिंदुस्थानांत बंगाल हाच तांदुळाच्या पिकाचा मुख्य प्रांत आहे. शेतजमिनीपैकीं शें. ८५ जमीन भाताच्या पेरणीकडे उपयोगांत आणतात. भाताशिवाय गहूं, कडधान्यें, गळिताचीं धान्यें, चणे वगैरे धान्य उत्पन्न होतें. गळिताच्या धान्यासाठीं (१९२३) १४८३७०० एकर जमीन पेरण्यांत आली होती. ऊंस व ताड आणि खजूर यांच्यापासून साखर करतात. तंबाखूहि दरेक जिल्ह्यांत पिकते परंतु तिचा खप स्थानिकच आहे. चहाची लागवड १९२३ सालीं १८०२५८ एकरांत झाली

होती. चहाचे मळे ३२५ असून त्यांतील मजुरांची सरासरी कायमचे १३८६७१ व तात्पुरते७६५९अशी होती.

शेतकीशिवाय या इलाख्यांत, तागाचा, चहाचा व कोळशाच्या उद्योगधंदा विशेष आहे. कलकत्त्याच्या आसपास तागाच्या गिरण्या पुष्कळ आहेत; स. १९२३–२४ मध्यें एकंदर ८३ गिरण्या काम करीत होत्या, त्यांत ४८०९४ माग व १०२५,३४३ चात्या होत्या व ३२३३५४ मजूर होते. कलकत्ता बंदरांतून ५५३००० टन कच्च्या तागाची २१४६.७९ लाख रुपयांची निर्गत झाली(१९२३). तीवरील ९.७२ लाखांची जकात कलकत्ता इंप्रुव्हमेंट ट्रस्टला मिळाली; ही बाब ट्रस्टच्या विशेष उत्पन्नापैकीं एक आहे. कलकत्याच्या एकंदर निर्गत मालांत कच्चा व पक्का ताग निम्म्यापेक्षां अधिक असतो., हिंदुस्थानच्या निर्गतींत कापसाच्या खालीं तागाचाच अनुक्रम लागतो. तागाशिवाय पुढील मुख्य धंदे बंगाल्यांत चालू आहेत--सूत, साधें कापड, रेशमी कापड, हातमागावरील कापड, साखर, गूळ व कागद. कापडाच्या गिरण्या ११–१२ आहेत. रेशमी कापड तयार करण्याचा धंदा सांप्रत बसत चालला आहे. गेल्या सालीं (१९२४) फक्त एकच रेशमाची गिरणी चालू होती व तींत सारे १५८ मजूर कामावर होते. दार्जिलिंग व जलपैगुरी भागांत चहाची लागवड वाढत्या प्रमाणावर होत आहे. या धंद्यांत बहुतेक सर्व यूरोपीय भांडवल असून तें जॉईंट स्टॉक कंपन्यांनीं उभारलें असून त्याची रक्कम ४३ कोटी आहे. सन १९२२ मध्यें एकंदर २८३ कोळशाच्या खाणी होत्या व त्या सालीं त्यांतून४३२८९८६ टन कोळसा निघाला. त्याच्या पूर्वीच्या वर्षी ४२५,९६४२ टन कोळसा निघाला होता व बंगाल–बहार–आसाम–ओरिसा या सर्व प्रांतांतून मिळून स. ११९२२मध्यें १७२८५१६६टन कोळसा निघाला. या सर्व प्रांतांतील या धंद्यांत गुंतलेलें भांडवल (जॉईंट स्टॉक कंपन्यांचें) साधारण ११ कोटी ३७ लक्षांचें आहे. सन १९२२ मध्यें बंगाल्यांत या धंद्यांत मजुरांची रोजची सरासरी ४४८९३ आणि बंगाल–बहार–आसाम–ओरिसा प्रांतांत १६८१५० होती.१९२३ सालीं कागदांच्या तीन गिरण्यांतून १२२२४०४० रुपये किंमतीचा२१६१८टन कागद निघाला.

सन १९२२–२३ मध्यें बंगालचा दर्यावरील व्यापार २ अब्ज ५ कोटी (पैकीं ८५ कोटी आयात व १२० कोटी निर्गत) रुपयांचा झाला, त्यांत शेंकडा ९५ टक्के एकट्या कलकत्ता शहराचा होता.मुख्य निर्गत मालांत अनुक्रमें पुढील वस्तू आहेतः—ताग (पक्का व कच्चा), चहा, लाख, कडधान्यें, कणीक, गळिताचीं धान्यें, व कातडें. आयात मालांत, कापड, भांडीं, साखर, तेलें, गिरण्यांचीं व आगगाड्यांचीं यंत्रें.

बंगालच्या चालू राज्यकारभारास १९२१ च्या जानेवारीपासून आरंभ झाला.पूर्वीचा लेफ्टनंट गव्हर्नर जाऊन त्याऐवजीं गव्हर्नर–इन–कौन्सिल स्थापन झालें व मुंबई, मद्रास यांच्या जोडीला हा प्रांत बसला. मांटफर्डसुधारणाप्रमाणें स्थानिक राज्यकारभाराची पुनर्घटना होऊन कांहीं खातीं, कायदेमंडळांतील लोकनियुक्त सभासदांतून निवडलेल्या दिवाणांच्या हातीं सोंपविलीं. सरकारचे कार्यकारी मंत्री चार व दिवाण तीन असतात. परंतु गेल्या (१९२४) वर्षी कायदेमंडळाच्या अडथळ्यामुळें दोनच दिवाण निवडले गेले व त्यांनांहि, त्यांचा पगार का. मं. नें नामंजूर केल्यामुळें राजीनामे द्यावे लागले. त्यानंतर सोंपीव खातीं सरकारी मंत्र्यांनीं चालविलीं व याप्रमाणें कांहीं दिवस द्विदलराज्यपद्धति (डायार्की) मोडली गेली.

या इलाख्यांत, बरद्वान, राजशाही, डाका, चितागंज व प्रेसिडेन्सी (कलकत्ता) असे पांच प्रांत असून त्यांवर कमिशनर आहेत. त्यांच्या हाताखालीं प्रत्येक जिल्ह्यावर एक कलेक्टर आहे. कांहीं बाबतींत बोर्ड ऑफ रेव्हेन्यू याचा अधिकार कमिशनरांवर असतो. बरद्वान प्रांतांत (बरद्वान, बीरभूम, बांकूर, मिद्नापूर, हुगळी, हौरा) सहा, प्रेसिडेन्सी प्रांतांत (चोवीस परगणे, कलकत्ता, नडिया, मुर्शिदाबाद, यशोहर, खुलना) सहा, राजशाही प्रांतांत (राजशाही, दिनाजपूर, जलपैगुरी, दार्जिलिंग, रंगपूर, बोग्रा, पबना, माल्डा) आठ, डाका प्रांतांत (डाका, मैमनसिंग, फरीदपूर, बाकरगंज) चार, चितागंज प्रांतांत (टिप्पेरा, नौखाली, चितागंज, चितागंज डोंगरीभाग) चार, मिळून एकंदर २८ जिल्हे आहेत. शिवाय कुचबिहार व त्रिपूर हीं संस्थानें आहेत.

कलकत्ता येथें एक हायकोर्ट, पांच प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटांचीं कोर्टे, दोन म्युनिसिपल मॅ. चीं कोर्टे व इतर साधीं कोर्टे आहेत. म्युनिसिपालिटयांचे अधिकार वाढवून त्यांच्या ताब्यांत, जनावरांचे दवाखाने, आरोग्यखातें वगैरे देण्यांत आलें आहे. अद्यापि कमिशनरांचा अधिकार बऱ्याच म्यु. वर चालतो; पाणीपुरवठा व इमारती बांधणें वगैरे त्याच्या नजरेखालीं असतें. खुद्द कलकत्त्याचें कॉर्पोरेशन हें १९२४ च्या ३ च्या कायद्यान्वयें चालतें. त्याचा सर्व कारभार लोकांच्या हातीं आहे. त्याचा मुख्य एक मेयर असून त्याच्या हाताखालीं एक डेप्युटी मेयर, एक एक्झिक्युटिव्ह ऑफिसर व एक डे. ए. ऑफिसर असतो; हे सर्व लोकनियुक्त असतात. एकंदर ८५ सभासद असतात, त्यांतील १० सरकारनियुक्त असतात. मुसुलमानांचा स्वतंत्र मतदारसंघ आहे. कलकत्त्यास एक इंप्रुव्हमेंट ट्रस्टहि असून त्याच्याकडे बहुतेक आरोग्यखातें आहे. प्रांतांतील जिल्हा व स्थानिक लोकलबोर्डाकडे पब्लिकवर्क्स, शिक्षण, दवाखाने दिले असून (खेड्यापाड्यांच्या) यूनियन कमेटयांच्या ताब्यांत रस्ते, पाणीपुरवठा व आरोग्य हीं खातीं दिलीं आहेत; सन १९१९ च्या ५ व्या बंगाल कानूप्रमाणें कांहीं ठिकाणीं ग्रामपंचायती स्थापन झाल्या असून त्यांना खेड्यांतील जातीजातींतील तंटे तोडणें, रस्तेदुरुस्ती, पाणीपुरवठा, रखवाली, आरोग्य,

गांवठी शाळा, दवाखाने वगैरे कामें दिलीं असून, खर्च भागविण्यासाठीं कर बसविण्याचा अधिकार दिला आहे. या ( ग्राम ) चौकीदारी पंचायतींनां व यूनियन कमिटयांनाच यूनियन बोर्ड असें नांव देण्यांत आलें आहे. यांच्याकडेच व्हिलेज बेंचांचें व कोर्टांचें काम सोंपवून त्यांनां कांहीं विशिष्ट मर्यादेपर्यंत निवाडे करण्याचा अधिकार देण्याचा सरकारचा विचार आहे सन १९२३ अखेर २ हजार यूनियन बोर्डें स्थापण्याचें ठरून १४०० च्या वर स्थापिलीं गेलीं.

पब्लिक वर्क्स खात्याकडेच आगगाडीचें खातें दिलें आहे. दोन्हीं खात्यांचा मुख्य, चीफ इंजिनियर आहे. याशिवाय इरिगेशन, मरीन, पोलीस, शिक्षण, मेडिकल वगैरे खातीं आहेत; शिवाय गुप्तपोलीसखातें स्वतंत्र आहे. पंचायती अथवा यूनियन बोर्डाच्या हाताखालीं व्हिलेज पोलीस ( दफेदार व चौकीदार ) असून त्यांचा पगार या पंचायतीकडून ( खेड्यांतून गोळा केलेला ) मिळतो. एकंदर पोलीसखात्याकडे १ कोटी ८३ लाखांचा खर्च होतो. मेडिकल खात्यांत जनरल व डायरेक्टर ऑफ पब्लिक हेल्थ असे मुख्य दोन पृथक् अधिकारी आहेत. खुद्द कलकत्यास २६ दवाखाने असून त्यांतील १० सरकारी खर्चानें चाललेले आहेत. याखेरीज बंगाल इलाख्यांत ९१४ दवाखाने आहेत.

शिक्षणाचें काम सरकार व लोक दोघांचेहि चालू आहे. खुद्द कलकत्त्यास सरकारी तीन (पैकीं एक खास स्त्रियांसाठीं व एक संस्कृत ) कॉलेजें असून, हुगळी, कृष्णनगर, राजशाही, चितागंज येथें एकेक व डाका येथें दोन आहेत. खेरीज तीन ट्रेनिंग कॉलेजें, पांच नॉर्मल शाळा आहेत. ट्रेनिंग कॉलेजांतील शिक्षक दुय्यम दर्जाच्या शाळांतून इंग्रजी ( माध्यमाच्या) च्या द्वारें शिक्षण देतात तर नॉ. शाळांतील शिक्षक देशी भाषेंतून शिकवितात. याशिवाय १ इंजिनियरिंग कॉलेज, २ मेडिकल कॉलेजें, १ व्हेटरनरी कॉलेज, १ व्यापारी विद्यालय, १ कलाशाळा, १ विणकामाची शाळा व बहुतेक जिल्ह्याच्या ठिकाणीं हायस्कुलें आहेत. खुद्द कलकत्यास ४ सरकारी हायस्कुलें आहेत. कलकत्ता, डाका वगैरे ५ ठिकाणीं मुलींचीं ५ हायस्कुलें आहेत. कांहीं कॉलेजें व हायस्कुलें लोकांचीं असून त्यांनां सरकार ग्रँटची मदत देते. तसेंच दुय्यम व देशी शाळांपैकीं बऱ्याच खाजगी आहेत. म्युनिसिपालिट्या व डि. लोकलबोर्डें यांच्या ताब्यांत प्राथमिक शाळा दिल्या आहेत. मागसलेल्या लोकांच्या शाळा मात्र खास सरकारी नियंत्रणाखालीं आहेत. प्राथमिक शाळांतील शिक्षक तयार करणारीं ९५ ट्रेनिंग स्कुलें, सरकार चालवीत आहे. मुसुलमानांच्या शिक्षणासाठीं सरकारच्या हुकमतीखालीं ५ मद्रसे चालू आहेत. थोड्याशा औद्योगिक व यांत्रिक शिक्षणाच्या शाळा डायरेक्टर ऑफ इंडस्ट्रीजच्या ताब्यांत आहेत. याखेरीज मिशनरी लोकांच्या शिक्षणविषयक संस्था पुष्कळच असून त्यांनां सरकार ग्रँटच्या रूपानें बरीच मदत देतें. दरेक म्युनिसिपालिटीस आपल्या उत्पन्नापैकीं एक ठराविक भाग शिक्षणाप्रीत्यर्थ खर्च करावा लागतो. त्यांच्या प्रांतांतील प्राथमिक शिक्षणाची जबाबदारी त्यांच्यावर आहे, तरी पण सरकारकडून त्यांनां मदत मागतां येते. त्यांच्यातर्फे ३ हायस्कुलें व एक कॉलेज चालू आहे. सारांश, १९२४ सालीं आर्ट कॉलेजें ४२, कायद्याचीं ३, मेडिकल ३, इंजिनियरचें १, ट्रेनिंगचीं ५, व्हेटरनरीचें १, दुय्यम दर्जाचीं २६१९, प्राथमिक ४९४२५, स्पेशल २५४६, खाजगी १३५२ असून एकंदर विद्यार्थी २०५७१३८ आहेत. मुसुलमानांचें शिक्षण भिन्न असून त्यांच्यासाठीं खास एक असिस्टंट डायरेक्टर नेमलेला आहे. कलकत्यास स. १८५७ त व डाक्यास स. १९२१ त विद्यापीठें स्थापन झालीं आहेत. कलकत्ता विद्यापीठानें नुक्तीच पोस्ट ग्रॅज्युएट स्कीम सुरू केली आहे.

सन १९२४–२५ च्या बंगाल इलाख्याचें उत्पन्न पुढीलप्रमाणें होतें—एकंदर उत्पन्न १० कोटी ४१ लक्ष ४० हजार असून त्यांत ३ कोटी जमीनमहसूल, एक्साईज २ कोटी १६ लक्ष व स्टँप ३ कोटी ३० लक्ष या उत्पन्नाच्या मुख्य बाबी आहेत. एकूण खर्च १० कोटी १६ लक्ष असून त्यांत पहिला नंबर पोलिसखात्याचा( १ कोटी ८५ लक्ष)आहे व शिक्षणाचा तिसरा ( १ कोटी १६ लक्ष ३५ हजार ) आहे.

इतर इलाख्यांपेक्षां बंगाल्यांत मजुरांच्या संपांचें प्रमाण जास्त निघतें. सन १९२१ मध्यें १५० संप झाले होते. तर १९२२ सालीं ९१ झाले. सरकारी शेतीखात्याकडून तागाच्या लागवडींत सुधारणा चालली आहे. कोऑपरेटिव्ह मंडळ्यांची चळवळ साधारण चालली आहे. त्यासाठीं कांहीं बँका काढल्या आहेत. हातमागाच्या कारखान्यांकडे जास्त लक्ष देण्यांत येत आहे. बंगाल्यांत मलेरिया फार असतो. शिवाय इन्फ्ल्युएन्झा, कॉलरा वगैरे मधून मधून उद्भवतो; मलेरियासाठीं क्विनाईनकरितां साधारण सालीना ५० हजार रुपयांची ग्रँट सरकाराकडून मिळते.

बंगाल्यांत ( १९२२ मार्च अखेर ) ३२२८.१७ मैल आगगाडीचे रस्ते होते. पुढील कालव्यांतून व नद्यांतून नावांनीं व्यापार चालतो; मिदनापूर, हिजली, कलकत्ता, नदिया, मदारीपूर, ओरिसा वगैरे; यांची लांबी ११॥ हजार मैल आहे.

**बंगाली वाङ्मय,** भा पा.—बंगाली ही खालचा बंगाल, अथवा गंगानदीच्या फांट्यामधील प्रदेश व त्यास लागून असलेले उत्तरेकडील व पूर्वेकडील जिल्हे,या प्रदेशांतील भाषा होय. ही भाषा बोलणारे लोक तिला बाङ्ला अथवा बंग भाषा ( बंग किंवा बंग देशांतील भाषा ) असें म्हणतात. यांपैकीं पहिलें नांव बोलण्याच्या भाषेंतील आहे, व दुसरें वाङ्मयांत आढळतें. संस्कृतांत 'वंग' याचा अर्थ पूर्व व मध्य बंगाल असा असून हल्लीं त्या शब्दानें बंगाली भाषा बोलली जाते तो सर्व प्रांत दर्शविला जातो. तंजावर येथील देवालयांतल्या ११ व्या शतकापासूनच्या खोदलेखांत वंगालम्

असा शब्द आहे. त्यावरून अरबी भूगोलकारांनी बंगाला असा शब्द बनवला व त्यावरून फारशी भाषेत घेतलेला 'बंगाल' असा शब्द अबुलफजलच्या ऐने-ई-अकबरी या ग्रंथांत आहे. त्यावरून हिंदुस्थानी भाषेत बंगाली व बंगला अशी विशेषणें बनलीं. बंगला यापासून इंग्रजींत 'बंगलो' म्हणजे बंगालमधील पद्धतीवर बांधलेलें घर अशा अर्थाचा शब्द झाला. पुढील लेखांत बंगाली आणि बंगभाषा हे शब्द समानार्थी वापरले आहेत.

बंगाली भाषा ही बिहार व ओरिसा वगळून बाकीच्या खालच्या बंगालप्रांतांत, छोटानागपूरच्या पूर्वभागांत, पूर्वेस आसाम खोऱ्यापर्यंत, आणि सिल्हेटकाचर या जिल्ह्यांमध्यें बोलली जाते. केओंझर व मयूरभंज या संस्थानांतील कुडमी जातीचे लोक बंगालींत बोलतात. पश्चिमेस सिंघभूम जिल्ह्यापैकीं धलभुमभागांत व मानभुम जिल्ह्यामध्यें, उत्तरेस महानद नदीच्या कांठानें माल्डा व पूर्णिआ या जिल्ह्यांतून वर नेपाळच्या सरहद्दीपर्यंत बंगाली भाषा असून माल्डाच्या पलीकडे बंगाली व बिहारी यांपासून झालेली मिश्रभाषा बोलतात.

इंडो-आर्यन भाषांपैकीं पूर्वेकडील आसामी, बंगाली, उडिया व बिहारी या चार भाषामध्यें सुधारणेच्या दृष्टीनें व भाषा बोलणाऱ्या लोकसंख्येच्या दृष्टीनें बंगाली भाषाच सर्वांत महत्त्वाची आहे. भाषारचनेच्या बाबतींत ती हिंदुस्थानीपेक्षां अधिक प्रौढ आहे. हिंदुस्थानींत विभक्तींचा अर्थ इंग्रजींतील शब्दयोगी अव्ययांच्या पद्धतीप्रमाणें पण शब्दांच्यापुढें अव्ययें जोडून आणतात. क्रियापदाच्या रूपांऐवजीं धातुसाधितें योजतात व सकर्मक क्रियापदांचा भूतकाळ करतांना कर्मकर्तरि रचना करतात. बंगालींत हे सर्व प्रकार नाहींसे होत असून सर्व विभक्तींचे प्रत्यय ठरले आहेत. बंगालींत एकवचनी व अनेकवचनी पृथक्पृथक् रूपें मात्र विशेषशी नाहींत. मनुष्यप्राणीखेरीजकरून इतर सर्व नामांचीं अनेकवचनी रूपें क्वचित आढळतात; अनेकवचनाचा अर्थ समुदायदर्शक शब्द जोडून आणतात; उ० कुत्रे श्वानसंघ. सर्वनामांत प्रथम व द्वितीयपुरुषी एकवचनाचीं रूपें वापरीत नाहींत, फक्त अतिपरिचय किंवा तिरस्कार दाखविण्याकरितां मात्र वापरतात. तृतीयपुरुषी एकवचन निर्जीव पदार्थांचें किंवा सन्मानरहित इसमाच्या बाबतींत योजतात. क्रियापदांतहि एकवचनी व अनेकवचनी रूपें निरनिराळीं होत नाहींत. अनेकवचनी रूपें सरसकट वापरतात; व निंदाव्यंजक म्हणून मात्र एकवचन योजतात.

आजकालचें बंगाली वाङ्मय हें १९ व्या शतकांत तयार झालेलें आहे. "ज्या परिस्थितींत बंगाली भाषेची वाढ झाली ती चांगली नव्हती. प्राकृतांतून निघालेल्या भाषांपैकीं ही अगदीं अलीकडील असून मोंगल साम्राज्याच्या ऱ्हासकालापासून ती वाढूं लागली. इतर प्रांतांपेक्षांहि बंगालमध्यें सामान्य जनता व विद्वान पंडित यांच्यामध्यें फार अंतर! त्यामुळें सामान्य जनतेची बोलण्याची भाषा निराळी असून तीहि थोडथोड्या मैलांच्या अन्तरानें बदलत गेलेली आहे; दुसरी वाङ्मयाची भाषा; ती छापील पुस्तकांच्या द्वारां संस्कृत जाणत्या सुशिक्षित लोकांतच मात्र प्रचलित आहे. हुगळी येथें ब्रिटिश वसाहत झाल्यापासून पूर्वे हिंदुस्थानांत जी विद्येच्या पुनरुज्जीवनाची चळवळ सुरू झाली तीमुळें ती निर्माण झालेली आहे. आरंभीं ती भाषा तुटपुंजी होती; मोंगली अंमलाखालीं तिची पूर्ण हेळसांड झालेली होती; विद्वानांचें तिजकडे बिलकुल लक्ष नव्हतें. पुढें विद्येचें आगर जें कलकत्ता शहर तेथें जुन्या बंगालीलाच संस्कृत भाषेच्या मदतीनें भव्य व सुंदर स्वरूप देण्याचा प्रयत्न सुरू झाला; अलीकडील दळणवळणाच्या जरूरीप्रमाणें तिच्यांत संस्कृतमधून शब्दसंग्रह व वाक्यरचना या दोन्हीं बाबतींत भर घालण्यात आली. पण स्विफ्टनें म्हटलें आहे कीं, "भिक्षेवर अवलंबून राहणारा सदा दरिद्रीच असावयाचा, त्याप्रमाणें बंगालीला संस्कृतचें पौष्टिक अन्न न पचवितां आल्यामुळें तिची वाढ खुंटल्यासारखी झाली. नेहमीं आईच्या कडेवर बसून हिंडल्यामुळें पांगळे बनलेल्या मुलाप्रमाणें बंगाली भाषेत स्वतःच्या पायावर उभें राहण्याचें अवसान कधींच आलें नाहीं."

संस्कृतमधून घेतलेल्या शब्दांच्या उच्चारासंबंधानें बंगालींत असली चमत्कारिक स्थिति आहे कीं, तशी जगांतल्या इतर कोणत्याहि भाषेत आढळत नाहीं. बंगालीचा पूर्वेतिहास थोडक्यांत असा आहे—ऋग्वेदांतल्यासारखी भाषा हिंदुस्थानांत आर्यलोक बोलत असत त्याच काळांत मूळचे येथील रहिवाशी दुसरी एक भाषा बोलत असत; तेच लोक पुढें पूर्वेकडे सरकून ख्रि. पू. २५० च्या सुमारास ते बिहार व ओरिसा प्रांतांत राहूं लागले. अशोक राजाच्या कारकीर्दीतील शिलालेखांत ती भाषा आढळते, तिला मागधी म्हणत असत. प्रथम तिचें संस्कृतशीं बरेंच साम्य होतें. पण पुढें दोहोंत फार फरक पडला. शब्दांचीं संस्कृत रूपें विगलित होऊन अवघड जोडाक्षराऐवजीं पृथक् एकेरी अक्षरें येऊं लागलीं. अशोकानें ही प्रचलित भाषाच आपल्या शिलालेखांत वापरली. नंतर इ. स. च्या १२ व्या शतकांत हेमचंद्रादि व्याकरणकारांच्या ग्रंथांत हीच भाषा आढळते. पण या मध्यंतरीच्या काळांत शब्दाच्या उच्चारांत व त्याबरोबरच लेखनांत पुष्कळ फरक झाला हें हेमचंद्राच्या ग्रंथांवरून स्पष्ट दिसतें. संस्कृत लक्ष्मीच्या ऐवजीं लक्खी असा सोपा शब्द आला; सागरबद्दल शागर, वाद्यबद्दल वज्झ अशीं रूपें झालीं. पुढें या मागधीपासून बंगाली भाषा निघाली यांत संशय नाहीं. हल्लींहि बंगाली लोकांना क्ष, स, द्य वगैरेंचे उच्चार बरोबर करतां येत नाहींत. आजचे संस्कृतज्ञ बंगाली लोक लक्ष्मी, सागर, वाद्य वगैरे शब्द शुद्ध संस्कृतांतल्यासारखे लिहितात, पण त्यांचाच उच्चार मात्र मागधींतल्यासारखा करतात. याप्रमाणें लिहितात एक व बोलतात

वाचतात एक, असला अद्भुत चमत्कार दृष्टीस पडतो. याचा परिणाम असा झाला आहे कीं, तिऱ्हाइताला बंगालींतील उच्चार समजणें फार अवघड होऊन बसतें. इंग्रजींतल्यासारखाच हा प्रकार आहे. अलीकडच्या बंगालींत संस्कृत शब्दांचाच बहुतेक भरणा आहे; पण उच्चार मात्र लिखिताक्षरांप्रमाणें फारच थोड्या शब्दांचे आहेत. अनेक शतकांच्या संवयीमुळें खुद्द बंगाली लोकांनांहि संस्कृत शब्द शुद्ध उच्चारण्यास फार प्रयास पडतात हीच गोष्ट बाबू श्यामचरण गांगोली यानीं कलकत्ता रिव्ह्यू ( इ. स. १८७७ ) मधील एका लेखांत स्पष्ट केली आहे.ते म्हणतात, " लेखी बंगाली व तोंडी बंगाली यांच्या व्याकरणांत फार फरक आहे. प्रत्येकाच्या परिचयांतले शब्द लिहिलेले वाचतां येण्याकरितां त्यांचीं मूळ संस्कृत रूपें शिकावीं लागतात. शिवाय कित्येक बंगाली शब्द बोलण्यांत येत नसले तरी लिहिण्यांत येत असतात तेहि शिकावे लागतात. बंगाली पुस्तकांतले संस्कृत शब्द दिसण्यांत संस्कृत दिसतात; पण त्यांचा उच्चार कानांना मात्र निराळा लागतो कारण ते शब्द शुद्ध संस्कृतांतल्यासारखे लिहितात, पण उच्चार मात्र बंगालींतल्यासारखे अशुद्ध करतात; व त्यामुळें बंगाली भाषा माहीत नसणाराला ते मुळींच समजत नाहींत.

बंगालीच्या पोटभाषाः—यांचा अभ्यास कोणीहि बंगाली विद्वानानें केलेला नाहीं. इंग्रज विद्वानांनीं प्रयत्न केला आहे, परंतु ते स्वतः परकी असल्यामुळें त्याचे प्रयत्न पूर्ण यशस्वी होणें शक्य नाहीं. या पोटभाषांचे प्रथम दोन विभाग पडतात. एक सुशिक्षितांची भाषा, व दुसरी अशिक्षितांची; पहिली सर्व बंगालभर बोलण्यांत व लेखनांत सारखीच आहे. तींत संस्कृत शब्द, म्हणी, रूपें पुष्कळच येतात. अशिक्षितांच्या भाषेंत संस्कृताची मिसळ फारच कमी असून व्याकरणाचे नियमहि अगदीं निराळे आहेत. ही बोलण्यातील भाषा थोड्या थोड्या मैलांच्या अन्तरानें बदलत गेलेली आहे. पैकीं पश्चिमेकडील मानभुमच्या दक्षिणेकडील डोंगराळ प्रदेशांतील रानटी जाती खरिआ-ठार नांवाची भाषा बोलतात; व संतल परगण्यांत मालपहारिआ, लोहर्दगाचे जैन सराकी, व बिहारच्या सरहद्दीवर कोच व सिरिपुरिआ इत्यादि भाषा आहेत.

बंगालच्या पूर्व भागांत रंगपूर व शेजारचे प्रांत यांत राजबंगशी,दार्जीलिंग-तराई येथें वाहे, सुर्मादरी, व मैमनसिंग प्रांतातील हलक्या जातींत हैजोंग, व चितगांव प्रदेशांत चाकमा इत्यादि भाषा बोलतात.

बंगाली लोक बुद्धिमान व चांगले सुशिक्षित असून हिंदुस्थानच्या अगदीं कानाकोपऱ्यांतून सुद्धा कारकुनीच्या पेशांत किंवा उच्च प्रकारच्या धंद्यांत असलेले आढळतात. यामुळें बंगाली भाषा इतर प्रांतांतूनहि पसरलेली आहे.

वाङ्मय, प्रास्ताविकः—बंगाली भाषा व लिपी या १००० हजार वर्षांपूर्वींच्या असाव्यात असें अनेक विद्वानांचें मत आहे. गौतमबुद्ध हा अंगलिपि, वंगलिपी, ब्राह्मी, सौरष्ट्री व मागधी इतक्या लिपी विश्वामित्र गुरूपाशीं शिकला असल्याबद्दल ललितविस्तर ग्रंथांत उल्लेख आहे.

बंगाली वाङ्मयाच्या वाढीचीं तीन कारणें सांगतां येतातः ( १ ) मुसुलमानी अम्मलाची स्थापना,( २ ) पौराणिक वाङ्मयाचें पुनरुज्जीवन, व(३) बंगाल्यांतील वैष्णव संप्रदायप्रसाराची जंगी चळवळ. दिनेशचंद्र सेन यानीं बंगाली वाङ्मयाचे इतिहासदृष्ट्या तीन भाग पाडले आहेत तेः— ( १ ) मुसुलमान पूर्वकालीन वाङ्मय, ( २ ) मुसुलमानी राजवटींतील वाङ्मय, व ( ३ ) इंग्रजी राजवटींतील वाङ्मय. ह्या तीन विभागांचा परस्परसंबंध काय, प्रत्येक विभागांत कोणकोणत्या स्वरूपांत वाङ्मयाची वृद्धि झाली व आजचा दर्जा प्राप्त होण्यास बंगाली वाङ्मयास कोणकोणत्या परिस्थितींतून संक्रमण करावें लागलें इत्यादि गोष्टींकडे वळलें पाहिजे.

## मुसुलमान पूर्वकालीन वाङ्मय

बं गा ली वा ङ्म या व र झा ले ले पू र्व सं स्का र.—बंगालदेश हें आर्य लोकांच्या अत्यंत प्राचीन वसाहतींचें केंद्र होय असें विधान दिनेशचंद्रसेन व इतर कित्येक ग्रंथकारांनीं केलें आहे. या विधानात लेखकाच्या देशाभिमानापलीकडे कांहीं नाहीं. ऐतरेय *आरण्यक*, *रामायण*, *महाभार*तादि प्राचीन ग्रंथांत ' *वंग* ' देशासंबंधीं उल्लेख आले आहेत. मनुसंहितेंतील—

आसमुद्रात्तु वै पूर्वादासमुद्रात्तु पश्चिमात् ।
तयोरेवांतरं गीर्यो आर्यावर्तं विदुर्बुधाः॥

या श्लोकावरून बंगाल प्रांत प्राचीन काळीं आर्यावर्तांतच मोडत होता असें सिद्ध होत नाहीं. बंगाल प्रांत हा अत्यंत प्राचीन काळापासून आर्यसंस्कृतीचा जोर येथें कमी पडल्यामुळें स्थानिक रानवटपणा बराच कायम राहिला व नव्या प्रकारच्या धार्मिक चळवळी व कल्पना त्यांचें ग्रहण करण्यास बराच अनुकूल प्रदेश झाला असें दिसतें. एकेकाळीं नुकत्याच स्थापन झालेल्या बौद्ध व जैन धर्मांनीं बहुतेक जनसमूहावर प्रथम छाप बसविली ती ह्याच बंगदेशांत; मगधामध्यें कल्पना निघावी आणि बंगांनीं ती घ्यावी असा प्रकार असे. शांतरक्षित, शीलभद्र वगैरेंसारखे बौद्ध यती व महावीरासह अनेक मोठमोठे जैन तीर्थंकर यांनीं मगधभूमींतच जन्म घेऊन नवीन नवीन धर्मकल्पना बंगलोकसमूहास ज्ञात केल्या. बरींच शतकें बंगदेशीय वातावरण प्राचीन हिंदु धर्मास विघातक होतें. म्हणूनच—

अंगबंगकलिङ्गेषु सौराष्ट्रे मागधेषुच
तीर्थयात्रांविना गच्छन् पुनः संस्कारमर्हति ।

हा श्लोक निर्माण झाला असावा. त्याचप्रमाणें आनंदतीर्थांनीं ऐतरेय आरण्यकावरील आपल्या प्रसिद्ध भाष्यांत

" वंग देशांत राक्षस पिशाच्चादिक राहतात " अशा केलेल्या उल्लेखाचीहि उपपत्ति नीट लागते. कारण बराच काळ बौद्ध-जैन, धर्मांच्या ह्या प्रांतांत झालेल्या भरभराटीमुळें वैदिक धर्म अजीवात मृतप्राय स्थितींत होता.

दहाव्या शतकाच्या उत्तरार्धात बौद्ध ग्रंथकारांनीं त्यावेळीं प्रचलित असलेल्या ' गौड प्राकृत ' भाषेंत ग्रंथरचना करण्यास सुरवात केली. ह्याच भाषाभेदास बाराव्या शतकांत होऊन गेलल्या व्याकरणनिष्णात कृष्णपंडितानें " पैशाची प्राकृत " हें नांव देऊन ह्या भाषेसंबंधीं घालून दिलेले कांहीं विशिष्ट नियम ( उदा॰ र आणि ण या वर्णांचे ल आणि न हें रुपांतरः ' य ' चा उच्चार ' ज ' प्रमाणें; श, ष, स या तीन शकारांबद्दल फक्त एक 'श' चाच उपयोग इ. ) अद्यापपर्यंतहि आजच्या बंगाली भाषेस लागू पडतात.

परंतु पुन्हां ब्राह्मणी धर्मस्वाचें पुनरुज्जीवन होतांच बंगाली वाङ्मयाचा आधार नाहींसा होऊन त्यावेळीं बरेचसे ग्रंथ नेपाळ, ब्रह्मदेश, जपान, चीन, कोरिया इत्यादि लांबच्या दूर प्रदेशांत गेले. कारण संस्कृताभिमानी जनता नेहमीं प्राकृत भाषेविषयीं उदासीन राहते. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं राजा राममोहनराय ह्या सुधारकाग्रणीच्या प्राचीन धर्माभिमान्यांशीं झालेल्या वादावरून देखील हीच गोष्ट सिद्ध होते.

परंतु अशा रीतीनें संस्कृताभिमानी पंडितांनीं,इतकेंच नव्हे तर बंगाली भाषेंतील नुतन ग्रंथकारांनीं देखील धिक्कारलेल्या बंगाली भाषेस हिंदु राजदरबारांत मान्यता कशी मिळाली ह्याची माहिती फारच मनोरंजक आहे. परंतु तत्पूर्वी ह्या कालच्या बंगाली म्हणून मानलेल्या वाङ्मयाचा आढावा घेणें इष्ट आहे.

श्रीयुत दिनेशचंद्र सेन यांनीं आपल्या बंगाली भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास या ग्रंथांत मुसुलमानपूर्वकाळीं तयार झालेल्या वाङ्मयाचें पुढीलप्रमाणें वर्गीकरण केलें आहे, तें:—(१) उपदेशपर वाक्यें व म्हणी, (२) धर्ममङ्गलकाव्यें, (३) बौद्धधर्मांतील तंत्रस्वरूपाच्या आधारें रचलेलें गूढसांप्रदायिक वाङ्मय, (४) पाल राजासंबंधीं गाणीं व (५) प्राचीन वंशावळींचे लेख.

उपदेशपर वाक्यें व म्हणी.—ह्या मुसुलमानपूर्वकालीन बंगाली वाङ्मयावर बौद्ध विचारपरंपरेची छाया पडलेली आहे. ह्या प्राचीन काळांतील बंगाली वाङ्मयाचा नमुना दाखविणारें 'डाकार्णव' नांवाचें उपलब्ध झालेलें लिखाण इ. सनाच्या १० व्या शतकांतील असावें. दुसरें ' खाना ' नांवाचें असेंच एक प्राचीन लिखाण आहे, व हीं दोन्हीं पुस्तकें सामान्य लोकसमुदायास 'डाकेरवाचन' व 'खानारवाचन' ह्या संज्ञेनें परिचित आहेत. ह्या अतिप्राचीन लिखाणाइतकीं सामान्य जनसमूहास आतांपर्यंत प्रिय अशीं कोणतींच पुस्तकें उपलब्ध नाहींत. 'डाकेरवाचन' याचा कर्ता 'डाका' गवळी असावा असें दिसतें, परंतु 'डाकार्णवतंत्र' या नांवावरून तें बौद्ध परंपरेपैकीं असावें हें उघड आहे. यामध्यें तत्कालीन ज्योतिष, आयुर्वेद, शेतकी वगैरेसंबंधीं पुष्कळ माहिती आहे. मधून मधून हिंदु समाजास अपरिचित असे बौद्ध विचारहि आले आहेत. उदाहरणार्थः—

भाल द्रव्य यतन पाव । कालिकारे तूलिया ना थोव ॥
दधि दुद्ध करिया भोग । औषध दिया खगुव रोग ॥
बले डाक एइ संसार । आपने मइले किंसेर आर ॥

या पद्यांतील विचारसरणी पुढीलप्रमाणें आहे—" खाण्याकरितां आपणांस उत्तम प्रकारचे पदार्थ मिळाले असतां उद्यांकरतां त्यांचें रक्षण करून ठेवणें शहाणपणाचें नाहीं. दूध दही खा, मजा करा, रोग झाला तर औषधाची योजना करून बरे व्हा; कारण, डाक म्हणतो कीं, मनुष्य मृत झाला कीं त्याचा या जगाशीं असलेला संबंध तुटलाच" ही विचार सरणी

यावज्जीवेत्सुखं जीवेदृणं कृत्वा घृतं पिबेत।
भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः॥

या श्लोकांतील चार्वाकमतानुयायाच्या विचारसरणीशीं जुळती नाहीं असें कोण म्हणेल. त्याचप्रमाणें स्त्रीस्वभावाचें सुक्ष्म निरीक्षण देखील 'डाकेरवाचन' यामध्यें उत्तम प्रकारें दृग्गोचर होतें. पुढील उतारा ह्याचपैकीं आहे—

घरे स्वामी बाइरे बइसे । चारी पाने चाहि मूचकी हासे
हेन स्त्रीयें याइार बास । ताहार केन जीवनेर आश ॥

" भर्ता घरांत आहे. व स्त्री बाहेर बसून चारी दिशांकडे बघून हास्य करीत आहे डाक म्हणतो कीं,अशा स्त्रीसह कालक्रमणाऱ्या नवऱ्याचें जीवित सुरक्षित नाहीं. "

सहदेव-भाडळीच्या पद्यांप्रमाणें 'खानारवाचन' हें पुस्तक शेतकरीवर्गास फारच उपयुक्त व आवडणारें आहे, कारण हजारों शेतकऱ्यांनीं ह्यांतील उपदेशपूर्ण म्हणी मार्गदर्शक करून घेतल्या आहेत. बंगाल प्रांतांतील जमीनी, तेथील ऋतु, हवामान वगैरे गोष्टींच्या अनुरोधानें केलेलें सूक्ष्म निरीक्षण ना पुस्तकांत जागोजाग आढळतें. उदाहरणार्थ.—

यदि वरे आगने । राजा नामेन मागने ॥
यदि वरे पौषे । कडि हय तूषे ॥
यदि वरे माघेर शेष । धन्य राजार पुण्य देश ॥

आग्रहायण मासांत पाऊस पडेल तर राजा भिकेला लागतो, पौषांत पडेल तर भूसदेखील वाटेल तितका पैसा आणील व माघ महिन्याच्या शेवटीं पडेल तर तो राजा व त्याचा देश हे अत्यंत सुखी होतील. )

रहाण्याचें घर कशा प्रकारें बांधावें ह्याच्याबद्दल पुढील नियम दिला आहेः—

पूर्वे हाँस । पश्चिमे बाँश ।
उत्तोरे बाग । दक्षिणे फाँक ॥

" पूर्वेच्या बाजूस हंस असावेत म्हणजे एखादें हंस क्रीडा करीत असलेलें तळें असावें, पश्चिमेला कळकीचें वन, उत्तरेला उत्तम बगीचा व दक्षिणेची बाजू मोकळी असावी. "

ह्याप्रमाणें 'डाकेरवाचन' व 'खानारवाचन' यांतील विषयांचें स्पष्टीकरण पुष्कळ करतां येईल. याशिवाय इतरहि पुष्कळ विषय या पुस्तकांतून आले आहेत.

धर्म मंगल काव्यें.—' धर्ममंगल काव्यें ' हींहि बंगाली काव्यवाङ्मयांतील अतिप्राचीन होत. या काव्याच्या उत्पत्तीचें मूलकारण म्हणजे 'धर्मठाकूर' नामक देवतेच्या उपासनासंप्रदायाचा बौद्धधर्माच्या अस्तकालांत झालेला प्रसार होय. वस्तुतः 'धर्म' देवतोपासना हे बौद्धधर्मांचेंच सामान्य जनांनीं स्वीकारलेलें स्वरूप होय, इतकेंच नव्हे तर 'धर्म ठाकूर' हा बुद्ध, धर्म, आणि संघ या बौद्धधर्मीय देवत्रयांतील एक होय. रामय्या पंडितांचें 'शून्यपुराण', कानूभट्टकृत ' चर्याचर्यविनिश्चय ' आणि इतर धर्ममंगलकाव्यें, त्याच प्रमाणें पालवंशीय राजांच्या सन्मानार्थ रचलेलीं कवनें इत्यादिकांवर बौद्धसंप्रदायाचा बराच परिणाम झाल्याचें दिसतें. धर्ममंगलकाव्यांतून मीननाथ, गोरक्षनाथ हाड़ीप व कालूप इत्यादि शून्यवादी यतींचे उल्लेख वारंवार आले आहेत. परंतु या धर्ममंगल काव्यांची रचना ब्राह्मणांनीं ज्यावेळीं आपल्या हातांत घेतली त्यावेळीं त्यांचें मूळचें बौद्ध सांप्रदायिक स्वरूप पार बदलून टाकून स्वधर्माचें स्वरूप दिलें.

'धर्म' देवतेच्या उपासनेकरितां वरील कवनें रचणारा पहिला प्राचीन कवि मयूरभट्ट हा होय. मयूरभट्टाचा काल निश्चित ठरला नाहीं, तथापि इ. सनाच्या १५ व्या शतकाच्या आरंभीं होऊन गेलेल्या 'सीताराम' नामक धर्ममंगल काव्य करणाऱ्या कवीनें मयूरभट्टाचीं काव्यें नष्टप्राय झाल्याबद्दल उल्लेख केला आहे, त्यावरून तो त्यापूर्वी ३।४ शतकें होऊन गेला असावा. माणिक गंगूलीच्या काव्यांतील माहितीवरून मयूरभट्ट हा कुलीन ब्राह्मणकुलांत जन्मला असल्याचें कळतें.

बहुतेक धर्ममंगलकाव्यांचा विषय म्हणजे ११ व्या शतकांत होऊन गेलेल्या 'लौसेन' नामक मैनागड येथील शूर राजाचीं वीररसोत्पादक कृत्यें वर्णन करणें हा होय. एकंदर कथानक थोडक्यांत द्यावयाचें म्हणजे पुढीलप्रमाणें:—

दुसऱ्या धर्मपालनामक गौड देशच्या राजाचा मुलगा गौडेश्वर हा राज्य करीत असतां राजवाड्यांतील 'सोमघोष' नामक चाकरानें गौडेश्वराची मर्जी व विश्वास संपादन करून त्या बळावर अजयनदीच्या कांठीं ठाकूर येथें जमीनजुमला मिळवला. सोमघोषाचा पुत्र इछाइघोष हा कालीचा उपासक असून वीर होता.त्यानें हळू हळू आपल्या पराक्रमाच्या जोरावर स्वातंत्र्य प्राप्त करून घेऊन बापाच्या इच्छेविरुद्ध गौडेश्वराबरोबर युद्ध पुकारलें. गौडेश्वरानें पुष्कळ सैन्य पाठवून बंडाचा मोड होत नाहीं असें पाहून कर्णसेन नामक मैनागडच्या मांडलिकास मदतीसाठीं बोलाविलें, परंतु युद्धांत कर्णसेनाचे चारी पुत्र मारले जाऊन त्यांच्या शोकानें त्याची स्त्रीहि मरण पावली. त्यामुळें वृद्धावस्थेस पोहोंचलेल्या कर्णसेनाचें काय बरें करावें असा विचार करीत असता, गौडेश्वरानें आपली भार्याभगिनी सुस्वरूप रंजावती हिचा कर्णसेनाशीं विवाह करून देण्याचें टरविलें,पुढें जोडप्यापासून धर्ममंगल काव्यांचा नायक लौसेन हा जन्मला. ह्यापूर्वी पुत्रप्राप्तीकरितां रंजावतीस ' धर्मठाकूर ' ह्या देवतेस विविध प्रकारच्या तपश्चर्येनें प्रसन्न करून घ्यावें लागलें असें म्हणतात. ह्यानंतर ' लौसेनच्या ' मदतीनें गौडेश्वरानें कामरूपचा राजा कर्पूरथल, आपल्या तरुण व सुस्वरूप मुलीबद्दल केलेल्या मागणीचा अव्हेर करणारा राजा हरिपाल व विशेषतः ठाकूरचा इच्छइघोष यास शरण यावयास लाविलें. आणि हरिपालाची तरुण मुलगी कानेड ही लौसेन यास देण्यांत आली.

ह्या मुख्य ऐतिहासिक कथेखेरीज एकंदर कवितेंत दुसरे कित्येक लहान लहान कथाभाग आले आहेत; ते म्हणजे गौडेश्वराचा अमात्य, लौसेनचा मामा माहूद्य यानें लौसेनास मारण्याकरितां योजलेल्या गुप्त युक्त्या होत. धर्ममंगल काव्यांचा विषय ऐतिहासिक आहे, आणि मैनागड येथील लौसेनच्या राजवाड्यांचे अवशेष, बांकुरा जिल्ह्यांतील, अजय नदीच्या कांठीं मोडकळीस आलेला इच्छइघोष याचा अभेद्य दुर्ग, इच्छइघोष याच्या उपासनेची काली देवीची मूर्ति, त्याचप्रमाणें कूर्मस्वरूपांतील धर्मठाकूर या देवतेचें लौसेन यानें मैनागड येथें बांधलेलें देवालय इत्यादि ऐतिहासिक स्थलें अद्याप अस्तित्वांत असून त्या कालची आपल्या वैभवाची साक्ष देतात. ह्या काव्यांतील राजदरबाराचीं वर्णनें वाचलीं असतां तत्कालीन राजसत्तेचें सामान्य स्वरूप लक्षांत येतें.

ह्या धर्ममंगलकाव्यांचा प्रथमजनक मयूरभट्ट हा असल्याबद्दल वर सांगितलेंच आहे. त्याच्यामागून खेलाराम, माणिक गंगुली, रुपराम, रामचंद्र, श्यामपंडित, रामदास अडक, सहदेव चक्रवर्ती, घनराम आणि दुसऱ्या कित्येक कवींनीं धर्ममंगलकाव्यें रचिलीं व त्यांचें मूळचें बौद्धस्वरूप बदलून त्यांना हिंदू धर्माचा पोषाख चढविला.

सहजपंथ व तंत्ररूपी गूढ सांप्रदायिक वाङ्मय.—बौद्धधर्माचा अम्मल कमी होत असून पौराणिक हिंदुधर्माचें मात्र अद्याप पुनरुज्जीवन झालें नव्हतें अशा संक्रमण कालांत वामाचारी बौद्धांनीं काढलेला सहजपंथ व त्याचें तांत्रिक स्वरूपांतील गूढसांप्रदायिक वाङ्मय ह्याचाच बंगालमध्यें बहुजनसमाजावर पगडा होता. धर्माच्या नांवाखालीं वामाचारी तांत्रिकांनीं एकंदर समाजांत किती गोंधळ माजविला होता याची स्पष्ट कल्पना सध्या उपलब्ध असलेल्या वरील धर्मपंथाच्या वाङ्मयावरून उघड होते.

ह्या पंथाचे उत्पादक वामाचारी तांत्रिक असून, निर्वाणप्राप्तीचें मुख्य साधन म्हणजे सौंदर्योपासना असे. ह्या पंथांत सामील झालेल्या साधकांनीं वैवाहिक बंधनें व सामाजिक रूढाचार यांना धाब्यावर बसवून सुस्वरूप युवतींची प्रेमाराधना कशी करावी त्याबद्दल निरनिराळे विधी सांगितले आहेत, त्यापैकीं कांहीं अत्यंत अश्लील आहेत. परंतु

स्त्रीपुरुषविषयक प्रेमांत देखील एक प्रकारची अत्युच्च दैवी भावना आहे व ह्या भावनेवरच वरील संप्रदाय उभारलेला आहे.

पुढें बंगालप्रांतांतून बौद्ध धर्माचें पूर्ण निर्मूलन झालें तरी पण त्यायोगें उत्पन्न झालेले सामाजिक परिणाम मात्र शिल्लक राहिले, व ह्या सहजपंथ वैष्णवमार्गी हिंदूंनीं उचलला, ह्या पंथाचा वैष्णव प्रसारक चण्डिदास होय. साधकानें आपल्या प्रेमाचें स्थान कशा तऱ्हेचें निवडावें ह्याबद्दल गुप्त साधनतंत्रांत पुढील उतारा आहे—

नटी कपालिकी वेश्या रजकी नापितांगना ।
ब्राह्मणी शूद्रकन्या च तथा गोपालकन्यका ॥
मालाकारस्य कन्या च नवकन्याः प्रकीर्तिताः ।
विशेषवैदग्ध्ययुताः सर्वा एव कुलांगनाः ॥
रूपयौवनसंपन्नाः शीलसौभाग्यशालिन्यः ।
पूजनीयाः प्रयत्नेन ततःसिद्धो भवेन्नरः ॥

चण्डिदासानें एका रजक स्त्रीवर प्रेम केलें ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे.

पा ल रा जां ची गा णीं.—इ. स. १५०७ च्या सुमारास होऊन गेलेला 'चैतन्यभागवत'कार वृंदावनदास यानें बंगाल प्रांतांत, पालवंशीय राजांच्या स्तुतिपर रचलेलीं कवनें किती लोकप्रिय होतीं त्याचा आपल्या ग्रंथांत उल्लेख केला आहे. मदनपाल राजाचा ताम्रलेखदेखील वरील विधानास दुजोरा देतो. डॉ. ग्रिअर्सननें प्रथम " माणिक चंद्र राजार गान " एशियाटिक सोसायटीच्या जर्नेलमध्यें प्रसिद्ध केलें. चंद्रपाल हा इ. सनाच्या ११ व्या शतकाच्या आरंभीं उत्तर बंगालवर राज्य करीत होता व त्याच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांनीं वरील कवन रचलें असावें. एकंदर कवनांची भाषा कवनें म्हणणाराकडून कालानुरूप बदलत गेलेली असली तरी मधून मधून मूळ प्राचीन गाण्यांचे भाग दिसून येतात. हीं गाणीं सामान्य दर्जाचीं आहेत, तरी पण त्यांत ऐतिहासिक सत्य मधून मधून डोकावतेंच. एकंदर वसूल करण्याची पद्धति, शिष्टसंप्रदाय, व्यापारी दळणवळण इत्यादि गोष्टी ह्या गाण्यांतून उत्तम तऱ्हेनें वर्णन केल्या आहेत. अशा या चमत्कृतिहीन कवनांतून देखील भिन्न रसांचे स्वाभाविक उद्गार दृष्टीस पडतात. राजा गोपीचंद हा यति बनून भिक्षेस निघाला असतांना त्याची स्त्री अदूना म्हणते—

ना याइओ ना याइओ राजा दूर देशांतर ।
कारे लागिया बांदिलाम शीतल मंदिर घर ॥

* * *

आमाके सङ्गे करि लइया याओ ॥
जीयव जीवन धन आमि कन्या सङ्गे गेल ॥

* * *

शीतल पाटि बिछाइया दिमू बालीसे हेलान पाओ ।
हाऊस रङ्गे यातिभु हनु पाओ ॥

" हे राजा, मला टाकून दूर देशांतर करूं नको. " हें शीतल मंदिर मी कोणाकरितां बांधलें ! "

'जर मी तुझ्याबरोबर असलें तर मला प्रिय असलेलें तुझें जीवन सुरक्षित ठेवीन. '

* * *

" ज्या वेळीं आपणास विश्रांति घ्यावीशी वाटेल त्या वेळीं मी एक थंडगार चटई आंथरीन व आपण उशीला टेकून विश्रांति घ्याल व त्या वेळीं उल्हासित चित्तानें स्वहस्तांनीं मी आपलीं चरणकमलें चुरीन."

अशा प्रकारचे आणखी कित्येक उतारे देतां येतील.

एकंदर बौद्धधर्माचा ह्या वेळीं जो ऱ्हास होत गेला त्याचें मुख्य कारण म्हणजे शिवोपासनेचा प्रसार होय. बौद्ध धर्मांतील तेज जसें कमी झालें तसेंच शिवदेवतेचें पौराणिक स्वरूप पार पालटून गेलें. वैदिक रुद्र म्हणजे एक भयंकर देवता; परंतु पौराणिक शिवाची कल्पना किती गंभीर व उदात्त! शुभ्रशिलापर्वतासारखा, निश्चल असा समाधिस्थितींत बसलेला, भालप्रदेशावर अर्धचंद्र चमकत आहे, व त्याच्या जटांतून भागीरथीचा शुद्ध जलप्रवाह खालीं पडतो आहे !

पौराणिकांनीं बौद्धांच्या उत्तम उत्तम गुणांची पौराणिक शिवकल्पनेंत भर घातली आहे. बुद्धाचें वैराग्य, माराशीं युद्ध, त्याचें निर्वाण, इत्यादि गोष्टी, शिवाच्या स्मशानवास, मदनदहन, शांत समाधि इत्यादि गोष्टींशीं पूर्ण जुळतात. ह्याखेरीज बुद्धापेक्षां शिवकल्पनेंत एक गोष्ट जास्त दृग्गोचर होते, ती उच्च वैवाहिक ध्येयाची होय. आपली प्रेमळ व आवडती पत्नी हिचा त्याग केल्याखेरीज बौद्ध निर्वाणाची सिद्धि पूर्ण होत नाहीं. परंतु पूर्ण समाधीच्या स्थितींत म्हणजे ब्रह्मानंदांत असतांना देखील शिव व दुर्गा या दांपत्याची ताटातूट करणें अशक्य आहे. हिंदु गृहस्थाश्रमीयांचा शिव हा आदर्श असून त्याची सहधर्मचारिणी अन्नपूर्णारूपानें सर्व जगास अन्न देऊन मातेप्रमाणें त्याचा संभाळ करते. दक्षयज्ञाचें कथानक तर पार्वतीच्या पातिव्रत्याचें व अखंड पतिप्रेमाचें पूर्ण निदर्शन आहे.

शिवदेवतेसंबंधीं माग हूनच्या गाण्यांत मुख्यतः तीन तत्त्वें आढळून येतात, तीं:-( १ ) पौराणिक कालचीं उच्च शिवकल्पना, ( २ ) तांत्रिक वाङ्मयांतील शिवास लावलेले दैवी गुण–शिव हा शेतकरी लोकांचा देव ( ३ ) यावर ताण करणारें वैवाहिक ध्येय. शिवसंबंधीं उपलब्ध असलेल्या एकंदर बंगाली काव्यांत शिवपार्वतीच्या उच्च गृहस्थाश्रमाचें व एकंदर कौटुंबिक संबंधांचें फारच हृदयंगम वर्णन आहे.

प्रा ची न वं शा व ळी चे ले ख.—पौराणिक हिंदुधर्मपुनरुज्जीवनाचा सूक्ष्म विचार केला असतां त्यांतील मुख्य गोष्ट म्हणजे ' आचार ' होय. ' आचार ' या शब्दानें प्रत्येक हिंदूचा रोजचा दिनक्रम कसा असावा ह्यासंबंधीं नियमांचा

निर्देश केला जातो, नीतीसंबंधीं तत्त्वांचा यांत बिलकुल संबंध येत नाहीं. ह्यापूर्वी हिंदू समाजांत बौद्धधर्मीय स्वतंत्र विचारांनीं इतका धुडगुस घातला होता कीं, त्यायोगें सामाजिक बंधनें देखील पार तुटण्याच्या बेतांत आलीं होतीं. कारण बौद्धधर्माची शिकवणच अशी होती.—" न स्वर्गो नैव जन्मान्यदपि न नरको नाप्यधर्मो न धर्मः । कर्ता नैवास्य कश्चित्प्रभवति जगतो नैव भर्ता न हर्ता ॥

" स्वर्ग, नरक, दुसरा जन्म, धर्म, अधर्म वगैरे कल्पना भ्रातिमय आहेत. ह्या जगाचा कर्ता, पालक, व संहर्ता कोणीहि नाहीं. "

ह्या नास्तिकवादविषयक अवतरणांत पुढे म्हटलें आहे कीं, पोरें हीं आईबापांपासून, मृत्कुंभ हे कुंभारांपासून, चित्रें हीं चित्रकारांकडून तयार होताना दिसतात, तर मग सृष्टीचा कोणी काल्पनिक उत्पादक देव आहे असें मानण्याचें कारण नाहीं. त्याचप्रमाणें अनीतीचा वागणूक हा दुर्गुणच नाहीं. अशा नास्तिकवादाची समाजावर जी क्रिया होत होती तीस प्रतिक्रिया म्हणून हिंदु धर्मशास्त्रकारांनीं आचारधर्मास त्या काळीं प्राधान्य दिलें.

इ. स. १११९–११६९ पर्यंत राज्यावर असलेल्या ' बल्लाळसेन ' नामक राजानें बंगाल प्रांतांतील निरनिराळया जातींतील लोकांस ' कौलिन्य ' किंवा कुलीनतेचा दर्जा देण्याचें ठरविलें, व त्याकरितां त्यानें पुढील नऊ गुणांची अट ठेवली तेः—( १ ) आचार, ( २ ) दया, ( ३ ) विद्या, ( ४ ) कीर्ति, ( ५ ) यात्रा, ( ६ ) भक्ति, ( ७ ) सुवर्तन, ( ८ ) तप, ( ९ ) परोपकारवृत्ति, हे होत. परंतु पुढे बल्लाळसेनाच्या मुलानें ह्या गुणांवर कौलिन्य न ठरवितां जन्मसिद्ध ठरविलें. त्यामुळें अकुलीन लोकांस मोटमोठा खर्च करून कुलीनांशीं विवाहसंबंध घडवून आणण्याची इच्छा होऊं लागली. अशा वेळीं ह्या प्रकाराच्या सामाजिक परिस्थितींत बल्लाळसेनापासून प्राचीन वंशावळीसंबंधीं बरीच लिखाणें रचलेलीं उपलब्ध झालीं आहेत, तीं इतिहाससंशोधकांस अत्यंत उपयुक्त होणार आहेत. हें वाङ्मय गद्यांत व पद्यांत रचलेलें आहे. व ह्यावरून त्या कालांतील राजकीय, व सामाजिक परिस्थितीचें स्वरूप बरेंच स्पष्ट होण्यासारखें आहे.

ह्याप्रमाणें मुसुलमानपूर्वकालीन बंगाली वाङ्मयाचें वर्गीकरण पांच प्रकारात केलें आहे. एकंदर ह्या काळच्या बंगाली वाङ्मयप्रवर्तनाचा मूलभूत उद्देश काय असावा हेंहि मधून मधून विवेचनांत कळून येईलच. वर केलेल्या वर्गीकरणाच्या पांच प्रकारांपैकीं पहिल्या प्रकारचें वाङ्मय म्हणजे उपदेशपर वाक्यें व म्हणी, त्याचप्रमाणें 'डाकेरवाचन' व 'खानारवाचन' ह्यांसारखें वाङ्मय शेतकरीवर्गांतच उद्भूत झालें. परंतु दुसरा व तिसरा प्रकार म्हणजे "धर्ममंगलकाव्यें" व " तांत्रिक गूढवाङ्मय ". ह्यांचा उद्गम त्या त्या संप्रदायाच्या प्रसारांत दिसून येतो. पालराजासंबंधीं गाणीं हा जो चवथा प्रकार आहे तो त्याविषयीं आदर दाखविण्याकरितां उद्भूत झाला, व शेवटच्या पांचव्या प्रतीचें वाङ्मय म्हणजे वंशावळीसंबंधीं लिखाणें, हीं मात्र त्यावेळचे सामाजिक निर्बंध काय आहेत त्यांचें ग्रथन व्हावें म्हणूनच लिहिलीं गेलीं.

चण्डिदास व विद्यापतिः—मुसुलमानपूर्वकालीन बंगाली वाङ्मयाविषयींचा विचार केला असतां आतांपर्यंत त्यास भारदस्त वाङ्मय असें म्हणतां येणार नाहीं. परंतु इसवी सनाच्या १४ व्या शतकांत बंगाली वाङ्मयक्षितिजावर चण्डिदास नामक एक तेजस्वी तारा चमकूं लागून पुढें लवकरच होणाऱ्या पौराणिक पुनरुज्जीवनाचीं पूर्व चिन्हें त्यानें सूचित केलीं. बंगाली वाङ्मयांतील अति प्राचीन कवि म्हणजे चण्डिदास हा होय. परंतु ह्यापूर्वी ह्याच्या समकालीन व मित्र असलेला विहारचा प्राचीन कवि विद्यापति ह्याजविषयीं थोडी माहिती देणें अप्रासंगिक होणार नाहीं.

विद्यापतिः—विद्यापति हा बंगाली कवि आहे असें इतिहासाच्या अभावीं सुमारें अर्धशतकापूर्वी मानण्यांत येत असे, परंतु आतां खरीं ऐतिहासिक साधनें उपलब्ध झालीं असल्यामुळें त्यावरून हा कवि बिहार प्रांतांतील दर्भंगा जिल्ह्यांतील सीतामरी तालुक्यांतील बिस्फी गांवचा रहिवाशी असून राजा शिवसिंहाच्या पदरीं होता, व त्यानें प्रस्तुत कवीस सदर गांव इनाम दिल्याबद्दल ताम्रपट आहे. व त्यावरून हा चौदाव्या शतकाच्या अखेरीस जन्मून १५ व्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला ही गोष्ट सिद्ध झाली आहे. विद्यापति व चण्डिदास यांच्या भेटीचीं रसभरित वर्णनें मागाहून झालेल्या कांहीं काव्यांतून आढळतात. उदाहरणार्थ,

" चण्डिदास शुनि विद्यापति गुण, दरशने भेल अनुराग
विद्यापति शुनि चण्डिदासगुण, दरशने भेल अनुराग ।
दुइ उत्कंठित भेल ।
संघहि रुपनारायण केवल विद्यापति चलि गेल ।
चण्डिदास तब् रहइ ना पारइ चलल दरशन लागि ॥

( चण्डिदासानें विद्यापतीचे गुण ऐकले व त्यास भेटण्याची त्याला फार उत्कंठा झाली, विद्यापति याचीहि अशीच स्थिति झाली; दोघेहि उत्कंठित झाले. विद्यापतीनें फक्त रुपनारायण यास बरोबर घेतलें. चण्डिदासासहि राहवेना, तोहि विद्यापतीस भेटण्यास निघाला )

विद्यापति हा पंडितकुलांत जन्मला असून संस्कृत भाषेत निष्णात होता. इतकेंच नव्हे तर यानें पुढील विद्वन्मान्य ग्रंथ रचले आहेत. तेः—( १ ) पुरुषपरीक्षा, ( २ ) शैवसर्वस्वसार, ( ३ ) दान--वाक्यावलि, ( ४ ) विवादसार, ( ५ ) गयापट्टन, ( ६ ) गंगावाक्यावलि, ( ७ ) दुर्गाभक्तितरंगिणी ( ८ ) कीर्तिलता.

त्याचप्रमाणें बिहारी भाषेत त्यानें लिहिलेल्या राधाकृष्ण प्रेमपर काव्यांचीं बंगाली रूपांतरें प्रसिद्धच आहेत. त्यापैकीं माथुर गानांतील पुढील उतारा करुणरसप्रधान आहे:—

" हरि कि मथुरापुरे गेल । अब गोकुल शून्य भेल ॥
रोदिति पिंजरे शुके । धेनु धायब माथुर मुखे ॥
अब सखि यमुनारिकूले । गोपगोपी नहि बूले ।
कैछन याओब यमुनातीर । कैछे नेहारब कुंजकुटीर ॥
सहचरी सने याँहा कयल फूल खेरि ।
कैछने जीयब ताहि ने हारि ॥

" कृष्ण मथुरेला गेला, हाय, सर्व गोकूळ शून्य झालें. राघू पिंजऱ्यात रोदन करीत आहे, गाई खिन्न दृष्टीनें मथुरेच्या मार्गाकडे पहात आहेत, गोप--गोपी यमुनातीरावर भेटत नाहींत. हे सख्यांनों, त्या तीरावर मी पुनः कशी जाऊं व कृष्णविरहित असें तें सुंदर लताकुंज कसें पाहूं ? ज्या प्रिय लतानिकुंजात सहचरीसह कृष्ण खेळला ते खेळ माझ्या नेत्रापुढें उभे राहतात व अद्याप मी जिवंत आहे. "

चण्डिदासः—चण्डिदास हा विद्यापतीचा समकालीन आहे ही गोष्ट वर आलीच आहे. चण्डिदास हा सामान्य जनाच्या दृष्टीनें 'पागला चाण्डि' बनला होता, कारण सामाजिक निर्बंधास न जुमानतां तनमनधनेंकरून 'रामी' नामक रजकीवर त्याचें प्रेम बसलें होतें, इतकेंच नव्हे तर आपल्या प्रियतमेवर त्यानें प्रेमकाव्यें रचलीं आहेत. इ. स. १४०३ च्या पूर्वीच त्यानें ९९६ गानांची रचना केली असें त्याच्या एका कवितेतील—

"विधूर निकटे नेए पक्ष ? वाण।
नवहुं नवहु रस इह परिमाण " ॥

—या ओळींवरून ठरतें. चण्डिदास हा विर्भुम जिल्ह्यांतील नान्नुर गांवचा राहणारा असून ब्राह्मण कुलांत जन्मला होता. चण्डिदास हा मूळ शाक्तपंथी असून पुढें तो वैष्णवमार्गाकडे वळला; ह्या गोष्टीवरून त्या काळच्या शाक्त, वैष्णव वगैरे धर्मपंथांतील कलहावर चांगला प्रकाश पडतो. नान्नुरा येथें वासलदेवीच्या देवालयांत पुजारी व उपाध्याय या नात्यानें काम करीत असतां सहजासहजीं नदीवर रोज दृष्टीस पडणाऱ्या 'रामी' रजकीवर त्याचें प्रेम बसल्यामुळें ब्राह्मण ज्ञातीनें त्याला बहिष्कृत केलें. परंतु चण्डिदासास याच्यावद्दल कांहींहि न वाटतां त्यानें आपलें काव्यें करण्याचें काम सुरून ठेविलें होतें. अशा गतीनें तो आपलीं कवनें शेजारच्या किर्णहार नामक गांवीं एका मित्राकडे प्रेक्षकांसमोर म्हणत असतां वरचें छप्पर त्याच्या अंगावर कोसळून त्याचा अंत झाला.

चण्डिदास व विद्यापति या दोघांनीं राधाकृष्णप्रेमावर काव्यें रचलीं, त्यावेळीं जयदेवाचें 'गीतगोविंद' नमुन्यादाखल पुढें ठेविलें असावें. चण्डिदासाच्या प्रेमगानांचें वर्गीकरण पुढीलप्रमाणें करण्यांत येतेंः— ( १ ) पूर्वराग, ( २ ) दौत्य, ( ३ ) अभिसार, ( ४ ) संभोगमीलन, ( ५ ) माथुर, ( ६ ) भाव आणि संम्मीलन

चण्डिदास व विद्यापति या दोघांच्या काव्याविषयीं साकल्यानें बोलावयाचें तर एवढेंच म्हणतां येईल कीं दोघांच्याहि काव्यांचे विषय एकच व दोघांच्याहि कविता रसपूर्ण आहेत. परंतु फरक एवढाच कीं, चण्डिदासाचीं काव्यें म्हणजे प्रतिभेचीं बाह्य स्वरूपेंच असून त्यांत कोणत्याहि प्रकारचा कृत्रिमपणा व भाषेचें अलंकारिकत्व सांपडत नाहीं, परंतु विद्यापतीचीं काव्यें मात्र विद्वानाला साजतलिशीं असून, त्यांनी विस्तृत कल्पनाशक्ति, निरनिराळे भाषालंकार, इत्यादि गुण प्रशंसनीय आहेत. एकाचीं काव्यें हृदय पिळवटून काढणारीं तर दुसऱ्याचीं कल्पनाशक्ति थक्क करून सोडणारीं आहेत. चण्डिदास याच्या काव्यांत एकप्रकारचा दैवी संचार असल्याचा भास होतो, परंतु विद्यापतीच्या काव्यांत पृथ्वीवरील रमणीय स्थळें. उद्यानें असलेलीं आढळतात. तरीपण दोघांच्याहि कविता श्रेष्ठ दर्जाच्या आहेत. विद्यापतीच्या काव्याचा नमुना वर दिलाच आहे.त्याचप्रमाणें चण्डिदासाच्या काव्याचें स्वरूपहि पाहिलें पाहिजे. राधाकृष्णाचा वियोग पुढील काव्यांत वर्णन केला आहेः—

आमि याइ आमि याइ बले तिन बोल ।
कत ना चुंबन देइ कत देइ कोल ॥
पद आध याय पिया चाय पालटिया ।
बयान निरखे कत कातर हइया ॥
केर कर धरि पिया शपथि देये मोरे ।
पून दरशन लागि कत चाटु बोले ॥
निगुड पीरिति पियार आरति बहु ।
चण्डिदास कहे हियार माझरे रहु ॥

" आतां मी जातो " असें तीनतीनदां म्हणतो, व कितीदां तरी चुंबन व आलिंगन देत आहे!अर्धे पाऊल टाकून माझ्या मुखाकडे वळून पहातो. त्यावेळीं त्याचे नेत्र इतके शोकपूर्ण दिसतात कीं, मला वर्णन करवत नाहीं. माझ्या हातांत हात घालून आपल्या स्वतःच्या नांवानें शपथ वाहण्यास मला सांगतो; आणि पुन्हां भेटीचें वचन मिळावें म्हणून किती गोड शब्द बोलतो. त्याचें प्रेम इतकें गूढ व त्याच्या प्रार्थना इतक्या आर्जवाच्या आहेत कीं, चण्डिदास म्हणतो, नेहमीं त्याला आपल्या हृदयांत वागविलें पाहिजे. "

यानंतर चण्डिदास व विद्यापति यांनीं जीं राधाकृष्णप्रेमविषयक काव्यें रचलीं त्यांचा मूळ हेतु काय होता, हीं काव्यें कोणत्या परिस्थितींत निर्माण झालीं, व यांनीं तत्कालीन समाजास कशा तऱ्हेचें वळण लाविलें या तीन गोष्टींविषयीं थोडा ऊहापोह करणें अप्रासंगिक होणार नाहीं.

वामाचारी बौद्धांनीं बौद्ध धर्माच्या ऱ्हासकालीं स्थापिलेल्या सहजपंथामुळें एकंदर समाजांत नास्तिकवाद व धर्माच्या नांवाखालीं अनीतीचा फैलाव किती झाला होता याबद्दल विवेचन आलेंच आहे. व्यवहारदृष्टया अनीतिमय दिसणाऱ्या मार्गानीं स्त्रीसौंदर्योपासना करून तद्वारां आपलें

निर्वाण प्राप्त करून घेणें ह्याच या सहजपंथाचा व थोड्या-बहुत प्रमाणांत शाक्तांचा मुख्य धर्म मानला गेला आहे. स्त्रीसौंदर्योपासनेच्या सुलभ मार्गानें दिव्य प्रेमाची प्राप्ति करून घेणें हा मार्ग दिसण्यांत सुकर आहे व या मतांतहि थोडें तथ्य आहे, परंतु या मार्गानें जाणाऱ्या मानवी जीवाचा पूर्ण अधःपात होण्याचा तितकाच जास्त संभव असल्यामुळें, व सामान्य बहुजनसमाज इतक्या उदात्त भावनेनें प्रेरित झालेला व अत्यंत विवेकी नसल्यामुळें हा मार्ग तितकाच भयप्रद झाला आहे.

अशा प्रकारच्या वाईट प्रकारांनां आळा पडावा व समाजाला जडलेलीं हीं दुर्व्यसनें व नास्तिकवाद निघून जावा म्हणून चण्डिदासानें समाजाला रुचेल अशाच प्रकारचा रामकृष्णप्रेमाचा विषय घेऊन, त्याला दैवी गुणांची झकाकी देऊन ईश्वराच्या ठायीं एकप्रकारची श्रद्धा उत्पन्न केली. त्याच्या पूर्वी झालेल्या जयदेव कवीच्या 'गीतगोविंद' नामक संस्कृत काव्यांत अशाच प्रकारचा प्रयत्न झाला. परंतु बहुजनसमाजास संस्कृत भाषा अपरिचित असल्यामुळें चण्डिदासादि कवींनीं प्राकृत भाषांत तसाच प्रयत्न करून पाहिला. ह्या दृष्टीनें सहजपंथाचें ध्येय चण्डिदासाच्या मतें काय होतें हें त्याच्य पुढील कवितेवरून दिसून येतें तो म्हणतोः—

"सहज सहज, सबाइ कहर सहज जानिबे के ।
तिमिर अंधकार ये हैया छे पार सहज जेनेछे से ॥

" प्रत्येकजण ' सहज ' धर्माविषयीं गप्पा मारतो, परंतु खरा अर्थ कोणास कळला आहे ? ज्या सत्पुरुषांनीं ( विषय ) अंधःकाराचा प्रांत ओलांडला त्यांनांच खरें रहस्य कळतें. "

ह्यावरून प्रपंचांत विषयसेवन करूनहि त्याची आसक्ति स्वतःस लागूं न देतां मोक्षप्राप्ति करून घ्यावयाची हाच वरील वाक्यांचा उद्देश. तेव्हां अशा प्रकारचें राधाकृष्णविषयक प्रेमाचें जें चित्र चण्डिदासादिकांनीं रेखाटलें त्यांतील मुख्य तत्त्वास वैष्णवपरिभाषेंत ' मधुर रस ' किंवा ' परकीय रस ' ही संज्ञा आहे व हें तत्त्व वैष्णवमार्गीयांनीं ' सहज ' पंथातील परस्त्रीसौंदर्योपासनेच्या तत्त्वापासून घेतलें आहे व ह्याच तत्त्वाचा पुढें झालेल्या चैतन्यप्रभूंनें व त्याच्या उपासकांनीं किती विकास केला व एकंदर समाजस्थिति कशी सुधारली हें पुढें विवरण करण्यांत येईलच. त्याचप्रमाणें बाह्यतः राधाकृष्णप्रेमविषयक काव्यांतून कशा प्रकारचीं उदात्त ध्येयें प्रतिपादिलीं जातात हेंहि पुढील एका उदाहरणावरून लक्षांत येईल. एका रात्रीं कृष्णभेटीविषयीं उत्सुक झालेल्या राधेचे उद्गार प्रस्तुतच्या चण्डिदासकृत काव्यांत आहेतः—

" ए घोर रजनी, मेघेर घटा, केमने आइला वाटे ।
आंगिनार माझे, बंधूया भिजिछे, देखे ये पराण फाटे ॥
सइ की आर बलिब तोरे ।
बहु पुण्यफल, से हेन बधूया, आसिया मिलल मोरे ।
घरे गुरुजन, ननदी दारुण, विलखे बाहिर हैनु ॥
अहा मरिमरि, संकेत करिया, कत ना यातना दिनू ॥
बंधूर पीरितीं, आरति देखिया, मोरे मने हेन करे ।
कालंकेर डालि, मायार करिया, अनल भेजाइ घरे ॥
आवनार दुःख, सुख करि माने, आमार दुःखेर दुःखी ।
चण्डिदास कय, बंधुर पीरिति, शुनिया जगत् सुखी ॥

" अंधारी रात्र, ढगांचें दाट छत पडलेलें, अशा वेळीं प्रियकरा, कोणत्या मार्गानें तूं येशील ? बागेंत भिजत उभा राहिलेला तो मला दिसतो व माझें हृदय फाटून जातें ! हे सख्यांनो, माझ्या पुण्याईनें माझा लाडका मला भेटण्यास आला. घरांत वडीलधारी माणसें, आणि माझी नणंदहि अति खाष्ट, त्यामुळें त्यांच्या भेटीकरितां मला धावून जातां येईना. अरेरे, त्याला येथें येण्याचा संकेत करून किती दुःख मीं दिलें ? ज्यावेळीं तो किती जिव्हाळ्यानें मजवर प्रेम करतो हें मी पाहते त्यावेळीं मला माझ्या दुष्कीर्तीचें ओझें सहन करण्यांत किती आनंद वाटतो व माझ्या घरास अग्नि लागला तरी मला त्याची फिकीर वाटत नाहीं. माझ्याकरितां पडलेले श्रम त्याला सुखाप्रमाणें वाटतात व मला दुःखी पाहिलें तर त्याला खेद होतो. अशी प्रेमकहाणी, चण्डिदास म्हणतो, सर्व जगाला आनंदित करील."

वरील कवनांत कृष्ण हा ईश्वर व राधा हा मानवी जीव असें मानलें म्हणजे ह्याच कवितेंतून मानवी जीवाची ईश्वरी साक्षात्काराविषयीं चाललेली धडपड कशा प्रकारची असते याबद्दल गुढार्थपर कल्पना मनांत येऊन प्रत्येक निरक्षर हिंदूच्या नेत्रांतून देखील ईश्वरी प्रेमाचें तेज चमकूं लागतें. पुढील कालांत प्रभु चैतन्य या सत्पुरुषास देखील चण्डिदासाच्या कवितांचा किती पोक होता व त्यावरून एकंदर समाजावर ह्या काव्यांचे किती उत्तम परिणाम झाले हें दिसून येईल.

मुसुलमानी राजवटींतील वाङ्मय.

पौ रा णि क ध र्मा च्या पु न रु ज्जी व ना चा का ल.—पठाण लोकांनीं तेराव्या शतकाच्या आरंभीं बंगालवर स्वारी करून मुसुलमानी अम्मल स्थापण्यास सुरवात केली व पंधराव्या शतकात ह्या क्रियेस पूर्ण स्वरूप मिळून बंगालवर मुसुलमानी राजसत्ता दृढ झाली. अर्थात ह्या परकीय राजसत्तेचे परिणाम समाजावर आणि एकंदर भाषा व वाङ्मयावर होणें अपरिहार्य होतें. बंगालवर झालेल्या पहिल्या मुसुलमान स्वारीच्या काळापासून म्हणजे इ. स. १२०३ पासूनच बंगाली भाषेवर अरबी व फारशी ह्या राजभाषांचे परिणाम होऊं लागले होते. त्याचप्रमाणें ज्वलत्श्रद्धामय असा त्यांचा तेजस्वी धर्म भारतवासीयांस त्यांच्या धार्मिक अवनतीच्या काळांत भेडसावून सोडीत होता. दैविक प्रेरणेनें उत्पन्न झाल्याचा समज असलेल्या महंमद पैगंबराच्या कुराणांत महंमदीधर्मावर विश्वास ठेवणाऱ्यास इस्लामी प्रभु तारतो व पाखंड्यास

मारतो असा उपदेश केला आहे. इस्लामी धर्मातील सुव्यक्त व सगुण ईश्वरासंबंधीं असलेल्या दृढ विश्वासास तोडीस तोड या नात्यानें ज्यामध्यें सुव्यक्त व सगुण देवतोपासना प्रधान आहे असे उपासनासंप्रदाय भारतीय समाजांत प्रचलित करून स्वधर्मसंरक्षण करणें हें आपलें कर्तव्य आहे अशी तत्कालीन हिंदू साधुसंतांची व विद्वानांची विचारसरणी होती.

ह्या पौराणिक कालांतील शिवोपासना किती विकास पावलेली होती, शिवाचें उदात्त स्वरूप, शिवपार्वतींचा उच्च वैवाहिक जीवनक्रम, त्याचप्रमाणें शिवाचें कडकडीत वैराग्य इत्यादि गोष्टी शिवकाव्यांतून किती कुशलतेनें रेखाटल्या आहेत यासंबंधीं मागें सांगोपांग विवेचन येऊन गेलेंच आहे. कांहीं कालपर्यंत शिवदेवतेच्या उदात्त व गंभीर गुणांनीं एकंदर सामान्य हिंदु समाजावर बराच परिणाम घडवून आणला होता,परंतु हळू हळू हा शिवोपासनासंप्रदाय गूढ स्वरूपाचा व अव्यक्तोपासनापर झाल्यामुळें, बहुजनसमाजास त्यांतील रहस्य कळेनासें झालें. अशा प्रकारें अव्यक्तोपासनापर शैवधर्म, ज्यामध्यें उच्च प्रकारचा अद्वैतवाद उत्पन्न झाला व ज्यामध्यें मनुष्यास स्वसामर्थ्यावर "चिदानंदरूपः शिवोऽहं शिवोऽहम्" अशा प्रकारची ब्रह्मैक्यवृत्ति प्राप्त करून घेतां येते असा हा शैवसंप्रदाय मागें पडला व इतर शाक्त, वैष्णव इत्यादि संप्रदायांनीं याच संधीचा फायदा घेऊन आपापल्या देवतेची उपासना प्रसृत करण्याचा उपक्रम सुरू केला.

शा क्त पं था ची वा ढ व त त्सं बं धीं वा ङ्म य — जगज्जीवनी या स्त्रीस्वरूपांत होन असलेली ईश्वरोपासना हें शाक्त पंथाचें मूलतत्त्व आहे. 'शक्ति' हें याच विश्वंभरांचें दुसरें नांव आहे. आर्यांचे प्राचीनतम धर्मग्रंथ जे वेद त्यांमध्यें अशा प्रकारच्या उपासनांचा उल्लेख कोठेंहि नाहीं. यावरून शक्त्युपासना ही मूळची इंडो-आर्यन लोकांची नसून त्यापूर्वींच ज्यांची संस्कृति भारतवर्षांत पसरली होती त्या मंगोली, अगर द्रविडी लोकांत शक्त्युपासना प्रचलित होती असा प्राचीनेतिहाससंशोधकांचा अभिप्राय आहे. चण्डी व महिषासुर यांचा संग्राम फार पूर्वी सत्ययुगांत झाला असल्याबद्दलचे पुराणग्रंथांतील उल्लेख देखील असेंच दाखवितात कीं, वेदांत नसलेल्या या प्राचीन उपासनापद्धतीचा स्वीकार इन्डो-आर्यन लोकांनीं फार मागाहून केला, इतकेंच नव्हे तर बराच कालपर्यंत शैवपंथ व शाक्तपंथ यांमध्यें विरोध असून कालांतरानें 'शिवशक्ति' या स्वरूपांत दोन्ही देवतांचा मिलाफ केला गेला.

परंतु बंगालप्रांतांत वरीलप्रमाणें शैवसंप्रदाय मागें पडला. त्यामुळें शाक्तपंथीयांनीं पुन्हां जोर केला व 'मनसादेवी,' चण्डिदेवी, गंगादेवी, व शीतलादेवी अशा प्रकारच्या स्थानिक देवतांचे पूजासंप्रदाय वाढूं लागले. ह्यांपैकीं मनसादेवी ही सर्पांची अधिष्ठात्री देवता, चण्डी ही गरीब निकृष्ट वर्गाची व पशूंची संरक्षक देवता, गंगा देवी ही पवित्र भागीरथी नदी, व शीतला देवी ही गोंवर,देवी वगैरेंसारख्या संसर्गजन्य रोगांची देवता असल्याबद्दल वर्णनें असून प्रत्येक देवतेभोंवतीं बंगाल प्रांतांत त्यावेळीं दाट असा काव्यकुंज निर्माण झाला.

म न सा मं ग ल का व्यें.—ह्यांपैकीं पहिल्या दोन देवतांसंबंधीं जें काव्यवाङ्मय उद्भूत झालें आहे त्यामध्यें तत्कालीन समाजाचें उत्तम प्रतिबिंब पडलें आहे. मनसादेवीसंबंधीं काव्यांतून जें कथानक वर्णन केलें आहे; त्याचा सारांशः- शिवानें एकदां पूर्वी असें भविष्य केलें कीं, चंपकनगरांतील चांद सौदागर हा मनसादेवीची उपासना करीतोंपर्यंत मनुष्यलोकांत मनसादेवतेची उपासना कोणीहि करणार नाहींत. हें ऐकून मनसादेवतेनें आपली पूजा करण्याबद्दल चांद सौदागर यास परोपरीनें सांगून पाहिलें परंतु तेव्हां त्यानें तिजविषयीं तुच्छता दर्शविली, त्यावेळीं मनसादेवीनें आपलें सर्पसैन्य पाठवून चांदाची नंदनवनासारखी सुरेख अशी 'गुआबारी' नामक बाग उध्वस्त करून टाकली, परंतु शिवोपासनेमुळें चांदसौदागर यास प्राप्त झालेल्या महाज्ञानाच्या प्रभावानें त्यानें आपली बाग पूर्ववत केली. पुढें मनसादेवीनें एक सुस्वरूप युवतीचें स्वरूप धारण करून चांद सौदागरापासून महाज्ञान मिळवून पुन्हां बागेचा नाश केला, त्यावेळीं चांद सौदागराप्रमाणें महाज्ञानसंपन्न असलेल्या 'शंकर गूडडिया' नामक मित्रानें बाग पूर्ववत करण्यापूर्वींच मनसादेवीनें त्याला ठार मारिलें. चांद सौदागराचे सहा पुत्र मनसादेवीच्या कपटास बळी पडले व त्याची स्त्री सनका हिनें मनसादेवीशीं लढा न घालण्याबद्दल आपल्या यजमानास परोपरीनें सांगितलें, आणि त्याच्या सहाहि सुनांना वैधव्यदशा प्राप्त झाली, तरी व्यर्थ. पुढें या दुःखद परिस्थितीचा थोडा विसर पडावा म्हणून त्यानें समुद्रपर्यटण करण्याकरितां सात जहाजें हाकारलीं परंतु मार्गांत मनसादेवीच्या रागानें वादळ उत्पन्न होऊन सर्व जहाजें बुडालीं, व एकट्या चांद सौदागरास शरण येण्यास तिनें सांगितलें, परंतु व्यर्थ. पुढें त्याचें जास्त सत्त्व पाहण्याकरितां अरण्यांत त्याला नाना प्रकारचा त्रास देऊन त्याला आपला भक्त व चांदचा मित्र चंद्रकेतु यांच्या घराचा आश्रय करावयास लाविलें, परंतु चंद्रकेतु हा मनसादेवीचा भक्त आहे हें पाहतांच चांद तेथून निघाला व नाना प्रकारचीं दुःखें भोगून परत घरीं ( चंपकनगरांत ) आला ह्यावेळीं लक्ष्मीधर नामक सुस्वरूप मुलगा झाला, परंतु ज्योतिष्यांनीं हा मुलगा लग्नाच्या रात्रीं सर्पदंशानें मरेल असें चांद यास सांगितलें. यावर मुलगा मोठा झाल्यावर, निछनिनगरचा व्यापारी शहा याची सुस्वरूप कन्या बेहुला हिच्याबरोबर त्याचा विवाह झाला. लक्ष्मधिर व बेहुला यांच्याकरितां चांदानें एक उत्तम पोलादी वाडा एकहि भेग नसलेला, किडामुंगीसहि शिरकाव करतां न येण्यासारखा बांधला होता, परंतु मनसादेवीनें धाक दाखविल्यावरून कारागिरानें सर्पास जातां येईल

एवढी लहान भेग राखली. शेवटीं ठरल्या रात्रीं लक्ष्मीधर व बेहुला झोंपीं गेलीं असतां मनसादेवीनें आपले सर्प पाठवून लक्ष्मीधरास दंश करविला व बेहुला व इतर लोक शोक करूं लागले. प्रघाताप्रमाणें लक्ष्मीधराचें प्रेत एका जहाजावर ठेवण्यांत येऊन बेहुला ही त्याच्या शेजारीं बसली व जहाज जलप्रवाहाच्या दिशेनें मार्ग क्रमूं लागलें मार्ग आक्रमीत असतां त्या प्रेताचा सांगाडा तेवढा शिल्लक राहिला, परंतु बेहुलेस आपणांमध्यें एक प्रकारची दैवी शक्ति संचारत असल्याचा तिला भास होऊं लागला. पुढें तें जहाज सहा महिन्यानंतर 'नेता' नामक देवांच्या परटिणीच्या घाटास लागलें. नेता हिच्या मुखाभोंवतीं असणारें तेजोवलय पाहून ती देवांगना असावी असें बेहुलेस वाटलें व ती 'नेता' हिला शरण गेली. पुढें स्वर्गांत जाऊन आपल्या नृत्यानें खुष झालेल्या देवांकडून मनसादेवीनें बेहुलेस लक्ष्मीधर याचें प्राणदान दिलें,फक्त अट एवढीच घातली कीं, तिनें आपल्या श्वशुरास मनसादेवीची पूजा करावयास लावावयाचें. मनसादेवीनें चांदाचीं बुडलेलीं सात जहाजें, 'गुआवारी' उपवन, शंकर गुडडिआ, व चांदचे सहा पुत्र परत दिले. बेहुला ही लक्ष्मीधर व सहा दीर यांसह जहाजांतून गांगूर नदींतून चंपकनगराकडे वळली. वाटेंत मातापित्यांची भेट घेऊन सर्व चंपकनगरास आले व बेहुलेनें आपल्या सासूसासऱ्यांस आनंदित केलें व अशा रीतीनें मनसादेवीची पूजा करण्याचा उपक्रम सुरू झाला.

मनसादेवीवर केलेले सुमारें साठ ग्रंथ सर्व अठराव्या शतकापूर्वी उपलब्ध झाले; त्यांपैकीं ठळकठळक ग्रंथकार म्हणजे हरिदत्त ( १२ वें शतक ), विजयगुप्त ( १४८४ ), नारायणदेव ( १४८४ ), क्षेमानंद ( १६४० ). हे मुख्य मनसामंगल काव्याचे उत्पादक असून त्यांपैकीं विजयगुप्त, क्षेमानंद हे तर फारच लोकप्रिय आहेत. यांखेरीज वरेच मनसामंगल काव्यें करणारे झाले.

चण्डिकाव्यें.—चण्डिपंथाच्या उगमाचा शोध काढणें ही गोष्ट सोपी नाहीं. पूर्वी गृहीत धरल्याप्रमाणे ही मूळ मंगोली किंवा द्रविडी देवता आहे, कीं खिस्तपूर्व २००० वर्षांच्या सुमारास बॅक्ट्रिआ प्रांत जिंकणारी असीरियाची राणी 'संमेरामिस' हिचेंच रूपांतर असावें, कीं अन्नपूर्णा या स्वरूपांत तिचें, गरीबांना अन्नवस्त्र देणारी रोमन देवता 'अॅन्ना पेरेन्ना' हिच्याशीं ऐक्य कल्पावयाचें हा एक गूढ प्रश्न आहे. एवढें खरें कीं मागाहून झालेल्या ब्राह्मण कवींनीं 'मंगलचण्डि' या निकृष्ट वर्गाच्या स्थानिक देवतेच्या पौराणिक ग्रंथांतील चण्डीशीं संबंध दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. चण्डिकाव्यांत पुढील दोन कथानकें आढळतातः—

इंद्रपुत्र नीलांवर ह्यास शापामुळें मृत्युलोकांत 'कालकेतु' नामक व्याधाचा जन्म आला. कालकेतु यानें मांसविक्या संजयकेतु याची कन्या फुल्लरा हिच्याशीं विवाह केला. शेजारच्या अरण्यांतील सिंहव्याघ्रादि सर्व पशूंना कालकेतूची भीति वाटल्यामुळें त्यांनीं चण्डिदेवीची कालकेतूकडून त्रास न व्हावा म्हणून प्रार्थना केली. इकडे अरण्यांत दाट धुकें पसरल्यामुळें कालकेतूस नेहमींप्रमाणें जेव्हां एका सरड्याखेरीज एकहि श्वापद मिळालें नाहीं, तेव्हा तसाच घरीं येऊन त्यानें आपल्या स्त्रीस शेजाऱ्याकडून थोडें धान्य उसनें आणण्यास सांगितलें व आपण घरांतील थोडें मांस होतें तें घेऊन बाजारांत विकण्यास गेला. इकडे सरडा जो होता तो वस्तुतः चण्डिदेवताच होती. कालकेतू बाहेर गेल्यावरोबर चण्डीनें आपलें सरड्याचें स्वरूप टाकून देऊन सुस्वरूप युवतीचें रूप धारण केलें. फुल्लरा घरीं येऊन पहाते तों आपल्या झोपडींत एक सुस्वरूप स्त्री आहे. हें पाहून व ती आपल्या पतिप्रेमाची चहाती आहे हें ऐकून तर तिचें धाबें दणाणलें. चण्डीनें मोठ्या कुशलतेनें द्व्यर्थी भाषण करून तिला भीति घातली व फुल्लरा तशीच कालकेतूकडे गेली. कालकेतूनेंहि येऊन त्या सुस्वरूप स्त्रीची पुष्कळ निर्भत्सना केली. सरतेशेवटीं चण्डीनें त्याच्या नैसर्गिक पापभीरुत्वावर प्रसन्न होऊन त्यापुढें आपलें रूप प्रगट केलें व त्यांना अपार ऐश्वर्य देऊन गुजराथेंत राज्य स्थापण्यास सांगितलें. पुढें कालांतरानें कालकेतू व फुल्लरा यांचा मुलगा पुष्पकेतु हा गुजराथचा राजा झाला.

श्रीमंत सौदागराचें कथानकः—रत्नमाला नावाची इंद्राची अप्सरा शापभ्रष्ट होऊन 'कुल्लाणा' नावानें पृथ्वीवर अवतीर्ण झाली. त्यावेळीं धनपति नामक एक श्रीमंत व्यापारी असून त्याची 'लहाणा' नामक स्त्री होती. त्याला कबुतरें उडविण्याचा षोक होता. एकदां त्याचें एक सुंदर कबुतर कळपातून निसटून कुल्लाणेच्या हातीं आलें. ही गोष्ट धनपतीस कळून तो कुल्लाणकडे जाऊन कबूतर मागूं लागला. कुल्लाणा ही लहाणेची चुलतबहीण असल्यामुळें तिनें धनपतीची चेष्टा पुष्कळ केली. यावेळीं स्वरूप व शृंगारचेष्टा पाहून धनपतीस कुल्लाणविषयीं प्रेमानुराग उत्पन्न होऊन त्यानें तिला मागणी घातली. सर्वांच्या संम्मतीनें दोघांचा विवाह झाला. त्यावेळीं राजाज्ञेमुळें धनपति सौदागर ह्यास उज्जनी सोडून गौड देशांत जावें लागलें व नूतनविवाहित कुल्लाणेस संभाळण्याचें काम त्यानें लहाणेकडे सोंपविलें. पुढें दुर्बला दासीच्या सांगण्यावरून मत्सरप्रेरित होऊन लहाणेनें कुल्लाणेस धनपतीच्या नांवानें खोटें पत्र दाखवून तिला रानांत मेंढ्या राखण्यास सांगितलें व फाटकीं वस्त्रें व वाईट धान्य देऊं लागली. तिच्या मेंढ्यांतील एक मेंढी एकदां नाहींशी झाली, तेव्हां कुल्लाणेस वाईट वाटून दुसऱ्या दिवशीं ती घरीं आली. धनपतीहि काम आटपून उज्जनीस परत आला व राजाची प्रथम भेट घेऊन अंतःपुरांत कुल्लाणा हिला भेटला. कुल्लाणच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या व धनपतीस झालेला प्रकार कळून येऊन फार वाईट वाटलें. परंतु कुल्लाणेनें आपल्या सवतीस क्षमा केली. एकदां धनपतीच्या घरीं श्राद्ध असतांना त्याचे भाऊबंद जमले होते,त्यावेळीं कोणी एकानें कुल्लाणच्या अरण्यांतील राहण्याबद्दल धनपतीच्या अब्रूवर शिंतोडे उडविले,

त्यावेळीं फुल्लणा हिनें सर्पदंशबाधा,तापलेलें लोखंड हातांत घेणें, जळत्या लाक्षागृहांतून निभावून जाणें, इत्यादि दिव्यें करून दाखविलीं. पुढें धनपति समुद्रपर्यटणास निघण्याच्या वेळीं फुल्लणा हि श भेटण्यास आला. त्यानें तिला चण्डिदेवीची पूजा करतांना पाहून त्या देवीच्या प्रतिमेस लाथेनें उडवून दिलें. मार्गांत चण्डीनें उत्पन्न केलेल्या वादळामुळें पांचहि जहाजें बुडून फक्त धनपति ज्यांत बसला होता तें 'मधुकर' नामक जहाज सिंहलद्वीपास लागलें. त्या ठिकाणीं समुद्रपृष्ठभागावर चोहोंकडे मोठमोठीं लाल कमळें पसरलीं असून वाऱ्याच्या झुळकीनें हलत आहेत; त्यांपैकीं सर्वांत अतिशय मोठया व सुंदर कमलावर एक सुस्वरूप युवती बसली असून एका हातांत एक महान हत्ती धरला असून दुसऱ्या हातानें तो तोंडांत घालीत आहे असा एक सुंदर पण विचित्र देखावा त्यानें पाहिला. सिलोनच्या राजास त्यानें ही हकीकत कळविली. त्यालाही गोष्ट खरी का खोटी हें पाहण्याची इच्छा होऊन ते दोघे त्या ठिकाणीं आले तों कांहीं नाहीं, असें पाहून राजानें धनपतीची सर्व चीजवस्त घेऊन त्यास तुरुंगांत घातलें.

इकडे उज्जनीस फुल्लणा ही प्रसूत होऊन मुलगा झाला. व त्याचें नांव श्रीमंत ठेवलें. मुलगा बारा वर्षांचा असतांना एकदां शाळेंत गेला असतां शिक्षकांनीं धनपतीसंबंधीं चेष्टा केली. त्याबद्दल वाईट वाटून श्रीमंत यानें सर्व लोकांची व राजाची मोठया मिनतवारीनें परवानगी घेऊन जलपर्यटणासाठीं आपलें जहाज हाकारलें व मार्गांत चण्डिदेवीची प्रार्थना करूं लागला. पुढें सिलोनबेटापाशीं आला असतां त्याला पुन्हां धनपतीनें प्रथम पाहिलेला देखावा दिसला. व त्यानें तेथील राजासहि तो प्रकार दाखविला. मागीलप्रमाणें राजाची निराशा झाली व त्यानें श्रीमंतास फांशीं देण्याचा हुकूम दिला परंतु चण्डिदेवीनें फांसावर त्याचें संरक्षण करून राजानें पाठविलेल्या सैन्याचा नाश केला. हें पाहून शालिवाहन राजानें स्वतः त्याची क्षमा मागून आपली मुलगी व अर्धें राज्य श्रीमंतास दिलें. पुढें धनपतीची व त्याची ओळख पटून श्रीमंतानें पित्यास चण्डिपूजा करण्याबद्दल परोपरीनें विनविलें. पुढें चण्डीच्या प्रसादानें धनपति पूर्वीसारखा सुखी झाला. व उज्जनीस परत आल्यावर विक्रमकेसरी राजानें आपली कन्या श्रीमंतास दिली. पुढें राज्यसुख भोगून फुल्लणा ही स्वर्गास गेली, व अशा रीतीनें चण्डिपूजा सुरू झाली.

अशा प्रकारचीं ही चण्डिमंगल काव्यें करणारे पुष्कळ कवी होऊन गेले. परंतु त्या सर्वांत मुकुंदराम कविकंकण त्याचें चंडिमंगल फारच लोकप्रिय झालें आहे. मुकुंदराम हा बरद्वान जिल्ह्यांतील 'दामुन्या' या गांवांत राहणारा असून त्या ठिकाणच्या मुसुलमान अधिकाऱ्याच्या जुलमामुळें त्याला आपला गांव सोडून जावें लागलें, व पुढें कांहीं धनिक लोकांनीं त्याला शेवटपर्यंत आश्रय दिला. त्यानें रचिलेलें चण्डिमंगल काव्य सामर्थ्य, तत्कालीन परिस्थिति हुबेहूब वर्णन केली आहे. त्यानंतर भवानीशंकर, जयनारायणसेन, शिवचरण सेन वगैरे चण्डिकाव्यांचे कर्ते होऊन गेले.

गं गा मं ग ल का व्यें.—वरीलप्रमाणेंच गंगानदीच्या स्तुतिपर काव्यें करणारे म्हटले म्हणजे माधवाचार्य (१६०९). द्विज कमलाकांत, जयरामदास, दुर्गाप्रसाद वगैरे होत.

शी त ला मं ग ल का व्यें.—या काव्यांचे कर्ते देवकीनंदन, नित्यानंद, कृष्णराम, रामप्रसाद, शंकराचार्य हे होत. या काव्यांवर बौद्ध धर्माचा परिणाम झाल्याचें दिसतें.

याशिवाय लक्ष्मी,सरस्वती, लहान मुलांची संरक्षक देवता, षष्ठीदेवी इत्यादि अनेक देवतांसंबंधीं स्तुतिपर छोटीं कवनें उपलब्ध आहेत.

ध र्म मं ग ल का व्यें.—त्याचप्रमाणें पूर्वी उल्लेखिलेल्या धर्ममंगल काव्याचें स्वरूप बदलणारे पुष्कळसे ब्राह्मण कवी मयूरभट्टानंतर होऊन गेले, त्यांपैकीं मुख्य म्हटले म्हणजे रूपराम, खेलाराम ( १५२७ ), सीतारामदास ( १५२७ ), प्रभूराम ( १५२७ ), माणिक गंगुली ( १५४७ ), घनराम ( १७१३ ) हे होत. त्यांपैकीं बहुतेकांच्या काव्यावरून लोकांच्या वारंवार बदलत असलेल्या सामाजिक परिस्थितीचें ज्ञान होतें.

द क्षि ण रा य का व्यें.—दक्षिणराय हा व्याघ्रांचा अधिष्ठाता देव असून त्याजवरहि माधवाचार्य (काल—१७व्या शतकाचा मध्य ) यानें कवनें रचिलीं आहेत. यानंतर कृष्णराम, वगैरे कवींनीं या देवतेवर थोडीं काव्यें रचलीं.

वर सांगितल्याप्रमाणें तांत्रिक बौद्ध धर्माच्या कालांत अशिक्षित समाजांत रूढ असलेल्या देवतोपासना ब्राह्मणांनीं हातीं घेऊन त्यासंबंधीं प्रचलित असलेल्या गोष्टींचा शास्त्रीय आख्यायिकांशीं मेळ घालून दिला ही गोष्ट चण्डिदेवतेसारख्या देवतासंप्रदायाच्या इतिहासावरून लक्षांत येईल. अशा रीतीनें हिंदुधर्माचें अशिक्षित बहुजनसमाजावर वजन पाडलें जाऊन प्रभुचैतन्यासारख्या धर्मोद्धारकांना वराच मार्ग मोकळा झाला व पौराणिक हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन झालें.

रा ज स त्ते चा बं गा लो वा ङ्म या स पा ठिं बा.—तेराव्या शतकाच्या आरंभींच पठाणांनीं बंगाल प्रांत व्यापून टाकला. ते जरी पुष्कळ दूरवरून आले होते तरी त्यांना पुन्हां स्वदेशी जावयाची इच्छा नव्हती. पठाण राजे बंगाली भाषा शिकले व एतद्देशीय समाजाशीं त्यांचा वारंवार निकट संबंध येऊं लागला. अर्थात हिंदु राजाप्रमाणें ब्राह्मणांकडून रामायणमहाभारतादि संस्कृत ग्रंथ ऐकणें हें त्यांना फार वेळाचें वाटूं लागलें. व त्यामुळें त्यांना समजत असलेल्या बंगाली भाषेत भाषांतरें करण्याकरितां त्यांनीं संस्कृत जाणणाऱ्या पण्डितांस आश्रय दिला. महाभारताचें पहिलें भाषांतर, इ. स. १३२५ च्या सुमारास राज्यावर असलेल्या नसिरशहा नामक गौडेश्वरानें तयार करविलें. या विद्यापतीनें नसिरशहाचें एका कवनांत वर्णन केलें आहे. रामायणाचा पहिला

एवढी लहान भेग राखली. शेवटीं ठरल्या रात्रीं लक्ष्मीधर व बेहुला झोपीं गेलीं असतां मनसादेवीनें आपले सर्प पाठवून लक्ष्मीधरास दंश करविला व बेहुला व इतर लोक शोक करूं लागले. प्रघाताप्रमाणें लक्ष्मीधराचें प्रेत एका जहाजावर ठेवण्यांत येऊन बेहुला ही त्याच्या शेजारीं बसली व जहाज जलप्रवाहाच्या दिशेनें मार्ग क्रमूं लागलें. मार्ग आक्रमीत असतां त्या प्रेताचा सांगाडा तेवढा शिल्लक राहिला, परंतु बेहुलेस आपणांमध्यें एक प्रकारची दैवी शक्ति संचारत असल्याचा तिला भास होऊं लागला. पुढें तें जहाज सहा महिन्यानंतर 'नेता' नामक देवांच्या परटिणीच्या घाटास लागलें. नेता हिच्या मुखाभोंवतीं असणारें तेजोवलय पाहून ती देवांगना असावी असें बेहुलेस वाटलें व ती 'नेता' हिला शरण गेली. पुढें स्वर्गांत जाऊन आपल्या नृत्यानें खुष झालेल्या देवाकडून मनसादेवीनें बेहुलेस लक्ष्मीधर याचें प्राणदान दिलें,फक्त अट एवढीच घातली कीं, तिनें आपल्या श्वशुरास मनसादेवीची पूजा करावयास लावावयाचें. मनसादेवीनें चांदाचीं बुडलेलीं सात जहाजें, 'गुआवारी' उपवन, शंकर गुडडिया, व चांदचे सहा पुत्र परत दिले. बेहुला ही लक्ष्मीधर व सहा दीर यांसह जहाजांतून गागूर नदींतून चंपकनगराकडे वळली. वाटेंत मातापित्याची भेट घेऊन सर्व चंपकनगरास आले व बेहुलेनें आपल्या सासूसासऱ्यांस आनंदित केलें व अशा रीतीनें मनसादेवीची पूजा करण्याचा उपक्रम सुरू झाला.

मनसादेवीवर केलेले सुमारें साठ ग्रंथ सर्व अठराव्या शतकापूर्वी उपलब्ध झाले; त्यापैकीं ठळकठळक ग्रंथकार म्हणजे हरिदत्त ( १२ वें शतक ), विजयगुप्त ( १४८४ ), नारायणदेव ( १४८४ ), क्षेमानंद ( १६४० ). हे मुख्य मनसामंगल काव्यांचे उत्पादक असून त्यांपैकीं विजयगुप्त, क्षेमानंद हे तर फारच लोकप्रिय आहेत. यांखेरीज बरेच मनसामंगल काव्यें करणारे झाले.

**चण्डिकाव्यें.**—चण्डिपंथाच्या उगमाचा शोध काढणें ही गोष्ट सोपी नाहीं. पूर्वी गृहीत धरल्याप्रमाणें ही मूळ मंगोली किंवा द्रविडी देवता आहे, कीं ख्रिस्तपूर्व २००० वर्षांच्या सुमारास बॅक्ट्रिआ प्रांत जिंकणारी असीरियाची राणी 'समेरामिस' हिचेंच रूपांतर असावें, कीं अन्नपूर्णा या स्वरूपांत तिचें, गरीबांनां अन्नवस्त्र देणारी रोमन देवता 'ॲन्ना पेरेन्ना' हिच्याशीं ऐक्य कल्पावयाचें हा एक गूढ प्रश्न आहे. एवढें खरें कीं मागाहून झालेल्या ब्राह्मण कवींनीं 'मंगलचण्डि' या निकृष्ट वर्गाच्या स्थानिक देवतेच्या पौराणिक ग्रंथांतील चण्डीशीं संबंध दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. चण्डिकाव्यांत पुढील दोन कथानकें आढळतातः—

इंद्रपुत्र नीलांबर ह्यास शापामुळें मृत्युलोकांत 'कालकेतु' नामक व्याधाचा जन्म आला. कालकेतु यानें मांसविक्या संजयकेतु याची कन्या फुल्लरा हिच्याशीं विवाह केला. शेजारच्या अरण्यांतील सिंहव्याघ्रादि सर्व पशूंनां कालकेतूची भीति वाटल्यामुळें त्यांनीं चण्डिदेवीची कालकेतूकडून त्रास न व्हावा म्हणून प्रार्थना केली. इकडे अरण्यांत दाट धुकें पसरल्यामुळें कालकेतूस नेहमींप्रमाणें जेव्हां एका सरड्याखेरीज एकहि श्वापद मिळालें नाहीं, तेव्हां तसाच घरीं येऊन त्यानें आपल्या स्त्रीस शेजाऱ्याकडून थोडें धान्य उसनें आणण्यास सांगितलें व आपण घरांतील थोडें मांस होतें तें घेऊन बाजारांत विकण्यास गेला. इकडे सरडा जो होता ती वस्तुतः चण्डिदेवताच होती. कालकेतू बाहेर गेल्याबरोबर चण्डीनें आपलें सरड्याचें स्वरूप टाकून देऊन सुस्वरूप युवतीचें रूप धारण केलें. फुल्लरा घरीं येऊन पहाते तों आपल्या झोपडींत एक सुस्वरूप स्त्री आहे. हें पाहून व ती आपल्या पतिप्रेमाची चहाती आहे हें ऐकून तर तिचें धाबें दणाणलें. चण्डीनें मोठ्या कुशलतेनें द्व्यर्थी भाषण करून तिला भीति घातली व फुल्लरा तशीच कालकेतूकडे गेली. कालकेतूनेंहि येऊन त्या सुस्वरूप स्त्रीची पुष्कळ निर्भर्त्सना केली. सरतेशेवटीं चण्डीनें त्याच्या नैसर्गिक पापभीरुत्वावर प्रसन्न होऊन त्यापुढें आपलें रूप प्रगट केलें व त्यानां अपार ऐश्वर्य देऊन गुजराथेंत राज्य स्थापण्यास सांगितलें. पुढें कालांतरानें कालकेतू व फुल्लरा यांचा मुलगा पुष्पकेतु हा गुजराथचा राजा झाला.

श्रीमंत सौदागराचें कथानकः—रत्नमाला नावाची इंद्राची अप्सरा शापभ्रष्ट होऊन 'कुल्लाणा' नांवानें पृथ्वीवर अवतीर्ण झाली. त्यावेळीं धनपति नामक एक श्रीमंत व्यापारी असून त्याची 'लहाणा' नामक स्त्री होती. त्याला कबुतरें उडविण्याचा षोक होता. एकदां त्याचें एक सुंदर कबुतर कळपांतून निसटून कुल्लाणेच्या हातीं आलें. ही गोष्ट धनपतीस कळून तो कुल्लाणाकडे जाऊन कबूतर मागूं लागला. कुल्लाणा ही लहाणेची चुलतबहीण असल्यामुळें तिनें धनपतीची चेष्टा पुष्कळ केली. यावेळीं स्वरूप व शृंगारचेष्टा पाहून धनपतीस कुल्लाणविषयीं प्रेमानुराग उत्पन्न होऊन त्यानें तिला मागणी घातली. सर्वांच्या संम्मतीनें दोघांचा विवाह झाला. त्यावेळीं राजाज्ञेमुळें धनपति सौदागर ह्यास उज्जनी सोडून गौड देशांत जावें लागलें व नूतनविवाहित कुल्लाणेस संभाळण्याचें काम त्यानें लहाणेकडे सोंपविलें. पुढें दुर्बला दासीच्या सांगण्यावरून मत्सरप्रेरित होऊन लहाणेनें कुल्लाणेस धनपतीच्या नांवानें खोटें पत्र दाखवून तिला रानांत मेंढ्या राखण्यास सांगितलें व फाटकीं वस्त्रें व वाईट धान्य देऊं लागली. तिच्या मेंढ्यांतील एक मेंढी एकदां नाहींशी झाली, तेव्हां कुल्लाणेस वाईट वाटून दुसऱ्या दिवशीं ती घरीं आली. धनपतीहि काम आटपून उज्जनीस परत आला व राजाची प्रथम भेट घेऊन अंतःपुरांत कुल्लाणा हिला भेटला. कुल्लाणच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या व धनपतीस झालेला प्रकार कळून येऊन फार वाईट वाटलें. परंतु कुल्लाणेनें आपल्या सवतीस क्षमा केली. एकदां धनपतीच्या घरीं श्राद्ध असतांना त्याचे भाऊबंद जमले होते, त्यावेळीं कोणी एकानें कुल्लाणच्या अरण्यांतील राहणीबद्दल धनपतीच्या अब्रूवर शितोंटे उडविले,

त्यावेळीं कुल्लणा हिनें सर्पदंशबाधा, तापलेलें लोखंड हातांत घेणें, जळत्या लाक्षागृहांतून निभावून जाणें, इत्यादि दिव्यें करून दाखविलीं. पुढें धनपति समुद्रपर्यटणास निघण्याच्या वेळीं कुल्लणा हिस भेटण्यास आला. त्यानें तिला चण्डिदेवीची पूजा करतांना पाहून त्या देवीच्या प्रतिमेस लाथेनें उडवून दिलें. मार्गांत चण्डीनें उत्पन्न केलेल्या वादळामुळें पांचहि जहाजें बुडून फक्त धनपति ज्यांत बसला होता तें 'मधुकर' नामक जहाज सिंहलद्वीपास लागलें. त्या ठिकाणीं समुद्रपृष्ठभागावर चोहोंकडे मोठमोठीं लाल कमळें पसरलीं असून वाऱ्याच्या झुळकीनें डुलत आहेत; त्यांपैकीं सर्वांत अतिशय मोठ्या व सुंदर कमलावर एक सुस्वरूप युवती बसली असून एका हातांत एक महान हत्ती धरला असून दुसऱ्या हातानें तो तोंडांत घालीत आहे असा एक सुंदर पण विचित्र देखावा त्यानें पाहिला. सिलोनच्या राजास त्यानें ही हकीकत कळविली. त्याला ती गोष्ट खरी का खोटी हें पाहण्याची इच्छा होऊन ते दोघे त्या ठिकाणीं आले तों कांहीं नाहीं, असें पाहून राजानें धनपतीची सर्व चीजवस्त घेऊन त्यास तुरुंगांत घातलें.

इकडे उज्जनीस कुल्लणा ही प्रसूत होऊन मुलगा झाला. व त्याचें नांव श्रीमंत ठेवलें. मुलगा बारा वर्षांचा असतांना एकदां शाळेंत गेला असतां शिक्षकांनीं धनपतीसंबंधीं चेष्टा केली. त्याबद्दल वाईट वाटून श्रीमंत यानें सर्व लोकांची व राजाची मोठ्या मिनतवारीनें परवानगी घेऊन जलपर्यटणासाठीं आपलें जहाज हाकारलें व मार्गांत चण्डिदेवीची प्रार्थना करूं लागला. पुढें सिलोनबेटापाशीं आला असतां त्याला पुन्हां धनपतीनें प्रथम पाहिलेला देखावा दिसला. व त्यानें तेथील राजासहि तो प्रकार कळविला. मागीलप्रमाणें राजाची निराशा झाली व त्यानें श्रीमंतास फांशीं देण्याचा हुकूम दिला परंतु चण्डिदेवीनें फांसावर त्याचें संरक्षण करून राजानें पाठविलेल्या सैन्याचा नाश केला. हें पाहून शालिवाहन राजानें स्वतः त्याची क्षमा मागून आपली मुलगी व अर्धें राज्य श्रीमंतास दिलें. पुढें धनपतीची व त्याची ओळख पटून श्रीमंतानें पित्यास चण्डिपूजा करण्याबद्दल परोपरीनें विनविलें. पुढें चण्डीच्या प्रसादानें धनपति पूर्वीसारखा सुखी झाला. व उज्जनीस परत आल्यावर विक्रमकेसरी राजानें आपली कन्या श्रीमंतास दिली. पुढें राज्यसुख भोगून कुल्लणा ही स्वर्गास गेली, व अशा रीतीनें चण्डिपूजा सुरू झाली.

अशा प्रकारचीं हीं चण्डिमंगल काव्यें करणारे पुष्कळ कवी होऊन गेले. परंतु त्या सर्वांत मुकुंदराम कविकंकण ह्याचें चंडिमंगल फारच लोकप्रिय झालें आहे. मुकुंदराम हा बरद्वान जिल्ह्यांतील 'दामुन्या' ह्या गांवांत राहणारा असून त्या ठिकाणच्या मुसलमान अधिकाऱ्याच्या जुलमामुळें त्याला आपला गांव सोडून जावें लागलें, व पुढें कांहीं धनिक लोकांनीं त्याला शेवटपर्यंत आश्रय दिला. त्यानें रचिलेलें चण्डिमंगल काव्य ह्यामध्यें तत्कालीन परिस्थिति हुबेहूब वर्णन केली आहे. ह्यानंतर भवानीशंकर, जयनारायणसेन, शिवचरण सेन वगैरे चण्डिकाव्यांचे कर्ते होऊन गेले.

गं गा मं ग ल का व्यें.—वरीलप्रमाणेंच गंगानदीच्या स्तुतिपर काव्यें करणारे म्हटले म्हणजे माधवाचार्य (१६०९). द्विज कमलाकांत, जयरामदास, दुर्गाप्रसाद वगैरे होत.

शी त ला मं ग ल का व्यें.—ह्या काव्यांचे कर्ते देवकीनंदन, नित्यानंद, कृष्णराम, रामप्रसाद, शंकराचार्य हे होत. ह्या काव्यांवर बौद्ध धर्माचा परिणाम झाल्याचें दिसतें.

याशिवाय लक्ष्मी, सरस्वती, लहान मुलांची संरक्षक देवता, षष्ठीदेवी इत्यादि अनेक देवतांसंबंधीं स्तुतिपर छोटीं कवनें उपलब्ध आहेत.

ध र्म मं ग ल का व्यें.—त्याचप्रमाणें पूर्वी उल्लेखिलेल्या धर्ममंगल काव्याचें स्वरूप बदलणारे बरेचसे ब्राह्मण कवी मयूरभट्टानंतर होऊन गेले, त्यांपैकीं मुख्य म्हटले म्हणजे रुपराम, खेलाराम ( १५२७ ), सीतारामदास ( १५२७ ), प्रभूराम ( १५२७ ), माणिक गंगुली ( १५४७ ), घनराम ( १७१३ ) हे होत. त्यांपैकीं बहुतेकांच्या काव्यावरून लोकांच्या वारंवार बदलत असलेल्या सामाजिक परिस्थितीचें ज्ञान होतें.

द क्षि ण रा य का व्यें.—दक्षिणराय हा व्याघ्रांचा अधिष्ठाता देव असून त्याजवरहि माधवाचार्य:(काल—१७व्या शतकाचा मध्य) ह्यानें कवनें रचिलीं आहेत. ह्यानंतर कृष्णराम, वगैरे कवींनीं या देवतेवर थोडीं काव्यें रचलीं.

वर सांगितल्याप्रमाणें तान्त्रिक बौद्ध धर्माच्या कालांत अशिक्षित समाजांत रूढ असलेल्या दैवतोपासना ब्राह्मणांनीं हातीं घेऊन त्यासंबंधीं प्रचलित असलेल्या गोष्टींचा शास्त्रीय आख्यायिकांशीं मेळ घालून दिला ही गोष्ट चण्डिदेवतेसारख्या देवतासंप्रदायाच्या इतिहासावरून लक्षांत येईल. अशा रीतीनें हिंदुधर्माचें अशिक्षित बहुजनसमाजावर वजन पाडलें जाऊन प्रभुचैतन्यासारख्या धर्मोद्धारकांनां बराच मार्ग मोकळा झाला व पौराणिक हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन झालें.

रा ज स त्ते चा बं गा ली वा ङ्म या स पा ठिं बा.—तेराव्या शतकाच्या आरंभीच पठाणांनीं बंगाल प्रांत व्यापून टाकला. ते जरी पुष्कळ दूरवरून आले होते तरी त्यांनां पुन्हां स्वदेशीं जावयाची इच्छा नव्हती. पठाण राजे बंगाली भाषा शिकले व एतद्देशीय समाजांशीं त्यांचा वारंवार निकट संबंध येऊं लागला. अर्थात हिंदु राजाप्रमाणें ब्राह्मणांकडून रामायणमहाभारतादि संस्कृत ग्रंथ ऐकणें हें त्यांनां फार वेळाचें वाटूं लागलें. व त्यामुळें त्यांनां समजत असलेल्या बंगाली भाषेत भाषांतरें करण्याकरितां त्यांनीं संस्कृत जाणणाऱ्या पण्डितांस आश्रय दिला. महाभारताचें पहिलें भाषांतर, इ. स. १३२५ च्या सुमारास राज्यावर असलेल्या नसिरशहा नामक गौडेश्वरानें तयार करविलें. ह्या विद्यापतीनें नसिरशहाचें एका कवनांत वर्णन केलें आहे.. रामायणाचा

भाषांतरकार कृत्तिवास हा कोणाच्या पदरीं होता हें निश्चित नाहीं. स. १४८० च्या सुमारास भागवताचें भाषांतर करणाऱ्या मलधर वसूस हुसेनशहा बादशहानें 'गुणराज खॉ' हा किताब दिला. अशा रीतीनें ही परंपरा पुष्कळ काळपर्यंत चालू होती. मुसुलमानी बादशहांनीं ज्यावेळीं बंगाली वाङ्मयास प्रोत्साहन दिलें त्यावेळीं अर्थातच हिंदू राजांनींहि त्यांचें अनुकरण केलें व अशा रीतीनें दिवसें-दिवस बंगाली वाङ्मयाची वाढ झपाट्यानें होऊं लागली.

अशा रीतीनें ब्राह्मणधर्मपुनरुज्जीवनाकरितां बंगालच्या मुसुलमानी राजसत्तेची अप्रत्यक्ष मदत झाली, कारण मुसुलमान राज्यकर्ते राजकारणाशिवाय हिंदूंच्या इतर सामाजिक व धार्मिक बाबतींत—कांहीं अपवाद सोडून देतां—हात घालीत नसत, व अशा रीतीनें लोकाग्रणींच्या ताब्यांत समाजास योग्य दिशेनें नेण्याची सत्ता आली होती व त्याचा फायदा घेऊन ब्राह्मण लोकांनीं सर्व समाजांमध्यें ब्राह्मणधर्माविषयीं पुष्कळ पूज्यभाव उत्पन्न केला.

रामायण, महाभारत, भागवत, इत्यादि ग्रंथांचीं त्या कालीं झालेलीं बंगाली भाषांतरें पाहिलीं असतां हीच गोष्ट दिसून येते. कारण हीं भाषांतरें नसून बहुजनसमाजाकरितां नवीन परिस्थित्यनुरूप नवीन ध्येयें, नवीन कल्पना इत्यादींनीं युक्त अशीं स्वतंत्र रूपांतरें आहेत.

कृत्तिवासः—बंगाली रामायणकार. याच्या चरित्राकरितां 'कृत्तिवास' ( ज्ञा. को. विभाग ११ ) पहा.

सांप्रतचें छापील 'कृत्तिवासरामायण' हें मूळचें कृत्तिवासाचें नसून त्यांत मुद्रक, प्रकाशक वगैरेंनीं, त्याचप्रमाणें वैष्णव, शाक्तपंथानुयायांनीं पुष्कळ नवीन भाग घुसडून दिलेला दिसतो. व रामायण, महाभारत इत्यादि बहुजनसमाजाकरितां अवतीर्ण झालेल्या ग्रंथांत मागाहूनच्या लेखकांनीं नवीन नवीन कल्पना घुसडल्या असल्याचाहि संभव आहे. ह्या सर्व गोष्टींचा पूर्ण विचार करतां मूळ वाल्मिकी-रामायण व कृत्तिवासरामायण यांची तुलना केली तर दोन्ही ग्रंथांतील अनुक्रमभेद, वाल्मिकी-रामायणांतील कांहीं प्रसंग कृत्तिवास रामायणांत गाळलेले व कांहीं प्रसंग नवीन घातलेले, त्याचप्रमाणें दोन्ही ग्रंथांतील वर्णनांत एकाच प्रसंगाची तफावत इत्यादि गोष्टींवरून कृत्तिवासरामायण ग्रंथास स्वतंत्र ग्रंथ ह्मणणेंच प्राप्त आहे. उदाहरणार्थ, रामधनुर्भंग, सीतापरिणय, परशुरामगर्वपरिहार इत्यादि प्रसंग कृत्तिवासरामायणांत फारच स्वतंत्र तऱ्हेनें वर्णन केले आहेत. त्याचप्रमाणें रामरावणयुद्धांतील वर्णन कृत्तिवासानें स्वकल्पनेनें रंगविलीं आहेत. अहिरावण-महिरावणाची कथा, हनुमानाचें सूर्यबिंब हातांत घेऊन पळून जाणें इत्यादि प्रसंग कृत्तिवासानें नवीनच घातले आहेत.

काशिरामदासकृत महाभारतः—कृत्तिवासरामायणाइतकेंच काशिरामदासकृत महाभारत बंगाली बहुजनसमाजाचें सर्वसाधारण धर्मपुस्तक आहे. कृत्तिवास जितका स्वतंत्र कल्पनेचा, सामान्य जनास समजेल अशा वर्णनशैलीचा, कथानिवेदक आहे तितकाच काशिराम हा महाभारतांतील उपदेश, गंभीर वाणीनें निरनिराळीं आख्यानें सांगून मनांत पूर्णपणें बिंबवणारा धर्मोपदेशक आहे. काशिरामदासाच्या महाभारतांत पूर्वीच्या बंगाली महाभारतांतील बराच भाग घेतला आहे. काशिरामदासापूर्वीं संजय, कवींद्र परमेश्वर, श्रीकर्णनंदी, नित्यानंदघोष इत्यादि बंगाली महाभारतकार होऊन सरतेशेवटीं काशिरामानें सर्व महाभारतग्रंथास एक स्वरूप देऊन त्यांत थोडी स्वतःची भर घातली.

काशिरामदास याचा जन्म बरद्वान जिल्ह्यांत सिंगी या गांवीं झाला असून त्याचें घराणें कायस्थ असूनहि मोठें विद्वान होतें. काशिरामास कृष्णराम व गदाधर असे दोन बंधू असून दोघेहि उत्तम कवी होते. काशिरामाचा काल इ. स. १६४५ चा सुमार मानतात. काशिराम याची चरित्रविषयक माहिती फारशी उपलब्ध नाहीं.

काशिरामदास हा जरी मूळ बंगाली महाभारतकार नाहीं तरी त्याची काव्यप्रतिभा जागोजाग प्रकाशते. कांहीं कांहीं ठिकाणीं तर त्यानें व्यासांच्या महाभारतांत न सांपडणारे असे नवीन प्रसंग घातले आहेत. त्यांवरून त्याला समाजाला कशा तऱ्हेचा उपदेश करावयाचा होता हें दिसून येतें. उदाहरणार्थ, युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञापूर्वी श्रीकृष्णानीं विश्वरूप दाखवून केलेला बिभीषणगर्वपरिहार हा प्रसंग अगदीं नवीन असा काशिराम यानें घातला आहे. त्याचप्रमाणें स्वतः जातीनें कायस्थ असून त्यानें जागोजागीं ब्राह्मण धर्माची स्तुति केली आहे. उदाहरणार्थः—

" बॉर क्रोधे यदुकुल हइल निर्वंश ।
बॉर क्रोधे नष्ट हइल सगरेर वंश ॥
बॉर क्रोधे कलंकी हइल कलानिधि ।
बॉर क्रोधे लवण हइल सलिलदि ॥
बॉर क्रोधे अनल हइल सर्वभक्ष ।
बॉर पदचिन्ह धरे नारायण वक्ष ॥ "

" ब्राह्मणाच्या कोपामुळें यादवकुलाचा त्याचप्रमाणें सगर वंशाचा नाश झाला, चंद्राला डाग लागण्याचें कारण व समुद्राला खारटपणा येण्याचें कारण ब्रह्मक्रोधच होय. अग्नि हा सर्वभक्ष होण्याचें कारण ब्राह्मणक्रोध इतकेंच नव्हे तर भगवान् श्रीविष्णूनां देखील ब्राह्मणाचें पदचिन्ह आपल्या वक्षस्थलावर धारण करावें लागलें."

राजा परिक्षिति हा तक्षकदंशामुळें मृत होईल असा ब्रह्मशाप त्यास मिळाला होता. ह्या प्रसंगीं काशिरामानें असें वर्णन केलें आहे कीं " राजा परिक्षितीस ठरलेल्या मुदतींत कोणीच सर्पदंश करण्यास येईना. म्हणून ब्रह्मशाप खोटा होतो कीं काय म्हणून त्यास काळजी लागली व त्यावेळीं तो खात असलेल्या एका बोरांतील एक आळी पाहून तो म्हणालाः—

" एइ पोका तक्षक हउक एइक्षण ।
दंशुक आमारे रहुक ब्राह्मणवचन ॥

"ब्राह्मणाचा शब्द खोटा होण्यापेक्षां ही आळी ह्यावक्षणीं सर्परूप धारण करून मला दंश करूं दे ! " मूळ व्यासांच्या महाभारतांत अशा प्रकारचें वर्णन नाहीं.

मलधर वसूचें भागवतः—ह्या दोन्ही काव्यांच्या खालोखाल असलेला ग्रंथ म्हटला म्हणजे भागवत हा होय. विशेषतः वैष्णव पंथाचा भागवत हा मुख्य आधारग्रंथ होय.

गोकुळांतील कृष्णलीला, राधाकृष्णप्रेमाचें गूढरहस्य इत्यादि अनेक विशिष्ट गोष्टींनीं भागवत हा एक जगमान्य ग्रंथ झाला आहे. असल्या बहुमोल संस्कृत ग्रंथाचें बंगाली भाषांतर करणारा हुसेनशहा बादशहाचा आश्रित मलधर वसु नावाचा एक कायस्थ जातींतील पण्डित होता; त्यानें राजाज्ञेवरून इ. स. १४८० च्या सुमारास तें संपविलें.

मलधर वसूची भाषापद्धति आणि वर्णनशैली अप्रतिम आहे. बंगाली भागवत हें रामायण-महाभारतादि ग्रंथांप्रमाणेंच शब्दशः भाषांतर नाहीं. मूळ संस्कृत भागवतांत उल्लेख नसलेली राधा मलधरवसूनें आपल्या बंगाली भागवतांत समाविष्ट केली आहे, व ह्या दृष्टीनें राधाकृष्णप्रेमपर काव्यें करणाऱ्या कवींचा मलधरवसु हा अग्रेसर होय.

मार्कंडेयचण्डि ह्या संस्कृत पूज्य ग्रंथाची देखील बंगाली भाषांतरें ह्या कालांत झालीं. त्याचप्रमाणें कृत्तिवास, काशिराम, व मलधरवसु ह्यांच्या मागून बंगाली रामायणें, महाभारतें, भागवतें करणारे पुष्कळ लहानमोठे कवी होऊन गेले, परंतु ह्या मूळ तीन कवींची लोकप्रियता कोणामुळें कमी झाली नाहीं. व अशा रीतीनें एकंदर समाजहि बराच सुसंस्कृत होऊन पुढील चैतन्यप्रभूच्या उपदेशाचें मर्म ओळखण्यास तयार झाला.

ह्या कालांत म्हणजे १४-१५ व्या शतकांत तयार झालेल्या प्राचीन अवाढव्य अशा बंगाली वाङ्मयाच्या मानानें ह्या प्रकरणांत दिलेली माहिती अपुरी आहे, कारण अद्याप बरेंच वाङ्मय अप्रकाशित व असंशोधित स्थितींत आहे, तरी देखील मनसामंगलकाव्यासारख्या बंगाली विशिष्ट वाङ्मयामध्यें चित्रित केलेल्या जलपर्यटणें, व्यापाराच्या तऱ्हा, बंगाली लोकांचें धाडस इत्यादि गोष्टी, त्यांतील अतिशयोक्तीचा व अमानुष कल्पनेचा भाग सोडून देतां प्राचीन कालची वस्तुस्थिति दर्शवितात.

वैष्णवांचें वाङ्मय.—बंगाली वाङ्मयाचा कालानुक्रमें इतिहास द्यावयाचा म्हटल्यास, वैष्णव वाङ्मयांतील बराचसा भाग १४-१५ व्या शतकांच्या वाङ्मयांत अंतर्भूत करावा लागेल. तथापि बंगालमधील वैष्णवेतर वाङ्मयापेक्षां या वैष्णव वाङ्मयाचें अनेक दृष्टींनीं वैशिष्ट्य असल्यानें, कालसंगतीकडे लक्ष्य न देतां, सबंध वैष्णव वाङ्मयाचा एकेठिकाणीं विचार करणें अधिक सोईचें होईल असें वाटतें. याकरतां या दृष्टीनें वैष्णव वाङ्मयाचा स्वतंत्र रीतीनें विचार केलेला आहे.

१४ व्या आणि १५ व्या शतकांतील इतर वाङ्मयामध्यें व वैष्णव वाङ्मयामध्यें जो महत्त्वाचा फरक आढळतो तो हा कीं वैष्णवेतर वाङ्मय हें अखिल जनतेकारितां नव्हतें. सुशिक्षित समाजालाच या वाङ्मयाच्या मंदिरांत प्रवेश करतां येत असे पण वाङ्मयांतील हें व्यंग नाहींसें करून वाङ्मयाचें द्वार सर्व जनतेला खुलें करून देण्याची महत्त्वाची कामगिरी वैष्णव वाङ्मयानें घडवून आणली.ही क्रांति घडवून आणणाऱ्यांमध्यें चैतन्याला अग्रस्थान दिलें पाहिजे.चैतन्यदेव जगाच्या रंगभूमीवर झळकण्यापूर्वी, बंगालमध्यें बौद्ध धर्माचें कमी जास्त प्रमाणांत वर्चस्व होतें. त्याचप्रमाणें ब्राह्मणांच्या हातांतहि धर्माचीं सूत्रें असल्यामुळें ते सांगतील तो धर्म अशी स्थिति झाली होती. तथापि या दोन्ही धर्मांमध्यें जो कर्मठपणा आला होता त्याविरुद्धहि चैतन्याच्या पूर्वीच प्रतिक्रिया सुरू झालेली होती. बौद्ध धर्मामध्यें, महायान पंथ निर्माण होऊन त्यानें बौद्ध धर्मांत भक्तीचें तत्त्व घुसडून देऊन मूर्तिपूजा अस्तित्वांत आणण्याची चळवळ सुरू केली होती व तिला यशहि येत चाललें होतें. इकडे हिंदुधर्मीयांमध्येंहि ब्राह्मणप्रणीत आचारांच्या विरुद्ध चळवळीचें बीं पेरलें गेलें होतें. अशा संधिकाळाच्या सुमारास चैतन्य हा जन्माला आला ( चैतन्याच्या चरित्रासंबंधींची माहिती ज्ञानकोश विभाग १३ यांत पहा ). चैतन्यानें कृष्णभक्तीला प्राधान्य देऊन, मुक्ति मिळवण्याचा सर्वांत सोपा उपाय म्हणजे श्रीहरीवर अनन्य श्रद्धा ठेवून त्याची भक्ति व नामसंकीर्तन अहर्निश करणें हा होय असें प्रतिपादन केलें; त्याचप्रमाणें हिंदुधर्मांतील जातिभेदाचें बंड मोडून त्यानें आपल्या भक्तिपंथांत सर्वांना येण्याची मुभा ठेवली. अशा रीतीनें सर्वांना मोक्षाचा दरवाजा त्यानें खुला करून दिल्यामुळें लोक त्याला देवासमान मानूं लागले. याचा परिणाम असा झाला कीं, चैतन्यासंबंधीं, त्याच्या पंथासंबंधीं व त्या पंथांतील तत्त्वांसंबंधीं, बरेंच वाङ्मय निर्माण होऊं लागलें. अशा रीतीनें बंगालमध्यें एका नवीन वाङ्मयाच्या निर्मितीला आरंभ होऊं लागला असें म्हणावयास हरकत नाहीं.

चैतन्यापूर्वी बंगालमध्यें फारच थोडे चरित्रग्रंथ प्रसिद्ध झाले होते. पण चैतन्याचा बंगालमध्यें अवतार झाल्यानंतर खुद्द त्याच्यासंबंधींच पुष्कळ चरित्रपर ग्रंथ निर्माण झाले व अशा रीतीनें या वाङ्मयशाखेंत कांहीं उत्कृष्ट ग्रंथांची भर पडली.

चैतन्यासंबंधीं जे चरित्रग्रंथ प्रसिद्ध झाले त्यापैकीं गोविंददास कर्मकार याचा 'कड्चा' उर्फ 'टिपणी' हा ग्रंथ महत्त्वाचा होय. गोविंददास हा चैतन्याच्या दक्षिणेंतील प्रवासाच्या वेळचा त्याचा हस्तक होता. त्यानें चैतन्याच्या चरित्रासंबंधीं दिनवृत्त लिहून ठेवलें, व तेंच 'कड्चा' या नांवानें प्रसिद्ध आहे. या ग्रंथामध्यें त्यानें चैतन्यासंबंधींच्या अनेक कथा दिल्या आहेत. या ग्रंथांतील भाषा अगदीं साधी व सोपी आहे. मधून मधून वर्णनेंहि सुंदर तऱ्हेचीं आलेलीं

आहेत. गोविंददास हा धार्मिक प्रवृत्तीचा असल्यामुळें, त्याच्या वर्णनांतहि ही प्रवृत्ति दृग्गोचर झाल्याविना रहात नाहीं. कन्याकुमारीजवळील समुद्राचें वर्णन त्यानें फार सुंदर केलेलें आहे.

ताम्रपर्णी पार हय्या समुद्रेर धारे ।
प्रभु कन्याकुमारी चलिला देखिबारे ॥
पर्वत कानन देश नाहि सेइ ठांइ ।
केवल सिंधुर शब्द शुनिबारे पाइ ॥
हुं हुं शब्दे समुद्र डाकि छे निरंतर ।
कि कब अधिक शेखा सकली सुंदर ॥
देखिबार किछु नाइ तथापि शोभन ।
शेखाने सौंदर्य देखे शुद्ध यार मन ॥

गोविंदासाच्या ग्रंथांत धर्मविषयक संकुचित मतें आढळून येत नाहींत.

गोविंदासाच्या ग्रंथाशिवाय चैतन्यचरित्रपर दुसरा ग्रंथ वृन्दावनदासाचा 'चैतन्यभागवत' होय. हा ग्रंथ चैतन्यचरित्रपर ग्रंथांमध्यें अधिक विश्वसनीय असून वैष्णव पंथांत याला फार मान आहे. या ग्रंथांत सर्वत्र पयार छंद वापरलेला असून सुमारें २५००० ओळी कविता आहे. चैतन्य हा परमेश्वरी अवतार होय असें सिद्ध करण्याचा प्रयत्न वृंदावनदासानें या ग्रंथांत केलेला आढळतो. पण हें मत मान्य नसणाऱ्यांची जी त्यानें निंदा केली आहे ती अति जहाल व अत एव अक्षम्य अशी आहे. या ग्रंथाचा तत्कालीन परिस्थिति समजण्याच्या कामीं फार उपयोग आहे. शिवाय चैतन्याच्या प्रसिद्ध अनुयायांची माहितीहि यांत आली असल्यामुळें या ग्रंथाला अधिक महत्त्व प्राप्त झालेलें आहे.

जयानंदाचा चैतन्यमंगल हा चैतन्यचरित्रपर तिसरा ग्रंथ होय. जयानंद हा बंगालचा १६ व्या शतकांतील प्रसिद्ध स्मृतिकार जो रघुनंदन त्याच्या कुलांत, १५१३ सालीं जन्मला. यानें चैतन्याचें जें चरित्र लिहिलें त्यांत ऐतिहासिक परिस्थितिविषयक उल्लेख आहेत. तसेंच चैतन्यासंबंधीं यानें जी माहिती दिलेली आहे तींत व वृन्दावनदासाच्या व दुसऱ्या लोकांच्या चैतन्यासंबंधींच्या हकीकतींत फरक आढळतो.

पण या तिन्ही चरित्रकारांपेक्षां शीलानें व ज्ञानानें श्रेष्ठ अशा कृष्णदासानें लिहिलेला 'चैतन्यचरितामृत' हा ग्रंथ अत्यंत श्रेष्ठ होय. कृष्णदास हा १५१७ सालीं एका गरीब कुळांत जन्मला. वयाच्या १६ व्या वर्षी, मीनकेतन रामदास नांवाच्या वैष्णव साधूच्या प्रवचनांचा त्याच्या मनावर जबरा परिणाम होऊन तो विरक्त बनला. त्यानें गोविंदलीलामृत नांवाचा संस्कृत पद्यग्रंथ व कृष्णकर्णामृतावर पद्यमय टीका, संस्कृतमध्यें लिहिली आहे. त्यावरून त्याची प्रतिभा व पांडित्य हे गुण दिसून येतात. त्याशिवाय त्यानें बंगालीमध्यें अद्वैतसूत्रकडूचा, स्वरूपवर्णन, रागमयीकणा इत्यादि गद्यग्रंथ लिहिले असून त्यांतील कांहीं भाग गद्य भाषेवरील त्याचें प्रभुत्व दर्शवितात. वयाच्या ७९ व्या वर्षी त्यानें चैतन्यचरितामृत हा ग्रंथ लिहावयास घेतला. व तो अत्यंत चिकाटीनें पुरा केला. बंगाली भाषेंत इतका परिश्रमपूर्वक लिहिलेला व विद्वत्तापूर्ण ग्रंथ त्यापूर्वी झाला नाहीं असें म्हटलें तरी चालेल. पण यांतील भाषा शुद्ध बंगाली नाहीं. भाषेंत संस्कृत शब्दांचा भरणा फार आहे. त्यामुळें या ग्रंथाची वाङ्मयाच्या दृष्टीनें योग्यता कमी झाली आहे. यांत १५०५० द्विवरणी श्लोक असून ग्रंथाचे आदि, मध्य व अंत असे तीन भाग आहेत. यांत वैष्णवधर्माचीं व चैतन्याचीं धार्मिक मतें अत्यंत विस्तृत रीतीनें प्रतिपादन केलेलीं आढळतात. आपल्या आयुष्याच्या शेवटच्या दिवसांत चैतन्याला नेहमीं एखाद्या साध्या प्रसंगानें सुद्धां कशी समाधि लागत असे याचें फारच सुंदर वर्णन या ग्रंथांत केलेलें आहे. काम व प्रेम यांमधील भेद यानें खालील चरणांत फार बहारीनें वर्णन केलेला आहे.

काम प्रेम दोहाकार विभिन्न लक्षण ।
लोह आर हेम यै छे स्वरूपविलक्षण ॥
आत्मेंद्रियप्रीति इच्छा तारे बलिकाम ।
कृष्णेंद्रिय प्रीति इच्छा तार प्रेमनाम ।
कामे रतात्पर्य निजसंभोग केवल ॥
कृष्णसुखतात्पर्यमात्र प्रेमत प्रवळ ।

तसेंच चैतन्याची वृंदावनास तो गेला असतां काय स्थिति झाली याचेंहि उत्कृष्ट व काव्यमय वर्णन कृष्णदासानें केलें आहे.

या चार महत्त्वाच्या चैतन्यपर चरित्रग्रंथांच्या खालोखाल लोचनदासाचा चैतन्यमंगल हा ग्रंथहि प्रसिद्ध आहे. पण त्याची प्रसिद्धि त्यांतील गोष्टींपेक्षां अगर तत्त्वप्रतिपादनापेक्षां लोचनदासाच्या काव्यपटुत्वावरच अवलंबून आहे. हा सर्व ग्रंथ अद्यापीहि गाण्यांत येतो असें म्हणतात. यांतील कांहीं प्रसंग तर अत्यंत काव्यपूर्ण आहेत. संन्यास घेण्यापूर्वी चैतन्याच्या व त्याच्या बायकोच्या मध्यें झालेला संवाद वाचल्यास वरील विधानाची सत्यता पटेल. हा संवाद हृदयाला पाझर फोडणारा व काव्यमय आहे. लोचन हा स.१५२९त जन्मला व १५८९ सालीं वारला. चैतन्यमंगलाशिवाय त्यानें दुर्लभसार नांवाचा ग्रंथ व वरींच सुंदर पद्यें रचिलीं.

चैतन्याप्रमाणेंच त्याच्या प्रसिद्ध शिष्यांवर--नित्यानंद व अद्वैताचार्यांवरहि--बरेच चरित्रपर ग्रंथ झाले. वैष्णवांच्या सर्व चरित्रग्रंथांत नित्यानंदासंबंधींची माहिती आलेली आहे. अद्वैताचार्यांच्या चरित्रपर असे कृष्णदासाचा बाल्यलीलासूत्र, श्यामदासाचा अद्वैतमंगल, ईशान नागराचा अद्वैतप्रकाश, हरिदासाचा अद्वैतमंगल, व नरहरीदासाचा अद्वैतविलास हे ग्रंथ होत. चैतन्याच्या शिष्यशाखेंत, नरोत्तमदास, रघुनाथदास यांच्यासारखीं अनेक राजघराण्यांतील माणसें व रूप,सनातन यांच्यासारखीं मोठमोठ्या अधिकाराच्या जागेवरील माणसें

होतो. रघुनाथदास हा राजपुत्र असून त्यानें अनेक हालअपेष्टा सोसून वैराग्यपद प्राप्त करून घेतलें. याची गोस्वामींमध्यें गणना होते. यानें संस्कृतांत २९ ग्रंथ लिहिले असून राधाकृष्णविलासावर सुंदर गीतें केलेलीं आहेत. रूप व सनातन हे हुसेनशहाच्या पदरीं मंत्री होते. पण चैतन्याच्या उपदेशानें त्यांनां संसाराचा वीट येऊन ते विरक्त बनले. त्यांनीं बरेच संस्कृत ग्रंथ लिहिले आहेत. याशिवाय इतर चैतन्यभक्तांमध्यें श्रीनिवासाचार्यांचें नांव प्रामुख्यानें आढळतें. हरिदास नांवाचा दुसरा एक वैष्णवपंथी साधु जातीनें मुसुलमान होता. त्यानें चैतन्याचें शिष्यत्व पत्करल्यामुळें त्याच्या गांवच्या मुसुलमान मॅजिस्ट्रेटनें त्याला अतोनात छळलें, तथापि त्यानें चैतन्यभक्ति सोडली नाहीं.

श्यामानंद नांवाच्या एका वैष्णव पंथी साधूनें बरीच पद्यें रचलीं आहेत. याशिवाय या शिष्यमालेंतील गदाधर ( १४८६–१५१४ ), उद्धारणदत्त (जन्म १४८१), लोकनाथदास गोस्वामी, गोपालभट्ट इत्यादिकांचीं चरित्रेंहि लिहिलीं गेलीं आहेत. १६।१७ व्या शतकांत जे अनेक चरित्रग्रंथ प्रसिद्ध झाले त्यांपैकीं महत्त्वाचे ग्रंथ येणेंप्रमाणेः—नरहरी-चक्रदासाचा भक्तिरत्नाकर—हा ग्रंथ प्रमाणभूत समजला जातो. हा प्रचंड ग्रंथ असून यांत वैष्णव धर्माचीं तत्त्वें, सुंदर रीतीनें ग्रथित केलेलीं आहेत. याशिवाय नरहरीनें नरोत्तमविलास नामक ग्रंथ लिहिला असून तो भक्तिरत्नाकरापेक्षांहि भाषेच्या बाबतींत सरस आहे. नरहरी हा जाडा संस्कृत पंडित होता. नित्यानंददासाचा प्रेमविलास हाहि मोठा ग्रंथ आहे. हा १७ व्या शतकांत लिहिला गेला. यांत श्रीनिवास व श्यामानंद यांचीं चरित्रें आलेलीं आहेत. जदुनंदनदासकृत कर्णामृत ( १६०७ )–यांत श्रीनिवासाचार्य व त्यांच्या शिष्यांची हकीकत आली आहे; पुरुषोत्तमसिद्धांत वागीशकृत वंशीशिक्षा ( १७१६ )—यांत चैतन्याचा अनुयायी वंशीदास याची हकीकत आली आहे; गोपीवल्लभदासकृत रसिकमंगल उर्फ रसिकानंदाचा जीवनवृत्तांत—जगज्जीवनमिश्राचा मनोसंतोषिणी ग्रंथ; यांत चैतन्याच्या सिल्हेट व पूर्व बंगालमधील प्रवासाचें मनोहर वर्णन आहे. याशिवाय चूडामणीकृत चैतन्यचरित, शंकरभट्टकृत निमाईसंन्यास, लोकनाथदासकृत सीताचरित इत्यादि अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत.

वैष्णव धर्मावर अनेक ग्रंथ संस्कृतांत लिहिले गेले आहेत. बंगाली भाषेंत या विषयावरील अनेक ग्रंथांपैकीं प्रमुख ग्रंथ म्हणजे अकिंचनदासकृत भक्तिसात्त्विका, अच्युतदासकृत गोपीभक्तिरसगीता, आनंददासकृत रसचूडार्णव, पसंददालन, गुरुतत्त्व, गौरसदासवसुकृत प्रेमभक्तिसार, गोपीनाथांचा सिद्धसार, नरोत्तमदासाचा प्रेमभक्तिचंद्रिका, प्रेमानंदकृत मनशिक्षा, रामगोपाळकृत चैतन्यतत्त्वसार, अनंतरामदत्तकृत क्रियायोगसार, नंदकिशोरदासकृत वृंदावनलीलामृत, व रसपुष्पकलिका, बलरामदासकृत कृष्णलीलामृत इत्यादि होत.

पण वैष्णव वाङ्मयामध्यें अत्यंत महत्त्वाचा भाग म्हटला म्हणजे पद्यांचा होय. या पद्यांत मुख्यतः वृंदावनांतील कृष्णलीलांचें वर्णन आलेलें असतें. कृष्णानें गोपालांच्या संगतींत काढलेलें आयुष्य, त्याला मारण्याचे कंसाचे प्रयत्न, राधाकृष्णप्रेम, इत्यादि विषय या पद्यांतून आढळतात. त्यातल्या त्यात कृष्णाच्या बाललीलांवर तर असंख्य पद्यें झालेलीं आहेत. या पद्यांचे कृषिगोष्ट, देवगोष्ठ, उत्तरगोष्ठ, इत्यादि अनेक भाग पाडण्यात आलेले आहेत. हीं पद्यें वरवर दिसण्यात जरी वैषयिक दिसतात तरी तीं मुळांत आध्यात्मिक आहेत. राधाकृष्णप्रणयावरील पद्यें अतोनात असून तीं अत्यंत मनोहर आहेत. राधेची कृष्णावरील प्रीति म्हणजे आत्म्याची परमात्मपदीं लीन होण्यासाठीं चाललेली धडपड होय. या दृष्टीनें राधाकृष्णांच्या प्रणयलीलांचा अर्थ लावला म्हणजे या पद्यांचें खरें महत्त्व कळून येतें. चैतन्याची कृष्णावरील अद्वितीय प्रीति, कृष्णाच्या स्वरूपांत विलीन होण्याची त्याची धडपड, मेघ अगर समुद्र अगर एखादी सुंदर वस्तु पाहिली असता चैतन्याला समाधि लागणें या सर्व चैतन्यलीला राधेच्या स्वरूपांत वर्णिलेल्या आहेत कीं काय असा भास या पद्यवाचनानें होतो. हीं पद्यें वाचत असतांना त्यांतील प्रेमभावनाच्या ज्या सूक्ष्म छटा दृष्टीस पडतात त्यायोगानें मनावर एक प्रकारचा पवित्र संस्कार होतो व उच्च व दिव्य प्रेमाच्या साम्राज्यांत विहार करीत असल्याचा भास होतो. मनुष्याच्या अंतःकरणांतील प्रीतीचा पारा किती उच्च चढवितां येईल हें या पद्यावरून उत्तम रीतीनें कळतें.

अशा प्रकारचीं प्रेमपर पद्यें करणाऱ्या अनेक पद्यकारांत गोविंददास ( १५३७–१६१२ ) याचा नंबर पहिला लागतो. याचीं राधाकृष्णपर गाणीं व्रज भाषेंत लिहिलेलीं असून तीं अत्यंत कर्णमधूर आहेत. भाषालालित्य, सहज साधलेला प्रास, कोमल भावना या बाबतींत चंडिदासाइतकीच गोविंददासाची योग्यता आहे यांत शंका नाहीं. या पद्यांशिवाय गोविंददासानें संस्कृतांत संगीतमाधव व कर्णामृत हे दोन काव्यमय ग्रंथ लिहिलेले आहेत. गोविंददासाच्या पद्याचा नमुना म्हणून एक पद खालीं देत आहों.

याहक लागि गुरुगंजन मन रंजनु दुरजन किये नाहिं केल।
याहक लागि कुलवतीवरत समापल,लाजे तिलांजलि देत ॥
सजनि जानु कठिणु कठिण पराण ।
व्रजपूर परिहरि याओरसो हरि शुनइते नाहि बादिराण ॥
यो मझु सरस समागम लागस मणिमय मंदिर छोडी ।
कंटक कुंजे जागि निशिवासर पथ नेहारत मोरी ॥
याहक लागि चलइते चरणे पडल फणि मणिमंजिर
करि मानि ।
गोविंददास भण कैछन सोदिन विछुरबा इह अनुमानि ॥

गोविंददासाच्या खालोखाल ज्ञानदास व बलरामदास यांचे नंबर लागतात; या दोन्ही पद्यकारांनीं आपल्या पद्यांत चंडीदासाचें अनुकरण केलेलें आढळतें. जदुनंदनदास ( जन्म

१५३७ ) याचींहि पद्यें चांगलीं आहेत. पद्यांशिवाय त्यानें कर्णानंद नांवाचा ऐतिहासिक ग्रंथ लिहिला, व कृष्णदास कविराजकृत गोविंदलीलामृत व रूपगोस्वामीकृत विदग्धमाधव नाटक या दोन संस्कृत ग्रंथांचें बंगाली पद्यांत भाषांतर केलें. राधशेखर हा १८ व्या शतकांत होऊन गेला. याचीं पद्येंहि अत्यंत भावनापूर्ण असून काव्यमय आहेत. घनःश्यामदासाचीं पद्यें बंगालमध्यें फार प्रसिद्ध आहेत. अनंतदासाचीं ४७ पद्यें उपलब्ध असून तींहि अतिशय लोकप्रिय आहेत. वंशीवादन या प्रख्यात पद्यकाराचीं ३८ पद्यें उपलब्ध असून तीं बंगालमध्यें आवडीनें गायलीं जातात. हा १४९८ सालीं जन्मला. वसुघोष, माधवघोष व गोविंदघोष या तिघांहि भावांनीं सुंदर पद्यें रचिलीं असून त्यांपैकीं वसुघोषाचीं चैतन्यस्तुतिपर पद्यें प्रसिद्ध आहेत. चैतन्याचा आवडता शिष्य नरहरी सरकार ( १४८७–१५४० ) यानेंहि चैतन्यस्तुतिपर सुंदर पद्यें रचिलेलीं आहेत. प्रेमदासाने वैष्णवभक्तिपर मनोहर पद्यें रचिलीं असून कविकर्णपूरकृत चैतन्यचंद्रोदय या संस्कृत नाटकाचें बंगाली पद्यांत भाषांतर केलें आहे. ओरिसाचा प्रधान रायरामानंद याचीं बंगाली पद्यें अत्यंत रमणीय अशीं आहेत. या पद्यांत आध्यात्मिक अर्थ भरलेला आहे. याचें एक प्रसिद्ध पद्य खालीलप्रमाणें आहे.

पहिलहि राग नयन भंगे भेल ।
अनुदिन बाढल, अवधि ना गेल ।
ना सो रमण ना हाम रमणी ।
दुहू मने मनोभग पशिल जानि ॥
ए सखि से सब प्रेमकाहिणी ।
कानू ठामे कहब विछरब जानी ।
ना खोंजल दुति ना खोंजल आन ।
दुहुंको मिलन मध्यस्थ पांचबाण ॥

रामगोपालदास ( १६४३ ) व त्याचा मुलगा पीतांबरदास यांचीं पद्येंहि बंगालमध्ये लोकप्रिय झालीं आहेत. याशिवाय सुमारें १५० पद्यकारांचीं नांवें सेन यानीं, आपल्या बंगाली वाङ्मयावरील ग्रंथांत दिलेलीं आहेत. तात्पर्य, हें पद्यवाङ्मय म्हणजे सुंदर काव्यमय पद्यांची खाणच होय, यांत शंका नाहीं. या पद्यांत अभिजातवाङ्मयांतील कृत्रिम शब्दप्रयोग, विशिष्ट प्रकारची छंदोरचना वगैरे प्रकार आढळून येत नाहींत, उलट काव्याचे कृत्रिम निर्बंध यांत पार झुगारून दिलेले आढळतात. पद्यांतील भाषा सोपी पण सुंदर अशी आहे. मृदु भावनांचें प्रतिबिंब यांत दृष्टीस पडतें. या पद्यांत शब्दस्वातंत्र्याप्रमाणेंच विचारस्वातंत्र्यहि आढळून येतें. निष्काम प्रेमाची ध्वजा बंगालमध्यें उभारण्याचें काम मुख्यतः या पद्यांनीं केलें. या पद्यकारांचीं पद्यें एकत्र करण्याचे पुष्कळांनीं प्रयत्न केले. १६ व्या शतकांतील मनोहरदासानें, जवळ जवळ १५००० पद्यांचा संग्रह करून पदसमुद्र नांवाचा पद्यसंग्रह प्रसिद्ध केला. त्याच शतकांतील राधामोहन ठाकूर यानें पदामृतसमुद्र नांवाचा संग्रह प्रसिद्ध केला. याशिवाय गौरमोगीनदासाचा पदकाव्यलतिका, हरिवल्लभाचा गीतचिंतामणि, नरहरीचा गीतचंद्रोदय, प्रसाददासाचा पदचिंतामणिमाला, पीतांबरदासाचा रसमंजरी इत्यादि संग्रह प्रसिद्ध आहेत. त्याशिवाय लीलासमुद्र, पदार्णवसारावली, गीतकल्पलतिका इत्यादि संग्रह प्रसिद्ध आहेत. पण संग्रहकर्त्यांचीं नांवें प्रसिद्ध नाहींत. या पद्यसंग्रहांत, पदकल्पतरू हा पदसंग्रह अत्यंत लोकप्रिय आहे. याचा कर्ता वैष्णवदास हा १८ व्या शतकांत जन्मला. यांत ३१०१ पद्यें असून त्याचे चार भाग आहेत. यांत वैष्णव ग्रंथकारांचीं उत्तम पद्यें तेवढींच ग्रथित केलेलीं आढळतात.

वैष्णव वाङ्मयाचा तत्कालीन समाजावर मोठा परिणाम झाला. वैष्णव धर्माच्या तत्त्वांचा सगळीकडे बोलबाला होऊं लागून तीं तत्त्वें यच्चयावत् वंगवासी जनतेच्या मुखांत खेळूं लागलीं. या काळीं जें वैष्णवेतर वाङ्मय निर्माण झालें त्यावरहि या वैष्णव धर्माची छाप पडल्यावांचून राहिली नाहीं. कृत्तिवासानें जें रामायण रचिलें त्याच्यांत या काळच्या पंडितानीं आपल्या मनास वाटेल ती भर घालून त्याला नवीन पेहराव दिला. या नवीन पेहरावानें सगळेल्या रामायणांत चैतन्य हा राम असून नास्तिक लोक हे रावणादि राक्षस होत असें दाखविण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. त्याचप्रमाणें पुराणांतील शिवाच्या स्वरूपांत आपली भर घालून त्याचें स्वरूपहि बदलून टाकण्याचा प्रयत्न केला आहे. चैतन्याच्या वैष्णव धर्मांतील उच्च उच्च तत्त्वें शाक्तपंथी व शैवपंथी लोकांनीं आपल्या पंथांत आत्मसात् करण्याचा प्रयत्न चालविला होता; व अशा रीतीनें आपल्या पंथाची सुधारणा करून या संप्रदायाविरुद्ध चळवळ करण्यास सुरवात केली होती. एका शाक्त कवीनें चैतन्यावर एक निंदाप्रचुर कविता लिहून त्याच्या पंथावर सडकून टीका केलेली प्रसिद्ध आहे. वाङ्मयाच्या दृष्टीनें वैष्णवांनीं केलेली प्रमुख कामगिरी म्हणजे त्यांनीं बंगाली भाषेंत अमोलिक ग्रंथ लिहून त्या भाषेला वैभव प्राप्त करून दिलें. मनोहरसाह नांवाचें नवीन वाद्य निर्माण करून व आपली स्वतंत्र रागपद्धति निर्माण करून त्यांनीं आपलीं पद्यें त्या धर्तीवर रचिलीं व गायिलीं. बंगाली भाषेंत पुष्कळसे हिंदी शब्द आणले. व्याकरणांत पूर्वी अनेकवचनी रूप करण्याकरितां सब, सकल, गण इत्यादि शब्द योजण्यांत येत असत त्याबद्दल अनेकवचनी नवीन प्रत्यय निर्माण केले. संस्कृत छंदांमधील निर्बंध सैल केले व काव्याला अधिक स्वातंत्र्य प्राप्त करून दिलें.

चैतन्योत्तरकालीन वाङ्मयः—चैतन्योत्तर कालामध्यें वैष्णव धर्माचा हळू हळू ऱ्हास होऊं लागून पुन्हां कर्मठ धर्मानें आपलें डोकें वर काढण्यास सुरवात केली. याला मुख्य कारण म्हणजे वैष्णव संप्रदायांत भक्तांच्या नांवाखालीं माजलेली अनीति होय. या अनीतीमुळें वैष्णवधर्माबद्दल जनतेची सहानुभूति कमी होऊं लागली. याच सुमारास म्हणजे १८ व्या शतकांत मुसलमानी सत्तेलाहि उतरती कळा

लागली होती व बंगालमध्यें बेबंदशाही माजली होती. छोट्या छोट्या सरदारांनीं बंडें करून आपली सत्ता वाढवण्याचा उपक्रम केला होता. राधाकृष्णचंद्र नांवाच्या राजानें कृष्णनगर व त्याच्या भोंवतालचा मुलुख आपल्या ताब्यांत आणून त्यावर आपली सत्ता वळकावली होती. हा राजा गुणी जनांचा चहाता व स्वतः पंडित व चांगला कवि होता. यानें आपल्या भोंवतीं त्या काळच्या मोठमोठ्या विद्वानांनां आपल्या दरबारीं आश्रय दिला होता.

वैष्णव संप्रदायाच्या ऱ्हासामुळें, वैष्णवकालीन वाङ्मयांत जें वाङ्मयीन स्वातंत्र्य व ओज दृष्टीस पडत होतें तें नाहींसें होऊन पुन्हां १८ व्या शतकांतलें वाङ्मय जुन्या वाङ्मयाच्या वळणावर जाऊं लागलें. राजदरबारीं पंडितांनां आश्रय मिळाल्यामुळें त्यांची कविताहि राजाला मानवेल अशा विषयावरच रचण्यांत येऊं लागली. उच्च वाङ्मय निर्माण होईनासें झालें. विचारापेक्षां, शब्दांच्या सजावटीकडे अधिक लक्ष्य पुरविण्यांत येऊं लागलें; वाङ्मयावर जुन्या कृत्रिम दडपणाचें वर्चस्व प्रस्थापित होऊं लागलें व चैतन्यकालीन वाङ्मयीन स्वातंत्र्याला ओहोटी लागली. तथापि अशाहि काळांत बंगालमध्यें कांहीं नांवाजलेले कवी व लेखक निर्माण झाल्याविना राहिले नाहींत. सगळ्यांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे या नवीन वाङ्मयाचा आरंभ एका मुसुलमान गृहस्थाकडून झाला हीं होय. या मुसुलमान गृहस्थाचें नांव सय्यद अलोल हें होतें. आराकानचा प्रधान मागन ठाकूर याच्या सांगण्यावरून त्यानें 'पद्मावत' या हिंदी काव्याचें बंगालींत पद्यमय भाषांतर केलें. त्याचप्रमाणें त्याच्याच सांगण्यावरून त्यानें सैफुलमुलुक व बदिउजमाल या फारशी ग्रंथांचेंहि बंगालींत भाषांतर केलें. पुढें त्यानें लोला चंद्राणी, सती मैना इत्यादि ग्रंथांचे व पुढें निझाम गझनवीच्या हफ्तपैकर नांवाच्या उर्दू काव्याचें बंगालींत भाषांतर केलें. अलोल १६१८ सालीं जन्मला व वराच म्हातारा होऊन मेला. अलोलनें मुख्यतः जरी भाषांतरवजा ग्रंथ लिहिले तरी मूळ ग्रंथांचें त्यानें शब्दशः भाषांतर न करतां आपल्या कल्पनाहि त्यांत घालून दिल्या असल्यामुळें त्याचें भाषांतर मूळ ग्रंथापेक्षां सरस झालें आहे. अल्लाउद्दीन व पद्मावती या विषयावरील पद्मावत हा त्याचा मुख्य ग्रंथ होय. यांत उच्च अगर संस्कृत बंगाली भाषा अलोलनें वापरली आहे. विचित्र कल्पना, विचित्र व अगडबंब शब्द घालून केलेलीं वर्णनें, संस्कृत शब्दांची योजना इत्यादिकांची पद्मावत ग्रंथांत रेलचेल आढळते. संस्कृत वाङ्मयाशीं त्याचा दृढ परिचय असल्यामुळें, संस्कृत वृत्तें, संस्कृतांतील, प्रेमविषयक वर्गीकरणें इत्यादिकांचा त्यानें आपल्या ग्रंथांत उत्तम उपयोग केला आहे. विचित्र व भरमसाट वर्णनांचा मासला म्हणून अलोलच्या ग्रंथांतील उतारा वाचण्यालायक आहे.

कनक मुकुर जिनि मुखज्योति साजे ।
देखइ अपूर्व रीत वदन उपरे ।
पद्मयुग वंदी हय चंद्रेर माझारे ।
शत्रुमाजे मित्र बंदी देखि दिवाकर ।
धरिया सिंदूर रूप आइल नियड ॥
भुरुयुग धरिया पंचबाण ।
तिलि तिलि हाने बाणकटाक्षे संधान ।
कमलनयनी मात्र मने एइ दुःख ।
निकटे ठाकिया मित्र ना देखाय मूख ।

तथापि या ग्रंथांतील कांहीं वर्णनें खरोखरीच सुंदर असून तीं वर्णनें अलोलच्या उच्च कवित्वाची खात्री पटवितात. अलोलपेक्षां अधिक प्रसिद्ध कवि म्हणजे भारतचंद्र हा होय. हा राजा कृष्णचंद्र याच्या पदरीं राजकवि होता. याचें विद्यासुंदर हें काव्य अत्यंत प्रसिद्ध आहे. 'विद्यासुंदर' कथेवर त्याच्यापूर्वी, गोविंददास, कृष्णाराम क्षेमानंद, मधुसूदन, रामप्रसाद इत्यादिकांनीं काव्यें रचिलीं होतीं पण भारतचंद्राच्या विद्यासुंदर काव्यापुढें हीं फिकीं पडतात भारतचंद्रानें या काव्यांत अनेक नवीन प्रसंग घातले असून त्यायोगानें या काव्याला रमणीय स्वरूप प्राप्त झालें आहे. यांत काल्पनिक वर्णनें, इतकीं आहेत कीं तीं वाचतांना वाचकांनां आपण कल्पनासृष्टींत वावरतो आहों कीं काय असें वाटतें. शब्दरचना उच्च बंगालींत असून त्यांत संस्कृत शब्दांचा भरणा आहे. बाह्यांगाकडेच कवीनें आपलें सारें लक्ष पोहोंचविल्यामुळें वैष्णव वाङ्मयांतील साधेपणा व प्रसाद या काव्यांत दिसून येत नाहीं. तथापि अनेक दृष्टींनीं हा काव्यग्रंथ अतिशय लोकप्रिय झाला असून त्याची लोकप्रियता यथोचित आहे यांत शंका नाहीं. हें काव्य त्याच्या आनंदमंगल नांवाच्या एका काव्याचा भाग आहे. यशिवाय भारतचंद्रानें रसमंजरी नांवाचा ग्रंथ व चंडीनाटक नांवाचें एक अपूर्ण नाटक व इतर पुष्कळ गोष्टी लिहिल्या आहेत. चंडीनाटकांत संस्कृत, बंगाली व फारशी या तिन्ही भाषेंतील शब्दप्रयोग आढळतात. भारतचंद्राच्या काव्यात ध्वन्यनुकारी ( आनोमाटोपोएटिक ) शब्दांचा भरणा आढळतो व त्यामुळें काव्य वाचतांना मनाला अतिशय आनंद वाटतो; सुंदर सुंदर शब्दप्रयोग एके ठिकाणीं आणून त्यामुळें वाचकाच्या मनावर मोहिनी घालण्याची त्याला अजब हातोटी साधलेली आहे. प्रसंगाला अनुलक्षून यथोचित वृत्त घालण्यांत त्याचा हातखंडा आहे. ज्यामध्यें वरील विशेष दृष्टीस पडतात असे आनंदमंगल काव्यांतील कित्येक उतारे देतां येतील. पण दोनच उतारे खालीं दिलेले आहेत. वसंतकाळच्या अवताराचें वर्णन त्यानें खालीलप्रमाणें केलें आहे.

कलकोकिल अलिकुल बकुल फूले ।
बसिला अन्नपूर्णा मणिदेऊळे ।

कमल परिमल लये शीतल जल पवनें टलटल उछले कले ।
बसंतराजा आनि छय रागिणी राणी करिला राजधानी अशोक मूले ।
कुसुमे पुनः पुनः भ्रमरे गुणगुण मदन दिल गुण धनुक हूले ।
यतेक उपवन कुसुमसुशोभन मधूमुदितमन भारत भूले ।

यांत मंजुल शब्द घालून कवीनें उत्तम प्रास साधला आहे. अशाच तऱ्हेचा दुसरा उतारा शिववर्णनपर आहेः—

महारुद्ररूपे महादेव साजे ।
भभओम भभओम शिंगा घोर बाजे ।
लटपट जटाजूट संघट्ट गंगा ।
छलछल टलटल कलकल तरंगा ।
फणाफण फणाफण फणी फन्न गाजे ।
दिनेश प्रतापे निशानाथ साजे ।
धकध्वक धकध्वक ज्वले वन्हि भाले ।
भभओं भभओं महाशब्द जाले ।
धिया ताधिया ताधिया भूत नाचे ।
उलंगी उलंगे पिशाची पिशाचे ॥

भारतचंद्र हा १७२२ सालीं जन्मला. याच्या काव्यप्रभुत्वामुळें राजा कृष्णचंद्रानें त्याला रायगुणाकर ही पदवी व मोठें इनाम दिलें होतें. हा १७६० सालीं मरण पावला. भारतचंद्र हा ज्याप्रमाणें पश्चिम बंगालमध्यें प्रसिद्धीस आला त्याप्रमाणेंच त्याच्या समकालीन जगनारायणसेन व त्याची पुतणी आनंदमयीदेवी यांनीं पूर्वबंगालमध्यें राजवल्लभ राजाच्या आश्रयानें काव्याच्या क्षेत्रांत कीर्ति मिळविली. जयनारायण व आनंदमयी या दोघांनीं मिळून हरिलीला नांवानें एक मोठें काव्य लिहिलें. जयनारायण हा भारतचंद्राच्या तोडीचा कवि होता. तथापि भारतचंद्राइतकी बाह्यांग सजविण्याची कला त्याला साधली नव्हती. भारतचंद्राप्रमाणेंच जयनारायण व आनंदमयी यांची संस्कृतप्रचुर बंगाली शब्दयोजना करण्याची पद्धति आहे. एका दृष्टीनें अशा प्रकारच्या संस्कृतप्रचुर शब्दसंयोगामुळें बंगाली भाषेचें शब्दभांडार अपरिमित वाढलें यांत शंका नाहीं. हरीलीलेंतील आनंदमयीच्या काव्यांत विद्वत्तेचें प्रदर्शन अधिक दृष्टीस पडतें; तर जयनारायणाच्या कवितेंत प्रसाद व वर्णनमाधुर्य.हे गुण आढळून येतात. हरीलीलेशिवाय चंडी नांवाचें एक काव्यहि यांनीं लिहिलें आहे.

१८व्या शतकाच्या उत्तरार्धांत भारतचंद्राच्या काव्यपद्धतीचें अनुकरण करणारे अनेक कवी निर्माण झाले. या कवींनीं बंगाली भाषेला सौंदर्य प्राप्त करून दिलें, तथापि बंगाली काव्यामध्यें कृत्रिमता मात्र निर्माण केली. शिवाय त्यांच्या वाङ्मयामध्यें अश्लीलपणाचीहि रेलचेल दृष्टीस पडते. या अनुकरण करणाऱ्या कवींमध्यें चंद्रकांत, कामिनीकुमार, गिरिधर इत्यादि कवी प्रमुख होत.

भारतचंद्रादिकांनीं निर्माण केलेलें वाङ्मय हें बंगालमधील आबालवृद्धांच्या आवांक्याबाहेरचें होतें. सुशिक्षित लोकांनाच या वाङ्मयाचा फायदा मिळत असे. पण अशा प्रकारच्या संस्कृतप्रचुर व वरच्या दर्जाच्या लोकांच्या वाङ्मयाखेरीज सामान्य जनतेला कळेल अशा प्रकारचेंहि वाङ्मय १८ व्या शतकांत व तत्पूर्वी निर्माण झालें होतें अशा प्रकारचें वाङ्मय म्हणजे (१) कविवाल्यांचीं गाणीं, (२) धार्मिक गाणीं व (३) यात्रागाणीं हें होय. कविवाल्यांचीं गाणीं हीं मुख्यतः राधाकृष्णांच्या लीलांवर रचिलेलीं आहेत, तथापि इतरहि विषयांवर त्यांनीं गाणीं रचिलेलीं आढळतात. नाटयकलेच्या प्रगतीमुळे या कविवाल्यांची संख्या कमी होत चालली आहे, पण पूर्वी या कविवाल्यांची बंगवासी जनतेंत फार लोकप्रियता होती. या कविवाल्यांच्या गाण्यांमधील कांहीं गाण्यांत तत्कालीन सामाजिक व धार्मिक परिस्थितीचें उत्कृष्ट चित्र रेखाटलेलें दृष्टीस पडते. कांहीं गाण्यांत उदात्त धार्मिक विचार दृष्टीस पडतात. या कविवाल्यांत परस्परामध्यें वाग्युद्धेंहि पुष्कळ वेळां होत असत. कविवाल्यांमधील प्रमुख कविवाले म्हणजे हरु ठाकूर ( १७३८–१८१३ ), रामवसू ( १७८६–१८२८ ), नित्यानंद विरागी (१७५१–१८२१), निळू, रामप्रसाद, उदयदास, मोहन सरकार, ठाकूरसिंह, इत्यादि होत; पण या कविवाल्यामध्यें ज्याचें नांव मुद्दाम घेतलें पाहिजे तो म्हणजे अंटनी हा पोर्तुगीज गृहस्थ होय. यानें एका हिंदु स्त्रीशीं लग्न केलें होतें. यानें बंगाली भाषेचा मार्मिक अभ्यास केला होता. हा उत्तम कविवाला असून जागच्या जागीं बंगालीमध्यें शीघ्र कविता करीत असे व तत्कालीन लोकांत त्यानें पुष्कळच लोकप्रियता मिळविली होती. धार्मिक गाणीं रचणाऱ्यांमध्यें रामप्रसाद सेन हा प्रमुख होय. याचीं गाणीं बंगालमध्यें अत्यंत लोकप्रिय आहेत. याचीं गाणीं मुख्यतः कालीच्या भक्तिपर आहेत. रामप्रसाद हा सन १७७५ मध्यें मरण पावला. त्याची परंपरा चालवणाऱ्यांमध्यें लाहोरचे महाराजा रामकृष्ण कमलकांत, दिवाण रघुनाथराय ( १७५०–१८३६ ), दिवाण रामदुलाल नंदी ( १७८५–१८५१ ) हे मुख्य होत. यात्रेवाल्यांचीं गाणींहि बंगालमध्यें अतिशय लोकप्रिय आहेत. यात्रेवाले म्हणजे नाटकमंडळ्यांचे पूर्वज होत असें म्हणतां येईल. बंगालमध्यें अनेक ठिकाणीं धार्मिक यात्रा भरत त्यावेळीं हे यात्रेवाले तेथें आपल्या मंडळींसह जाऊन आपलीं छोटीं नाटकें तात्पुरत्या रचलेल्या रंगभूमीवर करून दाखवीत. हीं नाटकें मुख्यतः राधाकृष्णपर असत. यांतील कांहीं नाटकें तर अलीकडील उत्तम नाटकांच्या जोडीला बसविण्याजोगीं आहेत. या यात्रेवाल्यांमध्यें गोपाल उरिया (१८१९–१८५९), गोविंद अधिकारी, पीतांबर अधिकारी, गुरुप्रसाद वल्लभ इत्यादि प्रसिद्ध यात्रेवाले होऊन गेले.तथापि या यात्रेवाल्यांमध्यें अग्रपूजेचा मान कृष्णकमल यास दिला पाहिजे. हा १८१० त जन्मला व १८८८ त वारला. त्याचीं स्वप्नविलास;

राइउन्मादिनी, भरतमीलन, निमाइसंन्यास, इत्यादि नाटकें फारच उत्कृष्ट आहेत. स्वप्नविलासाच्या प्रती कांहीं आठवडयांत पूर्वबंगालमध्यें २०००० वर खपल्या यावरून त्यांची लोकप्रियता व्यक्त होते. कांहीं नाटकें गद्यपद्यमिश्रित अशींहि आढळतात. त्यांत रामवल्लभाचें दूतीसंवाद, व एका अनामधेयाचें विद्यासुंदरगायन हीं महत्त्वाचीं आहेत.

चैतन्योत्तरवाङ्मययुगाच्या समाप्तीच्या शेवटच्या कालांत दाशरथी, रामानेधिपति व ईश्वरगुप्त या तिघा प्रसिद्ध कवींची गणना होते. हे तिघेहि कवी १९ व्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गले, तथापि त्यांच्यावर इंग्लिश संस्कृतीचो छाप पडलेली आढळत नाहीं. त्यामुळें यांची चैतन्योत्तरवाङ्मययुगांतच गणना करणें आवश्यक आहे. दाशरथी ( १८०४–१८५७ ) हा सामान्य जनांचा आवडता कवि होय. यानें पांचाली हें काव्य राधाकृष्णपर असून तें अत्यंत लोकप्रिय आहे. दाशरथाचा कोटया व प्रास या बाबतींत हातखंडा होता. त्याचीं काव्यें सामान्य जनासाठींच असल्यामुळें त्यांत पुष्कळ वेळां अश्लील भाग येत असे तथापि धार्मिक गाणीं करण्यांतहि तो पटाईत होता यानें ५० ग्रंथ लिहिले. त्यांत श्रीकृष्णजन्माष्टमी, नंदोत्सव, सत्यभामारव्रत, द्रौपदीवस्त्रहरण इत्यादि प्रसिद्ध होत. रामानिधी गुप्त ( १७३८–१८२५ ) हा त्याच्या प्रणयगीतांबद्दल प्रसिद्ध आहे. या गीतांमध्यें प्रणयाची अत्युच्च कल्पना दिसून येते. हीं गीतें 'टप्पा' नांवाच्या रागांत म्हटलीं जातात, व तीं कानाला फारच मधुर लागतात. यानें अशीं गीतें सुमारें पांच हजारपर्यंत रचिलीं. ईश्वरगुप्त ( १८११–१८५८ ) हा त्याच्या काळचा प्रसिद्ध लेखक व कवि होय. यानें संवादप्रभाकर नांवाचें साप्ताहिक व संवादरत्नावली नांवाचीं मासिकें चालविलीं होतीं. भागवताचें त्यानें बंगाली पद्यांत भाषांतर केलें आहे. यानें पन्नास हजार ओळी कविता रचली असें म्हणतात. पण त्याची मुख्य प्रसिद्धि, जुन्या कवींचा परिश्रमपूर्वक माहिती मिळवून त्यानें जीं चरित्रें लिहिलीं त्याबद्दल आहे. ईश्वरगुप्ताचें गद्य ओबडधोबड आहे; तथापि त्याचें पद्य मनोहर आहे. निंदागर्भित काव्याबद्दल त्याची फार प्रसिद्धि आहे. त्याची पद्यरचना भारतचंद्राच्या वळणावरच आहे.

कथावाङ्मयः—बंगालीमध्यें कथावाङ्मयहि पुष्कळच आढळून येतें तथापि तें एकत्र करण्याचा प्रयत्न अद्यापिहि फारसा झाला नाहीं. दक्षिणाबाबू मुजूमदार यांनीं अलीकडे १६ गोष्टींचे दोन भाग छापले आहेत. त्यांतील गोष्टी अगदीं साध्या पण हृदयंगम आहेत. त्यांत प्राचीन बंगालची कौटुंबिक स्थितीचें व सामाजिक परिस्थितीचें चित्र स्पष्ट दिसतें.

ऐतिहासिक काव्येंः—बंगालीमध्यें ऐतिहासिक काव्यें फार थोडीं आहेत. त्यांपैकीं पहिलें ऐतिहासिक काव्य म्हणजे 'राजमाला' हें होय. महाराज श्रीधर्ममाणिक्य ( १४०७–३९ ) यांच्या आज्ञेवरून शुक्रेश्वर व बाणेश्वर या राजकवींनीं हें काव्य रचलें. यांत टिप्पेरा येथील राजांचा इतिहास आला आहे. त्यानंतर १७४१ सालीं 'महाराष्ट्रपुराण' नांवाचें काव्य गंगाराम यानें रचिलें. मराठ्यांच्या स्वाऱ्यांमुळें बंगालमधील लोकांचा कसा थरकांप होत असे त्याचें वर्णन या काव्यांत पहावयाला मिळतें. समशेरगाझीरगण नांवाचें एक ऐतिहासिक काव्य असून त्यांत समशेरगाझीचें चरित्र वर्णिलेलें आहे. त्याशिवाय चौधरीकृत लढाई द्विज रामचंद्रकृत दाराशेख, अनूपचंद्रकृत प्रतापचंद, व अनेक छोटीं ऐतिहासिक काव्यें १८ व्या शतकांत झालीं.

शास्त्रीय वाङ्मयः—रामगतीचें मायातिमिरचंद्रिका हें योगाच्या माहितीचें काव्य प्रसिद्ध आहे. त्याशिवाय गुणराजखानकृत हाडमाल, सय्यदसुलतानचें ज्ञानप्रदीप, तनुसाधन, ज्ञानचौतीस इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. भाषांतरित ग्रंथांमध्यें जयनारायण घोसालचें काशीखंडाचें भाषांतर फार महत्त्वाचें आहे.

मिश्रवाङ्मयः—बंगालमध्यें हिंदु व मुसुल्मान यांचा निकट संबंध येत असल्यामुळें, परस्परांच्या संस्कृतीचे परस्परावर परिणाम पडून येणें स्वाभाविक होतें. हिंदु व मुसुलमान यांचा सर्वसाधारण देव 'सत्यपीर' होता व या देवाच्या स्तुतिपर हिंदु व मुसुलमान ग्रंथकारांनीं ग्रंथ लिहिलें. अशापैकीं फकीरचंदाचा 'सत्यपीरेर पांचाली' ( १७३४ ), रमानंदाचा 'सत्यपीर', शंकराचार्याचा 'सत्यपीर'. शिवाय करिमुल्लाचा यामीनीमबहाल ( १७६० ), संगीतशास्त्रावरील रागमाला, तालनामा, श्रीस्तिपद्म, ध्यानमाला, रागतालेरपुथी, चंपागाझीचा रागताल, कथावाङ्मयांत दौलतकाजी लोर चंद्रानी, समपयकर वगैरे गोष्टी, इत्यादि ग्रंथहि प्रसिद्ध आहेत.

गद्यवाङ्मयः—चैतन्योत्तर काळांत गद्यवाङ्मय फारच थोडें निर्माण झालें, व जें झालें त्यांत भेसळ शब्दांची रेलचेल होती. गद्यांमध्यें फारशी, अरबी व पोर्तुगीज शब्द सरसहा वापरण्यांत येत असत. सहजीय पंथाच्या ग्रंथकारांनीं स्वतंत्र गद्यग्रंथ अगर पद्यमिश्रित गद्यग्रंथ थोडेसे निर्माण केले तथापि त्यांतहि गद्यापेक्षां पद्याकडेच अधिक लक्ष दिलेलें आढळतें. अशा गद्यग्रंथांत दास्यदासतत्त्वभावार्थ ( १६८५ ), सिद्धितत्त्व (१७५५), त्रिगुणात्मिक ( १७५५ ), भोगपटल, प्रेमदासकृत चंद्रचिंतामणि, दासूघोसकृत सिद्धांतटीका, व्रजकारिका, वृंदावनपरिक्रमा, वेदांतितत्त्वनिर्णय, वृंदावनलीला इत्यादि वरेच ग्रंथ केवळ गद्यांत लिहिलेले आढळतात. रसभजनतत्त्व, जिज्ञासाप्रणाली, कृष्णभक्तिपरायण, उपासनानिर्णय इत्यादि गद्यपद्यमिश्रित आहेत. वैष्णवळीसंबंधींहि वरींच पुस्तकें आहेत. पण त्यांतील पुष्कळ गद्यपद्यमिश्रितच आहेत. भाषांतरग्रंथांत तर्कशास्त्रावरील भाषापरिच्छेद, व व्यवस्थातत्त्व हा कायद्यावरील ग्रंथ हे प्रमुख होत.

चैतन्योत्तरकाळांतील काव्याचा मुख्य विशेष म्हणजे छंदोभांडार हें होय. बंगालीमध्यें संस्कृत भाषेंतील उत्कृष्ट छंद आणून भारतचंद्रानें काव्यक्षेत्रात महत्त्वाची कामगिरी बजावली. तोटक व भुजंगप्रयात हीं वृत्तें त्यानें अत्यंत ५

योजली आहेत. याशिवाय भारतचंद्राची दुसरी महत्त्वाची कामगिरी म्हणजे पद्यांतील शेवटच्या अक्षरांत प्रास जमविणें ही होय. पयार, त्रिपादी, इत्यादि छंद या काळच्या वाङ्मजागजागीं आढळतात.

अर्वाचीन बंगाली वाङ्मय.–अर्वाचीन बंगाली वाङ्मयाचा प्रारंभ ब्रिटिशांनीं बंगालवर आपलें वर्चस्व ज्यावेळीं स्थापन केलें त्यावेळेपासून होतो असें स्थूलमानानें म्हणतां येईल. ब्रिटिशांचें वर्चस्व बंगालमध्यें प्रस्थापित होण्यापूर्वी मुसुलमान, ब्रह्मी, मराठे इत्यादिकांनीं बंगालवर स्वाऱ्या करून बंगालला पादाक्रांत केलें होतें. पण या लोकांनीं राजकीय सत्तेच्या दृष्टीनें बंगाल आपल्या ताब्यांत ठेवण्याच्या प्रयत्नाशिवाय कांहीं केलें नाहीं. पण इंग्रजांनीं बंगालमध्यें आपलें वर्चस्व स्थापन करून शिवाय आपली संस्कृतीहि पसरविण्याचाहि प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें प्रयत्न केला. बंगाली लोकांशीं मिळून मिसळून त्यांतील बऱ्याच लोकांना इंग्रजीचें शिक्षण देऊन. आकाशातील बापाच्या कळपात ओढण्याचा त्यांनीं प्रयत्न केला; व त्यांत त्यांनां थोडेंबहुत यशहि आलें. ख्रिस्ती संस्कृतीनें बंगालमधील तरुण जनता दिपून गेली. आपल्या संस्कृतींतील चांगल्या भागाकडेहि त्यांनीं तुच्छतेनें पाहण्यास सुरवात केली. अशा रीतीनें ख्रिस्ती संस्कृतीचा भारतीय संस्कृतीशीं संयोग होऊन नवीन युगाला सुरवात झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ख्रिस्ती संस्कृतीच्या प्रसारकांमध्यें असेहि कित्येक लोक होते कीं, ज्यांनीं देशी भाषेचें अध्ययन करून, देशी लोकांशीं मिळून मिसळून आपला धर्मप्रसार करण्यास सुरवात केली. अशा धर्मप्रसारकांपैकीं डॉ. कॅरी नांवाचा एक मनुष्य होता. बंगाली भाषेमध्यें बायबलचें भाषांतर छापण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. यासाठीं अतिशय खटपट करून शेवटीं त्यानें आपली महत्त्वाकांक्षा तडीस नेली. याशिवाय त्यानें गद्यामध्यें इतरहि पुस्तकें लिहिलीं तीं:—बंगाली भाषेचा कोश (१८१५–२५)–बंगाली व्याकरण (१८०१), कथोपकथान (१८०१), इतिहासमाला (१८१२)-डॉ. कॅरीची परंपरा, मार्शमन, मार्टन, पीयर्सन यांनीं पुढें चालू ठेवली; व अशा रीतीनें बंगाली गद्य निर्माण करण्याच्या अगर तें वाढविण्याच्या कामाला प्रथमतः यांनींच सुरवात केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कॅरीची परंपरा चालविणाऱ्यांनीं बंगालीमध्यें जीं अनेक विषयावर पुस्तकें लिहिलीं त्याची सविस्तर यादी दिनेशचंद्र सेन यांनीं आपल्या बंगाली वाङ्मयाच्या इतिहासांत दिली आहे. त्यांतील कांहीं मुख्य मुख्य ग्रंथ म्हणजे स्मिथकृत ‘ झमीनदारी सनदा ’(१८१७),‘मे’कृत ‘मेगणीत’ (१८१७), हारलेकृत गणितांक ( १८१९ ), फॉर्स्टरकृत बंगाली कोश, रोझारियोचा कोश ( १८१७ ), गिलख्राइस्टकृत ईसॉपच्या कथांचें भाषांतर ( १८०३ ); येट्सचें हितोपदेशाचें भाषांतर ( १८४१ ); पीयर्सनकृत भूगोलवृत्तांत ( १८१८ ); हल्डेडकृत बंगाली व्याकरण (१७७८); मरे, रॉबिन्सन, कीट यांनीं लिहिलेलीं बंगाली व्याकरणें, पीयर्सनचा प्राचीन इतिहास, व इतिहाससमुच्चय ( १८१० ), पीयर्सनकृत कालक्रमिक इतिहास, मॉर्टनकृत डॅनियलचरित, मार्शमनकृत भारतवर्षीय इतिहास ( १८३१ ), लॉगकृत महमदजीवनचरित्र, डॉ. कॅरीचा ‘ द्वादवली विद्या ’, रॉबिन्सनकृत भूमिपरिमाण, येट्सकृत पदार्थविद्यासार ( १८२५ ), मॅककृत किमयाविद्यासार, येट्सकृत सारसंग्रह, तसेच शेक्सपियर, गोल्डस्मिथ इत्यादि ग्रंथकारांच्या ग्रंथांचीं भाषांतरें, हे होत. अशा रीतीनें विविध ज्ञानक्षेत्रांमध्यें या यूरोपीय ग्रंथकारांनीं बंगाली पुस्तकें लिहिल्यामुळें, बंगाली वाङ्मयाला एक प्रकारचें नवजीवन प्राप्त झालें व ही नवजीवनाची चळवळ या यूरोपीय विद्वानांची छाप ज्या बंगाली विद्वानांवर बसली त्यांनीं सर्व बंगाली जनतेंत पसरून टाकली. तरुण बंगाल तर या नवजीवनाच्या ज्योतीनें भारून गेला. शेक्सपियर, मिल्टन, गोथे, शेले, कीट्स इत्यादिकांच्या ग्रंथांचा बंगालमध्यें जारीनें अभ्यास होऊं लागला, व त्यामुळें अगदीं नव्या धर्तीचें वाङ्मय बंगालमध्यें निर्माण होऊं लागलें.

डॉ. कॅरीप्रभृति धर्मप्रसारकांनीं ज्याप्रमाणें बंगाली वाङ्मयाला नवीन वळण लावलें, त्याचप्रमाणें फोर्ट विल्यम येथें १८०० सालीं स्थापन झालेल्या फोर्ट विल्यम कॉलेजमधील पंडितांनीं या कामीं बराच हातभार लाविला. या पंडितांमध्यें मृत्युंजय तर्कालंकार हा अग्रणी होय. हा अत्यंत विद्वान होता. यानें प्रबोधचंद्रिका नांवाचा बंगाली गद्यांत एक ग्रंथ लिहिला असून तो त्याच्या अगाध विद्वत्तेचें स्मारक होय; यांत शंका नाहीं. यांत हिंदु ज्योतिष, तर्क, न्याय, वेदांत इत्यादि अनेक शास्त्रांवर विद्वत्तापूर्ण निबंध असून त्यांची भाषा अगदीं शुद्ध पण सुंदर आहे. त्याचा दुसरा ग्रंथ राजावली ( १८०८ ) होय. यांत तैमूरलंगापर्यंतचा प्राचीन हिंदुस्थानचा इतिहास आहे. बात्रिस सिंहासन व हिंदु न्यायपद्धतीचें भाषांतर असे त्याचे आणखी दुसरे दोन ग्रंथ आहेत. मृत्युंजय तर्कालंकाराच्या खालोखाल रामराम वसु याचा नंबर लागतो. रामराम वसूचा प्रतापादित्यचरित्र हा अर्वाचीन बंगाली वाङ्मयांतील पहिला गद्यग्रंथ होय. हा १८०१ सालीं प्रसिद्ध झाला. यांतील भाषेंत फारशी व उर्दू हे शब्द फार आढळतात. या ग्रंथाशिवाय त्याचा लिपिमाला,हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या दोन ग्रंथकारांशिवाय इतर दुसरे दोन ग्रंथकार म्हणजे चंडीचरण मुनशी व राजीवलोचन मुखोपाध्याय हे होत.चंडीचरण मुनशीनें ‘तोत इतिहास’ हा ग्रंथ लिहिला आहे;व राजीवलोचनाचा कृष्णचंद्रचरित हा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

आंग्ल शिक्षणाची व संस्कृतीची ज्यांच्यावर छाप पडली होती व धर्मप्रसारकांच्या उत्तेजनानें प्रेरित होऊन ज्यांनीं बंगाली गद्यांत अपूर्व भर टाकली अशा अनेक ग्रंथकारांत रेव्हरंड कृष्णमोहन बानर्जी (जन्म १८१३) हा अग्रणी होय. यानें १८३२ सालीं ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली याची

अत्यंत महत्त्वाची कामगिरी म्हणजे विश्वकल्पद्रुम अगर बंगाली ज्ञानकोश हा होय. १८४६ सालापासून या कामाला सुरवात झाली व याचे ईजिप्त, रोमचा इतिहास, भूगोल, चरित्रें इत्यादिकांचे मिळून एकंदर १३ भाग बाहेर पडले. बानर्जीनंतर त्याच्या परंपरेंत अनेक विद्वानांनीं बंगाली वाङ्मयांत भर घातली .शब्दकोश, व्याकरण, इतिहास, चरित्रें, नैतिक कथा, भूगोल, भूमिति, इत्यादि निरनिराळ्या विषयांवर यांनीं ग्रंथ लिहिले. अशा प्रकारच्या६५ग्रंथांची व तत्कालीन वृत्तपत्रें व मासिकें यांची यादी सेन यांनीं आपल्या पुस्तकांत दिली आहे.

१९ व्या शतकांतील पहिल्या पादांतील गद्यलेखकांची भाषा बरीच ओबडधोबड व क्लिष्ट असे. परंपरागत वाङ्मयाहून हें नूतन वाङ्मय अगदीं निराळ्या प्रकारचें होतें. यामुळें जुन्या व नव्या वाङ्मयांमध्यें एकसूत्रीपणा राहिला नाहीं. पूर्वीचें वाङ्मय, हें अखिल वंगजनतेच्या विचारांच्या चालीरीतींचें प्रतिबिंब होतें, पण नवीन वाङ्मयाची तशी स्थिति नव्हती. निरनिराळ्या संस्कृतींच्या लोकांचा परस्परसंबंध आल्यामुळें बंगाली लोकांच्या बोलण्यांत व लिहिण्यांत, नवीन अपरिचित शब्द येऊं लागले व त्यामुळें बंगाली भाषेचें पूर्वीचें शुद्ध स्वरूप उरलें नाहीं. पण यूरोपीय लेखकांनीं बंगाली भाषेंत लिहिण्यास सुरवात केल्यामुळें जे थोडे फार फायदे झाले त्यांमध्यें महत्त्वाचा फायदा म्हणजे,बंगाली भाषेंत नवीन नवीन शास्त्रीय शब्द पुष्कळ प्रचारांत आले. त्याचप्रमाणें वाङ्मयाचें पूर्वीचें संकुचित स्वरूप जाऊन त्याला व्यापक स्वरूप प्राप्त झालें.कालांतरानें या नवीन वळणाचा अंगीकार बंगाली पंडित करूं लागले त्यामुळें पुन्हां बंगाली वाङ्मयाला भारदस्त स्वरूप प्राप्त होऊं लागलें. बंगाली वाङ्मयाला व विशेषतः गद्यवाङ्मयाला भारदस्त स्वरूप देणाऱ्यांमध्यें, राजा राममोहनराय याची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. राममोहनराय 'याला अर्वाचीन बंगाली गद्याचा जनक' असे मानण्यांत येतें.बंगाली जनतेमध्यें जें विलक्षण आचारविषयक स्तोम माजलें होतें त्यांतील वाईट भाग नाहींसा करून पुन्हां खऱ्या धर्माकडे बंगाली लोकांचें लक्ष वेधण्याच्या कामीं राममोहनरायनें अविश्रांत खटपट केली. यासाठीं बंगाली भाषेंत त्यानें बरीच छोटीं छोटीं पुस्तकें लिहिलीं व व्याख्यानें दिलीं. राममोहनरायाच्या ग्रंथामुळें बंगाली गद्यवाङ्मयामध्यें क्रांति घडून आली असें म्हणावयास हरकत नाहीं. त्याचीं पुस्तकें जवळजवळ निबंधवजा आहेत. वेदांगसूत्रें, उपनिपदें इत्यादिकांवरील छोटीं पुस्तकें त्यानें लिहिलीं, त्याचप्रमाणें प्रार्थनापत्र, आत्मानात्मविवेक, गोस्वामीसंहिताविचार, गौडीय व्याकरण, संवादकौमुदी, कविरकारेर संहिताविचार, ब्रह्मचारेर संहिताविचार, अनुष्ठान, ब्रह्मणाशेवधी, ब्रह्मसंगीत, गायत्रेर अर्थ इत्यादि छोटे ग्रंथ लिहिले. सतीवरील त्याचे निबंध अत्यंत मननीय आहेत.

राजाराममोहनरायच्या निधनानंतर देवेंद्रनाथ ठाकोर यानें राममोहनरायाची परंपरा चालू ठेवली. ब्राह्मोसमाजाच्या समासदांच्यासाठीं त्यानें उपनिषदांतील मुख्य मुख्य वेंचे काढून त्यानें त्यांचें बंगालींत भाषांतर छापलें. या पुस्तकांची भाषा फार मनोहर व समजण्याला सुलभ आहे. १८४३ सालीं त्यानें 'तत्त्वबोधिनी पत्रिका' नांवाचें पत्र काढलें. या पत्राचा अक्षय्यकुमारदत्त हा संपादक होता. या पत्रामध्यें अक्षय्यकुमार हा धर्मावर व नीतीवर सुंदर निबंध लिहीत असे. हे निबंध तत्कालीन बंगाली जनतेला अत्यंत प्रिय झाले होते. या निबंधांतील विचारसरणी व भाषा, ॲडिसन, स्टील इत्यादिकांच्या निबंधांच्या धर्तीवर आहे. याच सुमारास ईश्वरचंद्र विद्यासागर हा वाङ्मयक्षेत्रांत चमकूं लागला होता यानें या सुमारास वात्रिक सिंहासन हा ग्रंथ लिहून आपल्या लेखणीचा प्रभाव बंगालला दाखविला होता. याचे अत्यंत सुंदर असे ग्रंथ म्हणजे सीतारबनवास, शाकुंतल इत्यादि होत ईश्वरचंद्राच्या ग्रंथांतील भाषेइतकी नितांत सुंदर व प्रासादिक भाषा फारच थोड्या ग्रंथकारांच्या ग्रंथांत सापडते. ईश्वरचंद्राप्रमाणेंच तेकचंद्रठाकूर हाहि या वेळीं वाङ्मयाच्या क्षेत्रांत झळकूं लागला होता. याचा 'अलालेर घरेर दुलार' हा ग्रंथ मोलीयर अगर फील्डिंगच्या उत्तम ग्रंथांच्या जोडीला बसविण्यालायक आहे असें पुष्कळ टीकाकारांचें मत आहे.

कोणत्याहि प्रचलित भाषेचें अर्वाचीन काळचें वाङ्मय द्यावयाचें म्हणजे तें भोंवतालच्या चळवळीच्या अनुरोधानें दिलें पाहिजे. तथापि हिंदुस्थानांतल्या प्रचलित भाषेंचें वाङ्मय देतांना बऱ्याचशा अर्वाचीन चळवळीकडे लक्ष देण्याचें कारणच नाहीं. बंगालचा राज्यकारभार कसा चालावा यासंबंधाचें वाङ्मय बंगालींत असण्याचें कारण नाहीं अशी राजकीय स्थिति जवळ जवळ आजपर्यंत आहेच.लोकांचें राजकीय विचारक्षेत्र फारच नियमित आहे. कौन्सिलांत अधिक जागा व नोकऱ्या याविषयींच राजकीय बाबतींत विचार करणारा वर्ग वाढला असल्यानें सर्व राजकीय वाङ्मय कायस्थधर्मकांक्षी होतें, असें म्हटल्यास हरकत नाहीं. धार्मिक बाबतींमध्यें व सामाजिक बाबतींत जें वाङ्मय झालें तें महाराष्ट्रीय वाङ्मयापासून फारसें भिन्न नाहीं. त्यांत पडदा व बहुपत्नीत्व यांचा निषेध हे विषय अधिक येत एवढेंच. जो सुशिक्षितांचा वर्ग तयार झाला, त्यांत सुमारें एक हजार कुटुंबें आपणांस ब्राह्मो म्हणवून घेऊं लागलीं, आणि त्यामुळें कांहीं धार्मिक वाङ्मय उत्पन्न झालें. त्यापैकीं खरोखर अध्यात्मिक भावनांनीं किती प्रेरित झालें होतें आणि आपण प्रागतिक, मूर्तिपूजेच्याविरुद्ध इंग्रजांशीं अधिक सदृश, व त्यामुळें इंग्रज

लोकांनीं इतर नेटिव्हांत आपली गणना करूं नये या प्रकारच्या भावनांनीं किती निर्माण झालें हें सांगणें बरेंच कठिण आहे. परंतु आध्यात्मिक नवीन विचार या दृष्टीनें या वाङ्मयाची किंमत मोठी ठरविणें ब्रह्मसमाजाच्या कट्टया अनुयायांस देखील बरेंच जड जाईल. केशवचंद्रसेन हा आध्यात्मिक प्रवृत्तीचा परंतु एखाद दुसऱ्या वेळेसच स्खलन पावणारा असा होता कीं, आपल्या जातीस जानवें नाहीं तर ब्राह्मणांनींहि जानवें टाकावें असें बोलणारा लांडा कोल्हा आणि कार्यसाधु होता कीं, काय याविषयीं गेल्या पिढींत वाद अतिशय तीव्र होता,व तो वादाचा विषय बदलल्यामुळें अर्धाच टाकला गेला. तथापि साक्षरता बंगालमध्यें अधिक वाढली असल्यामुळें वाङ्मयाचा गिन्हाईकवर्ग महाराष्ट्राच्या सुमारें चौपट निर्माण झाला. आणि त्यामुळें ग्रंथरचनेस बरेंच उत्तेजन मिळालें. शिवाय बंगालमधील सुशिक्षित वर्ग यूरोपशीं बराच परिचित असल्यामुळें यूरोपांतील वाङ्मयाचें ध्येय व उच्चता हीं त्यास अधिक परिचित झालीं आणि अधिक अनुभवाचे लोक वाङ्मयक्षेत्रांत विहार करूं लागले. मायकेल मधुसूदन हा अशांपैकींच एक होता; व त्यामुळें त्याच्या कवितेंत अधिक विविधत्व दृष्टीस पडूं लागलें. कादंबऱ्यांमध्यें विशेषेंकरून प्रेमसंन्यास, स्त्रियाचा स्वार्थत्याग यांचीं चित्रें पुष्कळ येऊन त्यांच्या कादंबऱ्या परकीय लोकास मोठया मनोरंजक झाल्या आहेत. मराठी कादंबरी इंग्रजी धर्तीवर गेली आहे तर बंगाली कादंबरी फ्रेंच व रशियन वळणावर गेली आहे व अनेक कादंबऱ्यात इब्सान टार्गिनीव्हच्या कथाचौर्याचा किंवा आत्यंतिक परिणामाचा भास होतो. बंगाली वाङ्मय एकंदर वाचतांना आपण नाजूक नर्मवाक्यें बोलणाऱ्यांच्या संगतींत आहों, पौरुषात्मक भावनांनीं व्याप्त अशा जगांतून आपण नाहींसे झालों आहों, असें भासावयास लागतें. कादंबऱ्यांत समाजाचें यथार्थचित्र मुळींच नाहीं तर पाश्चात्य ग्रंथकारांच्या कृती मनांत ठेवून बंगाली नांवांची एक कथा केली आहे आणि भोंवतालची मानवेतर सृष्टि देखील बंगाल्यांतीलच मांडली आहे अशी भावना झाल्याशिवाय रहात नाहीं. सुमारें दोनशें तरी कादंबऱ्या बंगालींतून मराठींत अवतरल्या गेल्या आहेत. आणि त्यामुळें बंगालचें वाङ्मय महाराष्ट्रास बरेंच परिचित व लोकप्रियहि आहे.

बंगाली नाटकाविषयीं एवढें सांगतां येईल कीं, तेथील नाट्यगृहें गजबजलेलीं दिसतात व संध्याकाळीं ९ वाजल्यापासून सकाळपर्यंत खेळ करीत असतात. म्हणजे नाटयाभिरुचि महाराष्ट्रापेक्षां तिकडे जास्त आहे असें म्हणावें लागेल किंवा कलत्तर आयुष्यास वेश्येच्या घराशिवाय नाटय हीच एक मनोविनोदार्थ संस्था आहे असें म्हटल्यास हरकत नाहीं. नाटकांत स्त्रीनटांची परंपरा आज तीस चाळीस वर्षें आहे. व सामान्यतः नाटकांत अभिरुचि पारशी व उर्दू नाटकांपेक्षां अधिक उच्च तऱ्हेची दिसून येते. नटी जरी वेश्या असतात तरी त्यांचें रंगभूमीवरील काम छचोरपणाचें नसतें.संगीत नाटकें तिकडे नाहींत किंवा गद्य नाटकेंहि तिकडे नाहींत,या दोहोंच्या मधली अवस्था त्यांनीं शोधून काढून लोकप्रिय केली आहे. म्हणजे अत्यंत प्रासंगिकच संगीत आणावयाचें तर कोणी एकटा बसला असतांना गात आहे किंवा एक दुसऱ्यास म्हणून दाखवीत आहे, किंवा गाणें मुद्दाम करविलें आहे अशा तऱ्हेचे प्रसंग आणूनच संगीतेच्छा भागवून घेतात,परंतु संगीतोत्पादन सामान्य आयुष्क्रमाशीं विसंगत अशा तऱ्हेनें नाटकांत येऊं देत नाहींत. नटींच्या नादीं लागणें हें पाश्चात्य राष्ट्रांत ज्या प्रमाणांत आहे त्या प्रमाणांत इकडे शिरलें नसल तथापि नटीमागें लागून वेडे झालेले तरुण वारंवार दृष्टीस पडतात.

अर्वाचीन बंगाली वाङ्मयांत बंकिमचंद्र हा प्रख्यात कादंबरीकार होय. खऱ्या गद्य वाङ्मयाला बंकिमचंद्रापासून सुरवात झाली असें म्हणतां येईल. दुर्गेशनंदिनी कपालकुंडला, मृणालिनी, रजनी, विषवृक्ष, कृष्णकांतेर उइल, आनंदमठ, इत्यादि त्याच्या अनेक कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. या कादंबऱ्यांतील भाषा फारच ओजस्वी व सुंदर आहे. बंकिमचंद्राची परंपरा चालविणारा त्याच्या योग्यतेचा कादंबरीलेखक निर्माण झाला नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि त्याच्या, मागून शरच्चंद्र चतर्जी, मणींद्रनाथ वसु, निरुपमा देवी, सीता व शांता चतर्जी इत्यादि नावाजलेले कादंबरीकार झाले आहेत यांत शंका नाहीं शरच्चंद्र चतर्जींच्या चरित्रहीन श्रीकांत, प्रणयपंक इत्यादि कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. मणींद्रनाथ वसूची 'रोमोलो' कादंबरी प्रसिद्ध आहे. निरुपमा देवी हिची दिदी कादंबरी लोकप्रिय आहे. १८६० नंतर बंगालमध्यें जे प्रसिद्ध नाटककार झाले त्यांत दीनबंधुमित्र, मायकेल मधुसूदन दत्त, द्विजेन्द्र लाल रॉय, गिरीशचंद्र घोष,रवींद्रनाथ टागोर इत्यादि प्रसिद्ध आहेत. दीनबंधु मित्राचें नीलदर्पण हें नाटक अत्यंत लोकप्रिय आहे. मायकेलचीं शर्मिष्ठा, पद्मावती, कृष्णाकुमारी हीं नाटकें सुंदर आहेत. द्विजेन्द्र लालचीं चंद्रगुप्त,शहाजहान, मेवारपतन, प्रतापादित्य, सीता, इत्यादि ऐतिहासिक नाटकें प्रसिद्ध आहेत.स.१८६०नंतरचे सुप्रसिद्ध कवी म्हणजे मायकेल मधुसूदन दत्त, नवीनचंद्रसेन, सत्येंद्रनाथ दत्त,हेमचंद्र बानर्जी, प्रियंवदा देवी, कामिनीरॉय टॅगोर इत्यादि होत. मायकेल मधुसूदन याचीं तिलोत्तमासंभव, मेघनादवध, हेक्टरवध हीं महाकाव्यें पहिल्या दर्जाचीं आहेत. नवीनचंद्राचीं कुरुक्षेत्र व अमिताभ हीं काव्यें प्रसिद्ध आहेत. सत्येंद्रनाथ दत्ताचीं 'कुहु ओ केका' व 'अभ्र–अबीर' हींहि काव्यें चांगल्यापैकीं आहेत. रवींद्रनाथ टागोर हा तर जगांतील पहिल्या प्रतीचा कवि म्हणून गणला जातो. याशिवाय बंगालमध्यें उत्कृष्ट प्रकारचीं वर्तमानपत्रें व मासिकें चालली आहेत व त्यांनीं बंगाली वाङ्मयांत चांगली भर टाकली आहे.

**वघात**—पंजाब प्रांतांत, सिमल्याच्या डोंगरी संस्थानांपैकीं एक संस्थान. क्षेत्रफळ ३६ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ९५०५. येथील राजे दक्षिणेंतील धारानगरीच्या रजपुतांचे वंशज आहेत. संस्थानला कोणी वारस नसल्यामुळें स. १८३९ त हें संस्थान खालसा झालें होतें. पण तें इंग्रजांनीं १८४२ सालीं मागच्या राजाच्या भावाकडे दिलें व सं. १८४९ मध्यें परत घेतलें; पण १८६० सालीं तें पुन्हां राजाकडे देण्यांत आलें. खंडणीबद्दल येथील राजा सबाथूच्या लष्कराला पाण्याचा पुरवठा करतो.

**वचनाग**—एक वनस्पति याच्या एकंदर १५० जाती आहेत. पैकीं हिंदुस्थानांत २४ सांपडतात. अफगाणिस्तान, बलुचिस्तान, काश्मीर, कुमाऊन, नेपाळ, भूतान या प्रदेशांपासून तों आसामब्रह्मदेशापर्यंत डोंगरांतून वचनाग सांपडतो. याच्या मुळ्या मोठ्या विषारी असतात. वचनाग शुद्ध करून पुष्कळ रसायनांत वापरतात. लाहोरी वचनाग महाग असतो. [ वाट, पदे. ]

**वजरबट्टू**—हें ताडाचें झाड उंच असून तें सिलोन व मलबारमध्यें आढळतें. याचीं पानें फार मोठीं ( १० फूट व्यासाचीं ) असून याच्या चटया, पंखे, छत्र्या इत्यादि जिनसा तयार करितात, परंतु विशेषतः टोपल्याहि फार तयार करितात. फळांच्या माळा करितात.

**वजाणा**—मुंबई इलाखा. काठेवाड पोलिटिकल एजन्सीमधील एक संस्थान. क्षेत्रफळ १८३ चौरस मैल लोकसंख्या (१९०१) १०२७९. या संस्थानचें १९०३-४ सालांत उत्पन्न ७१००० रु. होतें. हें काठेवाडांत चवथ्या वर्गाचें संस्थान आहे. येथील जाट लोकांचें मूळ ठिकाण सिंधप्रांतात वांग बाजार येथें होतें; पण तेथून हांकून लाविल्यामुळें त्यांनीं मांडव डोंगरांतल्या पोवारांचा आश्रय धरला. जाट लोकांनीं चंपानेरच्या वेढ्याच्या वेळीं चांगलें शौर्य गाजविल्यामुळें, सुलतानानें त्यांचा पुढारी मलिक हिदोजी याला २४ खेडीं दिलीं. मलिक इसाजी यानें रावमापासून वालिवडा व वाराहि घेतलें व तो तेथें कायम राहूं लागला. मलिक लाखा व मलिक हैदरखान हे अनुक्रमें सितापूर व वनोद येथें स्थायिक झाले.

**वजानिया**—अथवा ढोली ( ढोलकें वाजविणारे ) हे लोक गुजराथ प्रांतभर पसरलेले आहेत. एकंदर लोकसंख्या सुमारें ११ हजार. ते गोंधळी व कोल्हाटी असून यात्रेच्या वेळेस १०-१२ माणसांच्या टोळ्या करून फिरतीवर निघतात.

या लोकांत (१) खास वजनिया व (२) मालवी असे दोन परस्पर अविवाह्य वर्ग आहेत. हे बीजमार्गी आहेत. विधवा धाकट्या दिराशीं लग्न लाविते. [ से. रि. (मुंबई); मुं. गॅ. ९]

**बजेट**—कौटिलीय अर्थशास्त्रांत अशा तऱ्हेच्या पत्रकाविषयीं स्पष्ट उल्लेख नाहीं परंतु 'समाहर्ता' नामक अधिकाऱ्यानें जमाखर्च व शिल्लक यांवर फार चांगली नजर ठेवून शिल्लक सारखी वाढविण्याचा प्रयत्न करीत रहावा असें वर्णन आहे. यावरून करांची यादी, निराळ्या करांपासून उत्पन्न झालेल्या रकमा व खर्च यांचें सुव्यवस्थित पत्रक त्यानें तयार केलेंच पाहिजे असें स्पष्ट दिसतें. परंतु हें पत्रक प्रजेच्या प्रतिनिधींपुढें सादर करावें अशा तऱ्हेचा या ग्रंथांत कोठेंहि ध्वनि नाहीं.

मराठी राज्यांत अष्टप्रधानांपैकीं पंत अमात्यांवर बजेट तयार करण्याची जबाबदारी असे. परंतु अमुक महिन्यांत अमक्या दिवशीं पत्रक तयार करावें अशा तऱ्हेचा आधुनिक पाश्चात्य पद्धतींतील निर्बंध त्यावेळीं नसे. त्यामुळें शिल्लक किती उरेल याचा अंदाज करण्याची कांहींच व्यवस्था नसे. प्रत्येक खात्यांतील फडणिसास विचारून कोणत्याहि विवक्षित प्रसंगीं शिल्लक काढावी लागे.

मोंगल राज्यव्यवस्थेंत दिवान-ई-अला अथवा मुख्य दिवाण याकडे सर्व साम्राज्यांतील जमा व खर्च यांचें एकीकरण करण्याचें काम असे. याला चॅन्सेलर असें म्हणतां येईल व रोज जमाखर्चाची स्थिति बादशहास निवेदन करण्याचें त्यानें काम असे. परंतु दिवाणानें अमक्या दिवशीं पुढील सालच्या जमाखर्चाचें अंदाजपत्रक तयार करावें अशा तऱ्हेचा नियम दिसून येत नाहीं व त्यामुळें आधुनिक पद्धतीचें बजेट मोंगलांच्या काळीं नव्हतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. बादशहाशिवाय कोणासहि जमाखर्च पहाण्याचा अधिकार नसे त्यामुळें बजेट करण्याची आवश्यकताहि नसे.

बजेट हा शब्द प्रथम यूरोपांत १७६० च्या सुमारास वापरण्यात आला. प्रतिवार्षिक जमा व खर्च व त्यांच्या बाबींचे तपशील यांचें जें वर्णनात्मक व विस्तृत पत्रक केलेलें असतें त्यास बजेट ही संज्ञा लावतात. बजेटांतील मूलभूत कल्पना दोन आहेत; (१) सार्वजनिक जमाखर्चाचा तक्ता तयार करणें व (२) कायदे करणाऱ्या मंडळानें अगर पार्लमेंटानें विवक्षित कर व विवक्षित खर्चाच्या रकमा यांस कायदेशीर संमति देणें. दुसरी कल्पना, राजसत्ता नियंत्रित करण्याची कल्पना दृढमूल झाल्यावर बजेटाचा आवश्यक घटक बनली आहे अनियंत्रित राजाच्या शासनव्यवस्थेंत कायदेमंडळाच्या संमतीची मुळींच जरूर नसते. परंतु आधुनिक लोकसत्ताकपद्धतींत लोकांच्या प्रतिनिधींनीं जमेची व खर्चाची प्रत्येक बाब बहुमतानें युक्त अशी ठरविल्याशिवाय मंत्रिमंडळास किंवा राजास कांहीं एक करतां येत नाहीं.

बजेट करण्याकरितां प्रत्येक खात्यास आपल्या गरजांचा व त्याकरितां लागणाऱ्या जमाखर्चाचा अंदाज करावा लागतो. हे सर्व आंकडे एकत्र करण्याचें काम फडणवीस अथवा 'फायनान्स' खात्याचा मुख्य मंत्री याजकडे असतें. या फडणविसास कोणत्याहि खर्चाच्या बाबींवर टीका करण्याचा अधिकार दिलेला असतो. या अधिकाराचा इष्ट परिणाम असा होतो कीं, प्रत्येक खात्यास नवीन खर्च करण्यापूर्वी त्या खर्चाचें समर्थन करण्यास सप्रमाण पुरावा हजर करावा लागतो. जमा काय होईल हें ठरविण्याचें फडणवीसाचें काम असल्यामुळें खर्चावर त्याचा ताबा असणें हें अत्यावश्यक आहे. बजेटाची

मुदत एक वर्ष असणें हें जरी तार्किक दृष्ट्या निश्चित नाहीं तरी व्यावहारिक दृष्टीनें एक वर्ष ही सोईची मुदत असते. बजेटचें वर्ष कोणत्या तारखेपासून सुरू करावें हें भिन्न देशांत भिन्नभिन्न कारणांनीं ठरविलें जातें. परंतु मुख्यत्वेंकरून अंदाज करण्याची सुगमता याच तत्त्वावर तारीख ठरविणें जास्त फायदेशीर असतें. असें न केल्यास अंदाज व त्यांतील ठरावांची अंमलबजावणी यांत जास्त कालावधि राहून बजेटचें महत्त्व कमी होतें.

बजेटचे निरनिराळे भाग करून त्याचे सुव्यवस्थित असे रकमांचे 'संघ' करणें हें जास्त फलद्रूप असतें; कारण त्यामुळें कोणत्या कारणाकरितां या रकमा पाहिजेत हें स्पष्ट होऊन, मंजुरी देणाऱ्या कायदेमंडळाच्या सभासदास एकंदर बजेटाची रूपरेषा अधिक सुलभ रीतीनें समजते. अगदीं बारीक रकमा मंजुरीकरितां ठेवल्यास होय किंवा नाहीं म्हणणें कठिण पडतें. बजेटांत रकमा घालावयाच्या त्या प्रत्येक खात्यातील खर्च वजा करून निखालस जमेच्या द्याव्या अशी पद्धति प्रथम रूढ होती, परंतु आतां जमेच्या व खर्चाच्या रकमा स्वतंत्र जशाच्या तशा देण्याची पद्धति जास्त शिष्टसंमत झाली आहे; कारण यायोगें सर्व तपशील कायदेमंडळाच्या नजरेसमोर येतो, व त्यांना टीका करण्यास वाव मिळतो. उदाहरणार्थ, रेल्वेची निखालस जमा हिंदी बजेटांत दिल्यास रेल्वेचा खर्च वाढत आहे किंवा कमी होत आहे व तो खर्च वाजवी किंवा गैरवाजवी आहे हें असेंब्लीच्या सभासदांस मुळींच कळणार नाहीं. त्याचप्रमाणें फायदेशीर खात्यांत सुद्धां त्यांचा खर्च किती आहे हें कळल्यानें त्यात काटकसर सुचविण्यांत येते. सरकारच्या औद्योगिक खात्यावर पार्लमेंटची नजर असणें हें अत्यंत हितावह आहे.

प्रत्येक खर्चाच्या बाबीकरितां एक एक निराळा व स्वतंत्र कर नेमून देण्याची पद्धति ही अपक्व अशा समाजस्थितीची द्योतक आहे. पूर्णत्वास पावलेल्या समाजस्थितींत एकंदर करांची रक्कम एकत्र करून ती वाटेल त्या तऱ्हेनें खर्च केली जाते. बजेटांतील अंदाज बिनचूक असणें हें फार महत्त्वाचें आहे. कारण हे अंदाज चुकल्यास सर्वच घोंटाळा होऊन जाईल; विशेषतः खर्च अंदाजाच्या बाहेर गेल्यास दिवाळें निघण्याचा प्रसंग येईल. ज्या वर्षाचा अंदाज करावयाचा त्यावर्षी विशिष्ट अशीं जीं कारणें परिणामकारक होण्याचा संभव आहे तीं विचारांत घेऊन अंदाज केला पाहिजे मागील वर्षाप्रमाणेंच जमा व खर्च राहील असें मानून चालत नाहीं. ह्या विशिष्ट कारणांचा अंदाज करण्यातच फडणविसाचें चातुर्य आहे. विशेषतः कृषिप्रधान देशांत पाऊस, दुष्काळ इत्यादिकांचा अंदाज करणें हें अनुभव व शास्त्रीय ज्ञान यावर अवलंबून असतें. विशेषतः अंकशास्त्रांत पारंगतता असल्यास हा अंदाज करण्यास हल्लींच्या युगांत सुलभ जातें. या आंकड्यांच्या मदतीनें करांपासून किती रक्कम वसूल होईल हें विशेष फरक न पडतां सांगतां येतें.

कर वसूल करणें हें काम मध्ययुगांत पुष्कळ वेळां सरकारी खात्यांशिवाय ईतर खाजगी व्यक्तींकडे सोपवीत असत. परंतु या पद्धतींत प्रजेवर जुलूम होऊन राजास जी रक्कम वसूल होते तीपेक्षा हे जमीनदार, मनसबदार वगैरे जास्त वसूल करीत. या अनुभवाचा फायदा घेऊन हल्लीं सर्व प्रागतिक देशांत कर वसूल करण्याचें काम सरकारमार्फत विशिष्ट खात्याकडून केलें जातें. या योगानें पार्लमेंटचा करवसूलीवरहि ताबा राहून, करवसूलीच्या पद्धतींत दिसून येणारे दोष दूर करणें सुलभ होतें. करवसुलीकरितां स्थानिक संस्थांच्या अधिकाऱ्यांवर अवलंबून न राहतां मध्यवर्ती सरकारनें आपले स्वतःचे अधिकारी नेमणें हें जास्त सोईचें असतें. शक्य असल्यास एका बँकेच्या द्वारें सर्व कर वसूल करणें हें श्रेयस्कर आहे, परंतु देश विस्तृत असल्यास किंवा बँकांची वाढ चांगली झाली नसल्यास अनेक खजिन्यांच्या द्वारें वसूल करणें जरूर पडतें. इंग्लंडांत सर्व कर बँक ऑफ इंग्लंडच्या मार्फत वसूल करतात.

सरकारनें कायदेमंडळासमोर बजेट हजर केल्यानंतर दुसरें महत्त्वाचें कार्य म्हणजे त्यास संमति देणें हें होय. कायदेमंडळाच्या अत्यंत महत्त्वाच्या कार्यांपैकीं हें कार्य समजलें पाहिजे. बहुतेक देशांत कायदेमंडळाच्या एका कमिटीकडून बजेटची तपासणी केली जावी अशी कायद्यातच व्यवस्था केलेली असते. इंग्लंडांत कोणत्याहि कमिटीपुढें बजेट न ठेवतां एकदम पार्लमेंटमध्यें सादर केलें जातें. त्यामुळें मंत्रिमंडळाची जबाबदारी तेथें जास्त असते व त्यांना बजेट तयार करण्याचें काम फार काळजीनें करावें लागतें. एकदा बजेट मंजूर झाल्यानंतर जमा किंवा खर्च यात फेरबदल करतां येत नाहीं; त्यामुळें मंत्रिमंडळ खर्चाची काटकसर करण्याविषयीं दक्ष राहतें. परंतु इतर देशांत असा नियम नसल्यामुळें खर्चाच्या रकमांत पुष्कळ वेळां फेरबदल करतात. फ्रान्स व युनायटेड स्टेट्समध्यें बजेटांत मंजूर झालेल्या रकमेपेक्षां हरहमेश जास्त खर्च होतो.

बजेट मंजूर करणें किंवा न करणें हा हक्क इंग्लंडांत फक्त कॉमन्स सभेलाच बजावितां येतो. परंतु इतर देशांत वरच्या दर्जाच्या सभेलाहि बजेट मंजूर करण्याचा हक्क दिलेला आहे. लोकनियुक्त सभा व लोकनियुक्त नसलेली सभा या दोहोंनीं एकत्र जमून बजेटचा विचार करावा हें सर्वांत उत्तम परंतु हें शक्य नसल्यास लोकनियुक्त सभेलाच बजेट मंजूर करण्याचा हक्क असावा. प्रत्येक खात्याच्या रकमा स्वतंत्र मंजूर करून घेण्याची पद्धति सगळ्यात जास्त सोईची आहे. असें न केल्यास एका खात्यांतील शिल्लक दुसऱ्या खात्यास खर्च करण्यास सांपडते व त्यामुळें जबाबदारीची जाणीव कमी होते. बजेटांतील रक्कम वसूल न झाल्यास किंवा आकस्मिक आपत्ति आल्यास अलाहिदा खर्चाची मंजूरी मागण्याची पद्धति सर्व देशांत रूढ आहे. परंतु या पद्धतीनें बजेटाचें एक समयावच्छेदत्व नष्ट होत असल्यामुळें अतिशय मोठया

आपत्तींतच अलाहिदा रकमांची मंजुरी मागावी असा इंग्लंडांतील संकेत आहे.परंतु इतर राष्ट्रांत हा संकेत पाळीत नाहींत. फ्रान्स, युनायटेड स्टेट्स, बेलजम, जर्मनी, इटली या सर्व राष्ट्रांत अलाहिदा मंजुरी हा सार्वत्रिक प्रसंग होऊन बसला आहे.

नेहमींच्या ठराविक खर्चाच्या रकमा पुन्हां पुन्हां मंजूर करण्याचे श्रम वांचविण्याकरितां अशी एक युक्ति आहे कीं, या रकमांची बेरीज करून ती सात किंवा दहा वर्षांकरितां एका कायद्यानें एकदम मंजूर करून घ्यावी. जर्मनींत लष्करी खर्चाची रक्कम अशा रीतीनें सात वर्षांकरितां मंजूर करून घेतात. इंग्लंडांतील नेहमींच्या ठराविक खर्चाची रक्कम 'कनसॉलिडेटेड फंड' या नांवानें जमा झालेल्या फंडांतून मंजुरीशिवाय खर्च करतां येते. प्रत्येक वर्षाच्या शेवटीं खरोखरी जमा झालेल्या रकमा व खरोखरी झालेला खर्च हा हिशोबांत घेऊन बजेटाची तोंडमिळवणी करावी हा सर्वांत उत्तम पक्ष होय. मंजूर झालेल्या रकमा खर्च न झाल्यास त्या रद्द कराव्या व नवीन वर्षाच्या आरंभीं नवीन खर्चाकरितां पुन्हां मंजुरी घ्यावी. कंपनीचे हिशोब ज्याप्रमाणें ठेवतात त्याप्रमाणें सरकारी हिशोब ठेवण्याची आवश्यकता नाहीं.

पार्लमेंटनें खर्च मंजूर केल्यानंतर त्याप्रमाणें कार्यकारीमंडळ करतें किंवा नाहीं हें तपासण्याची व्यवस्था प्रत्येक राज्यघटनेंत असली पाहिजे. या कामाकरितां एक पार्लमेंटचा हिशोबतपासनीस व देखरेख करणारा अधिकारी नेमण्याची पद्धति आहे. प्रत्येक रक्कम खजिन्यांतून देण्यापूर्वी खजिनदारानें हिशोबतपासनीस याम कायद्याचा आधार दाखवून त्याच्याजवळ मागणी केली पाहिजे. त्यानंतर हिशोबतपासनिसानें तपासणी करून खजिनदारास ती रक्कम देण्याविषयीं हुकूम केला पाहिजे. अशी व्यवस्था न केल्यास कायदेमंडळाचा राज्यकारभारावर ताबा राहणार नाहीं व मधील अधिकारी वाटेल तशी पुंडाई करून अनेक सबबींवर पैसे काढून घेतील. त्याचप्रमाणें रक्कम दिल्यानंतर तिचा व्यय कायद्याप्रमाणें झाला आहे किंवा नाहीं हें पाहणें सुद्धां हिशोबतपासनिसाचें काम आहे. याशिवाय कांहीं देशांत पार्लमेंटच्या सभासदांतून निवडलेल्या सभासदांची एक कमीटी सर्व हिशोब तपासण्याकरितां नेमितात. या हिशोबतपासनिसास कोर्टाचे अधिकार दिल्यास याहिपेक्षां त्याच्या कामाचें वजन वाढेल असें कांहीं ग्रंथकारांचें मत आहे.

या सर्व मुशींतून तावून सुलाखून निघालें म्हणजे तें बजेट पूर्ण शंभरनंबरी सोन्याप्रमाणें शुद्ध झालें वयाचें. बजेटवरचा खरोखरीचा ताबा ... आहे. स्वतंत्र बाण्याचीं वृत्तपत्रें व ... टीका येत गेली म्हणजे मंत्रिमंडळास ... कान्यास बेकायदेशीर वर्तन करणें ... म्हणजे ८.

घटक असें इंग्लंडांत म्हणतात. तें बजेटच्या बाबतींत अगदीं सार्थ आहे.

ब्रिटिश अमलाखालीं मोर्ले-मिंटो सुधारणा अमलांत येईपर्यंत बजेट हें अगदीं सरकारी नियंत्रणाखालीं असे. लोकांच्या प्रतिनिधींना बजेटावर कांहीं आक्षेप घेण्याची व उपयुक्त सूचना करण्याची संधि १९०९च्या सुधारणाकायद्यानें दिली. तथापि सरकारनें केलेल्या बजेटावर ठराव पास करणें किंवा त्यांतील बाबी नामंजूर करणें हे हक्क या कायद्यानें दिले नाहींत त्यामुळें आधुनिक यूरोपीय पद्धतीच्या दृष्टीनें या बजेटावरील वादविवादाला विशेष महत्त्व देतां येत नाहीं. लोकमत काय आहे हें सरकारला कळविण्यांत जो फायदा आहे तो मात्र या कायद्यानें झाला. १९१९ च्या कायद्यानें लोकांच्या प्रतिनिधींना बजेटावर बराच ताबा दिलेला आहे. प्रांतिक कौन्सिलांत सर्व रकमा मंजूर करण्याचा लोकप्रतिनिधींस हक्क आहे. असेंब्लींत कांहीं भाग सरकारनें आपल्या पूर्ण ताब्यांत ठेवून तो लोकमताच्या कक्षेच्या बाहेर ठेविला आहे तथापि गेल्या तीन वर्षांच्या अनुभवानें असें म्हणतां येईल कीं, लोकमताचा प्रभाव कार्यकारी मंडळास चांगला जाणवूं लागला आहे. यापुढील पायरी बजेटावरील पूर्ण स्वायत्तता ही होय.

बजेटावर उत्तम टीका करण्यास अर्थशास्त्राचा अभ्यास अधिक व्यवस्थित व्हावयास पाहिजे हिंदी वृत्तपत्रांत बजेटावर समतोल टीका करणारीं पत्रें अतिशय थोडीं आहेत. व कौन्सिलच्या सभासदांतहि अर्थशास्त्राचें उत्तम ज्ञान असणारे सभासद अल्पसंख्याक आहेत. ही स्थिति सुधारण्यास प्रत्येक जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणीं अर्थशास्त्राचा अभ्यास करण्यासाठीं 'स्कूलस' अथवा संशोधन कार्य करण्यास संस्था निर्माण झाल्या पाहिजेत.[ले. प्रो. व्हीं. एन्. गोडबोले ].

**बटकागड**—मध्यप्रांत, छिंदवाडा जिल्ह्यांतील एक जमीनदारी. या जमीनदारींत ८१ गांवें असून त्यांपैकीं ६५ गांवें आबाद आहेत. येथील जमीनदार गोंड आहे. सरकार त्याला सालाचे ९६०रु नेमणूक देतें. २० रु. टाकोळी आहे.

**बटवा**—उत्तर हिंदुस्थानांतील एक मोठी नदी. ही भोपाळ संस्थानांत पन्नास मैल वहात गेल्यावर भिलसा नजीक ग्वाल्हेर संस्थानांत शिरते.पुढें झांशी जिल्ह्याच्या ललितपूर नांवाच्या तालुक्यांतून वहात जाऊन ही नदी संयुक्त प्रांतांत हमीरपूर नजीक यमुना नदीला मिळते. या नदींत नावा केव्हांच चालू शकत नाहींत हिला मिळणाऱ्या मुख्य नद्याः- बेस; मध्यहिंदुस्थानांतून व झांशी जिल्ह्यांतून जम्नी आणि धसान; हमीरपूरमधून हिला पावन मिळते. पुराणांत व कालिदासाच्या मेघदूत नांवाच्या काव्यांत या नदीचा उल्लेख केलेला आढळतो. यास नदीच्या तीरावर पांडव आणि विदिशा येथील राजे यांच्यामध्यें युद्ध झालें.

**बटवाल**—पंजाबांतील एक जात. लोकसंख्या सुमारें ... हिंदु आहेत. सपाटीवरच्या मुसुलमान

बटवालांनां बरवाला म्हणतात. त्यांचीहि पंजाबांत ६० हजारांपर्यंत वस्ती आहे. ते चटया विणतात व रखवालीचेंहि काम करतात. बटवाल हा एक नीच जातीचा वर्ग आहे. त्याचा व चांभरांचा सामाजिक दर्जा एक आहे. ते चांभारांप्रमाणें कातड्याचें काम करीत नाहींत. यांचा धंदा सपाटावरच्या बटवालांप्रमाणेंच आहे. बटवालांचे दोन वर्ग आहेत; एक कारावाक किंवा करौक व दुसरा पालमपूर. बटवाल हा शब्द कारावर ( मनुस्मृति, १०. ३६ ) या शब्दाचा अपभ्रंश आहे. कारावर हे निषाद व वैदेहिक यांचे वंशज असून पूर्वी चांभारांचा धंदा करीत होते. नतर ते भोयाचें काम करीत. कारावार लोकांनीं उघड डघड रखवाली व दूताचें काम करण्यास आरंभ केला; बटवाल यांच्याशीं तें एक होऊन गेले आणि लवकरच त्यांची गणना बटवालांची पोटजात म्हणून होऊं लागली. [ से. रि. ( पंजाब ) १९११ ]

**बटाटे**—नांवें:-इंग्रजी-पोटॅटो, हिंदी-आलू, गुजराथी-पटाटा, कानडी-बटाटे. बटाटा जमिनींत तयार होतो म्हणून त्याला भुसभुशीत व पोकळ जमीन लागते. याचें रोप अर्धवट वेलासारखें असतें याच्या मुळास लहान लहान बटाटे येतात. बटाट्याचें पीक फार महत्त्वाचें आहे. कारण सर्व जगांत सरासरीनें दरवर्षी सोळा कोटी दहा लक्ष टन बटाटा पैदा होतो. बटाटा हिंदुस्थानांत अगदीं अलीकडे म्हणजे शेदोनशें वर्षांतच आला असावा. तो पोर्तुगीज लोकांनीं आणला असावा असा अंदाज आहे. याचें मूलस्थान अमेरिकाखंड होय. १५५३ सालीं स्पॅनिश लोकांनीं अमेरिकेंतील पेरू देशांतून याचें बीं स्पेनमध्यें आणून तेथें याची लागवड सुरू केली. पुढें याचा प्रसार इटली, जर्मनी, इंग्लंड, आयर्लंड वगैरे देशांत झाला आयर्लंड देशांत बटाटा हें बहुतेक गरीब लोकांचें मुख्य अन्न आहे. जर्मनी, ऑस्ट्रिया हंगेरींत याची दारू करतात. आसामांत खासियाच्या डोंगराळ प्रांतात बटाट्याची बरीच लागवड कोंकणांतील कुमरी पद्धतीनें करतात. तेथें खासी लोक बरेच महिने नुसते बटाट्यांवर काढतात. याला तिकडे झूमपद्धत म्हणतात.

१८४१ सालीं ईस्ट इंडिया कंपनीच्या अमदानींत पुणें जिल्ह्यांत खेड तालुक्यांत हिंवरें येथें व पुण्यानजीक दापोडी येथें कांहीं बागा करण्यांत आल्या. त्यांत नाना तऱ्हेचीं परदेशांतील पिकें आणून लागवड करण्यांत येई. खेड व जुन्नर येथें बटाट्यांचा प्रसार होण्याचें श्रेय या बागांकडे असावें. हल्लीं हिंदुस्थानांत बटाटा चोहोंकडे थोड्याबहुत प्रमाणात होऊं लागला आहे. तथापि जास्त चांगले बटाटे उंच डोंगरावरील पठारांत होतात. आपल्याकडे महाबळेश्वर, निलगिरी, कुमाऊन वगैरे ठिकाणच्या बटाट्यांची फार प्रसिद्धि आहे.

मुंबई इलाख्यांत पुणें जिल्ह्यांतील खेड व जुन्नर तालुक्यांत, कर्नाटकांत बेळगांव व धारवाड जिल्ह्यांत व गुजराथेंत सुरत आणि अहमदाबाद जिल्ह्यांत बटाट्याच्या पिकांनीं विशेष लागवड आहे. दरवर्षी सुमारें १५००० एकर क्षेत्र मुंबई इलाख्यांत बटाट्याच्या लागवडीला गुंततें असें अनुमान आहे. हल्लीं यूरोप व अमेरिका यांत बटाट्याच्या अनेक जाती आहेत व साल दरसाल नव्या नव्या जाती तयार करण्यांत येत आहेत. परंतु हिंदुस्थानांतील लागवड बहुतेक इटालियन बटाट्याची आहे इटली देशांतील बटाटे दरसाल व्यापारी लोक इकडे आणतात. त्यात दोन जाती आहेत. एकीचे बटाटे वाटोळे असून त्याला पुष्कळ डोळे असतात व यासाठीं या बटाट्यास मागणी जास्त असते दुसऱ्या जातींत बटाटे लांबट असतात. तिसऱ्या जातींच्या बटाट्यांचा आकार साधारण अंड्याप्रमाणें असून बटाटा चपटा असतो. या जातीचा खप निलगिरीवर व बंगलूरकडे जास्त होतो.

बटाट्याला हलकी, भुसभुशीत, बारीक रेंव असलेली, नदीकांठची, मध्यम काळी, चांगली निचरा होणारी जमीन उत्तम असते. बटाट्याचा फेरपालट बाजरी, भुइमूग, मिरच्या, कांदे, व गहूं वगैरेशीं करतात. बटाटे खरीप व रब्बी या दोन्ही हंगामांत लावितात; तथापि रब्बी पीक फार महत्त्वाचें आहे. खरीप हंगामांतील पीक सप्टेंबरांत काढण्यास येतें व रब्बीचें लाविल्यापासून तीन साडेतीन महिन्यांत तयार होतें. दर एकरीं सरासरी उत्पन्न-धारवाड, कोरडवाहू पीक २००० पौंड ( अजमासें बियांचें ७ पट ), बेळगांव ( पाणभरतें ) १०००० ते १५००० पौंड, खेड ( पाणभरतें ) ८००० ते १५००० पौंड.

खाण्याखेरीज बटाट्याचे इतर बरेच उपयोग आहेत. जर्मनींत बटाट्यापासून एक प्रकारची दारू काढतात. इंग्लंडांत बटाट्यांच्या भाकरी करतात. कपड्याला खळ देण्याच्या कामीं बटाट्यांचा उपयोग होतो.

बटाट्यास एक रोग होतो त्याला बांगडी रोग असें म्हणतात. या रोगांत आंतील गाभ्यास काळी बांगडीसारखी वाटोळी रेघ उत्पन्न होते. याशिवाय कीड, खोका, खुजली, ओली कूज व भुरी हे रोग बटाट्यांत होतात. कीड मारण्यास पेट्रोलची धुरी हाच उत्तम उपाय आहे.

**बटेव्हिया**—जावा बेटाच्या उत्तर किनाऱ्यावरील एक शहर व बंदर, व पूर्वेकडील सर्व डच वसाहतींचें मुख्य शहर. येथील लोकसंख्या एक लाख असावी. यांत १० हजार यूरोपीयन, २६ हजार चिनी, व तीन हजार अरब आहेत. येथें बऱ्याच प्रेक्षणीय इमारती आहेत निरनिराळ्या विषयांवर शिक्षण मिळण्याची व्यवस्था केली आहे. इतर शिक्षणसंस्थाहि बऱ्याच आहेत.

येथें डच लोकांची वस्ती फार थोडी असून पोर्तुगीज व मलाया लोकांत मिश्र झालेल्या लोकांचा भरणा फार आहे. येथें निरनिराळ्या जातींचे हिंदू लोक आढळतात. अरबी लोक आणि जावा लोकहि आहेत. तसेंच चिनी लोकहि बरेच असून ते उद्योगी आहेत. येथून तांदूळ, साबूदाणा, कॉफी, साखर, मीठ, तेल, तंबाखू, इमारती लांकूड, जावा

बेटांतील कापड, पितळेचीं भांडीं, यूरोपीय, हिंदुस्थानी व चिनी माल जातो. नसेंच पूर्वेकडील बेटांचा माल हिंदुस्थान, चीन देश,व यूरोप येथें पाठवितात.ह्या माल म्हणजे सुवर्णरज हिरे, कापूर, वेन्झोइन व औषधें वगैरे आहे. बोर्नियो व सुमात्रा येथून पक्ष्यांचीं घरटीं, मेण, कांसवाची पाठ व रंग देण्याचा माल येतो. बॅंका येथून टिन येतें. मोलक्कापासून मसाला व सेलिबिस वली येथून उत्तम कापड, सुमात्रा येथून मिरीं हा माल येतो.येथें अराक नांवाची दारू गाळण्याचाच उद्योग चालतो. या शहराची भरभराट १६१० सालीं जकात्रा येथें डच लोकांनीं वखार घातल्यापासून झाली.

**वडनूर**—मध्यप्रांतात, बैतूल जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण हें इटारसीपासून ५५ मैल व नागपूरपासून ११५ मैल दूर आहे. लोकसंख्या सुमारें ७ हजार. गोंड राजांची राजधानी खेर्ला हीं येथून ४ मैलांवर आहे. वडनूर हें बैतूल जिल्ह्यामध्यें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे.

**वडनेरा**—वऱ्हाड, उमरावती तालुका. हें उमरावतीच्या दक्षिणेस सहा मैलांवर आहे. याची लोकसंख्या १९११ सालीं ११०९८ होती. ऐने–ई–अकबरीमध्यें, गाविलच्या सरकारच्या परगण्यांतील हें मुख्य ठिकाण होतें म्हणून याचा उल्लेख आहे. याला वडनेरा बिबि असेंहि म्हणतात. येथील किल्ला व तट हे सलाबतखान आणि इलिचपुरचे बहलोलखान यांनीं बांधले आहेत. या गांवांत बागाईत पुष्कळ आहे. विड्याचीं पानें पुष्कळ होतात. दक्षिण बाजूला आणि रेल्वे स्टेशनच्या आसपास नवीन गांव वसलें आहे. येथें कापसांतील सरकी काढण्याचे कारखाने, आणि सूत व विणकाम यांच्या गिरण्या आहेत.

**वडवानी**, संस्थान.—मध्य हिंदुस्थानांतील एक संस्थान. हें नर्मदा नदीच्या डाव्या तीरावर आहे. याचें क्षेत्रफळ ११७८ चौरस मैल. वडवानीचे संस्थानिक सिसोदिया रजपूत आहेत. त्यांचा संबंध उदेपूरच्या घराण्याशीं आहे. दंतकथेवरून, बाप्पा रावळाचा दुसरा मुलगा ह्या घराण्याचा मूळ पुरुष होता; याचा एक वंशज अकराव्या किंवा चवदाव्या शतकांत नर्मदा जिल्ह्यांत गेला व जलगुनपासून ८ मैलावरील आवासगडच्या किल्ल्यांत त्यानें आपलें राहण्याचें ठिकाण केलें. याचा सर्व इतिहास उपलब्ध नाहीं संस्थानांतील कागदपत्रांवरून पहातां आतांपर्यंत५१ राणे झाले परंतु त्यांची फारशी माहिती मिळत नाहीं. पस्तिसावा राणा परशराम (पारसान) सिंग याचा मुसुलमानांनीं पराभव केला व त्यास दिल्लीस कैद करून नेलें, तेथें त्यानें आपली पूर्वीची मालमत्ता परत मिळण्याच्या अटीवर मुसुलमानी धर्म स्वीकारला. त्याच्या पुढील राणा भीमसिंग, व त्या पुढील दोन राणे नांवाचे हिंदू परंतु खरे मुसुलमान होते. स. १६५०च्या सुमारास ४१ वा राणा चंद्रसिंग यानें आवासगड सुरक्षित नाहीं असें समजून आपली राजधानी वडवानी येथें नेली; व तेव्हांपासून हें नांव या संस्थानास प्राप्त झालें आहे. चंद्रसिंगाचा मुलगा मोहनसिंग हा गादीवर असतां मराठ्यांनीं बहुतेक प्रांत जिंकला; यावेळेपासून या संस्थानास उतरती कळा लागली, व जरी कसेंहि करून राण्यांनीं आपलें स्वातंत्र्य राखिलें, तरी पुष्कळसा प्रदेश त्यांच्या हातांतून जाऊन हल्लीं आहे तेवढा प्रदेश त्यांच्या ताब्यांत राहिला; यानंतर दुसरा मोहनसिंग, जसवंतसिंग व इंद्रजित हे गादीवर आले. सध्यां रणजितसिंग गादीवर आहेत. यांस ९ तोफांची सलामी मिळते. लोकसंख्या १९११ सालीं १०८५८३ होती. संस्थानचें उत्पन्न सुमारें ५ लाख आहे. भील भाषा बोलणारे शें. ६८ लोक आहेत. या संस्थानांत एक शहर (वडवानी)व ३५२ खेडीं आहेत. बहुतेक लोक वन्य जातीचे आहेत; शें. ६५ शेतीवर व ६ मजुरीवर उपजीविका करतात.

शहर.—हे राजपुताना-माळवा रेल्वेवर मंहूपासून ८० मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें सात हजार. राणा चंद्रसिंगानें हें शहर स. १६५० च्या सुमारास वसविलें असें म्हणतात. यापासून पांच मैलांवर 'बावनगज' टेंकडी (५२ यार्ड) आहे; हें क्षेत्र असून येथील देवळांत इ. स. ११६६ व १४५९ मधील दोन खोदीव लेख आहेत.

**वडिशोप**—नांवें:-गुजराथी—वरिआळी, हिंदी—सोप, कानडी-सभासगी. हिची लागवड उत्तरहिंदुस्थान, खेडा जिल्हा, उत्तरगुजराथ व खानदेश येथें होते. खेडा जिल्ह्यांत या पिकाखालीं दरसाल सरासरी ४००० एकर क्षेत्र असतें. हें पीक गोराडू व मध्यम काळ्या जमिनींत चांगलें होतें. तें खरीप हंगामांत पेरितात. खेडा जिल्ह्यांत याचें उत्पन्न एकरीं सरासरी दीड ते दोन हजार पौंड व खानदेशांत सहा ते सातशें पौंड असतें. दर मणास (४० पौंड) तीन रुपये किंमत पडते. गुजराथेंत जेवणानंतर मुखशुद्धीकरितां वडिशोप खातात. वडिशोप व तिचा अर्क आमांशावर फार चांगला उपयोगी पडतो.

**वडोदें**, संस्थान.—मुंबई इलाखा. हें हिंदुस्थानांतील तिसरें मोठें संस्थान असून याचा सर्व राजकीय संबंध हिंदुस्थान सरकारकडे आहे. या संस्थानचा प्रदेश, गुजराथ व काठेवाडमध्यें आहे. परंतु त्याची व ब्रिटिशांच्या ताब्यांतील जवळच्या प्रांतांची इतकी गुंतागुंत झाली आहे कीं, याच्या नक्की सीमा देणें शक्य नाहीं. या संस्थानचा बहुतेक भाग उत्तर अक्षांश २०°४५' ते २४°९' आणि पू. रेखांश ७०°४२' ते ७३°५९' यांच्या दरम्यान आहे.

वडोद्याकडील लोक या संस्थानास व शहरास "वडोदरा" म्हणतात. हा शब्द संस्कृत वटोदर याचा अपभ्रंश आहे, अशी दंतकथा आहे. कारण वडोदें शहरासभोंवतीं पुष्कळ वडाचीं झाडें होतीं. वडोद्याचें दुसरें नांव वीरक्षेत्र (वीरांची जन्म [?] भूमि) अथवा वीरवती असें होतें. १७ व्या शतकांत वडोदें येथें येऊन गेलेला प्रख्यात गुजराथी कवि परमानंद यानें वडोदरा शब्दाबरोबर वीरक्षेत्र अथवा वीरवाटि या शब्दाचाहि उल्लेख केला आहे. म्हणून हें नांव विशेष

लक्षांत ठेवण्याजोगें आहे. आणखी असेंहि लिहिलेलें आढळतें कीं याचें फार प्राचीन नांव चंदनवती असें होतें; हें नांव जैनांपासून वडोदें हिसकावून घेणाऱ्या रजपुतांच्या ढोर जातीच्या चंदन नांवाच्या ढोर रजपुताच्या नांवावरून पडलेलें आहे. त्यापासून पुष्कळ बदल होऊन हा शब्द कसा झाला हें कळत नाहीं, परंतु अगदीं प्रथम आलेले इंग्रज प्रवाशी व व्यापारी या गांवास ब्रोदेरा असें म्हणत, व त्यापासून वडोदें शब्द झालेला आहे.

या संस्थानच्या गुजराथेंतील प्रदेशाचे तीन भाग अथवा प्रांत आहेत. उत्तरेस कडी प्रांत, मध्यें वडोदें आणि दक्षिणेस नवसरी आणि काठेवाडांतील भागास बहुधा अमरेळी प्रांत या नांवानें संबोधितात. संस्थानचें क्षेत्रफळ ८१३५ चौरस मैल आहे. संस्थानचा बराच भाग समुद्रकिनाऱ्यालगतच्या पट्टींत असून तो गुजराथ, माळवा व राजपुताना यांतील नद्यांमधून वहात आलेला गाळ खंबायतच्या आखातातील उथळ प्रदेशावर सांचून बनलेला आहे. किनाऱ्यापासून आंत जमीन चढती होत गेली आहे. परंतु चढ फारच थोडा असल्यानें सामान्यतः सर्व प्रदेश सपाट वाटतो व पूर्वेकडील भागात टेंकड्या दिसूं लागतात.

गुजराथेंतील बहुतेक नद्या खंबायतच्या आखाताला मिळतात. परंतु उत्तरेकडील बनास व सरस्वती या कच्छच्या रणांत जातात. खंबायतच्या आखातास मिळणाऱ्या चार मुख्य नद्या, साबरमती, मही, नर्मदा व तापी ह्या होत. ह्या सर्व नद्या वडोदें संस्थानच्या भागांतून जातात. याशिवाय धातूर, किम, मिंढोल, पूर्णा व अंबिका या लहान नद्या आहेत. नवसरीच्या उत्तरेकडील व पूर्वेकडील प्रदेशांत फार दाट झाडी आहे. सोनगड तालुक्यातील भाग फार डोंगराळ आहे. अमरेली जिल्हा अगदींच रुक्ष आहे. ओखामंडल विभाग समुद्रकिनाऱ्यावर असून त्यांत द्वारकेचें प्रसिद्ध बंदर असल्यामुळें तो काहींसा रमणीय वाटतो. कडीप्रांतात विस्तीर्ण अशीं तळीं बरींच बांधलेलीं आहेत त्यांपैकीं वडनगर येथील शर्मिष्ठा नांवाचें तळें, वीसनगरमधील व पाटणजवळचीं तळीं मुख्य आहेत. वडोदें प्रांतांत पुष्कळ मोठीं तळीं आहेत. पैकीं सावळी तालुक्यांत मावळ नांवाचें तळें सर्वांत मोठें आहे. वडोदें शहरास पाण्याचा पुरवठा करण्याकरितां आजवा येथें जो सयाजी सरोवर नांवाचा मोठा तलाव आहे तो पाहण्यासारखा आहे.

वडोदें संस्थानांत गुजराथेंत आढळणारीं वाघ, चित्ता, अस्वल, डुक्कर वगैरे जंगली जनावरें आहेत, आणि वेगवेगळ्या प्रकारचे पक्षीहि सांपडतात. मही व नर्मदा यांमध्यें मासे पुष्कळ आहेत. नवसरी भागांत पूर्णा, मिंदोल व अंबिका या नद्यांमध्येंहि मासे मारण्याचा धंदा चांगला चालू असतो. वडोदें प्रांतांत मे व जून महिन्यांत उष्णमान सर्वांत जास्त म्हणजे सरासरी १०५° असतें, परंतु तें कधीं कधीं १०७° पासून ११०° पर्यंतहि वाढतें. सप्टेंबर व आक्टोबरमध्यें हवा वाईट असते. कडीप्रांताची हवा सर्वांत निरोगी असते. नवसरी प्रांतांत महुव, व्यारा, सोनगड वेलाछाचा काहीं भाग या राणी ( अथवा अरण्य ) महालांची हवा रोगट आहे, परंतु नवसरी, पलसाण, कामरेज व गणदेवी ह्या रास्ती महालांची हवा चांगली आहे. अमरेळी प्रांतांत धारी व कोडिनार तालुके खेरीजकरून हवा कोरडी व निरोगी आहे. संस्थानांतील चार प्रांतांमध्यें वार्षिक पावसाची सरासरी पुढें दिल्याप्रमाणें आहे:--नवसरी-५२ इंच, वडोदें ३८ इंच, कडी २७ इंच आणि अमरेळी २२ इंच.

इकडील शिल्पाची तऱ्हा गुजराथी जैन पद्धतीची आहे. गुजराथी सुतार, गवंडी वगैरे कारागीर उत्तम कलाकुसरीचीं कामें करतात. हल्लीं पोरबंदरी पांढऱ्या दगडाचा उपयोग इमारती बांधण्यांत फार करतात. प्राचीन देवळें पाटण, सिद्धपूर, मोढेरा, डभई व वडनगर येथें आहेत.

गुजराथेंत पुरुषांपेक्षा स्त्रिया बहुशः कमी असतात. इकडे बालविवाह प्रचारात आहे. हल्लीं बालविवाहाची चाल कायद्यानें (१९०४च्या) बंद केली आहे, तरी पण दंड भरून असलीं लग्नें होतात. १२ वर्षांच्या आंत मुलीचें लग्न करणाऱ्यास हा दंड भरावा लागतो. विधवाविवाहाचा कायदा १९०२ सालीं पसार झाला आहे. इकडील आदित्यब्राह्मण व रजपूत यांच्यात मुली जास्त असल्याने त्यांच्यांत बहुभार्यांत्वाची चाल सुरू आहे. संस्थानांत गुजराथी, मराठी, हिंदुस्थानी व भिल्ली या भाषा प्रमुख आहेत. शेतीवर एकंदर लोकसंख्याच्या शेंकडा ६३ लोक निर्वाह करतात. कोष्टी, साळी हे शेंकडा १४ व व्यापारी शेंकडा ४ आहेत. तांदूळ, गहूं, हरभरा, कोद्रा, पावटा, कापूस, तंबाखू, कडधान्यें बाजरी, हीं मुख्य खाद्यधान्यें व पिकें आहेत. गुजराथ्यांनां तूपखिचडी व दुधपाकपुरी फार आवडते. हे लोक रांकट नसतात. गुजराथी स्त्रिया ( त्यातांहि पाटण प्रांतातील नागर ब्राह्मणांच्या स्त्रिया ) बऱ्याच देखण्या असतात.

नवसरी व अमरेळी प्रांतातील डोंगराळ जमिनीखेरीज बाकीच्या प्रांतांत जमीन चांगली असून नदींतील पुळणीची बनलेली आहे. गोरठ ( तांबूस ), काळी व भेसळ ( तांबूसकाळी ) असे जमिनीचे तीन प्रकार आहेत. वडोदें प्रांतांत नर्मदेच्या दक्षिणेकडील ४० मैलपर्यंतची जमीन काळी असून उत्तरेकडे गोरठ आहे. गोरठ जमीनींत झाडी पुष्कळ असते. कडी प्रांताची जमीन साधारण आहे. गोरठ जमिनींत दोन पिकें काढतां येतात; तींत बाजरी व तंबाखू उत्तम होते. काळ्या जमिनींत कापूस फार पिकतो. शेतकऱ्यांच्या उपयोगासाठीं एक शेतकीखातें, शेतकी शाळा व सरकारी शेतें आहेत. जनावराची पैदास, बीबियाणें खतें, आउतें वगैरे या खात्यांकडून लोकास पुरविलीं जातात, शेतकऱ्यास तगाई दिली जाते व त्यावर ५०० रुपयांच्या रकमांखालीं व्याज घेत नाहींत. चार शेतकी बँका सरकारानें उघडलेल्या आहेत, त्यांचा खर्च सरकार करतें. शेतकऱ्यांनां ६। टक्के

व्याजानें कर्ज देतात नफ्यापैकीं ३ टक्के सरकार घेतें व बाकीची रक्कम शिल्लक ठेवतात. हल्लीं ५४८ पतपेढ्याहि स्थापन झाल्या असून त्यांचा कायदा पसार झाला आहे. ( १९२३ ).

अमरेली प्रांतांत घोडे चांगले निपजतात. देशी व कांकेजी अशा गुरांच्या दोन जाती आहेत. कांकेजी बैल फार दांडगे असून त्यांना प्रत्येकीं २५० रु पर्यंत किंमत पडते. राज्यांत गायरानें पुष्कळ आहेत. संस्थानांत कालवे वरेच आहेत, तळींहि पुष्कळ आहेत. तलावामुळें व कालव्यामुळें जवळ जवळ ३ लाख एकर जमीन भिजली जाते. संस्थानांत रयतवारी पद्धत चालू आहे. अमरेली प्रांत सर्वांत मागसलेला आहे. नवसरी प्रांतांत झाडी फार असून साग, शिसूं हीं इमारती लांकडें वरीच होतात. सरकारी जंगलखातें असून सोनगडच्यारी इकडे राखीव जंगल आहे. त्याचा दुष्काळांत फार उपयोग होतो.

पूर्वी तापीच्या चुंबीयलोहमिश्रित वाळूपासून लोखंड व कांहीं नद्यांच्या पात्रांतून सोन्याचे कण काढीत. संखेडा भागांत चांगल्या इमारती दगडांची खाण आहे. कडीप्रांतांत वीरपूर व वडोदेंप्रांतांत भुरवण, धोडेली इकडे ग्रॅनाईट दगड आहेत. उत्तम हिरवे संगमरवरी दगड मोतीपुरास सापडतात.

अमरेली प्रांतांत उत्तम खादी ( धेड व मुसुलमानांनीं विणलेली ) निघते. पाटण येथें मशूरचें कापड, पितांबर, पातळें तयार होतात. वडोद्यास जरीचें व कशिद्याचें काम उत्तम होतें. अनरसुंब ( कडीप्रांत ) येथें सुऱ्या, तरवारी वगैरे शस्त्रें होतात. सोजित्रा, पेटलाद येथें कुलुपें व अडकित्ते होतात. बडोदें व कडीप्रांत ( पाटण, सिद्धपूर, वडनगर येथें ) लांकडी नक्षीकाम सुबक होतें.

वडोद्यास कापसाची व सुताची अशा दोन मोठ्या गिरण्या असून सरकी दाबण्याच्या ४–५ गिरण्या आहेत. याखेरीज संस्थानांत १४ कापडाच्या, एक लोंकरीची व एक सिमेंटची गिरणी आहे; शिवाय अलेंबिक केमिकल वर्क्स ( रासायनिक पदार्थ तयार करण्याचा कारखाना ), रंगाचा, कल्हईचा, पत्र्यांचा, भांड्यांचा, हातमागांचा, बर्फाचा, विटे-कौलांचा वगैरे लहान मोठे १०० वर कारखाने आहेत. कर्ज देऊन, जमीन देऊन वगैरे उपायांनीं संस्थानाकडून असल्या धंद्यांना मदत होते. संस्थानचा बहुतेक व्यापार मुंबईशीं चालतो. कापूस, धान्य, अफू, तंबाखू, गूळ, एरंडेल तेल, ताग, भांडीं, रेशमी कापड यांची निर्गत होते व साखर, लोखंड, मीठ, कापड, राकेल यांची आयात होते. द्वारका, नवसरी, बिलिमोरा या बंदरांत थोडा व्यापार चालतो. संस्थानच्या कंपनीकायद्यान्वयें संस्थानांत एकंदर औद्योगिक व व्यापारी १११ कारखानें व कंपन्या ( १९२३ पर्यंत ) नोंदल्या गेल्या आहेत.

संस्थानांत आगगाड्या वऱ्याच आहेत. वी. वी. सी. आय; आर. एम. आर; टी. व्ही. आर ; वगैरे मुख्य रेल्वे असून खुद्द संस्थानच्या मालकीचीहि ( जी. वी. एस. आर. ६५२ मैल ) वरीच रेल्वे आहे. पक्क्या खडीच्या सडका फार नाहींत पोष्ट व तारखात्यांची व्यवस्था इंग्रज सरकारच्या हातीं आहे. त्याच्या मोबदल्यांत संस्थानास लागणारा पोष्टांचा ( तिकिटांचा वगैरे ) खर्च इंग्रज सरकार देतें. दुष्काळाचा परिणाम सर्व संस्थानभर एकदम जाणवत नाहीं. द्वारका, वैयत, वेळण, बिलिमोरा वगैरे बंदरांची पहाणी ( व्यापारी दृष्टीनें ) चालू आहे.

संस्थान हिंदुस्थान सरकारच्या देखरेखीखालीं मोडतें. संस्थानचा कारभार कार्यकरी मंडळाच्या तत्वानें चालतो. या मंडळांत दिवाण, अमात्य व इतर तीन मिळून पांच मुख्य अंमलदार असतात. मंडळावर दिवाणाचा व महाराजाचा अधिकार असतो. खालसा मुलखाप्रमाणेंच पुष्कळ प्रकारचीं खातीं निर्माण केलीं असून, त्यांच्यावर इकडील अधिकाऱ्यांसारखे अधिकारी नेमलेले आहेत. राज्यांत चार प्रांत व ४२ महाल आहेत. प्रत्येक प्रांतावर एक सुभा व चार सुभ्यांवर एक सरसुभा असतो. सुभ्याच्या हाताखालीं नायबसुभा व त्याखालीं वहिवाटदार असतो. स्थानिक स्वराज्याची वाढ करण्यासाठीं पुष्कळ ठिकाणीं ( जेथें १ हजारावर लो. सं. आहे तेथें ) ग्रामपंचायती स्थापन करण्यांत आल्या असून ( १९०२ पासून ) त्यांना बरेचसे अधिकार दिले आहेत. त्यांत ५ पासून १० पर्यंत सभासद असून निम्मे लोकनियुक्त असतात. न्यायमंत्र्याच्या हाताखालीं एक न्यायखातें स्थापिलें असून तेथें ( महाराजच्या संमतीनें ) कायदे तयार होतात. एक कायदेमंडळ उर्फ धारासभा असून तींत लोकनियुक्त व सरकारनियुक्त सभासद असतात. त्याचा अध्यक्ष दिवाण असतो. सरकारी जादा सभासद ५, सरकारी ६, सरकारनियुक्त ४ व लोकनियुक्त १० मिळून २५ सभासद असतात. खुद्द वडोद्यास एक सर्व संस्थानचें हायकोर्ट आहे. हायकोर्टावरील ( कांहीं बाबतींत ) अपीलें महाराजांकडे जातात व त्यांचा निकाल तीन सभासदांच्या हुजूर न्यायसभेच्या सल्ल्यानें महाराज करतात. संस्थानांत ५०८६ कवायती व ३८०६ बिनकवायती सैन्य आहे. तैनाती फौजेबद्दल इंग्रज सरकारास सालिना ३.७ लाख रु. द्यावे लागतात. एकंदर म्युनिसिपालिट्या ११ ( १९२२ ) असून त्यांचा अध्यक्ष सरकारी अधिकारी असतो.

सन १९२२–२३ मध्यें संस्थानचें एकंदर उत्पन्न २२१२६४९१ रु. व खर्च २११३८८६६. रु. झाला. उत्पन्नांपैकीं मुख्य बाबी जमीनमहसूल ( ११३६३५५९ ), अबकारी ( २९३९९५३ ), अफू ( ६१७८४४ ), आगगाडी ( १२९१३५३ ), व्याज ( १३४९९७२ ), मांडलिकांकडील (रेवाकांठा, महीकांठा, काठेवाड, पालनपूर व मियागाम इकडील)

खंडणी ( ६६६३८९ ) या आहेत. पूर्वी संस्थानचें बाबाशाही नाणें व टांकसाळ होती. परंतु बट्टा वगैरे फार पडूं लागल्यानें ती बंद होऊन हल्लीं ( १९०१ पासून ) इंग्रजी नाणें सुरू झालें आहे. मांडलिकांकडून मिळणारी खंडणी इंग्रज सरकामार्फत वसूल होते. महाराजांचा खानगी खर्च ( खाजगी राजमहाल व हुजूर राज्यकारभार मिळून ) जवळ जवळ २९ लाख ( १९२२ ) आहे. संस्थानची एक(वडोदा) बँक आहे.

संस्थानांत निरनिराळ्या प्रकारच्या २८३६ शिक्षणसंस्था असून, त्यापैकीं ६८ संस्थांत इंग्रजी शिक्षण मिळतें. वडोदें कॉलेज मुंबई युनिव्हर्सिटीस जोडलेलें आहे. संस्थानांत पुष्कळशीं हायस्कुलें, औद्योगिक शाळा, मागसलेल्यांच्या व अस्पृश्यांच्या गायनाच्या, संस्कृत शिक्षणाच्या शाळा आहेत. प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें आहे. १८७१ सालीं शिक्षणखातें स्थापन झालें. संस्थानांत खेड्यापाड्यांत व फिरतीं अशीं ७२२ वाचनालयें आहेत. खुद्द वडोद्यास १ लाख पुस्तकांचें एक मध्यवर्ती वाचनालय आहे. आयुर्वेदास उत्तेजन देण्यासाठीं सरकारी पाठशाळा पाटण येथें आहे. गेल्या (१९२१ च्या) खानेसुमारींत साक्षरतेचें प्रमाण शेंकडा दहा निघालें. शिक्षणाकडे एकंदर ३०१०००५ रु. खर्च होतो. सर्व प्रकारच्या शिक्षणाकरितां संस्थानच्या खर्चानें परदेशीं पुष्कळ विद्यार्थी पाठविले जातात. प्रौढ स्त्रियांसाठीं ज्ञानावर्ग आहेत व बालचरांचें शिक्षण सुरू आहे. सिनेमा व मॅजिक लॅटर्न यांच्या योगानेंहि शिक्षण दिलें जातें.

न्याय व अम्मलबजावणी यांची फारकत १९०४ सालापासून केली आहे. खेडेगांवांतहि कांहीं मुनसफ नेमलेले आहेत. फांशीच्या शिक्षेस महाराजांची संमति लागते. सरदारदरकदारासाठीं एक स्वतंत्र सरदारकोर्ट आहे. आरोग्यासंबंधीं किरकोळ खटले गांवचा पाटील चालवितो, त्यासंबंधांत त्याला ५ रु. दंड व ४८ तास कैद देण्याचा अधिकार आहे. गांवाची आरोग्यव्यवस्थाहि तोच पहातो. सरकारी निरनिराळ्या खात्यांतील तक्रारींची चौकशी खातेनिहाय सदर अदालत कोर्टाकडे होते.

संस्थानांत शेतीची रयतवारी पद्धतच सुरू आहे; तरीपण तींत पुढील कांहीं प्रकार आहेत—कांहीं विशिष्ट ठेक्याच्या पद्धतीनें दिलेल्या जमिनीस वारखली पद्धत म्हणतात. जमीनमहसूलखात्यात वारखलीखातें स्वतंत्र आहे. या रीतीनें शेतच नव्हे तर गांवेंच्या गांवेंहि ठेक्यानें देतां येतात. या जमिनी खेडण्यास गिराशिया लोक घेतात. धर्मादाय; देवस्थानइनामांस नकरी म्हणतात. नोकरीबद्दल सरकाराकडून देण्यांत येणाऱ्या जमिनीस नोकरयात म्हणतात. ती घेणाऱ्यास विकण्याचा अथवा गहाण ठेवण्याचा अधिकार नाहीं. गांवकामगारांच्या जमिनीस पासीत म्हणतात. मागसलेल्या जंगली लोकांकडून ऐनजिन्नसरूपानें सारा घेतात. एकरीं ७ रु. दरानें सरकारी ट्रक्टर शेतकऱ्यास नांगरण्यास देतात. शेतजमिनीची वांटणी अमुक एकरांखालीं करूं नये व जमीन गहाण टाकतांना कुटुंबपोषणापुरती जमीन शेतकऱ्यास ठेवावी असे कायदे सरकारनें केले आहेत. शेतीविषयक माहितीचें 'खेडूत' पंचांग छापण्यांत येत असतें. रयतवारीखेरीज भागदारी, नरवदारी, अंकदबंदी व एकंकडी अशा सारावसुलीच्या चार पद्धती कांहीं भागांत प्रचलित आहेत. संस्थानांत गरीब लोकांस खिचडी वाटण्यांत येते. धर्मादाय खातीं ८८ हजारांपर्यंत खर्च होतो, यांत श्रावणमासदक्षणा ५ हजार असते.

अफूची लागवड, विक्री वगैरेंचा हक्क फक्त सरकारचा आहे. अमरेलीस मीठ होतें. नवसरी प्रांतांत ताडीचा खप फार आहे, जातीवार व धंदेवार असे पुष्कळ कर पूर्वी होते; १९०५ सालीं त्यांची संख्या २१४ होती व उत्पन्न ८५००० होतें. मोठमोठ्या शहरीं सरकारी डेअऱ्या ठेवल्या आहेत. निरनिराळ्या कोऑपरेटिव्ह सोसायट्या ४५० वर आहेत.

तालुका व जिल्हा लोकलबोर्डांत आणि म्युनिसिपालिट्यांत निम्मे लोकनियुक्त सभासद असतात. लोकलफंडापैकीं ¼ रकम दुष्काळासाठीं शिल्लक ठेवतात. १ हजार वस्तीच्या खेड्यात ग्रामपंचायत स्थापतात. कांहीं ठिकाणीं विशिष्ट पंचायती असून त्यानां पंचायत व म्युनिसिपालिटीचा अधिकार आहे. औद्योगिक शिक्षणासाठीं कलाभुवन ही संस्था १८९० सालीं स्थापिली. यात औद्योगिक शाखांचें ज्ञान मिळतें. महाराजांनीं २ लाख रु. चें व्याज वाङ्मयाभिवृद्धीसाठीं कायमचें दिलें आहे. हल्लीं ( १९२५ ) संस्थानांत प्रेस ॲक्ट लागू आहे; त्यामुळें १९२१-२२ सालीं ७ नवीन छापखाने निघाले तर ५ बंद झाले.

प्रां त.—या प्रांतांत अकरा तालुके ( व लष्कर आणि वडोदें शहर ) आहेत. नर्मदा व मही या दुआबांत हा प्रांत आहे. यांत वडोदें, पादरा, पेटलाद, डभई, सोजिया, आणि सिनोर हीं प्रसिद्ध शहरें आहेत. या प्रांतांत शें. ९३ लोक गुजराथी भाषा बोलतात. जमीन काळी, उत्तम व पिकाऊ असून तिला खताची विशेष जरूर नसते. पेटलाद तालुका तंबाखूसाठीं प्रसिद्ध आहे. डभईस पागोटीं, खोजित्रा, पेटलाद व चाकोळ येथें कापड, खादी, कुलुपें व वडोद्यास जरीचें व कशिद्याचें काम आणि दागदागिने तांब्यापितळेचीं भांडीं होतात. बहुतेक तालुक्यांस म्युनिसिपालिटी आहे. प्रांतांत एक महारोग्यांचा, एक वेड्यांच्या व इतर १० दवाखाने आहेत.

ता लु का.—वडोदें शहर व छावणी यांखेरीज यांत १११ गांवें आहेत; पाच नद्यांपैकीं विश्वामित्री व मही या मोठ्या आहेत. जमीन बहुतेक काळी आहे. कापसाचा पेरा बराच आहे. क्षे. फ. २६९ चौ. मै. व लो सं. सु. ६६ हजार.

श ह र.—हीं संस्थानची राजधानी विश्वामित्रीच्या कांठावर, मुंबईपासून २४४॥ मैलांवर आहे. लष्करासह शहराची लोकसंख्या ( १९२१ ) ९४७१२ असून तींत ८१

१७४६०

